

विवेक
आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण

# शिल्पकार चरित्रकोश

ही गाथा कर्तृत्वाची! प्रगल्भ नेतृत्वाची!

# ॥ चित्रपट आणि संगीत ॥

इतिहास । साहित्य । विज्ञान व तंत्रज्ञान आणि शिक्षण । न्यायपालिका • प्रशासन • संरक्षण । कृषी • सहकार । दृश्यकला । चित्रपट • संगीत ।
नाटक • क्रीडा । समाजकारण • पत्रकारिता • राजकारण । उद्योग • अर्थकारण • भविष्यवेध । धर्म • अध्यात्म • ललितेतर साहित्य । आरोग्य ।



# आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
# शिल्पकार चरित्रकोश

खंड ७
भाग १

## चित्रपट

**संपादक**
सुधीर वासुदेव नांदगावकर

**खंड निर्मिती सहयोग**
व्ही. शांताराम चलत् चित्र शास्त्रीय अनुसंधान
और सांस्कृतिक प्रतिष्ठान

**खंड अर्थ सहयोग**
कै. दादासाहेब फाळके चित्रनगरी, मुंबई

**प्रकल्प प्रायोजक**
दि सारस्वत को-ऑप. बँक लि.

**प्रकाशक**
**साप्ताहिक विवेक**
**(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)**

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश, खंड ७
भाग–१ : चित्रपट

**साप्ताहिक विवेक** (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

**पहिली आवृत्ती**
फाल्गुन शु. १४ शके १९३५/१५ मार्च २०१४

**प्रकाशक**
साप्ताहिक विवेक (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत,
३९६, स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी,
मुंबई – ४०० ०२५.
दूरध्वनी : (०२२) २४२२ ९४५१
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६
e-mail : charitrakosh@gmail.com
Website : www.maharashtranayak.com

**अक्षरजुळणी, सजावट आणि मुखपृष्ठ**
वीणा कुलकर्णी

**मुद्रक**
सिद्धी ऑफसेट प्रा. लि. प्रभादेवी, मुंबई – २५.

**मुद्रितशोधन**
सुधांशु नूलकर

**मूल्य :** १२०० रुपये



# चित्रपट खंड

**संपादक**
सुधीर वासुदेव नांदगावकर

**सहसंपादक**
डॉ. अर्चना कुडतरकर

**संपादकीय सल्लागार**
कै. द.भा. सामंत
श्री. सतीश जकातदार
श्री. श्रीकांत बोजेवार
श्री. मधू पोतदार
श्री. शशिकांत किणीकर
श्री. दिलीप ठाकूर

**विशेष आभार**
पुणे मराठी ग्रंथालय
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय
दादर सार्वजनिक वाचनालय
साधना मिडिया सेंटर
राष्ट्रीय फिल्म संग्रहालय
आशय फिल्म क्लब
प्रभात फिल्म कंपनी
श्री. कांचन नायक
श्री. नारायण फडके
श्री. चारुदत्त सरपोतदार
श्रीमती स्नेहा अवसरीकर
श्री. अभिजित पेंढारकर
श्री. महेश टिळेकर (संपा. मराठी तारका)

# भूमिका



'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण-शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पातील सातवे पुष्प म्हणजे 'चित्रपट व संगीत खंड' हे दोन्ही एकत्रितपणे प्रकाशित होत आहेत. हे खंड वाचकांच्या हाती देत असताना आम्हाला आनंद होत आहे. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक जडणघडणीपासून भविष्यकालीन महाराष्ट्राचा वेध घेण्यापर्यंत या प्रकल्पाची व्याप्ती आहे. महाराष्ट्राचा इतिहास, वर्तमान व भविष्य या संबंधीची एक व्यापक जाणीव या निमित्ताने वाचकांपुढे ठेवत आहोत.

संगीत ही मानवाला मिळालेली आदिम प्रेरणा असल्याने त्याची अभिव्यक्ती ही तेवढीच जुनी व परंपरागत आहे. संगीत या एकाच संज्ञेमध्ये गायन, वादन आणि नर्तन या तिन्ही कलाप्रकारांचा समावेश होतो. महाराष्ट्रात संगीत हे लोकगीत, भक्तिगीत, लावणी, नाट्यगीत आणि परंपरागत घराणी अशा विविध माध्यमातून पाझरले आहे. संगीत हे समाजाभिमुख करण्यात संगीत नाटकांचा महत्त्वाचा वाटा आहे आणि म्हणूनच संगीत नाटकाचा काळ हा संगीतासाठी व अभिनयासाठी सुवर्णकाळ मानला जातो. त्यानंतर ही जबाबदारी चित्रपटांनी उचलली आणि ती आजतागायत कायम आहे. पारंपरिक घराण्यांद्वारे शास्त्रीय संगीताची जोपासना ही आजही होत असून ही परंपरा तेवढीच समृद्ध आहे याचा अवघ्या महाराष्ट्राला अभिमान आहे. शास्त्रीय संगीतामध्ये फ्यूजन हा प्रकारही हळूहळू रुजतो आहे असे चित्र दिसत असले तरी शास्त्रीय संगीतातील अभिजाततेमध्ये मराठी माणूस जास्त रमतो असे दिसते. महाराष्ट्रातील संगीत क्षेत्रातील स्थित्यंतरे विविध चरित्रनायकांच्या चरित्रांमधून आपोआपच उलगडली गेली आहेत. संगीत खंडाच्या प्रारंभिक कार्यात डॉ. अशोक रानडे यांचे मौलिक मार्गदर्शन लाभले होते. त्यांच्या निधनानंतर या खंडाला पूर्णत्वाकडे नेण्याची जबाबदारी चैतन्य कुंटे व माधव इमारते यांनी उचलली. हा खंड आज वाचकांच्या भेटीस येत आहे यामागे त्यांचे खूप मोठे परिश्रम आहेत. आम्ही या संपादकद्वयाचे मनःपूर्वक आभार मानतो.

मराठी समाजाला आधुनिकतेकडे नेण्यासाठी चित्रपटांनी मोठा हातभार लावला आहे. लुमिए बंधूंचा नॉव्हेल्टी थिएटरमध्ये चलत्‌चित्रांचा खेळ पाहून सावेदादा यांनी १८९८ मध्ये अनुबोधपट बनवला. देशी चलचित्राचा आरंभ एका मराठी माणसाने केला ही अभिमानास्पद घटना आहे. भारतीय चित्रपट उद्योगाचे जनक दादासाहेब फाळके यांनी १९१३ साली 'राजा हरिश्चंद्र' हा संपूर्ण भारतीय बनावटीचा पहिला मूकपट बनवला. प्रभात फिल्म कंपनीचा पहिला बोलपट 'अयोध्येचा राजा' हा व्ही. शांताराम यांनी बनवला. असे असतानाही मराठी अभिजन खऱ्या चित्रपटमाध्यमापासून दूर आहेत. केवळ रंजनपर विषयांत गुंतून राहण्याची कोंडी अध्यापही मराठी चित्रपट पूर्णत्वाने फोडू शकलेला नाही. देशातील चित्रपट उद्योग शंभरी पूर्ण करत असताना प्रकाशित होणाऱ्या या चित्रपट खंडातून या काळातील स्थित्यंतराचा आलेख विविध शिल्पकारांच्या चरित्रांच्या माध्यमातून वाचकांसमोर उभा राहणार आहे. या सर्व महानायकांचे योगदान पाहून त्यातून या उद्योगाला प्रेरणा मिळावी असे वाटते. चित्रपट खंड पूर्णत्वास नेण्यासाठी या खंडाचे संपादक सुधीर नांदगावकर यांनी मनापासून परिश्रम घेतले. तसेच प्रभात चित्र मंडळाचेही सहकार्य आम्हास लाभले आहे. याबद्दल त्यांचेही आम्ही मनापासून आभार मानतो.

हा प्रकल्प यशस्वी करण्यासाठी स्वयंप्रेरणेने किंवा आमच्या विनंतीला मान देऊन विविध विषयांतील तज्ज्ञ, पुरस्कर्ते व ग्राहक यांचे सहकार्य लाभले आहे, लाभत आहे; त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. अशा प्रकारचा प्रकल्प भरीव अर्थसाहाय्याशिवाय पूर्ण होऊ शकत नाही. या साहाय्यासाठी प्रमुखत: दि सारस्वत को-ऑप. बँक व कीर्तने - पंडित इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी यांनी तसेच अन्य प्रायोजकांनी सहकार्य दिले. त्यामुळे हा प्रकल्प थोडा अधिक काळ घेऊन का होईना, पण निश्चितपणे पूर्ण होईल असा आम्हाला विश्वास वाटतो.

**- दिलीप करंबेळकर**

## साप्ताहिक विवेक

**प्रबंध संपादक**
दिलीप करंबेळकर

**व्यवस्थापक**
शहाजी जाधव

**संपर्क प्रमुख (विवेक समूह)**
किरण शेलार

**कार्यकारी संपादक**
अश्विनी मयेकर

**सह कार्यकारी संपादक**
रवींद्र गोळे

**प्रतिनिधी प्रमुख**
राहुल पाठारे

**पुस्तक प्रकाशन विभाग**
शीतल खोत

**कार्यालयीन साहाय्य**
आदिनाथ पाटील, अनंत मालप

**जाहिरात विभाग सहप्रमुख**
राकेश सोनार, सचिन जाधव

**व्यवसाय प्रतिनिधी**
प्रदीप निकम, दयानंद शिवशिवकर,
कृष्णात कदम, संतोष शिर्सेकर,
मुकुंद नाईक, विजय पुसे,
योगेश होतेकर

**हिंदी विवेक**
अमोल पेडणेकर (मुख्य कार्यकारी अधिकारी)
अजय कोतवडेकर

# प्रकल्प समिती

## मार्गदर्शक समिती
एकनाथ ठाकूर (माजी खासदार)
सुरेश हावरे
डॉ. गिरीश वासुदेव
राधाकृष्ण विखे-पाटील

## सल्लागार मंडळ
श्रीराम दांडेकर
देवेंद्र देवस्थळे
संजय हेगडे
रवींद्र प्रभुदेसाई
राहुल सोलापूरकर
(संपर्क समन्वयक)

## संपादकीय समिती
डॉ. रा.श्री. मोरवंचीकर
डॉ. बाळ फोंडके
डॉ. भा. र. साबडे
डॉ. द. र. बापट
अरुण टिकेकर
वसंत रोकडे
सुहास बहुळकर
सुधीर नांदगावकर
जयराज साळगावकर
सूर्यकांत पाठक
विद्याधर ताठे
डॉ. अरुणा ढेरे
ले.ज.द.ब. शेकटकर
डॉ. अरुणचंद्र पाठक
अभय टिळक

## सुकाणू समिती

**प्रबंध संपादक**
दिलीप करंबेळकर

**मुख्य कार्यकारी अधिकारी**
महेश पोहनेरकर

**प्रकल्प कार्यकारी संपादक**
दीपक हनुमंत जेवणे

**उपसंपादक**
सुपर्णा कुलकर्णी
डॉ. अर्चना कुडतरकर

**व्यवस्थापकीय समन्वयक**
शहाजी जाधव

**विक्री समन्वयक**
धनाजी जाधव

**आभार**
सारस्वत को-ऑप. बँक
के.पी.आय.टी., पुणे
पिनॅकल ग्रुप

# चित्रनगरीची सुसज्ज पावले



'चित्रनगरी' हे नुसते नाव उच्चारले तरी दिवसाही चित्रतारकारूपी तारांगण नजरेसमोर चमकू लागते. इथे सूर्य उगवतो, पण इथला प्रकाश कधीच विझला जात नाही. कारण चोवीस तास फ्लडलाईटच्या प्रखर झोतात येथे चित्रपटांचे चित्रीकरण होत असते. चित्रनगरी ही अशी जादुई दुनिया आहे, जी कलावंतांच्या कलात्मक प्रेरणेची कसोटी पाहत त्यांच्यातले उत्तम ते आविष्कृत करण्यासाठी त्यांना प्रेरित करते व त्यांच्या कल्पनेतील प्रसंग व पात्रे रूपेरी पडद्यावर अजरामर करण्यासाठी उद्युक्त करते, अशी ही मुंबईची 'चित्रनगरी'!

चित्रपती व्ही. शांताराम, दिग्दर्शक बी. आर. चोप्रा व श्रेष्ठ अभिनेता दिलीप कुमार आदींच्या विनंतीस मान देऊन महाराष्ट्र शासनाने २६ सप्टेंबर १९७७ रोजी चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळाची १९५६ च्या कंपनी कायद्याप्रमाणे स्थापना केली. सन २००१ साली भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक गोविंद धुंडिराम उर्फ दादासाहेब फाळके यांचे नाव देण्याचा ठराव करण्यात आला व आज हे महामंडळ 'कै. दादासाहेब फाळके चित्रनगरी' (फिल्मसिटी) या नावाने प्रसिद्ध आहे.

गोरेगाव (मुंबई)ची चित्रनगरी ही चित्रपटासाठी आवश्यक असणाऱ्या सुविधांनी युक्त असे कलागार संकुल (स्टुडिओ कॉम्प्लेक्स) आहे. नि:संशयपणे हे मुंबईचे सर्वात नेत्रदीपक, ग्लॅमरस व मोठे कलागार संकुल आहे. सुमारे ५२१ एकर क्षेत्रात ही चित्रनगरी वसली असून विहार लेकचे विहंगम दर्शन व संजय गांधी नॅशनल पार्कच्या नैसर्गिक हरितवनाच्या सीमारेषेमुळे चित्रनगरीत प्रवेश केल्यावर मुंबईच्या गर्दी व सिमेंट-काँक्रिट जंगलाचा विसर पडतो.

मागील चार दशकात चित्रनगरीत चित्रित झालेल्या 'देवदास', 'भारत एक खोज', 'जोश'पासून आजच्या अनेक ब्लॉकबस्टर चित्रपटांनी रसिकांचे भरपूर मनोरंजन केले आहे. टी. व्ही.वरचा सर्वाधिक लोकप्रिय गेम शो म्हणजे 'कौन



चित्रनगरीचे मुख्य प्रवेशद्वार



चित्रनगरीत तयार झालेला सेट

बनेगा करोडपती'चे सहा सीजन इथेच चित्रित झाले आहेत. सोळा सुसज्ज कलागारे व चाळीस बाह्यचित्रीकरण स्थळे, खाजगीकरणातून पोस्ट प्रॉडक्शन्सच्या दर्जेदार सुविधांमुळे चित्रनगरी ही हिंदी-मराठी चित्रपट व टी.व्ही. मालिकांसाठी प्रथम पसंतीचे स्थळ झाले आहे. यात नवल ते कसले? एकदा का मुख्य प्रवेशव्दारातून आत प्रवेश केला की, चित्रपट निर्मात्यांना चित्रीकरण निवांतपणे कोणत्याही अडथळ्याविना कलात्मकतेच्या धुंदीत करता येते.

आज शंभर वर्षाचा झालेला भारतीय चित्रपट हा दहा हजार करोड रुपयांपेक्षा जास्त व्याप्तीचा व मोठ्या प्रमाणात रोजगार मिळवून देणारा उद्योग झाला आहे. आज जगभर बॉलीवूड चित्रपटांची चलती आहे. चित्रपट, त्यातील नृत्य-संगीत ही एका अर्थाने आजची संस्कृती झाली आहे. राजकारण घ्या की उद्योग, समाजकारण घ्या की स्वयंसेवी संस्था, कोणतेही क्षेत्र आज भारतीय चित्रपटाच्या प्रभावातून मुक्त व अलिप्त राहू शकलेले नाही. त्यामुळे येत्या २१ व्या शतकात चित्रपट व एकूणच मनोरंजन व्यवसाय मोठ्या प्रमाणात वाढणार आहे, हे निर्विवाद सत्य आहे.

ज्या प्रमाणे आय.टी. क्षेत्रात झपाट्याने बदल होतात आणि बाजारात आणलेले मॉडेल्स व सॉफ्टवेअर जशा चार दोन महिन्यांमध्येच कालबाह्य (Obsolete) ठरतात, त्याच प्रमाणे चित्रपटसृष्टीचे तंत्रज्ञान वेगाने बदलत आहे व जुन्या गोष्टी अडगळीत जात आहेत. त्यामुळे पुढील पन्नास वर्षाचा विचार करता मुंबई ही मनोरंजन क्षेत्राची राजधानी म्हणून अबाधित राहणार आहे. यात चित्रनगरीचा वाटा सर्वाधिक राहावा, यासाठी राज्य शासनाने चित्रनगरीचा कायापालट करून जगातील सर्वोत्तम चित्रनिर्मिती केंद्र विकसित करण्यासाठी बृहत आराखडा तयार केला आहे. तसेच, सिनेपर्यटन ही केवळ चमकदार कल्पना नाही, तर तो प्रचंड आर्थिक उलाढालीचा पर्यटन उद्योग होऊ शकतो हे जाणून बाजारपेठेचा अभ्यास व संशोधन करून चित्रपट केंद्रित पर्यटन अर्थातच 'बॉलिवूड टुरिझम'ला चालना देण्यासाठी भव्य व आकर्षक असे बॉलिवूड म्युझियम बांधण्याचा आराखडा करून तो बृहत आराखड्यात समाविष्ट

केला. त्यास शासनाची मान्यता मिळवून खाजगी-सार्वजनिक तत्त्वावर २०१४ मध्ये प्रत्यक्ष कामास सुरुवात करण्यासाठी महामंडळ (चित्रनगरी) प्रयत्नशील आहे.

या बृहत आराखड्याचे प्रथम वैशिष्ट्य म्हणजे जागतिक दर्जाची चित्रीकरणाची व्यवस्था येथे विकसित केली जाणार आहे. विविध आकाराची सुसज्य अशी ५१ कलागारे (ज्यात लिफ्ट, कॅटवॉक, मेकप् रुम्स, भोजन कक्ष, आदींचा समावेश आहे.), आठ विविध प्रांतीय (महाराष्ट्रासह) गावे व २० सुसज्य बाह्यचित्रीकरण स्थळे निर्माण केली जातील. या खेरीज पोस्ट प्रॉडक्शनसाठी डबिंग, मिक्सिंग या सोयींबरोबर स्पेशल इफेक्ट स्टुडिओ, कारपेंटरी व कपडेपटाचे वर्कशॉपस्, ग्राफिक्स्, ॲनिमेशन व थ्रीडीच्या सुविधा जागतिक दर्जाच्या असतील. चित्रपटक्षेत्रातील निर्मात्यांपासून एक्स्ट्रा कलाकारांच्या मान्यताप्राप्त सर्व संघटनां(सुमारे ४०)साठी एक 'कमर्शिअल हब' असणार आहे, तेथे त्यांना कार्यालये व मिटिंग रूम्स उपलब्ध करून दिल्या जातील. एका वेळी येथे १०० चित्रपट, टी.व्ही. मालिका, जाहिरातींचे चित्रीकरण होऊ शकेल एवढी क्षमता या विभागाची असेल.

बॉलिवूड म्युझियम विकसित झाल्यावर ते केवळ मुंबईचेच नव्हे तर देशाचे एक प्रमुख पर्यटन केंद्र होईल, एवढे नेत्रदीपक, भव्य आणि मनोरंजक संग्रहालय उभारले जाणार आहे. पर्यटकांना १०० वर्षाचा भारतीय चित्रपटाचा प्रवास मनोरंजक पद्धतीने कळेल अशा पद्धतीने वस्तूंची व आकर्षणाची मांडणी नवनवीन Display Technique वापरून केली जाणार आहे. या संग्रहालयात वॅक्स म्युझियम, थ्री डी/फोर चित्रपट दाखवणारे थिएटर, स्टंट सीनचे जिवंत दर्शन (live enactment) चित्रपट ग्रंथालय व संशोधन केंद्र व प्रीव्हू थिएटर ही खास वैशिष्ट्ये असतील. येणाऱ्या देशी-विदेशी पर्यटकांना मराठी संस्कृती कळावी म्हणून खास मराठी संस्कृती संग्रहालय व पर्यावरणाशी दोस्ती व्हावी म्हणून जागतिक दर्जाच्या बायो डायव्हर्सिटी पार्क, तसेच थ्री राईड्सनी युक्त मनोरंजन नगरी यामुळे पर्यटकांना एकदा नाही अनेकवार येण्याचा मोह होईल, असे हे पर्यटन केंद्र असणार आहे.

चित्रपटसृष्टीची गरज भागवण्यासाठी टेलीपोर्ट व आर्काइव्ह, कलावंतांसाठी क्लबहाऊस, निवासव्यवस्था, चित्रपट महोत्सव पारितोषिक समारंभ व व्यापारी संमेलनासाठी भारतातले सर्वात मोठे ५००० आसन क्षमता असलेले कन्व्हेंशन सेंटर आणि दर्जेदार पायाभूत सुविधा निर्माण करण्यात येणार आहेत.

थोडक्यात सांगायचे झाले, तर चित्रनगरीचा बृहत आराखडा पूर्णपणे अंमलात येईल तेव्हा केवळ हिंदी-मराठी नव्हे तर भारतीय व आंतरराष्ट्रीय चित्रपट व टी.व्ही. मालिकांची निर्मिती येथे मोठ्या प्रमाणावर होऊन भारताचे बॉलीवूड अधिक मोठे होऊन हॉलिवूडची केवळ टक्करच नाही तर बरोबरी करू शकेल, एवढी सुविधा व आधुनिक तंत्रज्ञान चित्रनगरीत उपलब्ध असेल. दररोज १५ ते २० हजार पर्यटक बॉलीवूड म्युझियमला भेट देतील आणि त्यातून रोजगार निर्मितीस जोमदार चालना मिळेल.

चित्रपट हा केवळ व्यवसाय नाही, तर तो कलाविष्कार आहे. दृक्‌श्राव्य माध्यमाच्या सामर्थ्यामुळे त्याचा प्रभाव अधिक खोल व गहिरा असतो. साहित्य, संगीत, नृत्य, ध्वनी, चित्र, प्रकाश या सर्व कलांचा मेळ चित्रपटात होत असल्यामुळे कलात्मक आविष्कारासाठी केवळ आकाशाशीच सीमा असू शकते. अशा या चित्रपटाच्या निर्मिती व सुविधेसाठी चित्रनगरीचा बृहत आराखडा कलावंतांना मदतगार सिद्ध होणार हे नि:संशय!.

**– लक्ष्मीकांत देशमुख**

✻ ✻ ✻

# एक चित्रपट चळवळ





## व्ही. शांताराम चलत् चित्र शास्त्रीय अनुसंधान और सांस्कृतिक प्रतिष्ठान

व्ही. शांताराम यांनी प्रभातमधून बाहेर पडल्यावर मुंबई येथे राजकमल स्टुडिओची स्थापना केली. अनेक पुरस्कारप्राप्त चित्रपटांची निर्मिती करणाऱ्या स्टुडिओचा प्रवास आजही अव्याहतपणे सुरू आहे. १८ नोव्हेंबर १९७७ रोजी व्ही. शांताराम यांच्या पुढाकारानेच 'व्ही. शांताराम प्रतिष्ठान'ची स्थापना झाली. पुढे व्ही. शांताराम यांच्या निधनानंतर स्टुडिओची आणि प्रतिष्ठानची जबाबदारी किरण शांताराम यांच्यावर पडली आणि या प्रतिष्ठानच्या रूपाने त्यांनी चित्रपटसृष्टीला एक अभ्यासपूर्ण केंद्राची जोड दिली. पण केवळ चित्रपटांची निर्मिती करण्याचा उद्देश या प्रतिष्ठानच्या उभारणी मागे नव्हता, तर एका अर्थाने ती चित्रपट चळवळीची उभारणी होती, असे आज मानले पाहिजे.

या प्रतिष्ठानने चित्रपटांच्या निर्मितीबरोबरीनेच चित्रपटाच्या इतिहासाचे दस्ताऐवजीकरण करण्याला प्राधान्य दिलेले आहे. म्हणूनच चित्रपटसृष्टीत स्वत:चे वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण करणाऱ्या व्ही. शांताराम यांच्या जीवनाचा आढावा घेणारे 'शांतारामा' हे मधुरा जसराज या त्यांच्या कन्येची संकल्पना व शब्दांकन असणारे आत्मचरित्र १० एप्रिल १९८६ रोजी प्रतिष्ठानने प्रकाशित केले. हे आत्मचरित्र मराठी, हिंदी आणि इंग्रजी या तिन्ही भाषांमध्ये भाषांतरित केले गेले, हे विशेष. तसेच त्यांच्यावरील माहितीपटाची निर्मिती मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांमध्ये करण्यात आली. 'द पोर्ट्रेट ऑफ अ पायोनियर' या डॉ. व्ही. शांताराम यांच्या जीवनपटामध्ये, १९२० ते १९९० या सत्तर वर्षांच्या कालावधीतील त्यांच्या वैयक्तिक तसेच चित्रपट कारकिर्दीच्या वाटचालीचा वेध घेतलेला आहे. प्रतिष्ठानने या व्यतिरिक्त वसंत साठे-'बखर सिनेमाची', श्रीकांत बोजेवार-'वास्तववादी सिनेमा' तसेच संजित नार्वेकर-'अराव्हयल ऑफ सिनेमा इन इंडिया' (संकलन), या पुस्तकांचेही प्रकाशन केलेले आहे. किरण शांताराम यांनी आपल्या 'लिगसी ऑफ रॉयल लोटस' या इंग्रजी भाषेतील पुस्तकात 'वडील-गुरू-शिष्य' या अनुषंगाने पिता-पुत्र यांच्यामधील नातेसंबंधांचा उलगडा केला आहे.

व्ही. शांताराम यांच्या निधनानंतर १९९३ पासून त्यांच्या वाढदिवशी, १८ नोव्हेंबर रोजी 'व्ही. शांताराम' हा पुरस्कार सर्व भारतीय भाषांमधील चित्रपटांसाठी देण्याची प्रथा सुरू झाली. यामध्ये उत्कृष्ट चित्रपट दिग्दर्शनाचे व निर्मितीचे प्रत्येकी तीन पुरस्कार देण्यात येतात. सामाजिक संदेश, प्रबोधन, मार्गदर्शन व मनोरंजन यांचा योग्य समन्वय साधणाऱ्या चित्रपटांचाच विचार या पुरस्कारांसाठी प्रामुख्याने केला जातो.

भारतीय चित्रपटाचा जन्म, वाटचाल आणि त्याचा विकास यांबाबतचे शंभर वर्षांतील तपशील चित्रपट अभ्यासकांना व संशोधकांना सहजपणे संगणकामार्फत उपलब्ध व्हावेत, यासाठी प्रतिष्ठानने उभारलेले 'डिजिटल ग्रंथालय' सोयीचे व उपयुक्त आहे. त्यात सातत्याने नवीन तपशीलांची भर पडत आहे, हे विशेष. याच बरोबरीने चित्रपटाची भाषा, सेन्सॉर प्रमाणपत्राचे तपशील, चित्रपटाची लांबी, कृष्णधवल अथवा रंगीत चित्रपटाचे तंत्र, एकूणच चित्रपटाचे स्वरूप, संगीतकार, गीतकार, पार्श्वगायक, संगीत हक्क यांबाबतचे तपशीलही या ग्रंथालयात अभ्यासकांना, समीक्षकांना सहज उपलब्ध आहेत. चित्रपटांसाठी दिली जाणारी पारितोषिके, त्या संदर्भातील तपशील, तसेच राज्य व राष्ट्रीय पारितोषिकांबाबतची सर्व माहितीही येथे उपलब्ध आहे. येथे चित्रपटविषयक

पुस्तकांचा मोठा खजिना असून एकूण दहा हजार पुस्तके आहेत. त्यात भारतीय चित्रपट व चित्रपटसृष्टी यांवरील पाच हजार पुस्तके अभ्यासकांना वाचायला मिळतात. तसेच चित्रपटसृष्टीचा इतिहास उलगडून दाखवणाऱ्या 'फिल्म इंडिया' या मासिकाचे सर्वच्या सर्व अंक उत्सुक वाचकांनाही पाहायला मिळतात. भारतीय आणि पाश्चात्य चित्रपटविषयक संदर्भग्रंथांची उपलब्धता हेही या ग्रंथालयाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. 'ट्रेड गाईड' व 'फिल्म इन्फर्मेशन' या चित्रपटसृष्टीच्या व्यवसायविषयक माहिती देणाऱ्या साप्ताहिकांचे सर्व अंक येथे उपलब्ध असण्यामागे प्रतिष्ठानने बाळगलेली दूरदृष्टी आढळून येते.

ग्रंथालयाव्यतिरिक्त प्रतिष्ठानच्यावतीने चित्रपट समीक्षा व अभ्यास यांचे अभ्यासक्रम घेण्यात येतात. तसेच चित्रपटसृष्टीत महत्त्वाचे असणारे 'कोल्हापूर स्कूल' या संदर्भातील चर्चासत्राचे आयोजन करण्याची महत्त्वपूर्ण कामगिरीही प्रतिष्ठान पार पाडते.

चित्रपटसृष्टीच्या इतिहासाचे जतन व संवर्धन करण्याचे काम हिरिरीने करण्याऱ्या या प्रतिष्ठानची भविष्यकाळातील पावलेही जोमदार पडणार आहेत, हे त्यांनी केलेल्या नियोजनावरून सहज दिसून येते. या नियोजनामध्ये अंतर्भाव आहे तो प्रतिष्ठानचे संकेतस्थळ (वेबसाईट) सुरू करण्याचा. या संकेतस्थळावर आत्तापर्यंतच्या मराठी व हिंदी चित्रपटांची सविस्तर माहिती उपलब्ध होणार असून चित्रपटसृष्टीतील बुजुर्ग कलाकारांच्या घेतलेल्या सविस्तर मुलाखती चित्रपट रसिकांना येथे ऐकायला मिळतील. आत्मकथनात्मक स्वरूपाच्या या मुलाखतींमधून त्या त्या मान्यवरांच्या यशोगाथा त्यांच्याच शब्दांत मांडल्या जातील. तसेच प्रतिष्ठानच्या वतीने १९१३-२०१३ या शंभर वर्षांच्या काळात मराठी चित्रपटसृष्टीत निर्माण झालेल्या चित्रपटांची सूची करण्याचे कामही सुरू आहे. यात चित्रपटांची निर्मिती, निर्मिती वर्ष, सेन्सॉरचे तपशील, कलाकार, कथानक, गाणी, दिग्दर्शक, संगीत आदी गोष्टींच्या तपशीलवार नोंदी करण्यात येणार आहेत. त्यामुळे अभ्यासकांना जुन्या चित्रपटांचे तपशील एकत्र आणि एकाच ठिकाणी मिळणार आहेत, याकडेही जाणीवपूर्वक लक्ष वेधले पाहिजे.

मराठी चित्रपटसृष्टीच्या १०० वर्षांच्या वाटचालीत १९७७ साली उदयाला आलेले हे प्रतिष्ठान नवनवीन संकल्पना मांडून चित्रपट चळवळीत मोलाची भर घालते आहे, हे प्रतिष्ठानचे काम पाहताना सहज उमगत जाते.

* * *

# कोशरचना



कोणत्याही कोशाचे वाचन कथा अथवा कादंबरीप्रमाणे सलगपणे केले जात नाही. वाचकास हवा असलेला संदर्भ सुलभपणे आणि शीघ्रतेने उपलब्ध करून देणे, हे कोशाचे प्रमुख प्रयोजन समजले पाहिजे. वाचकांना या कोशाचा उपयोग करणे सोपे आणि सुलभ व्हावे या हेतूने या चरित्रकोशाच्या रचनेबाबत आणि स्वरूपाबाबत माहिती देत आहोत.

**कोशाचे स्वरूप :** कोशाचे दोन मुख्य प्रकार असतात. पहिला प्रकार म्हणजे विशिष्ट विषयाचा व दुसरा प्रकार म्हणजे सर्वविषयसंग्राहक. 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण- शिल्पकार चरित्रकोश' हा पहिल्या प्रकारचा म्हणजे विशिष्ट विषयाचा कोश आहे. या प्रकारच्या कोशरचनेचे काही स्वाभाविक फायदे आहेत. भारंभार माहितीतून आपणास हवी असलेली माहिती शोधून काढणे वाचकाला सुलभ आणि सोपे होणे हा सर्वांत मोठा फायदा आहे. प्रस्तुत कोश हा या प्रकल्पातील 'चित्रपट व संगीत' खंड आहे. या प्रकल्पाचा आणखी एक विशेष म्हणजे हा व्यक्तिचरित्रकोश आहे. त्यामुळे यात व्यक्तींच्या चरित्रनोंदी दिल्या आहेत.

**संपादकीय भूमिका :** या खंडाच्या संपादक-मंडळाने त्या खंडाची एकंदर पृष्ठसंख्या लक्षात घेऊन चरित्रनायकांच्या नोंदींची विभागणी चरित्रनोंद, टिपण नोंद आणि नामोल्लेख नोंद अशी केलेली आहे. वास्तविक पाहता कोणत्याही चरित्रनायकाच्या एकंदर कार्याचा आवाका हा त्याच्या चरित्रकाराशिवाय अथवा चरित्रअभ्यासकाशिवाय अन्य थोरामोठ्या अभ्यासकांनाही सर्व बारकाव्यांनिशी पूर्णपणे लक्षात घेऊन त्याच्या नोंदींची शब्दसंख्या ठरवून अशी विभागणी करणे, हे जिकिरीचे कार्य होते. कारण अशा विषयाधारित चरित्रकोशात एखाद्या चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदानाचा व कार्यकर्तृत्वाचा सांगोपांग तपशीलवार उल्लेख करण्याचे सूत्र स्वीकारले, तर त्या कार्याला काही अंतच राहत नाही. तसेच प्रत्येक चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदान कथन करणे, हे विषयाधारित कोशाचे उपयोजन नाही व नसते, हे लक्षात घेतले पाहिजे. विषयाधारित कोश त्या व्यक्तीच्या अन्यक्षेत्रीय पैलूंबाबत काही ठरावीक मर्यादिपर्यंतच मार्गदर्शन करू शकतो. चरित्रनायकाचे विशिष्ट क्षेत्रातील कार्यकर्तृत्वाचे नेमके चित्रण करण्याचा एक प्रयत्न, म्हणजे विषयाधारित कोश असतो. तरी संपादक मंडळाने आपले सर्व कौशल्य वापरून या सूचीला अंतिम रूप दिलेले आहे.

**विषयाधारित वर्गीकरण :** चरित्रनायकांचे विषयाधारित वर्गीकरण करताना जाणवणारी अडचण अशी की, एका चरित्रनायकाचे योगदान त्या विशिष्ट कार्यक्षेत्रापुरतेच मर्यादित नसून अन्यही क्षेत्रांत त्याने लक्षणीय अथवा भरीव कामगिरी केलेली आहे असे दिसते. अशा परिस्थितीत एकाच चरित्रनायकाच्या नोंदीची पुनरावृत्ती वेगवेगळ्या खंडांत होऊ नये म्हणून अशा सरमिसळ होऊ शकणाऱ्या चरित्रनोंदींसाठी काही मर्यादा व निकष ठरविण्यात आले. त्यानुसार भिन्न खंडांच्या संपादक मंडळांना तशा सूचना देण्यात आल्या. मात्र अन्य खंडांत या चरित्रनायकांची त्या क्षेत्रातील कामगिरी अधोरेखित करणारी टिपणनोंद घेतली जाईल, याचीही दक्षता घेण्यात आली व अशा सर्व टिपणांच्या सुरुवातीलाच सदर चरित्रनायकाची मुख्य नोंद ज्या खंडात आहे, त्या खंडाचे नाव देण्याचीही दक्षता घेण्यात आलेली आहे. जेणेकरून वाचकांना ती संपूर्ण नोंद त्या-त्या टिपणासोबत वाचता येईल.

मुख्य चरित्रनोंद ही एकाच खंडात घेण्याचा निर्णय हा मुख्यत्वे सामायिक मुद्द्यांची उदाहरणार्थ जन्म, बालपण, शिक्षण, कौटुंबिक पार्श्वभूमी, मृत्यू यासारख्या माहितीची पुनरावृत्ती टाळण्यासाठीच घेण्यात आलेला आहे. याचबरोबर मुख्य चरित्रनोंद व टिपणनोंद यांच्या ठिकाणी आणखी एक सुविधा देण्यात आलेली आहे, ती म्हणजे चरित्रनायकाचा एका ओळीत परिचय. हा परिचय वाचल्यानंतर त्या व्यक्तीचे बहुआयामी कार्य वाचकांच्या लक्षात येईल व त्या क्षेत्रांच्या अनुषंगाने त्या-त्या विषयांच्या खंडांत चरित्रनायकाच्या टिपणनोंदी त्यांना वाचता येतील.

या टिपणनोंदीत नेमकेपणाने चरित्रनायकाच्या त्या विशिष्ट क्षेत्रातील कार्याची माहिती येईल व व्यक्तीच्या मुख्य नोंदीत त्याचा चरित्रविषयक तपशील व सोबत त्याचे छायाचित्र देण्यात येईल, असा निर्णय खंडाच्या निर्मितीच्या वेळी घेण्यात आला होता, पण काही चरित्रनायकांच्या कार्याला, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीला विशिष्ट पार्श्वभूमी असते. त्या विशिष्ट परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्या व्यक्तीच्या कार्याचे महत्त्व समजून घेणे आवश्यक असते आणि त्याच्या कार्याचे मूल्यमापन त्या विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भात करणे उचित असते. अन्यथा अर्धवट माहितीच्या आधारावर चुकीची प्रतिमा वाचकांच्या मनात निर्माण होण्याचा संभव असतो. यावर साधकबाधक विचार करून या खंडात महत्त्वाचे दोन बदल स्वीकारण्यात आले आहेत. पहिला बदल म्हणजे चरित्रनायकाच्या कार्याची पार्श्वभूमी विशद होण्याच्या दृष्टीने काही प्रमाणात पुनरुक्तीचा दोष पत्करून पुरेशी माहिती टिपणनोंदीत समाविष्ट करण्यात आली आहे. तसेच वाचकांच्या सुविधेसाठी या टिपणनोंदीसोबत संबंधित चरित्रनायकांची छायाचित्रेही देण्यात आली आहेत.

**चरित्रनोंदींचे स्थूल स्वरूप :** चरित्रकोशातील नोंदींचे स्थूल स्वरूप पुढीलप्रमाणे आहे. नोंदींच्या पहिल्या ओळीत चरित्रनायकाचे आडनाव प्रथम दिले आहे.

उदाहरणार्थ : अभिषेकी, जितेंद्र बाळकोबा; गिंडे, कृष्णराव गुंडोपंत

या सर्वसाधारण धोरणास काही अपवाद करावे लागले आहेत. ते पुढीलप्रमाणे आहेत:

काही चरित्रनायकांची पूर्ण नावे अनेक प्रयत्न करूनही मिळू शकली नाहीत. त्यामुळे उपलब्ध असलेली लघुरूप नावे खंडात नाईलाजाने घेण्यात आली आहेत. उदाहरणार्थ : कल्ले, कृष्णा; कोरगावकर, विठ्ठलराव.

खंडात ज्या नावाने नोंद देण्यात आलेली आहे, ते नाव मोठ्या जाड ठशात पहिल्या ओळीत दिलेले आहे. नंतरच्या दुसऱ्या ओळीत त्या व्यक्तीचे उपनाव-टोपणनाव तिरप्या जाड ठशात दिले आहे.

यानंतरच्या ओळीत त्या व्यक्तीचे एकंदर योगदान दर्शविणाऱ्या क्षेत्रांचा उल्लेख केलेला आहे. त्यापुढच्या ओळीत चरित्रनायकाच्या जन्म व (दिवंगत असल्यास)मृत्यू या तारखा दिल्या आहेत. जेथे जन्म अथवा मृत्यूच्या तारखा उपलब्ध नाहीत तेथे केवळ साल व शक्य झाल्यास महिनासुद्धा दिलेला आहे. जन्म-मृत्यू तारखा उपलब्ध नसल्यास 'जन्म-मृत्यू दिनांक अनुपलब्ध' असे देण्यात आले आहे. यानंतर चरित्रनोंदीच्या मजकुराची सुरुवात करून त्यात चरित्रनायकाची व्यक्तिगत माहिती, शिक्षण, कार्यक्षेत्राची ठिकाणे व पदे, त्यांचे आपल्या क्षेत्रातील कार्य, त्यांनी गाजवलेले कर्तृत्व, ज्या कार्यासाठी ते प्रसिद्ध आहेत त्याची माहिती, त्यांना मिळालेले मानसन्मान आणि पुरस्कार यांचा उल्लेख केला आहे.

**संदर्भसूची :** चरित्रनोंदीत समाविष्ट माहितीची विश्वसनीयता आणि अधिकृतपणा लक्षात यावा या हेतूने नोंदीच्या शेवटी सदर नोंद लिहिण्यासाठी ज्या संदर्भसाधनांचा वापर केला गेला आहे, त्यांची सूची दिलेली आहे. यामागची भूमिका अशीही आहे की, ज्यांना सदर चरित्रनायकांबाबत अधिक अभ्यास अथवा संशोधन करायचे आहे त्यांना त्याचा उपयोग व्हावा. अशा प्रकारचा खंड प्रथमच सिद्ध होत असल्यामुळे संदर्भसाधनांची त्रुटी जाणवली. तरी या संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आली आहे : लेखकाचे नाव, संपादक असल्यास तसा उल्लेख; 'साहित्यकृतीचे नाव', साहित्यकृतीचा प्रकार; प्रकाशक, प्रकाशनस्थळ; आवृत्ती, प्रकाशनवर्ष.

जर नोंद लेखकाने मासिकातील आणि नियतकालिकातील लेखांचा आपल्या लेखनासाठी संदर्भ म्हणून उपयोग केला असेल तर संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आलेली आहे: 'मासिकाचे अथवा नियतकालिकाचे नाव'; प्रकाशन महिना व वर्ष.

हाती आलेल्या अपुऱ्या माहितीमुळे अपवादाने काही ठिकाणी सदरची शिस्त पाळता आलेली नाही, हे वाचकांनी ध्यानात घ्यावे.

ज्या ठिकाणी नामोल्लेख नोंद घेण्यात आलेली आहे. तेथे दोन प्रकार संभवतातः

१. जर त्या व्यक्तीची अन्य खंडात मुख्य चरित्रनोंद दिलेली असेल तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून तेथे 'मुख्य चरित्रनोंद' समाजकारण खंड, पत्रकारिता खंड आदी नमूद करण्यात आलेले आहे.

२. जर त्या व्यक्तीची नोंद याच खंडात अन्यत्र वेगळ्या नावाने दिलेली असेल, तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून ज्या नावाने ती नोंद आढळेल ते नाव देण्यात आले आहे.

**चरित्रनायक वर्गीकरण :** हा विषयाधारित कोश असल्यामुळे यात चरित्रनायकांचा त्यांच्या क्षेत्रातील निकष ठरवून त्यांचा कोशात समावेश करण्यात आलेला आहे. या प्रक्रियेसंबंधीची माहिती प्रत्येक खंडाचे संपादक अथवा समन्वयक यांनी आपल्या संपादकीयात अथवा मनोगतात विस्ताराने दिलेली आहे. तसे पाहता काही व्यक्तींचे कर्तृत्व बहुआयामी असल्यामुळे त्यांची नोंद त्या त्या विशिष्ट खंडात येणे अपरिहार्य असते. उदाहरणार्थ, बालगंधर्व यांची टिपणनोंद संगीत खंडात समाविष्ट केलेली आहे. त्यांची मुख्य नोंद नाट्य खंडात येणार आहे, पण बालगंधर्व हे संगीत नाटकांसाठी व त्यातील पदांच्या गायनासाठी प्रसिद्ध आहेत. त्यामुळे संगीत खंड सिद्ध करताना त्यांची दखल घेणे अत्यावश्यकच आहे. अन्य काही चरित्रनायकांचाही अशाच प्रकारे विचार करण्यात आला आहे.

**अकारविल्हे :**

चरित्रकोशातील वर्णमाला, सर्व नावांचा अकारविल्हे स्वरानंतर व्यंजने असा पुढीलप्रमाणे असेल:

अ अॅ आ ऑ इ ई उ ऊ ऋ

ए ऐ ओ औ (ं) अनुस्वार (ः) विसर्ग

क ख ग घ ङ

च छ ज झ

ट ठ ड ढ ण

त थ द ध न

प फ ब भ म

य र ल व श

ष स

ह ळ

क्ष ज्ञ

कोशात 'अ-ओ' असा स्वरांचा एक विभाग केलेला आहे व पुढे क, ख, ग... असे व्यंजनानुसार विभाग केलेले आहेत. ज्या अक्षराखाली एकही नोंद नाही, ते अक्षर वगळले आहे. वाचकांच्या सोयीसाठी कोशात अनुक्रमणिकेचाही अंर्तभाव केलेला आहे.

**अनुक्रमणिका :** दोन्ही खंडांची अनुक्रमणिकेची रचना ढोबळमानाने पुढीलप्रमाणे आहे. यात चरित्रनोंदीला अनुक्रमांक न देता पहिल्या स्तंभात चरित्रनायकाचे नाव दिले आहे. या नावाच्या आधी मुख्य चरित्रनोंदीसाठी '●', नामोल्लेख नोंदीसाठी '○', टिपणनोंदीसाठी '▲' अशा खुणा देण्यात आलेल्या आहेत.चरित्रनायकाच्या नावानंतरच्या स्तंभात या नोंदींचे पृष्ठक्रमांक दिलेले आहेत. या अनुक्रमणिकेतील शेवटचा स्तंभ 'मुख्य नोंद' असा आहे. पृष्ठक्रमांकावर जर नामोल्लेख नोंद असेल व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद याच खंडात जेथे असेल तो पृष्ठक्रमांक या स्तंभात दर्शविलेला आहे व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद अन्य खंडात असेल तर त्या विशिष्ट खंडाचे नाव या स्तंभात दर्शविले आहे. कोशाबरोबर अनुक्रमणिकेची ही रचनाही वाचकांना उपयोगी ठरेल, असा विश्वास आहे.

– दीपक हनुमंत जेवणे

प्रकल्प कार्यकारी संपादक

* * *

# मनोगत



'चित्रपट खंड' – आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश प्रकल्पातील सातवे, पण या प्रकल्पाच्या कलाविभागातील दुसरे पुष्प. चित्रपटाला कला म्हणावे की नाही? ती विशुद्ध कला आहे की नाही? ही कला श्रेष्ठ की कनिष्ठ? याबद्दल अनेक वाद विचारवंतांमध्ये होत असले तरी चित्रपट हे समाज प्रबोधनाचे प्रभावी माध्यम आहे, याबाबत कोणाचेही दुमत होणार नाही. या प्रकल्पासाठी आपण २०० वर्षांचा कालखंड गृहीत धरत असलो तरी चित्रपटाची कारकिर्दच मुळी १०० वर्षांची असल्यामुळे या क्षेत्राची सुरुवात झाल्यापासून आजपर्यंत या क्षेत्राच्या जडणघडणीत ज्या ज्या कलाकारांचे योगदान लाभले आहे, त्या त्या कलाकारांचा चरित्रात्मक परिचय या खंडात यथोचितपणे करून दिला आहे. खरेतर चरित्रकोशाचे काम करताना पहिली व महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या त्या विषयातील तज्ज्ञांचा शोध घेणे. हा शोध घेत असतानाच या टप्प्यावर चित्रपट अभ्यासक व समीक्षक म्हणून लोकप्रिय असणारे सुधीर नांदगावकर भेटले. त्यांच्या मार्गदर्शनाखालीच या खंडासाठी आवश्यक असणारी चरित्रनायकांच्या नावाची यादी तयार करण्यात आली. ही यादी तयार करताना चरित्रनायक निवडीचे निकष अर्थातच समोर ठेवण्यात आले होते. त्यामध्ये चित्रपटाची संख्या, अभिनयाची लोकप्रियता, भूमिकांमधील वैविध्य, या कलाकारांना राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय पातळीवर लाभलेले महत्त्व, त्यांच्या अभिनयाचा कालावधी या निकषांचा आधार प्रामुख्याने घेतला गेला. हा शोध केवळ अभिनयाच्या अंगाने घ्यावयाचा नसल्यामुळे, अर्थातच त्यात अभिनयाबरोबर दिग्दर्शन, पार्श्वसंगीत, छायाचित्रलेखन, कलादिग्दर्शन या चित्रपटनिर्मितीसाठी आवश्यक असणाऱ्या घटकांचाही तितक्याच साकल्याने विचार केला गेला. संपादकीय सल्लागार मंडळाच्या मदतीने यादी तयार झाल्यावर नोंदी लिहिण्यासाठी चित्रपटसृष्टीशी जवळून संबंध असणाऱ्या लेखकांच्या नावाचा शोध घेतला गेला. लेखकांच्या तयार केल्या गेलेल्या यादीतील मान्यवर लेखकांशी संपर्क साधला गेला.

आलेल्या नोंदी माहितीच्या दृष्टीने अपूर्ण असल्याचे लक्षात आल्यावर त्यावर संपादकीय संस्कार करण्यात जवळपास ६ महिन्यांहूनही अधिक कालावधी गेला. याच काळात माहितीची विश्वासार्हता जपण्यासाठी व चित्रपट कलाकारांविषयी होत असणारे 'गॉसिपिंग' लक्षात घेऊन त्या त्या व्यक्तीची स्वच्छ व सत्य प्रतिमा लोकांसमोर आणण्यासाठी हयात असलेल्या चरित्रनायकांना त्यांच्या त्यांच्या नोंदी दाखवून, त्यातील सत्यता जपण्याचा प्रामाणिक प्रयत्न केलेला आहे. तसेच या नोंदी लिहिताना उपलब्ध संदर्भसाहित्य, प्रत्यक्ष मुलाखती, तसेच हयात नसलेल्या चरित्रनायकांच्या निकटवर्तीयांशी संपर्क साधून माहितीची विश्वासार्हता जपलेली आहे. हे सर्व करत असतानाच माहितीजालावरची माहिती त्रोटक व चुकीची असल्याचा प्रत्यय आला व आपण प्रत्यक्ष त्या त्या व्यक्तीशी संपर्क साधून माहितीची व संदर्भाची विश्वासार्हता जपल्याचा आनंद संस्थेच्या वतीने व्यक्त करतानाही सुखावह वाटत आहे.

कोश वाङ्मयाची शिस्त पाळतच या खंडाचे काम झालेले आहे. हा चरित्रकोश असल्यामुळे यात त्या त्या चरित्रनायकांची छायाचित्रे तर देण्यात आलेली आहेतच, पण त्याच बरोबरीने त्यांच्या कलाकृतीची छायाचित्रेही देण्यात आलेली आहेत. ही छायाचित्रे मिळवण्यासाठी अनेक प्रयास करावे लागले, त्यातून बाहेर पडण्यासाठी थोडा

अवधी लागला असला तरी अखेरच्या क्षणी मदतीचा हात पुढे केला तो, प्रभात चित्रमंडळ आणि फिल्म आर्काइव्ह या संस्थांनी. त्यांनी केलेल्या या मदतीचा उल्लेख येथे आवर्जून केला पाहिजे. या खंडाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे चित्रपटसृष्टीशी संबधित असणाऱ्या महत्त्वाच्या संस्थाबद्दलची परिशिष्टेही यात देण्यात आलेली आहेत. तसेच येथे सगळ्या लेखकांचा नामोल्लेख करत आभार मानता येणे जागेच्यादृष्टीने शक्य नसले तरी त्यांनी केलेल्या कामाची जाणीव संस्थेकडे आहे, त्यासाठीच संस्थेने लेखक परिचयाचे वेगळे परिशिष्ट दिलेले आहे, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.

कोणत्याही कोश वाङ्मयाची पूर्तता करणे म्हणजे कोणत्याही एका व्यक्तीला तत्त्वत: अशक्य असते, असे प्रत्यक्ष काम करताना लक्षात आले. त्यामुळे कोशाचे काम एक सामुहिक आदान-प्रदानाची प्रक्रिया असून त्यामध्ये अनेकांचे हातभार कळत-नकळतपणे लागलेले असतात. या हातभारामध्ये जसा प्रत्यक्ष लेखकांचा सहभाग असतो तसाच तो माहिती पुरवणाऱ्या व्यक्तींचाही असतो. या कामी चारुदत्त सरपोतदार, कांचन नायक, नारायण फडके, अनिल दामले, विनय नेवाळकर, सुभाष भुरके, प्रसाद सुर्वे, महेश टिळेकर, सतीश जकातदार या व्यक्तींचे जसे सहकार्य लाभले, तसेच ते पुणे मराठी ग्रंथालय, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, साधना मीडिया सेंटर, राष्ट्रीय फिल्म संग्रहालय, आशय फिल्म क्लब, प्रभात चित्रमंडळ, फिल्म आकाईव्ह, दादासाहेब फाळके चित्रनगरी या संस्थांचेही लाभले. या संस्थांनी त्यांचे त्यांचे काम केलेले असले तरी या कामाचे महत्त्व लक्षात घेऊन तेथील व्यक्तींनी केलेली मदत निश्चितच कौतुकास्पद आहे, त्यामुळे या कामाशी ते नकळतपणे, पण आपलेपणाने जोडले गेले हे संस्थेच्यादृष्टीने महत्त्वाचे आहे.

खंडाचे काम करताना पाळावयाच्या तारतम्याचे भान मिळवून दिल्याबद्दल प्रबंध संपादक दिलीप करंबेळकर यांचे आभार मानणेही अगत्याचे आहे, तर छायाचित्रांसाठी प्रकल्प कार्यकारी संपादक दीपक जेवणे यांनी दिलेल्या सूचनाही महत्त्वपूर्ण होत्या. संपादकीय कामे करताना सातत्याने बाहेरची कामे करावी लागतात, या प्राथमिक कामांमध्ये नोंदी आणण्याचे काम स्नेहा अवसरीकर यांनी पार पाडले, याबद्दल त्यांचे आभार. इतर अनेक बाहेरची कामे करताना प्रशांत उपासनी, धनाजी जाधव, चेतन मॅडम या माझ्या सहकाऱ्यांचे जसे सहकार्य लाभले, तसेच संपादकीय कामे करताना नेहा वैशंपायन, स्वाती प्रभुमिराशी, चित्रा नातू या नव्याने प्रकल्पाशी जोडल्या गेलेल्या सहकाऱ्यांचेही लाभले, तर वीणा कुलकर्णीने ले-आऊट लावताना दाखवलेली आस्थाही तितकीच महत्त्वपूर्ण आहे.

खंड वाचकांच्या हाती देताना खूप आनंद होत असला तरी या खंडात काही त्रुटी राहिल्या असण्याची शक्यता नाकारता येत नाही. मिळालेली माहिती अधिकाधिक परिपूर्ण व विश्वासार्ह करण्याचा प्रयत्न आम्ही केलेला आहे, पण यात काही कमतरता आढळल्यास वाचक समजून घेतील व आपल्या सूचना आमच्याकडे नक्कीच पाठवतील अशी आशा बाळगतो. त्यामुळे पुढील आवृत्तीत त्या चुका आपल्याला सुधारता येतील, याची खात्री बाळगावी.

धन्यवाद !

– डॉ. अर्चना कुडतरकर
सहसंपादक

* * *

# अनुक्रमणिका





अनुक्रमाणिकेतील संक्षेपांचे स्पष्टिकरण पुढीलप्रमाणे : छायाचित्र.-छायाचित्रकार, कला दि.-कला दिग्दर्शक
●-मुख्य नोंद, ▲-टिपण नोंद, ○-नामोल्लेख नोंद

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ● कदम कामिनी अनिल | ३४ | अभिनेत्री | | | | | |
| ● कदम रामचंद्र वासुदेव | ३६ | | | | संगीतकार | | |
| ○ कर्नाटकी नंदा विनायक | – | अभिनेत्री | | | | | पृ. २७० |
| ○ कर्नाटकी विनायक दामोदर | – | अभिनेता | | | गायक | | पृ. ३०१ |
| ○ कांबळे जीवनकला दत्तोबा | – | अभिनेत्री | | | | | पृ. १२५ |
| ● कांबीकर मधू | ३७ | अभिनेत्री | | | | | |
| ○ कानन कौशल | – | अभिनेत्री | | | | | पृ. २३४ |
| ● कापडी मुरलीधर | ४० | | | दिग्दर्शक | | | |
| ● कामत गजानन रामचंद्र | ४० | | लेखक | | | | |
| ○ कामुलकर जयश्री तुकाराम | – | अभिनेत्री | | | | | पृ. १२० |
| ● काळे आशा रामकृष्ण | ४१ | अभिनेत्री | | | | | |
| ▲ काळे केशव नारायण | ४३ | | लेखक | | | | साहित्य खंड |
| ▲ किणीकर रघुनाथ रामचंद्र | ४४ | | लेखक | निर्माता | | | साहित्य खंड |
| ● किरण शांताराम | ४५ | | | दिग्दर्शक | | | |
| ● कुबल अलका लाडू | ४५ | अभिनेत्री | | | | | |
| ○ कुमार सोहनी | – | | | | | | पृ. ३८८ |
| ● कुलकर्णी अतुल सुधीर | ४७ | अभिनेता | | | | | |
| ● कुलकर्णी उमेश विनायक | ४९ | | लेखक | दिग्दर्शक | | | |
| ● कुलकर्णी गिरीश पांडुरंग | ५० | अभिनेता | लेखक | दिग्दर्शक | | | |
| ● कुलकर्णी चंद्रकांत किसन | ५२ | | | दिग्दर्शक | | | |
| ○ कुलकर्णी दत्ता केशव | – | | | | | | पृ. १५२ |
| ● कुलकर्णी बाळकृष्ण | ५२ | | | दिग्दर्शक | | | |
| ● कुलकर्णी मृणाल रुचिर | ५३ | अभिनेत्री | | | | | |
| ○ कुलकर्णी रेखा जयंत | – | अभिनेत्री | | | | | पृ. १० |
| ● कुलकर्णी सलील श्रीनिवास | ५५ | | | | संगीतकार | | |
| ● कुलकर्णी सुकन्या एकनाथ | ५६ | अभिनेत्री | | | | | |
| ● कुलकर्णी सोनाली व्यंकटेश | ५८ | अभिनेत्री | | | | | |
| ● कुळकर्णी नीना दिलीप | ६० | अभिनेत्री | | | | | |
| ○ के. दत्ता | – | | | | संगीतकार | | पृ. ६८ |
| ○ के. नारायण काळे | – | | लेखक | | | | पृ. ४३ |
| ● कोंडके दादा | ६३ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |
| ● कोंडके विजय धोंडीराम | ६६ | | | दिग्दर्शक | | वितरक | |
| ● कोठारे महेश अंबर | ६६ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ● कोरगावकर दत्ता | ६८ | | | | संगीतकार | | |
| ▲ कोल्हटकर चिंतामण गणेश | ६९ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | नाटक खंड |
| ● खरे संदीप दिलीप | ७१ | | | | संगीतकार | | |
| ● खेडेकर सचिन श्रीकांत | ७१ | अभिनेता | | | | | |
| ● खेबुडकर जगदीश गोविंद | ७४ | | | | गीतकार | | |
| ● खोटे दुर्गा विश्वनाथ | ७५ | अभिनेत्री | | | | | |
| ● खोटे शुभा नंदू | ७८ | अभिनेत्री | | | | | |
| ● गडकर जयश्री गोविंद | ८० | अभिनेत्री | | निर्माती | | | |
| ● गबाले राम नारायण | ८३ | | | दिग्दर्शक | | | |
| ● गांधी लीला माणिकचंद | ८४ | अभिनेत्री | | | | | |
| ● गुप्ते सुमती | ८६ | अभिनेत्री | | | | | |
| ● गोखले कमला रघुनाथ | ८८ | अभिनेत्री | | | | | |
| ● गोखले चंद्रकांत रघुनाथ | ८९ | अभिनेता | | | | | |
| ● गोखले विक्रम चंद्रकांत | ९१ | अभिनेता | | | | | |
| ○ गोगावले अजय अशोक | – | | | | | संगीतकार | पृ. ३ |
| ○ गोगावले अतुल अशोक | – | | | | | संगीतकार | पृ. ३ |
| ● गोर्ले दत्ता गणपत | ९३ | | | दिग्दर्शक | | छाया.चित्र. | |
| ● गोसावी राजा | ९४ | अभिनेता | | | | | |
| ● गौरी | ९७ | अभिनेत्री | | | | | |
| ▲ घाणेकर काशिनाथ बाळकृष्ण | १०० | अभिनेता | | | | | नाटक खंड |
| ● घाणेकर गिरीश गोविंद | १०२ | | | दिग्दर्शक | | | |
| ● घाणेकर गोविंद ब. | १०३ | | | दिग्दर्शक | | | |
| ○ घोरपडे वासंती विनायक | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३४६ |
| ● चंद्रकांत | १०४ | अभिनेता | | | | | |
| ○ चंद्रगिरी लीला | – | अभिनेता | | | | | पृ. ३३२ |
| ● चंद्रमोहन | १०६ | अभिनेता | | | | | |
| ● चव्हाण उषा | १०७ | अभिनेत्री | | | | | |
| ● चव्हाण पद्मा अण्णासाहेब | १०९ | अभिनेत्री | | | | | |
| ● चव्हाण विजय कृष्णराव | ११० | अभिनेता | | | | | |
| ● चांदेकर शंकर विष्णू | १११ | | | | संगीतकार | | |
| ● चिटणीस इंदिरा | ११२ | अभिनेत्री | | | | | |
| ● चिटणीस लीला गजानन | ११४ | अभिनेत्री | | | | | |
| ○ चितळकर, रामचंद्र नरहर | – | | | | | | पृ. ३७६ |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ○चित्रा | – | अभिनेत्री | | | | | पृ. १७६ |
| ●चोणकर नलिनी कृष्णराव | ११५ | अभिनेत्री | | | | | |
| ●चौधरी अंकुश पांडुरंग | ११७ | अभिनेता | | | | | |
| ●जयश्री टी. | ११९ | अभिनेत्री | | | | | |
| ●जयश्री शांताराम | १२० | अभिनेत्री | | | | | |
| ●जागीरदार गजानन जनार्दन | १२१ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |
| ●जाधव भरत | १२३ | अभिनेता | | | | | |
| ●जाधव सिद्धार्थ रामचंद्र | १२४ | अभिनेता | | | | | |
| ●जीवनकला | १२५ | अभिनेत्री | | | | | |
| ●जोग विष्णुपंत | १२७ | अभिनेता | | | | | |
| ●जोगळेकर अर्चना अरुण | १२९ | अभिनेत्री | | | | | |
| ●जोगळेकर वसंत | १३० | | | दिग्दर्शक | | | |
| ●जोशी निवेदिता गजानन | १३० | अभिनेत्री | | | | | |
| ●जोशी मोहन विष्णू | १३२ | अभिनेता | | | | | |
| ●जोसेफ डेव्हिड | १३४ | | लेखक | | | | |
| ●ठाकूर राजाराम दत्तात्रेय | १३५ | | | दिग्दर्शक | | संकलक | |
| ○डवरी तानूबाई भैरू | – | अभिनेत्री | | | | | पृ. ९७ |
| ●डावजेकर दत्तात्रेय शंकर | १३६ | | | | संगीतकार | | |
| ●तर्खड नलिनी आत्माराम | १३८ | अभिनेत्री | | | | | |
| ●तनुजा | १३८ | अभिनेत्री | | | | | |
| ●तलगिरी पांडुरंग | १४० | | | निर्माता | | | |
| ○तळपदे जयश्री चित्रसेन | – | अभिनेत्री | | | | | पृ. ११९ |
| ●तळवलकर शरद गणेश | १४१ | अभिनेता | | | | | |
| ●तळवलकर स्मिता अविनाश | १४२ | अभिनेत्री | | निर्माती | | | |
| ▲तेंडुलकर प्रिया विजय | १४४ | अभिनेत्री | | | | | साहित्य खंड |
| ▲तेंडुलकर विजय धोंडोपंत | १४६ | | पटकथा | | | | नाटक खंड |
| ●तोरणे कमलाकर विष्णू | १४७ | | | निर्माता | | | |
| ●तोरणे रामचंद्र गोपाळ | १४९ | | | दिग्दर्शक | | वितरक | |
| ●दत्त यशवंत | १५० | अभिनेता | | | | | |
| ●दत्ता केशव | १५२ | | | | | | |
| ○दत्ता धर्माधिकारी | – | | | दिग्दर्शक | | | पृ. १७१ |
| ○दादासाहेब फाळके | – | | | दिग्दर्शक | | | पृ. २४८ |
| ●दानवे जयशंकर ज्ञानेश्वर | १५४ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ● दाबके दत्तात्रेय दामोदर | १५४ | | | दिग्दर्शक | | छायाचित्र. | |
| ● दामले विष्णू गोविंद | १५५ | | | | | क.दि./ध्व. | |
| ○ दादा साळवी | – | अभिनेता | | | | | पृ. ३७४ |
| ○ दिवाण रंगू शंकर | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३७८ |
| ○ दीक्षित कृष्ण गंगाधर | – | | | | गीतकार | | पृ. ३६४ |
| ● देऊळगावकर नारायण यशवंत | १५६ | | पटकथा | | | | |
| ● देव अजिंक्य रमेश | १५८ | अभिनेता | | | | | |
| ● देव रमेश नारायणसिंग | १६० | अभिनेता | | | | | |
| ● देव सीमा रमेश | १६२ | अभिनेत्री | | | | | |
| ▲ देशपांडे पुरुषोत्तम लक्ष्मण | १६४ | | लेखक | दिग्दर्शक | | | साहित्य खंड |
| ○ देशमुख रंजना | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३१६ |
| ○ देशमुख विजया श्रीधर | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३६४ |
| ● देसाई नितीन चंद्रकांत | १६६ | | | निर्माता | | कला दि. | |
| ● देसाई मंगेश सदानंद | १६७ | | | | | ध्वनिमुद्रक | |
| ● देसाई वसंत कृष्णा | १६९ | | | | संगीतकार | | |
| ○ देसाई विठ्ठल रघुनाथ | – | अभिनेता | | | | | पृ. २९८ |
| ● धर्माधिकारी दत्तात्रेय जगन्नाथ | १७१ | | | निर्माता | | | |
| ● धायबर केशव | १७२ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |
| ● धुमाळ अनंत | १७३ | अभिनेता | | | | | |
| ● नलावडे अरुण जनार्दन | १७४ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |
| ● नवाथे चित्रा राजा | १७६ | अभिनेत्री | | | | | |
| ● नांदगावकर शांताराम मालोजी | १७८ | | | | गीतकार | | |
| ○ नांद्रेकर बाबासाहेब दादासाहेब | – | अभिनेता | | | | | पृ. २६२ |
| ● नाईक उषा | १८० | अभिनेत्री | | | | | |
| ● नाईक पांडुरंग सातू | १८० | | | निर्माता | | छाया.चित्र. | |
| ○ नाना पळशीकर | – | अभिनेता | | | | | पृ. २०४ |
| ● नायक कांचन प्रभाकर | १८२ | | | दिग्दर्शक | | | |
| ○ नायक दत्ताराम बापूराम | – | | | | संगीतकार | | पृ. ३१ |
| ● नायक प्रभाकर मालोजी | १८४ | | | दिग्दर्शक | गीतकार | | |
| ● नारकर अविनाश गोपाळ | १८५ | अभिनेता | | | | | |
| ● नार्वेकर संजय शशिकांत | १८६ | अभिनेता | | | | | |
| ○ निळू फुले | – | अभिनेता | | | | | पृ. २५१ |
| ● नेने गजानन हरी | १८७ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ● पैंगणकर इंदुमती शशिकांत | २३४ | अभिनेता | | | | | |
| ● पै बाबूराव कृष्णराव | २३६ | | | निर्माता | | वितरक | |
| ● पोतदार आशा | २३७ | अभिनेता | | | | | |
| ● पौडवाल अरुण प्रभाकर | २३७ | | | | संगीतकार | गायक | |
| ● प्रधान स्नेहप्रभा विठ्ठल | २३९ | अभिनेत्री | लेखक | | | गायिका | |
| ● प्रभावळकर दिलीप भालचंद्र | २४१ | अभिनेता | | | | | |
| ● प्रभुणे सविता अरुण | २४३ | अभिनेत्री | | | | | |
| ● प्रभू वसंत कृष्णराव | २४५ | | | | संगीतकार | | |
| ○ प्रिया अरुण | – | अभिनेत्री | | | | | पृ. २६५ |
| ● फत्तेलाल बाबासाहेब साहेबमामा | २४६ | | | | | कला दि. | |
| ● फत्तेलाल एस. | २४७ | | | | | कला दि. | |
| ● फाळके धुंडिराज गोविंद | २४८ | | | निर्माता | | | |
| ● फुले नीळकंठ कृष्णाजी | २५१ | अभिनेता | | | | | |
| ▲ फैयाज ईमाम शेख | २५४ | अभिनेत्री | | | | गायक | संगीत खंड |
| ▲ बढे राजा नीळकंठ | २५६ | | | | गीतकार | | साहित्य खंड |
| ● बाबूराव पेंटर | २५७ | | | निर्माता | | | |
| ○ बिंबा मोडक | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३०९ |
| ● बिडकर संजीवनी | २६१ | अभिनेत्री | | | | | |
| ● बी. नांद्रेकर | २६२ | अभिनेता | | | | | |
| ▲ बेडेकर विश्राम चिंतामण | २६३ | | लेखक | निर्माता | | | साहित्य खंड |
| ● बेर्डे प्रिया लक्ष्मीकांत | २६५ | अभिनेत्री | | | | | |
| ● बेर्डे रुही लक्ष्मीकांत | २६६ | अभिनेत्री | | | | | |
| ● बेर्डे लक्ष्मीकांत पांडुरंग | २६७ | अभिनेता | | | | | |
| ● बेबी नंदा | २७० | अभिनेत्री | | | | | |
| ● बेबी शकुंतला | २७२ | अभिनेत्री | | | | | |
| ▲ बोकील विष्णू विनायक | २७४ | | लेखक | | | | साहित्य खंड |
| ● भाटकर स्नेहल | २७५ | | | | संगीतकार | | |
| ○ भाटवडेकर हरिश्चंद्र सखाराम | – | | | | | छायाचित्र. | पृ. ३७३ |
| ● भावना | २७६ | अभिनेत्री | | | | | |
| ● भावे अश्विनी शरद | २७७ | अभिनेत्री | | | | | |
| ● भावे सुबोध सुरेश | २७८ | अभिनेता | | | | | |
| ● भावे सुमित्रा/सुकथनकर सुनील | २८० | | | दिग्दर्शक | | | |
| ○ भिवंडकर कमल | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३१९ |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ○ भूतकर जनार्दन गणपत | – | अभिनेता | | | | | पृ. ३२४ |
| ● भेंडे उमा प्रकाश | २८३ | अभिनेत्री | | | | | |
| ● भेंडे प्रकाश गजानन | २८५ | अभिनेता | | | | | |
| ● मंजू | २८६ | अभिनेत्री | | | | | |
| ○ मराठे उषा बापू | – | अभिनेत्री | | | | | पृ. २७ |
| ○ महाडिक यशवंत दत्तात्रेय | – | अभिनेता | | | | | पृ. १५० |
| ○ महाजन शकुंतला नागेश | – | अभिनेत्री | | | | | पृ. २७२ |
| ● महाजनी रवींद्र हणमंत | २८६ | अभिनेता | | | | | |
| ▲ महानोर नामदेव धोंडो | २८८ | | | | गीतकार | | साहित्य खंड |
| ▲ महाम्बरे गंगाधर मनमोहन | २८९ | | लेखक | | गीतकार | | साहित्य खंड |
| ● मांजरेकर महेश वामन | २९० | अभिनेता | लेखक | निर्माता | | | |
| ○ मांडरे गोपाळ तुकाराम | – | अभिनेता | | | | | पृ. १०४ |
| ○ मांडरे वामन तुकाराम | – | अभिनेता | | | | | पृ. ३८२ |
| ● माईणकर अण्णासाहेब | २९१ | | | | संगीतकार | | |
| ▲ माडगूळकर गजानन दिगंबर | २९२ | | | | गीतकार | | साहित्य खंड |
| ● माने अनंत गोविंद | २९३ | | | दिग्दर्शक | | | |
| ○ मामा वरेरकर | – | | लेखक | | | | पृ. ३३८ |
| ● मालवणकर दामुअण्णा बापूशेठ | २९५ | अभिनेता | | | | | |
| ● मास्टर भगवान | २९७ | अभिनेता | | | | | |
| ● मास्टर विठ्ठल | २९८ | अभिनेता | | | | | |
| ● मास्टर विनायक | ३०१ | अभिनेता | | | | गायक | |
| ● मीनाक्षी | ३०३ | अभिनेत्री | | | | | |
| ○ मुखर्जी तनुजा शोमू | – | अभिनेत्री | | | | | पृ. १३८ |
| ○ मेस्त्री बाबूराव कृष्णराव | – | | | | | कला. दि. | पृ. २५७ |
| ● मोघे सुधीर राम | ३०४ | | | | गीतकार | | |
| ● मोघे श्रीकांत राम | ३०६ | अभिनेता | | | | | |
| ● मोडक आनंद गोपाळ | ३०८ | | | | संगीतकार | | |
| ● मोडक शांता भास्कर | ३१० | अभिनेत्री | | | | | |
| ● मोडक शाहू रामकृष्ण | ३११ | अभिनेता | | | | | |
| ● मोरे विश्वनाथ शंकर | ३१३ | | | | संगीतकार | | |
| ● मोहिले अनिल जगन्नाथ | ३१४ | | | | संगीतकार | | |
| ○ यासीन शेख फत्तेलाल | – | | | | | कला. दि. | पृ. २४७ |
| ● येवलेकर सरला | ३१५ | अभिनेत्री | | | | | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ● रंजना | ३१६ | अभिनेत्री | | | | | |
| ● रणदिवे सतीश बाबूराव | ३१८ | | | दिग्दर्शक | | | |
| ● रत्नमाला | ३१९ | अभिनेत्री | | | | | |
| ● राजदत्त | ३२१ | | | दिग्दर्शक | | | |
| ● राजशेखर | ३२४ | अभिनेता | | | | | |
| ○ राजा नेने | – | | | दिग्दर्शक | | | पृ. १८७ |
| ○ राजा परांजपे | – | अभिनेता | | | | | पृ. १९४ |
| ● राम-लक्ष्मण | ३२५ | | | | संगीतकार | | |
| ○ रॉय किणीकर | – | | लेखक | | | | पृ. ४४ |
| ● रेखा | ३२६ | अभिनेत्री | | | | | |
| ▲ लागू श्रीराम बाळकृष्ण | ३२८ | अभिनेता | | | | | नाटक खंड |
| ● लिमये उपेंद्र मधुकर | ३३० | अभिनेता | | | | | |
| ● लिमये महेश मधुकर | ३३१ | | | | | छाया.चित्र. | |
| ● लीला | ३३२ | अभिनेत्री | | | | | |
| ● लोणकर प्रतीक्षा प्रभाकर | ३३४ | अभिनेत्री | | | | | |
| ○ वणकुद्रे किरण शांताराम | – | | | निर्माता | | | पृ. ४५ |
| ○ वणकुद्रे शांताराम राजाराम | – | अभिनेता | | दिग्दर्शक | | | पृ. ३४७ |
| ● वनमाला | ३३६ | अभिनेत्री | | | | | |
| ▲ वरेरकर भार्गवराम विठ्ठल | ३३८ | | लेखक | | | | नाटक खंड |
| ● वसंत पेंटर | ३३९ | | | दिग्दर्शक | | | |
| ● वाड निशिगंधा विजय | ३४० | अभिनेत्री | | | | | |
| ● वाडकर हंसा | ३४२ | अभिनेता | | | | | |
| ● वाशीकर शिवराम श्रीपाद | ३४५ | | लेखक | | | | |
| ● वासंती | ३४६ | अभिनेत्री | | | | | |
| ○ वॉटल चंदर मोहन | – | | | | | वितरक | पृ. १०६ |
| ● व्ही. शांताराम | ३४७ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |
| ● शशिकला | ३५० | अभिनेत्री | | | | | |
| ● शहाणे किशोरी | ३५१ | अभिनेत्री | | | | | |
| ● शहाणे रेणुका विजय | ३५२ | अभिनेत्री | | | | | |
| ● शिंदे माधव रावजी | ३५४ | | | निर्माता | | | |
| ● शिंदे वसंत कृष्णाजी | ३५५ | अभिनेता | | | | | |
| ○ शिरोडकर मीनाक्षी पांडुरंग | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३०३ |
| ● शिरोमणी सुषमा | ३५७ | अभिनेत्री | | | | | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे कार्यक्षेत्र | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अभिनेता अभिनेत्री | पटकथा लेखक | दिग्दर्शक निर्माता | संगीतकार गीतकार | इतर | |
| ▲शुक्ल सदाशिव अनंत | ३५८ | | लेखक | | | | साहित्य खंड |
| ▲शेळके शांता जनार्दन | ३५९ | | | | गीतकार | | साहित्य खंड |
| ● शोभना समर्थ | ३६१ | अभिनेत्री | | | | | |
| ● संजीव | ३६४ | | | | गीतकार | | |
| ● संध्या | ३६४ | अभिनेत्री | | | | | |
| ▲सबनीस वसंत | ३६६ | | | | गीतकार | | साहित्य खंड |
| ● सरनाईक अरुण शंकर | ३६७ | अभिनेता | | | | | |
| ● सरपोतदार नानासाहेब | ३६९ | अभिनेता | | दिग्दर्शक | | | |
| ● सरपोतदार विश्वास नरहर | ३७० | | | निर्माता | | वितरक | |
| ▲सरदेसाई रघुनाथ गोविंद | ३७१ | | | | | समीक्षक | साहित्य खंड |
| ● सराफ अशोक लक्ष्मण | ३७१ | अभिनेता | | | | | |
| ● सावंत संदीप दत्ताराम | ३७३ | | | दिग्दर्शक | | | |
| ● सावेदादा | ३७३ | | | | | छायाचित्र. | |
| ○साळगावकर रतन भालचंद्र | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३४२ |
| ● साळवी दिनकर शिवराम | ३७४ | अभिनेता | | | | | |
| ● सी. रामचंद्र | ३७६ | | | | संगीतकार | | |
| ○सुखटणकर कुमुद शंकर | – | अभिनेत्री | | | | | पृ. ३२६ |
| ● सुलोचना | ३७८ | अभिनेत्री | | | | | |
| ● सूर्यकांत | ३८२ | अभिनेता | | | | | |
| ● सूरकर संजय भाऊराव | ३८५ | | | दिग्दर्शक | | | |
| ● सोलापूरकर राहुल दत्तात्रय | ३८६ | अभिनेता | | | | | |
| ● सोहनी नरेंद्रकुमार नरहर | ३८८ | | | दिग्दर्शक | | | |
| ● हुबळीकर शांता दोडप्पा | ३९० | अभिनेत्री | | | | | |
| ○हेबळे सुमन | – | अभिनेत्री | | | | | पृ. २७६ |

# प्रस्तावना



शिल्पकार चरित्रकोशाची योजना ‘विवेक’ने जेव्हा घोषित केली आणि त्यात चित्रपटाचा समावेश ‘कला’ विभागात करण्यात आला, तेव्हा मला थोडेसे आश्चर्य वाटले. ते अशासाठी की, मराठी अभिजनामध्ये आज तरी चित्रपट हा महत्त्वाचा कलाप्रकार गणला जात नाही. किंबहुना ‘चित्रपट’ क्षेत्रातला एकूण व्यवहार केवळ ‘मनोरंजन’ या क्षेत्रात ढकलून मराठी अभिजन मोकळे होत आहेत. त्यामुळे चित्रपटाविषयी गंभीर लेखन, चर्चासत्रे, पुस्तके, समीक्षात्मक लेखन मराठीत फारसे आढळत नाही. जे काही ग्रंथ प्रकाशित झाले आहेत, ते म्हणजे नटनट्या, दिग्दर्शक, निर्माता यांची आत्मचरित्रे आहेत. अशा स्थितीत ‘विवेक’ने ‘चित्रपटा’ला कला विभागात स्थान देणे, म्हणजे चित्रपट हा कलाप्रकार आहे हे मान्य करणे होय. चित्रपटविषयक ‘चरित्रकोश’ लिहिण्याचा मराठीतला हा पहिलाच प्रयत्न आहे. माझ्या माहितीप्रमाणे अन्य भारतीय भाषांतही असा प्रयत्न झाल्याचे ऐकिवात नाही. याबद्दल ‘विवेक’ला धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच आहे आणि काळाबरोबर पावले टाकण्याचा ‘विवेक’चा हा उपक्रम स्तुत्यच आहे.

जो पवित्रा चित्रपटाविषयी अभिजनांचा, तोच प्रकार सर्वसामान्य मराठी रसिकांचा आहे. एकूणच ‘चित्रपट’ हा फक्त पाहून सोडून देण्याचा विषय आहे असे मानले जाते. पुष्कळसे सामान्य चित्रपट रसिक भारतीय चित्रपटातील गाण्यांवर लुब्ध असतात. वास्तविक ‘चित्रपटा’चा विज्ञानाने लावलेला शोध हा भारतीय संगीत लोकप्रिय करण्यासाठी लावलेला नव्हता. पण चित्रपटांतील संगीताच्या धुमाकुळामुळे ‘चित्रपटा’च्या खऱ्या सामर्थ्याकडे आजवर कोणाचेच लक्ष गेले नाही. तशी गरजच अभिजनांपासून सामान्य रसिकांपर्यंत कोणालाच वाटत नाही. स्वाभाविकच सत्यजित राय यांना हॉलिवूडने विशेष ऑस्कर प्रदान केले किंवा व्ही. शांताराम यांना भारत सरकारने फाळके पुरस्काराने गौरवले किंवा बर्लिनच्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात ‘सामना’ हा पहिला मराठी चित्रपट दाखवला गेला, या कशाचेही कौतुक मराठी मनाला नाही. फक्त बातमी वाचायची आणि सोडून द्यायची, एवढीच प्रतिक्रिया.

वास्तविक पाहता भारतात चित्रपट प्रथम आणला सावेदादा, दादासाहेब तोरणे आणि दादासाहेब फाळके यांनी. ही सारी माणसे मराठी होती. त्यावर कलेचे लेणे चढवले ते कोल्हापूरच्या बाबूराव पेंटर यांनी आणि चित्रपटाला कंठ

फुटल्यानंतर बोलपट युगाच्या पहिल्या दशकात, म्हणजे १९३२ ते १९४२ या दशकात भारतातील सर्वोत्कृष्ट चित्रपट पुण्याच्या प्रभात फिल्म कंपनीने दिले. असे असूनही स्वातंत्र्यानंतर हिंदी चित्रपटाचे मराठी चित्रपटावर आक्रमण झाल्यानंतर हळूहळू अभिजन मराठी चित्रपटापासून दूर गेले. आचार्य अत्रे हे 'श्यामची आई' व 'महात्मा फुले' हे चित्रपट दिग्दर्शित केल्यावर, तर 'गुळाचा गणपती' दिग्दर्शित केल्यावर पु.ल. देशपांडे चित्रपटक्षेत्रात पराभूत होऊन नाटकांकडे वळले. यामुळे सामान्य मराठी रसिकही मराठी चित्रपटापासून दूर गेला आणि उरला फक्त शहरातला अशिक्षित कामगार वर्ग आणि खेड्यातला निरक्षर शेतकरी. यामुळे १९५० च्या दशकात मराठी चित्रपट तमाशाकडे वळला आणि 'लाखाची गोष्ट', 'पेडगावचे शहाणे', 'जगाच्या पाठीवर' यांच्यासारखे उत्तमोत्तम चित्रपट काढणारा राजा परांजपे यांच्यासारखा श्रेष्ठ दिग्दर्शक आर्थिक अपयशाने खचून गेला. थोडक्यात १९५० नंतर मराठी चित्रपट वळचणीला गेला. एकही सुशिक्षित माणूस या काळात चित्रपटसृष्टीकडे फिरकला नाही. या दैन्यावस्थेमुळे मराठी चित्रपटसृष्टीचे जागतिक चित्रपटाकडे लक्ष गेले नाही. जागतिक स्तरावर १९५० नंतर चित्रपटाला 'कले'चा दर्जा प्राप्त झाला. देशोदेशीच्या दिग्दर्शकांनी चित्रपटातील कलात्मकता आपल्या प्रतिभेने वृद्धिंगत केली. मराठी भाषिकांना आणि मराठी चित्रपटनिर्मितीत गुंतलेल्यांना याची अजिबात कल्पना नव्हती. याची कारणे शोधायची, तर थोडे मागे जावे लागेल.

'चित्रपट' हे विज्ञानाचे अपत्य आहे. फ्रान्सच्या लुमिए बंधूंनी २८ डिसेंबर १८९५ ला पॅरिसच्या कॅफेत चलत्‌चित्रांचा पहिला खेळ सादर केला. पडद्यावर चालणारी, धावणारी जिवंत माणसे पाहून प्रेक्षक चकितच झाले. वृत्तपत्रांनी Marval of the Century म्हणजे शतकातले आश्चर्य असा चलत्‌चित्रांचा गौरव केला. ही सारी चित्रे मूक होती आणि प्रत्यक्षदर्शी व एकदीड मिनिटांची होती. आगगाडी स्टेशनमध्ये येत आहे, माळी बागेला पाणी देत आहे, असे एक-दीड मिनिटांचे मूकपट होते. त्याचे कथापट व्हायला १९०२ साल उजाडावे लागले.

आश्चर्याचा पहिला भर ओसरल्यावर पाश्चात्त्य समीक्षकांनी, विचारवंतांनी या शोधाचे स्वागत केले. अमेरिकन समीक्षक व्हिशेल लिंडसे म्हणाला, 'अश्मयुगात भाषा नसताना चित्रांच्या साहाय्याने माणसांनी एकमेकांशी संपर्क साधला. तसा हा चित्रपटशोध आहे.'

लिंडसेच्या वाक्याचा अर्थ अधिक विशद करायचा तर असे म्हणता येईल की, ५०० वर्षांपूर्वी जर्मनीत गुटेनबर्गने छपाई यंत्राचा शोध लावला, तो विज्ञानाने सिद्ध केलेला परस्पर संवादमाध्यमातला पहिला टप्पा होता. छपाई यंत्राच्या शोधाने प्रथम बायबल छापले गेले. ते पुस्तक सामान्य माणसाच्या हाती लागले तेव्हा युरोपातला माणूस हरखून गेला. मौखिक परंपरेला पर्याय उपलब्ध झाला. स्वाभाविकच शब्दमाध्यमाचे महत्त्व वाढले,

साहित्यनिर्मितीला गती मिळाली, वृत्तपत्रांचा उदय झाला.

विज्ञानाने १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात बाष्पशक्ती व विद्युतशक्ती यांचे शोध सिद्ध केले. त्यानंतर १८९५ मध्ये चित्रपटाचा शोध सिद्ध झाला. चित्रपट म्हणजे प्रतिमा. प्रतिमांचा शोध हा संपर्कमाध्यमातला दुसरा टप्पा. शब्दमाध्यमाहून सर्वस्वी भिन्न असे प्रतिमामाध्यम आहे. १८९५ ते १९२७ अशी ३२ वर्षे चित्रपटांत ध्वनी नव्हता. तरीही त्या चित्रपटांत सांगितलेली कथा लाखो प्रेक्षकांपर्यंत प्रतिमांद्वारा पोहोचत होती. चार्ली चॅप्लीन १९१५ साली पडद्यावर आला आणि पुढच्या पाच वर्षांत जगभर पोहोचला तो मूकपटांच्या माध्यमातूनच. शब्दमाध्यमाइतकेच प्रतिमामाध्यम मानवी संपर्काचे प्रभावी माध्यम बनले. विज्ञानाने संपर्कमाध्यमात तिसरा टप्पा गाठला तो संगणकाचा शोध सिद्ध करून. माहितीजालामुळे (Internetमुळे) बातमी जगाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत क्षणार्धात पोहोचू लागली. इथे एक लक्षात घेतले पाहिजे की, संगणक शब्दमाध्यम + प्रतिमामाध्यम या दोहोंचाही उपयोग करतो. प्रतिमामाध्यमामुळे 'न्यूज चॅनल्स' आली. या तिसऱ्या टप्प्यामुळे जग खूपच जवळ आले. शब्दमाध्यमाने 'साहित्य' कलेला जन्म दिला. प्रतिमामाध्यमाने चित्रपटकलेला जन्म दिला, संगणक अद्याप तरी संपर्काचेच, प्रक्षेपणाचे माध्यम आहे. 'कला' नाही.

चित्रपटाचे प्रतिमा सामर्थ्य समजून घेत असतानाचा पश्चिमेकडून आयात केलेल्या या माध्यमाचे भारतीयांनी कोणत्या भूमिकेतून स्वागत केले तेही पाहिले पाहिजे. युरोपात चित्रपट १९ व्या शतकाच्या अखेरीला अवतरला आणि २० व्या शतकात तो बहरला. चित्रपट युरोपात येण्याआधीच तेथे विज्ञान अवतरले. समाजाचा वैज्ञानिक दृष्टिकोन तयार झाला. स्वाभाविकच विज्ञाननिष्ठ समाजाने विज्ञानाचे अपत्य असलेला चित्रपट डोळसपणे स्वीकारला. त्यामुळे चित्रपटाचा शोध लगेच 'कला' म्हणून गती घेऊ लागला.

आपण हे नवे माध्यम कसे स्वीकारले, हे पाहण्यासारखे आहे. या संदर्भात एक घटना बोलकी आहे. लुमिएनी पॅरिसमध्ये जे खेळ सुरू केले, ते प्रचंड लोकप्रिय झाले. कॅफेसमोर रांगा लागायच्या. म्हणून दिवसाला १०/१५ मिनिटांचे २० खेळ करावे लागायचे. चलत्‌चित्रांची ही लोकप्रियता पाहून जानेवारी १८९६ मध्ये 'अरायव्हल ऑफ दि ट्रेन' हा दीड मिनिटांचा मूकपट लुमिएनी चित्रित केला. त्यात आगगाडी हळूहळू स्टेशनमध्ये प्रवेश करते, असे दृश्य पकडले. कॅमेऱ्याच्या भाषेत बोलायचे तर गाडी 'क्लोजअप'मध्ये आपल्याला पुढे सरकताना दिसते. कॅफेमध्ये हा खेळ पाहणाऱ्या पहिल्या प्रेक्षकांना गाडी क्लोजअपमध्ये येऊ लागताच असे वाटले की आता ती आपल्या अंगावर येणार, म्हणून प्रेक्षक खुर्ची सोडून कॅफेबाहेर पळाले. आणखी ६ महिन्यांनी म्हणजे जुलै १८९६ मध्ये लुमिएचे २० मिनिटांचे पॅकेज मुंबईच्या

नॉव्हेल्टी थिएटरमध्ये (आजच्या एक्सल्सियर थिएटरमध्ये) दाखवले गेले. नॉव्हेल्टी थिएटर मूळचे नाटकाचे. त्यामुळे ८०० आसनांचे होते. जगातील या आश्चर्याला प्रसिद्धी खूप मिळाल्याने पहिल्या खेळाला हाऊसफुल गर्दी होती. लुमिएच्या ऑपरेटरना भीती होती की आगगाडी येतेय हे दृश्य पाहून पॅरिसप्रमाणे खुर्च्या सोडून प्रेक्षक पळाले तर! पण असे काही घडले नाही. थिएटरमधला एकही प्रेक्षक बाहेर पळाला नाही की कोणी घाबरून किंचाळला नाही. या घटनेचा आज अर्थ लावताना असे लक्षात येते की, चित्रपट येण्याआधी जवळजवळ २००० वर्षे लोकरंजनाचे साधन या इथल्या लोककला होत्या. महाराष्ट्रात नमन किंवा खेळे, बंगालमध्ये 'जात्रा', कर्नाटकात 'यक्षगान', गुजरातेत 'भवई' ही लोककलेची काही उदाहरणे होत. पौराणिक कथानकाद्वारा त्यांचे खेळ चालायचे. लोककलेचे एक वैशिष्ट्य म्हणजे त्यात काम करणारे गायक, नर्तक, नट हे लोक गावातलेच असायचे. रामायणाचे आख्यान लावले तर दिवसा नांगर धरणारा गोपाळ रात्री मेकअप करून रामाच्या भूमिकेत दिसायचा. तो खरा राम नाही. गोपाळने रामाचे 'सोंग' आणले आहे अशी भावना प्रेक्षकांची सहजपणे झाली. त्याचप्रमाणे पडद्यावर स्टेशनमध्ये येणारी आगगाडी ही खरी नसून ती 'सोंग' आहे अशी प्रेक्षकांची सहज भावना झाली आणि फ्रान्समधील प्रेक्षकांप्रमाणे तो खुर्ची सोडून थिएटरबाहेर पळाला नाही. विज्ञानाचे अनेक शोध येथल्या मध्ययुगीन भारतीय समाजाने चमत्कार म्हणून स्वीकारले, पण त्याच विज्ञानाने दिलेला चित्रपट हा येथल्या प्रेक्षकांना पडद्यावरची 'लोककला'च वाटला. युरोपीय समाजाप्रमाणे चित्रपट हे विज्ञानाचे अपत्य आहे ही भावना तेव्हा नव्हती आणि आजही नाही.

आजचा प्रेक्षकही चित्रपटाला लोककलाच समजतो. लोककलेत गायन, वादन, नर्तन व कथा सांगणे असा प्रकार होता. या सर्व प्रकाराची अपेक्षा आजही आपला प्रेक्षक चित्रपटाकडून करतो. जागतिक चित्रपट विचारात घेतला तर भारतीय उपखंड सोडल्यास अन्य देशांतील चित्रपटात गाणी, नर्तन हा स्थायिभाव नाही. भारतीय चित्रपटात बोलपट युगाच्या जन्मापासून गाणी ठाण मांडून बसली आहेत. कारण लोककलेची पार्श्वभूमी अद्यापही पूर्णत: मावळलेली नाही. समांतर चित्रपटांनी गाण्यांना विराम द्यायचा प्रयत्न केला. पण बहुसंख्य प्रेक्षकांना तो पसंत पडला नाही. 'आर्ट फिल्म' अशी त्या चित्रपटांची संभावना झाली.

चित्रपटाला भारतीय समाजजीवनात काहीच परंपरा नाही. याचे कारण भारतात विज्ञानापाठोपाठ तंत्रज्ञान अवतरले नाही. स्वाभाविकच अध्यात्मात प्रगती करणारा भारत, वैज्ञानिक प्रगतीत मागे राहिला. युरोपने विज्ञानात आघाडी घेतली आणि वैज्ञानिक प्रगतीच्या बळावर जगभर साम्राज्ये स्थापन केली. जलमार्गाने अमेरिकेचा शोध लावून तेथील रेड इंडियन्सना हटवून तेथे

आपल्या वसाहती उभारल्या.

भारतात कोणतीच परंपरा नसलेल्या चित्रपट 'कले'वर भारतीय समाजाने आपले सरंजामशाही पूर्वसंस्कार लादले. त्यामुळे भारतीय प्रेक्षकांनी 'लोककला' म्हणून चित्रपट स्वीकारला. इतकी झटपट मिळणारी व स्वस्त करमणूक दुसरी कोठलीच नसल्याने आणि भाषेच्या पलीकडे जाणारे माध्यम म्हणून; बहुसंख्य निरक्षर भारतीय प्रेक्षकांनी चित्रपट पाहायला गर्दी केली. जनसामान्यांचे दोन घटका मनोरंजन एवढेच उद्दिष्ट बहुसंख्य निर्मात्यांनी बाळगले. अर्थात काही अपवाद होतेच. चित्रपटाच्या अफाट लोकप्रियतेमुळे व त्यातील अडाणी मनोरंजन मूल्यांमुळे अभिजन त्यापासून दूर गेले असेही म्हणता येईल. स्वाभाविकच युरोपप्रमाणे चित्रपटाचे सामर्थ्य, मर्यादा, त्याचे यंत्राधिष्ठित स्वरूप याचा विचार करण्याची गरज भासली नाही. वस्तुत: नृत्य, संगीत, साहित्य, नाटक, शिल्पकला, चित्रकला इ. शुद्ध कलांहून 'चित्रपट' कलेचे वेगळेपण सांगताना युरोपीय अभ्यासकांनी ते 'परंपरागत' (Traditional) कलाप्रकार आहेत आणि चित्रपट आधुनिक (Modern) 'कला'प्रकार आहे, असे विश्लेषण मांडले.

परंपरागत कलांना हजारो वर्षांचा इतिहास आहे. अगदी 'नाटक' हा प्रकार घेतला तरी कालिदासाचे 'शांकुतल' दोन हजार वर्षांपूर्वीचे आहे. 'चित्रे' तर गुहेतला माणूसही काढत होता आणि 'संगीत' आदिवासीतही आहे. त्यांची प्रगती व्हायला हजारो वर्षे उलटावी लागली. याउलट चित्रपटाचे आहे. चित्रपटाचा इतिहास अवघ्या १०० वर्षांचा आहे. चित्रपटाचे मूळ विज्ञानात असल्याने विज्ञानात जशी प्रगती होईल, तसा चित्रपटाला त्याचा फायदा मिळत गेला आणि अवघ्या एका शतकात चित्रपटाने मोठी झेप घेतली. आता चित्रपट पुस्तकासारखा डीव्हीडीवर घरी घेऊन जाता येतो.

परंपरागत कला व आधुनिक कला यांच्यात मूलत: फरक आहे. परंपरागत 'कलांना' यंत्राची शक्ती वापरावी लागत नाही. मानवी शक्तिस्रोतावर त्यांची निर्मिती होऊ शकते. या उलट यंत्रशक्तीच्या साहाय्याशिवाय चित्रपट उभाच राहू शकत नाही. चित्रीकरण करायचे तर कॅमेरा पाहिजे, संकलन करायचे व प्रिंट काढायची तर लॅब पाहिजे आणि चित्रपट दाखवायचा म्हटला तर प्रोजेक्टर हवा. चित्रपटाचे प्रत्येक पाऊल पुढे पडते ते यांत्रिक साहाय्याने, या अर्थाने चित्रपट ही आधुनिक 'कला' आहे. थोडक्यात, यंत्राचा अचूकपणा आणि माणसाची प्रतिभा यांच्या संयोगाने 'चित्रपटाची कला' प्रसवते. इंग्रजीत Art Through Science असे चित्रपटाचे अन्वर्थक वर्णन आढळते. चित्रपट हे तंत्राधिष्ठित माध्यम असल्याने चित्रपटाच्या दिग्दर्शकाला आधी तंत्रावर हुकमत मिळवावी लागते. मग त्याच्या प्रतिभेच्या पंखात जेवढे बळ असेल तसा चित्रपट आकार घेतो.

युरोपातदेखील चित्रपटाचा शोध एकाएकी लागला नाही. कोणताही वैज्ञानिक शोध हा प्रयोग करत करतच गवसतो. या तत्त्वानुसार चित्रपटाचा शोध १८९५ मध्ये सिद्ध होण्याआधी जवळजवळ एक शतक विविध प्रयत्न होत होते. त्यातल्या ठळक टप्प्यांचा निर्देश करणे आवश्यक आहे. हे प्रयोग प्रामुख्याने युरोपात झाले. युरोपचे एक वैशिष्ट्य म्हणजे तेथे प्रत्येक देशात शास्त्रज्ञ जन्मला. त्यांनी विज्ञान संशोधनात तन-मन-धन गोवले.

विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टिकोन याचा पद्धतशीर प्रसार करण्यासाठी युरोपात प्रथम 'सायन्स ॲकॅडमी' स्थापन केल्या गेल्या. याचा प्रारंभ जर्मनी व इटलीमधून झाला. इंग्लंडमध्ये 'रॉयल सोसायटी ऑफ लंडन' (१६६०), फ्रान्समध्ये 'दि ॲकॅडमी ऑफ सायन्स पॅरीस' (१६६६), जर्मनीत 'रॉयल ॲकॅडमी बर्लिन' (१७००) व रशियात 'अकॅडमी ऑफ सायन्स' (१७४४) अशा क्रमाक्रमाने विज्ञानप्रसारासाठी ॲकॅडमी स्थापन होत गेल्या आणि शास्त्रीय संशोधनाला गती मिळाली.

डॉ. पीटर मार्क रोज या ब्रिटिश फिजीशियनने दृष्टिसातत्याचा (Persistence of Visionचा) शोधनिबंध ९ डिसेंबर १८२४ मध्ये सादर केला. दृष्टिसातत्य म्हणजे दृष्टीच्या टप्प्यातून एखादी गोष्ट बाजूला झाली तरी त्या गोष्टीची प्रतिमा दृकपटलावर १/२० सेकंदापर्यंत राहाते. चित्रपट शोधाचा प्रारंभ येथून सुरू झाला. या सिद्धान्तावर ऑप्टीकल खेळणी बाजारात येऊ लागली. १८२६ मध्ये फ्रान्समध्ये जोसेफ निएप्सेने पहिले स्थिर छायाचित्र टिपले. याला ते 'हेलिओग्राम्स' असे म्हणत. रोजेचा सिद्धान्त बेल्जियम शास्त्रज्ञ जोसेफ प्लूटने पुढे नेला. त्याने पेनकिस्टिकोप (नजर चकवणारा) हे खेळणे १८३२ मध्ये बाजारात आणले. एका जाड पुठ्ठ्यावरच्या गोल चकतीवर एखाद्या कृतीची वेगवेगळ्या टप्प्यावरील आकृत्या छापलेली असत. ही चकती गोल फिरवली की त्या बोर्डावरील आकृती सलगपणे दिसे. प्लूटचे हे खेळणे म्हणजे चलत्‌चित्रांचा प्राथमिक अवतार होय. विख्यात फ्रेंच समीक्षक जॉर्ज सॅडोल याने चलत्‌चित्रांचे मूलतत्त्व प्लूटने शोधले असा निर्वाळा दिला आहे.

फ्रेंच सायन्स ॲकॅडमीने ७ जानेवारी १८३९ रोजी 'फोटोग्राफी'चा शोध जाहीर केला. प्रारंभी निगेटिव्ह कागदाची असल्याने एका चित्राच्या अनेक प्रती काढता येत नव्हत्या, पण टाल्बोटने कोलोडिन फिल्म वापरून एका फोटोच्या अनेक प्रती काढण्याची सोय करून दिली. सन १८८२ मध्ये फ्रान्सच्या एट्येने मारेने याने फोटोग्राफिक गन तयार केली. काही सुधारणा करून 'किनोफोटोग्राफ' हा चलत्‌चित्र घेणारा कॅमेरा १८८२ मध्ये बनवला. या 'गन'मुळेच चित्रीकरण म्हणजे 'शुटिंग' असा शब्दप्रयोग रूढ झाला. १८८९ मध्ये चित्रपट घेण्यासाठी जॉर्ज इस्टमन यांनी सेल्युलॉइड फिल्म बनवली आणि त्याचे अमेरिकन एकस्व (पेटंट) घेतले. या फिल्मचा वापर करून चलत्‌चित्रण

करता येईल असा कॅमेरा विल्यम ग्रीन या ब्रिटिश गृहस्थाने बनवला. १८९२ मध्ये फ्रान्समधला सायन्स शिक्षक चार्लस एमिल रेनॉड याने प्रॅक्झनिस्कोप बनवल्यामुळे 'प्रोजेक्टर' पूर्णत्वास पोचला.

या साऱ्या संशोधनाचा उपयोग करून लुमिए बंधूंनी आपल्या फोटोग्राफिक मटेरियल बनवण्याच्या फॅक्टरीतून बाहेर पडणाऱ्या कामगारांवर पहिली फिल्म बनवली. त्याने या शोधाचे एकस्व घेतले. लुमिए बंधूनी कॅमेरा, प्रिंटर व प्रोजेक्टर एकाच मशीनमध्ये बनवले आणि त्याला 'सिनेमाटोग्राफ' असे नाव दिले. १० जून १८९५ रोजी फ्रेंच सायन्स अॅकॅडमीच्या काँग्रेसमध्ये लुमिएनी आपली पहिली फिल्म दाखवली. नंतर आणखी काही मूकपटांच्या फिल्म चित्रित करून २८ डिसेंबर १८९५ रोजी पॅरिसच्या ग्रँड कॅफेच्या तळघरातील सॅलोन इंडियानामध्ये चलत्‌चित्रांचा जाहीर खेळ केला. चित्रपटाचा प्रारंभ येथून झाला. लुमिएनी आणखी सिनेमॅटोग्राफ यंत्र बनवून आपले प्रतिनिधी पाठवून चित्रपट जगभर पोहोचवला. परंतु या शोधाला काही भवितव्य नाही, असे लुमिए बंधूंना वाटले. त्यामुळे १९४० पर्यंत हयात असूनही त्यांनी एकही चित्रपट निर्माण केला नाही. आपण शोधलेल्या चित्रपटाचा वेलू गगनावेरी गेल्याचे मात्र त्यांना पाहायला मिळाले.

**प्रारंभीचे प्रयत्न :**

सन १८९६ च्या जुलैमध्ये लुमिएच्या प्रतिनिधीने मुंबईत खेळ केले, ते हरिश्चंद्र सखाराम भाटवडेकर ऊर्फ सावेदादा यांनी ते पाहिले. सावेदादांचा मुंबईत सॅण्डहर्स्ट रोडला फोटोग्राफिक स्टुडिओ होता. शतकातला हा चमत्कार पाहून सावेदादा हरखून गेले. त्यांनी लंडनहून रिले ब्रदर्सचा कॅमेरा, प्रोजेक्टर व काही मूकपट मागवले. ते १८९७ साल होते. म्हणजे लुमिएनंतर वर्षभरात सावेदादा चित्रपट दाखवण्यास सज्ज झाले. प्रोजेक्टर घेऊन ते श्रीमंतांच्या घरी मूकपट दाखवायचे. कॅमेऱ्याने त्यांनी हँगिंग गार्डनवर कुस्ती चित्रित केली, माकडांचे खेळ व नारळी पौर्णिमा यांचे चित्रण करून लंडनला प्रोसेसिंगला पाठवले आणि त्यांचे प्रदर्शन तंबू थिएटरमध्ये सुरू केले. ठाणावाला, बालीवाला, माणिक सेठना इ. लोकांनी विदेशी मूकपट तंबू थिएटरमध्ये प्रदर्शित करायला प्रारंभ केला. कलकत्ता येथील इलेक्ट्रिकल इंजिनिअर हिरालाल सेन यांनी १८९९ मध्ये रॉयल बायोस्कोप कंपनी स्थापना करून तंबू थिएटरमध्ये खेळ दाखवायला सुरुवात केली. १९०४ मध्ये माणिक सेठना यांनी टुरिंग चित्रपट सुरू केला. त्यात दोन रिळांचा 'ग्रेट ट्रेन रॉबरी' दाखवला जाऊ लागला.

१९०५ साली मादन यांनी बंगालच्या फाळणीविरुद्ध कलकत्त्यात जी निदर्शने झाली, ती चित्रित केली. पण ब्रिटिश सरकारने त्यावर बंदी घातली. १९०७ साली मादन यांनी 'एल्फिन्स्टन पिक्चर पॅलेस' हे देशातले पहिले थिएटर केवळ चित्रपटासाठी बांधले. 'ग्रेट ट्रेन रॉबरी' हा महत्त्वाचा चित्रपट

एल्फिन्स्टनमध्ये प्रकाशित झाला. १९१० पर्यंत सर्व प्रमुख शहरातून विदेशी मूकपट दाखवणे सुरू झाले होते.

दादासाहेब तोरणे हे ग्रीव्हज कॉटन कंपनीत इलेक्ट्रिकल विभागात नोकरीला होते. रामचंद्र गोपाळ तथा दादासाहेब तोरणे यांच्या मनात चित्रपट काढण्याची आकांक्षा होती. शेवटी त्यांना कॉरोनेशन थिएटरचे चित्रे आणि पुरुषोत्तम टिपणीस यांनी अर्थसाहाय्य केले आणि दादासाहेबांनी श्रीपाद संगीत मंडळीचे 'पुंडलिक' नाटक चित्रित केले. कॅमेरामन बोर्न अँड शेपर्ड कंपनीचा जॉन्सन आणि दिग्दर्शक-संकलक दादासाहेब तोरणे. १८ मे १९१२ ला म्हणजे फाळक्यांच्या आधी वर्षभर 'पुंडलिक' प्रकाशित झाला. कथा सांगणारा हा पहिला भारतीय बोलपट. तोपर्यंत अनुबोधपट वार्तापट म्हणूनच निघत होते. 'पुंडलिक' ४५ मिनिटांचा असावा.

पहिला मूकपट तोरणे यांचा असूनही 'भारतीय चित्रउद्योगाचे जनक' हा किताब दादासाहेब फाळके यांना मिळाला, याचे कारण 'पुंडलिक'चा कॅमेरामन ब्रिटिश होता. 'पुंडलिक'चे प्रोसेसिंग लंडनला होऊन प्रिंट तयार झाली आणि मुख्य म्हणजे तो नाटकावर आधारित होता. म्हणजे 'स्टेज शो' असे तेव्हा संबोधले जायचे. दादासाहेब फाळके यांचा 'राजा हरिश्चंद्र' स्वतंत्र कथानक व सारे काही - म्हणजे प्रोसेसिंग, प्रिंटिंग इ. भारतातच झाले. म्हणून देशी प्रयत्नातून झालेला 'राजा हरिश्चंद्र' हा पहिला भारतीय मूकपट मानला जातो आणि त्याचे जनक दादासाहेब फाळके; भारतीय चित्रोद्योगाचे मूळ पुरुष मानले जातात. फाळके यांच्याही आधी आणि 'पुंडलिक'नंतर पाटणकर, करंदीकर, दिवेकर यांनी एकत्र येऊन 'सावित्री' मूकपट हाती घेतला. स्वत: पाटणकर व करंदीकर कॅमेरामन होते.

'राजा हरिश्चंद्र' एक दृश्य



'सावित्री' पूर्ण झाला, पण तांत्रिक चुकांमुळे फिल्म कोरीच निघाली.

फाळके यांना भांडवल मिळवण्यासाठी खूप वणवण करावी लागली. पण त्यांनी आपले प्रयत्न सोडले नाहीत. ३ मे १९१३ रोजी 'राजा हरिश्चंद्र' मुंबईच्या कॉरोनेशन थिएटरमध्ये प्रदर्शित झाला. फाळके यांना बऱ्यापैकी धनलाभ झाला. त्यानंतर त्यांनी आपला मुक्काम हलवून आपल्या मूळ गावी नाशिकला नेला. तेथे त्यांनी 'मोहिनी भस्मासूर' हा मूकपट तयार केला आणि तिसरा मूकपट 'सत्यवान सावित्री' १९१४ साली प्रदर्शित झाला. तिन्ही मूकपट घेऊन फाळके लंडनला गेले. तेथे त्यांची विलक्षण कामगिरी पाहून वॉर्नर ब्रदर्सनी त्यांना भरघोस पगाराचे आमिष दाखवले. पण फाळके लोकमान्यांचे अनुयायी होते. 'स्वदेशी' चित्रपट व्यवसाय त्यांना वाढवायचा होता. त्यांनी ही सन्माननीय संधी नाकारली व युद्ध सुरू झाल्यामुळे ते स्वदेशी परतले. आर्थिक चणचण असूनही 'लंकादहन' हा मूकपट पूर्ण केला. 'लंकादहन' यशस्वी झाला. त्याबरोबर धनिकांचे लक्ष चित्रपटधंद्याकडे गेले. कोहिनूर मिलचे आपटे यांनी व अन्य तीन धनिकांनी भांडवल पुरवले आणि दादासाहेब फाळके यांनी १ जानेवारी १९१८ ला 'हिंदुस्थान फिल्म कंपनी' नाशिक येथेच स्थापन केली. भांडवल उपलब्ध झाल्याने स्टुडिओ अद्ययावत् केला. याच सुमारास द्वारकादास संपत या गुजराती धनिकाने पाटणकर यांना भांडवल दिले. त्यांनी रामायणावर २०,००० फूट लांबीची मालिका काढली, जी दोन भागात दाखवली जायची. याच काळात लोणावळा येथे संपतच्या भांडवलावर पाटणकरांनी विजेवर चालणारी प्रयोगशाळाही काढली. याच वर्षी कोल्हापुरात बाबूराव पेंटरांनी 'सैरंध्री' मूकपट तयार केला.

मूकपट युगाच्या पहिल्या दशकाच्या अखेरीला चित्रपट हा 'व्यवसाय' बनला आणि अनेक धनिक त्यात पैसे ओतू लागले. यामुळे मूकपटांची संख्या वाढली. स्पर्धा सुरू झाली. पण प्रतिभावंताचे धनिकांशी पटणे अशक्यच. फाळके हिंदुस्तान कंपनी सोडून गेले. एकूणच चित्रपटनिर्मितीवर धनिकांचा विळखा बसला.

दुसऱ्या दशकात म्हणजे १९२१ ते ३० या काळात अनेक चित्रपट कंपन्या स्थापन झाल्या. कलकत्ता व मुंबई याप्रमाणेच नाशिक, कोल्हापूर व मद्रास (आताचे चेन्नई) येथेही निर्मिती होऊ लागली. १९३० पर्यंत सुमारे हजार-बाराशे मूकपट निर्माण झाले. पण त्यातले पुण्याच्या नॅशनल फिल्म अर्काइव्हमध्ये आता १५ मूकपटही नाहीत. याचे कारण चित्रपट हा धंदा आहे ही धनिकांची भावना आणि आपण एका नव्या कलेला जन्म देत आहोत याची पुसटशी जाणीवही त्या काळच्या दिग्दर्शकांना नव्हती. त्यामुळे हे संचित जपून ठेवावे असे कोणाला वाटत नव्हते. ज्यांना वाटत होते, त्यांच्यापुढे आर्थिक अडचणी होत्या. चित्रपट हा १९२० नंतर धंदा झाला, पण व्यवसाय झाला

नाही. त्यामुळे व्यायसायिक निष्ठा जोपासल्या गेल्या नाहीत.

स्वाभाविकच फारच थोडे मूकपट आज उपलब्ध आहेत, त्यातील काही अर्धेमुर्धे आहेत. 'प्रभात'ने पुण्याला भव्य स्टुडिओ उभारल्यावर ज्वालाग्राही निगेटिव्ह म्हणून आपल्या पाचही मूकपटांच्या निगेटिव्हज नष्ट केल्या. १८९५ सालचे लुमिएचे मूकपट आज आपल्या आर्काइव्हमध्ये पाहायला मिळतात. पाश्चात्त्यांनी चित्रपट जतन करण्याचा घालून दिलेला आदर्श भारतीय निर्मात्यांनी कधीच ठेवला नाही.

**'बोल'पट युग :**

१९३१ साली अर्देसर इराणीचा 'आलमआरा' हा पहिला भारतीय 'बोल'पट प्रदर्शित झाला आणि भारतात मूकपटांचे युग संपून बोलपट पर्वाला आरंभ झाला. 'प्रभात' फिल्म कं.चा पहिला मराठी 'बोल'पट 'अयोध्येचा राजा' ६ मार्च १९३२ रोजी मुंबईच्या मॅजेस्टिक सिनेमात दाखवण्यात आला. प्रेक्षकांनी या हालत्या आणि बोलत्या चित्रांचे अभूतपूर्व स्वागत केले. बोलपट युगात पहिल्या दशकांत (१९३१ ते ४०) पुण्यात 'प्रभात फिल्म कं.', मुंबईत 'बॉम्बे टॉकीज' आणि कलकत्त्यात 'न्यू थिएटर्स' या मान्यवर संस्था होत्या. याखेरीज मुंबईत सागर, रणजित, मिनर्व्हा मुव्हीटोन इ. अनेक चित्रसंस्था होत्या. तरी या दशकावर प्रभाव होता, तो 'प्रभात', 'न्यू थिएटर्स' व 'बॉम्बे टॉकीज' यांचाच. त्या काळात स्टुडिओ पद्धत अस्तित्वात होती. बरेचसे चित्रीकरण स्टुडिओत चालायचे. या पद्धतीचे प्रधान वैशिष्ट्य म्हणजे नटनट्यांसह सर्व कर्मचारी स्टुडिओचे पगारी कर्मचारी होते. नट, संगीतकार करारावर होते, तर काही कर्मचारी होते. महिन्याला पगार घेणारे काही कर्मचारी होते. प्रत्येक स्टुडिओ हा एका कुटुंबाप्रमाणे राहात होता. प्रत्येक

'अयोध्येचा राजा' पहिला मराठी बोलपट



चित्रसंस्थेचा विशिष्ट ढंगाचा चित्रपट निघायचा. प्रेक्षक नटनाट्यांचे चित्रपट पाहायला जात नसत, तर 'प्रभात', 'न्यू थिएटर', 'बॉम्बे टॉकीज'चे चित्रपट पाहायला जात असत. मुंबईत या चित्रसंस्थांची थिएटरही ठरलेली असत. तेथेच त्या संस्थांचे चित्रपट प्रदर्शित व्हायचे. न्यू थिएटर्सचा 'देवदास', बॉम्बे टॉकिजचा 'अछूत कन्या' आणि प्रभातचा 'कुंकू' (हिंदी – 'दुनिया ना माने') हे चित्रपट पहिल्या दशकात गाजले. बॉम्बे टॉकिजचा भर मनोरंजनावर, तर न्यू थिएटर्सचा प्रामुख्याने संगीतावर होता. 'प्रभात'ने हेतुप्रधान विषय घेतले आणि या आयात केलेल्या विदेशी माध्यमावर देशी कलेचे लेणे चढवले.

**मराठीचा वेगळा घाट :**

'बोल'पट युगाच्या पहिल्या दशकात मराठी चित्रपटांनी लक्षणीय कामगिरी केली. हिंदी चित्रपटांप्रमाणे गाण्यांची व संगीताची रेलचेल मराठी चित्रपटांतही होती. परंतु हा सर्वमान्य फॉर्म्युला उपयोगात आणूनही त्याच्या चौकटीत काही नवे प्रयोग केले. चित्रपटांत 'बोल'पट युग सुरू झाले. तरीही मूकपट जमान्याप्रमाणे ९९% चित्रपट 'पौराणिक' व 'फँटसी' या विषयाने रंगणारे होते. बाबूराव पेंटरांनी १९२५ साली 'सावकारी पाश' हा पहिला सामाजिक मूकपट काढला. किंवा कलकत्त्यात धीरेन गांगुलींनी १९२२ सालीच 'इंग्लंड रिटर्न' हा सामाजिक मूकपट काढला होता. पण ९९% मूकपट पौराणिकच होते. बोलपटांनी तोच सिलसिला सुरू ठेवला. 'प्रभात' याला अपवाद नव्हता.




पहिला मराठी सामाजिक तोही विनोदी बोलपट काढण्याचे धाडस विश्राम बेडेकरांनी सांगलीच्या स्टुडिओत केले. चि.वि. जोशींचा मानसपुत्र गुंड्याभाऊ आणि गडकऱ्यांचा मानसपुत्र तिंबूनाना यांच्यावर अनुक्रमे 'सत्याचे प्रयोग' व 'ठकीचे लग्न' हे जोडचित्रपट निर्माण केले. ते एकत्र प्रदर्शित झाले. त्या काळातला हा अभूतपूर्व प्रयोग होता. परंतु ध्वनिमुद्रण अत्यंत सदोष झाल्याने दोन्ही चित्रपटांचे संवाद नीट ऐकू येत नव्हते. त्यामुळे प्रयोग फसला. असे असले, तरी पौराणिक, फॅण्टसी व ऐतिहासिक चित्रपटाच्या भाऊगर्दीतून बोलपट युगात मराठी चित्रपटाला वर्तमानात आणण्याचे श्रेय विश्राम बेडेकरांना जाते, हे मराठी

चित्रपटाच्या इतिहासात नोंदवले पाहिजे. बेडेकर सांगलीला चित्रपटात विनोदी चित्रपटाचा प्रयोग करत असताना त्याच वर्षी, म्हणजे १९३५ साली 'कोल्हापूर सिनेटोन' या सुसज्ज स्टुडिओत बाबूराव पेंढारकरांनी पहिला सामाजिक 'बोल'पट हाती घेतला, तो म्हणजे 'विलासी ईश्वर'. मा.विनायकांनी तो दिग्दर्शित केला. मा. विनायकांचाही हा पहिला चित्रपट. मामा वरेरकरांच्या कथेवरून र.शं. जुन्नरकरांनी पटकथा तयार केली. संकलनही जुन्नरकरांचेच. बाबूराव पेंढारकर, शोभना समर्थ, मा. विनायक व इंदिरा वाडकर यांच्या भूमिका होत्या. मराठीतला पूर्ण लांबीचा म्हणजे दोन तास चालणारा हा पहिला सामाजिक चित्रपट. 'प्रभात'नेही आपला सामाजिक चित्रपट नंतर दोन वर्षांनी, म्हणजे १९३७ साली निर्माण केला.

कोल्हापुरात असताना पहिला रंगीत चित्रपट काढण्याचा म्हणजे तंत्राचा अत्यंत धाडसी प्रयोग शांतारामबापूंनी केला. हॉलीवूडही तेव्हा रंगीत चित्रपट काढत नसे. उफा या जर्मन कंपनीने आपल्या रंगीत छायाचित्रणाची जाहिरात केली आणि 'प्रभात'मध्ये शांतारामबापूंना हा प्रयोग करावासा वाटला. त्यासाठी त्यांनी 'सैरन्ध्री' विषय घेतला. पण हे तंत्रज्ञान अर्धेकच्चे होते. स्वाभाविकच सैरन्ध्रीच्या रंगाचा बोजवारा उडाला आणि तिकीट खिडकीवरही बोजवारा उडाला. त्यानंतर प्रभात पुण्यात आली. प्रयोग फसला, पण भारतात पहिला रंगीत चित्रपट काढण्याचे श्रेय शांतारामबापूंना आणि प्रभातला जाते, हे नि:संशय.

'सैरन्ध्री'



**विनोदाची चित्रपटनिर्मिती :**

मराठीतले विनोदी वाङ्मय बाळसेदार आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, गडकरी, चिं.वि. जोशी, आचार्य अत्रे हे मराठीतले विनोदाचे शिल्पकार. मराठी विनोदी नाटकेही

प्रेक्षकांनी उचलून धरली होती. 'साष्टांग नमस्कार' (१९३३) या नाटकानंतर आचार्य अत्रे चित्रपट लिहायला लागले.

'बोल'पट युगाचे पहिले दशक हे आजच्या चित्रपटाच्या तुलनेत खूपच वेगळे होते. चित्रपट तेव्हा 'बोलू' लागला असला, तरी तंत्राच्या दृष्टीने चित्रपट बाल्यावस्थेतच होता. प्रशिक्षणाची काहीही व्यवस्था नव्हती. दिग्दर्शक, कॅमेरामन, संकलक यांच्यासमोर कोणतेही तयार मॉडेल नव्हते. अनुभवाच्या बळावरच चित्रपटनिर्मिती होत होती. नाटक, संगीत इ. कलाप्रकारांप्रमाणे पूर्वपरंपरा काहीच नव्हती. त्यातून हे आयात केलेले माध्यम. पण सुदैवाने शांताराम, मा. विनायक, भालजी यांसारखे प्रतिभावान दिग्दर्शक मराठीला लाभले. प्रारंभीची दोन-तीन वर्षे मराठी चित्रपटांनी नाटकांचे अनुकरण केले. फाळक्यांनी पहिल्या 'राजा हरिश्चंद्रा'मध्ये नाटकाप्रमाणे नटी-सूत्रधार हा प्रवेशही घातला होता. सूत्रधाराची भूमिका खुद्द दादासाहेब फाळक्यांनी केली होती. मराठीतला पहिला बोलपट 'अयोध्येचा राजा'वर मराठी संगीत नाटकांची छाप लगेच लक्षात येते. पण हे नाटकांचे अनुकरण एक दोन वर्षांत थांबले आणि लक्ष साहित्याकडे गेले. चित्रपटाचा सघन आशय देण्यासाठी सकस साहित्यकृती बंगालीतही पडद्यावर येऊ लागल्या. न्यू थिएटर्सचा गाजलेला 'देवदास' शरच्चंद्र चटर्जींच्या कादंबरीवरून घेतलेला होता.

आचार्य अत्रे हे चित्रपटात येण्यापूर्वीच विनोदी लेखक आणि नाटककार म्हणून प्रस्थापित झालेले होते. 'हंस'च्या बाबूराव पेंढारकरांनी चित्रपट लिहायला त्यांना पाचारण केले. त्या वेळच्या चित्रपट परंपरेप्रमाणे अत्रे यांनी काहीसा गंभीर 'धर्मवीर' हा चित्रपट इब्सेनच्या 'पिलर्स ऑफ दि सोसायटी' या नाटकावरून लिहिला. विनोदाचे मुख्य लक्ष्य म्हणजे रूढींवर हल्लाबोल, तो 'धर्मवीर'मध्ये होता. पण खऱ्या अर्थाने तो विनोदी चित्रपट नव्हे. पण या चित्रपटात लेखक अत्रे व दिग्दर्शक मा. विनायक ही जोडी जुळली. नट व दिग्दर्शक म्हणून मा. विनायक यांचे महत्त्व आचार्य अत्रे यांच्या मनावर ठसले. 'हंस'चे आचार्यांनी लिहिलेले पुढचे चित्रपट 'प्रेमवीर', 'ब्रह्मचारी' व 'ब्रॅण्डीची बाटली' हे तिन्ही चित्रपट विनोदी होते. या तिन्ही चित्रपटात मा. विनायक यांनी साहित्यातील विनोदाला एक सिनेमॅटिक परिमाण मिळवून दिले. यातला 'ब्रह्मचारी' तुफान लोकप्रिय ठरला आणि विनोदी चित्रपट हे जॉनर मराठी चित्रपटांत पक्के रुजले.

स्वातंत्र्य मिळेपर्यंत 'सरकारी पाहुणे' (विनायक - १९४२), 'लग्न पहावं करून' (विनायक - १९४०), 'नवरदेव' (दादासाहेब तोरणे - १९४१), 'घरजावई' (कुमारसेन समर्थ - १९४१), 'म्युनिसिपालिटी' (के. नारायण काळे - १९४१), 'किती हसाल' (वसंत जोगळेकर - १९४२) असे विनोदी चित्रपट निघाले. यातले 'नवरदेव' आणि 'घरजावई' यांचे लेखक आचार्य अत्रे

होते. 'सरकारी पाहुणे' व 'लग्न पहावं करून' हे चित्रपट चि.वि. जोशींच्या विनोदी कथांवर आधारलेले होते.

स्वातंत्र्य मिळेपर्यंतच्या विनोदी चित्रपटांना सामाजिक अस्तर होते. माणसाला त्याच्या जीवनातल्या विसंगती दाखवून देऊन त्या सुधारण्यास मदत करणे, हे विनोदाचे मुख्य कार्य होय. समाजात जेव्हा विकृती निर्माण होतात, तेव्हा त्यावर विनोदाचे अस्त्र वापरून प्रहार करणे हे विनोदी लेखनाचे उद्दिष्ट असते. स्वामी शिवानंद यांच्या 'ब्रह्मचर्य हेच जीवन' अर्थात 'वीर्यनाश हाच मृत्यू' या आचरट पुस्तकावरून आचार्य अत्रे यांना 'ब्रह्मचारी' सुचला. स्वातंत्र्यपूर्व काळातील विनोदी चित्रपट हे सामाजिक वास्तवाचे भान ठेवून होते. संस्थानिकांचा तऱ्हेवाईकपणा दाखवणारा 'सरकारी पाहुणे'; लग्न या संस्थेचे रूढींनी कसे विडंबन केले आहे, त्यावर नेमके भाष्य करणारा 'लग्न पहावं करून' या चित्रपटात तर पुण्याचे अश्लील मार्तंड कृष्णराव मराठे यांच्यावरूनही एक व्यक्तिरेखा घालण्यात आली होती. मराठी चित्रसृष्टीने पहिल्या दशकात विनोदी चित्रपटांचे एक विलोभनीय दालन 'बोल'पट युगात उघडले आणि आयात केलेल्या माध्यमावर बेमालूम देशी संस्कार केले, हे भूषणावह आहे.




**सामाजिक समस्या :**

याचबरोबर सामाजिक समस्यांचे दर्शनही पहिल्या दशकांतील चित्रपटात दिसते. 'धर्मात्मा', 'कुंकू', 'माणूस', 'शेजारी' यातून व्ही. शांतारामांनी सामाजिक समस्या मांडल्या. चित्रपट समाजाभिमुख व्हावेत हा शांतारामबापूंचा हेतू होता. 'धर्मात्मा' ही संत एकनाथांची जीवनकथा. पण या संतपटात एकनाथांचे अस्पृश्योद्धाराचे कार्य चितारलेले होते. 'कुंकू'ची कथा ना.ह. आपटे यांच्या मूळ कथेवरून घेतलेली होती. देवलांच्या 'शारदा' नाटकात जरठबाला विवाहाची तत्कालीन सामाजिक समस्या मांडलेली होती. 'कुंकू'त तीच समस्या अधिक उठावदारपणे मांडण्यात आलेली होती. 'कुंकू'तली नीरा तडफदार स्त्री आहे. १९३० चे दशक हे महाराष्ट्रात स्त्रीजागृतीचे दशक होते. त्याचेही दर्शन नीराच्या व्यक्तिरेखेत दिसते. 'कुंकू' ही मराठी चित्रपटाने घेतलेली फार मोठी झेप आहे. तंत्रदृष्ट्या जुना

असूनही ‘कुंकू’ आज पाहताना जुनाट वाटत नाही. जरठबाला विवाहाची समस्या समाजातून केव्हाच हद्दपार झालेली आहे, तरीही ‘कुंकू’ आज पाहताना ताजा वाटतो; कारण चित्रपट हे दृश्यमाध्यम आहे याचे शांतारामबापूंना कमालीचे भान होते. स्वाभाविकच सामाजिक समस्या मांडत असतानाच सौंदर्य विरुद्ध कुरूपता हा ‘कुंकू’चा अंतर्गत धागा सार्वकालिक आहे.

‘माणूस’मध्ये जीवन जगण्यासाठी धडपड आहे. प्रेमात विफलता म्हणजे जीवनात विफलता नव्हे, हा या चित्रपटाचा विषय होता. शांतारामबापूंनी हा कथाविषय घेण्याचे तात्कालिक कारण होते. न्यू थिएटर्सच्या ‘देवदास’ने तरुणांमध्ये आणलेली नैराश्याची भावना आणि दारूचे व्यसन. शांतारामबापूंचा ‘माणूस’ हे देवदासाला उत्तर आहे. चित्रपटाची स्पर्धा किती निरोगी होती, याचे हे उदाहरण आहे.

**ऐतिहासिक चित्रपट :**

बोलपट युगाच्या पहिल्या दशकात तिसरा प्रकार स्थिरावला, तो म्हणजे ऐतिहासिक बोलपट. याचे कारण शिवाजी राजांच्या कर्तृत्वाने स्थापन झालेले मराठी राज्य, दिल्लीपतीला जेरीस आणण्याची बाजीरावाच्या काळात मराठ्यांनी गाजवलेली मर्दुमकी यामुळे मराठी मनाला या पराक्रमाचा अभिमान आहे. मराठीतले ऐतिहासिक चित्रपट मराठेशाहीवरच बेतलेले आहेत. ‘मराठ्यांतली दुही’ (१९३२), ‘सिंहगड’ (१९३३), ‘छत्रपती संभाजी’ (१९३४), ‘शककर्ता शिवाजी’ (१९३४), ‘चंद्रराव मोरे’ (१९३४), ‘स्वराज सीमेवर’ (१९३५), ‘बाजीप्रभू देशपांडे’ (१९३८), ‘भगवा झेंडा’ (१९३९), , ‘नेताजी पालकर’ (१९३९), ‘रायगड’ (१९४०), ‘थोरातांची कमळा’ (१९४१), ‘बहिर्जी नाईक’ (१९४३), ‘रामशास्त्री’ (१९४६) हे चित्रपट महाराष्ट्राचा वैभवशाली इतिहास मांडतात.

ऐतिहासिक चित्रपटांचा प्रकार भालजी पेंढारकरांनी रुजवला. त्यांचा ‘नेताजी पालकर’ (१९३९) प्रेक्षकांना प्रचंड आवडला. त्या आधी ‘प्रभात’चा ‘सिंहगड’ (१९३३) असाच लोकप्रिय झाला होता. भालजींच्या ऐतिहासिक चित्रपटांचे सूत्र होते देव-देश-धर्म. या सूत्राचा प्रसार हे भालजींचे जीवनध्येय होते. यामुळे भालजी अखेरपर्यंत ऐतिहासिक चित्रपट निर्माण करत राहिले. ‘प्रभात’नेही ‘सिंहगड’ नंतर दुसरा ऐतिहासिक बोलपट ‘रामशास्त्री’ (१९४६) सिंहगडनंतर एक तपाने काढला. मराठ्यांचा रोमहर्षक इतिहास मांडणे हेच मराठी ऐतिहासिक चित्रपटांचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

**संतपट :**

मूकपटांनी केवळ धार्मिक विषयांवर चित्रपट काढल्याने सामाजिक, ऐतिहासिक, विनोदी हे विषय प्रेक्षकांना पसंत पडतील का? असा संभ्रम बोलपट युगाच्या पहिल्या दशकांतील निर्माते दिग्दर्शकांसमोर असावा. त्यामुळे

बोलपट युगातही पौराणिक विषयांनी प्रारंभ झाला. प्रभातसारखी मातब्बर संस्थाही याला अपवाद नव्हती. प्रभातने 'अयोध्येचा राजा'नंतर 'सिंहगड' निर्मिला, पण त्यानंतर 'अमरज्योती', 'अग्निकंकण', 'माया मच्छिंद्र' असे कल्पनारम्य किंवा पुराणसदृश विषयच घेतले.

पौराणिक बोलपटातील चमत्कार आणि लोकांना माहीत असलेले आणि आदराचा विषय असलेले संत हा सामाजिक चित्रपटाकडे जाण्याआधीचा एक दुवा म्हणता येईल. 'प्रभात'च्या 'संत तुकाराम' (१९३६) चित्रपटाने याचा यशस्वी प्रारंभ केला.

'संत नामदेव' (१९३५), 'कान्होपात्रा' (१९२७), 'संत जनाबाई' (१९३६), 'संत ज्ञानेश्वर' (१९३९), 'संत तुळशीदास' (१९३९), 'चोखामेळा' (१९४१), 'संत सखू' (१९४१), 'भक्त दामाजी' (१९४२) असे १०/१२ संतपट निघाले. ते सर्व मिनर्व्हा मुव्हीटोन, नवहंस, छत्रपती सिनेटोन किंवा प्रभात अशा मातब्बर संस्थांनी निर्माण केले. प्रभातच्या ज्ञानेश्वर तुकाराममध्ये चमत्कार होते, पण माफक. अन्य चित्रपटांतून चमत्कार हेच मुख्य आकर्षण असायचे.




चित्रपट माध्यमाचा विचार करताना 'संत ज्ञानेश्वर' हा सर्वश्रेष्ठ संतपट म्हणता येईल. 'संत तुकाराम' हा प्रचंड लोकप्रिय ठरला होता. स्वातंत्र्यानंतर संतपटांची सद्दी ओसरली.

१९४२ नंतर चित्रपट व्यवसायाला पहिल्या महायुद्धाच्या झळा जाणवू लागल्या. महागाई वाढली आणि तोपर्यंत अस्तित्वात असलेल्या स्टुडिओ व्यवस्थेला म्हणजे पगार पद्धतीला हादरा बसला. पहिले बंड केले ते चित्रपट तारे–तारकांनी. त्यांनी पगार पद्धती नाकारून करार पद्धती आणली आणि लोकप्रियतेनुसार कलाकार आपला मोबदला मागू लागले. युद्धामुळे कच्ची फिल्म महाग झाली होतीच, पण आता कलावंतांनी काही लक्ष रुपये मागायला सुरुवात केली. युद्धामुळे चित्रपटाचा प्रेक्षकही वाढत होता. सुशिक्षित मध्यमवर्ग हा मराठी चित्रपटाचा प्रेक्षक होता. पण युद्धकाळात शहरातला कामगारवर्गही मनोरंजनासाठी चित्रपटांकडे वळला. प्रामुख्याने हिंदी चित्रपटाचा प्रेक्षक वाढला. खर्च वाढल्यामुळे १९४६ मध्ये एकही मराठी चित्रपट प्रकाशित झाला नाही. या वाढलेल्या प्रेक्षकांची अभिरुची समान नव्हती. काही

वर्गांना तर रसिक अभिरुची नव्हती. स्वाभाविकच चित्रपटातले साहित्यमूल्य हरवत चालले. चित्रपटाला बेगडी मनोरंजनाचे वेड लागले. या असल्या अभिरुचिहीन काळात युद्धपूर्व काळात उत्तमोत्तम चित्रपट देणारा मराठी चित्रपट व्यवसाय हादरला. पुण्याचे ‘प्रभात’ व डेक्कन स्टुडिओ हळूहळू बंद पडले. उरला फक्त भालजींचा कोल्हापूरचा प्रभाकर स्टुडिओ. पण त्याची रयाही जात चालली. उत्तम स्टुडिओ नाहीत, हिंदी चित्रपटांमुळे चित्रपटगृहे मिळणे दुरापास्त होऊन बसले. मराठी चित्रपटाचा प्रेक्षक कमी झाल्याने मराठी कलावंतांना ‘ग्लॅमर’ उरले नाही. १९४७ ते १९६० म्हणजे स्वातंत्र्य मिळाल्यापासून महाराष्ट्र राज्य स्थापन होईपर्यंत मराठी चित्रपटांची दैन्यावस्था झाली. केवळ जिद्दीच्या बळावर मराठी चित्रपट व्यवसाय टिकून राहिला. अवघे १२/१५ चित्रपट वर्षाला निघायचे, त्यातला एखादाच नफा मिळवून द्यायचा. या दुरवस्थेमुळे युद्धानंतरचा मराठी चित्रपट हा युद्धापूर्वीच्या तोंडवळ्याचा राहिला. लेखक पटकथा लिहायचा, दिग्दर्शक वेगळा, ही जी बोलपट युगाच्या पहिल्या दशकातील परंपरा होती, तीच पुढे चालू राहिली. त्यात काळानुरूप बदल घडले नाहीत.




चित्रपटाचा तोंडवळा युद्धापूर्वीचा राहिला तरी युद्धानंतर लगेचच मराठीत दोन नवे ‘चित्रप्रकार’ आले. पहिला प्रकार म्हणजे ‘तमाशा’प्रधान चित्रपट! शांतारामबापूंनी ‘लोकशाहीर राम जोशी’मध्ये तमाशा सादर केला. राम जोशीची चरित्रकथा सांगणारा हा चित्रपट प्रतिभावंत ग.दि. माडगूळकरांनी लिहिला होता. त्यांचा हा पहिलाच चित्रपट. ब्राह्मण कुलोत्पन्न राम जोशी तमाशाच्या फडातल्या लावण्या लिहितो, हे उत्तर पेशवाईच्या कर्मठ काळात निषिद्ध होते. हेच नाट्य ग.दि.मां.नी अचूक पकडले. रामजोशींच्या आयुष्यात आलेली बयाबाई ही नीच कुलोत्पन्न. तिचे चरित्र तपशील उपलब्ध नाहीत, पण राम जोशीच्या एका लावणीत एका ओळीत तिचा उल्लेख आहे. ‘दैवे ही बयाबाई भेटली; कविता हिजसंगे फळा आली.’ या एका ओळीवरून माडगूळकरांनी बयाबाईची व्यक्तिरेखा रेखाटली. प्रतिभेचे पंख लाभलेला लेखक काय ‘नव’निर्माण करू शकतो, त्याचे बयाबाईची व्यक्तिरेखा हे ठळक उदाहरण. माडगूळकरांनी ‘सुंदरा मनामधी भरली’सारख्या राम जोशींच्या लावण्या वापरल्याच, पण सवालजवाब स्वतंत्रपणे लिहिले.

'चंद्रा पाहुनी सागरास ये का भरती – याचे कारण शुद्ध प्रीती' असे काव्यपूर्ण सवालजवाब होते. 'राम जोशी'ला उदंड प्रेक्षकवर्ग लाभला आणि तमाशाप्रधान चित्रपट हा नवा प्रकार मराठीत सुरू झाला.

दुसरा चित्रप्रकार 'ग्रामीण चित्रपट'! बाबूराव पेंढारकरांनी हा प्रकार 'जय मल्हार'मध्ये प्रथम सादर केला. बाबूराव पेंढारकर हे मराठी चित्रपटातले विलक्षण व्यक्तिमत्त्व. बाबुराव अभिनेता म्हणून पडद्यावर वावरत होते. त्यांना साहित्याची उत्तम जाण होती. निर्माता म्हणून लेखक, दिग्दर्शक शोधण्याची हातोटी होती. 'हंस'मध्ये त्यांनी आचार्य अत्रे यांना विनोदी लेखक म्हणून आणले. 'पहिला पाळणा'मध्ये लेखक, दिग्दर्शक विश्राम बेडेकर, 'जय मल्हार' निर्माण करताना भालजींचे साहाय्यक द.स. अंबपकर यांना दिग्दर्शन दिले आणि विनायकरावांचे साहाय्यक दिनकर द. पाटील यांची किर्लोस्करमधली 'वाघ्यामुरळी' ही कथा निवडून पटकथा संवाद दिनकर द. पाटील यांनाच लिहायला लावले. गीते ग.दि. माडगूळकरांची. संगीतात लावणीचा बाज आणला. 'काठेवाडी घोड्यावर' किंवा 'माझ्या व्हटाचं डाळिंब फुटलं' अशी लावणी ढंगाची गीते – नव्हे, कवने माडगूळकरांनी लिहिली. 'जय मल्हार' तुफान यशस्वी ठरला.




युद्धकाळात मराठी चित्रपटाला जी मरगळ आली होती, ती 'राम जोशी' व 'जय मल्हार' यांनी झटकून टाकली. पुढच्या दोन दशकांत तमाशा व ग्रामीण चित्रपटांनी मराठी चित्रपटात धुमाकूळ घातला. १९४७ ते १९६० या तेरा वर्षांत राजा परांजपेंचा 'जिवाचा सखा' (१९४८), भालजी पेंढारकरांचा 'मीठभाकर' (१९४९), विश्वास बेडेकरांचा 'वासुदेव बळवंत' (१९५०), दिनकर द. पाटील यांचा 'राम राम पाव्हणं', शांतारामबापूंचा 'अमर भूपाळी' (१९५१), दत्ता धर्माधिकारींचे 'बाळा जो जो रे' (१९५१), 'अखेर जमलं', 'स्त्री जन्मा ही तुझी कहाणी' व 'चिमणी पाखरं' (१९५२), राजा परांजपेंचे 'पेडगावचे शहाणे' आणि 'लाखाची गोष्ट' (१९५२) आणि राम

गबालेंचा ‘देवबाप्पा’, पु.ल. देशपांडेंचा ‘गुळाचा गणपती’, आचार्य अत्रे यांचा ‘श्यामची आई’, शांताराम आठवलेंचा ‘वहिनीच्या बांगड्या’ (१९५३), राजा परांजपेंचा ‘गंगेत घोडं न्हालं’ (१९५४), भालजी पेंढारकरांचा ‘पावन खिंड’ (१९५६), अनंत मानेंचा ‘दोन घडीचा डाव’ (१९५८) आणि ‘सांगत्ये ऐका’ (१९५९), माधव शिंदेंचा ‘शिकलेली बायको’ असे मोजकेच चित्रपट आर्थिकदृष्ट्या यशस्वी झाले. विनोदी चित्रपटांची परंपरा सुरू राहिली, पण त्यातून सामाजिक ढोंगावर हल्ला हे समीकरण बाद झाले. दत्ता धर्माधिकारींचे स्त्रीप्रधान, राजा परांजपे नर्मविनोदी आणि अनंत मानेंचा ‘सांगत्ये ऐका’ हा तमाशापट आणि भालजींचा ‘पावन खिंड’ हा ऐतिहासिक चित्रपट यशस्वी झाले.

अन्य बहुसंख्य चित्रपट आर्थिकदृष्ट्या अयशस्वी झाले. १९५० नंतर हिंदी चित्रपटांची स्पर्धा तीव्र झाली. मराठी चित्रपट हलाखीच्या अवस्थेत गेला. जे चित्रपट यशस्वी झाले, त्यांचे आर्थिक यश मर्यादित होते. घातलेले भांडवल परत आले, इतकेच. मोठा फायदा झाला नाही. मराठी चित्रपट व्यवसाय ‘एक उद्योग’ म्हणून स्थिर झाला नाही. एकांडी शिलेदारीच अधिक. असेही म्हणता येईल की, दाक्षिणात्य निर्मात्यांप्रमाणे मराठी निर्माते संघटित नव्हते. विदर्भ, मराठवाडा हे मराठी भाषिक असूनही तेथे हिंदी चित्रपट यशस्वी व्हायचे. एखाद-दुसरा मराठी चित्रपट प्रकाशित व्हायचा. याचा अर्थ मराठी चित्रपटाचे ‘मार्केट’ फक्त पश्चिम महाराष्ट्र व कोकण एवढेच उरले.




६० च्या दशकात दक्षिणेत चित्रपटाच्या बळावर द्रमुक पक्षाने राजकीय सत्ता हस्तगत केली. अण्णादुराई करुणानिधी हे चित्रपटांच्या पटकथा लिहायचे व त्या द्वारा द्रमुकचा प्रचार करायचे. एम.जी. रामचंद्रन, जयललिता इ. तारे-तारका द्रमुकचे समर्थक होते.

दक्षिणेत फिल्म स्टारला अफाट लोकप्रियता मिळते. यामुळेच तामिळनाडूत द्रमुक विजयी झाली आणि नंतर एम.जी. रामचंद्रन आणि आंध्रात एन.टी. रामाराव हे स्टार मुख्यमंत्री झाले. हिंदी चित्रपटांप्रमाणेच दक्षिणेत स्टार्सचे प्राबल्य आहे. महाराष्ट्र, कर्नाटक, बंगाल येथला प्रेक्षक दक्षिणात्य प्रेक्षकांप्रमाणे भाबडा नाही. त्यामुळे तेथील चित्रपटात 'स्टार्स'ना अवास्तव व अवाजवी महत्त्व मिळाले नाही. स्वाभाविकच चित्रपटाचा प्रभाव राजकारणावर दक्षिणेत जसा जास्त पडला, तसा महाराष्ट्रात पडला नाही.

कलात्मकदृष्ट्या युद्धापूर्वीचा मराठी चित्रपट आणि युद्धोत्तर मराठी चित्रपट यात मात्र काहीच फरक नव्हता. मे १९६० मध्ये महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. त्याच वर्षी राजा परांजपेंचा 'जगाच्या पाठीवर' प्रदर्शित झाला. नवनिर्मित महाराष्ट्र राज्याच्या मुख्यमंत्र्यांनी, यशवंतराव चव्हाणांनी नाटकावरचा करमणूक कर रद्द करून नाट्यव्यवसायाला दिलासा दिला. मराठी नाट्यव्यवसाय पुन्हा उभारीने उभा राहिला. प्रेक्षक नाटकांना गर्दी करू लागलाआचार्य अत्रेलिखित 'तो मी नव्हेच' (१९६२) या नाटकाने याचा प्रारंभ केला. नाटकानंतर महाराष्ट्र शासनाचे चित्रपटाकडे लक्ष गेले आणि १९६२ पासून मराठी चित्रपटांना राज्य पारितोषिके द्यायला प्रारंभ झाला. आर्थिक चणचणीत असलेल्या मराठी चित्रपट व्यवसायाला हा फार मोठा दिलासा होता. तोपर्यंत शासनाने चित्रपटाची राज्यस्तरावर कधीच दखल घेतली नव्हती. केंद्र सरकारने १९५३ मध्येच चित्रपट पारितोषिके सुरू केली आणि पहिल्याच वर्षी आचार्य अत्रे यांच्या 'श्यामची आई'ला राष्ट्रीय सन्मान मिळाला. मराठी चित्रपटचा हा सर्वोच्च गौरव होता. पण मराठी चित्रपटाची आर्थिक अडचणींची घरघर काही या सर्वोच्च सन्मानाने थांबली नाही. १९६२ सालच्या महाराष्ट्र शासनाच्या पहिल्याच चित्रपट सन्मान पारितोषिकात मधुकर पाठक दिग्दर्शित 'प्रपंच' प्रथम पुरस्कार, राजा परांजपेंच्या 'सुवासिनी'ला द्वितीय आणि अनंत मानेंच्या 'शाहीर परशुराम'चा तृतीय पुरस्कार मिळाला. विशेष नोंद करण्यासाठी गोष्ट म्हणजे तीनही चित्रपटांचे कथा-पटकथा-संवाद-गीते ग.दि. माडगूळकरांची होती.

मराठी चित्रपटांची शासकीय स्तरावर दखल घेतली जात आहे, हे पाहून कोल्हापूर, पुणे, मुंबई अशा तीन ठिकाणी विखुरलेला मराठी चित्रपट व्यवसाय खडबडून जागा झाला. प्रथम चिनी आक्रमणात बळी गेलेल्या जवानांसाठी संरक्षण निधी जमवण्यासाठी मराठी चित्रपट व्यावसायिकांनी गावोगावी कार्यक्रम करून निधी गोळा केला. यातून व्यवसायाला एकत्र ठेवण्यासाठी, साहित्य आणि नाटकांप्रमाणे चित्रपट संमेलन भरवायची कल्पना निघाली. पहिले संमेलन मुंबईत भरले, दुसरे कोल्हापुरात ८ व ९ नोव्हेंबर १९६६ आणि त्यात 'मराठी चित्रपट महामंडळा'ची स्थापना झाली. शासनाशी बोलणी

करायला एकच एक संस्था पाहिजे हा मुख्य उद्देश होता. महामंडळाने पाठपुरावा करून काही थोड्याफार सवलती मिळवल्या. पण प्रेक्षकच कमी झाल्याने मराठी चित्रपटाची आर्थिक दुरवस्था सहजी बदलणारी नव्हती. त्यासाठी मोठ्या योजनेची व आर्थिक साहाय्याची गरज होती.

शांतारामबापू, सुधीर फडके व विनायकराव सरस्वते यांनी करपरतीची योजना तयार केली. या योजनेप्रमाणे निर्मात्याचा पहिला मराठी चित्रपट जेवढा करमणूक कर गोळा करील, त्यातील ८ लाख रुपये कर शासनाने दुसरा चित्रपट काढायला परत करावा. ही परतावा योजना १८ फेब्रुवारी १९७५ ला महाराष्ट्राच्या विधानसभेत मंजूर झाली आणि लगेच कार्यवाहीला सुरुवात झाली. किमान आर्थिक अडचण दूर होणार या विचाराने मराठी चित्रपटात उत्साहाचे वारे खेळू लागले.

१९६० ते १९७५ या दरम्यान जागतिक चित्रपटात दोन मोठ्या घटना युरोपात घडून गेल्या होत्या. चित्रपट 'कले'कडे वाटचाल करण्यामध्ये पहिले परिवर्तन इटालियन चित्रपटात झाले. तेथे 'निओरिॲलिझम' म्हणजे नववास्तववाद या नावाने परिवर्तन आले. 'रोम ओपन सिटी', 'बायसिकल थीव्हज', 'शू शाईन' इ. चित्रपटांनी या नववास्तववादाचे दर्शन घडवले. हॉलिवूडच्या अगदी उलट असा हा नववास्तववाद होता. हॉलिवूडची भिस्त स्टार्सवर होती. तर नववास्तववादाने नवे चेहरे घेतले. हॉलिवूडचा कल स्टुडिओत भव्य सेट उभे करून भव्यतेकडे होता. नववास्तववादाने स्टुडिओबाहेर पडून खुल्या आकाशाखाली चित्रण केले आणि महत्त्वाचा बदल म्हणजे महायुद्धानंतरचा सामान्य माणूस व त्याची सुखदुःखे मांडणाऱ्या कथा निवडल्या. सामान्य माणूस हा केंद्रस्थानी आणला. चावून चोथा झालेली तंत्रे आणि भुसभुशीत आशय मागे पडला. इटालीतील हे नववास्तववादी चित्रपट १९५२ च्या मुंबईला भरलेल्या पहिल्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात दाखवले गेले. ते पाहून हिंदी चित्रपटसृष्टी चकित झाली. डिसिकाच्या 'शू शाइन'वरून राजकपूरने 'बूट पॉलीश' आणि 'बायसिकल थीव्हज'वरून बिमल रॉयनी 'दो बिघा जमीन' बेतला. पण मराठी चित्रपट व्यवसायाने या महोत्सवाची दखल घेतली नाही. 'नववास्तव'वाद मराठी चित्रपटाला माहीत झाला नाही. याचे कारण चित्रपट निर्मितीत गुंतलेल्या बहुसंख्य लोकांना चित्रपट हे आंतरराष्ट्रीय कलामाध्यम आहे याची पुसटशी जाणीव नव्हती.

दुसरी घटना म्हणजे फ्रान्समध्ये संपादकीय टेबलावरून उठून काही लोक चित्रपट निर्मितीकडे वळले. त्यांनी 'न्यू वेव्ह' चळवळीला जन्म दिला आणि इटालियनांच्या पुढे एक पाऊल टाकून चित्रपटाचा दिग्दर्शक हा चित्रपटाचा 'लेखक' असतो, अशी आतुर थिअरी मांडली. 'न्यू वेव्ह'मध्ये त्रूफॉ, गोदार्द हे दिग्दर्शक आघाडीवर होते. हे फ्रेंच चित्रपट फिल्म सोसायटीतून दाखवले गेले.

याकडेही आर्थिक विवंचनेत असलेल्या मराठी व्यावसायिकांचे लक्ष गेले नाही. इटलीतील नववास्तववाद १९४१ ते १९५० असा १० वर्षे टिकला, तर फ्रान्मधील 'न्यू वेव्ह' चळवळ १९५५ ते १९६५ अशी १० वर्षे टिकली.

आपल्या देशात 'पथेर पांचाली' (बंगाली १९५५)द्वारा सत्यजित रायनी इटालियन नववास्तववादाचे भारतीय 'मॉडेल' रुजवले. प्रचलित चित्रपटापेक्षा 'पथेर पांचाली' पूर्णत: भिन्न होता. नृत्यगीत हा फॉर्म्युला पथेर पांचालीत नाकारला गेला होता. तरीही बंगाली प्रेक्षकांना तो आवडला आणि कान्स महोत्सवात 'पथेर पांचाली'ला 'बेस्ट ह्यूमन डॉक्यूमेंट' म्हणून पारितोषिक मिळाले. या घटनेकडे मराठी चित्रपट निर्मितीत गुंतलेल्या लोकांनी काहीशा तुच्छतेने पाहिले. इतका संथ चित्रपट मराठी प्रेक्षकांना रुचणार नाही अशी प्रतिक्रिया दिली. 'पथेर पांचाली'तली कलात्मकता, आंतरराष्ट्रीय गौरव याकडे पूर्ण दुर्लक्ष करण्यात आले. केवळ धंदा करेल की नाही एवढाच विचार केला गेला. इटली व फ्रान्समधील चित्रपटातले परिवर्तन मराठी चित्रपट व्यवसायाला ठाऊकच नव्हते. पथेर पांचालीकडे केवळ मराठी प्रेक्षकांना तो रूचणार नाही असा शेरा मारून वासलात लावण्यात आली.




स्वाभाविकच १९६० ते ७५ या पंधरा वर्षात मराठी चित्रपट एक साचलेले डबके झाले. कौटुंबिक, विनोदी, तमाशाप्रधान अशा तीन त्याच त्याच विषयातले चित्रपट निघाले. या फॉम्युल्यांतर्गत 'सुवासिनी', 'शाहीर परशुराम', 'प्रपंच', 'मानिनी', 'मुंबईचा जावई' असे काही चांगले चित्रपट निघाले, पण तोंडवळा युद्धापूर्वीचाच. 'पाठलाग' हा मराठीतला पहिला रहस्यपट काढून राजा परांजपेंनी प्रचलित मराठी चित्रपटांपेक्षा वेगळा प्रयत्न केला. प्रेक्षकांनी, किमान शहरी प्रेक्षकांनी 'पाठलाग'चे उत्तम स्वागत केले.

राजा परांजपेंचे साहाय्यक दिग्दर्शक राजदत्त यांनी या कठीण काळात उत्तम चित्रपट देण्याची परंपरा सांभाळली. 'मधुचंद्र'या पहिल्याच चित्रपटाने त्यांच्याविषयी अपेक्षा उंचावल्या. त्यानंतर गाडगे महाराजांच्या जीवनावरील 'देवकीनंदन गोपाला', 'हेच माझे माहेर', 'मुंबईचा फौजदार' हुंडाविरोधी 'पुढचं पाऊल'

इ. चित्रपटाद्वारा राजदत्तांनी विविध कथाविषय मांडले व पारितोषिके मिळवली.

रंगमंचावर लोकप्रिय झालेल्या दादा कोंडकेनी 'सोंगाड्या' (१९७१) हा तमाशाच्या पार्श्वभूमीवर असलेला चित्रपट केला. दादा कोंडके 'विच्छा माझी पुरी करा' या लोकनाट्याने चांगलेच लोकप्रिय झालेले होते. त्यामुळे ग्रामीण आणि शहरी प्रेक्षकांनी 'सोंगाड्या'चे अभूतपूर्व स्वागत केले. तसेच शांतारामबापूंनी 'पिंजरा' (१९७२) हा रंगीत तमाशापट काढून अफाट यश मिळवले. त्यामुळे मराठी चित्रपटाने रंगाच्या युगात प्रवेश केला. हिंदी चित्रपटाच्या नंतर जवळजवळ एक तपाने मराठीत सररास रंगीत चित्रपट निघू लागले.

याच काळात मराठी चित्रपटाची चौकट काही सुशिक्षितांना जाचू लागली. हे सारे सुशिक्षित फिल्म सोसायटी चळवळीतले होते. या चळवळीचा प्रारंभ बंगालमध्ये झाला. सत्यजित रायनी देशातली पहिली फिल्म सोसायटी १९४७ मध्ये सुरू केली. फिल्म सोसायटी ही प्रायोगिक नाटकांप्रमाणे 'प्रेक्षक' चळवळ आहे. प्रेक्षकांची अभिरुची सुधारल्याखेरीज चित्रपटांचा दर्जा, कलात्मकता सुधारणार नाही, हे फिल्म सोसायटी चळवळीचे मुख्य सूत्र. तसेच चित्रपट हे साहित्याप्रमाणे प्रादेशिक कलामाध्यम नसून आंतरराष्ट्रीय कलामाध्यम आहे, याची जाणीव सत्यजित रायना होती. यामुळे फिल्म सोसायटी चळवळ प्रथम कलकत्त्यात सुरू झाली. 'पथेर पांचाली'च्या प्रकाशनानंतर जेव्हा वेगळ्या चित्रपटाचे मॉडेल प्रेक्षकांसमोर आले, तेव्हा कलकत्त्यात चळवळीने जोर पकडला. फिल्म सोसायट्या भराभर स्थापन होऊ लागल्या. त्या वेळी म्हणजे ६० च्या दशकाच्या अखेरीस आजच्या सारखे डीव्हीडी, टेलिव्हिजन, इंटरनेट इ. प्रकार नव्हते. त्यामुळे हॉलिवूडखेरीज जागतिक चित्रपट फक्त फिल्म सोसायटीतच पाहायला मिळत



होता. स्वाभाविकच फिल्म सोसायट्यांना भरपूर सदस्यसंख्या लाभली आणि जपान, पोलंड, हंगेरी, स्वीडन इ. देशातील उत्तमोत्तम चित्रपट प्रेक्षकांना पाहायला मिळाले. यातून 'नव' चित्रपटाची जाणीव कलकत्त्यात रुजली. मुंबईत १९६४ मध्ये चित्रपट व्यवसायातील १८ क्राफ्टस युनियन्सी एकत्र येऊन 'फिल्म फोरम'ही फिल्म सोसायटी सुरू केली. फिल्म फोरमची सदस्यसंख्या २५००/३००० होती. मराठी व्यावसायिकांनी फिल्म सोसायटी चळवळीकडे लक्ष दिले नाही, तसेच मराठी प्रेक्षकांनीही. मराठी चित्रपट रसिकांना जागतिक चित्रपटाची ओळख करून देण्यासाठी पाच चित्रपट समीक्षकांनी पुढाकार घेऊन 'प्रभात चित्रमंडळ' या फिल्म सोसायटीची १९६८ मध्ये स्थापना केली. मराठी चित्रपट रसिकांनी या उपक्रमाला उदंड प्रतिसाद दिला. चित्रपट व्यवसायातले प्रामुख्याने हिंदीतील व चित्रपटात काही नवे करू इच्छिणारे धडपडणारे तरुण सभासद होते. जयंत धर्माधिकारी हा त्यापैकीच एक. राज खोसलांच्या हिंदी चित्रपटात उमेदवारी करणारा, मराठी चित्रपटातले कलात्मक दारिद्र्य पाहून अस्वस्थ होणारा. त्याने 'कलावंत विकणे आहे' (१९७१) हा गीतविरहित विनोदी चित्रपट दिग्दर्शित केला. मात्र कथा आणि त्याचा आविष्कार जुन्या वळणाचा होता.




ज्येष्ठ अभिनेते-दिग्दर्शक गजानन जागीरदार यांनी दुसरा प्रयत्न केला. त्यांनी 'दोन्ही घरचा पाहुणा' हा गीतविरहित विनोदी चित्रपट दिग्दर्शित केला. जागीरदार फिल्म सोसायटी चळवळीशी संबंधित होते. फिल्म फोरमचे सरचिटणीस होते. फिल्म फोरम आणि फिल्म सोसायटी चळवळीशी संबंधित छायालेखक गोविंद निहलानी आणि नाट्यदिग्दर्शक सत्यदेव दुबे यांनी संयुक्तपणे तेंडुलकरांच्या 'शांतता कोर्ट चालू आहे' या गाजलेल्या प्रायोगिक रंगभूमीवरील नाटकावर त्याच नावाचा चित्रपट बेतला. पटकथा-संवाद विजय तेंडुलकरांचे होते. मराठीतला हा पहिला समांतर चित्रपट १९७१ सालीच प्रकाशित झाला. १९७१ मधील हे चाकोरीबाहेर जाणारे तिन्ही चित्रपट प्रेक्षकांनी नाकारले. या उलट तमाशाची पार्श्वभूमी असलेला 'सोंगाड्या' (१९७१) आणि तमाशप्रधान 'पिंजरा' (१९७२) या दोन्ही

चित्रपटांचे प्रेक्षकांनी अभूतपूर्व स्वागत केले. प्रायोगिकता हरली, व्यावसायिकता जिंकली.

मराठी चित्रपट पुन्हा पहिल्या वळणावर आला. हे सूत्र १९७५ पर्यंत होते. मराठी चित्रपटाची चौकट जाचणारे काही तरुण खुद्द चित्रपट व्यवसायातही होते. दादा कोंडके यांच्या युनिटमध्ये रामदास फुटाणे कार्यरत होते. पुढे चित्रपट काढायचा त्यासाठी अनुभव असावा, यासाठी ते दादा कोंडकेंच्या प्रॉडक्शन युनिटमध्ये काम करत होते. व्यंग कवी, चित्रकार, साहित्याची उत्तम जाण, चौफेर वाचन असे रामदास फुटाणे यांनी विजय तेंडुलकरांची भेट घेऊन कथा मागितली. तो चित्रपट म्हणजे 'सामना'.

'सामना'ची कथा एका साखरकारखानदारीची आहे. महाराष्ट्र राज्य स्थापनेनंतर महाराष्ट्रात सहकारी चळवळीला शासनाने प्रोत्साहन दिले. यातून पश्चिम महाराष्ट्रात सहकारी साखर कारखाने उभे राहिले आणि त्यांनी महाराष्ट्राच्या राजकारणावरही प्रभाव टाकला. पण या नव्या वर्तमानाचे चित्रण मराठी साहित्यातही 'सामना' प्रदर्शित होईपर्यंत झालेले नव्हते. तेंडुलकरांच्या समर्थ लेखणीतून 'सामना' उतरलेला होता. डॉ. जब्बार पटेलांनी तो दिग्दर्शित केला. त्याचा तोंडवळा नेहमीच्या मराठी चित्रपटांप्रमाणेच होता. पण लेखन इतके प्रभावी होते की 'सामना' (१९७५) अन्य मराठी चित्रपटांच्या तुलनेत एकदम वेगळा ठरला. व्यक्तिरेखा सच्च्या होत्या. डॉ. लागू, निळू फुले यांच्या अभिनयाची जुगलबंदी होती. या गुणसमुच्चयामुळे 'सामना' बर्लिन आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात स्पर्धा विभागात दाखवला गेला. बर्लिनमध्ये गेलेला पहिला मराठी चित्रपट.




१९७५ नंतर आलेल्या करपरती योजनेमुळे मराठी चित्रपट व्यवसायात

बऱ्यापैकी पैसा खेळू लागला निर्मितिमूल्ये उत्तम होऊ लागली. रंगीत छायाचित्रण अधिक चांगल्या प्रमाणात होऊ लागले.

निर्मितिमूल्ये वाढली तरी कलात्मक मूल्ये वाढली नाहीत. कौटुंबिक, ग्रामीण व विनोदी वर्तुळात मराठी चित्रपट फिरत राहिला. 'सिंहासन', 'शापित', 'पुढचं पाऊल', 'निवडुंग', 'हमाल दे धमाल' असे वेगळे कथाविषय आले पण एकतर करपरतीमुळे चित्रपटांची संख्या वाढू लागली आणि १९८४ साली रंगीत टेलिव्हिजन व व्हिडिओ आल्यामुळे हिंदी चित्रपटाच्या जीवघेण्या स्पर्धेची पकड ढिली झाली. याचा फायदा मराठी चित्रपटाला मिळाला. ८० च्या दशकात तमाशपट मागे पडले आणि विनोदी चित्रपटांना उधाण आले. या वेळपर्यंत शहरी व ग्रामीण प्रेक्षक यांच्यातली दरी खूप कमी झाली होती. त्यामुळे शहरी विषयावरील चित्रपटांना शहराच्या बाहेरही प्रेक्षक खेचू लागला. 'गंमत-जंमत', 'धूमधडाका', 'अशी ही बनवाबनवी' इ. विनोदी अंगाने जाणाऱ्या चित्रपटांना अमाप प्रेक्षक लाभला. पण हे विनोदी चित्रपट ३० च्या दशकातील 'ब्रह्मचारी'प्रमाणे सामाजिक समस्यांवर भाष्य करणारे नव्हते. याच काळात दादा कोंडकेंचे 'इनोदी' चित्रपट रौप्यमहोत्सव साजरा करीत होते.




या सगळया गदारोळात आंतरराष्ट्रीय स्तरावर दोनच चित्रपट पोहोचले. अमोल पालेकर दिग्दर्शित 'आक्रीत' (१९८१) आणि डॉ. जब्बर पटेल दिग्दर्शित 'उंबरठा' (१९८१), दोन्ही चित्रपटांच्या पटकथा विजय तेंडुलकरांच्या होत्या. अमोल पालेकर मराठी प्रायोगिक नाटकातून हिंदी चित्रपटात अभिनेते झाले. पालेकर फिल्म सोसायटी चळवळीत सदस्य होते. त्यामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय चित्रपटाची जाण होती. अभिनेत्याचे 'करियर' जोरात असतानाच अमोल पालेकरांनी 'आक्रीत' निर्माण केला आणि दिग्दर्शितही केला. ही कथा मानवत खूप खटल्यावर आधारित होती.

स्वत: अमोल पालेकर यांनी त्यात प्रमुख भूमिका केली. ‘आक्रीत’ फ्रान्समधल्या नान्टस महोत्सवात दाखवला गेला. तेथे त्याला उत्कृष्ट चित्रपटाचे पारितोषिक मिळाले.

‘उंबरठा’ची कथा शांता निसळ यांच्या आत्मकथनावरून घेतलेली होती. परंतु तेंडुलकरांनी पटकथा करताना कथेला स्त्रीमुक्ती चळवळीची पार्श्वभूमी दिल्याने ती अधिक प्रभावी झाली. ‘उंबरठा’ने देशात सन्मान मिळवलेच, शिवाय मॉस्को आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात भारताचे प्रतिनिधित्व केले.

१९९१ साली विजय कोंडके यांचा ‘माहेरची साडी’ हा कौटुंबिक चित्रपट प्रदर्शित झाला. जुन्या कौटुंबिक वळणाचाच हा चित्रपट होता. ‘माहेरची साडी’ला अमाप प्रेक्षक लाभला. दादा कोंडकेंच्या ‘इनोदी’ चित्रपटापेक्षा कितीतरी अधिक. ‘माहेरची साडी’चे आर्थिक यश ही मराठी चित्रपटातली अभूतपूर्व घटना म्हणून नोंदवली पाहिजे.

१९९१ साली नरसिंहराव सरकारने भारताच्या अर्थव्यवस्थेत जागतिकीकरण आणले. त्यामळे वाहिन्यांची संख्या वाढली त्या पाठोपाठ केबल आली आणि १९९५ ला डीव्हीडी बाजारात आली. चित्रपटाची डिजिटायझेशनकडे वाटचाल होऊ लागली. काही वाहिन्यांनी २४ तास चित्रपट दाखवायला सुरुवात केली. चित्रपटगृहामध्ये जाऊन चित्रपट पाहण्याची गरज उरली नाही. एकमेव मासमिडिया हे चित्रपटाचे बिरुद संपले. १९९२/९३ नंतर मराठी चित्रपटाला याचा फार मोठा फटका बसला. प्रेक्षक मराठी चित्रपटाकडे फिरकेनासे झाले. त्यामुळे करपरतीची योजना निरुपयोगी ठरली. कर गोळाच होत नाही तर करपरतावा कसा मिळणार? मराठी चित्रपट महामंडळाने महाराष्ट्र शासनाकडे करपरतीची योजना रद्द करून सानुग्रह अनुदान द्यावे असा लकडा लावला.




याच काळात सुमित्रा भावे व इन्स्टिट्यूट प्रशिक्षित सुनील सुकथणकर या दिग्दर्शक द्वयीने ‘दोघी’पासून मराठी चित्रपटात नवी कथानके आणली. महाराष्ट्रात सेना-भाजपा युतीचे सरकार आले. या सरकारने १९९७ साली मराठी चित्रपटावरचा करमणूक कर माफ केला

आणि १५ लाख रुपयांचे सानुग्रह अनुदान निर्मात्याच्या दुसऱ्या चित्रपटासाठी सुरू केले. पुढे ते ३० लाखांपर्यंत वाढत गेले. जागतिकीकरणामुळे काँट्रॅक्टर, व्यापारी, संगणक उत्पादक यांच्या हाती बराच पैसा आला. १५ लाखांचे गाजर असल्याने अमराठी निर्मातेही मराठी चित्रपटाकडे आकर्षित झाले. परिणामी मराठी चित्रपटांची संख्या वर्षाला वाढू लागली. २०/२१ चित्रपट वर्षाकाठी निर्माण होणारा व्यवसाय ५०/५५ वर गेला आणि २१ व्या शतकाच्या पहिल्या दशकात संख्या १०० च्या वर पोहोचली. सानुग्रह अनुदानामुळे अनेक नवे निर्माते आले, त्यांना चित्रपट निर्मितीचा किंवा वितरणाचा काहीही अनुभव नाही. त्यामुळे अनेक चित्रपट एक दोन आठवड्यातच गायब होऊ लागले. पहिल्या दशकात अनेक नवे दिग्दर्शक आले. त्यातला उमेश कुलकर्णी व सचिन कुंडलकर हे दोनच दिग्दर्शक पुण्याच्या फिल्म इन्स्टिट्यूटमधून पद्धतशीर शिक्षण घेऊन आले आहेत. बाकीचे बहुतेक हौशी, अननुभवी आहेत. त्यांनी कोठेही साहाय्यक दिग्दर्शक म्हणून उमेदवारी केलेली नसते. थोडाफार दूरदर्शन मालिका दिग्दर्शित करायचा अनुभव होता. याचा व्हायचा तोच परिणाम चित्रपटात दिसतो. बहुसंख्य चित्रपट उथळ कथा मांडतात, दिग्दर्शन सुमार असते. या भाऊगर्दीत काही दिग्दर्शकांनी आपला वेगळेपणा सिद्ध केला. त्यातला पहिला मान संदीप सावंतचा. त्याने 'श्वास'मध्ये मराठी गीत-संगीताचा फॉर्म्युला नाकारून शुद्ध चित्रपटाकडे झेप घेतली. 'श्वास'ने (२००३) सर्वोत्कृष्ट चित्रपटाचे त्या वर्षीचे राष्ट्रीय पारितोषिक तर मिळवलेच, त्याचबरोबरच हॉलिवूडच्या ऑस्कर पारितोषिकासाठी भारतातर्फे 'श्वास'ची प्रवेशिका पाठवण्यात आली.




दुसरा प्रशिक्षित दिग्दर्शक उमेश कुलकर्णी. गीतांची लयलूट नसूनही आणि ग्रामीण वातावरण असूनही, त्याचा पहिला चित्रपट 'वळू' चांगलाच लोकप्रिय झाला. दुसरा चित्रपट 'विहीर' अमिताभ बच्चनने निर्माण केला होता. 'विहीर' मानवी मनाचे गंभीर पापुद्रे उलगडणारा होता आणि तिसरा 'देऊळ' वर्तमान ग्रामीण

वातावरणात अंधश्रद्धेचे दर्शन घडवणारा. 'देऊळ'ला सर्वोत्तम चित्रपटाचा राष्ट्रीय पुरस्कार कन्नड चित्रपटाबरोबर विभागून मिळाला. या सर्व चित्रपटांची निर्मितिमूल्ये उत्कृष्ट होती. 'देऊळ'चे प्रेक्षकांनी उदंड स्वागत केले. परेश मोकाशी नाटकातून चित्रपटाकडे आला, तर रवी जाधव अ‍ॅडफिल्ममधून आला. परेशने मराठीचा फॉर्म्युला जाणीवपूर्वक नाकारला. त्याचा 'हरिश्चंद्राची फॅक्टरी' भारतातर्फे ऑस्कर पारितोषिकासाठी पाठवण्यात आला होता.

रवी जाधव यांचे 'नटरंग' व 'बालगंधर्व' (२०११) हे दोन्ही चित्रपट गाजले. 'नटरंग'ला तमाशाची पार्श्वभूमी आणि 'बालगंधर्व'ला मराठी संगीत नाटकांची पार्श्वभूमी. दोन्ही विषय मराठीत नवीन. सुजय डहाके हा इंडोनेशीयातील फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये शिक्षण घेऊन आलेला. 'शाळा' या चित्रपटात त्याने मिलिंद बोकील यांची कादंबरी घेतली. त्याला २०११चे सर्वोत्तम मराठी चित्रपटाचे राष्ट्रीय पारितोषिक मिळाले. प्रेक्षकांनीही 'शाळा'चे बऱ्यापैकी स्वागत केले.




मराठीत वेगळे प्रयोग करत मराठी चित्रपटाला प्रगतीकडे नेणारे अर्धाडझन दिग्दर्शक आज कार्यरत आहेत. १९८० नंतर मराठीत दादा कोंडकेंच्या चित्रपटांनी उत्पन्नाचे विक्रम मोडले तसे, २१व्या शतकाच्या पहिल्या दशकात महेश मांजरेकर यांनी विक्रम मोडले. 'मी शिवाजीराजे भोसले बोलतोय' या त्यांच्या चित्रपटाने २२ कोटी रुपये उत्पन्न मिळवून नवाच विक्रम केला. आणखी एक विक्रमवीर गजेंद्र अहिरे. नाटक, मालिका लिहीत व दिग्दर्शित करत २००२ मध्ये ते मराठी चित्रपटात आले आणि अवघ्या दहा वर्षात ३५ चित्रपट दिग्दर्शित करून त्यांनी मराठीत एक नवाच विक्रम प्रस्थापित केला. २०१३ साली ६० व्या राष्ट्रीय चित्रपट पुरस्कारांमध्ये मराठी चित्रपटाने आपण सर्वश्रेष्ठ असल्याचा पुरावाच दिला. सर्वोत्कृष्ट अभिनेता - विक्रम गोखले (अनुमती), सर्वोत्कृष्ट अभिनेत्री - उषा जाधव (धग), सर्वोत्कृष्ट दिग्दर्शन - शिवाजी पाटील (धग), सर्वोत्कृष्ट संगीतकार - शैलेंद्र बर्वे (धग), सर्वोत्कृष्ट पार्श्वगायिका - आरती अंकलीकर - टिकेकर (संहिता) असे

सर्वोत्कृष्ट असण्याचे पाच पुरस्कार मराठी चित्रपटाने पटकावत असतानाच 'इन्व्हेसमेंट' (२०१२) या रत्नाकर मतकरी दिग्दर्शित मराठी चित्रपटाला 'सर्वोत्कृष्ट मराठी' चित्रपटाचा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला, यातच मराठी चित्रपटाच्या अर्थपूर्णतेचे आणि यशाचे गमक आहे. २०१३ साली आलेल्या 'दुनियादारी' या सुहास शिरवळकर यांच्या कादंबरीवर आधारलेल्या आणि संजय जाधव यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटाने तरुणाईच्या मनाचा वेध घेत 'सुपरहिट' होण्याचा मान मिळवला आणि २५ कोटींहून अधिक कमाई करत प्रेक्षकांना खिळवून ठेवले.

मराठी चित्रपटात आज प्रेक्षकशरण व कलात्मक दोन्ही प्रकारचे चित्रपट निर्माण होत आहेत. काही आंतरराष्ट्रीय स्तरावरही पोहोचत आहेत. १९७५ साली मराठी चित्रपट दैन्यावस्थेत होता, पण शासनाच्या कृपाप्रसादाने मराठी चित्रपटसृष्टी आज आबाद आहे. एक कोटीच्यावर मराठीचे बजेट जाऊ लागले आहे. प्रेक्षक मात्र वाढलेला नाही आणि प्रेक्षकांची अभिरुचीही फारशी उंचावलेली नाही.




चित्रपटात आता डिजिटल क्रांतीचे तांत्रिक वादळ घोंगावू लागले आहे. अनेक चित्रपटगृहातून ३५ एम.एम. प्रिंटऐवजी उपग्रह वाहिनीवरून चित्रपट दाखवले जाऊ लागले आहेत. व्हिडिओ, डीव्हीडी, ब्लू रे या पाठोपाठ आता डीसीपी फॉरमॅट आला आहे. डीसीपी टेप चित्रपटगृहात ३५ एम.एम. प्रिंटएवढी मोठी दिसू शकते. येत्या ५ वर्षात सेल्यूलॉइड ३५ एम.एम. प्रिंट बंद होईल आणि त्याची जागा डिजिटल प्रिंट घेईल. तंत्रज्ञानाची ही भरारी कोठवर जाणार आहे, याचा अंदाज आज करणे कठीण आहे.

अशा तंत्रज्ञान भरारीच्या काळात प्रादेशिक बाजारपेठ असलेला मराठी चित्रपट कोणते वळण घेईल हे सांगणे अवघड आहे. एक मात्र सत्य आहे, ते म्हणजे दाक्षिणात्य चित्रपट व्यवसायाप्रमाणे मराठी चित्रपट व्यवसाय हा व्यावसायिकदृष्ट्या सक्षम नाही. महाराष्ट्र राज्य हे पश्चिम महाराष्ट्र, कोकण, विदर्भ

आणि मराठवाडा असे मिळून बनलेले असले तरी, परंपरेप्रमाणे चित्रपट वितरण विभागाचे तीन विभाग आज आहेत. ते मुंबई सर्कीट म्हणजे प. महाराष्ट्र, कोकण, गोवा व बेळगाव, सीपीसीआय म्हणजे विदर्भातले ८ जिल्हे आणि निझाम सर्कीट म्हणजे मराठवाड्यातील ८ जिल्हे. या विभागणीमुळे मराठी चित्रपट महाराष्ट्रभर प्रदर्शित करणे निर्मात्याला अवघड जाते. मराठीत तर आज वितरकच नाहीत. निर्मात्यालाच आपल्या चित्रपट वितरणाचे अवघड शिवधनुष्य उचलावे लागते.

याचे परिणाम मराठी चित्रपटसृष्टीला आज भोगावे लागत आहेत, भविष्यातही भोगावे लागतील. दक्षिणेत साऊथ इंडियन फिल्म चेंबर ऑफ कॉमर्स ही व्यावसायिक संघटना आहे. अशी संघटना मराठीत नाही. साधारणत: पश्चिम महाराष्ट्रातील चित्रपटगृहात जास्तीत जास्त मराठी चित्रपट प्रदर्शित होतात. विदर्भ व मराठवाडा येथे फार थोडे चित्रपट प्रदर्शित होतात. तेथे फक्त हिंदी चित्रपटच प्रेक्षकांना ठाऊक आहेत. या परिस्थितीवर काही व्यावसायिक तोडगा काढावा या मन:स्थितीत मराठी चित्रपट व्यावसायिक नाहीत. संख्या वाढणे, गुणवत्ता कमी असणे आणि प्रेक्षकांच्या कमतरतेमुळे व्यावसायिक गणिते न जुळणे अशा चक्रात मराठी चित्रपट व्यवसाय आजतरी गुरफटलेला आहे.




चित्रपट व्यवसाय जसा संघटित नाही, तशीच प्रेक्षकाची मनोवस्था आहे. ८० टक्के भारतीय चित्रपटप्रेक्षक चित्रपटाला केवळ मनोरंजनाचे साधन समजतो. संगीत व नाटक या कलांप्रमाणे चित्रपट हा मराठी प्रेक्षकांच्या सांस्कृतिक जाणिवेचा एक भाग झालेला नाही. त्यासाठी केरळ व बंगालमध्ये फिल्म सोसायटी चळवळीने मोलाचे कार्य केले. स्वाभाविकच महाराष्ट्राच्या तुलनेने केरळ आणि बंगालमधला चित्रपटप्रेक्षक अधिक सुजाण आहे. महाराष्ट्रात फिल्म सोसायटी चळवळ आता कोठे जिल्हास्तरावर पोहोचली आहे. अद्यापही ही चळवळ समाजावर फारसा प्रभाव टाकू शकलेली

नाही. शहरापुरताच हा प्रभाव काही प्रमाणात आहे. याचे उत्तम उदाहरण म्हणजे ‘हरिश्चंद्राची फॅक्टरी’ हा चित्रपट ऑस्करला प्रवेशिका म्हणून गेल्यामुळे शहरी प्रेक्षकांनी तो पाहायला गर्दी केली. पण नांदेडला केवळ एका खेळातच ‘हरिश्चंद्राची फॅक्टरी’ चित्रपटगृहामधून उतरवावा लागला. महाराष्ट्रातली ही वस्तुस्थिती ध्यान्यात घ्यायला हवी. तसेच मराठी अभिजनही चित्रपट माध्यमापासून अंतर राखून आहेत.

या विचित्र परिस्थितीत समाधानाची किनार म्हणजे विद्यापीठातून आता चित्रपट हा विषय अभ्यासक्रमात आला आहे. चित्रपटाचे ॲकॅडमिक स्वरूप विचारात घेतले जाऊ लागले आहे. त्यामुळे तरुण पिढीत चित्रपट माध्यमाची योग्य जाणीव लवकरच निर्माण होईल आणि चित्रपट भविष्यात समाजाच्या सांस्कृतिक जीवनाचा भाग होईल, अशी अपेक्षा ठेवायला हरकत नाही.

– सुधीर नांदगावकर

* * *

# अ ते औ





## अंबपकर, दत्तात्रेय सखाराम

**दिग्दर्शक, अभिनेते, निर्माते**

**२९ सप्टेंबर १९०२ – ११ डिसेंबर १९९२**



दत्तात्रेय सखाराम अंबपकर यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील वारणाकाठच्या अंबप या गावी झाला. लहानपणापासूनच त्यांना नकला करण्याची सवय होती, त्यातून निर्माण होणाऱ्या भांडणांना कंटाळून त्यांच्या घरच्यांनी त्यांची कोल्हापूरला रवानगी केली. कोल्हापूर विद्यापीठ हायस्कूलमध्ये त्यांचे शालेय शिक्षण झाले. त्यांनी राजाराम महाविद्यालयामधून त्यापुढील शिक्षण घेतले. शिकत असतानाही नकला करण्याची सवय कमी झाली नाही, उलट त्यातील गोडी वाढल्यामुळे त्यांनी नाटकांमधून कामे करायला सुरुवात केली. त्यातूनच त्यांच्यावर अभिनयाचे संस्कार झाले. महाविद्यालयात अंबपकर व मा. विनायक एकाच वर्गात शिकत होते. चित्रपटाच्या आवडीमुळे अंबपकर, बाबूराव पेंटर यांच्या महाराष्ट्र फिल्म कंपनीत जाऊ लागले. कंपनीत दाखल होणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने पडतील ती कामे करण्याचे बंधन असल्यामुळे द.स. अंबपकरांनाही सुरुवातीच्या काळात सर्व कामे करावी लागली.

अभिनयाची आवड असणाऱ्या अंबपकर यांना काम करावे लागले ते दिग्दर्शन विभागात, बाबूराव पेंढारकर यांच्या हाताखाली. त्याच बरोबरीने त्यांनी चित्रपट विपणन, प्रदर्शन आदी गोष्टीही येथे केल्या.

पुढे महाराष्ट्र फिल्म कंपनी बंद पडल्यानंतर भालजी पेंढारकर यांच्या कोल्हापूर सिनेटोन कंपनीत अंबपकर दाखल झाले. त्या काळात भालजी पेंढारकर ‘आकाशवाणी’ या चित्रपटाचे दिग्दर्शन करत होते. या चित्रपटात अंबपकर यांनी साहाय्यक म्हणून काम केले आणि छोटी भूमिकाही केली. याच काळात भालजी, कंपनीशी वाद झाल्यामुळे कंपनी सोडून गेले आणि दादासाहेब निंबाळकरांनी या चित्रपटाचे दिग्दर्शन करण्याचे ठरल्यावर अंबपकरांनी त्यांना साहाय्य केले. त्याने प्रभावित झालेल्या दादासाहेबांनी अंबपकरांना स्वत:च्या ‘स्वराज्य सीमेवर’ या चित्रपटासाठी आपल्याकडे बोलावले. पुढे भालजींच्या ‘पार्थकुमार’ चित्रपटातही त्यांनी काम केले. भालजी पेंढारकर यांनी कोल्हापूर सिनेटोन सोडल्यानंतर ते सरस्वती सिनेटोन, अरुण फेमस इ. कंपन्यांचे चित्रपट करत होते आणि अंबपकर त्यांना साहाय्य करत होते. केवळ दिग्दर्शन नव्हे तर चित्रपटनिर्मिती क्षेत्रातले वेगवेगळे धडे घेत होते. हे चित्रपट होते ‘राजा गोपीचंद’, ‘नेताजी पालकर’, ‘गोरखनाथ’, ‘थोरातांची कमळा’, ‘सूनबाई’. पुढे भालजी पेंढारकर कोल्हापूरला गेले आणि त्यांनी ‘प्रभाकर चित्र’ ही स्वत:ची संस्था उभारली आणि ऐतिहासिक, पौराणिक आणि ग्रामीण चित्रपटांची निर्मिती केली. त्या चित्रपटात अंबपकर सहभागी झाले.

१९४७ साली मा. विनायकांचे सहकारी व ज्येष्ठ ध्वनिमुद्रक विष्णुपंत चव्हाण आणि निर्मिती व्यवस्थापक वामनराव या दोघांनी बाबूराव पेंढारकर यांच्या नेतृत्वाखाली ‘मंगल चित्र’ ही संस्था स्थापन केली आणि ‘जय मल्हार’ (१९४७) चित्रपटाची निर्मिती केली. या चित्रपटाचे दिग्दर्शक होते द.स. अंबपकर. बाबूराव पेंढारकर, ललिता पवार, चंद्रकांत, सुमती गुप्ते यांच्यासह


अंबपकर दिग्दर्शित 'देवाघरचं लेणं'मध्ये ललिता पवार आणि प्रभाकर मुजुमदार

अंबपकर यांनीही यात अभिनय केला. दिनकर द. पाटील यांच्या 'वाघ्या मुरळी' या कथेवर हा तमाशाप्रधान चित्रपट आधारलेला होता. प्रचंड लोकप्रिय ठरलेल्या या चित्रपटाने चित्रपट व्यवसायात नवचैतन्य आणले. हमखास पैसा देणारा मराठी चित्रपट काढायचा तर 'ठसकेबाज लावण्यांचा तमाशा चित्रपट' काढायचा, असा पायंडा या चित्रपटामुळे पडला. या चित्रपटानंतर अंबपकर यांना 'पुढचं पाऊल' या चित्रपटात 'बारक्यानाना' ही वैशिष्ट्यपूर्ण भूमिका मिळाली. त्यांची ही भूमिका रसिक प्रेक्षकांच्या चांगलीच स्मरणात राहिली. त्यानंतर त्यांनी माणिक स्टुडिओचा 'कल्याण खजिना' (१९५०), रत्नप्रभाने निर्मिती केलेला 'संत कान्होपात्रा' (१९५०) या चित्रपटांचे दिग्दर्शन केले. 'संत कान्होपात्रा'ची कथा अंबपकर यांनीच लिहिली होती. १९५४ साली त्यांनी 'कांचन चित्र' ही स्वत:ची निर्मिती संस्था स्थापन केली आणि 'सासर माहेर' या चित्रपटाची निर्मिती आणि दिग्दर्शनही केले. १९५७ साली 'देवाघरचं लेणं' या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. कथा–पटकथा अंबपकर यांनीच लिहिली आणि संवाद पु.भा. भावे यांचे होते.

चित्रपट दिग्दर्शनाबरोबरच अंबपकर यांनी 'तांबडी माती', 'चाळ माझ्या पायात', 'आधार', 'अशी रंगली रात्र', 'बाईनं केला सरपंच खुळा' अशा चित्रपटांत दिग्दर्शकांच्या आग्रहाखातर छोट्या भूमिकाही केल्या.

द.स. अंबपकर यांनी मोलाचे योगदान दिले ते मराठी चित्रपट व्यवसायिकांची संघटना बांधण्यामध्ये. पुढे १ नोव्हेंबर १९६६ च्या संमेलनात या संस्थेची 'मराठी चित्रपट महामंडळ' अशी रीतसर स्थापना झाली. या संस्थेच्या कार्यकारिणीतही ते होते, तसेच या संस्थेचे कार्यवाह म्हणूनही त्यांनी काम केले. कोल्हापुरात चित्रनगरी स्थापन करण्यासाठी उभारलेल्या चळवळीत त्यांचा महत्त्वपूर्ण वाटा होता. या चळवळीच्या

यशस्वितेसाठी त्यांनी निकराचा लढा दिला. तो लक्षात घेऊन त्या वेळचे सांस्कृतिक कार्यमंत्री सुशीलकुमार शिंदे यांनी त्यांना 'शेलार मामा' ही पदवी दिली. कोल्हापूरच्या 'करवीर नाट्य मंडळा'लाही त्यांनी योगदान दिले. 'आंधळ्यांची शाळा', 'सुवर्णपदक' अशा अनेक नाटकांचेही दिग्दर्शन त्यांनी केले.

– सुभाष भुरके

**अजय-अतुल**
*गोगावले, अतुल अशोक*
**११ सप्टेंबर १९७४**
*गोगावले, अजय अशोक*
**२१ ऑगस्ट १९७६**
**संगीतकार**



आपल्या सुरेल संगीताने रसिकांच्या मनावर अधिराज्य गाजवणारे आजच्या पिढीचे संगीतकार म्हणजे अजय-अतुल. या दोघांचाही जन्म पुण्यात झाला. त्यांचे वडील महसूल खात्यात नोकरीला असल्यामुळे त्यांची सारखी बदली होत असे. त्यामुळे अजय व अतुल यांना पश्चिम महाराष्ट्रातल्या वेगवेगळ्या गावी राहावे लागे. ग्रामीण



संस्कृती, तिथल्या परंपरा, त्याचप्रमाणे तिथल्या भाषेचा ढंग, उच्चारातले बारकावे त्यांना जवळून हेरता आले. लहानपणापासूनच काकडआरतीपासून ते लग्नानंतरच्या गोंधळापर्यंत लोकसंगीताचे सर्व प्रकार त्यांना बघायला व ऐकायला मिळाले. लहानपणी बघितलेला सांस्कृतिक महाराष्ट्र पुढे त्यांच्या संगीतातून अवतरला. लहानपणी दोघांनाही शिक्षणामध्ये विशेष रस नव्हता. पण शालेय जीवनातच संगीताविषयीचा त्यांचा ओढा वाढला. शाळेत असतानाच गाणी-नृत्य बसवणे, बँड पथकात भाग घेणे असे त्यांचे उद्योग चालूच होते. घरात संगीताची पार्श्वभूमी नसल्यामुळे त्यांना संगीतासाठी घरातून प्रोत्साहन मिळाले नाही. तसेच, वाद्ये विकत घेण्याएवढी आर्थिक परिस्थिती नसल्यामुळे त्यांनी पुण्याला आल्यावर घराजवळच्या बँडवाल्याशी ओळख करून घेऊन त्यांच्याकडून अनेक वाद्ये शिकून घेतली. पुण्याच्या काही वाद्यवृंदांतून ते कार्यक्रम करू लागले.

महाविद्यालयात असताना एन.सी.सी.च्या स्पर्धेत त्यांनी पूर्वसंगीतबद्ध व स्वत: संगीतबद्ध केलेले गाणे सादर केले व त्यासाठी त्यांना प्रथम बक्षीस मिळाले. दरम्यान त्यांनी बाळासाहेब ठाकरे व दादा कोंडके यांच्यासमोर 'पोवाडा' गायल्यामुळे त्यांचे कौतुक झाले व त्यामुळे त्यांना प्रेरणा मिळाली. एकांकिका, खाजगी अल्बम्स अशी कामे करता करता चांगल्या संगीतामुळे त्यांचे नाव झाले आणि लवकरच 'विश्वविनायक' हा त्यांचा पहिला अल्बम आला. त्यातली गाणी खूप गाजली. 'सही रे सही', 'लोचा झाला रे', 'कळा या लागल्या जीवा', 'नामदेव म्हणे', 'गोपाळा गोपाळा', 'मन उधाण वाऱ्याचे' इ. नाटकांना त्यांनी दिलेले संगीत लोकप्रिय झाले. या दोघांनी उमेदवारीच्या काळात रवींद्र जैन, विशाल भारद्वाज, अमर उत्पल, अशोक पत्की, श्रीधर फडके इ. संगीतकारांकडे काम केले.

व्यावसायिक जिंगल्सपासून आपल्या कारकिर्दीला सुरुवात करणाऱ्या अजय-अतुल यांनी जाहिराती, बॅले यांना दिलेले संगीतही वेगळ्या धाटणीचे होते. नाटक, जाहिराती, जिंगल्स यांना संगीत देणाऱ्या अजय-अतुल यांनी 'सावरखेड - एक गाव', 'अगं बाई अरेच्चा', 'जत्रा', 'जबरदस्त', 'उलाढाल', 'जोगवा', 'नटरंग', 'भारतीय' आदी चित्रपटातील गाण्यांना संगीत दिले. या चित्रपटातील गाण्यांच्या तालाने रसिकांचे पाय जसे थिरकले, तसेच काही गाण्यांनी, त्यातील भावार्त आळवणीने रसिकांना अस्वस्थही केले.

श्रवणीयता, भावमधुरता, आराधना, परमेश्वर

आळवणी, प्रेमाराधन अशा अनेकानेक भावना अजय-अतुल यांच्या संगीतातून व्यक्त झालेल्या आहेत. संगीताची उत्तम जाण असणाऱ्या या जोडीने आपल्या आवाजात गायलेल्या गाण्यांनाही तितकीच लोकप्रियता मिळालेली दिसते. 'कोंबडी पळाली...', 'बायको कायको...', 'मोरया मोरया...', 'ये गो ये, ये मैना...', 'मल्हारवारी...' या गाण्यांच्या तालावर तरुणाईची पावले ताल धरू लागली, तशीच 'खेळ मांडला...', 'मन उधाण वाऱ्याचे...', 'जीव रंगला' यांसारख्या गाण्यांनी भावविवशही होऊ लागला.

संगीताच्या माध्यमातून रसिकांच्या परस्परविरुद्ध भावना मनात निर्माण करण्याचे अजय-अतुल यांचे कौशल्य निश्चितच वाखाणण्याजोगे आहे. मराठीप्रमाणेच हिंदी चित्रपटसृष्टीतही फार थोड्या अवधीत या जोडीने आपल्या नावाचा ठसा उमटवला. 'लाईफ हो तो ऐसी' (यातील हनुमान चालीसा), 'विरुद्ध', 'गायब', 'सिंघम', 'अग्निपथ', 'बोल बच्चन' अशा हिंदी चित्रपटांनाही त्यांनी संगीत दिले. या सर्व चित्रपटांमधील त्यांचे संगीत लोकप्रिय ठरले, आणि ते राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय ख्यातीचे संगीतकार म्हणून नावारूपाला आले. दक्षिणेतले प्रसिद्ध संगीतकार इलया राजा यांच्याबरोबर काम करायची संधीही त्यांना मिळाली.

अजय-अतुल यांना आपल्या यशस्वी संगीत कारकिर्दीबद्दल महाराष्ट्र कला निकेतन पुरस्कार, २००५ सर्वोत्कृष्ट संगीतकार (सावरखेड एक गाव), माता सन्मान, २००५ सर्वोत्कृष्ट संगीतकार (सावरखेड एक गाव), संस्कृती कला दर्पण, २००५ सर्वोत्कृष्ट संगीतकार (अगं बाई अरेच्चा), माता सन्मान – सर्वोत्कृष्ट संगीतकार, २००९ (जोगवा), व्ही. शांताराम पुरस्कार २००९ सर्वोत्कृष्ट संगीतकार (उलाढाल), राज्य पुरस्कार २००९ सर्वोत्कृष्ट संगीतकार (जोगवा), आदी पुरस्कार मिळालेले आहेत, तर २०११ चा राम कदम पुरस्कारही त्यांना मिळालेला आहे. मराठी लोकसंगीताचा बाज सांभाळून लोकप्रिय गाणी देणारे 'अजय-अतुल' आजच्या पिढीचे मोठे संगीतकार आहेत.

– मधू पोतदार

**संदर्भ** : १) पोतदार मधू, 'संगीतकार कोश', प्रतीक प्रकाशन, पुणे; २०१२.

## अत्रे, प्रल्हाद केशव

*आचार्य अत्रे*

**पटकथा, संवाद, गीतलेखक, निर्माता, दिग्दर्शक**

**१३ ऑगस्ट १८९८ – १३ जून १९६९**

☞ **मुख्य नोंद पत्रकारिता खंड**



प्रल्हाद केशव अत्रे हे बहुआयामी व्यक्तिमत्त्व होते. कवी, विडंबनकार, नाटककार, पत्रकार, विनोदी लेखक आणि पट्टीचा वक्ता अशी सर्व क्षेत्रे त्यांनी आपल्या कर्तृत्वाने गाजवली होती. १९३२ साली चित्रपट बोलू लागल्यावर या नव्या माध्यमाबद्दल अनेक मराठी साहित्यिकांना कुतूहल होते. आचार्य अत्रे हे त्यापैकी एक. चित्रपटात मात्र ते निमंत्रणावरून आले. १९३३ साली आचार्य अत्रे यांचे 'साष्टांग नमस्कार' हे विनोदी नाटक गाजत होते.

पुण्याला दादासाहेब तोरणेंचा सरस्वती सिनेटोन स्टुडिओ होता. त्यांनी आचार्य अत्रे यांना पुढच्या बोलपटांची कथा लिहायला बोलावले, पण हा चित्रपट तयार झालाच नाही. दरम्यान सांगलीहून बेडेकर यांनी 'ठकीचे लग्न'चे संवाद लिहायला त्यांना बोलवले आणि बाबूराव पेंढारकरांनी हंस पिक्चर्ससाठी तिसरे निमंत्रण दिले. हंससाठी त्यांनी 'धर्मवीर' (१९३७) या चित्रपटाची पटकथा लिहिली. मा. विनायक यांनी तो चित्रपट दिग्दर्शित केला. अत्रे लेखक, विनायक दिग्दर्शक असे 'हंस'चे 'प्रेमवीर', 'ब्रह्मचारी', 'ब्रॅण्डीची बाटली' हे विनोदी आणि 'अर्धांगी' असे गंभीर चित्रपट तयार झाले. सर्वच विनोदी चित्रपट गाजले, पण त्यातल्या त्यात




'ब्रह्मचारी' या चित्रपटाने रसिकांना मोहिनी घातली. 'यमुनाजळी खेळू खेळ कन्हैया' या अत्रे यांच्या गाण्याने अतोनात लोकप्रियता मिळवली.

चित्रपटांची लोकप्रियता लक्षात घेऊन अत्रे यांनी लिमिटेड कंपनी काढण्याची कल्पना मांडली. बाबूराव पेंढारकर यांनी ती उचलून धरली. त्यानंतर 'हंस'चे 'नवयुग चित्रपट लि. कंपनी'मध्ये रूपांतर झाले आणि ती कंपनी कोल्हापूरहून पुण्यात आली. अशा प्रकारे अत्रे यांनी 'नवयुग स्टुडिओ' सुरू केला. 'नवयुग'साठी आचार्य अत्रेंनी 'लपंडाव' हा चित्रपट लिहिला. 'नवयुग'ने के. नारायण काळे यांना दिग्दर्शनाचे काम दिले. 'लपंडाव' पूर्ण झाल्यावर 'संत सखू' दिग्दर्शित करायचे मा. विनायक यांनी नाकारल्यावर अत्रे 'नवयुग'चा राजीनामा देऊन बाहेर पडले. म्हणजे 'प्रभात'च्या आधी एक वर्ष 'नवयुग' कंपनी फुटली आणि आचार्य अत्रे मुंबईत आले. त्यांनी परळला भाडे करारावर स्टुडिओ घेतला आणि 'पायाची दासी' हा चित्रपट लिहिला. तोही लोकप्रिय ठरला. 'पायाची दासी'तील 'अंगणात फुलल्या जाईजुई' व 'ऐन दुपारी एकटी अशी' ही गाणी गाजली. त्यानंतर आचार्य अत्रे यांनी 'वसंतसेना' हा हिंदी–मराठी चित्रपट निर्माण केला. गजानन जागीरदारांना त्याचे दिग्दर्शन दिले. पण 'वसंतसेना'ने त्यांना प्रचंड अपयश दिले. कर्जाचा डोंगर उभा राहिला. त्यानंतर 'बाईलवेडा' (१९४३), 'मोरूची मावशी' (१९४८) 'ब्रह्मघोटाळा' (१९४९), 'ही माझी लक्ष्मी' (१९५१), 'श्यामची आई' (१९५३), 'महात्मा फुले' (१९५४) हे चित्रपट काढून आचार्य अत्रे यांनी 'अत्रे पिक्चर्स' बंद केली आणि संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात उडी घेतली. त्यासाठी त्यांनी 'दै. मराठा' हे वृत्तपत्र सुरू केले.

'श्यामची आई'ला सर्वोत्कृष्ट चित्रपटाचे राष्ट्रपती सुवर्णपदक मिळाले. 'महात्मा फुले'ला रौप्यपदक

मिळाले. 'मोरूची मावशी'पासून कथा-पटकथा-संवाद याबरोबरच पुढच्या सर्व चित्रपटांचे दिग्दर्शनही आचार्य अत्रे यांनी केले. पण आर्थिक परिस्थिती ओढगस्तीची राहिली. त्यांना 'चित्रमंदिर स्टुडिओ' विकावा लागला, तसेच हिंदी चित्रपटसृष्टीशी स्पर्धा सुरू झाल्यामुळे अत्रे चित्रपटसृष्टीतून बाहेर पडले.

– सुधीर नांदगावकर

## अथय्या, भानू सत्येंद्र

**वेषभूषाकार**

**२८ एप्रिल १९२६**

'ऑस्कर' हे आंतरराष्ट्रीय दर्जाचे व मानाचे पारितोषिक मिळवणाऱ्या वेषभूषाकार म्हणून भानू अथय्या विख्यात आहेत. भानू अथय्या यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. भानुमती अण्णासाहेब राजोपाध्ये असे त्यांचे मूळ नाव होते. त्यांच्या आईचे नाव शांताबाई होते. अण्णासाहेब राजोपाध्ये छत्रपतींचे पुरोहित होते. वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून भानुमतींनी चित्रकलेशी दोस्ती केली. तर त्याच दरम्यान त्यांनी 'एकादशी महात्म्य' या चित्रपटात बालकलाकार म्हणून



काम केले. भानुमती ९ वर्षांच्या असतानाच त्यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यांची चित्रकलेविषयीची आवड पाहून त्यांच्या आईने घरीच चित्रकलेसाठी शिक्षक ठेवले. शालेय शिक्षण संपताच त्यांनी मुंबईच्या जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्समध्ये प्रवेश घेतला. शेवटच्या वर्षी त्यांना सुवर्णपदक मिळाले.

साठच्या दशकात टाईम्स ऑफ इंडियाच्या 'ईव्हज वीकली'मधील भानू यांची रेखाटने पाहून अभिनेत्री नरगिस प्रभावित झाल्या. नरगिस यांच्यामुळेच भानू यांना राज कपूरच्या 'श्री ४२०' च्या वेषभूषेचे काम मिळाले. त्यानंतर त्यांनी मागे वळून पाहिले नाही. गुरुदत्त यांचा 'साहिब, बीबी और गुलाम', देव आनंद यांचा 'गाईड', 'आम्रपाली', शम्मी कपूर यांचा 'ब्रह्मचारी', शाहरूख खान यांचा 'ओम् शांती ओम्' इ. हिंदी चित्रपटांतून वेषभूषेचे काम करता करता त्यांना रिचर्ड ॲटेनबरोच्या 'गांधी'साठी काम करण्याची संधी मिळाली आणि या



गांधी चित्रपटातील भानू अथय्या यांनी साकारलेली गांधीजींची वेषभूषा

चित्रपटातील गांधीजींच्या वेषभूषेसाठी ऑस्कर पारितोषिक मिळाले. जोम मोलो यांच्याबरोबर विभागून हे पारितोषिक मिळाले होते. हे पारितोषिक मिळवणाऱ्या त्या पहिल्या भारतीय होत. तसेच 'लगान', 'स्वदेश' यासारख्या चित्रपटांमधील कलाकारांच्या वेषभूषा त्यांनी समर्पकपणे साकारल्या.

भानू यांनी अमोल पालेकरांच्या 'महर्षी कर्वे' या मराठी चित्रपटासाठी वेषभूषा केली होती. दाक्षिणात्य वेषभूषाकार सत्येंद्र अथय्या यांच्याशी त्यांनी विवाह केला.

– श्रीराम ताम्रकर

**संदर्भ** : १) संपा. पारीख कमल, 'महाराष्ट्र चरित्रकोश', सुनीती पब्लिकेशन, पुणे; २०००.

## अधिकारी, कांचन मार्कंड

**अभिनेत्री, निर्माती**

**२३ एप्रिल**



नाटक, चित्रपट, दूरदर्शन या माध्यमांतून अभिनयाने सुरू झालेला प्रवास यशस्वी निर्मितीपर्यंत नेणाऱ्या कांचन अधिकारी यांचे पूर्वाश्रमीचे नाव कांचन शरद घारपुरे. एका मध्यमवर्गीय व सुसंस्कारित कुटुंबात मुंबई येथे त्यांचा जन्म झाला. वडील शरद घारपुरे मुंबईला श्रीनिवास मिलमध्ये नोकरी करत होते आणि आई कुसुम घारपुरे कीर्तनकार होत्या. शालेय वयापासूनच त्यांना अभिनयक्षेत्राचे आकर्षण होते. मुंबईच्या एम.एल. डहाणूकर महाविद्यालयातून त्यांनी वाणिज्य शाखेची पदवी प्राप्त केली. त्यानंतर 'आविष्कार' या नाट्यसंस्थेच्या शिबिरात अभिनयाचे प्रशिक्षण घेतले.

वाणिज्य शाखेच्या शिक्षणामुळे त्यांनी 'बँक ऑफ इंडिया'मध्ये ५ ते ६ वर्षे नोकरीही केली. याच दरम्यान त्यांनी महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धेमध्ये रत्नाकर मतकरींच्या एका नाटकात काम केले. या भूमिकेचे खूप कौतुक झाले आणि त्यांना सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कारही मिळाला. या नाटकानंतर रंगभूमीवरील त्यांची वाटचाल सुरू झाली, पण दरम्यान दूरदर्शनच्या मुंबई केंद्रावर भक्ती बर्वे यांच्या प्रोत्साहनाने निवेदिका म्हणून त्यांची निवड झाली. १९८५ ते १९८८ या तीन वर्षांच्या काळात त्यांनी दूरदर्शन वाहिनीवर निवेदिका व वृत्तनिवेदिका म्हणून कामाचा अनुभव घेतला, तो भविष्यात त्यांच्या कुटुंबीयांच्या 'सब टी.व्ही.' अर्थात 'श्री अधिकारी ब्रदर्स' यांच्या खाजगी वाहिनीसाठी उपयुक्त ठरला.

'बबन प्रभू' लिखित 'पळा पळा कोण पुढे पळे तो' या पहिल्या व्यावसायिक नाटकातून कांचन अधिकारी यांनी व्यावसायिक रंगभूमीवर पदार्पण केले. या पहिल्याच नाटकामुळे त्यांना भक्ती बर्वे, आत्माराम भेंडे, दिलीप प्रभावळकर, माधव वझे या कलाकारांसह काम करण्याचा अनुभव मिळाला. या नाटकातील भूमिकेमुळे 'प्रेमासाठी वाट्टेल ते' या प्रकाश भेंडे यांच्या चित्रपटात त्यांना संधी मिळाली. अशोक सराफ या दिग्गज कलाकाराबरोबर नायिका म्हणून या चित्रपटात काम केले. कांचन अधिकारी यांनी बाबा सावंत यांच्या 'हिचं काय चुकलं?' या चित्रपटात रंजना, विक्रम गोखले यांच्यासह भूमिका केली होती. हा त्यांचा पहिलाच चित्रपट होता. किरण शांताराम यांची निर्मिती असलेल्या, गिरीश घाणेकर दिग्दर्शित 'बाळाचे बाप ब्रह्मचारी' या चित्रपटातही भूमिका साकारली. १९८९ साली आलेल्या या चित्रपटाच्या चित्रीकरणादरम्यान त्यांनी मार्कंड अधिकारी यांच्याशी विवाह केला.

लग्नानंतर काही काळ अभिनयक्षेत्रापासून दूर राहिल्यानंतर कांचन अधिकारी यांनी १९९५ साली 'दामिनी' या अत्यंत लोकप्रिय मालिकेच्या दिग्दर्शनाने या क्षेत्रात पुनरागमन केले. पंधराशेपेक्षा जास्त भाग चाललेल्या या मालिकेने अनेक पुरस्कारही मिळवले. आठ वर्षे चालू असलेल्या या मालिकेने लोकप्रियतेचा उच्चांक गाठला. कांचन अधिकारी यांनी मराठी चित्रपटांबरोबरच हिंदी चित्रपटातही भूमिका केल्या. दादा

कोंडके यांच्या 'आगे की सोच' या हिंदी चित्रपटात शक्ती कपूर, स्वप्ना या कलाकारांबरोबर सहजतेने अभिनय केला. 'ये जो है जिंदगी', 'बनते बिगडते', 'और भी है राहें', 'तितलियाँ' यासारख्या हिंदी मालिकांमध्ये अभिनय केलाच, शिवाय 'अभी तो मै जवान हूँ', 'संबंध', 'डोली लेके आयी है दुल्हनियाँ', 'हँसी वो फसी' या हिंदी मालिकांचे दिग्दर्शनही केले.

'श्री अधिकारी ब्रदर्स टेलिव्हिजन नेटवर्क लिमिटेड' या आपल्या कुटुंबाच्या व्यवसायात सक्रिय सहभाग घेऊन 'मी मराठी' या मराठी वाहिनीच्या कार्यक्रमांच्या निर्मितीची आणि दिग्दर्शनाची जबाबदारी यशस्वीपणे पार पाडत आहेत. त्यांनी रोहिणी हट्टंगडी, अजिंक्य देव, रेणुका शहाणे या कलाकारांना घेऊन 'अंतर' या दूरदर्शनपटाचे, 'मानिनी' या मराठी चित्रपटाचे दिग्दर्शन केले आहे. या चित्रपटानंतर 'तुक्या तुकविला नाग्या नागविला', 'दोन घडीचा डाव', 'मोकळा श्वास' अशा वेगळ्या वाटेने जाणाऱ्या चित्रपटांचे दिग्दर्शन केले. तसेच 'चोरावर मोर' यासारख्या काही मराठी मालिकांचेही दिग्दर्शन केले आहे. साजिद खान यांच्या 'सब कुछ हो सकता है' या मालिकेची संकल्पना आणि दिग्दर्शन कांचन अधिकारी यांनी केले.

रंगभूमी, चित्रपट, दूरदर्शन या माध्यमांतून अभिनय आणि दिग्दर्शनाबरोबर 'ध्रुव सेवाभावी संस्थे'च्या माध्यमातून सामाजिक उपक्रमांमध्येही कांचन अधिकारी यांचा सहभाग असतो. एकूणच सर्व माध्यमांची जाण असलेल्या कांचन अधिकारी यांचे निर्माती म्हणून काम आजही सुरू आहे.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## अनासपुरे, मकरंद मधुकर
**अभिनेता**
**२२ जुलै १९७३**

मकरंद मधुकर अनासपुरे या हरहुन्नरी कलाकाराने वेगळी शैली, प्रसंगावधान, अंगभूत अभिनयगुण आणि



विनोदाची समज या वैशिष्ट्यांच्या जोडीला खास मराठवाडी भाषेची आणि उच्चारांची जोड या भांडवलावर रुपेरी पडद्यावरचा यशस्वी प्रवास केला आहे. रुपेरी पडद्यावरच्या यशासाठी फक्त देखणा चेहरा लागतो, हा समज खोटा ठरवत, चारचौघांसारखे सर्वसाधारण दिसणारे मकरंद आज मराठी चित्रपटातले आघाडीचे आणि लोकप्रिय कलाकार ठरले. मकरंद यांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे रुपेरी पडद्यावर यश मिळाल्यावर बहुतेक जण रंगभूमीकडे पाठ फिरवतात, याला त्यांनी स्वत:च्या कर्तृत्वाने अपवाद निर्माण केला आहे. मराठी चित्रपटांमध्ये उदंड यश मिळवूनही मकरंद रंगभूमीवरही आणि छोट्या पडद्यावरही कार्यरत आहेत.

मकरंद मधुकर अनासपुरे यांचा जन्म औरंगाबाद येथे झाला. मकरंद यांचे वडील मधुकर आणि आई माधुरी हे दोघेही साधारण घरातले होते. घरात कलेचा वारसा फारसा नव्हता, पण मकरंद यांच्याकडे उपजतच कला होती. मकरंद यांचे सुरुवातीचे शिक्षण बीडला आणि नंतर औरंगाबादला झाले. ते विज्ञानाचे पदवीधर असून नाटकाच्या, अभिनयाच्या वेडामुळे त्यांनी मराठवाडा विद्यापीठातून नाट्यशास्त्राचीही पदवी मिळवली. महाविद्यालयीन जीवनापासूनच ते स्पर्धात्मक पातळ्यांवर चमकू लागले होते.

मकरंद यांना रंगभूमीवर पहिली संधी मिळाली तीच सुयोगनिर्मित 'झालं एकदाचं' या अशोक सराफ आणि सुधीर जोशी यांच्या नाटकातून!(१९९४). मराठी चित्रपटातले लोकप्रिय नायक म्हणून गाजणाऱ्या मकरंद यांचा पहिला चित्रपट मात्र हिंदी होता! 'यशवंत' हा त्यांचा पहिला चित्रपट! त्यानंतर पहिला मराठी चित्रपट त्यांना मिळाला तो 'सरकारनामा'. या चित्रपटातूनच मकरंद यांच्या मराठवाडी बोलीचा ठसका रसिकांच्या परिचयाचा झाला आणि मग त्यांनी मागे वळून पाहिले



**चित्रपट 'उलाढाल' मधील दृश्यात मकरंद अनासपुरे**

नाही! मकरंद यांच्या अभिनयाचे वैशिष्ट्य असे की, त्यांना स्वत:ची बलस्थाने वेळेवर आणि अचूक गवसली आहेत. त्यामुळे ती वैशिष्ट्ये सातत्याने वापरून अधिक धारदार, तीक्ष्ण बनवताना ते दिसत आहेत. अभिनयाच्या व संवाद उच्चारण्याच्या खास लकबीमुळे मकरंद लोकप्रिय अभिनेता झाले आहेत.

मकरंद यांनी गेल्या सुमारे पंधरा वर्षांत प्राधान्याने विनोदी चित्रपट केलेले दिसतात. 'पिपाणी', 'नवसाचं पोर,' 'असंच पाहिजे', 'नवं नवं', 'नाथा पुरे आता', 'सावरखेड एक गाव', 'काय द्याचं बोला', 'जबरदस्त', 'शुभमंगल सावधान', 'दोघात तिसरा आता सगळं विसरा', 'बाप रे बाप डोक्याला ताप', 'सासू नंबरी जावई दस नंबरी', 'दे धक्का', 'तुला शिकवीन चांगलाच धडा', 'मी शिवाजीराजे भोसले बोलतोय', 'जाऊ तिथे खाऊ', 'निशाणी डावा अंगठा', 'ऑक्सिजन', 'हापूस' असे अनेक यशस्वी चित्रपट मकरंद यांच्या नावावर आहेत. त्यांनी अभिनित केलेल्या चित्रपटांची संख्या ८० हून अधिक आहे. अर्थात विनोदी भूमिकांचे आधिक्य असले तरी प्रत्येक व्यक्तिरेखेत मकरंद यांचा 'खास स्पर्श' दिसून येतो. मकरंद यांचे काम पाहताना 'विनोदी भूमिका ही अत्यंत गंभीरपणे घ्यायची गोष्ट आहे' या विधानाची प्रचिती येते. अभिनयाच्या जोडीने मकरंद निर्मितीच्या आणि दिग्दर्शनाच्या क्षेत्रातही उतरले आहेत. त्यांनी 'गल्लीत गोंधळ दिल्लीत मुजरा' व 'गोष्ट छोटी डोंगराएवढी' (२००९) या चित्रपटांची निर्मिती केली आणि 'डँबिस' (२०११) हा चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केला, तसेच या चित्रपटाच्या निर्मितीतही त्यांचा सहभाग होता. या चित्रपटाला बोस्टन आंतरराष्ट्रीय महोत्सवात

'स्पेशल इंडी स्पिरीट रेक्क्कनेशन' पुरस्कार मिळाला.

मकरंद यांची 'पाच लाख चार लाख', 'हुरहुर', 'बकरी', 'सगळे एकापेक्षा एक', 'जाऊ बाई जोरात' आणि 'केशवा माधवा' ही नाटके खूप गाजली. छोट्या पडद्यावर 'शकुन अपशकुन', 'बेधुंद मनाच्या लहरी', 'तो एक राजहंस', 'तिसरा डोळा', 'शेजार', 'आमच्यासारखे आम्हीच', 'गंगूबाई नॉन मॅट्रिक', 'जिभेला काही हाड', 'तू तू मै मै' या मालिकांमधून, तसेच 'टिकल ते पॉलिटिकल', 'हास्यसम्राट', 'हफ्ताबंद' या रिॲलिटी शोमधून त्यांनी कामे केली.

मकरंद यांनी 'यशवंत', 'निदान', 'वास्तव', 'वजूद', 'जिस देश मे गंगा रहता है', 'प्राण जाय पर शान न जाय' असे हिंदी चित्रपट केले आहेत. तसेच 'हिरेवाली मुटीया' या भोजपुरी चित्रपटात काम केलेले आहे. मकरंद यांना 'काय द्याचं बोला'साठी महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार, 'बघ हात दाखवून'साठी संस्कृती कलादर्पण व महाराष्ट्र शासनाचा बेस्ट कॉमेडीअन, 'डँबीस'साठी अत्रे पुरस्कार, पु.ल. देशपांडे तरुणाई पुरस्कार, तसेच पहिला युवा बालगंधर्व पुरस्कार, २०१०–२०१२ या सलग तीन वर्षात महाराष्ट्राचा फेवरेट हा पुरस्कार, मराठवाडाभूषण असे, अनेक पुरस्कार मिळाले आहेत.

मकरंद यांनी तीन वर्षांत 'मला एक चान्स हवा', 'तिचा बाप त्याचा बाप', 'दोन घडीचा डाव', 'डावपेच', 'अगडबम' आणि 'मन्या सज्जना' हे लागोपाठ यशस्वी चित्रपट दिले आहेत.

– जयश्री बोकील

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

**अनुपमा**

*कुलकर्णी, रेखा जयंत*

**अभिनेत्री**

**२३ एप्रिल १९५०**

चित्रपटसृष्टीत अनुपमा या नावाने परिचित असणाऱ्या मूळच्या रेखा कुलकर्णी यांचा जन्म मुंबईतील मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे वडील जयंत



कुलकर्णी हे रेल्वेत नोकरीला होते, तर आई अलका कुलकर्णी या एल.आय.सी.मध्ये कामाला होत्या. रेखा कुलकर्णी यांचे शालेय शिक्षण मांटुग्याच्या लोकमान्य विद्यामंदिर येथे झाले, तर पुढील शिक्षण त्यांनी रुपारेल महाविद्यालयातून घेतले. याच दरम्यान रेखा यांना मधुसूदन कालेलकर यांच्या 'आसावरी' या नाटकात काम करण्याची संधी मिळाली. याच नाटकादरम्यान मधुसूदन कालेलकर यांनी रेखा यांचे नाव 'अनुपमा' असे ठेवले.

अभिनयाचा कोणताही वारसा नसणाऱ्या, तसेच अभिनयाचे कोणतेही प्रशिक्षण न घेतलेल्या रेखा कुलकर्णी यांच्या घरच्यांकडे ग.दि. माडगूळकर यांनी चित्रपटात काम करण्यासाठी विचारणा केली. परंतु घरतल्या जुन्या वळणामुळे त्यांना अनेक दिवस परवानगी मिळाली नाही, पण कालांतराने ग.दि. माडगूळकरांनी दिलेल्या आश्वासनामुळे रेखा यांना चित्रपटात काम करण्याची संधी मिळाली. त्यांनी काम केलेला आणि प्रदर्शित झालेला पहिला चित्रपट म्हणजे 'घरची राणी' (१९६८). या चित्रपटातल्या त्यांच्या अभिनयामुळे त्यांना 'धर्मकन्या' (१९६८) या चित्रपटात भूमिका मिळाली. त्यातील दारिद्र्यात होणारी तरुण मुलीची भावाकुल अवस्था अनुपमा यांच्या अभिनयातून व्यक्त झालेली आहे. त्यानंतर अनुपमा यांनी 'एक माती अनेक नाती' (१९६८), 'आधार' (१९६९), 'तांबडी माती' (१९६९), 'देवमाणूस' (१९७०), 'नाते जडले दोन जिवांचे' (१९७१), 'पाठराखीण' (१९७२), 'राजा शिवछत्रपती' (१९७४), 'सापळा' (१९७६) 'परिवर्तन' (१९७९) या चित्रपटांमध्ये महत्त्वपूर्ण भूमिका पार पाडल्या.

मराठी चित्रपटांमधून अनेक भूमिका केलेल्या अनुपमा यांनी हिंदी चित्रपटसृष्टीतही प्रवेश केल्यावर 'संसार',




‘दुनिया क्या जाने’, ‘सांस भी कभी बहू थी’, ‘दो बच्चे दस हाथ’, ‘टॅक्सी ड्रायव्हर’, ‘पाप और पुण्य’ या चित्रपटांमधून भूमिका केल्या. अनुपमा यांनी मराठी व हिंदी पाठोपाठ गुजराती चित्रपटसृष्टीतही आपल्या नावाचा ठसा उमटवला. ‘धरती ना लोलू’ या गुजराती चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना गुजरात सरकारने पुरस्कार देऊन त्यांच्या कामाचा गौरव केला. तसेच ‘जेसल तोरल’ (१९७१), ‘जेहर तो विखा जानी’ (१९७७) या दोन्ही चित्रपटांतील भूमिकांसाठी अनुपमा यांना गुजरात सरकारतर्फे गौरवण्यात आले आहे.

चित्रपटात काम करत असतानाही अनुपमा यांनी नाटकांमधूनही कामे केली. ‘अपराध मीच केला’, ‘सुखाचा शोध’ या नाटकात त्यांनी साकारलेल्या भूमिकाही वैशिष्ट्यपूर्ण होत्या.

नाट्य, चित्रपट कारकिर्द बहरत असतानाच बडोद्याचे डॉ. दिलीप धारकर यांच्याशी अनुपमा यांनी प्रेमविवाह केला. विवाहानंतर अनुपमा शिकागोला स्थायिक झाल्या. तेथेही अनुपमा या आकाशवाणीवर, दूरदर्शनवर कार्यरत असून नाटके बसवण्यातही व्यग्र आहेत.

– महेश टिळेकर

## अमरापूरकर, सदाशिव दत्तात्रय

**अभिनेता**

**११ मे १९५०**

खलनायक म्हणून सर्वपरिचित असणारे, तसेच आपल्या वैविध्यपूर्ण भूमिकांसाठी व त्यातील आत्मीय



सादरीकरणामुळे आणि विशिष्ट लकबीतील संवादफेकीमुळे सर्वसामान्य प्रेक्षकांच्या कायम लक्षात राहिलेले एक महत्त्वाचे अभिनेते म्हणजे सदाशिव अमरापूरकर. त्यांचा जन्म अहमदनगर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव रमाबाई होते, तर त्यांचे वडील द.ना. तथा दादासाहेब अमरापूरकर हे अहमदनगर शहरातील यशस्वी, प्रतिष्ठित व्यावसायिक, तसेच स्वातंत्र्यसैनिक आणि समाजकार्यकर्ते होते. त्या काळात म्युनिसिपाल्टीचे काऊन्सिलर म्हणूनही ते निवडून आले होते. सदाशिव अमरापूरकर यांचे शालेय आणि महाविद्यालयन शिक्षण अहमदनगर येथे आणि पदव्युत्तर शिक्षण पुणे विद्यापीठात झाले. त्यांचा अभिनयप्रवास खऱ्या अर्थाने सुरू झाला तो शालेय जीवनापासूनच. पण त्यांच्या अभिनयातील प्रगल्भता महाविद्यालयीन जीवनातच जाणवू लागली. या काळात त्यांनी युवक महोत्सवांमधून नाटके, एकपात्री नाटिका सादर केले. त्यासाठी त्यांना अनेकानेक पारितोषिकेही मिळाली. अभिनयाबरोबरीनेच त्यांनी कथाकथनामध्ये सहभागी होत ते क्षेत्रही पादाक्रांत केले.

सदाशिव अमरापूरकर १९७६ मध्ये मुंबईला आले आणि त्यांनी प्रायोगिक आणि व्यावसायिक नाटकांमध्ये कामे करण्यास सुरुवात केली. त्या वेळेस त्यांनी ‘छिन्ह’, ‘यात्रिक’, ‘कन्यादान’, ‘मी कुमार’, ‘सूर्याची पिल्ले’, ‘हँड्स अप’, ‘अकस्मात’, ‘बखर एका राजाची’ या नाटकांचे दिग्दर्शन करून त्यात अभिनयही केला व आपल्या कामाचा ठसा मराठी रंगभूमीवर सक्षमपणे उठवला. त्यांनी केलेल्या या नाटकांच्या दिग्दर्शनालाही उत्तम प्रतिसाद मिळाला.

रंगभूमीवरील कारकिर्द गाजत असतानाच त्यांना नचिकेत व जयू पटवर्धन दिग्दर्शित ‘२२ जून १८९७’ (१९७९) या मराठी चित्रपटात काम करण्याची संधी मिळाली. ती त्यांनी स्वीकारली आणि त्या संधीचे सोने केले. या चित्रपटात त्यांनी साकारलेली लोकमान्य टिळकांची भूमिका त्यांच्या अभिनय कारकिर्दीला कलाटणी देऊन गेली. त्यानंतर त्यांना अनेकानेक मराठी चित्रपटांमध्ये कामे मिळाली. ‘खिचडी’, ‘सावरखेड एक गाव’, ‘झेड पी’, ‘पैंजण’, ‘दोघी’, ‘वास्तुपुरुष’, ‘आरं आरं आबा’, ‘सख्खा भाऊ पक्का वैरी’, ‘तांबव्याचा विष्णू बाळा’, ‘आई पाहिजे’, ‘आघात’, ‘कुंकू झालं वैरी’ या चित्रपटांमधून सदाशिव अमरापूरकर सातत्याने प्रेक्षकांच्या समोर आले. पण ते प्रेक्षकांच्या लक्षात राहिले ते ‘खलनायक’ म्हणून. खलनायक साकारण्यासाठी लागणारा दुष्ट प्रवृत्तीचा अभिनय अमरापूरकर आपल्या आंगिक अभिनयातून यथार्थपणे सादर करतात. अर्थात यामागे त्यांचा या विषयाचा अभ्यास असलेला जाणवतो. हा अभ्यास त्यांनी ‘अभिनयाचे प्राथमिक सहा पाठ’ या ग्रंथात शब्दबद्ध केलेला आहे. अभिनयाचे शिक्षण घेणारे विद्यार्थी आणि शिक्षक यांना हा ग्रंथ मार्गदर्शक ठरतो.

सदाशिव अमरापूरकर म्हणजे खलनायक असे समीकरण जरी झाले असले, तरी त्यांनी वेगळ्या धाटणीच्या भूमिकाही केलेल्या आहेत. ‘कदाचित’ या अश्विनी भावे निर्मित चित्रपटातील त्यांची भूमिका सुहृद पित्याची आहे, लहान मुलीच्या साक्षीवर विश्वास ठेवून न्यायालयाने दिलेली शिक्षा संपवून आलेल्या बापाबद्दलचा गैरसमज चित्रपट संपताना दूर होतो, पण बाप असणारा हा मनस्वी कलाकार शेवटच्या दृश्यात खऱ्या अर्थाने हरलेल्या बापाचा अभिनय तत्कालीन भावनेशी समरस होऊन तन्मयतेने रंगवतो. या व्यक्तिरेखेला अभिप्रेत असणारे सुहृदपण सदाशिव अमरापूरकर यांनी नेटकेपणाने व नेमकेपणाने व्यक्त केलेले आहे. २०१२ मध्ये प्रदर्शित झालेला ‘होऊ दे जरासा उशीर’ या चित्रपटातही त्यांनी भूमिका केली. हा चित्रपट ऑस्करसाठी गेला होता. तसेच चित्रपटाचा १०० वर्षांचा इतिहास उलगडून दाखवणाऱ्या ‘बॉम्बे टॉकीज’ या चित्रपटातही अमरापूरकर यांना अभिनय



करण्याची संधी मिळाली.

मराठीप्रमाणेच हिंदी चित्रपटसृष्टीतही अमरापूरकर ओळखले जातात ते खलनायकी भूमिकांसाठी. हिंदी चित्रपटसृष्टीत पाऊल ठेवता ठेवता ‘अर्धसत्य’ या चित्रपटातील खलनायकी भूमिकेसाठी ‘फिल्मफेअर ॲवॉर्ड’ पटकावणारे अमरापूरकर विनोदी ढंगातील अंतर्यामी खलप्रवृत्ती असणाऱ्या भूमिकाही तितक्याच ताकदीने उभ्या करतात. याचा प्रत्यय ‘इश्क’, ‘कुली नं १’, यांसारख्या चित्रपटांवरून येतो. ‘सडक’ या हिंदी चित्रपटातील तृतीयपंथीय महाराणीची त्यांनी साकारलेली भूमिकाही पुरस्कारप्राप्त ठरली. तसेच ‘कालचक्र’ आणि ‘आखरी रास्ता’ या चित्रपटातील त्यांच्या भूमिकाही लक्षणीय होत्या.

नाटक, हिंदी-मराठी चित्रपटसृष्टी गाजवणाऱ्या सदाशिव अमरापूरकर यांनी दूरदर्शन मालिकांमध्ये काम करून प्रेक्षकांना आपल्या अभिनयाचे दर्शन घडवले आहे. ‘भारत एक खोज’, ‘राज से स्वराज’, ‘शोभा सोमनाथ की’ या मालिकांमध्ये त्यांनी काम केलेच, पण त्याचबरोबरीने त्यांनी ‘भाकरी आणि फूल’, ‘कुलवधू’ या मराठी मालिकांतही काम केलेले आहे.

रंगमंच, मोठ्या पडदा यावर सहजपणे वावरणाऱ्या या अभिनेत्याकडे असलेले लेखनकौशल्य त्यांनी लिहिलेल्या ‘किमयागार’ या हेलन केलरच्या जीवनावर आधारलेल्या नाटकातून व्यक्त होते. अपंग असणारी हेलन केलर व तिची शिक्षक असणारी ॲना सुलेवन यांच्या नातेसंबंधावर आधारलेल्या या नाटकातील घटना-प्रसंगांच्या मांडणीतून सदाशिव अमरापूरकर यांच्याठायी असणारी संवेदनशीलता दृग्गोचर होते, तर ‘पैंजण’ या चित्रपटाची पटकथा लिहून त्यांनी पटकथा लिखाणातले आपले कौशल्यही दाखवून दिले आहे.

सदाशिव अमरापूरकर यांची आणखी एक महत्त्वाची ओळख म्हणजे सामाजिक कार्यकर्त्याची. उपजत असलेल्या सामाजिक बांधिलकीच्या भावनेतून त्यांनी सामाजिक कृतज्ञता निधी उभारण्यात मोलाचे योगदान दिले, तर नर्मदा बचाव आंदोलनात सक्रियपणे सहभागी होत समाजाप्रती असणारी ऋणाची भावना व्यक्त केली आहे. समाजपरिवर्तनासाठी आवश्यक असणारी प्रबोधनाची गरज लक्षात घेऊन त्यांनी सामाजिक

विषयांवर गावोगावी व्याख्याने देण्यास प्रारंभ केला. त्यालाही आता १५ वर्षे उलटून गेली. साहित्य व सामाजिक विषयांवरचा त्यांचा अभ्यास लक्षात घेऊनच त्यांना चर्चेसाठी प्रसारमाध्यमांकडून सातत्याने बोलावणे येते.

दोनशेहून अधिक हिंदी–मराठी चित्रपटांमध्ये काम करणाऱ्या सदाशिव अमरापूरकर यांना फिल्मफेअर, क्रिटिक ॲवार्ड, पॉप्युलॅरिटी ॲवार्ड, सर्वोत्तम चरित्र अभिनेता पुरस्कार अशा पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आलेले आहे. लेखन, अभिनय, सामाजिक चळवळी यांमध्ये सक्रिय असणारे चतुरस्र व्यक्तिमत्त्व म्हणून आपल्या सदाशिव अमरापूरकर यांच्याकडे पाहता येते.

– डॉ. अर्चना कुडतरकर

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## अहिरे, गजेंद्र विठ्ठल

**दिग्दर्शक**

**१६ फेब्रुवारी १९६९**



सामाजिक आशयाच्या चित्रपटांना आपल्या संयत संवादलेखनातून आणि संवेदनशील, प्रभावी दिग्दर्शकीय दृष्टिकोनातून उतरवणारा एक यशस्वी आणि स्वतंत्र दृष्टीचा दिग्दर्शक म्हणून गजेंद्र अहिरे यांना खास शैलीतील चित्रपटांसाठी ओळखले जाते.

कथा, पटकथा, संवाद, दिग्दर्शन, गीतलेखन अशा चित्रपटाच्या सर्व अंगांची अचूक जाण असलेले गजेंद्र अहिरे यांच्या चित्रपटसृष्टीतील प्रवेशाची दारे महाविद्यालयीन काळातच खुली झाली. मुंबई परिसरातच त्यांचा जन्म झाला आणि तेथेच त्यांचे बालपण गेले. मुंबईतील भांडूप परिसरातील कुमारी कस्तुर विद्यालयात त्यांचे शालेय शिक्षण झाले. त्यानंतर त्यांनी रुईया महाविद्यालयातून पदवी प्राप्त केली. महाविद्यालयीन शिक्षण सुरू असतानाच महाविद्यालयातील नाटकांमध्ये ते सहभाग घेत असत. याशिवाय ठाण्यातील कलासरगम, जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्सच्या बाह्यविद्यार्थ्यांसाठी असलेल्या ‘झँग’ या संस्थेच्या माध्यमातून त्यांचा ‘नाटका’शी जवळून परिचय झाला. या नाटकांमधूनच त्यांना पटकथा, संवाद लेखनाचे तंत्र हळूहळू अवगत झाले. याच काळात कामगार कल्याण केंद्र आणि एम.एस.ई.बी. या संस्थांतील नाटकांच्या निमित्ताने निरनिराळे विषय आणि त्याची मांडणी यासंदर्भात त्यांचा स्वतंत्र विचार सुरू झाला.

‘कृष्णाकाठची मीरा’ हा गजेंद्र अहिरे यांनी दिग्दर्शित केलेला पहिलाच चित्रपट २००२ साली प्रदर्शित झाला. त्यानंतर २००३ साली ‘नॉट ओन्ली मिसेस राऊत’ हा स्त्रियांच्या समस्या मांडणारा सामाजिक चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केला. या चित्रपटाची कथा आणि संवाद स्वतः गजेंद्र अहिरे यांनी लिहिले होते. या चित्रपटाला केवळ लोकप्रियता लाभली नाही, तर राज्यशासनाचे १२ पुरस्कारही मिळाले. त्यापैकी वैयक्तिक पुरस्कार, सर्वोत्कृष्ट सामाजिक चित्रपट, सर्वोत्कृष्ट दिग्दर्शन, सर्वोत्कृष्ट गीतलेखन आदींचे पुरस्कार गजेंद्र अहिरे यांना मिळाले. या चित्रपटामध्ये रवींद्र मंकणी, मधुरा वेलणकर, वृंदा गजेंद्र अशा अनुभवी कलाकारांचा सहभाग होता. या यशस्वी पदार्पणानंतर ‘पांढर’ (२००४), ‘सरीवर सरी’ (२००५), ‘सैल’ (२००६) या चित्रपटांच्या दिग्दर्शनासह संवादलेखनाची जबाबदारीही त्यांनी पार पाडली. ‘पांढर’ या चित्रपटाला त्या वर्षीचा राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला.

२००६ साली आलेल्या ‘शेवरी’ या चित्रपटाची निर्मिती नीना कुलकर्णी यांनी केली होती. गजेंद्र अहिरे यांच्या कथेवर आधारित आणि दिग्दर्शित चित्रपटात शिवाजी साटम, नीना कुलकर्णी यांच्या प्रगल्भ अभिनयाने चित्रपटाला प्रेक्षकांची दाद मिळाली. ‘दिवसेंदिवस’ (२००६), ‘खंडोबाच्या नावानं’ (२००७), ‘मायबाप’ (२००७) या चित्रपटांनंतर २००८ साली दिग्दर्शित केलेला ‘वासुदेव बळवंत फडके’ हा




अजिंक्य देव यांची मध्यवर्ती भूमिका असलेला चित्रपट लक्षणीय ठरला. २००९ साली ‘त्या रात्री पाऊस होता’ या चित्रपटात सयाजी शिंदे, सोनाली कुलकर्णी, अमृता सुभाष, सुबोध भावे असे अभिनयकुशल कलाकार होते. राजकारणी व्यक्तींच्या हस्तक्षेपामुळे, त्याच्या विकृत मनसुब्यांमुळे उद्‌ध्वस्त झालेल्या एका कुटुंबाची कथा आणि त्यांचे संवादलेखन गजेंद्र अहिरे यांनी केले होते.

‘हॅलो जयहिंद’ या मराठी चित्रपटासाठी इलया राजा या दाक्षिणात्य, ज्येष्ठ संगीतकाराबरोबर गजेंद्र अहिरे यांनी प्रथमच एकत्र काम केले. या चित्रपटाच्या दिग्दर्शनाबरोबरच गीतलेखनही गजेंद्र अहिरे यांनी केले. मराठी चित्रपटाच्या संगीत दिग्दर्शनाची जबाबदारी प्रथमच इलया राजा यांच्याकडे होती. यानंतरही एका मराठी चित्रपटासाठी गजेंद्र अहिरे आणि इलया राजा यांनी एकत्र काम केले आहे. सामाजिक चित्रपटाच्या माध्यमातून विशिष्ट अशा समस्या, त्यातून माणसांच्या नातेसंबंधातील गुंता आणि तरलता प्रभावीपणे चित्रपटातून मांडणारा निर्माता आणि दिग्दर्शक म्हणून गजेंद्र अहिरे यांना ओळखले जाते. नवनव्या कथांसह नव्या कल्पना घेऊन येणारे चित्रपट पाहण्यासाठी प्रेक्षक उत्सुक असतात.

१९९५ साली त्यांनी अभिनेत्री आणि सहकलाकार ‘वृंदा’ यांच्याबरोबर विवाह केला.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## आगाशे, मोहन महादेव

**अभिनेता**

**२३ जुलै १९४७**

सत्यजित राय यांच्याकडून आपल्या अभिनयाच्या जोरावर ‘भारतातील बुद्धिमान नट’ असा गौरव मिळवलेले एक ज्येष्ठ अभिनेते म्हणजे डॉ. मोहन आगाशे. त्यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील भोर या गावी झाला. पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयातून शालेय



शिक्षण पूर्ण केल्यावर त्यांनी १९७० साली बी.जे. वैद्यकीय महाविद्यालयातून 'मेडिसिन आणि सर्जरी' या विषयात एम.बी.बी.एस.ची परीक्षा उत्तीर्ण केली. १९७५ मध्ये त्यांनी मानसशास्त्रीय वैद्यकशास्त्रामध्ये डी.पी.एम. ही पदविका घेतली आणि १९७८ साली डॉक्टर ऑफ मेडिसिन इन सायकिॲट्री (एम.डी.) ही पदव्युत्तर पदवी त्यांनी प्राप्त केली. त्यानंतर त्यांनी मनोविकृतिशास्त्र या विषयाचे प्राध्यापक म्हणून काम केले, तसेच पुण्यातील ससून रुग्णालयात मानसोपचारतज्ज्ञ म्हणून आपल्या रुग्णांशी विश्वासाचे नाते निर्माण केलेले होते.

खरे तर त्यांनी लहानपणातच सई परांजपे यांच्या बालनाट्यांमधून कामे करायला सुरुवात केली होती, पण त्यांना अभिनयाची खरी ओळख झाली, ती महाविद्यालयीन जीवनात. याच काळात त्यांनी पुरुषोत्तम करंडक स्पर्धेत सहभागी होत 'प्रार्थना' व 'सरहद्द' या एकांकिका गाजवल्या. यातूनच त्यांना नाटकांमध्ये कामे करण्याची संधी मिळाली. १९५८ मध्ये त्यांनी राज्य नाट्यस्पर्धेतील 'डाकघर' या नाटकात काम केले, तर प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशनच्या माध्यमातून त्यांनी १९६८ मध्ये 'धन्य मी कृतार्थ मी' या नाटकात काम करायला सुरुवात केली. १९७० मध्ये 'अशी पाखरे येती' या नाटकाचा प्रयोग सुरू असताना त्यांच्या नाकावर पडलेला प्रकाशाचा किरण पाहून जब्बार पटेल यांनी विजय तेंडुलकर लिखित 'घाशीराम कोतवाल'मधला नाना फडणवीस मोहन आगाशे यांच्यामध्ये शोधला. जब्बार पटेल यांचा नाना फडणवीस या व्यक्तिरेखेचा हा शोध सार्थ होता, हे मोहन आगाशे यांनी बुद्धिचतुर व कामातुर वृत्तीचा नाना फडणवीस, आब राखत साकारून दाखवून दिले. इतिहातील व्यक्तिरेखा वर्तमानात साकार करताना लागणारी सजगता डॉ. मोहन आगाशे यांनी या नाटकात सातत्याने सांभाळलेली दिसते. तब्बल २० वर्षे त्यांनी हे नाटक 'प्रयोगशील'पणे केले. ८०० च्या आसपास प्रयोग झालेले हे नाटक परदेशात होण्यामागे डॉ. मोहन आगाशे यांचे योगदान महत्त्वपूर्ण आहे. या नाटकाच्या परदेशी झालेल्या सर्व प्रयोगांची आखणी, बांधणी व आयोजन डॉ. मोहन आगाशे यांनी फार आस्थेने व आत्मीयतेने केली. हे सगळे करण्यामागे आपल्याला परदेशात जायला मिळावे एवढा मर्यादित हेतू नव्हता, तर त्या निमित्ताने विविध देशांशी सांस्कृतिक संबंध प्रस्थापित करण्याचा तो प्रयत्न होता. आपल्या एकूणच नाट्यसृष्टीच्या कालखंडात त्यांनी 'तीन चोक तेरा' (१९६६), 'दिनूच्या सासूबाई राधाबाई' (१९६८), 'राजा नावाचा गुलाम' (१९६९), 'क्षण झाला वैरी' (१९६९), 'तीन पैशाचा तमाशा' (१९७८), 'बेगम बर्वे' (१९७९) 'सावर रे' (१९९९), 'वासांसी जीर्णानी' (२०००) या नाटकांमधूनही कामे केलेली आहेत, तर 'काटकोन त्रिकोण' (२०१०) या नाटकाचे त्यांनी जवळपास २५० च्या आसपास प्रयोग यशस्वीपणे केले.

नाटकाशी एकनिष्ठपणे बांधले गेलेल्या डॉ. मोहन आगाशे यांनी चित्रपटसृष्टीत पाऊल ठेवले ते 'सामना' (१९७५) या जब्बार पटेल दिग्दर्शित चित्रपटातून. यात त्यांनी मारुती कांबळेची छोटी पण प्रभावी भूमिका पार पाडली. पण त्यांच्या अभिनय कारकिर्दीला झळाली आली ती, 'जैत रे जैत' (१९७७) या चित्रपटातील आदिवासी नाग्यामुळे. देवत्व मिळवण्यासाठी स्वत:च्या विकारांवर ताबा मिळवण्याच्या प्रयत्नात असणारा नाग्या त्यात यशस्वी झाल्यावर, साप चावलेल्या वडिलांचा मृत्यू आपल्या देवत्वामुळे टळेल अशी श्रद्धा बाळगतो. परंतु वडिलांच्या मृत्यूमुळे त्याच्या श्रद्धेचा अपेक्षाभंग होतो व देवत्व या संकल्पनेबरोबर त्याचा एक नवीन विरोधाभासात्मक संघर्ष सुरू होतो आणि श्रद्धाळू नाग्याचे ध्येयवेड्या वृत्तीच्या नाग्यात परावर्तन होते. श्रद्धाळूपणा, देवत्वाविषयी आत्मीयता व आपल्या वडिलांचा मृत्यू रोखण्यात अपयश आल्यामुळे देवाने केलेल्या अन्यायामुळे त्याला आपण शिक्षा दिली पाहिजे या



**‘जैत रे जैत’ चित्रपटामधील नाग्याच्या भूमिकेतील डॉ. मोहन आगाशे**

भावनेने सतत जागरूक राहणे व त्याला आवश्यक असणारे वर्तन करणे हा नाग्या या व्यक्तिरेखेला अभिप्रेत असणारा प्रवास डॉ. मोहन आगाशे यांनी सक्षमपणे साकारला आहे, तो त्यातील भाषिक वैशिष्ट्यांसह. नाग्याच्या भूमिकेमुळे सर्वसामान्य प्रेक्षकांच्या परिचयाच्या झालेल्या डॉ. मोहन आगाशे यांचा पुढचा महत्त्वाचा चित्रपट म्हणजे ‘सिंहासन’ (१९८०). बुधाजीराव या राजकीय नेत्याची त्यांनी साकारलेली भूमिकाही वैशिष्ट्यपूर्ण होती.

‘एक होता विदूषक’ (१९९२) या चित्रपटातील रगेल वृत्तीच्या हिम्मतराव इनामदाराची भूमिका त्यातील बारकाव्यांसह डॉ. मोहन आगाशे यांनी साकारली. या व्यक्तिरेखेच्या अंतर्गत वृत्तीतील रगेलपणा त्यांनी आपल्या डोळ्यांच्या हावभावातून व्यक्त केलेला आहे. पण हा रगेलपणा व्यक्त करणाऱ्या मोहन आगाशे यांनी ‘कथा दोन गणपतरावांची’ (१९९६) या चित्रपटात मैत्रीच्या नात्यातील आपपरभावाचा आविष्कार आपल्या आंगिक अभिनयातून घडवला. आपल्या मित्रावर असणारे प्रेम भांडणातूनही व्यक्त करता येऊ शकते, असा मैत्रीचा गाभा सांगणारा हा चित्रपट डॉ. मोहन आगाशे आणि दिलीप प्रभावळकर यांच्या अभिनयामुळे कलात्मक उंची गाठतो. त्यातूनच या चित्रपटाला अभिजात सौंदर्यमूल्य प्राप्त होते.

व्यक्तिरेखेचे बारकावे, त्यांचा सूक्ष्म अभ्यास व तो करत करतच आपल्या अभिनयातून ते प्रेक्षकांपर्यंत पोहोचवण्याची तळमळ असणाऱ्या डॉ. मोहन आगाशे यांनी वैविध्यपूर्ण भूमिका केल्या. त्यापैकी एक महत्त्वाची भूमिका म्हणजे ‘देवराई’मधील मानसोपचारतज्ज्ञाची.

आपल्या वैयक्तिक आयुष्यात नेहमीच जी भूमिका डॉ. मोहन आगाशे पार पाडत आले, ती भूमिकाही या चित्रपटात त्यांनी यथोचितपणे पार पाडलेली आहे. तर 'काय द्याचं बोला' या चित्रपटात त्यांनी बजावलेली न्यायाधीशाची भूमिका साकारतानाही ते तितकेच तन्मय झालेले सहज दिसून येते. 'वळू' (२००८)मधला सरपंच, 'विहीर' (२००९)मधील आजोबा, 'देऊळ' (२००९)मधला आमदार, 'रीटा' (२०११)मधील वडील अशा व्यक्तिरेखा रंगवण्यातच डॉ. मोहन आगाशे यांच्यामधले अभिनयकौशल्य अधोरेखित होते.

डॉ. मोहन आगाशे यांनी 'निशांत' (१९७५), 'मंथन' (१९७६), 'भूमिका' (१९७७), 'आक्रोश' (१९८०), 'मशाल' (१९८४), 'मुसाफिर', 'महायात्रा' (१९८७), 'रिहाई' (१९८८), 'पतंग' (१९९४), 'मृत्युदंड' (१९९७), 'गुडीया' (१९९७), 'गज गामिनी' (२०००), 'गंगाजल' (२००३), 'पाप' (२००३), 'असंभव' (२००४), 'अपहरण' (२००५), 'रंग दे बसंती' (२००६) या हिंदी चित्रपटातून काम करून हिंदी चित्रपटसृष्टीतही आपल्या अभिनयाची मोहोर उमटवलेली आहे आणि आपला खास प्रेक्षकवर्गही निर्माण केलेला आहे. सत्यजीत राय यांच्या 'सद्‌गती' या भारतातील पहिल्या टेलिफिल्ममध्ये मोहन आगाशे यांनी स्मिता पाटील, ओम पुरी, गीता सिद्धार्थ या कलाकारांसोबत काम केले.

डॉ. मोहन आगाशे यांनी छोट्या पडद्यावरही आपल्या अभिनयकौशल्याने प्रेक्षकांच्या मनात स्थान मिळवले. त्यांनी 'पिंपळपान' या मराठीतील कथा–कादंबऱ्यावर आधारित असणाऱ्या कार्यक्रमातील 'ऑक्टोपस' या श्री.ना. पेंडसेलिखित कादंबरीतील 'लालजी' सहीसही रंगवला होता, तर 'अग्निहोत्र', 'गुंतता हृदय हे' या मालिकांमध्येही त्यांनी साकारलेल्या भूमिका प्रेक्षकांच्या कायम स्मरणात राहिल्या.

'कथा दोन गणपतरावांची' या चित्रपटात उजवीकडील मोहन आगाशे



मराठी आणि हिंदी चित्रपटसृष्टीत व्यग्र असतानाही डॉ. मोहन आगाशे यांनी बालरंगभूमीसाठी 'मॅक्समुल्लर भवन' आणि 'ग्रिप्स थिएटर' यांच्या संयुक्त विद्यमाने अनेक कार्यशाळांचे आयोजन केले. बालरंगभूमीकडे अभिनव दृष्टीने पाहणाऱ्या व वेगळ्या पद्धतीने मुलांची नाटके सादर करणाऱ्या 'ग्रिप्स' चळवळीचा परिचय त्यांनी भारतीय रंगभूमीला करून दिला. या चळवळीचे अग्रगण्य दिग्दर्शक वोल्फगांग कोल्नेडर यांना डॉ. आगाशे यांनी भारतात आणले. या चळवळीमुळेच श्रीरंग गोडबोले व विभावरी देशपांडे या तरुण नाटककारांनी मुलांसाठी आणि तरुणांसाठी आपल्या मातीशी नाते सांगणारी नाटके दिली. ही नाटके मुले, शिक्षक आणि पालक यांच्यापर्यंत पोहोचवण्याचा प्रयत्न डॉ. आगाशे यांनी या कार्यशाळांच्या माध्यमातून केला.

डॉ. मोहन आगाशे यांना सांस्कृतिक प्रकल्पांसाठी जर्मन सरकारने २००२ मध्ये 'क्रॉस ऑफ ऑर्डरर मेरीट' आणि मार्च २००४ मध्ये 'गटे' पदकाने सन्मानित करण्यात आले. १९९० च्या जानेवारी महिन्यात त्यांना भारतीय सरकारतर्फे 'पद्मश्री' देऊन गौरवण्यात आले. याशिवाय १९९१ मध्ये नंदीकर पुरस्कार, १९९६ मध्ये संगीत नाटक अकादमी, १९९८ साली 'पुणे प्राईड' असे विशेष पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत. आजही नाट्य, चित्रपट क्षेत्रातील अनेक सन्माननीय पदे भूषवत अभिनयक्षेत्रात त्यांचे काम सुरू आहे. बारामती येथे झालेल्या ९३व्या (२०१२) अखिल भारतीय नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची बिनविरोध निवड झाली. वैद्यकीय क्षेत्रातही मोहन आगाशे यांनी उल्लेखनीय काम केलेले आहे. राज्यातील मानसिक आरोग्य शिक्षण व सेवा यातील दयनीय परिस्थिती लक्षात घेऊन त्यांनी त्यातील त्रुटी लक्षात आणून देणारा प्रकल्प अहवाल शासनाला १९८८ मध्ये सादर केला. त्यावर विचार होऊन शासनाने नवीन मानसिक आरोग्य धोरण स्वीकारले आणि त्यासाठी त्यांनी पुण्यात महाराष्ट्र राज्य मानसिक आरोग्य संस्था स्थापन केली. सुरुवातीपासून २००५ पर्यंत ते या संस्थेचे संस्थापक संचालक म्हणून कार्यरत होते. २००५ मध्ये ते या पदावरून सेवानिवृत्त झाले, काही काळ त्यांनी महाराष्ट्र सरकारचा सल्लागार म्हणूनही काम केलेले आहे. तसेच ते एप्रिल १९९७ ते एप्रिल २००२ या काळात 'फिल्म अ‍ॅण्ड टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया' या संस्थेचे संचालक म्हणून कार्यरत होते.

वैद्यकीय सेवा, चित्रपट–नाटक या क्षेत्राशी जवळून संबंध असणाऱ्या डॉ. मोहन आगाशे यांनी १९९३ मध्ये झालेल्या लातूरच्या भूकंपग्रस्तांसाठी राबवलेला ५ वर्षांचा प्रकल्प त्यांच्या सामाजिक बांधिलकीची जाणीव व्यक्त करणारा आहे. या प्रकल्पांतर्गत त्यांनी १००० कुटुंबांचे पुनर्वसन केलेले आहे. नैसर्गिक आघाताने मानसिक खच्चीकरण झालेल्या व्यक्तीचे मानसिक पुनर्वसन करण्यात डॉ. मोहन आगाशे यांचे मोलाचे योगदान आहे.

आपल्या अभिनयाने, त्यातील बारकाव्यांच्या अभ्यासपूर्ण सादरीकरणाने प्रेक्षकांना खिळवून ठेवणारे एक उमदे आणि सगळ्यांना आपलेसे वाटणारे व्यक्तिमत्त्व म्हणून डॉ. मोहन आगाशे चित्रपट रसिकांना परिचित आहेत, तर त्यांनीही आपल्या अभिनयाने मराठी–हिंदी चित्रपटसृष्टीत, तसेच नाट्यसृष्टीत आपले दखल घेण्याजोगे नाव निश्चित निर्माण केलेले आहे.

– डॉ. अर्चना कुडतरकर

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## आठवले, शांताराम गोविंद

**गीतकार, दिग्दर्शक**

**२१ जानेवारी १९१० – २ मे १९७५**

☞ **मुख्य नोंद – साहित्य खंड**

शांताराम गोविंद आठवले यांचे वडील सरदार शितोळे यांच्या पुण्याकडील जहागिरीची व्यवस्था पाहत असत. कसबा पेठेतील त्यांच्या वाड्यातच शांताराम यांचे बालपण गेले. त्यांच्या वडिलांना नाटकाचा व गाण्याचा शौक होता.

शितोळे यांच्या वाड्यातील दिवाणखान्यात तमाशाचे



फड कडकडत, बैठकी रंगत, शाहिरांच्या हजेऱ्या लागत. हे सारे शांतराम आठवले यांना लहानपणीच पाहायला मिळाले. तो काळ मराठी नाटकाच्या वैभवाचा काळ होता. त्यांनी बहुतेक सारी चांगली नाटके पाहिली. त्यातूनच त्यांचा कलावंताचा पिंड हळूहळू घडत गेला.

भावे स्कूलमधील शिक्षकांनी शांताराम यांची कलात्मक अभिरुची अधिक डोळस केली. याच शाळेत त्यांना कविवर्य माधव ज्युलियन यांच्या अध्यापनाचा लाभ घडला. पण आठवले यांची काव्यवृत्ती खरी फुलवली ती प्रा. वा.भा. पाठक यांनी. मराठीसोबतच प्रा. किंकर यांनी इंग्रजी काव्याचीही त्यांना गोडी लावली. त्यांनीच शांताराम आठवले यांच्या कविता प्रथम प्रकाशात आणल्या.

शांताराम १९३० साली मॅट्रिक झाले. कौटुंबिक अडचणींमुळे त्यांनी पहिल्या वर्षातच महाविद्यालय सोडले. प्रसिद्ध लेखक ना.ह. आपटे यांचे ‘पहाटेपूर्वीचा काळोख’ हे पुस्तक त्याच्या वाचनात आले. त्याने प्रभावित होऊन शांताराम त्यांना भेटायला कोरेगावला गेले, तेथे त्यांच्या सहवासात काही काळ राहिले.

याच सुमारास ‘प्रभात फिल्म कंपनी’ कोल्हापूरहून पुण्यास आली होती व ना.ह. आपटे यांच्या कथेवरून ‘अमृतमंथन’ हा चित्रपट काढायची बोलणी सुरू होती. आपटे यांनी शांताराम आठवले यांचे साहित्यगुण पारखले होते. त्यांनीच शांतारामबापूंकडे आठवल्यांच्या नावाची शिफारस केली. आपटे यांच्याच प्रेरणेने आठवल्यांनी ‘प्रभात’मध्ये पदार्पण केले. प्रभातमध्ये तीस रुपये पगारावर पद्यलेखक म्हणून त्यांची नेमणूक झाली. सुरुवातीला पद्यलेखनाबरोबरच चित्रीकरणास साहाय्यक म्हणून पडणारी सर्व कामे ते करत असत. शिवाय प्रभातच्या प्रसिद्धीचे व त्यानिमित्त करावे लागणारे सर्व लेखन करण्याची जबाबदारीही आठवले यांच्यावर होती.

‘अमृतमंथन’ या चित्रपटापासून शांताराम आठवले यांनी प्रभातच्या अनेक चित्रपटांचे गीतलेखन केले. त्यांनी लिहिलेली ‘अहा भारत विराजे’, ‘भारती सृष्टीचे सौंदर्य’, ‘उसळत तेज भरे’, ‘हासत वसंत ये वनी’, ‘राधिका चतुर बोले’, ‘लखलख चंदेरी’, ‘दोन घडीचा डाव’ ही सारी गीते प्रासादिक, नादमधुर व अर्थपूर्ण होती. आपल्या पद्यरचनेने शांताराम आठवले यांनी पद्यरचनेचा श्रेष्ठ आदर्श घालून दिला.

आठवले यांनी लिहिलेल्या ‘आधी बीज एकले’ या ‘संत तुकाराम’मधील अभंगाला तुकारामाची प्रतिष्ठा आणि पावित्र्य लाभले. संतवाङ्मयाचे गाढे अभ्यासक ह.भ.प. पांगारकर यांनी हा अभंग ऐकला. तुकारामांचा हा अभंग आपल्या दृष्टीतून कसा सुटला, याचे आश्चर्य वाटून त्यांनी तुकारामाची गाथा पुन्हा धुंडाळली, या पांगारकर यांच्या कृतीतच आठवले यांच्या काव्यप्रतिभेचे वैशिष्ट्य अधोरेखित होते.

प्रभातमध्ये आठवले १९३४ ते १९४३ अशी नऊ वर्षे होते. नंतर ते दिग्दर्शनाकडे वळले. शांतारामबापूंबरोबर काम करताना त्यांनी दिग्दर्शनातील बारकावे व वैशिष्ट्ये आत्मसात केली.

आठवले यांनी १९४८ साली ‘भाग्यरेखा’ हा चित्रपट निर्माण व दिग्दर्शित केला. त्यानंतर त्यांनी ‘मै अबला नहीं’, ‘वहिनीच्या बांगड्या’, ‘संसार करायचाय मला’, ‘शेवग्याच्या शेंगा’, ‘पडदा’ असे अनेक चित्रपट दिग्दर्शित केले. १९५९ मध्ये भारत सरकारच्या ‘फिल्म्स डिव्हिजन’मध्ये दिग्दर्शक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. तिथे त्यांनी अनेक अनुबोधपटांचे दिग्दर्शन केले.

‘एकले बीज’ व ‘बीजांकुर’ हे काव्यसंग्रह व ‘प्रभातकाल’ हे ‘प्रभात’मध्ये असतानाच्या काळात लिहिलेले त्यांचे आत्मकथन प्रसिद्ध आहे. त्यांना १९६५ सालच्या ‘वावटळ’ चित्रपटासाठी उत्कृष्ट दिग्दर्शनाचे महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक मिळाले. त्यांचा ‘ज्ञानेश्वरी’चा व ‘ज्योतिषशास्त्रा’चा अभ्यास दांडगा होता. आध्यात्मिक वृत्तीने ते निवृत्तीचे जीवन जगत होते.

– मधू पोतदार

## आपटे, नारायण हरी
**लेखक**
**११ जुलै १८८९ – १५ नोव्हेंबर १९७१**
☞ **मुख्य नोंद – साहित्य खंड**



नारायण हरी आपटे यांचे घराणे सांगली जिल्ह्यातील समडोळी येथील होते. पायी देशाटन करावे म्हणून त्यांनी वयाच्या १५ व्या वर्षीच घर सोडले. भटकंती करताना ते हिंदी व उर्दू भाषा शिकले. त्यांनी साताऱ्याजवळ कोरेगाव येथे स्वत:ची प्रकाशन संस्था उभी केली आणि त्या दरम्यान त्यांचे लेखन सुरू झाले. ‘कपट जाल’, ‘अर्वाचीन रामराज्य’, ‘भुरळ’ या त्यांच्या सुरुवातीच्या कादंबऱ्या होत्या.

आपटे यांच्या ‘लांछित चंद्रमा’ आणि ‘रजपुतांचा भीष्म’ या कादंबऱ्यांवरूनच बाबूराव पेंटर यांनी मूकपटाची निर्मिती केली. ‘सावकारी पाश’ या पहिल्या सामाजिक मूकपटाचे लेखनही आपटे यांनीच केले. त्यांनी लिहिलेल्या ‘भाग्यश्री’ कादंबरीवरून शांतारामबापूंनी ‘अमृतमंथन’ हा चित्रपट काढण्याचे ठरवले. त्याचे संवादलेखन आपटे यांनी केले.

आपटे यांनी काही संसारकथाही लिहिल्या. प्रभाततर्फे शांतारामबापूंनी आपटे यांच्याच ‘न पटणारी गोष्ट’ या कथेवर आधारित ‘कुंकू’ हा चित्रपट काढला. ‘अन्याय सहन न करणारी बंडखोर नायिका, नीरा’ हिची भूमिका शांता आपटे यांनी केली होती. हा चित्रपट खूपच यशस्वी ठरला. सर्वोत्तम चित्रपट म्हणून या चित्रपटाला १९३७ सालचे गोहर सुवर्णपदक देण्यात आले होते.

पुढे शालिनी सिनेटोनसाठी बाबूराव पेंटर यांनी आपटेंच्या ‘हृदयाची श्रीमंती’ या कादंबरीवरून ‘प्रतिभा’ हा बोलपट काढला. त्यानंतर ‘ध्रुवकुमार’ या चित्रपटाचे लेखनही आपटे यांनी केले. त्यांनी १९४८ साली शांताराम आठवलेंसाठी ‘भाग्यरेखा’ या चित्रपटाचे लेखन केले. या चित्रपटात शांता आपटे, बाबूराव पेंढारकर, पु.ल. देशपांडे यांनी भूमिका केल्या होत्या. ‘उमज पडेल तर’ (१९३९), ‘संसार करायचा मला’, ‘कुंकवाचा धनी’ असे चित्रपट आपटे यांच्या कादंबऱ्यांवर आधारित होते. सातारा जिल्ह्यातल्या कोरेगाव येथे नारायण हरी आपटे यांचे वृद्धापकाळाने निधन झाले.

– द.भा. सामंत

## आपटे, मधुकर शंकर
**अभिनेता**
**१ मार्च १९१९ – १३ मार्च १९९३**



‘मधू आपटे के साथ काम करते वख्त अच्छी ॲक्टिंग करके कोई फायदा नही. लोग तो मधूकोही देखेंगें’ असा हिंदी चित्रपटसृष्टीतील मातब्बर नट ओमप्रकाश यांच्याकडून अभिप्राय मिळवणाऱ्या मधू शंकर आपटे यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. घरच्या संपत्तीचे वाद चालू असतानाच्या काळातच त्यांच्या वडिलांचे निधन झाल्यावर त्यांच्या आई गंगूबाई आपल्या तीन मुलांना घेऊन आपल्या भावाच्या (ताम्हणकर यांच्या) आश्रयाला गेल्या. मुलांना सांभाळण्याच्या जबाबदारीमुळे त्यांनी लोणची, पापड, हलव्याचे दागिने, जरीच्या टोप्या इत्यादी गोष्टी करून विकण्याचा व्यवसाय केला व आपल्या मुलांचा सांभाळ केला. वयाच्या नवव्या वर्षी अतितापाने मधू आपटे यांची वाचा गेली. मिरजेच्या डॉ. वानलेस यांनी केलेल्या घशाच्या शस्त्रक्रियेमुळे त्यांना अडखळत का होईना, बोलता येऊ लागले. त्यांचा तोतरेपणा मात्र कायम राहिला.

घरची गरिबी असल्यामुळे शाळेची फी देणे परवडत नव्हते, त्यामुळेच बऱ्यापैकी हुशारी, चांगली स्मरणशक्ती व उत्तम हस्ताक्षर असूनही मधू आपटे यांचे शालेय शिक्षण पाचव्या इयत्तेपुढे जाऊ शकले नाही. मधू

आपटे यांच्या मामांना १९२९ मध्ये प्रभातमध्ये नोकरी लागली व त्यांनी मधू आपटे यांच्या मोठ्या भावाला – अनंत आपटे यांना बालनट म्हणून काम मिळवून दिले.

पुढे मामांच्या ओळखीनेच मधू आपटे १९३४ मध्ये प्रभातच्या पेंटिंग खात्यात कामाला लागले. तेथे त्यांना खूप कष्टाची कामे करावी लागली. ती त्यांना झेपत नसत. तरी त्यांनी वर्षभर ती कामे केली. त्याच वेळेस त्यांचा साहेबमामा फत्तेलाल यांच्याशी ऋणानुबंध जुळला. याच काळात सोळा वर्षांच्या तरण्या मधूच्या तोंडाला बालनट म्हणून रंग लागला तो अपघातानेच. स्टील डिपार्टमेंटमध्ये असताना शांतारामबापूंनी फोनवर मधू आपटे यांचे बोलणे ऐकल्यावर त्यांनी मधू आपटे यांना 'संत तुकाराम' या चित्रपटात सालोमालो या इरसाल व्यक्तिरेखेच्या भूमिकेत उभे केले.

प्रभात कंपनीचा १९५४ मध्ये लिलाव झाल्यावर मधू आपटे बेकार झाले, त्या वेळेस त्यांना सीताकांत लाड व चित्तरंजन कोल्हटकर यांच्या प्रयत्नांमुळे आकाशवाणीवर काम मिळाले. पण त्यात सातत्य नसे. येथे काम करत असतानाच त्यांनी नाटकांमध्येही कामे करायला सुरुवात केली. १९४४ मध्ये मा. दीनानाथ यांच्या पहिल्या पुण्यतिथीला 'भावबंधन' नाटकाचा प्रयोग करण्यात आला, त्यात मधू आपटे यांना लता मंगेशकर यांच्यासोबत काम करण्याची संधी मिळाली. अधूनमधून ते बाबूराव गोखले यांच्या नाटकांमधून काम करीत असत. पण तेथे त्यांचा जम न बसल्यामुळे त्यांनी १९५६ मध्ये मुंबईत फिल्मिस्तान कंपनीत नोकरी स्वीकारली. दरम्यानच्या काळात ते सुलोचनादीदींबरोबर चित्रीकरणाला जात असत, तेथे वावरत असतानाच हिंदी निर्मात्यांनी त्यांना छोट्या–मोठ्या भूमिका द्यायला सुरुवात केली. तेथे त्यांनी राजेंद्रकुमार, ओमप्रकाश, मोहनकुमार, नरेशकुमार यांच्यासोबत काम केले. वसंत जोगळेकर यांच्या 'कारगीर' या हिंदी चित्रपटातही त्यांना ओमप्रकाश व ललिता पवार या भांडकुदळ जोडप्याच्या इरसाल मुलाची भूमिका मिळाली. खरे तर मधू आपटे यांना तोतरे बोलण्याच्या ढंगावर भूमिका मिळत असल्या तरी ते तेवढ्यावरच आपली भूमिका वठवत नसत, तर विनोदी प्रसंगात दुसऱ्याच्या बोलण्यावर रिॲक्ट होण्याचे तंत्रही ते वापरत असत. त्यामुळेच त्यांनी वठवलेल्या विनोदी भूमिका प्रेक्षकांच्या कायम स्मरणात राहत. चार्ली चॅप्लीन, डॅनीके, बालगंधर्व, नानासाहेब फाटक यांच्याविषयी त्यांच्या मनात आदर होता.

मधू आपटे यांनी आपल्या ३६–३७ वर्षांच्या कारकिर्दीमध्ये २०० हिंदी–मराठी चित्रपटांमध्ये व २० नाटकांमध्ये कामे केलेली आहेत. वयाच्या ७५ व्या वर्षी त्यांचे पुणे येथे वार्धक्याने निधन झाले.

– कांचन काशिनाथ घाणेकर

## आपटे, शांता महादेव
**अभिनेत्री**
**२३ नोव्हेंबर १९१६ – २५ फेब्रुवारी १९६४**



ज्येष्ठ दिग्दर्शक आणि लेखक शांताराम आठवले यांनी आपल्या 'प्रभातकाल' या ग्रंथात शांता आपटे यांच्या नावाचा उल्लेख 'प्रभातचे कुंकू' असा केलेला आहे. शांता महादेव आपटे यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील दुधणी या गावी झाला. त्या गावच्या रेल्वे स्थानकावर त्यांचे वडील महादेव गोविंद आपटे स्टेशन मास्तर म्हणून काम करत असत. तसेच वेळप्रसंगी देवळात कथेकरी बनून कीर्तनकाराची भूमिकाही सांभाळत. घरातच संगीताची परंपरा असल्यामुळे शांता आपटे यांनाही संगीताची गोडी आपोआपच लागली. शालेय शिक्षण करताकरताच त्या मेळ्यातून कामे करू लागल्या. दिग्दर्शक नानासाहेब सरपोतदारांनी शांताबाईंची मेळ्यातली कामे आणि गायनकला पाहून सरस्वती सिनेटोनचे मालक दादासाहेब तोरणे यांच्याजवळ त्यांच्या नावाची शिफारस केली. तोरणे १९३० च्या सुमारास पुण्यात 'श्यामसुंदर' या हिंदी–मराठी बोलपटाचा डाव मांडून बसले होते. त्यांनी



**'कुंकू' या चित्रपटातील दृश्यात शांता आपटे**

नानासाहेब सरपोतदारांच्या शिफारशीमुळे शांता आपटे यांना चित्रपटात राधेची भूमिका दिली. त्या सुमारास शांता आपटे यांचे वय १४ वर्षांचे होते. शांता आपटे यांची भूमिका असणारा 'श्यामसुंदर' बोलपट मुंबईच्या वेस्टएंड (आताचा नाझ) थिएटरमध्ये सर्वप्रथम झळकला. तेथे तो सतत पंचवीस आठवडे पडद्यावर तळ ठोकून होता. शांता आपटे यांनी त्या बोलपटात गायलेले 'उदयाचलि सविता' हे गाणे लोकप्रिय झाले .

प्रभात फिल्म कंपनी त्या वेळेस कोल्हापुरात आपले चित्रपट तयार करत असे. त्यांनी शांता आपटे यांना 'अमृतमंथन' (१९३४) बोलपटात काम करण्यासाठी बोलावून घेतले. दिग्दर्शक होते व्ही. शांताराम. त्यांनी शांता आपटे यांच्यावर विशेष मेहनत घेऊन त्यांच्याकडून कसदार अभिनय करून घेतला. 'अमृतमंथन'च्या हिंदी आवृत्तीत शांताबाई यांनी गायलेले 'कमसीन मे अब' हे पंजाब प्रांतात खूपच गाजले. चित्रपटही भारतभर गाजला. शांता आपटे हे नाव प्रसिद्धीच्या झोतात आले. प्रभातमध्ये शांता आपटे यांनी 'अमरज्योती', 'वहाँ', 'गोपालकृष्ण', 'कुंकू' असे एकाहून एक बहारदार बोलपट केले.

'कुंकू' हा चित्रपट होता स्त्रीवरील अन्यायाचे चित्रण करणारा, त्यातील शांता आपटे यांची 'नीरा' या बंडखोर नायिकेची भूमिका खूपच गाजली. पडद्यावरची पहिली बंडखोर नायिका म्हणून आजही शांता आपटे यांचेच नाव घेतले जाते.

आपण प्रभातची मुख्य नटी असताना 'माणूस' चित्रपटासाठी बाहेरची नटी प्रमुख भूमिकेसाठी आणली व आपल्यावर अन्याय झाला, असा शांता आपटे यांचा समज झाला व त्यामुळे रागावून त्यांनी प्रभात चित्रपट कंपनीच्या बाहेर जाहीर उपोषणास सुरुवात केली. त्यांच्या मागण्या होत्या – आपल्या पगारात पाचशे रुपयांची वाढ अथवा प्रभातच्या करारातून मुक्तता. प्रभातने शांता आपटे यांचा करार रद्द करून आपली सुटका करून घेतली.

शांता आपटे यांची प्रभातच्या करारातून सुटका झाली ही बातमी कळताच त्यांना मद्रास (आता चेन्नई) येथून 'सावित्री' या तमिळ चित्रपटासाठी बोलावणे आले. त्याच बरोबर लाहोर येथून पांचोली या प्रख्यात फिल्म कंपनीच्या 'जमिंदार' या हिंदी भाषेतील बोलपटासाठी त्यांना आमंत्रण आले. शांता आपटे यांनी दोन्ही चित्रपटांच्या ऑफर्स स्वीकारल्या. त्याचबरोबर स्वतःचे 'ब्रँडनेम' तयार केले, तो 'एस. ए. कर्न्सच्या सौजन्याने'. ही अक्षर त्यांच्या नावासमोर ठळकपणे चित्रपटाच्या श्रेय नामावलीत, जाहिरातीत व प्रसिद्धी पत्रकातून देण्यात यावीत, तसेच श्रेयनामावलीत शांता आपटे हे नाव पडद्यावर सर्वप्रथम दाखवण्यात यावे व त्यानंतर नायक आणि इतर कलावंतांची नावे देण्यात यावीत. भारतीय चित्रपटाच्या इतिहासात स्वतःचे 'ब्रँडनेम' प्रस्थापित करणारी पहिली व्यक्ती म्हणून शांता आपटे यांचा उल्लेख केला पाहिजे.

'सावित्री' बोलपटासाठी मद्रासला जाऊन त्यांनी तमिळ भाषा आत्मसात केली. यात त्यांनी अभिनयासह

'गोपालकृष्ण' चित्रपटात शांता आपटे



गाणीही गायली. हा चित्रपट त्या काळी खूपच गाजला. त्यानंतर त्या लाहोरला गेल्या. 'जमिंदार' या चित्रपटात त्या पंजाबी पोशाखातील पहिली मराठी चित्रतारका म्हणून पडद्यावर झळकल्या. त्या चित्रपटातील 'छोटासा संसार मेरा' हे गाणे त्या वेळेस अखंड भारतात प्रचंड गाजले. त्या गाण्याच्या रॉयल्टीने पांचोली पिक्चर्सचा कोष धनराशींनी भरून गेला. 'जमिंदार' बोलपटही खूपच लोकप्रिय ठरला. लाहोरमध्ये असताना शांता आपटे पंजाबी भाषा शिकल्या आणि उर्दू लिपीतले लेखन वाचू लागल्या. ही शांताबाईंच्या जिद्दीची कमाल म्हणावी तितकी थोडीच आहे.

१९४२ सालातच सिर्को संस्थेतर्फे 'अपना घर'-'आपले घर' हा हिंदी-मराठी भाषेत तयार करण्याची तयारी सुरू होती. दिग्दर्शनासाठी कलकत्त्याहून देवकी बोस यांना खास बोलावून घेण्यात आले. शांता आपटे आणि चंद्रमोहन ही प्रभातची नामवंत मंडळी त्यात होती. सोबत नायमपल्ली, विमल वशिष्ठ, डेव्हीड, गोप आणि महेश कौल यांसारखे ताकदीचे कलाकार होते. ब्रिटिशांविरुद्ध स्वातंत्र्यलढ्याला जोर चढण्याचा तो काळ होता. स्वाभाविकच ब्रिटिश सरकारला चकवण्यासाठी चित्रपटात नवरा (चंद्रमोहन) म्हणजे ब्रिटिश राजवट, तर पत्नी (शांता आपटे) ही कैदी आणि घर म्हणजे भारत असे प्रतीकात्मक अर्थ देऊन देवकी बोस यांनी पटकथेची बांधणी केली होती. या चित्रपटात शांता आपटे आणि चंद्रमोहन यांच्या अभिनयाची जुगलबंदी प्रेक्षकांना पाहावयास मिळाली. हा चित्रपट मुंबईच्या कृष्ण सिनेमात १३ फेब्रुवारी १९४२ ला दाखवण्यात आला आणि पुढे ऑगस्टच्या महिन्यात 'चले जाव' ही चळवळ सुरू झाली. चित्रपटात शांता आपटे यांची तडफदार भूमिका पडद्यावर पाहून प्रेक्षकांमधून टाळ्यांचा कडकडाट ऐकू येत असे. या चित्रपटातले शांताबाईंनी गायलेले 'ते अपुले घर, ते नाही रे नाही, अपुले घर ते नाही' हे गाणे खूपच गाजले. गाण्याचे बोल होते शांताराम आठवले यांचे.

'फिल्म इंडिया' या मासिकातून झालेली आपली निंदानालस्ती सहन न होऊन शांता आपटे यांनी फिल्म इंडियाच्या कार्यालयामध्ये जाऊन आपल्या बदनामीचा निषेध धाडसाने नोंदवला. शांता आपटे यांचे हे नवे रूप लोकांच्या नजरेसमोर आले. पडद्यावरची बेडर नायिका ही प्रत्यक्ष जीवनातही तशीच बेडर असते, हे आपल्या कृतीने शांता आपटे यांनी सिद्ध केले. 'भाग्यरेखा', 'कुंकवाचा धनी', आणि 'मै अबला नही हूँ' हे चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केले. पुढे शांता आपटे यांचे 'भाग्यलक्ष्मी' (दिग्दर्शक सर्वोत्तम बदामी), 'कादंबरी' (दिग्दर्शक नंदलाल जसवंतलाल) हे चित्रपट गाजले. 'कादंबरी' हा चित्रपट संस्कृत नाटकावर बेतला होता. चित्रपटात शांता आपटे यांच्यासमवेत वनमाला आणि पहाडी संन्यास यासारखे तगडे कलाकार होते. हा चित्रपट बऱ्यापैकी चालला. नंतर आलेला 'सावन' पडद्यावर सपशेल कोसळला. नायक होता मोतीलाल आणि संगीत सी.रामचंद्र यांचे होते. दादा गुंजाळ दिग्दर्शित चित्रपट 'पनीहारी' चांगला झाला होता. सुरेंद्र आणि शांता आपटे यांच्या गाण्यांनी कानसेनांवर गारूड केले आणि तिकिटाच्या बारीवर पैशाचा पाऊस पडला.

'सुभद्रा' हा मा. विनायक यांचा बहुचर्चित चित्रपट. यात शांता आपटे यांनी रंगवलेली सुभद्रा अप्रतिम वठली होती. हा चित्रपट मुंबईच्या कारदार स्टुडिओत सुरू झाला. मा.विनायक यांच्या कामाची पद्धत म्हणजे शॉट मनासारखा होईपर्यंत शॉटचे अनेक रिटेक होत असत. चित्रीकरणाची वेळ सकाळी १० ते संध्याकाळी ७ वाजेपर्यंत असे. त्या वेळेत शॉट पूर्ण होत नसे. साहजिकच ओव्हर टाईम करावा लागत असे. शांता आपटे या वेळेच्या बाबतीत फारच काटेकोर असत. पाच वाजल्यानंतर त्या आपला मेकअप उतरवून स्टुडिओ बाहेर पडत. मा. विनायक त्यांना हा चित्रपट शक्यतो लवकर संपवायचा होता. त्यामुळे शांता आपटे यांना मोबदला वाढवून देण्यात आला. चित्रीकरण लांबल्यामुळे कारदार स्टुडिओचा फायदा झाला. चित्रपट पूर्ण होऊन मुंबईच्या रॉक्सी सिनेमागृहात मोठ्या थाटामाटात प्रदर्शित झाला आणि दुसऱ्याच आठवड्यात

बॅरिस्टर जीना यांनी डायरेक्ट ॲक्शनचा नारा दिला. देशात जातीय दंगली उसळल्या आणि त्यात सुभद्रा चित्रपटाची आहुती पडली.

शांता आपटे यांनी त्यानंतर ‘उत्तरा अभिमन्यू’, ‘वाल्मिकी’ , ‘मंदिर’, ‘स्वयंसिद्धा’ आणि ‘मै अबला नहीं हूँ’ सारखे हिंदी चित्रपट केले. त्यांनी ‘स्वयंसिद्धा’ चित्रपट हा कलकत्त्याला जाऊन केला आणि ‘मै अबला नहीं हूँ’मध्ये अभिनयाबरोबर चित्रपटाला संगीत दिले.

हिंदी चित्रपटसृष्टीत नाव कमावलेल्या शांता आपटे यांनी नंतरच्या काळातही मराठी बोलपटातून अभिनय केला. ‘भाग्योदय’, ‘जागा भाड्याने देणे आहे’, ‘शिलांगणाचं सोनं’ यासारख्या चित्रपटातून प्रेक्षकांना त्यांचे दर्शन झाले, पण त्यात पूर्वीची चमक नव्हती. गुजराती चित्रपटातून आणि मराठी रंगभूमीवर त्यांनी भूमिका केल्या.

शांता आपटे यांचा कॅन्सरने मृत्यू झाला. त्या प्रसंगी आचार्य अत्रे यांनी मराठा दैनिकांतून अग्रलेख लिहून शांता आपटे यांना आदरांजली वाहिली. यावरून शांता आपटे यांची अभिनय आणि संगीत या क्षेत्रातली थोरवी ध्यानात यावी. शांता आपटे यांनी ‘जाऊ मी सिनेमात’ हे पुस्तक लिहिले. त्याचा प्रकाशन सोहळा रत्नागिरीत भरलेल्या मराठी साहित्य संमेलनात संपन्न झाला होता.

– द.भा. सामंत

## इनामदार, कौशल श्रीकृष्ण

**संगीतकार**

**२ ऑक्टोबर १९७१**

कौशल श्रीकृष्ण इनामदार यांचा जन्म पुण्यात झाला. कौशल हे पाचगणीतील इंग्रजी माध्यमाच्या शाळेचे विद्यार्थी. ते महाविद्यालयात असताना त्यांना चेतन दातार हे मित्र गुरुरूपात भेटले. त्यांच्यामुळे कौशल नाट्यक्षेत्रात आले. त्यांनी नाट्यलेखनाची व अभिनयाची बक्षिसे पटकावली. हिंदीच्या प्रभावामुळे कौशल गझलच्या प्रेमात पडले. गुलाम अली व जगजित सिंग यांच्या गझलांच्या चालीवर ते गीते लिहू लागले.



लहानपणी ते संगीतकार कमलाकर भागवत यांच्याकडे संगीत शिकले होते. त्यांना पुढे सत्यशील देशपांडे यांचा सहवास लाभला. त्यांच्यावर नाटक, संगीत या कलांचा परिणाम होत राहिला. या क्षेत्रात असतानाच त्यांच्यातला संगीतकार जन्माला आला. कौशल यांनी १९९३ साली रुपारेल महाविद्यालयात माजी विद्यार्थी म्हणून कुसुमाग्रजांची ‘जा जरा पूर्वेकडे’ ही कविता सादर केली. ती वेगळी व अर्थपूर्ण चाल ऐकून ज्येष्ठ कवी शंकर वैद्य यांनी कौशल यांना संगीतक्षेत्रात जाण्याचा सल्ला दिला. आधीच्या पिढीतील कवींच्या उत्तम रचना नव्या पिढीला ज्ञात व्हाव्या, या हेतूने कौशल यांनी बोरकर, मर्ढेकर, अनिल अशा बऱ्याच कवींच्या कवितांना वेगवेगळ्या चाली लावून १९९५ साली ‘अमृताचा वसा’ हा कार्यक्रम केला. त्याचे शंभर प्रयोग झाले व ते लोकप्रियही झाले. या कार्यक्रमामुळे ‘संगीतकार’ म्हणून कौशल यांना स्वत:ची नवी ओळख निर्माण करता आली.

‘आपल्याला संगीत जमते’, इतकेच नव्हे तर ते करण्यात आनंद मिळतो, हे ध्यानात आल्यानंतर कौशल इनामदार यांनी ‘शुभ्रकळ्या मूठभर’ हा कार्यक्रम केला. अनेक ‘साहित्यिक मूल्ये’ असणाऱ्या कार्यक्रमांबरोबरच त्यांनी ‘मिस इंडिया’सारख्या कार्यक्रमाला दिलेले संगीतही यशस्वी ठरले. या विविधतेमुळे ‘प्रयोगशील संगीतकार’ म्हणून ते नावारूपाला आले. दूरदर्शनच्या ‘दौलत’, ‘झेप’, ‘भटकंती’, ‘चार दिवस सासूचे’, ‘तितलिया’ अशा जवळजवळ वीस मालिकांना, तसेच काही लघुपटांनाही त्यांनी संगीत दिले. संगीतकाराप्रमाणेच ते उत्तम गायकही आहेत. संगीताची सर्व माध्यमे हाताळल्यामुळे ‘विचारवंत संगीतकार’ असा कौशल इनामदार यांचा लौकिक झाला आहे.

ठाणे येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य

संमेलनात कौशल इनामदार यांनी कविवर्य सुरेश भट यांचे ‘लाभले आम्हास भाग्य बोलतो मराठी’ हे मायमराठीचे स्तवनगीत चाल लावून समूहाकडून गाऊन घेऊन सादर केले. ते इतके गाजले की अभिनेता अमिताभ बच्चन यांनीही कौशल इनामदार यांचे कौतुक केले. ‘कृष्णाकाठची मीरा’ (२००२) हा त्यांनी संगीत दिलेला पहिला चित्रपट. त्यांनी सुमारे १० चित्रपटांना संगीत दिले. त्यांच्या ‘बालगंधर्व’ या चित्रपटाच्या संगीताने नव्या पिढीला ‘गंधर्वयुगात’ नेण्याचे महत्त्वपूर्ण काम केले आहे.

– मधू पोतदार

**संदर्भ** : १) पोतदार मधू, ‘संगीतकार कोश’, प्रतीक प्रकाशन, पुणे; २०१२.

## उषाकिरण

*मराठे, उषा बापू*

**अभिनेत्री**

**२२ एप्रिल १९२९ – ९ मार्च २०००**



चित्रपटसृष्टीतील व्यक्तीने नगरपालपद भूषवण्याचा पहिला मान मिळवलेल्या अभिनेत्री म्हणजे उषाकिरण. त्यांचा जन्म वसईमध्ये एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव राधा होते. घरची आर्थिक परिस्थिती बेताची असूनही त्यांच्या वडिलांनी–बापू मराठे यांनी आपल्या मुलीला लहानपनापासूनच नृत्यकलेचे शिक्षण दिले. त्यांच्या पदलालित्यावर खूश होऊन प्रसिद्ध नर्तक उदय शंकर यांनी उषा मराठे यांना ‘कल्पना’ (१९४८) चित्रपटात भूमिका दिली. हा चित्रपट मद्रास येथे तयार झाला. या चित्रपटाच्या चित्रीकरणानंतर उषाकिरण मुंबईत आल्यावर त्यांना मो.ग. रांगणेकर यांच्या ‘कुबेर’ या चित्रपटातील भूमिका मिळाली. ती त्यांनी उषा मराठे या नावानेच केली. पुढे त्याच नावाने त्यांनी ‘सीता स्वयंवर’, ‘मायाबाजार’, ‘माझा राम’, ‘चाळीतले शेजारी’ यासारखे चित्रपट केले. १९५० मध्ये त्यांना ‘गौना’ नावाच्या हिंदी चित्रपटात नायिकेची भूमिका मिळाली. त्या वेळेस अमिया चक्रवर्ती यांनी उषा मराठे यांनी ‘उषाकिरण’ असे त्यांचे नामकरण केले आणि पुढे त्या याच नावाने चित्रपटसृष्टीत ओळखल्या जाऊ लागल्या.

विश्राम बेडेकर यांनी उषाकिरण यांना ‘क्रांतिवीर वासुदेव बळवंत’ या चित्रपटात तमाशात नाचणाऱ्या कोल्हाटणीची भूमिका दिली. त्यांनी साकारलेल्या या भूमिकेची खूपच प्रशंसा झाली आणि त्या मराठी–हिंदी चित्रपटसृष्टीतील आघाडीच्या नायिका म्हणून एकदम प्रसिद्धीला आल्या.

वि.वि. बोकील यांच्या गाठीभेटी या कादंबरीवर आधारलेल्या ‘बाळा जो जो रे’ या चित्रपटातील उषाकिरण यांची भूमिकाही लोकप्रिय ठरली. मातृदेवोभव हा संदेश अभिनव पद्धतीने सांगणाऱ्या या चित्रपटाने रजत महोत्सव साजरा केला. मंगल पिक्चर्सच्या राम गबाले दिग्दर्शित ‘जशास तसे’ या चित्रपटात त्यांना पुन्हा एकदा कोल्हाटणीची भूमिका मिळाली. त्यांच्या सोबत बाबूराव पेंढारकरांसारखे कसलेले अभिनेते होते. त्यांच्या तोडीचा अभिनय करून उषाकिरण यांनी बाबूरावांची शाबासकी मिळवली. तर पु.ल. देशपांडे यांच्या ‘दूधभात’ (१९४२) या चित्रपटातील अभिनय सादरीकरणामुळे त्यांना पु.लं.कडून प्रशस्तीही मिळाली.

‘स्त्री जन्मा ही तुझी कहाणी’ हा दत्ता धर्माधिकारी दिग्दर्शित चित्रपट उषाकिरण यांच्या अभिनयामुळे अत्यंत लोकप्रिय ठरला होता, त्यातील त्यांच्या अभिनयामुळे रणजित मुव्हीटोनने हिंदीत ‘औरत ये तेरी कहानी’ हा चित्रपट काढला. लता मंगेशकर यांच्या सुरेल चित्रच्या ‘कांचनगंगा’ (१९५४) या चित्रपटातील गोड गळयाची पण दिसायला कुरूप असणारी नायिका उषाकिरण यांनी आपल्या अभिनयाने जिवंत केली. बाबूराव पै आणि चुंबळे यांच्या ‘पोस्टातली मुलगी’ (१९५४) या चित्रपटातील मध्यमवर्गीय मराठी कुटुंबातील सुशिक्षित कमावत्या मुलीची होणारी कुचंबणा उषाकिरण यांनी



‘जशास तसे’ मध्ये प्रभाकर मुजुमदारसह उषाकिरण

आपल्या अभिनयकलेच्या आविष्कारातून यथोचितपणे साकारली. अनंत माने यांच्या ‘पुनवेची रात’मधली तमाशाच्या फडात नाचणारी नर्तिका, माधव शिंदे दिग्दर्शित ‘शिकलेली बायको’मधील डॉक्टर असणारी शेतकऱ्याची बायको, या व्यक्तिरेखा त्यांनी समर्थपणे साकारल्या. ‘शिकलेली बायको’ या चित्रपटावरून मोहन सैगल यांनी हिंदीत ‘डॉक्टर विद्या’ हा चित्रपट काढला.

१९६० सालच्या ‘कन्यादान’ हा चित्रपट महादेवशास्त्री जोशी यांच्या ‘जगावेगळी गोष्ट’ या कथेवर बेतला होता. आपल्या विधवा सुनेचे लग्न लावून देणारा सासरा व सून यांच्यातील हृद्य कहाणी या चित्रपटात दाखवण्यात आली होती. यातील विधवा सून उषाकिरण यांनी उत्तमरीत्या साकारली. या चित्रपटाला १९६१ सालचे राष्ट्रपती रौप्यपदक मिळाले. ‘एक धागा सुखाचा’ (१९६१) या अत्यंत गाजलेल्या चित्रपटाचे दिग्दर्शक होते दत्ता धर्माधिकारी. त्यातील उषाकिरण यांनी साकारलेली भूमिकाही महत्त्वपूर्ण होती.

१९६२ मध्ये उषाकिरण यांचे ‘गरिबाघरची लेक’, ‘सप्तपदी’, ‘सूनबाई’ हे चित्रपट पडद्यावर आले. त्यांच्या अभिनयाने चित्रपट रसिकांना जिंकून तर

घेतलेच, त्याचबरोबर यशस्वी ठरलेल्या या चित्रपटाने उत्तम व्यवसायही केला.

उषाकिरण यांनी आपल्या अभिनय कारकिर्दीत अत्यंत वेगळ्या धाटणीच्या भूमिका पार पाडल्या. पण त्यातही नृत्यनिपुणता, बोलका चेहरा, गोरा वर्ण असूनही त्यांनी कोल्हाटणीच्या पार पाडलेल्या भूमिका प्रेक्षकांच्या आजही स्मरणात आहेत. या भूमिका सादर करताना चेहऱ्यावरील शहरीपण जाणवू न देता त्यांनी आपल्या अभिनयाच्या जोरावर या भूमिकांना न्याय मिळवून दिला.

या चित्रपटांव्यतिरिक्त उषाकिरण यांनी 'मर्दमराठा' (१९५१), 'बेलभंडारा' (१९५२), 'प्रीतिसंगम' (१९५७), 'चाळ माझ्या पायात' (१९६०), 'सख्या सावरा मला' (१९६०), 'माणसाला पंख असतात' (१९६१), अशा चित्रपटांमधून महत्त्वाच्या भूमिका पार पाडलेल्या आहेत. उषाकिरण यांनी मराठीबरोबरच हिंदी बोलपटही गाजवले. हिंदीतला नायिका असणारा त्यांचा पहिला बोलपट होता 'गौना' (१९५०). त्यानंतर त्यांनी 'मदहोश', 'डाग', 'पतिता', 'मुसाफिर', 'औलाद', 'समाज', 'झांजर' यांसारखे चित्रपट केले.

उषाकिरण यांनी 'चंबल की कसम' (१९८०) या चित्रपटात चरित्र अभिनेत्री म्हणून भूमिका केली. पडद्यावरचे हे त्यांचे शेवटचे दर्शन. चित्रपटसंन्यास घेतल्यानंतर उषाकिरण यांनी समाजोपयोगी कामे करण्यास सुरुवात केली. पुढे त्यांचे काम पाहून महाराष्ट्र शासनाने त्यांना मुंबईचे नगरपालपद दिले. त्यांची कन्या तन्वी आझमी यांनी त्यांच्या अभिनयाचा वारसा चालू ठेवला आहे.

आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात उषाकिरण यांनी आपल्या अनुभवांचा लेखाजोखा 'उष:काल' या आत्मचरित्राच्या रूपाने वाचकांना दिलेला आहे. मुंबई येथे कर्करोगासारख्या असाध्य रोगाने उषाकिरण यांचे निधन झाले.

– द.भा. सामंत

संदर्भ : १) उषाकिरण, 'उष:काल', श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९८९.

## उसगावकर, वर्षा अच्युत
**अभिनेत्री**
**२८ फेब्रुवारी १९६९**



वर्षा उसगावकर यांचा जन्म गोव्याच्या फोंडा तालुक्यातल्या उसगाव येथे झाला. कोकणी मातृभाषा असलेल्या या मुलीने अभिनेत्री व्हायचे असे लहानपणीच ठरवले होते. त्यांचे वडील अच्युत काशीराम उसगावकर गोवा मुक्ती संग्रामात सहभागी झाले होते. १९६२ साली गोवा मुक्त झाल्यावर ते कॅबिनेट मंत्री झाले. वर्षा यांची आई माणिक उसगावकर या एम.ए. केल्यानंतर ११ वर्षे शास्त्रीय संगीत शिकल्या. त्यामुळे आपसूकच वर्षा उसगावकर यांनीही पाचवीत असल्यापासूनच पं. सुधाकर करंदीकर यांच्याकडे जयपूर घराण्याचे शास्त्रीय संगीताचे धडे घेतले आहेत. शाळा, महाविद्यालयामध्ये शिकत असतानाच वर्षा उसगावकर नाटकात काम करत होत्या. 'तियात्र' या ख्रिस्तीधर्मीयांच्या रंगभूमीवरही त्यांनी केलेले कामही वैशिष्ट्यपूर्ण होते.

वर्षा उसगावकर यांनी गोव्यातूनच बी.कॉम.पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. याच काळात गोव्यातील 'कलाशुक्लेंदु' या नाट्यसंस्थेच्या 'महापूर' या नाटकात केलेल्या भूमिकेला आंतरराज्य नाट्यस्पर्धेत सुवर्णपदक मिळाले. राजकारणाचा वारसा असूनही वर्षामधील अभिनयाच्या गुणाला त्यांच्या आई-वडिलांनी आस्थेने प्रोत्साहन दिले. त्यामुळेच वर्षा उसगावकर यांनी औरंगाबाद येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठातल्या नाट्यशास्त्र विभागातून अभिनयाचे प्रशिक्षण घेतले. अभिनय करण्याच्या ध्यासामुळे त्या मुंबईला आल्या. कारकिर्दीच्या सुरुवातीच्या काळात दिग्दर्शक दामू केंकरे यांच्या 'कार्टी प्रेमात पडली' या नाटकाद्वारे त्यांनी व्यावसायिक रंगभूमीवर काम करण्यास सुरुवात केली. नंतर दामू केंकरे यांच्या प्रयत्नांमुळेच



'गंमत जंमत' मध्ये अशोक सराफ व सचिन पिळगावकरसह वर्षा उसगावकर

'तुझ्यावाचून करमेना' या चित्रपटात वर्षा उसगावकर यांना छोटी भूमिका मिळाली.

प्रकाश बुद्धिसागर यांच्या 'ब्रह्मचारी' नाटकातील बोल्ड वेषभूषेमुळे अभिनेते दिग्दर्शक सचिन पिळगावकर यांनी 'गंमत जंमत' (१९८७) चित्रपटातल्या भूमिकेसाठी उसगावकर यांना निवडले. हा चित्रपट अत्यंत यशस्वी ठरला. पुढे 'पैज लग्नाची' या चित्रपटातही त्यांनी काम केले. या दोन्ही चित्रपटातल्या भूमिकेसाठी त्यांना शासनाचे उत्कृष्ट अभिनयासाठीचे पारितोषिक मिळाले. 'यज्ञ', 'पैंजण', 'सवत माझी लाडकी', 'खट्याळ सासू नाठाळ सून', 'सगळीकडे बोंबाबोंब', 'मज्जाच मज्जा', 'रेशीम गाठी', 'आत्मविश्वास', 'हमाल दे धमाल', 'अफलातून', 'पसंत आहे मुलगी', 'भुताचा भाऊ', 'एक होता विदूषक', 'शुभमंगल सावधान', 'अबोली', 'जमलं हो जमलं', 'सवाल माझ्या प्रेमाचा', 'तुमच्याचसाठी' अशा जवळपास ४५ पेक्षा जास्त चित्रपटांतून त्यांनी भूमिका साकारल्या.

मराठीबरोबरच वर्षा उसगावकर यांनी बंगाली, तेलगू, कोकणी चित्रपटांतूनही अभिनय केला. तसेच 'दूध का कर्ज', 'हनिमून', 'तिरंगा', 'घरजमाई', 'सोने की जंजीर', 'साथी', 'खलनायिका', 'शोहरत', 'घर आया मेरा परदेसी' अशा हिंदी चित्रपटांतल्या त्यांच्या भूमिका लक्षणीय ठरल्या. या व्यतिरिक्त वर्षा उसगावकर यांनी महालक्ष्मी लॉटरी, लिंटास, अमूल बटर, सर्फ, लक्स, निरमा यांसारख्या अनेक जाहिरातींतही काम केलेले आहे. त्यांनी हिंदी नाटकांबरोबर 'महाभारत', 'झाँसी की रानी' यासारख्या हिंदी मालिकांतून अभिनय केला. 'इतिहास के गवाह', 'कभी इधर कभी उधर', 'अलविदा डार्लिंग', 'चंद्रकांता', 'अर्धांगिनी' 'कभी कभी' या मालिकांमध्येही त्यांनी काम केलेले आहे. याचबरोबरीने वर्षा उसगावकर यांनी लंडनच्या चॅनेल फोरसाठी 'प्लेफुल म्युज' या कार्यक्रमात काम केले. त्याच वेळेस

दिग्दर्शक अजय शर्मा यांच्याशी त्यांची ओळख झाली व त्यांच्यासोबतच त्या विवाहबद्ध झाल्या.

१९९४ पासून त्यांनी स्टेज शो करायला सुरुवात केली. तसेच 'वर्षा उसगावकर नाईट' या वाद्यवृदांमध्येही त्या गातात. त्यांनी महेश कोठारे यांच्या 'धांगडधिंगा' या चित्रपटासाठी पार्श्वगायन केलेले आहे. तसेच गोव्याच्या उल्हास बुयाँव यांच्या 'रूप तुझें लायता पिशे' या कोकणी अल्बमसाठी त्या गाणी गायल्या. वर्षा उसगावकर यांनी केवळ चार मराठी नाटकांमध्ये काम केलेले आहे. त्यातील 'ब्रह्मचारी' नाटकाचे जवळजवळ दोनशे प्रयोग केले आहेत. 'डबल गेम' नाटकाचे शंभर प्रयोग झालेले आहेत.

संगीताचा अभ्यास, आवड असल्याने वर्षा उसगावकर यांचे स्वत:चे 'रिक्षावाला' आणि 'आमची बालवाडी' हे दोन अल्बम तयार आहेतच, शिवाय 'म्युझिक मस्ती गप्पा गाणी' या संगीतिक कार्यक्रमाचे संचालनही त्या करत आहेत. अनेक मालिकांत, चित्रपटांत त्या आजही व्यग्र आहेत.

– संपादित

**संदर्भ** : १) टिळेकर महेश, 'मराठी तारका', प्रकाशक – महेश टिळेकर, पुणे; २००७. २) देसाई माधवी, 'गोमन्त सौदामिनी', माणिक प्रकाशन, कोल्हापूर; २०११. ३) विश्वचरित्र कोश, खंड ६, प्रमुख संपादक श्रीराम कामत, प्रकाशक – कार्यवाह विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा; २०१०.

## एन. दत्ता

*नायक, दत्ताराम बाबूराम*

**संगीतकार**

**१२ डिसेंबर १९२७ – ३० डिसेंबर १९८७**



एन. दत्ता ऊर्फ दत्ताराम बाबूराम नायक यांचा जन्म पेणजवळील आरोषा या गावी झाला. त्यांचे बालपण गोव्यात गेल्याने त्यांच्यावर पोर्तुगीज व कोकणी संगीताचे संस्कार झाले. लहानपणापासून संगीताकडे ओढा असल्याने शिक्षण अर्धवट सोडून दत्ता मुंबईला आले. येथे बी.आर. देवधर यांच्या मार्गदर्शनाखाली देवधर संगीत विद्यालयात संगीत शिकू लागले.

चित्रपट संगीताची गोडी लागल्याने त्यांनी गुलाम हैदर या संगीत दिग्दर्शकाकडे काही काळ उमेदवारी केली. त्याच काळात गीतांना स्वतंत्रपणे संगीत देऊन ते गाण्याचे कार्यक्रमही करू लागले. अशाच एका कार्यक्रमात ज्येष्ठ संगीत दिग्दर्शक सचिन देव बर्मन यांनी त्यांना हेरले व स्वत:चा साहाय्यक संगीत दिग्दर्शक म्हणून त्यांची नेमणूक केली. १९५१ मध्ये आलेल्या 'सजा' या चित्रपटापासून या दोघांची जोडी जमली. पुढे एन. दत्ता यांनी अनेक चित्रपटांसाठी बर्मन यांचे साहाय्यक संगीत दिग्दर्शक म्हणून काम केले.

तथापि १९४९ मध्ये आलेल्या 'ती आणि ते' या चित्रपटाने एन. दत्ता यांना पार्श्वसंगीत देण्याचा स्वतंत्र अनुभव आलेला होता. दत्ता यांनी १९५१ मध्येच 'मिलाप' या चित्रपटाला स्वतंत्रपणे संगीत देत आपली संगीत दिग्दर्शनाची कारकिर्द सुरू केली. परंतु १९५९ ते १९६३ या काळात गंभीर आजारपणामुळे त्यांना काम करता आले नाही. नंतर १९६४ मध्ये आपली संगीत दिग्दर्शनाची कारकिर्द पुन्हा सुरू करताना 'चाँदी की दीवार' या चित्रपटाला संगीत दिले. दत्ता यांचे 'साधना' (औरत जनम दिया मर्दो को), 'चंद्रकांता' (मैने चाँद और सितारोंकी तमन्ना की थी), 'धूल का फूल' (तेरे प्यार का आसरा चाहता हूँ) या चित्रपटातील गाणीही गाजली. त्यानंतर ते मराठी चित्रपटांकडे वळले. १९६४ ते १९८१ या काळात त्यांनी संगीतबद्ध केलेले बारा मराठी चित्रपट प्रदर्शित झाले. 'एक दोन तीन' हा त्यांचा पहिला मराठी चित्रपट. त्यानंतर आलेल्या 'मधुचंद्र' या चित्रपटातील 'मधू इथे आणि चंद्र तिथे झुरतो अंधारात' व 'हे चिंचेचे झाड दिसे मज चिनार वृक्षापरी' ही गाणी रसिकांच्या अजूनही स्मरणात आहेत. १९६९ मध्ये आलेल्या

‘अपराध’ व १९७७ मध्ये आलेल्या ‘बाळा गाऊ कशी अंगाई’ या चित्रपटांनी एन. दत्ता यांना राजमान्यता मिळाली. या दोन्ही चित्रपटांसाठी त्यांना महाराष्ट्र शासनातर्फे सर्वोत्कृष्ट संगीत दिग्दर्शकाचा पुरस्कार मिळाला.

१९८१ मध्ये प्रदर्शित झालेला ‘गोविंदा आला रे आला’ हा त्यांच्या संगीत दिग्दर्शनाखालील अखेरचा चित्रपट ठरला. त्यानंतर व्याधींनी ग्रासल्यामुळे त्यांना चित्रपटसंन्यास घेणे भाग पडले. मुंबई येथे त्यांचे हृदयविकाराने निधन झाले.

– शशिकांत किणीकर

## ओक, श्याम नीळकंठ

**चित्रपट समीक्षक, लेखक**

**२७ जानेवारी १९०७ – १० मार्च १९८२**

श्याम नीळकंठ ओक हे चित्रपट समीक्षक व लेखक म्हणून सर्वपरिचित असणारे लोकप्रिय व्यक्तिमत्त्व. बी.पी. सामंत यांच्या जाहिरात कंपनीत प्रसिद्धीप्रमुख म्हणून काम पाहत होते. तसेच जाहिरातीची कॉपी लिहिण्यात त्यांचा हातखंडा होता.

आपल्या लेखणीच्या माध्यमातून चित्रपटाची जाहिरात करणारे ओक शब्दांच्या यथोचित वापराबाबत नेहमी सजग असत, म्हणूनच खलनायकाच्या भूमिकेत वावरणाऱ्या बाबूराव पेंढारकर यांनी हंसच्या ‘देवता’ चित्रपटात त्यांना प्रथमच नायकाची भूमिका केली. त्या प्रसंगी श्यामरावांनी त्या चित्रपटाची जाहिरात करताना म्हटले की, ‘पडद्यावरचा बदमाश सुधारला.’

प्रतिभा या तत्कालीन महत्त्वाच्या साप्ताहिकातून ओक चित्रपटाची परीक्षणे करत. ती परीक्षणेही खास शामराव पद्धतीची असत. त्या वेळेस हंसचा ‘छाया’ हा बोलपट प्रचंड गाजला. त्या चित्रपटाचे परीक्षण करताना शामराव म्हणतात, ‘पांडुरंगाची कृपा लाभल्याने या बोलपटाचे यश निश्‍चित होऊन त्याला सुवर्णपदक लाभले.’ यातील पांडुरंग नाईक या छायाचित्रकाराला आणि त्यांच्या नेत्रसुखकारक छायाचित्रणाला त्यांनी दिलेली ही दाद, अत्यंत समर्पक व परिणामकारक शब्दांच्या मांडणीतून ओक सहजपणे सांगून जातात.

तसेच प्रभातचा ‘अमरज्योती’ हा दर्यावर्दी चित्रपट म्हणून प्रभात त्याची जाहिरात करत असे. त्या चित्रपटाचे परीक्षण करताना ओक लिहितात, ‘प्रभातच्या या चित्रपटात दर्या फक्त वर्दी लावण्यापुरता दिसतो.’ मिश्कीलपणा हा त्यांच्या लेखणीचा गुण त्यांच्या परीक्षणांमधून सहजगत्या उमटून जातो. प्रतिभामध्ये त्यांनी प्रभातच्या ‘धर्मात्मा’ या चित्रपटाचे दीर्घ परीक्षण लिहिले होते. पॉप्युलर प्रकाशन संस्थेने ‘धर्मात्मा’ चित्रपटाची कथा, पटकथा, संवाद आणि गाणी असणारे दर्जेदार पुस्तक काढले. प्रतिभामध्ये श्यामराव ओक यांनी लिहिलेल्या परीक्षणाचा संपूर्ण भाग त्या पुस्तकात घेतला आहे, हे आवर्जून नमूद केले पाहिजे. पुढे १९३९-४० साली श्यामरावांनी जाहिराती आणि परीक्षण करण्याचे सोडून दिले व उत्तमोत्तम ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली. ‘गलोल’, ‘बाभळवनात’, ‘मालगाडी’, ‘परिहास’, ‘हवेवर’, ‘नवमिका’ हे त्यांचे काही ग्रंथ आजही आवर्जून वाचले जातात. ‘शामराई’ या त्यांच्या गाजलेल्या विनोदी संग्रहाला पु.ल. देशपांडे यांची प्रस्तावना आहे.

परीक्षणे व जाहिरात लेखनाने चित्रपट क्षेत्रात महत्वपूर्ण योगदान देणाऱ्या ओक यांचे पुण्यात निधन झाले.

– संपादित

## औंधकर, विष्णू हरी

**अभिनेता, पटकथाकार, दिग्दर्शक, नाटककार**

**३ डिसेंबर १८९२ – १७ डिसेंबर १९४२**

विष्णू हरी औंधकर यांचे शिक्षण मराठी चार इयत्तेपर्यंतच झाले होते. बालवयातच त्यांनी महाराष्ट्र नाटक मंडळीत स्त्रीपार्ट करण्यासाठी प्रवेश केला. तेथे त्यांनी ‘पुण्यप्रभाव’, ‘शिवसंभव’, ‘कांचनगडची मोहना’ इत्यादी नाटकांतून कामे केली. त्याच वेळेस दादासाहेब फाळके ‘राजा हरिश्चंद्र’ या चित्रपटाची निर्मिती करत होते. या चित्रपटात भूमिका करण्यासाठी ते नट

मंडळी शोधत होते. त्यांच्या नजरेत औंधकर आले व त्यांनी औंधकर यांना आपल्या चित्रपटात भूमिका दिली. फाळके यांचा हा चित्रपट १९१३ साली पडद्यावर आला. पुढे फाळके यांनी मुंबई सोडून नाशिकला मुक्काम हलवला. औंधकर मात्र मुंबईतच राहिले व नाटकातून भूमिका करू लागले.

तीव्र बुद्धी आणि सूक्ष्म निरीक्षणशक्ती यांच्या बळावर रंगभूमी आणि तिचा प्रेक्षकवर्ग यांचा अभ्यास करून 'बेबंदशाही', 'आग्र्याहून सुटका' अशी नाटके औंधकर यांनी सातत्याने लिहिली. ही नाटके रंगभूमीवर गाजली.

पांडुरंग तलगिरी यांनी पुण्याला खडकी येथे युनायटेड पिक्चर्स सिंडिकेट ही चित्रसंस्था स्थापना केली आणि औंधकरांना खास बोलावून घेतले. 'शिवप्रभाव' (Glory of virtue, १९२७) हा चित्रपट औंधकरांनी त्या वेळेस लिहून दिला. चित्रपट चांगला जमल्यामुळे तलगिरींनी त्यांना लगेच पुढला चित्रपट लिहिण्याचा आग्रह केला. केवळ पाच दिवसांत औंधकरांनी 'शूर किल्लेदारीण' (Brave woman, १९२७) चित्रपट लिहून दिला आणि पुढे त्या चित्रपटाचे दिग्दर्शनही केले. औंधकरांनी प्रभातमध्ये अनेक चित्रपटांची कथानके रचून दिली.

बाबूराव पेंटर यांनी शालिनी सिनेटोनसाठी १९३६ साली 'सावकारी पाश' या बोलपटाची निर्मिती केली. बाबूरावांनी प्रथम हा चित्रपट १९२५ साली मूकपट म्हणून काढला होता. आता चित्रपट बोलणार होता म्हणून पटकथा आणि संवाद लिहिण्यासाठी औंधकरांना आमंत्रण धाडले आणि काम करून घेतले. तसेच त्या बोलपटातल्या खलप्रवृत्तीच्या सावकाराचे काम करण्याची संधीही दिली.

मुंबईच्या मॅजेस्टिक चित्रपटगृहात १७ मार्च १९३६ रोजी 'सावकारी पाश' हा वास्तववादी चित्रपट प्रदर्शित झाला. त्या वेळेस औंधकरांच्या संवादांची आणि अभिनयाची खूपच प्रशंसा झाली. औंधकरांनी शेठशिराज अली हकीम यांच्यासाठी 'चंद्रराव मोरे' (१९३८) या चित्रपटाची पटकथा, संवाद आणि गीतरचना करून दिली व त्यात खलप्रवृत्तीची भूमिका केली.

प्रकाश पिक्चर्सचे एक भागीदार विजय भट यांनी औंधकरांकडून 'भरतभेट' (१९४२), 'नरसी भगत' (१९४७) व 'रामराज्य'(१९४४) हे बोलपट लिहून घेतले. त्यांचे हे सारे चित्रपट पडद्यावर भरपूर यशस्वी ठरले. मात्र 'भरतभेट' आणि 'रामराज्य' या चित्रपटांचे यश औंधकर पाहू शकले नाहीत. कारण हे चित्रपट पडद्यावर येण्यापूर्वीच मुंबई येथे त्यांचे निधन झाले.

– द.भा. सामंत

* * *

# क



## कदम, कामिनी अनिल

**अभिनेत्री**

**ऑगस्ट १९३३ – १९ जून २०००**



छायालेखक व्ही.अवधूत यांची मेहुणी, माणिक मुदलियार म्हणजेच कामिनी कदम यांचा जन्म कर्नाटकात बेळगाव येथे झाला. वयाच्या सातव्या वर्षी त्या शिक्षणाच्या निमित्ताने मुंबईला बहिणीकडे आल्या. दादर येथील ओरिएंट आणि जी.ई.आय. गर्ल्स हायस्कूलमध्ये त्यांचे शिक्षण सुरू असतानाच त्यांच्यामधील खेळाची आवड दिसू लागली. त्यातूनच त्यांनी हुतूतू, कबड्डी, खो-खो या मैदानी खेळांमध्ये प्रावीण्य मिळवले. खरे तर खेळ हेच आयुष्याचे ध्येय होणार होते, पण भालजी यांच्या निमित्ताने त्यांच्या आयुष्यात अभिनयाने प्रवेश केला.

मैदानी खेळात प्रवीण असणाऱ्या, पण अभिनयाची जाण नसणाऱ्या माणिक यांची निवड भालजी पेंढारकर यांनी 'ये रे माझ्या मागल्या' (१९५५) या चित्रपटासाठी केली. या क्षेत्राचा जवळून संबंध येत असला तरी अभिनयात अनभिज्ञ असणाऱ्या बालवयातील माणिक यांनी भालजींच्या मार्गदर्शनाखाली अभिनय केला. अभिनयाच्या प्रांतात नवख्या असणाऱ्या माणिक यांना दामूअण्णा मालवणकर, शशिकला, बाबूराव पेंढारकर यांसारख्या प्रख्यात कलाकारांबरोबर काम करण्याची मोलाची संधी भालजींनी मिळवून दिली. लहानग्या माणिकच्या चेहऱ्यावरचे सदैव दिसणारे हसरे भाव लक्षात घेऊन भालजींनी त्यांचे नाव 'स्मिता' असे ठेवले.

सदर चित्रपट अयशस्वी ठरल्यावरही भालजींनी १९५६ साली 'गाठ पडली ठका ठका' या चित्रपटाची निर्मिती करण्याचे निश्चित केले आणि या चित्रपटातही त्यांनी स्मिता या अभिनेत्रीला संधी देण्याचे ठरवले. कौटुंबिक विनोदप्रधान कथानक असणाऱ्या या चित्रपटात सूर्यकांत मांडरे, राजा गोसावी, जयश्री गडकर यांच्याबरोबर दुसरी नायिका होती स्मिता. राजा परांजपे दिग्दर्शित या चित्रपटातील कामाने स्मिता या अभिनेत्रीचा अभिनय करण्यातला आत्मविश्वास बळावत गेला आणि त्यांनी त्यापुढे 'देवघर' (१९५६), 'आंधळा मागतो डोळा' (१९५६), 'देव जागा आहे' (१९५७), 'देवाघरचं लेणं' (१९५७), 'नवरा म्हणू नये आपला' (१९५७), 'पहिलं प्रेम' (१९५७), 'धाकटी जाऊ' (१९५८), 'दोन घडीचा डाव' (१९५८) अशा अनेक चित्रपटांतून भूमिका केल्या. तत्कालीन दिग्गज कलाकारांबरोबर केलेल्या कामाच्या अनुभवातून त्या मराठी चित्रपटसृष्टीचा अविभाज्य भाग ठरल्या.

मराठी चित्रपटसृष्टीतील कारकिर्द भरात असतानाच त्यांना हिंदी चित्रपटसृष्टीतही संधी मिळू लागल्या. पं. मुखराम शर्मा या हिंदीतील दिग्दर्शकाने स्मिता यांना 'तलाक' (१९५८) या चित्रपटात राजेंद्रकुमारबरोबर काम करण्याची संधी दिली. नवरा-बायकोच्या भांडणांमध्ये होणाऱ्या मुलांच्या मानसिक कुंचबणेची रेखाटणी या चित्रपटात केलेली आहे.

याच दरम्यान स्मिता या एअर इंडियातील अधिकारी अनिल कदम यांच्याशी विवाहबद्ध झाल्या आणि स्मितावरून त्यांचे नाव कामिनी कदम झाले.

'तलाक' या चित्रपटानंतर हिंदी चित्रपटसृष्टीत रुळलेल्या कामिनी यांना 'संतान' आणि 'माँबाप' हे



**'संथ वाहते कृष्णामाई' या चित्रपटात चंद्रकांतसह कामिनी कदम**

चित्रपट मिळाले. तसेच त्यांनी 'मियाँ बीबी राजी', 'सपने सुहाने', 'स्कूल मास्टर' या चित्रपटांमध्येही कामे केली.

हिंदी चित्रपटसृष्टीत काम करणाऱ्या कामिनी मराठी चित्रपटसृष्टीत काम करीतच होत्या. १९५८ साली त्यांनी 'दोन घडीचा डाव' आणि 'धाकटी जाऊ' या दोन लोकप्रिय ठरलेल्या चित्रपटांमध्येही कामे केली. पुढे 'सुधारलेल्या बायका'(१९६५), 'शेरास सव्वाशेर'(१९६६), 'संथ वाहते कृष्णामाई'(१९६७), 'धर्मपत्नी'(१९६८), 'माझा होशील का'(१९६९) या चित्रपटांतील त्यांच्या भूमिका वाखाणण्याजोग्या आहेत.

मराठी-हिंदी चित्रपटसृष्टीत स्वत:च्या नावाची खास ओळख निर्माण करूनही कामिनी कदम यांनी रंगभूमीवर अभिनय करण्याच्या ऊर्मीने 'अपराध मीच केला' या नाटकातील शैला वर्टीची भूमिका चोखपणे केली. परंतु नाट्यसृष्टीमध्ये उशिरा केलेल्या प्रवेशामुळे त्या तेथे रुळू शकल्या नाहीत. असे असले तरी चित्रपटसृष्टीतील त्यांच्या स्थानाला धक्का पोहचू शकलेला नाही.

– संपादित

## कदम, रामचंद्र वासुदेव

*कदम, राम*

**संगीतकार**

**२८ ऑगस्ट १९१८ – १९ फेब्रुवारी १९९७**



रामचंद्र वासुदेव कदम हे राम कदम यांचे पूर्ण नाव. त्यांचे मूळ गाव मिरज होते. बालपणापासूनच त्यांना संगीताची आवड होती. मिरजेत त्यांच्या वडिलांची खानावळ होती. राम यांनी मिरजच्या महाराष्ट्र विद्यालयात तिसरीपर्यंत शिक्षण घेतले. लहानपणीच ते मिरजच्या अपान्ना गंगावणे यांच्या मेळ्यात बुलबुलतरंग वाजवत व गाणीही म्हणत. हाच मेळा पुढे करमरकरांचा मेळा म्हणून प्रसिद्धीला आला. छोट्या वयातच राम यांना या मेळ्यात खूप संधी मिळाल्यामुळे लहान वयातच बक्षिसांबरोबरच त्यांचे कौतुकही खूप झाले.

राम कदम यांना लहान वयातच संत गाडगेबाबांबरोबर राहायला मिळाले. त्यांच्या भजनात राम कदम बुलबुलतरंगची साथ करीत. त्यांच्या वडिलांचे हॉटेल फारसे चालत नसे. गरिबीमुळे राम कदम यांनी मिरजेच्याच जनरल ब्रास बँडमध्ये नोकरी केली. सुरुवातीला हरकाम्या म्हणून ते कार्यक्रमामधली वाद्ये पुसत. तिथे त्यांनी एकदा क्लॅरियोनेट वाजवून पाहिले, म्हणून वादकाने त्यांच्या थोबाडीत मारली. त्या तिरमिरीत ‘मी स्वत:चे क्लॅरियोनेट घेऊनच परत येईन’, अशी प्रतिज्ञा करून ते घराबाहेर पडले. दुसऱ्या गावी जाऊन स्वत:च्या कमाईतून क्लॅरियोनेट घेऊनच मिरजेला परतले. मिरजेचे बँडमास्टर चांदलाल यांनी राम कदम यांना क्लॅरियोनेट वादनामध्ये तयार केले. मधल्या काळात त्यांना खांसाहेब अब्दुल करीम खां यांच्याकडे गाणे शिकण्याची संधी मिळाली.

पुढे चांदलाल यांनीच कदम यांना पुण्याच्या ‘प्रभात’मध्ये काम करण्यासाठी पाठवले. ‘प्रभात’मध्ये मिरजेचे ई.महंमद हे छायाचित्रकार म्हणून उमेदवारी करत होते. त्यांनीच रामची प्रभातमध्ये वर्णी लावली. कदम सुरुवातीला गड्याचे काम करीत, पण वादक म्हणून त्यांची लवकरच बढती झाली. प्रभातमध्ये केशवराव भोळे व मा. कृष्णराव अशा दिग्गज संगीतकारांच्या हाताखाली त्यांना शिकायला मिळाले. शिवाय नवयुग व शालिमार स्टुडियोत ते क्लॅरियोनेट वाजवायला जात. तिथे अनेक संगीतकारांच्या हाताखाली काम करण्याचा अनुभव त्यांना मिळाला. त्यातून त्यांच्यामधला संगीतकार तयार होत गेला. सुधीर फडके व वसंत पवार यांचे साहाय्यक म्हणूनही त्यांनी काम केले.

१९५१ साली ‘गावगुंड’ या चित्रपटापासून कदम यांची कारकिर्द सुरू झाली. १९६५ पर्यंत – म्हणजे सुमारे पंचवीस चित्रपट होईपर्यंत त्यांना सूर सापडत नव्हता. ‘केला इशारा जाता जाता’ या चित्रपटापासून मात्र त्यांची घोडदौड सुरू झाली. याच सुमारास संगीतकार व लावणीसम्राट वसंत पवार यांचे निधन झाले. मग ‘लावणीचे शिवधनुष्य’ या रामने यशस्वीरीत्या पेलले.

लावणीव्यतिरिक्त मराठी लोकसंगीतातील झगडा, भूपाळी, विराणी, गवळण, भारूड, पोतराज, वासुदेव, नागोबाची – हळदीची गाणी, धनगरगीते, कोळीगीते, मोटेवरची गाणी, गौरी–हादगा–मंगळागौरीची स्त्रीगीते असे सर्व प्रकार त्यांनी मराठी रसिकांना दिले. ‘पिंजरा’ या शांतारामबापूंच्या चित्रपटामुळे कदम यांनी कर्तृत्वाच्या यशाचे शिखर गाठले. ४५ वर्षांच्या सांगीतिक कारकिर्दीत ११३ मराठी, ३ हिंदी, १ तेलगू चित्रपट व २५ नाटके या साऱ्यांतून दिलेल्या लोकसंगीतातून अस्सल मराठी मातीचे संगीत देताना त्यांनी प्रभातमधील अभिजात संगीताचे संस्कार तर जपलेच, शिवाय मराठी लावणीचे लावण्यही खुलवले.

राम कदम हे मराठी लोकसंगीताचे अनभिषिक्त सम्राट होते. सूरसिंगारचे ‘बृहस्पती ॲवॉर्ड’ व ‘स्वामी हरिदास पुरस्कार’, याशिवाय ‘एकटा जीव सदाशिव’ (१९७४), ‘सुगंधी कट्टा’ (१९७६), ‘पैज’ (१९८०) व ‘साईबाबा’ (१९९५) या चित्रपटांना उत्कृष्ट संगीताचे राज्य शासनाचे

पुरस्कार मिळाले होते. 'संगीतकार राम कदम' हे मधू पोतदार लिखित चरित्र प्रकाशित झाले आहे. राम कदम यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या नावाने संगीतातील मान्यवर व्यक्तींना दर वर्षी दोन पुरस्कार दिले जातात.

– मधू पोतदार

**संदर्भ** : १) पोतदार मधू, 'संगीतकार राम कदम', प्रतीक प्रकाशन, पुणे; २०१०.

## कांबीकर, मधू
**अभिनेत्री**
**२८ जुलै १९५३**



'मधू कांबीकर ही नुसतीच उत्तम नर्तिका नाही, तर उत्तम अभिनेत्री आहे' असा उल्लेख श्रीराम लागू यांच्या 'लमाण' या आत्मकथनात आढळतो. अभिनयाच्या जोरावर श्रीराम लागूंसारख्या ज्येष्ठ अभिनेत्याकडून कौतुकाची थाप मिळवलेल्या मधू कांबीकर उर्फ मधू वामन जाधव यांचा जन्म बीड जिल्ह्यातील गेवराई तालुक्यातील मालेगाव येथे झाला. तेथेच त्यांनी तिसरीपर्यंतचे शिक्षण घेतले व त्या पुढचे सातवीपर्यंतचे शिक्षण कांबी या गावी पूर्ण केले. वयाच्या ११ व्या वर्षी त्यांनी पुण्याच्या बाळासाहेब गोखले यांच्याकडे कथ्थक नृत्याचे शिक्षण घेतले, तर वयाच्या १३-१४ व्या वर्षी मधू कांबीकर यांनी गुरू पांडुरंग घोटीकर व लावणीसम्राज्ञी लक्ष्मीबाई कोल्हापूरकर यांच्याकडे लावणी नृत्याचे धडे घेतले. येथूनच मधू कांबीकर यांचा लोककलेचा प्रवास खऱ्या अर्थाने सुरू झाला.

एकीकडे लोककलाकार म्हणून नाव गाजत असतानाच दुसरीकडे लोककलाकार म्हणूनच त्यांना समाजाच्या अवहेलनेचा विषय व्हावे लागत होते, पण त्यानेही खचून न जाता मधू कांबीकर यांनी चित्रपटसृष्टीत कोणाच्याही मदतीशिवाय केलेला प्रवेश त्यांच्या धडपड्या वृत्तीचा निदर्शक असल्याचे लक्षात येते. चित्रपटात प्रवेश करण्यापूर्वी त्यांना प्रभाकर पणशीकर यांनी 'पुत्रकामेष्टी' (१९८०) या अनिल बर्वेलिखित नाटकात काम करण्यासाठी बोलावले. येथेही त्यांना लोककलावंत म्हणून हिणवले गेले, पण या काळात मोठ्या हिमतीने त्यांच्या मागे वडीलकीच्या नात्याने उभे राहिले ते प्रभाकर पणशीकर. त्यांच्या सहकार्याने व आपुलकीने भारावलेल्या मधूबाईंनी या नाटकात केलेला अभिनय उत्कृष्ट ठरला व त्या वर्षीचा 'नाट्यदर्पण'चा 'विशेष लक्षवेधी अभिनेत्री'चा पुरस्कार त्यांनी पटकावला. त्यानंतर मधू कांबीकर यांनी 'पेईंग गेस्ट', 'चंद्र जिथे उगवत नाही', 'आकाश पेलताना', 'फुलवंती' इत्यादी १९ नाटकांमधून काम केलेले आहे.

याच दरम्यान त्यांनी 'सतीची पुण्याई', 'दगा', 'लक्ष्मी' यांसारख्या चित्रपटांमध्ये छोट्या-छोट्या भूमिका केल्या आहेत. पण त्यांना चित्रपटसृष्टीत नावलौकिक प्राप्त झाला तो 'शापित'मुळे (१९८२). ग्रामीण राहणीमान, ग्रामीण हेलातील बोलणे व चालण्या-बोलण्यात ग्रामीण ढंग यांमुळे ३६-३७ मुलींमधून मधूबाईंची निवड झाली, हे विशेष. स्नेहलता दसनूरकर यांच्या 'वज्रदीप' या कादंबरीवर आधारलेल्या 'शापित' या चित्रपटाची पटकथा ग.रा. कामत यांनी लिहिली होती. यात 'बिजली' नावाच्या ग्रामीण, खेडवळ व वेठबिगार असलेल्या पुरुषाच्या पत्नीची भूमिका मधू कांबीकरांना वठवायची होती. स्वत:चे बालपण खेड्यात गेलेले असल्यामुळे त्यांना ही भूमिका सहज करता आली असती. पण तरीही या भूमिकेला न्याय देण्यासाठी त्यांनी पुन्हा एकदा खेड्यात जाऊन ग्रामीण स्त्रीच्या देहबोलीचा अभ्यास केला व त्या जाणिवा भूमिकेशी पडताळून पाहून मगच अभिनय केला. या चित्रपटातील 'बिजली' ही व्यक्तिरेखा सुंदर नवविवाहित स्त्री म्हणून चित्रपटाच्या सुरुवातीला समोर येते व चित्रपटाच्या शेवटी ती कणखर, आलेल्या अनुभवांनी आपले जीवन सक्षमपणे जगणारी एक बलवान स्त्री होते. सुंदर रूप व गरिबी यांच्यामुळे तिच्या

आयुष्याचा झालेला विचका शोकमय आहे. या शोकमय जीवनाचा आलेख, अक्षमतेपासून सक्षमतेपर्यंतचा बिजली या व्यक्तिरेखेचा प्रवास मधू कांबीकर यांनी आपल्या अभिनयातून ताकदीने उभा केला. खेडवळ स्त्रीची बसण्या-उठण्याची, बोलण्या-हसण्याची, तिच्या व्यक्तिगत व सामाजिक संघर्षाची, मुलाप्रती असणाऱ्या तिच्या ममत्वाची, आपल्या स्त्रीअस्मितेचा अपमान झाला, त्याला नवरा जबाबदार असल्यामुळे त्यांच्यावर आयुष्यभर असणाऱ्या रोषाची निरनिराळी रूपे मधू कांबीकरांनी आपल्या अभिनयाने संपन्न केली. त्यांच्या या अभिनयासाठी त्यांना १९८३ सालची सर्वोत्कृष्ट अभिनेत्री म्हणून राज्य शासनाने गौरवले, तसेच फिल्मफेअर हा मानाचा पुरस्कारही लाभला. अभिनयाची कारकिर्द सुरू झाल्याझाल्या मानाचे पुरस्कार मधू कांबीकरांना लाभले, यातूनच त्यांची अभिनयक्षमता ध्यानात येते. ही अभिनयक्षमता राजदत्त यांच्यासारख्या दिग्दर्शकाने हेरली व त्यांचे चीज केले, हेही वाखाणण्यासारखे आहे. तेव्हाच मधू कांबीकर यांनी राजदत्त यांना आपले गुरू मानले, ते कायमचे.

यानंतरचा त्यांचा चित्रपट म्हणजे ‘राघू मैना’



‘शापित’ या चित्रपटात मधु कांबीकर

(१९८२). वसंत सबनीसलिखित ही पटकथा लोककलेत काम करणाऱ्या कलावंताची दुर्दशा दाखवणारी आहे. यात त्यांच्यासोबत निळू फुले, अशोक सराफ व नाना पाटेकर यांच्यासारख्या दिग्गज कलाकारांनी कामे केली होती. राजदत्त यांनी दिग्दर्शित केलेल्या या चित्रपटातील अभिनयासाठी राज्य शासनाच्या सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीच्या पुरस्कारासाठी मधू कांबीकर यांचे नामांकन झाले होते.

या दोन चित्रपटांच्या यशस्वी कारकिर्दीनंतर मधूबाईंना एक ते दीड वर्ष कामे मिळाली नाहीत, पण १९८४ साली त्यांना 'हेच माझे माहेर' नावाचा चित्रपट मिळाला. यातील मामा-मामींनी सांभाळ केलेल्या अनाथ 'शकू'ची भूमिका त्यांनी केली. आयुष्यभर दुःख पाहिलेल्या अनाथ मुलीचा लग्नानंतरही सासरी छळ होतो, एका मुलाच्या जन्मानंतर नवऱ्याचा मृत्यू होतो व तिचे आयुष्य आणखी वैराण होते, पण मुलाला सांभाळण्याची जबाबदारी समर्थपणे ती पेलते व आपल्या मुलाला मोठे करते. अनाथ मुलगी ते कर्तव्यदक्ष माता असा 'शकू' या व्यक्तिरेखेचा बहुआयामी प्रवास त्यांनी आपल्या अभिनयातून समर्थपणे साकारल्यामुळेच या भूमिकेसाठी त्यांना १९८५ चा महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार लाभला.

मधू कांबीकर यांचा पुढील टप्प्यातील महत्त्वाचा चित्रपट म्हणजे 'एक होता विदूषक'. पुलंची पटकथा, ना.धों. महानोर यांच्या लावण्या, लक्ष्मीबाई कोल्हापूरकर यांचे नृत्यदिग्दर्शन, डॉ. जब्बार पटेल यांचे दिग्दर्शन व लक्ष्मीकांत बेर्डे यांची भूमिका. यातला मधू कांबीकर यांचा अभिनय कलावंत आईचा संघर्ष मांडणारा आहे. हा संघर्ष वयात आलेल्या आपल्या मुलाबरोबर तमाशाच्या फडात काम करताना आपल्या वयाचे भान ठेवण्याचे तारतम्य व त्याच वेळेस आपल्या कलेला न्याय देण्याचा ध्यास, असा दुहेरी पातळीवरचा आहे. आपल्या कलेवर निरतिशय प्रेम असणारी ही कलावंत स्त्री आपल्या मुलावर कलेइतकेच निर्व्याज प्रेम करते. हा दोन टोकातला संघर्ष या बाणेदार व स्वाभिमानी स्त्रीला सतत अस्वस्थ करत राहतो, ते अस्वस्थपण त्यांनी आपल्या अभिनयातून प्रत्ययकारी पद्धतीने मांडले आहे. याचे मूळ आपल्याला त्यांच्या 'मधुरंग' आत्मकथनातील काही भागांमध्ये पाहायला मिळते. त्यांच्या वास्तव अभिनय कारकिर्दीमधील ठसठसते दुःख प्रेक्षकांना 'एक होता विदूषक' या चित्रपटाच्या माध्यमातून, त्यातल्या त्यांच्या अस्सल अभिनयातून पाहायला मिळते. त्यामुळेच एका आईचे अस्वस्थपण या भूमिकेच्या माध्यमातून त्या नेटकेपणाने, सहजपणाने व वास्तवरीत्या मांडू शकल्या असे वाटते. या चित्रपटाची निवड इंडियन पॅनोरमात झाली होती, तसेच राज्य शासनाच्या सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीच्या पुरस्कारासाठीही मधूबाईंचे नामांकन झाले होते.

यशाच्या शिखरावर पोहोचलेल्या मधू कांबीकर यांनी त्यानंतर 'रावसाहेब' या चित्रपटात काम केले व त्यातील अभिनयासाठीही त्यांना १९९६ सालचा राज्य शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार मिळाला. १९९९ साली त्यांनी 'साद' नावाचा गुजराथी चित्रपटात काम केले. त्यातील त्यांच्या संवादरहित आंगिक अभिनयासाठी त्यांना गुजराथ राज्य शासनाचे सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचे पारितोषिक मिळाले. २००१ व २००२ साली प्रदर्शित झालेल्या 'आई कुलस्वामिनी तुळजाभवानी' व 'संघर्ष जीवनाचा' या चित्रपटातील भूमिकांसाठीही त्यांना राज्य शासनाचे सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचे पुरस्कार लाभलेले आहेत, तर २००५ व २००६ साली आलेल्या 'राजा पंढरीचा' व 'सवाल माझ्या प्रेमाचा', 'संत गाडगे महाराज', 'ती' या चित्रपटांसाठी नामांकन झाले होते. त्यांनी दादा कोंडके यांच्या बरोबर काम केलेल्या 'ह्योच नवरा पायजे', 'मला घेऊन चला', 'येऊ का घरात' या चित्रपटांनाही यश मिळाले. याशिवाय त्यांचे 'बिनकामाचा नवरा', 'मुंबईचा डबेवाला', 'रणरागिनी', 'दुसऱ्या जगातली', 'पैज लग्नाची', 'अशी असावी सासू', 'झपाटलेला' आदी चित्रपटही प्रेक्षकांच्या लक्षात राहिले आहेत. त्यांनी 'होळी रे होळी', 'सर्जा राजा', 'वैभव', 'संत गाडगे महाराज', 'श्रावणधारा', 'मुक्ती' यांसारख्या दूरदर्शन मालिकांमध्येही काम केलेले आहे.

तसेच त्यांनी 'मधुप्रीतम' (१९९६) नावाची संस्था स्थापन करून त्याद्वारे अभिजात पारंपरिक लावणी या लोककलेचे जतन व संवर्धन करणारा 'सखी माझी लावणी' हा कार्यक्रम सातत्याने सादर केला. या माध्यमातून पेशवेकालीन पारंपरिक लावणी व तिचा इतिहास रेखाटण्याचे मधू कांबीकर यांचे काम उल्लेखनीय आहे. तसेच नृत्यासाठी राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त केलेल्या लावणीसम्राज्ञी लक्ष्मीबाई कोल्हापूरकर यांच्या नावे 'लक्ष्मीबाई कोल्हापूरकर प्रतिष्ठान'ची स्थापना ही त्यांच्या लोककलेशी असणाऱ्या इमानाची ग्वाही देणारी आहे. त्यांनी 'ओमप्रीतम' नावाची आपली निर्मिती संस्था स्थापन करून 'काटा रुते कुणाला' नावाच्या टेलिफिल्मची निर्मितीही केली होती.

लोकनाट्य-नाटक-दूरदर्शन मालिका-चित्रपट असा चौफेर प्रवास करणाऱ्या मधू कांबीकर यांनी आपल्या बहुआयामी अभिनयकौशल्याने मराठी चित्रपटसृष्टीत स्वत:चे ठाम, निश्चित व आवर्जून दखल घेतले जाणारे स्थान निर्माण केलेले आहे.

– डॉ. अर्चना कुडतरकर

**संदर्भ** : १) कांबीकर मधू, 'मधुरंग', संस्कृती प्रकाशन, पुणे; २०१२. २) प्रत्यक्ष मुलाखत.

## कापडी, मुरलीधर

**दिग्दर्शक**

**जन्मदिनांक अनुपलब्ध – १२ ऑक्टोबर २००६**



मुरलीधर कापडी यांनी अमेरिकेत चित्रपट प्रशिक्षण घेऊन आलेल्या कुमारसेन समर्थ यांच्याकडे प्रथम उमेदवारी करायला प्रारंभ केला. ते वर्ष होते १९५४. त्यानंतर राजा ठाकूर यांच्याकडे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून काम केल्यावर त्यांना स्वतंत्र दिग्दर्शनाची संधी खूप उशिरा, म्हणजे १९७७ साली मिळाली. चित्रपट होता 'अशी ही साताऱ्याची तऱ्हा'.

त्यानंतर 'नाव मोठं लक्षण खोटं' (१९७७), 'चोरावर मोर' (१९८०), 'कडकलक्ष्मी' (१९८०), 'भुजंग' (१९८२), 'सावित्री' (१९८३), 'बिनकामाचा नवरा' (१९८४), 'सगेसोयरे' (१९८५), 'किस बाई किस' (१९८८), इ. चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केले. मराठी चित्रपटांसमवेत मुरलीधर कापडी यांनी हिंदी चित्रपटाचेही दिग्दर्शन केलेले आहे. 'आओ जाओ घर तुम्हारा' (१९८४) या हिंदी चित्रपटाचे दिग्दर्शन त्यांनी यशस्वीपणे केलेले आहे.

– सुधीर नांदगांवकर

## कामत, गजानन रामचंद्र

**पटकथालेखक**

**१२ मार्च १९२३**



मुंबईजवळील पूर्वीच्या कुलाबा जिल्ह्यातील अलिबागजवळील चरी या गावात गजानन रामचंद्र कामत यांचा जन्म झाला. घरचा शेतीचा व्यवसाय असल्यामुळे चित्रपट, नाटक अशी कलेची कोणतीही पार्श्वभूमी त्यांना नव्हती. गजानन दोन वर्षांचे असतानाच आई सीताबाई यांचे निधन झाले. त्यामुळे वडील रामचंद्र यांच्यावरच मुलांना सांभाळण्याची जबाबदारी पडली. गजानन यांच्या वडिलांनी दुसरे लग्न केल्यावर सावत्र आईने आपल्या दोन मुलांबरोबर त्यांचाही सांभाळ केला. गजानन कामत यांनी इयत्ता सातवीपर्यंतचे शिक्षण अलिबागच्या शाळेत घेतले आणि ते पुढे शिकण्यासाठी मुंबईत दाखल झाले. मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी रुईया महाविद्यालयात प्रवेश घेतला. रुईयामध्ये त्यांना न.र. फाटक, सोनोपंत दांडेकर या महनीय प्राध्यापकांचे मार्गदर्शन लाभले. मं.वि. राजाध्यक्ष, श्री.पु. भागवत, राम पटवर्धन यांच्यासारख्या साहित्यिक मित्रांच्या

संगतीत गजानन कामत यांची साहित्यप्रतिभा बहरू लागली. त्या काळात मौज, सत्यकथा ही नियतकालिके प्रसिद्ध होती. श्री.पु. भागवतांनी त्यांना या नियतकालिकांचे सहसंपादक (१९४५) केले. नीळकंठ खाडिलकर यांच्या नवाकाळमध्येही ते काही काळ होते. त्यातच एकदा ग.दि. माडगूळकरांनी ग.रा. कामत यांना मराठी चित्रपटासाठी एखादे कथाबीज सुचवा म्हणून सांगितले. त्यातूनच 'पेडगावचे शहाणे'चा जन्म झाला. 'पेडगावचे शहाणे'ची कथा, पटकथा ग.रा. कामत यांची पहिलीच कलाकृती. त्यानंतर 'कन्यादान', 'घरचं झालं थोडं', 'लाखाची गोष्ट' इत्यादी चित्रपटांनंतर त्यांनी मराठीतील 'शापित' हा ट्रायका फिल्मचा चित्रपट शेवटचा केला. 'लाखाची गोष्ट'च्या काळात रेखा या चित्रपट अभिनेत्रीशी त्यांनी १९५३ साली विवाह केला.

१९५३ ते १९६६ या काळात कामत यांनी मराठी चित्रपटांसाठी कथा, पटकथा, संवाद लिहिले. त्यासाठी त्यांचा मुक्काम त्यांनी मुंबईहून पुण्यात हलवला. १९६६ नंतर कामत यांनी मराठीसाठी आपली लेखणी काही काळ बंद केली आणि हिंदी चित्रपटांसाठी सुरू केली. त्या काळात मुंबईत हिंदी चित्रपटसृष्टीदेखील जोरात होती. दर्जेदार, आशयघन, समस्याप्रधान चित्रपटांची निर्मिती येथील सर्जनशील निर्माते, दिग्दर्शक यांच्याकडून होत होती. ग.रा. कामत यांना हे वातावरण खुणावत होतेच. राज खोसला या त्या काळातील दर्जेदार चित्रपटांसाठी प्रसिद्ध असलेल्या निर्माता, दिग्दर्शकाचे लक्ष कामतांनी वेधून घेतले. राज खोसला यांनी 'अनिता' या गाजलेल्या चित्रपटाची कथा, पटकथा कामतांकडून लिहून घेतली. 'अनिता'च्या यशानंतर कामत यांनी खोसला यांचा विश्वास संपादन केला. 'अनिता'चे खरे आव्हान ग.रा. कामतांसाठी होते. कारण कामत मराठी चित्रपट करत होते आणि हिंदी भाषा त्यांना नवखी नसली, तरी हिंदीचा बाज आणि लहेजा आत्मसात करणेही महत्त्वाचे होते. त्यावर तोडगा म्हणून कामत मराठीतून पटकथा लिहीत आणि त्याचा तजुर्मा हिंदीमध्ये होत असे. 'अनिता' सर्वच दृष्टीने लोकप्रिय ठरला आणि ग.रा. कामत या नवख्या पटकथाकारांकडे हिंदी चित्रपटसृष्टीचे लक्ष वेधले गेले. 'बंबई का बाबू', 'दो चोर', 'मेरा गाँव मेरा देश', 'कच्चे धागे', 'काला पानी', 'पुकार', 'इम्तेहान', 'मै तुलसी तेरे आँगन की', 'बसेरा' अशा एकाहून एक सरस अशा पन्नासेक चित्रपटांच्या कथा, पटकथा आणि काही वेळा संवादलेखन आणि दिग्दर्शन साहाय्यही केले आहे. यातील वर उल्लेखिलेल्या चित्रपटांनी रजत व सुवर्ण जयंती साजऱ्या केलेल्या आहेत.

कथा, पटकथाकार म्हणून ग.रा. कामत यांना चार वेळा फिल्मफेअर पुरस्काराने त्याचप्रमाणे राष्ट्रीय पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहे.

– संदीप राऊत

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## काळे, आशा रामकृष्ण
**अभिनेत्री**
**२३ नोव्हेंबर १९४९**



सोज्ज्वळ चेहऱ्यामुळे प्रामुख्याने कौटुंबिक आणि स्त्रीप्रधान भूमिका साकारणाऱ्या अभिनेत्री म्हणून आशा काळे परिचित आहेत. चित्रपट आणि रंगभूमी ही दोन्ही माध्यमे त्यांनी समर्थपणे हाताळली आणि दोन्ही कलाप्रांतात स्वत:ची खास ओळख निर्माण केली. या साऱ्या कलाप्रवासात त्यांनी काही निराळ्या भूमिकाही लक्षवेधी केल्या.

आशा रामकृष्ण काळे यांचा जन्म कोल्हापूरजवळच्या गडहिंग्लज परिसरात झाला. त्यांच्या मातोश्रींचे नाव विमल, तर वडिलांचे नाव रामकृष्ण दत्तात्रेय काळे असे होते. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण कोल्हापूर व पुणे या ठिकाणी झाले. पुढे अभिनयाच्या ओढीने त्या नाट्यसृष्टीकडे वळल्या, म्हणून त्यांना महाविद्यालयीन शिक्षण घेता आले नाही. अगदी लहानपणापासून

आशाताईंचा नृत्याकडे ओढा होता. त्या काळातील प्रसिद्ध नृत्यगुरू बाळासाहेब गोखले यांच्याकडे त्या रीतसर नृत्य शिकल्या आहेत. कथ्थक आणि भरतनाट्यम नृत्याचे स्वतंत्र कार्यक्रम सादर करण्याइतपत त्यांचे नृत्याचे शिक्षण झाले आहे. आशाताईंच्या आठवणीनुसार या नृत्यकलेनेच त्यांना रंगभूमीवर पहिली संधी मिळवून दिली. 'शिवसंभव' या नाटकात त्यांनी नृत्य सादर करून दाद मिळवली होती. चित्रतपस्वी भालजी पेंढारकर यांच्या पाहण्यात ते नाटक आले आणि त्यांनी आशाताईंना 'तांबडी माती' (१९६९) या स्वत:च्या चित्रपटात सर्वप्रथम नायिकेची भूमिका दिली.

पदार्पणाच्या चित्रपटातच आशाताईंनी अन्य निर्मात्यांचे व दिग्दर्शकांचे लक्ष वेधून घेतले. दरम्यान अनेक नाटकांतून मराठी रंगभूमीवरही आशा काळे हे नाव रसिकांच्या परिचयाचे झाले होते. नाटककार बाळ कोल्हटकर यांचे 'सीमेवरून परत जा' हे नायिका म्हणून आशा काळे यांचे पहिले नाटक. त्यानंतर 'महाराणी पद्मिनी', 'बेइमान', 'विषवृक्षाची छाया', 'वाहतो ही दुर्वांची जुडी', 'गुंतता हृदय हे' अशा गाजलेल्या अनेक नाटकांतून त्यांनी प्रमुख भूमिका साकारल्या.



'हा खेळ सावल्यांचा' या चित्रपटात आशा काळे

एका नृत्यांगनेच्या रूपाने रंगभूमीवर त्यांचे पदार्पण झाले, तेव्हा त्यांनी ठुमरीवर नृत्य पेश केले होते. नंतरच्या काळात त्यांनी विविध चित्रपटांतूनही प्रसंगामध्ये नृत्य केले. पण चित्रपटातील त्यांची ओळख मात्र कौटुंबिक, सोज्ज्वळ, सोशिक नायिकेचीच राहिली. तुळशीवृंदावनाभोवती फेऱ्या मारणारी, वडाची पूजा करणारी, सासूचा छळ सोसणारी, काबाडकष्ट उपसणारी सून त्यांनी बहुतेक चित्रपटांतून उभी केली. अर्थात त्या काळात अशाच चित्रपटांचा प्रवाह होता. खास आशाताईंसाठी सोशिक सुनेच्या आणि खाष्ट सासूच्या, छळवादी आणि ढालगज नणंदेच्या भूमिका, प्रसंग लिहिले जात असत. ते प्रसंग व त्या भूमिका प्रेक्षकांपर्यंत समर्थपणे पोहोचवण्याचे काम आशा काळे यांनी आपल्या समृद्ध अभिनयाद्वारे केले.

'सतीचं वाण' (१९६९), 'चुडा तुझा सावित्रीचा' (१९७१), 'बाळा गाऊ कशी अंगाई' (१९७७), 'सासुरवाशीण' (१९७८), 'सतीची पुण्याई' (१९८०), 'थोरली जाऊ' (१९८३), 'कुलस्वामिनी अंबाबाई' (१९८४), 'अर्धांगी' (१९८५), 'पुत्रवती' (१९९६) हे त्यांचे सर्व गाजलेले आणि व्यावसायिकदृष्ट्याही यशस्वी ठरलेले चित्रपट, त्यांची हीच प्रतिमा अधोरेखित करणारे होते. सोशिकतेची मूर्ती या त्यांच्या प्रतिमेला संपूर्ण छेद देणारी वेगळी आणि आव्हानात्मक भूमिका त्यांना दिग्दर्शक वसंत जोगळेकर यांनी 'हा खेळ सावल्यांचा' (१९७६) या चित्रपटातून दिली. एरवी अंगभर नऊवारी साडीत वावरणाऱ्या सोज्ज्वळ आशाताई या चित्रपटातून एकदम शर्ट, पँट, टी-शर्ट अशा (त्या काळात) आधुनिक समजल्या जाणाऱ्या पोशाखात प्रेक्षकांसमोर आल्या, तेव्हा त्यांचा चाहता वर्गही दचकला होता. पण ही वेगळी भूमिकाही त्यांनी समरसून केली आणि त्यासाठी पुरस्कारही मिळवला. 'गहिरे रंग' या नाटकातही त्यांनी अशीच निराळी भूमिका केली होती. या नाटकात त्या स्कर्टमध्ये वावरल्या होत्या. त्यांच्या या सोज्ज्वळ प्रतिमेमुळे त्यांचे अनेक चित्रपट लोकप्रिय ठरले. सुमारे पन्नास चित्रपटांत त्यांनी भूमिका केल्या.

रंगभूमीवरही त्यांनी हजारो प्रयोग केले. त्यापैकी 'वाहतो ही दुर्वांची जुडी' या नाटकाचे आशाताईंनी तब्बल ९०० प्रयोग केले आहेत. 'गुंतता हृदय हे' या नाटकात त्यांच्यासोबत नायकाच्या भूमिकेत डॉ. काशिनाथ घाणेकर होते. हे नाटक खूप गाजले. याशिवाय आशाताईंनी 'हसत हसत फसवुनी' या नाटकात चक्क विनोदी भूमिका केली होती. हे आशाताईंचे स्वत:चे आवडते नाटक आहे.

अनेक पुरस्कारांच्या रूपाने आशाताईंच्या चित्रपटातील व रंगभूमीवरील कर्तृत्वाचा सन्मान करण्यात आला आहे. 'नाट्यव्रती पुरस्कार', व्ही. शांताराम फाऊंडेशनचा 'जीवनगौरव पुरस्कार', 'शांता आपटे सुवर्णपदक' ही काही ठळक नावे घेता येतील.

– जयश्री बोकील

## काळे, केशव नारायण

*के. नारायण काळे*

**पटकथा, संवाद व गीतलेखक, अभिनेता**

**२४ एप्रिल १९०४ – २० फेब्रुवारी १९७४**

☞ **मुख्य नोंद – साहित्य खंड**



केशव नारायण काळे हे 'के नारायण काळे' या नावाने साहित्य जगतात, नाटकात आणि चित्रपटात वावरत असत. काळे त्या काळचे बी.ए., एलएल.बी. होते. पण त्यांना रस होता तो साहित्य आणि रंगभूमी या क्षेत्रांत. इम्पिरियल कंपनीने १९२८ साली जगद्गुरू शंकराचार्य अर्थात 'द वर्ल्ड टीचर' हा मूकपट काढण्याचे ठरवले आणि पार्श्वनाथ आळतेकर यांच्यावर त्याच्या दिग्दर्शनाची जबाबदारी सोपवली. आळतेकरांनी मामा वरेरकर यांच्याकडून चित्रपटाची पटकथा लिहून घेतली आणि शंकराचार्यांच्या भूमिकेसाठी के. नारायण काळे यांची निवड केली. काळे यांनी अभिनय केलेला हा पहिलाच

चित्रपट होय. त्यानंतर काळे यांनी १९३० सालामध्ये ‘हूज फॉल्ट’ या आणि १९३१ मध्ये एक-दोन मूकपटातून काम करून ‘रत्नाकर’ या उत्कृष्ट मासिकाचे संपादकपद स्वीकारले. काळे हे ‘नाट्यमन्वंतर’ या नाटक संस्थेमध्ये हिरिरीने भाग घेत. नाट्यमन्वंतरमध्ये के. नारायण काळे, पार्श्वनाथ आळतेकर, केशवराव भोळे, ज्योत्स्ना भोळे, केशवराव दाते आणि वर्तक यांसारखी मंडळी काम करत. ‘आंधळ्यांची शाळा’ हे काळे यांचे नाटक खूपच गाजले होते. ते पाहून शांतारामबापूंनी के. नारायण काळे यांना प्रभातमध्ये येण्याचे निमंत्रण दिले. त्या वेळेस प्रभातमध्ये ‘अमृतमंथन’ या चित्रपटाची निर्मिती चालली होती. ‘अमृतमंथन’चे गीत-संवादलेखन काळे यांनी केले. पुरोगामी लेखक म्हणून काळे प्रसिद्ध होते. त्यांनी शांतारामबापूंना ‘संत एकनाथ’ यांच्या जीवनावर चित्रपट करण्यास सांगितले. कारण एकनाथांनी आपल्या काळी हरिजनोद्धाराची क्रांतिकारक सुधारणा प्रत्यक्ष कृतीने अमलात आणली. त्यांच्या या चरित्रविशेषांवर काळे यांनी भर दिला होता. त्यांनी ‘धर्मात्मा’ या चित्रपटाचे संवादलेखन, पटकथालेखन पार पाडले आणि चित्रपटातून एकनाथांच्या मुलाचे कामही केले. काळे यांनी प्रभातसाठी ‘अमरज्योती’ नावाची एक कल्पनारम्य कथा लिहिली. हा चित्रपट फक्त हिंदी भाषेत होता व त्यात दुर्गा खोटे, शांता आपटे, वासंती आणि चंद्रमोहन यांच्याबरोबर काळे यांनीही भूमिका निभावली होती.

शांतारामबापूंनी काळे यांना स्वतंत्र दिग्दर्शनाची संधी दिली, तो चित्रपट होता ‘वहाँ’. या चित्रपटामध्ये आर्य आणि अनार्य यांच्यातील संघर्ष दाखवण्यात आला होता. प्रभातने काळे यांना दिग्दर्शनासाठी ‘माझा मुलगा’ हा पुढला चित्रपट दिला. या चित्रपटानंतर काळे प्रभातमधून बाहेर पडले. त्याबरोबर नवयुग पिक्चर्सने त्यांना ‘लपंडाव’ हा आपला चित्रपट दिला. ‘लपंडाव’मध्ये मा. विनायक, मीनाक्षी, वनमाला आणि बाबूराव पेंढारकर यांसारखे दिग्गज कलाकार होते. काळे यांनी स्वत:ची चित्रपट कंपनी स्थापन करून ‘म्युन्सिपालटी’ हा चित्रपट निर्माण केला. त्याचे दिग्दर्शन मात्र बाबूराव आपटे यांच्याकडे सोपवले होते. त्यानंतर काळे यांनी अत्र्यांचा ‘बाईलवेडा’ हा चित्रपट दिग्दर्शित करून दहा वर्षांची दीर्घ विश्रांती घेतली. १९५३ साली त्यांनी पुलंचा ‘अंमलदार’ आणि सदाशिवराव कवी यांचा ‘दीदी’ हा हिंदी चित्रपट दिग्दर्शित करून चित्रपट जगताचा संन्यास घेतला.

– संपादित

## किणीकर, रघुनाथ रामचंद्र

*रॉय किणीकर*

**लेखक, निर्माते**

**१९०७ – ५ सप्टेंबर १९७८**

**☞ मुख्य नोंद – साहित्य खंड**



रामचंद्र रघुनाथ किणीकर यांनी नवयुग चित्रपट लि. या कंपनीत ‘बिल्वमंगल’, ‘मोती पन्ना’, ‘भक्त पुंडलिक’ या चित्रपटांच्या कथा, पटकथा, संवाद व काही गाणीही लिहिली. नंतर त्यांनी ‘धन्यवाद’, ‘ललत’ या चित्रपटांचे लेखनही केले. ‘ललत’ हा एक तासाचा प्रायोगिक लघुपट होता. निर्माते होते पु.रा. भिडे. याशिवाय रॉय किणीकर यांनी ‘ताई तेलीण’, ‘शिर्डीचे श्री साईबाबा’ आणि ‘झाला महार पंढरीनाथ’ या चित्रपटांच्या कथा, पटकथा व संवाद लिहिले. ‘शिर्डीचे श्री साईबाबा’ या चित्रपटाचे ते निर्मातेही होते. १९५२-५४ या कालावधीत चित्रपट करताना अनेक आर्थिक, सामाजिक अडचणी आल्या. किणीकरांनी काही मित्रांच्या मदतीने व स्वतःच्या पैशांनी चित्रपटाची निर्मिती करायला सुरुवात केली. चित्रपट लांबत गेल्यामुळे सर्व मित्र भांडवलासहित बाजूला गेले, पण त्याही परिस्थितीत न डगमगता सर्व जबाबदारी घेऊन किणीकरांनी चित्रपट पूर्ण केला. चित्रपटाला १९५४

सालचा पहिल्या वर्षाचा राष्ट्रपती प्रशस्तीपत्रकाचा दुसरा पुरस्कार मिळाला. यानंतरच्या वर्षापासून राष्ट्रपतीपदक दिले जाऊ लागले. त्यांनी अनेक लघुपटांचे लेखन केले.

– अनिल किणीकर

## किरण शांताराम

*वणकुद्रे, किरण शांताराम*

**दिग्दर्शक, निर्माते**

**२६ जून १९४३**



भारतीय चित्रपटाचे श्रेष्ठ दिग्दर्शक व्ही. शांताराम हे किरण यांचे पिताश्री. १९५९ साली एस.एस्सी. झाल्यावर किरण यांनी व्ही. शांताराम यांच्या मार्गदर्शनाखाली चित्रपटक्षेत्रातली उमेदवारी सुरू केली. लवकरच ते दिग्दर्शन विभागात शांतारामबापूंचे पाचवे साहाय्यक म्हणून काय करू लागले. ते १९७५ साली साहाय्यक दिग्दर्शक झाल्यावर शांतारामबापूंनी त्यांना दिग्दर्शनाची संधी दिली. जगदीश खेबुडकरांची संवाद व गीते आणि राम कदम यांचे संगीत असलेला 'झुंज' हा चित्रपट प्रदर्शित झाला. पण त्यानंतर किरण पुन्हा दिग्दर्शनाकडे वळले नाहीत. त्यांनी १९८८ साली व्ही. शांताराम प्रॉडक्शनच्या युवा विभागासाठी 'अशी ही बनवाबनवी' हा सचिन दिग्दर्शित विनोदी चित्रपट निर्माण केला. तो कमालीचा यशस्वी झाला. नंतर १९८९ साली गिरीश घाणेकरांना दिग्दर्शनासाठी घेऊन 'बाळाचे बाप ब्रह्मचारी' चित्रपट निर्माण केला. दरम्यान शांतारामबापूंचे निधन (१९९०) झाले. त्यामुळे त्यांनी उभे केलेले साम्राज्य सांभाळण्याची जबाबदारी किरण यांच्यावर आली. साहाजिकच त्यांना निर्मितीकडे लक्ष देणे जमेना. रेकॉर्डिंग स्टुडिओ, राजकमल स्टुडिओ, व्ही. शांताराम फाऊंडेशन, प्लाझा थिएटर, सिल्व्हर स्क्रीन एक्स्चेंज या सर्व संस्थांचा कार्यभार किरण यांनी समर्थपणे सांभाळला. याच काळात किरण मुंबईतील अग्रगण्य फिल्म सोसायटी 'प्रभात चित्र मंडळ'च्या संपर्कात आले आणि चित्रपट संस्कृतीचा वारसा त्यांच्या लक्षात आला. यातूनच १९९७ साली मुंबई महानगराचा पहिला आंतरराष्ट्रीय महोत्सव भरवण्यात त्यांनी पुढाकार घेतला. त्यासाठी 'मुंबई अकादमी ऑफ मुव्हिंग इमेजिस' हा न्यास स्थापन केला. या संस्थेचे सचिव या नात्याने महोत्सवाची धुरा त्यांनी सांभाळली. नंतर हा महोत्सव रिलायन्सकडे देण्यात आला. महाराष्ट्र शासनाने २००१ साली त्यांची मुंबईचे नगरपाल म्हणून नियुक्ती केली गेली. वर्षभरात त्यांनी उत्तम कामगिरी केल्याने या पदाच्या इतिहासात प्रथमच २००२ मध्ये दुसऱ्या वर्षी त्यांची नियुक्ती करण्यात आली. या काळात मुंबई महानगरासाठी एखादा आंतरराष्ट्रीय कार्यक्रम आयोजित करावा, या उद्देशाने देशातला पहिला 'थर्ड आय आशियाई चित्रपट महोत्सव' सुरू झाला. या महोत्सवाने १० वर्षे पूर्ण केली आहेत.

चित्रपट निर्मितीपेक्षाही चित्रपट संस्कृती प्रसार हे किरण यांचे उद्दिष्ट आहे. त्यासाठी प्रभात चित्र मंडळ, फेडरेशनचा महाराष्ट्र चॅप्टर, एशियन फिल्म फाऊंडेशन इ. संस्थात किरण कार्यरत आहेत.

– सुधीर नांदगांवकर

## कुबल, अलका लाडू

**अभिनेत्री**

**२३ सप्टेंबर १९६५**



मराठी चित्रपटसृष्टीत चित्रपटाने सुवर्णमहोत्सव साजरा करण्याचे क्षण अनेक आले, पण त्याही पलीकडे चित्रपटगृहात वर्षभराहून अधिक काळ गर्दी खेचणारा चित्रपट म्हणजे अलका कुबल यांच्या अभिनयाने सजलेला, विजय कोंडके यांचा 'माहेरची साडी' हा चित्रपट होय. प्रामुख्याने महिला प्रेक्षकांनी हा चित्रपट उचलून धरला

असला, तरी या एकाच चित्रपटाने मराठी चित्रपटसृष्टीत अनेक उच्चांक गाठले. अलका कुबल यांना तारका बनवले, मराठी चित्रपटसृष्टीत कौटुंबिक चित्रपटांचा प्रवाह सुरू केला आणि राज्यभरातील प्रेक्षक चित्रपटगृहांमध्ये आणला.

अलका कुबल जन्मापासून मुंबईकर आहेत. त्यांचे वडील लाडू कृष्णा कुबल टाटा मिलमध्ये तंत्रज्ञ विभागात अधीक्षक म्हणून काम करत होते, तर आई सुमती या महानगरपालिकेच्या शाळेत शिक्षिका होत्या. गोरेगाव येथील महाराष्ट्र विद्यालयातून शालेय शिक्षण पूर्ण केल्यावर त्यांनी पुढील शिक्षणासाठी मुंबईच्या दालमिया महाविद्यालयात प्रवेश घेतला व मानसशास्त्र या विषयात बी.ए.ची पदवी मिळवली. त्यांच्या घरात कलेची परंपरा नव्हती, तरीही सुरुवातीपासून या क्षेत्राकडे त्यांचा ओढा होता. त्यांनी मराठी रंगभूमीवर बालकलाकार म्हणून काम केले. 'नटसम्राट', 'संध्याछाया', 'वेडा वृंदावन' ही त्यांची नाटके गाजली होती. शाळकरी वयात त्यांनी या नाटकांचे सुमारे चारशे प्रयोग केले होते.

१९८१ साली 'चक्र' या चित्रपटाद्वारे अलका कुबल यांचे रुपेरी पडद्यावर पदार्पण झाले. त्यानंतर 'आपलं माणूस' आणि 'वटवट सावित्री' अशी दोन नाटकेही त्यांनी केली. रुपेरी पडद्यावरचे त्यांचे पहिले महोत्सवी चित्र म्हणजे 'लेक चालली सासरला'. हा चित्रपट राज्यभरात यशस्वी ठरला. त्यापाठोपाठ त्यांनी 'तुझ्यावाचून करमेना', 'दुर्गा आली घरा', 'माहेरची साडी', 'माहेरचा आहेर', 'देवकी', 'नवसाचं पोर', 'स्त्रीधन' असे अनेक कौटुंबिक चित्रपट केले.

'स्त्रीधन' आणि 'तुझ्यावाचून करमेना' या चित्रपटातील अलका कुबल यांच्या भूमिका पुरस्कारप्राप्त ठरल्या. 'श्रीमंत दामोदर पंत' यासारख्या चित्रपटातून त्यांनी विनोदी भूमिका स्वीकारून 'कौटुंबिक चित्रपटांची नायिका' या स्वत:च्या प्रतिमेला छेद देण्याचाही प्रयत्न


'माहेरची साडी' या चित्रपटात डावीकडील अलका कुबल

केला आहे. त्यांच्या बहुतांश चित्रपटांना महिला प्रेक्षकांनी अधिक प्रतिसाद दिला आहे. प्रामुख्याने कौटुंबिक आणि स्त्रीप्रधान चित्रपट ही त्यांची खासियत आहे. त्यांनी विविध व्यक्तिरेखांच्या माध्यमातून सोशिक कन्या, आज्ञाधारक सून, आदर्श पत्नी, प्रेमळ माता, वत्सल वहिनी, जाऊ, भावजय अशाच भूमिका पडद्यावर साकारल्या आहेत. अलका कुबल यांचा ग्रामीण भागातील प्रेक्षकवर्ग मोठा आहे.

मराठी चित्रपटांमध्ये वेगवेगळ्या दशकांत सामाजिक, धार्मिक, कौटुंबिक, विनोदी, ग्रामीण, तमाशापट अशा विविध विषयांवर आधारित चित्रपटांच्या लाटा निर्माण झालेल्या दिसतात. त्यामध्ये अलका कुबल यांच्या अभिनयाने प्रामुख्याने कौटुंबिक, सामाजिक चित्रपटांना सुरुवात झाली. प्रामुख्याने माहेरची लाडकी लेक, विवाहानंतर सून, पत्नी, जाऊ, भावजय, वहिनी अशा विविध नात्यांनी बांधलेल्या नायिका साकारण्यात अलका कुबल यांचा हातखंडा मानला जातो.

अभिनयाच्या क्षेत्रात सातत्याने तीस वर्षे कार्यरत असलेल्या अलका कुबल यांनी निर्मितिक्षेत्रातही पदार्पण केले आणि 'सुवासिनीची सत्त्वपरीक्षा', 'नाते मामा-भाचीचे', 'अग्निपरीक्षा' आणि अलीकडे तृतीयपंथीयांच्या समस्येवरील 'आम्ही का तिसरे' या चित्रपटांची निर्मितीही केली आहे. 'युगंधरा', 'अमृतवेल', 'बंदिनी', 'ये रे ये रे पैसा', 'आकाशझेप', 'मंगळसूत्र' या मालिकांत भूमिका केल्या.

सुमारे ३० वर्षांत त्यांनी अडीचशेहून अधिक मराठी चित्रपटांत काम केले आहे आणि आजही करत आहेत.

– जयश्री बोकील

## कुलकर्णी, अतुल सुधीर
**अभिनेता**
**१० सप्टेंबर १९६५**

वैशिष्ट्यपूर्ण भूमिका जिवंत करणारे अभिनेते म्हणून अतुल कुलकर्णी यांच्या नावाला मराठी आणि हिंदी चित्रपटसृष्टीमध्ये एक वलय आहे. भूमिकेचा खोलवर



विचार करून, स्वतःच्या अनुभवाची जोड देत अतुल कुलकर्णी यांनी स्वतःला संवेदनशील अभिनेता म्हणून सिद्ध केले आहे.

अतुल कुलकर्णी यांचा जन्म बेळगावला झाला. सोलापूरच्या हरीभाई देवकरण शाळेमध्ये शिक्षण घेतले. मॅट्रिकच्या परीक्षेनंतर पुढील शिक्षणासाठी कुलकर्णी बेळगावला गेले. तिथे बारावीपर्यंतचे शिक्षण घेतल्यानंतर 'इलेक्ट्रिकल इंजिनिअरिंग'च्या शिक्षणासाठी पुण्याला आले. पण 'इंजिनिअरिंग' न जमल्यामुळे सोलापूरच्या डी.ए.व्ही. महाविद्यालयातून 'इंग्रजी' साहित्यामध्ये पदवी प्राप्त केली. वडिलांना व्यवसायात मदत करताना, एकीकडे शिक्षण घेताना, सोलापूरच्या 'नाट्य आराधना' या हौशी नाट्यसंस्थेशी संपर्क आला आणि डॉ. वामन देगावकरांच्या सहवासात अभिनयातले बारकावे समजत गेले. या नाट्यसंस्थेमध्ये नाटक रंगमंच, कलाकार, कपडेपट, नेपथ्य आणि बॅकस्टेज समजून घेण्याची संधी मिळाली. 'नाटक' या माध्यमाने अतुल कुलकर्णींमधल्या अंतर्मुख स्वभावाच्या कलावंताचे लक्ष वेधून घेतले. त्यांनी पूर्ण वेळ नाटक करण्याचा निर्णय घेतला आणि १९९२ ते १९९५ या कालावधीत 'नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा' या दिल्लीच्या नामांकित संस्थेमधून अभिनयाचे शास्त्रशुद्ध शिक्षण घेतले. याच सुमाराला नाट्याभिनयाची कारकिर्द सुरू झाली. 'उद्ध्वस्त धर्मशाळा', 'चाफा', 'आपण सारेच घोडेगांवकर', 'माणूस नावाचं बेट' या नाटकातून भूमिका केल्या. 'गांधी विरुद्ध गांधी' या नाटकातील भूमिकेसाठी त्यांना सर्वोत्कृष्ट अभिनयाचा पुरस्कार मिळाला.

'भूमीगीता' या १९९७ साली आलेल्या कन्नड चित्रपटापासून चित्रपटक्षेत्रात त्यांचा प्रवेश झाला. २००० साली प्रदर्शित झालेला, कमल हसन दिग्दर्शित 'हे राम' या हिंदी चित्रपटातील 'श्रीराम अभ्यंकर' या


'नटरंग' चित्रपटात अतुल कुलकर्णी

भूमिकेपासूनच खऱ्या अर्थाने चित्रपटसृष्टीमधील त्यांची वाटचाल सुरू झाली. या भूमिकेला पदार्पणातच उत्कृष्ट साहाय्यक अभिनेता म्हणून राष्ट्रीय पारितोषिकाने त्यांना सन्मानित करण्यात आले. त्याच वर्षी 'कैरी' या मराठी चित्रपटातही त्यांनी भूमिका साकारली. त्यांचा हिंदी आणि मराठी भाषेतील चित्रपटांचा दुहेरी प्रवास आजही सुरू आहे. आजपर्यंत सहा भाषांमध्ये त्यांनी परस्परभिन्न व्यक्तिमत्त्वाच्या भूमिका केल्या आहेत.

२००२ साली मधुर भांडारकर दिग्दर्शित 'चांदनी बार' या चित्रपटात गुन्हेगारी जगतातील पण काही अंशी माणूसपण शिल्लक असलेला 'पोत्या सावंत' अतुल कुलकर्णी यांनी सहजसुंदर अभिनयाने साकारला. हिंदी चित्रपटसृष्टीतील अभिनयसंपन्न मराठी चेहरा म्हणून त्यांचे नाव चर्चेत राहिले. या भूमिकेसाठी त्यांना सर्वोत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्याचा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. अभिनयावरची निष्ठा आणि भूमिकांची चोखंदळ निवड यामुळे वेगवेगळ्या व्यक्तिरेखांचे रंग उलगडणाऱ्या भूमिका त्यांना मिळत गेल्या.

राजकुमार संतोषींच्या 'खाकी' या चित्रपटात अमिताभ बच्चन, ऐश्वर्या राय, अजय देवगण, अक्षयकुमार अशा हिंदी चित्रपटातील कलाकारांबरोबरही त्यांच्या अभिनयाची छाप पडली. 'रंग दे बसंती', '88 antop hill', 'सत्ता', 'पेज थ्री', 'समझोता एक्स्प्रेस', 'चालीस चौरासी', 'दिल्ली', 'दम, 'ये मेरा दिल' अशा वेगळ्या वाटेने जाणाऱ्या चित्रपटाच्या दिग्दर्शकांना अतुल कुलकर्णी यांनी प्राधान्य दिले आहे.

‘दहावी फ’ या २००३ साली आलेल्या चित्रपटात अभ्यासात फारशी गती नसलेल्या विद्यार्थ्यांमध्ये शालेय वर्गभेदामुळे निर्माण झालेली दरी आणि ‘गणेश देशमुख’ या शिक्षकांची विद्यार्थ्यांविषयी जबाबदारी अतुल कुलकर्णी यांनी चोख निभावली आहे. ‘भेट’ (२००२), ‘वास्तुपुरूष’ (२००३), ‘चकवा’ (२००५), ‘मातीमाय’ (२००७) अशा कलात्मक आणि व्यावसायिक अशा संमिश्र चित्रपटात भूमिका केल्या. ‘वळू’ (२००८) या उमेश कुलकर्णी दिग्दर्शित नर्मविनोदी चित्रपटात गावकऱ्यांच्या ‘वळू’विषयीच्या श्रद्धा-अंधश्रद्धा आणि खरेपणाने जगणाऱ्या गावकऱ्यांमध्ये सामावून गेलेल्या ‘फॉरेस्ट ऑफिसर’ची भूमिका केली.

आनंद यादव यांच्या कादंबरीवर आधारित आणि रवी जाधव यांनी दिग्दर्शित केलेल्या ‘नटरंग’ या चित्रपटातील ‘गुणवंत कागलकर’ या तमाशा कलावंताची भूमिका अतुल कुलकर्णी यांच्या कारकिर्दीतील विशेष उल्लेखनीय भूमिका होती. एका रांगड्या तरुणाच्या मनात असलेली कलेची ओढ आणि उपजत लाभलेली कला, या कलेशी इमान राखताना वैयक्तिक आणि कौटुंबिक पातळीवरचा खडतर प्रवास करणाऱ्या ‘गुणा’ची आव्हानात्मक भूमिका त्यांनी खूप मेहनतीने आणि समरसून केली. रांगडा मर्द गडी आणि तमाशातील नाच्या कलावंत या परस्परभिन्न प्रवृत्तीच्या भूमिकेसाठी देहयष्टी कमावणे आणि उत्तरार्धात स्त्रीसुलभ हालचालींना कायिक-वाचिक अभिनयाची जोड देत त्यांनी ही दुहेरी भूमिका भावस्पर्शी केली आहे.

२०१३ साली ‘प्रेमाची गोष्ट’ या प्रेमकथेवर आधारित चित्रपटात त्यांनी प्रियकराची भूमिका केली. अतिशय विचारी आणि ‘परफेक्शनिस्ट’ म्हणून ओळख असलेल्या अतुल कुलकर्णी यांना व्यायामाची आणि संगीताची आवड आहे. त्यांच्या मनाचा एक कप्पा हा भवतालाशी आणि भवतालातील माणसांशी जोडलेला आहे. अडचणीत असलेल्याला मदत करताना त्यांचे ग्लॅमर कधी त्यांच्या आड येत नाही.

अतुल कुलकर्णींचा स्पष्टवक्तेपणा, अभिनयकलेवरचे प्रेम, कामाप्रती निष्ठा याप्रमाणेच त्यांचे वाचन आणि पुस्तकप्रेम सर्वपरिचित आहे. त्यामुळेच दूरदर्शन वाहिनीवरील ‘बुकशेल्फ’ या मालिकेच्या यशाचे श्रेय त्यांना दिले जाते.

अतुल कुलकर्णी या मनस्वी कलाकाराला आयुष्याची जोडीदार म्हणून सहाध्यायी आणि नाट्यअभिनेत्री ‘गीतांजली’ यांची साथ मिळाली आहे. त्यांना कारकिर्दीच्या सुरुवातीलाच राष्ट्रीय पारितोषिके मिळाली आणि त्यानंतरही अनेक पुरस्कारांनी गौरवले. ‘दहावी फ’ या मराठी चित्रपटासाठी उत्कृष्ट अभिनेता म्हणून स्क्रीन व्हिडिओकॉन अॅवॉर्ड, ‘भेट’ या चित्रपटासाठी सर्वोत्कृष्ट अभिनेता म्हणून म.टा. सन्मान, अल्फा गौरव पुरस्कार, याच चित्रपटामध्ये साहाय्यक अभिनेता म्हणून राज्य शासनाच्या पुरस्कार त्यांना मिळाला. याशिवाय २०१० साली एशिया पॅसिफिक स्क्रीन बेस्ट अॅवॉर्डसाठी ‘नटरंग’ मधील भूमिकेसाठी त्यांचे नामांकन झाले होते.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ :** १) प्रत्यक्ष मुलाखत.

## कुलकर्णी, उमेश विनायक

**लेखक, दिग्दर्शक**

**६ डिसेंबर १९७६**



उमेश विनायक कुलकर्णी यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांच्या आईचे नाव विशाखा होते. पुण्यातच शालेय शिक्षण झालेल्या उमेश यांनी येथीलच बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्समधून पदवी घेतल्यानंतर कायद्याचेही शिक्षण घेतले. याच काळात त्यांची सुमित्रा भावे व सुनील सुकथनकर यांच्याशी ओळख झाली व उमेश कुलकर्णी यांना ‘दोघी’ या चित्रपटाचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून त्यांच्यासोबत काम करण्याची संधी मिळाली. त्यानंतर त्यांनी कायद्याचे शिक्षण अर्धवट सोडले व ते पुण्यातील ‘फिल्म अँड




टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट'मध्ये (२०००) दाखल झाले. या संस्थेत शिक्षण घेत असताना उमेश यांनी 'गिरणी' नावाचा लघुपट बनविला. राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर या लघुपटाची दखल घेण्यात आली. या लघुपटाला राष्ट्रीय पुरस्कार मिळाला.

उमेश कुलकर्णी यांनी २००८ च्या जानेवारीत प्रदर्शित झालेल्या 'वळू' चित्रपटाद्वारे दिग्दर्शक म्हणून प्रदार्पण केले. या चित्रपटाने 'क्लास' आणि 'मास' अशा दोन्ही प्रेक्षकवर्गाची मने जिंकली. आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या वर्तुळातही या चित्रपटाने वाहवा मिळवली. बर्लिन आंतरराष्ट्रीय महोत्सवातही हा चित्रपट दाखवण्यात आला. या चित्रपटाच्या यशामुळे अमिताभ बच्चन यांनी आपल्या बॅनरसाठी कुलकर्णी यांना 'विहीर' हा चित्रपट बनविण्याची संधी दिली. अत्यंत कठीण विषय सहजतेने मांडत उमेश कुलकर्णींनी या चित्रपटाद्वारे दिग्दर्शन माध्यमावरील आपली पकड सिद्ध केली. त्यानंतर त्यांनी निर्माते अभिजित घोलप यांच्यासाठी 'देऊळ' हा चित्रपट दिग्दर्शित केला.

'विहीर' हा चित्रपट बर्लिन महोत्सवासाठी पात्र ठरला. तसेच रॉटरडॅम महोत्सवातही हा चित्रपट दाखल झाला. 'देऊळ'ला २०११ या वर्षाचा सर्वोत्कृष्ट चित्रपटाचा राष्ट्रपती पुरस्कार आणि उत्कृष्ट पटकथालेखनाचा, उत्कृष्ट अभिनेत्याचाही पुरस्कार मिळाला.

– मंदार जोशी

## कुलकर्णी, गिरीश पांडुरंग

**लेखक, अभिनेता, दिग्दर्शक**

**२५ नोव्हेंबर १९७१**

गिरीश पांडुरंग कुलकर्णी यांचा जन्म उस्मानाबाद जिल्ह्यातील परांदा येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण



पुण्यातील नवीन मराठी शाळा व न्यू इंग्लिश स्कूल येथे झाले. लातूर येथून गिरीश यांनी मेकॅनिकल अभियांत्रिकीमधील पदविका प्राप्त केली. लातूरमध्ये शिक्षण घेत असताना कुलकर्णी यांनी रंगभूमीवर आपला ठसा उमटवण्यास सुरुवात केली होती. पदविका पूर्ण केल्यानंतर काही काळ त्यांनी एका खासगी कंपनीत नोकरी केली. त्यानंतर मात्र त्यांनी लेखनावर आपले लक्ष केंद्रित केले. 'संस्कार भारती'च्या नाट्यविभागात गिरीश कुलकर्णी, उमेश कुलकर्णी आणि श्रीकांत यादव या त्रिकुटाने विविध प्रयोग केले. उमेश कुलकर्णींनी 'एफटीआयआय'साठी केलेल्या लघुपटांच्या निर्मितीसाठी त्यांना गिरीश कुलकर्णी यांची मोठी मदत मिळाली. पुढे आपल्याला भावेल असाच चित्रपट करायचा, या इराद्याने या जोडीने या क्षेत्रात उडी घेतली. २००८ मध्ये प्रदर्शित झालेल्या 'वळू' या चित्रपटामुळे गिरीश कुलकर्णी हे नाव प्रेक्षकांना माहीत झाले. या चित्रपटाच्या लेखनाबरोबरच कुलकर्णी यांनी त्यामधील 'जिवन्या' ही मुख्य व्यक्तिरेखादेखील साकारली होती. गिरीश कुलकर्णी यांनी 'वळू' या चित्रपटाबरोबरच 'विहीर', 'देऊळ' 'मसाला' या चित्रपटांचे लेखन केलेले आहे. अभिनयाची आवड असलेल्या गिरीश यांना कारकिर्दीच्या सुरुवातीलाच चांगल्या भूमिका मिळाल्यामुळे त्यांच्या आवडीला खतपाणी मिळाले. त्यामुळेच 'गाभ्रीचा पाऊस' या चित्रपटामध्ये त्यांनी साकारलेली शेतकऱ्याची भूमिका लक्षणीय ठरली. 'देऊळ' चित्रपट त्यांच्या कारकिर्दीतील सर्वोत्तम चित्रपट ठरला. या चित्रपटातील मुख्य भूमिकेसाठी कुलकर्णी यांना सर्वोत्कृष्ट अभिनेत्याचा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला.



'मसाला' चित्रपटात गिरीश कुलकर्णी

तसेच या चित्रपटातील खटकेबाज संवादलेखनासाठी त्यांना सर्वोत्कृष्ट संवादलेखनाचा पुरस्कार मिळाला आहे. 'मसाला' चित्रपटात त्यांनी अभिनयही केलेला आहे. २०१३ मध्ये प्रदर्शित झालेल्या 'पुणे ५२' या सतीश राजवाडे दिग्दर्शित चित्रपटातही गिरीश यांनी अभिनय केला आहे. सध्या ते अनुराग कश्यप यांच्या 'अग्ली' या हिंदी चित्रपटाच्या कामात व्यग्र आहेत.

– मंदार जोशी

## कुलकर्णी, चंद्रकांत किसन

**दिग्दर्शक**

**१५ ऑक्टोबर १९६३**



चित्रपट, रंगभूमी आणि दूरदर्शन या तिन्ही माध्यमांवर आपला ठसा उमटविणारे दिग्दर्शक म्हणून चंद्रकांत कुलकर्णी यांचे नाव घेतले जाते. चंद्रकांत कुलकर्णी यांचा जन्म मराठवाडा जिल्ह्यातील परभणी तालुक्यातील हमदापूर (पाथरी) येथे झाला. त्यांच्या आईचे नाव उषा. त्यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण औरंगाबाद येथे झाले. औरंगाबाद येथून आपल्या कारकिर्दीस सुरुवात करणाऱ्या चंद्रकांत कुलकर्णी यांनी सुरुवातीच्या काळात प्रायोगिक रंगभूमीवर काम केले. तेथून मुंबईत दाखल झाल्यावर त्यांनी काही काळ पत्रकारिता केली. त्यानंतर मराठी रंगभूमीवर पदार्पण केले आणि मग तेथून त्यांनी मागे वळून पाहिले नाही. 'गांधी विरुद्ध गांधी', 'ध्यानीमनी', 'रंग उमलत्या मनाचे' यांसारख्या नाटकांमुळे ते प्रकाशझोतामध्ये आले. रंगभूमी गाजवल्यानंतर कुलकर्णी यांनी 'बिनधास्त' हा आपला पहिला मराठी चित्रपट दिग्दर्शित केला. या चित्रपटाला मोठे व्यावसायिक यश मिळाले होते. 'बिनधास्त'च्या यशानंतर कुलकर्णी यांनी दूरदर्शन या माध्यमासाठीही बरेच काम केले.

'पिंपळपान', 'टिकल ते पोलिटिकल' या त्यांनी दिग्दर्शित केलेल्या मालिका विलक्षण लोकप्रिय ठरल्या. दरम्यानच्या काळात कुलकर्णी यांनी विख्यात अभिनेते–दिग्दर्शक अमोल पालेकर यांच्या 'बनगरवाडी' या चित्रपटामध्ये नायकाची व्यक्तिरेखाही साकारली होती. 'काय द्याचं बोला' या चित्रपटाद्वारे कुलकर्णी यांनी विनोदी विषयांमधील आपले कसब पुन्हा एकदा प्रेक्षकांना दाखवून दिले. या चित्रपटामुळे प्रसिद्ध अभिनेते मकरंद अनासपुरे यांची कारकिर्द आकारास आली. 'भेट' आणि 'कदाचित' यांसारखे वेगळे विषयही त्यांनी हाताळले. 'मीराबाई नॉट आऊट' या चित्रपटाद्वारे त्यांनी हिंदी चित्रपट दिग्दर्शनक्षेत्रात पदार्पण केले. या चित्रपटाखेरीज त्यांनी 'कॅरी ऑन पांडू' हा चित्रपटदेखील दिग्दर्शित केला. २०१२ मध्ये कुलकर्णी यांनी दिग्दर्शित केलेला 'तुकाराम' हा चित्रपट प्रेक्षकांच्या पसंतीस उतरला. १९३८ मध्ये प्रदर्शित झालेल्या 'संत तुकाराम'नंतर कुलकर्णी यांनी तुकारामांच्या आयुष्यावर पुन्हा एकदा चित्रपट काढण्याचे धाडस दाखवले, हे विशेष उल्लेखनीय आहे.

– मंदार जोशी

## कुलकर्णी, बाळकृष्ण

**दिग्दर्शक व माहितीपट निर्माता**

**५ ऑक्टोबर १९२६**

प्रभात फिल्म कं. या विख्यात कंपनीचे पाचवे भागीदार सीतारामपंत कुलकर्णी हे बाळकृष्ण कुलकर्णी यांचे मामा. कोल्हापुरात प्राथमिक शिक्षण झाल्यावर बाळकृष्ण कुलकर्णी पुढील शिक्षणासाठी पुण्याला मामाच्या घरी आले. स्वाभाविकच प्रभात स्टुडिओत त्यांचा राबता सुरू झाला. बी.एस्सी. झाल्यावर ते 'प्रभात'मध्ये दिग्दर्शन विभागात दाखल झाले. यशवंत पेठकर दिग्दर्शित 'आगे बढो' व 'अपराधी' या दोन चित्रपटांना बाळकृष्ण कुलकर्णी साहाय्यक होते.

बाळकृष्ण कुलकर्णी 'प्रभात'मध्ये उमेदवारी करत असतानाच सीतारामपंतांचा मोठा मुलगा सदाशिव याने

चित्रपट काढण्याचे ठरवले. त्याच्यासाठी बाळकृष्ण कुलकर्णी यांनी विश्राम बेडेकरांच्या 'ब्रह्मकुमारी' नाटकावरून 'उद्धार' ही पटकथा लिहिली. देव आनंद व मुन्वर सुलताना यांना घेऊन बाळकृष्ण कुलकर्णी यांनी 'उद्धार'चे चित्रीकरण सुरू केले, पण ते विषमज्वराने आजारी पडले. त्यामुळे चित्रीकरण रद्द झाले. त्यानंतर १९४८ साली संघबंदी आली, त्यात सत्याग्रह करून बाळकृष्ण कुलकर्णी तुरुंगात गेले. स्वाभाविकच तेव्हा सदाशिव कुलकर्णी यांनी 'उद्धार'चे दिग्दर्शन करून चित्रपट पूर्ण केला. तोपर्यंत बाळकृष्ण तुरुंगातून सुटले. त्यांनी या चित्रपटाच्या संकलनाला थोडाफार हातभार लावला, पण 'उद्धार'चे नाणे वाजले नाही.

'अपराधी'नंतर सीतारामपंत कुलकर्णी यांनी 'प्रभात'मधून आपली भागीदारी काढून घेतली. त्यामुळे बाळकृष्ण कुलकर्णी यांना 'प्रभात'चे दरवाजे बंद झाले. पण सीतारामपंतांनी स्वतंत्रपणे चित्रपट काढायचे ठरवले. यासाठी सदाशिव यांनी 'अमृत चित्र' ही संस्था स्थापन केली. बाळकृष्ण दिग्दर्शक, सदाशिव ध्वनिलेखक आणि सदाशिव यांचा धाकटा भाऊ काशिनाथ छायालेखक, अशी ही घरची संस्था उभी राहिली. या संस्थेसाठी बाळकृष्ण कुलकर्णी यांना 'उष:काल' कादंबरीवर चित्रपट करायचा होता. पण सर्वानुमते 'प्रतापगड' हा ऐतिहासिक विषय घेतला गेला. कथा-पटकथा, संवाद, गीते ग.दि. माडगूळकर यांचे होते. सुधीर फडके यांनी संगीत दिले होते, बाळकृष्णांनी दिग्दर्शन केले. नवयुग-अमृत चित्र या बॅनरखाली 'प्रतापगड' (१९५२) निर्माण करण्यात आला. तो चांगलाच यशस्वी झाला. बाळकृष्ण, माडगूळकर व सुधीर फडके या त्रयीने 'कुबेराचे धन' (१९५३) हा दुसरा चित्रपट केला, पण हा चित्रपट चालला नाही. तिसरा चित्रपट विनोदी करायचा म्हणून अमृत चित्र संस्थेने फडके व माडगूळकर यांना घेऊनच 'इन मिन साडे तीन' (१९५६) हा चित्रपट केला. राजा परांजपे प्रमुख भूमिकेत होते. उत्तम विनोदी चित्र असूनही हा चित्रपटही चालला नाही. त्यानंतर सीतारामपंतांनी अमृत चित्र ही संस्था बंद करून टाकली. बाळकृष्ण कुलकर्णी काम शोधण्यासाठी मुंबईत आपल्या भावाकडे आले आणि माहितीपट निर्माण करू लागले. महाराष्ट्र सरकारसाठी त्यांनी 'केशवसुत', 'राम गणेश गडकरी' इत्यादी माहितीपट तयार केले. आचार्य अत्रे यांनी 'केशवसुत' व 'गडकरी' या दोन्ही माहितीपटांचे लेखन केले होते. नंतर बाळकृष्ण कुलकर्णी माहितीपट निर्मितीमध्ये रमले. चित्रपट दिग्दर्शनाकडे पुन्हा ते वळले नाहीत.

– सुधीर नांदगांवकर

## कुलकर्णी, मृणाल रुचिर

**अभिनेत्री**

**२१ जून**



मृणाल रुचिर कुलकर्णी यांचा जन्म पुणे येथे झाला. प्रख्यात लेखक गो.नी. दांडेकर यांची नात, प्रा. वीणा देव आणि डॉ. विजय देव यांची कन्या, चरित्र अभिनेते जयराम कुलकर्णी, डॉ. हेमा कुलकर्णी यांची सून असलेल्या मृणाल यांनी वयाच्या पंधराव्या वर्षी 'स्वामी' मालिकेद्वारे 'रमा' म्हणून अभिनयक्षेत्रात पदार्पण करत, पुढे छोटा आणि मोठा असे दोन्ही पडदे गाजवले.

गोनीदांबरोबर गडकिल्ले पालथे घालणाऱ्या मृणाल प्रारंभी अभिनयाकडे गांभीर्याने पाहत नव्हत्या; पण त्यांच्या 'रमे'वर रसिकांनी इतके अपरंपार प्रेम केले की, पुढे अभिनय हीच त्यांची मुख्य ओळख बनली. शालेय शिक्षण हुजूरपागा शाळेत, तर पुण्याच्या सर परशुराम महाविद्यालयातून बी.ए. आणि मराठी-इंग्रजी वाङ्मयात 'मास्टर इन लिटरेचर' ही पदवी घेणाऱ्या मृणाल यांनी महाविद्यालयात अध्यापक म्हणूनही काही काळ काम केले आहे. त्यांच्या आजीच्या (नीरा दांडेकर यांच्या) आग्रहामुळे त्या गंगाधरबुवा पिंपळखरे, पद्माकर बर्वे व मालती पांडे-बर्वे यांच्याकडे गाणे शिकल्या. चित्रकला,

ट्रेकिंग, छायाचित्रण व वाचन हे छंद जोपासण्याबरोबरच त्यांनी कथ्थकचेही शिक्षण घेतले आहे. व्यक्तिमत्त्वाचे पैलू जितके अधिक, तितका अभिनयही अधिक कसदार व संपन्न होतो, याचे मृणाल या साक्षात उदाहरण आहेत.

'स्वामी', 'पिंपळपान', 'अवंतिका', 'राजर्षी शाहू महाराज' 'गुंतता हृदय हे' अशा मराठी, तर 'श्रीकांत', 'हसरते', 'मीरा', 'टीचर', 'दी ग्रेट मराठा', 'स्पर्श', 'नूरजहाँ', 'द्रौपदी', 'सोनपरी', 'झूठा सच' या गाजलेल्या हिंदी मालिकांमधून अभिनय आणि व्यक्तिमत्त्वातला वेगळेपणा रसिकांच्या मनावर ठसवणाऱ्या मृणाल, 'माझं सौभाग्य' या चित्रपटाद्वारे मराठी चित्रपटसृष्टीत आल्या. प्रारंभी सारे काही सोसणारी, मात्र नंतर नवऱ्याला वठणीवर आणणारी नायिका या चित्रपटात त्यांनी साकारली. 'जमलं हो जमलं', 'घराबाहेर', 'लेकरू', थांग', 'जोडीदार' हे मृणाल यांचे महत्त्वाचे चित्रपट. त्यांनी 'कमला की मौत', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर', 'वीर सावरकर', 'कुछ मीठा हो जाए' या हिंदी चित्रपटांतही निवडक भूमिका केल्या आहेत.

भूमिकांबाबतचा चोखंदळपणा, निवड करण्यामागची त्यांची दृष्टी हाही मृणाल यांचा नोंद घेण्याजोगा विशेष आहे. मालिकेतली भूमिका असो वा चित्रपटातली, मृणाल आपल्या तत्त्वाबाहेर जाऊन ती करणार नाही हे नक्की. राज कपूर यांच्या 'हीना' चित्रपटातील 'हीना' या भूमिकेसाठी त्यांना विचारणा झाली होती. वेगळ्या शक्यता निर्माण करणारी, मोठी वाट खुली करणारी ही संधी होती. मात्र 'अशा चित्रपटातले नायिकेचे दर्शन मनाला पटत-रुचत नाही' या कारणास्तव मृणाल यांनी ही भूमिका, नवी संधी नाकारण्याचे धाडस दाखवले.

'माझं सौभाग्य' या मृणाल यांच्या पहिल्याच मराठी चित्रपटासाठी त्यांना महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार मिळाला. 'जोडीदार' मध्ये त्यांनी सर्वसामान्य पतिव्रता आणि व्यावसायिक डावपेच खेळत व्यवसायाचा मोठा पसारा सांभाळणारी आधुनिक मुलगी



अशी दुहेरी भूमिका साकारली. या दुहेरी भूमिकेसाठी त्यांना 'स्क्रीन' आणि 'फिल्मफेअर' पुरस्कार मिळाले. 'घराबाहेर' या चित्रपटासाठी त्यांना उत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्रीचा महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. अभिनयक्षेत्रातील कामगिरीबद्दल त्यांना 'स्मिता पाटील पुरस्कार' मिळाला आहे. गजेंद्र अहिरे दिग्दर्शित 'बयो' हा त्यांचा चित्रपट पॅनोरमासाठी निवडला गेला. मालिका, मॉडेलिंग, मराठी-हिंदी चित्रपट याबरोबरच त्यांनी काही प्रादेशिक आणि आंतरराष्ट्रीय चित्रपटही केले आहेत. रूपसंपदा, बुद्धिचातुर्य व अभिनयनिपुणता असे एकत्रित वरदान मिळालेल्या मृणाल यांनी व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू जाणीवपूर्वक जोपासले. 'अभिनयाहून वेगळा पर्याय माझ्यापुढे नव्हताच कधी, मी अभिनयाशिवाय दुसरं काहीच करू शकत नाही', असे ऋषी कपूर यांचे म्हणणे मृणाल कुलकर्णी यांनी लहानपणी वाचले होते, तेव्हाच आपल्यापुढे एक नाही तर अनेक पर्याय असले पाहिजेत, असे त्यांनी ठरवून टाकले होते.

अध्यापक म्हणून काम करणे, संगीत शिकणे, नृत्यनिपुणता व अफाट वाचन करणे या सर्व गोष्टी त्या जागरूकतेचेच द्योतक आहेत.

कला आणि व्यवहार यांचे व्याप सांभाळताना पुण्यातील 'आपलं घर' या अनाथगृहासाठीही त्या काम करत आहेत. 'मेकअप उतरवल्यावर' हे त्यांचे पुस्तकही प्रसिद्ध आहे. अलीकडेच त्यांनी दिग्दर्शन क्षेत्रात पदार्पण करून 'प्रेम म्हणजे प्रेम म्हणजे प्रेम असतं' हा चित्रपट दिग्दर्शित केला आहे.

– स्वाती प्रभुमिराशी

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## कुलकर्णी, सलील श्रीनिवास
**संगीतकार**

**६ ऑक्टोबर १९७२**

गेल्या दहा-बारा वर्षांत 'युवा पिढीची स्पंदने आपल्या सुरावटीतून नेमकेपणाने व्यक्त करणारा संगीतकार' ही डॉ. सलील कुलकर्णी यांची ओळख आहे. सुरावट



आणि वाद्यमेळ यात कविता हरवून जाऊ नये, यासाठी गीतातील शब्दांकडे सूक्ष्मतेने आणि संवेदनशीलतेने पाहणे, हे सलील यांचे वैशिष्ट्य मानले जाते.

मुंबईच्या दादर परिसरात जन्मलेले सलील हे श्रीनिवास कुलकर्णी आणि रेखा कुलकर्णी या दांपत्याचे चिरंजीव. लहानपणापासून संगीताकडे त्यांचा कल असला तरी तो छंद जपत त्यांनी भारती विद्यापीठाच्या वैद्यक महाविद्यालयाची पदवी प्राप्त केली. एम.बी.बी.एस. झाल्यावर काही वर्षे वैद्यकीय व्यवसायाचा अनुभव घेतल्यावर आपला कल संगीताकडेच आहे, हे उमगून वैद्यकीय पेशा बाजूला ठेवून पूर्णवेळ संगीतकार म्हणून काम करण्याचा निर्णय घेतला.

दरम्यान त्यांनी पं. गंगाधरबुवा पिंपळखरे, जयमाला शिलेदार आणि प्रमोद मराठे यांच्याकडून संगीताचे मार्गदर्शन घेतले. या मार्गदर्शनाला डॉ. सलील यांनी स्वत:च्या एकलव्य वृत्तीची जोड देऊन संगीताची जाण समृद्ध केली. साहित्याविषयीचा जिव्हाळाही प्रथमपासून असल्याने, संगीतरचना करण्याकडे सलील यांचा अधिक कल राहिला.

उत्तमोत्तम कवितांना चाली लावण्याचा प्रयत्न सुरू असतानाच, त्यांची 'तरीही वसंत फुलतो', ही पहिली ध्वनिफीत १९९९ मध्ये प्रकाशित झाली. त्यापाठोपाठ 'स्वप्नांत पाहिली राणीची बाग', 'संधिप्रकाशात', 'अबोली', 'सांग सख्या रे', 'आनंदपहाट', 'स्वरभाव', 'आयुष्यावर बोलू काही', 'अग्गोबाई ढग्गोबाई'... अशा अनेक ध्वनिफिती प्रकाशित झाल्या. 'आयुष्यावर बोलू काही' या ध्वनिफीतीप्रमाणेच त्याचे रंगमंचीय कार्यक्रमही लोकप्रिय झाले. कवी संदीप खरे यांच्या कवितांना सलील यांनी दिलेल्या चाली युवा वर्गात विलक्षण गाजल्या. समकालीन कलाकार ध्वनिमुद्रित गाण्यांचे कार्यक्रम करत असताना फक्त स्वत:च्या

रचनांचे कार्यक्रम लोकप्रिय करून स्वत:चे श्रोते निर्माण करण्याची किमया नव्या पिढीत डॉ. सलील यांनी संदीप खरे यांच्या साथीने करून दाखवली आहे. ध्वनिफिती, सीडी यानंतरचा टप्पा चित्रपटांचा होता. २००३ मध्ये सलील यांचे संगीत असलेला 'विठ्ठल विठ्ठल' हा चित्रपट प्रदर्शित झाला. त्यानंतर 'पांढर', 'आनंदीआनंद', 'बदाम राणी गुलाम चोर', 'चिंटू' आदी सुमारे २५ चित्रपटांना सलील यांनी संगीत दिले आहे. छोट्या पडद्यावरचा 'नक्षत्रांचे देणे' हा कार्यक्रम विशेष लक्षणीय ठरला. तसेच सारेगमपचे परीक्षणही त्यांनी केले. 'मधली सुट्टी' हा कार्यक्रमही ते छोट्या पडद्यावर सादर करतात. त्यांनी वृत्तपत्रीय सदरलेखनही केले असून 'लपवलेल्या काचा' हे पुस्तकही प्रकाशित झाले आहे. झी गौरव, मटा सन्मान, राज्य पुरस्काराचेही ते मानकरी आहेत. संगीतकार म्हणून काम करताना पार्श्वगायक म्हणूनही त्यांनी मोजकेच काम करून ठसा उमटवला आहे.

कविता, गाणी आणि आठवणी, तसेच संगीतरचनेची प्रक्रिया याविषयी सलील नेहमीच भरभरून बोलतात आणि अनेक रंगमंचीय कार्यक्रमात ते स्वत:च सूत्रधाराची भूमिका निभावतात. सलील हे ज्येष्ठ संगीतकार-गायक पं. हृदयनाथ मंगेशकर यांच्यासह 'मैत्र जिवांचे' हा कार्यक्रमही सादर करतात. त्यांनी पुण्यात सलील कुलकर्णी म्युझिक स्कूल ही सुरू केले असून याद्वारे ते युवा कलाकारांना मार्गदर्शन करतात.

सलील कुलकर्णी यांची पत्नी अंजली राज्य पुरस्कार प्राप्त गायक असून मुलगा शुभंकरही या क्षेत्रात आपले स्थान निश्चित करण्याच्या मार्गावर आहे.

– जयश्री बोकील

## कुलकर्णी, सुकन्या एकनाथ

**अभिनेत्री**

**२५ डिसेंबर १९६८**

अभिनयक्षेत्राची कोणतीही भक्कम पार्श्वभूमी नसलेल्या मध्यमवर्गीय कुटुंबात सुकन्या कुलकर्णी यांचा जन्म झाला. जन्मापासूनच वास्तव्य असणाऱ्या दादर



येथील अमृतकुंभ सोसायटीतील दीपोत्सवामध्ये त्या बालपणापासून नृत्ये सादर करत होत्या, तसेच अभिनयही करत होत्या. याच कार्यक्रमांमधून त्यांना स्टेजवर वावरण्याचा आत्मविश्वास व सभाधीटपणा मिळाला. दादर येथील बालमोहन शाळेत त्यांनी शालेय शिक्षण घेतले, तर पुढे त्यांनी रुपारेल महाविद्यालयातून अर्थशास्त्राची पदवी मिळवली. शालेय शिक्षणाबरोबरच नृत्याचेही शिक्षण घ्यावे, या आकांक्षेने त्यांनी सुचेता भिडे-चापेकर आणि स्मिता साठे-महाजन यांच्याकडे १२ वर्षे भरतनाट्यम् या शास्त्रीय नृत्याचे धडे घेतले. शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षणानंतर बँकेत नोकरी करावी किंवा शाळेत शिक्षिका म्हणून काम करावे, असे मनोमन वाटत असताना या दोन्हीपेक्षा वेगळा मार्ग त्यांची वाट पाहत होता. सुकन्या कुलकर्णी यांनी आपल्या मैत्रिणीसोबत सुलभा देशपांडे यांच्या आविष्कार संस्थेमार्फत गुरू पार्वतीकुमार यांनी दिग्दर्शित केलेल्या 'दुर्गा झाली गौरी' या नृत्यनाटिकेमध्ये भाग घेतला आणि त्यांच्यावर कलेच्या वातावरणाची मोहिनी पडली आणि आपल्या घरातल्यांच्या प्रोत्साहनामुळे त्या या क्षेत्रात आत्मविश्वासाने वावरू लागल्या, पण याचे बाळकडू त्यांना शालेय जीवनातच विद्याताई पटवर्धन यांच्याकडून मिळाले होते. सुकन्या यांचा चित्रपटसृष्टीतील प्रवेशही अचानक झाला. सुलभा देशपांडे यांनी त्यांना 'ईश्वर' या हिंदी चित्रपटात एक भूमिका दिली. अनिल कपूर व विजयाशांती अभिनित या चित्रपटात सुकन्या कुलकर्णी यांनी 'छुटकी'ची भूमिका रंगवली. यानंतर मात्र अभिनयक्षेत्रातील त्यांची वाट निश्चित झाली.

सुकन्या कुलकर्णी यांना वामन केंद्रे यांच्या 'झुलवा' या नाटकात संधी मिळाली. सयाजी शिंदे या सहकलाकाराबरोबरची या नाटकातील त्यांची भूमिका प्रेक्षकांच्या लक्षात राहिली. झुलवामधील अभिनयासाठी

त्यांना महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक, तसेच अखिल भारतीय नाट्य परिषदेची दोन पारितोषिके व नाट्यदर्पणचेही पारितोषिक मिळाले होते. यानंतर त्यांना ‘गावाकडल्या गोष्टी’, ‘महानगर’, ‘कश्मकश’ या मालिकांमध्ये काम करण्याची संधी मिळाली. याच दरम्यान ‘जन्मगाठ’ नावाचे नाटक चालू असताना त्यांना अपघात झाला. या अपघातात त्यांची वाचा गेली व चार दिवसांचे अंधपणही आले. पण त्यामुळे त्या मानसिकदृष्ट्या खचल्या नसल्या तरी त्यांना नृत्य बंद करावे लागले. या आजारपणातून उठल्यानंतर त्यांनी पुन्हा नृत्याला सुरुवात केली. पण दुर्दैवाने १० जून १९९३ त्यांचा पुन्हा एकदा अपघात झाला. त्या वेळेस त्यांची वाचा गेली, सतत सहा महिने त्यांना बोलता आले नाही. तसेच उजवी बाजू पॅरालाइज्ड झाल्यामुळे त्यांना अनेक आजारपणांनी ग्रासले, पण त्यातूनही खचून न जाता त्यांनी धीराने व संयमाने एक वर्षाच्या सक्तीच्या विश्रांतीनंतर महेश भट यांच्या ‘जमीन आसमान’, ‘शांती’ या मालिकांमधून काम करण्यास सुरुवात केली.

‘झुलवा’ नाटकातील त्यांचा अभिनय पाहून बाबा पाठक यांनी ‘वारसा लक्ष्मीचा’ या चित्रपटात त्यांना



नायिकेची भूमिका दिली आणि नाटक आणि चित्रपट असा त्यांचा दुहेरी प्रवास सुरू झाला. या चित्रपटासाठी त्यांना फिल्मफेअर व फिल्मग्रोव्हर असे दोन पुरस्कार मिळाले. अभिनेता-दिग्दर्शक सचिन पिळगावकरांनी 'एकापेक्षा एक' या हलक्याफुलक्या धाटणीच्या चित्रपटात लक्ष्मीकांत बेर्डे यांची नायिका म्हणून त्यांना भूमिका दिली. अशोक सराफ, मधुकर तोरडमल, निशिगंधा वाड अशा अनुभवी कलाकारांबरोबर केलेला हा चित्रपट त्यांच्यासाठी एक चांगला अनुभव ठरला. त्यानंतर 'चंबूगबाळे', 'ताईच्या बांगड्या', 'सौभाग्यकंकण', 'पुत्रवती', 'आई, थोर तुझे उपकार' अशा चित्रपटातून विविधांगी भूमिका केल्या. 'सरकारनामा' या राजकीय पार्श्वभूमीवर आधारित चित्रपटामुळे यशवंत दत्त, दिलीप प्रभावळकर, आशुतोष गोवारीकर, अजिंक्य देव, अश्विनी भावे, प्रतीक्षा लोणकर अशा अभिनयकुशल कलाकारांच्या यादीमध्ये सुकन्या कुलकर्णी हे नावही लक्षणीय ठरले. राजकारणाचा बळी पडलेल्या एका सरकारी अधिकाऱ्याची भावी पत्नी म्हणून सुकन्या कुलकर्णी यांनी पुन्हा एकदा आपले अभिनयकौशल्य सिद्ध केले. यासाठी त्यांना 'फिल्मफेअर' पुरस्कार मिळाला.

सुकन्या कुलकर्णी यांना 'पुत्रवती' आणि 'घे भरारी' या चित्रपटातील भूमिकांसाठी महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार मिळाला. 'पुत्रवती'साठी त्यांना व्हिडिओकॉन स्क्रीन अ‍ॅवार्ड मिळाले. मराठी चित्रपटांबरोबरच हिंदी चित्रपटांमध्येही त्यांनी भूमिका केली. 'जिगर', 'सरफरोश', 'परवाने' या हिंदी चित्रपटांमधूनही त्यांनी काम केले. मराठी आणि हिंदी चित्रपटांतील भूमिकांबरोबरच त्यांची 'पतित पावनी' या कानडी चित्रपटातील भूमिका नावाजली गेली. त्यातील उत्कृष्ट भूमिकेसाठी त्यांना कर्नाटक सरकारचा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार मिळाला.

चित्रपटात भूमिका करताना नाट्यक्षेत्रातही त्यांचा वावर स्वाभाविक होता. 'कुसुम मनोहर लेले' या नाटकातील अद्वितीय अभिनयासाठी सुकन्या कुलकर्णी यांना अखिल भारतीय नाट्यपरिषद, नाट्यदर्पण, नाट्यनिर्माता संघ, नाट्यगौरव, कालनिर्णय अशी बक्षिसे मिळाली. विजया मेहता दिग्दर्शित 'नागमंडल' या हिंदी आणि 'ती फुलराणी' या पु.ल. देशपांडेलिखित नाटकांचे काही प्रयोग सुकन्या यांनी केले. 'लेकुरे उदंड झाली', 'कुसुम मनोहर लेले' ही त्यांची नाटकेही सर्वार्थाने गाजली. संजय मोने यांच्याबरोबर १९९८ साली त्यांचा विवाह झाला. नाटक-चित्रपटातील भूमिकांबरोबरच दूरदर्शनवरील 'गावाकडच्या गोष्टी', 'कथास्तु', 'मन वढाय वढाय', 'बंदिनी', 'आई', 'आभाळमाया', 'अग्निशिखा' व 'एका लग्नाची दुसरी गोष्ट' या मालिकांमधील अभिनयामुळे सुकन्या लक्षवेधी ठरल्या.

मुलीच्या जन्मानंतर नाटक, चित्रपट आणि मालिका यांपासून त्या अल्पकाळ दूर राहिल्या, पण पुन्हा नव्या उत्साहाने सुकन्या कुलकर्णी यांनी अभिनयक्षेत्रात पदार्पण केले आहे. जवळपास १३ वर्षांनी 'फॅमिली ड्रामा' या नाटकात त्यांनी काम केले. या नाटकातील भूमिकेसाठी त्यांना महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार लाभला. लोकमत या वर्तमानपत्रात त्यांनी 'शब्दांगण' नावाचे सदर वर्षभर चालवले होते.

– नेहा वैशंपायन

## कुलकर्णी, सोनाली व्यंकटेश
**अभिनेत्री**
**३ नोव्हेंबर १९७४**



मराठी, हिंदी व इंग्रजी नाटके, मराठी, तमिळ, तेलगू, हिंदी, इंग्रजी, इटालियन चित्रपट हे जणू काही कमीच म्हणून की काय, नाट्यलेखन, नाट्यदिग्दर्शन, दैनिकांतून सदर लेखन अशी बहुआयामी, प्रतिभावंत, सक्षम अभिनेत्री म्हणजे सोनाली कुलकर्णी. त्यांचा जन्म पुणे येथे झाला. 'मुक्ता', 'देवराई', 'रेस्टॉरंट', 'दोघी' अशा चित्रपटातून



**डॉ. बाबासाहेब आंबेडकर या चित्रपटातील रमाबाई आंबेडकरांच्या भूमिकेत**

स्वत:ची अभिनयक्षमता सिद्ध करणाऱ्या सोनाली यांनी अभिनयाचे पहिले पाऊल टाकले ते गणेशोत्सवातून.

संदीप कुलकर्णी आणि संदेश कुलकर्णी या दोन भावांमुळे सोनाली यांचा अभिनयाकडचा ओढा वाढत गेला. याच काळात आई सुचिता व वडिलांच्या प्रोत्साहनामुळे सोनाली कुलकर्णी नऊ वर्षे माणिक अंबिके यांच्याकडे भरतनाट्यम् शिकल्या.

चित्रपटात येण्यापूर्वी सोनाली यांची कारकिर्द नाटकमय होती. नाटकात काम करण्याबरोबरच पुण्यातील फर्गसन महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या सोनाली यांनी पुण्यातल्या मानाच्या पुरुषोत्तम करंडक स्पर्धेसाठी 'मंजू' नावाचे नाटक लिहिले आणि दिग्दर्शितही केले होते, अर्थात अभिनयासह. या नाटकातल्या त्यांच्या भूमिकेचे दिग्गजांकडून विशेष कौतुक झाले. याच दरम्यान प्रख्यात अभिनेते व दिग्दर्शक गिरीश कर्नाड त्यांच्या नव्या चित्रपटासाठी नायिकेच्या शोधात होते. कर्नाड यांच्या चित्रपटाकरता सोनाली यांनी स्क्रीनटेस्ट दिली आणि 'चेलुवी' (१९९२) या चित्रपटासाठी त्यांची निवड झाली. ही भूमिका एका झाडाची होती. या चित्रपटाला सर्वोत्कृष्ट पर्यावरण चित्रपटाचा राष्ट्रीय पुरस्कार देण्यात आला होता. या चित्रपटाने सोनाली यांना अभिनयाचे नवे दरवाजे उघडून दिले. यानंतर मराठी चित्रपटसृष्टीत सोनाली यांचा प्रवेश झाला तो डॉ. जब्बार पटेल दिग्दर्शित 'मुक्ता' या लक्षवेधी चित्रपटामध्ये. जब्बार पटेल यांच्या 'डॉ. आंबेडकर' चित्रपटातही सोनाली यांनी रमाबाई आंबेडकर यांची ऐतिहासिक व्यक्तिरेखा साकारत त्यांच्या अभिनयाची ताकद दाखवून दिली.

अमोल पालेकर यांचा 'दायरा', 'कैरी', सुमित्रा भावे यांचा 'दोघी' (१९९४), 'देवराई', 'घराबाहेर', 'रेस्टॉरंट' हे सोनाली यांचे आवर्जून कौतुक करावे असे चित्रपट. या चित्रपटांना प्रेक्षकांची आणि जाणकारांचीही

दाद मिळाली. ‘मुक्ता’, ‘दोघी’, ‘देवराई’ या चित्रपटांसाठी सोनाली यांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले. ‘दोघी’ चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना फिल्मफेअर पुरस्कारही देण्यात आला. ‘गाभ्रीचा पाऊस’, ‘त्या रात्री पाऊस होता’, ‘देऊळ’ हा सुवर्णकमळ विजेता चित्रपट हे त्यांचे आणखी काही महत्त्वाचे चित्रपट. ‘प्यार तूने क्या किया’, ‘टॅक्सी नं.९.२.११’, ‘मिशन कश्मीर’, ‘दिल चाहता है’ हे हिंदी चित्रपटही सोनाली यांच्या नावावर जमा आहेत. ‘दिल चाहता है’ या गाजलेल्या चित्रपटातील ‘वो लडकी है कहाँ’ या लोकप्रिय गाण्याने सोनाली यांनाही देशभरातल्या हिंदी चित्रपट रसिकांमध्ये प्रसिद्धी लाभली. २०१२ मध्ये त्यांनी ‘सिंघम’ या चित्रपटात प्रामाणिक पोलीस अधिकाऱ्याच्या बायकोची केलेली भूमिका लक्षणीय ठरली.

‘ब्राईड अ‍ॅन्ड प्रेज्युडीस’ हा सोनाली यांनी ऐश्वर्या रॉय यांच्यासोबत केलेला आंतरराष्ट्रीय चित्रपट. ‘फुको डी सु मे’ अर्थात ‘फायर ऑट माय हार्ट’ या इटालियन चित्रपटात सोनाली यांना प्रख्यात हॉलिवूड अभिनेता ओमर शरीफ यांच्यासमवेत भूमिका करण्याची संधी मिळाली. विशेष महत्त्वाची बाब म्हणजे, या चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना ‘मिलान चित्रपट महोत्सवा’त सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार देऊन गौरवण्यात आले.

चंद्रकांत कुलकर्णी दिग्दर्शित ‘चाहूल’ हे सोनाली कुलकर्णी यांचे पहिले व्यावसायिक नाटक होय. या नाटकात त्यांनी तुषार दळवी यांच्यासोबत काम केले. ‘नको रे बाबा’, ‘सखाराम बाईंडर’ या नाटकातून भूमिका करणाऱ्या सोनाली कुलकर्णी ‘समन्वय’ या त्यांच्या नाट्यविषयक ग्रूपद्वारे मराठी रंगभूमीशी जोडून आहेत. याचबरोबर त्यांनी ‘बसंत का तिसरा यौवन’, ‘सर सर सरला’ या हिंदी नाटकांमधूनही महत्त्वपूर्ण भूमिका साकारल्या.

‘डॉ. प्रकाश आमटे : द रिअल हिरो’ या चित्रपटात त्यांनी डॉ. मंदा आमटे यांची महत्त्वपूर्ण भूमिका केली आहे. महेश मांजरेकर दिग्दर्शित ‘कोकणस्थ’ (२०१३) या चित्रपटातील आईची भूमिका त्यातील बारकाव्यांनिशी सोनाली कुलकर्णी यांनी ताकदीने साकारून पुन्हा एकदा आपल्या अभिनयाने प्रेक्षकांना मंत्रमुग्ध केले.

प्रादेशिक, राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय चित्रपटांतून भूमिका, नाट्यलेखन, दिग्दर्शन, अभिनय अशी चौफेर कामगिरी करणाऱ्या सोनाली यांनी दैनिकातून केलेल्या स्तंभलेखनाचे ‘सो कूल’ हे पुस्तकही प्रसिद्ध आहे. सतत वेगवेगळ्या गोष्टी अभ्यासपूर्वक करणाऱ्या आणि अभिनयक्षेत्रात नवनवे टप्पे ताकदीने पादाक्रांत करणाऱ्या सोनाली त्यांच्या चतुरस्र अशा वेगळेपणासाठी चित्रपटसृष्टीत कायमच ओळखल्या जातील.

– स्वाती प्रभुमिराशी

**संदर्भ :** १) प्रत्यक्ष मुलाखत.

## कुळकर्णी, नीना दिलीप

**अभिनेत्री**

**१५ ऑगस्ट १९५५**



चित्रपट, रंगभूमी, दूरदर्शन मालिका, जाहिरातपट अशा अनेक माध्यमातून एकाचवेळी सहजसुंदर अभिनयातून एक प्रगल्भ उंची गाठणारी अभिनेत्री म्हणून नीना कुळकर्णी हे नाव आदराने घेतले जाते. उपजत अभिनयगुणांना सजगतेने आणि अभ्यासाने पैलू पाडत नीना कुळकर्णी यांनी चित्रपट-नाट्यसृष्टीत स्वतःला सिद्ध केले आहे. त्यांचा जन्म पुण्याला झाला. त्यांची आई कमल जोशी एम.बी.बी.एस. आणि वडील वसंत जोशी मानोसपचारतज्ज्ञ असल्यामुळे घरामध्ये अभ्यासाला पूरक वातावरण होते. इंग्रजी माध्यमात शिक्षण घेत असल्या तरी त्यांना मराठी साहित्यामध्येही रूची होती. ‘मकरंद सहनिवास’ या राहत्या कॉलनीमध्ये होणाऱ्या




**'गंध'मध्ये बाजूला बसलेली बाई जानकीच्या भूमिकेत नीना कुळकर्णी**

नाटकांमुळे 'नाटक' या विषयाशी त्यांचे जवळचे (जिव्हाळ्याचे) नाते निर्माण झाले. दरम्यान मधुकर तोरडमल यांच्या 'चांदणे शिंपीत जा' या व्यावसायिक नाटकात काम करण्याची विचारणा विमलाताई राऊत यांच्याकडून झाली. विमलताईंनी नीना कुळकर्णी यांच्या आईकडून फक्त वीस प्रयोगांपुरती परवानगी मिळवली, आणि त्यांचा व्यावसायिक रंगभूमीवरचा प्रवास सुरू झाला. १९७१ साली 'गुंतता हृदय हे' या नाटकमध्ये डॉ. काशिनाथ घाणेकर यांच्या प्रोत्साहनामुळे त्यांना आघाडीच्या कलाकारांबरोबर काम करण्याची संधी मिळाली. या नाटकाचे साधारणपणे ६०० प्रयोग त्यांनी केले. एकीकडे नाटकांचे प्रयोग आणि दुसरीकडे महाविद्यालयीन शिक्षण सक्षमतेने पार पाडत त्यांनी फ्रेंच भाषेतील पदवी एलफिन्स्टन महाविद्यालयातून घेतली. महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच 'क्लिअरअ‍ॅसेल' या सौंदर्य प्रसाधनाच्या जाहिरातीसाठी 'मॉडेल' म्हणून त्यांची निवड झाली. जाहिरातींमधून प्रत्यक्ष काम केल्याने या क्षेत्राची मागणी, तिथे चालणारे काम आणि एक अभिनेत्री, मॉडेल म्हणून त्या माध्यमाची जाण, बारकावे त्यांनी आत्मसात केले. याच काळात मुंबईमध्ये 'पर्यटन विकास' क्षेत्रामध्ये त्यांनी गाईड म्हणून काम केले. महाविद्यालयात असतानाच 'सत्यदेव दुबे' यांच्या नाटकात काम करण्याची सुवर्णसंधी मिळाली. एकाचवेळी निरनिराळ्या स्तरावर अनेक तऱ्हेची काम केल्यामुळे त्यांचे अनुभवविश्व समृद्ध होत होते आणि त्याच वेळी जीव ओतून केलेल्या प्रत्येक कामातून दिसणारी त्यांची अभिनयावरची निष्ठा आणि मेहनत करण्याची तयारी यामुळे एका कामातून दुसरे काम त्यांच्यासमोर नवी संधी म्हणून उभे राहत होते. 'संभोगसे संन्यासतक', 'आधेअधुरे', 'अरे मायावी सरोवर', 'आह', 'अबे बेवकूफ' ही हिंदी नाटके सत्यदेव दुबे यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांना करता आली. (१९७१–

७२) या वर्षी मुंबई परिसरातील 'मिस वनिता समाज' हा किताब त्यांनी मिळवला. अशी चौफेर वाटचाल सुरू असताना, सत्यदेव दुबेंच्या नाटकातून अभिनय करताना 'दिलीप कुळकर्णी' या अभिनेता-दिग्दर्शकांबरोबर परिचय झाला आणि २५ ऑक्टोबर १९८० साली ते विवाहबद्ध झाले.

नीना कुळकर्णी यांनी १९८१ च्या सुमारास दूरदर्शन केंद्रामध्ये निवेदक म्हणून काम केले. नीना कुळकर्णी यांच्या रंगभूमीवरील प्रवासात १९७७ साली 'हमीदबाईची कोठी' या अनिल बर्वेलिखित आणि विजय मेहता दिग्दर्शित नाटकात 'शब्बो'ची महत्त्वपूर्ण भूमिका त्यांनी केली. 'महासागर'मधील (१९७८) 'चंपू', 'सावित्री' (१९८५) , 'सवाल अंधाराचा', 'ध्यानीमनी'मधील 'शालन', 'नागमंडल'मधील 'राणी', 'अकस्मात', 'नातीगोती', 'डॉक्टर तुम्हीसुद्धा', 'प्रेमपत्र'मधील 'गुलमोहर' अशा आशयघन आणि निरनिराळ्या कौटुंबिक, सामाजिक विषयांचा सखोल वेध घेणाऱ्या नाटकांमधून नीना कुळकर्णी या गुणी अभिनेत्रीने निरनिराळ्या ढंगांच्या भूमिकांना न्याय दिला आणि त्या भूमिका अजरामर केल्या. विजया मेहता यांच्या मार्गदर्शनाने 'महासागर' या नाटकाच्या दिग्दर्शनाचा अनुभवही नीना कुळकर्णी यांनी घेतला. रंगभूमीवर विशेष प्रेम असलेल्या नीना कुळकर्णी यांना प्रेक्षकांची, रसिकांची थेट मिळणारी दाद, प्रतिसाद अधिक भावतो. त्यांचे रंगभूमीशी असलेले नायिका, चरित्रनायिका, खलनायिका अशा रूपातील नाते २९ वर्षेदृढ होते.

मराठी नाटकांखेरीज 'डॉक्टर आपभी' या हिंदी आणि 'महात्मा व्हर्सेस गांधी' या इंग्रजी नाटकात 'कस्तुरबां'ची भूमिका त्यांनी साकारली. देहबोली, संवादाची फेक, शब्दोच्चार, भाषा आणि नाटकाच्या संवादात कलाकार म्हणून अभिनयाने घातलेली भर या बळावर त्यांनी स्वतःची अभिनयक्षमता वारंवार सिद्ध केली आहे. 'रंगभूमी म्हणजे सतत शिकणं' असे मानणाऱ्या नीना कुळकर्णी यांनी मराठी चित्रपटांमधूनही काम केले. १९९३ साली प्रदर्शित झालेल्या 'सूनबाईचा भाऊ' या चित्रपटात नायिकेच्या भूमिकेने त्यांची चित्रपटसृष्टीतील कारकिर्द खऱ्या अर्थाने सुरू झाली असली तरी 'ताईच्या बांगड्या' हा त्यांचा पहिला मराठी चित्रपट. त्यानंतर त्यांनी 'सवत माझी लाडकी' (१९९३), 'हसरी', 'आई', 'पछाडलेला', 'सातच्या आत घरात', 'उत्तरायण' (२००४), 'नितळ' (२००९), 'गंध' अशा वैविध्यपूर्ण कथानक असलेल्या चित्रपटातून भूमिका केल्या. २००६ साली त्यांनी 'शेवरी' या चित्रपटाची निर्मिती केली. या चित्रपटातील 'विद्या'ची व्यक्तिरेखा त्यांनी समर्थपणे मांडली. विद्याच्या दिशाहीन झालेल्या आयुष्याला एका रात्रीत मिळालेले वळण आणि या दरम्यान मनाच्या पातळीवरची आंदोलने नीना कुळकर्णी यांनी अभिनय सामर्थ्याने जिवंत केली आहेत. या चित्रपटाला राष्ट्रीय पुरस्कार तर मिळालाच याशिवाय 'पिस'चा तुकाराम पुरस्कारही मिळाला. फेस्टिव्हल ऑफ केरळसाठी या चित्रपटाची निवड झाली होती. 'अनुमती' या २०१३ साली आलेल्या चित्रपटात छोटी पण आशयदृष्ट्या महत्त्वपूर्ण भूमिका नीना यांनी केली.

नीना कुळकर्णी यांनी मराठी चित्रपटांच्या तुलनेत हिंदी चित्रपटही मोठ्या संख्येने केले. हिंदी चित्रपटसृष्टीत 'नायकाची आई' म्हणून त्यांना 'वलय' प्राप्त झाले आहे. 'दाग-द-फायर' (१९९६), 'मिर्चमसाला' (१९८५), 'दायराँ' (१९९६), 'बादल', 'फिर भी दिल है हिंदुस्तानी', 'गुरू', 'ढाई अक्षर प्रेम के', 'हंगामा', 'पहेली' या चित्रपटात हिंदी चित्रपटसृष्टीतील कसदार अभिनेत्यांबरोबर त्यांनी काम केले. 'भूतनाथ' आणि 'रण' या चित्रपटांमध्ये अमिताभ बच्चन यांच्याबरोबरही त्यांनी काम केलेले आहे.

मुंबईच्या आंतर नाट्यस्पर्धेत रमणाऱ्या सत्यदेव दुबेंना एक उत्तम शिक्षक मानणाऱ्या आणि विजया मेहता यांच्या नाट्यविषयक दृष्टिकोनाने स्वतःची जाण समृद्ध करणाऱ्या अभिनेत्री नीना कुळकर्णी यांनी नाटक-चित्रपट-दूरदर्शन मालिका या तीनही माध्यमांची ताकद आणि मर्यादा लक्षात घेऊन त्या त्या माध्यमाशी त्या अतिशय सहजपणे एकरूप झाल्या.

'अधुरी एक कहाणी' (२००४) ही दूरदर्शन वाहिनीवरील नीना कुळकर्णी यांची पहिली मराठी मालिका होती आणि 'सारथी' ही हिंदीतील पहिली मालिका. या मालिका करण्यापूर्वी सई परांजपे यांची 'अडोसपडोस', तसेच 'हिना' (१९८५) या मालिकांमुळे या क्षेत्राची ओळख त्यांना होतीच, पण २००२ साली दिलीप कुळकर्णी यांच्या अकाली निधनानंतर मात्र नीना कुळकर्णी यांनी आपले कुटुंब सावरण्यासाठी दूरदर्शन मालिकांना प्राधान्य दिले. 'लज्जा', 'उंच माझा झोका', 'देवयानी', 'स्वामी', 'अनुभूती', 'दृष्टीदान' या मराठी आणि 'हिंदी है हम' आणि 'मेरी माँ' या हिंदी मालिकांमध्येही नीना यांनी भूमिका केल्या आहेत.

ए.आय.सी. मास्टरकार्ड, कॅटबरी, मदर डेअरी, बिस्लेरी या जाहिरातपटांमधूनही नीना कुळकर्णी यांनी आपली मोहोर उमटवली आहे. लेखन हाही त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय आहे. लोकसत्ताच्या चतुरा पुरवणीसाठी 'अंतरंग' हे सदर लिहिले (१९९४-९५) नंतर ते त्याच शीर्षकाने प्रकाशित झाले आहे.

व्यावसायिक अभिनेत्री म्हणून यश मिळवताना अनेक पुरस्कारही त्यांना मिळाले आहेत. 'अकस्मात' या नाटकासाठी सर्वोत्कृष्ट अभिनेत्री म्हणून नाट्यदर्पण, नाट्यपरिषद आणि नाट्यनिर्माता संघाचा पुरस्कार मिळाला. 'महासागर' या नाटकातील भूमिकेमुळे विशेष लक्षवेधी अभिनेत्री म्हणून पारितोषिक मिळाले. 'देहभान' या नाटकाकरिता 'म.टा.' पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. 'सवत माझी लाडकी' या चित्रपटातील 'सीमा'च्या भूमिकेसाठी आणि 'उत्तरायण'मधील भूमिकेसाठी 'सर्वोत्कृष्ट अभिनेत्री' म्हणून राज्यशासनाचा पुरस्कार मिळाला, तसेच 'आई' या चित्रपटातील 'आई'च्या सक्षम भूमिकेसाठी 'अप्सरा अ‍ॅवॉर्ड'ने त्यांना गौरवण्यात आले.

भूमिका निवडीबाबत चोखंदळ असणाऱ्या नीना कुळकर्णी यांनी साकारलेल्या बहुतांश भूमिका या गंभीर प्रवृत्तीच्या आहेत. थोडक्या पण नेटक्या भूमिका साकारण्यामागे त्यांची भूमिका पडताळून पाहण्याची, त्याचा सखोल अभ्यास करण्याची व भूमिकेच्या मूळाशी जाण्याची प्रवृत्ती असलेली दिसते. भूमिकेची परिणामकारकता त्यांच्या अभिनयातून अपरिहार्यपणे प्रेक्षकांपर्यंत पोहोचल्याशिवाय राहात नाही.

– नेहा वैशंपायन

## कोंडके, दादा

*कोंडके, श्रीकृष्ण खंडेराव*

**निर्माता, दिग्दर्शक, अभिनेता**

**८ ऑगस्ट १९३२ – १४ मार्च १९९८**



'नायका'ला शोभेल अशी शरीरयष्टी नाही, प्रभावित करेल असे रूपही नाही. तरीही 'दादा कोंडके' नावाच्या अवलियाने प्रेक्षकांवर अधिराज्य गाजवले. ज्यांच्या नावावर चित्रपट चालतात आणि प्रेक्षक पुन्हापुन्हा गर्दी करतात, अशा काही मोजक्या भाग्यवंत कलाकारांपैकी दादा एक.

दादा कोंडके यांचा जन्म मुंबईतील नायगाव परिसरातील गिरणी कामगाराच्या घरात गोकुळाष्टमीच्या दिवशी झाला, त्यामुळे त्यांचे नाव श्रीकृष्ण ठेवण्यात आले. बालपणापासूनच दादा वात्रट होते. मस्ती त्यांच्या नसानसांत भिनलेली. त्यामुळे ते राहत असलेल्या मुंबईच्या परळ, नायगाव भागात खोड्या-भांडणे करणारा म्हणूनच दादांची ओळख होती. त्यांच्या रोजच्या त्रासाला त्यांची आई, सखूबाई वैतागलेली असायची. त्यांचे वडील गिरणीत कामाला होते. भविष्यात पोराचे कसे होणार? ही चिंता दादांच्या आई-वडिलांना सतत असायची. अभ्यासातही दादांचे फारसे लक्ष नसायचे. गुंडगिरी करणाऱ्या मित्रांच्या सहवासातच त्यांचा जास्तीत जास्त वेळ जात असे.

दिवसेंदिवस वाढत जाणारा दादांचा द्वाडपणा कमी व्हावा, म्हणून मोठ्या भावाने त्यांना 'अपना बझार'मध्ये नोकरीला लावून दिले. राजाराम गोलटकर नावाच्या

नवीन चित्रपट दिग्दर्शकाकडे साहाय्यक म्हणून दादा काम करू लागले. चित्रपटांची 'सलगता' (कंटीन्युइटी) लिहिण्याचे काम करीत असताना दादांच्या हातून सतत चुका व्हायच्या. दिग्दर्शकाची येता-जाता बोलणी खाऊनही दादा या नोकरीत काही काळ तरी टिकले. याच दरम्यान दादांच्या वडिलांचे व पाठोपाठ आईचेही निधन झाले. शिक्षणात रस नसल्यामुळे दहावी परीक्षेत अनुत्तीर्ण झाल्यावर दादांनी शिक्षणाकडे कायमची पाठ फिरवली. त्यांच्या घराच्या जवळच असलेल्या श्रीकृष्ण बँड पथकामध्ये त्यांचे येणे-जाणे होते. बँड पथकाच्या शेजारी असणाऱ्या राष्ट्र सेवादलाच्या कार्यालयात मोठमोठ्या व्यक्तींचा राबता असे. त्यांना जवळून पाहता यावे म्हणून दादा सेवादलामध्ये सहभागी झाले आणि त्यांच्या सांस्कृतिक कार्यक्रमांमध्येही भाग घेऊ लागले. तिथे त्यांची निळू फुले, राम नगरकर यांच्याशी ओळख झाली. या ओळखीचे पुढे घट्ट मैत्रीत रूपांतर झाले.

कलापथक बंद पडल्यावर दादांनी स्वत:च एखाद्या लोकनाट्याची निर्मिती करून ते रंगभूमीवर आणायचे ठरवले. जवळ पैसा नसल्यामुळे, मित्रमंडळींकडून पैसे उसने घेऊन, वसंत सबनीस लिखित 'विच्छा माझी पुरी


'सोंगाड्या' चित्रपटात दादा कोंडके

करा' हे लोकनाट्य दादांनी रंगभूमीवर सादर केले. त्यात दादांनी रंगवलेल्या हवालदाराची भूमिका तुफान गाजली. प्रत्येक प्रयोगाला त्या-त्या दिवशी घडलेल्या राजकीय परिस्थितीवर ते विनोदी टीका करत. राजकीय नेत्यांचीही ते खिल्ली उडवत. हजरजबाबीपणामुळे दादांचा प्रत्येक प्रयोग रंगात येई आणि प्रेक्षक हसूनहसून बेजार होत. 'विच्छा माझी पुरी करा' या लोकनाट्यामुळे 'दादा कोंडके' हे नाव महाराष्ट्रात सर्वतोमुखी झाले. या लोकनाट्यातील दादांची भूमिका पाहून खूश झालेले चित्रतपस्वी भालजी पेंढारकर यांनी त्यांच्या 'तांबडी माती' (१९६९) या चित्रपटात दादांना संधी दिली. आशा काळे, अनुपमा यांच्याही त्यात भूमिका होत्या. मात्र, हा चित्रपट फारसा चालला नाही.

'विच्छा'च्या प्रयोगातून जमलेल्या पैशातून एखादा व्यवसाय करण्याचा दादांचा विचार होता. पण त्याऐवजी चित्रपटनिर्मिती करण्याचा सल्ला भालजींनी दादांना दिला. चित्रपटसृष्टीत नवीन असणाऱ्या दादांना, त्या काळातील नामवंत अभिनेत्रींनी त्यांच्याबरोबर चित्रपटात काम करण्यास नकार दिला. तेव्हा दादांनी उषा चव्हाण यांना नायिकेची प्रमुख भूमिका दिली. या चित्रपटाचे नाव होते


'पांडू हवालदार' चित्रपटात दादा कोंडके

‘सोंगाड्या’ (१९७१). गोविंद कुलकर्णी यांनी या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. भालजींच्याच सांगण्यावरून दादांनी अर्धी विजार, गुडघ्यापर्यंत लोंबणारी नाडी, सैल सदरा असा गबाळा ‘नायक’ साकारला आणि तो प्रेक्षकांनी डोक्यावर घेतला. ‘सोंगाड्या’ पूर्ण झाला, तरी तो प्रदर्शित करण्यासाठी कोणीच वितरक पुढे येत नव्हता. दादांनी अनेक खटपटी करून पुण्यातील ‘भानुविलास’ चित्रपटगृहामध्ये तो प्रदर्शित केला. प्रेक्षकांना तो चित्रपट एवढा आवडला की, त्याने चक्क रौप्यमहोत्सव साजरा केला. महाराष्ट्रातही ठिकठिकाणी ‘सोंगाड्या’ने तुफान यश मिळवले आणि दादा कोंडके नावाचा ‘ब्रँड’च तयार झाला. पहिल्याच चित्रपटाच्या यशानंतर दादांनी ‘एकटा जीव सदाशिव’ (१९७२), ‘आंधळा मारतो डोळा’ (१९७३), ‘तुमचं आमचं जमलं’ (१९७६), ‘मुका घ्या मुका’ (१९८८) या मराठी व हिंदी मिळून १९ चित्रपटांची निर्मिती करून त्यात भूमिकाही साकारल्या.

चित्रपटात द्व्यर्थी संवाद चपखलपणे वापरण्यात दादा तरबेज होते. या द्व्यर्थी संवादांमुळे दादांचा ‘सेन्सॉर’च्या सदस्यांशी कायमच वाद व्हायचा. अल्पावधीतच दादांनी यशस्वी नायक, निर्माता, दिग्दर्शक म्हणून मराठी चित्रपटसृष्टीत नाव मिळवले. त्यांनी स्वत:ची चित्रपट वितरणसंस्थाही निर्माण केली. दादांनी ‘अंधेरी रातमें दिया तेरे हाथ में’ (१९८५), ‘खोल दे मेरी जुबान’ (१९८६), ‘आगे की सोच’ (१९८९) या हिंदी चित्रपटांची निर्मिती केली. त्यात ते स्वत:च नायक होते. ‘चंदू जमादार’, ‘राम राम आमथाराम’ या गुजराती चित्रपटांमध्येही दादांनी नायकाची भूमिका केली. दादांच्या ‘एकटा जीव सदाशिव’ या चित्रपटावरून प्रेरणा घेऊन कन्नड चित्रपटसृष्टीतले आघाडीचे कलाकार राजकुमार यांनी ‘बंगा वरती पंजरा’ या कन्नड चित्रपटाची निर्मिती करून त्यात मुख्य भूमिकाही केली. महेश मांजरेकर यांचा ‘जिस देशमें गंगा रहता है’ हा गोविंदाची प्रमुख भूमिका असलेला चित्रपट म्हणजे दादांच्या ‘एकटा जीव’चीच हिंदी आवृत्ती होता. राजकुमार यांची प्रमुख भूमिका असलेल्या ‘सनदी अप्पण्णा’ या कन्नड चित्रपटावरून दादांनीही मराठीत ‘वाजवू का?’ हा चित्रपट केला. या चित्रपटात दादांनी सनईवादकाची व्यथा मांडणारी गंभीर भूमिका साकारली.

चित्रपटाबरोबर दादांनी राजकारणात सक्रिय होण्याचा निर्णय घेतला व ते शिवसेनाप्रमुख बाळासाहेब ठाकरे यांच्यासाठी भाषणे करू लागले. पण त्या क्षेत्रात सर्जनशील व्यक्तिमत्त्वाचा टिकाव लागला नाही. विनोदसम्राट दादांना शिकारीचाही अतिशय नाद होता. आवतीभोवती माणसांचा गोतवळा जमवून गप्पांच्या मैफली रंगवण्यात त्यांचा हातखंडा होता. रिकाम्या वेळात ते पुढील चित्रपटांच्या योजना आखत. अशाच एका नवीन चित्रपटाची तयारी करत असताना मुंबईतील दादर येथे हृदयविकाराने त्यांचा मृत्यू झाला.

– अभिजित पेंढारकर

**संदर्भ** : १) पाध्ये अनिता, ‘एकटा जीव’, अनुबंध प्रकाशन, पुणे; २०११.

## कोंडके, विजय धोंडीराम
**निर्माता, वितरक, दिग्दर्शक**
**१९ जुलै १९४९**



विजय कोंडके म्हणजे विख्यात विनोदी नट दादा कोंडके यांच्या मोठ्या भावाचा मुलगा. शेवंताबाई व धोंडीराम या दांपत्याच्या पोटी विजय यांचा जन्म मुंबई येथे झाला. मात्र त्यांचे शालेय शिक्षण हिंगवली, उरळीकांचन आणि भोर या ठिकाणी पार पडले. महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी ते पुण्यात आले. पुण्याच्या गरवारे महाविद्यालयामधून १९७१ मध्ये ते बी.कॉम. झाले. त्याच काळात दादांनी ‘सोंगाड्या’ हा पहिला चित्रपट निर्माण केला. पण सोंगाड्याला वितरक मिळेना. तेव्हा स्वत:च सोंगाड्याचे वितरण करायचे दादांनी ठरवले. पण वितरणाची काहीच कल्पना नसल्याने वितरणातील एका

अनुभवी माणसाला नेमून त्यांच्या हाताखाली विजय कोंडके यांना वितरण शिकण्यासाठी नेमले.

दादांचे वितरण कार्यालय तेव्हा पुण्यात होते. थोड्याच दिवसात विजय कोंडके यांनी वितरणाची बरीचशी माहिती जमवली. चित्रगृहवाल्यांच्या ओळखी करून घेतल्या आणि 'एकटा जीव सदाशिव' या दादांच्या दुसऱ्या चित्रपटाचा कोल्हापुरात मुहूर्त केला, तेव्हा त्यांनी विजय कोंडके यांना आपल्या वितरणाचे प्रमुख नेमले. विजय कोंडके यांनी साऱ्या महाराष्ट्रात फिरून चित्रगृहवाल्यांशी ओळख करून घेतली आणि वितरण क्षेत्रात आपला जम बसविला. नंतर ते निर्मितीकडे वळले. विजय कोंडके यांनी 'मला घेऊन चला' (१९८८), 'पळवापळवी' (१९८९) हे दोन चित्रपट निर्माण केले. दोघांचेही दिग्दर्शन आणि प्रमुख भूमिका दादा कोंडके यांची होती. यानंतर विजय कोंडके यांनी दिग्दर्शनात उतरायचे ठरवले आणि १९९१ मध्ये 'माहेरची साडी' हा कौटुंबिक चित्रपट दिग्दर्शित केला. कामगाराच्या कुटुंबाची ही कथा. त्यामुळे समाजात ज्याला तळागाळाचा वर्ग म्हणतात, त्या वर्गाने 'माहेरची साडी'ला गर्दी केली. या चित्रपटाने मराठी चित्रपट उत्पन्नाचे सर्व उच्चांक मोडले.

– सुधीर नांदगांवकर

## कोठारे, महेश अंबर

**निर्माता, दिग्दर्शक, अभिनेता**

**२८ सप्टेंबर १९५७**

बालकलाकार म्हणून चित्रपटसृष्टीत प्रवेश केलेल्या व्यक्तीने पुढच्या आयुष्यात निर्माता आणि दिग्दर्शक म्हणून यशस्वी कारकिर्द घडविल्याचा अनुभव विरळाच. महेश अंबर कोठारे यांनी मात्र आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर ही कामगिरी करून दाखविली.

महेश कोठारे यांचे वडील अंबर आणि आई सरोज कोठारे हे नाट्य अभिनेते. प्रसिद्ध अभिनेते गजानन जागीरदार यांच्याशी त्यांची ओळख होती. एका भेटीदरम्यान जागीरदार यांनी छोट्या महेशना पाहिले. त्या



वेळी 'छोटा जवान' या चित्रपटासाठी एक चुणचुणीत मुलगा हवा होता. चुणचुणीत आणि गोरेपान महेश त्यांना आवडले आणि त्यांनी चित्रपटासाठी महेश यांचे नाव सुचवले. महेश यांनी हे काम झोकात केले. त्या वेळी राज्य चित्रपट पुरस्कारांमध्ये बालकलाकारांसाठी वेगळा पुरस्कार नव्हता. तरीही महेश यांचे काम बघून त्यांना विशेष पुरस्कार देण्यात आला. त्यानंतर महेश यांना अनेक हिंदी चित्रपटांत भूमिका मिळाल्या. 'मेरे लाल'साठी आंध्र सरकारचा पुरस्कार, 'घर घर की कहानी'साठी राष्ट्रीय पुरस्कारासाठी नामांकन, असे मानसन्मानही त्यांना मिळाले. 'राजा और रंक' आणि 'मेरे लाल' या चित्रपटांत तर त्यांच्यासाठी खास भूमिका लिहिल्या गेल्या. त्याशिवाय रौप्यमहोत्सवी 'छोटा भाई', 'सफर' आदी चित्रपटही झाले. 'संत निवृत्ती ज्ञानदेव' या चित्रपटात त्यांनी ज्ञानेश्वराची भूमिका केली, चित्रपटात काम करतानाही शिक्षणाकडे दुर्लक्ष करायचे नाही, असा आईवडिलांचा दंडक होता. त्यामुळे महेश कोठारेंनी शिक्षण पूर्ण केले. नंतर कायद्याची पदवीही घेतली. तीन वर्षे यशस्वी वकिलीसुद्धा केली. दरम्यानच्या काळात 'प्रीत तुझी माझी' या चित्रपटांतून त्यांनी नायक म्हणून चित्रपटसृष्टीत पदार्पण केले. प्रभाकर पेंढारकर (दिनेश) हे त्या चित्रपटाचे दिग्दर्शक होते. त्यानंतर 'चांदणे शिंपीत जा', 'गुपचूप गुपचूप', 'थोरली जाऊ', 'लेक चालली सासरला' अशा चित्रपटांतही त्यांनी नायकाच्या भूमिका साकारल्या. ७-८ गुजराथी चित्रपटही त्यांनी केले.

स्वत: चित्रपटाची निर्मिती आणि दिग्दर्शन करण्याची इच्छा त्यांच्या मनात आधीपासूनच होती. अखेर १९८५ साली 'धूमधडाका'मधून त्यांनी हे धाडस केले. त्या वेळी त्यांच्या आईवडिलांनीही पाठिंबा दिला होता. 'बँक ऑफ महाराष्ट्र'ने साडेसहा लाखांचे कर्ज दिल्यानंतर कोठारे यांना हुरूप आला. 'प्यार किये जा' या



'झपाटलेला' चित्रपटात डावीकडील महेश कोठारे

चित्रपटावरून प्रेरणा घेऊन त्याचे उत्तम मराठीकरण करण्यात महेश कोठारे आणि लेखक अण्णासाहेब देऊळगावकर यांना यश आले. त्याशिवाय कॅमेरामन सूर्यकांत लवंदे, संकलक एन.एस. वैद्य यांनीही माफक मानधन घेऊन काम करण्याची तयारी दाखवली होती. शरद तळवलकर, अशोक सराफ हे तेव्हा नावाजलेले कलाकार होते. लक्ष्मीकांत बेर्डे यांचा एका नाटकातील अभिनय बघून कोठारेंनी त्यांना एक रुपया लाक्षणिक रक्कम (टोकन) देऊन नव्या चित्रपटासाठी करारबद्ध करून टाकले होते. 'धूमधडाका'मधून त्यांनी लक्ष्मीकांत बेर्डे यांना पडद्यावर आणले आणि बेर्डे मराठी प्रेक्षकांच्या गळ्यातला ताईत बनले. चित्रपट पूर्ण झाल्यानंतर त्याची दुसरी प्रत काढण्यासाठीही कोठारेंकडे पैसे नव्हते, पण 'ॲडलॅब्ज' या स्टुडिओचे मालक मनमोहन शेट्टी यांनी त्यांना आगाऊ पैसे न घेता प्रिंट उपलब्ध करून दिली. पुण्यात 'विजय टॉकिजला' हा चित्रपट प्रदर्शित झाला आणि तुफान गाजला. त्यानंतर महेश कोठारेंनी 'दे दणादण', 'थरथराट', 'धडाकेबाज', 'झपाटलेला' अशा लोकप्रिय चित्रपटांचा धडाकाच लावला.

प्रत्येक चित्रपटात वेगळे प्रयोग करणे आणि नवनवीन तंत्रज्ञान आणणे, हेसुद्धा कोठारेंचे वैशिष्ट्य होते. त्यांनी 'धडाकेबाज'मधून फँटसी मराठीत आणली, तसेच पहिला सिनेमास्कोप आणि फोर ट्रॅक साऊंडचा प्रयोग केला. 'झपाटलेला' हा हिंदी, गुजराथी भाषेत डब झालेला पहिला मराठी चित्रपट. त्यात त्यांनी बोलक्या बाहुल्यांच्या कलेला पडद्यावर स्थान मिळवून दिले. 'चिमणी पाखरं'मधून डॉल्बी डिजिटल साऊंडचा प्रयोगही त्यांनी यशस्वीपणे केला, तर 'पछाडलेला'मध्ये कॉम्प्युटर ग्राफिक्स वापरून प्रेक्षकांचा थरकाप उडवला. 'मासूम' आणि 'लो मै आ गया' असे दोन हिंदी चित्रपटही त्यांनी दिग्दर्शित केले. पाच अक्षरी शीर्षक, मनोरंजनाचा यशस्वी फॉर्म्युला, विचित्र नावांचे आणि लकबींचे खलनायक, ही कोठारेंच्या चित्रपटांची वैशिष्ट्ये. त्यांच्याच गाजलेल्या 'झपाटलेला'मधील 'तात्या विंचू' या खलनायकावर बेतलेल्या 'झपाटलेला २' या मराठीतील पहिल्या ३ डी चित्रपटाची निर्मिती

त्यांनी केली. हा चित्रपट विलक्षण लोकप्रिय ठरला.

अभिनय, दिग्दर्शन आणि निर्मिती या क्षेत्रांमध्ये केवळ प्रवेश न करता, या माध्यमांच्या मुळाशी जाऊन, त्याचा अभ्यास करून त्यात प्रयोगशीलता आणण्याचे कौशल्य महेश कोठारे यांच्याकडे आहे, हे त्यांचे चित्रपट पाहताना सहज लक्षात येते. म्हणूनच त्यांचे मराठी चित्रपटसृष्टीला लाभलेले हे योगदान महत्त्वपूर्ण ठरते.

– अभिजित पेंढारकर

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## कोरगावकर, दत्ता

*के. दत्ता*

**संगीतकार**

**४ जून १९०८ – २३ डिसेंबर १९७८**

संगीतातील ज्येष्ठतेमुळे संगीतकार सी. रामचंद्र, वसंत देसाई, दत्ता डावजेकर वगैरे मराठी संगीतकारांकडून वरंवार वाहवा मिळवणारे संगीतकार म्हणजे के. दत्ता. चित्रपटसृष्टीत के. दत्ता म्हणून परिचित असणारे दत्ता कोरगावकर यांचे घराणे सातारा जिल्ह्यातील कोरेगावचे. गावातले कुलकर्णीपण करणारे त्यांचे आजोबा गोव्यामध्ये जाऊन राहिले. तेथेच के. दत्ता यांचा जन्म झाला. दत्ता कोरगावकर यांचे वडील वारंवार नोकरी बदलत असल्यामुळे पडणाऱ्या शिक्षणातील खंडामुळे सावंतवाडी येथे कायमचे बिऱ्हाड करण्याचे ठरवले. म्हणून दत्ता यांचे शालेय शिक्षण सावंतवाडी येथेच पार पडले. तेथेच त्यांच्या घराशेजारी एक गवई राहत. त्या गवयाचा रियाझ ऐकून दत्ता यांनाही संगीताची गोडी लागली. ते हार्मोनियम व पायपेटी वाजवून गाणे म्हणू लागले.

शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर महाविद्यालयीन शिक्षणासाठी व सोबत नोकरी करण्याच्या निमित्ताने दत्ता मुंबईत स्थिरावले. पण महाविद्यालयीन शिक्षणापेक्षा संगीताकडे त्यांचा कल असल्याने ते गांधर्व महाविद्यालयामध्ये व बी.आर. देवधरांच्या संगीताच्या शिकवण्यांमध्ये जास्त वेळ उमेदवारी करत असल्यामुळे त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण संपुष्टात आले व त्यांना आपोआपच संगीताची दारे खुली झाली.

१९३७ च्या दरम्यान मा. विनायक मुंबईत फिल्म सिटीत ‘धर्मवीर’ या चित्रपटाचे चित्रीकरण करीत होते, तेव्हा दत्ता यांच्या तेथे वाऱ्या चालत. या दरम्यानच चित्रपटाची नायिका थोडी बेसूर होत असल्याचे दत्ता यांनी संगीत दिग्दर्शक अण्णासाहेब माईणकर यांच्या नजरेस आणून दिले. त्यांची संगीतातील जाण बघून खूश झालेल्या मा. विनायक यांनी त्यांचे नाव चित्रपटाच्या हजेरी पटावर लावून घेतले. पुढे ‘प्रेमवीर’ या चित्रपटाच्या वेळेसही ते हजेरी पटावर होते. ‘प्रेमवीर’ या चित्रपटापासून मराठी चित्रपटात पार्श्वगायनाची सुरुवात झाली. मा. विनायक १९३८ मध्ये ‘ब्रह्मचारी’ या चित्रपटाच्या निमित्ताने कोल्हापूरला आले. त्याच स्टुडिओत सुरू असलेल्या ‘चंद्रराव मोरे’ नावाच्या मराठी चित्रपटासाठी संगीत दिग्दर्शक म्हणून विनायक यांनी के. दत्ता यांच्या नावाची शिफारस केली. हाच त्यांचा पहिला स्वतंत्र चित्रपट. याच वेळी त्यांनी दत्ता कोरगावकर हे आपले मूळ नाव बदलून के. दत्ता हे नाव धारण केले.

हंस पिक्चर्सतर्फे १९३९ मध्ये मराठीत ‘सुखाचा शोध’ तर हिंदीत ‘मेरा हक’ हे चित्रपट प्रदर्शित झाले. या दोन्ही चित्रपटांना के. दत्ता यांचेच संगीत होते. त्यानंतर सिर्को कंपनीचा ‘गीता’ (हिंदी/मराठी) ‘गोरा कुंभार’, भालजी पेंढारकरांचे ‘गोरखनाथ’ (मराठी), ‘अलख निरंजन’ (हिंदी), ‘सूनबाई’, ‘महात्मा विदुर’ (हिंदी/मराठी) असे अनेक चित्रपट दत्ता यांनी केले. नंतरच्या काळात ते प्रामुख्याने हिंदीत स्थिरावले. नूरजहाँची चार गाणी असलेला ‘नादान’, मझहर खान यांचा ‘याद’, मा. विनायक यांचा ‘बडी माँ’ हे चित्रपटही के. दत्ता यांनी केले. ‘बडी माँ’मध्ये नायिका नूरजहाँ असली तरी लता मंगेशकर यांची या चित्रपटात छोटीशी भूमिका होती. तेव्हा या चित्रपटाचे संगीत खूप गाजले.

के. दत्ता यांनी मराठी चित्रपटांनाही संगीत दिले होते. त्यात बाबूराव पै यांच्या ‘गळ्याची शपथ’, तसेच

'जमीन' व 'महारथी कर्ण' या चित्रपटाचेही संगीत दिग्दर्शन केले. पुढे 'सोनेरी सावली' व 'कलगी तुरा' या चित्रपटानंतर बऱ्याच कालावधीने त्यांनी 'रायगडचा राजबंदी' हा चित्रपट केला. तोच त्यांच्या अखेरचा मराठी चित्रपट. प्रकृतिअस्वास्थ्यामुळे त्यांना 'अजनबी' या (हिंदी) चित्रपटाचे संगीत अर्धवट सोडावे लागले.

मुंबई येथे हृदयविकाराच्या तीव्र झटक्याने के. दत्ता यांचे निधन झाले.

– शशिकांत किणीकर

## कोल्हटकर, चिंतामण गणेश

**चरित्र अभिनेता, दिग्दर्शक**

**१२ मार्च १८९९ – २३ नोव्हेंबर १९५९**

**☞ मुख्य नोंद – नाटक खंड**



चिंतामण गणेश कोल्हटकर यांच्या वडिलांचे लहानपणीच निधन झाल्यामुळे चिंतामणरावांच्या शिक्षणाची परवड झाली. त्यांनी १९११ साली महाराष्ट्र नाटक मंडळीत प्रवेश केला आणि पुढे मा. दीनानाथ मंगेशकरांच्या समवेत बलवंत नाटक मंडळीची स्थापना केली. १९३१ सालात चित्रपट बोलू लागला आणि नाटक मंडळे धंदा गमावून बसली. बलवंत नाटक मंडळीने कात टाकून बलवंत पिक्चर्सची स्थापना केली. सांगली येथे स्टुडिओ उभा करून 'कृष्णार्जुन युद्ध' हा बोलपट तयार केला. त्यांनी विश्राम बेडेकरांच्या मदतीने या चित्रपटाचे दिग्दर्शन केले.

भालजी पेंढारकरांनी १९३६ मध्ये 'कान्होपात्रा' या चित्रपटाची निर्मिती केली. त्या प्रसंगी खलनायकाच्या भूमिकेसाठी चिंतामणरावांना बोलवून घेतले. प्रेक्षकांनी त्यांच्या कामाची प्रशंसा केली. त्याच वर्षात बेडेकरांनी 'अंधेरी दुनिया' हा हिंदी चित्रपट काढला. त्यात चिंतामणरावांनी कैद्याची भूमिका रंगवली होती.

'सूनबाई' (१९४२) हा भालजींचा अत्यंत गाजलेला बोलपट. चिंतामणरावांचे काम आणि भालजींचा पहिला सामाजिक चित्रपट असल्यामुळे हा चित्रपट भरपूर चालला. 'वसंतसेना' ही आचार्य अत्रे यांची भव्य चित्रकृती. शूद्रकांच्या 'मृच्छकटिक' या संस्कृत नाटकावरती ती बेतली होती. त्यातील खलनायक – शकाराची भूमिका चिंतामणरावांनी विनोदी पद्धतीने केली. त्यांच्या तोंडी एक गाणे होते 'वसंतसेना राणी माझी सौंदर्याची गोणी'. पडद्यावर हे गाणे व दृश्य दिसताच प्रेक्षकांतून हास्याचा व टाळ्यांचा कडकडाट होत असे.

भालजींनी 'सूनबाई'चा उत्तरार्ध म्हणून 'सासुरवास' काढला. त्यातही चिंतामणरावांनी सासऱ्यांची भूमिका सजवली होती. 'सासुरवास'ची भट्टी जमली नव्हती. पण अच्युत रानडे यांच्या 'जागा भाड्याने देणे आहे' या विनोदी चित्रपटातील त्यांची घरमालकाची व्यक्तिरेखा प्रेक्षकांच्या पसंतीस आली. 'मानाचे पान', 'माझा राम', 'मोठी माणसं', 'वासुदेव बळवंत', 'मी दारू सोडली', 'स्वराज्याचा शिलेदार' अशा चित्रपटातही चिंतामणराव यांनी कामे केली.

चिंतामणराव यांनी केलेल्या रंगभूमीच्या सेवेसाठी त्यांना राष्ट्रपतींकडून सुवर्णपदक प्रदान करण्यात आले. चिंतामणराव यांनी लिहिलेल्या 'बहुरूपी' या आत्मचरित्रास साहित्य अकादमीने १९५८ साली पारितोषिक देऊन गौरवले.

– द.भा. सामंत

* * *

# ख





## खरे, संदीप दिलीप

**कवी, गीतकार**

**१३ मे १९७३**



युवा पिढीतील लोकप्रिय गीतकार-कवी म्हणून संदीप खरे सर्वपरिचित आहेत. आपल्या रचनांवर तरुण पिढीला हजारोंच्या संख्येने झुलवण्याचे सामर्थ्य संदीप यांच्या गीतांना व कवितांना लाभले आहे. सोपी पण अर्थवाही, तसेच आजच्या पिढीच्या थेट परिचयाची भाषा आणि अभिव्यक्ती हे संदीप खरे यांच्या गीतांचे वैशिष्ट्य आहे.

संदीप खरे यांचा जन्म पुण्यात झाला. अभियांत्रिकी पदविकाधारक असलेल्या संदीप खरे यांनी महाविद्यालयीन दिवसांपासूनच आपल्या वेगळ्या कवितांनी लक्ष वेधून घेतले. मुद्रण हक्क म्हणून काम केल्यावर ‘चकवा’ या चित्रपटातून संदीप यांनी चित्रपट क्षेत्रात गीतकार म्हणून पदार्पण केले. ‘आनंदीआनंद’, ‘निशाणी डावा अंगठा’, ‘हाय काय नाय काय’, ‘जमीन’, ‘हापूस’, ‘तुला शिकवीन चांगलाच धडा’, ‘कालचक्र’, ‘जावईबापू झिंदाबाद’, ‘जनगणमन’, ‘मोरया’, ‘बदाम राणी गुलाम चोर’ असे २५ चित्रपट संदीप खरे यांच्या गीतांनी सजले आहेत. संगीतकार सलील कुलकर्णी यांच्यासोबत त्याची जोडी सर्वाधिक यशस्वी ठरली आहे.

तसेच त्यांनी ‘ताक धिना धिन’, ‘वहिनीसाहेब’, ‘बिनधास्त’, ‘अशी ही माहेरची साडी’, ‘झेप’, ‘जिवलगा’ या मालिकांसाठी गीतलेखन केले आहे.

कवी म्हणून संदीप खरे यांचे ‘कॅलिडोस्कोप’, ‘कधीतरी वेड्यागत’, ‘आयुष्यावर बोलू काही’, ‘अग्गोबाई ढग्गोबाई’, ‘कधी हे कधी ते’, ‘नामंजूर’, ‘दमलेल्या बाबाची कहाणी’, ‘सांग सख्या रे’, ‘संधिप्रकाश’, ‘हृदयामधले गाणे’ आदी अल्बम तसेच रंगमंचीय कार्यक्रमही लोकप्रिय आहेत. त्यांचे ‘मौनाची भाषांतरे’, ‘नेणिवेची अक्षरे’ आणि ‘तुझ्यावरच्या कविता’ हे कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. झी टी.व्ही. गौरव पुरस्काराचे ते मानकरी ठरले आहेत.

– जयश्री बोकील

## खेडेकर, सचिन श्रीकांत

**अभिनेता**

**१४ मे १९६५**



मराठी रंगभूमीच्या तालमीतून तयार झालेल्या अभिनेत्यांनी मराठी चित्रपटसृष्टीला प्रगल्भतेच्या वळणावर आणून सोडले. मध्यमवयीन, घरंदाज पुरुषाला शोभेल असा चेहरा, विरळ होत जाणारे केस, कपाळावरचा लक्षात येण्याजोगा तीळ आणि चेहऱ्यावरचे प्रसन्न हास्य, या रूपात ‘सचिन खेडेकर’ यांनी साकारलेल्या मराठी चित्रपटातल्या मध्यमवयीन पुरुषांच्या सर्वच भूमिका यशस्वी ठरल्या.

मुंबईतल्या विलेपार्ले येथे सचिन श्रीकांत खेडेकर यांचा जन्म झाला. या जन्मभूमीनेच त्यांना अभिनय क्षेत्राची वाट दाखवली. सांस्कृतिकदृष्ट्या सजग

असलेल्या या परिसरात खेडेकर वाढले ते साहित्य, कला, नाटक, संगीत यांचे बाळकडू घेऊनच.

विलेपार्लेमधील वेगवेगळ्या सेवाभावी संस्था, तसेच लोकमान्य सेवा संघाच्या वतीने होणाऱ्या नाट्यप्रयोगात खेडेकर प्रत्यक्ष सहभागी होऊ लागले. त्यांचे शालेय शिक्षण पार्ले टिळक विद्यालय येथे झाले. त्यांनी थदुमल शहानी कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग येथून पर्यावरण अभियांत्रिकीची पदविका संपादन केली. खेडेकरांना नाट्य अथवा चित्रपटसृष्टीत येण्यासाठी कोणतीच कौटुंबिक पार्श्वभूमी नव्हती.

सचिन खेडेकर पाच वर्षांचे असताना त्यांच्या वडिलांचे निधन झाले व सचिन व त्यांचा लहान भाऊ अशा दोन मुलांचा सांभाळ करण्याची जबाबदारी त्यांच्या आई मंदा खेडेकर यांच्यावर येऊन पडली. खेडेकर यांच्या आई 'इंडियन एअरलाईन्स'मध्ये नोकरी करत होत्या. अभिनयासारख्या बेभरवशाच्या क्षेत्रात खेडेकर त्यांच्या आईने दिलेल्या पाठिंब्यामुळेच उभे राहू शकले.

एका विद्यार्थी शिबिरात ५ नोव्हेंबर या 'रंगभूमी दिनाच्या' निमित्ताने खेडेकरांनी 'एकच प्याला' या नाटकातील 'रामलाल' या पात्राची भूमिका साकारली. हा त्यांचा पहिला नाट्यप्रवेश होता आणि या भूमिकेपासून त्यांचा अभिनयक्षेत्रातील प्रवास सुरू झाला. या प्रवासात त्यांचे गुरू 'विनय आपटे' यांनी खेडेकरांना वेळोवेळी साथ दिली. महाविद्यालयीन काळात त्यांचा अभिनयक्षेत्रातील प्रवास जोमाने सुरू झाला. विनय आपटे, सई परांजपे, वामन केंद्रे, महेश मांजरेकर अशा गुरुस्थानी असलेल्या दिग्गजांबरोबर त्यांना काम करण्याची संधी मिळाली.


'काकस्पर्श' या चित्रपटातील हरिभाऊंच्या भूमिकेत सचिन खेडेकर

'अफलातून' या विनय आपटे व विक्रम भागवत दिग्दर्शित नाटकातून त्यांनी मराठी रंगभूमीवर आपला पहिला ठसा उमटवला. त्यानंतर 'दुसरा सामना', 'मी राष्ट्रपती', 'वाडा चिरेबंदी', 'आपसातल्या गोष्टी', 'तुझ्या-माझ्यात', 'मौन रंग' अशा मराठी नाटकांतून त्यांनी भूमिका साकारल्या. मराठी रंगभूमीसोबतच त्यांनी हिंदी व गुजराती रंगभूमीवरही तितक्याच सहजपणे काम केले. १९९७ मधील चंद्रकांत कुलकर्णी दिग्दर्शित 'डॉक्टर आप भी' व १९९५ मधील निखिलेश शर्मा दिग्दर्शित 'श्याम रंग' ही त्यांची नाटके विशेष गाजली.

सचिन खेडेकरांनी सर्वप्रथम जनसामान्यांच्या मनात प्रवेश मिळवला तो १९८९ साली दूरदर्शनवर आलेल्या विनय आपटे दिग्दर्शित 'चाळ नावाची वाचाळ वस्ती' या मालिकेद्वारे. मराठी मालिकांप्रमाणेच 'इम्तेहान' आणि 'सैलाब' या त्यांच्या हिंदी मालिकाही विशेष लोकप्रिय ठरल्या. रवी राय हे 'इम्तेहान' या हिंदी मालिकेचे दिग्दर्शक खेडेकरांचे दूरदर्शन मालिका क्षेत्रातील गुरू ठरले. रंगभूमी, दूरचित्रवाणीचा छोटा पडदा व चित्रपटांच्या मोठ्या पडद्यावरही ते सारख्याच मोकळेपणाने व सहजतेने वावरले. विशेषत: दूरचित्रवाणीवरील त्यांचा अभिनय त्यांच्या उत्तम माध्यमसाक्षरतेची साक्ष देतो. म्हणूनच वेगवेगळ्या हिंदी व मराठी मालिकांद्वारे खेडेकरांचे मराठी प्रेक्षकांच्या मनातील स्थान अधिक पक्के झाले.

१९८८ मध्ये पद्मनाभ यांनी दिग्दर्शित केलेल्या 'विधिलिखित' या चित्रपटाद्वारे खेडेकरांचे मराठी चित्रपटसृष्टीत पदार्पण झाले. महेश मांजरेकर दिग्दर्शित 'अस्तित्व' (२०००), 'चिमणी पाखरे' (२००१), 'मी शिवाजी राजे भोसले बोलतोय' (२००९), 'शिक्षणाच्या आयचा घो' (२०१०), 'ताऱ्यांचे बेट' (२०११), 'लालबाग परळ' (२०१०), 'काकस्पर्श' (२०१२) हे त्यांचे विशेष गाजलेले चित्रपट. यांपैकी 'मी शिवाजी राजे भोसले बोलतोय' यातील 'दिनकरराव' या सामान्य मराठी माणसाच्या भूमिकेला प्रेक्षकांनी भरभरून दाद दिली. त्यांच्या या भूमिकेला सर्वोत्कृष्ट अभिनयाच्या जवळजवळ सर्वच महत्त्वाच्या पुरस्कारांनी गौरवण्यात आले. 'मी शिवाजी राजे भोसले बोलतोय'ला २०१० चा 'मिफ्ता' पुरस्कार मिळाला. २०१२ मध्ये प्रदर्शित झालेल्या 'महेश मांजरेकर' दिग्दर्शित 'काकस्पर्श' या चित्रपटातील खेडेकरांची 'हरिभाऊ' ही भूमिका विशेष लक्षात राहण्याजोगी आहे. परंपरा, प्रेम आणि सुधारक या तीन पातळ्यांवरून जाणारी ही भूमिका खेडेकरांनी सक्षमपणे साकारली.

मराठीप्रमाणेच हिंदी चित्रपटांमधील त्यांच्या अनेक लहानमोठ्या साहाय्यकारी भूमिकांनी हिंदी चित्रपटसृष्टीलाही त्यांची दखल घेणे भाग पाडले. १९९७ मधील हसन मेहता यांनी दिग्दर्शित केलेला 'जयते', महेश मांजरेकर दिग्दर्शित 'पिताह', संजय झा दिग्दर्शित 'प्राण जाये पर शान ना जाये' या चित्रपटातील त्यांच्या भूमिका संस्मरणीय ठरल्या. 'गुरू', 'कालचक्र', 'यू मी और हम', 'सिंघम' अशा अनेक हिंदी चित्रपटांतून त्यांनी भूमिका साकारल्या.

सचिन खेडेकरांचा अभिनय केवळ मराठी व हिंदी पुरताच मर्यादित राहिला नाही, तर तमिळ, मल्याळम, गुजराती, इंग्रजी अशा विविध भाषांतील चित्रपटांत पाहायला मिळतो. तमिळमधील 'दैवा थिरूमंगल', मल्याळममधील 'पोलिस', गुजरातीतील 'पैसो मारो परमेश्वर' व तसेच इंग्रजीतील 'ए पॉकेटफुल ऑफ ड्रीम' अशा त्यांच्या इतर भाषेतील चित्रपटांची नावे सांगता येतील. 'क्रिश ३' या हिंदी व 'प्रेम म्हणजे प्रेम म्हणजे प्रेम असतं' या मराठी चित्रपटातही ते दिसले, तर 'कोकणस्थ'मधील त्यांची भूमिकाही लक्षणीय ठरली.

नट हे चित्रपटाचा आशय प्रेक्षकांपर्यंत पोहोचवणारे माध्यम असते. नटाला दिग्दर्शकाच्या मनातील कल्पनांना पडद्यावर अभिनित करायचे असते. या 'नटा'बद्दलच्या संकल्पना सुस्पष्ट असणारे सचिन खेडेकर हे एक जाणते कलाकार तर आहेतच, त्याचबरोबर सर्वच माध्यमांना सहजपणे आत्मसात करणारे 'माध्यममित्र'ही आहेत.

– मनश्री पाठक

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## खेबुडकर, जगदीश गोविंद

**गीतकार**

**१० मे १९३२ - ३ मे २०११**



कविवर्य जगदीश खेबुडकर हे कोल्हापूरजवळच्या खेबवडे या गावाचे. त्यांचे वडील प्राथमिक शाळेत शिक्षक होते. गावी थोडीफार शेती व गाईगुरे अशा वातावरणात ते वाढले. १९४८ साली गांधीवधानंतर झालेल्या जाळपोळीत त्यांचेही घर जाळण्यात आले. सारे कुटुंब उघड्यावर आले आणि त्या आत्यंतिक वेदनेतून त्यांची पहिली कविता जन्माला आली - 'मानवते, तू विधवा झालीस!'

खेबुडकर १९५३ मध्ये मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण होऊन एका औषधाच्या कंपनीत नोकरी करू लागले. १९५६ मध्ये एस.टी.सी. होऊन ते शिक्षक झाले. पुढे आयुष्यभर त्यांनी शिक्षकाचीच नोकरी केली. त्यादरम्यान कविता लिहिणे चालूच होते. सांगली आकाशवाणीसाठी त्यांनी काही गाणी लिहिली. संगीतकार वसंत पवार यांनी त्यांची काही गाणी स्वरबद्ध केली. ती गाणी चित्रपटासाठी नव्हती. गाण्यावर अदाकारी करून पोट भरणाऱ्या कोल्हापूरच्या गरीब कलावंतिणींना ही गाणी पवारांनी फुकट देऊन टाकली होती. पण वसंत पवारांनीच त्यांना चित्रपटासाठी गाणी लिहायची पहिली संधी लवकरच दिली. १९६२ मध्ये निघालेल्या 'रंगल्या रात्री अशा' या संगीतप्रधान चित्रपटासाठी पवारांनी खेबुडकरांकडून प्रथमच तीन लावण्या लिहून घेतल्या.

वसंत पवारांचे बोट धरून खेबुडकर चित्रपटसृष्टीत आले खरे, पण त्यांचे खरे सूर जमले ते पवारांचे शिष्य संगीतकार राम कदम यांच्याशीच! संगीतकार राम कदम व गीतकार खेबुडकर यांच्या 'शब्दसुरां'च्या मिलाफाने मराठी रसिकांना जवळजवळ दोन दशके मनमुराद आनंद दिला. या काळातील बहुतेक मराठी चित्रपट ग्रामीण पार्श्वभूमीचे असल्यामुळे त्यातील गाणी ही अस्सल मराठमोळी-ग्रामीण समाजजीवनाची, सणांची, चालीरीतींची, रूढी-परंपरांची अशी होती. त्यात गणगौळण, सवालजवाब, झगडे, भूपाळी, भारूड, विराणी, वासुदेव, कीर्तन, नागोबाची-हादग्याची, मंगळागौरीची-हळदीची-लग्नाची गाणी, मोटेवरची गाणी, कोळीगीते, धनगराची गाणी, डोंबाऱ्याची गाणी, लेझीम, शेतकरी गीत असे अस्सल मराठी मातीचे असंख्य गीतप्रकार होते. खेबुडकरांनी हे सारे गीतप्रकार अतिशय समर्थपणे शब्दबद्ध केले.

तमाशा हा मराठी मातीचा वारसा. तो जपण्यासाठी खेबुडकरांनी अथकपणे असंख्य लावण्या लिहिल्या. ग.दि. माडगूळकरांनंतर तेवढ्याच समर्थपणे आणि ताकदीने खेबुडकरांनी लावण्या लिहिल्या. माडगूळकरांप्रमाणेच त्यांनीही लावणी लिहिताना लेखणीचा आब व तोल साधला. अभिजाततेचा व कलात्मकतेचा स्पर्श असलेल्या लावण्या खेबुडकरांनी लिहिल्या. आयुष्यात तमाशा कधीही न बघितलेल्या खेबुडकरांनी एकापेक्षा एक फर्मास व फाकडू लावण्या लिहिल्या, ही वैशिष्ट्यपूर्ण देणगी त्यांना लाभली होती. गदिमा, सुधीर फडके व राजा परांजपे या त्रिकुटाप्रमाणेच राम कदम, अनंत माने व जगदीश खेबुडकर हे त्रिकूटही मराठी चित्रपटसृष्टीत गौरवास्पद ठरले.

शांतारामबापू, भालजी यांच्यापासून अगदी लहानसहान निर्मात्यापर्यंत अनेक चित्रपटांची गाणी त्यांनी कुशलपणे लिहिली. मराठी चित्रपटांसाठी त्यांनी ६० वर्षे अव्याहतपणे ३५० चित्रपटांसाठी सुमारे २७५० गाणी लिहिली. साठहून अधिक संगीतकारांसाठी गाणी लिहिणारे ते एकमेव गीतकार होते. व्ही. शांताराम दिग्दर्शित 'पिंजरा'ची गाणी सर्वात गाजली.

सुमारे २६ चित्रपटांचे कथा-पटकथा-संवाद त्यांनी लिहिले होते, तर 'देवघर' नावाच्या चित्रपटाची निर्मितीही त्यांनी केली होती. गेल्या तीन पिढ्यांचे ते लोकप्रिय गीतकार होते. 'सवाल माझा ऐका' (१९६५), 'केला इशारा जाता जाता' (१९६६), 'आम्ही जातो अमुच्या गावा' (१९६८), 'गणगौळण' (१९६९),

'भोळीभाबडी'(१९७२), 'सुगंधी कट्टा' (१९७३), 'बायकांनो नवरे सांभाळा' (१९७४), 'बाळा गाऊ कशी अंगाई' (१९७६) आणि 'झेड.पी.' (१९९०) या सर्व चित्रपटांना महाराष्ट्र राज्य सरकारचे उत्कृष्ट गीतलेखनाचे पुरस्कार लाभले होते. राज्य शासनातर्फे दिला जाणारा 'व्ही.शांताराम पुरस्कार', 'गदिमा पुरस्कार', 'पी.सावळाराम पुरस्कार' व 'संगीतकार राम कदम पुरस्कार' या अनेक पुरस्कारांनी ते सन्मानित झाले होते.

मूत्रपिंडाच्या आजाराने जगदीश खेबुडकर यांचे कोल्हापूर येथे निधन झाले.

– मधू पोतदार

## खोटे, दुर्गा विश्वनाथ

**अभिनेत्री**

**१३ जानेवारी १९०५ – २२ सप्टेंबर १९९१**



हिंदी आणि मराठी चित्रपटात आपल्या ठसठशीत अभिनयाने रजत पडदा गाजवून अनन्यसाधारण स्थान निर्माण करणाऱ्या, तसेच चित्रपटनिर्मिती व दिग्दर्शन आणि लघुपट, जाहिरातपट या क्षेत्रातही असामान्य कामगिरी सिद्ध करणाऱ्या एकमेव अभिनेत्री होत्या दुर्गा खोटे.

दुर्गा खोटे यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे पाळण्यातील नाव होते विठा. लहानपणी त्यांना कौतुकाने बेबी या नावाने संबोधत असत. नंतर त्यांना सर्व जण बानू म्हणू लागले. १९२३ साली (विश्वनाथ) खोटे यांच्याशी त्यांचा विवाह झाला व लग्नानंतर त्यांचे नाव दुर्गा खोटे असे झाले. त्यांचे वडील लाड हे सॉलीसिटर होते. वडिलांकडूनच बुद्धीचा वारसा लाभलेल्या दुर्गा खोटे शालेय शिक्षणातही हुशार होत्या. मातृभाषा मराठी असूनही त्यांना उर्दू, हिंदी व इंग्लिश या भाषा चांगल्याच अवगत होत्या.

दिसायला रूपमती असल्याने निर्माते–दिग्दर्शक मोहन भावनानी यांनी दुर्गा खोटे यांना 'फरेबी जाल' या मूकपटात नायिकेच्या भूमिकेसाठी पाचारण केले. त्या काळात चित्रपट क्षेत्रात सुविद्य आणि घरंदाज स्त्रिया अगदी अभावानेच दिसत असत, पण दुर्गाबाई विचारांनी अत्यंत प्रगल्भ व दूरदर्शी असल्याने त्यांनी हा चित्रपटाचा प्रस्ताव स्वीकारला. 'फरेबी जाल' हा चित्रपट निर्माणाधीन असताना बोलपटाचा शोध लागला व त्यामुळे भवनानी यांनी आपल्या मूकपटाचे तंत्र बदलून त्याला बोलपटाचा मुलामा देण्याचा प्रयत्न केला; त्यामुळे हा चित्रपट मूकपट व बोलपट असा सरमिसळ तयार झाला, पण तो फारसा चालला नाही. या चित्रपटात दुर्गा खोटे यांनी एक गाणेही म्हटले होते.

या काळात प्रभात फिल्म कंपनी बोलपट निर्मितीच्या दृष्टीने पावले टाकत होती. त्यांनी 'अयोध्येचा राजा' (मराठी) व 'अयोध्या का राजा' (हिंदी) या चित्रपटाची तयारी सुरू केली होती. त्या वेळी चित्रपटासाठी नायिका म्हणून प्रभात कंपनीने दुर्गा खोटे यांची निवड केली. प्रभात फिल्म कंपनीच्या पहिल्याच बोलपटाच्या दोन्ही भाषेतल्या आवृत्त्या गाजल्या आणि त्यामुळे दुर्गा खोटे यांचे नाव सर्वदूर झाले. त्याच वर्षी प्रभातने पुन्हा एकदा दुर्गाबाईंना घेऊन 'माया मच्छिंद्र' हा हिंदी व मराठी अशा दोन्ही भाषेत चित्रपट सादर केला. तोही चांगला चालला व दुर्गाबाईंना अभिनेत्री म्हणून मान्यता मिळाली.

दुर्गाबाई चित्रपटात आल्या, तो काळ स्टुडिओ सिस्टीमचा होता. त्या काळात कलाकारांना व तंत्रज्ञानाला महत्त्व नव्हते. चित्रपटाचा गौरव आणि बोलबाला व्हायचा तो ज्या फिल्म कंपनीने तो निर्मिला त्या कंपनीचाच, कारण सारे कलाकार, तंत्रज्ञ चित्रपट कंपन्यांमध्ये पगारदार नोकर असत. ही पद्धत सर्वप्रथम मोडून काढली दुर्गाबाई खोटे यांनी.

दुर्गा खोटे यांनी १९३३ साली देवकी बोस यांच्या दिग्दर्शनाखाली 'राजरानी मीरा' या चित्रपटामध्ये कोलकाता येथे काम केले व त्यानंतर १९३४ साली 'सीता', १९३५ साली 'जीवन नाटक' या दोन चित्रपटांत नायिकांच्या भूमिका करून त्यांनी केवळ बंगालमध्येच


'अयोध्येचा राजा' या चित्रपटात
उजवीकडून पहिल्या दुर्गा खोटे

नव्हे, तर साऱ्या भारतभर लोकप्रियता मिळवली. त्यांची लोकप्रियता इतकी प्रचंड होती की, प्रभात फिल्म कंपनीने दुर्गाबाईंना पुनश्च 'अमरज्योती' (१९३६) या हिंदी चित्रपटात काम करण्यासाठी मुद्दाम बोलावून घेतले. स्त्रियांवर झालेले अत्याचार तेवढ्याच तडफतेने परतवून लावून पुरुषांना आपल्या कह्यात ठेवणारी तेजस्विनी दुर्गा खोटे यांनी 'अमरज्योती'मध्ये अत्यंत परिणामकारकरीत्या उभी केली होती. यात त्यांच्या असामान्य अभिनयाचे आगळेवेगळे दर्शन घडले. या चित्रपटामुळे दुर्गाबाईंचा लौकिक आणखीच वाढला. तरीही प्रभातमध्ये न राहता त्यांनी इतरत्र काम करणे अधिक पसंत केले. त्यामुळेच १९३७ साली प्रदर्शित झालेल्या शालिनी सिनेटोनच्या कलामहर्षी बाबूराव पेंटर दिग्दर्शित 'प्रतिभा' या हिंदी-मराठी चित्रपटात त्यांनी पुन्हा एकदा आपले अभिनयसामर्थ्य दाखवून दिले. याच वर्षी त्यांचे पती विसूभाऊ खोटे यांना देवाज्ञा झाली.

वाढती लोकप्रियता आणि धोरणी तसेच संवेदनशील दिग्दर्शक व्ही. शांताराम, देवकी बोस यांच्या दिग्दर्शनाचा सहवास लाभल्यामुळे दुर्गा खोटे यांनी आत्मविश्वासाने चित्रपट निर्मितीच्या क्षेत्रात पाऊल टाकण्याचे ठरवले. 'नटराज फिल्म' या नावाची चित्रपटसंस्था स्थापन करून 'सवंगडी' (मराठी) व त्याची हिंदी आवृत्ती 'साथी' हा चित्रपट काढायला घेतला. त्यासाठी दादा साळवी, मुबारक, नायमपल्ली यांच्यासारखे ज्येष्ठ कलाकार निवडले. दिग्दर्शनासाठी पार्श्वनाथ अळतेकर या ज्येष्ठ दिग्दर्शकाची निवड केली. निष्णात संगीतकार गोविंदराव टेंबे यांच्याकडे संगीताचा भार सोपवला. नायिकेची भूमिका दुर्गाबाई स्वतःच करणार होत्या. साऱ्या गोष्टी योग्यरीत्या जमून आल्या होत्या, पण दुर्गाबाईंनी चित्रपटाचा नायकाची भूमिका अनुभवी कलाकाराला न

देता अप्पा पेंडसे नावाच्या पत्रकाराला दिली. त्यांना अभिनयाचा बिलकुल सराव नव्हता; त्यामुळे १९३८ साली हा चित्रपट प्रदर्शित झाला आणि त्याला प्रेक्षकांची पसंतीची पावती न मिळाल्याने 'साथी' व 'सवंगडी' हे दोन्हीही चित्रपट पडले, त्यामुळे दुर्गाबाईंना खूप कर्ज झाले. त्यांनी चित्रपटनिर्मिती बंद करून पुन्हा एकदा केवळ अभिनयावर लक्ष केंद्रित केले.

या काळातल्या सिर्को प्रॉडक्शनचा 'गीता', प्रकाश पिक्चर्सचे 'नरसी भगत' व 'भरत भेट', पांचोली आर्ट्स (लाहोर)चे 'खानदान' व 'जमीनदार', साहेबराव मोदी यांच्या मिनर्व्हा मुव्हीटोन निर्मित 'पृथ्वीवल्लभ', भालजी पेंढारकर दिग्दर्शित 'महारथी कर्ण', के. असीफ यांचा पहिला चित्रपट 'फूल' वगैरे चित्रपटातल्या त्यांच्या अभिनयाने प्रेक्षक भारावून गेले.

१९४१ साली अत्रे पिक्चर्सचा 'पायाची दासी' व त्याची हिंदी आवृत्ती 'चरणोंकी दासी' प्रदर्शित झाले. नायिका म्हणून लोकप्रियतेच्या शिखरावर असूनही दुर्गाबाईंनी या चित्रपटात आखाडसासूची भूमिका अत्यंत ठसकेबाजपणे केली होती. त्या चित्रपटामुळे त्यांच्या भूमिकेचे प्रेक्षकांनी स्वागत केले खरे, पण या चित्रपटामुळेच त्यांच्यावर चरित्र अभिनेत्री असा शिक्का बसला गेला व त्यानंतर त्यांना नायिकेच्या भूमिका मिळणेच बंद झाले. तरीही दुर्गाबाईंनी बदलत्या काळात चरित्र अभिनेत्रीच्या अनेक भूमिका आपल्या जिवंत अभिनयाने सजीव केल्या. त्यामध्ये प्रभात फिल्म कंपनीचा 'हम एक है', नर्गिस आर्ट कंपनीचा 'अंजुमन', 'मायाबाजार', 'सीता स्वयंवर', 'मगरूर', 'आराम', 'हमलोग', 'चाचा चौधरी', 'शिकस्त', 'परिवार', 'भाभी', 'मुसाफिर', 'परख', 'अनुपमा', 'देवर', 'दादी माँ' अशा अनेक चित्रपटांचा उल्लेख करता येईल. १९६० साली प्रदर्शित झालेल्या 'मुगल-ए-आझम' या चित्रपटातील महाराणी जोधाबाईच्या भूमिकेने त्यांनी

**'अयोध्येचा राजा' या चित्रपटात डावीकडून दुर्गा खोटे व गोविंदराव टेंबे. पालखीत बाबूराव पेंढारकर**



प्रेक्षकांचे लक्ष चांगलेच वेधून घेतले होते. दुर्गा खोटे यांनी नायिका व चरित्र अभिनेत्री म्हणून एकूण २०० पेक्षा जास्त चित्रपटांत भूमिका केल्या.

उत्कृष्ट अभिनयाच्या कसोटीला उतरणाऱ्या अनेक भूमिका दुर्गाबाईंनी सादर केल्या. बेंगॉल फिल्म जर्नालिस्ट असोसिएशनतर्फे त्यांना 'पायाची दासी', प्रकाश पिक्चर्सचा 'भरत मिलाप' या चित्रपटांतील भूमिकांबद्दल पारितोषिक देऊन गौरवले होते. तसेच १९७० साली महाराष्ट्र राज्य चित्रपट पारितोषिक समारंभात सर्वोत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्री म्हणून 'धरतीची लेकरं' या चित्रपटासाठी सन्मानित केले होते. हिंदी चित्रपट 'बिदाई'साठी १९७४ साली त्यांना फिल्मफेअरने पारितोषिक दिले होते.

दुर्गा खोटे यांनी काही मोजक्या भूमिकांनी मराठी रंगमंचही गाजवला. नटवर्य नानासाहेब फाटक यांच्याबरोबर त्यांनी शेक्सपिअरच्या मॅकबेथ या जगप्रसिद्ध नाटकाचा मराठी अवतार 'राजमुकुट'मध्ये काम केले होते. त्याची खूपच प्रशंसा झाली. 'मुंबई मराठी नाट्यसंघ' आणि 'इप्टा' या अग्रगण्य नाट्यसंस्थांशी त्यांचे घनिष्ठ संबंध होते. १९५८ साली दुर्गा खोटे यांना संगीत नाटक अकादमी अ‍ॅवॉर्ड देऊन गौरवले होते, तर १९६८ साली भारत सरकारने त्यांना पद्मश्री देऊन सन्मानित केले व भारत सरकारतर्फे दुर्गाबाईंना १५वा दादासाहेब फाळके पुरस्कार मिळाला. हा पुरस्कार मिळणाऱ्या त्या पहिल्या मराठी कलाकार होत्या.

दुर्गा खोटे यांनी 'आर्ट फिल्म' आणि 'दुर्गा खोटे प्रॉडक्शन' या दोन संस्था स्थापन करून त्याद्वारे त्यांनी शेकडो लघुपट, माहितीपट व जाहिरातपट सादर केले. त्यातले काही श्वेतधवल होते, तर काही सप्तरंगात. १९८८ साली त्यांनी 'वागळे की दुनिया' ही दूरदर्शन मालिकाही तयार केली व ती खूप लोकप्रिय झाली.

दुर्गाबाईंचे वैयक्तिक आयुष्य फारसे सुखावह नव्हते. त्यांनी दोन विवाह केले. पहिले लग्नायुष्य फारच अल्पकाळ टिकले. दुसरे तर प्रेमलग्नच होते. त्यासाठी त्यांनी मुसलमान धर्मही स्वीकारला आणि आपले नाव बदलले, पण चित्रपटक्षेत्रात मात्र त्यांनी दुर्गा खोटे हेच आपले नाव कायम ठेवले.

आयुष्याच्या संध्याकाळी दुर्गाबाईंनी मुंबई सोडून देऊन, अलिबाग येथे समुद्रकिनारी राहून उर्वरित आयुष्य शांतीने व समाधानाने व्यतीत करण्याचा मानस केला. त्यानंतर त्या अगदी क्वचित प्रेक्षकांसमोर आल्या. १९७९ साली प्रभात फिल्म कंपनीला पन्नास वर्षे पुरी झाली, त्या निमित्त आयोजित केलेल्या भव्य सोहळ्याला त्या उपस्थित राहिल्या होत्या. अलिबाग येथेच वृद्धापकाळामुळे त्यांचा मृत्यू झाला.

दुर्गा खोटे यांनी १९८९ साली लिहिलेल्या 'मी-दुर्गा खोटे' या आत्मचरित्रात त्यांनी आपल्या वैयक्तिक आणि व्यावसायिक जीवनाचा अत्यंत कुशलतेने परिपूर्ण आढावा घेतला आहे. त्यांचे आत्मचरित्र आणि त्यांनी अभिनय केलेले काही चित्रपट अजूनही दुर्गा खोटे यांच्या कलापूर्ण जीवनाची ओळख करून देतात.

– शशिकांत किणीकर

**संदर्भ** : १) खोटे दुर्गा, 'मी दुर्गा खोटे', मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; १९८२.

## खोटे, शुभा नंदू

**अभिनेत्री**

**जन्मदिनांक अनुपलब्ध**



शुभा नंदू खोटे या अभिनेत्रीने साकारलेली त्यांची प्रतिमा अधिकांश हिंदी चित्रपटविश्वाशी निगडित आहे. मराठीतील सुप्रसिद्ध नाट्य अभिनेते नंदू खोटे यांची ती मुलगी. चित्रपटाच्या सुरुवातीपासून अभिनेत्री म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या दुर्गा खोटे याच परिवारातील. शुभा खोटे यांनी मुंबईतल्या सेंट तेरेसा कॉन्व्हेंट स्कूलमधून, विल्सन महाविद्यालयामधून शिक्षण पूर्ण केले. शालेय व

महाविद्यालयीन आयुष्यात शुभा खोटे यांनी हौसेखातर नाटकांमधून भूमिका केल्या. पण याच काळात सायकलिंग आणि पोहणे यातही त्यांनी प्रावीण्य मिळवले होते. महाविद्यालयीन जीवनातच 'शुभमंगल' या अनंत मानेंच्या चित्रपटाद्वारे त्यांचे चित्रपटसृष्टीत पदार्पण झाले. यात सूर्यकांत त्यांचे सहकलाकार होते. हा चित्रपट फारसा चालला नाही, पण त्यामुळेच श्रेष्ठ दिग्दर्शक अमिया चक्रवर्तींचे त्यांच्याकडे लक्ष गेले आणि त्यानंतर शुभा खोटेंकडे चालून आली ती 'सीमा'मधील भूमिका.

दुर्गा खोटेंच्या पावलावर पाऊल ठेवून शुभा खोटेही हिंदी चित्रपटसृष्टीत आल्या त्या अशा. पुढे अर्थातच त्या हिंदीत छान स्थिरावल्या. शुभा खोटेंच्या डोळ्यांमध्ये दडलेल्या सततच्या मिस्कील भावामुळे त्यांनी अत्यंत वेगळ्या प्रकारच्या विनोदी स्त्री अभिनेत्रीचा पायंडा निर्माण केला. अमिया चक्रवर्तींच्या 'देख कबीरा रोया' या चित्रपटातही त्यांची भूमिका महत्त्वाची होती. 'पेईंग गेस्ट' व 'चंपाकली' या चित्रपटांमधील भूमिकांमुळे शुभा खोटेंची एक वेगळी प्रतिमा निर्माण झाली. याच सुमारास विनोदी अभिनेता मेहमूदबरोबरच्या भूमिकांमुळे त्यांच्या जोडीचा जमानाच सुरू झाला. 'ससुराल', 'दिल तेरा दिवाना', 'भरोसा' या काही चित्रपटांमधून ही जोडी रसिकांच्या कायम लक्षात राहिली. 'दीदी' या चित्रपटात शुभा खोटे यांना जरा वेगळी भूमिका मिळाली. 'दीदी'मध्ये सुनील दत्त नायक होते. त्यातील 'तुम मुझे भूल भी जाओ' हे गाणे पडद्यावर साकार करणाऱ्या शुभा खोटे आजही स्मरणात आहेत. शुभा खोटेंची 'एक दूजे के लिए'मधील भांडखोर स्त्रीची भूमिका लक्षणीय होती. त्यांनी 'बेनाम', 'मिली' या चित्रपटांमधून केलेल्या चरित्रभूमिकाही महत्त्वपूर्ण होत्या.

शुभा खोटे यांचे 'रानपाखरं', 'उमज पडेल तर', 'माझा पती करोडपती', 'आई थोर तुझे उपकार', 'आधार', 'या मालक', 'चिमुकला पाहुणा' हे काही मराठी चित्रपटही प्रदर्शित झाले. त्यांचे वडील नंदू खोटे यांनी 'या मालक' हा चित्रपट निर्माण केला होता. 'चिमुकला पाहुणा' या चित्रपटाची निर्मिती आणि दिग्दर्शन खुद्द शुभा खोटे यांचेच होते.

सध्या शुभा खोटेंचा एक मुलगा अमेरिकेत असतो, तर दुसरा मुलगा चित्रपटसृष्टीतच ध्वनिमुद्रक म्हणून कार्यरत आहे. कन्या भावना (बलसावर) विनोदी बाजाच्या भूमिका करीत आहेत. शुभा खोटेंचे भाऊ विजू खोटे हे लोकप्रिय विनोदी अभिनेते म्हणून परिचित आहेतच.

मोठ्या एकत्रित कुटुंबातील मुक्त, हसतखेळत वातावरणामुळे शुभा खोटे हे जे व्यक्तिमत्त्व तयार झाले, ते त्यांनी तसेच पडद्यावर साकारले.

– जयंत राळेरासकर

* * *

ग



ग

## गडकर, जयश्री गोविंद

**अभिनेत्री, निर्माती**

**२१ मार्च १९४० - २८ ऑगस्ट २००८**



'जयश्रीच्या अभिनयाची तुलना करायचीच झाली, तर ती लताच्या गाण्याशीच करावी लागेल. संगीत क्षेत्रात लताचे जे श्रेष्ठत्व आहे, ते श्रेष्ठत्व जयश्री गडकरने अभिनय क्षेत्रात संपादन केले आहे' असे मत दिग्दर्शक दिनकर द. पाटील यांनी जयश्री गडकर यांच्याविषयी व्यक्त केले होते.

कारवार जिल्ह्यातील सदाशिवगड तालुक्यातील कणसगिरी या गावी जयश्री गडकर यांचा जन्म झाला. मध्यमवर्गीय कुटुंबात त्यांचे बालपण गेले. वयाच्या पाचव्या-सहाव्या वर्षीच त्या मुंबईत आल्या. मुंबईत खेतवाडीतल्या महानगरपालिकेच्या शाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. पुढे गिरगावच्या राममोहन हायस्कूलमधून त्यांनी शालान्त परीक्षा दिली. शिक्षणाची आवड असूनही त्यांना फार शिक्षण घेता आले नाही. मात्र लहानपणापासून त्यांना गाण्याची आवड होती. ताल-सुरांचे उपजत ज्ञान होते आणि गळाही गोड होता. त्यामुळे मास्टर नवरंग यांच्याकडे त्या गाणे शिकल्या.

जयश्री गडकर यांनी १९५० - १९५४ या काळात हौशी रंगभूमीवर कामे केली. याच काळात त्या शास्त्रीय नृत्यही शिकल्या. जयश्री गडकर यांनी सुरुवातीच्या काळात राजकमल कलामंदिरात नोकरी केली.

याच काळात व्ही. शांताराम यांना आपल्या 'झनक झनक पायल बाजे' (१९५५) या चित्रपटासाठी एका समूहनृत्यात सहनर्तिका हव्या होत्या. संध्या या चित्रपटाची नायिका होत्या. व्ही. शांतारामसारखे दिग्दर्शक आणि सप्तरंगी हिंदी चित्रपट या आकर्षणामुळे त्यांनी या चित्रपटात समूहनृत्यातून आपली नृत्यकला सादर केली. या नृत्याने त्यांना 'दिसतं तसं नसतं' या चित्रपटात एका नृत्यासाठी काम मिळाले. मात्र केवळ नृत्य करण्याइतकी भूमिका करायची नाही, असे त्यांनी या चित्रपटानंतर ठरवले. यानंतर 'गाठ पडली ठका ठका' या चित्रपटात नायिका म्हणून त्यांना प्रथमच भूमिका मिळाली. २१ मार्च १९५६ या दिवशी त्या नायिका म्हणून पडद्यावर आल्या, याच दिवशी योगायोगाने त्यांनी वयाची १६ वर्षे पूर्ण केली. १९५७ साली फिल्मिस्तानच्या 'आई मला क्षमा कर' आणि 'पहिलं प्रेम' या चित्रपटातून त्यांनी प्रमुख भूमिका केल्या. फिल्मिस्तानचा पहिला चित्रपट होता 'आलिया भोगासी'. या चित्रपटात जयश्री गडकर यांनी राजा गोसावींबरोबर प्रमुख भूमिका केली आणि नंतरच्या कारकिर्दीत राजा गोसावींबरोबर त्यांनी अनेक चित्रपटांतून नायिकेच्या भूमिका केल्या, त्या प्रेक्षकांच्या पसंतीस उतरल्या.

यानंतर 'चेतना चित्र'चा चित्रपट प्रदर्शित झाला. 'सांगत्ये ऐका' (१९५९) या चित्रपटात जयश्री गडकर यांनी तमासगिरिणीची भूमिका रंगवली. हा चित्रपट मराठीतला सर्वात जास्त चालणारा चित्रपट ठरला. त्यातल्या 'बुगडी माझी सांडली गं...' या लावणी नृत्याने जयश्री गडकर यांना मराठी चित्रपटसृष्टीत उत्कृष्ट नृत्यांगना म्हणून कायमचे स्थान मिळाले. चित्रपट रसिकांना ही लावणी अजूनही भुरळ घालते. पुण्यात विजयानंद चित्रपटगृहात हा चित्रपट सलग १३२ आठवडे

ग


'साधी माणसं' या चित्रपटात जयश्री गडकर

चालला. हा चित्रपट त्यांच्या कारकिर्दीतला मैलाचा दगड ठरला. १९५९ साली प्रदर्शित झालेल्या या चित्रपटाचे दिग्दर्शक होते अनंत माने. याच चित्रपटातल्या भूमिकेने जयश्रीबाईंना 'रसरंग फाळके पुरस्कार' मिळवून दिला. त्यानंतर जयश्री गडकर यांनी जवळपास पन्नास वर्षे मराठी चित्रपटसृष्टीत अधिराज्य गाजवले. तमाशापटांबरोबरच अनेक कौटुंबिक, भावनाप्रधान, विनोदी, ऐतिहासिक चित्रपटांतूनही त्यांनी प्रमुख भूमिका केल्या. एक चतुरस्र कलाकार म्हणून त्यांनी मराठी चित्रपटात आपला अमीट ठसा उमटवला.

दरम्यानच्या काळात त्यांनी 'एक अरमान मेरा' या चित्रपटाद्वारे हिंदी चित्रपटसृष्टीतही प्रवेश केला. अभिनेते अशोककुमार यांच्याबरोबर नायिकेची भूमिका असलेला 'प्रायव्हेट सेक्रेटरी' हा त्यांचा चित्रपट रसिकांच्या आजही लक्षात आहे. हिंदी चित्रपटसृष्टीत धार्मिक, पौराणिक चित्रपटात त्यांच्या भूमिका लक्षणीय ठरल्या. तसेच 'सारंगा' चित्रपटातील 'सारंगा तेरी याद में...' हे गाणेही रसिकांच्या स्मरणात आहे.

मराठीत या काळात त्यांनी 'सवाल माझा ऐका', 'साधी माणसं', 'पवनाकाठचा धोंडी', 'थांब लक्ष्मी कुंकू लावते', 'युगे युगे मी वाट पाहिली', 'घरकूल', 'घर गंगेच्या काठी', 'पाटलाची सून', 'अवघाची संसार', 'मोहित्यांची मंजुळा' इ. महत्त्वाच्या चित्रपटांतून प्रमुख भूमिका केल्या. उपजत साधेपणा, सौंदर्य, नृत्यकुशलता, अभिनयातील सहजता यांमुळे या सर्व भूमिका एकापेक्षा एक सरस ठरल्या. चित्रपट क्षेत्रातल्या त्यांच्या लोकप्रियतेबरोबर याच चित्रपटातील भूमिकांमुळे त्यांना अनेक पुरस्कारांनी गौरवले. १९६१ साली प्रदर्शित

झालेल्या 'मानिनी' चित्रपटातल्या भूमिकेसाठी त्यांना सर्वप्रथम 'राष्ट्रीय पुरस्कार' मिळाला. पं. महादेवशास्त्री यांची कथा असलेल्या या चित्रपटाचे संवाद आणि पटकथा व्यंकटेश माडगूळकर यांनी लिहिले होते. जयश्री गडकर यांनी यापूर्वी चित्रपटातून विशेषत: तमासगिरिणीच्या भूमिका केल्या होत्या. त्या नृत्यकुशल अभिनेत्री म्हणून ओळखल्या जात होत्या; 'मानिनी'तल्या सोज्ज्वळ, सात्त्विक, स्वाभिमानी ब्राह्मणकन्येची भूमिका जयश्री निभावेल का?' असा प्रश्न त्या काळात चित्रपट क्षेत्रातील दिग्गजांना पडला होता. मात्र या भूमिकेतही आपल्या सात्त्विक सौंदर्याने, मृदू व्यक्तिमत्त्वाने, अभिनयकौशल्याने जयश्री गडकर यांनी अभिनय क्षेत्रातील आपले अष्टपैलुत्व सिद्ध केले. १९६४ साली 'सवाल माझा ऐका', १९६५ साली 'साधी माणसं', १९६६ साली 'पवनाकाठचा धोंडी' या चित्रपटांसाठी सलग राष्ट्रीय पुरस्कार मिळवून त्यांनी 'हॅट्ट्रीक' साधली.

महाराष्ट्र राज्य चित्रपट महोत्सवातही 'साधी माणसं',



'पाटलाची सून', 'थांब लक्ष्मी कुंकू लावते', 'घर गंगेच्या काठी' या चित्रपटातील भूमिकांसाठी सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीच्या पुरस्कारांनी त्यांना गौरवले. 'घरकूल' चित्रपटासाठी १९७१ साली 'विशेष अभिनेत्री'चा पुरस्कार देऊन राज्य सरकारने त्यांच्या समर्थ अभिनयाची, एकूण चित्रपट कारकिर्दीची वेगळी दखलही घेतली.

साधारण १९५० ते १९६० या कृष्णधवल चित्रपटाच्या काळात जयश्रीबाईंनी भालजी पेंढारकर, राजा परांजपे, अनंत माने, दिनकर द. पाटील, दत्ता धर्माधिकारी, राजा ठाकूर, गजानन जागीरदार, वसंत पेंटर यांसारख्या दिग्गज दिग्दर्शकांकडे काम केले. प्रत्येकाची वेगळी दिग्दर्शनशैली त्यांनी अनुभवली. त्यांनी राजा गोसावी, सूर्यकांत, चंद्रकांत, अरुण सरनाईक या सहकलाकारांबरोबर केलेल्या भूमिका विशेष गाजल्या.

व्यक्तिरेखेच्या मागणीनुसार शिकत राहणे, परिश्रम घेत राहणे हा त्यांचा स्थायिभाव होता. भालजी पेंढारकरांच्या 'साधी माणसं' या चित्रपटासाठी त्यांनी लोहाराचा भाता चालवण्याचे तंत्र अवगत केले आणि मगच त्या कॅमेऱ्यासमोर गेल्या. भाता चालवतानाचे 'ऐरणीच्या देवा तुला ठिणगी ठिणगी वाहू दे..' हे गाणे अजरामर ठरले.

आपल्या पन्नास वर्षांच्या कारकिर्दीत त्यांनी २५० चित्रपटांतून भूमिका केल्या. स्त्रीचा स्वाभिमान, स्त्रीचा सूड, स्त्रीची माया-ममता अशा सगळ्या भावभावनांना त्यांनी पडद्यावर संवेदनशीलपणे जिवंत केले. याचबरोबर चित्रपट क्षेत्राशी निगडित असणाऱ्या ध्वनी, संकलन, चित्रीकरण, प्रकाशयोजना या तांत्रिक बाबीही त्या शिकत गेल्या. हिंदी, गुजराती, मारवाडी, पंजाबी, भोजपुरी, कन्नड, तेलगू या भाषांतील चित्रपटांतूनही त्यांनी अभिनय केला. शहरी तसेच ग्रामीण, मराठमोळ्या मराठी बोलीभाषेवरही त्यांचे प्रभुत्व होते.

'जगन्नाथाचा रथ' या चित्रपटाचे नायक बाळ धुरी यांच्याशी १९७५ साली त्यांनी विवाह केला. राजू या मुलाच्या जन्मानंतरही त्यांनी चित्रपटातून भूमिका केल्या. रामानंद सागर यांच्या 'रामायण' या दूरदर्शन मालिकेत या पतिपत्नींनी दशरथ-कौशल्येची भूमिका केली.

मराठी चित्रपटातल्या भूमिका करत असतानाच जयश्री गडकर यांनी अण्णासाहेब घाडगे यांच्या 'सासर-माहेर' चित्रपटाचे दिग्दर्शन केले. चित्रपट यशस्वी झाला आणि दिग्दर्शिका होण्याचे त्यांचे स्वप्नही साकार झाले. त्यानंतर १९९६ साली त्या चित्रपट निर्मिती क्षेत्रातही उतरल्या. निर्मिती, कथा-दिग्दर्शन-अभिनय अशा भूमिका उत्तम सांभाळून त्यांनी चित्रपट बनवला 'अशी असावी सासू'.

मराठी चित्रपटसृष्टीतल्या या चौफेर प्रदीर्घ कारकिर्दीची दखल घेऊन ३० एप्रिल २००३ रोजी महाराष्ट्र शासनाने त्यांना 'व्ही. शांताराम पुरस्कार' दिला. त्यापूर्वीही १९९८ साली 'गदिमा पुरस्कार', २००१ मध्ये 'झी अल्फा गौरव पुरस्कार', २००४ साली जनकवी पी. सावळाराम स्मरणार्थ 'गंगाजमुना पुरस्कार', २००५ मध्ये 'समाजदर्पण', सिने अँड टीव्ही आर्टिस्टतर्फे दिला जाणारा 'सीण्टा' पुरस्कार यासह अनेक महत्त्वाचे पुरस्कार, सन्मान त्यांना लाभले. 'नक्षत्रलेणं - सुवर्णनायिका जयश्री गडकर' हे त्यांच्या पन्नास वर्षातल्या चित्रपट वाटचालीचा प्रवास अधोरेखित करणारे पुस्तक 'जयश्री गडकर प्रतिष्ठान'तर्फे २००९ साली प्रकाशित झाले आहे. जयश्री गडकर या अभिनेत्रीचे मुंबई येथे निधन झाले.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ** : १) गडकर जयश्री, 'अशी मी जयश्री', रोहन प्रकाशन, पुणे; १९८७.

## गबाले, राम नारायण

**दिग्दर्शक**

**२० मार्च १९२४ - ९ जानेवारी २००९**

राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर येथून पदवी प्राप्त केल्यावर राम नारायण गबाले यांनी मा. विनायक यांच्या प्रफुल्ल पिक्चर्स या संस्थेमधून चित्रपटसृष्टीत प्रवेश केला. मा. विनायक यांच्या मृत्यूनंतर ते प्रभात फिल्म कंपनीत यशवंत पेठकर यांच्या हाताखाली दिग्दर्शन करू लागले.

ग



त्या वेळेस १९४७ मध्ये राम गबाले यांना 'वंदे मातरम्' या चित्रपटाच्या स्वतंत्र दिग्दर्शनाची संधी मिळाली. या चित्रपटात पु.ल. देशपांडे व सुनीताबाई नायक-नायिकेच्या भूमिकेत होते. नंतर त्यांनी मंगल पिक्चर्सच्या 'मोठी माणसं' या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. पुढे मंगल पिक्चर्सच्याच 'देव पावला' (१९५०) व 'जोहार मायबाप जोहार' (१९५०) या दोन अत्यंत यशस्वी चित्रपटांचे दिग्दर्शनही त्यांनी केले.

यानंतर अनेक चित्रपटांची निर्मिती व दिग्दर्शन करून राम गबाले यांनी मराठी चित्रपटसृष्टीत स्वतःचा वेगळा ठसा उमटवला. त्यांचे 'दूधभात' (१९५२), 'जशास तसे' (१९५२), 'घरधनी' व 'देवबाप्पा' (१९५३), 'पोस्टातली मुलगी' (१९५४), 'छोटा जवान' (१९६३), 'जिव्हाळा'(१९६८) असे अनेक चित्रपट गाजले व त्यासाठी राम गबाले यांना अनेक पुरस्कार मिळालेले आहेत.

गबाले यांची मराठी चित्रपटसृष्टीतील कारकिर्द प्रदीर्घ होती. त्यांनी देशभक्तीपर, समाजहिताच्या विषयावर २६हून अधिक मराठी व हिंदी चित्रपट बनवले. 'छोटा जवान' या चित्रपटाला उत्कृष्ट प्रादेशिक चित्रपटाचे राष्ट्रीय स्तरावरील 'रजतकमल' पारितोषिक मिळाले.

राम गबाले यांनी 'शेर शिवाजी'(१९८७)सारखे दहाहून अधिक बालचित्रपट बनवले. १००हून अधिक अनुबोधपट, १५ दूरदर्शनपट, मालिका, जाहिरातपट या सर्वांशी ते दिग्दर्शन व लेखक या नात्याने निगडित होते. गबाले यांनी रिचर्ड ॲटेनबरो यांना 'गांधी' या चित्रपटाच्या दिग्दर्शनात साहाय्य केले होते. पु.ल. देशपांडे यांच्या 'बटाट्याची चाळ'च्या निर्मितीत त्यांचा सहभाग होता. तसेच मुंबई व दिल्ली दूरदर्शनसाठी त्यांनी अनेक मालिकांची निर्मिती केली.

गबाले यांची फिल्म्स डिव्हिजनच्या संचालकपदी राष्ट्रीय स्तरावर नियुक्ती झाली होती. तसेच त्यांनी 'फिल्म आणि टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट'चे उपप्राचार्यपदही भूषवले होते. गोरेगाव येथील चित्रनगरी उभारण्यात त्यांचा सक्रिय सहभाग होता. त्यांनी चित्रनगरी व्यवस्थापकीय संचालकपदी, तसेच राजकमल स्टुडिओच्या व्यवस्थापकपदीही काम केले होते.

'काळे गोरे' या राम गबाले यांच्या लघुपटाला आंतरराष्ट्रीय पुरस्कार मिळाला होता, तर 'जलदीप'ला व्हेनिस फिल्म फेस्टिव्हलमध्ये गौरवले गेले. 'शतायू केसरी' या त्यांच्या लघुपटाला विशेष पुरस्कार मिळाला, तर 'फूल और कलिया'ला (१९६१) पंतप्रधानांचे सुवर्णपदक मिळाले. त्यांना १९९९ मध्ये सोलापूरच्या श्रीराम पुजारी फाऊंडेशनचा 'पु.ल. देशपांडे - बहुरूपी' पुरस्कार मिळाला. याशिवाय 'व्ही. शांताराम', 'गदिमा', 'नानासाहेब सरपोतदार' यांच्या नावाचे पुरस्कारही त्यांना मिळाले. महाराष्ट्र जीवन गौरव पुरस्काराने ही राम गबाले यांना सन्मानित करण्यात आले होते. वार्धक्याने राम गबाले यांचे पुण्यात निधन झाले.

– द.भा. सामंत

**संदर्भ** : १) गबाले राम, 'आत्मचित्र', पद्मगंधा प्रकाशन, पुणे; २००६.

## गांधी, लीला माणिकचंद
**अभिनेत्री**
**१ जून १९३८**



वयाच्या आठव्या वर्षापासून लीला गांधी यांनी गोविंद निकम यांच्याकडे कथ्थक नृत्याचे शिक्षण घेतले. १९५१ साली दिग्दर्शक दिनकर द. पाटील यांनी त्यांच्या 'राम राम पाव्हणं' या गाजलेल्या मराठी चित्रपटावरून 'घरबार' नावाचा हिंदी चित्रपट काढला. त्यात गोप आणि पारो यांच्या एका नृत्यात लीला यांची मदत घेतली होती.

ग



**'केला इशारा जाता जाता'मध्ये नृत्य सादर करताना लीला गांधी डावीकडील**

गुरू गोविंद निकम यांच्याबरोबर लीला गांधी एकदा मा. भगवान यांच्याकडे गेल्या होत्या. तिथे मा. भगवान यांचे डान्स मास्तर रॉबर्ट हजर होते. त्यांची व निकम यांची चांगली मैत्री होती. मा. भगवान यांना लीलाच्या नृत्याबद्दल समजले आणि त्यांनी तिला त्यांच्या 'रंगीला' (१९५३), 'हल्लागुल्ला' (१९५४) व 'भला आदमी' (१९५८) या चित्रपटांत नृत्य करायची संधी दिली.

'बगदाद की राते' या चित्रपटासाठी रॉबर्ट मास्तरांनी एका नृत्यासाठी लीला यांना बोलावले. श्याम या खलनायकासमोर नायक महिपाल याला बांधलेले असते तिथे खलनायकासमोर तिला नृत्य करायचे होते. नृत्य छान झाले, पण हा चित्रपट आलाच नाही. त्यानंतरच्या 'बस कंडक्टर' या चित्रपटात तर त्यांनी हेलनबरोबर नृत्य केले होते. हेलन यांचा भांगडा व लीला यांची लावणी अशी ती जुगलबंदी होती.

लीलाबाईंचा नृत्याचा एक कार्यक्रम प्रसिद्ध मराठी दिग्दर्शक राजा ठाकूर यांनी पाहिला आणि त्यांना 'रेशमाच्या गाठी' या कार्यक्रमात नृत्य करण्यासाठी

बोलावले. सुरुवातीला वसंत पवार व महंमद ही जोडी या नृत्याचे दिग्दर्शन करणार होती, पण पवारांनी लीलाबाईंचे नृत्यनैपुण्य पाहून राजाभाऊंना सांगितले – 'हिचं नृत्य हिलाच बसवू द्या!' 'इष्काच्या रंगात वीज भरे अंगात' या गाण्यावर त्यांनी सुंदर नृत्य केले. ही त्यांची मराठी चित्रपटातली सुरुवात होती. 'प्रीतिसंगम'मधील (१९५७) हिंदी अभिनेता आगा याच्याबरोबरचा त्यांचा 'झगडा' खूप गाजला, 'सांगत्ये ऐका'पासून (१९५९) त्यांनी अनेक चित्रपटांचे नृत्यदिग्दर्शन केले, तर 'केला इशारा जाता जाता' (१९६५) या चित्रपटाच्या त्या सहनायिका होत्या.

चित्रपटांबरोबरच त्यांचा नाट्यप्रवासही चालू होता. ७५ चित्रपटात व २५ नाटकांत त्यांनी काम केले. 'महाकवी कालिदास' या संस्कृत नाटकातही त्यांनी काम केले होते. 'कथा अकलेच्या कांद्याची'मधील त्यांची नृत्ये पाहून संगीतकार वसंत देसाई यांनी दिग्दर्शक हृषीकेश मुखर्जी यांना सांगून 'आशीर्वाद' या हिंदी चित्रपटातील 'सवाल जवाब'साठी त्यांना बोलावले. यातील लीलाबाईंचे नृत्य गाजले.

चित्रपट-नाटकातील निवृत्तीनंतर लीलाबाईंनी कॉसमॉस बँकेच्या संचालिका म्हणून, त्याचप्रमाणे अ.भा.नाट्य परिषदेच्या अध्यक्षा म्हणूनही काम केले. शासनाच्या 'रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण' मंडळाच्याही त्या सदस्या होत्या. महाराष्ट्र राज्य चित्रपट पुरस्कारात त्यांना 'कार्तिकी' (१९७५) व 'पैज' (१९८१) या चित्रपटातील भूमिकांसाठी पुरस्कार मिळाला होता. लीलाबाई सुमारे २५ पुरस्कारांनी सन्मानित झाल्या आहेत. त्यात 'राज्य सांस्कृतिक पुरस्कार', 'पठ्ठे बापूराव पुरस्कार', अनंत माने स्मृती पुरस्कार, अकादमीचा 'फाळके पुरस्कार', 'व्ही. शांताराम पुरस्कार' असे मानाचे पुरस्कार आहेत.

सध्या त्या पुणे येथे निवृत्तीचे जीवन जगत आहेत.

– मधू पोतदार

**संदर्भ** : १) टिळेकर महेश, 'मराठी तारका', प्रकाशक – महेश टिळेकर, पुणे; २००७.

## गुप्ते, सुमती

**अभिनेत्री**

**११ मे १९१८ – ३१ ऑक्टोबर २००९**



'फोटोजेनिक चेहरा असणारी एकमेव मराठी अभिनेत्री' असा बाबूराव पटेलांसारख्या दिग्दर्शकाकडून अभिप्राय मिळवणाऱ्या सुमती गुप्ते यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील वाई येथे झाला. परंतु त्यांचे बालपण बडोदा संस्थानात गेले. त्यांचे वडील न्यायाधीश होते. बडोदा येथेच त्यांचे शिक्षणही पार पडले. पदवी प्राप्त होताच त्यांनी प्रभात फिल्म कंपनीत प्रवेश केला. प्रभात कंपनीच्या 'संत ज्ञानेश्वर' चित्रपटात ज्ञानेश्वर महाराज नदीत स्नान करून परतताना उमटलेल्या त्यांच्या ओल्या पायाच्या ठशांवर हाताच्या ओंजळीतून फुले वाहताना दिसतात, या दृश्यातले हात सुमती गुप्ते यांचे होते. प्रभात फिल्म कंपनीतले त्यांचे हे एकमेव काम. त्या अगोदर सरस्वती सिनेटोनने दादासाहेब तोरणे यांनी सुमती गुप्ते यांना 'नवरदेव' चित्रपटात नायिकेची भूमिका दिली होती. १९४१ साली 'नवरदेव' प्रदर्शित झाला.

भालजी पेंढारकर आणि शिराज अली हकीम यांनी पुण्यात फेमस अरुण चित्रची स्थापना करून कवी बी यांच्या दीर्घकाव्यावर आधारित 'थोरातांची कमळा' (१९४१) हा चित्रपट काढण्याचे ठरवले आणि कमळाच्या भूमिकेसाठी सुमती गुप्ते यांची निवड केली. याच चित्रपटाद्वारे त्यांचे पडद्यावर सर्वप्रथम दर्शन झाले. याच संस्थेने पुढचा चित्रपट प्रदर्शित केला 'सूनबाई' (१९४२). जुने आणि नवे यातला संघर्ष दाखवणाऱ्या या चित्रपटात सुमती गुप्तेंनी आधुनिक तरुणीची भूमिका केली. त्यांची ही भूमिका पाहून मा. विनायकांनी त्यांना 'गजाभाऊ' (१९४४) चित्रपटात काम दिले. त्याच सुमारास मा. विनायक यांच्या 'चिमुकला संसार' (१९४३) या चित्रपटाचे काम सुरू होते. त्यांचे दिग्दर्शक

ग



**'जानकी' मध्ये उजवीकडून पहिल्या सुमती गुप्ते**

होते वसंत जोगळेकर. दिग्दर्शक वसंत जोगळेकर यांच्याशी सुमती गुप्ते यांनी विवाह केला.

१९४५ सालात सुमती गुप्तेंना प्रकाश पिक्चर्स, वाडिया मुव्हीटोन आणि जनक चित्र अशा मोठ्या चित्रसंस्थांमध्ये कामासाठी बोलवणे आले. चित्रपट होते 'हमारा संसार', 'शरबती आँखे' व 'संतान'. यापैकी पहिल्या दोन चित्रपटांत त्यांनी सहनायिकेची भूमिका केली. 'संतान' चित्रपटात त्यांनी नायिकेची भूमिका केली होती. त्यानंतर सुमती गुप्ते यांनी वसंत जोगळेकरांबरोबर मीरा चित्र ही संस्था स्थापन केली. मीरा हे त्यांच्या मुलीचे नाव होते आणि मीरा चित्रतर्फे 'साखरपुडा' (१९४९) हा चित्रपट काढला. हा चित्रपट लिहिला होता विभावरी शिरूरकर अर्थात मालतीबाई बेडेकर यांनी. संजीवनी मराठे यांनी त्यातील गीते लिहिली होती. हा चित्रपट चांगला चालला.

नंतर विश्राम बेडेकर यांच्या 'वासुदेव बळवंत' या चित्रपटात सुमती गुप्ते यांनी वासुदेव बळवंत यांच्या पत्नीची भूमिका साकारली होती. 'जय मल्हार' या प्रेक्षकांचा उदंड प्रतिसाद लाभलेल्या चित्रपटात सुमती गुप्ते यांनी पाटलाच्या सोशिक पत्नीची भूमिका साकारली. या चित्रपटात सूर्यकांत यांनी खलप्रवृत्तीच्या पाटलाची भूमिका केली. हा चित्रपट ग्रामीण चित्रपटांचा जनक ठरला.

१९५४ साली प्रदर्शित झालेल्या 'ऊनपाऊस' चित्रपटात राजा परांजपे आणि सुमती गुप्ते यांनी म्हाताऱ्या नायक-नायिकेच्या भूमिका आपल्या कसदार अभिनयाने उत्कृष्टपणे साकारल्या.

दरम्यान 'नंदकिशोर' (१९५१), 'प्रतापगड' (१९५२), 'श्यामची आई' (१९५३), 'स्वयंवर झाले सीतेचे' (१९६४), 'शेवटचा मालुसरा' (१९६५),

‘पवनाकाठचा धोंडी’ (१९६६), ‘मानला तर देव’ (१९७०), ‘हा खेळ सावल्यांचा’ (१९७६), ‘दोस्त असावा तर असा’ (१९७८), ‘जानकी’ (१९७९) अशा अनेक लोकप्रिय चित्रपटांत अभिनय केला. ‘समाज’, ‘नंदकिशोर’, ‘कारीगर’ वगैरे हिंदी चित्रपटांतही त्यांनी भूमिका केल्या. १९६५ साली त्यांनी मधू मूव्हीज ही स्वत:ची चित्रसंस्था स्थापन केली आणि ‘शेवटचा मालुसरा’ (१९६५), ‘कारीगर’, ‘आँचल’, ‘आज और कल’, ‘एक कली मुस्काई’, ‘प्रार्थना’ (१९६९), ‘हा खेळ सावल्यांचा’ (१९७६), ‘जानकी’ (१९७९) असे चित्रपट निर्माण केले. त्यांनी ‘एक कली मुस्काई’ या चित्रपटातून आपली कन्या मीरा हिला नायिका बनवले. तसेच कथा-पटकथा लिहिल्या. चित्रपटसृष्टीत दीर्घकाळ काम करून त्यांच्या वाट्याला फारसे मान-सन्मान आले नाहीत. प्रदीर्घ आजाराने त्यांचे मुंबई येथे निधन झाले.

– द.भा. सामंत

ग

## गोखले, कमला रघुनाथ
**अभिनेत्री**
**१९०१ – १८ मे १९९८**



पहिली चित्रपट अभिनेत्री म्हणून नावारूपाला आलेल्या कमला रघुनाथ गोखले म्हणजे पूर्वाश्रमीच्या कमला कामत यांचा जन्म मुंबईतील गिरगाव येथे झाला. त्यांचे मूळ घराणे गोव्यातील अस्नोडा येथील होते. त्यांचे वडील कीर्तनकार होते, तर आई उत्तम सतारवादक होत्या. त्यामुळे कमला यांचे संगीताचे शिक्षण घरातच झाले होते, परंतु घरच्या गरिबीमुळे त्या शालेय शिक्षण घेऊ शकल्या नाहीत. वयाच्या पाचव्या वर्षी कमला मेळ्यामध्ये कामे करू लागल्या. त्यामुळे त्यांच्यावर अभिनयाचे व संगीताचे संस्कार नकळत होत गेले. याच काळात त्यांना ‘हॅल्मेट’ नाटकात काम करण्याची संधी मिळाली. पुढे १९१४ साली दादासाहेब फाळके यांनी ‘भस्मासूर मोहिनी’ या चित्रपटासाठी कमला गोखले व त्यांची आई दुर्गा कामत यांना घेण्याचे ठरवले. त्यात कमलाबाई मोहिनीच्या मुख्य भूमिकेत होत्या; तर दुर्गा कामत यांनी पार्वतीची भूमिका केली होती.

रघुनाथ गोखले किर्लोस्कर नाटक कंपनीत स्त्रीपार्ट करत असत. तेथेच कमलाबाई व त्यांच्या आई काम करत असताना कमलाबाईंची रघुनाथ गोखले यांच्याबरोबर ओळख झाली व त्या रघुनाथ गोखले यांच्यासोबत विवाहबद्ध झाल्या. त्यानंतर हे नवीन जोडपे किर्लोस्कर कंपनीचे ‘लीड’ जोडपे म्हणून ओळखले जाऊ लागले.

वयाच्या अवघ्या पंचविसाव्या वर्षी रघुनाथ गोखले यांचे निधन झाल्यावर संपूर्ण संसाराची व तीन मुलांची जबाबदारी कोसळलेल्या कमलाबाईंनी खचून न जाता नाटकात काम करण्याचा आपला निश्‍चय कायम ठेवला व त्या तवनाप्पा चिवटे यांच्या मनोहर स्त्री संगीत मंडळीत दाखल झाल्या. या कंपनीत सर्व स्त्रियाच काम करत असल्यामुळे कमला गोखले यांनी ‘मानापमान’ (धैर्यधर), ‘मृच्छकटिक’ (चारुदत्त), ‘संशयकल्लोळ’ (अश्‍विनशेठ) या नाटकांमधून पुरुष भूमिकाही पार पाडल्या. तसेच त्यांनी ‘नाट्य कला प्रसारक’ यांसारख्या संस्थांमध्ये काम केले. अशिक्षित असणाऱ्या कमलाबाईंचा इतर भाषांशी संबंध नसूनही त्यांनी कानडीमध्ये ‘लंका दहन’ या नाटकाचे प्रयोग केले. त्यासाठी त्यांनी एका आठवड्यात कानडी भाषेचा परिचय करून घेतला.

वैधव्य आल्यावरही कमला गोखले यांनी मोठ्या धैर्याने आपल्या तिन्ही मुलांचा सांभाळ केला. ज्या काळात स्त्रीने नाटक-चित्रपटात काम करणे आक्षेपार्ह मानले जाई, त्या काळात त्यांनी धाडसाने नाटकात व चित्रपटात कामे केली व समाजापुढे वेगळे आदर्श निर्माण केले. या कारणामुळे त्यांना समाजाच्या अवहेलनेचा विषय व्हावे लागले, त्यांच्या मुलांना ‘नाटक-

सिनेमावाल्या बाईची पोरे' म्हणून हिणवले जाई. तरीही खचून न जाता त्यांनी आपल्या मुलांना अभिनयाचे शिक्षण दिले, हे विशेष.

१९३० मध्ये त्यांनी 'वीर सावरकर' या बॅनरखाली 'उ:शाप' नावाचे नाटक केले. त्यात हरिजनांच्या प्रश्नांना वाचा फोडली होती. विश्राम बेडेकर यांच्या १९३८ सालच्या 'लक्ष्मीचे खेळ' या चित्रपटात काम करण्याची संधी कमलाबाईंना मिळाली. त्यानंतर त्यांनी मा. अविनाश यांच्या संगीत दिग्दर्शनाखाली 'दुनिया हसते रडते बघ रे', 'कोणी न वाली जगात' या दोन गाण्यांचे गायन केले होते. त्यांच्यानंतर त्यांचा मुलगा चंद्रकांत गोखले यांनी चित्रपटक्षेत्रात नाव कमावले, तर नातू विक्रम गोखले यांनीही मराठी आणि हिंदी चित्रपटसृष्टी गाजवली.

मराठी रंगभूमीवर सातत्याने चाळीस वर्षे काम करणाऱ्या कमला गोखले यांच्यावर रीना मोहन या बंगाली दिग्दर्शिकेने हिंदी भाषेत 'कमलाबाई' हा लघुपट तयार केला, याला राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पारितोषिके प्राप्त झाली आहेत, हाच त्यांच्या कार्याचा उचित असा गौरव आहे, असे म्हटले पाहिजे.

– डॉ. अर्चना कुडतरकर

**संदर्भ** : १) टिळेकर महेश, 'मराठी तारका', प्रकाशक – महेश टिळेकर, पुणे; २००७. २) देसाई माधवी, 'गोमंतक सौदामिनी', माणिक प्रकाशन, कोल्हापूर; २०११.

## गोखले, चंद्रकांत रघुनाथ

**अभिनेता**

**७ जानेवारी १९२१ – २० जून २००८**

चंद्रकांत रघुनाथ गोखले यांचा जन्म मिरज येथे झाला. त्यांचे वडील रघुनाथ व आई कमलाबाई हे दोघेही गायक-नट म्हणून रंगभूमीवर काम करीत असत. त्यामुळे चंद्रकांत गोखले यांना अगदी बालपणापासून गाण्याचे व अभिनयाचे बाळकडू मिळाले. वयाच्या आठव्या वर्षी 'पुन्हा हिंदू' या नाटकात छोटी भूमिका करून त्यांनी



आपल्या कलाजीवनाचा श्रीगणेशा केला. त्यांच्या आई कमलाबाई या मराठी चित्रपटसृष्टीतील पहिल्या स्त्री कलाकार होत्या.

घरची गरिबी असल्याने चंद्रकांत गोखले यांना शालेय शिक्षण घेता आले नाही. पण त्यांनी आपल्या आईकडूनच मराठी व हिंदी भाषा शिकून घेतल्या. संगीताची सुरुवात आईकडूनच केली व नंतरच्या काळात मराठी रंगभूमीवर भूमिका करता करता ते मा. दीनानाथ मंगेशकर यांच्याकडूनही थोडेफार संगीत शिकले. बळवंत संगीत मंडळीमध्ये प्रमुख भूमिका करणारे मा. अविनाश व मा. दीनानाथ मंगेशकर यांचे गाणे ऐकून ते आत्मसात केले व त्यांना मनोमन आपले गुरू मानले.

मराठी नाटकात त्यांनी सुरुवातीला काही काळ स्त्री भूमिका केल्या व नंतर पुरुष भूमिका करायला सुरुवात केली. रंगभूमीवरील तब्बल पाऊण शतकाच्या प्रदीर्घ प्रवासात त्यांनी अण्णासाहेब किर्लोस्कर, राम गणेश गडकरी, वि.दा. सावरकर, मामा वरेरकर, मो.ग. रांगणेकर, विष्णुपंत औंधकर, प्र.के. अत्रे, पु.ल. देशपांडे, बाळ कोल्हटकर वगैरे लेखकांच्या विविध भूमिकांना आकार दिला. 'कुलवधू', 'राणीचा बाग', 'राजे मास्तर', 'बॅरिस्टर', 'पुरुष' 'नटसम्राट', 'सिंहासन', 'झुंझारराव' वगैरे एकूण ६४ नाटकांत त्यांनी भूमिका केल्या. 'राजे मास्तर' या श्री.ना. पेंडसे यांच्या 'हद्दपार' या कादंबरीवरून केलेल्या नाटकातील राजे मास्तरांची मुख्य भूमिका चंद्रकांत गोखले यांना मिळाली. एका साध्या शाळा मास्तरांच्या जीवनावर आधारलेले असे हे नाटक होते. या नाटकात त्यांच्यासोबत सुनीता देशपांडे, दत्ता भट, सुमती गुप्ते, श्रीकांत मोघे, मधू कदम आदी मंडळी काम करत होती. पण या नाटकाचे पुरसे प्रयोग होऊ शकले नाहीत. पुढे त्यांना जयवंत दळवी यांच्या 'बॅरिस्टर' या नाटकातील तात्याची छोटी पण




उठावदार भूमिका करण्याची संधी मिळाली. तात्या हे पात्र खलनायकी होते. अशा खेडवळ, बेडर, आडदांड, दारुडा व लंपट तात्या आपल्या विधवा सुनेकडेही वासनेने पाहतो, याचा प्रत्ययकारी अभिनय गोखले करत असत. तर शिरवाडकरांच्या 'नटसम्राट' या नाटकाचे डॉ. श्रीराम लागू यांनी केलेले प्रयोग लक्षात घेऊनही चंद्रकांत गोखले यांनी वृद्ध आप्पासाहेब बेलवलकरांची भूमिका नव्या संचात केली व ती भूमिका यशस्वी करून दाखवली. त्यांनी 'पुरुष' या जयवंत दळवी लिखित नाटकातही महत्त्वपूर्ण भूमिका केली. या नाटकाची संहिता स्त्री-सबलीकरणाचे महत्त्व विशद करणारी आहे. आपले राजकारणी नेते आपल्या समाजाप्रती असणाऱ्या कर्तव्यापासून दूर जाऊन आपल्या परंपरा, संस्कृती, आदर्श या नीतिनियमांना धाब्यावर बसवतात व स्त्रीवर अन्याय करत राहतात, पण आधुनिक काळातील स्त्री आपल्यावर होणाऱ्या अन्यायाचा कशा प्रकारे बदला घेते, याचे वर्णन या नाटकात येते. या नाटकात चंद्रकांत गोखले यांनी आदर्शवादी समाजसेवक असणाऱ्या

अण्णांची भूमिका पार पाडली. या भूमिकेला अनेक पदर होते. आदर्शवाद, देशभक्ती, चांगल्यासाठी झटणे, राष्ट्रीय पुरस्कार मिळाल्यामुळे आनंदी असणे, आपल्या मुलीवर झालेल्या बलात्कारामुळे दु:खी होणे, सामान्य माणसाला या जगात जगणे असाहय्य होणे व त्याने निराश होणे अशा अनेक गोष्टींमुळे या भूमिकेला न्याय देत चंद्रकांत गोखले यांनी ही भूमिका संस्मरणीय केली.

नाटकात भूमिका करीत असतानाच १९३८ साली 'लक्ष्मीचे खेळ' या चित्रपटात त्यांनी सर्वप्रथम भूमिका केली. त्यानंतर त्यांनी जवळजवळ ७० मराठी व १५ हिंदी चित्रपटात चरित्र नायकाच्या भूमिका रंगवल्या. सहज अभिनय, एखाद्या व्यक्तिरेखेत स्वत:ला झोकून देणे हे त्यांचे विशेष गुण होते. 'महाराणी येसूबाई', 'धाकटी जाऊ', 'भैरवी', 'मानिनी', 'माणसाला पंख असतात', 'सुवासिनी', 'सुखाची सावली', 'स्वप्न तेच लोचनी', 'धर्मकन्या', 'ईर्षा', 'मुक्काम पोस्ट ढेबेवाडी', 'जिवाचा सखा' वगैरे मराठी चित्रपटातील त्यांनी केलेल्या भूमिका गाजल्या. तसेच त्यांनी हिंदी व मराठी दूरदर्शन मालिकांतही भूमिका केल्या.

नाट्यक्षेत्रात केलेल्या भूमिकेबद्दल चंद्रकांत गोखले यांना नटश्रेष्ठ 'नानासाहेब फाटक', 'केशवराव दाते', 'मा. दीनानाथ' यांच्या नावाने दिले जाणारे पुरस्कार लाभले. त्याखेरीज 'अखिल मराठी नाट्य परिषद', 'चतुरंग प्रतिष्ठान', 'नाट्यदर्पण', 'कलारंजन' या संस्थांतर्फे वेळोवेळी पुरस्कार लाभले. चित्रपटासाठी त्यांना 'सुवासिनी', 'स्वप्न तेच लोचनी', 'धर्मकन्या' व 'ईर्षा' या चित्रपटासाठी महाराष्ट्र राज्य पारितोषिके मिळाली. नाट्य-चित्रक्षेत्रातील कामगिरीबद्दल त्यांचा विविध संस्था व महाराष्ट्र राज्य यांनी वेळोवेळी बहुमान केला. अखेरच्या काळात मात्र त्यांना समारंभस्थळी प्रत्यक्ष जाऊन पारितोषिके घेणे प्रकृतिअस्वास्थ्यामुळे शक्य होईना. त्यामुळे ते पारितोषिकांचा सविनय अस्वीकार करू लागले.

त्यांनी १९९९ साली कारगिल जवानांसाठी पन्नास हजार रुपयांचा धनादेश दिला व नजीकच्या काळात आर्मी सेंट्रल वेलफेअर फंड व सदर्न कमांड पुणे यांच्याकडे तेवढेच पैसे देणगीदाखल जमा केले. त्यानंतर त्यांनी काही पैसे बँकेमध्ये मुदत ठेवीमध्ये गुंतवले. देशाची सेवा करताकरता अपंगत्व आलेल्या सैनिकांच्या मदतीसाठी 'क्वीन मेरीज् टेक्निकल इन्स्टिट्यूट फॉर डिसेबल्ड सोल्जर्स' या संस्थेला बँकेतील मुदत ठेवीच्या व्याजापोटी येणाऱ्या एक लाख रुपयांचा धनादेश दर वर्षी देण्याचा मानस केला. चंद्रकांत गोखले यांनी आपली आई कमला व पत्नी हेमा यांच्या स्मरणार्थ दर वर्षी दि.२६ फेब्रुवारी रोजी धनादेश देण्याचा प्रघात सुरू केला.

वयाच्या ८८ वर्षी कर्करोगासारख्या आजाराने गोखले यांचे पुणे येथे निधन झाले. त्यांनी आपल्या हयातीत सुरू केलेला अपंग सैनिकांना धनसाहाय्य करण्याचा उपक्रम त्यांच्या मृत्यूनंतरही सुरूच आहे.

– शशिकांत किणीकर

**संदर्भ** : १) किणीकर शशिकांत, 'चंद्रकिरण', मेनका प्रकाशन, पुणे; २००३.

## गोखले, विक्रम चंद्रकांत

**अभिनेता**

**३० ऑक्टोबर १९४५**



अभिनयाचा आणि संगीताचा जन्मजात वारसा लाभलेल्या विक्रम गोखले यांनी हिंदी आणि मराठी चित्रपटसृष्टीत व नाट्यसृष्टीतही अढळपद निर्माण केले आहे. भारतीय चित्रपटसृष्टीतील पहिल्या नायिका म्हणून लौकिक असलेल्या कमलाबाई गोखले या त्यांच्या आजी आणि चरित्रनायक म्हणून ठसा उमटवणारे चंद्रकांत गोखले हे त्यांचे वडील. कलाप्रेमी कुटुंबात आणि हेमावती गोखले या आईच्या संस्कारात विक्रम गोखले यांच्या मनात कलेवरची निष्ठा रुजणे स्वाभाविक होते.



'अनुमती' या चित्रपटात विक्रम गोखले

अभिनयाचा वारसा घरातूनच लाभलेल्या विक्रम चंद्रकांत गोखले यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे शालेय शिक्षण पुण्यातील भावे हायस्कूल व वि.र. वेलणकर हायस्कूल येथे झाले, तर महाविद्यालयीन शिक्षण पुण्यातील एम.ई.एस. (आताचे आबासाहेब गरवारे) महाविद्यालयात झाले. शिक्षण अर्धवट सोडून त्यांनी अभिनयात करिअर करण्याचा निर्णय घेतला.

बालवयातच त्यांनी नाटकांमध्ये कामे करायला सुरुवात केली. बालकलाकार म्हणून त्यांनी 'आग्र्याहून सुटका', 'राजसंन्यास', 'बेबंदशाही' या नाटकांमध्ये भूमिका केल्या. तर याच काळात त्यांनी 'शेवग्याच्या शेंगा' या चित्रपटात पहिल्यांदा अभिनय केला. 'वाहतो ही दुर्वांची जुडी' हे त्यांचे पहिले व्यावसायिक नाटक होय. मराठी चित्रपटात नायक म्हणून 'अनोळखी' हा त्यांचा पहिला चित्रपट होता. स्पष्ट आणि स्वच्छ शब्दोच्चार, उत्तम संवादफेक, देखणे-रुबाबदार व्यक्तिमत्त्व आणि अभिनयातील सहजता या त्रिवेणी संगमातून मराठी आणि हिंदी चित्रपटातील त्यांच्या भूमिका गाजल्या. 'बाळा गाऊ कशी अंगाई' या चित्रपटात आशा काळे, नयनतारा, सतीश दुभाषी अशा कलाकारांबरोबर विक्रम गोखले यांची भूमिकाही प्रेक्षकांच्या स्मरणात राहिली. १९८९ मधील 'कळत नकळत' आणि १९९१ साली प्रदर्शित झालेल्या 'माहेरची साडी' या दोन्ही मराठी चित्रपटांत परस्परांहून वेगळ्या भूमिका त्यांनी ताकदीने उभ्या केल्या. याशिवाय 'कुंकू', 'मुक्ता', 'लपंडाव' या चित्रपटांतील त्यांच्या भूमिकाही गाजल्या. तसेच 'वऱ्हाडी आणि वाजंत्री', 'बिजली', 'आधारस्तंभ' आदी चित्रपटांतही त्यांनी भूमिका साकारल्या. 'वजीर' (१९९४) या चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना फिल्मफेअर ॲवॉर्ड मिळाले, तर

त्यांनी डॉक्टरी पेशावर आधारित कथेवर ‘आघात’ या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. त्यांनी दिग्दर्शित केलेल्या पहिल्याच चित्रपटासाठी त्यांना आंतरराष्ट्रीय पुरस्कार प्राप्त झाला. ‘अनुमती’ या मराठी चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना २०१३ मध्ये सर्वोत्कृष्ट अभिनेत्याचा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. तसेच कोल्हापूर इंटरनॅशनल फिल्म फेस्टिवल व न्यूयॉर्क इंटरनॅशनल फिल्म फेस्टिवलमध्येही त्यांना या चित्रपटातील अभिनयासाठी पुरस्कार प्राप्त झाले आहेत.

नामांकित निर्मिती संस्थांच्या हिंदी चित्रपटांतही विक्रम गोखले यांनी आपल्या हिंदी शब्दोच्चारांनी आणि सहजसुंदर, परिपक्व अभिनयाने आपला ठसा उमटवला आहे. ‘इन्साफ’, ‘खुदा गवाह’, ‘हम दिल दे चुके सनम’, ‘हे राम’, ‘भुलभुलैय्या’, ‘मदहोशी’, ‘तुम बिन’, ‘चॅम्पियन’, ‘लाडला’, ‘हसते हसते’, ‘शाम घनश्याम’, ‘अग्निपथ’, ‘ईश्वर’, ‘सलीम लंगडे पे मत रो’, ‘मिशन ११ जुलै’, ‘सो झूठ एक’, ‘गफला’, ‘धुवाँ’ या हिंदी चित्रपटात त्यांनी वेगवेगळ्या धाटणीच्या भूमिका साकारल्या.

विक्रम गोखले यांनी ‘अपराध मीच केला’, ‘वेगळं व्हायचंय मला’, ‘जास्वंदी’, ‘स्वामी’, ‘महासागर’, ‘जावई माझा भला’, ‘बॅरिस्टर’, ‘दुसरा सामना’, ‘आणि मकरंद राजाध्यक्ष’, ‘संकेत मीलनाचा’, ‘खरं सांगायचं तर’, ‘आप्पा आणि बाप्पा’, ‘नकळत सारे घडले’ इ. नाटकांत मुख्य भूमिका केल्या होत्या. विजया मेहता यांच्या ‘बॅरिस्टर’ नाटकातील त्यांची मध्यवर्ती भूमिका खूप गाजली. कोणत्याही भूमिकेशी समरस होऊन ताकदीने ती भूमिका जिवंत करण्याचे कसब त्यांच्याकडे आहे. कामावर असलेल्या निष्ठेने आणि समर्पणाने त्यांनी हिंदी चित्रपटसृष्टीतही महत्त्वपूर्ण भूमिका केल्या. ‘ढाई अक्षर प्यार के’, ‘जरा मुस्करा दो’ या हिंदी नाटकांशिवाय दूरदर्शन मालिकांमध्येही त्यांचा सहभाग आहे. ‘विरुद्ध’ या मालिकेतील धीरेंद्रराय सिंघानिया या त्यांनी साकारलेल्या भूमिकेची खूप चर्चा झाली. ‘जीवनसाथी’, ‘संजीवनी’, ‘मेरा नाम करेगी रोशन’, या हिंदी मालिका आणि ‘या सुखांनो या’, ‘अग्निहोत्र’ या मराठी मालिकांमध्येही त्यांनी अभिनय केलेला आहे.

मराठी व हिंदीसह त्यांनी १७ गुजराती, २ तमिळ व १ कन्नड या भाषांतील चित्रपटांतूनही काम केले. आपल्या परीने ते लेखनही करतात. नाट्य-चित्रपट संदर्भातील विविध शैक्षणिक संस्था आणि विद्यापीठे येथे अतिथी प्राध्यापक म्हणून ते व्याख्याने देतात.

अभिनय क्षेत्रात भारदस्त कामगिरी करतानाही सामाजिक भान आणि खरेपणा जपणाऱ्या या मनस्वी कलाकाराने पब्लिक चॅरिटेबल ट्रस्टचीही स्थापना केलेली आहे. तसेच त्यांना छायाचित्रणाचाही छंद आहे. चित्रपट, नाटक आणि दूरदर्शन मालिकांमध्ये व्यग्र असले, तरी एक कलाकार म्हणून आणि एक माणूस म्हणून त्यांच्याकडे सभोवतालचे भान आणि चिंतन निश्चित आहे.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## गोर्ले, दत्ता गणपत
**छायाचित्रकार, दिग्दर्शक**
**जन्म-मृत्युदिनांक अनुपलब्ध**



दत्ता गणपत गोर्ले पुण्यात सोमवार पेठेतील सुप्रसिद्ध नागेश्वर मंदिराजवळ राहत. इंग्रजी चौथीपर्यंत त्यांचे शिक्षण झाले होते. तेथील रंगकामाचे व पॉलिशकामाचे ते तरबेज कारागीर होते. लहानपणी दत्ता नागेश्वर मंडळातर्फे हुतुतू खेळत. लहान वयातच त्यांना छायाचित्रणाबद्दल ओढ आणि आकर्षण निर्माण झाले. त्यासाठी धडपड करीत ते शंकरशेठ रोडवरच्या ‘नवयुग स्टुडिओ’त जात. पण दोन वेळा त्यांना दारातूनच धक्के खाऊन परत यावे लागले.

स्टुडिओत शिरकाव करायला मिळत नाही, हे लक्षात आल्यावर त्यांना वाटले की थिएटरवर काम करावे, तिथे

ग

कुणी ना कुणी सिनेमावाले भेटतील, मग त्यांच्या ओळखीने स्टुडिओत शिरता येईल; म्हणून त्यांनी अपोलो थिएटरमध्ये १९३८ ते १९४४ अशी सहा वर्षे डोअरकीपरची नोकरी केली. तिथे स्टोअर रूममधून फिल्म चालवायलाही ते शिकले.

एकदा अपोलो थिएटरमध्येच दत्ता गोर्ले यांची 'माणिकराव स्टुडियो'चे बाळासाहेब पाठक यांच्याशी ओळख झाली. दत्ता गोर्ले यांनी सांगितले, ''मला फोटोग्राफी शिकायची आहे. तुम्ही मला नवयुग स्टुडिओत प्रवेश मिळवून द्या!'' त्यांच्या ओळखीने दत्ता गोर्ले नवयुग स्टुडिओत थेट कॅमेरा डिपार्टमेंटच्या बाळासाहेब ढवळे यांच्या हाताखाली काम करू लागले. सुरुवातीला ते बिनपगारी कामगार होते. त्यांची मेहनत आणि शिकण्याची हौस लक्षात घेऊन तिथलेच दुसरे एक कॅमेरामन बाळ बापट यांनी 'गरिबांचे राज्य' या चित्रपटाच्या वेळी त्यांना आपल्याकडे बोलवून घेतले. त्या वेळी त्यांना तीस रुपये पगार होता. त्या वेळी त्यांना कॅमेरा हाताळायला मिळाला व प्रत्यक्ष चित्रीकरण शिकायला मिळाले. बापट यांना गुरुस्थानी मानून त्यांच्याकडून छायाचित्रणाचे धडे गिरवले. दुय्यम साहाय्यकपदावरून लवकरच त्यांनी बाळ बापटांचा प्रमुख साहाय्यक होण्यापर्यंत मजल मारली.

लवकरच 'नवयुग स्टुडिओ' बंद पडला, पण त्या जागी 'सिंको स्टुडिओ' सुरू झाला आणि सिंको स्टुडिओजतर्फे सुरू होणाऱ्या पहिल्याच चित्रपटाच्या छायाचित्रणासाठी दत्ता गोर्ले यांचे नाव पुढे आले. चित्रपटाचे नाव होते – 'गंगेत घोडं न्हालं' (१९५३).

दत्ता गोर्ले खूश झाले. पण राजा परांजपे यांना त्यांचे नाव मान्य नव्हते. दत्तांनी त्यांना 'माझं काम बघा आणि मग काय ते ठरवा' असे आत्मविश्वासपूर्वक सांगितले.

राजा परांजपे हसले व 'ठीक आहे' म्हणून चित्रीकरणाला सुरुवात झाली. पहिल्याच चित्रीकरणाची 'निगेटिव्ह' पाहून राजा गोसावींनी त्यांना जवळ बोलावून त्यांचे कौतुक केले. राजाभाऊंच्या त्यानंतरच्या अनेक चित्रपटाचे छायाचित्रकार दत्ता गोर्लेच होते. १९५५ ते १९९५ या चाळीस वर्षात दत्ता गोर्ले यांनी ४७ चित्रपटांचे (त्यात दोन हिंदी) छायाचित्रण केले. त्यांनी राजा परांजपे यांच्याशिवाय राजा ठाकूर, दत्ता धर्माधिकारी, राजा नेने, अनंत माने, दिनकर द. पाटील, राजदत्त, मुरलीधर कापडी अशा अनेक यशस्वी दिग्दर्शकांबरोबर काम केले.

काही लघुपट व अनुबोधपटही त्यांनी चित्रित केले. त्यात 'एसटी', 'शेगावचे गजानन महाराज', 'अवतार मेहेरबाबा' असे अनेक अनुबोधपट होते.

'सून माझी लक्ष्मी' (१९८१) व 'जुगलबंदी' (१९८४) या दोन मराठी चित्रपटांचे दिग्दर्शनही त्यांनी केले होते. त्यांच्या चार चित्रपटांना छायाचित्रणाचे पारितोषिक मिळाले.

– मधू पोतदार

## गोसावी, राजा

**अभिनेता**

**२८ मार्च १९२५ – २८ फेब्रुवारी १९९८**



मराठी रंगभूमीवरील आणि मराठी चित्रपटसृष्टीतील ज्येष्ठ अभिनेते राजा गोसावी यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील माणदेश भागातल्या सिद्धेश्वर कुरोली येथे झाला. एकूण २६५ मराठी चित्रपटांत आणि ५ हिंदी चित्रपटांत त्यांनी भूमिका केल्या; तर अनेक नाटके आणि त्याचे शेकडो प्रयोग त्यांनी केले.

मेळे, गाणी, नकला आणि नाटके या गोष्टीत रमण्याची लहानपणापासून आवड असलेल्या राजाभाऊंनी घरातून काढता पाया घेतला आणि थेट गंगाधरपंत लोंढेंच्या 'राजाराम संगीत मंडळी'त प्रवेश मिळवला. तेथे पडद्यामागील कामे करत असतानाच त्यांनी मा. विनायकांच्या प्रफुल्ल पिक्चर्समध्ये नोकरी पत्करली. ही नोकरी करत असतानाच चित्रपटाच्या विविध भागात थातूरमातूर कामे केल्यावर त्यांना 'चिमुकला संसार' या

चित्रपटात पहिले किरकोळ काम मिळाले. नंतर त्यांनी ‘गजाभाऊ’ आणि ‘बडी माँ’ या चित्रपटांतही किरकोळ कामे केली. ‘गजाभाऊ’च्या निमित्ताने त्यांचा दामूअण्णा मालवणकरांशी परिचय झाला, तेव्हा त्यांनी मालवणकरांच्या ‘प्रभाकर नाट्य मंदिर’ या नाट्यसंस्थेत प्रवेश केला. तेथे त्यांना नाटकाचे प्रॉम्प्टिंग करण्याचे काम व हळूहळू नाटकात उभे राहण्याची संधी मिळाली

प्रथम त्यांना या संस्थेच्या ‘भावबंधन’ या नाटकातील स्टेशन मास्तरच्या पहारेकऱ्याचे काम मिळाले. नंतर ते त्या नाटकात मोरू, फौजदार, मनोहर व धुंडिराज या भूमिका करत असत. धुंडिराजचा भाबडेपणा ते बेमालूम व्यक्त करीत. भावी काळात त्यांनी नाटकांत आणि चित्रपटांत प्रेमळ मनाच्या आणि साध्या स्वभावाच्या विविध व्यक्तिरेखा रंगवल्या, त्याची मूळ प्रेरणा धुंडिराज व्यक्तिरेखेत होती. त्यानंतर राजा गोसावी यांनी ‘उधार उसनवार‘, ‘एकच प्याला’, ‘सौभद्र’, ‘संशयकल्लोळ’, ‘शिवसंभव’ अशा असंख्य नाटकात लहानसहान कामे केली. ५ जुलै १९४९ रोजी त्यांचे लग्न झाले आणि प्रपंचाचा खर्च भागविण्यासाठी त्यांनी पुण्याच्या ‘भानुविलास’ थिएटरमध्ये बुकिंग क्लार्कची नोकरी पत्करली. नाटकात ते काम करत होते. दत्ता धर्माधिकारी यांच्या ‘अखेर जमलं’ या चित्रपटाचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून काम करताना त्यांनी याही चित्रपटात छोटीशी भूमिका केली होती. कोडे सोडवण्याऱ्या माणसाची त्यांनी रंगवलेली व्यक्तिरेखा राजा परांजपे यांच्या नजरेत भरली आणि त्यांनी ‘लाखाची गोष्ट’ या चित्रपटात काम दिले. हे विनोदी चित्र कमालीचे गाजले. ज्या भानुविलासमध्ये ते बुकिंग क्लार्क होते, तेथेच हा चित्रपट






हाऊसफुल गर्दी खेचत होता. चित्रपटाला महोत्सवी यश मिळाले. अल्पावधीतच ते 'हिरो' बनले. या यशामुळे चित्रपट निर्माते त्यांच्याभोवती फिरू लागले.

'चिमणी पाखरं', 'बोलाविता धनी', 'सौभाग्य', 'अबोली', 'गंगेत घोडं न्हालं', 'आलिया भोगासी', 'आंधळा मागतो एक डोळा', 'दोन घडीचा डाव', 'पसंत आहे मुलगी', 'इन मीन साडेतीन', 'देवघर', 'उतावळा नवरा', 'नवरा म्हणू नये आपला', 'झालं गेलं विसरून जा' असे त्यांचे अनेक चित्रपट गाजले. त्यांचे हे यश बघून मद्रासच्या रा.व्ही. राम या विख्यात चित्रसंस्थेने 'गाभी' व 'स्कूल मास्टर' या हिंदी चित्रपटांत त्यांना महत्त्वाची भूमिका दिली. दत्ता धर्माधिकारी यांच्या 'महात्मा' या हिंदी-मराठी-इंग्रजी चित्रपटातील त्यांची भूमिका विशेष लक्षात राहिली. 'लाखाची गोष्ट'नंतरच्या दशकात राजाभाऊंचे लागोपाठ साठ-सत्तर चित्रपट आले. त्यांची अमाप लोकप्रियता पाहून होमी वाडियांनी 'राजा गोसावीची गोष्ट' हा बोलपट काढला. यात राजा गोसावी यांनी तिहेरी भूमिका केली.

धुंडिराज, कामण्णा (भावबंधन), तळीराम (एकच प्याला), नूपुर (पुण्यप्रभाव), गोकुळ (प्रेमसंन्यास) या राम गणेश गडकरींच्या नाटकातील विनोदी भूमिका राजा गोसावी यांनी गाजवल्या. चित्रपटांतील त्यांच्या विनोदी भूमिकांनाही प्रेक्षकांचा अमाप प्रतिसाद मिळाला.

पाच फूट सात इंच उंच, नाकीडोळी नीटस असे राजा गोसावी यांचे अव्यंग व्यक्तिमत्त्व होते. मराठीतील इतर विनोदी नटांपेक्षा त्यांचे व्यक्तिमत्त्व अधिक उठावदार

होते. सहजता हा त्यांच्या अभिनयाचा सर्वात मोठा गुण होता. घरीदारी वावरावे इतक्या सहजतेने ते रंगमंचावर व चित्रपटात वावरत. त्यांच्या संवादफेकीत कृत्रिमतेचा लवलेश नव्हता. मिळालेल्या भूमिकेचे मर्म ओळखून ते त्यांचे दर्शन नेमकेपणाने घडवत. निर्व्याज, भाबडा व निरागस माणूस उभा करणे त्यांना सहजगत्या जमत असे.

चित्रपटातल्या यशामुळे त्यांच्याकडे नाटकातल्या – विशेषत: विनोदी नाटकातल्या भूमिकांची रीघ लागली. बाबूराव गोखले यांच्या 'श्री स्टार्स' या नाट्यसंस्थेतर्फे 'करायला गेलो एक' हे फार्सिकल नाटक आणले. त्यातील हरिभाऊ हर्षेची भूमिका त्यांनी बहारीने सादर केली. याच वेळी 'रंग श्री' नावाची स्वत:ची नाट्यसंस्था स्थापन करून त्यांनी अनेक जुनी-नवी नाटके रंगमंचावर आणली व महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात त्याचे शेकडो प्रयोग केले. 'हा स्वर्ग सात पावलांचा', 'या घर आपलंच आहे', 'लग्नाची बेडी', 'तुझे आहे तुजपाशी', 'वरचा मजला रिकामा' अशा अनेक नाटकांतील त्यांच्या भूमिका गाजल्या, तर 'संशयकल्लोळ'मधील फाल्गुनराव व वसंत सबनीस यांच्या 'सौजन्याची ऐशी तैशी'मधील नाना बेरके या बनेल पुरुषाची भूमिका सर्वात गाजली.

नाटकांव्यतिरिक्त अधूनमधून राजा गोसावी चित्रपटातही दिसत असत. या काळात राजा गोसावी-शरद तळवलकर या जोडीचे काही चित्रपट गाजले. 'अवघाची संसार', 'अतिशहाणा त्याचा', 'वाट चुकलेले नवरे', 'येथे शहाणे राहतात', 'लग्नाला जातो मी', 'कामापुरता मामा' व 'शेरास सव्वाशेर' अशा अनेक चित्रपटांत या जोडीने प्रेक्षकांना मनमुराद हसवले. 'दामूअण्णा मालवणकर- विष्णुपंत जोग' यांच्याप्रमाणेच ही दुक्कल गाजली.

वसंतराव जोगळेकर यांच्या 'हा खेळ सावल्यांचा'मधील खलप्रवृत्तीच्या मामाची भूमिका व 'असला नवरा नको ग बाई' आणि 'चंगूमंगू'मधील त्यांच्या भूमिका विशेष गाजल्या. अखेरच्या काळात त्यांनी वि.वा. शिरवाडकरांचे 'नटसम्राट' नाटक सादर करून त्याचे खेड्यापाड्यात प्रयोग केले. बारामती येथे झालेल्या अखिल भारतीय नाट्यसंमेलनाचे अध्यक्षस्थानही त्यांनी भूषवले. 'नटसम्राट'पेक्षा 'विनोद सम्राट' म्हणून ते लोकांच्या अधिक स्मरणात आहेत.

– सतीश जकातदार

**संदर्भ** : १) पाटील रमेश, 'राजा गोसावी', अनुबंध प्रकाशन, पुणे; २००३.

ग

## गौरी

*डवरी, तानूबाई भैरू*

**अभिनेत्री**

**१९१२ – मे १९६९**



चित्रपटसृष्टीत जिजाई म्हणून ओळखल्या गेलेल्या गौरी उर्फ तानूबाई भैरू डवरी यांचा जन्म कोल्हापूरमधील कागल जिल्ह्यातील गरीब कुटुंबात झाला. कोणतेही शालेय शिक्षण न घेतलेल्या तानूबाई यांना चरितार्थासाठी उत्पन्नाचे साधन उपलब्ध नव्हते. त्या काळात कोल्हापूर ही चित्रकर्मींची नगरी असल्यामुळे फारसे कष्ट न घेता त्यांना बाबूराव पेंटर यांच्या महाराष्ट्र फिल्म कंपनीत काम मिळाले. त्या वेळेस त्या तेथे रु. पाच पगारावर कामावर रुजू झाल्या. येथे एक्स्ट्रा म्हणून काम करताना कोणतीही महत्त्वपूर्ण भूमिका त्यांच्या वाट्याला न येताही त्या तेथे काम करतच राहिल्या.

१९३५ सालच्या 'धर्मात्मा' चित्रपटातील एकनाथांच्या घरी श्राद्धाच्या स्वयंपाकाच्या दृश्यात गौरी यांच्या तोंडच्या 'सासू माझा जाच करते लवकर निर्दळी तिला' या छोट्या पण ठसकेबाज संवादामुळे त्या लक्षवेधी ठरल्या. त्यांच्या या वैशिष्ट्यपूर्ण संवादफेकीच्या लकबीमुळे संगीत दिग्दर्शक मा. कृष्णराव यांनी प्रभात कंपनीच्या 'संत तुकाराम' चित्रपटातील कर्तव्यदक्ष, ओढगस्तीच्या संसाराला कंटाळलेली व म्हणून सदैव आपला वैताग व्यक्त



'संत तुकाराम' चित्रपटात विष्णुपंत पागनीस यांच्यासह गौरी

करणारी संत तुकारामांची पत्नी जिजाई यांच्या भूमिकेसाठी तानूबाईंचे नाव सुचवले.

प्रभातच्या तालमी घेण्याच्या प्रक्रियेतून तानूबाईंना संवादाची वही दिली गेली. परंतु लिहिता-वाचता न येणाऱ्या तानूबाईंनी वही परत केली. त्या वेळेस 'संत तुकाराम' चित्रपटाचे संगीत दिग्दर्शक केशवराव भोळे आणि कवी शांताराम आठवले यांनी तानूबाईंकडून संवाद पाठ करून घेतले. याच दरम्यान शांताराम आठवले यांनी तानुबाईंचे नामकरण 'गौरी' असे केले. गावकुसाबाहेर स्मशानाच्या जवळ राहणाऱ्या तानूबाईंनी गौरी या शब्दाचा संबंध शेणाच्या गोवऱ्यांशी जोडला, त्यातल्या अमंगलाने भेदरलेल्या तानूबाईंनी या नावाला विरोध केला, पण शांताराम आठवले यांनी त्यांच्या मनात असलेल्या सांस्कृतिक भेदाचे निराकरण केल्यावर व त्या नावातले मांगल्य जाणून घेतल्यावरच तानूबाईंनी 'गौरी' या नावाला संमती दिली. यातूनच त्यांच्या तल्लख बुद्धीची आणि स्वअस्मितेची जपणूक करण्याच्या स्वभावाची ओळख पटते. साध्या आणि निरागस चेहऱ्याच्या गौरीबाईंनी निभावलेली आक्रस्ताळी व कजाग स्वभावाची 'संत तुकाराम' चित्रपटातील जिजाई त्यातल्या अभिनयाच्या समर्थ साकारणीमुळे आजही प्रेक्षकांच्या स्मरणात आहे. हेच गौरी यांच्या अभिनयाला मिळालेले पारितोषिक आहे, असे म्हणता येते.

गौरी यांच्या अभिनयातील सामर्थ्य लक्षात घेऊन प्रभातने त्यांना शिकवणी लावली. आपल्याबद्दल दाखवलेल्या या आपुलकीने भारावलेल्या गौरी यांनीही

प्रभातला कधीही अंतर दिले नाही. म्हणूनच त्यांना 'कुंकू', 'माणूस', 'शेजारी', 'संत सखू', 'रामशास्त्री' अशा चित्रपटांतून दुय्यम, पण महत्त्वपूर्ण भूमिका मिळाल्या. तसेच त्यांनी प्रभातच्या हिंदी चित्रपटातूनही भूमिका केलेल्या आहेत. त्यांच्या या भूमिकांमधून कधी खाष्टपणा दिसला, तर कधी आपुलकीही प्रत्ययाला आली, अशा या विरोधाभासात्मक भूमिकाही त्यांनी तितक्याच ताकदीने रंगवल्या, हे विशेष. कालांतराने त्यांनी इतर कंपन्यांच्या 'भाग्यरेखा', 'जरा जपून', 'मानाचं पान', 'गंगेत घोडं न्हालं', 'दोन घडीचा डाव' अशा चित्रपटांतूनही दुय्यम भूमिका केल्या.

चित्रपटसृष्टीत वावरणाऱ्या गौरी यांना रंगमंचावर आपल्या अभिनयाची चुणूक फार कमी वेळा दाखवता आली, पण जेव्हा दाखवली तेव्हाचा त्यांचा अभिनयही जिवंत होता. म्हणूनच 'करायला गेलो एक' या विनोदी फार्समधील गोवेकरणीची गौरी यांनी तंतोतंत वठवलेली भूमिका प्रेक्षकांच्या आजही लक्षात राहिली आहे.

१९६१ साली आलेल्या पानशेतच्या पुरात गौरीबाई यांचे संपूर्ण घर उद्ध्वस्त झाल्यामुळे त्या आपल्या जन्मगावी, कागलला आल्या. तल्लख बुद्धीच्या या अभिनेत्रीला आपल्या अखेरच्या दिवसांमध्ये स्मृतिभ्रंश झाला आणि वयाच्या ५७व्या वर्षीच त्यांचे निधन झाले.

– संपादित

* * *

ग

# घ



घ

## घाणेकर, काशिनाथ बाळकृष्ण

**अभिनेता**

**१४ सप्टेंबर १९३२ – २ मार्च १९८६**

**☞ मुख्य नोंद – नाटक खंड**



काशिनाथ बाळकृष्ण घाणेकर यांचा जन्म कोकणातील राजापूर या गावी झाला. त्यांच्या जन्माच्या वेळेस त्यांची आत्या काशीयात्रा करून परत आल्यामुळे त्यांचे नाव ‘काशिनाथ’ ठेवण्यात आले होते. त्यांच्या आईचे नाव यमुनाबाई होते. चिपळूण येथून शालेय शिक्षण पूर्ण झाल्यावर पुढील शिक्षणासाठी त्यांनी पुण्याच्या एस.पी. महाविद्यालयात प्रवेश घेतला. एक वर्ष तेथे शिक्षण घेतल्यानंतर ते पुढील शिक्षणासाठी रत्नागिरीला गेले. तेथे खऱ्या अर्थाने त्यांचा नाट्यसृष्टीशी परिचय झाला व त्यांनी महाविद्यालयाच्या अनेक नाटकांमध्ये काम केले.

एम.डी. होण्याचे आपले स्वप्न पूर्ण होणार नाही, हे लक्षात आल्यावर त्यांनी मुंबईच्या रुईया महाविद्यालयात इंटरसायन्सला प्रवेश घेतला. खरे तर त्यांना सर्जन व्हायचे होते, पण थोडे गुण कमी मिळाल्यामुळे त्यांना सर्जरीला जाता आले नाही. त्यामुळे मोठ्या भावाच्या सल्ल्यानुसार त्यांनी दंतवैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश घेतला. १९५७ मध्ये घाणेकर बी.डी.एस.च्या परीक्षेत मुंबई विद्यापीठात पहिले सुवर्णपदकाचे मानकरी ठरले. त्यानंतर त्यांनी जे.जे. वैद्यकीय महाविद्यालयात व्याख्याता म्हणून नोकरी करण्यास सुरुवात केली आणि पुढे वर्षभरातच त्यांनी स्वत:चा दवाखाना सुरू केला.

परंतु उपजतच्या अभिनयकलेमुळे काशिनाथ घाणेकर यांनी नाटकांमध्ये काम करण्याचा निर्णय घेतला. नाटकामध्ये यशस्वी कारकिर्द घडवणाऱ्या काशिनाथ घाणेकर यांनी चित्रपटातही काम करायला सुरुवात केली. त्यांचा पहिला चित्रपट होता ‘पाहू रे किती वाट’. हा चित्रपट राजा ठाकूर यांनी दिग्दर्शित केला होता. यामध्ये त्यांच्यासोबत अरुण सरनाईक, सीमा यांनी अभिनय केला होता. यातील नायिकेच्या धाकट्या भावाची भूमिका डॉ. काशिनाथ घाणेकर यांनी केली होती. त्यांची नायिका होती उमा. त्यानंतर त्यांना भालजी पेंढारकर यांच्या ‘मराठा तितुका मेळवावा’ या चित्रपटांमध्ये काम करण्याची संधी मिळाली. या चित्रपटात ‘भाव्या’ नावाच्या शिलेदाराचे काल्पनिक पात्र त्यांच्या वाट्याला आले होते. ही भूमिका छोटी असली तरी त्यांच्यावर चित्रित झालेले ‘शूर आम्ही सरदार आम्हाला काय कुणाची भीती’ हे गीत रसिकांच्या आजही तितकेच लक्षात आहे.

काशिनाथ घाणेकर यांचा अभिनय असलेला आणखी एक चित्रपट म्हणजे ‘सुखाची सावली’. हा चित्रपट सुमती क्षेत्रमाडे यांच्या ‘वृंदा’ या कादंबरीवर आधारित होता, तर दिग्दर्शक गजानन जागीरदार, संगीतकार दत्ता डावजेकर व अभिनेत्री जयश्री गडकर अशा दिग्गजांचा त्यात सहभाग होता.

लागोपाठ दोन चित्रपट अपयशी ठरल्यावर काशिनाथ घाणेकर यांची चित्रपट कारकिर्द संपुष्टात येते की, काय असे वाटत असतानाच त्यांना श्रीपाद चित्रतर्फे राजाभाऊ परांजपे यांच्या दिग्दर्शनाखाली ‘पाठलाग’ या मराठीतील पहिल्या रहस्यमय चित्रपटात काम करण्याची संधी



**'पाठलाग' या चित्रपटात काशिनाथ घाणेकर डावीकडून पहिले.**

घ

मिळाली. या चित्रपटातील भूमिकेसाठी काशिनाथ घाणेकर यांना सर्वोत्कृष्ट अभिनेत्याचा पुरस्कार मिळाला. हा चित्रपट विलक्षण यशस्वी ठरल्यावर त्यांच्याकडे 'लक्ष्मी आली घरा' या चित्रपटातील भूमिका चालून आली. हा चित्रपट चंद्रकांत काकोडकर यांच्या 'वंदना' या कौटुंबिक कादंबरीवर आधारलेला होता. दोन भावांच्या या कथेतील मोठ्या भावाची भूमिका चंद्रकांत करणार होते, तर वहिनीच्या भूमिकेसाठी सुलोचनाबाईंची निवड झाली होती व लहान भावाच्या भूमिकेसाठी घाणेकर यांना घेण्यात आले होते. १९६५ मध्ये हा चित्रपट प्रदर्शित झाला. त्यानंतर ते राजा परांजपे यांच्या 'पडछाया' या चित्रपटामध्ये रमेश देव यांच्या मुलाच्या भूमिकेत चमकले.

या दोन चित्रपटातील अभिनय पाहून सुलोचनाबाईंनी 'दादी-माँ' या हिंदी चित्रपटासाठी घाणेकर यांचे नाव सुचवले व घाणेकर यांना या चित्रपटात काम करण्यासाठी बोलावण्यात आले. या चित्रपटाच्या यशानंतर त्यांना लगेच 'अभिलाषा' या नव्या हिंदी चित्रपटात काम करण्याची संधी मिळाली व त्यानंतर त्यांनी 'मधुचंद्र' या नव्या मराठी चित्रपटासाठी करार केला. या चित्रपटाचे दिग्दर्शक होते राजदत्त. प्रभाकर ताम्हाणे यांच्या 'अल्ला जाने क्या होगा' या कथेवर आधारलेल्या चित्रपटासाठी नायिका म्हणून उमा यांची निवड करण्यात आली होती. या चित्रपटाला एन.दत्ता यांनी संगीत दिले होते. यामध्ये त्यांनी वठवलेली खेळकर दिनूची भूमिकाही खूपच गाजली. पुढे त्यांना 'एकटी' या राम केळकर यांची पटकथा-संवाद व राजा ठाकूर यांचे दिग्दर्शन असलेल्या चित्रपटात मधूची भूमिका मिळाली होती.

कालांतराने त्यांनी 'देवमाणूस' व 'झेप' या चित्रपटांमध्ये काम केले. पण हे दोन्ही चित्रपट अजिबात चालले नाहीत. त्यानंतर त्यांनी 'चंद्र आहे साक्षीला' या चित्रपटात काम केले. पण तोही चित्रपट फारसा चालला

नाही. 'गारंबीचा बापू' या चित्रपटातील इरसाल बापूची त्यांची भूमिका प्रेक्षकप्रिय ठरली होती. 'हा खेळ सावल्यांचा' या चित्रपटात त्यांनी केलेली मानसोपचारतज्ज्ञाची भूमिकाही लोकप्रिय झाली. त्यानंतर मात्र त्यांनी चित्रपटांमधून फारशा भूमिका केल्या नाहीत.

घ

चित्रपटामध्ये आपली यशस्वी कारकीर्द निर्माण करणाऱ्या काशिनाथ घाणेकर यांना विशेष रस होता तो नाटकातील अभिनयामध्ये. अशा या अभिनेत्याचे 'तुझे आहे तुजपाशी' या नाटकाच्या दौऱ्यावर असतानाच, अमरावती येथे हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले.

– डॉ. अर्चना कुडतरकर

**संदर्भ** : १) घाणेकर कांचन, 'नाथ हा माझा', मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे; १९९०.

## घाणेकर, गिरीश गोविंद

**दिग्दर्शक**

**१६ ऑगस्ट १९४३ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



गिरीश गोविंद घाणेकर यांना मराठी चित्रपटसृष्टीतील गोविंद घाणेकर या कल्पक, मेहनती, प्रतिभावान व परोपकारी व्यक्तीच्या पोटी जन्म लाभला. वडिलांच्या स्वभावातला हा सारा वारसा गिरीश यांना लाभला. मुंबई विद्यापीठातून १९६६ साली संख्याशास्त्र विषय घेऊन ते पदवीधर झाले. नंतर त्यांनी भारतीय विद्याभवनातून १९६७ साली विपणनशास्त्राची पदविका आणि १९६८ साली जाहिरातशास्त्राची पदविका मिळवल्या. ते १९६९ साली वडिलांच्या – गोविंद घाणेकरांच्या 'ट्रायोफिल्म्स'मध्ये रुजू झाले. त्यांनी १९७३ ते १९७४ अशी दोन वर्षे आरसीए टेलिव्हिजन (रेडियो कार्पोरेशन ऑफ अमेरिका)मध्ये कामाचा अनुभव घेतला.

'निशांत' (१९७५) व 'मंथन' (१९७६) या चित्रपटांचे दिग्दर्शक श्याम बेनेगल यांच्या हाताखाली साहाय्यकाचे काम करून गिरीश घाणेकर यांनी दिग्दर्शनाचे धडे घेतले होते.

१९८२ साली गिरीश यांनी 'जी'ज फिल्म शॉप' या नावाची स्वत:ची चित्रसंस्था काढली. या संस्थेने व इतर कंपन्यांनी काढलेले बरेच चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केले. 'गोष्ट धमाल नाम्याची', 'हेच माझे माहेर', 'प्रेम करू या खुल्लमखुल्ला', 'रंगतसंगत', 'राजाने वाजवला बाजा', 'बाळाचे बाप ब्रह्मचारी', 'हसण्यासाठी जन्म आपुला', 'वाजवा रे वाजवा' व 'नवसाचं पोर' असे चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केले. स्वत:ची चित्रसंस्था सुरू करण्याआधीच्या 'कैवारी' या चित्रपटाचे ते सूत्रधार होते, तर मातोश्री सुनंदाबाई घाणेकर या निर्मात्या होत्या.

'गोष्ट धमाल नाम्याची' या पहिल्याच चित्रपटापासून संकलक अशोक पटवर्धन व संगीतकार अशोक पत्की यांच्याशी त्यांचे विशेष सूर जमले.

कमीतकमी वेळात प्रेक्षकांना बरेच काही सांगणे हे जाहिरातपटाचे तत्त्व त्यांनी चित्रपटात वापरले. त्यामुळे त्यांचे सर्व चित्रपट कमालीचे बांधेसूद असून त्यात पाल्हाळ नसे. त्यातील कथानक जरासुद्धा रेंगाळत नसे. उत्तम निर्मितिमूल्य, अभिरुचीसंपन्न कथानक, निर्मळ नर्मविनोद आणि ओघवती मांडणी यामुळे त्यांच्या चित्रपटांना गती असे. त्यांचा मूळ पिंड कलावंताचा. वडिलांबरोबर काम करत त्यांनी आपले कलागुण अधिक विकसित केले व बापसे बेटा सवाई ठरला.

'हेच माझे माहेर', 'प्रेम करू या खुल्लमखुल्ला' या त्यांच्या चित्रपटांना फाळके पुरस्कार, तर 'रंगतसंगत', 'वाजवा रे वाजवा' व 'नवसाचं पोर' या तिन्ही चित्रपटांना मा.विनायक पुरस्कार मिळाले होते.

'नवसाचं पोर' हा गिरीश घाणेकर यांचा शेवटचा चित्रपट ठरला. त्यांच्या वयाच्या ५६ व्या वर्षी त्यांचा मृत्यू झाला. त्यांच्या अकाली निधनाने मराठी चित्रपटसृष्टीने एक कल्पक व प्रतिभावान दिग्दर्शक गमावला.

– मधू पोतदार

## घाणेकर, गोविंद ब.
**दिग्दर्शक**
**१५ जून १९११ - १४ डिसेंबर १९७९**

गोविंद ब. घाणेकर हे मूळचे साताऱ्याचे. ते मॅट्रिक झाल्यावर अनेक लहानमोठे उद्योग करत असतानाच त्यांची बी.पी.सामंत यांच्याशी गाठ पडली. त्यांच्याकडे ते सुमारे आठ वर्षे म्हणजे १९३३ ते १९४० पर्यंत होते. या काळात त्यांनी मुंबईच्या 'नवाकाळ' वर्तमानपत्रातही लेखन केले. घाणेकर १९४० मध्ये 'प्रभात फिल्म कंपनी'त निर्मिती व्यवस्थापक म्हणून काम पाहू लागले. 'प्रभात'च्या परंपरेतले सर्व गुण गोविंदरावांच्या अंगी उपजतच होते. विशेषत: व्यावसायिक शिस्त व कामातील सफाई व कौशल्य या गुणांचा त्यांनी नंतर स्वत: काढलेल्या चित्रसंस्थेत फार उपयोग झाला.

प्रभातच्या 'संत जनाबाई' या १९४९ सालच्या चित्रपटाचे त्यांनी दिग्दर्शन केले होते. ते १९५१ ते १९५५ पर्यंत 'फेमस पिक्चर्स' व १९५५ ते १९६१ पर्यंत 'इंडियन नॅशनल पिक्चर्स'चे महाव्यवस्थापक होते. या दोन्ही संस्थांसाठी त्यांनी अनेक जाहिरातपट तयार केले. त्यांनी सुधीर फडके यांच्या 'वंशाचा दिवा' (१९५०), माणिक चित्रचा हिंदी-मराठी 'शिवलीला' व पांडुरंग कोटणीस यांचा 'भल्याची दुनिया' या चित्रपटांचे दिग्दर्शन केले.

गोविंदरावांनी जाहिरातक्षेत्रात वेगळे विश्व निर्माण केले. नंतर १९६१ साली गोविंदरावांनी 'ट्रायोफिल्म' नावाची जाहिरातपट काढणारी स्वत:ची चित्रसंस्था सुरू केली. त्यानंतर 'सह्याद्री फिल्म्स' ही संस्था काढली.

श्याम बेनेगल यांनी गोविंदरावांच्या संस्थेतच आपल्या सिनेकारकिर्दीची सुरुवात केली. गोविंदरावांच्या मार्गदर्शनाखाली जाहिरातपट तयार करतानाच श्याम बेनेगल यांच्या प्रतिभेला अंकुर फुटला. त्यामुळे समांतर चित्रपटसृष्टीला एक प्रतिभावंत दिग्दर्शक मिळाला.

गोविंदराव हे अतिशय परोपकारी वृत्तीचे 'भला माणूस' होते. दादरच्या 'पाम व्ह्यू'मधील त्यांच्या घरी त्यांचे मित्र ग.दि. माडगूळकर व त्यांचा गोतावळा यांचा कायम राबता असे. आध्यात्मिक वृत्तीचे गोविंदराव हे गुरुदेव रानडे यांचे शिष्य होते.

गोविंदरावांच्या 'इंडियन नॅशनल पिक्चर्स'ने जाहिरातपटाऐवजी एक मराठी चित्रपट काढायचे ठरवले. गोविंदराव चित्रपटकलेला फार महत्त्व देत. त्यांनी शहराप्रमाणे ग्रामीण भागातही चालेल अशा कौटुंबिक विषयावर - कुटुंबनियोजनासारख्या राष्ट्रीय समस्येच्या विषयावर चित्रपट काढला. कथा- पटकथा-संवाद-गीते गदिमांनी लिहिली, तर बाबा पाठकांनी दिग्दर्शन केले. चित्रपट होता 'प्रपंच'. या चित्रपटाला राज्य सरकारचे सात पुरस्कार तर दिल्लीत सर्व भाषेतील सर्वोत्तम चित्रपटाचा पुरस्कार मिळाला. पुढे युनेस्कोने हा चित्रपट विकत घेऊन तो जगातील बेचाळीस भाषांमध्ये डब केला. गोविंद घाणेकर यांचे मुंबई येथे निधन झाले.

- मधू पोतदार

* * *

घ

# च





## चंद्रकांत

*मांडरे, गोपाळ तुकाराम*

**अभिनेता**

**१३ ऑगस्ट १९१३ – १७ फेब्रुवारी २००१**



मूकपटापासूनच आपल्या कसदार अभिनयाने आणि प्रभावी व्यक्तिमत्त्वाने मराठी चित्रपटसृष्टीवर स्वतंत्र ठसा उमटवणारे अभिनेते म्हणजे चंद्रकांत. चंद्रकांत जवळपास पाच दशके चित्रपट क्षेत्रात कार्यरत होते. या काळात शंभराहून अधिक चित्रपटात भूमिका करून त्यांनी रसिकांच्या मनात कायमचे स्थान मिळवले.

चंद्रकांत उर्फ गोपाळ तुकाराम मांडरे यांचा जन्म कोल्हापुरात झाला. त्यांना एक बहीण आणि वामन उर्फ सूर्यकांत हे भाऊ होते. त्यांच्या वडिलांचा लुगडी विकण्याचा व्यवसाय होता. चंद्रकांत यांचे इंग्रजी सहावीपर्यंतचे शालेय शिक्षण कोल्हापूरलाच हरिहर विद्यालयात आणि प्रायव्हेट हायस्कूलमध्ये झाले. त्या वेळीच त्यांच्यावर चित्रकलेचेही संस्कार झाले. त्या लहान वयात माधवराव बागल यांच्या निसर्गचित्रांचा त्यांच्यावर प्रभाव पडला. वडिलांनी त्यांना बाबूराव पेंटर यांच्याकडे नेले. मात्र बाबूरावांनी त्यांना बाबा गजबरांकडे पाठवले. गजबर तेव्हा ओब्रायन टेक्निकल स्कूलमध्ये कलाशिक्षक होते.

चंद्रकांत यांनी गजबरांकडूनच चित्रकलेचे पहिले धडे घेतले आणि चित्रकलेत कसब मिळवून इंटरमिजिएट ही चित्रकलेची परीक्षा ते उत्तीर्ण झाले. १९३२ मध्ये कोल्हापूरच्या राजाराम आर्ट सोसायटीतर्फे भरलेल्या प्रदर्शनात चंद्रकांत यांच्या पन्हाळा किल्ल्याच्या जलचित्राला पहिले रौप्यपदक मिळाले. बाबा गजबरांनी त्यांचे चित्रकलेतले प्रावीण्य पाहून बलवंत सिनेटोन कंपनीत पोस्टर तयार करण्याची नोकरी मिळवून दिली. पण बलवंत सिनेटोन कंपनी लवकरच बंद पडली. त्यानंतर शालिनी सिनेटोन या बाबूराव पेंटर यांच्या चित्रकंपनीत महिना २५ रुपये पगारावर ते नोकरी करू लागले. शालिनी सिनेटोनतर्फे सुरू असलेल्या ‘उषा’ या भव्य पौराणिक चित्रपटांची पोस्टर्स चंद्रकांत यांनी बनवली. पुढे बाबूराव पेंटर यांनी ‘सावकारी पाश’ या मूकपटाचे बोलपटात रूपांतर करण्याचे काम सुरू केले. या चित्रपटाचा नायक म्हणून बाबूरावांनी चंद्रकांत यांची निवड केली. या पहिल्याच चित्रपटात बाबूराव पेंटर यांनी त्यांच्याकडून उत्कृष्ट अभिनय करून घेतला. ‘सावकारी पाश’ हा त्यांचा पहिलाच सामाजिक चित्रपट यशस्वी ठरला होता.

चंद्रकांत यांनी १९३८ मध्ये ‘ज्वाला’ या चित्रपटात अभिनेते चंद्रमोहन यांच्याबरोबर अभिनय केला. त्याच वर्षी भालजी पेंढारकर यांनी सरस्वती सिनेटोनतर्फे ‘राजा गोपीचंद’ या चित्रपटाची निर्मिती करताना चंद्रकांत यांना बोलावून घेतले आणि चित्रपट पूर्ण झाल्यावर चित्रपटाची जाहिरात करताना त्यांचे नाव ‘चंद्रकांत’ असे ठेवले.

त्यानंतर चंद्रकांत यांनी व्ही. शांताराम यांच्या ‘शेजारी’ या चित्रपटात भूमिका केली आणि प्रभातमध्ये ते पूर्णवेळ नोकरीही करू लागले. पुढे त्यांनी ‘थोरातांची कमळा’, ‘भरतभेट’, ‘रामराज्य’, ‘जय मल्हार’, ‘मानाचं पान’, ‘मीठभाकर’, ‘छत्रपती शिवाजी’, ‘वादळ’, ‘मुकं लेकरू’, ‘भाऊबीज’, ‘सांगते ऐका’,

'मोहित्यांची मंजुळा', 'युगे युगे मी वाट पाहिली', 'पवनाकाठचा धोंडी', 'संथ वाहते कृष्णामाई', 'मानाचा मुजरा', 'धन्य ते संताजी धनाजी', 'ईर्षा', 'अष्टविनायक', 'भालू', 'पतिव्रता', 'बनगरवाडी' अशा अनेक चित्रपटांत उल्लेखनीय भूमिका केल्या. 'राजा गोपीचंद'सह 'असीरे हवीस', 'महारथी कर्ण', 'जीवनयात्रा', 'मेरे लाल', 'छत्रपती शिवाजी', 'नवरंग', 'सुवर्णभूमी', 'शेरशिवाजी' या हिंदी चित्रपटांतही त्यांनी अभिनय केला आणि 'लाईन्स ऑन द रॉक' या इंग्रजी चित्रपटातही विशेष भूमिका केली.

'युगे युगे मी वाट पाहिली' (१९६५), 'पवनाकाठचा धोंडी' (१९६६) आणि 'संथ वाहते कृष्णामाई' (१९६७) या चित्रपटांतील त्यांच्या अभिनयाला राष्ट्रीय सन्मान मिळाला; तर 'संथ वाहते कृष्णामाई' (१९६७) आणि 'खंडोबाची आण' (१९६८) या चित्रपटातील भूमिकांसाठी त्यांना महाराष्ट्र सरकारने पारितोषिक देऊन गौरवले होते.

चंद्रकांत यांनी भालजी पेंढारकर यांच्या चित्रपटातील शिवाजीराजे इतक्या ताकदीने, समरसतेने उभे केले की, महाराष्ट्रातील रसिकांनी त्यांच्या रूपातील छायाचित्रे घराघरांत जपून ठेवली. त्याचबरोबर संभाजी, शहाजी यासारख्या ऐतिहासिक व्यक्तिरेखांतही त्यांनी इतिहासातली सजीवता आणली आणि 'राम', 'कृष्ण' अशा पौराणिक अवतारातही त्यांच्या व्यक्तित्वाने रसिकांना भारावून टाकले होते.

भूमिका नेमकी समजून, अचूक संवाद फेकीने त्यांनी लोहारापासून गावपाटलापर्यंत आणि शेतकऱ्यापासून नेत्यापर्यंत विविध प्रकारच्या व्यक्तिरेखांना पुरेपूर न्याय

च

**'छत्रपती शिवाजी' या चित्रपटात शिवाजी महाराजांच्या भूमिकेत चंद्रकांत**



दिला. सूर्यकांत या त्यांच्या अभिनेते बंधूंबरोबरही ते अनेक चित्रपटांत दिसले.

चंद्रकांत यांनी १९८० साली चित्रपट क्षेत्रातून निवृत्ती पत्करली. मात्र अभिनेते, दिग्दर्शक अमोल पालेकर यांच्या आग्रहास्तव त्यांनी १९९७ साली 'बनगरवाडी' चित्रपटात भूमिका केली. हाच त्यांचा अखेरचा चित्रपट.

चित्रपटसृष्टीतल्या रुपेरी कारकिर्दीबरोबरच त्यांच्यातल्या संपन्न चित्रकाराने चित्रकार म्हणूनही मान्यता मिळवली. चित्रपटाच्या चित्रीकरणाच्या मधल्या वेळात त्या त्या ठिकाणी त्यांनी जलरंगात अनेक निसर्गचित्रे रेखाटली. यासाठी त्यांनी फ्रान्स, नेपाळ, अमेरिकेसह अनेक परदेशदौरे केले. भारतभर चित्रप्रदर्शनेही भरवली.

चित्रकला क्षेत्रातल्या या योगदानासाठी त्यांना जागतिक मराठी परिषद (१९८९), फाय फाऊंडेशन (१९३०), छत्रपती शाहू पुरस्कार (१९९४), व्ही. शांताराम पुरस्कार (१९९४), अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळाचा चित्रभूषण पुरस्कार (१९९८) यांसह महत्त्वाचे अनेक पुरस्कार प्राप्त झाले.

दर वर्षी दिवाळीच्या आणि उन्हाळ्याच्या सुट्टीत विद्यार्थ्यांना निसर्गचित्राच्या आणि पावडर शेडिंगच्या वर्गात चंद्रकांत मांडरे स्वत: शिकवत असत. १९८४ साली चंद्रकांत यांनी स्वत: काढलेली ४०० चित्रे शासनाच्या स्वाधीन केली आणि त्या चित्रांचे 'चंद्रकांत मांडरे कलासंग्रहालय'ही उभे राहिले. त्यांनी १९९७ साली चंद्रकांत मांडरे कला अकादमी स्थापन केली. या अकादमीतर्फे दर वर्षी कष्टाळू, गुणवंत कलावंतांना पारितोषिक देऊन त्यांचा सन्मानही केला जातो.

आपल्या अखेरच्या काळातही कलासाधनेत व्यस्त असतानाच चित्रपटसृष्टीच्या इतिहासातले एक समर्थ, तेजस्वी व्यक्तिमत्त्व काळाच्या पडद्याआड गेले.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ :** १) मांडरे सूर्यकांत, 'चंद्रकांत', पुरातत्त्व वस्तुसंग्रहालय विभाग; १९८६. २) मांडरे सूर्यकांत, 'धाकटी पाती', पुरंदरे प्रकाशन, पुणे; १९८६.

## चंद्रमोहन

*वॉटल, चंदर मोहन*

**अभिनेता**

**१९०७ – १९४९**



चंदर मोहन वॉटल ऊर्फ चंद्रमोहन यांचा जन्म काश्मीरमधल्या नरसिंगपूर गावात झाला. त्यांनी दिल्ली येथे एका वितरणसंस्थेत नोकरी केली. त्या वितरणसंस्थेसाठी काम करत असताना त्यांनी दिल्ली, पंजाब, सिंध आणि वायव्य सरहद्द प्रांत या प्रदेशांसाठी प्रभातच्या चित्रपटांच्या वितरणाचे हक्क मिळतात का? हे पाहण्यासाठी पुण्यात प्रभातला भेट दिली. शांतारामबापूंनी त्यांचा चेहरा, डोळे, बोलण्याची लकब, उलटे फिरवलेले काळेभोर केस पाहूनच त्यांना चित्रपटात काम करण्याची विचारणा केली आणि दरमहा साठ रुपये पगारावर प्रभातमध्ये त्यांची वर्णी लागली. 'अमृतमंथन' (१९३४) हा त्यांचा पहिला चित्रपट. त्यात त्यांनी सनातनी वृत्तीचा महंत रंगवला होता. 'धर्मात्मा'मध्येही ते कर्मठ प्रवृत्तीचा महंत होते. 'अमर ज्योती'त (१९३६) कुबड्या घेऊन वावरणारा 'दुर्जय' हा खलनायक त्यांनी रंगवला, तर 'वहाँ'मध्ये (१९३७) आर्यांचा कोदंडधारी राजा झाले होते. त्यांचे सारे बोलपट हिंदी भाषेतील होते.

बाबूराव पेंढारकर यांनी चंद्रमोहन यांना 'ज्वाला' (१९३८) बोलपटासाठी कोल्हापूरला आणले. मराठी व हिंदी अशा दोन भाषेत 'ज्वाला' हा बोलपट निर्माण केला होता. चंद्रमोहन यांचा हा पहिला मराठी चित्रपट. त्यात त्यांनी 'अंगार' ही भूमिका साकारली होती.

त्यानंतर चंद्रमोहन यांनी मुंबईच्या सिर्को चित्रसंस्थेसाठी 'गीता' (१९४०) आणि 'आपुले घर' (१९४२) हे दोन मराठी चित्रपट केले. 'गीता'त त्यांची दुहेरी भूमिका होती आणि नायिका होत्या दुर्गा खोटे. त्यांचा पुढला चित्रपट होता 'आपुले घर', त्यात नायिका

होत्या शांता आपटे.

चंद्रमोहन यांचे हे तिन्ही बोलपट बहुचर्चित ठरले. त्यानंतर त्यांनी 'पुकार' (१९३९), 'भरोसा' (१९४०), 'रोटी', 'हुमायून' (१९४५), 'शहीद' (१९४८), 'रामवाड', 'बडे नवाब साहेब' यासारखे हिंदी चित्रपट केले आणि गाजवले. 'रोटी'मधली शेठ धरमदास ही त्यांची भूमिका अजरामर ठरली.

शांतारामबापूंचा 'शकुंतला' हा मुंबईतला पहिला चित्रपट. त्यात चंद्रमोहन यांनी राजा दुष्यंतची भूमिका केली होती. बाहेरच्या चित्रपटात काम करण्यासाठी लाखो रुपये बिदागी घेणाऱ्या चंद्रमोहन यांनी आपल्या गुरूंकडून म्हणजे शांतारामबापूंकडून अवघे तीन हजार रुपये मानधन घेतले. मद्यपानाच्या अतिरेकामुळे तरुण वयातच चंद्रमोहन यांचा मृत्यू झाला.

– संपादित

## चव्हाण, उषा
**अभिनेत्री**
**जन्मदिनांक अनुपलब्ध**



उषा चव्हाण यांचा जन्म आंबेगाव तालुक्यातील अवसरी खुर्द या गावी झाला. चित्रपटात येण्याअगोदर उषा चव्हाण यांची तमाशा पार्टी होती. पुढे त्या नाटकातून भूमिका करू लागल्या. 'लवंगी मिरची कोल्हापूरची' हे त्यांचे अरुण सरनाईक यांच्याबरोबर काम असणारे नाटक गाजले होते. नायिका म्हणून 'केला इशारा जाता जाता' (१९६५) या पहिल्याच चित्रपटात त्यांनी आपल्या उत्कृष्ट अभिनयाबरोबर नृत्यकौशल्याने साऱ्या प्रेक्षकवर्गाला जिंकले होते.

उषा चव्हाण यांना हा चित्रपट मिळाला, हा निव्वळ योगायोग होता. अनंत माने यांनी आपली नेहमीची नायिका जयश्री गडकर यांना सोडून नृत्यसमूहातून नाचणाऱ्या उषा चव्हाण यांना नायिका म्हणून काम करण्याची संधी दिली. उषा चव्हाण या आधी 'सवाल माझा ऐका' चित्रपटात जयश्री गडकर यांच्या मागे कोरसमध्ये नाचल्या होत्या.

अनंत माने यांनी जेव्हा उषा चव्हाण यांना काम करण्याबाबत विचारले, तेव्हा 'मागच्यासारखं नाचाचं काम असणार ना? पण या वेळी मी दिवसाला १५ रुपये घेऊन काम करणार नाही. २० रुपये घेईन' असे बजावले. त्यावर माने म्हणाले, 'अगं, तुला या वेळी मागे नाचायचं नाही, तुला या चित्रपटात नायिका म्हणून काम करायचं आहे.' या चित्रपटाद्वारे उषा चव्हाण यांची नायिका म्हणून वाटचाल सुरू झाली. महाराष्ट्र शासनाने पाचव्या चित्रपट महोत्सवात उषा चव्हाण यांना 'सवाल माझा ऐका' या चित्रपटासाठी उत्कृष्ट अभिनेत्री म्हणून पारितोषिक देऊन गौरवले होते. पुण्याच्या आर्यन चित्रपटगृहात हा चित्रपट ७० आठवडे चालला होता.

'केला इशारा जाता जाता'च्या यशामुळे उषा चव्हाण यांना चित्रपटातून भराभर कामे मिळत गेली. 'खंडोबाची आण', 'मुक्काम पोस्ट ढेबेवाडी', 'अशी रंगली रात्र', 'कोर्टाचा पायरी' यासारखे अनेक चित्रपट त्यांनी केले आणि अचानक 'सोंगाड्या'च्या रूपाने त्यांना वेगळीच संधी मिळाली. 'सोंगाड्या'त प्रथम जयश्री गडकर काम करणार होत्या. पुढे त्यांनी भूमिका करण्यास नकार दिला आणि उषा चव्हाण यांच्याकडे 'सोंगाड्या' चित्रपट आला. अर्ध्या विजारीमधल्या बावळट नायकाचा 'सोंगाड्या' हा सुवर्णमहोत्सवी चित्रपट ठरला. दादा कोंडके आणि उषा चव्हाण यांची जोडी म्हणजे चित्रपटावर पैशाचा पाऊस, असे समीकरण झाले.

'सोंगाड्या' (१९७१) पाठोपाठ आला 'एकटा जीव सदाशिव' (१९७१). उषा चव्हाण यांनी त्यात उत्कृष्ट अभिनय आणि नृत्ये केली होती. हा चित्रपटही सुवर्णमहोत्सवी ठरला. 'पांडू हवालदार' (१९७५), 'राम राम गंगाराम' (१९७७), 'बोट लावीन तिथं गुदगुल्या' (१९७८), 'आली अंगावर', 'मुका घ्या मुका' (१९८७), 'पळवापळवी' (१९९०), 'येऊ का घरात'

च



**'केला इशारा जाता जाता' या चित्रपटात लावणी सादर करताना उषा चव्हाण**

(१९९२), 'सासरचं धोतर' (१९९४), 'वाजवू का?' हे दादा कोंडके आणि उषा चव्हाण या जोडीचे चित्रपट गाजले.

प्रसिद्ध कलाकार गणपत पाटील यांच्याबरोबर 'सख्या सजणा' चित्रपटात काम करून चित्रपटात रूढ अर्थाने 'नायक' नसतानाही चित्रपट गाजू शकतो, हे उषा चव्हाण यांनी स्वत:च्या अभिनयाने आणि नृत्यकलेने दाखवून दिले. निळू फुले यांच्याबरोबर 'सोनारानं टोचलं कान' आणि 'थापाड्या' या चित्रपटांतून त्यांनी आपले अभिनयकौशल्य सिद्ध केले. 'रानपाखरं' चित्रपटात उषा चव्हाण यांच्या कसदार अभिनयाचे दर्शन घडले होते. या चित्रपटासाठी त्यांना मानसन्मानही मिळाले. 'शिर्डी के साईबाबा', 'तेरे मेरे बीच में', 'अंधेरी रात में दिया तेरे हाथ में' या हिंदी चित्रपटांतही त्यांनी काम केले. 'चुडा तुझा सावित्रीचा', 'एकटा जीव सदाशिव', 'करावं तसं भरावं', 'वरात', 'चोरीचा मामला', 'दगा', 'नाव मोठं लक्षण खोटं', 'भैरू पैलवान की जय', 'कलावंतीण', 'चांडाळ चौकडी', 'चोरावर मोर', 'मंत्र्याची सून',

'पैज', 'जिद्द', 'गनिमी कावा', 'मोसंबी नारिंगी' (१९८१), 'भामटा' (१९८२), 'डाळिंबी', अशा अनेक चित्रपटातून त्यांनी साकारलेल्या वैशिष्ट्यपूर्ण भूमिका आजही प्रेक्षकांच्या स्मरणात राहिल्या आहेत.

उषा चव्हाण यांना 'केला इशारा जाता जाता', 'बोट लावीन तिथं गुदगुल्या' आणि 'चोरावर मोर' या चित्रपटांसाठी महाराष्ट्र शासनाची पारितोषिके मिळाली आहेत. त्यांनी 'गौराचा नवरा' आणि 'धरपकड' अशा दोन चित्रपटांची निर्मिती आणि दिग्दर्शन केले.

– अभिजित पेंढारकर

## चव्हाण, पद्मा अण्णासाहेब

**अभिनेत्री**

**७ जुलै १९४४ – १२ सप्टेंबर १९९६**



पद्मा अण्णासाहेब चव्हाण यांचा जन्म कोल्हापुरात झाला. सरदार घराण्यातील कॅप्टन अण्णासाहेब चव्हाण यांची ही कन्या. अभ्यासात त्यांची प्रगती झाली नाही. जेमतेम प्राथमिक शिक्षण पूर्ण करून पद्मा यांनी शाळेला रामराम ठोकला आणि चित्रपटात कारकिर्द घडवायची, असे मनोमन ठरवून टाकले. कोल्हापुरात चित्रपटनिर्मिती होतच होती. १९५९ साली भालजी पेंढारकर यांच्या 'आकाशगंगा' या चित्रपटात पद्मा यांना भूमिका मिळाली.

पद्मा चव्हाण यांच्या भूमिका असलेले 'अवघाची संसार' (१९६०), 'एक दोन तीन', 'आराम हराम आहे' (१९७६), 'बोट लावीन तिथं गुदगुल्या' (१९७८) हे चित्रपट लोकप्रिय झाले. पद्मा चव्हाण यांच्या या भूमिका आठवताना प्रकर्षाने एक गोष्ट लक्षात येते की, नागरी-शहरी रूपात त्या जशा शोभतात, तशाच ग्रामीण स्वरूपातही. या दोन्ही प्रकारच्या भूमिका त्यांनी सहजपणे साकारल्या आहेत. 'या सुखांनो या' (१९७५) आणि 'आराम हराम आहे' (१९७६) या चित्रपटातील भूमिकांबद्दल पद्मा चव्हाण यांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कारही मिळाले.

मराठीत घौडदौड चालू असताना पद्मा यांनी हिंदीतही काही लक्षणीय भूमिका केल्या आहेत. अनेक वेळा त्या नकारात्मक, खलनायकी भूमिका होत्या. 'आदमी', 'बिन बादल बरसात', 'कश्मीर की कली' या चित्रपटांमधून त्यांनी हिंदी चित्रपटसृष्टीतील दिग्गज कलावंतांसोबत काम केले.

'लग्नाची बेडी'बरोबर काही नाटकेदेखील त्यांच्याकडे चालून आली. 'माझी बायको माझी मेहुणी!' 'गुंतता हृदय हे' या नाटकातील त्यांच्या भूमिकाही खूप गाजल्या. 'लाखात अशी देखणी' या नाटकातील त्यांच्या अभिनयामुळे आचार्य अत्रे यांनी त्यांना 'महाराष्ट्राची मर्लिन मन्रो' व 'सौंदर्याचा ॲटम बॉम्ब' हे किताब दिले होते. या सगळ्या अभिनय कारकिर्दीच्या घौडदौडीतच दिग्दर्शक कमलाकर तोरणे यांच्याशी त्यांची गाठ पडली. त्या दोघांच्या परस्पर प्रेमाची अखेर विवाहात परिणती झाली.

पद्मा चव्हाण यांनी 'आकाशगंगा' (१९५९), 'अवघाची संसार' (१९६०), 'संगत जडली तुझी न माझी' (१९६०), 'झाला महार पंढरीनाथ' (१९७०), 'लाखात अशी देखणी' (१९७१), 'अनोळखी' (१९७३), 'ज्योतिबाचा नवस' (१९७५), 'या सुखांनो या' (१९७५), 'आराम हराम आहे' (१९७६), 'तूच माझी राणी' (१९७६), 'देवघर' (१९८१), 'गुपचूप गुपचूप' (१९८३), 'घायाळ' (१९९३), 'पोरका' (१९९३) या चित्रपटांत साकारलेल्या भूमिकाही महत्त्वपूर्ण होत्या.

विवाहानंतर पद्मा चव्हाण यांनी काही चरित्रभूमिका केल्या. 'अष्टविनायक' (१९७९), 'सासू वरचढ जावई' (१९८३), 'घायाळ' (१९९३), 'पोरका' (१९९३) हे त्यांचे काही चित्रपटही यशस्वी ठरले.

एका दुर्दैवी मोटार अपघातात पद्मा चव्हाण या अभिनेत्रीचा अंत झाला.

– जयंत राळेरासकर

च

## चव्हाण, विजय कृष्णकुमार

**अभिनेता**

**८ फेब्रुवारी १९५५**



'मोरूची मावशी' या नाटकातील मावशीच्या भूमिकेमुळे जनमानसात लोकप्रिय झालेल्या विजय कृष्णकुमार चव्हाण यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे वडील गिरणी कामगार होते. त्यांचे शालेय शिक्षण दादरच्या इंग्लिश स्कूलमध्ये झाले, तर पुढील शिक्षण रुपारेल महाविद्यालयात झाले. तेथूनच त्यांनी बी.ए.ची पदवी मिळवली. महाविद्यालयाच्या सुवर्णमहोत्सवी वर्षानिमित्त सादर होणाऱ्या नाटकामधील नायक आजारी पडल्यामुळे विजय चव्हाण यांना नाटकात काम करण्याची संधी मिळाली. नाटकातील त्यांच्या कामाची खूप प्रशंसा झाली, पण या क्षेत्रात जाण्याचा त्यांचा निर्णय झाला नव्हता. पुढे महाविद्यालयाच्या यूथ फेस्टिवलमध्ये एक एकांकिका सादर केली व त्यात त्यांना अनेक बक्षिसे मिळाल्यामुळे त्यांनी या माध्यमाकडे वळण्याचा निर्णय घेतला. मध्यम-कनिष्ठवर्गात वाढताना घर चालवण्यासाठी श्रमाशिवाय काहीच पर्याय नाही, याचे बाळकडू त्यांना मिळाले होते. त्यामुळे त्यांनी मराठी नाटक-चित्रपट-मालिका या तिन्ही माध्यमातून भूमिका साकारताना तब्बल पंचवीस वर्षे आपली गिरणीतील नोकरी कायम ठेवली. पुढे विजय कदम व त्यांनी मिळून एक 'रंगतरंग' नावाची नाट्यसंस्था स्थापन केली. त्यादरम्यान त्यांची लक्ष्मीकांत बेर्डे यांच्याशी ओळख झाली व त्यांना पुरुषोतम बेर्डे यांच्या 'टुरटुर' या नाटकात काम करण्याची संधी मिळाली. त्यानंतर त्यांना गिरीश कर्नाड यांच्या 'हयवदन' या नाटकात काम करायला मिळाले. याच काळात सुधीर भट 'मोरूची मावशी' हे नाटक घेऊन लक्ष्मीकांत बेर्डे


'गोल गोल डब्यातला'मध्ये
विजय चव्हाण उजवीकडे

यांच्याकडे गेले होते, तेव्हा लक्ष्मीकांत बेर्डे यांनी मावशीच्या भूमिकेसाठी विजय चव्हाण यांचे नाव सुचवले आणि हे नाटक विजय यांना मिळाले.

'मोरूची मावशी' हे विजय चव्हाण यांचे सर्वाधिक लोकप्रिय व त्यांना नाव मिळवून देणारे लोकप्रिय नाटक. त्यात त्यांनी साडी नेसून मावशीची भूमिका केली. त्यातील 'टांग टिंग टिंगा....' या गाण्यावरचे त्याचे नृत्य प्रचंड लोकप्रिय झाले. त्यानंतर त्यांना 'असे पाहुणे येती' ही दूरदर्शनवरील मालिका मिळाली, तर 'घोळात घोळ', 'आली लहर केला कहर' यांसारख्ये चित्रपट मिळाले. 'लाईफ मेंबर', 'रानफूल' यांसारख्या कार्यक्रमांमधून ते लोकप्रिय ठरले. याशिवाय 'हयवदन', 'शाकुंतल', 'तसे आम्ही सज्जन', 'कशात काय न् लफड्यात पाय', 'कशी मी राहू तशीच', 'कार्टी प्रेमात पडली', 'देखणी बायको दुसऱ्याची', 'लहानपण देगा देवा', 'डोळे मिटून उघड उघड', 'येता का खंडाळ्याला', 'श्रीमंत दामोदरपंत', 'तू सुखकर्ता', 'जळू बाई हळू', 'तू तू मै मै', 'बाबांची गर्लफ्रेंड' इत्यादी नाटकांतूनही त्यांनी विनोदी भूमिका साकारल्या.

मराठी चित्रपटातील त्यांची वाटचालही खूप मोठी आहे. 'आली लहर केला कहर' हा विजय चव्हाण यांचा पहिला मराठी चित्रपट. 'माहेरची साडी', 'येऊ का घरात', 'बलिदान', 'जिगर', 'झपाटलेला', 'पछाडलेला', 'वहिनीच्या बांगड्या', 'जबरदस्त', 'गोल गोल डब्यातला' इ. अनेक चित्रपट त्यांच्या नावावर आहेत.

'अशी असावी सासू' या चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना १९९६ मध्ये राज्य शासनाचा उत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्याचा पुरस्कार मिळाला होता. १९९७ मध्ये त्यांना 'वहिनीची माया' या चित्रपटातील भूमिकेसाठी उत्कृष्ट विनोदी अभिनेत्यासाठी दिला जाणारा दामूअण्णा मालवणकर पुरस्कार देण्यात आला होता. १९९८ साली 'कमाल माझ्या बायकोची' या चित्रपटातील भूमिकेसाठीही उत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्याचा पुरस्कार प्राप्त झाला. तर प्रतिष्ठेचा मानला जाणारा राजीव गांधी पुरस्कारही त्यांना २००३ मध्ये मिळाला होता. २००९ मध्ये त्यांना महाराष्ट्र राज्याचा विशेष अभिनेत्याचा डॉ. काशिनाथ घाणेकर पुरस्कार 'ती' या चित्रपटासाठी मिळाला होता.

– दिलीप ठाकूर

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

च

## चांदेकर, शंकर विष्णू

*चांदेकर, दादा*

**संगीतकार**

**१९ मार्च १८९७ – २७ जानेवारी १९७६**



शंकर विष्णू चांदेकर उर्फ दादा चांदेकर हे मराठी बोलपटाच्या पहिल्या दशकातील संगीतकार होते. त्यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे वडील विष्णुपंत यांना संगीताची चांगली जाण होती व ते भजन व कीर्तन करत असत. त्यामुळे दादाही अगदी लहान वयापासून आपल्या वडिलांकडेच संगीत शिकू लागले. त्यानंतर त्यांनी धम्मनखाँ व नीळकंठबुवा जंगम यांच्याकडेही संगीताची तालीम घेतली. पुढे शालेय शिक्षण सोडून, ते आपल्या वडिलांना भजनाच्या व कीर्तनांच्या कार्यक्रमात हार्मोनियमवर साथ करू लागले. यातूनच पुढे अर्थार्जनासाठी १९१४ मध्ये त्यांनी किर्लोस्कर नाटक मंडळीत संगीत साथीदाराची नोकरी पत्करली. दादांना १९१७-१८ च्या दरम्यान मा. दीनानाथ यांच्या बळवंत संगीत मंडळीत काम करण्याचा योग आला व पुढे जवळजवळ पंधरा वर्षे ते तिथेच स्थिरावले.

बलवंत नाटक मंडळी बंद पडली, तेव्हा बोलपटांना सुरुवात व्हायला लागली होती. त्यामुळे १९३५ मध्ये दादांनी कोल्हापूर सिनेटोनमध्ये प्रवेश मिळवला. येथेच त्यांनी भालजी पेंढारकर दिग्दर्शित 'कालिया मर्दन' या चित्रपटाला सर्वप्रथम संगीत दिले. त्यानंतर दादांनी संगीत

दिग्दर्शन केलेला प्रिन्स शिवाजी प्रॉडक्शनचा 'स्वराज्य सीमेवर' हा चित्रपट आला.

१९३७ मध्ये 'प्रेमवीर' हा चित्रपट प्रदर्शित झाल्यावर हंस पिक्चर्सचे मालक व दिग्दर्शक मा. विनायक यांनी मुंबईहून कोल्हापूर येथे स्थायिक होऊन 'ब्रह्मचारी' चित्रपटाच्या निर्मितीला सुरुवात केली. त्यांनी दादा चांदेकरांना या चित्रपटासाठी संगीत दिग्दर्शक म्हणून नेमले. त्या काळी चित्रपट संगीतावर मराठी नाटक व शास्त्रीय संगीत यांचा जबरदस्त प्रभाव होता. 'ब्रह्मचारी' (१९३८) या चित्रपटाने मराठी चित्रपट संगीताला या प्रभावातून बाहेर काढले व त्याला अधिक आकर्षक रूप दिले. या चित्रपटातील सर्वच गाणी गाजली. परंतु नायिका मीनाक्षीने पोहण्याचा पोषाख घालून गायलेले 'यमुनाजळी खेळू खेळ कन्हैया, का लाजता' या गाण्याने धमाल उडवून दिली. आजही चित्रपट संगीताच्या इतिहासात त्या गाण्याला विशेष स्थान आहे.

'ब्रह्मचारी'नंतर मा. विनायक व दादा चांदेकर या जोडीने अनेक चित्रपट केले. 'ब्रँडीची बाटली', 'अर्धांगी', 'लग्न पहावं करून', 'अमृत', 'संगम', 'पहिली मंगळागौर' ही त्यापैकी गाजलेली काही विशेष नावे. दादांनी 'पहिली मंगळागौर' या चित्रपटात सर्वप्रथम लता मंगेशकर यांच्याकडून गीत गाऊन घेतले. त्या चित्रपटात लता मंगेशकरांनी अगदी छोटीशी भूमिकाही केली होती. यानंतर दादांनी नवयुग चित्रपट लिमिटेडच्या 'तुझाच' व 'पुंडलिक' या दोन चित्रपटांना संगीत दिले. त्याच काळात दादांनी काही मोजक्या हिंदी चित्रपटांनाही संगीत दिले.

चित्रपट संगीताला नाट्यसंगीताच्या प्रभावातून बाहेर काढणाऱ्या दादा चांदेकरांनी 'जय मल्हार' या चित्रपटाद्वारे मराठी चित्रपटसृष्टीत ग्रामीण संगीताचा पाया घातला. त्यातील गाणी खूपच गाजली. 'नांदाय जावे खुशा हितं ऱ्हावं', 'कुठं चाललीस गं चंद्रावळी', 'काठेवाडी घोड्यावरती पुढ्यात घ्या हो मला', 'माझ्या व्हटाचं डाळिंब फुटलं', 'छबीदार नार गुलजार चालली नटून' या गाण्यांना रसिकांनी डोक्यावर घेतले. यानंतर दादांनी अनेक चित्रपटांना संगीत दिले. त्यातील आचार्य अत्रे यांच्या 'मोरूची मावशी' व 'ब्रह्मघोटाळा' यांचे संगीत खूप गाजले. १९६४ मध्ये प्रदर्शित झालेला 'वाघ्यामुरळी' हा दादा चांदेकर यांनी संगीत दिलेला अखेरचा चित्रपट.

यानंतर चित्रपटसृष्टीतून काहीसे बाजूला होऊन दादांनी पुणे आकाशवाणीवर नोकरी पत्करली. तिथे सादर होणाऱ्या विविध कार्यक्रमांचे संगीत संयोजन केले. १९६४ ते १९७५ या अकरा वर्षांच्या काळात त्यांनी शेकडो कार्यक्रमांचे संगीत संयोजन केले. नंतर वयाच्या ७८ व्या वर्षी १९७५ मध्ये त्यांनी पूर्ण निवृत्ती पत्करली.

अखेरीस पुणे येथे त्यांचा मृत्यू झाला.

– शशिकांत किणीकर

## चिटणीस, इंदिरा

*अधटराव, इंदिरा दामोदर*

**अभिनेत्री**

**१९१२/१३ – १७ सप्टेंबर १९८२**



आपल्याच तोऱ्यात मिरवणारी खाष्ट सासू आठवली की इंदिरा चिटणीस यांचा ठसका आपल्या मनात उभा राहतो. नऊवारी साडी, अस्ताव्यस्त सुटलेले केस, ठेंगणी–ठुसकी अंगकाठी आणि अचूक संवादफेक यामुळे इंदिरा चिटणीस यांच्या अनेक व्यक्तिरेखा मराठी चित्रपटातून चांगल्याच उठून दिसल्या.

इंदिरा चिटणीस यांचा जन्म मुंबईत झाला. शिक्षण केवळ मराठी चौथीपर्यंत झाले. घरचे बाळबोध वातावरण. त्यामुळे परवचा, रामरक्षा रोजच्या रोज म्हणायला लागायचे. त्यांचा परिणाम नकळत त्यांच्या वाणीवर झाला आणि पुढील काळात संवादफेक करणे त्यांना सहज शक्य झाले.

लहानपणापासूनच इंदिरा चिटणीस यांना अभिनयाची



**‘मोहित्यांची मंजुळा’ या चित्रपटात इंदिरा चिटणीस**

च

आवड होती. आरशासमोर उभ्या राहून त्या निरनिराळ्या प्रकारचे आविर्भाव करीत. नाटकांचा जमाना असल्यामुळे मुंबईत विविध कंपन्यांची नाटके होत. त्यांना इंदिरा चिटणीस आपल्या वडिलांसमावेत हजेरी लावायच्या. मुंबईत मो.ग. रांगणेकर यांच्या नाट्यनिकेतन या संस्थेची नाटके सुरू होती. एक दिवस मनाचा हिय्या करून इंदिराबाई त्या कंपनीचे मालक व चालक मो.ग. रांगणेकर यांना भेटल्या व नाटकात काम करण्याची इच्छा प्रकट केली. दिसायला अगदी सामान्य असणाऱ्या या मुलीला कसले काम द्यायचे हा प्रश्न पडला. पण त्यांनी तिला कंपनीत ठेवून घेतले व ‘कुलवधू’, ‘राणीचा बाग’, ‘आशीर्वाद’ अशा अनेक नाटकांत भूमिका दिल्या आणि इंदिरा चिटणीस हे नाव मराठी रंगभूमीवर हळूहळू प्रसिद्धीस येऊ लागले.

१९४०-४१ या काळात भालजी पेंढारकर पुणे येथे चित्रपट करत असत. ‘थोरातांची कमळा’ या चित्रपटासाठी त्यांना एका छोट्या भूमिकेसाठी एक पात्रयोजना करायची होती. त्यासाठी त्यांनी इंदिरा चिटणीस यांना पाचारण केले आणि ‘थोरातांची कमळा’ या चित्रपटाद्वारे मराठी चित्रपटसृष्टीला एका गुणवंत कलाकाराची साथ मिळाली. ती म्हणजे इंदिरा चिटणीस यांची!

‘थोरातांची कमळा’नंतर इंदिरा चिटणीस यांनी मो.ग. रांगणेकर यांच्या ‘कुबेर’ या चित्रपटात महत्त्वपूर्ण भूमिका केली. त्यानंतर ‘मोहित्यांची मंजुळा’, ‘मोठी माणसं’, ‘साखरपुडा’, ‘श्रीकृष्ण दर्शन’, ‘वर पाहिजे’, ‘दूधभात’, ‘बाळा जो जो रे’, ‘चिमणी पाखरं’, ‘स्त्री जन्मा ही तुझी कहाणी’ असे त्यांच्या भूमिका असलेले अनेक चित्रपट पडद्यावर आले. इंदिरा चिटणीस यांनी जवळजवळ १२५ चित्रपटात भूमिका केल्या.

इंदिराबाईंचा विवाह १९३९ मध्ये दामोदर तुकाराम अधटराव यांच्याबरोबर झाला. लग्नाआधीचे त्यांचे नाव

होते इंदिरा चिटणीस. चित्रपटात काम करायचा विचार विवाहानंतर झाला. पण त्या वेळी त्यांच्या सासूबाईंनी 'ही पोरटी सिनेमात जाऊन आपल्या घराण्याला कलंक लावणार' या विचाराने आपले अधटराव नाव लावायला मज्जाव केला. त्यामुळे इंदिराबाईंनी अधटराव हे नाव न लावता माहेरचे चिटणीस हेच नाव कायम ठेवले व तेच शेवटपर्यंत चिकटून राहिले.



चित्रपटांबरोबरच त्या नाटकातही भूमिका करत. बाबूराव गोखले यांच्या श्री स्टार्स कंपनीतर्फे साकार झालेल्या 'करायला गेलो एक अन् झालं भलतच' वगैरे नाटकातील त्यांच्या भूमिकांना सर्वमान्यता मिळाली. खाष्ट व्यक्तिरेखा साकार करणाऱ्या इंदिराबाईंनी पु.ल. देशपांडे यांच्या 'नवे बिऱ्हाड' या लघुपटात विनोदी भूमिकाही केली होती. 'मानिनी' या चित्रपटातील त्यांची प्रेमळ आईची भूमिका चित्रपटरसिक कसे विसरतील?

इंदिरा चिटणीस यांचा मृत्यू वयाच्या ७८व्या वर्षी झाला. तो दिवस सर्वपितरी अमावस्येचा होता. त्यांच्या पहिल्या पुण्यातिथीनिमित्त त्यांच्यावर अनेक कलाकार आणि चाहते यांनी लेख लिहिले व ते 'समर्पिता' या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले.

– शशिकांत किणीकर

**संदर्भ** : १) वाटवे बापू, 'समर्पिता-इंदिरा चिटणीस यांच्या आठवणी', प्रकाशक – दा.तु. अघटराव; १९८३.

## चिटणीस, लीला गजानन

**अभिनेत्री**

**९ सप्टेंबर १९१२ – १४ जुलै २००३**

लीला गजानन चिटणीस यांचा जन्म कर्नाटकातल्या धारवाड येथे झाला. लीला नगरकर हे त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव होय. त्यांचे वडील शिक्षक होते. नंतरच्या काळात – म्हणजे १९१९-२० सालात ते मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात इंग्रजीचे प्राध्यापक होते. लीला यांना तीन बहिणी आणि तीन भाऊ होते. प्रॉक्टर रोडवर इमॅन्युएल गर्ल्स स्कूल या स्कॉटिश मिशनच्या शाळेत त्यांचे शालेय शिक्षण झाले.



महाविद्यालयीन शिक्षण चालू असतानाच त्यांनी डॉ. गजानन यशवंत चिटणीस यांच्याशी विवाह केला. डॉ. चिटणीस ध्येयवादी, समाजसुधारक होते. ते प्रार्थना समाजच्या सुबोधपत्रिकेचे काम पाहत. तत्कालीन राजकीय प्रश्न, समाजवाद-मार्क्सवाद या विषयात त्यांना रस होता. विवाहानंतर लीलाही त्यांच्या सामाजिक कार्यात रस घेऊ लागल्या. त्यांनी बी.ए. पदवीपर्यंत शिक्षण पूर्णही केले होते. संसाराची आर्थिक घडी बसवण्यासाठी त्या मारवाडी गर्ल्स हायस्कूलमध्ये शिक्षिकेची नोकरी करू लागल्या.

याच सुमारास नाट्यमन्वंतर संस्थेच्या 'आंधळ्यांची शाळा' या नाटकाचे प्रयोग धूमधडाक्यात सुरू होते. डॉ. चिटणीस या संस्थेच्या प्रमुख कार्यकर्त्यांपैकी एक होते. त्यांच्या ओळखीने लीला यांनी नाट्यमन्वंतर संस्थेच्या 'आंधळ्यांची शाळा' नाटकात काम करण्यास सुरुवात केली. त्याबरोबर 'उसना नवरा', 'लपंडाव' याही नाटकात त्या काम करू लागल्या.

१९३५ साली आदर्श चित्र संस्थेच्या 'धुँवाधार' या बोलपटात अभिनय करण्यासाठी त्यांना बोलावले गेले. हाच त्यांचा पहिला चित्रपट होता. त्यानंतर 'हंस चित्र'च्या 'छाया' या चित्रपटात त्यांनी भूमिका केली. 'छाया'ची कथा वि.स.खांडेकर यांची होती. रत्नप्रभा, मा. विनायक, बाबूराव पेंढारकर, दादा साळवी व इंदिरा वाडकर या कलाकारांनी यात भूमिका केल्या होत्या. या चित्रपटानंतर त्या मुंबईला स्थायिक झाल्या आणि प्रभात फिल्म कंपनीच्या 'वहाँ' या चित्रपटात त्यांना भूमिका मिळाली. नंतर दर्याना प्रॉडक्शन या चित्रपटसंस्थेशी महिना ८०० रुपये वेतनावर वर्षभर त्यांचा करार झाला. या संस्थेच्या 'जंटलमन डाकू', 'इन्साफ' या चित्रपटांत त्यांनी नायिकेच्या भूमिका केल्या. या चित्रपटांच्या दरम्यान 'गुली' नामक चित्रपट वितरकाबरोबर त्यांनी

दुसरा विवाह केला.

नंतर मिनर्व्हा मुव्हिटोनच्या सोहराब मोदी यांनी त्यांना ‘जेलर’ या चित्रपटात भूमिका दिली. या चित्रपटातल्या भूमिकेनंतरच चित्रपट व्यवसायात लीला चिटणीस यांची दखल घेतली गेली. पुढे रणजित फिल्म कंपनीच्या ‘संत तुलसीदास’ चित्रपटात नायिकेच्या भूमिकेसाठी त्यांची निवड झाली. विष्णुपंत पागनीस नायकाच्या भूमिकेत काम करणार होते. नंतर त्यांचा बॉम्बे टॉकीजशी तीन वर्षांचा करार झाला आणि ‘कंगन’, ‘बंधन’, ‘झूला’ या चित्रपटांत त्यांनी काम केले. नायक होते अशोककुमार. ‘कंगन’ चित्रपटाला यश मिळाल्यामुळे त्यांना ‘आजाद’ हा चित्रपट मिळाला. तसेच ‘हंस’ चित्रच्या ‘अर्धांगी’, ‘दिल की रानी’ या मा. विनायक दिग्दर्शित चित्रपटांत त्यांनी भूमिका केली. मधल्या काळात त्यांनी ‘कंचन’ या चित्रपटाची निर्मिती केली. त्या चित्रपटाचे कथानकही लिहिले. त्यांनी चित्रा प्रॉडक्शन ही स्वत:ची संस्था सुरू केली होती. ‘कंचन’नंतर या संस्थेद्वारे त्यांनी ‘किसीसे ना कहना’ या चित्रपटाची निर्मिती केली. ‘शहीद’ या फिल्मिस्तानच्या चित्रपटात त्यांनी सर्वप्रथम दिलीपकुमारच्या आईची भूमिका केली आणि त्यानंतर अनेक चित्रपटात त्यांनी चरित्रभूमिका केल्या. १९५१ साली बिमल रॉय दिग्दर्शित ‘माँ’ या चित्रपटातली त्यांची भूमिका अविस्मरणीय ठरली. दरम्यान १९४१ साली ‘लक्स’ साबणाच्या जाहिरातीसाठी मॉडेलिंग करणाऱ्या त्या पहिल्या भारतीय अभिनेत्री होत्या.

लीला चिटणीस यांनी दिलीपकुमार, राज कपूर, देव आनंद, धर्मेंद्र, सुनील दत्त, संजीवकुमार, राजेश खन्ना, राजेंद्रकुमार या त्या काळी गाजलेल्या अभिनेत्यांबरोबर काम केले. १९५५ साली ‘आज की बात’ या हिंदी चित्रपटाचे त्यांनी दिग्दर्शनही केले. ‘एक होता राजा’ (१९५२), ‘प्रेम आंधळं असतं’ (१९६१), ‘आधी कळस मग पाया’ (१९६१), ‘पाहू रे किती वाट’ (१९६३) या मराठी चित्रपटांबरोबर ‘वक्त’, ‘जिंदगी’, ‘गाईड’, ‘प्रिन्स’, ‘गुनाहोंके देवता’, ‘इन्तकाम’, ‘दुल्हन एक रातकी’, ‘औरत’, ‘मुहब्बत इसको कहते है’, ‘दोस्ती’, ‘पूजा के फूल’, ‘काला बाजार’, ‘मनमौजी’, ‘असली नकली’, ‘पलकोंकी छावमें’, ‘जीवनमृत्यू’ अशा अनेक हिंदी चित्रपटांतही काम केले.

१९८० साली प्रदर्शित झालेला ‘रामू तो है दिवाना’ हा लीला चिटणीस यांचा शेवटचा चित्रपट. पुढे त्यांनी अमेरिकेत काही काळ स्थलांतर केले आणि पोटापाण्याचा व्यवसाय म्हणून पाळणाघर चालवू लागल्या. पण तिथे त्या फार काळ रमल्या नाहीत. पुन्हा भारतात परतल्यावर १९८१ साली त्यांनी ‘चंदेरी दुनियेत’ हे आत्मवृत्त लिहिले. त्याची बरीच चर्चा झाली.

पण चित्रपटात भूमिका मिळणे या काळात बंद झाल्याने त्या भारत सोडून अमेरिकेत स्थायिक झाल्या आणि तेथेच त्यांचे निधन झाले.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ** : १) चिटणीस लीला, ‘चंदेरी दुनियेत’, श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९८१.

## चोणकर, नलिनी कृष्णराव
**अभिनेत्री**
**१२ जून १९३८ – २६ जून २००५**



बालगंधर्वांच्या नाटक कंपनीत गायक व नट म्हणून काम करणारे, तसेच ‘सोनी महिवाल’, ‘अफगाण अबला’, ‘सौभाग्यलक्ष्मी’ आदी बोलपटांमधून अभिनेते म्हणून प्रेक्षकांच्या समोर येणाऱ्या कृष्णराव चोणकर यांची कन्या म्हणजे नलिनी चोणकर. घरातूनच अभिनयाचा वारसा लाभलेल्या नलिनी यांना लहानपणापासूनच नृत्याची आवड होती. त्या आवडीपोटीच त्यांनी नृत्याचे रीतसर शिक्षणही घेतले होते.

रेखीव चेहरा आणि आकर्षक डोळे असणाऱ्या नलिनी चोणकर यांना दिग्दर्शक राजा ठाकूर यांनी १९५७ साली ‘घरचं झालं थोडं’ या विनोदी चित्रपटात काम दिले. राजा

गोसावी यांच्यासारख्या कसलेल्या नटाबरोबर केलेल्या त्यांच्या अभिनयाला आणखी झळाळी आली आणि पदार्पणातल्या या चित्रपटानेच त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले.

अल्पावधीतच मराठी चित्रपटसृष्टीत स्थिरस्थावर होणाऱ्या नलिनी चोणकर यांचा हिंदी चित्रपटसृष्टीतील प्रवेशही दमदार ठरला, तो 'राणी रूपमती', 'साजिश' या चित्रपटांतील भूमिकांमुळे. त्यांनी साकारलेल्या नायिकांच्या भूमिकांमुळे 'श्रावणकुमार', 'सिंहलदीप की सुंदरी' हे हिंदी चित्रपटही खूप गाजले.

१९५९ साली राजा नेने दिग्दर्शित 'याला जीवन ऐसे नाव' या विनोदी चित्रपटात नलिनी चोणकर यांनी महत्त्वाची भूमिका केली. मधुसूदन कालेलकर निर्मित या चित्रपटात जयश्री गडकर, राजा गोसावी, शरद तळवलकर या कलाकारांसमवेत नलिनी यांनीही खूप तन्मय होऊन भूमिका साकारली. त्यांच्या अभिनयातील वैशिष्ट्य लक्षात आल्यावरच त्यांना हिंदीतील 'मदन मंजिरी', 'मॉडेल गर्ल', 'पिया मिलन की आस' या चित्रपटांतून भूमिका मिळाल्या.

मराठी-हिंदी चित्रपटसृष्टीत अभिनेत्री म्हणून नावाजल्या गेलेल्या नलिनी चोणकर यांनी वडील कृष्णराव चोणकर यांच्या दिग्दर्शनाखाली 'नंदादीप' (१९६२) या चित्रपटाची निर्मिती केली. तसेच यात त्यांनी गुजराती अभिनेते विजयदत्त यांच्यासमवेत नायिकेची भूमिकाही साकारली.

चित्रपटनिर्मितीत अपयशी ठरूनही नलिनी चोणकर यांनी आपली अभिनयाची कारकिर्द सुरूच ठेवली, म्हणूनच प्रेक्षकांना त्यांच्या भूमिका असलेले 'भाभी', 'पारसमणी', 'बाजे घुंघरू' हे चित्रपट पाहण्याचा आनंद घेता आला. 'पारसमणी' चित्रपटातील 'हसता हुआ नूरानी चेहरा, काली जुल्फे रंग सुनहरा....' हे नलिनी चोणकर यांच्यावर चित्रित झालेले गाणे आजही प्रेक्षकांना भुरळ घालते. देवाच्या नावाने सोडलेल्या स्त्रीची मानसिक कुचंबणा दाखवणाऱ्या 'वाघ्यामुरळी'



**'वाघ्यामुरळी' या चित्रपटात नलिनी चोणकर डावीकडील**

(१९६४) या मराठी चित्रपटात त्यांनी साकारलेले मुरळीचे दैन्य त्यातल्या बारकाव्यांनिशी नलिनी चोणकर यांनी सक्षमपणे आपल्या भूमिकेतून उलगडले आहेत.

गुजराती भाषा ज्ञात असणाऱ्या नलिनी चोणकर यांनी 'ढोल मारु', 'पाकीटमार', 'रानी रिक्षावाली' या गुजराती चित्रपटांतूनही केलेले काम त्यांना पुरस्काराचे मानकरी ठरवून गेले. 'मत्स्यगंधा', 'प्रीतिसंगम', 'मीरामधुरा', 'बावनखणी', 'अठरावं वरीस धोक्याचं' अशा नाटकांमधून नलिनी चोणकर यांनी साकारलेल्या भूमिकांनी रंगमचांविषयीची त्यांची जाणही व्यक्त झाली, तसेच त्यांच्या कामाचे खूप कौतुकही झाले.

'मीरामधुरा' नाटकातील त्यांचे सहकलाकार विश्वनाथ बागुल यांच्याशी त्या विवाहबद्ध झाल्या. त्यानंतर त्यांचा चित्रपटसृष्टीशी असणाऱ्या संपर्क कमी झाला व जो राहिला तो केवळ हिंदी चित्रपटांशीच. म्हणूनच मिथुन चक्रवर्ती आणि पद्मिनी कोल्हापुरे यांनी भूमिका केलेल्या 'प्यारी बहना' या चित्रपटानंतर त्या या क्षेत्रातून निवृत्त झाल्या. पण नृत्य व अभिनयाशी असणारे त्यांचे दृढ नाते त्यांना स्वस्थ बसू देईना म्हणून त्यांनी १९८५ साली नृत्य आणि अभिनय याचे शिक्षण देणारी संस्था सुरू केली.

अर्धांगवायूच्या झटक्याने निकामी झालेल्या शरीरामुळे मनही खंगत गेले व त्यातच त्या निवर्तल्या.

– संपादित

## चौधरी, अंकुश पांडुरंग

**अभिनेता**

**३१ जानेवारी १९७३**

अंकुश चौधरी यांचे नाव आज मराठी चित्रपटसृष्टीत आघाडीवर आहे. त्याचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे वडील पांडुरंग धोंडीबा चौधरी गिरणीमध्ये नोकरी करीत होते. आई माधुरी या बॉम्बे पोर्ट ट्रस्टमध्ये परिचारिकेचे काम करीत होत्या. परळच्या आर.एम. भट शाळेत अंकुश चौधरी यांचे शालेय शिक्षण झाले. महर्षी दयानंद महाविद्यालयातून १२वी पर्यंतचे शिक्षण त्यांनी पूर्ण केले.



महाविद्यालयीन दिवसांपासूनच अंकुश यांना चित्रपट क्षेत्राचे आकर्षण होते. १९८५ साली 'महाराष्ट्राची लोकधारा' या कार्यक्रमातून लोकनृत्य करण्याची प्रथम संधी त्यांना मिळाली. लोकधारा कार्यक्रमामुळे अंकुश चौधरी यांची केदार शिंदे, संतोष पवार, भरत जाधव यांच्याशी ओळख झाली व हे सर्व जण लहान–सहान कार्यक्रम करू लागले. त्यानंतर अंकुश चौधरी यांनी भरत जाधव व केदार शिंदे यांच्या समवेत 'बापाचा बाप' व 'आभास की भास' या एकांकिकामधून अभिनय केला होता. पुढे त्यांनी केदार शिंदे यांच्या 'ऑल दि बेस्ट' या नाटकात आंधळ्यांची भूमिका यथोचितपणे साकारली. हे नाटक यशस्वी झाले. पुण्या–मुंबईत त्यांनी अभिनय केलेल्या 'ऑल दि बेस्ट'चे ८२५ यशस्वी प्रयोग झाले. याच काळात 'बेधुंद मनाच्या लहरी' या दूरदर्शनवरील मालिकेमध्ये ते काम करत होते.

१९९४ च्या आसपास 'सुना येती घरा' हा अंकुश चौधरी यांनी अभिनय केलेला पहिला चित्रपट. नंतरच्या काळात 'माझा नवरा तुझी बायको', 'मातीच्या चुली', 'यंदा कर्तव्य आहे', 'आयला रे' अशा अनेक चित्रपटांतून त्यांनी विविध प्रकारच्या भूमिका केल्या. नंतर महेश मांजरेकर दिग्दर्शित 'जिस देश मे गंगा रहता है' या हिंदी चित्रपटातूनही त्यांनी काम केले.

'अगं बाई अरेच्चा' आणि 'जत्रा' या चित्रपटांसाठी दिग्दर्शक केदार शिंदे यांच्याबरोबर त्यांनी सहदिग्दर्शक म्हणून अनुभव घेत अभिनयाबरोबरच चित्रपटातल्या इतर गोष्टीही समजावून घेतल्या. नंतरच्या काळात अशोक सराफ, मकरंद अनासपुरे, भरत जाधव, सुकन्या कुलकर्णी, सुजाता जोशी, अमृता खानविलकर अशा अनुभवी आणि आघाडीच्या कलाकारांना घेऊन अंकुश चौधरी यांनी 'साडे माडे तीन' या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. या चित्रपटाचे प्रभातमध्ये सलग २१ खेळ

च



'दुनियादारी' या चित्रपटात अंकुश चौधरी उजवीकडील

हाऊसफुल्ल झाले. मराठी चित्रपटसृष्टीत खूप वर्षानंतर हा योग जुळून आला होता. यानंतर 'झकास' व 'नो एंट्री' या चित्रपटांचेही दिग्दर्शन त्यांनी केले. 'झकास' या चित्रपटाला उत्तम विनोदी चित्रपट म्हणून त्या वर्षीचे पारितोषिकही मिळाले. तर 'गैर', 'अशाच एका बेटावर', 'चेकमेट', 'रिंगा रिंगा', 'सावरखेड एक गाव', 'इश्श' अशा अनेक चित्रपटातून अंकुश चौधरी यांनी लक्षणीय भूमिका साकारल्या. त्यांना आजपर्यंत तीन वेळा 'स्टाईल आयकॉन ॲवॉर्ड' मिळाले आहे. २०१३ मध्ये 'संशय कल्लोळ' हा चित्रपट प्रदर्शित झाला, तर 'दुनियादारी' या चित्रपटातील डी.एस.पी.ची भूमिका अंकुश चौधरी यांनी आपल्या आंगिक अभिनयाने समृद्ध केली.

– संपादित

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

* * *

# ज





**जयश्री टी.**
*तळपदे, जयश्री चित्रसेन*
**अभिनेत्री**
**जन्मदिनांक अनुपलब्ध**



कलाप्रिय वातावरण असलेल्या घरात जन्माला आलेल्या जयश्री टी. यांचे वडील चित्रसेन हे नाटकांमधून कामे करत असत, तर त्यांच्या आईला गायनाची आवड होती. त्यामुळे आपसूकच लहानपणापासून जयश्री यांच्यावर कलेचे संस्कार झाले. बालवयातच त्यांनी नृत्याचे शिक्षण घेण्यास प्रारंभ केला, तो के.श्री. पांचाळ यांच्याकडे. कालांतराने नृत्यात पारंगत झालेल्या जयश्री टी. यांनी लहान वयातच नृत्याचे कार्यक्रम सादर केले. त्यांचा नृत्याविष्कार पाहूनच 'गूँज उठी शहनाई' या चित्रपटामध्ये बालकलाकार म्हणून काम करण्याची संधी मिळाली. बालकलाकार म्हणून हिंदी चित्रपटसृष्टीत स्थिरस्थावर झाल्यावर जयश्री टी. यांना 'धर्मकन्या' या मराठी चित्रपटात काम मिळाले. त्यांच्यावर चित्रित झालेली 'सखी गं, मुरली मोहन मोही मना...' ही बैठकीची लावणी सादर करताना दिसलेल्या त्यांच्या चेहऱ्यावरच्या विभ्रमाच्या खुणांचे मूळ त्यांनी बालपणी घेतलेल्या नृत्याच्या शिक्षणात आहे, असे दिसते.

जयश्री टी. यांचा महत्त्वाचा चित्रपट म्हणजे 'बायांनो नवरे सांभाळा'. १९७४ सालच्या या चित्रपटात जयश्री यांनी साकारलेली भूमिका महत्त्वपूर्ण होती. अन्यायाने पेटून उठलेली नायिका आपल्यावर अन्याय करणाऱ्या व्यक्तींचा सूड घेते. साधी भोळी, अबला ते सबला असा अंबू या व्यक्तिरेखेचा प्रवास त्यांनी आपल्या अभिनयातून साकारलेला आहे. या भूमिकेसाठी जयश्री यांना सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा महाराष्ट्र शासनाचा पुरस्कारही मिळाला. यानंतरचा त्यांचा महत्त्वाचा चित्रपट म्हणजे 'ह्योच नवरा पाहिजे' (१९८०). या चित्रपटात त्यांनी दादा कोंडके या दिग्गज कलाकाराबरोबर केलेले कामही नावाजले गेले. त्यानंतर त्यांनी 'मानाचं कुंकू' (१९८१), 'विश्वास' (१९८२) या चित्रपटातून महत्त्वपूर्ण भूमिका केलेल्या आहेत.

मराठी चित्रपटसृष्टीत नावारूपाला आलेल्या, तसेच सर्वोत्कृष्ट अभिनयाचे पारितोषिक पटकावणाऱ्या या मराठी अभिनेत्रीने हिंदी चित्रपटसृष्टीतही आपल्या नावाचा दबदबा निर्माण केला, तो आपल्या अभिनयकौशल्याने. हिंदीतील अभिनेत्री हेलन, बिंदू यांच्याबरोबरीने जयश्री यांनीही कुशल नृत्यांगना म्हणून स्वत:ची ओळख निर्माण केली. कालांतराने हिंदी चित्रपटांमधून त्यांना चरित्रभूमिका मिळत गेल्या, त्या भूमिकाही त्यांनी तितक्याच आनंदाने रंगवल्या. तमिळ, तेलगू, मल्याळम्, उडिया, आसामी, राजस्थानी, पंजाबी, बंगाली अशा १८ भाषांमधील चित्रपटात त्यांनी निरनिराळ्या धाटणीच्या भूमिका साकारल्या. एवढ्या विविध भाषांमध्ये काम करणाऱ्या त्या एकमेव मराठी अभिनेत्री होत्या. गुजरात सरकारतर्फे तीन वेळा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार त्यांना मिळाला आहे.

जयश्री टी. या मा. विनायक यांच्या मुलाशी, म्हणजे जयप्रकाश कर्नाटकी यांच्याशी विवाहबद्ध झाल्या. त्यांनी देशात व परदेशात नृत्याचे कार्यक्रम केले आहेत.

— संपादित

## जयश्री शांताराम

*कामुलकर, जयश्री तुकाराम*

**अभिनेत्री**

**४ मार्च १९२२ – १२ ऑक्टोबर २००४**



'लखलख चंदेरी तेजाची न्यारी दुनिया', 'हासत वसंत ये', 'मनी राधिका चतुर बोले' या गाण्यातील आवाजाने मंत्रमुग्ध झालेले रसिक तिच्या सौंदर्यानेही मुग्ध झाले, ती गायिका –अभिनेत्री म्हणजे जयश्री! ज्यांना जयश्री शांताराम म्हणून चित्रपटसृष्टी ओळखते, त्या आपल्या लौकिक जीवनात जयश्री तुकाराम कामुलकर म्हणून ओळखल्या जात असत. त्यांचा जन्म मुंबईतील गिरगावच्या परिसरात झाला. परंतु त्यांचे मूळ गाव गोव्यातील कामुर्ली हे होते. वडिलांच्या अकाली झालेल्या निधनानंतरचे, जयश्री यांचे बालपण आपल्या मूळ गावी, कामुर्ली येथे गेले. येथे त्या वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत राहिल्या. जयश्री यांच्या आवाजातील माधुर्य त्यांच्या काकांच्या लक्षात आल्यावर ते लहानग्या जयश्री यांना घेऊन परत मुंबईला आले. त्यानंतर उस्ताद गमनखाँ यांच्याकडे जयश्री यांचे गाण्याचे रीतसर शिक्षण सुरू झाले.

गाण्यात पारंगत असणाऱ्या चौदा वर्ष वयाच्या जयश्री यांना आपसूकच नाटकांमध्ये काम करण्याची संधी मिळाली, पण गुजराती रंगभूमीवर. 'देशीसमाज नाटक' (१९३५) या नाटकात काम करत असतानाच संगीतकार के. दत्ता आणि गीतकार मो.ग. रांगणेकर यांच्याशी झालेल्या परिचयातूनच 'यंग इंडिया कंपनी'ने जयश्री यांच्या आवाजातील गाणी ध्वनिमुद्रित केली आणि जयश्री प्रसिद्धीच्या झोतात आल्या. रूप आणि आवाज यांच्या जोरावर त्यांना 'चंद्रराव मोरे' (१९३८) या चित्रपटात काम करण्याची संधी मिळाली, तेव्हा त्या मा. कृष्णराव यांच्याकडे गाण्याचा रियाज करत होत्या. जनरल फिल्मच्या 'चंद्रराव मोरे' या ऐतिहासिक चित्रपटातील अभिनयाच्या यथार्थतेमुळे जयश्री यांना 'नंदकुमार' या चित्रपटातील भूमिका मिळाली. तर 'माझी लाडकी' या सामाजिक बोधप्रधान चित्रपटातील मुख्य भूमिकेमुळे त्यांची लोकप्रियता वाढली.

प्रसिद्धीच्या शिखरावर असतानाच ब्रॅण्ड नेम म्हणून ओळखल्या जाणाऱ्या तत्कालीन नावाजलेल्या प्रभात फिल्म कंपनीत जयश्री यांचा प्रवेश झाला. येथे आल्यावर कलात्मक दृष्टी असलेल्या व या दृष्टीचा यथोचित वापर करणाऱ्या व्ही. शांताराम यांच्या दिग्दर्शनाखाली जयश्री यांनी 'शेजारी' या चित्रपटात काम करण्याचे ठरवले. ग्रामीण बाजाच्या या चित्रपटात त्यांनी साकारलेली तरुणी त्यांच्या अभिनयामुळे विशेष गाजली. प्रभातमध्ये आल्यावर त्यांचे व व्ही. शांताराम यांचे स्नेहबंध जुळून आले आणि याची परिणती अखेर विवाहात झाली. २२ ऑक्टोबर १९४२ रोजी जयश्री आणि व्ही. शांताराम विवाहबद्ध झाले.

व्ही. शांताराम यांनी राजकमल स्टुडिओची स्थापना केल्यावर जयश्री याही अर्थातच राजकमलमध्ये गेल्या. तेथे व्ही. शांताराम यांनी दिग्दर्शित केलेल्या 'शकुंतला', 'डॉ. कोटणीस की अमर कहाणी', 'दहेज', 'परछाई', 'सुबह का तारा' आदी चित्रपटांमध्ये जयश्री यांनी अभिनय केला, पण गाण्यांना मात्र स्वत:चाच आवाज दिला. या चित्रपटांबरोबरीनेच त्या 'मेहंदी', 'दीदी', 'नया संसार', 'दर्शन', 'मेला', 'हैदर अली', 'अपना पराया' अशा अनेक हिंदी चित्रपटांमध्येही नायिका म्हणून वावरल्या.

जयश्री यांना राजश्री, तेजश्री आणि किरण अशी तीन मुले असून किरण शांताराम राजकमल स्टुडिओ चालवत आहेत. चित्रपटसृष्टीतून बाहेर पडल्यावर आपल्या संसारात रमलेल्या जयश्री यांचा हृदयविकाराच्या झटक्याने मृत्यू झाला.

– संपादित

संदर्भ : १) टिळेकर महेश, 'मराठी तारका', प्रकाशक – महेश टिळेकर, पुणे; २००७. २) देसाई माधवी, 'गोमन्त सौदामिनी', माणिक प्रकाशन, कोल्हापूर; २०११.

## जागीरदार, गजानन जनार्दन
**अभिनेता, निर्माता-दिग्दर्शक**
**२ एप्रिल १९०७ - १३ ऑगस्ट १९८८**



चित्रपट लेखक, दिग्दर्शक, अभिनेता, निर्माता, व्यवस्थापक, फिल्म इन्स्टिट्यूटचे प्राचार्य व शालेय शिक्षक असे चतुरस्र व्यक्तिमत्त्व म्हणजे गजानन जनार्दन जागीरदार! त्यांचा जन्म अमरावती येथे झाला. वडील जनार्दन जागीरदार शिक्षक असल्याने गजानन यांनाही शिक्षणाची मुळातच आवड होती. त्यांचे प्राथमिक शिक्षण अमरावती, कानपूर व नंतर बनारस येथे पुढील शालेय शिक्षण झाले. नंतर महाविद्यालयीन शिक्षणासाठी त्यांनी पुणे येथील फर्गसन महाविद्यालयात प्रवेश घेतला. शिकत असतानाच जागीरदार लेखन, नाटकात काम करीत असत. बी.ए.ची पदवी मिळाल्यावर त्यांनी १९३० मध्ये कोल्हापूर येथे शिक्षकी पेशा स्वीकारला. नोकरीत असतानाच नटवर्य बाबूराव पेंढारकर यांनी त्यांच्याकडे प्रभात फिल्म कंपनीच्या मूकपटांची उपशीर्षके लिहिण्याचे काम सोपवले व तेव्हापासून जागीरदार यांचा चित्रपटसृष्टीत प्रवेश झाला. त्यानंतर १९३० मध्येच बाबूराव पेंढारकर यांच्या कंपनीमध्ये भालजी पेंढारकर 'राणी रूपमती' या मूकपटाचे दिग्दर्शन करत होते. त्या वेळी जागीरदार यांना पेंढारकरांचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून नेमण्यात आले. पुढे इंग्रजीमधून पत्रव्यवहार करणे, वृत्तपत्रांना पाठवण्यासाठी वार्तापत्र करणे व शांतारामबापूंना दिग्दर्शनात साहाय्य करणे या कामासाठी प्रभात फिल्म कंपनीमध्ये चाळीस रुपये पगारावर त्यांना नोकरीवर ठेवण्यात आले. याच काळात त्यांनी प्रभातच्या 'अग्निकंकण' (मराठी) व 'जलती निशानी' (हिंदी) या चित्रपटांत भूमिका केल्या.

१९३३-३४ च्या दरम्यान कोल्हापूर येथे श्याम सिनेटोन नावाची चित्रसंस्था स्थापन झाली. त्यांच्यातर्फे 'पार्थकुमार' या हिंदी व मराठी या दोन्ही भाषांत तयार होणाऱ्या चित्रपटाचे दिग्दर्शन भालजी पेंढारकर करत होते. परंतु काही कारणांमुळे भालजींनी हा चित्रपट सोडला. त्यामुळे श्याम सिनेटोनच्या निर्मात्यांनी गजानन जागीरदार यांच्याकडे दिग्दर्शन सोपवल्यामुळे त्यांचे दिग्दर्शनक्षेत्रात पाऊल पडले. त्यानंतर त्यांनी 'सिंहासन' (१९३४) व 'होनहार' (१९३६) हे चित्रपट दिग्दर्शित केले व त्यात भूमिकाही केल्या.

अभिनय व दिग्दर्शन या दोन्ही आघाड्यांवर जागीरदार यांचे नाव सर्वतोमुखी झाले. यानंतर मिनर्व्हा मुव्हीटोनच्या सोहराब मोदी यांनी त्यांना आपल्याकडे बोलावून घेतले. या कंपनीत ते तीन वर्षे होते. येथे त्यांनी 'मै हारी' या चित्रपटाचे दिग्दर्शन करून अभिनयही केला.

१९४० च्या सुमारास प्रभात फिल्म कंपनीने जागीरदार यांना पुन्हा बोलावून घेतले व त्यांना 'शेजारी' (मराठी) व 'पडोसी' (हिंदी) या चित्रपटांत भूमिका दिल्या. या दोन्ही चित्रपटांत जागीरदार यांनी 'मिर्झा' या मुस्लीम शेजाऱ्याची भूमिका उत्कृष्टपणे अभिनित केली. या भूमिकेची व चित्रपटाची सर्व हिंदुस्थानभर खूप चर्चा झाली. याच भूमिकेसाठी जागीरदारांना बेंगॉल फिल्म जर्नालिस्ट असोसिएशनतर्फे १९४१ मध्ये पारितोषिक देऊन गौरवण्यात आले. त्यानंतर अत्रे पिक्चर्ससाठी 'पायाची दासी' व 'वसंतसेना' हे दोन चित्रपट करून ते पुन्हा प्रभात फिल्म कंपनीत दाखल झाले. येथे त्यांनी 'रामशास्त्री' या चित्रपटाचे दिग्दर्शन व त्यातील भूमिका अशा दोन्ही आघाड्या सांभाळल्या. या चित्रपटासाठी जागीरदार यांना बेंगॉल फिल्म जर्नालिस्ट असोसिएशनतर्फे सर्वोत्तम दिग्दर्शक म्हणून गौरवले.

यानंतरच्या काळात गजानन जागीरदार यांनी 'बेहराम खान', 'उमाजी नाईक' असे अनेक चित्रपट दिग्दर्शित केले व त्याच बरोबर अनेक हिंदी व मराठी चित्रपटांतून भूमिकाही केल्या. त्यातील अनेक भूमिका गाजल्याही.

१९६० मध्ये पुणे येथे फिल्म इन्स्टिट्यूटची स्थापना झाली आणि या संस्थेचे पहिले प्राचार्य म्हणून गजानन जागीरदार यांची नेमणूक झाली. काही वर्षे प्राचार्यपद

ज


'रामशास्त्री' चित्रपटात रामशास्त्रींच्या भूमिकेत गजानन जागीरदार

ज

सांभाळल्यावर पुन्हा चित्रपट क्षेत्रात येण्यासाठी त्यांनी ही संस्था सोडली. पण ते मानद प्राध्यापक म्हणून तेथे अधूनमधून काम करत असत. यानंतर त्यांनी जागीरदार प्रॉडक्शन या नावाने स्वत:ची संस्था सुरू केली. 'उमाजी नाईक' या चित्रपटाची निर्मिती, दिग्दर्शन व अभिनय ही तिन्ही सूत्रे त्यांनी सांभाळली. वास्तविक १९३८ मध्ये याच नावाचा मराठी चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केला होता. यानंतर 'वैजयंता' हा मराठी चित्रपट त्यांनी सादर केला. यातही भूमिका, निर्मिती व दिग्दर्शन या तिन्ही आघाड्या त्यांनी यशस्वीपणे सांभाळल्या. या चित्रपटासाठी त्यांना राष्ट्रपती पदक मिळाले. त्यानंतर त्यांना 'शाहीर परशुराम' या चित्रपटातील भूमिकेसाठी उत्कृष्ट अभिनेत्याचे पारितोषिके मिळाले. त्यानंतर 'छोटा जवान' या चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना महाराष्ट्र शासनातर्फे 'विशेष अभिनेता' म्हणून गौरवण्यात आले. नंतर 'दोन्ही घरचा पाहुणा' या चित्रपटासाठी त्यांना महाराष्ट्र शासनाचा बहुमान पुन्हा मिळाला.

१९८१ मध्ये भारतीय बोलपटांच्या सुवर्णजयंती महोत्सवात तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या हस्ते जागीरदार यांना सुवर्णपदक देऊन गौरवले.

जागीरदार यांनी 'संध्याकाळ' व 'पाऊलखुणा' ही दोन आत्मचरित्रे व 'अभिनय कसा करावा' व 'दि मॅजिक सर्कल' अशी एकूण चार पुस्तके लिहिली आहेत. मुंबईत वार्धक्याने त्यांचे निधन झाले.

– शशिकांत किणीकर

**संदर्भ** : १) जागीरदार गजानन, 'संध्याकाळ', राजहंस प्रकाशन, पुणे; १९७१. २) जागीरदार गजानन, 'पाऊलखुणा', मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; १९८६.

## जाधव, भरत

**अभिनेता**

**जन्मदिनांक अनुपलब्ध**



भरत जाधव यांचे बालपण मुंबईतील लालबाग भागात गिरणी कामगारांच्या वस्तीत गेले. शालेय शिक्षण येथेच झाल्यावर त्यांनी मंगेश दत्त यांच्या ओळखीने ‘महाराष्ट्राची लोकधारा’ या कार्यक्रमात १९८५ पासून काम करण्यास सुरुवात केली. येथेच त्यांची केदार शिंदे, अंकुश चौधरी, संतोष पवार यांच्याशी ओळख झाली व त्याचे मैत्रीत रूपांतर झाल्यावर त्यांनी एकांकिका स्पर्धांमध्ये भाग घ्यायला सुरुवात केली. आंतरमहाविद्यालयीन एकांकिका स्पर्धांमध्ये चांगले परीक्षक लाभतात असे कळल्यावर त्यांनी परळच्या महर्षी दयानंद महाविद्यालयात प्रवेश घेतला. तेथे त्यांनी देवेंद्र पेम यांची ‘प्लॅन्चेट’ ही एकांकिका केली. त्या एकांकिकेला सर्वोत्कृष्ट एकांकिकेचा पुरस्कार मिळाला.

त्यानंतरच्या ‘ऑल द बेस्ट’ या एकांकिकेला आय.एन.टी. मध्ये पारितोषिक मिळाल्यावर मोहन वाघ यांनी ही एकांकिका नाटकरूपात व्यावसायिक रंगमंचावर आणली व भरत जाधव यांचा नाट्यप्रवास खऱ्या अर्थाने सुरू झाला. या एकांकिकेत भरत जाधव यांना मुक्याची भूमिका करण्याची संधी मिळाली. हे नाटक यशस्वी झाल्यानंतर त्यांना केदार शिंदे लिखित व लता नार्वेकर दिग्दर्शित ‘आमच्यासारखे आम्ही’ नाटकात काम केले. ‘अधांतर’ नाटकातील भूमिकेसाठी त्यांना सर्वांत जास्त पारितोषिके मिळाली. ‘श्रीमंत दामोदर पंत’, ‘तू तू मी मी’ यांसारख्या नाटकातून उत्तम अभिनय करून आपल्या कामाचा ठसा उमटवण्यातही भरत जाधव यशस्वी झाले. पुढे गजेंद्र अहिरे यांच्या ‘जन्मसिद्ध’ नाटकात त्यांनी एका बी.सी. उमेदवाराची भूमिका साकारली. प्रदीप पटवर्धन यांच्याबरोबर त्यांनी ‘चल काहीतरीच काय’ हे नाटक केले, पण ते विशेष चालले नाही. त्यानंतरचे ‘पैसाच पैसा’ हे व्यावसायिक नाटकही फसले.

भरत जाधव यांनी अल्फा टी.व्ही.वरील ‘प्रपंच’ या मालिकेतही नंदूची भूमिका साकारली. त्यानंतर त्यांनी केलेले ‘सही रे सही’ या नाटकाचे प्रयोग खूपच गाजले. या नाटकातील गलगलेची भूमिका प्रेक्षकांच्या चांगलीच लक्षात राहिली. १९९९ मध्ये ‘वास्तव : द रिॲलिटी’, ‘प्राण जाये पर शान न जाये’ यासारख्या अभिनय कारकिर्दीच्या सुरुवातीच्या काही हिंदी चित्रपटांनंतर भरत यांनी आपला मोर्चा पूर्णपणे मराठीकडे वळवला आणि पुन्हा मागे वळून पाहिलेच नाही.

भरत जाधव यांनी ‘खतरनाक’ (२०००), ‘बाप रे बाप’ (२००३), ‘नवऱ्याची कमाल बायकोची धमाल’ (२००४), ‘हाउस फूल’ (२००४), ‘खबरदार’ (२००५), ‘पछाडलेला’ (२००५), ‘नाना मामा’ (२००६), ‘माझा नवरा तुझी बायको’ (२००६), ‘नामदार मुख्यमंत्री गणप्या गावडे’ (२००६), ‘जत्रा’ (२००६), ‘चालू नवरा भोळी बायको’ (२००६), ‘मुक्काम पोस्ट लंडन’ (२००७), ‘गलगले निघाले’ (२००८), ‘मस्त चाललयं आमचं’ (२०११), यासारख्या विनोदी बाजाच्या भूमिकांसह ‘सरीवर सरी’तील (२००५) असफल प्रियकर, ‘बकुळा नामदेव घोटाळे’मधील (२००७) खलनायकी सरपंच, ‘शिक्षणाच्या आयचा घो’तील (२०१०) मुलाच्या सुरक्षित भविष्यासाठी धडपडणारा बाप (मधुकर राणे), ‘क्षणभर विश्रांती’मधील जगणं शिकवणारा अप्पा आणि ‘झिंग चिक झिंग’मधील जगण्याची जिद्द घेऊन लढणारा माउली या काही अत्यंत वेगळ्या आणि काळजाला हात घालणाऱ्या भूमिकाही भरत यांनी आपल्या अप्रतिम अभिनयाने जिवंत केल्या.

भरत जाधव यांचा केदार शिंदे दिग्दर्शित ‘खो खो’ (२०१३) हा चित्रपट प्रदर्शित झाला. भरत जाधव एन्टरटेन्मेंट या त्यांच्या संकेतस्थळाच्या माध्यमातून ते नव्या कलाकारांना प्रोत्साहन देण्याचेही काम करतात.

– आसावरी चिपळूणकर

ज

## जाधव, सिद्धार्थ रामचंद्र

**अभिनेता**

**२३ ऑक्टोबर १९८१**



मराठी चित्रपटांतून आणि मालिकांमधून अतिशय थोड्याच काळात विनोदी अभिनेता म्हणून नावारूपाला आलेला कलाकार-नट म्हणजे सिद्धार्थ जाधव.

सिद्धार्थ रामचंद्र जाधव यांचा जन्म राजापूर तालुक्यातील केळवली या गावी झाला, पण त्यांचे बालपण मुंबईसारख्या महानगरात गेले. रामचंद्र आणि मंदाकिनी जाधव यांचा हा तिसऱ्या क्रमांकाचा मुलगा. नायगावच्या सरस्वती हायस्कूलमध्ये त्यांचे शालेय शिक्षण झाले. शालेय जीवनात हुशार विद्यार्थी म्हणून नावाजले गेलेल्या सिद्धार्थ जाधव यांनी मॅट्रिक झाल्यावर रुपारेल महाविद्यालयात प्रवेश घेतला. येथे शिकत असतानाच कला शाखेच्या दुसऱ्या वर्षाला असताना त्यांना जयवंत भालेकर यांच्या ओळखीने देवेंद्र पेम यांच्या 'तुमचा मुलगा करतो काय' या नाटकात काम करण्याची संधी मिळाली. या नाटकातील भूमिकेमुळे व त्या भूमिकेला दिलेल्या न्यायामुळे सिद्धार्थ जाधव यांच्याकडे अनेक चित्रपट आणि मालिकांमधून काम करण्यासाठी विचारणा झाली. या नाटकाचे त्यांनी ३५० प्रयोग केले. या नाटकादरम्यान त्यांची पॅडी (पंढरीनाथ) कांबळे या कलाकारासोबत ओळख झाली व त्याचे रूपांतर पुढे मैत्रीत झाले. त्यानंतर सिद्धार्थ जाधव यांनी 'राम भरोसे' या नाटकात काम केले. या नाटकाचे २५ प्रयोग झाले.

महेश मांजरेकर दिग्दर्शित 'मी शाहरुख मांजरसुंभेकर' या नाटकात सिद्धार्थ जाधव यांच्यातील कलाकाराची खरी कसोटी लागली व त्यांच्या अंगी असलेल्या अभिनयकौशल्यामुळे ते खऱ्या अर्थाने या कसोटीला उतरले आणि याच नाटकामुळे त्यांच्यातला कलाकार खऱ्या अर्थाने घडला.

सिद्धार्थ जाधव यांच्या अभिनयातील सहजता लक्षात आल्यावर केदार शिंदे यांनी आपल्या 'लोच्या झाला रे' या नाटकात त्यांना काम दिले. या नाटकामुळे सिद्धार्थ यांच्या कारकिर्दीला कलाटणी मिळाली आणि नंतर त्यांना अनेकानेक चित्रपटात काम करण्याची संधी मिळाली.

'जत्रा', 'माझा नवरा तुझी बायको', 'अगं बाई अरेच्या', 'बकुळा नामदेव घोटाळे', 'जबरदस्त', 'साडे माडे तीन', 'दे धक्का', 'उलाढाल', 'बापरे बाप अन् डोक्याला ताप', 'गलगले निघाले', 'सालीने केला घोटाळा', 'गाव तसं चांगलं', 'मी शिवाजीराजे भोसले बोलतोय', 'शिक्षणाच्या आयचा घो', 'हुप्पा हुय्या', 'लालबाग परळ', 'क्षणभर विश्रांती', 'इरादा पक्का', 'भैरू पैलवान की जय', 'फक्त लढ म्हणा', 'कुटुंब', 'खो खो' अशा चित्रपटांतून त्यांनी अतिशय सहज आणि वेगळ्या विनोदी भूमिका साकारल्या व आपला एक विशिष्ट प्रेक्षकवर्ग आपल्या कारकिर्दीत अगदी कमी वेळात तयार केला. मराठीबरोबरच 'गोलमाल' या हिंदी चित्रपटात, तसेच 'आऊटसोर्स' या इंग्लिश चित्रपटात कामे करून त्यांनी चित्रपटातील भाषिक मर्यादा पार केल्या.

चित्रपटात काम करत असतानाही व यशाच्या शिखरावर पोहोचल्यावरही त्यांनी नाटक या प्रयोगशील कलेकडे पाठ फिरवली नाही, तर याउलट त्यांनी आपल्या अभिनयाच्या ताकदीच्या जोरावर 'जागो मोहन प्यारे' या नाटकात महत्त्वाची भूमिका साकारली. नाटक सुरू झाल्यापासून संपेपर्यंत प्रेक्षकांना जागेवर खिळवून ठेवण्याची ताकद सिद्धार्थ जाधव यांच्या अभिनयात निश्चितपणे आहे. या नाटकाचे त्यांनी ४५० प्रयोग केलेले आहेत.

'एक शून्य बाजीराव' (सह्याद्री), 'घडलंय बिघडलंय', 'हसा चकटफू' (झी मराठी), 'आपण यांना हसलात का?', 'तीन तेरा पिंपळझाड' (ई टीव्ही), 'दार उघडा ना गडे' (स्टार प्रवाह) या मराठी मालिकांतून सिद्धार्थ जाधव यांनी काम केले आहे. शिवाय 'बा बहु



'खो खो' या चित्रपटात आगळ्यावेगळ्या भूमिकेत सिद्धार्थ जाधव

और बेबी', 'कॉमेडी सर्कस का नया दौर' (सोनी), 'साराभाई वर्सेस साराभाई' अशा अनेक हिंदी मालिकांतूनही ते चमकले.

सिद्धार्थ जाधव यांना अभिनयासाठी २००७ साली युवा बालगंधर्व पुरस्कार, २००८ साली 'दे धक्का' चित्रपटातल्या भूमिकेसाठी महाराष्ट्र राज्य सरकारचा उत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्याचा पुरस्कार, २००४-०५ साली 'जागो मोहन प्यारे', 'लोच्या झाला रे' या नाटकासाठी महाराष्ट्र राज्य व्यावसायिक नाट्य स्पर्धेत उत्कृष्ट अभिनेत्याचा पुरस्कार, २०१२ मध्ये 'लालबाग परळ' या चित्रपटातील अभिनयासाठी महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनयाचा पुरस्कार त्यांना मिळाला. महाराष्ट्र कला निकेतनतर्फे २ वेळा अभिनयासाठी पुरस्कार, तसेच एकता कल्चरल ॲकॅडमीतर्फे व्ही. शांताराम स्मृती पुरस्कारही त्यांना मिळाले आहेत.

नृत्याची उपजत देणगी लाभलेल्या या कलाकाराकडे अभिनयाची उत्तम जाणही आहेच, हे त्यांनी आपल्या अनेक प्रकारच्या भूमिका साकारून सिद्ध केलेले आहे. एक बुद्धिमान व प्रयोगशील अभिनेता म्हणून सिद्धार्थ जाधव यांनी चित्रपटसृष्टीत आपले स्वत:चे स्थान निर्माण केले आहे.

– संपादित

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

**जीवनकला**
*कांबळे, जीवनकला दत्तोबा*
**अभिनेत्री**
**२९ जून १९४४**

दत्तोबा कांबळे व गंगूबाई कांबळे या कलावंत दांपत्याच्या पोटी जीवनकला यांचा जन्म पुणे येथे झाला. गंगूबाई यांनी एकेकाळी मूकपटाचा काळ गाजवला होता. 'फिअरलेस नादिया'चा उदय होण्यापूर्वी गंगूबाई तशाच प्रकारची चित्तथरारक कामे करीत. त्यामुळे त्या काळात 'स्टंट क्वीन' असा त्यांचा लौकिक झाला होता. पुढे बोलपटातूनही त्यांनी कामे केली. वडील दत्तोपंत



हेही चित्रपटात कामे करीत.

मंगेशकर कुटुंबाने सुरू केलेल्या 'सुरेल बाल कला केंद्र'मध्ये अनेक बाल कलाकार कामे करीत. उषा मंगेशकर, हृदयनाथ मंगेशकर, लक्ष्मीकांत कुडाळकर, प्यारेलाल शर्मा, कल्याणजी, आनंदजी, बाळ पार्टे, जयवंत कुलकर्णी, कुमारसेन गुप्ते, अरविंद मयेकर, अशी पुढे मोठेपणी नाव झालेली कलावंत मंडळी त्यात होती. छोट्या जीवनकलाही सुरेल बाल कला केंद्रात नृत्य करीत असत. तेव्हापासून जीवनकला मंगेशकर कुटुंबातल्याच झाल्या.

१९५२ साली दत्ता धर्माधिकारी यांनी दिग्दर्शित केलेला 'अखेर जमलं' हा चित्रपट प्रदर्शित झाला. वसंत शिंदे, सूर्यकांत, बेबी शकुंतला, यांच्या प्रमुख भूमिका असलेल्या या चित्रपटात राजा गोसावी व शरद तळवलकर या विनोदी अभिनेत्यांनी प्रथमच भूमिका केली होती. त्याचप्रमाणे 'बेबी जीवनकला' या नावाने जीवनकलाही या चित्रपटात बालतारका म्हणून चमकल्या. पुढे हिंदी चित्रपटसृष्टीत 'नृत्यांगना' म्हणून त्यांनी अनेक चित्रपटांत कामे केली. हेलन, जयश्री टी, बेला बोस, अशा अनेक नृत्यांगनांच्या बरोबरीने जीवनकला यांनी अविस्मरणीय नृत्ये केली.

१९६० साली 'संगत जडली तुझी नि माझी' या प्रभाकर नायक यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटात जीवनकला यांचे नायक राजा गोसावी असूनही या चित्रपटाचा फारसा बोलबाला झाला नाही. त्यानंतरच्या 'अवघाचि संसार' (१९६०), 'उमज पडेल तर' (१९६०), 'पुत्र व्हावा ऐसा' (१९६१), 'चिमण्यांची शाळा' (१९६२), 'दृष्टी आहे जगाची निराळी' (१९६२), 'सूनबाई' (१९६२), 'हा माझा मार्ग एकला' (१९६३), 'दैवाचा खेळ' (१९६४), 'काय हो चमत्कार' (१९६४), 'मराठा तितुका मेळवावा' (१९६४), 'तुका झालासे कळस' (१९६४), 'वैशाख वणवा' (१९६४), 'शेरास सव्वाशेर' (१९६६), 'सुदर्शन' (१९६७), 'मानाचा मुजरा' (१९६९), 'काळी बायको' (१९७०), 'ती मी नव्हेच' (१९७०) अशा अनेक चित्रपटात सहनायिकेच्या वा खलनायिकेच्या भूमिकेत चमकल्या.

राजा ठाकूर दिग्दर्शित 'पुत्र व्हावा ऐसा' या चित्रपटात, त्यांनी प्रेमभंगामुळे निराश झालेल्या प्रेयसीची भूमिका केली होती. त्यातील 'जिथे सागरा धरणी मिळते' हे अप्रतिम गाणे त्यांच्यावरच चित्रित झाले होते. चित्रपट चांगला चालला व त्यांच्या भूमिकेचेही प्रेक्षकांकडून कौतुक झाले. आपली मुलगी नायिका व्हावी म्हणून वडील दत्तोपंत कांबळे यांनी १९६८ साली 'जानकी' हा चित्रपट खास त्यांच्यासाठी निर्माण केला. या चित्रपटात (दोस्ती फेम) सुधीरकुमार त्यांचे नायक असूनही हा चित्रपट अपेक्षेप्रमाणे चालला नाही.

जीवनकला यांच्यावर चित्रित झालेली काही गाणी खूप गाजली. 'अखेरचा हा तुला दंडवत', 'रेशमाच्या रेघांनी लालकाळ्या धाग्यांनी' (मराठा तितुका मेळवावा), 'साडी दिली शंभर रुपयांची' (वैशाख वणवा) ही गाणी कुणीच विसरू शकणार नाही. 'पारसमणी' या हिंदी चित्रपटातील 'हसता हुआ नूरानी चेहरा' या गाण्यावर त्यांनी सादर केलेले नृत्य लोकप्रिय झाले. नृत्याबरोबरच जीवनकला यांनी अनेक हिंदी-मराठी चित्रपटांतील भूमिकातून आईवडिलांचा अभिनयाचा वारसा जपला. त्यांनी स्वतंत्रपणे केलेले नृत्याचे कार्यक्रमही गाजले.

प्रसिद्ध पटकथा-संवादलेखक राम केळकर यांच्याशी त्यांचा विवाह झाला. दुर्दैवाने राम केळकरांचे अकाली निधन झाले. जीवनकला यांनी संसाराची जबाबदारी समर्थपणे सांभाळली. त्यांचा मुलगा हेमंत लेखक व दिग्दर्शक आहे, तर मुलगी मनीषा ही अभिनेत्री आहे. जीवनकला यांनी एका चित्रपटाची निर्मिती केली आहे. २०१० साली पी.सावळाराम पुरस्काराने त्यांना सन्मानित करण्यात आले.

– मधू पोतदार

## जोग, विष्णुपंत

**अभिनेता**

**१८ सप्टेंबर १९०५ – २९ जून १९९३**



सुप्रसिद्ध विनोदी लेखक चिं.वि. जोशी यांनी चिमणराव जोशी व गुंड्याभाऊ दांडेकर या व्यक्तिरेखा आपल्या लेखणीद्वारे अमर केल्या. त्या रजतपटावर आणल्या मा. विनायक यांनी. १९४० साली त्यांनी 'लग्न पहावं करून' आणि १९४२ साली 'सरकारी पाहुणे' हा चित्रपट सादर केला. त्यामध्ये दामुअण्णा मालवणकर यांनी चिमणरावांची भूमिका केली होती, तर गुंड्याभाऊच्या भूमिकेत विष्णुपंत जोग चमकले होते. चिं.वि. जोशी यांच्या व्यक्तिरेखांना रजतपटाद्वारे अमरत्व प्राप्त करून दिले ते दामूअण्णा मालवणकर आणि विष्णुपंत जोग यांनी. त्या दोघांनी सादर केलेल्या भूमिका गाजल्या पुढील काळात दामुअण्णा म्हणजे चिमणराव आणि विष्णुपंत जोग म्हणजे गुंड्याभाऊ, हे समीकरणच होऊन बसले.

विष्णुपंत जोग यांचा जन्म मध्य प्रदेशातील विलासपूर येथे झाला. त्यांचे वडील रेल्वेमध्ये नोकरी करीत. नागपूर येथे त्यांची बदली झाल्यावर विष्णुपंत जोग यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण नागपूर येथेच झाले. पण महाविद्यालयीन शिक्षण अर्धवट सोडून देऊन ते द्रव्यार्जनासाठी कामाच्या शोधाला लागले.

जोग यांचे काका बाळाभाऊ हे नाटकात उत्तम स्त्रीपार्ट करीत. तसेच त्यांचे थोरले बंधू नाना जोग हे उत्तम सारंगीवादक होते. त्यांनी नाटकेही लिहिली होती. त्यामुळे जोग यांच्या घरी गाण्यांच्या मैफली होत. एकदा त्यांच्या घरी दीनानाथ मंगेशकर आले होते. विष्णुपंत जोग यांचा आवाज मर्दानी, पल्लेदार आणि धारदार असल्यामुळे दीनानाथांनी त्यांना आपल्या बलवंत संगीत मंडळीत बोलावून घेतले आणि 'रणदुंदुभी' या नाटकात किरकोळ भूमिका दिली. ते त्यांचे रंगभूमीवरचे पहिले पदार्पण. हे साल होते अंदाजे १९२८–२९.

मा. दीनानाथ यांच्या नाटक कंपनीत जोग यांना हवा तसा वाव मिळेना आणि मतभेद झाले. त्यामुळे त्यांनी ती कंपनी सोडली व हिराबाई बडोदेकर यांच्या नूतन संगीत मंडळीत गेले. तिथे हिराबाई यांनी त्यांना शास्त्रोक्त गाणे शिकवण्याचा प्रयत्न केला पण त्यांना ते जमले नाही. मात्र 'संशयकल्लोळ', 'सौभद्र' वगैरे नाटकात भूमिका मिळाल्या. पण नूतन संगीत मंडळीमध्येही मतभेद झाले, तेव्हा जोग सोहराब मोदी यांच्या आर्यसुबोध नाटक मंडळीत दाखल झाले व तिथे त्यांनी भालजी पेंढारकर लिखित 'आसुरी लालसा' या नाटकात भूमिका केली. सोहराब मोदी यांच्या कंपनीत हिंदी वातावरण होते. ते जोगांना रुचेना. तेव्हा ती कंपनी सोडून पुन्हा ते हिराबाई बडोदेकर यांच्या कंपनीत गेले व तिथे पुन्हा काही नवी–जुनी नाटके केली. पण तिथे पुन्हा बिनसले, तेव्हा नवप्रभात नाटक कंपनीत जाऊन त्यांनी अनेक हिंदी–उर्दू नाटकात कामे केली.

१९३५ सालापर्यंत विष्णुपंत जोग नाटकातून छोट्या मोठ्या भूमिका करीत व शास्त्रशुद्ध पद्धतीने गाणे शिकले नसूनही नाट्यगीते म्हणत व त्यांना चांगला प्रतिसाद मिळत असे. या काळात चित्रपटांचा जमाना चांगला स्थिरावत चालला होता. विष्णुपंतांचे मेहुणे नटवर्य नानासाहेब फाटक. ते चित्रपटसृष्टीत शिरले होते. त्यांनीच विष्णुपंत जोग यांना आग्रहाने कोल्हापूर येथे बोलावून घेतले व शालिनी सिनेटोनच्या 'उषा', 'प्रतिभा', 'सावकारी पाश' या चित्रपटांत छोट्या छोट्या भूमिका मिळवून दिल्या.

बाबूराव पेंटर यांनी दिग्दर्शित केलेल्या शालिनी सिनेटोनमधील चित्रपटांतील विष्णुपतांच्या भूमिका मा. विनायक यांच्या पाहण्यात आल्या व त्यांनी विष्णुपंत जोग यांना 'ब्रह्मचारी' (१९३८) या चित्रपटात चकोरची भूमिका करण्यासाठी बोलावून घेतले व जोग यांच्या जीवनात आणखी एक नवा अध्याय सुरू झाला. 'ब्रह्मचारी' या चित्रपटातील त्यांची भूमिका प्रेक्षकांच्या मनात चांगलीच रुजली. त्यांचे गाणेही एकदम उचलून




ज

धरले गेले. त्यामुळे विनायक यांनी जोग यांना 'ब्रँडीची बाटली', 'सुखाचा शोध' व 'अर्धांगी' या हिंदी/मराठी चित्रपटात विनोदी भूमिका दिल्या. पण 'लग्न पहावं करून' या १९४० साली प्रदर्शित झालेल्या जोग यांच्या गुंड्याभाऊ दांडेकर या भूमिकेने त्यांना लोकप्रियतेच्या उच्चांकावर नेऊन बसवले. त्यांच्या सर्व भूमिकांना गाण्याची जोड असायचीच. त्यानंतर विनायकांनी जोग यांना 'अमृत', 'संगम' व 'पहिली मंगळागौर' या चित्रपटात भूमिका दिल्या व त्यानंतर पुन्हा एकदा चिमणराव व गुंड्याभाऊ यांच्या प्रमुख भूमिका असलेला 'सरकारी पाहुणे' हा चित्रपट पडद्यावर आणला. 'लग्न पहावं करून' या चित्रपटाप्रमाणे 'सरकारी पाहुणे' हा चित्रपटही खूपच गाजला आणि गुंड्याभाऊ म्हणजे विष्णुपंत जोग हे समीकरण होऊन बसले.

विष्णुपंत जोग यांचा अभिनय आणि गाणे यांवर मा. विनायक एकदम खूश होते. १९४३ साली प्रदर्शित झालेल्या 'गजाभाऊ' या एकमेव चित्रपटात त्यांनी नायकाची भूमिका केली होती. त्यानंतर मा. विनायक यांच्या अनेक हिंदी व मराठी बोलपटांत त्यांनी विविध प्रकारच्या विनोदी भूमिका सजवल्या. १९४७ साली मा. विनायक यांचे निधन झाल्यावर त्यांनी 'जय मल्हार', 'जिवाचा सखा', 'देव पावला' वगैरे चित्रपटात महत्त्वपूर्व भूमिका केल्या व गाणीही म्हटली. त्यानंतर ते चरित्र भूमिकांकडे वळले व आपले लक्ष त्यांनी मराठी चित्रपटांपुरतेच मर्यादित ठेवले.

विष्णुपंत जोग यांनी जवळजवळ ७५ हिंदी/मराठी चित्रपटांत भूमिका केल्या. १९७५ साली प्रदर्शित झालेला 'घर गंगेच्या काठी' या चित्रपटात छोटीशी

भूमिका करून त्यांनी चित्रसंन्यास घेतला. त्यांची कर्मभूमी कोल्हापूर हीच होती. चित्रसंन्यास घेतल्यानंतर ते पुणे येथे निवृत्तीचे जीवन जगत होते.

विष्णुपंत जोग यांच्या ऐन उमेदवारीच्या काळात पारितोषिके नव्हतीच. पण १९८० साली अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त त्यांचा अखिल भारतीय नाट्यपरिषदेतर्फे भव्य सत्कार करण्यात आला होता. ज्येष्ठ कलाकार या नात्याने भारतीय चित्रपटांना ७५ वर्षे पूर्ण झाली तेव्हा त्यांना सन्मानचिन्ह देऊन गौरवण्यात आले होते. त्यांचा वृद्धापकाळामुळे पुणे येथे मृत्यू झाला.

जोग यांनी गुंड्याभाऊ तर अमर केलाच, त्याचबरोबर त्यांच्या गाण्यांची खुमारी प्रेक्षकांना चटका लावून जात असे. 'सरकारी पाहुणे'मधला त्यांनी गायलेला तराणा कोण विसरेल!

– शशिकांत किणीकर

**संदर्भ** : १) खांडगे मंदा, 'मी गुंड्याभाऊ', प्रतिमा प्रकाशन, पुणे; १९९४.

## जोगळेकर, अर्चना अरुण

**अभिनेत्री**

**४ जानेवारी १९६५**



अर्चना जोगळेकर यांची आई आशा जोगळेकर उत्तम कथ्थक नृत्यकलाकार असल्याने अर्चना यांच्या बालपणापासून त्यांना घरातच नृत्याचे धडे मिळाले. एकीकडे नृत्यकला आत्मसात करतानाच त्यांनी उच्च शिक्षणाकडेही लक्ष कायम ठेवले. त्यांनी बी.कॉम., एल.एलबी. केल्यावर वकील म्हणून हळूहळू व्यवसायही सुरू केला. पण वकिलीपेक्षा अभिनय व नृत्य या कलांकडे त्यांचा जास्त ओढा होता. कलेच्या क्षेत्रातच त्यांनी भरपूर प्रगती केली. शिवाजी मंदिर क्रीडा विभागाच्या खुल्या एकपात्री स्पर्धेत अभिनयाचे पहिले पारितोषिक पटकावल्याने त्यांना 'उघडले स्वर्गाचे दार' या नाटकात काम करण्याची संधी मिळाली. 'मुक्ता', 'कळत-नकळत' अशा काही मराठी नाटकांतून भूमिका साकारतानाच दिग्दर्शक व्ही.के. नाईक यांनी 'खिचडी'मध्ये आपले पुत्र शेखर यांची नायिका म्हणून त्यांना संधी दिली. या चित्रपटात नृत्याला वाव असल्याने अर्चना सरस ठरल्या.

त्यानंतर 'अर्धांगी' (दिग्दर्शक – राजदत्त), 'रंगत संगत' (दिग्दर्शक – गिरीश घाणेकर), 'निवडुंग' (दिग्दर्शक – महेश सातोस्कर), 'एकापेक्षा एक' (दिग्दर्शक – सचिन), 'अनपेक्षित' (दिग्दर्शक – संजीव नाईक) अशा मराठी चित्रपटांतून भूमिका साकारताना त्यांना मराठीतील मान्यवर दिग्दर्शकांकडे काम करायला मिळाले. यातून त्यांचे व्यक्तिमत्त्व खुलले.

अर्चना जोगळेकर यांनी व.पु. काळे यांच्या कथांवर आधारित 'अवघाची संसार' या मालिकेच्या कथा-पटकथा-संवादलेखन व दिग्दर्शन या साऱ्यांची जबाबदारी स्वीकारली. नायिका म्हणून त्यांची कारकिर्द खुलत असताना त्यांनी अशी आव्हाने पेलणे त्या वेळी खूप विशेष मानले गेले. अर्चना यांनी 'राऊ' ही मालिका व 'निवडुंग' चित्रपट यांचेही नृत्यदिग्दर्शन केले. 'चुनौती' या मालिकेपासून अर्चना यांनी हिंदीत पाऊल टाकले. 'साम्राज्य' या मालिकेचे कथा-पटकथा-संवादलेखन व दिग्दर्शन या जबाबदाऱ्या त्यांनी पेलल्या.

'संसार', 'बिहू बादशाह' अशा काही हिंदी चित्रपटांतून भूमिका साकारतानाच अर्चना जोगळेकर यांना दिलीप शंकर दिग्दर्शित 'आतंक ही आतंक' या चित्रपटात अमीर खान व रजनीकांत या दोन कलाकारांसोबत अभिनय करण्याची संधी मिळाली. त्यानंतर त्या 'पुना चोढोई' (बंगाली), 'स्त्री' (ओरिसा), 'मोहमूळ' (तमिळ) अशा काही प्रादेशिक चित्रपटांतूनही चमकल्या. त्यांनी 'गणपती अथर्वशीर्ष', 'अर्धनारीनटेश्वर', 'विश्वविनायका' अशा कार्यक्रमांचे नृत्यदिग्दर्शनही यशस्वीपणे केले.

अमेरिकेतील न्यू जर्सी येथील डॉ. निर्मल मुळ्ये यांच्याशी १९९९ मध्ये विवाह केल्यावर अर्चना

ज

ज

जोगळेकर न्यू जर्सी येथे राहायला गेल्या. येथील कलाक्षेत्रावर त्यांचा ठसा उमटला आहे.

– दिलीप ठाकूर

## जोगळेकर, वसंत

**दिग्दर्शक**

**२५ सप्टेंबर १९१४ – मृत्यु दिनांक अनुपलब्ध**



वसंत जोगळेकर यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांचे व्यक्तिमत्त्व राजबिंडे होते व हस्ताक्षरही सुंदर होते. त्यांना चित्रपटात काम करण्याची तीव्र इच्छा होती. त्यामुळे पदवी प्राप्त केल्यावर अभिनेता बनण्यासाठी वसंत जोगळेकर नागपूरहून मुंबईला आले. सागर मुव्हीटोनच्या सर्वोत्तम बदामी या गाजलेल्या दिग्दर्शकाशी त्यांची भेट झाली आणि वसंत जोगळेकर 'बदामी' यांचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून सागर मुव्हीटोनद्वारे चित्रपटसृष्टीत दाखल झाले. 'चिंगारी' हा त्यांचा पहिला चित्रपट होता.

सागर मुव्हीटोन ही संस्था १९४०-४१ च्या दरम्यान बंद झाल्याने जोगळेकरांनी पुणे येथे मुक्काम हलवला. तेथे १९४२ मध्ये जोगळेकरांनी सदूभाऊ गद्रे यांच्या 'किती हसाल' या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. नंतर त्यांनी 'चिमुकला संसार' या मा. विनायकांच्या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. यामध्ये मा. विनायक व मीनाक्षी हे नायक-नायिकेच्या, तर सुमती गुप्ते या सहनायिकेच्या भूमिकेत होत्या. पुढे वसंत जोगळेकर व सुमती गुप्ते विवाहबद्ध झाले.

नंतर जोगळेकरांना मुंबई येथे दत्तू बांदेकरलिखित 'आपकी सेवा में' या चित्रपटाच्या दिग्दर्शनाची संधी मिळाली. १९४७ मध्ये आलेल्या या चित्रपटात दत्ता डावजेकर यांच्या संगीत दिग्दर्शनाखाली लता मंगेशकर यांनी हिंदी चित्रपटात सर्वप्रथम पार्श्वगायन केले. नट महिपाल यांनी हे गीत लिहिले होते. यानंतर जोगळेकरांनी स्वत:ची चित्रपट संस्था स्थापून 'साखरपुडा' या चित्रपटाची निर्मिती केली. नंतर १९५१ मध्ये एम अँड टी कंपनीच्या 'नंदकिशोर' या हिंदी व मराठीत बनलेल्या चित्रपटांचे दिग्दर्शन त्यांनी केले. यानंतर जोगळेकरांचे 'समाज', 'कारागीर', 'शेवटचा मालुसरा' (१९६५), 'एक कली मुस्काई' (१९६८), 'आज और कल' (१९६३), 'हा खेळ सावल्यांचा' (१९७६), 'जानकी' (१९७९) इ. अनेक हिंदी-मराठी चित्रपट गाजले. १९८० मध्ये जोगळेकर चित्रपटसृष्टीतून निवृत्त झाले.

– द.भा. सामंत

## जोशी, निवेदिता गजानन

**अभिनेत्री**

**१० जानेवारी**



निवेदिता गजानन जोशी यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांचे बालपणही तेथेच गेले. किंग जॉर्ज हायस्कूल, दादर आणि माधवराव भागवत हायस्कूल विलेपार्ले येथे त्यांचे शालेय शिक्षण पूर्ण झाले. पुढील शिक्षणासाठी त्यांनी मुंबई येथील सिडनहॅम महाविद्यालयात प्रवेश घेतला. एकेकाळी बालरंगभूमीवरून हौस-मौज म्हणून त्यांनी आपल्या अभिनयाची सुरुवात केली. 'टिळक-आगरकर', 'अखेरचा सवाल', 'प्रेमाच्या गावा जावे', 'वाहतो ही दुर्वांची जुडी', 'श्रीमंत', 'तुझ्या-माझ्यात' या नाटकांमधून निवेदिता जोशी यांनी कामे केली. 'ये जो है जिंदगी' या हिंदी मालिकेतील अभिनयामुळे त्या खऱ्या अर्थाने प्रकाशझोतात आल्या.

निवेदिता जोशी यांनी चित्रपटसृष्टीत प्रवेश केला तो 'घरचा भेदी' या चित्रपटाद्वारे. या चित्रपटात ललिता पवार, महेश कोठारे यांच्यासमवेत काम करण्याची संधी त्यांना मिळाली. निवेदिता जोशी यांनी 'नवरी मिळे नवऱ्याला', 'अर्धांगी' या चित्रपटांमधून सहनायिकेच्या



**'बाळाचे बाप ब्रह्मचारी' या चित्रपटात डावीकडच्या निवेदिता जोशी**

भूमिका केल्या. पण 'धूमधडाका'(१९८५) या चित्रपटाद्वारे त्यांना खऱ्या अर्थाने लोकप्रियता मिळाली. श्रीमंत बापाची लाडात वाढलेली मुलगी, कंपनीत काम करणाऱ्या एका कामगाराला धडा शिकवायला जाते. पण या कामगारामुळे या मस्तवाल मुलीची श्रीमंतीची नशा उतरून ती, त्या कामगाराच्याच प्रेमात पडते, अशा या तरुणीची भूमिका त्यांनी या चित्रपटात साकारली होती.

'मराठी नायिका' अशी आपली कारकिर्द व्यवस्थित सुरू असतानाच अशोक सराफ यांच्याशी गोवा येथे अचानक लग्न करून निवेदिता सराफ म्हणून त्या ओळखल्या जाऊ लागल्या आणि कालांतराने प्रथम छोट्या पडद्यावरील मालिकांची निर्माती व त्याहून पुढे लग्नसोहळ्यासाठीचे आयोजन अशा या क्षेत्राबाहेरच्या उद्योगापर्यंत त्यांचा प्रवास पोहोचतो. विशेष म्हणजे, मान्यवर वृत्तपत्रांनी एक उद्योजिका म्हणूनही निवेदिता सराफ यांची दखल घेतलेली आहे.

निवेदिता जोशी यांचा प्रवास चौफेर आहे. त्यांना ‘किंग अंकल’, ‘मरते दम तक’, ‘नरसिंह’ इ. हिंदी चित्रपटात नायिका म्हणून काम करण्याची संधी महेश कोठारेंनी दिली. महेश कोठारेंच्या ‘धूमधडाका’, ‘दे दणादण’, ‘थरथराट’ (१९८९) यात निवेदिता जोशी या महेश यांच्या हुकमी व यशस्वी नायिका होत्या, तर महेश यांनीच ‘माझा छकुला’मध्ये एका व्याकुळ मातेची भूमिका देऊन त्यांच्या अभिनयाला वाव दिला. या व्यतिरिक्त त्यांनी गिरीश घाणेकर दिग्दर्शित ‘बाळाचे बाप ब्रह्मचारी’ (१९८९) या चित्रपटातील भूमिकाही लोकप्रिय ठरली. तत्पूर्वी याच निवेदिता एका वेगळ्या गाण्याद्वारे आपल्यासमोर आल्या. ओम प्रकाश निर्मित व दिग्दर्शित ‘अपनापन’ या चित्रपटात सुधीर दळवी एका प्रवासी बसमध्ये ‘आदमी मुसाफीर है, आता है, जाता है’ हे गाणे गातात, तेव्हा त्यांच्यासोबत असणारी मुलगी म्हणजेच निवेदिता जोशी होय.

अशोक सराफ यांच्यासोबतच्या संसारात एका मुलाच्या आईची जबाबदारी पेलत असतानाच त्यांनी निर्मिती संस्था स्थापली व काही मालिकांची निर्मिती केली. ‘चुटकी बजाके’, ‘डोंट वरी’, ‘हो जाएगा’, ‘फिफ्टी फिफ्टी’ अशा त्यांच्या मालिका लोकप्रिय झाल्या.

– दिलीप ठाकूर

## जोशी, मोहन विष्णू
**अभिनेता**
**१२ जुलै १९५३**

हिंदी चित्रपटसृष्टीत ‘खलनायक’चा परिपाठ निर्माण करणारा मराठी भाषिक अभिनेता मोहन जोशी हे मराठी चित्र-नाट्यसृष्टीतील एक सुपरिचित नाव आहे. त्यांचा जन्म बंगळुरू येथे झाला, पण त्यांचे बालपण पुण्याला गेले. त्यांच्या आईचे नाव प्रमिला होते. न्यू इंग्लिश स्कूल या शाळेत त्यांचे माध्यमिक शिक्षण झाले आणि त्यानंतर बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स या महाविद्यालयात त्यांनी वाणिज्य शाखेचे शिक्षण घेतले. त्यांना



अभिनयाची आवड उपजतच असली तरी प्रत्यक्ष प्रशिक्षण मात्र मिळाले नाही. भरत नाट्य मंदिराचे संचालक बाबूराव विजापुरे यांच्याकडून नाटकाचे काही प्राथमिक धडे त्यांनी गिरवले.

मोहन जोशी यांनी महाविद्यालयीन शिक्षणानंतर १९७५ साली किर्लोस्कर ऑईल इंजिन्स या कंपनीत सात आठ वर्षे नोकरी केली. त्याच वर्षी म्हणजे १६ फेब्रुवारी १९७५ रोजी त्यांचा विवाह झाला आणि त्याच वर्षी ‘मोरूची मावशी’ या नाटकात त्यांना काम करण्याची संधी मिळाली. लहान-मोठ्या व्यावसायिक नाटकात काम करत असतानाच मराठी चित्रपटसृष्टीकडेही त्यांची पावले वळली. १९८१ साली ‘रावसाहेब’ या मराठी चित्रपटात त्यांनी भूमिका साकारली. खर्जामध्ये लागणारा खडा आवाज, कसदार आणि सहजसुंदर अभिनयशैली यांमुळे मोहन जोशी हे नाव नाट्य-चित्रपटसृष्टीमध्ये वरच्या वर्तुळात घेतले जाऊ लागले. ‘रावसाहेब’ या चित्रपटाला महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. १९८८ साली ‘मिल गयी मंझिल मुझे’ या हिंदी चित्रपटामध्ये त्यांनी काम केले. हिंदी आणि मराठी अशा दोन्ही भाषेत साधारणपणे ५५० चित्रपटांतून त्यांनी भूमिका केल्या.

१९९७ साली प्रदर्शित झालेल्या ‘घराबाहेर’ या चित्रपटातील भूमिकेसाठीही त्यांना महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार, तसेच राष्ट्रीय पुरस्कारही मिळाला. १९९३ सालच्या ‘सवत माझी लाडकी’ या चित्रपटातही बीना (नीना कुळकर्णी) यांच्या इरसाल, डॉक्टर पतीची विनोदी ढंगाची भूमिका त्यांनी केली. ‘तू तिथं मी’ या १९९६ साली प्रदर्शित झालेल्या चित्रपटात निवृत्तीनंतर पत्नीपासून दुरावलेल्या एका कुटुंबवत्सल पतीची त्यांनी वठवलेली भूमिका लक्षणीय ठरली. भावनांचे अनेक पदर उलगडणाऱ्या या अभिनयकौशल्यासाठी त्यांना महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनेता पुरस्कार देण्यात आला.



**'रावसाहेब' या चित्रपटात मोहन जोशी उजवीकडील**

याच भूमिकेसाठी फिल्मफेअर पुरस्काराने त्यांना गौरवण्यात आले. मिश्कील आणि विनोदी भूमिका रंगवण्याची हातोटी असलेले मोहन जोशी अष्टपैलू अभिनेते म्हणून ओळखले जातात. २०१० साली आलेल्या 'बे दुणे साडे चार' या चित्रपटातील विनोदी भूमिकेसाठी त्यांना 'उत्कृष्ट विनोदी अभिनेता' म्हणून महाराष्ट्र शासनाच्या पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. 'नॉट ओन्ली मिसेस राऊत' चित्रपटात त्यांनी केलेली व्यवहारकठोर वकिलाची भूमिका आजही प्रेक्षकांच्या लक्षात आहे. याशिवाय 'सरीवर सरी', 'दिवसेंदिवस', 'मु.पो. लंडन', 'तुझ्या माझ्यात' यासारख्या अनवट विषयांवरील चित्रपटातही त्यांनी महत्त्वपूर्ण भूमिका केल्या.

हिंदी चित्रपटसृष्टीमध्ये मोहन जोशी यांनी 'खलनायका'ची कारकिर्द स्वतंत्रपणे घडवली. मराठी कलाकाराचा हिंदी चित्रपटसृष्टीतील सहज वावर, भाषेवरची उत्तम हुकमत आणि भूमिकेत स्वानुभवातून पडलेली भर या गुणांनी मोठमोठ्या निर्मिती संस्थांचे, महत्त्वाचे हिंदी चित्रपट त्यांच्या नावावर जमा आहेत. 'भूकंप', 'ऐलान', 'टक्कर', 'जीत', 'हलचल', 'हकीकत', 'गुलाम-ए-मुस्तफा', 'मृत्युदंड', 'जुडवा', 'सलाखे', 'बारूद', 'वास्तव', 'आज का रावण', 'बागबान', 'गंगाजल' अशा चित्रपटातून चरित्र भूमिकेवर स्वतःचा ठसा उमटवला आहे.

नाट्य-चित्रपटसृष्टीप्रमाणे दूरदर्शन मालिकांमध्येही मोहन जोशी यांचा मोठा सहभाग आहे. 'ऊनपाऊस', 'अग्निहोत्र', 'धनंजय', 'भैरोबा', 'गुंडा पुरुष देव', या मालिकांमधूनही त्यांच्या भूमिका आपल्याला पाहायला मिळाल्या. त्यांनी २००३ पासून अखिल भारतीय मराठी नाट्य परिषदेच्या अध्यक्षपदाची जबाबदारी स्वीकारली आहे. तसेच त्यांनी २०१० साली अमेरिकेमध्ये न्यू जर्सी येथे विश्व नाटचसंमेलन भरवले होते. अभिनयाव्यतिरिक्त 'जिव्हाळा' या ट्रस्टच्या स्थापनेत त्यांचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे. या संस्थेतर्फे नाट्य-

सिनेक्षेत्रातील गरजू कलाकारांना मदत दिली जाते. अशा अनेक उपक्रमात सहभागी होताना त्यांची अभिनयक्षेत्रातील वाटचालही सुरूच आहे. भोजपुरी चित्रपटातही ते सातत्याने काम करत आहेत.

– नेहा वैशंपायन



## जोसेफ डेव्हिड

*पेणकर, योसेफ दावीद*

**पटकथा–संवाद–गीतलेखक, नेपथ्यकार**

**१८७९ – १९४९**

'आलम आरा' चित्रपटाचे संवादलेखक म्हणून अखंड भारताचा पहिला बोलपट करण्याचे श्रेय घेणारा हरहुन्नरी लेखक म्हणजे जोसेफ डेव्हिड.

योसेफ दावीद पेणकर हे त्यांचे खरे नाव. त्यांनी मराठी, उर्दू, हिंदी आणि गुजराती या भाषांत नाटके रचली होती. उर्दू आणि पारसी रंगभूमीवर त्यांची नाटके मोठ्या प्रमाणात गाजली. 'मक्काबी वीरांचे शौर्य' (१९२१), 'राजपुत्र आबशालोम' (१९२१), 'एस्तर राणी', 'आबशालोमचे सिंहासन', 'रशियातील यहुदी कन्या', 'रोमन राजा टैटस' ही मराठी भाषेतील त्यांची नाटके. यातील संविधानके प्राचीन धर्मग्रंथावर आधारित आहेत. यहुदी नववर्षाच्या आगमनाच्या वेळेला नागपाडा, भायखळा, ठाणे, पुणे येथे पेणकर स्वत: ही नाटके करत. त्यांचे शिक्षण मराठी भाषेतून झाले होते, पण माझगाव, नागपाडा आणि भायखळा विभागात वास्तव्य असल्यामुळे त्यांचा उर्दू भाषक व गुजराती भाषक लोकांशी सततचा संबंध येत असे. त्यामुळे त्या भाषांतल्या रंगमंचावर ते आपली नाटके प्रेक्षकांपुढे सादर करत. त्यामुळेच इंपीरियलचे मालक आर्देसिर इराणी यांचे जोसेफ डेव्हिड यांच्याकडे लक्ष गेले. 'आलम आरा'चे कथानक, संवाद आणि गाणी जोसेफ डेव्हिड यांनीच रचली. त्यानंतर त्याच कंपनीसाठी 'नूरजहाँ' (१९३१) चित्रपटाचे लेखन करून दिले.

वाडिया मुव्हीटोनचे जमशेदजी वाडिया यांनी त्यांना वाडिया कंपनीत आणले आणि 'नूरे–यमन' बोलपटाचे कथालेखन, संवादलेखन व गीतलेखन करून घेतले. त्या चित्रपटाचे संगीतही जोसेफ डेव्हिड यांनीच दिले होते. प्रसिद्ध शास्त्रीय गायक फिरोज दस्तूर हे बोलपटाचे नायक होते. वाडियाच्या चित्रसंस्थेसाठी त्यांनी 'बागे मिसर' (१९३४), 'वामन अवतार' (१९३४), 'नूरे–यमन' (१९३५) अशा बोलपटांसाठी कथा–संवाद–गीतलेखन केले आणि संगीत दिले. त्यांनी मराठी भाषेत 'दावीदाख्यान', 'महाराणी एस्तरचे बुद्धिचातुर्य' या कीर्तनांच्या पद्यावली रचल्या.

– द.भा. सामंत

* * *

ठ





### ठाकूर, राजाराम दत्तात्रेय

*राजा ठाकूर*

**दिग्दर्शक, संकलक**

**२६ नोव्हेंबर १९२३ - २८ जुलै १९७५**



राजाराम दत्तात्रेय ठाकूर यांचा जन्म रत्नागिरी येथे झाला. नवयुग फिल्म कंपनीत र.शं. जुन्नरकर यांच्या हाताखाली संकलक म्हणून राजा ठाकूर काम पाहू लागले. जुन्नरकर नवयुग सोडून गेल्यावर राजा ठाकूर यांनी नवयुगच्या 'क्या तराना', 'पन्ना', 'शिकायत' या तीन चित्रपटांचे स्वतंत्रपणे संकलन केले. त्यानंतर ठाकूर यांनी राजा परांजपे यांना 'बलिदान' (१९४८) या चित्रपटासाठी दिग्दर्शन साहाय्य केले व संकलनही केले. पुढे राजा परांजपे यांच्या गाजलेल्या 'जिवाचा सखा', 'लाखाची गोष्ट', 'पेडगावचे शहाणे' या चित्रपटांचे संकलनही राजा ठाकूर यांनीच केले. राजा परांजपे व ग.दि. माडगूळकर यांनी पुण्यात 'नवचित्र' ही चित्रपट संस्था स्थापन केली. 'बोलविता धनी' (१९५२) हा त्यांनी स्वतंत्रपणे दिग्दर्शित केलेला पहिला चित्रपट. त्यानंतर त्यांनी 'रेशमाच्या गाठी' हा चित्रपट दिग्दर्शित केला.

राजा ठाकूर यांनी १९५४ च्या सुमारास स्वत:ची चित्रपटसंस्था स्थापन केली. त्यांनी १९५५ मध्ये 'मी तुळस तुझ्या अंगणी' या चित्रपटाची निर्मिती केली. प्रेक्षक व समीक्षक, दोघांच्याही पसंतीला उतरलेल्या या चित्रपटासाठी राजा ठाकूर यांना राष्ट्रीय स्तरावरील उत्कृष्ट प्रादेशिक चित्रपटासाठीचा 'रजतकमल' हा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. त्यानंतरच्या 'उतावळा नारद' मध्ये ठाकूर यांनी हिंदीतील प्रख्यात विनोदी नट भगवान याला मराठीत प्रथमच संधी दिली. चिमणराव व गुंड्याभाऊ या चि.वि. जोशींच्या मानसपुत्रांवर आधारित विनोदी चित्रपट 'घरचं झालं थोडं' (१९५७) याची निर्मिती केली. यात दामूअण्णा मालवणकर व विष्णुपंत जोग यांच्या भूमिका होत्या. त्यांचा 'रंगल्या रात्री अशा' हा चित्रपट १९६२ मध्ये प्रदर्शित झाला. अत्यंत यशस्वी ठरलेल्या या चित्रपटातून जगदीश खेबुडकर यांचे गीतकार म्हणून चित्रपटसृष्टीत आगमन झाले. या चित्रपटालाही 'रजतकमल' या पुरस्काराने गौरवले. 'गजगौरी' हा प्रभात फिल्मचा शेवटचा चित्रपट राजाभाऊंनी दिग्दर्शित केला होता. यानंतर त्यांनी 'राजमान्य राजश्री', 'पुत्र व्हावा ऐसा', 'पाहू रे किती वाट', 'एकटी', 'मुंबईचा जावई' यासारखे मराठी चित्रपट रसिकांना दिले. त्यातील १९६८ मध्ये आलेल्या 'एकटी' या चित्रपटासाठी त्यांना राष्ट्रीय स्तरावर 'रजतकमल' देऊन सन्मानित करण्यात आले.

ठाकूर यांनी हिंदीतील सुप्रसिद्ध संगीतकार सी.रामचंद्र यांना 'धनंजय' या चित्रपटात नायकाच्या भूमिकेत संधी दिली. त्यांनतर त्यांनी 'बिरबल माय ब्रदर' या इंग्रजी चित्रपटाची निर्मिती केली. तसेच हिंदी चित्रपटसृष्टीत प्रवेश करून १९७५ मध्ये 'जख्मी' या यशस्वी चित्रपटाचे दिग्दर्शन केले. हा चित्रपट मुंबईत ४० आठवडे एकाच चित्रपटगृहात चालला. यानंतर 'रईसजादा' या चित्रपटाच्या निर्मितीदरम्यानच हृदयविकाराच्या तीव्र झटक्याने त्यांचे निधन झाले.

- द. भा. सामंत

* * *

# ड





## डावजेकर, दत्तात्रेय शंकर

**संगीतकार**

**१५ नोव्हेंबर १९१५ - ११ नोव्हेंबर २००७**



दत्तात्रेय शंकर डावजेकर हे पुण्याजवळील 'केंदूर' या गावचे होते. लहानपणीच त्यांचे मातृसुख हरपले, पण आजीने मोठ्या जिव्हाळ्याने त्यांचे पालनपोषण केले. त्यांचे वडील उत्तम तबलजी होते. त्या काळच्या प्रसिद्ध थिएटर मंडळींबरोबर तबल्याची साथ करण्यासाठी ते महिनोन् महिने दौऱ्यावर असत. नंतर वडिलांनी तबल्याचे वर्ग सुरू केले; पण दत्ता काही त्यांच्याकडे तबला शिकले नाहीत, मात्र गाणे-बजावणे कानावरून गेल्यामुळे दत्ता यांच्यावर संगीताचे संस्कार झाले.

संगीताची आवड निर्माण झाल्यावर दत्ता यांनी भातखंडे यांच्या 'हिंदुस्तानी संगीत पद्धती' या पुस्तकाचा कसून अभ्यास केला. तबला, दिलरुबा, पियानो वाजवण्यात उत्तम प्रगती केली. दत्तोपंत मंगळवेढेकर यांच्याकडे ते जलतरंगही शिकले.

दत्ता पुण्यातील नूतन मराठी विद्यालयात मॅट्रिकपर्यंत शिकले. पुस्तकी ज्ञानाबरोबरच चित्रकला, मातीकाम अशा ललित कलांमध्येही त्यांना उत्तम गती होती.

लवकरच 'शांता आपटे कन्सर्न्स' या संस्थेत साथीदार म्हणून ते दाखल झाले. १९३५ च्या सुमारास 'नंदकुमार' या चित्रपटाचे संगीतकार सुरेशबाबू माने यांच्यांकडे ते साहाय्यक म्हणून भरती झाले. तिथे त्यांना अनेक गोष्टी शिकता आल्या. पण ही कंपनी लवकरच बंद पडली. 'सवंगडी' या चित्रपटाच्या वेळी संगीत विभागात साहाय्यक म्हणून दत्तांची नेमणूक झाली. सर्व जण त्यांना 'डीडी' म्हणत. 'सवंगडी' (मराठी) व 'साथी' (हिंदी) या चित्रपटांची गाणी डीडींनीच बसवून ध्वनिमुद्रित केली. त्या वेळी एच.एम.व्ही.चे वरिष्ठ अधिकारी जी.एन. जोशी यांनी डीडींना एच.एम.व्ही.त नोकरी दिली, पण नोकरीत बांधून घेणे त्यांना मानवले नाही.

सोहराब मोदींच्या मिनर्व्हा मुव्हीटोनमध्ये संगीत दिग्दर्शक मीरसाहेब यांचे साहाय्यक म्हणून दत्ता काम करू लागले. इथेच ते गाण्यांचे नोटेशन भरभर लिहावयास शिकले. वादक व संगीत साहाय्यक म्हणून स्थिरावल्यावर त्यांचे मित्र कोष्टी यांच्या 'म्युनिसिपालिटी' या चित्रपटाचे संगीत दिग्दर्शन करण्याची संधी त्यांना मिळाली. १९४१ सालचा 'म्युनिसिपालिटी' हा त्यांनी स्वतंत्रपणे संगीत दिलेला पहिला चित्रपट. या चित्रपटातूनच वसंतराव देशपांडे प्रथमच पार्श्वगायक म्हणून आले.

डीडींना मेळ्यात गाणी लिहायची सवय असल्यामुळे 'म्युनिसिपालिटी' चित्रपटात त्यांनी 'हळूहळू या सजणा' व 'तू माझ्या जवळी यावे' ही दोन गाणी लिहिली. पुढे नवयुग कंपनीच्या 'सरकारी पाहुणे'साठी त्यांना बोलवणे आले. त्यानंतर मा. विनायक यांच्या 'प्रफुल्ल पिक्चर्स'चे 'माझे बाळ', 'चिमुकला संसार' व 'गजाभाऊ' हे तीन चित्रपट केले. डीडी हेच लता मंगेशकर यांना मा.विनायकांकडे घेऊन गेले. त्यांच्या 'आपकी सेवा में' या चित्रपटातील 'पालागूकर जोरीरे' ही पिलू रागातील ठुमरी म्हणजे लता मंगेशकरांचे पहिले हिंदी गाणे.

१९४५ मध्ये जी.एन. जोशींच्या ओळखीने

एच.एम.व्ही.मध्ये असताना त्यांनी ‘तुज स्वप्नी पाहिले गोपाळा’, ‘कुणी बाई गुणगुणले’ ही गाणी लिहून संगीत देऊन ध्वनिमुद्रित केली. डीडींनी अनिल विश्‍वास, सुरेशबाबू माने, चित्रगुप्त, एस.एन. त्रिपाठी, प्रेमधन रोशन आणि सी.रामचंद्र यांच्याकडे साहाय्यक म्हणून काम केले.

आयुष्यभर त्यांनी इलेक्ट्रॉनिक्सच्या छंदाची जोपासना केली. इलेक्ट्रॉनिक सूरपेटी (१९७०) व इलेक्ट्रॉनिक तंबोरा (१९७१) ची त्यांनी निर्मिती केली. अनेक मराठी नाटकांना, ५० मराठी चित्रपटांना व २ हिंदी चित्रपटांना त्यांनी संगीत दिले. लता मंगेशकरांच्या परदेशदौऱ्यात त्यांच्याबरोबर प्रमुख वादक म्हणून डीडींनी काम केले.

‘रंगल्या रात्री अशा’ (१९६२), ‘पाठलाग’ (१९६४), ‘संथ वाहते कृष्णामाई’ (१९६७) व ‘धरतीची लेकरं’ (१९७०) या चित्रपटांना महाराष्ट्र राज्य सरकारचा उत्कृष्ट संगीताचा पुरस्कार, तर ‘यशोदा’ (१९७४) या चित्रपटाला शास्त्रीय संगीताचा सूरसिंगार पुरस्कार मिळाला आहे. १९९५ सालचा महाराष्ट्र राज्य सरकारचा ‘लता मंगेशकर’ पुरस्कार त्यांना मिळाला. त्यांची मुलगी रेखा (डॉ. अपर्णा मयेकर) वैद्यकीय क्षेत्रात असूनही उत्तम गायिका आहे. तर धाकटा मुलगा विनय हा बांधकाम व्यावसायिक असून त्याला संगीताची आवड आहे. कोल्हापूरला आपल्या वडिलांच्या नावे त्याने ‘संगीतकार दत्ता डावजेकर प्रतिष्ठान’ची स्थापना केली असून या प्रतिष्ठानतर्फे दर वर्षी संगीताचे कार्यक्रम आयोजित केले जातात.

– मधू पोतदार

* * *

# त





## तर्खड, नलिनी आत्माराम

**अभिनेत्री**

**जन्म-मृत्युदिनांक अनुपलब्ध**



भारतीय चित्रपट जेव्हा शैशवावस्थेत होता, तेव्हा स्त्रियांनी चित्रपटात भूमिका करणे निषिद्ध मानले जायचे. हिंदी उच्चशिक्षण घेतलेल्या पहिल्या अभिनेत्री होत्या मीनाक्षी रामराव आणि दुसऱ्या अभिनेत्री नलिनी तर्खड. नलिनी मराठा समाजातील होत्या. त्यांचे वडील डॉ. आत्माराम पांडुरंग तर्खड सामाजिक कार्यकर्ते होते आणि ब्रिटिश काळात मुंबईचे पहिले हिंदू शेरीफ होते. दिग्दर्शक मोहन भवनानींनी नलिनी तर्खड यांचे सौंदर्य पाहून 'वसंतसेना' (१९३१) या मूकपटात त्यांना भूमिका दिली. या मूकपटाच्या नायिका होत्या मीनाक्षी रामराव, तर नलिनी सहभूमिकेत होत्या. त्यानंतर दिग्दर्शक जे.के. चंदा यांच्या 'पवित्र गंगा' चित्रपटात नायिका म्हणून नलिनी चमकल्या. चित्रपटात काम केल्यामुळे वृत्तपत्रांनी त्यांच्याविरुद्ध आघाडी उघडली.

नंतर नलिनी यांनी प्रभात फिल्म कंपनीत प्रवेश केला. शांतारामबापूंनी त्यांना 'अमृतमंथन' (१९३४) मध्ये भूमिका दिली. त्यानंतर केशवराव धायबर दिग्दर्शित 'रजपूत रमणी'मध्ये त्यांनी नायिकेची भूमिका केली. केशवराव धायबरांशी त्यांची घनिष्ठ मैत्री जमली. कालांतराने दोघे विवाहबद्ध झाले. नलिनी यांनी विवाहानंतर चित्रपटसृष्टीला रामराम ठोकला. नलिनी यांची चित्रपटकारकिर्द छोटी होती. पण चांगल्या घरातील मुलींना चित्रपटात काम करणे निषिद्ध नाही, हा आदर्श नलिनी यांनी घालून दिला.

– श्रीराम ताम्रकर

## तनुजा

*मुखर्जी, तनुजा शोमू*

**अभिनेत्री**

**२३ सप्टेंबर १९४३**



लावण्याचे वरदान लाभलेली, अभिनयकुशल, प्रख्यात अभिनेत्री शोभना समर्थ आणि जर्मनीत दिग्दर्शनाचे धडे घेतलेले चित्रपट दिग्दर्शक, कवी कुमारसेन समर्थ यांची मुलगी तनुजा. आई शोभना आणि बहीण नूतन यांच्याप्रमाणेच चित्रपटक्षेत्रातला अभिनयाचा वारसा समर्थपणे पुढे नेत तनुजा यांनीही अनेकानेक चित्रपटांद्वारे रसिकांच्या मनावर आपल्या नावाची स्वतंत्र मोहोर उमटवली. नैसर्गिक उत्स्फूर्त अभिनय अंगी असलेल्या तनुजा यांचा जन्म मुंबईमध्ये चेंबूर येथे झाला. त्यांना चार भावंडे होती. त्यातील अभिनेत्री नूतन आणि चतुरा या त्यांच्या बहिणी. तनुजा यांनी पाचव्या-सहाव्या वर्षीच बालकलाकार म्हणून चित्रपटसृष्टीत पहिले पाऊल टाकले. नूतन आणि तनुजा यांचे चित्रपटसृष्टीत पदार्पण व्हावे, या उद्देशाने शोभना समर्थ यांनी अनुक्रमे 'हमारी बेटी' (१९५०) आणि 'छबिली' (१९६०) या चित्रपटांची निर्मिती केली होती. 'छबिली' हा तनुजा यांना स्वतंत्र ब्रेक मिळवून देणारा चित्रपट असला, तरी


‘झाकोळ’ या चित्रपटात तनुजा

त्यांनी त्यापूर्वी १० वर्षे आधी ‘हमारी बेटी’ या चित्रपटात नूतनच्या छोट्या बहिणीची भूमिका केली होती. तसेच ‘अंबर’ या चित्रपटातून ती लहानपणीची नर्गिस म्हणूनही प्रेक्षकांना दिसली होती.

त्यानंतर तनुजा यांना शिक्षणासाठी स्वित्झर्लंड येथे पाठवण्यात आले. तिथून शिक्षण घेऊन मुंबईला परतल्यावर ‘छबिली’ या चित्रपटाद्वारे त्यांची या क्षेत्रातली खरी कारकिर्द सुरू झाली. १९६० ते २००३ अशा दीर्घ वाटचालीत त्यांनी हिंदीबरोबरच मराठी, बंगाली, भोजपुरी, पंजाबी, गुजराती अशा अनेक भाषांमधले बरेच चित्रपट केले. नायिका, सहनायिका इथपासून चरित्र अभिनेत्रीपर्यंत अनेक व्यक्तिरेखा त्यांनी समर्थपणे रंगवल्या.

‘बहारे फीर भी आयेंगी’, ‘जीने की राह’, ‘पैसा या प्यार’, ‘हाथी मेरे साथी’, ‘दूर का राही’, ‘मेरे जीवन साथी’, ‘दो चोर’, ‘एक बार मुस्कुरादो’, ‘कामचोर’, ‘मेरी दीदी’, ‘आज और कल’, ‘नई उमर की नई सफर’, ‘दादी माँ’, ‘भूत बंगला’, ‘याराना’, ‘अनुभव’, ‘इम्तिहान’, ‘खुद्दार’, ‘पाकिटमार’, ‘जुआरी’, ‘गंगा और गीता’, ‘गुस्ताखी माफ’, ‘अमीर गरीब’, ‘साथिया’, ‘खाकी’, ‘भूत’, ‘ज्वेल थीफ’ असे त्यांचे अनेक गाजलेले हिंदी चित्रपट आजही प्रेक्षकांच्या स्मरणात आहेत. अनेक उत्तम भूमिका साकारणाऱ्या तनुजा यांना अभिनयाचे अनेक धडे दिले ते खऱ्या अर्थाने त्यांचे गुरू असलेले दिग्दर्शक केदार शर्मा यांनी. एक अभिनेत्री म्हणून स्वतःच्या ताकदीविषयी तनुजा यांच्या मनात विश्वास निर्माण केला तो दिग्दर्शक शर्मा यांनीच. त्यांनीच दिग्दर्शित केलेल्या ‘हमारी याद आएगी’ या चित्रपटानें युवा तनुजा यांना ‘छबिली’ नंतर पुन्हा रसिकांसमोर आणले.

आईकडून मराठी मातीशी नाळ जुळलेल्या तनुजा यांनी डॉ. श्रीराम लागू यांनी दिग्दर्शित केलेल्या ‘झाकोळ’ (१९८०) आणि ‘उनाड मैना’ या चित्रपटांत भूमिका करून मराठी प्रेक्षकांनाही आपल्या अभिनयाची अदाकारी दाखवून आनंद दिला. डॉ. श्रीराम लागू, सरला येवलेकर, बालकलाकार उर्मिला मातोंडकर हे झाकोळमध्ये सहकलाकार होते. ‘आज अचानक गाठ पडे’ हे ‘झाकोळ’मधले कवी अनिलांचे गीतही अत्यंत लोकप्रिय आहे. सुषमा शिरोमणी यांच्या ‘गुलछडी’ या चित्रपटातही त्यांनी काम केले. प्र.के. अत्रे यांचे ‘लग्नाची बेडी’ हे नाटक आणि त्यातली ‘रश्मी’ ही व्यक्तिरेखा मराठी रंगभूमीवर गाजलेल्या. कुमार सोहनी यांच्या दिग्दर्शनात या नाटकाचे पुनरागमन झाले आणि त्यात ‘रश्मी’ ही भूमिका साकारली ती तनुजा यांनी. हे नाटक पुन्हा रंगमंचावर आले ते सामाजिक जाणिवांमधून आणि समाजासाठी निधी उभारण्याच्या हेतूने. या प्रयोगांनी बराच निधी जमवून दिला.

आईकडून मराठी, वडिलांकडून बंगाली असलेल्या तनुजा यांनी ‘अ‍ॅन्टोनी फिरंगी’, ‘देयानेया’, ‘तीन भुवनेर प्यारी’, ‘प्रोथोम कदम फूल’, ‘राजकुमारी’ हे बंगालीत केलेले चित्रपट. पैकी ‘देयानेया’, ‘अ‍ॅन्टोनी फिरंगी’ आणि ‘राजकुमारी’ हे त्यांचे चित्रपट सुपरहिट ठरले.

निर्माता-दिग्दर्शक शोमू मुखर्जी यांच्याशी तनुजा यांनी विवाह केला. ‘एक बार मुस्कुरादो’ या चित्रपटाच्या चित्रीकरणादरम्यान सेटवर झालेल्या ओळखीचे रूपांतर पुढे विवाहबंधनात झाले. काजोल आणि तनीषा या त्यांच्या मुलींनीही चित्रपटाच्या क्षेत्रात स्वतःचे नशीब अजमावले. काजोल ही अभिनयकुशल आणि तिच्या काळातली आघाडीची अभिनेत्री. काजोल आणि तनीषा या मुलींच्या जन्मानंतर तनुजा यांनी चित्रपटसृष्टीत पुन्हा पदार्पण केले ते चरित्र भूमिकांमधून. ‘आई नं.१’ (२०००), ‘साथिया’ (२००२), ‘भूत’ (२००३), ‘रूल्स : प्यार का सुपरहिट फॉर्म्युला’ (२००३) हे त्यांचे अलीकडचे चित्रपट आहेत. २०१२ सालच्या ‘सन ऑफ सरदार’ अत्यंत गाजलेल्या चित्रपटातही त्यांनी वृद्ध महिलेची भूमिका केली.

तनुजा यांना १९६९ च्या ‘पैसा या प्यार’ या चित्रपटासाठी ‘सर्वोत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्री’ म्हणून फिल्मफेअरचा पुरस्कार मिळाला. त्यापूर्वी १९६७ सालच्या ‘ज्वेल थीफ’मधील भूमिकेसाठी फिल्मफेअरच्या सर्वोत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्रीच्या पुरस्कारासाठी नामांकन मिळाले होते.

– स्वाती प्रभुमिराशी

## तलगिरी, पांडुरंग

**निर्माता, दिग्दर्शक**

**३१ जानेवारी १९०३ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**

पांडुरंग तलगिरी यांचे शालेय शिक्षण मुंबईतील एल्फिन्स्टन विद्यालयात झाले. त्यानंतर पुढील शिक्षणासाठी त्यांनी सेंट झेवियर्स महाविद्यालयात प्रवेश घेतला. तलगिरी यांचे वडील मुंबई नगरपालिकेत उच्च पदावर होते. ते ललितकलादर्श या नाटक मंडळीचे चाहते होते. कलेची तीच आवड पांडुरंग तलगिरींमध्येही आली होती. त्यामुळे महाविद्यालयीन शिक्षणानंतर त्यांनी मुंबईच्या रॉयल आर्ट स्टुडिओत छाया दिग्दर्शक म्हणून १९२४ मध्ये प्रवेश घेतला. ललितकलादर्श मंडळीने मामा वरेरकर यांचे ‘तुरुंगाच्या दारात’ हे नाटक रंगभूमीवर आणायचे ठरवले. तलगिरींच्या वडिलांनी या नाटकाचा लघुपट तयार करून तो मुंबई-पुण्याच्या दरम्यान धावणाऱ्या डेक्कन क्वीनच्या पँट्री कारमध्ये प्रदर्शित करण्यास सांगितले. अशा प्रकारे चित्रपटाद्वारे नाटकाची जाहिरात करण्याचा हा पहिला प्रसंग होता व तो यशस्वी होऊन नाटक लोकप्रिय झाले.

तलगिरींनी पुढे मामासाहेब वरेरकर आणि नेरुरकर यांच्या मदतीने डेक्कन पिक्चर्स कॉर्पोरेशन ही चित्रपट संस्था काढली. त्याद्वारे ‘पुण्यावर हल्ला’ हा ऐतिहासिक चित्रपट निर्माण केला. मामा वरेरकर यांनी दिग्दर्शित केलेल्या या चित्रपटात चित्रकार केतकर यांनी प्रमुख भूमिका केली होती. तलगिरींच्या संस्थेचा पुढील चित्रपट ‘प्रभावती’ हा नानासाहेब सरपोतदारांनी दिग्दर्शित केला.

१९२५-२६ मध्ये तलगिरी यांनी पुण्यात खडकी येथे युनायटेड पिक्चर्स सिंडिकेट नावाची चित्रपट संस्था काढली. मूकपटांच्या या काळात त्यांनी विष्णुपंत औंधकर, मामा वरेरकर, विठ्ठल सीताराम गुर्जर, न.चिं. केळकर अशा मराठीतील मोठमोठ्या साहित्यिकांच्या कलाकृतींवर चित्रपट (मूकपट) तयार केले.

या चित्रपटांसाठी औंधकर, पार्श्वनाथ आळतेकर, कतनुरकर यांना सर्वप्रथम चित्रपट दिग्दर्शनाची संधी मिळाली. पांडुरंग तलगिरी यांनी स्वत: 'रक्ताचा सूड', 'जिजाबाई', 'खुनी ताज' आणि 'शिवजन्म' असे चित्रपट दिग्दर्शित केले.

बोलपट सुरू झाल्यावर १९३८ मध्ये त्यांनी 'मराठ्याची मुलगी' आणि १९४० मध्ये 'देवयानी' हे दोन बोलपट काढले.

– द.भा. सामंत

## तळवलकर, शरद गणेश
**अभिनेता**
**१ नोव्हेंबर १९१२ – २२ ऑगस्ट २००१**



पु.ल. देशपांडे यांनी शरद तळवलकरांच्या अभिनयाचे मार्मिक वर्णन करून ठेवले आहे. ते म्हणतात, ''अभिनयातील सहजता हा दुर्मीळ गुण शरदमध्ये आहे. आपलं बोलणं विनोदी करायला त्याला कसलीही युक्ती वापरावी लागत नाही. नाटककाराने लिहिलेला संवाद पुरेसा हशा पिकवणारा नाही, या समजुतीने काही विनोदी नट आपली विनोदबुद्धी वापरतात, नको त्या ठिकाणी नको इतके अंगविक्षेप करतात. हशा पिकवण्यासाठी शरदला यापैकी कशाचीच गरज भासली नाही.''

शरद गणेश तळवलकर यांचा जन्म नगर जिल्ह्यातील बोधेगाव येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण पुण्याच्या भावे हायस्कूलमधून झाले. शाळेत असताना ते शिक्षकांच्या नकला हुबेहूब करायचे. १९३५ साली 'रणदुंदुभी' नाटकात शिशुपालाची भूमिका करणारा कलाकार ऐन वेळी अडला आणि शरद तळवलकरांनी आपल्या अभिजात कलागुणांनी त्या भूमिकेत कमालीचा रंग भरला. तेव्हापासून दर वर्षी स्नेहसंमेलनाच्या नाटकात त्यांच्यासाठी आग्रह धरला जाऊ लागला. नटश्रेष्ठ केशवराव दाते यांच्या पाहण्यात त्यातील एक भूमिका आली आणि त्यांच्या 'नाट्य विकास' संस्थेत त्यांनी तळवलकरांना निमंत्रण दिले. नाटकात कामे करणे ही त्या काळात फारशी समाजमान्य गोष्ट नव्हती. वडिलांनी नाटक कंपनीत जाण्यास विरोध केल्यानंतर नाटकाच्या वेडापायी शरद तळवलकरांनी घर सोडले.

अभिनयाबाबत मार्गदर्शन घेण्यासाठी तळवलकर कोल्हापूरला मा. विनायक यांच्या 'हंस पिक्चर्स'मध्ये बाबूराव पेंढारकरांना भेटले. त्यांच्या सल्ल्यानुसार त्यांनी आधी शिक्षण पूर्ण करायचे ठरवून जोडीला अकाऊंटंटची नोकरी पत्करली. महाविद्यालयाच्या नाटकांतूनही त्यांच्या भूमिका प्रेक्षकप्रिय झाल्या. व्यावसायिक नाटकांतून भादव्या, फाल्गुनराव, कामण्णा, तळीराम, धैर्यधर अशा भूमिका शरद तळवलकर करू लागले. १९५२ साली गाजलेल्या 'पेडगावचे शहाणे' आणि 'लाखाची गोष्ट' या राजा परांजपे दिग्दर्शित चित्रपटांत त्यांना छोट्या भूमिका मिळाल्या. तसेच, दत्ता धर्माधिकारी यांच्या 'अखेर जमलं' या चित्रपटात लक्षात राहण्याजोगी भूमिका मिळाली.

१९५५ साली आलेल्या 'करायला गेलो एक' या तुफान विनोदी फार्सने शरद तळवलकरांचे नाव महाराष्ट्रभर केले. तेथून त्यांची यशस्वी वाटचाल सुरू झाली. अभिनयाच्या वेडापायी त्यांनी पुणे विद्यापीठातील नोकरीही सोडली. पुढे राजा गोसावी यांच्याबरोबर 'अवघाची संसार', 'दोन घडीचा डाव' आणि 'याला जीवन ऐसे नाव' हे त्यांचे चित्रपट गाजले. 'रंगल्या रात्री अशा' (१९६२) या चित्रपटात शरद तळवलकरांना आव्हानात्मक भूमिका मिळाली. 'बायको माहेरी जाते' या चित्रपटातील त्यांची विनोदी भूमिकाही

त


'धूमधडाका'मध्ये शरद तळवलकर उजवीकडील



गाजली. अत्यंत सहज आणि उत्स्फूर्त अभिनय हे त्यांचे वैशिष्ट्य होते.

शरद तळवलकरांनी १९५१ साली कारवारला व्यावसायिक रंगभूमीवर 'संशयकल्लोळ'मधील सुभानराव सर्वप्रथम केला. मग 'खडाष्टक'मधील कर्कशराव, 'लग्नाची बेडी'मधील गोकर्ण, अवधूत या व्यक्तिरेखा केल्या. 'अपराध मीच केला'मधील गोके मास्तर, 'दिवा जळू दे सारी रात'मधील पोस्ट मास्तर, या व्यक्तिरेखांबरोबरच 'एकच प्याला', 'भावबंधन', 'घरोघरी हीच बोंब', 'आप्पाजींची सेक्रेटरी' या नाटकांतील त्यांच्या भूमिकाही गाजल्या.

'मुंबईचा जावई' (१९७०), 'धाकटी मेहुणी', 'आली अंगावर', 'नवरे सगळे गाढव' (१९८२), 'चांदणे शिंपीत जा', 'थोरली जाऊ', 'गडबड घोटाळा' आदी चित्रपटांतील त्यांच्या विनोदी भूमिका गाजल्या. 'धूमधडाका'मध्ये शरद तळवलकर आणि लक्ष्मीकांत बेर्डे यांनी रंगवलेला चित्रपटाची कथा सांगण्याचा प्रसंग तर कोण विसरेल? 'एकटी', 'लेक चालली सासरला', 'अष्टविनायक', 'कैवारी' या चित्रपटांतील चरित्र भूमिकाही त्यांनी अजरामर केल्या. 'मी रंगवलेले म्हातारे' आणि 'गुदगुल्या' या त्यांच्या पुस्तकांना राज्य सरकारचा पुरस्कारही मिळाला.

असा हा चतुरस्र कलावंत अखेरपर्यंत रंगभूमीवर कार्यरत राहिला. 'डार्लिंग डार्लिंग', 'सखी शेजारिणी' आदी नाटकांचे प्रयोग सुरू असतानाच त्यांनी अखेरचा श्वास घेतला. विनोदाच्या आणि सहजसुंदर अभिनयाच्या प्रवासाला पूर्णविराम मिळाला.

– अभिजित पेंढारकर

## तळवलकर, स्मिता अविनाश

**अभिनेत्री, दिग्दर्शिका, निर्माती**

**५ सप्टेंबर १९५५**

सह्याद्री वाहिनीवर वृत्तनिवेदिका म्हणून एकेकाळी बातमी सांगणाऱ्या स्मिता अविनाश तळवलकर काही



वर्षांनी ‘अस्मिता चित्र’ या निर्मिती संस्थेद्वारे वेगळ्या प्रवाहातील चित्रपटांची निर्मिती व दिग्दर्शन करण्यात यशस्वी ठरल्या. हा प्रवास केवढा तरी मोठा व वळणावळणाचा.

स्मिता तळवलकर यांचे मूळचे नाव स्मिता सदाशिव गोविलकर. पुण्याच्या हुजूरपागा शाळेत त्या शिकल्या. त्यांनी शालेय वयातच नाटकातून भूमिका करायला सुरुवात केली. त्या वेळी त्या ‘उदय कलाकेंद्र’, ‘कुमार कलाकेंद्र’, ‘राज्य नाट्यस्पर्धा’मधून काम करत असत. रुईया महाविद्यालयामधून तत्त्वज्ञान व मानसशास्त्र घेऊन त्यांनी बी.ए. केले, तर सोफिया महाविद्यालयामध्ये मास कम्युनिकेशनचा व पत्रकारितेचा अभ्यासक्रम पूर्ण केला. अशी भक्कम शैक्षणिक पार्श्वभूमी असणाऱ्या स्मिता यांची संपूर्ण कारकिर्दीतील पावले विचारपूर्वक व अचूक पडली त्यात आश्चर्य नाही. पण योग्य वळणावर अचूक निर्णय घेण्याची त्यांची क्षमताही महत्त्वाची होती. १९७३ साली, म्हणजे वयाच्या अठराव्या वर्षीच स्मिता यांनी अविनाश विष्णू तळवलकर यांच्याशी लग्न केले व त्यानंतर चौफेर वाटचाल सुरू केली. मॉडेलिंग, वृत्तनिवेदिका, नाट्य कलाकार, चित्रपट अभिनेत्री, निर्माती, दिग्दर्शिका, लेखिका, वितरक अशा कितीतरी भूमिकांत त्यांनी स्वत:ला गुरफटून टाकले. ‘छावा’ (१९८३) या नाटकाद्वारे त्या व्यावसायिक नाटकात आल्या. त्यानंतर त्यांनी ‘तू फक्त हो म्हण’, ‘अभिनय’, ‘उंच माझा झोका गं’ अशा बऱ्याच नाटकांतून भूमिका साकारल्या.

सन १९८६ साली दिग्दर्शक मुरलीधर कापडी यांनी ‘तू सौभाग्यवती हो’ या चित्रपटाद्वारे त्यांना चित्रपटात आणले. ‘धाकटी सून’, ‘गडबड घोटाळा’, ‘खट्याळ सासू नाठाळ सून’ इत्यादी मराठी चित्रपटांतून भूमिका

त



साकारताना त्यांनी कात टाकली. आपल्या यशस्वी कारकिर्दीचा विस्तार करताना त्यांनी १९८९ मध्ये ‘अस्मिता चित्र’ ही निर्मिती संस्था सुरू केली आणि अगदी वेगळ्या प्रकारच्या चित्रपटांच्या निर्मितीत पावले टाकली. ‘कळत नकळत’ हा त्यांचा पहिला चित्रपट त्यांना नवी ओळख देणारा ठरला. अस्मिता चित्र व स्मिता तळवलकर काही बौद्धिक खाद्य घेऊनच येणार याची विश्वासनीयता कायम वाढीला लागली, हे विशेष. ‘चौकट राजा’, ‘सवत माझी लाडकी’, ‘तू तिथं मी’, ‘सातच्या आत घरात’, ‘आनंदाचं झाड’ असे चित्रपट निर्माण करताना स्मिता तळवलकर यांनी मराठी चित्रपटसृष्टीत स्वत:चे वेगळे स्थानही निर्माण केले. त्यांनी ‘सवत माझी लाडकी’ या फॅण्टसी चित्रपटाचे दिग्दर्शनही केले. ‘कळत नकळत’ला चार राष्ट्रीय व नऊ राज्य पुरस्कार लाभल्याने स्मिता तळवलकर या नावाभोवतीचे वलय वाढले. त्यांच्या प्रत्येक चित्रपटाने मानाचे पुरस्कार पटकावले आहेत. विशेष म्हणजे स्मिता यांच्या वृत्तपत्रीय लेखनाचे ‘पिंपळपान’ (लोकसत्ता) व ‘जगावेगळी’ (तरुण भारत) असे दोन संग्रहदेखील पुस्तकरूपात प्रसिद्ध झाले आहेत.

– दिलीप ठाकूर

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

त

## तेंडुलकर, प्रिया विजय
**अभिनेत्री**
**१९ ऑक्टोबर १९५४ – १९ सप्टेंबर २००२**

नाटक, सिनेमा, मॉडेलिंग, पंचतारांकित हॉटेलमधील नोकरी, लेखन, दूरदर्शन माध्यमातील कार्यक्रम अशा अनेकविध माध्यमांतून स्वत:ला आजमावत स्वत:ची जागा निर्माण केली ती प्रिया विजय तेंडुलकर यांनी.

प्रिया विजय तेंडुलकर यांचा जन्म मुंबई येथे झाला. ज्येष्ठ नाटककार आणि पटकथाकार विजय तेंडुलकर आणि निर्मला तेंडुलकर यांची मुलगी प्रिया; सुषमा, तनुजा आणि राजा या आपल्या भावंडांसमवेत एका मध्यमवर्गीय कुटुंबात आनंदी आणि समाधानी होती.



जे.जे.स्कूल ऑफ आर्ट्स या कलामहाविद्यालयात पदविकेचे शिक्षण घेत असताना अमृता शेरगील आणि सॉमरसेट अशा ज्येष्ठ कलाकारांचा आदर्श त्यांनी समोर ठेवला होता. पण प्रत्यक्ष अभ्यासामधील मेहनत लक्षात आल्यानंतर, त्याच विचारात असताना एकदा साडीच्या एका जाहिरातीकरता मॉडेल म्हणून त्यांना अचानक विचारणा झाली आणि तेव्हापासून जाहिरातक्षेत्रात त्यांना हळूहळू संधी मिळत गेल्या. याच सुमाराला ‘मुखपृष्ठावरील चेहरा’ म्हणूनही त्यांना प्रसिद्धी मिळाली. फेमिना, ब्यूटिफुल ईव्हज वीकली, धर्मयुग अशा प्रसिद्धीच्या झोतात असलेल्या मासिकांच्या मुखपृष्ठावर प्रिया तेंडुलकर यांचे फोटो जवळजवळ एकाच वेळी छापून आले.

प्रिया तेंडुलकर यांनी १९६९ साली गिरीश कर्नाड यांच्या ‘हयवदन’ या नाटकामधून अभिनयक्षेत्रात पदार्पण केले. त्यांनी या नाटकात कल्पना लाझमींबरोबर एका बाहुलीची भूमिका केली. ‘पिग्मॅलियन’, ‘अँजी’, ‘कन्यादान’, ‘सखाराम बाइंडर’, ‘कमला’ अशा काही नाटकांमधूनही प्रिया तेंडुलकर यांनी भूमिका केल्या. अशा हौशी आणि व्यावसायिक नाटकांबरोबरच हिंदी आणि मराठी चित्रपटांमधूनही त्यांनी निरनिराळ्या भूमिका केल्या. ‘अंकुर’ या १९७२ साली प्रदर्शित झालेल्या श्याम बेनेगल यांच्या पहिल्या वास्तवदर्शी चित्रपटात त्यांनी अनंत नाग यांच्या सोशिक पत्नीची भूमिका साकारली. रंगभूमी, जाहिरात क्षेत्र, दूरदर्शन या माध्यमांमध्ये हिंदी भाषिक कलाकारांबरोबर आणि कलाकृतींशी त्यांनी सहजपणे जुळवून घेतले.

अशोक सराफ, रवींद्र महाजनी, महेश कोठारे या सहकलाकारांबरोबर ‘गोंधळात गोंधळ’ (१९८४), ‘मुंबईचा फौजदार’ (१९८५) अशा काही मराठी चित्रपटांमधूनही त्यांनी काम केले. याशिवाय ‘मिनचिना


'मुंबईचा फौजदार' या चित्रपटात प्रिया तेंडुलकर

ओटा' या कानडी चित्रपटात अनंत नाग यांना तुल्यबळ अशी महत्त्वपूर्ण भूमिका केली. 'पूजा ना फूल' या गुजराती चित्रपटामधली नायिकेची त्यांची भूमिकाही नावाजली गेली.

१९८५ साली बासू चॅटर्जी यांनी दूरदर्शनवरून प्रसारित होणाऱ्या 'रजनी' या साप्ताहिक मालिकेमध्ये प्रिया यांना संधी दिली. या मालिकेच्या अफाट लोकप्रियतेमुळे प्रिया तेंडुलकर हे नाव तेव्हा चर्चेत राहिले. 'रजनी' या भूमिकेमुळे त्यांना स्वतंत्र अशी ओळख मिळाली. याच मालिकेतील सहकलाकार करण राजदान यांची प्रत्यक्ष जीवनातही 'जोडीदार' म्हणून साथ मिळाली. १९८८ साली 'करण राजदान' यांच्याशी त्यांनी विवाह केला. पण अवघ्या सात वर्षांच्या सहजीवनानंतर काही मतभेदानंतर १९९५ मध्ये त्यांचा घटस्फोट झाला.

रजनी मालिकेनंतर गुलजार यांच्या 'स्वयंसिद्धा' या स्त्रीवादी मालिकेतही प्रिया तेंडुलकर यांनी काम केले. 'महानगर', 'हक्के-बक्के', 'किस्से मियाँ बिवी के' अशा काही मालिकांमधील अभिनयासाठीही प्रिया यांचे नाव घेतले जाते.

प्रिया यांनी कथालेखनाद्वारे आणि वर्तमानपत्रातील सदरलेखनाद्वारे वारशाने मिळालेली लेखनकलाही जोपासली. १९९६ साली 'असंही' हा निवडक सदरलेखनाचा संग्रह प्रकाशित झाला. २००० सालापर्यंत त्यांचे 'जन्मलेल्या प्रत्येकासाठी', 'ज्याचा त्याचा प्रश्न' आणि 'जावे तिच्या वंशा' हे तीन कथासंग्रह प्रसिद्ध झाले. या कथासंग्रहातून माणसांच्या आयुष्याकडे, विशेषत: स्त्रियांच्या आयुष्याकडे पाहाण्याचा स्वतंत्र आणि व्यापक दृष्टिकोन दिसतो. कधी संवेदनशील, कधी

त

उपहासात्मक तर कधी चिंतनशील लेखन करणारी मनस्वी लेखिका म्हणून प्रिया तेंडुलकर यांचा आवर्जून उल्लेख केला जातो. सुरुवातीच्या काळात स्वत:चा मार्ग शोधत असताना हवाईसुंदरी म्हणून केलेली नोकरीने, तसेच रिसेप्शनिस्ट म्हणून एका पंचतारांकित हॉटेलमध्ये केलेल्या नोकरीने त्यांना अनुभवसमृद्ध केले. जगाची ओळख करून देणारे स्वानुभव त्यांनी 'पंचतारांकित' या चरित्रवजा पुस्तकात अतिशय सहजसोप्या व ओघवत्या शैलीत मांडले आहेत. बहुआयामी व्यक्तिमत्त्व लाभलेल्या प्रिया तेंडुलकर यांच्या लिखाणाचा ठसा कथालेखनातही उमटला आहे. टाईम्स ऑफ इंडिया या इंग्रजी दैनिकाच्या पुरवणीमध्ये 'फर्स्ट पर्सन' या शीर्षकाने जुलै २००० ते मार्च २००१ या काळात त्यांनी सदर लिहिले. हे सदरलेखनही पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले.

खाजगी दूरचित्रवाहिनीवरून प्रसारित झालेल्या 'प्रिया तेंडुलकर टॉक शो' आणि त्यानंतर 'जिम्मेदार कौन' या चर्चात्मक कार्यक्रमाने त्यांना बरीच मान्यता मिळाली. त्यांनी राजकारणाशी आणि समाजकारणाशी संबंधित चालू घडामोडींवर आधारित या कार्यक्रमाची अभ्यासपूर्वक आखणी केली. अतिशय नाजूक तसेच ज्वलंत प्रश्नांवरही चर्चा घडवून आणण्यातही त्यांचे कसब होते. विषयाशी संबंधित असलेल्या तज्ज्ञांना, मान्यवरांना सहभागी करून कार्यक्रमाचे सादरीकरण वरवरचे नाही, तर संशोधनपूर्ण केले. अत्यंत धीटपणे, परखडपणे, आत्मविश्वासाने केलेल्या सादरीकरणाने हा कार्यक्रम लोकप्रिय झाला. त्याचे साठपेक्षा जास्त भाग प्रसारित झाले. या कार्यक्रमाने काही वेळा त्या वादाच्या भोवऱ्यातही अडकल्या, पण तरीही नेटाने त्यांनी आपले काम सुरू ठेवले.

आयुष्याची शेवटची काही वर्षे प्रिया तेंडुलकर यांना कर्करोगाने ग्रासले होते. वयाच्या सत्तेचाळिसाव्या वर्षी रात्री झोपेतच त्यांचे हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले. एका गुणी अभिनेत्रीने, लेखिकेने अल्पायुष्यातच कलाजगताचा निरोप घेतला.

– नेहा वैशंपायन

## तेंडुलकर, विजय धोंडोपंत

**पटकथा-संवाद लेखक**

**६ जानेवारी १९२८ – १९ मे २००८**

**☞ मुख्य नोंद – साहित्य खंड**



विजय तेंडुलकर नाट्य व्यवसायात प्रस्थापित झाल्यावर त्यांनी चित्रपट-पटकथा लेखनाकडे आपला मोर्चा वळवला. त्यामुळे त्यांच्या पटकथा लेखनाकडे फारसे लक्ष गेले नाही. त्यांनी नाटक स्वत:साठी लिहिले आणि चित्रपट अर्थार्जनासाठी, असे एका मुलाखतीत सांगितल्यामुळे कदाचित मराठी अभिजनांनी त्यांच्या पटकथा लेखनाकडे दुर्लक्ष केले असावे. वस्तुत: ग.दि. माडगूळकरांनंतर विजय तेंडुलकर हा समर्थ पटकथाकार चित्रपटाला लाभला. मराठीत पटकथा लेखन करण्याऱ्या लेखकांची यादी डोळ्यासमोर आणली तर त्यात फक्त विजय तेंडुलकर एकमेव पटकथा लेखक असे आहेत, ज्यांना चित्रपट हे प्रादेशिक माध्यम नसून वैश्विक माध्यम आहे, याची जाणीव होती. आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांना विजय तेंडुलकर हजेरी लावीत आणि जगातील उत्तम चित्रपटांचा आस्वाद घेत असत. लेखक म्हणून वाढत्या वयात चित्रपटावर तेंडुलकरांची जडणघडण पोसली गेली हे कोणाला सांगितले तर खरे वाटणार नाही, इतका 'नाटककार' म्हणून त्यांच्यावर शिक्का बसला आहे.

तेंडुलकर १२/१५ वर्षांचे असताना, म्हणजे तीसच्या दशकात 'बोल'पट आल्यामुळे नाटक पार कोसळले होते. त्या काळात 'माणूस', 'कुंकू', 'ज्ञानेश्वर', 'तुकाराम' इ. प्रभातच्या चित्रपटांनी लेखक म्हणून त्यांची जडणघडण झाली. एका मुलाखतीत स्वत: तेंडुलकरांनीच याची कबुली दिलेली आहे. दैनिकात काम करत असताना त्यांनी नाटके लिहिली आणि हॉलिवूडचे चित्रपट पाहून पटकथा लेखनाचा अभ्यास

केला. दै. मराठात रविवारची पुरवणी संपादित करत असतानाच 'मराठा'चे इंग्रजी चित्रपटाचे दर आठवड्याला ते सदर लिहीत असत. त्या निमित्त त्यांनी असंख्य हॉलिवूड चित्रपट पाहिले.

तेंडुलकरांची पहिली पटकथा हिंदी होती, 'प्रार्थना'. वसंत जोगळेकर त्याचे दिग्दर्शक होते. १९७१ साली त्यांनी आपल्याच 'शांतता, कोर्ट चालू आहे' या नाटकावरून त्याच नावाचा चित्रपट लिहिला. त्या वेळी तरुण असलेले सत्यदेव दुबे आणि गोविंद निहलानी हे त्याचे दिग्दर्शक होते. मराठीतला हा पहिला समांतर चित्रपट. पण तमाशा चित्रपटात गर्क असलेल्या मराठी प्रेक्षकांनी या चित्रपटाचे थंड स्वागत केले.

तेंडुलकरांची पहिली यशस्वी पटकथा म्हणजे 'सामना'. डॉ. जब्बार पटेल यांनी हा चित्रपट दिग्दर्शित केला होता. निळू फुले आणि डॉ. श्रीराम लागू यांच्या अभिनयाची जुगलबंदी समोर ठेवून तेंडुलकर यांनी तो लिहिला. एका साखरसम्राटाची ही कथा होती. तोपर्यंत मराठी साहित्यातही साखरसम्राटावर कादंबरी लिहिली गेली नव्हती. तेंडुलकर यांनी या साखरसम्राटाला खलनायक बनवले नाही. १९७६ च्या बर्लिन महोत्सवात या चित्रपटाने भारताचे प्रतिनिधित्व केले. तेंडुलकर यांनी जब्बार पटेलांसाठी त्यापाठोपाठ 'सिंहासन' आणि 'उंबरठा' हे उत्कृष्ट मराठी चित्रपट लिहिले. याच काळात श्याम बेनेगल यांच्यासाठी 'निशांत' व 'मंथन' हे दोन हिंदी चित्रपट लिहिले. 'मंथन'साठी विजय तेंडुलकर यांना सर्वोत्कृष्ट पटकथेचे राष्ट्रीय पारितोषिक मिळाले.

'मानवत खून खटल्यावर' त्यांनी अमोल पालेकरांसाठी 'आक्रीत' हा चित्रपट लिहिला. फ्रान्सच्या नाण्टस महोत्सवामध्ये या चित्रपटालाही उत्कृष्ट चित्रपटाचा पुरस्कार मिळाला. नंतर त्यांनी गोविंद निहलानींसाठी 'आक्रोश' लिहिला. या चित्रपटाला भारताच्या आंतरराष्ट्रीय महोत्सवात सर्वोत्कृष्ट चित्रपटाचे सुवर्णमयूर पारितोषिक मिळाले आणि श्री.दा. पानवलकरांच्या लघुकथेवरून गोविंद निहलानींसाठी 'अर्धसत्य' लिहिला. हा चित्रपट कमालीचा लोकप्रिय झाला. राज कपूर यांना 'अर्धसत्य' एवढा आवडला की त्यांनी पुढचा चित्रपट लिहायला तेंडुलकरांना निमंत्रण पाठवले. पैशासाठी चित्रपट लिहितो असे म्हणणाऱ्या तेंडुलकरांनी हे निमंत्रण साभार नाकारले. कोणता विषय नाटकासाठी घ्यायचा आणि कोणता चित्रपटासाठी घ्यायचा याची अचूक जाण तेंडुलकरांना होती. 'प्रतिमा' माध्यमावर त्यांची हुकमत होती.

तेंडुलकरांचे निधन झाले, तेव्हा 'नाटककार तेंडुलकर गेले' अशी वार्ता छापून आली. वास्तविक ते नाटककार म्हणून जेवढे श्रेष्ठ होते त्याहून अधिक पटकथाकार म्हणून श्रेष्ठ होते. पण चित्रपट हे दिग्दर्शकाचे माध्यम असल्याने तेंडुलकरांकडे म्हणावे तसे लक्ष गेले नाही.

– सुधीर नांदगावकर



## तोरणे, कमलाकर विष्णू

**निर्माते, दिग्दर्शक**

**१२ नोव्हेंबर १९२५ – ९ एप्रिल १९९०**



कमलाकर विष्णू तोरणे यांचा जन्म बेळगाव येथे झाला. पण त्यांचे मूळ घराणे कोकणातील वेंगुर्ला येथील. लहानपणी डॉक्टर व्हायचे ठरवलेले असल्यामुळे त्यांनी बी.एस्सी.ची पदवी मिळवली. परंतु चित्रपट व कला यांवर प्रेम असल्यामुळे त्यांनी चित्रपट क्षेत्रात प्रवेश केला. भालजी पेंढारकर हे त्यांचे गुरू. 'महारथी कर्ण' या चित्रपटात त्यांनी अभिनयही केला होता. 'हिरवा चुडा' हा त्यांनी दिग्दर्शित केलेला पहिला चित्रपट.

१९६६ मध्ये कमलाकर तोरणे यांनी पद्मा चव्हाण या अभिनेत्रीसोबत विवाह केला. १९७५ मध्ये त्यांनी 'प्रेम चित्र' नावाची स्वत:ची संस्था स्थापन केली. चित्रपट निर्माता व दिग्दर्शक म्हणून त्यांनी 'आम्ही जातो आमच्या गावा' हा पहिला चित्रपट काढला. या संस्थेमार्फत त्यांनी रवींद्र महाजनी, महेश कोठारे,




लक्ष्मीकांत बेर्डे, रुही बेर्डे यांसारख्या कलाकारांना चित्रपटात काम करण्याची संधी दिली.

‘थोरली जाऊ’, ‘बाळा गाऊ कशी अंगाई’, ‘भैरू पैलवान की जय’, ‘आई पाहिजे’, ‘आम्ही दोघे राजा राणी’, ‘आराम हराम आहे’, ‘लाखात अशी देखणी’ हे चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केले.कौटुंबिक कथानक, भावस्पर्शी प्रसंगी, उत्तम संगीत आणि कलाकारांकडून दर्जेदार अभिनय काढून घेणारे दिग्दर्शक अशी त्यांची ओळख होती.

तोरणे यांच्या ‘आम्ही जातो आमुच्या गावा’ (१९६८), ‘थोरली जाऊ’ (१९८२) या चित्रपटांना उत्कृष्ट चित्रपटांचे पुरस्कार लाभले. तसेच ‘बाळा गाऊ कशी अंगाई’ आणि ‘भैरू पैलवान की जय’ या चित्रपटांसाठी १९७६ आणि १९७७ अशी लागोपाठ दोन वर्षे महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट चित्रपटाचा पुरस्कार मिळाला होता. दूरदर्शनची पहिली मालिका ‘नस्ती आफत’ ही कमलाकर तोरणे यांनी काढलेली होती. हिंदीत दिग्दर्शक म्हणून पदार्पण करत असताना अचानक मेंदूत रक्तस्राव होऊन त्यांचा मृत्यू झाला.

– जयश्री बोकील

## तोरणे, रामचंद्र गोपाळ

*तोरणे, दादासाहेब*

**निर्माता, दिग्दर्शक, वितरक**

**१३ एप्रिल १८८० – १९ जानेवारी १९६०**



दादासाहेब तोरणे या नावाने चित्रपटक्षेत्रात परिचित असणाऱ्या रामचंद्र गोपाळ तोरणे यांचा जन्म सिंधुदुर्ग जिल्ह्यातील सुकुलवाडी येथे झाला. तेथेच शालेय शिक्षण झाल्यावर नोकरीसाठी ते मुंबईला आले. 'ग्रीव्हज कॉटन' या युरोपियन कंपनीत नोकरी करत असताना ते नाटक पाहण्याचा आपला छंदही पुरा करीत. त्याच सुमारास युरोपातून आपल्याकडे मूकपट येऊ लागले. ते चित्रपट पाहून आपणही चित्रपट बनवावे असे त्यांनी ठरवले.

नानूभाई चित्रे आणि कीर्तीकर यांच्या मदतीने तोरणे यांनी १८ मे १९१२ रोजी मुंबईच्या कॉरोनेशन चित्रपटगृहात 'पुंडलिक' हा चित्रपट प्रदर्शित केला. फाळके यांच्या 'राजा हरिश्चंद्र' या चित्रपटाअगोदर एक वर्ष हा चित्रपट झळकला. तो दोन आठवडे दाखवला गेला. परंतु जॉन्सन नामक एका युरोपियन माणसाने या चित्रपटाचे छायाचित्रण केल्याने या चित्रपटाला पहिल्या भारतीय चित्रपटाचा मान मिळू शकला नाही.

थोड्याच दिवसात त्यांची कराची येथे बदली झाली. तेथे बाबूराव पै यांच्याशी त्यांची ओळख झाली. दोघांनी मिळून तेथे महाराष्ट्र फिल्म कंपनीच्या वितरणाची जबाबदारी स्वीकारली. त्यामुळे पंजाब, सिंध व वायव्य सरहद्द प्रांतात महाराष्ट्र फिल्म कंपनीचे चित्रपट झळकू लागले. हा व्यवसाय किफायतीचा ठरल्याने तोरणे यांनी ग्रीव्हज कॉटन कंपनीतील नोकरी सोडून बाबूराव पैंसह मुंबई गाठली. तेथे त्या दोघांनी 'प्रभात' व 'आर्यन' या दोन फिल्म कंपन्यांच्या वितरणाची जबाबदारी घेतली. त्याचबरोबर छायाचित्रण आणि त्याला लागणारी सामग्री पुरवण्यासाठी 'मुव्ही कॅमेरा' नावाची कंपनी स्थापन केली. १९२९-३०च्या सुमारास परदेशातून बोलपट यायला लागल्यावर या दोघांनी अमेरिकेतील ऑडिओ केमिक्स या ध्वनिमुद्रण यंत्राची एजन्सी मिळवली. याच ऑडिओ केमिक्स ध्वनिमुद्रण यंत्राच्या साहाय्याने प्रभातचा 'अयोध्येचा राजा' हा चित्रपट निर्माण झाला. प्रभातबरोबरच त्यांनी रणजित फिल्म कंपनी व वाडिया मुव्हीटोन या कंपन्यांनाही ध्वनिमुद्रणाचे यंत्र पुरवले.

नंतर तोरणे यांनी स्वत:ची चित्रपट संस्था स्थापून चित्रपट बनवण्यास सुरुवात केली. दोराबजी कोल्टा यांच्या भागीदारीत त्यांनी नानासाहेब सरपोतदारांचा आर्यन स्टुडिओ विकत घेतला व 'सरस्वती सिनेटोन' असे त्याचे नामकरण केले. पुण्यातील हा पहिला बोलका स्टुडिओ. सरस्वती सिनेटोनतर्फे तोरणे यांनी 'श्यामसुंदर' हा मराठी व हिंदी या दोन्ही भाषेतील बोलपट बनवला. मुंबईच्या वेस्ट एंड चित्रपटगृहात हा बोलपट २७ आठवडे चालला. 'श्यामसुंदर' हा रौप्यमहोत्सव साजरा करणारा भारतातील पहिला चित्रपट ठरला.

बाबूराव पै यांच्यासह तोरणे यांनी फेमस पिक्चर्स ही वितरण संस्थाही सुरू केली. या संस्थेकडे प्रभातचे सर्व चित्रपट वितरणासाठी असत. स्वत: तोरणे यांच्या चित्रपट संस्थेने 'भक्त प्रल्हाद', 'औट घटकेचा राजा', 'सावित्री', 'ठकसेन राजपूत' असे चित्रपट निर्मिले.

तोरणे यांनी शाहू मोडक, शांता आपटे, सुधा आपटे, दादासाहेब साळवी, जयशंकर दानवे इत्यादी कलाकारांना पडद्यावर सर्वप्रथम संधी दिली. तसेच मामा वरेरकर, मो.ग. रांगणेकर यांसारख्या साहित्यिकांना चित्रपटसृष्टीशी जोडले.

दुसऱ्या महायुद्धानंतर चित्रपटसृष्टीत मंदीचा काळ आला आणि त्यानंतर बरेचसे भांडवलदार या क्षेत्राकडे वळल्याने फ्रीलान्सिंगचा व्यवहार सुरू झाला. दादासाहेब तोरणे यांनी त्यानंतर 'माझी लाडकी' हा शेवटचा चित्रपट काढून डब्ल्यू.झेड. अहमद यांना आपली चित्रपट संस्था विकून चित्रपटसंन्यास घेतला.

– द.भा. सामंत

* * *

त

# द





## दत्त, यशवंत

*महाडिक, यशवंत दत्तात्रेय*

**अभिनेता**

**७ नोव्हेंबर १९४५ – ११ नोव्हेंबर १९९७**



आपल्याच कारकिर्दीच्या निरोपाचे दृश्य चित्रित करावे आणि दुसऱ्याच दिवशी आयुष्यालाही पूर्णविराम मिळावा, असे एखाद्या कलाकाराच्या बाबतीत घडणे, हा दैवदुर्विलासच. यशवंत दत्त यांचा अकाली मृत्यू सर्वांना असाच चटका लावून गेला.

यशवंत दत्त यांचे मूळ नाव यशवंत दत्तात्रेय महाडिक. त्यांचे वडील दत्तात्रेय महाडिक उर्फ मा. छोटू हे प्रसिद्ध कलावंत. 'प्रभात' चित्रपट संस्थेत साहाय्यक दिग्दर्शक आणि कलाकारांचे प्रशिक्षक म्हणूनही ते काम करायचे. यशवंत यांच्या आई वत्सलाबाईही चित्रपटसृष्टीत होत्या. पण त्या काळची चित्रपटसृष्टीची अवस्था आणि आर्थिक टक्केटोणपे यांची कल्पना असल्याने, आपल्या मुलाने चित्रपटात येऊ नये, असेच त्यांना वाटत होते. तरीही आईवडिलांकडून मिळालेले बाळकडू यशवंत यांना स्वस्थ बसू देईना. पुण्यात जन्मलेल्या यशवंत यांचे शिक्षण टिळक रस्त्यावरील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये झाले. सुरुवातीपासूनच वेगवेगळ्या कलाकारांचे, भोवतालच्या माणसांचे निरीक्षण करून त्यांच्या हुबेहूब नकला करण्याची कला त्यांनी अवगत केली होती.

वयाच्या पाचव्या वर्षी 'परीराणी आणि निरुपमा' या बालचित्रपटात त्यांनी काम केले होते. पुण्यातील राजाभाऊ नातू यांच्या महाराष्ट्र कलोपासक मंडळ या हौशी नाट्यसंस्थेत ते सहभागी झाले होते.

आईवडिलांच्या इच्छेनुसार यशवंत 'फिलिप्स'मध्ये नोकरी करू लागले. पण कलेची आवड त्यांना स्वस्थ बसू देईना. तेव्हा तेथील कामगार नाट्य स्पर्धांमध्ये भाग घेण्याचे त्यांचे 'उद्योग' सुरू झाले. मधुकर तोरडमल यांच्या 'भोवरा' या नाटकात त्या वेळी त्यांनी काम केले. त्यांनी अनेक कामगार नाट्यस्पर्धा गाजवल्या. 'नाट्यमंदार' या संस्थेत अभिनयाचीच नोकरी मिळाल्यानंतर 'फिलिप्स'मधली नोकरी त्यांनी सोडून दिली. तेंडुलकरांच्या भल्याकाकामध्ये त्यांनी नाट्यमंदारच्या नाटकांत भूमिका केली. 'गरिबी हटाव' हे त्यांचे पहिले व्यावसायिक नाटक. त्यांना दत्ता भट हे गुरू म्हणून लाभले. मधुसूदन कालेलकरांचे 'नाथ हा माझा' हे त्यांचे पहिले गाजलेले नाटक. त्यातील सुभानराव ड्रायव्हरच्या त्यांच्या भूमिकेचे खूप कौतुक झाले. 'नाट्यमंदार'च्याच 'चांदणे शिंपीत जा' या नाटकातील त्यांचे काम सुलोचनाबाईंना फार आवडले. त्यामुळे त्यांनी आग्रह धरून दत्ता माने यांच्या 'मामा भाचे' या चित्रपटात यशवंत दत्त यांना काम मिळवून दिले. तेव्हापासून चित्रपट क्षेत्रातील त्यांची घोडदौड सुरू झाली. 'करावं तसं भरावं', 'चांडाळ चौकडी', 'भैरू पैलवान की जय' आदी चित्रपटांतून त्यांनी काम केले. 'भैरू पैलवान की जय'मधून त्यांच्यातील विनोदी अभिनेता आणि नकलाकार प्रेक्षकांसमोर आला. 'शापित' या राजदत्त यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटातील भूमिकेसाठी यशवंत दत्त यांना उत्कृष्ट अभिनेत्याचा 'शिवाजी गणेशन' पुरस्कारही मिळाला. 'चानी', 'आहुती' यासारख्या चित्रपटांत थंड डोक्याचा

खलनायक आणि 'पुढचं पाऊल'मधील गरीब, दीनवाणा सासराही त्यांनी त्याच समरसतेने रंगवला. यशवंत दत्त यांनी साकारलेला 'नटसम्राट'ही दत्ता भट किंवा श्रीराम लागू यांच्याएवढाच गाजला. 'क्रोध' या हिंदी चित्रपटात प्रमुख खलनायकाची भूमिकाही त्यांनी केली.

'जंटलमन', 'शिवम', 'दूरी' आदी हिंदी चित्रपटांतही यशवंत दत्त यांच्या महत्त्वाच्या भूमिका होत्या. 'धरम' या चित्रपटात प्राण, डॅनी डेन्झोप्पा यासारखे कलाकार असतानाही यशवंत दत्त यांनी मुख्य खलनायकाची भूमिका केली, पण तो चित्रपट प्रदर्शित न झाल्याने हिंदी चित्रपटसृष्टीत या मराठी कलाकाराचे कर्तृत्व सिद्ध होण्याची एक मोठी संधी त्यांच्या हातून गेली. यशवंत दत्त उत्तम नकलाकार, कवी, गायकही होते. गप्पांच्या मैफली रंगवण्यातही त्यांचा हातखंडा होता. शिक्षण अर्धवट सोडले असले, तरी मराठी भाषेवर त्यांचे विलक्षण प्रभुत्व होते.

'चांडाळ चौकडी', 'चानी', 'चंद्र आहे साक्षीला', 'सासुरवाशीण', 'आपली माणसं', 'फटाकडी', 'हीच

**'शापित' चित्रपटातील दृश्यात यशवंत दत्त**



द

खरी दौलत', 'सुगंधी कट्टा', 'पैज', 'सरकारनामा', 'भैरू पैलवान की जय', 'गनिमी कावा', 'माझं घर माझा संसार', 'शापित', 'उनाड मैना', 'निष्पाप', 'दगा', 'झंझावत' या चित्रपटांमध्ये त्यांनी काम केले.

'देवाजीने करुणा केली', 'गगनभेदी', 'कालचक्र', 'प्रेमाच्या गावा जावे', 'श्री तशी सौ', 'तू आहेस तरी कोण?', 'वादळ माणसाळतंय', 'आमच्या या घरात', 'वेडा वृंदावन' या नाटकांत त्यांनी केलेल्या कामांमुळे ही नाटके विलक्षण गाजली. 'सरकारनामा' या चित्रपटातील पाताळयंत्री मुख्यमंत्र्याची भूमिका त्यांनी रंगवली होती. या चित्रपटाचा शेवट अधिक प्रभावी करण्यासाठी मुख्यमंत्र्यांना शिक्षा झाल्याचे एक दृश्य चित्रपट प्रदर्शित झाल्यानंतर चित्रित करण्यात आले. त्याचे चित्रीकरण पूर्ण करून यशवंत दत्त यांनी रात्री 'लाख मोलाचा शब्द' हा एकपात्री प्रयोगही मुंबईत केला. दुसऱ्या दिवशी पहाटे त्यांच्या छातीत जी कळ आली, ती या हरहुन्नरी कलाकाराला बरोबर घेऊनच गेली.

संत तुकारामांवर एकपात्री प्रयोग करण्याची तयारी त्यांनी सुरू केली होती, ती इच्छा अपूर्णच राहिली.

– अभिजित पेंढारकर

द

## दत्ता केशव

*कुलकर्णी, दत्ता केशव*

**दिग्दर्शक, लेखक**

**३० जून १९३२**



लेखक – दिग्दर्शक दत्ता केशव हे चित्रपटसृष्टीतील महत्त्वाचे नाव आहे. दत्ता धर्माधिकारींचे साहाय्यक म्हणून त्यांनी चित्रपटसृष्टीत प्रवेश केला आणि जवळपास ३०–३५ वर्षे चित्रपट क्षेत्रात स्वतंत्र वाट निवडली. त्यांच्या आईचे नाव शांताबाई, वडील केशव कुलकर्णी बेळगावला रेशीम कारखान्यात काम करत होते. त्यामुळे दत्ता यांचे प्राथमिक शिक्षण बेळगावलाच झाले. पुढे मात्र मोठा भाऊ वसंत कुलकर्णी यांनी त्यांना पुढील शिक्षणासाठी पुण्याला बोलावून घेतले. त्यामुळे दत्ता केशव यांचे पुढील शिक्षण पुण्याला भावे स्कूलमध्ये झाले. दरम्यान वडील आजारपणात मृत्यू पावले आणि त्यांचे शिक्षण संपुष्टात आले.

दिवसभरात लाँड्रीत इस्त्री करण्यापासून दुकानात विक्रेता म्हणून काम करण्यासारखी अनेक छोटी कामे ते करत असत. पुण्याच्या जोशी बुक सेलर्सकडे त्यांनी विक्रेता म्हणून नोकरी केली आणि दैवयोगाने १९६६ साली जोशी यांनी दत्ता केशव कुलकर्णी यांनी लिहिलेले पहिले पुस्तक छापले, ते 'दैव लाभला चिंतामणी' हे नाटक. या काळात कृषी महाविद्यालयात फळ, भाजी विक्रेता म्हणून ते काम करत होते. त्यांचा मोठा भाऊ वसंत कुलकर्णी प्र.के. अत्रे यांच्या नाटकात काम करत असत. ते गायकही होते. शिवाय या काळात घरातल्या वातावरणामुळे नामवंत साहित्यिक प्र.के. अत्रे, ग.ल. ठोकळ, य.गो. जोशी, पं. महादेवशास्त्री जोशी, दत्त रघुनाथ कवठेकर यांच्याशी दत्ता केशव यांच्या ओळखी होत गेल्या. १९५० साली दत्ता धर्माधिकारी यांच्या 'आल्हाद चित्र' संस्थेत साहाय्यक दिग्दर्शक म्हणून त्यांनी कामाला सुरुवात केली. दत्ता धर्माधिकारी दिग्दर्शित 'बाळा जो जो रे', 'चिमणी पाखरं', 'महात्मा', 'सुहागन', 'सावधान' अशा अनेक चित्रपटांना साहाय्यक दिग्दर्शक म्हणून ते लाभले. दत्ता धर्माधिकारी यांच्या 'अखेर जमलं' या चित्रपटाचे लेखन मधुसूदन कालेलकर यांनी केले होते.

या काळात दत्ता केशव यांची मधुसूदन कालेलकरांबरोबर ओळख झाली आणि पुढच्या काळात कालेलकरांनी लिहिलेल्या 'आम्ही जातो अमुच्या गावा', 'एक धागा सुखाचा', 'क्षण आला भाग्याचा' या चित्रपटाचे साहाय्यक लेखक म्हणून काम केले. काही काळ हिंदी चित्रपटसृष्टीतले लेखक दिग्दर्शक पी.एल. संतोषी यांच्याबरोबरही लेखन, दिग्दर्शन साहाय्यक म्हणून त्यांनी काम केले. तसेच पं. मुखराम शर्मा

यांच्याकडेही साहाय्यक लेखक म्हणून काही चित्रपटांसाठी काम केले.

दत्ता केशव यांनी स्वतंत्रपणे दिग्दर्शित केलेला पहिला चित्रपट ‘अति शहाणा त्याचा.’ (१९६७) त्या वेळेस हा चित्रपट मराठी आणि भोजपुरी भाषेत करण्यात आला होता. पुढे ‘बायांनो नवरे सांभाळा’ हा चित्रपट १९७४-७५ साली प्रदर्शित झाला. चित्रपटाचे लेखन आणि दिग्दर्शन दत्ता केशव यांचे होते. ‘पिंजरा’नंतरचा हा मराठी रंगीत चित्रपट होता. चित्रपटाच्या आर्थिक गणिताचा विचार करत अनेक मान्यवर दिग्दर्शक, निर्माते रंगीत चित्रपटाच्या वाटेला जात नसत. (अपवाद व्ही. शांताराम यांचा) पण दत्ता केशव यांनी मोठ्या जिद्दीने, योग्य बजेटमध्ये हा चित्रपट काढला. निर्माते होते ना.गो. दातार. मुंबईच्या मेट्रो चित्रपटगृहात हा चित्रपट खूप चालला. चित्रपटाला महाराष्ट्र राज्य शासनाचे दिग्दर्शनाचे दुसरे पारितोषिक मिळाले. या चित्रपटातून जयश्री टी. यांनी प्रथमच नायिका म्हणून भूमिका केली. गिरीश कर्वे यांनाही या चित्रपटासाठी उत्कृष्ट छायाचित्रकार म्हणून पारितोषिक प्राप्त झाले. ‘भिंगरी’, ‘फटाकडी’, ‘मोसंबी नारिंगी’ हे दत्ता केशव लिखित, दिग्दर्शित सर्व चित्रपट सुवर्णमहोत्सवी ठरले.

आपल्या चित्रपट कारकिर्दीत दत्ता केशव यांनी जवळपास ४० चित्रपटांचे लेखन केले, तर २७ चित्रपटांचे दिग्दर्शन केले. ‘थांब लक्ष्मी कुंकू लावते’, ‘गडबड घोटाळा’, ‘आई थोर तुझे उपकार’ हे त्यापैकी त्यांनी लिहिलेले काही चित्रपट. ‘सेनानी साने गुरुजी’ या त्यांनी लिहिलेल्या चित्रपटाला इराण सरकारतर्फे विशेष पारितोषिक मिळाले.

‘धमाल बाबल्या गणप्याची’ हा दत्ता केशव यांच्या कारकिर्दीतला शेवटचा चित्रपट. चित्रपटासाठी कथा, पटकथा, संवाद, दिग्दर्शन अशा बाजू सांभाळताना काही मोजक्या चित्रपटात त्यांनी छोट्या भूमिका केल्या. ‘चिमणी पाखरं’, ‘नन्हे मुन्हे’ या चित्रपटात त्यांनी खलनायक म्हणून काम केले. साधारण ५०-६० चित्रपटांसाठी गीतलेखनही केले. ‘राणीने डाव जिंकला’, ‘सावली प्रेमाची’, ‘दे टाळी’ हे त्यापैकी काही चित्रपट. ‘दैवे लाभला चिंतामणी’ या नाटकात त्यांनी लेखनासह अभिनय केला. ‘माझा कुणा म्हणू मी’, ‘रात्र थोडी सोंगे फार’, ‘घरोघरी मातीच्या चुली’ या नाटकांशिवाय ‘मवाली’ हे झोपडपट्टी या विषयाला वाचा फोडणारे नाटकही त्यांनी लिहिले.

नाटकासाठी त्यांना आचार्य अत्रे पारितोषिक, राम गणेश गडकरी पारितोषिक, गोविंद बल्लाळ देवल पारितोषिक मिळाले. याशिवाय १९६६ ते १९७० या काळात शरद पिळगावकर यांच्या ‘नवरंग’ साप्ताहिकाचे संपादक म्हणून ते काम पाहत होते. या काळात राज कपूर, सुलोचना, दत्ता धर्माधिकारी, पु.ल. देशपांडे, सुधीर फडके, सुबल सरकार, मधुसूदन कालेलकर यांच्याविषयी लिहिलेल्या लेखांचे ‘कलाकोंदणातील हिरे’ हे पुस्तक आता प्रकाशनाच्या वाटेवर आहे. त्यांचे ४ कथासंग्रह यापूर्वीच प्रकाशित झाले आहेत. ‘मृत्यूचा जन्म’, ‘शापित’, ‘ज्वालामुखी’, ‘धवलकीर्ती धर्माधिकारी’, ‘वनवास’ अशा ४ कादंबऱ्याही त्यांनी लिहिल्या आहेत.

याशिवाय ११ धारावाहिक मालिका त्यांनी लिहिल्या आहेत. पटकथा-कथा-संवाद आणि काही गाण्यासह ‘संत तुकाराम’ ही दूरदर्शनवरील मालिकाही त्यांनी लिहिली आहे. ‘रिश्तेकी दीवार’ आणि ‘एक और एक ग्यारा’ या हिंदी चित्रपटाचे लेखन-दिग्दर्शन त्यांनी केले आहे. या चतुरस्र कलाकाराला स्क्रीन रायटर्स असोसिएशनतर्फे बेस्ट स्क्रिप्टिंगसाठी जीवनगौरव पुरस्कार देण्यात आला. महाराष्ट्र शासनातर्फेही चित्रपट दिग्दर्शनातल्या भरीव कामगिरीबद्दल पुरस्कार देऊन त्यांना सन्मानित करण्यात आले आहे. तीन मुले आणि तीन सुना व एक मुलगी असा दत्ता केशव यांचा संपूर्ण परिवारही चित्रपट, नाट्य आणि दूरदर्शन माध्यमांतल्या विविध कलाक्षेत्रात कार्यरत आहे.

– संपादित

**संदर्भ** : १) दत्ता केशव, ‘अपूर्णविराम’, महाजन पब्लिशिंग हाऊस, पुणे; २००७. २) प्रत्यक्ष मुलाखत.

द

## दानवे, जयशंकर ज्ञानेश्वर

**अभिनेता, दिग्दर्शक**

**१ मार्च १९११ - ३ सप्टेंबर १९८६**



जयशंकर ज्ञानेश्वर दानवे मूळचे पुण्याचे. त्यांचा जन्म झाला, त्याच वर्षी पुण्यात प्लेग आला आणि दानवेंचे मातृपितृछत्र हरवले. त्यांच्या काकांनी त्यांचा सांभाळ केला. काकांनी त्यांना कॉन्व्हेंट स्कूलमध्ये घातले. पण दानवेंना अभिनयाची आवड असल्यामुळे, नकला करायच्या या उद्देशाने ११ व्या वर्षी घर सोडून सोहराब मोदींचा भाऊ रुस्तम मोदी यांच्या आर्य सुबोध नाटक मंडळीत ते दाखल झाले. तेथे भालजी पेंढारकर व्यवस्थापक होते. कंपनीचे दिग्दर्शक बेंजामिन हे दानवेंचे नाट्यगुरू. १९३१-३२ साली चित्रपट बोलका झाल्यावर नाटक मंडळी मोडकळीस आली. अनेकांनी त्यांना चित्रपटात जाण्याचा सल्ला दिला. तेव्हा दानवे कोल्हापुरात आले व वणकुद्रे बंधूंच्या सम्राट सिनेटोनमध्ये नायक म्हणून रु. पंचाहत्तर महिना पगारावर नोकरीला राहिले. पण 'स्वर्ग' हा कंपनीचा चित्रपट पूर्ण झालाच नाही.

दानवे शालिनी सिनेटोनमध्ये बाबूराव पेंटरांकडे आले. तेथे पेंटर यांच्या 'उषा', 'सावकारी पाश', 'प्रतिभा' इ. चित्रपटांत त्यांनी भूमिका केल्या. शालिनी सिनेटोनसाठी भालजी पेंढारकरांनी 'संत कान्होपात्रा' दिग्दर्शित केला. त्यात त्यांना खलनायकाची भूमिका मिळाली. नंतर अनेक चित्रपटांतून ते खलनायक झाले.

'शालिनी' बंद पडताच भालजींनी त्यांना पुण्याला दादासाहेब तोरणेंच्या सरस्वती सिनेटोनमध्ये पाठवले. सरस्वतीमध्ये त्यांनी 'राजा गोपीचंद', 'ये सच है' (हिंदी), 'माझी लाडकी', 'नवरदेव', 'देवयानी' इ. चित्रपटांत भूमिका केल्या. १९४२ च्या आसपास सरस्वती सिनेटोन बंद पडली. त्याच वेळी भालजींनी कोल्हापुरात जयप्रभा स्टुडिओ सुरू केला होता. त्यांनी दानवेंना तार करून बोलावून घेतले. बेंजामिन हे दानवेंचे नाट्यगुरू, तर भालजी हे चित्रपटगुरू. तेथे अभिनयाबरोबरच भालजींचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून दानवे काम करू लागले. दानवे अखेरपर्यंत भालजींकडे राहिले. त्यांनी भालजींबरोबर 'बहिर्जी नाईक', 'मीठभाकर', 'छत्रपती शिवाजी' इ. महत्त्वाचे चित्रपट केले. नंतर भालजींनी त्यांना 'जय भवानी' हा चित्रपट दिग्दर्शित करायला दिला. दानवेंनी त्याखेरीज 'फुलपाखरू' व 'ईश्वर' हे चित्रपटही दिग्दर्शित केले. 'गाठ पडली ठका ठका', 'नायकिणीचा सज्जा', 'जावई माझा भला', 'मराठा तितुका मेळवावा', 'आम्ही जातो अमुच्या गावा' इ. ६० मराठी चित्रपटांतून दानवेंनी भूमिका केल्या. प्रभाकर पेंढारकर दिग्दर्शित 'प्रीत तुझी माझी' (१९७५) हा दानवेंचा शेवटचा मराठी चित्रपट. याचबरोबर यांनी १२५ नाटकांतून भूमिका केल्या आणि त्यातली बरीच नाटके दिग्दर्शित केली. कोल्हापूर नगरपालिकेने त्यांचा सत्कारही केला. दानवे यांच्या मृत्यूनंतर 'हिरवी चादर रुपेरी पडदा' हे त्यांचे आत्मचरित्र प्रकाशित झाले.

– सुधीर नांदगांवकर

## दाबके, दत्तात्रेय दामोदर

**दिग्दर्शक, छायाचित्रकार**

**१८८५ - १६ डिसेंबर १९४६**

रत्नागिरी जिल्ह्यातील आसोद हे दत्तात्रेय दामोदर दाबके यांचे मूळ गाव. परंतु त्यांचे वास्तव्य बनारसाला असल्यामुळे त्यांना उर्दू, हिंदी भाषा अवगत होत्या. मॅट्रिकमध्ये असतानाच त्यांना नाटकात भूमिका करायची ओढ लागली. याच काळात त्यांनी उर्दू नाटकांमध्ये कामे केली. नाटकांमध्ये कामे करण्याच्या निमित्ताने ते मुंबईत आले. मुंबईत आल्यावर त्यांना समजले की दादासाहेब फाळके मूकपट काढायच्या खटपटीत आहेत. दाबके नाटकाचा विचार सोडून लगेच फाळकेंना भेटले. फाळकेंनी त्यांची शरीरयष्टी पाहून त्यांना 'राजा हरिश्चंद्र'मध्ये हरिश्चंद्राची भूमिका दिली. परंतु त्यानंतर

फाळके यांच्या लक्षात आले की दाबके यांच्यामध्ये दिग्दर्शनाची क्षमता आहे. त्यामुळे त्यांना साहाय्यक दिग्दर्शक म्हणून नेमले.

दाबकेंनी दिग्दर्शन व छायालेखन या दोन्ही क्षेत्रात फाळकेंच्या हाताखाली पाच वर्षे उमेदवारी केली. नंतर त्यांनी फाळकेंची साथ सोडली. १९२२ मध्ये त्यांनी द्वारकादास संपन यांच्या कोहिनूर फिल्म कंपनीत दिग्दर्शक व छायालेखक म्हणून नोकरी धरली. नट होण्यासाठी दत्तात्रेय दामोदर दाबके चित्रपटात आले, पण उत्तम छायाचित्रकार म्हणून त्यांनी नाव मिळवले. ट्रिक फोटोग्राफी हा त्यांचा हातखंडा विषय ठरला.

– श्रीराम ताम्रकर

## दामले, विष्णू गोविंद

**कलादिग्दर्शक, ध्वनिमुद्रक, निर्माता, दिग्दर्शक**

**१४ ऑक्टोबर १८९२ – ५ जुलै १९४५**



विष्णू गोविंद दामले यांचा जन्म पेण येथे मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यामुळे दामले यांना फारसे शिक्षणही घेता आले नाही. परंतु त्यांना जन्मजातच असलेल्या चित्रकलेच्या आवडीमुळे त्यांच्या वडिलांनी दामले यांना चित्रकलेचे शिक्षण द्यायचे ठरवले. चित्रकलेच्या विषयांत हातखंडा असलेले विष्णुपंत दामले त्या परिक्षेत नापास झाले, तेव्हा वडिलांनी बाबूराव पेंटर आणि आनंदराव पेंटर यांच्या हाताखाली चित्रकलेचे धडे गिरवण्यासाठी दामले यांना कोल्हापूरला पाठवले. त्या वेळेस पेंटर बंधू नाटकाचे पडदे रंगवत आणि दामले त्यांना मदत करत.

पुढे बाबूरावांनी कोल्हापुरात महाराष्ट्र फिल्म कंपनीची स्थापना केली, त्या प्रसंगी दामले महाराष्ट्र फिल्म कंपनीत मदतनीस म्हणून दाखल झाले. तेथे त्यांनी फत्तेलाल यांच्याबरोबरीने बाबूराव पेंटरांच्या १९ चित्रपटांचे छायाचित्रण पार पाडले. त्याच वेळेस १९१९ ते १९२९ या काळात बाबूरावांनी दामले आणि फत्तेलाल यांना स्वतंत्रपणे दिग्दर्शन करण्याची संधी दिली. त्या चित्रपटाचे नाव होते ‘महारथी कर्ण’ (१९२८). हा मूकपट होता. सर्व भारतभर त्याची प्रशंसा झाली आणि हॉलिवूडच्या ‘बेन हर’ या चित्रपटाबरोबर त्याची तुलना केली गेली. या चित्रपटाच्या दिग्दर्शनामुळे दामले यांचा आत्मविश्वास वाढला आणि ‘महाराष्ट्र फिल्म कंपनी’त काही भवितव्य नाही, हे जाणून दामलेंनी फत्तेलाल यांच्यासोबत फिल्म कंपनी काढायचे ठरवले. तेव्हा कोल्हापुरातील एक सराफ सीतारामपंत कुलकर्णी यांनी त्यासाठी भांडवल द्यायचे कबूल केले. १ जून १९२९ रोजी दामले, फत्तेलाल, शांतारामबापू आणि केशवराव धायबर यांनी एकत्रितपणे ‘प्रभात फिल्म कंपनी’ची स्थापना केली. तेव्हा शांताराम दिग्दर्शन व संकलन यांची, तर दामले व फत्तेलाल अन्य जबाबदाऱ्या पार पाडत. प्रभातचे पहिले सहा मूकपट आणि काही बोलपट कोल्हापुरातच तयार झाले. दामले यांनीच ‘अयोध्येचा राजा’ या प्रभातच्या पहिल्या बोलपटाचे ध्वनिमुद्रण पार पाडले. प्रभात १९३३ मध्ये पुण्यात स्थलांतरित झाली. दामले यांनी पुण्यातला स्टुडिओ उभारण्याचे काम केले.

दामले आणि फत्तेलाल यांनी मिळून १९३६ मध्ये ‘संत तुकाराम’ हा बोलपट दिग्दर्शित केला. सर्व भारतभर हा बोलपट झळकला व या बोलपटाने नाव कमावले. हा बोलपट मराठी भाषेत असला तरी भाषेची अडचण कुठेही न येता भारतातील सर्वभाषिक प्रेक्षकांनी त्याला उत्तम दाद दिली.

‘संत तुकाराम’नंतर दामले-फत्तेलाल यांनी ‘संत ज्ञानेश्वर’ (१९४०), ‘गोपाळकृष्ण’ (१९४०) आणि ‘संत सखू’ (१९४१) असे चित्रपट दिग्दर्शित केले. ‘संत तुकाराम’ हा चित्रपट व्हेनिस फिल्म फेस्टिवलला पाठवला होता. त्या प्रसंगी तीन उत्कृष्ट चित्रपटांपैकी एक असा त्याचा सन्मान झाला. ‘संत ज्ञानेश्वर’ला इंग्लिश भाषेतील उपशीर्षक टाकून न्यूयॉर्कमध्ये त्याचे प्रदर्शन करण्यात आले. फ्रॅन्क काप्रासारख्या दिग्गज दिग्दर्शकाने त्या चित्रपटाचे तोंड भरून कौतुक केले.

द





शांतारामबापू प्रभात सोडून बाहेर पडले, त्या प्रसंगी दामले आणि शेख फत्तेलाल हे प्रभातचे स्थान टिकवण्यासाठी खंबीरपणे उभे राहिले. त्यांनी राजा नेने यांना दिग्दर्शनाची संधी देऊन 'दहा वाजता' हा हलकाफुलका चित्रपट निर्माण केला. त्यानंतर दामले यांची प्रकृती खालावत गेली. तथापि तशाही परिस्थितीत त्यांनी 'रामशास्त्री' या भव्य आणि दिव्य चित्रपटाची निर्मिती करण्याचे ठरवून राजा नेने यांच्यावर या चित्रपटाच्या दिग्दर्शनाची जबाबदारी टाकली.

राजा नेने यांच्याकडून 'रामशास्त्री'चे दिग्दर्शन ठरावीक वेळेत पुरे होणार नाही, हे ध्यानात येताच दामले आणि फत्तेलाल यांनी राजा नेने यांच्याबरोबर विश्राम बेडेकरांवर हा चित्रपट पूर्ण करण्याची जबाबदारी दिली. विश्राम बेडेकरांनी 'रामशास्त्री' राजा नेनेंच्या साथीत पूर्ण केला. 'रामशास्त्री'चे चित्रीकरण चालू असतानाच दामले यांची प्रकृती फारच खालावत गेली, पण अशा परिस्थितीत 'रामशास्त्री'च्या निर्मितीत त्यांनी लक्ष ठेवले. वयाच्या ५२ व्या वर्षी त्यांचे निधन झाले आणि प्रभातचा आधारस्तंभ हरपला.

– द.भा. सामंत

## देऊळगावकर, नारायण यशवंत

*अण्णासाहेब देऊळगावकर*

**पटकथालेखक**

**२२ ऑगस्ट १९२० – ३ जून २००८**

अण्णासाहेब उर्फ नारायण यशवंत देऊळगावकर हे चार वर्षांचे असतानाच त्यांच्या वडिलांचा मृत्यू झाला. मोठ्या दोन बहिणी, धाकटा भाऊ विनायक व आई असे हे कुटुंब होते. अण्णांचे शालेय शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांनी पुण्यातील एस.पी. व फर्गसन या दोन



महाविद्यालयात शिक्षण घेतले. मराठी व संस्कृत विषय घेऊन ते विशेष गुणवत्तेने उत्तीर्ण झाले. त्यांना प्रा. श्री.म. माटे, प्रा. के.ना. वाटवे, डॉ. आर.एन. दांडेकर अशा प्रतिभावंत प्राध्यापकांच्या अध्यापनाचा लाभ झाला. त्यामुळेच अण्णांना त्या वयातच लेखनात रस वाटू लागला. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या निबंधस्पर्धेत अण्णांचा एकमेव निबंध बक्षीसपात्र ठरला होता. या काळात त्यांनी मराठी, संस्कृत व इंग्रजी भाषेतील उत्तमोत्तम ग्रंथांचे वाचन व परिशीलन केले होते. एम.ए. करताना त्यांना मिलिटरी अकाऊंट्समधील नोकरी मिळत असल्यामुळे त्यांनी शिक्षण सोडून नोकरी स्वीकारली. पण नोकरीत रमण्याचा त्यांचा पिंड नव्हता.

मोठ्या बहिणीचे (सुशीलाचे) पती बाळासाहेब (पीके) पाठक हे 'प्रभात फिल्म कंपनी'त निर्मिती प्रमुख व महाव्यवस्थापक होते. अण्णा त्यांच्याबरोबर बऱ्याच वेळा 'प्रभात'मध्ये जात असत. तिथेच त्यांना चित्रपट निर्मितीपासून तो प्रदर्शित होईपर्यंतच्या सर्व प्रक्रिया बघायला मिळाल्या. चित्रपटाची बरीच तांत्रिक अंगे त्यांच्या लक्षात आली. या काळात अण्णांनी पुण्यात थिएटर्स भाड्याने घेऊन इंग्रजी चित्रपटांचे वितरण सुरू केले. चित्रपटांचा अभ्यास केला. पटकथा लेखनावरची अनेक पुस्तके त्यांनी वाचली.

१९४८ सालच्या 'सीतास्वयंवर' या चित्रपटाची संपूर्ण पटकथा लिहून काढली. ग.दि. माडगूळकर या चित्रपटाचे संवाद लिहिणार होते. त्यामुळे अण्णांनी पटकथा प्रथम माडगूळकरांना दाखवली. त्यांनी ती वाचून पटकथेचे कौतुक करत म्हटले, ''अरे, तू पंचपक्वान्नाचा स्वयंपाकच तयार करून ठेवला आहेस. ओगराळ्यानं वाढायचं काम माझ्यासाठी शिल्लक ठेवलं आहेस!''

सुरुवातीला अण्णांचे नाव प्रसिद्ध नसल्यामुळे श्रेयनामावलीत त्यांचे नाव नसे. पण इथेच अण्णांना पुढच्या वाटचालीचा मार्ग सापडला, तो म्हणजे चित्रपटासाठी पटकथा-संवाद आणि गीतलेखन करण्याचा. 'मायाबाजार' चित्रपटापासून बाळासाहेब पाठकांनी 'माणिक चित्र' ही चित्रपटसंस्था काढली. अण्णा या संस्थेच्या सर्व चित्रपटांच्या वितरणाशिवाय कधी पटकथालेखन, तर कधी गीतलेखन करत.

१९६३ सालच्या 'सुभद्राहरण' या वाडिया यांच्या चित्रपटाच्या कथा-पटकथा-संवादलेखनामुळे अण्णांना प्रचंड लोकप्रियता मिळाली. १९६९ साली निर्माते दत्ताराम गायकवाड यांच्या विनंतीवरून त्यांनी 'सती मालाई'च्या पोथीवरून 'सतीचं वाण' या चित्रपटाचे पटकथा-संवाद लिहिले. हा चित्रपट रौप्यमहोत्सवी ठरला. गायकवाडांच्या 'थापाड्या'ची कथा, पटकथा, संवाद व काही गीतेही अण्णांनीच लिहिली होती. लवकरच अण्णांनी 'रसिकराज प्रॉडक्शन्स' ही स्वत:ची चित्रसंस्था काढून तिच्यातर्फे 'सासुरवाशीण', 'सतीची पुण्याई', 'लेक चालली सासरला' व 'साखरपुडा' अशा चित्रपटांची निर्मिती केली. हे चित्रपट बऱ्यापैकी चालले.

अण्णांना बऱ्याच निर्मात्यांकडून पटकथा-संवाद लिहिण्यासाठी बोलावणी आली. महेश कोठारे यांच्या कारकिर्दीच्या सुरुवातीच्या चित्रपटांच्या यशात अण्णांचा मोठा वाटा होता. 'धूमधडाका'साठी पटकथा-संवाद व 'दे दणादण'ची कथा-पटकथा-संवाद त्यांनीच लिहिले होते. सचिन पिळगावकरच्या 'कुंकू'चे संवाद, छगन भुजबळांच्या 'नवरा बायको'चे कथा-पटकथा-संवाद, अरुण गोडबोले यांच्या 'नशीबवान'चे पटकथा-संवाद तर 'भाविका चित्र'च्या 'खट्याळ सासू नाठाळ सून'ची कथा-पटकथा-संवाद व गीतेही त्यांनी लिहिली होती.

विजय कोंडके यांच्या 'माहेरच्या साडी'ने तर अनेक बाबतीत विक्रम केला होता. अण्णांनी लिहिलेल्या या चित्रपटाच्या पटकथा-संवादांनी संपूर्ण महाराष्ट्राला रडवले. या चित्रपटाच्या हृदयस्पर्शी संवादांनी घराघरातल्या स्त्रियांच्याच नव्हे, तर पुरुषांच्याही काळजाला हात घातला होता.

पत्नीच्या निधनानंतर अण्णा नागपूरला मुलीकडे राहत

द

होते. अखिल भारतीय चित्रपट महामंडळाचा 'चित्रभूषण पुरस्कार' (२००१), गदिमा प्रतिष्ठानचा 'ग.दि. माडगूळकर पुरस्कार' (२००४) व 'व्ही. शांताराम पुरस्कार' (२००९) अशा मानाच्या पुरस्कारांनी ते सन्मानित झाले होते.

अण्णांचे धाकटे बंधू विनायक देऊळगावकर हेही चित्रपट निर्मितीक्षेत्रात व वितरणक्षेत्रात नावाजले होते. वयाच्या ८७ व्या वर्षी अण्णांचे निधन झाले.

– मधू पोतदार

**संदर्भ** : १) वडनेरकर प्रीती, 'मायाबाजार', श्रीविद्या प्रकाशन, पुणे; २००९.

द

## देव, अजिंक्य रमेश

**अभिनेता**

**१७ जानेवारी**



अभिनय, दिग्दर्शन, पटकथा लेखनाबरोबरच चित्रकलेची आणि अनेक खेळांचीही आवड जोपासणाऱ्या अजिंक्य देव यांचा जन्म मुंबईत झाला, बालपणही मुंबईतच गेले. बी.डी.एम. हायस्कूलमध्ये आणि साठे महाविद्यालयामध्ये त्यांचे शिक्षण झाले. प्रख्यात अभिनेते रमेश देव व सीमा देव हे आईवडील, अभिनय हे दिग्दर्शक असलेले धाकटे भाऊ असे हे देव कुटुंब चित्रपटसृष्टीशी निगडित आहे. आईवडिलांच्या व्यग्रतेच्या काळात त्यांना आजी आणि मामा यांचा प्रेमळ सहवास लाभला. अभिनयासाठी असलेल्या आईवडिलांची चित्रपट जगतातली कारकिर्द जवळून आणि सजगपणे अनुभवणाऱ्या अजिंक्य यांनी उपजतच अभिनयाकडे असलेला कल आणि घरातला हा वारसा घेऊन चित्रपट क्षेत्रात पदार्पण केले ते 'अर्धांगी' या चित्रपटाद्वारे १९८४ मध्ये. त्यानंतर त्यांचे १९८५ साली 'वहिनीची माया' आणि १९८६ साली 'शाबास सूनबाई' हे चित्रपट प्रदर्शित झाले, पण अजिंक्य देव यांचे नाव सर्वतोमुखी झाले ते १९८७ झाली, रमेश देव यांची निर्मिती असलेल्या, राजदत्त यांनी दिग्दर्शित केलेल्या 'सर्जा' या ऐतिहासिक पार्श्वभूमीच्या चित्रपटामुळे.

अजिंक्य यांनी 'सर्जा' चित्रपटासाठी 'सर्जा दोर न बांधता गड चढतो' हे दृश्य जमिनीपासून ३५०-४०० फुटांवर जेमतेम उभे राहता येईल अशा जागी उभे राहून, अंगावर सोसाट्याचा वारा झेलत, दगडांच्या कपारीला धरून ३-४ फूट वर चढण्याचे धाडस करून चित्रित करून दिले. या चित्रपटाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे, ज्या काळात मराठी चित्रपटसृष्टीत विनोदी आणि तमाशाप्रधान चित्रपटांची चलती होती, त्या काळात 'सर्जा'च्या कथानकावर चित्रपट करणे. आणि तो चालणार नाही अशी शंका व्यक्त होत असतानाही रमेश देव यांनी केलेल्या चित्रपटाला प्रेक्षकांनी उदंड प्रतिसाद दिला. ही भूमिका अजिंक्य यांच्या कारकिर्दीत मैलाचा दगड ठरली. या भूमिकेसाठी अजिंक्य यांना राष्ट्रीय पुरस्कार आणि महाराष्ट्र राज्य शासनाचे विशेष पारितोषिकही मिळाले.

'माझं घर माझा संसार' हा त्यानंतर प्रदर्शित झालेला अजिंक्य यांचा लोकप्रिय चित्रपट. नायिका होती मुग्धा चिटणीस. या चित्रपटातली 'दृष्ट लागण्याजोगे सारे', 'हसणार कधी, बोलणार कधी' ही गीतेही लोकप्रिय झाली. 'कशासाठी प्रेमासाठी?', 'माहेरची साडी', 'जसा बाप तशी पोरे', 'जिवलगा', 'वाजवा रे वाजवा', 'कुंकू', 'चल गंमत करू', 'विश्वविनायक', 'पैंजण', 'लपंडाव', 'अवगत', 'एक क्रांतिवीर : वासुदेव बळवंत फडके', 'रिंगा रिंगा', 'जेता', 'दुभंग' हे अजिंक्य देव यांचे मराठीतले निवडक पण लक्षणीय चित्रपट. 'माहेरची साडी' या भावुक-कौटुंबिक, कमालीच्या लोकप्रिय चित्रपटातली अलका कुबल यांच्या भावाची भूमिका असो किंवा त्याहून अगदी वेगळ्या अशा राजकीय पार्श्वभूमीवरच्या 'सरकारनामा'मधली सरकारी अधिकाऱ्याची भूमिका असो - अजिंक्य यांनी सर्वच भूमिका ताकदीने साकारल्या.

अजिंक्य यांची भूमिका असलेला 'वासुदेव बळवंत

फडके' हा चित्रपट हे रमेश देव यांचे स्वप्न होते. क्रांतिकारकाचा जीवनपट उलगडून दाखवणारा हा मराठीतला पहिलाच ऐतिहासिक चित्रपट. हा चित्रपट हिंदीतही डब करण्यात आला. त्यासाठी दिग्गज अभिनेते अमिताभ बच्चन यांनी आवाज दिला. २०१० साली 'जेता' या चित्रपटाद्वारे अजिंक्य दिग्दर्शक आणि पटकथाकारही बनले. निर्माता, दिग्दर्शक आणि अभिनेता अशी तिहेरी जबाबदारी त्यांनी सांभाळली. एका वृद्धाचा यंत्रणेविरुद्धचा लढा यात केंद्रस्थानी आहे. नायकाची भूमिका रमेश देव यांनी साकारली. या चित्रपटाच्या माध्यमातून अजिंक्य यांना आईवडिलांना दिग्दर्शित करण्याची संधी मिळाली. या चित्रपटात २४ वर्षांनंतर या तिघांनी पुन्हा एकत्र काम केले. या चित्रपटाला सर्वोत्कृष्ट पटकथेचा तसेच महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कारही मिळाला.

अजिंक्य देव यांनी हिंदी चित्रपटातही मोजक्या पण लक्षात राहणाऱ्या भूमिका केल्या. 'संसार', 'कच्ची कली', 'सोने पे सुहागा', 'प्यासी निगाहे', 'परवाने', 'फूल और अंगार', 'पांडव', 'छोटासा घर', 'आन : मेन ॲट वर्क', 'डेव्हीड' हे त्यांचे हिंदी चित्रपट. याचबरोबर त्यांनी काही तेलगू चित्रपटात आणि 'द पिकॉक स्प्रिंग' या इंग्रजी दूरदर्शन चित्रपटातही काम केले आहे. ९० पेक्षा अधिक चित्रपटात अभिनय करणाऱ्या अजिंक्य देव यांनी रेणुका शहाणे यांच्यासह केलेली रवी राय यांची 'सैलाब' ही हिंदी मालिका अतिशय गाजली. 'सैलाब'नंतर अजिंक्य यांच्याकडे भूमिकांचा ओघ सुरू झाला. 'युनिट ९' ही त्यांची गाजलेली मराठी मालिका. त्यांनी रेणुका शहाणे यांच्याबरोबर 'अंतर' नावाची टेलिफिल्मही केली आहे. मालिकांमधल्या आणि चित्रपट क्षेत्रातल्या या कारकिर्दीबरोबरच अजिंक्य देव यांनी 'प्रभात एन्टरटेन्मेंट' या दूरदर्शन वाहिनीचे संचालक म्हणूनही काही काळ काम केले. या वाहिनीच्या कामात अजिंक्य यांची पत्नी आरती यांचाही महत्त्वपूर्ण सहभाग होता.

'थोडं तुझं थोडं माझं' हा अजिंक्य देव यांचा २०१३ मधील चित्रपट. अजिंक्य देव आणि देव कुटुंबीय यांनी विशेष मुलांसाठी मुंबईत सुरू केलेली 'ॲकॅडमी ऑफ लर्निंग अँड डेव्हलपमेंट' ही शाळा त्यांच्या संवेदनशील मनाची साक्ष देते.



– स्वाती प्रभुमिराशी

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

द

## देव, रमेश नारायणसिंग
**अभिनेता, निर्माता**
**३० जानेवारी १९२५**



चित्रपटसृष्टीत सलग ६५ वर्षे सक्रिय असलेले, काळानुरूप वेगवेगळे प्रयोग करणारे आणि कला क्षेत्रातील सर्वच विभागांत यशस्वी कारकिर्द घडविणारे एकमेव कलावंत म्हणजे रमेश नारायणसिंग देव.

रमेश नारायणसिंग देव यांचे घराणे मूळचे राजस्थानातील जोधपूरचे. कोल्हापूरच्या छत्रपती शाहू महाराजांनी त्यांच्या आजोबांना कोल्हापूरला बोलावून घेतले, तेव्हापासून हे कुटुंब त्याच शहरात स्थिरावले. रमेश देव यांचे शिक्षण कोल्हापूरमध्येच झाले. महाविद्यालयामध्ये असतानाच भालजी पेंढारकर, दिनकर पाटील अशा मान्यवरांशी रमेश देव यांचा परिचय होता. त्यांच्या चित्रीकरणाच्या ठिकाणी जाणे, त्यांच्याशी गप्पा मारणे सुरू असायचे. त्यातूनच १९४७ साली हौसेखातर रमेश देव यांनी चेहऱ्याला पहिल्यांदा रंग लावला. तो चित्रपट होता ‘वाल्मिकी’. त्यात पृथ्वीराज कपूर होते. ही अर्थातच छोटी भूमिका होती. त्यानंतरही रमेश देव छोट्यामोठ्या भूमिका करत राहिले. परंतु कलाकार म्हणून पूर्ण वेळ काम करण्याचा विचार त्यांनी केला नव्हता.

महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केल्यानंतर रमेश देव यांनी पोलीस खात्यात नोकरी मिळवण्यासाठी परीक्षा दिली. त्यात त्यांची निवडही झाली. भरतीसाठी ते नाशिकला जाणार होते. त्या वेळी, लष्करात कॅप्टन असलेला त्यांचा एक भाऊ पुण्यात राहायला होता. रमेश देव त्याच्याकडे राहायला गेले होते. एकदा सहज रेसकोर्सवर गेले असताना तेथे प्रख्यात दिग्दर्शक राजा परांजपे यांच्याशी त्यांची भेट झाली. राजा परांजपे त्या वेळी अश्वशर्यतीमध्ये बरेच पैसे हरले होते. रमेश देव यांनी सहज म्हणून त्यांना एका घोड्यावर पैसे लावण्यास सुचवले, त्यावर पैसे लावल्यावर तो घोडा जिंकला. त्यातून राजा परांजपे यांना सहा-सात हजार रुपये मिळाले. त्यांनी खूश होऊन रमेश देवांना त्यांच्या चित्रपटात काम करण्यासाठी विचारणा केली. तेच रमेश देव यांचे खऱ्या अर्थाने पहिले व्यावसायिक काम. ‘आंधळा मागतो एक डोळा’ या चित्रपटातील त्यांची खलनायकाची भूमिका गाजली. या चित्रपटाने रौप्यमहोत्सव साजरा केला. त्यानंतर त्यांनी ‘रामराम पाव्हणं’, ‘पाटलाचा पोर’ अशा अनेक चित्रपटांतून कामे केली. भालजी पेंढारकर यांच्या ‘येरे माझ्या मागल्या’मध्ये त्यांनी मुख्य खलनायकही साकारला. अशोक ताटे दिग्दर्शित ‘मंगळसूत्र’ या चित्रपटातही त्यांनी भूमिका केली आहे. मराठी चित्रपटातून यश मिळत असतानाच रमेश देव यांची सीमा यांच्याशी भेट झाली आणि दोघांनी लग्न करण्याचा निर्णय घेतला.

मराठी चित्रपटातून यश मिळत असले, तरीही मराठी चित्रपटसृष्टी म्हणजे छोटी विहीर आहे, हे रमेश देव यांच्या लक्षात येऊ लागले होते. हिंदीत काम करणे हे खऱ्या अर्थाने समुद्रात पोहणे आहे आणि त्यातून देशपातळीवर ओळख मिळू शकते, हेही त्यांनी जाणले. त्यामुळे त्यांनी हिंदी चित्रपटांमध्ये काम मिळवण्यासाठी प्रयत्न सुरू केले. त्यासाठी हिंदी उच्चारांचा सराव, हिंदी चित्रपटांचा अभ्यासही केला. ‘आरती’ या राजश्री प्रॉडक्शनच्या पहिल्या चित्रपटामध्ये त्यांना छोटी भूमिका मिळाली. तो चित्रपट गाजला. त्यानंतर ‘मोहब्बत इसको कहते हैं’ या चित्रपटात त्यांना सहनायकाची भूमिका मिळाली. त्यानंतर ‘लव्ह अँड मर्डर’मधून त्यांना नायक होण्याची संधी मिळाली. परंतु दुर्दैवाने रमेश देव यांनी नायक म्हणून साकारलेले तिन्ही चित्रपट पडले, त्यामुळे नंतर खलनायकी ढंगाच्या भूमिका त्यांच्या वाट्याला येऊ लागल्या. त्या त्यांनी आनंदाने स्वीकारल्या.

दरम्यानच्या काळात रमेश देव यांनी ‘अजिंक्य थिएटर्स’ ही स्वत:ची नाट्यनिर्मिती संस्था काढून काही नाटकांची निर्मिती केली. ‘तुझे आहे तुजपाशी’, ‘लग्नाची बेडी’, ‘मवाली’, ‘कर्ता करविता’, ‘लाल बंगाली’,



'मंगळसूत्र'मध्ये रमेश देव उजवीकडील समोर बघणारे

'अकुलिना', 'फोन नं. ३३३३३' आदी नाटकांचे अनेक प्रयोग त्यांनी केले. राजा परांजपे यांच्याकडून रमेश देव यांना खूप शिकायला मिळाले. कारकिर्दीच्या सुरुवातीच्या टप्प्यात राजा परांजपे यांच्यासारख्या निष्णात दिग्दर्शकाचे मार्गदर्शन मिळणे, ही रमेश देव यांच्या दृष्टीने महत्त्वाची बाब होती.

मराठी कलाकाराने हिंदी चित्रपटसृष्टीत काम करणे आणि तिथे जम बसवणे, ही त्या काळी खूप मोठी गोष्ट होती. रमेश देव यांनी जिद्दीच्या आणि मेहनतीच्या जोरावर ते साध्य करून दाखवले. हृषीकेश मुखर्जींच्या 'आनंद' या चित्रपटात त्यांनी राजेश खन्ना आणि अमिताभ बच्चन यांच्याबरोबर तेवढ्याच ताकदीने काम केले. पृथ्वीराज कपूर, राज कपूर, दिलीपकुमार, आशा पारेख, हेमामालिनी, झीनत अमान अशा बॉलिवूडमधील सर्व लोकप्रिय कलाकारांसोबत त्यांनी काम केले.

नायक म्हणून हिंदीत यशस्वी होऊ न शकल्याने त्यांनी खलनायकी ढंगाच्या भूमिका स्वीकारल्या. मराठीत याच्या उलट झाले. खलनायकी भूमिकांमधून त्यांचा मराठी चित्रपटसृष्टीत प्रवेश झाला होता, पण नंतर ते नायक म्हणून लोकप्रिय झाले. आपली प्रकृती आणि आवड ओळखून त्याला साजेशा भूमिका निवडणे आणि त्यात समरसून काम करणे यातच कलाकाराचे खरे कौशल्य असते. आपल्याला शहरी भूमिकाच शोभतील, हे त्यांनी ओळखले आणि तशा भूमिकांमध्ये ते रमले. त्या काळात तमाशापटांची लाट असतानाही त्यांनी ग्रामीणपटात किंवा तमाशापटांत अपवादानेच काम केले.

चित्रपट क्षेत्राशी संबंधित सर्व विभागात काम करण्याची आवड आणि इच्छाही रमेश देव यांना होती. त्यांनी स्वत:च्या निर्मिती संस्थेतर्फे 'सर्जा' चित्रपटाची निर्मिती करून मराठी चित्रपटसृष्टीला अजिंक्य देव हा नवा

नायक दिला. ‘सर्जा’ला राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. ‘सेनानी साने गुरुजी’ या चित्रपटाच्या उत्कृष्ट दिग्दर्शनासाठी रमेश देव यांना इराण, इराक आणि चीन या देशांतही पुरस्कार मिळाले. असा मान मिळवणारे ते पहिले मराठी दिग्दर्शक आहेत. ‘क्रांतिवीर वासुदेव बळवंत फडके’, ‘गोष्ट लग्नानंतरची’, ‘जेता’ आदी चित्रपटांची निर्मितीही त्यांनी केली.

जागतिकीकरणाच्या प्रवाहात जाहिरात आणि विपणन क्षेत्राचे प्रस्थ वाढल्यानंतर त्यांनी स्वत:ची जाहिरात निर्मिती कंपनी स्थापन केली. त्यांचा मुलगा अभिनय देव आता या कंपनीचा कारभार सांभाळत आहे. या कंपनीला जाहिरात क्षेत्रातील प्रतिष्ठेचा मानला जाणारा फ्रान्सचा ‘गोल्डन लायन’ पुरस्कारही मिळाला. भारतात दूरदर्शनचे आगमन झाल्यानंतर हा छोटा पडदा पुढील काळात खूप मोठा होणार आहे, हेसुद्धा रमेश देव यांनी हेरले आणि त्यासाठी कार्यक्रमांची निर्मिती सुरू केली. पूर्वीच्या काळी पु.ल. देशपांडे पुणे आकाशवाणीचे प्रमुख असताना रमेश देव यांनी त्यांच्या हाताखालीही काही काळ काम केले होते.

द

संपूर्ण कुटुंब चित्रपटसृष्टीत सक्रिय असल्याचे आपले एकमेव उदाहरण असल्याबद्दल रमेश देव यांना सार्थ अभिमान आहे. जगदंबेची कृपा आणि लोकांचे अलोट प्रेम, यांना ते आजवरच्या यशस्वी वाटचालीचे श्रेय देतात. एक्स्ट्रॉतील एक्स्ट्रॉ म्हणून चित्रपटातील कामाला सुरुवात करून मुख्य नायक किंवा खलनायक येथपर्यंतचा प्रवास त्यांनी मोठ्या जिद्दीने केला. कामाबद्दल निष्ठा, व्यायामाची आवड आणि निर्व्यसनीपणा यामुळेच आज सत्याऐंशीव्या वर्षातही ते तेवढ्याच उत्साहाने काम करतात. मराठीतील सर्वोच्च व्ही. शांताराम पुरस्कार त्यांना मिळाला. सोलापूरच्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषवले. राष्ट्रपती प्रतिभा पाटील यांची उपस्थिती हे या संमेलनाचे वैशिष्ट्य ठरले.

रमेश देव यांना सामाजिक कार्याचीही पहिल्यापासून आवड. त्यासाठीच त्यांच्या प्रेरणेतून त्यांचा मुलगा अजिंक्य देव आणि सून आरती यांनी विशेष मुलांसाठी एक शाळाही मुंबईत सुरू केली. अशा मुलांना त्यांच्या हक्काचे शिक्षण मिळावे, त्यांच्या मनातील न्यूनगंड कमी व्हावा, यासाठी ही शाळा कार्यरत आहे. असे आणखी काही प्रकल्प राबवण्याचा रमेश देव यांचा मानस आहे.

रमेश देव यांनी तीनशे हिंदी आणि सुमारे अडीचशे मराठी चित्रपटांत काम केले. सध्याही ते ‘जॉनी एलएलबी’ या हिंदी आणि ‘चांदी’सारख्या काही चित्रपटांतून काम करीत आहेत. अजूनही दूरदर्शन मालिकेसाठी बारा तासांच्या शिफ्टमध्येही ते काम करू शकतात. प्रामाणिकपणे काम करणे आणि जिद्द हे आपल्या उत्साहाचे रहस्य असल्याचे ते सांगतात. चित्रपटांचे विषय, स्वरूप यांच्यात झालेल्या बदलांचे ते मनापासून स्वागत करतात. काळानुसार चित्रपट बदलणारच, हे त्यांचे ठाम मत आहे. सध्या त्यांच्या संस्थेतर्फे हिंदी चित्रपटाच्या निर्मितीची तयारी सुरू आहे. करीना कपूर आणि राणी मुखर्जी यांच्या त्यात प्रमुख भूमिका असतील.

– अभिजित पेंढारकर

**संदर्भ** : १) देव रमेश, ‘या सुखांनो या’, राजा प्रकाशन, मुंबई; २००६. २) प्रत्यक्ष मुलाखत.

## देव, सीमा रमेश

**अभिनेत्री**

**२७ मार्च १९४२**



सीमा रमेश देव यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव नलिनी सराफ होते. त्यांचे बालपण मुंबई येथील गिरगाव परिसरात गेले. तेथेच राममोहन इंग्लिश स्कूलमधून त्यांनी इयत्ता ९वीपर्यंतचे शिक्षण घेतले. ‘झनक झनक पायल बाजे’ या चित्रपटातून समूहनृत्यामध्ये नृत्य करणाऱ्या नलिनी सराफ यांनी कुटुंबाचा आर्थिक भार उचलण्यासाठी चित्रपटांमध्ये




डावीकडील सीमा देव

प्रवेश केला. भावंडांची जबाबदारी, डोक्यावर वडिलांचे छत्र नाही, अशा स्थितीत एकट्या कमावणाऱ्या आपल्या आईला सुचिताला मदत करायची, या हेतूने चित्रपटात मिळेल ते काम स्वीकारण्याची त्यांची तयारी होती. चित्रपटात भूमिका साकारताना लहानपणापासून शिकलेल्या नृत्याची त्यांना मदत झाली. 'आलिया भोगासी' हा नलिनी सराफ यांचा पहिला चित्रपट. यात त्यांचे सहकलावंत होते रमेश देव. रमेश देव यांच्या बहिणीची भूमिका त्यांनी साकारली. १९६५ साली 'पडछाया' या चित्रपटात रमेश देव यांच्या मुलीची भूमिका त्यांनी केली. चित्रपट क्षेत्रात 'नलिनी' नावाच्या अन्य अभिनेत्रीही असल्याने नलिनी सराफ यांनी आपले मूळ नाव सोडून 'सीमा' हे नाव धारण केले.

सीमा यांनी रमेश देव यांची नायिका म्हणून सर्वप्रथम 'ग्यानबा तुकाराम' (१९५८) या चित्रपटात काम केले. त्यानंतर 'यंदा कर्तव्य आहे', 'माझी आई', 'सुवासिनी', 'सोनियाची पावले', 'मोलकरीण' यांसारख्या अनेक चित्रपटांत रमेश देव यांच्यासह भूमिका साकारल्या. एक अभिनेत्री म्हणून सीमा यांच्या रुपेरी जीवनाला आकार देणारा महत्त्वाचा पहिला चित्रपट म्हणजे 'जगाच्या

पाठीवर'. १९६० सालच्या या चित्रपटात त्यांनी साकारलेल्या आंधळ्या नायिकेच्या भूमिकेचे कौतुक झाले. एक सशक्त अभिनेत्री म्हणून त्यांची ओळख निर्माण झाली. ही भूमिका साकारताना त्यांनी अपार मेहनत घेतली. राजा परांजपेंसारख्या कुशल अभिनेता-दिग्दर्शकामुळे सीमा यांना ही भूमिका सहजरीत्या सादर करण्यात यश आले. सीमा यांच्यावर चित्रित झालेल्या 'तुला पाहते रे तुला पाहते' या गाण्यासह यातील सर्वच गाणी आजही श्रवणीय आहेत.

'सुवासिनी', 'हा माझा मार्ग एकला', 'पाहू रे किती वाट', 'अपराध', 'या सुखांनो या' या चित्रपटांतील सीमा यांच्या भूमिका गाजल्या. १९६३ सालच्या 'पाहू रे किती वाट' या चित्रपटातील भूमिकेसाठी महाराष्ट्र सरकारचा सर्वश्रेष्ठ अभिनेत्रीचा पुरस्कार सीमा यांना मिळाला. सोज्ज्वळ चेहरा असूनही 'अपराध', 'मोलकरीण' अशा चित्रपटांतून वाईट प्रवृत्तीच्या व्यक्तिरेखाही त्यांनी तेवढ्याच समरसतेने साकारल्या.

द

रमेश देव यांच्याबरोबर प्रेमविवाह झाल्यानंतर सीमा यांनी संसारातच स्वत:ला गुंतवून घेतले. पुढे आई म्हणून आपली कर्तव्ये पार पाडत असताना, मुले मोठी झाल्यावर चरित्र अभिनेत्री म्हणून त्यांनी चित्रपटांमधून भूमिका करण्यास पुन्हा सुरुवात केली. 'सर्जा' या घरची निर्मिती असलेल्या चित्रपटात अजिंक्य देवच्या आईची भूमिका त्यांनी साकारली. अजिंक्य आणि अभिनय या दोन्ही मुलांना घडविण्यासाठी आणि त्यांच्यावर चांगले संस्कार करण्यासाठी सीमा यांनी कामे सांभाळून त्यांच्याकडे विशेष लक्ष दिले.

चरित्र अभिनेत्री म्हणून सीमा यांना हिंदी चित्रपटात अनेक नामवंत कलाकारांसह काम करण्याची संधी मिळाली. मीनाकुमारी, अमिताभ बच्चन, राजेश खन्ना, अनिल कपूर, गोविंदा यांसारख्या सर्व पिढीतील कलावंतांसह काम करताना आपल्या भूमिकेशी त्या प्रामाणिक राहिल्या. 'भाभी की चूडियाँ', 'आँचल', 'आनंद', 'प्रेमपत्र', 'मियाँ बीबी राजी', 'तकदीर', 'हथकडी', 'मर्द' हे सीमा यांचे यशस्वी हिंदी चित्रपट.

सीमा देव यांनी याशिवाय 'आलिया भोगासी', 'दोन घडीचा डाव', 'राजमान्य राजश्री', 'अंतरीचा दिवा', 'जगाच्या पाठीवर', 'पैशांचा पाऊस', 'आधी कळस मग पाया', 'प्रपंच', 'सुवासिनी', 'चिमण्यांची शाळा', 'रंगल्या रात्री अशा', 'हा माझा मार्ग एकला', 'मोलकरीण', 'पाहू रे किती वाट', 'पडछाया', 'सुखी संसार', 'अपराध', 'नंदिनी', 'काळी बायको', 'या सुखांनो या', 'जानकी', 'पोरींची धमाल बापाची कमाल', 'सर्जा', 'जिवा सखा', 'कुंकू' या महत्त्वाच्या मराठी चित्रपटांमध्येही भूमिका साकारल्या आहेत.

– अभिजित पेंढारकर

**संदर्भ** : १) देव सीमा, 'सुवासिनी', श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९९८. २) प्रत्यक्ष मुलाखत.

## देशपांडे, पुरुषोत्तम लक्ष्मण

*पु.ल. देशपांडे*

**दिग्दर्शक, पटकथाकार, संगीतकार**

**८ नोव्हेंबर १९१९ – १२ जून २०००**

☞ **मुख्य नोंद – साहित्य खंड**



'कुबेर' (१९४७) या भूपाल पिक्चर्सच्या चित्रपटाद्वारे पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे यांनी चित्रपटसृष्टीत पहिले पाऊल टाकले. मो.ग. रांगणेकर यांनी या चित्रपटाची कथा, पटकथा, संवाद, गीते, दिग्दर्शन ही सारी अंगे-उपांगे सांभाळली होती. पु.ल.ना त्या चित्रपटात एक छोटी भूमिका होती व त्यामध्ये संगीत दिग्दर्शक केशवराव भोळे यांच्या संगीत निर्देशनाखाली त्यांनी एक गीतही म्हटले होते.

मग पुढच्या वर्षी पु.लं.नी शांताराम आठवले दिग्दर्शित 'भाग्यरेखा' या चित्रपटात एक महत्त्वाची भूमिका केली होती. त्याच साली, म्हणजे १९४८ साली प्रकाशित झालेल्या 'वंदे मातरम' या चित्रपटात ते आपली पत्नी सुनीता देशपांडे यांच्याबरोबर नायकाच्या

'गुळाचा गणपती' या चित्रपटात पु.लं. देशपांडे उजवीकडील

द

भूमिकेत चमकले होते. १९४९ साली प्रदर्शित झालेल्या 'मानाचं पान' या चित्रपटाचे ते संगीत दिग्दर्शक बनले. त्यानंतर त्यांनी 'मोठी माणसं' (१९४९) व 'देव पावला' (१९५०) या दोन चित्रपटांना संगीत दिले. 'गोकुळचा राजा' (१९५०) या चित्रपटाचे कथा, संवाद, पटकथा आणि गीते ही सारी कामे त्यांनी इतर काही जाणत्या लोकांबरोबर केली. १९५० सालीच 'जोहार मायबाप' हा चित्रपट आला, त्यामध्ये ते पुन्हा एकदा नायकाच्या भूमिकेत चमकले. 'नवरा बायको' या चित्रपटाची कथा, पटकथा, संवाद व संगीत त्यांचे होते, तर 'पुढचं पाऊल' (१९५०) या चित्रपटात ते पुन्हा एकदा नायकाच्या भूमिकेत दिसले. अच्युत रानडे यांच्या जोडीने त्यांनी 'वर पाहिजे' (१९५०) या चित्रपटाची कथा लिहिली, तर या चित्रपटाचे सारे संवाद त्यांचेच होते.

१९५१ साल कोरडेच गेले. पण १९५२ साली पुन्हा एकदा पु.लं.ची लेखणी प्रकाशमान झाली. 'दूधभात'ची कथा, पटकथा व संवाद त्यांनी लिहिले, तर 'घरधनी' या चित्रपटासाठी पटकथा व संवाद त्यांच्या लेखणीतून उतरले. एवढेच नव्हे, तर या दोन्ही चित्रपटांचे संगीतही त्यांनीच दिले होते.

त्यानंतर १९५३ साली 'अंमलदार' हा चित्रपट आला. 'इन्स्पेक्टर जनरल' या प्रहसनावरून पु.लं.नी त्याची कथा मराठीत आणली होती. पु.ल. व ग.दि. माडगूळकर या दोघांनी मिळून पटकथा व संवाद लिहिले होते. संगीत तर त्यांचे होतेच, शिवाय त्या चित्रपटात त्यांनी प्रमुख भूमिकाही केलेली होती. दत्ता धर्माधिकारी यांना 'महात्मा' (१९५३) हा चित्रपट मराठी, हिंदी व इंग्रजी भाषांत केला होता. त्याची कथा पु.लं.ची होती. 'माईसाहेब' (१९५३) या चित्रपटासाठी त्यांनी पटकथा, संवाद व संगीत हे तीन विभाग सांभाळलेले होते. 'देवबाप्पा' (१९५३) या चित्रपटासाठी पटकथा, संवाद व संगीत त्यांनी केले होते; तर काही गीते ग.दि. माडगूळकर यांनी व काही पु.लं.नी लिहिली होती. या चित्रपटाबरोबरच 'नवे बिऱ्हाड' नावाचा विनोदी लघुपटही दाखवला जात असे. त्याचे लेखन व संगीत पु.लं.नी सांभाळले होते. शिवाय त्याचे धावते समालोचनही पु.लं.नीच केले होते.

याच वर्षी आलेला 'गुळाचा गणपती' हा पु.लं.चा आणखी एक चित्रपट. त्यामध्ये 'सबकुछ पु.ल.' होते. त्याची कथा, पटकथा, संवाद, दिग्दर्शन व संगीत पु.लं.नी सांभाळले होते. एवढेच नव्हे, तर त्यामध्ये प्रमुख भूमिका त्यांचीच होती. 'सुंदर मी होणार' या त्यांच्या नाटकावरून दिग्दर्शक वसंत जोगळेकर यांनी 'आज और कल' हा चित्रपट सादर केला होता. तो १९६३ साली पडद्यावर आला. त्यानंतर जवळजवळ ४० वर्षांच्या प्रदीर्घ काळानंतर त्यांची पटकथा व संवाद असलेला 'एक होता विदूषक' हा चित्रपट १९९२ साली पडद्यावर आला. पु.लं.नी १९९२ साली प्रदर्शित झालेल्या 'संदेश' या चित्रपटाची कथा व पटकथा लिहिली होती.

पु.लं.नी मराठी चित्रपटसृष्टीसाठी कथा-पटकथा-संवाद-गीतलेखन, संगीत दिग्दर्शन, चरित्र अभिनेता, नायक वगैरे अनेक बाबी सांभाळून बहुमोल कार्य केले. 'एक होता विदूषक' हा त्यांचा अखेरचा चित्रपट.

– शशिकांत किणीकर

द

## देसाई, नितीन चंद्रकांत

**कलादिग्दर्शक, निर्माता, दिग्दर्शक**

**६ ऑगस्ट १९६५**



कलादिग्दर्शक म्हणून फारच थोड्या अवधीत चित्रपटसृष्टीत आपले स्वत:चे खास स्थान निर्माण करणारे व्यक्तिमत्त्व म्हणजे नितीन चंद्रकांत देसाई. ठाण्यात जन्मलेल्या नितीन यांचे बालपण मुंबईत आणि कोकणात गेले. दापोलीजवळ पाचवली गावातील निसर्ग त्यांच्यातील कलाकाराला घडवण्यास कारणीभूत ठरला. शालेय शिक्षण झाल्यानंतर नितीन यांनी जे.जे. व रहेजा या कला महाविद्यालयातून शिक्षण घेतले. सुरुवातीला त्यांनी प्रख्यात कलादिग्दर्शक नितीश रॉय यांच्याकडे कलादिग्दर्शनाचे धडे गिरवले. 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया', 'तमस', 'चाणक्य', 'मृगनयनी' यांसारख्या मालिकांसाठी त्यांनी कलादिग्दर्शन केले. 'परिंदा', 'जो जीता वही सिकंदर' या चित्रपटांसाठीही त्यांनी नितीशदांना साहाय्य केले.

'१९४२ अ लव्ह स्टोरी' या चित्रपटापासून नितीन देसाई स्वतंत्रपणे कलादिग्दर्शन करू लागले. या चित्रपटातील भव्य सेट्सनी सर्वांचे डोळे दिपवून टाकले आणि नितीन देसाई या नावाची जादू सगळीकडे पसरायला सुरुवात झाली. 'खामोशी द म्युझिकल', 'हम दिल दे चुके सनम', 'देवदास', 'लगान', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर', 'द लिजंड ऑफ भगतसिंह', 'मुन्नाभाई एमबीबीएस', 'ट्रॅफिक सिग्नल', 'जोधा अकबर' हे त्यांचे गाजलेले चित्रपट. 'सलाम बॉम्बे', 'बुद्धा', 'जंगल बुक', 'कामसूत्र', 'सच अ लाँग जर्नी', 'होली सेफ' या हॉलिवूडपटांसाठीही त्यांनी कलादिग्दर्शन केले. तब्बल चार चित्रपटांसाठी त्यांना कलादिग्दर्शनाचा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. चित्रपटांखेरीज दूरदर्शन मालिकांसाठी, तसेच 'गेम शोज'साठीही त्यांनी कलादिग्दर्शन केले. 'कौन बनेगा करोडपती'साठी देसाई




यांनी उभारलेला सेट खूप गाजला.

कलादिग्दर्शनामध्ये यश मिळाल्यानंतर देसाई यांनी चित्रपटांच्या आणि मालिकांच्या निर्मितीकडे मोर्चा वळवला. 'राजा शिवछत्रपती', 'बाजीराव मस्तानी', 'मराठी पाऊल पडते पुढे' या त्यांच्या गाजलेल्या मालिका. त्यांनी 'बालगंधर्व' चित्रपटाचीही निर्मिती केली. 'अजिंठा' चित्रपटाद्वारे ते दिग्दर्शनात उतरले.

नितीन देसाई यांनी 'चंद्रकांत प्रॉडक्शन कंपनी लि.'ची स्थापना केली असून त्या अंतर्गत 'माँ आशापुरा मतवाली' या चित्रपटाची निर्मितीही केलेली आहे.

कोणत्याही चित्रपटाचे कलादिग्दर्शन करताना नितीन देसाई यांनी अभ्यासपूर्ण रितीने ते केलेले दिसते. आलेल्या चित्रपटातील दृश्याचा विचार करतानाच त्यातील पात्रांचा, प्रसंगांचा-घटनांचा विचारही ते तारतम्याने करतात आणि मगच कलादिग्दर्शनाकडे वळतात. अभ्यासपूर्ण कलादिग्दर्शनामुळेच त्यांनी तयार केलेले सेट्स आखीव-रेखीव व प्रेक्षणीय होतात. त्यातली लय प्रेक्षकांना भुरळ घातल्याशिवाय राहत नाही. म्हणूनच नितीन देसाई यांनी कलादिग्दर्शित केलेले चित्रपट पाहण्यासाठी, त्यातील भव्यता अनुभवण्यासाठी ते चित्रपट प्रेक्षक प्रेक्षागृहातच पाहतात, हाच त्यांच्या कामाचा यथोचित सन्मान आहे, असे म्हटले पाहिजे.

– मंदार जोशी

**संदर्भ** : १) जोशी मंदार, 'आधुनिक युगाचा विश्वकर्मा', सकाळ प्रकाशन, पुणे; २०११.

## देसाई, मंगेश सदानंद

**ध्वनिमुद्रक**

**१९ फेब्रुवारी १९२३ – १५ ऑक्टोबर १९८५**

मंगेश सदानंद देसाई यांचा जन्म कोल्हापूरला झाला. कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयातून त्यांचे बी. एस्सी.पर्यंतचे शिक्षण झाले. पदवी घेण्यापूर्वीच त्यांनी या

शिक्षणास रामराम ठोकला, कारण इलेक्ट्रॉनिक विषयात त्यांना रस वाटू लागला. त्यांनी १९४२ च्या भारत छोडो चळवळीत भाग घेतला आणि हातबाँब निर्माण करण्याचा उद्योग सुरू केला. त्या उद्योगात अपघात होऊन ते जखमी झाले. त्यांच्या या उद्योगामुळे त्यांना कारावास भोगावा लागला. १९४६ मध्ये सरकारने जेव्हा सर्व राजकीय कैद्यांना कारावासातून मुक्त केले, तेव्हा ते तुरुंगातून बाहेर आले.

संगीत दिग्दर्शक वसंत देसाई हे त्यांचे चुलते होते. एकदा वसंत देसाई कोल्हापुरात आले असता त्यांनी मंगेश यांना आपल्याबरोबर मुंबईला आणले आणि राजकमल स्टुडिओच्या ध्वनिमुद्रण खात्यात नोकरी दिली. त्या विभागाचे प्रमुख होते ए.के. परमार. मंगेश देसाईंनी त्यांच्या हाताखाली ध्वनिमुद्रणाचे धडे घेतले.

द

जे.बी.एच. वाडिया १९५१ साली राजकमलच्या स्टुडिओत 'मदहोश' हा चित्रपट चित्रित करत होते. त्या प्रसंगी ध्वनिमुद्रक परमार आजारी पडले. चित्रपटाचे काम अडू नये म्हणून वाडिया यांनी मंगेश देसाईंकडे चित्रपटाच्या ध्वनिमुद्रणाची जबाबदारी सोपवली. निर्माते वाडिया यांनी 'मदहोश' चित्रपटाच्या ध्वनिमुद्रणाची प्रशंसा केली. 'मदहोश' हा देसाई यांनी स्वतंत्रपणे ध्वनिमुद्रण केलेला पहिला बोलपट होता.

त्यानंतर 'दीदार' हा त्यांनी ध्वनिमुद्रण केलेला दुसरा चित्रपट. त्याचे संगीतकार होते नौशाद. त्या चित्रपटाचा नायक अंध होता व त्याच्यावरच्या एका गाण्याचे ध्वनिमुद्रण चालू असता मंगेश देसाईंनी ध्वनिमुद्रण मध्येच थांबवले. तेव्हा नौशाद म्हणाले, ''अरे, तुम्ही काय करता आहात?'' तेव्हा मंगेश यांनी त्यांना थांबवले. स्टोअररूममधून एक काठी मागवली व ती धरून त्यांच्या साहाय्यकाला सांगितले की, मी ध्वनियंत्र सुरू केले की तू ही काठी घेऊन चालत राहा. गाणे संपले आणि त्या गाण्यात नायक गाताना त्या काठीचा आवाजही ध्वनिमुद्रित झाला. नौशादजी आश्चर्यचकित झाले आणि म्हणाले, ''आपने तो पिक्चर की शकल बदल डाली. अब इसमें जान आ गयी।''

संगीत वादकांनी १९७४ साली संप पुकारला होता. चित्रपटांच्या पार्श्वसंगीताचे काम पूर्णपणे ठप्प झाले होते. त्या प्रसंगी शांतारामबापूंनी मंगेश देसाईंना विचारले, ''मंगेश, पार्श्वसंगीताच्या अभावी रखडत पडलेल्या चित्रपटात जुन्या चित्रपटांतील पार्श्वसंगीताचा योग्य उपयोग करता येऊ शकेल का?'' मंगेश देसाई यांनी त्या वेळेस योग्य त्या प्रसंगात त्या पार्श्वसंगीताचा वापर करून पाहिजे तो परिणाम साधून दिला. शांताराबापू त्या वेळेस गिल्डचे अध्यक्ष होते. त्यांनी निर्मात्यांची सभा घेऊन त्यांना समजावले की, त्यांनी त्यांच्या जुन्या चित्रपटातील पार्श्वसंगीताचा नव्या चित्रपटासाठी वापर करावा आणि ध्वनिमुद्रक मंगेश देसाई हे काम करून देतील. पार्श्वसंगीताचा तुम्हाला पाहिजे तसा परिणाम ते मिळवून देतील. पुढे २५ ते ३० निर्माते आपले चित्रपट आणि त्यातल्या पार्श्वसंगीताचा संग्रह घेऊन आले. मंगेश देसाईंनी त्यांचे काम योग्य प्रकारे करून दिले.

महाराष्ट्र शासनाने 'स्वातंत्र्यसैनिक' म्हणून मंगेश देसाईंचा गौरव केला आणि त्यांना कोल्हापूर येथे एक भूखंड देऊ केला. देसाईंनी मानपत्राचा स्वीकार केला, पण भूखंड नाकारला आणि विनंती केली की, शासनाने त्या जागेवर गरजू विद्यार्थ्यांसाठी एक शिक्षणसंस्था स्थापन करावी, ज्याचा विद्यार्थ्यांना उपयोग होईल.

सत्यजीत राय यांना त्यांच्या 'प्रतिद्वंद्वी' चित्रपटाचे पुनर्ध्वनिमुद्रण राजकमल स्टुडिओत करावयाचे होते. त्यांनी चित्राचे डबे मंगेश देसाईंकडे सुपुर्द केले. देसाईंनी त्यावर योग्य ते संस्कार करून ध्वनिमुद्रण पार पाडून राय यांना दिले. सत्यजीत राय यांनी मंगेश देसाईंचे अभिनंदन केले आणि पुढे आपले सारे चित्रपट पुनर्ध्वनिमुद्रणासाठी मंगेश देसाईंच्या हाती सोपवले.

रमेश सिप्पी आपल्या 'शोले' चित्रपटाच्या ध्वनिमुद्रणासाठी मंगेश देसाईंना लंडनला घेऊन गेले. कारण तो स्टीरिओफोनिक साऊंड असणारा चित्रपट होता. त्यासाठी लागणारा साऊंड स्टुडिओ भारतात नव्हता. 'शोले'ला मिळालेल्या यशात मंगेश देसाईंचा सिंहाचा वाटा आहे. मनोजकुमार 'क्रांती' चित्रपटासाठी

त्यांना घेऊन जपानला गेले होते आणि ध्वनिमुद्रणाचे काम त्या देशात करण्यात आले. त्या चित्रपटाच्या ध्वनिमुद्रणाची वाहवा झाली.

ध्वनिमुद्रणातला जादूगार म्हणून मंगेश देसाईंची ओळख आजही आहे. मुंबईत हृदयविकाराच्या झटक्याने त्यांचा मृत्यू झाला.

– द.भा. सामंत

## देसाई, वसंत कृष्णा

**संगीतकार**

**९ जून १९१२ – २२ डिसेंबर १९७५**



मराठी आणि हिंदी चित्रपटसृष्टीत, तसेच नाट्यक्षेत्रात अभिजात शास्त्रीय संगीताची गाणी देणारे आणि म्हणूनच स्वत:चे खास स्थान निर्माण करणारे संगीतकार म्हणजे वसंत कृष्णा देसाई.

वसंत कृष्णा देसाई यांचा जन्म सिंधुदुर्ग जिल्ह्यातल्या कुडाळ तालुक्यातील सोनवडे या गावी झाला. लहानपणापासूनच व्यायामाची आवड असल्यामुळे शालेय शिक्षणाकडे त्यांचे दुर्लक्ष झाले. त्यांचे शिक्षण मराठी चौथीपर्यंतच झाले. सुरुवातीच्या काळात त्यांनी उ. अलम खाँ यांच्याकडे शास्त्रीय संगीताचे धडे गिरवले आणि नंतर उ. इनायत खाँ यांच्याकडे ते गाणे शिकले. ध्रुपद–धमार या शास्त्रीय गायनपद्धतीसाठी त्यांनी डागर बंधूंकडे शिक्षण घेतले.

उत्तम गळा, दमदार आवाज, कमावलेले शरीर आणि जबरदस्त आलापी याबरोबरच गुरूंकडे केलेला नियमित रियाज, यामुळे त्यांची शास्त्रीय संगीताची बैठक उत्तम तयार झाली होती. त्यानंतर ते ठिकठिकाणी गाण्याच्या मैफली करू लागले. त्यामुळे त्यांना इंडियन ब्रॉडकास्टिंग कंपनीतर्फे गाण्यासाठी बोलावले. तेथे त्यांनी स्वत: संगीत देऊन स्वत:च्याच आवाजात अनेक गाणी सादर केली.

देसाई १९३० मध्ये प्रभात फिल्म कंपनीत नोकरीला लागले. परंतु उत्तम शरीरयष्टी लाभली असल्याने, आपण चित्रपटात अभिनय करावा असे त्यांना वाटत होते व त्यानुसार ‘खुनी खंजर’ या मूकपटात त्यांनी भूमिका केली. १९३२ साली प्रभात फिल्म कंपनीच्या ‘अयोध्येचा राजा’ या पहिल्या बोलपटात त्यांनी भूमिका केली. शिवाय चित्रपटातले ‘जय जय राजाधिराज’ हे गाणेही त्यांनी गायले. नंतर ‘धर्मात्मा’, ‘कुंकू’, ‘माझा मुलगा’, ‘संत ज्ञानेश्वर’ वगैरे चित्रपटांत त्यांनी भूमिका केल्या.

राजकमलचा ‘लोकशाहीर राम जोशी’ हा वसंत देसाईंनी संगीत दिलेला पहिला मराठी चित्रपट, मात्र त्यापूर्वी अकरा वर्ष हंस पिक्चर्सच्या मा. विनायक निर्मित ‘छाया’ चित्रपटातील दोन गाण्यांना त्यांनी संगीत दिले होते. ‘श्याम माझा पाहिला’ आणि ‘घनहीना ललनांना’ या दोन गाण्यांना त्यांनी चाली दिल्या होत्या. त्यानंतर १९५२ साली आचार्य अत्रेंनी वसंत देसाईंवर ‘ही माझी लक्ष्मी’ या चित्रपटाचे संगीत सोपवले. या चित्रपटात बारा गाणी होती. नंतर आचार्य अत्रेंनी वसंत बापटांच्या मदतीने ‘श्यामची आई’ या चित्रपटाची पटकथा लिहिली. वसंत देसाई यांच्यावर या चित्रपटाच्या संगीत दिग्दर्शनाची जबाबदारी होती. या चित्रपटाने पहिले राष्ट्रपती सुवर्णपदक पटकावले, हे सर्वज्ञात आहे. या चित्रपटाचे संगीत अविस्मरणीय ठरले. त्यानंतर त्यांनी भालजी पेंढारकर यांच्या ‘माझी जमीन’ या चित्रपटाला संगीत दिले. नंतर १९५४ साली दिग्दर्शक माधव शिंदे आणि लता मंगेशकर यांची निर्मिती असलेल्या ‘सुरेल चित्र’ संस्थेच्या ‘कांचनगंगा’ या चित्रपटालाही वसंत देसाईंनीच संगीत दिले. भालजींची कथा, पी. सावळाराम यांची सात गाणी या चित्रपटात होती. चित्रपटातली ‘बोल वीणे बोल’, ‘शाम सुंदर नयन’ ही गाणी शास्त्रीय रागदारीवर आधारित होती. १९५५ साली भालजी पेंढारकरांच्या ‘येरे माझ्या मागल्या’ या विनोदी चित्रपटाला संगीत दिल्यानंतर वसंत देसाईंनी हिंदी चित्रपटांना संगीत दिले. यामध्ये राजकमल, वाडिया,

द

फेमस, मिनर्व्हा, प्रकाश पिक्चर्स, प्रफुल्ल पिक्चर्स यांसारख्या हिंदी चित्रपट संस्थांच्या जवळपास २५ चित्रपटांना संगीत दिले.

१९६० साली वसंत देसाईंचे मित्र गजानन जागीरदार यांनी 'उमाजी नाईक' हा महत्त्वाकांक्षी चित्रपट वसंत देसाईंकडे सोपवला. त्यानंतर १९६२ साली शास्त्रोक्त संगीताचा अतिरेक करणाऱ्यांवरती विडंबन कथा असणारा 'बाप माझा ब्रह्मचारी' या चित्रपटाला त्यांनी संगीत दिले. याच चित्रपटात गायक महेंद्र कपूर हे वसंत देसाईंकडे प्रथम गायले. नंतर 'छोटा जवान', 'मोलकरीण', 'स्वयंवर झाले सीतेचे', (१९६४) शांतारामबापूंच्या 'इये मराठीचिये नगरी' अशा बऱ्याच चित्रपटांना वसंतरावांनी संगीत दिले. शांतारामबापूंनी 'इये मराठीचिये नगरी' हा चित्रपट 'लडकी सह्याद्री की' या नावाने हिंदीतही काढला. १९६२ साली सूरसिंगार संसदने या चित्रपटाच्या संगीत नियोजनासाठी वसंत देसाईंना 'डॉ. बृहस्पती पारितोषिक' दिले.

द

'धन्य ते संताजी धनाजी' हा ऐतिहासिक चित्रपट, तसेच 'लक्ष्मणरेषा' अशा चित्रपटांनाही देसाईंनी संगीत दिले. हृषीकेश मुखर्जींच्या 'आशीर्वाद' आणि 'गुड्डी' या चित्रपटांनाही संगीत दिल्यानंतर १९७४ साली देसाईंनी 'बायांनो नवरे सांभाळा' या चित्रपटाला संगीत दिले. या चित्रपटाला तेराव्या महाराष्ट्र राज्य चित्रपट महोत्सवात उत्कृष्ट संगीताचे पारितोषिक मिळाले. 'उभी अशी त्रैलोक्यसुंदरी' या गीताला आणि संगीत दिग्दर्शनासाठी वसंत देसाई यांना 'हरिदास पारितोषिक' मिळाले होते.

'तूच माझी राणी' हा त्यांनी संगीत दिलेला शेवटचा चित्रपट ठरला. चित्रपट संगीताशिवाय अनेक नाटकांनाही वसंत देसाईंनी संगीत दिले. १९६० साली 'पंडितराव जगन्नाथ' या नाटकाला त्यांनी प्रथम संगीत दिले. नंतर 'जय जय गौरीशंकर', 'देव दीनाघरी धावला', 'प्रीतिसंगम', 'मृत्युंजय', 'स्वरसम्राट तानसेन' यांसारख्या एकूण पंधरा नाटकांना १९६० ते १९७५ या काळात त्यांनी अप्रतिम संगीतरचना बांधून दिल्या. त्यापैकी 'प्रीतिसंगम' या नाटकाचे संगीत गाजले. त्यांनी फिल्म्स डिव्हिजनच्या लघुपटांचे संगीत दिग्दर्शन केले. नृत्य-संगीतप्रधान आणि अनेक भावगीतांना वसंत देसाईंनी संगीत दिले.

चित्रपटाला पार्श्वसंगीत देण्यातही वसंत देसाई यांचा हातखंडा होता. स्वत: संगीत दिग्दर्शक असताना त्या चित्रपटाला तर त्यांनी संगीत दिलेच. त्याशिवाय 'संत ज्ञानेश्वर', 'संत सखू' (संगीतकार केशव भोळे), 'भक्तीचा मळा' (संगीत मा. कृष्णराव), 'परछाई', 'सुबह का तारा' (संगीतकार सी. रामचंद्र) 'सुरंगा' (संगीतकार एस. पुरुषोत्तम), 'तीन बत्ती चार रस्ता' (संगीतकार शिवराम), 'जलजला' (संगीतकार पंकज मलिक), 'कश्ती' (संगीतकार हेमंतकुमार), 'सेहरा' आणि 'गीत गाया पत्थरोंने' (संगीतकार रामलाल), अशा चित्रपटांना वसंत देसाईंनी पार्श्वसंगीत दिले. मुंबई दूरदर्शनच्या कार्यक्रमाची, प्रसारणाची सुरुवातच वसंत देसाईंच्या सुरावलीने झाली होती. १९६७ साली भारत सरकारतर्फे त्यांना 'पद्मश्री' किताबाने गौरवले गेले.

एका गीताचे ध्वनिमुद्रण संपवून घरी परततानाच त्यांचा अपघाती मृत्यू झाला.

–शशिकांत किणीकर

* * *

# ध



## धर्माधिकारी, दत्तात्रेय जगन्नाथ
*दत्ता धर्माधिकारी*
**निर्माता, दिग्दर्शक**
**२ डिसेंबर १९१३ – ३० डिसेंबर १९८२**



शुभ्र खादी आणि डोक्यावर गांधीटोपी असा दत्ता धर्माधिकारी यांचा वेष असल्यामुळे चित्रपटसृष्टीत गांधीवादी दिग्दर्शक म्हणून त्यांचा उल्लेख केला जात असे. धर्माधिकारी हे कोल्हापूरला प्रभात फिल्म कंपनीमध्ये 'टाईमकीपर' म्हणून नोकरीस लागले. पुढे प्रभात कोल्हापूरहून पुण्यात आली, त्या प्रसंगी धर्माधिकारीही कोल्हापूरहून पुण्यास आले. पुण्यात राजा नेने, शांताराम आठवले, अनंत माने, शंकरराव दामले यांच्याशी त्यांची मैत्री जमली.

शांतारामबापू प्रभात सोडून गेल्यावर राजा नेने यांचे प्रभातमधील स्थान बळकट झाले, कारण दामलेमामांचे ते भाचे होते. राजा नेने यांना प्रभातने 'दहा वाजता'/'दस बजे' हा मराठी, हिंदी चित्रपट दिग्दर्शनासाठी दिला. प्रभातच्या पठडीबाहेर जाऊन राजा नेने यांनी महाविद्यालयीन जीवनातील प्रणय घेऊन हा चित्रपट फुलवला होता. चित्रपट बऱ्यापैकी चालला आणि धर्माधिकारी हळूहळू साहाय्यक दिग्दर्शकाच्या भूमिकेत शिरू लागले.

'रामशास्त्री'च्या चित्रपटनिर्मितीच्या वेळेस प्रभातचे मालक आणि राजा नेने यांच्यात खटके उडून राजा नेने यांना प्रभात बाहेर जावे लागले. त्यांच्याबरोबरच दत्ता धर्माधिकारी, शांताराम आठवले, केशवराव भोळे इत्यादींना कंपनीने नोटीस देऊन ऐन दिवाळीमध्ये घरी बसवले. राजा नेने यांना मोहन स्टुडिओने 'तारामती' हा चित्रपट देऊन त्यांचा लवाजमा मुंबईला बोलावून घेतला. दुर्दैवाने 'तारामती' चित्रपट पडला आणि राजा नेने यांना पुणे गाठावे लागले. १९४७ साली राजा नेने यांनी 'शादीसे पहले' हा चित्रपट पुण्यात निर्माण केला आणि साहाय्यक दिग्दर्शक म्हणून श्रेयनामावलीत धर्माधिकारी यांचे नाव दिसले. पुढे दत्ता धर्माधिकारी यांनी 'आल्हाद पिक्चर्स'ही स्वत:ची चित्रपट संस्था स्थापन केली. 'बाळा जो जो रे', 'स्त्री जन्मा ही तुझी कहाणी', 'चिमणी पाखरे' असे रौप्य महोत्सव पार पाडणारे तीन चित्रपट मराठी प्रेक्षकांना दिले.

धर्माधिकारी यांनी १९५२-५३ साली पु.ल. देशपांडे यांच्या नाटकावरून 'महात्मा' हा चित्रपट हिंदी, मराठी आणि इंग्रजी अशा तीन भाषांतून निर्माण करण्याचा घाट घातला. 'महात्मा' हे अत्यंत गंभीर प्रकृतीचे चित्र होते. त्यात कुठेही प्रेक्षकांचे मनोरंजन होईल असे काहीही नव्हते. असा हा गंभीर प्रकृतीचा चित्रपट पडद्यावर सपशेल कोसळला. त्यामुळे दत्ता धर्माधिकारी यांच्यावर नादारी घेण्याची वेळ आली. पुढे त्यांना मुंबईचे 'भाग्यवान', 'सुदर्शन चक्र', 'सावधान', 'दीप जलते रहो' असे हिंदी चित्रपट दिग्दर्शनाठी मिळाले. हे चित्रपट उत्तम धंदा करून गेले, पण धर्माधिकारी यांना त्याचा लाभ मिळाला नाही.

१९६० च्या दरम्यान धर्माधिकारी यांनी 'लग्नाला जातो मी', 'एक धागा सुखाचा', 'कलंकशोभा', 'क्षण आला भाग्याचा', 'सप्तपदी' यासारखे उत्कृष्ट मराठी चित्रपट प्रेक्षकांना दिले. १९६३ साली मुंबईच्या वाडिया

ब्रदर्सने धर्माधिकारी यांना 'सुभद्राहरण' हा चित्रपट दिग्दर्शनासाठी दिला आणि वाडियांच्या कोशामध्ये द्रव्याची भर पडली तरी धर्माधिकारी यांना त्याचा फायदा झाला नाही.

१९६४ साली धर्माधिकारी यांनी महादेवशास्त्री जोशी यांच्या कथेवरून 'वैशाखवणवा' हा सदाबहार मराठी चित्रपट प्रेक्षकांना बहाल केला. त्यानंतरचे त्यांचे चित्रपट होते 'सतीचं वाण', 'नस्ती उठाठेव', 'धाकटी मेहुणी' आणि 'सतीची पुण्याई' या चित्रपटांमध्ये खास असे काही नव्हते.

हृदयविकाराच्या तीव्र धक्क्याने त्यांचे निधन झाले.

– द.भा. सामंत

धायबर, केशव

**अभिनेता, निर्माता, दिग्दर्शक**

**१८९० – १० मे १९७८**



केशव धायबर यांचा जन्म कोल्हापूरपासून जवळच असलेल्या कुरुकली या लहान खेड्यात झाला. त्यांच्या जन्मानंतर काही महिन्यातच त्यांच्या वडिलांचे निधन झाल्यामुळे त्यांना 'वाईट पायगुणाचा' ठरवून त्यांच्या आईने त्यांच्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले. त्यांच्या मूळ आईचे नाव रखमाबाई डेळेकर होते. बडोद्याच्या सरदार घराण्यातल्या स्त्रीने त्यांचा सांभाळ केला. ज्या सरदार घराण्याने केशवरावांचा सांभाळ केला, त्यांचे आडनाव धायबर होते, म्हणून त्यांचे नाव 'केशवराव धायबर'. केशवरावांनी त्या काळानुसार व्हर्नाक्युलर फायनलपर्यंत शिक्षण घेतले. इंग्रजी शिक्षण घरातच सुरू केले.

वयाच्या सतराव्या वर्षीच 'मा'नी त्यांचे लग्न लावून दिले आणि सहा महिन्यातच त्या वारल्या. सांभाळलेला मुलगा म्हणून 'मा'च्या वारसदारांनी केशवरावांची अवहेलना सुरू केली. त्यामुळे नेसत्या वस्त्रानिशी त्यांनी घर सोडले आणि त्यांच्या पत्नीच्या – म्हणजे भाऊसाहेब बोधे यांच्या घरी राहू लागले. पुढे दीड वर्षातच त्यांच्या पत्नीचे – लक्ष्मीचे निधन झाले. त्यानंतर धायबर सैन्यात सी.के. लान्सरमध्ये दाखल झाले. चार वर्ष सैन्यात नोकरी केल्यानंतर ते कोल्हापूरला परत आले. शाहू महाराजांच्या ओळखीने त्यांना अबकारी अधीक्षकाची नोकरी मिळाली.

१९१५ साली शाहू महाराजांनी विनायक घोरपडे यांच्या बहिणीबरोबर केशवराव धायबर यांचे दुसरे लग्न लावून दिले आणि ते कोल्हापूरला स्थायिक झाले. या काळात थिएटरमध्ये जाऊन ते चित्रपट पाहू लागले. बाबूराव पेंटर यांच्याशी त्यांची ओळख झाली आणि बाबूरावांनी स्थापन केलेल्या महाराष्ट्र फिल्म कंपनीत ते काम करू लागले आणि प्रख्यात नट गणपत जोशी यांची नाटकेही पाहू लागले. त्यांच्या सहजसुंदर अभिनयाचा धायबरांवर प्रभाव पडला आणि तेही अभिनय करण्याचा प्रयत्न करू लागले.

महाराष्ट्र फिल्म कंपनीच्या 'सैरंध्री' या चित्रपटाची जुळवाजुळव सुरू झाली. या चित्रपटात केशव धायबर यांना अर्जुनची म्हणजे बृहन्नडेची भूमिका मिळाली. ही भूमिका करत असतानाच धायबर कॅमेऱ्याचे तंत्र आत्मसात करत होते. फिल्म डेव्हलपिंग, प्रिंटिंग, एडिटिंग अशी तंत्रेही त्यांनी कष्टपूर्वक आत्मसात केली. १९२० साली 'सैरंध्री' चित्रपट पुण्यात आर्यन चित्रपटगृहात दाखल झाला.

पुढे महाराष्ट्र फिल्म कंपनीचे 'वत्सलाहरण', 'सावकारी पाश' (१९२५), 'मायाबाजार' (१९२५), 'सिंहगड' (१९३३), 'कृष्णावतार', 'सावित्री' (१९३६), 'भक्त दामजी मार्कंडेय' (१९३७), असे चित्रपट काढले. डेव्हलपिंग, प्रिंटिंग व एडिटींग खात्यात धायबर स्वतंत्रपणे काम करू लागले. त्यानंतर धायबर यांनी 'नेताजी पालकर' हा चित्रपट दिग्दर्शित केला. पुढे १ जून १९२९ रोजी प्रभात फिल्म कंपनीची स्थापना झाली, त्या चार भागीदारांपैकी एक भागीदार होते केशवराव धायबर. त्यांनी 'राणीसाहेब', 'गोपाळकृष्ण'

या चित्रपटात भूमिका केल्या. 'चंद्रसेना' चित्रपटाची जुळवाजुळव सुरू झाली आणि धायबरांनी कॅमेरा हाती घेतला. त्यानंतरच्या 'जुलूम' या चित्रपटाचे केशव धायबर यांनी दिग्दर्शन केले.

प्रभात फिल्म कंपनीने 'अयोध्येचा राजा' (१९३२), 'अग्निकंकण' (१९३२), 'मायामच्छींद्र' (१९३२) असे चित्रपट काढले. 'अमृतमंथन' (१९३४) चित्रपटाच्या निर्मितीपर्यंत प्रथम श्रेणीचे कॅमेरामन म्हणून धायबर यांचा बोलबाला झाला होता. पुढे त्यांनी प्रभात फिल्म कंपनी सोडली आणि दादासाहेब तोरणे यांचा सरस्वती स्टुडिओ चालवण्यास घेतला आणि जयश्री फिल्म कंपनी स्थापना करून मो.ग. रांगणेकरांच्या कथेवर आधारित 'नंदकुमार' या चित्रपटाची निर्मिती केली.

नंतर मिनर्व्हा मुव्हीटोनने केशवराव धायबरांना एका मराठी चित्रपटाचे दिग्दर्शन करण्याची संधी दिली. चित्रपट होता 'अकरावा अवतार' (१९३९). बडोद्याचे महाराज प्रतापसिंगराव गायकवाड यांच्या राज्यारोहण समारंभाचा चित्रपट त्यांनी केला. पुढे सहा वर्षे सोहराब मोदींच्या मिनर्व्हा मुव्हीटोनमध्ये त्यांनी काम केले. या काळात केशवराव धायबर यांनी 'उलटी गंगा' आणि 'रथदास' या हिंदी चित्रपटांचे दिग्दर्शन केले आणि १९४४ साली प्रभात कंपनीतूनच दामलेमामांचे बोलावणे आल्यावर ते मिनर्व्हा मुव्हीटोन सोडून पुन्हा प्रभातमध्ये दाखल झाले. दरम्यान मे १९४० मध्ये प्रभातच्या अभिनेत्री नलिनी तर्खड यांच्याशी ते विवाहबद्ध झाले.

दामलेमामांच्या निधनानंतर पुन्हा प्रभात कंपनी सोडून बाबूराव पै यांच्या फेमस पिक्चर्समध्ये केशवराव धायबर दाखल झाले. महाराष्ट्र सरकारतर्फे 'श्रीकृष्ण का कल्याण कार्य', 'मुजऱ्याचे मानकरी', गुजराती भाषेतील 'परिवार नियोजन' आणि 'महाराष्ट्रातील तीर्थक्षेत्र' हे लघुपट (डॉक्युमेंटरीज) त्यांनी बनवले.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ** : १) धायबर केशवराव, 'एका जिंदगीची पटकथा', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९६४.

## धुमाळ, अनंत
**साहाय्यक अभिनेता**
**१९१६**



हिंदी सिनेमात १९५० ते १९७० या काळात मुख्य कथेच्या जोडीला एक विनोदी उपकथानक असे. आगा, जॉनी वॉकर, मुकरी इ. हिंदी भाषिकांचा विनोद त्यात असे. पुढे मेहमूदही यामध्ये आला. मात्र मराठी नाटकांतून चित्रपटांतून आलेले अनंत धुमाळ त्याआधीपासूनच या विनोदी उपकथानकामध्ये चांगलेच रुजलेले होते.

'पेडगावचे शहाणे' या चित्रपटात धुमाळ यांनी मद्रासी संगीत शिक्षकाची भूमिका केली. या भूमिकेमुळे ते चित्रपटसृष्टीत नावारूपाला आले. त्यावरून करदारनी हिंदीत 'चाचा चौधरी' केला, तेव्हा धुमाळ यांना तीच भूमिका दिली. त्यामुळे विनोदी अभिनेता म्हणून ते हिंदीत लोकप्रिय ठरले.

– सुधीर नांदगांवकर

* * *

ध

# न



## नलावडे, अरुण जनार्दन

**अभिनेता, दिग्दर्शक, निर्माता**

**२६ ऑगस्ट १९५५**



'श्वास' या चित्रपटाला अभिनयाद्वारे आंतरराष्ट्रीय पातळीवर पोहोचवणाऱ्या अरुण जनार्दन नलावडे यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे वडील जनार्दन हे भारतीय नौदलामध्ये कामाला होते. तसेच ते कामगार चळवळींमध्ये कार्यरत होते. माटुंग्याच्या गोपी टँक हायस्कूलमध्ये अरुण यांचे प्राथमिक शिक्षण झाले, तर माध्यमिक शिक्षणासाठी त्यांनी गिरगावातील युनियन हायस्कूलमध्ये प्रवेश घेतला. घरच्या आर्थिक अडचणींमुळे त्यांची आई गावी गेल्यावर अरुण यांना मामाच्या घरी राहावे लागले. त्यांच्या मामा व काका यांना हिंदी व इंग्रजी चित्रपट पाहण्याचे वेड असल्यामुळे अरुण यांनाही त्यांच्या जोडीने चित्रपट पाहायला मिळत. चित्रपटासंदर्भात मामांशी साधलेला संवाद, चित्रपटाच्या तंत्राचे बारकाईने केलेले निरीक्षण, पाहिलेल्या चित्रपटांचे साभिनय केलेले कथन व उत्कृष्ट वक्तृत्व यामुळे बालपणातच चित्रपटासंदर्भातले त्यांचे आराखडे निश्चित झाले.

युनियन हायस्कूलमध्ये पाचवीच्या वर्गात शिकत असताना अरुण यांना स्नेहसंमेलनात 'पंडित रविभूषण' या नाटकाचा प्रॉम्प्टर म्हणून काम करण्याची संधी मिळाली. पण आयत्या वेळेस नाटकाचा नायक आजारी पडल्यामुळे अरुण यांनी नाटकात नायकाची भूमिका केली. त्या वेळेस पायजम्याच्या सुटलेल्या नाडीचा ताण न घेता, प्रसंगावधान राखत त्यांनी नाटक पूर्ण केले व त्यांच्या अभिनयाचे कौतुक झाले. या प्रसंगामुळे त्यांचा अभिनय करण्याचा आत्मविश्वास वाढला.

आठवीत असताना दादर येथील छबिलदास शाळेतही अरुण यांनी स्नेहसंमेलनासाठी छोट्या नाटिका बसवल्या, त्यासाठी लेखन व दिग्दर्शन केले. बोरिवली येथील गोखले एज्युकेशन शाळेत नववीत असताना त्यांनी मित्र प्रदीप कबरे यांच्या सहकार्याने 'कला शलाका' नावाची संस्था स्थापन करून रमेश पवारांच्या 'हंगर स्ट्राईक', 'सन अँड सँड', 'क्यू', 'उकिरडा', 'कोणं हसलं' या एकांकिका केल्या. त्यात त्यांना सर्वोकृष्ट अभिनेत्याची, दिग्दर्शकाची पारितोषिके मिळाली. रंगमंचीय कारकिर्दीत यशस्वी होत असतानाच ते शालेय जीवनात अयशस्वी ठरले, पण हार न मानता ते पुन्हा नव्या जोमाने अभ्यासाला लागले व पुढल्या वर्षी नववीची परीक्षा उत्तीर्ण झाले. १९७३ मध्ये मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांनी मुंबईच्या रुपारेल महाविद्यालयात प्रवेश घेतला. त्या काळात मुंबईत आघाडीच्या 'प्रबोधन', 'नानासाहेब फाटक', 'इक्सस', 'नॉइजी', 'नाट्यदर्पण' यांसारख्या एकांकिका स्पर्धांमध्ये त्यांनी बक्षिसे पटकावली.

१९७४ मध्ये अरुण नलावडे यांना बी.ई.एस.टी.मधून नोकरीसाठी बोलावणे आल्यामुळे त्यांनी शिक्षण अर्धवट सोडले व कौटुंबिक जबाबदाऱ्यांमुळे तीन वर्षांच्या मोटार मेकॅनिकच्या प्रशिक्षणासाठी बी.ई.एस.टी.त रुजू झाले. याच काळात तेथे बंद पडलेली एकांकिका स्पर्धा नव्याने सुरू झाली आणि त्यांनी पहिल्याच वर्षी उत्कृष्ट अभिनेत्याचे व दिग्दर्शकाचे पारितोषिक पटकावले. चौदा वर्षांच्या आपल्या कार्यकाळात त्यांनी सहकारी व लेखक



न

प्र.ल. मयेकर यांच्या नाट्यसंहितांचे दिग्दर्शन केले. दोन वेळा राज्य नाट्य स्पर्धेत कमी उंचीमुळे नाकारले गेल्यावर त्यांनी प्र.ल. मयेकर व अविनाश नारकर यांच्यासह बाहेरून राज्य नाट्य स्पर्धेत उतरण्याचा निर्णय घेतला. या स्पर्धेसाठी त्यांनी 'अथं मनूस जगन हं' या नावाचे नाटक केले. हे नाटक यशस्वी झाल्यावर डॉ. श्रीराम लागूंनी या नाटकाचे ५० प्रयोग केले. याच दरम्यान अरुण यांची मच्छींद्र कांबळी यांच्याशी ओळख झाली व कांबळी यांनी त्यांना दिग्दर्शनासाठी 'पांडगो इलोरे बा इलो' हे नाटक दिले. या नाटकाने ९५० प्रयोग करण्याचा विक्रम केला. याबरोबरीनेच त्यांनी 'पाहुणा', 'रानभूल', 'रातराणी' यांसारख्या नाटकांचे दिग्दर्शन करून त्यात अभिनयही केला, तर 'गंमतजंमत' या नाटकात त्यांनी एकूण तेरा भूमिका साकारल्या असून त्यातील प्रत्येक भूमिका जीवनाविषयीचे तत्त्वज्ञान मांडणारी होती.

अरुण नलावडे यांच्यावर श्रीराम लागू यांच्या कार्यपद्धतीचा प्रभाव पडला आणि नेमके त्याच वेळी त्यांना श्रीराम लागूंसोबत 'नटसम्राट'मध्ये आप्पा बेलवलकरांच्या जावयाची भूमिका मिळाली. ही भूमिका छोटी असली तरी त्यांनी ती अत्यंत प्रत्ययकारी पद्धतीने साकारली. यानंतर नलावडे यांना व्यावसायिक रंगभूमीवरील 'वासूची सासू' या नाटकातील 'बंड्या'ची भूमिका मिळाली. त्यांची ही भूमिका लहान असली तरी त्यातल्या दारुड्याचा विनोदी भाव त्यांनी तंतोतंत अभिव्यक्त केला. दारू प्यायल्यावर शुद्ध येणाऱ्या, पण वास्तवात विरोधाभास निर्माण करणारी ही विनोदी भूमिकाही अरुण नलावडे यांच्या अभिनयकौशल्यामुळे लक्षात राहते. या नाटकानंतर हौशी रंगभूमीशी असणारे नलावडे यांचे नाते कमी झाले व त्यांची व्यावसायिक वाटचाल सुरू झाली.

कलावैभवच्या मोहन तोंडवळकरांनी नलावडे यांना 'कार्टी श्रीदेवी' या वसंत सबनीसलिखित नाटकाचे दिग्दर्शन करण्याची संधी दिली. यानंतर मात्र त्यांनी चित्रपटसृष्टीकडे आपला मोहरा वळवला. त्यांनी 'स्पंदन', 'तिचा बाप त्याचा बाप', 'गोजिरी' यांसारख्या चित्रपटांमध्ये काम केले. 'श्री सिद्धिविनायक महिमा' या चित्रपटांचे दिग्दर्शनही त्यांनी प्रभावीपणे केले. 'ही पोरगी

कुणाची' हा टेस्टट्यूब बेबी या वेगळ्या धाटणीच्या विषयावर आधारित, गिरीश मोहिते यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटात हवालदाराची भूमिका त्यांनी साकारली. संवेदनशील मनाचा हा हवालदार प्रेक्षकांच्या मनात घर करून राहतो. कोणत्याही स्वार्थाची अपेक्षा न ठेवणारा, सोज्ज्वळ मनाचा, माणुसकी बाळगणारा व मदत करणे पोलीस या नात्याने आपला हा नैतिक अधिकार आहे असा मानणारा हा भाबडा हवालदार बाप नसणाऱ्या मुलीचा स्वीकार प्रांजळपणे करण्यास तयार होतो, हा परंपरेला विरोध करणारा विचार नलावडे यांनी प्रेक्षकांसमोर ठेवला.

अरुण नलावडे स्वत: दिग्दर्शित केलेल्या नाटक-चित्रपटामध्ये काम करत असताना त्या त्या संहितेचे वाचन करून कथानकातील सर्व पात्रे, त्यांच्या मनोभूमिका समजून घेतात. दिग्दर्शन व अभिनयासाठी लागणारा हा सर्व मनोव्यापार व अभ्यास पूर्ण झाल्यावरच ते आपल्या कामातून कलाकृतीला न्याय देतात. म्हणूनच त्यांच्या सर्व भूमिका संवेदनशीलपणे प्रेक्षकांपुढे येतात. त्यांची प्रत्येक भूमिका प्रेक्षकांना नवा विचार देऊन जाते आणि त्या भूमिकेचे बारकावेही मांडते. आपल्या आजूबाजूला वावरणारी माणसेच कलाकृतीत दिसतात, त्यांचाच आविष्कार कलाकृतीतून होत असतो, या साहित्य व समाज यांच्यातील अन्योन्यसंबंधाचे भान अरुण नलावडे यांच्याकडे असलेले दिसते. त्याचे उदाहरण द्यायचे झाले तर आपल्याला 'श्वास' या चित्रपटाचे द्यावे लागेल. त्यातली केशवराव विचारेंची भूमिका गावातल्या सर्वसामान्य माणसाची हतबलता दाखवत असतानाही आपल्या नातवाच्या आजारापणातील हळवेपणही दाखवून जाते, तसेच अडचणीच्या काळात आवश्यक असणारा कणखरपणाही दृग्गोचर करते. आपल्या भोवतालचे निरीक्षण हा अभिनयाचा व दिग्दर्शनाचा गाभा आहे, असे मानणाऱ्या अरुण यांनी या चित्रपटातील कोकणातील वृद्धाची भूमिका जशीच्या तशी उठवली आहे. त्यांच्या अभिनयातील सच्चेपणा व सहजता हे गुण त्यांनी भूमिकेच्या व व्यक्तिरेखेच्या बारकाईने केलेल्या अभ्यासात आढळतात. 'श्वास'सारखा वास्तववादी चित्रपट चालणार नाही अशी चर्चा चित्रपटसृष्टीत चालू असतानाही अरुण नलावडे व त्यांच्या सहकाऱ्यांनी नेटाने हा चित्रपट केला व तो ऑस्करसाठी गेला, हे विशेष. याशिवाय त्यांनी 'काय द्याचं बोला' (२००४), 'अकल्पित', 'क्षण', 'साडे माडे तीन', या चित्रपटांमध्येही काम केलेले आहे. त्यांनी दूरदर्शनवरील 'आभाळमाया', 'वादळवाट', 'गहिरे पाणी', 'अवघाचि संसार' इ. मालिकांमध्येही काम केलेले आहे. तसेच सध्या ते 'टाईम प्लीज' नावाचे नाटक करत आहेत.

कलाकृतींची अभ्यासपूर्ण निवड, त्यावर केलेले दिग्दर्शीय काम व भूमिका साकार करण्यापूर्वी भूमिकेचा केलेला अभ्यास या सर्वांमुळे अरुण नलावडे यांचे चित्रपट निश्चितपणे यशस्वी ठरतात.

– डॉ. अर्चना कुडतरकर

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## नवाथे, चित्रा राजा

*चित्रा*

**अभिनेत्री**

**२३ सप्टेंबर १९३५**



मराठी-हिंदी चित्रपटसृष्टीत १९५० च्या दशकात दुर्गा खोटे, शोभना समर्थ, सुलोचना अशा दिग्गज अभिनेत्रींनी आपले साम्राज्य उभे केले होते. या मराठी तारकांच्या प्रभावळीत कोकणातील आचरा येथून आलेल्या कुसुम आणि कुमुद शांताराम सुखटणकर या दहाबारा वर्षांच्या बहिणीदेखील मराठी-हिंदी चित्रपटात, १९४५ च्या दरम्यान, चित्रपटातील वाढदिवस, लग्न, शाळा अशा समूहदृश्यांमधून बालकलाकार म्हणून झळकत होत्या. कुसुम आणि कुमुद या दोन बहिणी म्हणजे पुढे मराठी-

हिंदी चित्रपटात गाजलेल्या अनुक्रमे चित्रा आणि रेखा. ग.दि. माडगूळकरांनी ‘लाखाची गोष्ट’ चित्रपटाच्या वेळी कुसुमचे ‘चित्रा’ आणि कुमुदचे ‘रेखा’ असे नामकरण केले.

मुंबईत दादर येथील मिरांडा चाळीत सुखटणकर कुटुंब राहत होते. चार बहिणी, दोन भाऊ, आईवडील असा चित्रा म्हणजे कुसुम यांचा लग्नापूर्वीचा परिवार. मुंबईत भवानीशंकर रोडवरील प्राथमिक शाळेत त्यांचे ७वीपर्यंतचे शिक्षण झाले आणि आर्थिक परिस्थितीमुळे चित्रा यांना विद्यामंदिराऐवजी चित्रमंदिरात प्रवेश करावा लागला. त्यांनी चित्रपट स्टुडिओचा उंबरठा ओलांडला आणि कलावंत म्हणून आपल्या वाट्याला आलेले काम यशस्वी करून दाखवले आणि ग.दि. माडगूळकरांनी दिलेले ‘चित्रा’ हे नाव सार्थ करून दाखवले.

कुसुम सुखटणकर म्हणजे चित्रा यांचे वडील मुंबईत एका कार्यालयात नोकरी करीत. आई घरीच असे. त्या वेळी दशावतार, मेळे, गणेशोत्सव, दिवाळी, होळी, नारळीपौर्णिमा, दहीकाला अशा सण-उत्सवांतून कुसुम, कुमुद या बहिणीदेखील नृत्य, अभिनय पेश करत असत. त्यांचे वडील शांताराम सुखाटणकर हेदेखील अधूनमधून रघुवीर सावकार, भार्गवराम आचरेकर, वसंत आचरेकर या आपल्या गाववाल्या स्नेहयांच्या मैत्रीमुळे त्यांच्या नाटकातून भूमिका करत असत. हीच कलेची पार्श्वभूमी लाभलेल्या या दोन चुणचुणीत आणि देखण्या मुलींचा अभिनय, त्यांचे नृत्यातील कसब पाहून त्यांना बालकलाकार म्हणून कामे मिळू लागली. त्या काळात त्यांना दिवसभराच्या कामासाठी रु. ५ मिळत. पुढे त्यांना होमी वाडियांच्या फिल्म कंपनीत प्रॉडक्शन इन्चार्ज असलेल्या तळपदे यांच्या ओळखीतून कामे मिळू लागली. विशेषतः संत चित्रपटात त्यांनी बऱ्याच भूमिका केल्या. बाबूराव पै यांच्या फेमस स्टुडिओमध्येही त्यांना कामे मिळू लागली. विश्राम बेडेकर, गोविंद घाणेकर, दिनकर पाटील, राजा परांजपे, ग.दि. माडगूळकर, राम गबाले अशा प्रथितयश आणि बड्या चित्रपट निर्मात्यांच्या, दिग्दर्शकांच्या पारखी नजरेतून त्या सुटल्या नाहीत. याच वेळी हंसा वाडकर या त्या काळातील आघाडीच्या अभिनेत्रीने ‘या दोन बहिणींना मोठी कामे द्या, त्या पेलतील’ असे राजाभाऊ परांजपे यांना सुचवले. त्यानुसार १९५१ साली ‘लाखाची गोष्ट’ हा चित्रा यांना नायिका म्हणून मिळालेला पहिला चित्रपट होता. त्यांचे नायक होते विवेक. तो खूपच गाजला. त्यानंतर चित्रा यांनी ‘वहिनीच्या बांगड्या’, ‘देवबाप्पा’, ‘गुळाचा गणपती’, ‘बोलविता धनी’, ‘उमज पडेल तर’, ‘मोहित्यांची मंजुळा’, ‘कोरीची पायरी’, ‘भैरवीर’, ‘छत्रपती शिवाजी’ अशा सुमारे पंचवीस चित्रपटांमधून मुख्य भूमिका साकारल्या. त्या काळातील विवेक, राजा गोसावी, सूर्यकांत, चंद्रकांत अशा अभिनेत्यांसह त्यांचा अभिनय रसिकांच्या पसंतीस उतरला होता. चित्रा यांनी ‘बोक्या सातबंडे’, ‘अगडबंब’ या चित्रपटात काम केले. ‘टिंग्या’ हा चित्रपट त्यांनी वयाच्या ७८ व्या वर्षी केला, तो आजीची भूमिका साकारून. चित्रा यांच्या अभिनयातील विशेषता होती ती, त्यांच्यातील शहरी नायिकेला आवश्यक असलेले व्यक्तिमत्व आणि सौंदर्य. कोकणातील असूनही मुंबईसारख्या आधुनिक शहरात वाढल्यामुळे आपसूकच येणारा शहरी स्पष्टवक्तेपणा आणि आत्मविश्वास त्यांच्या भूमिकेतून दृश्यमान होत असे आणि त्यामुळेच श्रीमंत बापाची मुलगी, स्वाभिमानी स्त्री असा बाज असलेल्या भूमिकांसाठी त्यांच्याकडे पाहिले जात असे. म्हणूनच त्यांचा चेहरा शहरी नायिकेसाठी योग्य असा गणला जाई. चित्रा यांनी गुरू पार्वतीकुमार, सचिन शंकर यांच्याकडून नृत्यकला शिकून घेतली होती.

राज कपूर यांच्या ‘आह’ चित्रपटात सहदिग्दर्शक म्हणून राजा नवाथे काम करत होते. त्यातील एका गाण्यातील नृत्यात चित्रादेखील होत्या. तेथेच राजाभाऊ नवाथे यांच्याशी त्यांचा परिचय झाला आणि परिचयाचे रूपांतर विवाहबंधनात झाले. लग्नानंतर चित्रा यांनी चित्रपटातील कामे कमी केली आणि त्या गृहिणी बनल्या. परंतु अभिनयाची आपली आवड लक्षात घेऊन त्यांनी ब्रिटानिया बिस्किटच्या जाहिरातीतील आजी

न

साकारली. ती आजही प्रेक्षकांच्या स्मरणात आहे.

आपला स्वतंत्र चाहता वर्ग चित्रा यांनी निश्चितपणे निर्माण केला होता. त्यामध्ये अनेक साहित्यिकांसह सर्वसामान्यांमधील असंख्य चाहते होते आणि आजही आहेत. 'त्या तिथे पलीकडे माझिया प्रियेचे झोपडे', 'करू देत शृंगार', 'कुणी छेडिली तार', 'इथेच टाका तंबू', 'नाच रे मोरा' अशा कित्येक गाण्यांनी आजही चित्रपटरसिकांना नोस्टॅल्जिक केले आहे. मराठी चित्रपटांबरोबरच चित्रा यांनी काही नाटकेही केली आहेत. 'तुझे आहे तुजपाशी'तील उषा, 'लग्नाची बेडी'तील यामिनी इत्यादी भूमिकांवर त्यांनी आपली छाप उमटवली होती. मराठी नाट्य-चित्रपटांबरोबरच त्यांनी हिंदी, गुजराथी चित्रपटांतही कामे केली.

चित्रा यांच्या चित्रपट-नाट्य क्षेत्रातील दखल वेळोवेळी घेण्यात आली. रसिकांनी त्यांच्यावर कौतुकाचा वर्षाव करून प्रेम व्यक्त केले आहेच, परंतु विविध पुरस्कारांनी त्यांना आजवर गौरवण्यात आले आहे. राजा परांजपे प्रतिष्ठान, पुणे; अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळ; नाट्याचार्य गोविंद बल्लाळ देवल या पुरस्कारांसह ४५ व्या महाराष्ट्र राज्य चित्रपट महोत्सवात त्यांना जीवनगौरव पुरस्काराने सन्मानित केले आहे. २०१० सालचा महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक पुरस्कार त्यांना प्रदान करण्यात आला आहे. 'टिंग्या' चित्रपटासाठी त्यांना पुरस्कार देऊन सन्मानित केले आहे.

चित्रा सध्या मुंबईतील जुहू भागात समाधानाने निवृत्तीचे जीवन व्यतीत करत आहेत.

— संदीप राऊत

न

## नांदगावकर, शांताराम मालोजी

**गीतकार**

**१९ ऑक्टोबर १९३६ — ११ जुलै २००९**

आशयघन आणि समर्पक शब्दरचनांमुळे, संगीतानुकूल शब्दयोजनेमुळे सर्व संगीतकारांचे आवडते गीतकार म्हणून शांताराम नांदगावकर यांचा लौकिक होता. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील नांदगाव हे त्यांचे मूळ गाव



होते, पण त्यांचे बालपण मुंबईमध्ये गेले. शांताराम यांच्या लहान वयातच त्यांचे वडील मालोजी नांदगावकर यांचे निधन झाले, त्यामुळे उदरनिर्वाहाकरता त्यांच्या आईला — चंद्राबाई नांदगावकर यांना गिरणीमध्ये नोकरी पत्करावी लागली. त्यासाठी परळला हाफकिन इन्स्टिट्यूटमधील वास्तव्य हलवून त्यांना कुटुंबीयांसमवेत गावात नातेवाइकांकडे राहायला जावे लागले. तुटपुंज्या कमाईत हलाखीचे आयुष्य जगताना शांताराम यांचे शिक्षणही कसेबसे सुरू होते. त्याच सुमाराला भावसंगीताचे सुखावणारे वारे वाहू लागले. गजानन वाटवे, बबन नावडीकर यांचे नाव होत होते आणि ठिकठिकाणी त्यांचे कार्यक्रम होत होते. दादरला झालेल्या अशाच भावसंगीताच्या कार्यक्रमात 'प्रेमस्वरूप आई, वात्सल्यसिंधू आई' या गाण्याने शांताराम नांदगावकर प्रभावित झाले. 'आपणही काहीतरी लिहावे' असा ध्यास त्यांनी घेतला. हळूहळू या प्रेरणेने त्यांनी दोन-दोन ओळी लिहिण्यास प्रारंभ केला. पण मनासारखे कागदावर उतरत नव्हते. एकीकडे लेखनाविषयीची ओढ, दुसरीकडे घरची बेताची परिस्थिती, शिक्षणाविषयीची आस्था या कसरती करत असताना त्यांचा सुलोचना यांच्याशी विवाह झाला.

लग्नानंतर पहिले घर सोडून नांदगावकर आपल्या कुटुंबीयांसमवेत ऑपेरा हाऊस येथे राहू लागले. १९६३ च्या सुमाराला रजनीकांत राजाध्यक्ष यांनी संगीतकार दशरथ पुजारी यांच्याबरोबर शांताराम नांदगावकर यांची ओळख करून दिली. दरम्यानच्या काळात सुचलेल्या लयबद्ध ओळी नांदगावकर आपल्या वहीमध्ये लिहून ठेवत, ती गीते त्यांनी दशरथ पुजारी यांना दाखवली. त्यांना ती गीते खूप आवडली. सुमन कल्याणपूर यांनी गायलेले, दशरथ पुजारी यांनी संगीत दिलेले 'ही नव्हे चांदणी, ही तर मीरा गाते' हे नांदगावकरांचे पहिले गीत

ध्वनिमुद्रित झाले. या ध्वनिमुद्रणासाठी त्यांना १५ रुपये मानधन मिळाले होते. त्यानंतर थोड्याच दिवसांनी 'रात्र आहे पौर्णिमेची, तू असा येऊन जा' या गीताने नांदगावकरांना गीतकार म्हणून ओळख मिळवून दिली. ग.दि. माडगूळकरांनीही त्यांच्या सहजसुंदर गीतरचनांचे कौतुक केले. त्यांच्या गीतलेखनाचा प्रवाह पुढे सातत्याने सुरू राहिला. शांताराम नांदगावकरांनी ७० आणि ८० अशा दोन दशकांमध्ये एक सिद्धहस्त गीतकार म्हणून मराठी चित्रपटसृष्टीमध्ये स्वत:चे वलय निर्माण केले होते. दशरथ पुजारी, कमलाकर भागवत, प्रभाकर जोग, अशोक पत्की, अनिल मोहिले, अरुण पौडवाल यासारख्या संगीतकारांबरोबर त्यांनी काम केले. 'रजनीगंधा', 'बंदिनी', 'बकुळीच्या तळी', 'सजल नयन' या ध्वनिमुद्रिकांना अतिशय लोकप्रियता मिळाली.

'सूर सनईत नादावला', 'हे सावळ्या घना', 'विसर प्रीत विसर गीत' यांसारखी भावविभोर गीते व 'येऊ कशी प्रिया', 'रुपेरी वाळूत', 'अनुरागाचे थेंब झेलती' अशी अल्लड प्रेमगीते ज्या भावुकतेने नांदगावकरांनी लिहिली, त्याच लेखणीने त्यांनी 'ससा तो ससा', 'बे एके बे', 'सांग सांग भोलानाथ' ही सहजसोपी बाळबोध बालगीतेही लिहिली. भक्तिरसपूर्ण अशा 'हरीनाम मुखी रंगते', 'पंढरीनाथा झडकरी आता', 'प्रभू मी तुझ्या करातील वीणा' या रचनाही त्यांनी केल्या.

अतिशय कमी वेळात गीतरचना करणारे गीतकार अशी त्यांची ख्याती होती. संगीत व चित्रपटसृष्टीमध्ये अनेकांना त्यांच्या शीघ्रकवित्वाची प्रचिती आली आहे. अत्यंत लोभस शब्दरचना, गेयता, सहजी तोंडावर रुळणारे धृवपद यांमुळे त्यांच्या गीतांनी रसिकांच्या मनावर राज्य केले. आकाशवाणीचे मान्यताप्राप्त गीतकार म्हणून त्यांनी अनेक वर्षे काम केले. आकाशवाणीकरता 'कारवाँ चालला', 'शांतिदूत' या संगीतिका लिहिणाऱ्या शांताराम नांदगावकरांनी दूरदर्शनच्या 'फुलोरा'सारख्या गीतमालेसाठीही गीते लिहिली.

भावगीतांप्रमाणे चित्रपटासाठीही प्रसंगानुरूप गीते लिहिण्यासाठी त्यांची लेखणी तत्पर होती. १९८० च्या दशकातील 'अशी ही बनवाबनवी', 'गंमत जंमत', 'गोडीगुलाबी', 'नवरी मिळे नवऱ्याला', 'गुपचूप गुपचूप', 'धूमधडाका' अशा चित्रपटांत गीतकार म्हणून शांताराम नांदगावकर हे नाव अपरिहार्यपणे झळकू लागले. १९७९ मध्ये प्रदर्शित झालेल्या 'अष्टविनायक' या चित्रपटाची चर्चा कथा, पटकथा, संगीत याबरोबरच गीतांच्या संदर्भातही झाली. सिनेटोन मुव्हीजच्या 'पैजेचा विडा' या चित्रपटाची गीते नांदगावकरांनी लिहिली, ती ध्वनिमुद्रितही झाली. 'कुंकू', 'रणांगण', 'आक्का', 'आई पाहिजे' या चित्रपटांची गीतेही त्यांनी लिहिली.

मराठी चित्रपटांप्रमाणे हिंदी चित्रपटसृष्टीकडेही त्यांची वाटचाल सुरू झाली होती. 'दूध का कर्ज' या चित्रपटातील गीते शांताराम नांदगावकरांनी लिहिली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जीवनकार्यावर आधारित गीतरचना अतिशय ओघवत्या शैलीने लिहिल्या, 'दलितांचा राजा भीमराव माझा' या ध्वनिमुद्रिकेतील सर्व गीते लोकप्रियतेच्या शिखरावर होती. याशिवाय 'एकवीरा देवी', 'साईबाबा', 'गौतम बुद्ध' अशा श्रद्धाकेंद्रित गीतरचनाही ध्वनिमुद्रिकांच्या रूपाने प्रसिद्ध झाल्या. त्यांनी जवळजवळ १५०० गणपती गीते लिहिली आहेत.

कलाक्षेत्राप्रमाणे शांताराम नांदगावकर यांचा राजकीय क्षेत्राशीही संबंध आला. १९९५ साली 'महाराष्ट्र स्टेट कौन्सिल'साठी त्यांची शिवसेनेकडून निवड झाली. १९९४ साली त्यांची 'स्टेज परफॉर्मन्स स्क्रूटिनी बोर्ड'च्या अध्यक्षपदी नियुक्ती झाली. कलाक्षेत्राशी एकरूप झालेले नांदगावकर सुरुवातीच्या काळात एअर इंडिया या विमानकंपनीत नोकरी करत होते. या काळातही सिनेसृष्टीतील अनेक कलाकारांशी त्यांचा स्नेह जुळला. कालांतराने त्यांनी नोकरीमधून स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली आणि निष्ठेने गीतलेखन केले. नवी दिल्ली येथे १९७४ साली 'राष्ट्रीय कवी' म्हणून नांदगावकर यांचा गौरव करण्यात आला. तसेच 'सूरसिंगार'चा सर्वोत्कृष्ट गीतकाराचा पुरस्कारही त्यांना प्राप्त झाला आहे. 'बकुळीच्या तळी' हा त्यांच्या

कवितांचा संग्रह आणि 'रुपेरी वाळूत' हा ध्वनिमुद्रित गीतांचा संग्रह प्रकाशित झाला आहे.

नांदगावकर यांनी १९७९ साली 'संत सखू' या विषयावर नृत्यनाट्य लिहिले. वैजयंतीमाला यांनी सादर केलेले हे नृत्यनाट्य वसंत देसाई यांनी संगीतबद्ध केले. दूरदर्शनवरून प्रसारित झालेल्या गौतम बुद्धांवर आधारित एका मालिकेचे लेखन शांताराम नांदगावकर यांनी केले होते. माजी पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी ही मालिका पाहिली आणि त्या प्रभावित झाल्या. या मालिकेचे सर्व भाषांमध्ये रूपांतर करण्याची सूचनाही त्यांनी दिली.

आयुष्याच्या अखेरीला काही वर्षे 'अल्झायमर' या विकाराने ते त्रस्त होते. नांदगावकरांनी मुंबईमध्ये वयाच्या त्र्याहत्तराव्या वर्षी कलाजगताचा निरोप घेतला. प्रशांत व मिलिंद ही शांताराम नांदगावकर यांची दोन मुले आणि एक मुलगी आज कलाक्षेत्रात कार्यरत आहेत.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

न

## नाईक, उषा

**अभिनेत्री**

**जन्मदिनांक अनुपलब्ध**



डॉ. जब्बार पटेल दिग्दर्शित 'सामना' या चित्रपटाद्वारे उषा नाईक यांनी चित्रपटक्षेत्रात पाऊल ठेवले. 'सख्या रे घायाळ मी हरणी' हे या चित्रपटातले गीत त्यांच्यावरच चित्रित झाले होते.

उषा यांनी लहान वयापासून शास्त्रीय नृत्याचे धडे घेतले. त्यामुळे अभिनेत्रीबरोबर नृत्यांगना म्हणूनही त्यांची ओळख तयार झाली. 'जोतिबाचा नवस' व 'करावं तसं भरावं' या चित्रपटातून त्यांनी छोट्या भूमिका केल्या. अनंत माने दिग्दर्शित 'पाच रंगाची पाच पाखरं' या चित्रपटात त्यांनी नायिका म्हणून प्रथम काम केले.

त्यानंतर 'सुशीला', 'बन्याबापू', 'अनोळखी', 'दुनिया करी सलाम', 'हळदीकुंकू', 'देवाशपथ खरं सांगेन', त्याचबरोबर 'आई', 'नवरे सगळे गाढव', 'चांदणे शिंपीत जा', 'माफीचा साक्षीदार', 'संसार पाखरांचा', 'पायगुण', 'जगावेगळी प्रेमकहाणी' अशा जवळपास १२५ मराठी चित्रपटांत त्यांनी वेगवेगळ्या भूमिका केल्या. नृत्यप्रधान चित्रपटाबरोबरच गंभीर आणि विनोदी भूमिकाही त्यांनी समरसून साकारल्या. 'हळदीकुंकू' या चित्रपटातल्या त्यांच्या भूमिकेसाठी त्यांना महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक मिळाले. 'देवाशपथ खरं सांगेन' या चित्रपटातील भूमिकेसाठी उषा नाईक यांना 'सर्वोत्कृष्ट अभिनेत्री' म्हणून 'फिल्मफेअर' पुरस्कार मिळाला.

हिंदी, भोजपुरी, ओरिया, कन्नड अशा विविध भाषिक चित्रपटांतही त्यांनी काम केले. शिवाय काही चित्रपटांसाठी नृत्यदिग्दर्शिका म्हणूनही त्यांनी काम केले आहे. 'काल रात्री बारा वाजता' या चित्रपटासाठी त्यांना उत्कृष्ट नृत्यदिग्दर्शकाचे पारितोषिक मिळाले. दूरदर्शनवरील स्टार प्रवाह या वाहिनीवर 'स्वप्नांच्या पलीकडले' अशा मालिकांतून आजही उषा नाईक यांचा अभिनयप्रवास सुरूच आहे.

– महेश टिळेकर

## नाईक, पांडुरंग सातू

**छायाचित्रकार, निर्माता**

**१३ डिसेंबर १८९९ – २१ ऑगस्ट १९७६**

पांडुरंग सातू नाईक यांचा जन्म गोमंतकात म्हार्दोळ गावात झाला. त्यांचे वडील फूलविक्रेते होते. घरची परिस्थिती अत्यंत बेताची होती. त्यामुळे त्यांनी इयत्ता तिसरीपर्यंतच कसेबसे शिक्षण घेतले आणि पूजेसाठी लागणाऱ्या फुलांची आरास करण्याची कला ते वडिलांकडून शिकले. १९१३ साली त्यांच्या वडिलांचा मृत्यू झाला. घरचा भार सांभाळण्यासाठी १९१६ साली पांडुरंग नाईक थेट दादासाहेब फाळके यांना भेटले. तेथे त्यांना सुतारखात्यात नोकरी मिळाली. मात्र



सुतारकामासह त्यांनी त्या काळात पडतील ती कामे केली आणि त्याच काळात कॅमेऱ्याच्या हालचालींकडेही त्यांनी लक्ष दिले. 'सावित्री' या चित्रपटानंतर त्यांनी दादासाहेब फाळके यांच्या कंपनीतली नोकरी सोडली आणि ते 'भारत विजय' या नाट्यसंस्थेत सुतारखाते आणि रंगखाते विभागात काम करू लागले. काही दिवसांनी नाईक यांनी पाटणकरांच्या 'पाटणकर फ्रेंड्स' या चित्रसंस्थेत साहाय्यक छायालेखक म्हणून काम करायला सुरुवात केली. त्या अगोदर मूकपटाच्या जमान्यात मूकपटात विष्णुकुमार व्यासांच्या पेटीवादनाला तबलावादनाची साथही ते करत असत. चित्रकलेची आणि छायाचित्रकलेची आवड तर त्यांना पूर्वीपासूनच होती. नंतर त्यांनी 'कोहिनूर फिल्म कंपनी'त काम सुरू केले. त्या काळात तेथे 'अनसूया' चित्रपटाचे काम सुरू होते. त्याचे छायाचित्रकार होते माणिकलाल पटेल. त्यांचे साहाय्यक छायालेखक म्हणून नाईक काम पाहू लागले. देव्हारे, दाबके, जोशी असे आघाडीचे छायाचित्रकार त्या काळी काम करत होते. त्यांच्याकडून नाईकांनी छायाचित्रकलेतले बारकावे समजून घेतले.

लक्ष्मी पिक्चर्सनिर्मित 'नीरा' हा पांडुरंग नाईक यांनी छायालेखन केलेला पहिला चित्रपट. त्यानंतर 'आशा', 'बुलबुले', 'परिस्तान', 'फातमा' यांसारखे बरेच चित्रपट त्यांनी छायाचित्रित केले. 'फातमा' हा त्यांनी ट्रिक फोटोग्राफी केलेला पहिला चित्रपट. या चित्रपटाच्या छायालेखनावर चंदुलाल शहा खूश होते. पांडुरंग नाईक यांनी चंदूलाल शहांच्या 'विश्वमोहिनी', 'राजलक्ष्मी', 'चंद्रमुखी' या चित्रपटांचे छायालेखन केले.

पुढे शहा यांनी रणजित स्टुडिओची स्थापना केली आणि पांडुरंग नाईक यांना बोलावून घेतले. रणजितमध्ये त्यांनी अनेक मूकपटांचे आणि बोलपटांचे छायालेखन केले. १९३० साली त्यांनी इंग्लंडचा आणि जर्मनीचा दौरा केला. या दौऱ्यात त्यांनी तिथले स्टुडिओ, छायालेखन, वातावरणनिर्मिती यांची पाहणी केली. तीन महिन्यांच्या या दौऱ्यात जर्मनीच्या 'उफा' या स्टुडिओत ते जाऊन आले. नंतर त्यांनी इंपिरियल फिल्म कंपनीत काम करण्यास सुरुवात केली. तेथे त्यांनी 'इंदिरा एम.ए.', 'वाईल्ड कॅट ऑफ बॉम्बे', 'पुजारीन' हे चित्रपट केले. 'इंदिरा एम.ए.' हा पांडुरंग नाईक यांचा सर्वात आवडता चित्रपट होता. रुबी मायर्स या त्यांची नायिका होत्या.

नाईक यांची १९३५ साली बाबूराव पेंढारकरांशी भेट झाली. बाबूरावांनी त्यांच्यापुढे स्वत:ची फिल्म कंपनी स्थापन करण्याचा प्रस्ताव मांडला. संस्थेसाठी लागणारे भांडवल म्हणून शहा यांनी पंधरा हजार रुपये दिले आणि 'हंस चित्र' ही संस्था स्थापन झाली.

पांडुरंग नाईक यांनी 'हंस चित्र' निर्मित 'ज्वाला' या चित्रपटाचे अप्रतिम छायाचित्रण केले. या चित्रपटातले गुहेचे देखावे चित्रित करणे ही पाडुरंग नाईक यांची कसोटी होती. पुढे पांडुरंग नाईक यांनी 'धर्मवीर', 'प्रेमवीर', 'ब्रह्मचारी', 'ब्रँडीची बाटली', 'सुखाचा शोध', 'देवता' आणि 'अर्धांगी' या हंस चित्रच्या सगळ्याच बोलपटांचे चित्रण केले.

कालांतराने 'हंस'चे रूपांतर 'नवयुग'मध्ये झाले होते. नवयुगनिर्मित 'लपंडाव', 'अमृत', 'लग्न पाहावं करून' या चित्रपटाचे छायालेखनही पांडुरंग नाईक यांनी केले. या चित्रपटांच्या यशात पांडुरंग नाईक यांच्या उत्कृष्ट छायालेखनाचा मोठा वाटा होता.

'नवयुग' सोडल्यानंतर पांडुरंग नाईक यांनी बाबूराव पेंढारकरांसमवेत 'नवहंस चित्र संस्था' स्थापन केली आणि 'भक्त दामाजी', 'पहिला पाळणा' आणि 'पैसा बोलतो आहे' या तीन चित्रपटांचे छायालेखन केले. त्याच सुमारास प्रभातच्या 'लाखाराणी' या बोलपटाचे छायालेखन केले. 'पहिला पाळणा' हा सामाजिक चित्रपट आणि 'लाखाराणी' हा पोशाखी चित्रपट होता. काव्यात्म छायाचित्रणाचा उत्कृष्ट नमुना म्हणून त्या काळात अन्य छायाचित्रकार या चित्रपटाचा उल्लेख करत.

नवहंस चित्र संस्थेवर बाबूराव पटेल यांनी ताबा मिळवला, तेव्हा पांडुरंग नाईक यांनी भागीदारी सोडली.

पुढच्या काळात पांडुरंग नाईक यांनी 'चूल आणि मूल', 'पगडी', 'आरती', 'चिराग कहाँ रोशनी कहाँ', 'प्यार का सागर', 'दूरकी आवाज' असे अनेक हिंदी व मराठी चित्रपट केले. भारत सरकारने निर्माण केलेल्या विश्राम बेडेकर दिग्दर्शित 'लोकमान्य टिळक' या पाऊण तासाच्या माहितीपटाचे छायाचित्रण पांडुरंग नाईक यांनी केले.

पांडुरंग नाईक यांच्याकडे सुरेंद्र नाईक, राजू नाईक, अनंत कदम, जमशेद इराणी, व्ही. बाबासाहेब, कामत-घाणेकर, श्रीधर नाईक, रत्नाकर लाड अशा आघाडीच्या छायाचित्रकारांनी धडे गिरवले.

मुंबईत पांडुरंग नाईक यांचा मृत्यू झाला. त्यांच्या मरणोत्तर मुंबई महानगर पालिकेने शिवाजी पार्क, रस्ता क्र. ५ चे 'पांडुरंग नाईक मार्ग' असे नामकरण करून त्यांच्या कामाचा गौरव केला.

न

– द.भा. सामंत

## नायक, कांचन प्रभाकर

**दिग्दर्शक, लेखक**

**१३ नोव्हेंबर १९५५**



भावनात्मक कथा हाताळणारा दिग्दर्शक अशी ओळख असणारे एक दिग्दर्शक म्हणजे कांचन नायक. त्यांचा जन्म पुणे येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे वडील प्रभाकर नायक हे दिग्दर्शक असले तरी त्या काळात मराठी चित्रपटसृष्टी हलाखीच्या अवस्थेत होती. या काळात चित्रपट कमी निघत असल्यामुळे प्रभाकर नायक यांच्याकडे काम नसे. त्याचा परिणाम अर्थातच घरच्या सांपत्तिक स्थितीवर झाला.

कांचन नायक यांना लहानपणापासूनच वाचनाची आवड होती. वाढत्या वयानुसार ती वाढतच गेली. त्या वयात वाचनातून मिळालेल्या ज्ञानामुळे ते तरुण वयातच समजूतदार व गंभीर प्रवृत्तीचे झाले. आजूबाजूच्या सगळ्या गोष्टींकडे ते अधिक डोळसपणे पाहू लागले व त्याचा फायदा त्यांना दिग्दर्शन करताना होऊ लागला.

कांचन नायक यांच्या वडिलांनी त्यांना या व्यवसायात येण्यास नकार दिला असला तरीही त्यांनी १९७२ साली आपले वडील प्रभाकर नायक यांच्या समवेत 'थापाड्या', 'पटलं तर व्हय म्हणा' या चित्रपटांचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून कारकिर्दीला सुरुवात केली. पण यातून मिळणारे आर्थिक उत्पन्न तुटपुंजे असल्यामुळे त्यांनी नोकरी करण्याचा विचार केला. त्या वेळेस त्यांनी लेथ मशीनवरही काम केले. पण यात मन न रमल्यामुळे त्यांनी कलाक्षेत्रातच काम करण्याचा निश्चिय केला. या निश्चियामागे अर्थातच आपण चांगले काम करू शकू हा आत्मविश्वास होता.

हा निर्णय घेतल्यावर त्यांनी वडिलांच्या तालमीत तयार होण्यापेक्षा इतर दिग्दर्शकांकडे काम करण्याचे ठरवले आणि 'राजदत्त' यांच्याकडे काम करण्यास सुरुवात केली. राजदत्त यांच्या मार्गदर्शनाखाली 'अरे संसार संसार', 'भानू' या चित्रपटाचे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून त्यांनी काम केले. याच दरम्यान त्यांची 'सिंहासन' चित्रपटाच्या निमित्ताने जब्बार पटेल यांच्याबरोबर ओळख झाली आणि राजदत्त यांच्या सल्ल्यानुसार ते जब्बार पटेल यांच्याकडे गेले. कांचन नायक यांनी 'सिंहासन'पासून 'उंबरठा'पर्यंत ते 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' या इंग्लिश चित्रपटापर्यंत जब्बार पटेल यांचे सहकारी म्हणून काम केले. 'राजदत्त' व 'जब्बार पटेल' या प्रतिभावंत दिग्दर्शकांबरोबर काम करण्याची मोलाची संधी कांचन नायक यांना लाभली व या संधीचे त्यांनी सोने केले.

दरम्यान १९८९ मध्ये स्मिता तळवळकर यांनी चित्रपट निर्मितीचा निर्णय घेतला आणि दिग्दर्शनाची सर्व सूत्रे कांचन नायक यांच्या हाती सोपवली. त्यातून 'कळत नकळत' हा चित्रपट आकाराला आला. कौटुंबिक

जीवनातले भावनात्मक ताणतणाव व त्यांची हळुवार पद्धतीने केलेली उकल असा आशय असलेला हा चित्रपट त्यातल्या एकूणच बांधणीमुळे रसिकांच्या अजूनही स्मरणात आहे. या स्वतंत्रपणे दिग्दर्शित केलेल्या पहिल्याच चित्रपटाला सर्वोत्कृष्ट चित्रपटासह चार राष्ट्रीय पारितोषिके व सर्वोत्कृष्ट चित्रपटासह नऊ राज्य पारितोषिके मिळाली. दरम्यान १९९९ साली 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' या राष्ट्रीय चित्रपट विकास महामंडळ निर्मित व डॉ. जब्बार पटेल दिग्दर्शित इंग्रजी चित्रपटासाठी सहदिग्दर्शक या नात्याने त्यांचा सहभाग होता. त्यानंतर २००७ साली सहाव्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात वि.वा. शिरवाडकर लिखित 'विश्वनाथ-एक शिंपी' या लघुचित्रपटाला सर्वोत्कृष्ट लघुचित्रपटाचा पुरस्कार मिळाला. याचे श्रेय दिग्दर्शक या नात्याने कांचन नायक यांनाच जाते. याच वर्षी त्यांनी 'घर दोघांचे' या त्रिकोणी प्रेमकथा असलेल्या भावनाप्रधान चित्रपटाचेही दिग्दर्शन केले.

कांचन नायक यांनी २००१ साली 'राजू' या




न

सिनेमास्कोप संगीतमय चित्रपटाचे दिग्दर्शन केले. या चित्रपटाने रौप्यमहोत्सवाबरोबर राज्य शासनाच्या सर्वोत्कृष्ट चित्रपटाच्या तिसऱ्या पारितोषिकासह एकूण सात पारितोषिके पटकावली.

भावनाप्रधान चित्रपटांसाठी प्रसिद्ध असणाऱ्या कांचन नायक यांनी भोजपुरी भाषेतला 'पिंजडेवाली मुनिया' व 'डंक्यावर डंका' असे विनोदी विषयही चित्रपटाचे दिग्दर्शन करताना लीलया हाताळले. शं.ना. नवरे यांच्या कथेवर केलेली टेलिफिल्म 'त्या तिथे पलीकडे' हा नर्मविनोदाचा एक उत्तम नमुना आहे. २००८ साली प्रसिद्ध दाक्षिणात्य निर्माते डी. रामनायडू यांच्या 'माझी आई' या पहिल्या मराठी चित्रपटाचे दिग्दर्शनही त्यांनी केले. २०१३ मध्ये त्यांनी 'दणक्यावर दणका' या विनोदी चित्रपटाचेही दिग्दर्शन केले.

कांचन नायक यांनी मोठ्या पडद्याप्रमाणे छोट्या पडद्यावरही आपल्या दिग्दर्शनाने प्रेक्षकांच्या मनात स्थान मिळवले. जयवंत दळवींच्या 'पर्याय' या हुंडाबळीवरील प्रसिद्ध नाटकावर आधारित 'आव्हान' या दूरदर्शन मालिकेचे पटकथा व संवादलेखन (१९८६) त्यांनीच केले. कांचन नायक यांनी झी मराठी वाहिनीसाठी 'इंद्रधनुष्य', तसेच 'बंधन' या दैनिक मालिकांचेही दिग्दर्शन केले. त्याचप्रमाणे दिल्ली दूरदर्शनसाठी 'प्रारंभ' या हिंदी मालिकेचेही दिग्दर्शन केले. ई-टीव्ही या वाहिनीसाठी त्यांनी २०११ मध्ये 'क्राईम डायरी' या मालिकेच्या १५०हून अधिक भागांचे दिग्दर्शन केले आहे. कांचन नायक यांनी दूरदर्शनसाठी काही मालिका, 'यशवंतराव चव्हाण' व 'शोभना समर्थ' यांच्या जीवनावर आधारित लघुपटांचे दिग्दर्शन केले. शासकीय पातळीवर त्यांनी अनेक माहितीपटांची निर्मिती व दिग्दर्शन केले. बालमजुरी या विषयावरील त्यांनी केलेल्या 'वसा शिक्षणाचा' या माहितीपटाची सर्वांनीच वाखाणणी केली.

झी अॅवार्ड, म.टा. सन्मान, राष्ट्रीय चित्रपट पारितोषिके यांवर परीक्षक म्हणून कांचन नायक यांनी वेळोवेळी केलेली कामगिरीही महत्त्वपूर्ण आहे. भावनात्मकता व सामाजिक बांधिलकीची जाणीव असणारा एक कलात्मक दिग्दर्शक म्हणून आपल्याला नायक यांच्या नावाचा आवर्जून उल्लेख करावा लागतो.

– संपादित

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## नायक, प्रभाकर मालोजी

**दिग्दर्शक, गीतलेखक, अभिनेता**

**१ जून १९२० – २५ मे १९८६**



साधारण १९४२ मध्ये नवयुग सिनेटोनमध्ये प्रोजेक्शनिस्ट म्हणून प्रभाकर नायक यांच्या कारकिर्दीला सुरुवात झाली. त्यांनी काही छोट्या-मोठ्या भूमिका केल्या. नजम नकवी यांना साहाय्यक दिग्दर्शक म्हणून काम करायला सुरुवात केली. त्या वेळी त्यांच्या 'पन्ना', 'पारो', 'कमरा नं.१०१' या गाजलेल्या हिंदी चित्रपटांमध्ये छोट्या भूमिका केल्या. प्रभातच्या गाजलेल्या 'कीचकवध' या चित्रपटात प्रभाकर नायकांनी तरुण वयात 'कंचुकी' या जख्ख म्हाताऱ्याची छोटीशी पण लक्षवेधी भूमिका केली. १९४७ साली नजम नकवी पाकिस्तानात गेल्यानंतर, शौरी, भालजी पेंढारकर यांच्याकडे 'थापाड्या', 'पटलं तर व्हय म्हणा' या चित्रपटांसाठी साहाय्यक म्हणून त्यांनी काम केले. या चित्रपटांसाठी त्यांनी गीतलेखनही केले. नंतरच्या काळात 'तेवढं सोडून बोला', 'दाम करी काम', 'उनाड मैना' या चित्रपटात चरित्र भूमिकाही केल्या. त्यांनी अनेक चित्रपट दिग्दर्शित केले, त्यांतले 'पाठराखीण', 'खंडोबाची आण', 'थापाड्या' (रौप्यमहोत्सवी), 'चांडाळ चौकडी' इ. महत्त्वाचे चित्रपट. त्यांनी 'लाथ मारीन तिथे पाणी' (१९८१) या चित्रपटाची निर्मिती व दिग्दर्शन केले आणि पुढच्या काळात ते निवृत्त झाले.

– सुधीर नांदगावकर

## नारकर, अविनाश गोपाळ
**अभिनेता**
**८ जुलै १९६६**



अभिनयाचा कौटुंबिक वारसा नसलेल्या, पण उपजतच जाण असलेल्या अविनाश नारकर यांचा जन्म मुंबई येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे शालेय शिक्षण दादर येथील शारदाश्रम विद्यामंदिरात झाले, तर बी.कॉम.ची पदवी त्यांनी महालक्ष्मी येथील लाला लजपतराय महाविद्यालयातून घेतली. याच काळात आंतरमहाविद्यालयीन एकांकिका स्पर्धांमध्ये भाग घेऊन त्यांनी आपल्यातील अभिनयगुण दाखवून दिले. अविनाश यांनी विजय टाकळे दिग्दर्शित 'माणसांची गोष्ट', 'ढोल वाजतोय', 'व्हिक्टिम', 'फॉर सेकंड', 'शेवाळ शेकतयं क्लोरोफिल' या एकांकिकांमध्ये अभिनय केला. मोनो ॲक्टिंग स्पर्धेत सहभागी झाल्यावर त्यांना स्वत:च्या अभिनयातील त्रुटी कळू लागल्या, तसेच आपल्या अभिनयातील चांगले-वाईट बारकावे आणि बलस्थानेही हेरता आली. यामुळेच त्यांच्यात रंगभूमीवर वावरण्याचा आत्मविश्वास निर्माण झाला.

शिक्षण झाल्यावरही त्यांनी १९८२-१९८५ या काळात डायनर्स् इंटरनॅशनल क्रेडिट इश्यू फर्ममध्ये अर्धवेळ काम केले, तर १९८८ मध्ये ते बस सेवेत रुजू झाले. तेथे त्यांनी कामगार नाट्य स्पर्धेतील नाटकांमध्ये कामे केली. त्यांनी कामे केलेली 'मनूचा इतिहास' (१९८६), 'काळोखाच्या सावल्या', 'गंध निशिगंधाचे' (१९९३), 'तीन पैशांचा तमाशा', 'रणांगण' ही नाटके प्रेक्षकप्रिय झालेली आहेत. नाटकांमध्ये कामे करत असतानाच त्यांची पल्लवी आठवले यांच्याशी ओळख झाली आणि १९९५ मध्ये ते दोघे विवाहबद्ध झाले.

नाटकातील यशस्वी कारकीर्दीनंतर अविनाश यांनी १९९४ मध्ये पहिल्यांदा 'मुक्ता' या चित्रपटात काम केले. त्यात त्यांनी महेश वाघ या दलित कार्यकर्त्याची भूमिका समर्थपणे साकारली. या भूमिकेसाठी त्यांना राज्य शासनाचा उत्कृष्ट अभिनेत्याचा पुरस्कार मिळाला होता. त्यानंतर त्यांनी 'माझा मुलगा' (१९९५), 'हसरी' (१९९७), 'पुत्रवती' (१९९७), 'खतरनाक' (२०००), 'पैज लग्नाची', 'लक्ष्मी' या चित्रपटातून काम केले. 'पैज लग्नाची' या चित्रपटात केलेली वेड्या भावाची भूमिकाही लोकप्रिय झाली. अभिनयातील सहजता त्यांच्या सर्वच प्रकारच्या भूमिकांमधून पाहायला मिळते.

अविनाश यांनी नाटक, चित्रपट या माध्यमांप्रमाणे दूरदर्शनच्या पडद्यावरही आपली मोहोर उमटवली. 'पांडू रे पांडू' ही त्यांनी अभिनित केलेली पहिली दूरदर्शन मालिका. या मालिकेत त्यांनी पांडू या मुख्य भूमिकेतील नोकराचे काम केले होते. खरेतर ही भूमिका त्यांच्याकडे चालून आल्यावर नोकराचे काम करायला त्यांनी नकार दिला होता, पण आईच्या सल्ल्यावरून ती भूमिका करायची त्यांनी मान्य केले व ही भूमिका अतिशय लोकप्रिय ठरली, तर 'महाश्वेता' ही अशीच एक खूपच गाजलेली मालिका. या भूमिकेने त्यांना लोकप्रियतेचे वलय निर्माण करून दिले व नाटकातला हा चेहरा खऱ्या अर्थाने घरोघरी दिसला. त्यांनतर त्यांनी 'वादळवाट', 'वहिनीसाहेब', 'अग्निहोत्र', 'राजा शिवछत्रपती', 'पाऊस मृगाचा पडतो', 'पिंपळपान' यांसारख्या काही मालिकांमधूनही त्यांनी उत्तमोत्तम भूमिका केल्या.

समाज जागृतीसाठी माध्यमाचा वापर करून घेण्यासाठी अविनाश नारकर यांनी आपली पत्नी ऐश्वर्या यांच्यासोबत २०१० मध्ये 'ऐश्वर्या आर्ट अ‍ॅण्ड व्हिजन' या संस्थेची स्थापना करून 'चॅम्पियन' हा बालमजुरी व बालशिक्षण यावर आधारित चित्रपट तयार केला. या चित्रपटाला पुणे आंतरराष्ट्रीय महोत्सवात विशेष परीक्षक पुरस्कार लाभला, तसेच या चित्रपटात काम केलेल्या दोन्ही बालकलाकारांनाही राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त झाले.

एक सर्जनशील व संवेदनशील नट अशी ख्याती त्यांना प्राप्त झाली ती त्यांच्या अभिनयातील सहजतेमुळेच.

– संपादित

न

## नार्वेकर, संजय शशिकांत

**अभिनेता**

**१८ डिसेंबर १९६६**



मराठी चित्रपटांतील आणि नाटकांतील एक महत्त्वाचे आणि लोकप्रिय नाव म्हणजे संजय नार्वेकर. त्यांचा जन्म मुंबई येथे झाला. शालेय शिक्षण मुंबईतील ए.एस.ए.सी. इंग्लिश स्कूलमध्ये झाले. त्यांचे वडील शशिकांत अनंत नार्वेकर हे विक्रीकर विभागात नोकरीला होते. संजय नार्वेकर यांनी रुईया महाविद्यालयातून कलाशाखेची पदवी प्राप्त केली. याचदरम्यान त्यांनी नाटकांमध्ये काम करायला सुरुवात केली. 'आम्ही जगतो बेफाम' हे त्यांनी काम केलेले पहिले नाटक.

न

विविध चित्रपटांतून निरनिराळ्या भूमिका साकारलेल्या संजय यांची 'अगं बाई अरेच्चा' चित्रपटातील श्रीरंग देशमुख (रंगा) ही भूमिका प्रेक्षकांच्या पसंतीस उतरली आणि लक्षात राहिली. 'खबरदार', 'चेकमेट', 'तुला शिकवीन चांगलाच धडा' या चित्रपटांतही त्यांनी उल्लेखनीय भूमिका साकारल्या.

मराठी चित्रपटांसह संजय यांनी नाटकांत साकारलेल्या विविध भूमिका प्रेक्षकांनी चांगल्याच उचलून धरल्या. 'रंग्या रंगीला रे', 'ऑल द बेस्ट', 'लोच्या झाला रे, 'बाजीराव मस्त मी', 'झोल बच्चन' आणि 'आमच्यासारखे आम्हीच' या काहीशा विनोदी ढंगाने जाणाऱ्या नाटकांच्या बरोबरीनेच संजय यांनी जयंत पवार लिखित 'अधांतर', विजय तेंडुलकर लिखित 'अशी पाखरे येती' आणि चंद्रशेखर फणसळकर लिखित 'खेळीमेळी' या नाटकांत गंभीर स्वरूपाच्या उत्तम भूमिका साकारल्या. सुबकतर्फे हर्बेरियमच्या उपक्रमातील जी पाच नाटके रंगमंचावर आली, त्यातील 'हमीदाबाईची कोठी' या पाचव्या नाटकात संजय नार्वेकर यांनी लुक्का




'चेकमेट' मध्ये डावीकडून पहिला संजय नार्वेकर

भाई ही भूमिका साकारली. नाना पाटेकर यांनी पूर्वी साकारलेल्या याच भूमिकेशी संजय यांच्या अभिनयाची तुलना होण्याची शक्यता असूनही त्यांनी त्यांच्या परीने या भूमिकेला योग्य न्याय दिला.

फक्त मराठी नाटक आणि चित्रपटच नाही, तर संजय यांनी अनेक हिंदी चित्रपटांतूनही छोट्या, तरीही लक्षणीय भूमिका साकारल्या आहेत. 'वास्तव : द रिॲलिटी' या चित्रपटात संजय दत्त यांच्यासह केलेली 'देड फुट्या' ही त्यांची भूमिका चांगलीच गाजली. याच भूमिकेसाठी त्यांना फिल्मफेअर उत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्याच्या पुरस्कारासाठी नामांकन मिळाले होते. या व्यतिरिक्त 'हंगाम' चित्रपटातील अनिल, 'ये तेरा घर ये मेरा घर'मधील नामदेव, 'बाघी'तील चक्कू या भूमिकाही उल्लेखनीय ठरल्या.

संजय नार्वेकर यांना क्रिकेट आणि फुटबॉल या खेळात विशेष रस आहे. रुईया महाविद्यालयामध्ये असताना फुटबॉलच्या विविध सामन्यात ते सहभागी झाले आहेत. अभिनयाच्या क्षेत्रात असूनही ते आवर्जून या खेळांची आवड टिकवून आहेत.

आजच्या घडीलाही त्यांचे नाटकांचे दौरे आणि हिंदी व मराठी सिनेमातील घोडदौड दणक्यात सुरू आहे.

– आसावरी चिपळूणकर

## नेने, गजानन हरी

*राजा नेने*

**अभिनेता, दिग्दर्शक**

**१८ सप्टेंबर १९१२ – १९७५**

राजा नेने हे प्रभात चित्रपट कंपनीच्या मालकांपैकी दामले यांचे भाचे असल्याने लहानपणापासूनच चित्रपटक्षेत्राशी त्यांचा संबंध आला. त्यामुळे शांतारामबापूंच्या हाताखाली त्यांनी दिग्दर्शनाचे व संकलनाचे धडे गिरविले. दामले–फत्तेलाल हे 'संत तुकाराम' या चित्रपटाचे दिग्दर्शक होते; परंतु त्या चित्रपटातील काही महत्त्वाच्या प्रसंगांच्या दिग्दर्शनात राजा नेने यांचे योगदान होते. यानंतर आलेल्या 'संत



ज्ञानेश्वर' व 'गोपालकृष्ण' या दोन्ही चित्रपटांच्या दिग्दर्शनात राजा नेने यांनी दामले–फत्तेलाल या जोडीला साहाय्य केले.

प्रभातच्या पहिल्या सामाजिक चित्रपटात – अर्थात 'कुंकू'मध्ये – राजा नेने यांनी केशवराव दाते यांच्या वाह्यात मुलाची भूमिका साकारली होती. 'संत सखू' या चित्रपटाच्या श्रेयनामावलीत दिग्दर्शक म्हणून दामले–फत्तेलाल यांच्याबरोबर राजा नेने यांचेही नाव होते. यानंतर प्रभातचा 'दहा वाजता' हा चित्रपट राजा नेने यांनी स्वतंत्रपणे दिग्दर्शित केला. या चित्रपटात भावगीतांचा वापर प्रथमच केला गेला. या वेळी राजा नेने यांचा 'प्रति शांताराम' असा उल्लेख होत असे. नंतर प्रभातने 'रामशास्त्री' हा चित्रपट सुरू करून नेने यांच्याकडे दिग्दर्शनाची सूत्रे दिली. परंतु चित्रपटाचा सुरुवातीचा काही भाग चित्रित करून त्यांनी चित्रपट व प्रभात कंपनी दोन्ही सोडले. पुढे गजानन जागीरदार, विश्राम बेडेकर व शेख फत्तेलाल यांनी मिळून हा चित्रपट पूर्ण केला.

मुंबईच्या रमणिकलाल यांनी राजा नेने यांना व त्यांच्या साथीदारांना मुंबईला बोलावून त्यांच्याकडे 'तारामती' या चित्रपटाची सूत्रे सोपवली. या चित्रपटानंतर त्यांनी 'बच्चों का खेल' व 'फिर भी अपना है' हे दोन चित्रपट केले. पुढे नेने यांनी स्वत:ची चित्रसंस्था काढून त्याद्वारे 'शादी से पहले', 'संत रामदास', 'केतकीच्या बनात', 'पठ्ठे बापूराव' यांसारखे चित्रपट काढले. नंतर आपली चित्रसंस्था बंद करून राजा नेने फक्त अभिनय करीत राहिले. १९६७ मध्ये सदाशिवराव कवींनी त्यांना 'तुका झालासे कळस' हा चित्रपट करायला दिला. चित्रपट उत्तम होऊनही त्याला फारसा प्रतिसाद मिळाला नाही. राजा नेने चित्रपटसृष्टीपासून हळूहळू दूर गेले.

– द.भा. सामंत

* * *

न

# प





## पटवर्धन, आनंद अच्युत

**दिग्दर्शक**

**१८ फेब्रुवारी १९५०**



आनंद पटवर्धन यांचा जन्म मुंबई येथे झाला. परंतु ते मूळचे अहमदनगरचे होते. १९७० मध्ये त्यांनी मुंबई विद्यापीठाची इंग्रजी साहित्य या विषयात बी.ए.ची पदवी प्राप्त केली. त्यानंतर १९७० मध्ये आनंद पटवर्धन यांनी ब्रंडीस विद्यापीठातून समाजशास्त्र या विषयात दुसऱ्यांदा बी.ए.ची पदवी मिळवली, तर १९८२ मध्ये त्यांनी संभाषणकौशल्य या विषयातील एम.ए.ची पदवी मॅक गिल विद्यापीठातून प्राप्त केली.

आनंद पटवर्धन यांचे काका रावसाहेब पटवर्धन आणि वडील अच्युतराव पटवर्धन हे भारताच्या स्वातंत्र्य चळवळीतील आघाडीच्या फळीत होते. तसेच समाजवादी विचारसरणीचा प्रसार त्यांनी महाराष्ट्रातून केला. तीच विचारसरणी घेऊन आनंद पटवर्धन यांनी अनेक लघुपट निर्माण केले.

आनंद पटवर्धन यांनी 'प्रिझनर ऑफ कॉनसायन्स' (१९७८), 'बिझनेस ॲज युजवल', 'वेव्हस् ऑफ रेव्हुलेशन' (१९७४), 'अ टाईम टू राइज' (१९८१), 'हमारा शहर', 'उन मित्रोंकी याद', 'राम के नाम', 'द अदर साइज', 'वुई आर नॉट युअर मंकीज' असे अनेक लघुपट निर्माण केले आहेत. देशातून आणि परदेशातून त्यांच्या अनेक लघुपटांना पारितोषिके देऊन गौरवण्यात आले.

एक आघाडीचा 'लघुपट निर्माता' म्हणून पटवर्धन यांचे नाव घेतले जाते.

– संपादित

## पटेल, जब्बार रझाक

**दिग्दर्शक**

**२३ जून १९४२**



मराठी चित्रपटसृष्टीने केवळ महाराष्ट्रालाच नव्हे, तर भारतीय चित्रपटसृष्टीला जे काही मोजके संवेदनशील चित्रकर्ते दिले, त्यामध्ये जब्बार पटेल यांचे नाव आवर्जून घ्यावे लागते. नाटक, कथा-चित्रपट, अनुबोधपट या तिन्ही क्षेत्रात त्यांनी आपल्या कलाकृती सादर केल्या. त्यांच्या कलाकृती विषयाने जितक्या ताज्या होत्या, तितक्याच त्या उत्कृष्ट आशयाच्या होत्या. त्यामुळेच त्यांना रसिक आणि समीक्षक या दोघांकडूनही चांगला प्रतिसाद मिळाला.

पंढरपूर येथे जन्मलेल्या जब्बार यांचे शिक्षण सोलापूर येथे झाले. पुढे वैद्यकीय शिक्षणासाठी ते पुण्यात आले आणि येथेच त्यांची कारकिर्द खऱ्या अर्थाने सुरू झाली. प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशनमध्ये ते हौशी नाट्यकलावंत म्हणून दाखल झाले. तेथे त्यांनी 'अशी पाखरे येती' हे नाटक केले. याच संस्थेने १९७२ मध्ये विजय तेंडुलकरलिखित 'घाशीराम कोतवाल'ची निर्मिती केली, त्याचे दिग्दर्शक होते डॉ. जब्बार पटेल. पेशवेकालीन कथानकाच्या आधारे केलेल्या या अनैतिहासिक नाटकामुळे पटेल एकदम प्रकाशात आले.

त्यातील ऐतिहासिक व्यक्तींच्या बदनामीमुळे या नाटकावर बरीच उलट-सुलट चर्चाही झाली. कालांतराने या नाटकाचे प्रयोग सुरू ठेवण्यासाठी डॉ. पटेल आणि त्यांचे कलावंत मित्र यांनी 'थिएटर ॲकॅडमी' ही नाट्यसंस्था स्थापन केली. पुढे या नाटकाच्या परदेशवारीसाठी सरकारने पोलीस संरक्षण दिले. वादग्रस्त ठरले असले तरी डॉ. पटेलांनी 'घाशीराम कोतवाल' नाटक अतिशय समर्थपणे सादर केले होते.

एक वेगळे नाटक म्हणून 'घाशीराम कोतवाल' ओळखले गेले. त्यातील प्रसंग चौकटी तर इतक्या चपखल होत्या की, पटेलांच्या याच सर्जनशीलतेमुळे त्यांना लगेचच 'सामना' चित्रपटाचे दिग्दर्शन करायला मिळाले. 'तोपर्यंत आपण कधी सिनेमाच्या कॅमेऱ्यातून पाहिलेही नव्हते', असे त्यांनी जाहीरपणे सांगितले.

'सामना' (१९७५) हा एक असाधारण मराठी चित्रपट मानला जातो. विजय तेंडुलकर यांची पटकथा आणि संवाद, डॉ. श्रीराम लागू आणि निळू फुले यांची अभिनयाची जुगलबंदी आणि डॉ. पटेलांचे कल्पनापूर्ण दिग्दर्शन या 'सामना'च्या जमेच्या बाजू ठरल्या. सूर्यकांत लवांदे यांच्या छायाचित्रणाला एन.एस. वैद्य यांच्या संकलनाने एक वैशिष्ट्यपूर्ण गती दिली. काहीशा संथ लयीत चालणाऱ्या या चित्रपटाला लोकांनी सुरुवातीला दाद दिली नाही. परंतु भारताने अधिकृतपणे पाठवलेल्या 'सामना'चे बर्लिन चित्रपट महोत्सवातील प्रदर्शन आणि राज्य शासनाचा सर्वोत्कृष्ट मराठी चित्रपटाचा पुरस्कार मिळाल्यावर मात्र या चित्रपटाकडे प्रेक्षकांचे लक्ष गेले. डॉ. मोहन आगाशे, स्मिता पाटील, लालन सारंग आणि विलास रकटे या छोट्या भूमिका केलेल्या कलावंतांनीही 'सामना'ला मोठे योगदान दिले. लौकिक अर्थाने म्हणायचे, तर यानंतर डॉ. पटेलांनी कधीच मागे वळून पाहिले नाही.

गो.नी. दांडेकर यांची सुप्रसिद्ध कादंबरी 'जैत रे जैत' (म्हणजे 'जिंकलो रे जिंकलो') पटेलांनी रुपेरी पडद्यावर साकारली. याच शीर्षकाने निर्मिती झालेला हा चित्रपट म्हणजे आदिवासींच्या मुक्त जीवनावरील, रुपेरी पडद्यावरची एक लयबद्ध कविताच होती. पं. हृदयनाथ मंगेशकरांनी संगीतबद्ध केलेली ना.धों. महानोरांची गीते, ठाकरवाडीच्या पाड्यांवरची आणि सुळक्याची दृश्ये, तसेच डॉ. मोहन आगाशे आणि स्मिता पाटील यांनी रेखाटलेली आदिवासी पात्रे यांमुळे 'जैत रे जैत' (१९७७) म्हणजे एक उत्तम रंगचित्र असावे तसा दिसला.

त्यानंतर डॉ. पटेलांनी एक राजकीयपट सादर केला – 'सिंहासन' (१९७९). ख्यातनाम पत्रकार आणि लेखक अरुण साधू यांच्या 'सिंहासन' आणि 'मुंबई दिनांक' या दोन कादंबऱ्यांवर आधारित या चित्रपटाची पटकथा होती. निर्ढावलेले नेते जनतेच्या समस्यांची अजिबात फिकीर न करता स्वत:चाच फायदा कसा करून घेतात, हा या चित्रपटाचा कथाविषय होता. तो मांडताना आपल्या कलावंतांच्या प्रस्थापित प्रतिमांना छेद देत पटेलांनी त्यांच्यातील वेगळ्या प्रतिभेचे दर्शन घडवले. उदा. सतीश दुभाषींना कामगार नेत्याच्या भूमिकेत सादर केले, तर निळू फुले यांची बेरकी पुढाऱ्याची प्रतिमा बाजूला ठेवून त्यांना चक्क एका संवेदनशील पत्रकाराच्या भूमिकेत सादर केले. संपूर्णत: राजकीय बाज असलेल्या या चित्रपटातील अरुण सरनाईक, दत्ता भट, डॉ. श्रीराम लागू, रिमा लागू यांच्या वेगळ्या भूमिकाही प्रेक्षकांना पसंत पडल्या. आपल्या चित्रपटाची निर्मितिमूल्ये स्वत:च्या मनासारखी असावी, म्हणून डॉ. पटेल 'सिंहासन'पासून निर्माताही बनले. कदाचित त्यामुळेच राजकारण्यांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध आल्यामुळे होरपळणाऱ्या लोकांची घुसमट पटेलांना अतिशय उत्कटपणे दाखवता आली. मधल्या काळात डॉ. जब्बार पटेल यांनी बर्टोल्ट ब्रेख्त यांच्या 'थ्री पेनी ऑपेरा' नाटकावर 'तीन पैशाचा तमाशा', 'पडघम' ही नाटके दिग्दर्शित केली. त्यातूनही त्यांचे वेगळेपण दिसून आले.

१९८१ या वर्षी प्रदर्शित झालेला 'उंबरठा' हा पटेल दिग्दर्शित पहिला रंगीत चित्रपट. शांता निसळ यांच्या 'बेघर' या कादंबरीवर आधारित या चित्रपटात स्मिता पाटील यांनी त्यांच्या कारकिर्दीतील सर्वोत्कृष्ट भूमिका केली. हौशी, व्यावसायिक आणि ध्येय म्हणून केलेल्या

प

'सिंहासन' चित्रपटाचे दृश्य समजावून सांगताना डॉ. जब्बार पटेल उजवीकडून पहिले





समाजसेवेतील धूसर रेषा या चित्रपटात स्पष्ट करण्यात आली होती. एका बाजूला महिलाश्रमांतून सररास चाललेल्या गैरप्रकारांना फोडलेली वाचा, तर दुसऱ्या बाजूला बेघर झालेले आयुष्य सावरण्यासाठी स्वत:च बेघर झालेली ध्येयवादी स्त्री, असे दुधारी अस्त्र पटेलांनी 'उंबरठा'मधून सोडले. यामध्ये गिरीश कर्नाड, दया डोंगरे आणि कुसुम कुलकर्णी यांनीही महत्त्वाच्या भूमिका केल्या होत्या. 'सुबह' (१९८३) या नावाने हा चित्रपट हिंदी भाषेतही प्रदर्शित झाला.

अशा सर्जनशील कथा-चित्रपटांच्या जोडीला डॉ. जब्बार पटेल यांनी काही महत्त्वपूर्ण अनुबोधपटांचेही दिग्दर्शन केले. यामध्ये भारतीय नाट्यसृष्टीची ओळख करून देणारा 'इंडियन थिएटर', एस.एम.जोशी यांच्या कार्याची महती सांगणारा 'मी एसेम', त्याचप्रमाणे संतूरवर लीलया बोटे फिरवणाऱ्या पं. शिवकुमार शर्मा यांची कलात्मकता उलगडून दाखवणारा 'हंस अकेला' अशा वैविध्यपूर्ण अनुबोधपटांचा समावेश आहे.

खूप वर्षांनंतर पु.ल. देशपांडे यांना लिहिते करीत डॉ. पटेलांनी 'एक होता विदूषक' (१९९२) दिग्दर्शित केला. यामध्ये त्यांनी तमाशाचा बाज वापरला आणि खानदेशी धाटणीच्या लावण्या सादर केल्या. शिवाय राजकारण्यांकडून लोककलावंतांचा वापर असा संदर्भही त्यांनी या कथानकात उपयोगात आणला. लक्ष्मीकांत बेर्डे, वर्षा उसगावकर आणि निळू फुले यांनी 'एक होता विदूषक'मध्ये महत्त्वाच्या भूमिका वठवल्या आहेत.

अनेक वर्षे कथा-चित्रपटांपासून दूर राहिल्यानंतर डॉ. पटेल यांनी १९९५ मध्ये 'मुक्ता'चे दिग्दर्शन केले. राजकारण्याच्या घरातील सुशिक्षित मुलगी एका दलित कार्यकर्त्याच्या प्रेमात पडते आणि त्यामुळे एकच खळबळ उडते. यानिमित्त डॉ. पटेलांनी मागासवर्गीय आणि जातीय राजकारण यांचा ऊहापोह केला आहे.

२००० मध्ये डॉ. पटेलांनी 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' हा त्यांचा महत्त्वाकांक्षी चित्रपट दिग्दर्शित केला. त्यासाठी जगभराच्या अनेक देशांतील अनेक

कलावंतांची चाचणी घेतल्यानंतर डॉ. पटेलांनी अखेर प्रसिद्ध दाक्षिणात्य कलावंत मामुटी यांची शीर्षक भूमिकेसाठी निवड केली. त्याकरिता त्यांनी संगणकीय चित्रव्यवस्थेचीही मदत घेतली आणि त्यातून मामुटी हे सर्वात योग्य अभिनेता असल्याचे सिद्ध झाले. चित्रपटाची व्याप्ती मोठी होती. डॉ. आंबेडकरांच्या कोलंबिया विद्यापीठातील शिक्षणाच्या दिवसांपासून ते नागपुरात सार्वजनिकरीत्या बौद्ध धर्म स्वीकारण्याच्या प्रसंगापर्यंत त्यांच्या जीवनातील महत्त्वाच्या सर्व टप्प्यांचा यामध्ये समावेश करण्यात आला होता. मोठे बजेट असलेल्या या चित्रपटाच्या निर्मितीसाठी केंद्र आणि राज्य शासनानेही आर्थिक मदत केली होती. त्याचा पूर्ण फायदा घेऊन, आपल्या मनासारखे योग्य कलावंत, तंत्रज्ञ आणि प्रसंगस्थळे निवडून डॉ. पटेलांनी डॉ. आंबेडकरांचे व्यक्तिचित्र अतिशय सखोलपणे सादर केले.

आपल्या कलावंतीय कारकिर्दीत डॉ.जब्बार पटेल यांनी स्वत: तर उत्कट आणि सर्जनशील कलाकृती तर सादर केल्याच, त्याचबरोबर आपल्या नाटक-चित्रपटांसाठी त्यांनी पारंपरिक, प्रस्थापित कलावंतांना अनेक वेळा बाजूला ठेवून नवनव्या अभिव्यक्तीच्या कलावंतांचा योग्य उपयोग करून घेतला. पं. हृदयनाथ मंगेशकर, ना.धों. महानोर, सुरेश भट, वसंत बापट, सोनाली कुलकर्णी, गिरीश कर्नाड आणि अनेक कलावंत, तंत्रज्ञ, कवी, संगीतकार यांचा डॉ. पटेलांच्या चित्रपटातील सहभाग हेच सिद्ध करतो.

डॉ. पटेलांना पद्म पुरस्कारासहित, संगीत नाटक अकादमीचा आणि केंद्र/राज्य शासनाचे अनेक पुरस्कार बहाल केलेले आहेत.

– चंद्रशेखर जोशी

## पटेल, बाबूराव

**दिग्दर्शक, निर्माता**

**४ एप्रिल १९०४ – ४ सप्टेंबर १९८२**

बाबूराव पटेल यांचे खरे आडनाव होते पाटील. पालघर तालुक्यात बंजारी जमातीत त्यांचा जन्म झाला



होता. त्यांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंतच झाले असूनही त्यांनी इंग्रजी भाषेवर असामान्य प्रभुत्व मिळवले होते. मॅट्रिक अनुत्तीर्ण झाल्यानंतर त्यांच्या वडिलांनी त्यांना ‘तुझ्या पोटापाण्याची व्यवस्था तूच कर’, असे सांगितले. त्यानंतर बाबूरावांनी गजकर्ण या रोगासाठी रिंगोसाईड नावाचे एक मलम तयार केले. लगेच त्यांना औषध निरीक्षकाची नोटीस आली आणि त्यांना हा धंदा बंद करावा लागला. नंतर त्यांनी गेव्हार्ट या कंपनीत नोकरी धरली. तेथे त्यांची विनायक घोरपडे (वासंती या बालनटीचे वडील) यांच्याशी ओळख झाली. घोरपडे महाराष्ट्र फिल्म कंपनीशी संबधित होते. त्याच सुमारास बाबूराव पेंटर यांनी महाराष्ट्र फिल्म कंपनीतील अंग काढून घेतले होते. त्यामुळे दिग्दर्शनासाठी माणूस हवा होता. विनायकरावांनी कंपनीच्या चालकांशी बोलून बाबूराव पटेल यांना दिग्दर्शक म्हणून बोलावून घेतले आणि ‘किस्मत’ चित्रपटाच्या दिग्दर्शनाची सूत्रे त्यांच्या हाती सोपविली. त्यानंतर बाबूरावांनी मुंबईला विठ्ठलराव महिंद्रकर यांच्या मदतीने महिंद्रकर फिल्म सर्व्हिसेस ही वितरण संस्था काढली. त्यात त्यांना यश आले नाही.

अकोल्यातल्या त्यांच्या एका मित्रासाठी बाबूरावांनी ‘पृथ्वीराज संयोगिता’ या बोलपटाची निर्मिती हाती घेतली. दिग्दर्शनाची सूत्रे नानासाहेब सरपोतदार यांच्या हातात सोपवली. याच काळात बाबूरावांनी ‘गंधर्व सिनेटोन’ या स्वत:च्या चित्रपट कंपनीची स्थापना केली आणि ‘महानंदा’, ‘बाला जीवन’, ‘महाराणी’, ‘चाँद का टुकडा’ असे बोलपट निर्माण केले; पण पडद्यावर ते फार काळ टिकू शकले नाहीत. त्यामुळे कंपनी बंद करून चित्रपटांच्या जाहिराती करण्याचे काम त्यांनी सुरू केले. सर्वप्रथम सागर मुव्हीटोनने आपल्या चित्रपटांच्या जाहिराती बाबूरावांच्या हातात सोपवल्या. १९३५ साली पाटकर यांच्याशी त्यांची गाठ पडली. पाटकरांचा

प

स्वत:चा 'न्यू जॅक प्रिंटिंग प्रेस' नावाचा छापखाना होता. त्या छापखान्यासाठी पाटकरांनी चित्रपटविषयक मासिक काढण्याचे ठरविले आणि संपादकाची जबाबदारी बाबूरावांच्या अंगावर टाकली. बाबूरावांनी 'फिल्म इंडिया' असे त्या मासिकाचे नाव ठेवले आणि ४ एप्रिल १९३५ रोजी पहिला अंक प्रसिद्ध केला. पहिल्याच अंकावर वाचकांच्या उड्या पडल्या आणि त्या अंकाच्या तीन आवृत्त्या १५ दिवसात प्रसिद्ध कराव्या लागल्या. पुढे पाटकरांनी त्यांना फिल्म इंडियात भागीदार म्हणून घेतले. त्यासाठी बाबूरावांना त्यांना तीन हजार रुपये भांडवलापोटी द्यावे लागले.

१९३९ साली हिंदी चित्रपट धंद्याचा रौप्यमहोत्सव साजरा झाला, त्या प्रसंगी फिल्मी वृत्तपत्रांच्या परिषदेचे अध्यक्षस्थान भूषवण्याचा मान बाबूरावांना मिळाला.

'फिल्म इंडिया'चा खप दिवसेंदिवस वाढतच होता. त्यांनी इंग्लंड-अमेरिकेचा दौरा करण्याचे ठरविले आणि इंग्लंड आणि हॉलीवूड येथील नामवंत नट-नट्या, दिग्दर्शक, निर्माते यांच्या प्रत्यक्ष भेटी घेऊन फिल्म इंडियात त्याचे सविस्तर वार्तापत्र प्रसिद्ध केले.

१९४४ साली बाबूराव पटेल यांनी आपली दुसरी पत्नी सुशीलादेवी यांना घेऊन 'द्रौपदी' हा चित्रपट पूर्ण केला. पुढे १९४६ साली त्यांनी एका चित्रपटसंस्थेसाठी 'ग्वालन' नावाचा बोलपट तयार करून दिला. त्यानंतर ग्वाल्हेरच्या विजयाराजे शिंदे यांनी त्यांना जनसंघामार्फत ग्वाल्हेरहून संसदचे तिकिट मिळवून दिले. बाबूरावांनी पुढील पाच वर्षे संसदही गाजवली. संसदेत गेल्यावर त्यांनी फिल्म इंडियाचे स्वरूप बदलून त्याला राजकीय रंग दिला.

– द.भा. सामंत

प

## पत्की, अशोक गोविंद

**संगीतकार**

**२५ ऑगस्ट १९४१**



अशोक पत्की यांनी आपल्या सहजसुंदर स्वररचनांच्या बलस्थानाने भावसंगीत, मराठी चित्रपटसृष्टी, नाट्यसृष्टी आणि दूरदर्शन-आकाशवाणी या सर्व माध्यमांमध्ये स्वतःची संगीतकार म्हणून ओळख निर्माण केली आहे. त्यांचा जन्म मुंबई येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे वडील गोविंद पत्की गिरणीमध्ये नोकरीला होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण मुंबईतील गोपी टँक म्युन्सिपल शाळेत झाले आणि मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण खारच्या बी.पी.एम. विद्यालयामध्ये झाले. शंकर-जयकिशन, रोशन, नौशाद यांच्या कार्यक्रमात त्यांची बहीण मीना पत्की गात असे. त्यांना सोबत करत असतानाच पत्की यांचा संगीतक्षेत्राशी जवळून संबंध आला. केवळ तीव्र निरीक्षणशक्तीने आणि रियाझाने हार्मोनियम आणि ढोलक ही वाद्ये ते चांगल्या प्रकारे वाजवू लागले. गाण्याची उपजत समज आणि शिकण्याची ऊर्मी यामुळे त्यांनी पं. मनोहर चिमोटे यांच्याकडे वर्षभर हार्मोनियम वादनाचे धडे गिरवले. पण वर्षभरातच ही शिकवणी बंद झाली. लहानमोठ्या कार्यक्रमात वादक म्हणून जात असताना चित्रपटविश्वाची आणि संगीतविश्वाची जवळून ओळख होत होती.

संगीत क्षेत्रातच काहीतरी करायचे असा मनाशी निश्चय करून त्यांनी हिंदी चित्रपटसृष्टीतील रॉबीन बॅनर्जी, बी.एच. कोहली, राहुल देव बर्मन या संगीतकारांकडे वादक म्हणून काम केले. वादक आणि साहाय्यक संगीतकार म्हणून काम करताना मिळालेले अनुभव, प्रतिभाशाली कलाकारांच्या भेटी आणि श्यामराव कांबळेंसारखे मार्गदर्शक आणि स्नेही यांच्यामुळे त्यांची संगीत क्षेत्राविषयीची जाण समृद्ध झाली. 'आकाशवाणी' या माध्यमातून नव्याने उदयाला आलेल्या 'जिंगल्स' या प्रांतात पत्की यांनी २० वर्षे संगीतकार आणि वादक म्हणून काम केले आहे. 'जिंगल्स' तयार करताना जाहिरातदारांची अपेक्षा पूर्ण

करण्याच्या कसरतीमध्ये स्वरांना आणि 'मेलडी'ला असलेले प्राधान्य राखण्याकडे एक संगीतकार म्हणून पत्की यांचा कल होता. विविध उत्पादनांच्या शेकडो जिंगल्स पत्की यांनी आजवर केल्या आहेत. राष्ट्रीय एकात्मतेवर आधारित 'मिले सूर मेरा तुम्हारा' ही सर्वाधिक लोकप्रिय ठरलेली जिंगल. साक्षरता प्रसारासाठी केलेली कविता कृष्णमूर्ती यांच्या स्वरातील 'पूरबसे सूर्य उगा फैला उजियाला' ही जिंगलसुद्धा स्मरणीय झाली.

पं. जितेंद्र अभिषेकी यांच्यामुळे अशोक पत्की यांचा नाटकाच्या संगीताशी परिचय झाला. 'मत्स्यगंधा' ते 'तू तर चाफेकळी' या नाटकापर्यंत पत्की जितेंद्र अभिषेकी यांच्याबरोबर साहाय्यक संगीतकार म्हणून काम करत होते. याच काळात 'धी गोवा हिंदू असोसिएशन' या नाट्यसंस्थेशी त्यांचे जिव्हाळ्याचे नाते निर्माण झाले. या संस्थेच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त 'आटपाटनगरची राजकन्या' हे रत्नाकर मतकरीलिखित नाटक स्वतंत्रपणे संगीत दिग्दर्शनासाठी पत्की यांना मिळाले. त्यानंतर 'बिऱ्हाड-बाजलं', 'अखेरचा सवाल', 'तसे आम्ही सज्जन', 'दिसतं तस नसतं' या नाटकांनाही त्यांनी संगीत दिले. सुयोग या नाट्यसंस्थेचे 'मोरूची मावशी' हे नाटक पत्की यांनी १९८५ साली संगीत दिलेले पहिले नाटक. नाटकातल्या फार्सिकल गाण्यांसाठी त्यांनी कलाकारांमधील स्वर व ताल या क्षमतांचा उपयोग करून घेतला. या यशानंतर 'भ्रमाचा भोपळा', 'ब्रह्मचारी', 'लग्नाची बेडी' यासारखी सुयोगची हलकीफुलकी नाटकेही अशोक पत्की आणि प्रशांत दामले यांच्या समीकरणाने यशस्वी झाली. 'गांधी विरुद्ध गांधी' या गंभीर नाटकाला पत्की यांनी दिलेल्या पार्श्वसंगीताची दखलही जाणकारांनी, समीक्षकांनी घेतली. सुयोग, मुंबई मराठी साहित्य संघ, गणरंग, कलावैभव, चित्रलेखा, श्रीचित्र अशा नामांकित नाट्यसंस्थेच्या २५० पेक्षाही जास्त नाटकांना पत्की यांनी संगीत दिले आहे. नाटकांचे आणि संगीत कार्यक्रमाचे परदेशदौरे करताना त्या-त्या संस्कृतीतील संगीतकलेची वैशिष्ट्ये टिपत मराठी नाटकातूनही ते मांडण्याचे प्रयोग त्यांनी यशस्वी केले. या प्रयोगातूनच 'जादू तेरी नजर' हा ऑपेरा संगीतबद्ध झाला.

अशोक पत्की यांनी १९७२ साली अशोक जी. परांजपे यांच्या गीतांना चाली देऊन सुमन कल्याणपूर यांनी गायलेल्या 'एकदाच यावे सखया', 'सहज तुला गुपित' या भावगीतांची ध्वनिमुद्रिका एच.एम.व्ही.ने काढली. 'केतकीच्या बनी' या गाण्यामध्ये बंगाली संगीतातील संचारीचा प्रयोग केला आणि या गाण्यांमुळे 'मेलोडियस संगीतकार' म्हणून त्यांची एक स्वतंत्र ओळख निर्माण झाली.

अशोक पत्की यांनी गीतकार शांताराम नांदगावकर यांच्याबरोबरही अनेक वर्षे काम केले. 'कारवाँ चालला' या मुंबई आकाशवाणीवरील सांगीतिकेपासूनच या गीतकार-संगीतकार जोडीचे सूर जुळले आणि 'काल राती स्वप्नामध्ये', 'अनुरागाचे थेंब झेलती', 'सूर झंकारले', 'सजल नयन नीत धार', 'गा गीत तू सतारी', 'चंद्र वाटेवरी', 'हसलीस एकदा' अशा सुरेल, मोहक गीतांनी भावसंगीतात मोलाची भर घातली. पत्की यांनी भूपेंद्रसिंग, येशूदास, कविता कृष्णमूर्ती, शंकर महादेवन, कुणाल गांजावाला, शान अशा अमराठी गायकांनाही मराठी भावगीत, चित्रपटगीत, शीर्षकगीतांसाठी आवर्जून संधी दिली. ज्येष्ठ संगीतकार अशोक पत्की नव्या पिढीशी आणि पर्यायाने बदलत्या संगीत प्रवाहाशी जुळवून घेत आहेत. स्वप्निल बांदोडकर यांनी गायलेले 'राधा ही बावरी' हे घराघरात पोहोचलेले गाणे याची साक्ष देते. पत्की यांनी 'दर्याच्या दे गेर', 'सोबीत सफर', 'नाईन' अशा कोकणी गीतांनाही संगीत दिले आहे.

पत्की यांनी संगीतदिग्दर्शित केलेला 'पैजेचा विडा' (१९८५) हा पहिला चित्रपट. चित्रपटाला आवश्यक अशी प्रासंगिक गीते करताना निरनिराळ्या विषयांच्या चित्रपटांना त्यांनी संगीत दिले. 'अर्धांगी' या चित्रपटातील गीताला सर्वप्रथम राज्य शासनाचा सर्वोत्कृष्ट संगीतकार म्हणून पुरस्कार मिळाला. 'आपली माणसं' (१९९२) या चित्रपटात पत्की यांनी संगीतबद्ध केलेले केवळ एकच गाणे होते. आशा भोसले-सुरेश

वाडकर यांनी गायलेल्या एकमेव गीतासाठी त्यांना सर्वोत्कृष्ट संगीतकार म्हणून राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. 'नणंद भावजय', 'मामला पोरींचा', 'हेच माझं माहेर', 'भेट', 'बिनधास्त', 'आईशपथ' अशा सव्वाशेहून अधिक चित्रपटांना त्यांनी संगीत दिले. १९८८ च्या सुमाराला 'दे टाळी', 'किस बाई किस', 'एकापेक्षा एक', 'प्रेम करू या खुल्लमखुल्ला' या हलक्याफुलक्या विनोदी चित्रपटांनाही पत्की यांनी संगीत दिले. २००७ साली 'अंतर्नाद' (कोकणी) हा राजेंद्र तालक यांचा चित्रपट आणि त्याच कथेवर 'सावली' (मराठी) हा चित्रपट अशोक पत्की यांनी संगीत दिग्दर्शित केला. गुरुशिष्य परंपरेचा वेध घेणारी, आईवडील आणि मुले यांच्या नात्याचा शोध घेणारी कथा आणि त्याला साजेसे संगीत प्रेक्षकांना भावले. 'अंतर्नाद' या चित्रपटाला ५४ वा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला आणि 'सावली' या चित्रपटासाठी राज्य शासनाचा सर्वोत्कृष्ट संगीतकाराचा पुरस्कार पत्की यांना मिळाला.

प

'मी सिंधुताई सपकाळ' या चरित्रकथेवर आधारित चित्रपटासाठी सुरेश भटांच्या काही गझला पत्की यांनी संगीतबद्ध केल्या. सुरेश वाडकर आणि देवकी पंडित यांनी गायलेल्या गीतांमधून आणि समर्पक स्वररचनांमधून चित्रपटाचा संघर्षमय, करुण आणि सकारात्मक विचार अधिक परिपूर्ण झाला. या चित्रपटातील स्वररचनांसाठी सर्वोत्कृष्ट संगीतकार म्हणून पत्की यांना मिफ्टा पुरस्काराने सन्मानित केले. २०१२ साली आलेल्या चंद्रकांत कुलकर्णी दिग्दर्शित 'तुकाराम' या चित्रपटाचे संगीत दिग्दर्शन अशोक पत्की आणि अवधूत गुप्ते यांनी केले. पत्की यांनी 'शितू', 'अलिशा', 'सावरीयाँ डॉट कॉम' या कोकणी चित्रपटांनाही संगीत दिलेले आहे.

'दूरदर्शन' मालिकांची 'शीर्षकगीतां'ना दिलेले संगीत अशोक पत्की यांच्या कारकिर्दीमधील महत्त्वपूर्ण योगदान आहे. 'गोट्या' या मालिकेप्रमाणे 'बीज अंकुरे अंकुरे' हे शीर्षकगीतही अतिशय लोकप्रिय झाले. शीर्षकगीतांना भावगीतांच्या दर्जाच्या चाली देऊन 'पिंपळपान', 'आभाळमाया', 'वादळवाट', 'मानसी', 'अधुरी एक कहाणी' ही शीर्षकगीते घरोघरी पोहोचली.

अशोक पत्की आज चाळीस वर्षांपेक्षा जास्त काळ संगीतसृष्टीमध्ये काम करताना नव्या आणि जुन्या पिढीच्या संगीतामध्ये दुवा जोडणारे आणि दोन्ही पिढ्यांना सामावून घेणारे संगीत देत आहेत.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## परांजपे, राजाराम दत्तात्रेय

*राजा परांजपे*

**अभिनेता, दिग्दर्शक, निर्माता**

**२० एप्रिल १९१० – ९ फेब्रुवारी १९७९**



स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी चित्रसृष्टीचे शिल्पकार म्हणून विख्यात चित्रकर्ते राजाराम दत्तात्रेय परांजपे यांचा नेहमीच उल्लेख करण्यात आला आहे. जवळपास चाळीस वर्षांची चित्रसंपदा, अभिनेता, दिग्दर्शक, निर्माता, लेखक तसेच क्वचित प्रसंगी गायक – अशा विविध क्षेत्रात ऐंशी मराठी आणि हिंदी चित्रपटांशी आलेला संबंध अशी त्यामागची परंपरा होती. कारकिर्दीच्या सुरुवातीच्या काळात लहानसहान भूमिका करीत राजाभाऊंनी स्वातंत्र्यानंतरच्या काळामध्ये एक महत्त्वाचा चित्रकर्ता म्हणून मान्यता मिळवली. या काळामध्ये राजा परांजपे यांनी मराठी चित्रपटांना आवश्यक असलेले नावीन्य तर दिलेच, पण त्याचबरोबर विषय आणि सादरीकरण यातही ताजेपणा आणला. रेखीव पात्ररचना आणि कल्पनापूर्ण दिग्दर्शन यांनी त्यांचे चित्रपट समृद्ध असत.

राजाभाऊंना मास्टर विनायकांच्या विनोदपटांची परंपरा पुढे चालविल्याचे श्रेय दिले जाते. पण परांजपे यांचा विनोद हा चार्ली चॅप्लीनच्या शैलीशी अधिक मिळताजुळता आहे. रहस्य, उपहास, मनोविश्लेषण अशा अनेक कथाविषयांवर त्यांनी चित्रपट केले आणि

त्यांपैकी काही तर मराठीमध्ये प्रथमच निर्माण झाले होते. आपल्या चित्रपटांबद्दल कमीत कमी व्यावसायिक दृष्टिकोन असलेल्या मोजक्या भारतीय चित्रकर्त्यांपैकी ते एक होत. कामुक, हिंसक आणि अश्लील दृश्ये दाखवून प्रेक्षकांची मने चाळवण्यापेक्षा विनोद, उपहास, कल्पनारम्यता, तसेच मौज यांतून त्यांचे मृदू मनोरंजन करणे त्यांनी पसंत केले.

मिरज येथे जन्मलेल्या राजा परांजपे यांचे बालपण पुण्यात गेले. शालेय शिक्षणात अजिबात रस नसलेले परांजपे, त्याच वयात रंगभूमीकडे आकर्षित झाले होते. शाळेच्या वार्षिक स्नेहसंमेलनात बसवलेल्या माधवराव जोशी यांच्या 'विश्ववैचित्र्य' नाटकात त्यांनी एक विनोदी भूमिका केली आणि प्रेक्षकांची वाहवा मिळवली.

राजाभाऊ तारुण्यात आले, तो मूकपटांचा काळ होता. अशा मूकपटांना पार्श्वसंगीत देण्याच्या इराद्याने त्यांनी चित्रपटगृहामध्ये प्रवेश मिळवला आणि तेथून या माध्यमाशी त्यांचा संबंध जुळून आला. पडद्यावर पाहिलेली उत्तमोत्तम चित्रपटांतील पात्रे पाहून ते भारावून जात आणि त्यातून त्यांची अभिनयाची आवड अधिकच वाढत गेली. या काळात त्यांनी एस.व्ही. वर्तक यांच्या 'लपंडाव' नाटकात 'वाटाणे' नावाचे विनोदी पात्र रंगवले. यानंतर जोमाने पुढे येणाऱ्या मराठी चित्रपटसृष्टीकडे ते आकर्षित झाले आणि त्यांनी बाबूराव पेंटर यांच्या 'सावकारी पाश' (१९३५)मध्ये पहिली भूमिका केली. या यशस्वी पदार्पणानंतर राजाभाऊंनी पेंटर यांच्याच 'प्रतिभा' (१९३७) मध्ये चकण्या मंडूकचे काम केले. यामध्ये केशवराव दाते आणि दुर्गा खोटे यांच्याही भूमिका होत्या. भालजी पेंढारकरांच्या 'गोरखनाथ' (१९४०) मधील परांजपे यांचा विनोदी भोलेनाथ चांगलाच गाजला. यामध्ये त्यांनी दोन गाणीही गायली.

अशा प्रकारे, चित्रपटसृष्टीशी जवळीक साधलेली असताना त्यांना चित्रनिर्मितीच्या विविध बाबी समजून घेण्याची जिज्ञासा निर्माण झाली नसती तरच नवल होते. म्हणून त्यांनी भालजी पेंढारकर आणि मास्टर विनायक, तसेच 'नजम नक्वी', 'शोरी', 'वेदी' या हिंदी चित्रपट दिग्दर्शकांना साहाय्य केले. याचीच परिणती म्हणून राजा परांजपे यांना 'बलिदान' (१९४७) या पहिल्यावहिल्या चित्रपटाच्या दिग्दर्शनाची संधी मिळाली. यानंतर पुढच्याच वर्षी आलेल्या 'जिवाचा सखा'ने एका बाजूला रौप्यमहोत्सव साजरा केला, तर दुसऱ्या बाजूला राजा परांजपे, ग. दि. माडगूळकर आणि सुधीर फडके यांना एकत्र आणले. या त्रिकुटाने नंतरच्या काळात अनेक महत्त्वाचे चित्रपट दिले.

'पुढचं पाऊल' (१९५०) चित्रपटाने परांजपे यांच्या कारकिर्दीची पुढची दिशा ठरवली. यामध्ये गदिमा आणि पु.ल. देशपांडे यांनी भूमिका केल्या होत्या, पण त्याहीपेक्षा लोकांच्या लक्षात राहिला तो परांजपे यांनी रंगवलेला कोकणी सुहृद चिपळूणकर.

यानंतरचा काळ म्हणजे, राजाभाऊंच्या उत्तुंग प्रतिभेचे आणि प्रतिमेचे दर्शन घडवणारा ठरला. 'पेडगावचे शहाणे' (१९५२) मध्ये त्यांनी एकाच घरात राहून वेगवेगळ्या जीवनशैलींमुळे कुटुंबप्रमुखाला जेरीस आणणारी पात्रे सादर केली. यामध्ये त्यांना वठणीवर आणणारे वेडे आणि शहाणे काका अशा राजाभाऊंच्या दुहेरी भूमिकांचे आणि कल्पक दिग्दर्शनाचे खूपच कौतुक झाले. या यशाने प्रेरित होऊन त्याच वर्षी राजाभाऊंनी 'लाखाची गोष्ट' अधिक आत्मविश्वासाने सादर केला. यामध्येही उपहास होता आणि त्याला कारुण्याचीही झालर होती. यातील रेसकोर्स आणि स्वप्नदृश्यांची खूप चर्चा झाली. दरम्यानच्या काळात, करदार स्टुडियोने 'चाचा चौधरी' (१९५३) या 'पेडगावचे शहाणे'च्या हिंदी आवृत्तीची निर्मिती केली आणि अर्थातच यातील दुहेरी भूमिका आणि दिग्दर्शन राजाभाऊंनी केले.

राजा परांजपे यांच्या 'ऊनपाऊस' (१९५४)मध्ये त्यांच्या अभिनयाने आणि दिग्दर्शनाने आणखी मोठी उंची गाठली. आपल्या काळाच्या पुढे जाऊन आईवडील आणि मुले यातील संघर्ष त्यांनी अतिशय उत्कटतेने सादर केला. म्हातारपणी झालेली पती-पत्नीची ताटातूट आणि त्यांची अगतिकता दाखवताना परांजपे यांच्या मानवी स्वभावाच्या जाणिवांचे दर्शन घडले.

प

'गंगेत घोडं न्हालं' (१९५५) हा एक मजेदार फार्स होता. त्याचे रसिकांनी आणि समीक्षकांनी चांगले स्वागत केले. याच वर्षी भारतीय चित्रकर्त्यांच्या अधिकृत शिष्टमंडळासहित राजाभाऊ चीनला गेले आणि तेथील चित्रसृष्टीची माहिती घेतली. त्यांच्यासमवेत बलराज साहनी, बिमल रॉय, चेतन आनंद, पृथ्वीराज कपूर असे मातब्बर कलाकारही होते. यानंतर यशस्वी दाक्षिणात्य निर्माते ए. व्ही. मैयप्पन यांच्यासाठी राजभाऊंनी 'बाप बेटे' (१९५९) चे दिग्दर्शन केले.

चेन्नई येथे निर्मिती झालेल्या या चित्रपटात अशोककुमार, श्यामा, कन्हैयालाल यांनी भूमिका केल्या, तर रमेश देव यांचे हिंदी चित्रसृष्टीत पदार्पण झाले.

चेन्नईहून परत आल्यानंतर राजा परांजपे यांनी श्रीपाद चित्र ही संस्था सुरू करून स्वत:च्याच कथेवर आधारित 'जगाच्या पाठीवर' (१९६०) चे निर्मिती-दिग्दर्शन (आणि त्यात अभिनयही) केले. नाव नसलेल्या पात्राविषयीच्या या चित्रपटात राजाभाऊ, गदिमा आणि सुधीर फडके पुन्हा एकत्र आले. अत्यंत लोकप्रिय



'बायकोचा भाऊ' या चित्रपटात राजा परांजपे

प


'जगाच्या पाठीवर'
या चित्रपटात राजा परांजपे

ठरलेल्या या चित्रपटानंतर राजा परांजपे यांनी 'सुवासिनी' (१९६१) या सर्वांगसुंदर चित्रपटाचे दिग्दर्शन केले. दरम्यान बिमल रॉय यांच्या 'बंदिनी' (१९६३) मध्ये परांजपे यांनी सदाशिवबाबू या उतारवयातील पोस्टमास्तरची भूमिका केली. संगीताची जाण असलेल्या परांजपे यांनी वैष्णव पदे गाऊन स्वावलंबी विचाराची ही प्रतिष्ठित भूमिका अधिकच रंगतदार वठवली. याच वर्षी, चार्ली चॅप्लीनच्या 'द किड' (१९२१) वर आधारित 'हा माझा मार्ग एकला'चे दिग्दर्शन केले. या वेळी राजाभाऊंचे वय ५३ होते आणि त्यांनी केसांचा टोप वापरून नायकाची भूमिका सजीव केली.

रहस्यपट म्हणजे भीतिदायक वातावरण, एकाकी इमारती, भयावह चेहरे, खून अशा कल्पना मोडीत काढत राजाभाऊंचा हा चित्रपट इतका लोकप्रिय ठरला की, राज खोसला यांनी 'मेरा साया' ही त्याची हिंदी आवृत्ती काढली. शिवाय याच्या तमिळ आणि तेलगू भाषेतही आवृत्त्या निघाल्या, त्या वेगळ्याच.

'पडछाया' (१९६५) द्वारे राजा परांजपे यांनी एक गूढकथा सादर केली. यामध्ये त्यांनी आपल्या मुलाच्या पितृत्वाबद्दल शंका असलेल्या एका डॉक्टरचे मनोविश्लेषण मांडले. एक वृद्ध माणूस आणि तरुण मुलगी यांच्यातील प्रेमाचा नाजूक दुवा सादर करणारा 'आधार' (१९६९) हा राजा परांजपे यांनी दिग्दर्शित केलेला अखेरचा चित्रपट. यानंतर त्यांनी काही मराठी तसेच हिंदी चित्रपटातून भूमिका केल्या. त्यांचेच शिष्य राजदत्त यांनी दिग्दर्शित केलेल्या 'या सुखांनो या' (१९७५) मध्ये परांजपे यांनी आपली अखेरची भूमिका केली. परांजपे यांचे पुण्यात निधन झाले.

व्यक्तिगत आणि सामाजिक मूल्ये हे परांजपे यांच्या चित्रपटातील बलस्थान असे. त्यांनी इतर दिग्दर्शकांबरोबर केलेल्या चित्रपटांतूनही ही गोष्ट आवर्जून असे. परांजपे यांना आपली संस्कृती, कुटुंबपद्धती, समाज याबद्दल प्रचंड आदर होता आणि तो त्यांच्या चित्रपटांतून प्रतिबिंबित होत असे. त्यांच्या पात्रांमधील

संवाद हा बहुधा ओघवते संभाषण वाटे. त्यामुळे त्यातून एका क्षणाला हासू तर दुसऱ्या क्षणाला आसू, असेही होऊ शके.

एक यशस्वी चित्रकर्ता म्हणून कारकिर्द असलेल्या राजा परांजपे यांना प्रेक्षक आणि समीक्षक यांनी भरभरून दाद दिली. केवळ मराठीच नव्हे, तर इंग्रजी वृत्तपत्रांतूनही त्यांच्याबद्दल रकानेच्या रकाने भरून मजकूर प्रसिद्ध होत असे. आपल्या चित्रपट कारकिर्दीमध्ये राजा परांजपे यांनी दोन राष्ट्रीय आणि चार राज्य चित्रपट पुरस्कार प्राप्त केले.

**– चंद्रशेखर जोशी**

**संदर्भ** : १) श्रीखंडे शशिकांत, 'मराठी चित्रपटसृष्टीचे अध्वर्यू-राजा परांजपे', मधुश्री प्रकाशन, पुणे; २००४.

## पवार, कुलदीप वसंत

**अभिनेता**

**१० जून १९४९ – २४ मार्च २०१४**

प



चित्रपटसृष्टी, रंगभूमी आणि दूरदर्शन यावर नायक, खलनायक आणि विनोदी भूमिका दमदारपणे साकारणारे आणि प्रसंगी स्वतःच पटकथाही लिहिणारे अभिनेते कुलदीप पवार मूळचे कोल्हापूरचे. त्यांचे वडील वसंतराव मोटारसायकलींच्या एजन्सीमध्ये काम करत आणि आई शांतादेवी यांनी गुजराथी शाळा चालवली होती. कुलदीप वसंत पवार यांना अभिनयाचा वारसा नसला तरी आई शांतादेवी उत्तम नकला करत असत, तर वडील व्हायोलीन व माऊथऑर्गन वाजवत असत.

कुलदीप पवार यांचे शिक्षण कोल्हापूरला 'सेट झेवियर्स' स्कूलमध्ये झाले. शाळेत असतानाच त्यांनी अभिनयाला सुरुवात केली. याच वयात त्यांनी सुलोचनादीदींच्या हस्ते बक्षिसेही पटकावली. 'ज्यांना दुसरं काही करता येत नाही ते सिनेमात जातात' अशी समजूत असण्याच्या काळात पवार यांनी याच क्षेत्रात यायचे निश्चित केले. तेव्हा त्यांना घरातून विरोधही झाला. अभिनयाऐवजी आजोबांची 'जयश्री', 'प्रताप', 'वसंतबहार' ही सांगली-कोल्हापूरची थिएटर्स सांभाळ, असे त्यांना सांगण्यात आले. पण अभिनयाकडे ओढा आणि घरचा कडाडून विरोध अशा कात्रीत सापडलेले पवार वयाच्या सोळाव्या वर्षी घरातून पळून कऱ्हाडला आले आणि 'हिंदुस्थान गिअर्स' नावाच्या कंपनीला कास्टींग पुरवणाऱ्या फाऊंड्रीत कामाला लागले. लेथवर काम केल्यावर खाली पडणारा कचरा उचलण्याचे काम त्यांना देण्यात आले. फक्त रु. ९०/- पगार घेणारे कुलदीप काम संपल्यावर संध्याकाळी कामगारांची नाटके हौसेने बसवायचे. याच काळात कुलदीप पवार यांच्याकडे दिग्दर्शक कृष्णा पाटील यांचे लक्ष गेले आणि 'एक माती अनेक नाती' या चित्रपटातल्या नायकाच्या भूमिकेसाठी त्यांना विचारणा झाली. हा कुलदीप पवार यांचा पहिला चित्रपट. या चित्रपटात त्यांची नायिका होती अनुपमा, तर खलनायक होते चित्तरंजन कोल्हटकर. परंतु हा चित्रपट फारसा चालला नाही. मात्र या चित्रपटामुळे 'आपल्या अभिनयात अजून खुलेपणा, परिपक्वता येण्याची गरज आहे' हे कुलदीप पवार यांना स्वतःलाच जाणवले. यानंतर पवार पुण्याला आले. तेथे ते 'राजहंस' आणि 'माउली' या मासिकांसाठी विपणन करू लागले. अभिनयाचा योग्य मार्ग दाखवतील असे वाटणारी अनेक माणसे त्यांना या काळात भेटली, मात्र प्रत्यक्षात काम हाती आले नाही. मुंबईतल्या स्टुडिओंना भेटी दिल्या तर काही काम होईल, असे वाटून कुलदीप पवार पुणे सोडून मुंबईला आले. स्टुडिओतली पायपीट सुरू झाली आणि पोटासाठी बंगाली माणसाच्या कारखान्यात चेपलेल्या गाड्यांना रंग देण्याचे काम त्यांनी सुरू केले. या काळात त्यांना चित्रपटात काम करण्याची संधी मिळत नसल्यामुळे नैराश्य आले.

याच काळात भारदस्त आवाजाच्या आणि उत्तम व्यक्तिमत्त्वाच्या पण दाढी वाढलेल्या पवारांशी गाडगीळ नावाच्या गृहस्थांशी ओळख झाली. ते पवारांना




'नाट्यसंपदे'च्या कार्यालयामध्ये घेऊन गेले व पवारांच्या रूपात दाजी पणशीकरांना 'इथे ओशाळला मृत्यू' या नाटकाकरता जसा हवा होता तसा संभाजी सापडला. या नाटकाचा पहिलाच प्रयोग बेळगावला झाला, तो एकदम सुपरहिट, हाऊसफुल ठरला. याचे पुढे ३५० हून अधिक प्रयोग झाले. पुढे नाट्यसंपदा आणि कुलदीप पवार हे अतूट समीकरण झाले. या भूमिकेमुळे अभिनयाचा रस्ता त्यांच्यासाठी खुला झाला.

नाटकामध्ये सर्व प्रकारच्या भूमिका केल्याशिवाय चित्रपटात काम करणार नाही, असे ठरवणाऱ्या कुलदीप पवार यांनी ऐतिहासिक, फार्सिकल, तसेच लोकनाट्यही केली. 'नकटीच्या लग्नाला', 'वीज म्हणाली धरतीला', 'गोलमाल', 'पाखरू', 'रखेली', 'निष्कलंक', 'खेळ थोडा वेळ', 'बायांनो नवरे सांभाळा', 'अश्रूंची झाली फुले', 'सोळावं वरीस धोक्याचं', 'पती सगळे उचापती', 'एन्काऊंटर', 'राजकारण गेलं चुलीत' अशी अनेक नाटके त्यांनी केली, गाजवली. त्यांनी 'गीतगोविंद' नावाची स्वतःची नाट्यसंस्थाही काढली.

पवार यांनी मोठ्या पडद्यावर पुनरागमन केले ते गोविंद कुलकर्णी यांच्या 'जय तुळजाभवानी' या चित्रपटामधून

एका छोटाशा भूमिकेद्वारे. या चित्रपटाच्या चित्रीकरणादरम्यान अनंत माने यांनी त्यांच्या 'कलावंत' या चित्रपटासाठी खलनायक म्हणून पवार यांना साईन केले. अनंत माने यांच्याबरोबर कुलदीप पवार काम करत आहेत, हे कळल्यावर दिग्दर्शक कमलाकर तोरणे यांनी त्यांच्या 'दरोडेखोर' या चित्रपटात नायकाची भूमिका दिली. हा चित्रपट मराठीतल्या अभिजात चित्रपटांपैकी एक ठरला. त्यानंतर कुलदीप पवार यांनी केलेला 'जावयाची जात' हा चित्रपट सुपरहिट ठरला. रांगडा, मराठमोळा मर्द नायक या चित्रपटात त्यांनी अतिशय प्रभावीपणे साकार केला. यानंतर त्यांच्या उत्तमोत्तम चित्रपटांची मालिकांच प्रेक्षकांसमोर आली. 'अरे संसार संसार', 'शापित', 'सर्जा', 'बिनकामाचा नवरा', 'मर्दानी', 'गुपचूप गुपचूप', 'गोष्ट धमाल नाम्याची', 'नेताजी पालकर', 'पायगुण', 'हिरवा चुडा', 'खरा वारसदार', 'एकापेक्षा एक', 'आई तुळजाभवानी', 'जाऊ तिथे खाऊ', 'देवाशपथ खोटं सांगेन, खरं सागंणार नाही', 'वजीर', 'तहान', 'सुपारी', 'श्रीनाथ म्हस्कोबाचं चांगभलं', 'नवरे सगळे गाढव', 'संसार पाखरांचा', 'मला एक चानस हवा', 'नवरा माझा नवसाचा', 'भारतीय' इ. चित्रपट करणाऱ्या कुलदीप पवार यांनी वैविध्यपूर्ण भूमिका केल्या. भूमिकांचे असे वैविध्य फारच कमी जणांच्या वाट्याला येते.

कुलदीप पवार यांनी 'प्रोफेसर प्यारेलाल', 'दूध का कर्ज', 'जीत' असे मोजके हिंदी चित्रपटही केले. त्यांच्या 'परमवीर', 'तू तू मै मै', 'वक्त की रफ्तार' या हिंदी तर 'बंदिनी' ही मराठी मालिका लोकप्रिय झाली. त्यांची 'परमवीर' ही डिटेक्टीव्ह मालिका पाहणाऱ्या प्रेक्षकांत बिग बी अमिताभ बच्चन यांचाही समावेश होता. अभिनेता कुलदीप पवार यांच्यामध्ये एका पटकथाकाराचे काही पैलूही आहेत. त्यांनी 'बंदिनी', 'परमवीर' या मालिकांचे काही भाग स्वतः लिहिले आहेत.

कुलदीप पवार यांच्या 'सत्ताधीश'मधील भूमिकेला महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट साहाय्यक अभिनेता म्हणून 'हळद-कुंकू' चित्रपटातल्या भूमिकेला विशेष लक्षवेधी भूमिका म्हणून आणि 'एन्काऊंटर' या नाटकाला नाट्यगौरव पुरस्कार मिळाले आहेत.

४१ वर्षांहून अधिक काळ अभिनयक्षेत्रात बहुरंगी व्यक्तिरेखा साकारणाऱ्या कुलदीप पवार यांच्या पत्नी नीलिमा यांनी ऐश्वर्य आणि समृद्ध या दोन मुलांसह घरची आघाडी सुरळीत सांभाळली आहे.

– स्वाती प्रभुमिराशी

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## पवार, ललिता गणपत
**अभिनेत्री**
**१८ एप्रिल १९१६ – २४ फेब्रुवारी १९९८**



चित्रपटसृष्टीत ज्या काळात पुरुष खलनायकांचा राबता होता, त्या काळात आपल्या खलनायकी भूमिकांसाठी लोकप्रिय झालेल्या अभिनेत्री म्हणजे ललिता पवार. त्यांचा जन्म नाशिक जिल्ह्यातील येवले या गावी झाला. त्यांच्या वडिलांनी – लक्ष्मण सगुण यांनी मुलीचे नाव 'अंबिका' असे ठेवले. उदरनिर्वाहासाठी लक्ष्मण सगुण हे कापडविक्रीचा उद्योग करत असत. लहानपणापासूनच धीट स्वभावाच्या अंबिका यांनी चित्रपटांमध्ये काम करण्यास सुरुवात केली. त्या काळात त्यांनी 'आर्य महिला', 'ठकसेन', 'पारिजातक', 'भीमसेन', 'पृथ्वीराज संयोगिता', 'नको गं बाई लग्न' या चित्रपटांमधून कामे केली होती.

'अमृत' या नवयुग फिल्मच्या चित्रपटात त्यांनी साकारलेली चांभारणीची भूमिका वैशिष्ट्यपूर्ण ठरली, तर 'नेताजी पालकर', 'भक्त दामाजी', 'गोरा कुंभार', 'संत बहिणाबाई' या चित्रपटातील त्यांच्या भूमिकाही लक्षणीय ठरल्या.

ललिताबाईंच्या भूमिकेतील वैशिष्ट्य लक्षात घेऊनच प्रभातने 'रामशास्त्री' या चित्रपटातील आनंदीबाईंच्या

प



**'रामशास्त्री' चित्रपटात आनंदीबाईंच्या भूमिकेत ललिता पवार**

भूमिकेसाठी त्यांना निवडले. ललिताबाईंनीही आपल्या अभिनयाच्या जोरावर महत्त्वाकांक्षी, करारी व निष्ठुर स्वभावाची आनंदीबाई यथोचितपणे साकारली. या चित्रपटातील आनंदीबाईंच्या भूमिकेमुळे त्यांचे नाव सर्वदूर पोहोचले. यानंतर त्यांना 'झुमके', 'बैरामखान', 'संतान' या हिंदी चित्रपटात कामे मिळाली. 'जय मल्हार' या पहिल्या ग्रामीण धर्तीच्या चित्रपटात ललिताबाईंनी साकारलेली मुरळीची भूमिकाही महत्त्वपूर्ण होती.

चित्रपटांमध्ये काम करत असतानाच चित्रपटसृष्टीतील अंबू यांनी गणपत पी. पवार यांच्याशी विवाह केला आणि त्या ललिता पवार या नावाने ओळखल्या जाऊ लागल्या. याच काळात त्या हिंदी स्टंटपटातही कामे करत असत. चित्रपटात मा. भगवान यांच्याबरोबर काम करत असताना मा. भगवान ललिताबाईंच्या थोबाडीत मारतात, असे दृश्य होते. त्याचे चित्रीकरण चालू असतानाच पहेलवान असणाऱ्या मा. भगवान यांनी जोराने ललिताबाईंच्या गालावर मारलेली चपराक ललिताबाईंचा गाल पॅरालाईज्ड करून गेली. डोळ्याची रक्तवाहिनी फुटल्यामुळे त्यांना खूप त्रास झाला. त्या वेळेस तिरळा झालेला डोळा तीन वर्षांच्या उपचारांनंतरही सरळ झाला नाही. त्यांच्या तिरळ्या डोळयाचा परिणाम त्यांच्या अभिनयावर झाला नसला तरी त्यांना मिळणाऱ्या भूमिकांवर निश्‍चितपणे झाला. त्यानंतर प्रेक्षकांना त्या नायिकेच्या ऐवजी चरित्रभूमिका साकार करताना दिसू लागल्या. नायिकेच्या भूमिकेत वावरणाऱ्या या हाडाच्या अभिनेत्रीने त्यात कमीपणा न मानता किंवा या प्रसंगाने हरून न जाता, आपली अभिनय कारकिर्द सुरूच ठेवली व अभिनयाने


'संत बहिणाबाई' चित्रपटात ललिता पवार

आपल्या व्यक्तिमत्त्वाला उत्तुंगता प्राप्त करून घेतली.

डोळा तिरळा झाल्यानंतर ललिता पवार यांनी भूमिका केलेला पहिला चित्रपट होता 'गृहस्थी'. यात त्यांनी खलनायिकेची भूमिका साकारली. त्यानंतर त्यांनी 'मानाचं पान' (१९४९), 'अमर भूपाळी' (१९५१), 'नंदकिशोर' (१९५१), 'छत्रपती शिवाजी', 'मायेचा पाझर' (१९५२), 'संत बहिणाबाई' (१९५३), 'कलगीतुरा' (१९५५), 'पायदळी पडलेली फुलं' (१९५६), 'देवाघरचं लेणं' (१९५७), 'सुखाचे सोबती' (१९५८), 'सतीचं वाण' (१९६९), 'चोरीचा माल' (१९७६), 'सासुरवाशीण' (१९७८), 'घरचा भेदी' (१९८४), 'कुलस्वामिनी अंबाबाई' (१९८४), 'लिमिटेड माणुसकी' (१९९४) अशा अनेक चित्रपटातून त्यांनी आपल्या अस्सल अभिनयाने प्रेक्षकांच्या मनावर ठसा उमटवला. यापैकी अनेक भूमिका खाष्ट सासूच्या किंवा खलनायकी प्रवृत्तीच्या होत्या.

दरम्यानच्या काळात हिंदी चित्रपटसृष्टीतही केवळ अभिनयक्षमतेच्या जोरावर त्यांनी स्वत:चे स्थान निर्माण केले होते. राजकपूर निर्मित 'अनाडी' चित्रपटातल्या, वरकरणी खाष्ट पण प्रेमळ मिसेस डिसाची भूमिका आजही प्रेक्षकांच्या आठवणीत आहे. यासाठी त्यांना १९५९ सालचा 'फिल्मफेअर' हा सर्वोत्कृष्ट साहाय्यक अभिनेत्रीचा पुरस्कारही मिळाला. 'श्री ४२०' (१९५५), 'गंगामाई' (१९५५), 'मि. अॅण्ड मिसेस ५५'मध्ये सीतादेवी, 'सुजाता' (१९५९)मध्ये गिरीबाला, 'हम दोनो' (१९६१)मध्ये मेजरची आई, 'प्रोफेसर' (१९६१) मध्ये सीतादेवी वर्मा याही चित्रपटातल्या त्यांच्या भूमिका गाजल्या. 'दुसरी सीता' (१९७४), 'आज का ये घर' (१९७६), 'तपस्या' (१९७६), 'आईना' (१९७७), 'काली घटा' (१९८०), 'फिर वही रात' (१९८०), 'सौ

दिन सासके' या चित्रपटांतूनही त्यांनी चरित्रअभिनेत्रीच्या भूमिका साकारल्या.

गणपत पवारांबरोबरचा त्यांचा विवाह अयशस्वी ठरल्यानंतर त्यांनी मुंबईच्या अंबिका स्टुडिओचे चित्रपट निर्माते राजप्रकाश गुप्ता यांच्याशी विवाह केला. मात्र आयुष्याच्या शेवटच्या काळात त्या एकाकी झाल्या आणि पुण्याला औंध भागात स्थायिक झाल्या. पुण्यातच त्यांचे निधन झाले.

– संपादित

**संदर्भ** : १) मराठी विश्वकोश, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई. २) पुराणिक अरुण, अंबू उर्फ ललिता पवार, लोकप्रभा; ८ जून २०१२.

## पवार, वसंत शंकर

**संगीतकार**

**१९२७ – ६ ऑगस्ट १९६५**



वसंत शंकर पवार यांचे घराणे मूळचे धार (मध्य प्रदेश) येथील होते. पण भाऊबंदकीला व संस्थानी राजकारणाला वैतागून त्यांचे वडील कोल्हापूरला आले. तेथेच वसंत यांचा जन्म झाला. वसंत यांचे वडील शंकर हे स्वत: उत्तम संगीतकार होते. त्यांना अनेक वाद्ये वाजवता येत व नवयुग फिल्म कंपनीमध्ये ते प्रमुख वादक व संयोजक म्हणून काम करत. 'आपला मुलगा उत्तम सतारवादक व्हावा' या ईर्षेतून त्यांनी वसंत यांना शिकवण्यासाठी धारवाडचे सुप्रसिद्ध सताररत्न रहिमतखां यांना कोल्हापूरला बोलावून घेतले आणि १९३४ साली रु. २२००/–चे मानधन देऊन वसंत यांचे गंडाबंधन केले. त्यांच्या हाताखाली वसंत तयार होत होते. त्यांची ग्रहणशक्ती मूळचीच उत्तम असल्याने सतारवादनात ते लवकरच तरबेज झाला. पण विधिलिखित वेगळेच होते. पुण्याला सहज म्हणून मित्रांना भेटायला नवयुग स्टुडिओत गेलेल्या वसंत यांचा एका संगीतकाराने अपमान केला आणि या घटनेमुळे दुखावलेल्या वसंत यांच्या मनात संगीतकार व्हायची ईर्षा निर्माण झाली. त्या महत्त्वाकांक्षेपोटी त्यांनी सतारवादन सोडून मुंबईला प्रस्थान केले. तेथे त्यांनी अनेक देशी–विदेशी वाद्ये शिकून त्यावर हुकमत मिळवली. त्यांनी मुंबईला 'रणजित स्टुडिओ'त वर्षभर उमेदवारी केली. रणजित स्टुडिओच्या 'तानसेन' (कुंदनलाल सैगल) या चित्रपटामधील सर्व गाण्यातील सतार वसंत पवार यांचीच आहे. रणजित स्टुडिओचे संगीत दिग्दर्शक खेमचंद प्रकाश त्यांच्या सतारवादनावर खूश होते.

वसंत पवार १९४४ साली पुण्यात आले. कारण पुण्यात त्या वेळी प्रभात, डेक्कन, शालिमार, नवयुग अशा अनेक स्टुडिओत वादकांची आवश्यकता होती. या सर्व चित्रसंस्थांमध्ये १९४४ ते १९४९ या काळात त्यांनी अनेक वाद्ये वाजवली. १९४५ साली 'गोकुळ' या चित्रपटाला सुधीर फडके संगीत देत होते. त्यांच्याकडे सतारवादक म्हणून आलेले वसंत पवार पुढे त्यांचे साहाय्यक झाले. १९४८ साली बाबूजींनी त्यांचा 'जयभीम' हा हिंदी चित्रपट वसंत पवार यांना संगीत दिग्दर्शनासाठी दिला. त्यानंतर शंकर पवार यांच्या 'बलिदान' या चित्रपटालाही त्यांनी संगीताचा हातभार लावला. पण त्याची खरी वाटचाल सुरू झाली ती १९५० सालच्या 'पठ्ठे बापूराव' या चित्रपटापासून. त्यानंतर त्यांनी मागे वळून पाहिलेच नाही. मराठी चित्रपटात अस्सल पेशवाई थाटाची, मर्दानी, रंगेल अक्कडबाज आणि झोकदार लावणी वसंतरावांनीच आणली.

वसंतराव हरहुन्नरी कलावंत होते. ते उत्तम जादूगार होते. लहानपणापासून अनेक मोठमोठ्या हिंदी–मराठी साहित्यिकांत (चित्रपट कथालेखकांत) वावरल्यामुळे मूळच्याच हुशार आणि उत्तम ग्रहणशक्ती असलेल्या वसंतरावांना केवळ व्यासंगातून बहुश्रुतता, विद्वत्ता, चतुरस्र बुद्धिमत्ता प्राप्त झाली होती. एकपाठी स्मरणशक्ती असल्यामुळे जुनी गाणी, लावण्या, भजने, शेरोशायरी त्यांच्या ओठावर असत. अनेक नव्या–जुन्या कवींच्या,

शायरांच्या रचना त्यांनी मुखोद्गत केल्या होत्या. खाजगी बैठकीत आपल्या स्वच्छ व सुंदर वाणीने ते साऱ्यांना मंत्रमुग्ध करीत. 'मैफलीचा चांद' म्हणून पु.ल. देशपांडे वसंतरावांचा उल्लेख करीत.

वसंतरावांनी ५० मराठी व ८ हिंदी चित्रपटांना, तसेच चार नाटकांना संगीत दिले. 'सांगत्ये ऐका' (१९५९) व 'मानिनी' (१९६२) या चित्रपटांसाठी त्यांना सर्वोत्कृष्ट संगीताचा 'फाळके गौरव चिन्ह' पुरस्कार, तर 'रंगल्या रात्री अशा' (१९६४) व 'सवाल माझा ऐका' (१९६५) या चित्रपटांना महाराष्ट्र राज्य सरकारचा उत्कृष्ट संगीताचा पुरस्कार मिळाला. केवळ व्यसनाच्या अतिरेकामुळे, वयाच्या अवघ्या ३८ व्या वर्षी हा गुणी संगीतकार मराठी रसिकांना सोडून गेला.

**– मधू पोतदार**

**संदर्भ** : १) पोतदार मधू, 'वसंतलावण्य', कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे; २००९.

प

## पळशीकर, नारायण बळवंत

*नाना पळशीकर*

**अभिनेता**

**२० मे १९०८ – २ जून १९८४**



केवळ आपल्या मुद्राभिनयाने प्रेक्षकांच्या मनावर छाप पाडणारे असामान्य चरित्र अभिनेते म्हणजे नाना पळशीकर. नाना पळशीकर यांचा जन्म मध्य प्रदेशातील भंडारा येथे झाला. मध्य प्रदेशातच जन्म झाल्याने त्यांच्यावर मराठी भाषेपेक्षा हिंदी भाषेचे खोलवर संस्कार झाले होते. जेमतेम मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर देशप्रेमाने प्रेरित होऊन त्यांनी स्वातंत्र्ययुद्धात उडी घेतली व त्यासाठी त्यांनी तुरुंगवासही भोगला. नागपूर येथे हिंदू महासभेच्या कार्यक्रमात कॅम्प फायरचे आयोजन करण्यात आले होते. त्या कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे होते डॉ. हेडगेवार. त्या वेळी नारायण पळशीकर यांनी छोटासा कार्यक्रम केला. तो पाहून डॉ. हेडगेवार यांनी पळशीकरांची प्रशंसा केली आणि म्हणाले, ''तू खूप चांगला अभिनय करतोस. तू सिनेमात गेलास तर चांगले नाव कमावशील.'' त्या काळात नागपूरला एक चित्रपट संस्था मूकपट तयार करत होती. त्या मूकपटात नारायण यांना काम मिळाले. त्याच वेळी त्यांचे नाव 'नाना पळशीकर' असे बदलले आणि पुढे तेच नाव रूढ झाले.

चित्रपट क्षेत्रातच नाव कमवावे, या हेतूने नाना पळशीकर पुढे पुण्यातल्या प्रभात फिल्म कंपनीत गेले. पण तिथे त्यांना काम मिळाले नाही. मग ते मुंबईला गेले आणि तिथे रणजित स्टुडिओत दररोज एक रुपया एवढ्या रोजंदारीवर काम करू लागले. त्या वेळी रणजित स्टुडिओत 'देशदासी' (१९३५) या चित्रपटाचे काम चालले होते. त्या चित्रपटात त्यांना छोटी भूमिका मिळाली. त्यानंतर 'बॅरिस्टरकी बीबी' या चित्रपटातही त्यांना नगण्य भूमिका दिली.

रणजितमध्ये आपल्या अभिनयाला फारसा वाव मिळत नाही, हे पाहून काही महिन्यांतच नानांनी रणजित स्टुडिओला रामराम ठोकला. पुढे काय करायचे या विचारात असतानाच, द्वारका प्रसाद मिश्र यांच्याशी त्यांची भेट झाली. द्वारका प्रसाद त्या काळात मध्य प्रदेशाचे गृहमंत्री होते आणि ते 'धुवाँधार' चित्रपट निर्माण करण्याच्या प्रयत्नात होते. त्यांनी नाना पळशीकर यांना आपल्या चित्रपटात काम करण्यासाठी ताबडतोब करारबद्ध केले. 'धुवाँधार'मधली त्यांची भूमिका गाजली. त्यानंतर त्यांनी बॉम्बे टॉकीजच्या 'दुर्गा', 'नया संसार', 'कंगन', 'आझाद' या चित्रपटात चरित्र अभिनेत्याच्या भूमिका केल्या आणि प्रसिद्धी मिळवली. हे पाहून व्ही. शांताराम यांनी त्यांना राजकमल कलामंदिरमध्ये बोलावून घेतले आणि 'माली' या हिंदी आणि 'भक्तीचा मळा' या मराठी चित्रपटात भूमिका दिली. 'माली' चित्रपटासाठी नानांनी एक हिंदी गीतही लिहिले. 'भक्तीचा मळा' हा त्यांचा पहिला मराठी बोलपट. त्यानंतर त्यांनी हिंदी चित्रपटसृष्टीत बरीच कामे

करत आपले बस्तान बसवले. हिंदी चित्रपटातील व्यग्रतेमुळे त्यांना मराठी चित्रपटात काम करण्यासाठी वेळही मिळाला नाही. तरीही 'मूठभर चणे' (१९५५), 'प्रेम आंधळं असतं' (१९६२) आणि 'फकीरा' (१९६३) या चित्रपटात त्यांनी भूमिका केल्या. 'गुरू' या अमेरिकन चित्रपटातही त्यांनी भूमिका केली.

एकूणच त्यांनी केवळ चार मराठी चित्रपटांत भूमिका केल्या, तर शंभरहून अधिक हिंदी चित्रपटांत भूमिका केल्या. त्यामुळे त्यांना हिंदी चित्रपटातील अभिनयासाठीच पारितोषिके मिळाली. 'कानून' या चित्रपटातल्या भूमिकेसाठी, तसेच एकूण तीन चित्रपटांसाठी त्यांना सर्वोत्कृष्ट साहाय्यक अभिनेता म्हणून 'फिल्मफेअर पारितोषिक' मिळाले. १९८२ साली बोलपट चित्रसृष्टीच्या अमृतमहोत्सवानिमित्त तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या हस्ते त्यांना पारितोषिक देण्यात आले होते.

वयाच्या ७६ व्या वर्षी मुंबई येथे वृद्धापकाळाने त्यांचा मृत्यू झाला.

– शशिकांत किणीकर

## पळशीकर, सुहास प्रभाकर

**अभिनेता**

**१३ फेब्रुवारी १९५६**



'इतनी शक्ती हमे देना दाता.. मनका विश्वास कमजोर ना हो' ही गाजलेली प्रार्थना असलेल्या 'अंकुश' या चित्रपटातल्या भूमिकेने सुहास पळशीकर प्रकाशझोतात आले. पळशीकरांचा जन्म हैद्राबाद येथे झाला. त्यांच्या आई कमल आणि वडील प्रभाकर यांच्यासह घरात अभिनयाची कुठलीच पार्श्वभूमी नव्हती. मात्र राधाबाई पळनीटकर प्रशालेत शिकत असतानाच ते अनेक एकांकिकेतही काम करत होते. तेव्हा ते नाट्यस्पर्धेतही भाग घेऊ लागले. शालेय स्तरांवरच्या अनेक स्पर्धांमधून त्यांना अभिनयासाठी बक्षिसे मिळाली. पुढे महाविद्यालयीन शिक्षणासाठी त्यांनी हैद्राबादच्या विवेकवर्धिनी महाविद्यालयात प्रवेश घेतला. बी.ए. इंटरला असताना राज्य नाट्यस्पर्धेसाठी सॅम्युअल बेकेट यांचे 'वेटिंग फॉर गोदो', हे नाटक बसवले होते. या नाटकातील भूमिकेसाठी सुहास पळशीकर यांना अभिनयासाठी रौप्यपदक मिळाले. या नाटकाला १३व्या महाराष्ट्र राज्य नाट्य महोत्सवात प्रथम क्रमांक मिळाला. या स्पर्धेसाठी उपस्थित असलेले अभिनेते श्रीराम लागू यांनी सुहास पळशीकर यांचे विशेष कौतुक केल्याने सुहास यांना प्रोत्साहन मिळाले. अभिनयातल्या या गुणवत्तेने त्यांना युनियन बँकेत नोकरी मिळाली आणि त्यानिमित्ताने पळशीकर मुंबईला स्थायिक झाले.

सुहास पळशीकर युनियन बँकेतल्या नोकरीबरोबरच नाटकांतून आणि एकांकिकांमधून अभिनय करत होतेच. याच काळात 'अंकुश' या चित्रपटासाठी कलाकार निवडण्यासाठी आणि चित्रपटनिर्मितीसाठीच्या बैठका सुरू होत्या. अभिनेते नाना पाटेकर यांच्या घरी या बैठका होत होत्या. नीलकांती पाटेकरही युनियन बँकेत नोकरी करत असल्याने त्यांनी सुहास पळशीकर यांना एन.चंद्रा यांस भेटण्यास सुचवले आणि 'अंकुश'मधल्या 'लाल्या'च्या भूमिकेसाठी सुहास पळशीकर यांची निवड झाली. हा चित्रपट खूप गाजला आणि अभिनेता म्हणून सुहास पळशीकर यांनाही नावलौकिक मिळाला.

'अंकुश'नंतर 'गुरुदक्षिणा', 'प्रतिघात', 'कर्मयोद्धा', 'चांदनी बार' यांसारख्या अनेक हिंदी चित्रपटात त्यांनी भूमिका केल्या. त्याचबरोबर 'ओटी खणानारळाची', 'दुर्गा आली घरा', 'धुडगूस', 'सुपारी', 'चकवा', 'एक मराठी माणूस', 'येळकोट येळकोट जयमल्हार', 'धो-धो पावसातली वन डे मॅच', 'गाभारा', 'मी सिंधुताई सपकाळ' यासारख्या अनेक मराठी चित्रपटांमध्ये त्यांनी भूमिका केल्या. त्यांपैकी 'सुपारी' व 'गाभारा' या चित्रपटांतल्या भूमिकांसाठी त्यांना उत्कृष्ट साहाय्यक अभिनेते म्हणून महाराष्ट्र शासनाचे पारितोषिकही

प






मिळाले. याबरोबरच त्यांचा नाट्यप्रवासही सुरूच होता लेखक सुरेश जयराम यांचे प्रकाश बुद्धिसागर दिग्दर्शित 'डबलगेम' हे त्यांची भूमिका असलेले गाजलेले नाटक. त्यांनी या नाटकाचे १२९ प्रयोग केले. भक्ती बर्वे या प्रख्यात अभिनेत्रीची भूमिकाही या नाटकात होती. कुमार सोहनी दिग्दर्शित 'कुणीतरी आहे तिथे' हेही त्यांचे गाजलेले नाटक होते. सुहास पळशीकर यांच्या अभिनय कारकिर्दीत वसंतराव गोडसे यांना ते गुरू व मार्गदर्शक मानतात.

'निष्पाप', 'मी जिंकलो मी हरलो' यांसारख्या अनेक दूरदर्शन मालिकांमधून त्यांनी केलेले काम निश्चितच उल्लेखनीय होते.

तृप्ती भोईर लिखित आणि गजेंद्र अहिरे दिग्दर्शित 'टूरिंग टॉकीज', रमेश मोरे यांचा 'शूर आम्ही सरदार', गजानन कुलकर्णी यांचा 'आभास' आणि 'आमरान' त्याचबरोबर मंदार शिंदे यांच्या 'ध्यास' या चित्रपटांत त्यांनी भूमिका केल्या आहेत. अनेक वर्षानंतर 'किडनॅप' या नाटकांद्वारे ते पुन्हा एकदा रंगभूमीकडे वळले आणि आपल्या वैशिष्ट्यपूर्ण अभिनयाने प्रेक्षकांचे मन जिंकून घेतले.

– सुजाता कार्यकर्ते

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## पळसुले, बाळ श्रीपती
**संगीतकार**

**१९३८ – ३० जुलै २०१२**

बाळ पळसुले मूळचे सांगलीचे. त्यांच्या घरची गरिबी होती. त्यांच्या वडिलांचा बुरुड व्यवसाय होता. बाळ यांचे इ. चौथीपर्यंत शिक्षण झाले होते. लहानपणी त्यांना मेळ्यातून गीत-संगीत ऐकायला मिळे. तेव्हा आपणही मेळ्यात काम करावे, गाणे म्हणावे, वाजवावे असे बाळ यांना वाटे.

त्यातून त्यांना बाजाची पेटी वाजवायची आवड निर्माण झाली आणि त्यांनी ऐकून ऐकून, अंदाजाने येईल



तसे वाजवायला सुरुवात केली. त्याबरोबरच, गीतांना चाली लावायचाही त्यांचा सराव होत गेला. पुढे त्यांना मेळ्यात काम मिळाले आणि तिथेच स्वत:च चाल लावलेली गाणी गाऊन, तर कधी दुसऱ्या कुणाचे गीत घेऊन त्याला चाल लावण्याचा छंद त्यांना जडला. त्यामुळे त्यांच्या कार्यक्रमाची रंगत वाढू लागली. गीतकार म्हणून पुढे प्रसिद्ध झालेले जगदिश खेबुडकर याच मेळ्यात बासरी वाजवत. लोकप्रिय हिंदी गाण्याच्या चालावर मराठी गाणी गातानाही त्यांना आनंद वाटत असे. संगीत देता देता वाद्यांचा वापर कसा करावा याची समज त्यांना आली. कळत नकळत संगीताचा अभ्यास होऊ लागला.

पळसुले यांनी काही काळ वसंत पेंटर यांच्या चित्रसंस्थेत शिपायाची नोकरी केली. मात्र संगीत दिग्दर्शक व्हायचे, हाच त्यांचा उद्देश होता. लवकरच, म्हणजे १९६५ साली त्यांना संगीत दिग्दर्शनासाठी ‘सुधारलेल्या बायका’ हा चित्रपट मिळाला. त्यातली ‘लाडकीचे लाड राया पुरवाल का?’ ही लावणी लोकप्रिय झाली. प्रसंगानुरूप वातावरणनिर्मिती करण्याच्या दृष्टीने परिणामकारक संगीत देण्याकडे बाळ पळसुले लक्ष देऊ लागले. पळसुले यांनी मराठीत कव्वाली ढंगाच्या चालीचा प्रथमच प्रयोग केला. ‘थापाड्या’ या त्यांनी संगीत दिलेल्या चित्रपटाची गाणी फारच गाजली. तेव्हापासून मराठी रसिक बाळ पळसुले यांना ओळखू लागले.

बाळ पळसुले यांनी सुमारे साठ चित्रपटांना संगीत दिले आहे. ‘अथांग’ व ‘अनोळखी’ या दूरदर्शन मालिकांनाही त्यांनी संगीत दिले आहे. त्यांनी संगीत दिलेल्या ‘पंढरीची वारी’ या चित्रपटाला शास्त्रीय संगीताचे ‘सूरसिंगार’ पारितोषिक मिळाले आहे.

त्यांनी एकूण १५० मराठी चित्रपटांना संगीत दिले. तसेच हिंदी, गुजराती, भोजपुरी चित्रपटांनाही त्यांनी संगीत दिले. त्यांनी संगीत दिलेली ‘कुठं कुठं जायाचं हनिमुनला...’, ‘धरिला पंढरीचा चोर’, ‘अवती भवती डोंगरझाडी’ ही गाणी अतिशय लोकप्रिय ठरली. त्यांच्याकडे आशा भोसले, उषा मंगेशकर, उत्तरा केळकर, सुलोचना चव्हाण, सुमन कल्याणपूर, कृष्णा कल्ले, अनुराधा पौडवाल, अनुप जलोटा हे गायक गायले.

बाळ पळसुळे यांना त्यांच्या सांगीतिक जीवनाच्या वाटचालीसाठी दादासाहेब फाळके अकादमीचा पुरस्कार, मराठी चित्रपट महामंडळाचा चित्रकर्मी पुरस्कार (२००६) मिळाले आहेत. तर १९७५ मध्ये कोल्हापूर नगर परिषदेने, १९९० मध्ये सांगली नगर परिषदेने त्यांचा सन्मान केला. अशा या संगीतकाराचे वयाच्या ७८ वर्षी श्वसनविकारामुळे इचलकरंजी येथे आपल्या मुलीच्या घरी निधन झाले.

– मधू पोतदार



## पागनीस, विष्णुपंत दत्तात्रेय

**अभिनेता, गायक**

**१५ नोव्हेंबर १८९२ – ३ ऑक्टोबर १९४३**



विष्णुपंत पागनीस हे नाव समोर आले की प्रथम डोळ्यासमोर येतो तो ‘संत तुकाराम’ हा चित्रपट. प्रभातच्या या चित्रपटाने भारतीय भूमीवरच नव्हे, तर विदेशी जगतातदेखील लौकिक मिळवला होता. त्यांनी संत तुकारामांची भूमिका केवळ अविस्मरणीयच केली होती असे नाही, तर ते उर्वरित आयुष्यातदेखील तुकारामच होऊन गेले. अशा आख्यायिका सांगितल्या जातात की, संत तुकारामाचे फोटो म्हणून विष्णुपंत पागनीसांचेच फोटो प्रचलित झालेले आहेत.

विष्णुपंत पागनीस यांचा जन्म कोल्हापुरात झाला


'संत तुकाराम'मध्ये विष्णुपंत पागनीस वह्या पाण्यात बुडवताना

प

होता. वयाच्या दहाव्या वर्षी विष्णुपंत पागनीस यांनी जनूभाऊ निंबकरांच्या नाटकात स्त्री-भूमिका केली होती. जनूभाऊंची स्वदेशी हितचिंतक नाटक मंडळी त्या काळी खूप लोकप्रिय होती. 'शारदा आणि शकुंतला' या नाटकातदेखील त्यांनी भूमिका केली होती.

नाटकामधील भूमिकांच्या या पार्श्वभूमीमुळेच चित्रपटाच्या माध्यमात ते यशस्वी पदार्पण करू शकले. 'पूना रेडेड' (१९२४) आणि 'सुरेखा हरण' (१९२१) हे त्यांच्या भूमिका असलेले सुरुवातीचे चित्रपट होते. 'संत तुकाराम' १९३६ मध्ये प्रदर्शित झाल्यानंतर फार थोडा काळ ते चित्रपटसृष्टीत रमले. 'संत तुलसीदास' (१९३९) मधील त्यांची भूमिका आणि त्यातील 'वन चले राम रघुराय' या गाण्यामुळे ते लोकप्रिय झाले. त्या काळात नट गायक असणे ही काळाची गरज होती. पागनीस स्वत: उत्तम गायक नट होते. त्यांनी गायलेला 'आधी बीज एकले'... हा अभंग आजही लोकप्रिय आहे. 'संत तुलसीदास'मधील 'मेरे मनकी बगिया भूली' हे वासंती या नटीसोबतचे गाणे आणि 'भारत की एक सन्मारी की' हे 'रामराज्य' मधील गाणेही पागनीसांचे गाणे म्हणून नोंद घेण्याजोगे आहे. 'नरसी भगत' (१९४०), 'महात्मा विदुर' (१९४३), 'भक्तराज' (१९४३) व 'रामराज्य' (१९४३) हे त्यांचे गाजलेले इतर चित्रपट होत.

विष्णुपंत पागनीस यांच्या आवाजातील 'वंदे मातरम्' या बंकीमचंद्राच्या गीताची ध्वनिमुद्रिकादेखील लोकप्रिय झाली होती. वर उल्लेखलेले काही चित्रपट हिंदीदेखील होते आणि ज्ञानदत्त यांनी त्यांचे संगीत केले होते, ही एक महत्त्वपूर्ण बाब. असे म्हटले जाते की, तुकारामाच्या झपाटलेपणानेच पागनीसांनी उर्वरित आयुष्य काढले. पण असे असूनही, त्यानंतर १९४३पर्यंत त्यांनी ५-६ चित्रपट केले होते.

त्यांचे निधन नेमके कुठे झाले याबद्दल प्रवाद आहेत, पण एका दाव्यानुसार, पंढरपुरीच त्यांचे निधन झाले. आपल्या एका भूमिकेमुळे आणि एका गाण्यामुळे पागनीस जनमानसात अजरामर झाले.

– जयंत राळेरासकर

**संदर्भ** : १) यादव योगेश, 'हिंदी फिल्म सिंगर्स', प्रकाशक – योगेश यादव, बडोदा; १९८७.

## पाटील, गणपत नायकू

**अभिनेता**

**२० ऑगस्ट १९२० – २३ मार्च २००८**



अनेक मराठी चित्रपटांतून तृतीयपंथीयाची भूमिका करणारे नट म्हणून गणपत पाटील मराठी रसिकांच्या ओळखीचे आहेत. त्यांचा जन्म कोल्हापूर येथे गरीब कुटुंबात झाला. लहानपणीच वडिलांचे निधन झाल्यामुळे घरची सर्व जबाबदारी त्यांच्या आईवर पडली. आपली व आपल्या सहा भावंडांची जबाबदारी एकट्या आईवर पडलेली असल्यामुळे गणपत पाटील यांना मोलमजुरी करणे, भाजीपाला विकणे, यांसारखी कामे करावी लागली. याच दरम्यान कोल्हापुरात होणाऱ्या मेळ्यांमध्ये ते कामे करू लागले, तसेच 'रामायणा'मध्ये सीतेच्या भूमिकाही ते करत असत. या प्रत्ययकारी भूमिकेमुळे त्यांना 'कॉलेजकुमारी' या नाटकात काम करण्याची संधी मिळाली. वयाच्या १४व्या वर्षी त्यांना राजा पंडित यांच्या 'बाल ध्रुव' या चित्रपटामध्ये भूमिका केली, पण त्या वेळेस त्यांना मॉब सीनमध्ये काम करावे लागले होते. या क्षेत्रात पैसे मिळत नसल्याचे लक्षात आल्यावर गणपत पाटील यांनी उदरनिर्वाहासाठी हलक्या दर्जाची कामे करावयास सुरुवात केली. पण छंद म्हणून त्यांनी अभिनयाची कास सोडली नाही.

पारतंत्र्याच्या काळात गणपत पाटील यांनी छुपेपणाने काही कामे केली. पण तेव्हाही त्यांना अभिनयाची ओढ स्वस्थ बसू देत नव्हती. याच काळात त्यांचा राजा गोसावी यांच्यासोबत परिचय झाला आणि त्यांच्या ओळखीनेच गणपत पाटील यांनी मा. विनायक यांच्या शालिनी सिनेटोनमार्फत चित्रपटसृष्टीत शिरकाव केला. तेव्हा सुरुवातीच्या दिवसात त्यांनी सुतारकाम करणे, रंगभूषा करणे अशी साहाय्यकाची कामे केली. कामे करत असताना त्यांच्या चित्रपटसृष्टीतील अनेकांशी परिचय झाला. त्यातूनच त्यांना राजा परांजपे यांच्या 'बलिदान' व राम गबाले यांच्या 'वन्दे मातरम्' या चित्रपटांमध्ये काम करण्याची संधी मिळाली. यातील त्यांचा अभिनय पाहून भालजी पेंढारकर यांनी गणपत पाटील यांना 'मीठभाकर' या चित्रपटात खलनायकाची भूमिका दिली. यानंतर त्यांना अनेक चित्रपटातून कामे मिळाली. पुढे चित्रपटसृष्टीत त्यांचे नाव आदराने घेतले जाऊ लागले.

चित्रपटातून मिळणारी रक्कम अपुरी पडू लागल्यामुळे गणपत पाटील या काळात मेकअपची कामे करू लागले. याच बरोबरीने ते नाटकातही कामे करू लागले. जयप्रकाश दानवे यांच्या 'ऐका हो ऐका' या अस्सल ग्रामीण ढंगाच्या तमाशाप्रधान नाटकात त्यांना तृतीयपंथी सोंगाड्याची भूमिका करण्याची संधी मिळाली व त्या संधीचे त्यांनी सोने केले. हे नाटक लोकप्रिय ठरल्यामुळे त्यांना लगेच आय. बारगीर यांच्या 'जाळीमंदी पिकली करवंद' या नाटकात संधी मिळाली.

गणपत पाटील यांच्या नाच्याच्या भूमिकेतील मार्दव लक्षात घेऊन कृष्णा पाटील यांनी 'वाघ्या मुरळी' चित्रपटात त्यांना तृतीयपंथी पुरुषाची भूमिका दिली. त्यासाठी त्यांना त्या वर्षीचा चरित्र अभिनेत्याचा (१९५४) महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. या प्रसिद्धीमुळे त्यांना अनेक तमाशाप्रधान चित्रपटांमध्ये नाच्याच्या भूमिका मिळाल्या. त्यांनी 'मल्हारी मार्तंड', 'एक गाव बारा भानगडी', 'देवा तुझी सोन्याची जेजुरी' इत्यादी अनेक चित्रपटांतून भूमिका केल्या. 'लावण्यावती' हा त्यांना अभिनित केलेला शेवटचा

चित्रपट होय. अनेक नाटकांतल्या त्यांच्या भूमिकाही गाजल्या. वयाच्या ८९व्या वर्षी त्यांचे कोल्हापूर येथे निधन झाले.

– सुधीर नांदगावकर

**संदर्भ** : १) पाटील गणपत, 'रंग नटेश्वराचे', प्रभात प्रकाशन, पुणे; १९९५.

## पाटील, दिनकर दत्ताजी

**दिग्दर्शक, लेखक, पटकथालेखक**

**६ नोव्हेंबर १९१५ – २१ मार्च २००५**



दिनकर दत्ताजी पाटील यांचा जन्म चिकोडी तालुक्यातल्या बेनाडी या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण त्याच गावात झाले. मात्र आध्यात्मिक शिक्षणासाठी ते कोल्हापूरला आपल्या मामाकडे आले आणि त्यांनी विद्यापीठ हायस्कूलमध्ये प्रवेश घेतला. मा. विनायक हे दिनकर पाटील यांच्या वर्गाला मराठी शिकवत. त्या काळात गजानन जागीरदारही या शाळेत शिक्षक म्हणून काम करत. त्या काळात वि.स. खांडेकर आणि ना.सी. फडके हे विद्यार्थ्यांचे आवडते लेखक होते. विद्यापीठ हायस्कूलमधील साहित्यप्रेमी विद्यार्थी दर रविवारी मा. विनायक यांच्याकडे जमत. मा. विनायक 'किर्लोस्कर'मध्ये छापून आलेल्या फडके आणि खांडेकर यांच्या कथा त्यांना वाचून दाखवत. अशा प्रकारे दिनकर पाटील यांच्यामधील साहित्यिक घडण्यास सुरुवात झाली.

उच्च शिक्षणासाठी दिनकर पाटील यांनी राजाराम महाविद्यालयात प्रवेश घेतला. महाविद्यालयाच्या 'राजारामीयन' मासिकाचे संपादक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. ना.सी. फडके यांच्याबरोबर कवी माधव ज्युलियनही या महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून काम करत होते. या मोठ्या साहित्यिकांच्या प्रभावाने दिनकर पाटील यांनी लिहिण्यास सुरुवात केली. 'सेवक', 'सत्यवादी' या वृत्तपत्रातून लेखन करण्यास त्यांनी सुरुवात केली. लवकरच 'किर्लोस्कर' मासिकाच्या कथास्पर्धेत दिनकर पाटील यांच्या 'एरीना' या कथेला प्रथम पारितोषिक मिळाले आणि लेखक म्हणून त्यांना मान्यता मिळाली. या काळात ते शारदा मंडळ साहित्य संस्थाही चालवत असत. या मंडळाच्या एका कार्यक्रमात त्यांना सुमन शिंदे ही सहचरी भेटली व त्यांचे लग्न झाले.

पुढे दिनकर पाटील मा. विनायक यांच्या हंस पिक्चर्समध्ये नोकरी करू लागले. 'हंस'चे रूपांतर 'नवयुग'मध्ये झाले. पुढे 'नवयुग' कंपनी बंद पडली आणि विनायक यांनी कोल्हापूरच्या शालिनी स्टुडिओमध्ये प्रफुल्ल पिक्चर्स ही स्वत:ची संस्था सुरू केली. प्रफुल्ल कंपनीने 'बडी माँ' हा हिंदी चित्रपट बनवला आणि संस्था मुंबईला हलवली, त्याबरोबर दिनकर पाटीलही मुंबईला आले. मुंबईला विनायक यांच्या 'मंदिर' या चित्रपटाचे काम सुरू झाले. त्याच सुमारास जुन्या हंस पिक्चर्सचे व्यवस्थापक वामनराव कुलकर्णी यांनाही विनायकरावांनी बोलवून घेतले. वामनरावांनी दिनकर पाटील यांना चित्रपटाच्या कथेविषयी विचारले, तेव्हा पाटील यांनी 'किर्लोस्कर'मध्ये प्रकाशित झालेली 'जय मल्हार' ही कथा त्यांना दाखवली. वामनराव कुलकर्णी यांनी बाबूराव पेंढारकर यांना ही कथा दाखवली. पेंढारकरांनाही ही कथा आवडली. दिनकर पाटील यांनी या काळात 'वाघ्या मुरळी'ची पटकथा लिहून ठेवली आणि संवादही लिहिले. बाबूराव पेंढारकरांनी चित्रपटाचे नाव ठेवले, 'जय मल्हार'! या चित्रपटाचे दिग्दर्शनही दिनकर पाटील यांनीच करावे असे बाबूराव पेंढारकर यांनी सुचवले, पण विनायकरावांनी बाबूरावांना तसे करण्याची परवानगी दिली नाही. 'दिनकर माझा साहाय्यक आहे, त्या चित्रपटाला मीच दिग्दर्शन करणार' असे विनायकरावांनी सांगितले.

१९ ऑगस्ट १९४७ रोजी विनायकरावांचे निधन झाले आणि अपूर्ण राहिलेल्या 'मंदिर' चित्रपटाचे दिग्दर्शन करण्याची जबाबदारी शांतारामबापूंनी दिनकर पाटील

यांच्यावर सोपवली आणि दिनकर द. पाटील यांनी 'मंदिर' या पहिल्या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. 'मंदिर'चे काम सुरू असतानाच 'जय मल्हार' पूर्ण झाला. द.स. अंबपकर यांनी त्याचे दिग्दर्शन केले होते. ग.दि. माडगूळकरांनी या चित्रपटासाठी ठसकेबाज लावण्या लिहिल्या होत्या. दिनकर द. पाटील यांनी लिहिलेला हा पहिलाच चित्रपट गाजला. 'जय मल्हार'पासूनच लावणीप्रधान चित्रपटाचे नवे युग सुरू झाले. दिनकर द. पाटील हे मान्यताप्राप्त पटकथाकार झाले. वि.स. खांडेकर, ना.सी. फडके यांसारखे लेखक जरी त्यांचे आवडते असले, तरी चित्रपटाचे संवाद लिहिताना त्यांना भालजी पेंढारकरांची शैली जवळची वाटली. 'माझं शिष्यत्व सांगणारे कोणी असोत किंवा नसोत, पण माझा खरा शिष्य कोणी शोभत असेल तर दिनकर पाटीलच.' असे भालजी पेंढारकरांनी म्हटले होते. पण दिग्दर्शनाच्या बाबतीत मात्र दिनकरराव हे 'विनायकरावांच्या' परंपरेतील विद्यार्थी होते.

त्यानंतर दिनकर पाटील यांनी 'राम राम पाव्हणं' या चित्रपटाची कथा लिहिली. शांता शेळके आणि पी. सावळाराम यांच्याकडून त्यांनी गाणी लिहून घेतली आणि लता मंगेशकर यांनी या चित्रपटाला संगीत दिले. या चित्रपटाने रौप्यमहोत्सव साजरा केला. नंतर 'पाटलाचं पोर' हा चित्रपटही चांगलाच यशस्वी ठरला. दिनकर पाटील यांनी लिहिलेल्या 'वादळ', 'शिकलेली बायको' या चित्रपटाचे दिग्दर्शक होते माधव शिंदे. 'जोतिबाचा नवस', 'जावयाची जात' (दिग्दर्शक कमलाकर तोरणे) या चित्रपटांना अमाप लोकप्रियता मिळाली.

दिनकर पाटील जवळपास पन्नास वर्ष चित्रपट क्षेत्रात कार्यरत होते. त्या काळात सुमारे १००हून जास्त चित्रपटांचे लेखन, ३५ चित्रपटांचे दिग्दर्शन त्यांनी केले. १० अनुबोधपट तयार केले. या व्यतिरिक्त ५ नाटके, २ एकांकिका, ४ कथासंग्रह, ४ व्यक्तिचित्र संग्रह, आणि 'रुपेरी पडदा तंत्रमंत्र' अशी मोठी मजल त्यांनी मारली. 'पाटलाचं पोरं' हे आत्मचरित्रही त्यांनी लिहिले. १९५३ साली त्यांनी दिनकर चित्र संस्थेची स्थापना केली.

दिनकर पाटील यांनी मराठी चित्रपट क्षेत्रात 'ग्रामीण चित्रपटांची' मोलाची भर घातली आणि चित्रपट रसिकांच्या मनात वेगळे स्थान मिळवले.

'उमज पडेल तर' (१९६०), 'प्रेम आंधळं असतं' (१९६२) व 'ते माझे घर' (१९६३) या दिनकर पाटील यांच्या चित्रपटांना राष्ट्रीय पुरस्कार मिळाले. 'कुंकू माझं भाग्याचं' या चित्रपटाला फिल्मफेअर ॲवार्ड मिळाले. दिनकर पाटील यांनी त्यापूर्वीच १९५४ साली 'तारका' हा चित्रपट व्यवसायावरचा पहिला चित्रपट काढला होता आणि १९५५ साली भिकाऱ्यांच्या जीवनावरचा 'मूठभर चणे' या चित्रपटांसाठी त्यांना १९८२ साली ग.दि. माडगूळकर पुरस्कार, १९९८ साली जनकवी पी. सावळाराम पुरस्कार आणि १९९८ सालचा चित्रपती व्ही. शांताराम पुरस्कार मिळाला होता. मराठी चित्रपट महामंडळाने 'चित्रभूषण' अशी पदवी त्यांना बहाल करून त्यांचा सन्मान केला होता. वयाच्या ८९ व्या वर्षी कोल्हापूर येथे त्यांचे निधन झाले.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ** : १) पाटील दिनकर द., 'पाटलाचं पोर', प्रेस्टिज प्रकाशन, पुणे; १९८६.

प

## पाटील, राजीव

**दिग्दर्शक**

**२७ मार्च १९७२ – ३० सप्टेंबर २०१३**



मराठीतील अभिजात साहित्यकृती चित्रपट माध्यमाद्वारे सामाजिक प्रबोधनासाठी प्रेक्षकांसमोर मांडण्याचे कौशल्य असणारा एक संवेदनशील दिग्दर्शक म्हणून राजीव पाटील यांचे नाव चित्रपटसृष्टीने स्वीकारले होते. अशा या दिग्दर्शकाचा जन्म नाशिकमध्ये झाला. शालेय व महाविद्यालयीन शिक्षण घेतल्यानंतर राजीव यांनी अभियांत्रिकीचे शिक्षण घेतले. याच काळात त्यांचा

'प्रयोग परिवार' या नाट्यसंस्थेशी परिचय झाला. अभिनयापेक्षा दिग्दर्शनाचे क्षेत्र त्यांना जवळचे वाटल्यावर त्यांनी नाटकांच्या संहितांमध्ये प्रयोगशीलता आणणाऱ्या श्याम मनोहर यांची तत्कालीन प्रवाहापेक्षा वेगळी असणारी नाटके रंगमंचावर आणली. त्यांनी दिग्दर्शित केलेली नाटके दिल्लीच्या महोत्सवांमध्येही दाखवली.

नाटकांमध्ये जम बसत असतानाच राजीव पाटील यांनी आपली या क्षेत्रातील कारकिर्द घडवण्यासाठी मुंबईला स्थलांतर केले. मुंबईत आल्यावर त्यांना 'बेधुंद मनाच्या लहरी', 'पिंपळपान' या दूरदर्शनवरील मालिकांचे पटकथा-संवाद लिहिण्याचे काम मिळाले. 'बेधुंद मनाच्या लहरी' ही मालिका तरुणाईच्या चांगलीच पसंतीस उतरली ती अर्थात त्यातल्या स्टार कास्टबरोबरीनेच संवादांमुळे.

छोट्या पडद्यावर यशस्वी ठरलेल्या राजीव पाटील यांनी अमोल पालेकर आणि चंद्रकांत कुलकर्णी या आघाडीच्या दिग्दर्शकांकडे साहाय्यक दिग्दर्शक म्हणून काम केले. परंतु राजीव पाटील यांना चित्रपटाचे दिग्दर्शन करण्याची संधी मिळाली ती 'सावरखेड - एक गाव' (२००४) या चित्रपटाच्या निमित्ताने. पदार्पणातलाच चित्रपट गाजल्यावर आत्मविश्वास वाढीला लागलेल्या पाटील यांनी 'सनई चौघडे' (२००८) या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. पारंपरिक विवाहसंस्थेवर भाष्य करणाऱ्या या सामाजिक चित्रपटाने प्रबोधनाबरोबरीनेच प्रेक्षकांचे मनोरंजनही केले, हे विशेष. किंबहुना राजीव पाटील या हरहुन्नरी, तरुण दिग्दर्शकाने मनोरंजनाची रूढ संकल्पना बदलत सामाजिक विषयही हलक्याफुलक्या पद्धतीने मांडण्यास सुरुवात केली, हेच त्यांच्या यशामागचे खरे कारण होते, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.



राजीव पाटील यांना यशाच्या शिखरावर नेणारा महत्त्वपूर्ण चित्रपट म्हणजे 'जोगवा'. २००९ मध्ये प्रदर्शित झालेल्या या चित्रपटावर पाच राष्ट्रीय पुरस्कारांची मोहोर उमटली. अर्थात पुरस्कारांचे सारे श्रेय जाते, ते राजीव पाटील यांच्या दिग्दर्शकीय दृष्टिकोनाला. दिग्दर्शकीय दृष्टिकोनातूनच त्यांनी राजन गवस यांच्या 'भंडारभोग' आणि उत्तम बंडू तुपे यांच्या 'झुलवा' या देवदासी प्रथेवर भाष्य करणाऱ्या कादंबऱ्या चित्रपटासाठी निवडल्या. देवाच्या नावाने सोडलेल्या स्त्री-पुरुषांची मानसिक कुचंबणा, सामाजिक अवहेलना दाखवताना त्यांनी कलाकार निवडीचे तारतम्यही बाळगले. म्हणूनच मुक्ता बर्वे आणि उपेंद्र लिमये या कलाकारांनी या चित्रपटातील कथानकाला खऱ्या अर्थाने न्याय दिला. कथानकाची निवड, कलाकारांची निवड आणि त्याहीपेक्षा आजही समाजात अशा अंधश्रद्धा प्रसूत करणाऱ्या परंपरा टिकून आहेत; इतकेच नाही, तर त्या जोपासण्यासाठी एक विशिष्ट वर्ग दक्ष आहे, याचे भान या चित्रपटाने व्यक्त केलेले दिसते, म्हणूनच या चित्रपटाची दखल समीक्षकांना आवर्जून घ्यावी लागली आणि सर्वार्थाने रंगलेला हा चित्रपट राष्ट्रीय पुरस्काराचा मानकरी ठरला, हे विसरता येत नाही.

सन २०१० मध्ये आलेल्या विश्वास पाटील लिखित 'पांगिरा' या चित्रपटाने सामान्य शेतकऱ्यांच्या दाहक जीवनाचे चित्र रेखाटले आहे. आजच्या युगात ग्रामीण मूल्य बदलताना दिसत आहेत. ग्रामीण अर्थकारण आणि राजकारण यात बदल होत आहे. परंतु सर्वसामान्य शेतकऱ्याला ग्रामीण अर्थकारणाचा उपयोग होत नाही. समाजव्यवस्थेतला हा विरोधाभास, सामान्य माणसाचे दुष्टचक्र 'पांगिरा'च्या निमित्ताने राजीव पाटील मांडून जातात. यातूनच दिग्दर्शक या नात्याने समाजव्यवस्थेकडे पाहण्याची त्यांची संवेदनशील दृष्टी अधोरेखित होते.

'पांगिरा' या चित्रपटाच्या यशानंतर पाटील वळले, ते गावकुसाबाहेरच्या समाजाकडे. म्हणूनच अशोक व्हटकर यांच्या '७२ मैल - एक प्रवास' या आत्मकथनाचे चित्र प्रेक्षकांना देण्याचा विचार त्यांनी केला. वसतिगृहातून पळून आलेल्या मुलाचा एका अनोळखी स्त्रीबरोबरचा ७२ मैलाचा प्रवास. त्या प्रवासात आलेल्या अडचणी व त्यावर मात करण्यासाठी चाललेली केविलवाणी धडपड, स्वत:वर ओढवलेल्या प्रसंगातून अल्पवयीन मुलाचे प्रगल्भ होत जाणे, याचे हृदयद्रावक व प्रत्ययकारी चित्रण या चित्रपटात केले आहे.

सामाजिक चित्रपट देणाऱ्या व प्रेक्षकांना विचार प्रवृत्त करणाऱ्या या दिग्दर्शकाचे आणखी एक वैशिष्ट्य दडलेले आहे ते कलाकार निवडीत. चित्रपट चालण्यासाठी नावाजलेल्या कलाकारांना घेऊन चित्रपट करण्याची प्रथा असूनही पाटील यांनी नेहमीच नव्या चेहऱ्यांना प्राधान्य दिले. अर्थात या नव्या चेहऱ्यांनीही त्यांचा अपेक्षाभंग न करता सतत आपल्या अभिनयातून चित्रपटांना लोकप्रियता मिळवून दिली, यातही तथ्य आहे.

सामाजिक आशय संप्रेषित करणारी कथानके, त्यासाठी आवश्यक असणारी दिग्दर्शीय सूत्रे व त्याबरहुकूम काम करत यश मिळवण्यापेक्षा सामाजिक प्रबोधन करण्याची आकांक्षा या जोरावरच राजीव पाटील अल्पावधीतच मराठी चित्रपटसृष्टीत लोकप्रिय झाले. एकूणच चित्रपटसृष्टीच्या, प्रेक्षकांच्या त्यांच्याकडून अपेक्षा वाढत असतानाच वयाच्या अवघ्या ४२ व्या वर्षी हृदयविकाराच्या झटक्याने मुंबई येथे त्यांचे निधन झाले आणि चित्रपटसृष्टीला, चित्रपट रसिकांना एक ‘मौल्य’वान व ‘मूल्य’वान दिग्दर्शक हरपण्याचे दुःख पचवावे लागले.

– डॉ. अर्चना कुडतरकर

## पाटील, स्मिता शिवाजी

**अभिनेत्री**

**१७ ऑक्टोबर १९५५ – १३ डिसेंबर १९८६**



*"At 25 Smita is clearly the queen of Indian parallel cinema, as much an icon for film-makers of the milieu as was Anna Karenina for young directors in France at the outset of their new wave. Patil is not a classic beauty but the lady glows. She never makes a false move on screen.",* असे विधान प्रसिद्ध अमेरिकन चित्रपट समीक्षक *Elliott Stein* यांनी स्मिता पाटील यांच्या अभिनय कारकिर्दीविषयी केले होते. विलक्षण बोलके डोळे आणि त्याला धारदार अभिनयाची साथ लाभल्यामुळे स्मिता पाटील यांनी आपली अल्प कारकिर्द आपल्या वैशिष्ट्यपूर्ण अभिनयाने गाजवली.

रंगभूमी, चित्रपट आणि दूरदर्शन या तिन्ही माध्यमांवर या अभिनेत्रीने आपल्या कामाचा ठसा उमटवलेला आहे. अवघ्या दीड दशकाच्या आपल्या कारकिर्दीत या अभिनेत्रीने विविधांगी भूमिका साकारत हिंदी चित्रपटसृष्टीच्या इतिहासामधील काही मोजक्या श्रेष्ठ अभिनेत्रींच्या रांगेत जाऊन बसण्याचा मान मिळवला.

राजकीय नेते शिवाजीराव पाटील आणि सामाजिक कार्यकर्त्या विद्याताई यांच्या पोटी स्मिता पाटील यांचा जन्म पुणे येथे झाला. पुण्यातील रेणुका स्वरूप स्मृती हायस्कूलमध्ये त्यांचे शालेय शिक्षण झाले. त्या मॅट्रिकला असतानाच त्यांचे वडील शिवाजीराव पाटील मंत्री झाले, पण स्मिता पाटील त्यांच्यासोबत मुंबईला न जाता पुण्यातच आपल्या एका मैत्रिणीकडे राहिल्या. मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी पुण्यातील फर्गसन महाविद्यालयात प्रवेश घेतला. याच काळात त्यांचा थिएटर अॅकॅडमीच्या ग्रूपशी परिचय झाला. अभिनयातील त्यांचे पदार्पण झाले ते ‘तीव्र मध्यम’ या अरुण खोपकर दिग्दर्शित एफ.टी.आय.आय.च्या पदविका फिल्ममधून. त्यानंतर दोन वर्षांनी पुण्याहून मुंबईला आल्यावर दूरदर्शनच्या माध्यमातून त्या प्रसिद्धीच्या झोतात आल्या. तेव्हा नव्यानेच सुरू झालेल्या दूरदर्शन वाहिनीवर स्मिता पाटील वृत्तनिवेदिक म्हणून काम करू लागल्या.

भारतात १९७७-७८च्या सुमारास ‘समांतर चित्रपटा’ची लाट आली. समांतर चित्रपटांसाठी स्मिता पाटील यांनी आपल्या कारकिर्दीमधील तब्बल पाच वर्षे दिली. १९७५ साली दिग्दर्शक श्याम बेनेगल यांच्या ‘चरणदास चोर’ या बालचित्रपटामधील ‘राणी’च्या भूमिकेपासून स्मिता पाटील यांनी आपल्या चित्रपट



प



कारकिर्दीची सुरुवात केली. 'मंथन' (१९७७), 'भूमिका' (१९७७), 'जैत रे जैत' (१९७८), 'गमन' (१९७९), 'बाजार', 'आक्रोश' (१९८०), 'चक्र' (१९८१), 'अर्थ' (१९८३), 'आखिर क्यों'(१९८५), 'अमृत' (१९८६), 'मिर्चमसाला' (१९८७) आदी चित्रपटांमधील व्यक्तिरेखांद्वारे त्यांनी आपल्यातील सशक्त अभिनेत्रीचे दर्शन घडवले. यापैकी 'मंथन' या चित्रपटामधील बिंदूच्या व्यक्तिरेखेसाठी त्यांना राष्ट्रीय पुरस्काराद्वारे गौरवण्यात आले.

प

श्याम बेनेगल, गोविंद निहलानी, केतन मेहता, डॉ. जब्बार पटेल यांच्यासारख्या कसलेल्या दिग्दर्शकांकडे काम केल्यामुळे स्मिता पाटील यांच्या अभिनयाला आणखी वेगळी झळाळी आली. 'जैत रे जैत' (१९७८) या चित्रपटातील 'चिंधी', तिच्या अंतर्गत ऊर्मींसह आपल्यासमोर येते, ती अर्थातच स्मिता पाटील यांच्या समर्थ अभिनयातून. नवऱ्याने सोडलेली चिंधी नाग्याच्या प्रेमात पडते व त्याला मिळवण्यासाठी अथक प्रयत्न करते. राणी माशीमध्ये देवत्व शोधणाऱ्या नाग्याचा देवत्वाविषयीचा संघर्ष ती जाणते व नाग्याला मिळवण्यासाठी त्याच्या वेडेपणात सामील होऊन, राणी माशीला शोधण्यासाठी त्याच्यासोबत जाते. नाग्याचा वेडेपणा मनोमन माहीत असला तरी आपल्या प्रिय व्यक्तीसाठी करावा लागणारा उघड संघर्ष ती मान्य करते. चिंधीचा प्रेमातला वेडेपणा स्मिता पाटील



आपल्या अभिनयातून सकारात्मक पद्धतीने मांडतात व चिंधीच्या भूमिकेला न्याय देतात.

डॉ. पटेल दिग्दर्शित 'उंबरठा' या चित्रपटामध्ये पाटील यांनी साकारलेली सुलभा महाजन ही व्यक्तिरेखा मराठी चित्रपटसृष्टीच्या इतिहासामधील सर्वात महत्त्वाची व्यक्तिरेखा मानली जाते. या व्यक्तिरेखेच्या माध्यमातून त्यांनी व्यक्तिगत, सामाजिक पातळीवर अपयशी ठरलेल्या तरी स्वत:वर विश्वास असणाऱ्या स्त्रीची भूमिका रंगवली. सामाजिक कार्य करताना, ती काम करत असलेल्या आश्रमाकडून नाकारली जाते, तर सामाजिक कार्य करायला घराबाहेर पडली म्हणून घरातल्यांकडून नाकारली जाते. या दोन्ही पातळ्यांवरचा नकार ती ज्या ताकदीने पचवते, त्यातूनच तिच्या व्यक्तिमत्त्वातील स्वतंत्रपण व समर्थपण जाणवून जाते. या व्यक्तिरेखेचा प्रवास त्यांनी आपल्या सहज व संयमित अभिनयातून उत्कृष्टपणे रेखाटला आहे.

मराठी, हिंदी, पंजाबी, बंगाली, गुजराती, कन्नड, मल्याळम आणि तेलगू अशा आठ भाषांमधील चित्रपटांमध्ये स्मिता पाटील यांनी काम केले. १९७५ ते १९८२ या काळात आपल्या वाट्याला आलेल्या प्रत्येक भूमिकेचे त्यांनी सोने केले. कलात्मक चित्रपटामधील काम वाखाणले गेल्यानंतर त्यांनी व्यावसायिक चित्रपटांवर आपले लक्ष केंद्रित केले. त्या काळात समांतर चित्रपटांच्या चळवळीत नासिरुद्दीन शाह, ओम पुरी यांच्या भूमिका लक्षणीय ठरल्या; परंतु, तरीदेखील त्यांना व्यावसायिक चित्रपटांमध्ये संधी मिळण्यासाठी प्रतीक्षा करावी लागली. स्मिता पाटील यांना मात्र खूप लवकर व्यावसायिक संधी प्राप्त झाली आणि या अभिनेत्रीने त्याचा खूप चांगला लाभ उठवला. अमिताभ बच्चन यांची कारकिर्द ऐन भरात असताना स्मिता पाटील यांना या महानायकाबरोबर नायिका म्हणून झळकण्याची संधी मिळाली, ती त्यांच्या अभिनयकौशल्यामुळे. 'शक्ती' आणि 'नमक हलाल' या दोन्ही चित्रपटांमधील त्यांच्या व्यक्तिरेखा प्रेक्षकांच्या कायमच्या स्मरणात राहिल्या.

राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरही स्मिता पाटील यांच्या कामाचा गौरव करण्यात आला. कोस्टा गॅव्हरास या आंतरराष्ट्रीय पातळीवरील श्रेष्ठ दिग्दर्शकाने फ्रान्समध्ये स्मिता पाटील यांच्या चित्रपटांचा महोत्सव भरवला होता. अशा प्रकारचा मान मिळवणाऱ्या त्या पहिल्याच भारतीय अभिनेत्री ठरल्या. मॉंट्रियल आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवामध्ये त्यांनी परीक्षकाची भूमिका निभावली होती. १९८५ मध्ये नैरोबी येथे झालेल्या जागतिक महिला परिषदेमध्ये स्मिता पाटील यांनी भारताचे प्रतिनिधित्व केले होते. २६ जानेवारी १९८५ रोजी केंद्र सरकारने स्मिता पाटील यांचा 'पद्मश्री' किताबाद्वारे सन्मान केला.

स्मिता पाटील यांनी चित्रपट अभिनेते राज बब्बर यांच्याशी विवाह केला होता. उण्यापुऱ्या १० वर्षांच्या चित्रपट कारकिर्दीत स्मिता पाटील यांनी एकूण ८० चित्रपटांमध्ये काम केले होते. प्रसूतिपश्चात झालेल्या आजारपणामुळे त्यांचे वयाच्या ३१व्या वर्षी मुंबई येथे निधन झाले.

प

– संपादित

**संदर्भ** : १) ताम्हाणे ललिता, 'स्मिता स्मित आणि मी', राजहंस प्रकाशन, पुणे; २००९. २) देशपांडे रेखा, 'स्मिता पाटील', श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९८७.

## पाटेकर, नाना

**अभिनेता**

**१ जानेवारी १९५१**

आपल्या वैशिष्ट्यपूर्ण आवाजाने व वैविध्यपूर्ण अभिनयाने प्रेक्षकांना मंत्रमुग्ध करणारे, मराठीप्रमाणेच हिंदी चित्रपटसृष्टीत आपले वर्चस्व निर्माण करणारे महाराष्ट्राच्या भूमीत जन्मलेले आंतरराष्ट्रीय ख्यातीचे एक व्यक्तिमत्त्व म्हणजे नाना पाटेकर.

नाना पाटेकर यांचा जन्म अलिबाग जिल्ह्यातील मुरुड-जंजिरा येथे झाला. त्यांचे बालपण तेथेच गेले. लहानपणापासूनच त्यांना चित्रकलेची आवड होती. या वयातच त्यांनी चित्र काढायला सुरुवात केली आणि पुढे



त्यांना काही काळ आपला उदरनिर्वाह करण्यासाठी या कलेचा उपयोगही झाला. चित्रकलेचे रीतसर शिक्षण घ्यायचे, या उद्देशाने त्यांनी मुंबईच्या जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्समध्ये प्रवेश घेतला. चित्रकलेचे उपजतच भान असलेल्या या कलाकाराला खऱ्या अर्थाने मोहिनी घातली ती अभिनयाने. म्हणून महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच त्यांनी अभिनय करायलाही सुरुवात केली ती आंतरमहाविद्यालयीन नाट्यस्पर्धेतून. या स्पर्धेत त्यांनी 'ससा आणि कासव' या नाटकात काम केले. त्यांना याचा उपयोग बाहेरच्या जगातील अभिनयक्षेत्रात प्रवेश करण्यासाठी झाला. महाविद्यालयीन शिक्षण घेऊन नाना पाटेकर बाहेर पडले आणि त्यांना आविष्कार या नाट्यसंस्थेच्या 'गौराई' (१९७४) या नाटकात काम करण्याची संधी मिळाली. यातील अप्रतिम अभिनयामुळे त्यांना पुढे 'पाहिजे जातीचे', 'हमीदाबाईची कोठी', 'महासागर', 'पुरुष' आदी नाटकांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण भूमिका मिळाल्या. पण ते खऱ्या अर्थाने लोकप्रिय झाले, ते 'पुरुष' नाटकातील खलनायकी भूमिकेमुळे.

एकीकडे आपली नाटकाची कारकिर्द बहरत असताना नाना पाटेकर यांना चित्रपटांमध्येही काम करण्याची संधी मिळाली. त्यांचे चित्रपटातील आगमन झाले, ते 'आव्हान'मधून. रंजना या अभिनेत्रीसोबत त्यांना एका आदर्शवादी तरुणाची भूमिका यात साकारायची होती. हा आदर्शवादी तरुण प्रस्थापित समाजव्यवस्थेत अन्यायाचा बळी ठरतो आणि आपल्यावर झालेल्या अन्यायाचा ठरलेल्या आदर्शावर आधारित सामना करण्याऐवजी वाईट मार्गाला लागतो. सन्मार्ग ते वाईट मार्ग असा व्यक्तिरेखेचा प्रवास नाना पाटेकर यांनी ताकदीने रंगवला आहे. या चित्रपटामागोमाग नाना पाटेकर यांनी रंजना या अभिनेत्रीसोबतच 'सावित्री' हा चित्रपट केला. या चित्रपटापासूनच त्यांचा 'नायक' म्हणून बोलबाला व्हायला लागला. मराठी चित्रपटसृष्टीत थोडे स्थिरस्थावर होत असतानाच 'गड जेजुरी जेजुरी', 'भालू' हे चित्रपट त्यांनी आपल्या अभिनयकौशल्याने स्मरणीय केले. पण त्यांच्या अभिनयाचा खरा कस लागला तो जब्बार पटेल यांच्या 'सिंहासन' या चित्रपटात. राजकीय व्यक्तिमत्त्वाची साकारणी त्यांनी या चित्रपटात कसलेल्या अभिनयाने यथार्थपणे केली. पण त्याहीपेक्षा त्यांचा संस्मरणीय ठरलेल्या चित्रपट म्हणजे 'नागीण' (१९८१). बेरड जमातीचे शोषण करणाऱ्या पांढरपेशा समाजावर भाष्य करणाऱ्या या चित्रपटात नाना पाटेकर यांनी निभावलेली भूमिका त्यांच्या व्यक्तित्वातील भारदस्तपणा दाखवून गेली.

पुढील काळातील नाना पाटेकर यांचा महत्त्वपूर्ण चित्रपट म्हणजे 'राघू मैना' (१९८५). राजदत्त यांचे दिग्दर्शन असलेल्या या चित्रपटात त्यांनी दलित तरुणाची, राघवची भूमिका रंगवली. वर्णाधिष्ठित समाजव्यवस्थेवर प्रहार करत दलित वर्गाचे दु:ख जगासमोर आणणारा राघव त्यांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण अभिनयातून अभिव्यक्त केला. या चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना 'सर्वोत्कृष्ट अभिनेत्या'चा राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला.

१९८६ मध्ये आलेला 'माफीचा साक्षीदार' हा सत्य घटनेवर आधारित चित्रपटही नाना पाटेकर यांनी साकारलेल्या राघवेंद्र जक्कलच्या भूमिकेमुळे वैशिष्ट्यपूर्ण ठरला. माणसाच्या रक्तासाठी चटावलेल्या व त्यासाठी निर्घृणपणे वागणारा राघवेंद्र नाना पाटेकर यांनी आपल्या अभिनयातून तंतोतंत साकारला. त्यांच्या अभिनयातून व्यक्त होत जाणारी हिंस्र पण थंड प्रवृत्ती प्रेक्षकांच्या अंगावर काटा आणणारी ठरली. राघवेंद्र या व्यक्तिरेखेच्या अंगांगात मुरलेला हिंस्रपणा नाना पाटेकर यांनी केवळ नजरेतून व्यक्त करून भूमिकेला अभिप्रेत असणारा क्रूरपणा दाखवून दिला.

'सूर्योदय-एक पहाट' हा नाना पाटेकर यांनी अभिनय केलेला आणखी एक महत्त्वपूर्ण मराठी चित्रपट. दिप्ती नवल या हिंदी चित्रपटसृष्टीतील अभिनेत्रीबरोबर त्यांनी


**'राघू मैना' या चित्रपटात नाना पाटेकर डावीकडील**

साकारलेली भूमिका निश्चित लक्षात राहण्याजोगी होती.

'पक पक पकाक'(२००५)मध्ये नानांनी साकारलेली भुत्याची भूमिकाही लक्षणीय ठरली. बायकोच्या हत्येनंतर गावामध्ये वैद्य असणारा संवेदनशील मनाचा सखाराम समाजापासून दुरावतो व जंगलात जाऊन राहतो. त्याचा अंतर्गत संवाद त्याला माणसांपासून दूर ठेवतो व जंगलाबाहेरील माणसांसाठी तो भुत्या होतो. तटस्थ भुत्या ते लहान चिखलूच्या सहवासात नव्याने उमलू लागलेले माणूसपण येथेपर्यंतचा सबंध प्रवास नानांच्या या भूमिकेतून सक्षमपणे रेखाटला गेला आहे. तर 'देऊळ' या चित्रपटात त्यांनी गावातील राजकारणी व्यक्तीची केलेली भूमिकाही प्रेक्षकप्रिय झाली.

नाना पाटेकर यांनी मराठी चित्रपटसृष्टीत आपले स्थान निश्चित करण्यापूर्वीच हिंदी चित्रपटसृष्टीत प्रवेश केला होता, तो 'गमन' या चित्रपटामधून. स्मिता पाटील आणि फारुख शेख यांच्या प्रमुख भूमिका असलेल्या या चित्रपटात नाना पाटेकर यांनी मध्यमवर्गीय तरुण साकारला. त्यानंतर त्यांनी 'आज की आवाज', 'आवाम', 'सूत्रधार', 'अंकुश', 'प्रतिघात', 'परिंदा', 'प्रहार', 'यशवंत', 'थोडा रुमानी हो जाए', 'क्रांतिवीर' या व यासारख्या अनेक हिंदी चित्रपटांमधून अभिनय केलेला आहे.

हिंदी-मराठी चित्रपटातील त्यांच्या भूमिका या व्यवस्थेविरुद्धचा लढा अधोरेखित करणाऱ्या होत्या,

सामाजिक बांधिलकीची भावना जपत जपतच देशभक्तीची भावनाही त्यांच्या काही भूमिकांमधून व्यक्त होताना दिसते. गुन्हेगारी प्रवृत्ती, मानसिकदृष्ट्या दुर्बल असणे, सक्षम पोलीस अधिकारी असणे, राजकारणी, सर्वसामान्य मध्यमवर्गीय तरुण अशा विविधांगी भूमिका रंगवणाऱ्या नाना पाटेकर यांचा तीव्र संवेदनशील स्वभाव त्यांच्या अभिनयातून सातत्याने डोकावत राहतो.

नाना पाटेकर यांनी आपल्या वैयक्तिक आयुष्यात सामाजिक बांधिलकीची भावनाही मनोमन जोपासलेली दिसते. म्हणूनच मुंबईत झालेल्या दंगलीच्या काळात त्यांनी मदत केली, तर कारगिल युद्धात प्रत्यक्ष युद्धभूमीवर जाऊन काम करू धजावले. बाबा आमटे यांच्या आनंदवनमध्ये काम करतानाही नाना तितकेच रमतात. या सर्व सामाजिक उपक्रमशीलतेतूनच त्यांची सामाजिक संबंधांबाबतची तळमळ सहजपणे उमटून जाते. त्यांनी ७७ व्या नाट्य संमेलनाचे अध्यक्षपद जितक्या समर्थपणे भूषवले, तितक्याच समर्थपणे ते कोईमतूरच्या राष्ट्रीय रायडल्स स्पर्धेत यशस्वी ठरले.

प

नानांना अनेक पुरस्कार लाभले आहेत. २०१३मध्ये त्यांना पद्मश्री पुरस्कार देऊन गौरवण्यात आले. हा त्यांच्या सर्वांगीण कामगिरीचा यथोचित सन्मान आहे, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

धारदार आवाज, रांगडे व्यक्तिमत्त्व, आपल्या कामाबद्दलची निष्ठा, अभिनयातील आत्मविश्वास आणि संपूर्ण व्यवस्थेकडे बघण्याचा विवक्षित दृष्टिकोन यांतून घडलेले नाना पाटेकर यांनी मराठी-हिंदी चित्रपटसृष्टीत मानाचे व आदराचे स्थान पटकावले आहे, हे निर्विवाद.

– संपादित

**संदर्भ** : १) मनोज कुलकर्णी, 'विक्षिप्त, वेगळा नाना', साप्ताहिक सह्याद्री; ७ डिसेंबर १९८९. २) मुलाखत - कुलकर्णी मनोज, 'धारदार आवाजाचा तडफदार नायक - नाना पाटेकर', आवाज दिवाळी अंक; १९८५. ३) पाटेकर नाना, 'आणि माझं टाळकंच सणकलं', चिन्ह; ऑक्टोबर १९८७,

## पाठक, मधुकर गोपाळ
**संवादलेखक**
**१८ नोव्हेंबर १९२५ – २० मे २०११**



मधुकर गोपाळ पाठक हे मूळचे आटपाडीचे. त्यांचे वडील आटपाडीच्या शाळेत शिक्षक होते. पाठकमास्तर म्हणून ते प्रसिद्ध होते. शिवाय औंधच्या राजपुत्रांना ते शिकवायलाही जात.

आटपाडीच्या व औंधच्या शाळेत मधू यांचे शिक्षण झाले. पुढे बी.एस्सी. करण्यासाठी ते पुण्याला आले. पुण्यात विद्यार्थ्यांसाठी 'पंताचा गोट' म्हणून औंधच्या संस्थानिकांची जागा होती, तेथे मधू राहायला लागले. ते स.प. महाविद्यालयाचे विद्यार्थी होते. 'पंताच्या गोटा'तील त्यांच्या खोलीत व्यंकटेश माडगूळकरही लवकरच राहायला आले. त्यामुळे अधूनमधून ग.दि. माडगूळकरही तेथे मुक्कामाला येत. दहा बाय दहाच्या त्या खोलीत पु.ल. देशपांडे, राम गबाले, सुधीर फडके, यशवंत पेठकर, बाळासाहेब पाठक, वामनराव कुलकर्णी, विष्णुपंत चव्हाण अशी चित्रपट क्षेत्रातील मंडळी जमत. तासन् तास त्यांची बैठक रंगे.

राम गबाले 'मधू' यांना 'बाबा' असे संबोधत आणि लवकरच ग. दि. माडगूळकरांसह सारे जण त्यांना 'बाबा' असे म्हणू लागले. तेथे येणारी 'सत्यकथा', 'अभिरुची' व 'वसंत' यासारखी मासिके वाचून व होणाऱ्या साहित्यिक गप्पा ऐकून बाबांनाही साहित्यात गोडी वाटू लागली. एक दिवस त्यांनी 'काकाचा हिऱ्या' नावाची कथा अभिरुची मासिकासाठी पाठवली आणि साहित्यिक म.गो. पाठक या लेखकाचा जन्म झाला.

बी. एस्सी.चा निकाल लागताच बाबांनी खडकीच्या ॲम्युनिशन फॅक्टरीत नोकरीसाठी अर्ज केला. त्याचे उत्तर आले नाही, पण नोकरीत रमेल असे बाबांचे मन नव्हते. ते अण्णा माडगूळकरांच्या मागेमागे धावत होते. साहित्य

वा चित्रपट क्षेत्रात काहीतरी करावे, असे सारखे वाटत होते. माडगूळकरांचे ते १० वर्षे सहकारी होते.

बाबांवर ग. दि. माडगूळकरांमधल्या 'साहित्यिका'ची छाप होती. माडगूळकर पटकथा-संवाद लिहीत, त्या वेळी त्यांचे साहाय्यक म्हणून बाबा कायम त्यांच्यासोबत असत. बाबांनी 'झुंज', 'माणसाच्या मागावर', 'लागीर', 'अवलिया विजांची साखळी' आणि 'दिव्यांची आरास' हे कथासंग्रह लिहिले. ते खूप गाजले. 'बाबूरावांचे' या नावाचा निवडक कथांचा संग्रह आहे. 'गदिमांच्या सहवासात' हे व्यक्तिचरित्रात्मक पुस्तक, तर 'राजपुत्र' व 'लक्ष्मीबाई भ्रतार वासुदेव' या कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. कथालेखक म्हणून नावलौकिक मिळविण्याची संधी असतानाही बाबांनी चित्रपटलेखन व दिग्दर्शन याकडेच आपला मोहरा वळवला. ग.दि. माडगूळकरांसारख्या सिद्धहस्त लेखकाचा त्यांना लाभलेला सहवासच या गोष्टीला कारणीभूत झाला!

बाबांनी 'प्रपंच', 'नंदिनी', 'संत निवृत्ती ज्ञानदेव', 'स्वयंवर झाले सीतेचे', 'संथ वाहते कृष्णामाई', 'मुक्काम पोस्ट ढेबेवाडी', 'चांदोबा चांदोबा भागलास का?' व 'वारसा लक्ष्मीचा' या चित्रपटांचे दिग्दर्शन केले. 'गरिबाघरची लेक', 'जावई माझा भला', 'पवनाकाठचा धोंडी', 'सखू आली पंढरपुरा', 'अशी ही साताऱ्याची तऱ्हा', 'चांदोबा चांदोबा भागलास का?' या चित्रपटांचे पटकथा-संवाद बाबांनीच लिहिले आहे. एस.एन.डी.टी. विद्यापीठाच्या बी.ए.च्या मराठीच्या अभ्यासक्रमात 'लक्ष्मीबाई भ्रतार वासुदेव' या त्यांच्या कादंबरीच्या काही भागाचा समावेश केला होता.

'गदिमांच्या सहवासात' या पुस्तकाला महाराष्ट्राला राज्य सरकारचा उत्तम साहित्याचा पुरस्कार मिळाला आहे. 'गरिबाघरची लेक' या चित्रपटाला उत्कृष्ट संवादाचे राज्य सरकारचे पारितोषिक मिळाले. 'प्रपंच' व 'संथ वाहते कृष्णामाई' या बाबांच्या चित्रपटांना राष्ट्रपती पारितोषिकांनी गौरवण्यात आले. 'प्रपंच' हा चित्रपट तर 'व्हॅकूंव्हर चित्रपट महोत्सवा'त 'बेस्ट रूरल फिल्म' म्हणून गौरवण्यात आला. शिवाय ४५ भाषांत हा चित्रपट तयार केला होता. हिंदी चित्रपटसृष्टीत 'दो चोर', 'इमान', 'नालायक' या चित्रपटाची पटकथा, संवाद व सहदिग्दर्शनही त्यांनी केले.

'संत निवृत्ती ज्ञानदेव'ला फिल्मफेअर ॲवॉर्ड मिळालेच, त्याशिवाय राष्ट्रीय पुरस्कारही लाभला. बाबा पाठक हे ग. दि. माडगूळकर पुरस्कार, दिग्दर्शनासाठी महाराष्ट्र राज्य सरकारचे सात पुरस्कार व व्ही. शांताराम पुरस्कार यांनी सन्मानित झाले होते.

बाबांनी आदिवासी मुलीच्या जीवनावर 'कौशी' नावाची कथा लिहिली होती. ती अप्रकाशित होती. पण त्यांच्या मृत्यूमुळे त्यावर चित्रपट काढायची त्यांची उत्कट इच्छा अपुरी राहिली आहे.

– मधू पोतदार

## पालेकर, अमोल कमलाकर

**अभिनेता, दिग्दर्शक, निर्माता**

**२४ नोव्हेंबर १९४४**



अभिनेता आणि दिग्दर्शक म्हणून परिचित असलेले अमोल कमलाकर पालेकर यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांनी जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्समधून १९६५ साली 'ड्रॉइंग ॲण्ड पेंटिंग' या विषयात पदवी मिळवली. तर १९६६ मध्ये त्यांनी 'म्युरल पेंटिग'चा पदव्युत्तर शिक्षणक्रम पूर्ण केला. मराठी प्रायोगिक रंगभूमीवरील १९६७-१९८० या काळातले एक महत्त्वाचे दिग्दर्शक म्हणून त्यांचा उल्लेख केला जातो. आधी सत्यदेव दुबेंच्या 'थिएटर युनिट'मधून आणि नंतर स्वत: स्थापन केलेल्या 'अनिकेत' या नाट्यसंस्थेमार्फत त्यांनी चाकोरीबाहेरची, वेगळ्या धाटणीची नाटके सादर केली. तोवर दर्शनी रंगमंचाच्या (Proscenium Archच्या) चौकटीत वावरणाऱ्या मराठी नाटकाला त्याबाहेरच्या मुक्त अवकाशात आणण्याचे महत्त्वाचे काम ज्या नाट्यकर्मींनी केले, त्यामध्ये



'समांतर' चित्रपटात शर्मिला टागोरसह अमोल पालेकर

प

पालेकरांचे स्थान अग्रगण्य मानले जाते. तसेच इतर भारतीय भाषांमधल्या नाकटकारांच्या नाटकांची महाराष्ट्रातल्या प्रेक्षकांना ओळख करून देण्यातही त्यांचा मोठा वाटा होता.

अमोल पालेकर यांनी १९६७ पासून 'बँक ऑफ इंडिया'मध्ये नोकरीला सुरुवात केली. याच काळात त्यांनी बासू चटर्जी यांच्या 'रजनीगंधा' (१९७४) या चित्रपटात नायकाची भूमिका केली. त्यातूनच त्यांची 'शेजारचा सखासोबती' अशी मोहक प्रतिमा निर्माण झाली. साधासुधा, सरळ, मध्यमवर्गीय नायक आणि प्रेमात उडणारी त्याची त्रेधातिरपीट हाच या प्रतिमेचा गाभा होता. 'रजनीगंधा' पाठोपाठ आलेल्या 'छोटीसी बात' (१९७५), 'चितचोर' (१९७६), 'दामाद' (१९७८), 'बातो बातों में' (१९७९), 'गोलमाल' (१९७९), 'अपने पराये' (१९८०) या चित्रपटांतून त्यांची ही प्रतिमा अधिकच लोकप्रिय झाली. याच प्रतिमेद्वारे त्यांनी हिंदी चित्रपटसृष्टीवर अधिराज्य गाजवले. त्या काळातील त्यांच्या समकालीन नायकाच्या अवास्तव व उत्तुंग प्रतिमेला त्यांच्या या साध्या, सरळमार्गी प्रतिमेने आव्हान देऊन यशस्वीरीत्या छेद दिला. या प्रतिमेपलीकडे जाऊन त्यांनी श्याम बेनेगल यांच्या 'भूमिका' (१९७७), बिल्पव रॉय चौधरींच्या 'स्पंदन' (१९८३), तपन सिन्हांच्या 'आदमी और औरत' (१९८४), कुमार शहानींच्या 'तरंग' (१९८४), आणि विधू विनोद चोप्रा यांच्या 'खामोश' (१९८५) यांसारख्या अनेक चित्रपटांतून आपल्या सशक्त अभिनयाचे दर्शन घडवले. 'सर्वोत्कृष्ट अभिनेता' म्हणून त्यांना तीन वेळा 'फिल्मफेअर' व सहा वेळा राज्य पुरस्कार मिळाले.

हिंदी-मराठीसह बंगाली, कन्नड, मल्याळम व इंग्रजी चित्रपटांतही अभिनेता म्हणून त्यांची कारकिर्द लक्षणीय ठरली. मराठीत पदार्पणातल्या 'शांतता कोर्ट चालू आहे'

(१९६७) नंतर 'बाजीरावचा बेटा' (१९६९), 'तूच माझी राणी' (१९७७) आणि स्वत: दिग्दर्शित केलेल्या 'आक्रीत' (१९८०) व 'समांतर' (२००८) या चित्रपटांमधून त्यांच्या समर्थ अभिनयाचा प्रत्यय आला. 'मदर' (१९७९), 'कलंकिनी' (१९८१) व 'चेना अचेना' (१९८३) या बंगाली भाषेतील चित्रपटांतील भूमिकांमुळे ते बंगालीतही लोकप्रिय झाले. 'कनेश्वर रामा' (१९७७) व 'पेपर बोट्स' (१९८०) या कन्नड, तसेच 'ओळगंल' (१९८४) या मल्याळी भाषेतल्या चित्रपटातील त्यांच्या अभिनयाचे कौतुक झाले. अभूतपूर्व लोकप्रियता आणि समीक्षकांकडून मन:पूर्वक स्वागत होत असतानाच या चतुरस्र अभिनेत्याने १९८६ नंतर अभिनयाची कारकीर्द थांबवून 'चित्रनिर्मिती'चा ध्यास घेतला व संपूर्ण लक्ष दिग्दर्शनाकडे वळवले.

'आक्रीत' (१९८०) या मराठी चित्रपटाच्या निमित्ताने अमोल पालेकर यांनी चित्रपट दिग्दर्शनाच्या क्षेत्रात प्रथम पाऊल ठेवले. त्या काळी महाराष्ट्रात गाजलेल्या 'मानवत हत्याकांडा'च्या सत्य घटनेवर आधारित चित्रपटातील हत्याकांडाच्या पडद्यामागील सूत्रधाराची त्यांची खलनायकी भूमिका विशेष गाजली. फ्रान्समधील 'नान्त'च्या आंतरराष्ट्रीय महोत्सवात 'सर्वोत्कृष्ट चित्रपटा'चे स्पेशल ज्युरी पारितोषिक पटकवणारा हा पहिला मराठी चित्रपट. त्यानंतर पालेकर यांनी 'सार्थ' या बॅनरखाली प्रथम चित्रा पालेकर व नंतर संध्या गोखले यांच्या साहाय्याने तीन भाषांत १६ चित्रपट निर्माण केले.

'आक्रीत'नंतर 'अनकही' (१९८४), 'थोडासा रुमानी हो जाएं' (१९९०), 'दायरा' (१९९६), 'कैरी' (२०००), 'कल का आदमी' (२००१), 'पहेली' (२००५), 'दुमकटा' (२००८) हे हिंदी चित्रपट; तसेच 'बनगरवाडी' (१९९५), 'ध्यासपर्व' (२००१), 'अनाहत' (२००३), 'थांग' (२००६), 'समांतर' (२००९), 'धूसर' (२०१०) आणि 'वी आर ऑन होऊन जाऊ द्या' (२०१३) हे मराठी चित्रपट दिग्दर्शित केले. याशिवाय 'क्वेस्ट' ('थांग'ची इंग्रजी आवृत्ती – २००६) आणि 'ॲन्ड वन्स अगेन' (२००९) हे इंग्रजी चित्रपट निर्माण केले.

अमोल पालेकर यांच्या अनेक चित्रपटांना राज्य, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय सन्मान मिळाले आहेत. तसेच दर वर्षी भरणाऱ्या भारतीय आंतरराष्ट्रीय महोत्सवातील 'इंडियन पॅनोरामा'साठी त्यांनी दिग्दर्शित केलेल्या चित्रपटांची हमखास निवड झाली आहे. १९९६ साली अमेरिकेतल्या टाईम मासिकाने 'जगातील त्या वर्षातल्या सर्वोत्कृष्ट १० चित्रपटांच्या यादी'त 'दायरा'ची निवड केली होती; फ्रान्समधल्या व्हॅलेन्सिए आंतरराष्ट्रीय महोत्सवात त्या चित्रपटाला सर्वोत्कृष्ट चित्रपटाचा 'ग्रां-प्री' सन्मानही प्राप्त झाला होता. २००६ साली ७८ व्या आवृत्तीमध्ये सर्वोत्कृष्ट परदेशी चित्रपटाच्या पारितोषिकासाठी भारताची अधिकृत प्रवेशिका म्हणून 'पहेली' हा चित्रपट पाठवण्यात आला होता. त्यांच्या काही चित्रपटांचे 'जागतिक प्रिमियर' आंतरराष्ट्रीय महोत्सवात झाले आहेत, तर ब्रिस्बेन, पुसान, बँकॉक, टोरान्टो, तेहरान, कार्लोव्ही, कैरो, लंडन अशा जगविख्यात महोत्सवासाठी त्यांच्या चित्रपटांची निवड करण्यात आली आहे.

'स्त्री'चे भावनिक विश्व, त्याची अतिशय तरलपणे केलेली मांडणी व स्त्री-पुरुष संबंधातील विविध पैलूंचा शोध हा त्यांच्या चित्रपटातील विषयांचा मुख्य गाभा राहिला आहे. विशेषत: स्त्रीच्या संवेदनाशील व्यक्तिरेखेचा विस्तार त्यांच्या चित्रपटात आढळतो. 'थांग'मधील समलिंगी नवऱ्यास नाकारणारी सुशिक्षित सई, आपल्या रखेलपणाविरुद्ध बंड करणारी 'आक्रीत'मधील रुही, आपला नवरा नाही हे माहीत असूनदेखील त्याच्यासारखा दिसणाऱ्या प्रियकराला स्वीकारणारी 'पहेली'तील लच्छी, स्वत:च्या लैंगिक भावनांची जाणीव व्यक्त करणारी 'अनाहत'मधील राणी शीलवती, 'अल्झायमर्स'सारख्या असाध्य रोगाचा सामना करणारी 'धूसर'मधील अव्वा आणि नवऱ्याच्या 'संततीनियमना'च्या एकांड्या ध्यासात स्वत:च्या मातृत्वाला तिलांजली देणारी 'ध्यासपर्व'मधील मालती कर्वे... अशा एक ना अनेक चित्रपटांतील स्त्री

प

व्यक्तिरेखा, त्यांतील स्त्रीचे स्वयंपण, तिच्या अपारंपरिक जाणिवा आणि तिच्या स्वीकार-नकारातील ताण-तणावांचे सर्जनशील चित्रण त्यांनी आपल्या चित्रपटातून केले. त्यासाठी कधी जी.ए. कुलकर्णी, व्यंकटेश माडगूळकर, चि.त्र्यं. खानोलकर व विजयदान देथा अशा साहित्यिकांच्या अभिजात साहित्यकृतींचा आधार घेतला आहे, तर कधी समाजातल्या ज्वलंत, भिडणाऱ्या मुद्द्यांभोवती गुंफलेल्या कलाकृती निर्माण करून समाजभाषेशी चित्रपटभाषेचा मेळ घातला आहे.

'चिल्ड्रन फिल्म सोसायटी'च्या अध्यक्षपदाची धुरा सांभाळताना अमोल पालेकर यांनी भारतीय आंतरराष्ट्रीय बालचित्रमहोत्सव भरवण्यास सुरुवात केली. महाराष्ट्रात 'चित्रपट संस्कृती'चा प्रसार करणाऱ्या 'प्रभात चित्रमंडळ' या फिल्म सोसायटीचे अध्यक्षस्थानही त्यांनी काही काळ भूषवले होते. 'मुंबई ॲकॅडमी ऑफ मूव्हिंग इमेज' (मामी) या संस्थेचे विश्वस्त-संस्थापक या नात्याने मुंबईत दर वर्षी भरवल्या जाणाऱ्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाची मुहूर्तमेढही त्यांनी रोवली. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय महोत्सवात 'ज्युरी' या नात्याने काम पाहिले आहे.

प

चित्रपटांव्यतिरिक्त 'कच्ची धूप', 'नकाब', 'मृगनयनी', 'कृष्णकली' या हिंदी आणि 'पाऊलखुणा' ही मराठी दूरचित्रवाणीमालिका अमोल पालेकर यांनी दिग्दर्शित केल्या. त्या वेळेस अनोळखी असलेल्या आणि आज नावारूपाला आलेल्या अनेक कलावंत-तंत्रज्ञ यांना पदार्पणाची संधी या मालिकांद्वारे मिळाली होती. याशिवाय, त्यांच्या अनेक चित्रपटांच्या पटकथाकार संध्या गोखले यांच्यासोबत त्यांनी सौंदर्यवादी गायिका गानसरस्वती किशोरी आमोणकर यांच्यावर 'भिन्न षड्ज' हा जीवनपटही निर्माण केला आहे.

रंगभूमी, चित्रपट, चित्रवाणी आणि चित्रकला अशा विविध क्षेत्रांतील अमोल पालेकर यांची कामगिरी बहुआयामी आहे.

– सतीश जकातदार

**संदर्भ** : १) प्रत्यक्ष मुलाखत.

## पिळगावकर, सचिन शरद
**अभिनेता**
**१७ ऑगस्ट १९५७**



चेहऱ्यावर विलसणारा गोडवा, अभिनयातून डोकावणारा आत्मविश्वास आणि जोडीला असणारे भाबडेपण यांच्या बळावर बालवयातच चित्रपटसृष्टीवर अधिराज्य गाजवणाऱ्या 'मास्टर सचिन'ची आजही चित्रपटसृष्टीतील ऊठबस तेवढीच आहे.

सचिन शरद पिळगावकर यांचा जन्म मुंबईत मध्यमवर्गीय कुटुंबात कृष्ण जन्माष्टमीच्या दिवशी झाला. हे पिळगावकर कुटुंब गोव्याचे 'राजाध्यक्ष', पण मुंबईत आल्यावर ते पिळगावकर झाले, ते कायमचे. याच नावाने सचिन यांना प्रचंड लोकप्रियता मिळवून दिली. वडील शरद पिळगावकर नोकरदार, तर आई सुशीला गृहिणी.

काही घरगुती कारणांमुळे दादर परिसरातील घराजवळच्या एका लॉजवर सचिन यांना काही दिवस राहावे लागले आणि लहान वयातच चित्रपटसृष्टीने त्यांना आपणहून आमंत्रण दिले. सूर्यकांत यांच्या सल्ल्यानुसार सचिन यांचे वडील त्यांना कोल्हापूरला चित्रपटात काम करण्यासाठी घेऊन गेले आणि वयाच्या चौथ्या वर्षी सचिन यांना 'सूनबाई' (१९६१) या चित्रपटात भूमिका मिळाली. पण घरात चित्रपट जगताचा वारसा नसणाऱ्या, अभिनयाची कोणतीही पार्श्वभूमी नसताना, तसेच बालवयामुळे भांबावलेल्या सचिन यांना चित्रीकरणदरम्यान रडू कोसळले. त्यामुळे चित्रपटात काम न करताच त्यांना वडिलांसोबत मुंबईला परतावे लागले.

लॉजवरून परत घरी राहायला आल्यावर मात्र बाबूजींच्या (सुधीर फडके यांच्या) रूपाने सचिन यांना पुन्हा एकदा चित्रपटसृष्टीची कवाडे उघडली गेली आणि



'अशी ही बनवाबनवी'मध्ये स्त्री भूमिकेत सचिन

उपजतच असणाऱ्या नृत्याच्या आवडीने सचिन यांना या कवाडातून प्रवेश मिळाला, पण त्यासाठी त्यांना राजाभाऊ परांजपे यांच्या परीक्षेला उतरावे लागले. २०० मुलांच्या ऑडिशनमधून निवडल्या गेलेल्या सचिन यांची 'हा माझा मार्ग एकला' (१९६३)मधील भूमिका प्रेक्षकांच्या भलतीच पसंतीस उतरली. या भूमिकेसाठी सचिन यांना उत्कृष्ट बालकलाकाराचा राष्ट्रीय पुरस्कार डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या हस्ते वयाच्या सहाव्या वर्षीच स्वीकारण्याचे भाग्य लाभले होते.

यानंतर सचिन यांनी मराठी चित्रपटसृष्टीत बालकलाकार म्हणून 'बायको माहेरी जाते' (१९६३), 'पाहू रे किती वाट' (१९६३), 'स्वयंवर झाले सीतेचे' (१९६४), 'पडछाया' (१९६७), 'मधुचंद्र' (१९६७), 'अन्नपूर्णा' (१९६८), 'नंदिनी' (१९६९), 'अजब तुझे सरकार' (१९७१), 'बाजीरावचा बेटा' (१९७१) या चित्रपटांमधून कामे केलेली आहेत.

वयाच्या सहाव्या वर्षीच चित्रपटसृष्टीत प्रवेश केलेल्या सचिन यांनी ६वीपर्यंतचे शिक्षण घेतले ते दादर इंग्लिश स्कूलमधून. यानंतर बालकलाकार म्हणून चित्रपटसृष्टीत आपले स्थान दृढ करण्यात व्यग्र असणाऱ्या सचिन यांना पुन्हा शिक्षणाकडे वळता आले नाही. पण मुख्याध्यापकांच्या आग्रहाखातर त्यांनी दहावीची परीक्षा बाहेरून दिली आणि ते मॅट्रिक झाले.

घरच्या बिकट परिस्थितीमुळे त्यांनी बालवयातच घरची सर्व आर्थिक जबाबदारी स्वत:च्या शिरावर घेतली आणि चित्रपटसृष्टीत प्रस्थापित होत होत आपली अभिनयातील कारकिर्द घडवली. याच दरम्यान त्यांनी बालकलाकार म्हणून रंगमंचावरही पाऊल ठेवले. 'अपराध मीच केला' या नाटकात संजूबाळाची भूमिका सचिन यांनी केली होती. त्यानंतर त्यांना 'म्हैस येता

प

माझ्या घरा', 'शिकार' या नाटकांमध्ये काम करण्याची संधी मिळाली. पण खऱ्या अर्थाने बालकलाकार म्हणून त्यांच्या नावाचा दबदबा निर्माण झाला, तो हिंदी चित्रपटसृष्टीत.

मराठी चित्रपटसृष्टीत बालकलाकार म्हणून सर्वोत्कृष्ट अभिनेत्याचा पुरस्कार मिळवणाऱ्या सचिन यांना हिंदी चित्रपटसृष्टीत प्रवेश मिळाला तो 'झिंबो का बेटा' (१९६६) या चित्रपटातून. हिंदी चित्रपटसृष्टीत प्रवेश मिळाल्यावर सचिन यांनी 'ज्वेल थीफ' (१९६७), 'मंझली दीदी' (१९६७), 'ब्रह्मचारी' (१९६८), 'दुनिया' (१९६८), 'दिल और मुहब्बत' (१९६८), 'चंदा और बिजली' (१९६९), 'वारिस' (१९६९), 'प्रेमपुजारी' (१९७०), 'बचपन' (१९७०), 'हिम्मत' (१९७०), 'सफर' (१९७०), 'जाने अनजाने' (१९७१), 'मेला' (१९७१) आदी चित्रपटांमध्ये कामे करून हिंदीतील आपली अभिनय कारकिर्द सातत्याने यशस्वी ठेवली. हिंदीतील यशस्वी कारकिर्द घडवताना त्यांचा मराठी चित्रपटसृष्टींशी संबंध आला तो अभावानेच.

प

किशोरवयातही त्यांना पहिली संधी दिली, ती हिंदी चित्रपटसृष्टीनेच. 'शोले' या हिंदीतील सुपरडुपर हिट ठरलेल्या चित्रपटाने, तर त्यांच्यातील अभिनेता अधिक सजग झाला आणि वयात आल्यावर या बालकलाकाराला 'नायक' केले, तेही हिंदीतील 'गीत गाता चल' (१९७५) या चित्रपटातील श्यामच्या व्यक्तिरेखेने. या चित्रपटात सारिका त्यांची नायिका होती. त्यानंतर त्यांनी अनेकानेक हिंदी चित्रपटांमधून भूमिका केल्या असल्या तरी 'सत्ते पे सत्ता' या चित्रपटात त्यांनी साकारलेली सगळ्यात लहान भावाची, सनीची भूमिका प्रेक्षकांच्या आजही स्मरणात आहे.

आपल्या वडिलांची निर्मिती असलेल्या 'मायबाप' (१९८२) या मराठी चित्रपटापासून सचिन यांनी दिग्दर्शनालाही सुरुवात केली आणि ते पुन्हा नव्या दमाने, उत्साहाने मराठी चित्रपटसृष्टीत दाखल झाले. मराठी चित्रपटसृष्टीशी नाळ जोडण्याच्या प्रयत्नात त्यांनी स्वत:च दिग्दर्शित केलेल्या चित्रपटांमध्ये स्वत: अभिनय करण्याची नवी पद्धतही रूढ केली. म्हणूनच त्यांनी दिग्दर्शित केलेल्या 'नवरी मिळे नवऱ्याला' (१९८४), 'गंमत जंमत' (१९८७), 'माझा पती करोडपती' (१९८८), 'अशी ही बनवाबनवी' (१९८८), 'भुताचा भाऊ' (१९८९), 'आत्मविश्वास' (१९८९), 'एकापेक्षा एक' (१९९०), 'आमच्यासारखे आम्हीच' (१९९०), 'आयत्या घरात घरोबा' (१९९१), 'नवरा माझा नवसाचा' (२००५), 'आम्ही सातपुते' (२००८), 'आयडियाची कल्पना' (२०१०) आदी चित्रपटांमधून त्यांचा अभिनयही पाहायला मिळतो. स्वत:च्या दिग्दर्शनाखाली केलेल्या कामांमुळे त्यांच्या अभिनयातील नेमकेपणा प्रेक्षकांना पाहायला मिळाला. विनोदी चित्रपटांमधून अशोक सराफ, निवेदिता जोशी, लक्ष्मीकांत बेर्डे, प्रिया अरुण, सुप्रिया पिळगावकर आणि सचिन पिळगावकर अशी एक टीमच तयार झाली. या टीमने अभिनय केलेल्या आणि सचिन पिळगावकर यांनी दिग्दर्शन केलेल्या चित्रपटांनी मराठी चित्रपटसृष्टीला खुमासदार विनोदाची देणगीच दिली. 'अशी ही बनवाबनवी'सारखा चित्रपट तर आजही प्रेक्षक तितक्याच आवडीने पाहतात आणि पोट धरून हसतात. प्रेक्षकांना असे हसवण्यात सचिन यांच्या चित्रपट दिग्दर्शनाची हातोटी असलेली दिसते.

आपल्या चित्रपटाच्या घडणीत सर्व पातळ्यावर कार्यरत असणाऱ्या सचिन यांनी छोट्या पडद्यावरही आपली नाममुद्रा तितक्याच ताकदीने उमटवलेली आहे. म्हणूनच त्यांच्या 'तू तू मैं मैं', 'हद कर दी आपने', 'तेरे घरच्या समोर', 'कुणासाठी कुणीतरी', 'तू तोता मै मैना' आदी मालिका लोकप्रिय झाल्या, तर त्यांनी निवेदक, परीक्षक म्हणून रिॲलिटी शोजमध्ये निभावलेल्या भूमिकाही महत्त्वपूर्ण होत्या.

सचिन यांनी सुप्रिया सबनीस या अभिनेत्रीशी विवाह केला, त्यांना श्रिया नावाची एक मुलगी असून तीही चित्रपटसृष्टीत कार्यरत आहे.

सचिन यांनी आपल्या कारकिर्दीत अभिनेता,

दिग्दर्शक, पटकथाकार, नृत्यदिग्दर्शक, संकलक, निर्माता, गायक, संगीतकार या चित्रपटसृष्टीतील भूमिका जितक्या ताकदीने पार पाडल्या, तितक्याच ताकदीने व्यक्तिगत जीवनातील मुलगा, पती आणि पिता या भूमिकाही निभावलेल्या दिसतात. बालकलाकार म्हणून नावारूपाला आलेल्या या चतुरस्र व्यक्तिमत्वाचे चित्रपटसृष्टीतील स्थान आजही अढळ असलेले दिसते.

– संपादित

**संदर्भ :** १) 'हाच माझा मार्ग', पिळगावकर सचिन, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०१३.

## पिळगावकर, सुप्रिया सचिन

**अभिनेत्री**

**१७ ऑगस्ट १९६७**



सुप्रिया सचिन पिळगावकर म्हणजे मूळची सुप्रिया अरुण सबनीस. त्यांचा जन्म मुंबईतच झाला. विलेपार्ले येथे राहणाऱ्या सुप्रिया यांनी शाळेत असतानाच नाटकातून कामे करायला सुरुवात केली. सुधा करमरकर यांच्या 'लिटल थिएटर'च्या 'हिमगौरी आणि सात बुटके' या नाटकात त्यांनी काम केले. त्याच वेळी त्या दूरदर्शनवरील 'किलबिल' या कार्यक्रमाचेही संचालन करीत असत. त्यातीलच 'भामटी आणि बावळे' या नाटकातील त्यांची भूमिका पाहून सचिन पिळगावकर प्रभावित झाले. ही भूमिका लक्षात ठेवून सचिन यांनी 'नवरी मिळे नवऱ्याला'साठी सुप्रिया यांची निवड केली. चित्रपटातील अभिनयामुळे खूश झालेल्या सचिन यांनी सुप्रियाला लग्नाची मागणी घातली व २१ डिसेंबर १९८५ रोजी सचिन व सुप्रिया विवाहबद्ध झाले. त्याच वेळी त्यांचे एकीकडे रुपारेल महाविद्यालयामध्ये कला शाखेच्या पहिल्या वर्षाचे शिक्षण सुरू होते. विवाह झाल्यावरही त्यांची स्वत:ची ओळख व अभिनयशैली कायम राहिली, हे विशेष. लग्नानंतर दोघांनी 'अशी ही बनवाबनवी' या चित्रपटातून अभिनय केला. 'तू तू मै मै' या हिंदी मालिकेतील अभिनयामुळे त्या घराघरात पोहोचल्या. कालांतराने 'नच बलिये' या रिॲलिटी शोमध्ये त्यांनी उत्स्फूर्त नाचून विजेतेपद पटकावले. दोघांची एकमेकांना कायम साथ मिळाली.

सुप्रिया यांनी गृहिणी व आई या भूमिका सांभाळतानाच आपली कारकिर्ददेखील अगदी व्यवस्थित जपली. त्यांनी एशियन पेन्ट्स, प्रॉमिस इत्यादी उत्पादनांसाठी मॉडेलिंग केले, त्याचबरोबर 'कुंकू', 'आयत्या घरात घरोबा', 'नवरा माझा नवसाचा', 'आम्ही सातपुते' अशा मराठी चित्रपटांतून आपली वाटचाल कायम ठेवली. 'ऐतबार', 'बरसात', 'तुझे मेरी कसम' इत्यादी हिंदी चित्रपटांतूनही भूमिका साकारल्या. 'आम्ही दोघे राजाराणी' या मराठी नाटकातूनही त्यांनी आपले अभिनयगुण दाखवले. या प्रवासात त्यांच्या अभिनयाची दखल घेत त्यांना पुरस्कारही प्राप्त झाले. 'नवरी मिळे नवऱ्याला'साठी फिल्मफेअर, तर 'माझा पती करोडपती'साठी राज्य पुरस्कार पटकावला. पुरस्कार म्हणजे सुप्रिया यांच्यासाठी पुढील प्रवासासाठीचा खूप मोठा आनंदठेवा असतो. पुरस्कारांमध्येच त्यांच्यासारखे कलाकार अडकून पडत नाहीत, तर आपला चौफेर प्रवास कायम ठेवतात.

– दिलीप ठाकूर



## पी. सावळाराम

*पाटील, निवृत्तिनाथ रावजी*

**गीतकार**

**४ जुलै १९१४ – २० डिसेंबर १९९७**

निवृत्तिनाथ रावजी पाटील उर्फ पी. सावळाराम यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील येडेनिपाणी या गावी झाला. तासगावच्या प्राथमिक शाळेत मराठी चौथीच्या वर्गात त्यांनी पहिला क्रमांक पटकावला. वि.स. पागे हे निवृत्तिनाथांचे गुरुतुल्य शाळकरी मित्र. पागे यांना कादंबरीकार ह.ना. आपटे यांच्या 'उष:काल' या



कादंबरीतील ‘सावळ्या’ या व्यक्तिरेखेत आणि निवृत्तिनाथांमध्ये कमालीचे साम्य आढळले. त्यामुळे ते निवृत्ती यांना ‘सावळ्या’ या नावानेच संबोधू लागले. पी. सावळाराम यांनी ‘निवृत्तिनाथ रावजी पाटील’ या नावाने सुरुवातीची गाणी लिहिली; पण त्याच वेळी नागपूर आकाशवाणी केंद्रावर एका बासरीवादकाचे नाव निवृत्तिनाथ पाटील असे प्रक्षेपित झालेले त्यांनी ऐकले. या नामसाधर्म्यामुळे काही घोटाळा होऊ नये व आपण काहीतरी वेगळे नाव घ्यावे म्हणून त्या काळी प्रचलित असलेल्या सी. रामचंद्र, व्ही. शांताराम या शैलीप्रमाणे त्यांनी ‘पी. सावळाराम’ असे नाव धारण केले.

पी. सावळाराम पुढील शिक्षणासाठी तासगावहून कोल्हापूरला आले. एका शिक्षकाने व एका मित्राने त्यांची राहण्याची व जेवण्याची सोय केली. पुढे त्यांची मेजर दादासाहेब निंबाळकर यांच्याशी ओळख झाली आणि त्यांच्या सौजन्याने साऱ्या अडचणी दूर झाल्या. राजाराम महाविद्यालयात त्यांना कविवर्य माधव ज्युलियन (पटवर्धन) यांच्यासारखा महान साहित्यिक गुरू म्हणून लाभला. त्यांच्या मार्गदर्शनाचाही लाभ त्यांना झाला. पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर ते साताऱ्याला गेले, कारण तिथे एका सरकारी हायस्कूलमध्ये त्यांना नोकरी मिळाली. आचार्य अत्रे यांच्यासारखे आपणही बी.ए., बी.टी. व्हायचे असे त्यांनी ठरवले होते. परंतु त्याच सुमारास १९४२मध्ये ‘चलेजाव’ चळवळ जोमाने सुरू झाली आणि ते बी.टी. परीक्षेत अपयशी झाले.

१९४३ मध्ये विवाहानंतर त्यांनी ठाण्यात आपला संसार सुरू केला. १९४५ मध्ये त्यांना शिधावाटप अधीक्षकाची नोकरी मिळाली. ही नोकरी सांभाळूनच त्यांनी गीतलेखनाकडे आपली लेखणी वळवली. याच सुमारास पी. सावळारामांनी लिहिलेली दोन गाणी कोलंबिया ग्रामोफोन कंपनीच्या वसंतराव कामेरकर यांच्याकडे आली. त्या वेळी वसंत प्रभू या नव्या संगीतकाराचे नाव कामेरकरांच्या कानावर आले होते. त्यांनी वसंत प्रभूंकडे या गाण्यांचे संगीत सोपवले. त्यांच्या अपेक्षेप्रमाणे ही दोन्ही गाणी गाजली नाहीत, पण वसंत प्रभूंच्या संगीतातली चुणूक कामेरकरांच्या लक्षात आली आणि लवकरच पी. सावळाराम व वसंत प्रभू या जोडीचे ‘गंगा जमुना डोळ्यात उभ्या का?’ हे लता मंगेशकर यांच्या स्वरातले भावगीत घरोघर पोहोचले. या भावगीताने इतिहास घडवला.

१९५० साली निर्माता-दिग्दर्शक दिनकर द. पाटील यांच्या ‘रामराम पाव्हणं’ या चित्रपटापासून पी. सावळाराम चित्रपटाचे गीतकार झाले. या चित्रपटापासून, म्हणजे १९५० पासून ते १९८५ च्या ‘गड जेजुरी जेजुरी’पर्यंत सुमारे ५० बोलपटांसाठी त्यांनी गाणी लिहिली. चित्रपटाव्यतिरिक्त लिहिलेल्या भावगीत, भक्तिगीत, लावण्या, गवळणी इ. गीतांची संख्या सुमारे १२५ आहे. पी. सावळाराम हे भावगीत कवी म्हणूनच ओळखले जातात. त्यांची सर्व भावगीते गाजली. महाराष्ट्रात सर्वांच्या तोंडी ती बसली. भावगीते लिहून मराठी मनावर अधिराज्य गाजवणारे पी. सावळाराम हे पहिले चित्रपट गीतकार होत. म्हणूनच लोकांनी त्यांना ‘जनकवी’ ही उपाधी प्रेमाने बहाल केली.

पी. सावळाराम यांनी ‘नांदायला जाते’ या चित्रपटाची कथा-पटकथा-संवाद व गीतांसह निर्मिती केली होती. ‘बाळ माझं नवसाचं’ या चित्रपटाची कथाही त्यांनी लिहिली होती. ‘सलामी’ चित्रपटाची पटकथा-संवाद त्यांनी लिहिले होते व ‘पुत्र व्हावा ऐसा’चीही कथा-पटकथा संवाद त्यांचेच होते.

पी. सावळाराम हे काही काळ ठाण्याचे नगराध्यक्ष होते. गीतलेखनासाठी दिला जाणारा ‘ग.दि. माडगूळकर पुरस्कार’ त्यांना मिळाला होता.

पी. सावळाराम यांच्या नावाने ठाणे महानगर पालिका दर वर्षी चित्रपटातील मान्यवर स्त्री, पुरुष व नवोदित कलावंत यांना पुरस्कार देत असते.

– मधू पोतदार

प

## पेंडसे, गोविंद मोरेश्वर

*आप्पा पेंडसे*

**समीक्षक**

**१७ नोव्हेंबर १९१० – २६ जून १९८०**

गोविंद मोरेश्वर पेंडसे उर्फ आप्पा पेंडसे यांचा जन्म बडोद्याजवळील व्यास गावी झाला. त्यामुळे गुजराती भाषेतून त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. घरातील आर्थिक अडचणीमुळे त्यांना पुढचे शिक्षण घेता आले नाही, म्हणून नोकरीच्या शोधात ते मुंबईला आले. मुंबईत आल्यावर त्यांनी वृत्तपत्रसृष्टीत प्रवेश केला. 'विविधवृत्त', सिनेसाप्ताहिक तारकांमध्ये उपसंपादक, संपादक अशी कामे त्यांनी केली. त्याचबरोबर निर्माते दादासाहेब तोरणे, बाबूराव पै, पांडुरंग नाईक, मास्टर विनायक, बाबूराव पेंढारकर यांसारख्या नामवंत कलाकारांच्या प्रदीर्घ मुलाखती घेतल्या व त्या प्रसिद्ध केल्या. नर्मविनोदी आणि तिरकस शैलीने त्यांनी विविधवृत्त साप्ताहिकातून चित्रपटांची परीक्षणे लिहिली. त्यांच्या लेखणीने चित्रपटांच्या परीक्षणात एक स्वतंत्र ठसा उमटला होता. त्यांची परीक्षणे त्या काळात खूपच गाजली होती. पुढे त्यांनी लोकसत्तामधून 'एक्स्प्रेस टॉवर'वरून आणि महाराष्ट्र टाईम्समधून 'हजरत सलाम घ्यावा' अशा लोकप्रिय लेखमाला लिहिल्या.

आप्पा पेंडसे १९५८ सालात मुंबई महानगरपालिकेत नगरसेवक म्हणून निवडून गेले. तसेच मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई मराठी पत्रकार संघ यांच्या जडणघडणीत त्यांचा फार मोठा वाटा होता. बाबूराव पै यांच्या 'चूल आणि मूल' या चित्रपटात ते नायक म्हणून चमकले. तसेच 'झंझावात' आणि 'जन्माची गाठ' या चित्रपटांतही ते प्रमुख भूमिकेत होते.

आप्पा पेंडसे यांनी मुंबई दूरदर्शनवरून दादा साळवी, वनमाला, स्नेहप्रभा प्रधान इत्यादी चित्रपट कलावंताच्या मुलाखती घेतल्या. त्या प्रेक्षकांच्या दीर्घकाळ स्मरणात राहिल्या होत्या. वृद्धापकाळाने त्यांचे मुंबईत निधन झाले.

– द.भा. सामंत

## पेंढारकर, त्यागराज बाबूराव

**छायालेखक**

**११ फेब्रुवारी १९२६**



बाबूराव पेंढारकर यांचे सुपुत्र म्हणून जगाला परिचित असले तरी एक संवेदनशील छायाचित्रकार म्हणून त्यागराज पेंढारकर चित्रपटसृष्टीला परिचित आहेत.

त्यागराज पेंढारकर हे चित्रपटसृष्टीसाठी लोकप्रिय असणाऱ्या करवीर नगरीत जन्मले. घरातूनच कलेचा वारसा लाभलेल्या त्यागराज यांनी इंजिनिअर होण्याचा निर्णय घेतला. त्यासाठी व्ही.जे.टी.आय.मधून इंजिनिअरिंगची परीक्षाही त्यांनी दिली. पण दोनदा अनुत्तीर्ण झाल्यानंतर कोल्हापूरपासून लागलेला छायाचित्रणाचा छंद जोपासण्यासाठी भालजींच्या स्टुडिओत कॅमेरा विभागामध्ये ते दाखल झाले. पण लवकरच दुसरे काका व्ही. शांताराम यांच्या राजकमल स्टुडिओत 'परछाई' चित्रपटाच्या वेळी जी. बाळकृष्ण यांना छायालेखनात साहाय्यक झाले. 'दो आँखे बारह हाथ' या चित्रपटाच्या वेळी जी. बाळकृष्ण आजारी पडल्याने त्यागराज यांना छायालेखनाची संधी मिळाली. यानंतर 'मौसी' आणि टेक्निकलर 'नवरंग'नंतर राजकमल सोडून ते मुक्त छायालेखक-छायाचित्रकार म्हणून काम करू लागले. जेमिनीचा 'पैसा या प्यार' व अन्य चित्रपट, काही गुजराती चित्रपट यांबरोबरच दादा कोंडकेचा 'आली अंगावर', 'आंधळा मारतो डोळा', 'यशोदा', 'राजा शिवछत्रपती', 'चव्हाटा', 'बाल शिवाजी', 'आघात', 'अभिलाषा' इत्यादी मराठी चित्रपटही केले. त्यागराज यांचे 'पडद्यामागचा माणूस' हे आत्मचरित्र प्रकाशित झाले आहे.

– सुधीर नांदगावकर

**संदर्भ** : १) पेंढारकर त्यागराज, 'पडद्यामागचा माणूस', रावा प्रकाशन, पुणे; २०११.

प

## पेंढारकर, बाबूराव गोपाळ

**अभिनेता**

**२२ जून १८९६ – ९ नोव्हेंबर १९६७**



मराठी चित्रपटसृष्टीतील अतिशय हरहुन्नरी कलाकार म्हणून बाबूराव गोपाळ पेंढारकर यांचा उल्लेख करावा लागेल. कंपनीत व्यवस्थापक म्हणून काम करता करताच त्यांनी अभिनयात मोठी मजल मारली आणि चित्रपटसृष्टीत स्वत:चे स्थान निर्माण केले. त्यांचा जन्म कोल्हापूरला झाला. त्यांच्या वडिलांचे नाव गोपाळराव, आईचे नाव होते राधाबाई. त्यांचे वडील कोल्हापूरमध्ये नावाजलेले डॉक्टर होते. मात्र बाबूरावांचे शिक्षण यथातथाच होते. सुरुवातीच्या काळात त्यांनी पन्हाळ्याच्या शाळेत इंग्रजीचे शिक्षक म्हणून नोकरी केली. तेथे नोकरीत करत असतानाच त्यांचे लग्न झाले आणि ते कोल्हापूरला आले. काही काळ एका होमिओपॅथीच्या डॉक्टरांच्या दवाखान्यात त्यांनी कंपाऊंडर म्हणून नोकरी केली. नंतर बाबूराव पेंटर यांनी पेंढारकरांना महाराष्ट्र फिल्म कंपनीत काम करण्यासाठी बोलावून घेतले आणि तिथेच 'सैरंध्री' चित्रपटाद्वारे बाबूरावांनी अभिनयाचा श्रीगणेशा सुरू केला. 'सैरंध्री' चित्रपट त्या काळात खूप गाजला.

महाराष्ट्र फिल्म कंपनीत बाबूराव सुरुवातीला सेवक आणि नंतर व्यवस्थापक म्हणून काम करीत होते, त्या वेळी त्यांना १५ रुपये पगार मिळत होता. १९२३ साली पेंढारकरांनी महाराष्ट्र फिल्म कंपनी सोडली. काही काळ कॉर्पोरेशन कंपनीत काम केले. 'प्रभावती' नावाच्या एकाच चित्रपटात त्यांनी काम केले आणि डेक्कन कॉर्पोरेशन कंपनीही सोडली. पुढे भालजी पेंढारकर, बाबूराव पेंढारकर आणि पार्श्वनाथ आळतेकर यांनी 'वंदे मातरम' कंपनीची स्थापना केली आणि 'वंदे मातरम' या मूकपटाची निर्मिती केली. हा चित्रपट चालला नाही आणि 'वंदे मातरम' कंपनी त्यामुळे बंद पडली.

पुढे प्रभात कंपनीत बाबूराव नोकरीला लागले. ते व्यवस्थापक म्हणून काम करत असले तरी कंपनीतील सर्व प्रकारची कामे शिकून घेण्याचा निश्चय केला. कंपनीतील पत्रव्यवहार, करारमदार करणे, चित्रपटासाठी लहानमोठे कलावंत निवडणे, अन्य कामगारांची व्यवस्था, चित्रीकरणाची तयारी अशा प्रकारची कामे बाबूराव करत होते. 'बजरबट्टू' या प्रभातच्या मूकपटात पेंढारकरांनी खलनायकाची भूमिका केली. ही भूमिका गाजली आणि उत्तम खलनायक म्हणून बाबूरावांचा लौकिक झाला. पुढे प्रभात फिल्म कंपनीत बाबूरावांनी कथानक, दिग्दर्शन, छायालेखन या क्षेत्रांचाही सूक्ष्मतेने अभ्यास केला. 'जुलूम', 'अयोध्येचा राजा', 'जलती निशानी', 'अग्निकंकण' अशा चित्रपटांत त्यांनी सुरुवातीच्या काळात खलनायकाच्या भूमिका केल्या. त्यांची 'सिंहगड' चित्रपटातील 'उदयभानू' ही भूमिका जाणकार प्रेक्षकांकडून आणि टीकाकारांकडूनही गौरवली गेली. मात्र प्रभातच्या 'अयोध्येचा राजा' चित्रपटातील 'गंगानात'च्या भूमिकेनेच बाबूरावांना खऱ्या अर्थाने लोकप्रियता मिळून दिली. त्यांचे अस्थिर संघर्षमय जीवन संपून आर्थिकदृष्ट्याही स्थैर्य मिळाले.

प्रभात कंपनीचे पुण्याला स्थलांतर झाल्यानंतर कोल्हापूर सिनेटोनमध्ये ते सामील झाले. या वेळी बाबूराव, भालजी, मा. विनायक आणि वासुदेव असे चारही बंधू एकत्र आले. 'आकाशवाणी', 'विलासी ईश्वर' असे चित्रपट कोल्हापूर सिनेटोनतर्फे निर्माण केले. त्यानंतर १९३६ साली 'हंस पिक्चर्स'तर्फे 'छाया' चित्रपट प्रदर्शित झाला. बाबूरावांनी चित्रपटातील डॉ. अतुल ही खलनायकाची भूमिका साकारली. 'छाया' चित्रपटही गाजला. १९३९ साली हंस पिक्चर्सचा 'देवता' चित्रपट प्रदर्शित झाला. या चित्रपटात बाबूराव पेंढारकरांनी प्रथमच नायकाची भूमिका केली आणि आपल्या समर्थ अभिनयाच्या बळावर 'सुखाचा शोध', 'देवता', 'पैसा बोलतो आहे', 'पहिला पाळणा' अशा अनेक चित्रपटांत नायकाची व्यक्तिरेखा साकारली.

वाढत्या वयाला लक्षात घेत त्यांनी चरित्र भूमिकाही




प्रभावीपणे अभिनित केल्या. 'छत्रपती शिवाजी', 'पावनखिंड', 'ये रे माझ्या मागल्या', 'पुनवेची रात', 'कलगीतुरा', 'गाठ पडली ठका ठका', 'जगावेगळी गोष्ट', 'महात्मा फुले', 'देवघर', 'आम्रपाली', 'बायको माहेरी जाते', 'थोरातांची कमळा', 'देव जागा आहे', 'दो आँखे बारह हाथ', 'नवरंग', 'इथे मराठीचिये नगरी' यासारख्या चित्रपटांतल्या चरित्र भूमिकाही त्यांनी मेहनतीने रंगवल्या आणि बाबूरावांना अभिनयाबरोबरच साहित्य, संगीताचीही जाण होती. वि.स. खांडेकर, आचार्य अत्रे, पु.भा. भावे, ग.दि. माडगूळकर यांच्या सहवासात ते रमत असत. साहित्याचे वाचन अफाट होते. इंग्रजी शिक्षणही झाले होते.

१९५१ साली रंगमंदिर नाट्यसंस्था स्थापन करून बाबूराव यांनी 'शिवसंभव' या नाटकाचा प्रयोग केला. 'सीमेवरून परत जा' आणि 'वाहतो ही दूर्वांची जुडी' या नाटकाचे बाबूराव पेंढारकर आणि बाळ कोल्हटकर हे सूत्रधार होते. त्यांनी भागीदारीत 'दूर्वांची जुडी' ही संस्था स्थापन केली आणि 'वाहतो ही दूर्वांची जुडी' या नाटकाचे ५०० प्रयोग केले. कर्करोगाने कोल्हापूर येथे त्यांचे निधन झाले. पुढे त्यांचे पुत्र श्रीकांत पेंढारकर यांनी 'बाबूराव नावाचे झुंबर' हे त्यांच्या आठवणीचे पुस्तक प्रकाशित केले. केशवराव भोसले नाट्यगृहात त्यांचा अर्धपुतळाही उभारला गेला.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ** : १) पेंढारकर बाबूराव, 'चित्र आणि चरित्र', व्हिनस प्रकाशन, पुणे; १९६१.

प

## पेंढारकर, भालजी

*पेंढारकर, भालचंद्र गोपाळ*

**अभिनेता, पटकथाकार, निर्माता, दिग्दर्शक**

**३ मे १८९८ - २६ नोव्हेंबर १९९४**



साठ वर्षांहून अधिक काळ चित्रपटसृष्टीमध्ये कार्यरत राहून स्वतःचे एक विशिष्ट स्थान निर्माण करणारे अवलिया म्हणजे भालजी पेंढारकर. अभिनेता, कथाकार, पटकथाकार, संवादलेखक, गीतलेखक, निर्माता, दिग्दर्शक आणि स्टुडिओ मालक अशा विविध प्रकारे त्यांनी चित्रपटसृष्टीसाठी योगदान दिले.

भालजी उर्फ भालचंद्र गोपाळ पेंढारकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. वडील गोपाळराव कोल्हापूर येथे नामांकित डॉक्टर होते. अभ्यासापेक्षा मौजमजा करण्यातच भालचंद्रांचे बालपण जास्त गेल्यामुळे त्यांनी जेमतेम सहावीपर्यंतच शिक्षण घेतले आणि शाळा सोडली. शाळा सोडण्याच्या कारणावरून त्यांना घरही सोडावे लागले. ते थेट पुण्याला आले आणि टिळकांच्या 'केसरी' या वृत्तपत्रात नोकरी करू लागले. काही काळ तिथे नोकरी केल्यावर ते १९२० मध्ये परत कोल्हापूरला आले व 'मराठा लाईफ इन्फंट्री'मध्ये कामाला राहिले.

मराठा लाईफ इन्फंट्रीमधली नोकरी सुटल्यावर भालजी पेंढारकर पुणे येथील एका थिएटरमध्ये मूकपटांची स्फुटे लिहिण्याचे काम करू लागले. लेखनकलेचा अशा प्रकारे श्रीगणेशा झाल्यावर त्यांनी 'असुरी लालसा' हे नाटक लिहिले. पुढे 'क्रांतिकारक' व 'भवितव्यता', 'संगीत कायदेभंग', 'राष्ट्रसंसार' आणि 'अजिंक्यतारा' अशी एकूण सहा नाटके त्यांनी लिहिली.

यानंतर कोल्हापूर येथे भालजींना बाबूराव पेंटर यांनी आपल्या महाराष्ट्र फिल्म कंपनीसाठी 'मार्कंडेय' या पौराणिक चित्रपटाचे कथानक लिहिण्याची संधी दिली. या वेळी त्यांचा दादासाहेब तोरणे आणि बाबूराव पै यांच्याशी परिचय झाला. 'मार्कंडेय'चे चित्रीकरण सुरू असताना कंपनीला आग लागली व चित्रित झालेला भाग आगीत जळून गेल्यामुळे बाबूराव पेंटर यांनी या चित्रपटाचे काम बंद केले, त्यामुळे नाराज झालेले भालजी पेंढारकर तोरणे व पै यांच्यासह कंपनीतून बाहेर पडले. त्यांनी 'पृथ्वीवल्लभ' (१९२४) या चित्रपटाची योजना आखली. त्या चित्रपटासाठी भालजींनी रंगभूषा, अभिनय याबरोबर पटकथेचीही जबाबदारी स्वीकारली.

चित्रपटलेखनासोबतच भालजींनी दिग्दर्शक होण्याचाही ध्यास घेतला. त्यांनी १९२५ साली 'बाजीराव मस्तानी' या चित्रपटाचे दिग्दर्शन केले. त्यानंतर 'वंदे मातरम्' हा चित्रपट केला, पण सेन्सॉरने तो असंमत करून त्यातील दृश्य कापून प्रदर्शित करण्यास परवानगी दिली. अखेरीस तो १९२७ साली प्रदर्शित झाला आणि साफ कोसळला. त्यानंतर भालजींनी प्रभात फिल्म कंपनीसाठी 'उदयकाल', 'जुलूम', 'बजरबट्टू' आणि 'खुनी खंजर' या मूकपटांच्या कथा लिहिल्या.

या वेळेपर्यंत बोलपटांचा जमाना आला होता; त्यामुळे भालजींनी दादासाहेब तोरणें यांच्या 'श्यामसुंदर' (१९३२) या चित्रपटासाठी लेखन, दिग्दर्शन केले आणि त्यात अभिनयही केला. यातील गाणीही भालजींनीच लिहिली होती. हा चित्रपट हिंदी आणि बंगाली भाषेतही तयार झाला. श्रीकृष्णाच्या बाललीलांवर आधारित असलेला हा चित्रपट मुंबईत २५ आठवड्यांपेक्षाही जास्त चालला. भारतीय बोलपटांच्या इतिहासात 'रौप्यमहोत्सवी' ठरलेला हा पहिला बोलपट.

यानंतर भालजींनी 'आकाशवाणी', 'पार्थकुमार', 'कालियामर्दन', 'सावित्री', 'राजा गोपीचंद', 'गोरखनाथ', 'महारथी कर्ण' हे पौराणिक चित्रपट तयार केले. तसेच 'कान्होपात्रा', 'वाल्मिकी', 'भक्त दामजी' हे संतपटही केले. 'स्वराज्याच्या सीमेवर', 'नेताजी पालकर', 'बहिर्जी नाईक', 'जय भवानी', 'स्वराज्याचा शिलेदार', 'छत्रपती शिवाजी', 'महाराणी येसूबाई', 'पावनखिंड', 'नायकिणीचा सज्जा', 'मोहित्यांची मंजुळा', 'बालशिवाजी', 'गनिमी कावा' हे ऐतिहासिक




चित्रपट केले. 'सूनबाई', 'सासुरवास', 'मीठभाकर', 'मी दारू सोडली', 'माय बहिणी', 'येरे माझ्या मागल्या', 'आकाशगंगा', 'साधी माणसं', 'तांबडी माती' वगैरे सामाजिक चित्रपटही केले. यातले काही हिंदी, तर काही मराठी भाषेत होते. 'महारथी कर्ण', 'वाल्मिकी', 'स्वर्णभूमी', 'जीना सीखो' हे फक्त हिंदीत होते, तर बाकीचे सर्व फक्त मराठी भाषेतच होते.

दादासाहेब तोरणे हे भालजींना भालबा म्हणत, तर इतर लोक त्यांना 'बाबा' या आदरयुक्त नावाने ओळखत. बाबांनी आजन्म चित्रपट व्यवसाय केला असला, तरी या व्यवसायाला आपल्या ध्येय धोरणांच्या मर्यादा घालूनच त्यांनी तो केला. निव्वळ कलात्मक अथवा गल्लाभरू चित्रपट करणे त्यांच्या स्वभावाला कधीच मानवले नाही. देशप्रेम, स्वधर्माभिमान, ईश्वरनिष्ठा, संयम, सदाचार, सद्‌भिरुची या गुणांची जोपासना करून त्यांनी चित्रपटांसाठी कथा लिहिल्या आणि त्याच उद्दिष्टांनी चित्रपट निर्मिले व दिग्दर्शित केले. ग्रामीण भाषेला चित्रपटांच्या माध्यमातून त्यांनी चिरंजीव केले. त्यांनी लिहिलेले खटकेबाज संवाद हे त्यांच्या चित्रपटांचे खास आकर्षण असायचे आणि म्हणूनच त्यांच्या चित्रपटांच्या अखेरीस 'भालजी पेंढारकर बोलपट' असा मजकूर वाचायला मिळायचा.

भालजी पेंढारकर यांनी चित्रपटसृष्टीस अनेक नामवंत कलाकार व तंत्रज्ञ दिले. शाहू मोडक, शांता आपटे, शांता हुबळीकर, दादा कोंडके यांनी सर्वप्रथम पडदा पाहिला तो भालजींमुळेच. शिवाय मा. विठ्ठल, बी.

नांद्रेकर, रत्नमाला, राजा परांजपे, जयशंकर दानवे, चित्तरंजन कोल्हटकर, रमेश देव, अनुपमा, चंद्रकांत, सूर्यकांत, सुलोचना यांचा अभिनय फुलला तो भालजींच्याच चित्रपटांमधून. सी. बालाजी व हृदयनाथ मंगेशकर यांच्यासारखे संगीतकार भालजींनीच चित्रपटसृष्टीला मिळवून दिले, तर गानसम्राज्ञी लता मंगेशकरांनी 'आनंदघन' या नावाने भालजी पेंढारकर यांच्या चित्रपटांना स्वरसाज चढवला. 'वाल्मिकी' या चित्रपटात राज कपूर यांना भालजींमुळे अभिनय करण्याची संधी मिळाली. ज्येष्ठ अभिनेते पृथ्वीराज कपूर भालजींसमोर आदराने मान झुकवीत, तर दक्षिणेकडील बी.एन. रेड्डी, पुल्लय्या यांच्यासारखे दिग्गज दिग्दर्शक भालजींना गुरुस्थानी मानत.

जन्म, लहानपण व शिक्षण कोल्हापूर येथे झाले असल्याने भालजींनी कोल्हापूर हीच आपली कर्मभूमी मानली आणि १९४३ साली 'कोल्हापूर सिनेटोन' विकत घेऊन तिचे 'जयप्रभा सिनेटोन' असे नामाभिधान करून प्रभाकर पिक्चर्स व अन्य संस्थांतर्फे कोल्हापूर येथेच चित्रपट काढले. १९४८ साली गांधीहत्येनंतर उसळलेल्या दंगलीत त्यांचा स्टुडिओ जाळण्यात आला; त्यामुळे भालजींचे अपरिमित नुकसान झाले, पण तरीही न डगमगता त्यांनी हरप्रयत्नांनी स्टुडिओ पुन्हा उभारून तेथेच चित्रनिर्मिती सुरू केली. त्यासाठी काढलेले कर्ज फेडता न आल्याने स्टुडिओचा लिलाव झाला व तो स्टुडिओ लता मंगेशकर यांनी विकत घेतला. स्वतः घडवलेल्या स्टुडिओची मालकी गेली, पण स्टुडिओवर भालजींचीच हुकमत शेवटपर्यंत राहिली. त्यांनी दिग्दर्शित केलेला अखेरचा चित्रपट 'गनिमी कावा' (१९८१) हा होता, तर त्यांचा कथा-संवाद आणि निर्मिती असलेला अखेरचा चित्रपट 'शाब्बास सूनबाई' १९८६ साली पडद्यावर आला.

१९६० साली महाराष्ट्र सरकारने मराठी चित्रपटासाठी पुरस्कार सुरू केले, पण त्या वेळीही भालजींनी आपले चित्रपट पुरस्कारार्थ पाठवण्यास नकार दिला. अखेरीस 'साधी माणसं' हा चित्रपट त्यांच्या आप्तस्वकीयांनी व स्नेह्यांनी पुरस्कारासाठी पाठवण्याची त्यांना भीड घातली. त्यांनीही साऱ्यांची विनंती मानली व त्या चित्रपटास महाराष्ट्र शासनाची नऊ पारितोषिके प्राप्त झाली. त्यामध्ये सर्वोत्कृष्ट चित्रपट, सर्वोत्कृष्ट दिग्दर्शक, सर्वोत्कृष्ट पटकथा, सर्वोत्कृष्ट संवाद या विभागांमध्ये भालजींना पारितोषिके मिळालेली होती. त्यानंतर सर्वोत्कृष्ट कथा आणि सर्वोत्कृष्ट चित्रपट या विभागात 'तांबडी माती' या चित्रपटाला राष्ट्रपती पारितोषिके मिळालेली होती. याखेरीज १९९१ साली 'चित्रभूषण' व 'जीवनगौरव पुरस्कार'ही त्यांना प्राप्त झालेले होते. १९९४ साली त्यांच्याच तालमीत तयार झालेल्या ग.दि. माडगूळकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिल्या जाणाऱ्या 'ग.दि.मा.' पुरस्कारानेही त्यांना गौरवले होते. १९९२ साली त्यांना चित्रपटसृष्टीचा सर्वोच्च 'दादासाहेब फाळके पारितोषिक' तत्कालीन माहिती व नभोवाणी मंत्री अजित पवार यांनी कोल्हापूर येथे जाऊन दिले होते.

बाबा हे अत्यंत साधे व्यक्तिमत्त्व होते. कधीकधी सूटबूट या वेषात फिरणारे बाबा महात्मा गांधी यांच्या प्रेरणेने हातमागचे कपडे वापरू लागले व त्यानंतर त्यांनी पांढरा शर्ट आणि अर्धी चड्डी हाच आपला वेश कायम ठेवला. त्यांची विचारधारा हिंदुत्ववादी होती; यामुळेच ते वि.दा. सावरकर, डॉ. हेडगेवार आणि गोळवलकर गुरुजी यांच्याकडे ओढले गेले. डॉ. हेडगेवार यांनी त्यांची कोल्हापूरच्या संघसंचालकपदी निवड केली. करवीर हिंदूसभेचेही ते सर्वाधिकारी होते. स्वतः कट्टर हिंदुत्ववादी असूनही अनेक गांधीवादी, साम्यवादी, समाजवादी पुढाऱ्यांशी त्यांचे घनिष्ठ संबंध होते, पण 'गांधीहत्येचा कट जयप्रभा सिनेटोनमध्येच शिजला', असा संशय घेऊन तत्कालीन सरकारने त्यांना अटक करून तुरुंगवास भोगायला लावला. त्या वेळी ते स्थितप्रज्ञ राहिले. कुणाबद्दलही मनात आकस न ठेवता त्यांनी आपले काम पूर्वीच्याच उत्साहाने आणि जिद्दीने सुरू ठेवले. बाबांची परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा होती. भगवान श्रीकृष्ण व छत्रपती शिवाजी महाराज ही त्यांची आराध्यदैवते. त्यांच्या चिंतन, मनन व पूजनाद्वारे बाबांना

जीवनाचा मंत्र मिळाला. कार्याची दिशा व प्रेरणा मिळाली. अशा अवतारी पुरुषांच्या चरित्रांतून आणि चारित्र्यातूनच त्यांच्या जीवनात देव, देश आणि धर्म यावरील अढळ निष्ठांचा उदय झाला. या निष्ठांच्या प्रचारासाठीच त्यांनी आपली वाणी, लेखणी वाहून घेतली आणि चित्रपट निर्मिती केली. याच प्रेरणेतून त्यांनी १९५२ साली शिवरायाचा जन्म ते राज्याभिषेक दर्शवणारा 'छत्रपती शिवाजी' हा चित्रपट सादर केला. त्याचप्रमाणे १९६५ साली साधा, सरळ, आशयघन हा 'साधी माणसं' सामाजिक चित्रपट केला.

वयाच्या ९७ व्या वर्षी कोल्हापूर येथे भालजी पेंढारकर यांचे निधन झाले. त्यांच्या मृत्यूपूर्वी एक वर्ष त्यांचे 'साधा माणूस' नावाने आत्मवृत्त प्रसिद्ध झाले होते. त्यांना दादासाहेब फाळके पारितोषिक प्रदान करण्याचा समारंभ होता, त्या वेळी 'भालजी पेंढारकर सांस्कृतिक केंद्रां'साठी भारत सरकारने पाच लाख रुपयांची देणगी दिली.

– शशिकांत किणीकर

**संदर्भ :** १) किणीकर शशिकांत, 'दादासाहेब फाळके पुरस्कार', प्रतीक प्रकाशन, पुणे; २०१०. २) 'भालजी पेंढारकर', श्रीखंडे शशिकांत, सुपर्ण प्रकाशन, पुणे; २००७.

## पेठकर, यशवंत विठ्ठल

**दिग्दर्शक**

**१५ मे १९०९ – २८ एप्रिल १९९५**

यशवंत विठ्ठल पेठकर यांचा जन्म कोल्हापूरचा. त्यांचे आई वडील हे विद्यापीठ शिक्षणसंस्थेत शिक्षक होते. त्यांच्या हाताखालीच मास्टर विनायक यांनी शिक्षणाचा ओनामा गिरवला होता. पेठकरही पुढे त्या शिक्षणसंस्थेत शिक्षकाची नोकरी करत होते.

मास्टर विनायकांनी १९३७ सालात 'प्रेमवीर' या विनोदी चित्रपटाची निर्मिती केली. त्या चित्रपटात यशवंत पेठकरांनी विनोदी खलनायकाची भूमिका उत्तम केली. पडद्यावर ओझरते दर्शन देऊन पेठकर पुढे दहा वर्षांनी



चित्रपटसृष्टीत आले. १९४७ मध्ये साने गुरुजींच्या 'रामाचा शेला' या कादंबरीवरून प्रभात फिल्म कंपनीने 'आगे बढो' या चित्रपटाची निर्मिती केली. पेठकरांनी त्याचे दिग्दर्शन केले आणि तेथून पेठकरांची चित्रपटसृष्टीतील आगेकूच सुरू झाली. देव आनंद चित्रपटाचा नायक होते आणि त्या काळातील गाजलेल्या अभिनेत्री खुर्शिद या चित्रपटाच्या नायिका होत्या.

प्रभातने पेठकरांना 'अपराधी' हा पुढला चित्रपट दिग्दर्शनासाठी मिळाला. १९४२ च्या चले जाव चळवळीवर याची चित्रकथा बांधली होती. त्यात नायक-नायिकेच्या भूमिकेत होते रामसिंग व मधुबाला आणि अच्युतराव पटवर्धनांच्या व्यक्तिरेखेशी साम्य असणारी भूमिका केली होती प्राण या नटाने. या चित्रपटात प्राण हे खलनायक नव्हते, तर एक क्रांतिकारक होते.

पेठकरांच्या कामाच्या पद्धतीवर खूश होऊन मुंबईच्या प्रकाश पिक्चर्सच्या विजय भट्ट यांनी पेठकरांना मोठा मोबदला देऊन मुंबईला आणले व 'शादी की रात' हा हिंदी चित्रपट त्यांच्या हातात दिला. त्यात गीता बाली, रेहमान, अरुण यांसारखे आघाडीचे कलाकार होते.

सुधीर फडके यांनी त्यांना 'रत्नधर' हा आपला चित्रपट दिला. चित्रपट उत्कृष्ट जमला होता, पण भागीदारांच्या भांडणामुळे तो प्रदर्शित होऊ शकला नाही.

'अपराधी'चा नायक असणाऱ्या राम सिंग यांनी पेठकरांना 'सौ का नोट' हा आपला चित्रपट दिग्दर्शनासाठी दिला. त्यात गीता बाली, करण दिवाण, बेगमपारा हे कलाकार होते.

प्रभादेवीच्या किस्मत टॉकिजचे मालक बेहराम यांना एक मराठी चित्रपट काढायचा होता. त्यांनी कथा लिहिली होती. 'झालं गेलं विसरून जा' या चित्रपटाच्या दिग्दर्शनाची, पटकथालेखनाची आणि संवाद

प

लिहिण्याची कामगिरी बेहराम यांनी पेठकरांवर सोपवली. हा चित्रपट गाजला. उषाकिरण यांचे वडील बापूसाहेब मराठे यांनी 'चोरावर मोर' या आपल्या चित्रपटाच्या दिग्दर्शनाची जबाबदारी सोपवली. या चित्रपटाची कथा, पटकथा, संवाद आणि गीते आचार्य अत्रे यांच्या लेखणीतून उतरली होती. पेठकरांनी यशवंत देव यांना या चित्रपटाच्या संगीत दिग्दर्शनाची संधी दिली.

पेठकरांनी गजानन शिर्के यांना 'मोलकरीण'सारखा उत्तम चित्रपट काढून दिला. हाच चित्रपट पुढे त्यांनी गुजराती भाषेत 'मोटी वा' या नावाने काढला. त्या गुजराती चित्रपटाला गुजरात सरकारने सर्वोत्कृष्ट गुजराती चित्रपट म्हणून गौरवले. पेठकरांनी पुढे 'कधी करशी लग्न माझे', 'तूच माझी वहिनी', 'मायमाउली', 'सून लाडकी या घरची' यासारखे यशस्वी चित्रपट काढले आणि चित्रपट जगतातून निवृत्ती घेतली. पुढे एका तपानंतर १९९१ साली त्यांनी निर्माते शरद वैद्य यांच्या आग्रहास्तव 'संत नामदेव' या चित्रपटाचे दिग्दर्शन केले.

प

पेठकरांनी आपले आत्मचरित्र लिहावयास घेतले होते, पण ते पूर्ण होण्याअगोदर मृत्यूने त्यांना गाठले. चिरंजीव अविनाश पेठकर यांनी यशवंत पेठकर यांना 'कीचकवध' या चित्रपटाच्या दिग्दर्शनासाठी साहाय्य केले होते.

–द.भा. सामंत

## पैंगणकर, इंदुमती शशिकांत

*कानन कौशल*

**अभिनेत्री**

**जन्मदिनांक अनुपलब्ध**

कृष्णधवल चित्रपटांच्या कालखंडात ज्या सोज्ज्वळ, सोशिक सौंदर्यवतींचा बोलबाला होता, त्या काळातील नायिकांच्या अनेक लोभस चेहऱ्यांपैकी इंदुमती पैंगणकर (पूर्वाश्रमीच्या इंदुमती शेट) यांचा एक चेहरा होता. अगदी शाळेपासूनच त्यांना अभिनयाची आवड होती. महाविद्यालयीन काळात ही आवड अधिक दृढ झाली. अर्थशास्त्र व इतिहास हे विषय घेऊन त्या एम.ए. झाल्या.



याच दरम्यान महाविद्यालयातील सांस्कृतिक महोत्सवांमधून अनेक नाटकांत त्यांनी काम केले. या माध्यमातून त्यांना अभिनयाकरिता हिंदी नाटकांमधून संधी उपलब्ध झाली. 'दो जहाँ के बीच' या हिंदी नाटकांमध्ये इंदुमती पैंगणकर यांनी संजीवकुमार आणि लीला चिटणीस या दिग्गज कलाकारांसोबत काम केले. या नाटकातील त्यांच्या अभिनयामुळे त्यांना अनेक नाटकांसाठी विचारणा होऊ लागली. नकळतपणे अभिनयक्षेत्राची दिशा त्यांच्यासाठी नक्की झाली.

'पहर' या हिंदी चित्रपटाने चित्रपट क्षेत्रातील त्यांची कारकिर्द सुरू झाली. त्यानंतर 'आशा के दीप' या हिंदी चित्रपटातही त्यांनी एक भूमिका साकारली. दुर्दैवाने हे दोन्ही चित्रपट अपूर्ण राहिले, पण या दोन्ही चित्रपटांमुळे 'चित्रपट' या माध्यमाची त्यांना जवळून ओळख झाली.

फोटोजेनिक चेहरा, चेहऱ्यावरील लोभसवाणे आणि मृदू भाव आणि उपजत अभिनयगुण यामुळे रंगभूमी आणि चित्रपट अशा दोन्ही माध्यमांमध्ये त्यांचा स्वाभाविक आणि सहज वावर होता. 'आखरी दिन पहली रात' या कमाल अमरोही निर्मित चित्रपटादरम्यान त्यांनी इंदुमती पैंगणकर यांना 'कानन कौशल' असे नाव दिले.

प्रदर्शित झालेला त्यांचा पहिला हिंदी चित्रपट म्हणजे 'मान अपमान'. राजा ठाकूर यांनी दिग्दर्शित केलेल्या या चित्रपटानंतर एकामागून एक हिंदी चित्रपट त्यांना मिळत गेले. १९७५ साली प्रदर्शित झालेल्या 'जय संतोषी माँ' या चित्रपटाने त्यांना भारतभर प्रसिद्धी मिळाली. या चित्रपटामध्ये भारत भूषण, आशिषकुमार व अनिता गुहा या सहकलाकारांबरोबरची 'सत्यवती'ची त्यांची भूमिका खूप गाजली. एका सोशिक, सात्त्विक आणि श्रद्धाळू पत्नीची मध्यवर्ती भूमिका त्यांनी साकारली. पौराणिक कथेवर आधारित अनेक चित्रपटांसाठी इंदुमती पैंगणकर यांना निर्माता-दिग्दर्शक बोलावू लागले. याशिवाय



'एकटी' या चित्रपटात इंदुमती पैंगणकर उजवीकडून दुसरी

त्यांनी 'जय द्वारकाधीश', 'इतनीसी बात', 'जाग उठा इन्सान', 'भगवानदादा', 'बिदाई', 'लव मॅरेज', 'ये गुलिस्ताँ हमारा', 'जीवनदाता' अशा अनेक चित्रपटात लहानमोठ्या भूमिका केल्या.

राजा ठाकूर यांनी दिग्दर्शित केलेला 'एकटी' (१९६८) हा इंदुमती पैंगणकर यांचा पहिला मराठी चित्रपट होता. त्यांनी 'कार्तिकी', 'भोळीभाबडी', 'पाहुणी', 'मामा भाचे', 'लक्ष्मणरेखा', 'श्रद्धा', 'चंद्र आहे साक्षीला' अशा तीसपेक्षा जास्त मराठी चित्रपटांत भूमिका केल्या. 'मुंबईचा जावई' या चित्रपटातही एका लहान, पण लक्षात राहणाऱ्या भूमिकेने इंदुमती पैंगणकर यांनी लक्ष वेधून घेतले. अरुण सरनाईक या सहकलाकाराबरोबर त्यांच्यावर चित्रित झालेले 'का रे दुरावा, का रे अबोला' हे गीत आजही लोकप्रिय आहे.

हिंदी आणि मराठीव्यतिरिक्त त्यांनी सोळा गुजराथी आणि चार भोजपुरी चित्रपटांतही भूमिका केल्या. 'घुंघट' आणि 'गुनसुंदरीनो घरसंसार' या गुजराथी चित्रपटातील उत्कृष्ट अभिनयासाठी त्यांना गुजराथ सरकारचे पारितोषिक प्राप्त झाले. 'पाहुणी' (१९७६) या मराठी चित्रपटासाठी महाराष्ट्र शासनाने सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीच्या पुरस्काराने त्यांचा गौरव केला.

इंदुमती यांनी 'रूपसाधना' आणि 'वधूचा साज' ही सौंदर्यविषयक पुस्तके लिहिली आहेत. त्यापैकी 'रूपसाधना' या पुस्तकाला राज्य शासनाचे पारितोषिक मिळाले. ४० वर्षे अभिनयक्षेत्राशी निगडित असूनही त्यांनी चंदेरी दुनियेतील आपले पाऊल काढून घेतले आणि त्या आनंदाने आपले जीवन व्यतीत करीत आहेत.

– नेहा वैशंपायन

**संदर्भ** : १) देसाई माधवी, 'गोमंत सौदामिनी', माणिक प्रकाशन, कोल्हापूर; २०११.

प

## पै, बाबूराव कृष्णराव
**वितरक, निर्माता**
**१० मे १९०२ – मृत्युदिनांक अनुपलब्ध**



बाबूराव कृष्णराव पै हे चित्रपट क्षेत्रात 'मूव्ही मोघल' म्हणून ओळखले जात. बाबूराव शिक्षण संपल्यावर बँकेत नोकरी करत असताना त्यांची मुंबईहून कराची येथे बदली झाली. तेथे त्यांची दादासाहेब तोरणे यांच्याशी भेट झाली. दोघांनाही चित्रपटांबद्दल आत्मीयता असल्याने दोघांनी मिळून चित्रपट वितरणाचा व्यवसाय सुरू केला. पंजाब, सिंध व वायव्य सरहद्द प्रांतामध्ये बाबूराव पेंटर यांच्या महाराष्ट्र फिल्म कंपनीच्या चित्रपटांचे वितरण करण्यास सुरुवात केली. हा व्यवसाय त्यांना लाभदायी ठरला.

प

चित्रपट क्षेत्रातील संधी ओळखून बाबूराव पै व दादासाहेब तोरणे या दोघांनी बँकेतील नोकरी सोडून कराचीहून मुंबईला प्रयाण केले. येथे त्यांनी प्रभात व आर्यन फिल्म कंपनीच्या चित्रपटांचे वितरण करण्यास सुरुवात केली. त्यानंतर या दोघांनी मुव्ही कॅमेरा कंपनीची स्थापना केली आणि त्याद्वारे चित्रपट निर्मितीसाठी व चित्रीकरणासाठी लागणाऱ्या गोष्टी निर्मात्यांना पुरवण्याचे काम सुरू केले. भारतात या दोघांनीच या उद्योगाची मुहूर्तमेढ रोवली.

१९२८-२९ च्या सुमारास 'फेमस पिक्चर्स' या नावाने वितरण संस्था स्थापन करून संपूर्ण भारतात या संस्थेची कार्यालये सुरू केली. १९३१ मध्ये बोलपटांच्या आगमनानंतर तोरणे व पै यांनी अमेरिकेतील ऑडीओकेमिक्सच्या ध्वनिमुद्रण क्षेत्रातील कंपनीशी ध्वनिमुद्रण यंत्रासाठीची भारतातील एजन्सी मिळवली. याच यंत्रणेच्या साहाय्याने प्रभातचा 'आयोध्येचा राजा' हा चित्रपट ध्वनिमुद्रित झाला. रणजित, सागर व वाडिया या चित्रपट संस्थांनाही या दोघांनी ध्वनिमुद्रण यंत्रे पुरवली. यानंतर तोरणे यांनी दोराबजी कोल्हा यांच्या मदतीने नानासाहेब सरपोतदारांचा आर्यन स्टुडिओ विकत घेतला. 'सरस्वती सिनेटोन' असे त्याचे नामकरण करून त्याद्वारे 'श्यामसुंदर' हा चित्रपट बनवला. त्यांच्या या वाटचालीत बाबूराव पै यांचा मोठा वाटा होता. बाबूराव पै यांनीच 'श्यामसुंदर' या चित्रपटाला वेस्टर्न थिएटर मिळवून दिले. या चित्रपटाने रौप्यमहोत्सव साजरा केला.

केशवराव धायबरांनी प्रभात फिल्म कंपनी सोडल्यावर बाबूराव पै तेथे भागीदार म्हणून सामील झाले. पुढे शांतारामबापूंनी प्रभात सोडल्यावर बाबूराव पैंच्या हाती त्या कंपनीची सर्व सूत्रे आली. तेव्हा पै यांची 'फेमस पिक्चर्स' ही संस्था वितरणक्षेत्रात कार्यरत होतीच. या संस्थेद्वारे हलसुख पिक्चर्सचा 'खजांची' चित्रपट मुंबईत कृष्णा थिएटरमध्ये थाटामाटाने प्रदर्शित करण्यात आला. वर्तमानपत्रातून या चित्रपटाच्या मोठ्या जाहिराती देण्यात आल्या. यानंतर पै यांनी प्रभातचा 'रामशास्त्री', पांचालींचा 'जमीनदार', 'खानदान', 'लैला मजनू' असे रौप्यमहोत्सवी चित्रपट वितरित केले. याबरोबरच के.के. मोदी यांच्यासमावेत वेस्टर्न इंडिया थिएटर्स ही चित्रपटगृहांची साखळी निर्माण केली. मुंबईत व पुण्यात त्या वेळेस त्यांची जवळजवळ सव्वीस चित्रपटगृह होती.

बाबूराव पै यांनी 'फेमस स्टुडिओ'ची स्थापना केली. त्यामार्फत 'नर्गीस', 'बडी बहेन', 'प्यार की जीत', 'हमारी मंजिल' यासारखे यशस्वी चित्रपट काढले. पुढे काही कारणाने व्यवसाय अयशस्वी झाल्याने पै यांनी फेमस स्टुडिओची चित्रनिर्मिती बंद करून चित्रपट व्यवसायातून निवृत्ती घेतली.

शांतारामबापूंनी 'झनक झनक पायल बाजे' या चित्रपटाची निर्मिती करून प्रचंड यश मिळविले. त्या प्रसंगी बाबूराव पै यांनी पुढाकार घेऊन मुंबईत शिवाजी पार्क येथे चित्रपट व्यवसायिकांतर्फे शांतारामबापूंचा सत्कार घडवून आणला. या सत्कार सोहळ्यात आचार्य अत्रे यांनी शांतारामबापू यांना 'चित्रपती' ही पदवी बहाल केली.

–द.भा. सामंत

## पोतदार, आशा
**अभिनेत्री**
**२१ ऑगस्ट १९३९ – ६ एप्रिल २००६**



बंगलोर येथील कानडी कुटुंबात आशा पोतदार यांचा जन्म झाला. त्यांचे वडील बंगलोर येथेच चित्रपट वितरक होते. मावशीच्या संगोपनात वाढलेल्या आशा पोतदार शिक्षणाच्या निमित्ताने मुंबईला आल्या. शिक्षणाबरोबरच नृत्याकडे आकर्षित झालेल्या आशा यांनी पार्वतीकुमार आणि चंद्रशेखर पिल्ले यांच्याकडे नृत्याचे शिक्षण घेतले. नृत्यात पारंगत झाल्यावर त्यांनी देश-विदेशात नृत्याचे कार्यक्रम केले. महाविद्यालयात शिकत असतानाच्या काळातच आशा यांना अभिनय करण्याची संधी मिळाली. पु.ल. देशपांडे यांचे बंधू रमाकांत देशपांडे यांच्या दिग्दर्शनाखाली ‘अंमलदार’ या नाटकात त्यांनी अभिनय केला. त्यानंतर अभिनयाच्या क्षेत्रात कारकिर्द घडवण्याचा विचारही न केलेल्या आशा यांना अभिनयातही रस वाटू लागला.

आशा पोतदार यांना आत्माराम भेंडे यांच्यामुळे ‘नरो वा कुंजरो वा’ या व्यावसायिक नाटकात काम करण्याची संधी मिळाली. त्या संधीचा उपयोग त्यांना अनेकानेक नाटके मिळण्यासाठी झाला. पुढे त्यांनी ‘झोपी गेलेला जागा झाला’, ‘दिनूच्या सासूबाई राधाबाई’ या व्यावसायिक नाटकांतही कामे केली. नंतर १९७१ साली रवींद्रनाथ टागोर यांच्या ‘विसर्जन’ या नाटकाचा अनुवाद असलेल्या ‘माते तुला काय हवंय’ या नाटकात त्यांनी काम केले. या नाटकात नानासाहेब फाटक यांच्यासोबत काम करण्याची संधी त्यांना मिळाली. हे नाटक लोकप्रिय झाले आणि या नाटकातील त्यांची भूमिका पाहूनच दिग्दर्शक ना.बा. कामत यांनी ‘प्रेम आंधळं असतं’ (१९६२) या चित्रपटाची नायिका म्हणून त्यांची निवड केली. रमेश देव यांच्याबरोबर त्यांनी साकारलेली नायिका सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार पटकावून गेली. १९६२ साली सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार मिळवल्यानंतर आशा पोतदार यांनी ‘वावटळ’ (१९६५), ‘स्वप्न तेच लोचनी’ (१९६७), ‘प्रीत शिकवा मला’ (१९६८), ‘रात्र वादळी काळोखाची’ (१९६९), ‘अधिकार’ (१९७१), ‘बहकलेला ब्रह्मचारी’ (१९७१), ‘दोन्ही घरचा पाहुणा’ (१९७१), ‘तिथे नांदते लक्ष्मी’ (१९७१), ‘मला देव भेटला’ (१९७१), ‘देवकीनंदन गोपाळा’ (१९७७), ‘तुमची खुशी हाच माझा सौदा’ (१९७७), ‘मामा भाचे’ (१९७९), ‘बिजली’ (१९८६) अशा चित्रपटातून भूमिका साकारल्या. त्यांची भूमिका असलेल्या ‘वावटळ’, ‘दोन्ही घरचा पाहुणा’, ‘स्वप्न तेच लोचनी’, ‘देवकीनंदन गोपाळा’ या चित्रपटांनाही पुरस्कार मिळाले.

मराठीमध्ये नाव मिळवलेल्या आशा पोतदार यांनी ‘मनचली’ या हिंदी चित्रपटातही भूमिका केली. पुढल्या काळात दूरदर्शन मालिकांमधूनही त्यांनी काम केले.

– महेश टिळेकर



## पौडवाल, अरुण प्रभाकर
**संगीतकार, संगीत संयोजक**
**९ मे १९४४ – १ नोव्हेंबर १९९१**



अरुण पौडवाल या प्रतिभाशाली संगीतकाराचा जन्म मुंबई येथे झाला. उपजत असलेल्या संगीतकलेच्या ओढीने ते शालेय शिक्षणाबरोबरच वयाच्या सहाव्या वर्षीच मुंबईतील ‘ऑपेरा हाऊस’ येथे देवधर स्कूल ऑफ म्युझिक या नामांकित संगीत विद्यालयात संगीताचे धडे गिरवू लागले. गायनाबरोबरीने अरुण पौडवाल यांना वाद्यांविषयी विशेष आकर्षक होते. एल्फिन्स्टन महाविद्यालयात कला शाखेत शिक्षण घेत असताना ॲकॉर्डियन या वाद्याचा त्यांच्यावर प्रभाव

पडला आणि अनिल देसाई यांच्याकडून त्यांनी ॲकॉर्डीयन शिकण्यास प्रारंभ केला. संगीतविषयक जाण आणि वाद्यांविषयी उत्सुकता यामुळे त्यांनी ॲकॉर्डीयनमधील बारकावे शिकत, हळूहळू त्यावर हुकमत मिळवली. महाविद्यालयात शिक्षण सुरू असतानाच वादक जयसिंग भोई यांच्या वाद्यवृंदात ॲकॉर्डीयन वादनासाठी त्यांना बोलावणे आले.

कला शाखेची पदवी घेतल्यानंतर अरुण पौडवाल देना बँकेत नोकरी करू लागले. एकीकडे त्यांचे ॲकॉर्डीयन वादन सुरूच होते. दरम्यान कलाक्षेत्रातील माणसांशी त्यांचा परिचय होत होता. संगीतकार दत्ता डावजेकरांनी अरुण पौडवाल यांच्यातील गुणांना पारखून त्यांना खूप प्रोत्साहन दिले. किशोरकुमार यांच्या परदेश दौऱ्यामध्ये मुख्य वादकांमध्ये वयाच्या चोविसाव्या वर्षी त्यांचा प्रवेश झाला आणि उत्कृष्ट वादन केल्यामुळे लता मंगेशकर, आशा भोसले यांच्या बहुतेक कार्यक्रमात त्यांचा सहभाग अपरिहार्य झाला. याच सुमाराला सचिनदेव बर्मन यांच्याकडे प्रथम वादक आणि नंतर संगीत संयोजक म्हणून ते काम पाहू लागले. प्रयोगशील संगीत संयोजक होण्यासाठी सचिनदेव बर्मन आणि लक्ष्मीकांत प्यारेलाल या अनुभवी आणि यशस्वी संगीतकारांकडे साहाय्यक म्हणून मिळालेला अनुभव त्यांच्या आयुष्यातील महत्त्वाचा टप्पा ठरला.

या काळात त्यांनी जवळपास तीस यशस्वी चित्रपटांमध्ये साहाय्यक म्हणून काम केले. त्यापैकी ‘शर्मिली’ (१९७१), ‘अभिमान’ (१९७३), ‘शराबी’ (१९८४) या चित्रपटांचा विशेष उल्लेख करता येईल.

१९७० साली हृदयनाथ मंगेशकर यांच्या प्रेरणेने त्यांचे समवयस्क, समविचारी वादक, संगीत संयोजक अनिल मोहिले यांच्याबरोबर ‘अनिल-अरुण’ या संयुक्त नावाने संगीत दिग्दर्शन करण्यास सुरुवात केली. या संगीतकार जोडीचे मराठी भावसंगीतातले योगदान महत्त्वपूर्ण आहे. आशा भोसले यांनी गायलेली ‘स्वप्नातल्या कळ्यांनो’, ‘रुपेरी वाळूत’, ‘येऊ कशी प्रिया’ ही भावगीते, उषा मंगेशकर यांनी गायलेली ‘सूर सनईत नादावला’, ‘आता लावा, लावा शिळा’ ही गीते, तसेच अनुराधा पौडवाल यांनी गायलेली ‘सजणा कशासी अबोला’, ‘का हासला किनारा’ ही गीते मराठी भावगीतविश्वाचे अविभाज्य अंग बनली आहे. याशिवाय अरुण पौडवाल यांचे स्वतंत्रपणे असलेले संगीतिक कामही नोंद घेण्याजोगे आहे. स्वत: वादक असल्यामुळे भावसंगीतात आवश्यक वाद्यांचा बाज ओळखून केलेले संगीत संयोजन यांमुळे त्यांनी स्वत:ची शैली निर्माण केली. त्यांच्या खास, वैशिष्ट्यपूर्ण शैलीतून निर्माण झालेली ‘रजनीगंधा’ आणि ‘बंदिनी’ ही भावगीतांची ध्वनिमुद्रिका अतिशय लोकप्रिय झाली. घराघरातून ऐकू येणाऱ्या या ध्वनिमुद्रिकांनी विक्रींचा उच्चांक गाठला.

अनिल मोहिले आणि अरुण पौडवाल या दोघांच्याही कामाचे क्षेत्र विस्तारत गेल्याने ‘अनिल-अरुण’ ही संगीतकार जोडी विभक्त झाली. दरम्यान ‘सचिन पिळगावकर’ या निर्माता, दिग्दर्शकाबरोबर त्यांचे सूर जुळले. त्यांच्या विनोदी चित्रपटाच्या प्रवाहात अनेक मराठी चित्रपटांना अरुण पौडवाल यांनी संगीत दिले. हलक्याफुलक्या, उडत्या, सोप्या चालीच्या गाण्यांनी चित्रपटही लोकप्रिय झाले. ‘माझं घर माझा संसार’ (१९८६), ‘आत्मविश्वास’ (१९८९), ‘गंमत जंमत’ (१९८७), ‘चंगूमंगू’, ‘अशी ही बनवाबनवी’ (१९८८), ‘माझा पती करोडपती’, ‘सगळीकडे बोंबाबोंब’ (१९८८), ‘भुताचा भाऊ’ (१९८९), ‘आमच्यासारखे आम्हीच’, ‘घनचक्कर’ (१९९०), ‘आयत्या घरात घरोबा’ (१९९१), ‘ऐकावं ते नवलंच’ (१९९३) अशा चित्रपटांमधून अरुण पौडवाल शैलीचे चित्रपट संगीत लोकप्रिय झाले.

वादक, साहाय्यक संगीत संयोजक, संगीतकार म्हणून एकेक वाट निर्माण करत असतानाच गायिका अलका नाडकर्णी (म्हणजेच आताच्या अनुराधा पौडवाल) यांच्याशी १९७२ साली अरुण पौडवाल विवाहबद्ध झाले. आपल्या वैशिष्ट्यपूर्ण सांगीतिक कामाने हिंदी व मराठी चित्रपटसृष्टीत स्वत:च्या नावाभोवती वलय निर्माण करण्यात त्यांना यश मिळाले होते. सुपर कॅसेट्सच्या

प

'मीरा का मोहन' या चित्रपटांचे संगीत दिग्दर्शनही अरुण पौडवाल यांनी केले.

अत्यंत सुरेल स्वरसंयोजन, प्रफुल्लित करणारे संगीत, तसेच गाण्याच्या प्रत्येक तत्त्वांच्या सखोल विचारांमधून उतरलेली भावगीते, चित्रपटगीते, बालगीते, भक्तिगीते रसिकांच्या मनात आजही घर करून आहेत. आदित्य पौडवाल आणि कविता पौडवाल या त्यांच्या दोन्ही मुलांना संगीताचा वारसा मिळाला आहे.

अरुण पौडवाल या प्रज्ञावंत कलाकाराचे नवी दिल्ली येथे वयाच्या अवघ्या ४६ व्या वर्षी हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले. आपल्या योगदानाने मराठी संगीतक्षेत्राला एका नव्या वळणावर नेणाऱ्या संगीतकाराच्या अकाली जाण्याने उत्तमोत्तम चालींना संगीतरसिक मुकले. 'अरुण पौडवाल म्युझिक फाऊंडेशन' या संस्थेच्या वतीने संगीतविषयक निरनिराळ्या कार्यक्रमांबरोबर पुरस्कारही दिला जातो.

– नेहा वैशंपायन

## प्रधान, स्नेहप्रभा विठ्ठल

**अभिनेत्री, गायिका, लेखिका**

**२० ऑक्टोबर १९१५ – ७ डिसेंबर १९९३**



सौंदर्याने, कलेने आणि बुद्धिमत्तेने हिंदी आणि मराठी चित्रपटक्षेत्रात स्वत:चे वेगळे स्थान निर्माण करणाऱ्या अभिनेत्री म्हणजे स्नेहप्रभा विठ्ठल प्रधान. त्यांच्या आईचे नाव ताराबाई होते. आई-वडील या दोघांनीही सामाजिक क्षेत्रात – विशेषत: शिक्षण क्षेत्रात उल्लेखनीय काम केले होते. स्नेहप्रभा प्रधान यांचे बालपण नागपूर, पुणे, मुंबई, दिल्ली, कलकत्ता अशा अनेक ठिकाणी गेले. त्यामुळे त्यांचे शालेय शिक्षणही अनेक गावांमधून पार पडले. परंतु डॉक्टरच व्हायचे या ध्येयाने त्या मुंबईला आल्या आणि त्यांनी वैद्यकीय शिक्षण घेण्यासाठी मुंबईच्या ग्रँट मेडिकल महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. मात्र दुर्दैवाने त्यांना डॉक्टर होण्याचे आपले स्वप्न पूर्ण करता आले नाही. पण त्याने नाउमेद न होता त्या नृत्य, संगीत आणि अभिनय यांसारख्या कलांमध्ये पारंगत झाल्या. पुढील काळात आपली कारकिर्द घडवताना त्यांना या कलाशिक्षणाचा पुरेपूर उपयोग झालेला दिसतो. त्यांचे कलागुण लक्षात घेऊन त्या काळातल्या बॉम्बे टॉकीज, मुरली मुव्हीटोन, रणजित मुव्हीटोन, हिन्दुस्थान मुव्हीटोन यांसारख्या नावाजलेल्या चित्रपटसंस्था त्यांना चित्रपटात अभिनय करण्यासाठी विचारत होत्या.

शेवटी १९३९ साली चिमणभाई देसाई यांच्या बॉम्बे टॉकीज संस्थेच्या 'सौभाग्य' व 'सजनी' या चित्रपटात त्यांनी भूमिका करण्यास सुरुवात केली. पण त्या भूमिका नगण्य होत्या. मात्र १९४० साली बॉम्बे टॉकीजने 'पुनर्मिलन' हा चित्रपट तयार केला आणि स्नेहप्रभा प्रधान यांनी नायिका म्हणून त्यात काम केले. चित्रपटाला रामचंद्र पाल यांचे संगीत होते. चित्रपटाचे नायक होते किशोर साहू. हा चित्रपट खूप यशस्वी ठरला. त्यातले 'नाचो... नाचो प्यारे मनके मोर' हे गीत लोकप्रिय झाले. याच दरम्यान स्नेहप्रभा प्रधान यांनी किशोर साहू यांच्याशी विवाह केला. मात्र हे लग्न फार काळ टिकले नाही. त्यानंतर मा. विनायक यांनी बनवलेल्या 'पहिली मंगळागौर' (१९४२) या चित्रपटात स्नेहप्रभा प्रधान यांनी भूमिका केली. स्नेहप्रभा प्रधान यांचा हा पहिला मराठी चित्रपट होता. शाहू मोडक त्याचे नायक होते व लता मंगेशकर यांनी बालकलाकार म्हणून काम केले होते. स्नेहप्रभा आणि लता मंगेशकर यांनी गायलेले द्वंद्वगीतही या चित्रपटात होते. हा चित्रपट चांगला चालला.

त्या काळात नवयुगच्या 'दिनरात' (नायक – परेश बॅनर्जी), 'शिकायत' (नायक – श्याम), 'कालिदास' (नायक – पहाडी संन्याल) अशा बऱ्याच हिंदी चित्रपटांतून स्नेहप्रभा प्रधान यांनी भूमिका केल्या. 'प्यास' या मुरली मुव्हीटोनच्या चित्रपटात त्यांनी काम केले. १९५० साली देव आनंद, नर्गीस यांच्या 'बिरही की रात' या चित्रपटातही त्यांनी भूमिका केली आणि

प



'पहिली मंगळागौर' या चित्रपटात स्नेहप्रभा प्रधान

१९५० पासून चित्रपट क्षेत्रातून त्या निवृत्त झाल्या. त्यानंतर बाबूराव पै यांच्या फेमस पिक्चर्स संस्थेत त्यांनी माहितीपट, जाहिरातपट खात्यात नोकरी केली.

स्नेहप्रभा प्रधान यांनी १९४९ साली 'झुंझारराव' या नाटकात भूमिका करून रंगभूमीवर पाऊल ठेवले. अ.वा. वर्टीलिखित 'राणीचा बाग', 'लग्नाची बेडी', रत्नाकर मतकरी यांचे 'अस्ताई', सुमती धनवरे यांचे 'धुळीचे कण', विद्याधर गोखले यांचे 'साक्षीदार' अशा नाटकांत त्यांनी भूमिका केल्या. तसेच 'प्रभा थिएटर' अशी स्वत:ची नाट्यसंस्था स्थापन करून 'सौभद्र', 'संशयकल्लोळ' यासारखी संगीत नाटके रंगभूमीवर आणली. 'सर्वस्वी तुझाच' हे आत्मचरित्रवजा कथानक असणारे नाटक लिहून त्यात भूमिका केली, तसेच त्याचे दिग्दर्शनही केले. 'स्नेहांकिता' हे आत्मचरित्र त्यांनी लिहिले आहे.

– स्नेहा अवसरीकर

**संदर्भ** : १) प्रधान स्नेहप्रभा, 'स्नेहांकिता', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९७३.

## प्रभावळकर, दिलीप भालचंद्र
**अभिनेता**
**४ ऑगस्ट १९४४**



महाराष्ट्रातील सर्व रसिक दिलीप प्रभावळकर या सर्जनशील, गुणी कलावंताचे नाव आणि कर्तृत्व जाणून आहेत. आपल्या चाळीस वर्षांच्या प्रदीर्घ नाट्य-चित्र कारकिर्दीत स्वत:च्या अभिनयाचा खास ठसा उमटवण्यात ते यशस्वी झाले आहेत.

दिलीप भालचंद्र प्रभावळकर यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांच्या आईचे नाव कमल होते. शारदा विद्यालयातून शालेय शिक्षण घेतलेल्या प्रभावळकर यांनी रुईया महाविद्यालयातून बी.एस्सी.ची पदवी मिळवली. अष्टपैलू अभिनेता म्हणून मान्यता पावलेल्या प्रभावळकरांच्या व्यक्तिमत्त्वाचा, फार जणांना माहीत नसलेला एक पैलू म्हणजे ते जैव-भौतिकशास्त्र या विषयात प्रथम श्रेणीचे एम.एस्सी. पदवीधर आहेत. त्यांनी भाभा अनुसंशोधन केंद्रातून पदविका प्राप्त केल्यावर औषधी कंपनीत अनेक वर्ष नोकरी केली. त्यानंतर व्हिडियो प्रॉडक्शन युनिटमध्ये भागीदार म्हणूनही काम पाहिले. याच काळात त्यांनी छबिलदासमधून बालरंगभूमीवर व प्रायोगिक रंगभूमीवर काम करण्यास सुरुवात केली. प्रभावळकर यांच्या अभिनयाचा प्रवास त्यानंतर व्यावसायिक रंगभूमी, दूरदर्शन मालिका व चित्रपट येथपर्यंत पोहोचला.

‘चिमणराव’ या मालिकेद्वारे प्रभावळकर यांनी छोट्या पडद्यावर पदार्पण केले. या मालिकेतून त्यांना विलक्षण लोकप्रियता मिळाली व ते घरोघरी परिचित झाले. पण त्याचबरोबर त्यांनी इतरही अनेक विविधरंगी, एकाहून एक सरस व वैशिष्ट्यपूर्ण भूमिकांद्वारे लोकांची मने जिंकली. रंगभूमीवर ‘चेटकी’पासून ‘नातीगोती’, ‘एक झुंज वाऱ्याशी’, ‘कलम ३०२’, ‘गुरू’ या गंभीर व्यक्तिरेखांपासून ‘हसवा-फसवी’मधील अफलातून भूमिकांपर्यंत त्यांच्या अनेक भूमिका लक्षवेधी ठरल्या. ‘हसवा-फसवी’चे त्यांनी शेकडो प्रयोग केले.

नाट्य-चित्रपटक्षेत्रातील त्यांच्या कामगिरीबद्दल त्यांना अनेक वेळा ‘महाराष्ट्र राज्य’, ‘नाट्यदर्पण’ व ‘नाट्य परिषद’ पुरस्कार प्राप्त झाले आहेत. १९९९ सालच्या ‘महिंद्र नटराज’ हा प्रतिष्ठेच्या पुरस्काराचेही ते मानकरी ठरले आहेत. ‘पुलोत्सव-बहुरूपी’ पुरस्कारही त्यांना प्राप्त झाला आहे. अभिनयाबरोबर लेखन क्षेत्रातही त्यांनी मुशाफिरी केली. बालवाङ्मय, विनोदी लेखन, सदर लेखन, नाट्यलेखन असे विपुल लेखन त्यांनी केले आहे. या लेखनासाठी त्यांना साहित्य पुरस्कारही प्राप्त झाले आहेत. ‘अनुदिनी’ या सदर लेखनावरच ‘श्रीयुत गंगाधर टिपरे’ ही दूरदर्शन मालिका आधारित होती. ‘श्रीयुत गंगाधर टिपरे’ ही त्यांची भूमिका घराघरात आदराचे स्थान मिळवून गेली. तर त्यांच्या ‘बोक्या सातबंडे’ या लेखनावर आधारित मालिका व चित्रपटही निघाले. कलावंताचा मुखवटा आणि व्यक्तिगत आयुष्यातील त्याचा खरा चेहरा यातील परस्परसंबंध जाणवून देणारा, ‘मुखवटे आणि चेहरे’ हा अनोखा विविध माध्यमी-एकपात्री प्रयोगही त्यांनी निर्माण केला आहे. त्यांनी देशा-परदेशात याचे शेकडो खेळ केले.

१९९१ साली त्यांनी अरविंद देशपांडे दिग्दर्शित आणि विजय तेंडुलकर लिखित ‘लोभ असावा ही विनंती’ या नाटकात महत्त्वाची भूमिका केली. याच वेळी त्यांनी हेतुपुरस्सर ‘अभिनय क्षेत्रा’ची निवड केली आणि रंगभूमी, चित्रपट आणि दूरदर्शन मालिका यांतून चतुरस्र अभिनयाने आपला खास चाहतावर्ग बनवला.

‘एक डाव भुताचा’ (१९८२) या चित्रपटात दिलीप प्रभावळकर यांनी साध्या, भोळ्याभाबड्या, कोणत्याही राजकारणाचा प्रभाव नसणाऱ्या, अलिप्त पण संवेदनशील मनाच्या शिक्षकाची भूमिका साकारली, तर त्यानंतर त्यांनी ‘चौकट राजा’ (१९९१) या चित्रपटात वयाच्या ४१ व्या वर्षी सर्वसामान्य मुलांपेक्षा सर्वार्थाने भिन्न, पण विशेष मुलाची, म्हणजेच नंदूची भूमिका

प





साकारून आपल्या अभिनयातले वैशिष्ट्य दाखवून दिले. अभिनेत्याचे वास्तव वय व चित्रपटातील विशेष मुलाची भूमिका यांच्या वयाचा बारकाईने विचार केल्यास प्रभावळकरांनी साकारलेल्या या भूमिकेतील वैशिष्ट्य चटकन जाणवते. या भूमिकेसाठी त्यांना महाराष्ट्र राज्य सरकारचे 'सर्वोत्कृष्ट अभिनेता'चे पारितोषिक मिळाले. 'एक होता विदूषक' (१९९२), 'झपाटलेला' (१९९२), 'आपली माणसं' (१९९३), 'कथा दोन गणपतरावांची' (१९९६), 'सरकारनामा' (१९९७), 'रात्र आरंभ' (१९९९), 'सुंदर माझं घर' (२००१), 'आधारस्तंभ' (२००२), 'अगं बाई अरेच्चा' (२००४), 'गोड गुपित' (२००४), 'वळू' (२००८), 'झिंक चिका झिंक' (२०१०), 'शाळा' (२०१२) अशी त्यांची अभिनय कारकिर्द त्यानंतर बहरत राहिली. त्यांच्या भूमिकांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी साकारलेल्या भूमिका पाहताना त्यात तोचतोपणाचा प्रत्यय येत नाही. प्रत्येक भूमिका आधीच्या भूमिकेपेक्षा निराळी असते व त्या भूमिकेला अभिप्रेत असणारा अभिनयही निराळा असतो. या दृष्टीने आपल्याला त्यांच्या 'चौकट राजा', 'सरकारनामा', 'रात्र आरंभ', 'देऊळ' आणि आता आताचा 'नारबाची वाडी' अशा विविध चित्रपटातील भूमिकांकडे पाहता येते. 'अगं बाई अरेच्चा' या चित्रपटात त्यांनी संजय नार्वेकर यांच्या वडिलांची भूमिका केली. या भूमिकेसाठी त्यांच्या वाट्याला फारसे संवाद आले नसले तरी आंगिक अभिनयाच्या जोरावर त्यांनी ही छोटीशी भूमिकाही संस्मरणीय केली, तर 'रात्र-आरंभ' या चित्रपटातील दुभंग व्यक्तिमत्त्वही त्यांनी आपल्या अभिनयातून नेटकेपणाने मांडले. 'पछाडलेला' या चित्रपटातील चौकटीत अडकलेला व आपल्या मुलाचे भले करण्यासाठी वाईट वागणारा बाप असो, 'सरकारनामा'मधील राजकारणी असो, किंवा 'मोरया'सारख्या चित्रपटातील संस्कृतिसंरक्षक सामान्य माणूस असो, त्यांच्या प्रत्येक भूमिकेला सहजपणाचे एक अंग असते, ते अंग प्रत्येक भूमिकेतून सहजपणे

अभिव्यक्त होते. त्यांनी या अनेक मराठी चित्रपटांबरोबरच ‘एनकाउंटर - द किलिंग’, ‘महात्मा गांधी’, ‘लगे रहो मुन्नाभाई’, ‘पहेली’, ‘सरकारराज’, ‘सी कंपनी’, ‘सावरीया डॉट कॉम’ अशा अनेक हिंदी चित्रपटांतून अभिनय केला. ‘लगे रहो मुन्नाभाई’तील त्यांनी साकारलेल्या गांधीजींच्या कौतुक झालेल्या भूमिकेसाठी त्यांना राष्ट्रीय पारितोषिकही मिळाले.

अभिनयातील सहजता, नेमकेपणा, भूमिका निवडीतील चोखंदळपणा व नावीन्यपूर्ण भूमिकांचा स्वीकार व स्वीकारलेल्या भूमिकांना न्याय देण्याची वृत्ती प्रभावळकर यांच्याकडे असलेली दिसते. अभिनय व लेखन या दोन्ही कलांनी मराठी नाट्य-चित्रपटक्षेत्रात आणि साहित्यक्षेत्रातही स्वत:च्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीनिशी दिलीप प्रभावळकर यांनी आपले बळकट स्थान निर्माण केले आहे.

– सतीश जकातदार

## प्रभुणे, सविता अरुण

**अभिनेत्री**

**१८ एप्रिल १९६०**



हिंदी चित्रपटांमध्ये आणि दूरदर्शन मालिकांमध्ये यशस्वी वाटचाल करणाऱ्या मराठमोळ्या सविता प्रभुणे या अभिनेत्रीचा जन्म सातारा जिल्ह्यात वाई या निसर्गरम्य छोट्याशा गावात झाला. तेथील कन्याशाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले, तर इंग्लिश विषयातील कला शाखेची पदवी घेतल्यानंतर आईवडिलांच्या प्रोत्साहनाने दिल्लीच्या ‘नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा’ या प्रतिष्ठित संस्थेमधून त्यांनी अभिनयाचे धडे घेतले.

सविता प्रभुणे अभिनेत्री म्हणून स्वत:ला अजमावून पाहाण्यासाठी ‘मुंबई’ या चित्रपटसृष्टीच्या कर्मभूमीमध्ये दाखल झाल्या. ‘महाराणी पद्मिनी’ या नाटकापासून त्यांची अभिनय क्षेत्रातली घोडदौड सुरू झाली. त्यानंतर ‘निष्पाप’, ‘तू फक्त हो म्हण’, ‘चार दिवस प्रेमाचे’, ‘षड्यंत्र’, अशा निरनिराळ्या आशयाच्या नाटकांतून वैविध्यपूर्ण भूमिकांना न्याय देत रंगभूमीवरचा त्यांचा प्रवास सुरू झाला. या नाट्यप्रवासात एन.एस.डी.मधील अभिनयाचे संस्कार आणि एकूणच ‘नाट्य’ या विषयातील उपजत असलेली समज यांमुळे ‘सविता प्रभुणे’ हे नाव सुपरिचित झाले. रंगभूमीवर नाव मिळाल्यानंतर एक अभिनेत्री म्हणून ‘चित्रपट’ या माध्यमाची शक्यताही स्वाभाविकपणे तपासून घेण्यासाठी त्यांना सहजपणे संधी उपलब्ध झाली. अण्णासाहेब देऊळगावकर या अनुभवी चित्रपट लेखक-दिग्दर्शकाच्या ‘लेक चालली सासरला’ या चित्रपटात सहनायिकेची भूमिका त्यांना मिळाली. ‘हुंडा’ या विषयावर बेतलेल्या या चित्रपटात कजाग आईला विरोध करणारी मुलगी सविता प्रभुणे यांनी साकारली. या पहिल्याच चित्रपटात शशिकला, अलका कुबल, महेश कोठारे, लक्ष्मीकांत बेर्डे अशा नामांकित सहकलाकारांबरोबर काम करण्याचा अनुभव मिळाला आणि चित्रपट या माध्यमाची जवळून ओळख झाली. या चित्रपटाने रौप्यमहोत्सव साजरा केला.

‘धाकटी सून’ या चित्रपटात शरद तळवळकर यांच्या धाकट्या सुनेची भूमिका साकारत सोशिक, सात्त्विक, मेहनती, स्वाभिमानी आणि कणखर अशी सुनेची रूपे आपल्या सहजसुंदर अभिनयाने त्यांनी साकारली. ‘खरा वारसदार’, ‘लपंडाव’, ‘कुलदीपक’, ‘वहिनीसाहेब’, ‘कर्तव्य’ अशा चित्रपटांत गंभीर आणि जबाबदार व्यक्तिरेखा करत असतानाच वेगळ्या धर्तीच्या, विनोदी शैलीच्या भूमिका त्यांनी लीलया केल्या. ‘गडबड घोटाळा’, ‘मामला पोरींचा’, ‘फेकाफेकी’ या चित्रपटांतल्या हलक्याफुलक्या अभिनयाने सविता प्रभुणे यांचे वेगळेपण अधोरेखित झाले.

सविता प्रभुणे यांची सर्वाधिक लक्षणीय भूमिका ठरली, ती ‘कळत-नकळत’ या चित्रपटातील नायिकेची. पतीच्या विवाहबाह्य संबंधाची कल्पना

प


'लेक चालली सासरला' मध्ये
सविता प्रभुणे डावीकडील

प

आल्यानंतर स्वतंत्रपणे आयुष्याची वाट निवडणाऱ्या, स्वत्व जपणाऱ्या पत्नीची भूमिका त्यांनी अतिशय समरसतेने केली. या चित्रपटात विक्रम गोखले, अश्विनी भावे, अशोक सराफ अशा कलाकारांच्या भूमिका होत्या. या चित्रपटासाठी सविता प्रभुणे यांना महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा पुरस्कार मिळाला. मराठी चित्रपटांबरोबर त्यांनी हिंदी चित्रपटांतही चरित्र भूमिका सहजपणे साकारल्या. लाघवी चेहरा, मोहक सौंदर्य, भाषेची व अभिनयाची परिपूर्ण जाण असलेल्या या अभिनेत्रीला हिंदी चित्रपटातही भाषेची अडचण आली नाही. माधुरी दीक्षितच्या 'अबोध' या पहिल्या चित्रपटात सविता प्रभुणे यांना महत्त्वाची भूमिका मिळाली होती. याशिवाय 'फिलहाल' चित्रपटात सुश्मिता सेन या अभिनेत्रीच्या आईची भूमिका, 'तेरे नाम' या चित्रपटातही सलमान खान यांच्या आईची भूमिका साकारली.

सविता प्रभुणे यांनी 'बाके-बिहारी' (भोजपुरी), 'सती', 'जी वृंदावन कॉलनी' (तमिळ-तेलगू) या चित्रपटांतही भूमिका केल्या. दूरदर्शनवरून प्रसारित होणाऱ्या मराठी आणि हिंदी अशा दोन्ही मालिकांमध्ये व्यग्र असलेल्या कलाकारांपैकी त्या एक आहेत. 'बंदिनी', 'घरोघरी', 'अधिकार', 'ऊन पाऊस', 'भांडा सौख्यभरे' या मराठी मालिका आणि आघाडीच्या आणि प्रतिष्ठित निर्मिती संस्थांच्या हिंदी मालिकाही त्यांच्या नावावर जमा आहेत. 'इतिहास', 'फुलवंती', 'कोशिश – एक आशा', 'साया' या मालिकांमध्ये त्यांनी चरित्र भूमिका साकारल्या आहेत.

आपल्या अभिनयकलेवर अपार निष्ठा ठेवत या क्षेत्रातील सविता प्रभुणे यांची वाटचाल आजही सुरू आहे. आजवर त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. 'निष्पाप' या नाटकासाठी त्यांना सर्वोत्कृष्ट अभिनेत्रीचा महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार, 'चार दिवस प्रेमाचे' या नाटकासाठी 'नाट्यदर्पण' पुरस्कार व 'तिची कथा

वेगळी' या नाटकासाठी 'नाट्यनिर्माता संघाचा पुरस्कार' मिळाला. आजही त्या या क्षेत्रात कार्यरत आहेत.

– नेहा वैशंपायन

## प्रभू, वसंत कृष्णराव

**संगीतकार**

**१९ जानेवारी १९२४ – १३ ऑक्टोबर १९६७**



अवघ्या १८ वर्षांच्या कारकिर्दीत एकापेक्षा एक मधुर भावगीते आणि चित्रपटगीते देणारे संगीतकार म्हणून वसंत कृष्णराव प्रभू विख्यात होते.

वसंत प्रभू यांचा जन्म मुंबई येथील लालबागच्या कामगार वसाहतीत झाला. घरची गरिबी असल्यामुळे त्यांचे शिक्षण यथातथाच पार पडले. पण बालपणापासूनच त्यांना संगीताचे वेड होते. त्यामुळे गाण्याच्या बऱ्याच कार्यक्रमांना ते हजेरी लावत असत. गाणे ऐकून ऐकूनच त्यांचे कान तयार झाले होते. मग कुठूनतरी हार्मोनियम मिळवून त्यांनी त्यावर सराव सुरू केला. हळूहळू ते नृत्यही करायला शिकले. वयाच्या दहाव्या वर्षी भरत सेना मेळ्यामध्ये ते नृत्य करताना स्वत:च गाणे म्हणत असत.

हार्मोनियमवर सराव करत असतानाच एखाद्या लोकप्रिय गीताला सर्जनशील कलावंत म्हणून वसंत प्रभू आपली स्वत:ची चाल लावत. १९४७ साली त्यांनी 'अगं पाटलाच्या पोरी.. जरा जपून जपून..' या गाण्याला चाल लावली आणि एच.एम.व्ही. कंपनीने ते ध्वनिमुद्रित केले. या पहिल्याच गाण्याने वसंत प्रभूंना चांगलीच लोकप्रियता मिळवून दिली. १९४९ साली त्यांनी पी. सावळाराम यांचे एक गीत ध्वनिमुद्रित केले. लता मंगेशकर यांनी ते गीत गायले होते. या ध्वनिमुद्रिकेची चांगली विक्री झाल्याने एच.एम.व्ही.ला महिनाभरातच ध्वनिमुद्रिकेची दुसरी आवृत्ती काढावी लागली. ते गीत होते 'गंगा जमुना डोळ्यात उभ्या का?' आणि नंतर एच.एम.व्ही., लता मंगेशकर आणि वसंत प्रभू असे समीकरणच तयार झाले आणि नंतरच्या काळात 'हसले गं बाई हसले अन् कायमची मी फसले', 'कृष्णा मिळाली कोयनेला', 'श्री रामा घनश्यामा', 'ते दूध तुझ्या त्या घटातले', 'निजल्या तान्ह्यावरी माउली', 'डोळे पाण्याने भरले', 'प्रेमस्वरूप आई', 'विठ्ठल तो आला आला', 'जन पळभर म्हणतील हाय हाय', 'चाफा बोलेना' अशी अनेक भावगीते वसंत प्रभूंनी संगीतबद्ध केली आणि या गीतांनी वसंत प्रभूंना अमाप लोकप्रियता मिळाली.

ताजी, सुटसुटीत आणि लोकांना पटकन आवडेल अशी संगीतरचना अगदी मोजक्या वाद्यमेळाच्या साहाय्याने ते बनवत. त्यांनी १९४८ साली चित्रपटांना संगीत देण्यास सुरुवात केली. त्यांचा पहिला चित्रपट होता. 'घरबार'. वसंत प्रभूंनी संगीत दिलेला हा एकमेव हिंदी चित्रपट होता. १९५० साली दिनकर पाटील यांच्या 'राम राम पाव्हणं' या चित्रपटातल्या काही लावण्यांना त्यांनी संगीत दिले व नृत्य दिग्दर्शनही केले होते. त्यानंतर दिनकर पाटील यांच्याच 'पाटलाचं पोर' (१९५१) या चित्रपटालाही त्यांनीच संगीत दिले. 'पाटलाचं पोर'पासून दिनकर पाटील, वसंत प्रभू आणि पी. सावळाराम या त्रयीने मराठी रसिकांना उत्तम संगीत ऐकवून तृप्त केले. 'वादळ', 'मूठभर चणे', 'तीन मुले' या चित्रपटांनाही वसंत प्रभू यांनी संगीत दिले. साधी, सोपी स्वररचना, गेयता आणि मोजका वाद्यवृंद ही वसंत प्रभूंच्या संगीताची वैशिष्ट्ये होती. त्यामुळे त्यांनी बनवलेली गाणी सुरेल आणि अविस्मरणीय ठरली.

मुंबईत वयाच्या ४३ व्या वर्षी त्यांचे निधन झाले.

– शशिकांत किणीकर

* * *

प

# य



## येवलेकर, सरला

**अभिनेत्री**

**जन्मदिनांक अनुपलब्ध**



सरला येवलेकर या मूळच्या सोलापूरच्या. शालेय जीवनात असतानाच त्या नाटकातून, मेळ्यातून भूमिका करीत असत. 'अशी वस्ती अशी माणसं' या चित्तरंजन कोल्हटकर यांच्या नाटकाद्वारे त्या व्यावसायिक रंगभूमीवर आल्या. पिंजरा (१९७२) या चित्रपटातून त्यांची अभिनय कारकिर्द खऱ्या अर्थाने सुरू झाली. चित्रपटसृष्टीत त्यांनी निळू फुले, डॉ. श्रीराम लागू यांच्यासारख्या दिग्गज अभिनेत्यांसोबत भूमिका केल्या. डॉ. श्रीराम लागू यांच्याबरोबर 'सुगंधी कट्टा' या चित्रपटामध्ये त्यांनी केलेल्या भूमिकेचा खूप बोलबाला झाला आणि या भूमिकेसाठी त्यांना त्या वर्षीचा फिल्मफेअर पुरस्कारदेखील मिळाला होता. सरला येवलेकर यांनी काही गुजराती चित्रपटांतूनही भूमिका केल्या. 'डियर भौजाई' या गुजराती चित्रपटातील भूमिकेबद्दल त्यांना गुजरात सरकारनेदेखील पारितोषिक दिले होते. 'पिंजरा' या शांतारामबापूंच्या चित्रपटातील भूमिकेसाठी त्यांना 'रसरंग पुरस्कार' लाभला होता. हिंदी चित्रपटातीलही त्यांच्या काही भूमिका स्मरणात आहेत. त्यांनी 'डान्स-डान्स', 'कमांडो', 'मेहंदी रंग लाएगी' इत्यादी हिंदी चित्रपटांत भूमिका केल्या. सरला यांच्या तीन भाषांतील चित्रपटांची संख्या ५०च्या आसपास आहे. काही मालिकांमधूनही त्यांनी काम केले आहे.

'सुगंधी कट्टा', 'झाकोळ', 'बन्याबापू', 'पिंजरा', 'धाकटी मेहुणी', 'हऱ्या नाऱ्या झिंदाबाद', 'जावयाची जात' हे सरला येवलेकर यांनी भूमिका केलेले उल्लेखनीय चित्रपट होते. हल्ली सरला येवलेकर या येशू ख्रिस्ताच्या स्तुतिपर कवनांच्या ध्वनिमुद्रिकांची निर्मिती करण्यात व्यग्र आहेत. ख्रिस्ताचा संदेश लोकांपर्यंत पोहोचवण्याच्या कामात त्या व्यस्त आहेत.

– जयंत राळेरासकर

* * *

# स्वर-ताल-लय


बालगंधर्व


भास्करबुवा बखले


वझेबुवा


सवाई गंधर्व


भीमसेन जोशी


सुचेता भिडे-चापेकर


केसरबाई


मोगुबाई कुर्डीकर


जयमाला शिलेदार


सुलोचना चव्हाण



# आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
# शिल्पकार चरित्रकोश

खंड ७

भाग २

# संगीत

संपादक

चैतन्य कुंटे

माधव इमारते

खंडनिर्मिती सहयोग

कै. दादासाहेब फाळके चित्रनगरी,
गोरेगाव, मुंबई

प्रायोजक

दि सारस्वत को-ऑप. बँक. लि.

महिको सीड्स

प्रकाशक

साप्ताहिक विवेक

(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश, खंड ७
भाग-२ : संगीत



**पहिली आवृत्ती :**
फाल्गुन शु. १४ शके १९३५/१५ मार्च २०१४

**प्रकाशक**
साप्ताहिक विवेक (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत,
३९६, स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी,
मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी : (०२२) २४२२ १४४०/५६३९
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६
e-mail : charitrakosh@gmail.com
Website : www.maharashatranayak.com

**संगणकीय अक्षरजुळणी**
आस्वाद प्रकाशन प्रा. लि.,
प्रभादेवी, मुंबई.

**मुद्रक**
सिद्धी ऑफसेट, प्रा. लि.,
प्रभादेवी, मुंबई - २५.
दूरध्वनी : (०२२) २४२२००६२

**मुद्रितशोधन**
मिलिंद केसरीनाथ वेलिंगकर

मूल्य : ९०० रुपये



# संगीत

**संपादक**
चैतन्य कुंटे
माधव इमारते

**कार्यकारी संपादक**
सुपर्णा कुलकर्णी

**संपादकीय सल्लागार**
कै. डॉ. अशोक दा. रानडे
डॉ. सुधा पटवर्धन
डॉ. नारायणराव मंगरूळकर

**खंड सहयोग**
कै. दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
व्ही. शांताराम मोशन पिक्चर फाऊंडेशन.
के.पी.आय.टी., पुणे.
पिनॅकल ग्रुप, पुणे.

**संदर्भ ग्रंथालय**
मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई
दादर सार्वजनिक वाचनालय, मुंबई

**छायाचित्रांच्या संदर्भात साहाय्य व आभार**
डॉ. अशोक दा. रानडे, श्री. चैतन्य कुंटे, डॉ. अरविंद थत्ते, श्री. भरत कामत यांच्या वैयक्तिक छायाचित्र संग्रहातून, तसेच पुणे भारत गायन समाज व गांधर्व महाविद्यालय, पुणे या संस्थांच्या ग्रंथालयातील छायाचित्र संग्रहांतून बव्हंशी छायाचित्रे प्राप्त झाली. या सर्व व्यक्ती आणि संस्थांचे आभार. शिवाय अनेक कलाकारांची छायाचित्रे त्यांच्या संबंधितांकडून प्राप्त झाली. त्याचे आभार. तसेच दुर्मीळ छायाचित्रे विविध व्यक्ती वा संस्था विषयक स्मरणिका, पुस्तके यांतूनही घेतली आहेत. ज्यांचा स्वतंत्र उल्लेख करणे हे विस्तारभयास्तव शक्य नाही, मात्र त्या सर्व लेखक/प्रकाशकांचेही आभार.

# मनोगत



आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण 'शिल्पकार चरित्रकोश' या मालिकेतील सहावा खंड म्हणजेच 'संगीत' खंड वाचकांच्या हाती देताना अतिशय आनंद होत आहे, या खंडाच्या प्राथमिक बैठका डॉ. अशोक रानडे यांच्या निवासस्थानी झाल्या होत्या. या बैठकांमध्ये संगीत खंडातील चरित्रनायक निवडीचे निकष काय असावेत याचा विचार करून संगीत या मथळ्याखाली मोडणारे प्रकार म्हणजेच लोकसंगीत, शास्त्रीय संगीत, भक्तिसंगीत, भावगीत, नाट्यसंगीत, चित्रपट संगीत तसेच वादनप्रकारातील चर्मवाद्य, तंतुवाद्य, सुषिरवाद्य इत्यादी आणि नर्तन कलेतील शास्त्रीय नृत्यप्रकार तसेच लावणी हे प्रमुख विभाग पाडण्यात आले. या सर्व विभाग, उपविभागांसोबतच संशोधन, समीक्षण, प्रचार-प्रसार या क्षेत्राचाही समावेश संगीत खंडात करण्यात आला. या सर्व क्षेत्रांचा एक प्राथमिक आढावा घेऊन डॉ. रानडे यांच्याशी चर्चा करून यात समाविष्ट होऊ शकणाऱ्या चरित्रनायकांची एक प्राथमिक यादी तयार करण्यात आली. या यादीला परिपूर्ण रूप मिळावे आणि संपूर्ण महाराष्ट्राचे त्यात प्रतिनिधित्व असावे या हेतूने विदर्भ, मराठवाडा, कोकण इत्यादी प्रांतातील चरित्रनायकांच्या नावांचा तपशील त्या त्या विभागातील तज्ज्ञांकडून जाणून घेणे आवश्यक होते.

हा सर्व विचार केल्यावर दि. ३० मार्च २०१० पुणे येथे एक बैठक आयोजित करण्यात आली. या बैठकीला ज्येष्ठ संगीतज्ज्ञ सौ. सुधा पटवर्धन, श्री. मुकुंद संगोराम, श्री. माधव इमारते यांच्यासोबतच व्हायोलीन वादक श्री. रत्नाकर गोखले, तबलावादक श्री. आमोद दंडगे, नर्तिका आसावरी राहाळकर, धनश्री खरवंडीकर, मधुवंती पेठे असे गायन, वादन, नर्तन या क्षेत्राचे प्रतिनिधित्व करणारे मान्यवर आणि या प्रकल्पाचे प्रबंध संपादक दिलीप करंबेळकर व प्रकल्प कार्यकारी संपादक दीपक जेवणे आदी मंडळी उपस्थित होती. डॉ. अशोक रानडे प्रकृती अस्वास्थ्यामुळे उपस्थित राहू शकले नाही.

विदर्भातील चरित्रनायकांच्या नावांचा विचार करण्याकरिता नागपूरचे ज्येष्ठ गायक, समीक्षक, शिक्षक डॉ. नारायणराव मंगरूळकर यांना सांगण्यात आले होते. यांचे वैदर्भीय कलोपासक-भाग १ व २ असे दोन खंड प्रसिद्ध असल्याने तेथील नावांची निश्चिती करणे विशेष कठीण गेले नाही. अशाप्रकारे चरित्रनायकांच्या नावांची निश्चिती होऊन एक बृहत् यादी तयार झाली. पुण्यात झालेल्या बैठकीतच संभाव्य लेखकांचाही विचार करण्यात आला.

यानंतर सहा महिन्यांचा काळ संगीत खंडाच्या दृष्टीने अत्यंत कठीण होता. याचे कारण डॉ. अशोक रानडे यांचे प्रकृति अस्वास्थ्य हे होते. लेखकांकडून नोंदी प्राप्त झाल्या होत्या; तरीपण त्या नोंदींच्या संपादनाचे काम संथ गतीने सुरू होते. डॉ. रानडे यांना दरम्यानच्या काळात वारंवार रुग्णालयात दाखल करण्यात आले आणि ३० जुलै २०११ या दिवशी त्यांना देवाज्ञा झाली.

त्यांच्या पश्चात संगीत खंडाच्या संपादनाचे काम कोणी करावे असा मोठा प्रश्न निर्माण झाला. विचाराअंती श्री. चैतन्य कुंटे व श्री. माधव इमारते ही नावे पुढे आली. श्री. माधव इमारते चरित्रकोशाच्या प्रकल्पाशी आधीपासूनही निगडित होते. या दोघांना संगीत खंडाचे संपादन करण्याची विनंती करण्यात आली व ती दोघांनीही सहर्ष स्वीकारली. श्री. चैतन्य कुंटे यांची संगीतक्षेत्रातील व्यापक व सखोल अभ्यासपूर्ण माहिती व श्री. माधव इमारते यांची

चिंतनशीलता यामुळे या कामास परिपूर्णता लाभत गेली.

शास्त्रीय संगीतातील घराणेदार गायकीतील कलावंत व भक्तिगीत, भावगीत, चित्रपटगीत, लावणी या प्रकारांतील गायक, गायिका तसेच अनेक नृत्यप्रकार रुजवणारे सर्जनशील कलावंत आणि विविध वाद्यवादक व कलोपासक यांच्या सोबतच समीक्षक, लेखक, शिक्षक, कलाश्रयदाते, संगीतशास्त्रकार, रचनाकार, संगीतकार अशी आदींची चरित्रे या खंडात रसिक वाचकांस, अभ्यासकांस वाचावयास मिळणार आहेत.

या सोबतच श्री. चैतन्य कुंटे यांची ८० पानांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना महाराष्ट्रातील एकूणच संगीत विषयावर विविध मितींनी प्रकाशझोत टाकणारी आहे. ही प्रस्तावना मोठ्या कालखंडाचा प्रवास उलगडणारी असल्याने ती विद्यार्थ्यांच्या आणि सामान्य वाचकांच्या ज्ञानात भर घालणारी आहे. परिशिष्टामध्ये दिलेली अभ्यासाविषयक पुस्तकांची सूची ही संदर्भ सूची म्हणून उपयुक्त आहे.

संगीत खंडासाठी लेखन करणाऱ्या लेखकांचेही आभार मानावे तेवढे थोडेच आहेत; कारण या खंडासाठी लेखन करणारी मंडळी देखील त्या त्या विषयातील तज्ज्ञ आहेत. त्यामुळे नोंदीच्या माहितीमध्ये विश्वासार्हता व वस्तुनिष्ठता आहे.

लेखक, संपादक यांनी चरित्रनायकांच्या नोंदी परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु संदर्भांची वानवा भासल्याने काही नोंदीमध्ये कमतरता राहण्याची शक्यता नाकारता येत नाही. वाचक त्याबद्दल उदार मनाने क्षमा करतील, असा विश्वास आहे.

**- सुपर्णा कुलकर्णी**
कार्यकारी संपादक

# अनुक्रमणिका



| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाचे सांगितिक योगदान | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | गायन | वादन | नृत्य | संगीतरचना संशोधन/ अध्यापन | अन्य | मुख्य नोंद |
| ●आबान मिस्त्री | ५४४ | – | तबला | – | – | – | – |
| ●आमोणकर किशोरी रवींद्र | ५४५ | गायिका | – | – | – | – | – |
| ●आरोळकर शरच्चंद्र आत्माराम | ५४७ | गायक | – | – | – | – | – |
| ●इंगळे केशव गुंडूबुवा | ५४८ | गायक | – | – | – | – | – |
| ●इचलकरंजीकर बाळकृष्ण रामचंद्र | ५५० | गायक | – | – | – | – | – |
| ●उत्पात ज्ञानोबा विठ्ठल | ५५२ | गायक | – | – | रचनाकार, शिक्षक | – | – |
| ●कडकडे अजित | ५५४ | गायक | – | – | – | – | – |
| ○कपिलेश्वरी बाळकृष्ण लक्ष्मण | ५५५ | – | – | – | – | – | पृ.५५५ |
| ●कपिलेश्वरी बुवा | ५५५ | – | – | – | संशोधक लेखक, संस्थापक | – | – |
| ●कल्याणपूर सुमन रमाकांत | ५५६ | गायिका | – | – | – | – | – |
| ●कल्ले कृष्णा | ५५८ | गायिका | – | – | – | – | – |
| ●कशाळकर उल्हास नागेश | ५५९ | गायक | – | – | – | – | – |
| ●कशाळकर नागेश दत्तात्रय | ५६० | – | – | – | संगीतज्ञ | – | – |
| ●कशाळकर विष्णु अण्णाजी | ५६१ | गायक | – | – | – | – | – |
| ○कांबळी महादेव जगन्नाथ | ५६२ | – | – | – | – | – | पृ.७३९ |
| ●काणे दत्तात्रेय विष्णु | ५६२ | गायक | – | – | – | – | – |
| ●कादरबक्ष | ५६३ | – | सारंगी | – | – | – | – |
| ●कामत रामदास शांताराम | ५६४ | गायक | – | – | – | – | – |
| ●कायकिणी दिनकर दत्तात्रेय | ५६६ | गायक | – | – | – | – | – |
| ●कारेकर प्रभाकर जनार्दन | ५६७ | गायक | – | – | – | – | – |
| ●कुंटे अनंत कृष्णाजी | ५६८ | – | सारंगी | – | – | – | – |
| ○कुंदगोळकर, रामभाऊ गणेश | ५६९ | – | – | – | – | – | पृ.९१० |
| ●कुमार गंधर्व | ५६९ | गायक | – | – | – | – | – |
| ●कुर्डीकर मोगूबाई | ५७१ | गायिका | – | – | – | – | – |
| ●कुलकर्णी धोंडुताई गणपत | ५७३ | गायिका | – | – | – | – | – |
| ●कुळकर्णी वसंतराव | ५७४ | गायक | – | – | – | – | – |
| ●केरकर केसरबाई | ५७६ | गायिका | – | – | – | – | – |

सर्वस्पर्शी प्रतिभेचे वरदान मिळालेल्या उस्तादजींनी आपली प्रतिभा फक्त शास्त्रीय संगीताच्या चौकटीतच बंदिस्त करून ठेवली नाही. हिंदी चित्रपटसंगीताच्या सुवर्णकाळातली सदाबहार गाणी त्यांच्या सतारीच्या सुरांनी रत्नजडित झाली आहेत. उदाहरणादाखल, 'कोहिनूर', 'अनारकली', 'मुगल-ए-आझम', 'झनक झनक पायल बाजे' हे त्यांपैकी काही गाजलेले चित्रपट होत. उस्तादजींनी इतर भारतीय वाद्यांबरोबर केलेले सहवादन रसिकांची उत्स्फूर्त दाद मिळवून गेले. पं. शंकर शास्त्रींची वीणा, उ. बिस्मिल्ला खाँ साहेबांची शहनाई, पं. रामनारायण यांची सारंगी अशा अनेक दिग्गज कलाकारांबरोबर उस्तादजींनी जुगलबंदी सादर केली आहे. तसेच, अमेरिकेत जॅझ संगीत आणि सतारवादन यांचा एकत्र मेळ घालण्याचा अभिनव प्रयोगही त्यांनी केला आहे.

उस्तादजींच्या अनेक तबकड्या, ध्वनिफिती व ध्वनिचकत्या रसिकांच्या खजिन्यात मानाचे स्थान मिळवून आहेत. अरज, आरभी, जैताश्री, चांदनी केदार, लतांगी इत्यादी रागांमध्ये त्यांच्या खास रचना उपलब्ध आहेत. या सगळ्यांत त्यांची 'पहाडी'ची तबकडी प्रचंड गाजली. त्यांच्या 'जाफरखानी बाज' या वैशिष्ट्यपूर्ण शैलीबद्दलची संपूर्ण माहिती देणारे पुस्तक 'जाफरखानी बाज' या नावानेच प्रसिद्ध आहे. सतार शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना ते खूपच मार्गदर्शक ठरत आहे. उस्तादजींनी 'हलीम अकॅडमी ऑफ सितार' स्थापन केली आहे. या माध्यमातून होतकरू, गुणी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करणे हे ज्ञानसत्र अखंड चालू आहे.

उस्तादजींना अनेक पुरस्कार मिळाले आहेत. महाराष्ट्र, आंध्रप्रदेश, मध्यप्रदेश, कर्नाटक, बंगाल, उत्तरप्रदेश, दिल्ली वगैरे राज्यांमधून त्यांना सन्मानाचे शिरपेच मिळाले. भारत सरकारने 'पद्मश्री' (१९७०), तसेच संगीत नाटक अकादमी (१९८७) आणि २००६ साली 'पद्मभूषण' पुरस्कार प्रदान करून त्यांचा गौरव केला आहे.

— उस्ताद उस्मान खाँ

## अभिषेकी, जितेंद्र बाळकोबा

**गायक, संगीतकार**

**२१ सप्टेंबर १९३१ – ७ नोव्हेंबर १९९८**



जितेंद्र बाळकोबा अभिषेकींचा जन्म गोव्याला झाला. त्यांच्या आईचे नाव जानकी होते. गोव्यातल्या मंगेशी येथे नित्योपासना व पूजाअर्चा करणारे त्यांचे वडील कीर्तनकार होते. त्यामुळे लहानपणापासून त्यांच्यावर संगीताचे संस्कार झाले. त्यांना मुळातच संगीताची आवड असल्यामुळे कीर्तनात टाळ वाजवणे, भजन म्हणणे अशी संगीताची सुरुवात घरातूनच झाली. श्रीमती गिरिजा केळेकर यांच्याकडे अभिषेकींनी संगीताचे धडे घेतले. पुढे पुणे व मुंबई येथे ते संगीत शिकायला गेले. पुण्यात 'अनाथ विद्यार्थी गृह' येथे शालेय शिक्षणाच्या काळात त्यांना रामकृष्णबुवा वझे यांचाही सहवास मिळाला. मुंबईला त्यांचा परिचय उस्ताद अजमत हुसेन खाँ यांच्याशी झाला व त्यांना खुर्जा घराण्याची तालीम मिळाली.

मुंबईला त्यांनी काही काळ आकाशवाणी केंद्रावर कोकणी विभागात काम केले. त्या काळात अनेक कोकणी गीतांना आणि श्रुतिकांना चाली लावण्याची संधी त्यांना मिळाली. त्याच वेळी त्यांना सुप्रसिद्ध साहित्यिक पु.ल. देशपांडे यांच्याकडे बिल्हण संगीत संयोजन व गायन करण्याची संधी मिळाली. 'माझे जीवनगाणे' व 'शब्दावाचून कळले सारे' ही गीते जितेंद्र अभिषेकी यांच्या आवाजात ध्वनिमुद्रित करण्यात आली. या गीतांनी त्यांना फार मोठी लोकप्रियता लाभली. एच.एम.व्ही.द्वारे १९६० साली प्रकाशित, विलासखानी तोडी व मारवा या रागांच्या ध्वनिमुद्रिकेने त्यांना एक ख्यालिया म्हणून मान्यता मिळवून दिली. तेव्हा त्यांची सांगीतिक रचना-प्रतिभा लोकांसमोर आली. त्यांनी अनेक कोकणी गीतांना चाली देऊन ती

आकाशवाणीवर सादर केली. अभिषेकींचा १९५९ मध्ये जगन्नाथबुवा पुरोहित यांच्याशी परिचय झाला. त्यांच्याकडे अनेक वर्षे तालीम घेण्याची त्यांना संधी मिळाली. जगन्नाथबुवांचे ते लाडके शिष्य होते. याव्यतिरिक्त रत्नकांत रामनाथकर, निवृत्तीबुवा सरनाईक, आरोळकरबुवा, अजिजुद्दीन खाँ यांचेही मार्गदर्शन त्यांना लाभले. त्यांना १९६९ मध्ये होमी भाभा शिष्यवृत्ती मिळाली आणि त्यांनी जयपूर घराण्याचे गायक गुलूभाई जसदनवाला यांची अनवट रागांची तालीम घेतली. मधुमक्षिकेच्या वृत्तीने त्यांनी सर्व गुरूंकडून जे काही चांगले आहे, ते आत्मसात केले. एक व्यासंगी गायक म्हणून ते परिचित होते.

मुंबईला ते 'धी गोवा हिन्दू असोसिएशन' या संस्थेची संगीत शाखा सांभाळीत होते. त्यातूनच संगीत नाटकाला संगीत दिग्दर्शन करण्याची संधी १९६४ साली उपलब्ध झाली. 'मत्स्यगंधा' हे त्यांचे पहिले संगीत नाटक होय. त्यातील पदांच्या चाली खूप गाजल्या. संगीत दिग्दर्शक म्हणून त्यांची ख्याती पसरू लागली.

मराठी संगीत रंगभूमीच्या संदर्भातही जितेंद्र अभिषेकींचे योगदान महत्त्वपूर्ण आहे. मराठी नाट्यसंगीतास ६०च्या दशकानंतर पुन्हा नवा बहर आणणाऱ्या संगीतकारांत अभिषेकींचे कार्य अग्रगण्य आहे. त्यांनी प्रचलित व अप्रचलित रागांत, ख्याल, ठुमरी, टप्पा, गझल, भावगीत अशा नाना ढंगांच्या स्वररचना नाटकासाठी केल्या. तसेच पोर्तुगीज, पॉप प्रकारच्याही रचना करून मराठी संगीत रंगभूमीवर नवा रंग आणला. 'अभिषेकीप्रणित नाट्यसंगीत' हे नवे वळण आज मराठी जनमानसात रुजले आहे.

त्यांनी संगीत दिलेली नाटके अशी आहेत : 'मत्स्यगंधा' - वसंत कानेटकर (१९६४); 'ययाति आणि देवयानी' - वि.वा. शिरवाडकर, 'लेकुरे उदंड जाहली' - वसंत कानेटकर (१९६६); 'नयन तुझे जादूगार', 'कट्यार काळजात घुसली' - पुरुषोत्तम द्वारव्हेकर, 'वासवदत्ता' - मीना पेठे (१९६७); 'मन पाखरू पाखरू' - शं.ना. नवरे (१९७०); 'मीरामधुरा' - वसंत कानेटकर (१९७१) ; 'हे बंध रेशमाचे - रणजित देसाई, 'सोन्याची द्वारका' - अनंत आळतेकर (१९७२); 'धाडिला राम तिने का वनी' - द.ग. गोडसे, बिकट वाट वहिवाट - व्यंकटेश माडगूळकर (१९७६); 'गोरा कुंभार' - अशोक परांजपे, 'कांते फार तुला' - बाळ कोल्हटकर (१९७८); 'महानंदा' - अशोक परांजपे (१९७९) ; 'कधीतरी कोठेतरी' - पुरुषोत्तम दारव्हेकर, 'देणाऱ्याचे हात हजार' - बाळ कोल्हटकर (१९८०) ; 'अमृतमोहिनी' - यशवंत रांजणकर (१९८२) ; 'तू तर चाफेकळी' - वसंत कानेटकर (१९९६). यांपैकी 'मत्स्यगंधा', 'ययाति-देवयानी', 'लेकुरे', 'कट्यार', 'हे बंध रेशमाचे', 'गोरा कुंभार' या नाटकांतील पदे विशेष लोकप्रिय ठरली.

'भाव तेथे देव' या एकाच मराठी बोलपटास १९६१ साली त्यांचे संगीत लाभले. काही मोजक्या चित्रपटांत त्यांनी पार्श्वगायन केले. 'गोमू माहेरला जाते हो नाखवा' हे त्यांनी गायिलेले चित्रपटगीत लोकप्रिय झाले.

एक आदर्श गायक म्हणून भारतभर त्यांचा नावलौकिक होता. जयपूर, आग्रा अशा विविध घराण्यांच्या गायकीचा अभ्यास करून त्यांनी स्वत:ची अशी स्वतंत्र शैली निर्माण केली. त्यांचे स्वरलगाव, रागमांडणीची पद्धत, तानांचे प्रकार यांचे अनुकरण त्यांचे अनेक शिष्य करतात. त्यातून 'अभिषेकी पठडी' संगीत अस्तित्वात आले असे म्हणावयास हवे. एक बंदिशकार म्हणूनही त्यांनी प्रभावी रचना केल्या. त्यांच्या सुमारे ५० बंदिशींपैकी यमन (झपतालातील तराणा), रागेश्री, झीलफ, दिन की पूरिया, गांधारकंस, मनोरंजनी, मधुरंजनी या रागांतील बंदिशी प्रचलित झाल्या. मराठी अभंगांना त्यांनी दिलेल्या चाली केवळ आकर्षकच नसून शब्दानुरूप आहेत. त्यांनी महाराष्ट्रातील संत परंपरेबरोबरच उत्तर भारतातील कबीर, मीरा आणि तुलसीदास यांच्या साहित्याचा अभ्यास केला. ते १९७० साली पं. रविशंकरांच्या संगीत प्रकल्पांतर्गत गायक म्हणून अमेरिकेस गेले होते. नंतर ८० व ९० च्या दशकात त्यांनी ब्रिटन, अमेरिका, कॅनडा, युरोप, रशिया,

आफ्रिका व आखाती देशांत गायनाचे दौरे केले. गायक, संगीतकार, तत्त्वचिंतक यांप्रमाणे एक आदर्श गुरू म्हणूनही ते सुपरिचित होते. अनेक विद्यार्थी त्यांच्या घरी राहून संगीताचे शिक्षण घेत. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय व्हावी म्हणून त्यांनी १९७४ साली लोणावळा येथे गुरुकुलाची स्थापना केली. त्यातून अनेक शिष्य तयार झाले. त्यांच्या तालमीत प्रभाकर कारेकर, देवकी पंडित, राजा काळे, अजित कडकडे, शौनक अभिषेकी असे उत्तम गायक तयार झाले.

जितेंद्र अभिषेकी यांना 'पद्मश्री' (१९८८), संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार (१९८९), 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार (१९९०), लता मंगेशकर पुरस्कार (१९९६) व 'बालगंधर्व पुरस्कार' (१९९७) आदी पुरस्कार देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. ते १९९५ साली अखिल भारतीय मराठी नाट्य संमेलनाचे अध्यक्ष झाले होते. त्यांचे प्रदीर्घ आजाराने अडुसष्टाव्या वर्षी पुण्यात निधन झाले.

— विकास कशाळकर, चैतन्य कुंटे

## अभ्यंकर, शंकर कृष्ण

**सतारवादक, बंदिशकार**

**१९ मे १९३४**



शंकर कृष्ण अभ्यंकर यांचा जन्म सातारा येथे एका गरीब कुटुंबात झाला. त्यांचे वडील कृष्णाजी गोविंद अभ्यंकर हे प्राथमिक शाळेत शिक्षक होते. त्यांना गाण्याची अतिशय आवड होती. परंतु पं. विष्णू दिगंबर पलुसकर यांच्याकडे ते करारपत्र लिहून न देऊ शकल्यामुळे त्यांची इच्छा अपूर्णच राहिली. आपल्या मुलांना उत्तम गाता आले पाहिजे या भावनेपोटी त्यांनी मुलांना गायनाचे शिक्षण देण्यास आरंभ केला. उ. अब्दुल करीम खाँ यांच्याकडेही ते मुलांना शिकवायला घेऊन गेले; परंतु खाँसाहेबांनी त्यांना स्वीकारले नाही. मग साताऱ्यालाच म.रा. दांडेकर यांच्याकडे या भावंडांचे गाण्याचे शिक्षण चालू राहिले. भोरच्या संस्थानाच्या दरबारात गाण्याइतपत ही भावंडे तयार झाली.

ग्वाल्हेरचे कृष्णराव पंडित, अंतूबुवा जोशी, गजाननराव जोशी अशा वेगवेगळ्या गुरूंचे दरवाजे ठोठावून शेवटी शंकर अभ्यंकर वयाच्या सुमारे अकराव्या वर्षी, ग्वाल्हेर घराण्याचे सुप्रसिद्ध गायक पं. नारायणराव व्यास यांच्याकडे आले. तेथे जवळजवळ चौदा वर्षे गुरुकुल पद्धतीने राहून त्यांनी शास्त्रीय कंठसंगीताचे शिक्षण घेतले. त्या वेळी विष्णू दिगंबरांच्या पठडीप्रमाणे विद्यार्थ्यांना गायनाबरोबरच इतर वाद्येही शिकविली जात. त्यामुळे अभ्यंकर तबलावादनातही अत्यंत प्रवीण झाले व त्यांनी पुढे अनेकदा पं. नारायणराव व्यास यांना संपूर्ण संगीत मैफलींत तबलासंगतही केली. त्यांनी पं. शंकरराव व्यास यांच्याकडून सतारवादनाचेही प्राथमिक धडे घेतले.

नारायणराव व्यास यांच्याकडे राहत असताना त्यांना पलुस्कर पुण्यतिथी व इतर कार्यक्रमांच्या निमित्ताने थोर कलाकारांच्या मैफली ऐकण्याची संधी मिळाली. त्यामुळे वेगवेगळ्या घराण्यांच्या गायकीची व थोर गायक-वादकांच्या शैलींची वैशिष्ट्ये त्यांच्या मनावर पुरती बिंबली.

पं. रविशंकर व उ. विलायत खाँ यांच्या सतारवादनाचा एकलव्याप्रमाणे अभ्यास करून त्यांनी सतारवादनात प्रगती साधली. सवाई गंधर्व पुण्यतिथी, गुनिदास संगीत संमेलन यांसारख्या प्रतिष्ठित संगीत महोत्सवांत, तसेच सिंगापूर, इंग्लंड, पोलंड इ. परदेशांतही त्यांचे सतारवादनाचे कार्यक्रम झाले.

पं. नारायणराव व्यास हे त्यांचे शास्त्रीय कंठसंगीतातील गुरू खरे; पण त्यानंतर पं. कुमार गंधर्व हे त्यांचे 'मानसगुरू' ठरले. त्यांच्या गायकीने व विशेषत: त्यांच्या बंदिशींनी ते अत्यंत प्रभावित झाले आणि कुमारांच्याच प्रेरणेने त्यांनी बंदिशनिर्मितीला सुरुवात

केली. त्यांनी पारंपरिक रागांमध्ये व जोडरागांमध्ये, वेगवेगळ्या तालांमध्ये अनेक आकर्षक बंदिशी बांधल्या. हमीर-नंद, हमीर-केदार, नायकी-मल्हार, मारुबसंत यांसारखे काही जोडराग त्यांनी निर्माण केले, तसेच 'प्रतीक्षा', 'आराधना' इ. रागांचीही निर्मिती केली. विलंबित ख्याल, छोटे ख्याल, तराणे, तसेच दादरा, ठुमरी, झूला, भजन अशा उपशास्त्रीय संगीतातील रचनांचाही त्यांत अंतर्भाव आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या बंदिशींचा 'आराधना' हा संग्रह १९९१ साली प्रकाशित केला. आता त्यांच्या बंदिशींचा दुसरा संग्रहही प्रकाशनाच्या मार्गावर आहे. आजच्या आघाडीच्या गायक-गायिकांनी गायलेल्या अभ्यंकरांच्या अनेक उत्तमोत्तम बंदिशी ध्वनिचकत्यांच्या (सीडी) रूपात रसिकांसमोर आल्या आहेत.

त्यांनी गायन व सतार या दोन्ही क्षेत्रांतील 'संगीत अलंकार' ही पदवी संपादन केली. त्यांनीश्री.ना.दा.ठा. महिला विद्यापीठाच्या संगीत विभागात संगीताचे प्राध्यापक म्हणून अनेक वर्षे अध्यापन केले. अनेक सांगीतिक घटनांचे ते साक्षीदार आहेत.

त्यांनी संगीत शिक्षक संघ, मुंबई या संस्थेचे उपाध्यक्ष या नात्याने गेली चाळीसहून अधिक वर्षे संस्थेचा कार्यभार सांभाळलेला आहे. तसेच अनेक गरीब कलाकारांना शासनाकडून मदत मिळवून दिलेली आहे.

– डॉ. कमल अभ्यंकर

## अमान अली खाँ

**गायक**

**१८८८ - ११ नोव्हेंबर १९५३**

उ. अमान अली खाँ भेंडीबाजार घराण्याच्या तीन संस्थापक बंधूंपैकी सर्वांत मोठे उ. छज्जू खाँ यांचे सुपुत्र होत. घरात संगीताचे वातावरण असूनही अमान अली खाँ यांना बालपणी संगीतात रुची नव्हती. त्यामुळे तीनही बंधूंना या गोष्टीचे दु:ख होत असे. परंतु एकदा उ. नजीर



खाँ साहेबांच्या शिष्या अंजनीबाई मालपेकर यांचे गायन अमान अली खाँनी ऐकले आणि त्या गायनाने ते प्रभावित झाले. या संधीचा फायदा घेऊन अंजनीबाईंनी घराण्याच्या उज्ज्वल परंपरेची त्यांना कडक शब्दांत जाणीव करून दिली व घराण्याची परंपरा चालवण्यास उद्युक्त केले. त्यानंतर त्यांचे आपल्या वडिलांकडे व काकांकडे संगीताचे अध्ययन सुरू झाले. जन्मत: तीक्ष्ण बुद्धी, गोड आवाज व अंगभूत लयीची ईश्वरी देणगी आणि तीव्र ग्रहणशक्ती या गुणांमुळे काही वर्षांतच अमान अलींनी घराण्याची गायकी आत्मसात केली.

उ. अमान अली खाँनी त्यांना मिळालेल्या घराण्याच्या परंपरागत गायकीव्यतिरिक्त इतर गायन वैशिष्ट्येही आपल्या गायकीत समाविष्ट केली. संगीतशास्त्र आणि हिंदी साहित्य यांचा अभ्यास केला. विविध स्वरावलींच्या नोटेशन करण्याचाही त्यांनी सराव केला. वडील धृपद उत्तम गात, तसेच त्यांचा ब्रजभाषेचा अभ्यासही दांडगा होता. अमान अली खाँ यांचाही ब्रजभाषेचा अभ्यास होत गेला. कर्नाटक संगीतातील प्रसिद्ध विद्वान कृष्णाप्पा बिडार यांच्याकडे ते कर्नाटक संगीत शिकले. घरातील आध्यात्मिक वातावरणाचाही त्यांच्यावर प्रभाव होता.

भेंडीबाजार गायकीमध्ये त्यांनी आपल्या कल्पकतेने व चिंतन-मनन करून काही सौंदर्यपूर्ण वैशिष्ट्यांची भर घातली. आवाजाचा अतिमोकळा लगाव, अत्यंत विलंबित लयीची गायकी व अतिदीर्घ मींड या गोष्टींमध्ये त्यांनी बदल केला. स्वाभाविक मृदू स्वरलगाव, मध्य लयीची गायकी व संयमित मींड या गोष्टींचा समावेश केला. मध्य लयीतील सुरतालाचे वेगळेच परिमाण या गायकीला लाभले. कर्नाटक संगीतातील 'सरगम'चा प्रस्तुतीकरणात बदल करून त्यांनी ती आपल्या गायनात आणली. त्याचप्रमाणे त्यांनी कर्नाटक संगीतातील

हंसध्वनी, प्रतापवराळी, नागस्वरावली इत्यादी रागांमध्ये उत्तमोत्तम बंदिशीही बांधल्या.

अमान अली खाँ हे उत्तम रचनाकारही होते. वडिलांची काव्यप्रतिभा वारशाने त्यांच्यातही आली होती. वल्लभ संप्रदायाशी त्यांचा संपर्क होता. आपल्या वडिलांचे 'अमर' हे उपनाव घेऊन त्यांनी श्रीगणेश, शंकर, देवी सरस्वती, श्रीकृष्ण इत्यादी देवतांच्या लीलांचे वर्णन, तसेच 'तत्त्वज्ञान' या विषयावर साहित्यिक मूल्ये जपणाऱ्या बंदिशींची रचना केली. काव्यगुण व नादमय व्यंजने, शब्द असणाऱ्या व उच्च साहित्यिक गुण असलेल्या विविध विषयांवरील अनेक बंदिशी त्यांनी बांधल्या.

'जय माता विलंब तज' व 'लागी लगन सखी' (हंसध्वनी), 'सुगम रूप सलोने' व 'जागे एरी लालन' (यमन), 'मनवारन रीझन' (खेम), 'मध मदन बावरी' (पटबिहाग), 'अत सोहत चंद्रवदन' (दुर्गा), 'पती देवन महादेव' (झिंझोटी), 'जय श्रीशंकरसुत गणेश' (गुणक्री), 'जमुना जमुना कित' (रागेश्री), 'अंगना रसिक सहेलन' (पंचम), 'ए मोरवा करही पुकार' (शुद्धसारंग), 'बन पंछी डोलन' (गौरी), 'बनरा बन आयो' (जोग) या त्यांच्या काही प्रचलित, लोकप्रिय बंदिशी होत. खाँ साहेबांचा तालाचा व्यासंग दांडगा होता. साडेसात मात्रांपासून ते ५५ मात्रांपर्यंत तालांची रचना करून अशा सर्व तालांत त्यांनी रचना केल्या.

खंडमेर पद्धतीची सौंदर्यपूर्ण बढत, स्वरांचे गुंजन, बीन अंगाची मींडयुक्त आलापी, इ. भेंडीबाजार गायकीच्या मूळ वैशिष्ट्यांबरोबरच, कर्नाटक ढंगाच्या लयदार सरगमचा कौशल्यपूर्ण उपयोग, सूत, मींड उचक-समेट यांसारख्या क्रिया व भावपूर्ण शब्दोच्चार ही त्यांच्या गायकीची ठळक वैशिष्ट्ये होत. प्रत्येक वेळी बंदिशीचा मूळ मुखडा तसाच न म्हणता आलापानुसार वेगवेगळ्या प्रकारे मुखडा पेश करून समेवर आकर्षकपणे येणे (मुखविलास) हेही त्यांच्या गायकीचे खास वैशिष्ट्य होते. त्यांना लेखनाची आवड होती. खाँसाहेबांनी संगीतशास्त्रावर उर्दू भाषेत एक मोठा ग्रंथ लिहिला होता. दुर्दैवाने घराला लागलेल्या आगीत तो ग्रंथ नष्ट झाला.

खाँसाहेबांनी उदारहस्ते विद्यादान करून घराण्याची गायकी पुढील पिढीला सुपूर्त केली. त्यांच्या प्रमुख शिष्यांमध्ये उ. अमीर खाँ, पं. शिवकुमार शुक्ल, डॉ. वसंतराव देशपांडे, पं. त्र्यंबकराव जानोरीकर, मास्टर नवरंग, पांडुरंग आंबेरकर, रमेश नाडकर्णी आणि उस्ताद मोहम्मद हुसेन खाँ यांचा समावेश आहे. सुप्रसिद्ध गायिका लता मंगेशकरांनाही खाँ साहेबांकडून गायनाची तालीम मिळाली आहे. भेंडीबाजार गायकीचा प्रचार-प्रसार आणि सौंदर्यपूर्ण सादरीकरणात अमान अली खाँसाहेबांचा प्रमुख वाटा आहे.

— शरद करमरकर

## अमीर हुसेन खाँ

***हुसेन अमीर अहमद बक्श***

**तबलावादक**



**१८९९ - ५ जानेवारी १९६९**

उ. अमीर हुसेन खाँ यांचा जन्म उत्तर प्रदेशातील मेरठ जिल्ह्यातील बनखंडा या गावात झाला. त्यांचे वडील उ. अहमद बक्श हे नाणावलेले सारंगीवादक होते. हैदराबादच्या निझामाने त्यांची दरबारवादक म्हणून नियुक्ती केल्यामुळे हे कुटुंब हैदराबाद येथे स्थलांतरित झाले.

वडिलांनी छोट्या अमीरला पाचव्या वर्षापासून सारंगीचे पाठ द्यावयास सुरुवात केली; परंतु त्यांचा ओढा तबल्याकडे आहे हे जाणवल्यामुळे त्यांनी त्याचे तबल्याचे प्राथमिक शिक्षण सुरू केले. उस्ताद उ. अहमद बक्शांचे मेहुणे उ. मुनीर खाँ हे एक विद्वान तबलावादक होते. एकदा ते आपल्या बहिणीकडे हैदराबादला आले असता, त्यांनी छोट्या अमीरचा लयदार ठेका ऐकला व त्याला तबल्याचे शास्त्रशुद्ध शिक्षण देण्यास सुरुवात

केली. त्यांच्या सहा महिन्यांच्या मुक्कामात त्यांनी अमीरला बरेचसे शिकवले व भरपूर रियाज करवून घेतला; मात्र हे शिक्षण दोन ते तीन महिनेच होते.

अमीर हुसेन खाँ वयाच्या अठराव्या वर्षी १९१८ साली मुंबईला आले. उ. मुनीर खाँचे वास्तव्य त्या वेळी मुंबईत होते. त्यांनी १९१७ ते १९३७ म्हणजेच उ. मुनीर खाँ यांच्या मृत्यूपर्यंत सुमारे वीस वर्षे गुरुगृही राहून विद्याग्रहण व रियाज केला. उस्तादांच्या सांगण्यावरून अमीर हुसेन खाँ यांनी १९३५ साली मध्यप्रदेशातील रायगडचे महाराज राजा चक्रधर सिंह यांच्या दरबारात आठवडाभर रोज तबलावादन केले.

उस्तादांच्या मृत्यूनंतर अमीर हुसेन खाँ हैदराबादला गेले. ते १९४५ साली एका कार्यक्रमासाठी मुंबईला आले. त्यांच्या वादनाने भारावून जाऊन पंढरीनाथ नागेशकर, गुलाम रसूल, शरीफ अहमद व जमाल खाँ यांनी त्यांचे गंडाबंध शिष्यत्व पत्करून त्यांना मुंबईत आग्रहाने ठेवून घेतले. तेव्हापासून त्यांच्या मृत्यूपर्यंत सुमारे चोवीस वर्षे त्यांचे वास्तव्य मुंबईतच होते.

अभिजात खानदानी तबल्याचा, विशेषत: एकल तबलावादनाचा प्रचार करण्याचा उ. मुनीर खाँ यांचा वारसा त्यांनी पुढे चालवला. अधूनमधून ते आपल्या कुटुंबीयांना भेटण्यासाठी हैदराबादेस जात. त्या वेळी ते व त्यांचे पीरभाई उ. अहमदजान थिरकवा, फरूखाबादचे सुप्रसिद्ध तबलानवाझ मियाँ चूडियावाले इमाम बक्श यांचे पुत्र उ. हैदर बक्श खाँ यांच्याकडे बुजुर्गांच्या दुर्मीळ बंदिशी शिकण्यास जात.

उ. मुनीर खाँ यांचे पुतणे उ. गुलाम हुसेन हेसुद्धा हैदराबाद येथे स्थायिक झाले होते. तेही उ. मुनीर खाँ यांचे शागिर्द होते. परंपरेनुसार घराण्याच्या खलिफापदाचा मान त्यांचा होता. परंतु उ. अमीर हुसेन खाँ यांची अलौकिक प्रतिभा, विद्वत्ता, रियाज व वादनातील कर्णमाधुर्य या गुणांमुळे उ. मुनीर खाँ यांनी त्यांनाच खलिफापद बहाल केले.

उ. अमीर हुसेन खाँ यांनी जुन्या पारंपरिक रचनांमध्ये स्वरचित असंख्य रचनांची भर घातली. या रचना परंपरेला अनुसरून बांधलेल्या असल्या तरीही अत्यंत सुंदर व चमत्कृतिपूर्ण आहेत.

उ. अमीर हुसेन खाँ यांचा उर्दू व फारसी या भाषांचा चांगला अभ्यास होता. त्यामुळे त्यांनी अत्यंत जुन्या संगीतविषयक ग्रंथांचा अभ्यास केला होता. तबल्याची भाषा, व्याकरण, तबल्यातील संज्ञांच्या व्याख्या वगैरे गोष्टींवर त्यांनी खूप विचार केला होता.

ते कुरेशी ज्ञातीचे चौधरी होते. ते अतिशय निष्पक्षपणे न्यायनिवाडा करीत असत. जात-धर्म-लिंग हा भेदभाव न ठेवता त्यांनी केलेली मानवतेची सेवा त्यांच्या प्रसिद्धिपराङ्मुख स्वभावामुळे जगापुढे आली नाही.

त्यांनी शेकडो शिष्य तयार केले. त्यांच्या प्रथितयश शिष्यांमध्ये पंढरीनाथ नागेशकर, गुलाम रसूल, जमाल खाँ, सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक गुलाम मुहंमद, निखिल घोष, आत्माराम थत्ते, फकीर हुसेन, पांडुरंग साळुंके, माधव पवार, सदाशिव पवार, अरविंद मुळगावकर यांचा समावेश आहे.

– अरविंद मुळगावकर

## अमेम्बल, दिनकर

***डी. अमेल***

**बासरी वादक, संगीतकार**

**२४ सप्टेंबर १९०९ – फेब्रुवारी १९९०**



दिनकर अमेम्बल यांचा जन्म गुवाहटी येथे दक्षिण कर्नाटक येथील चित्रापूर सारस्वत कुटुंबात झाला. अमेम्बल कुटुंब हे संगीत व कलाप्रेमी कुटुंब म्हणून ओळखले जाई. अमेम्बल यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण मंगलोरच्या गणपती विद्यालयामध्ये झाले. त्यानंतर ते कुटुंबासोबत मुंबईत आले. जात्याच गोड आवाज असलेल्या अमेम्बलांनी रीतसर संगीत शिक्षण घेतले

नव्हते. ते स्वशिक्षित गायक होते. पुणे येथील फर्गसन महाविद्यालयामध्ये बी.एस्सी.च्या शेवटच्या वर्षाला असतानाच संगीताच्या जबरदस्त वेडापायी शिक्षण सोडून ते मुंबईला आले व १९२७ साली त्यांनी इंडियन स्टेट्स ब्रॉडकास्टिंग कंपनीमध्ये गायक आणि वादक म्हणून, सुरुवातीला नैमित्तिक कलाकार म्हणून व नंतर पगारी कलावंत म्हणून नोकरी पत्करली. पुढे १९३६ साली इंडियन ब्रॉडकास्टिंग कंपनीचे 'ऑल इंडिया रेडिओ' हे नाव सर्वमान्य झाले. अमेम्बलांना या ऑल इंडिया रेडिओमध्ये समाविष्ट करून भारतीय संगीताचे कार्यक्रम अधिकारी म्हणून नेमण्यात आले. १९६७ साली ते आकाशवाणीवरून निवृत्त झाले.

विद्यालयीन शिक्षण घेत असतानाच अमेम्बल गायक म्हणून लोकप्रिय होते. अतिशय गोड आणि लवचीक आवाजाची त्यांना देणगी होती. भक्तिगीते गाण्याकडे त्यांचा अधिक कल होता. मास्टर कृष्णराव फुलंब्रीकर हे त्यांचे आदर्श होते व त्यांच्या शैलीचा अमेम्बलांवर प्रभाव होता. गायनाबरोबरच हार्मोनिअम या वाद्यावरही त्यांचे प्रभुत्व होते. ए. सुंदर राव या त्यांच्या थोरल्या बंधूंच्या हार्मोनिअमवादनाने प्रभावित होऊन त्यांनी हार्मोनिअम वाजवायला सुरुवात केली. स्वातंत्र्यानंतर हार्मोनिअमवर आकाशवाणीने बंदी घातली, तेव्हा अमेम्बलांनी बासरी व व्हायोलिन शिकण्यास सुरुवात केली. पुढे बासरीवादनावरच आपले पूर्ण लक्ष केंद्रित करून त्यात त्यांनी आश्चर्यकारक प्रावीण्य मिळविले.

आकाशवाणी मुंबई केंद्रावरील कार्य हे अमेम्बलांचे खरे योगदान होते. त्यांनी १९३५ साली 'व्हीयूबी इंडियन ऑर्केस्ट्रा' या वाद्यवृंदाची सुरुवात केली. 'डी. अमेल' हे टोपणनाव घेऊन भारतीय रागदारी संगीतातील मध्यवर्ती कल्पना (थीम्स) घेऊन त्यांनी अनेक रचना करून त्या प्रसारित केल्या. या रचनांचे दिग्दर्शक आणि मार्गदर्शकही तेच असायचे. पुढे या वाद्यवृंदाचे 'बम्बई (मुंबई) आकाशवाणी वाद्यवृंद' म्हणून नामकरण करण्यात आले.

या वाद्यवृंदात अमेम्बलांचा बासरीवादक म्हणून सहभाग असे व संचालनदेखील तेच करीत. तंतुवाद्य, सुषिरवाद्य, तसेच घनवाद्यांचे वेगवेगळे प्रकार या वाद्यवृंदात असत, शिवाय क्लॅरिओनेट व दाक्षिणात्य संगीतातील गोटुवाद्यम्‌चाही यांत समावेश असे. श्रीधर पार्सेकर, मंगेशराव कामू, इब्राहिम, अल्लारखा यांसारख्या दिग्गज वादकांचाही या वाद्यवृंदात सहभाग असायचा.

भारतीय रागसंगीतातील अनेक प्रचलित व अप्रचलित राग, अकरा रागांची एक मालिका, कानडा, मल्हार, तोडी, सारंग यांसारख्या रागांचे काही अप्रचलित प्रकार, हिंडोल–बहारसारखे जोड-राग, यांबरोबरच ठुमरी, नाट्यसंगीत, गझल, नगमा असे विविध संगीत प्रकार या वाद्यवृंदाद्वारे त्यांनी प्रसारित केले. एच.एम.व्हीने पिलू व नायकी कानडा या दोन वाद्यवृंद रचनांच्या ध्वनिमुद्रिकाही काढल्या होत्या. नायकी-कानडाची ही रचना पुढे 'वनिता मंडळा'चे बोधसंगीत म्हणूनही रूढ झाली.

'सप्ताह गीत' हा कार्यक्रमही त्या काळी लोकप्रिय झाला होता. दिनकर अमेम्बलांना संगीताच्या जाणकारी- बरोबरच साहित्याची व काव्याचीही चांगली जाण होती. बा.सी. मर्ढेकर, कृ.द. दीक्षित यांसारखी मंडळी त्या वेळी त्यांच्याबरोबर काम करीत. मराठीतील नामवंत कवींच्या गीतांना अमेम्बलांनी चाली लावल्या. दर आठवड्याला एक गीत सादर होत असे. कुसुमाग्रज, कवी मायदेव, अनिल, पु.शि. रेगे, संजीवनी मराठे यांच्या गीतांना त्यांनी अतिशय सुंदर चाली दिल्या होत्या. छोटा गंधर्व, मोहनतारा अजिंक्य, सरस्वती राणे, पुरुषोत्तम सोळांकुरकर, सुरेश हळदणकर यांसारख्या गायक-गायिकांनी या रचना गायल्या होत्या.' नवलाख तळपती दीप विजेचे जेथ', 'स्वप्नातून आलीस तुडवीत हिमलहरी', 'झोक्यांना घेऊ या बाई, झोक्यांना देऊ या' अशा अनेक काव्यदृष्ट्या सुंदर रचनांना अमेम्बलांनी संगीत दिले होते. 'भावगीत म्हणजे कवितेचे संगीतमय इंटरप्रिटेशन', असे ते मानीत.

याशिवाय ‘बदकांचे गुपित’, ‘कर्ण’ या कवी मर्ढेकरांच्या संगीतिकांनाही अमेम्बलांनी संगीत दिले होते. अनेक ‘सिग्नेचर ट्यून्स’ त्यांनी तयार केल्या, यात वॉल्टर कॉफमन या त्या वेळच्या पाश्चात्त्य संगीत विभाग प्रमुखाचाही सहभाग होता. या दोघांनी मिळूनही अनेक सांगीतिक रचना सादर केल्या.

आकाशवाणीवर हार्मोनिअम वादनावर बंदी असल्यामुळे अमेम्बल बासरीकडे वळले. ते पितळेची बासरी उभी वाजवीत. सर्वसाधारणपणे उत्तर हिंदुस्थानी रागदारी संगीतात आडव्या बासरीचाच वापर करतात; पण त्यांनी या उभ्या बासरीतून रागदारी संगीत सादरीकरणातील अनेक घटक युक्तीने वापरून रागसंगीत फुलवले. प्रसिद्ध बासरीवादक पं. पन्नालाल घोषांबरोबर अमेम्बलांची मुंबई केंद्रात जुगलबंदीही झाली होती.

‘अमेली तोडी’ व ‘अमलेश्वरी’ या दोन रागांची निर्मितीही अमेम्बल यांनी केली. बी.आर. देवधर त्यांच्या अमेली तोडीने एवढे प्रभावित झाले होते, की त्यांनी या रागात विलंबित आणि द्रुतमध्ये बंदिशीही बांधल्या.

जवळजवळ ३४ वर्षे त्यांनी आकाशवाणीवर काम केले. शेवटची काही वर्षे ते प्रशासकीय विभागात होते. अतिशय मृदू स्वभावाच्या व मितभाषी डी. अमेलांना १९९० साली कोलकात्याच्या संगीत रिसर्च अकादमीचा पुरस्कार लाभला. सूफी संत आणि गुजराती व उर्दू रंगभूमीवरील कलाकार अश्रफ खान हे त्यांचे श्रद्धास्थान होते. आपली शेवटची वर्षे त्यांनी ध्यानधारणा, वाचन यांतही व्यतीत केली . कालांतराने त्यांच्या कानामध्येही दोष निर्माण झाला होता, पुढे वाढून ते कानांनी अधू झाले. या सर्जनशील कलावंताचे वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी मुंबई येथे निधन झाले.

भारतीय रागदारी संगीताचे सुलभ व श्रवणीय रूप प्रसारित करून जनसामान्य श्रोत्यांची अभिरुची वाढवण्यात आकाशवाणीचा जेवढा सहभाग आहे तेवढाच, नव्हे त्यातूनही अधिक वाटा दिनकर अमेम्बल ऊर्फ डी. अमेल यांचा आहे.

— माधव इमारते

## अल्लादिया खाँ

**गायक**

**११ ऑगस्ट १८८५ – १६ मार्च १९४६**



उ. अल्लादिया खाँ साहेबांचा जन्म उनियारा येथे एका नामवंत कलाकार कुटुंबात झाला. नाथ विश्वंभर हे त्यांच्या घराण्याचे मूळ पुरुष होत. ते पूजाअर्चा, मंत्रपठण आदी रागरागिण्यांमध्येच करत असत. तानसेनचे गुरू हरिदास स्वामी हेसुद्धा याच वंशातील होते. काळाच्या ओघात पुढे काही कारणास्तव खाँ साहेबांचे पूर्वज मुसलमान झाले. खाँ साहेबांचे वडील ख्वाजा अहमद खाँ हे उनियारा येथे दरबारी गायक होते. त्यांची पहिली काही अपत्ये अल्पवयातच मृत्यू पावली. अवलियांच्या कृपेने खाँ साहेबांचा जन्म झाला म्हणून ख्वाजा अहमदखाँनी मुलाचे नाव गुलाम अहमद असे ठेवले; परंतु ‘अल्ला का दिया’ म्हणून त्यांचे नाव ‘अल्लादिया’ असे झाले व पुढे याच नावाने ते प्रसिद्ध झाले.

अल्लादिया खाँसाहेबांना पैतृक घराण्याच्या बरोबरीने मातुल घराण्याकडूनही संगीताचा वारसा मिळाला. मातुल घराण्यातील पूर्वज गोबरहार वाणीचे गायक होते. दिल्ली व इतर दरबारांत मानसन्मान मिळवून ते उनियारा येथे स्थायिक झाले. काका उ. जहांगीर खाँ हे उत्तम गाणारे व उ. ख्वाजा अहमद खाँ यांचे शिष्य, त्यामुळे खाँसाहेबांना संगीताचे शिक्षण घरीच मिळाले. त्यांच्या वयाच्या पंधराव्या वर्षी वडिलांचा मृत्यू झाला. त्या वेळी ख्वाजा अहमद खाँ टोक दरबारात दरबारी गायक होते. पाठच्या दोन बहिणी, एक भाऊ उ. हैदर खाँ, आई व इतर नातेवाईक यांची जबाबदारी खाँसाहेबांवर येऊन पडली.

खाँसाहेबांना गाण्यापेक्षा अरबी, फारसी भाषा शिकण्याचा छंद जडला होता. तथापि, घरची परिस्थिती लक्षात घेऊन त्यांनी घरच्याच कलेचा अभ्यास

करावयाचा असे ठरविले व काका उ. जहांगीर खाँ यांच्याकडे त्यांची संगीताची तालीम सुरू झाली.

गुरूवरील अविचल निष्ठा, अपार कष्ट करण्याची वृत्ती, सौंदर्याचा वेध घेणारी प्रज्ञा, गुरूंची तालीम व आजूबाजूचे वातावरण यांमुळे खाँसाहेब एक तयार मैफली कलाकार झाले. काका उ. जहांगीर खाँ त्यांना आपल्या गायकीचा वारसदार समजत.

उ. जहांगीर खाँसाहेबांकडून त्यांना एक तप तालीम मिळाली. सुरुवातीला पाच ते सहा वर्षे धृपद-धमाराची तालीम मिळाली. खाँसाहेबांनी हजारो धृपद व धमार कंठगत केल्यानंतर ख्यालगायन शिकवायला सुरुवात केली. उ. जहांगीर खाँ यांच्या पाठीमागे तंबोऱ्यावर साथ करणे हा अल्लादिया खाँचा नित्याचा कार्यक्रम झाला. रामपूरच्या नवाबांचे बंधू कल्लन खाँ हे जयपूरमध्ये असताना प्रसिद्ध गवय्ये उ. मुबारक अली खाँ कल्लन खाँच्या भेटीसाठी येत असत. अल्लादिया खाँसाहेबांच्यावर त्यांचा अतिशय प्रभाव पडला. जयपूर येथेच त्यांनी तानरस खाँ, हद्दू खाँ व मुबारक अली खाँ यांचा चुरशीचा सामना ऐकला होता.

काका उ. छम्मन खाँ यांच्या मुलीशी विवाह करून त्यांनी जोधपुरात वैवाहिक जीवनास प्रारंभ केला. १८८६ साली पहिले चिरंजीव नसरुद्दीन ऊर्फ बडेजी, १८८८ मध्ये मधले चिरंजीव बद्रुद्दिन ऊर्फ मंजी खाँ व १८९० मध्ये धाकटे चिरंजीव शमशुद्दीन ऊर्फ भुर्जी खाँ यांचा जन्म झाला.

खाँसाहेब प्रथितयश गायक म्हणून नावलौकिक मिळवत असतानाच एक दुर्दैवी घटना घडली. आमलेटा संस्थानात खाँसाहेबांच्या गळ्यावर अतिरिक्त ताण पडला. त्यांचा आवाज चिप्प बसला व गाणेही अशक्य झाले. पुढे जोधपूर येथे आल्यावर निकराच्या प्रयत्नाने दोन वर्षांनी त्यांचा आवाज सुटला, तथापि त्यातली ऊर्जा नाहीशी झाली होती. पण तीव्र बुद्धीचे वरदान असलेल्या खाँसाहेबांनी गोड आवाजाची गायकी बाजूला सारून नव्या वळणाची बुद्धिप्रधान, पेचदार गायकी निर्माण केली. मींड, गमकयुक्त गायकी, तीही शुद्ध आकारात व संथ लयीत असल्यामुळे त्या गायकीला भारदस्तपणा प्राप्त झाला. त्यांच्या रुंद, कमवलेल्या आवाजाला ही गायकी अतिशय अनुकूल होती. त्यांची 'हिक्के की तान' ही त्यांच्या रियाजाचा परिपाक होती. खाँसाहेबांना उर्दू, ब्रज भाषा उत्तम अवगत असल्यामुळे बोलांचे उच्चार ही त्यांची स्वत:ची खासियत होती. तान हा तर त्यांच्या गायनाचा उत्कृष्ट नमुना होता. या तानेवर मुबारक अली खाँसाहेबांचा विलक्षण प्रभाव जाणवत असे.

खाँसाहेब अतिशय धोरणी व बुद्धिमान होते. त्यामुळे आपल्या आवाजाला साजेशी गायकी, तीही इतरांपेक्षा वेगळी अशी असावयाला हवी याचा विचार करून रसिकांना स्तिमित करणारी गायकी निर्माण करून त्यांनी खरे तर क्रांतीच केली. नंतर खाँसाहेब इंदूर, अहमदाबाद व बडोदा येथे आले. बडोदे संस्थानात त्यांना दरबारगायक होण्याची इच्छा होती. त्यांच्या गायकीवर राजेसाहेब खूशही होते. तथापि उ. मौलाबक्ष यांच्या कारवायांमुळे ते तेथून बाहेर पडले व मुंबईला आले. त्या वेळी मुंबईत भेंडीबाजार घराण्याचे उ. नजीर खाँ, उ. छज्जू खाँ व उ. खादिम हुसेन खाँ ही त्रयी आपला प्रभाव राखून होती. उ. अल्लादिया खाँना त्यांचाही विरोध सहन करावा लागला.

पुढे १८९५ साली श्रीमंत छत्रपती शाहू महाराजांनी त्यांना कोल्हापूरला दरबारी गवई म्हणून आणले. ते कोल्हापूरचेच झाले आणि महाराष्ट्र त्यांची खऱ्या अर्थाने कर्मभूमी झाली.

प्रचंड मेहनतीने कमावलेल्या दमसासयुक्त गायकीचे दर्शन त्यांच्या विलंबित लयीत ठसठशीतपणे जाणवे. विलंबित लय व आकारयुक्त आलापिका यांमुळे आलेला भारदस्तपणा किंवा बोजदारपणा हा त्यांच्या गायकीचा प्राण ठरला. या दोन बाबींमुळे त्यांच्या गायनात अतूटता आली. बलपेचाची तान हा तर खाँसाहेबांच्या गायकीचा प्राण होता.

स्वत:चे वेगळेपण सिद्ध करण्यासाठी खाँसाहेबांनी झुमरा, तिलवाडा या तालांऐवजी विलंबित त्रिताल,

आडाचौताल, झपताल, रूपक हे ताल कलाविष्कारासाठी निवडले. त्याच बरोबरीने प्रचलित रागांपेक्षा अनवट व मिश्रराग खाँसाहेबांनी स्वसामर्थ्यावर लोकप्रिय केले. सावनी, नट, खोकर, बिहागडा, काफी कानडा, तोडी व बहारचे विविध प्रकार, ललिता गौरी यांसारखे जोडराग, त्रिवेणी, टंकेश्री, लंकेश्री असे अनोखे राग त्यांनी प्रचारात आणून लोकप्रिय केले.

जोडराग गात असताना त्या रागांचा सांधा ते असा बेमालूमपणे जोडत असत, की दोन्ही राग एकजीव होत असत. आलाप व तानेमध्येही हा एकजिनसीपणा दिसत असे. 'डागुरी'सारख्या काही रागांची निर्मिती त्यांनी केली. 'अहमदपिया' या मुद्रेने त्यांनी अनेक बंदिशी रचल्या.

जयपूर, जोधपूर, बडोदा, अहमदाबाद, इंदूर, कलकत्ता, नेपाळ, आमलेटा, महाराष्ट्र इत्यादी ठिकाणी अनेक मैफली करून खाँसाहेबांनी रसिकांना मंत्रमुग्ध करून आपली गायकी प्रस्थापित केली. याच गायकीला कोल्हापूर गायकी (कोल्हापूर घराणे) असेही म्हटले जाते. कारण खाँसाहेबांची करवीर ही कर्मभूमी ठरली. श्रीमंत छत्रपती शाहू महाराज असेपर्यंत (१९२२ सालापर्यंत) ते तेथेच राहिले. नंतर ते मुंबईला स्थायिक झाले. त्यांची शिष्यपरंपराही मोठी आहे.

तानीबाई कागलकर, आग्रा व ग्वाल्हेर घराण्यांची तालीम घेतलेले पं. भास्करबुवा बखले, केसरबाई केरकर, मोगूबाई कुर्डीकर, गोविंदबुवा शाळीग्राम, गुलूभाई जसदनवाला, सुशीलाराणी पटेल, वामनराव सडोलीकर, शंकरराव सरनाईक, लीलाताई शिरगावकर, निवृत्तीबुवा सरनाईक यांसारख्या अनेक शिष्यवरांनी त्यांची गायकी त्यांच्या हयातीतच लोकप्रिय केली. खाँसाहेबांची ही गायकी महाराष्ट्रात रुजली व तिचा प्रभाव आजही जनमानसावर आहे.

स्वत:च्या तपश्चर्येने ते 'संगीतमहर्षी' या पदाला पोहोचले, तर बॅ. जयकरांनी त्यांना 'संगीतातील गौरीशंकर' या उपाधीने गौरविले. खाँसाहेबांच्या मुळात उर्दूमध्ये असलेल्या अप्रकाशित आत्मचरित्राचा इंग्रजी अनुवाद 'माय लाइफ' या नावाने २००० साली प्रकाशित झाला. त्यांच्या स्मृतिनिमित्त चेंबूर येथे दरवर्षी संगीत महोत्सव आयोजित केला जातो.

— डॉ. शुभदा वायंगणकर

**संदर्भ:**

*१. टेंबे, गोविंदराव; 'खाँसाहेब अल्लादिया खाँ यांचे चरित्र'.*

## अल्लारखाँ

**तबलावादक**

**१९१९ - ३ फेब्रुवारी २०००**



उ. अल्लारखाँ यांचा जन्म जम्मू प्रदेशातील फगवाल नामक छोट्या खेड्यात झाला. आपल्या सात भावंडांत ज्येष्ठ असणाऱ्या उ. अल्लारखाँ यांचे व्यक्तिमत्त्व बालपणापासूनच वेगळे होते. लहानपणी ते प्रवासी संगीत नाटक कंपन्यांचे प्रयोग बघत आणि त्यांत वाजणाऱ्या तबल्यात रमत असत. वयाच्या अकराव्या वर्षी ते लाहोरला आले. तिथे पंजाब घराण्याचे खलिफा उ. मियाँ कादरबक्ष यांच्याकडून त्यांनी तबल्यातील पंजाब घराण्याचे रीतसर शिक्षण घेतले.

लवकरच उ. अल्लारखाँ उत्तम तबलावादक म्हणून नावाजले जाऊ लागले आणि त्यांना लाहोर नभोवाणी केंद्रावर तबला कलाकार म्हणून नोकरी मिळाली. तिथून त्यांची दिल्लीला बदली झाली आणि दिल्लीहून १९४५ च्या आसपास ते मुंबईला आले. तेव्हापासून त्यांच्या मृत्यूपर्यंत त्यांची कर्मभूमी ही मुंबईच राहिली.

उ. अल्लारखाँ यांनी पतियाळा घराण्याचे श्रेष्ठ गायक उ. आशिक अली खाँ यांच्याकडून संगीताचेही सखोल शिक्षण घेतले होते. ते गायन आणि तबलावादन या दोन्ही कला पेश करीत असत. त्यांच्या कल्पक स्वरविलासाचा सुरुवातीला त्यांच्यावर अधिक अंमल

होता असे जाणवते. ते हिंदी चित्रपटसृष्टीत संगीत दिग्दर्शक म्हणूनही यशस्वी झाले. त्यांनी संगीतबद्ध केलेल्या पंचवीसेक चित्रपटांतील ‘माँ-बाप’, ‘घर की लाज’, ‘सबक’, ‘सती अनसूया’, ‘खानदान’ आदी चित्रपटांनी रौप्यमहोत्सवापर्यंत मजल मारली. संगीत दिग्दर्शन कार्यात ते जरी यशस्वी होत होते, तरी त्यांचे मन तबलावादनात गुंतले होते आणि त्यांनी तबलावादनावर लक्ष केंद्रित करायचे ठरविले.

तबल्यावरील कठोर रियाज, प्रतिभा, नवनिर्मिती, गायनकलेचे ज्ञान या गुणांमुळे आपल्या समकालीन ज्येष्ठ तबलावादकांमध्ये चतुरस्र तबलावादक म्हणून त्यांनी तरुणपणीच एक स्वतंत्र स्थान निर्माण केले. कंठसंगीताची साथ, वाद्यसंगीताची साथ, कथक नृत्याची साथ आणि एकल तबलावादन या चारही शाखांमध्ये उ. अल्लारखाँ अत्यंत निपुणपणे आणि समर्थपणे आपली कला सादर करीत असत. त्यामुळे स्वदेशात आणि परदेशांत त्यांना दिगंत कीर्ती प्राप्त झाली.

उ. अल्लारखाँ यांचा बहुतांश तबला हा स्वनिर्मित होता. त्यांची पेशकार संकल्पना संपूर्णपणे स्वनिर्मित होती. ‘पेशकार’ शब्दाची फोड ते ‘पेंच काटना’ अशीही करत असत आणि म्हणून त्यांचा पेशकार हा पेच निर्माण करणारा आणि पेच काटणारा असा होत असे.

केवळ त्रितालच नव्हे, तर अन्य तालांतही आकर्षक रूपसौष्ठवाचे कायदे त्यांनी बांधले आहेत, जे आजचे तबल्याचे विद्यार्थीसुद्धा वाजवतात.

उ. अल्लारखाँ यांनी अत्यंत आकर्षक अशा लयबंधांचे अनेक छंद (चलने) बांधले, ज्या छंदांची नंतर ते रव (रेले) करीत असत. संपूर्ण संगीतात ‘तिहाई’ हा प्रकार प्रस्तुत होतच असतो. परंतु उ. अल्लारखाँ निर्मित ‘तिहाई’ हा एक नवनिर्मितीचा अनोखा यशस्वी प्रयोग होता. विविध शब्दांच्या, आकारांच्या आणि विशेष म्हणजे विविध विरामकालांच्या आकर्षक तिहाईंची निर्मिती, ते प्रत्येक तालात करीत असत. गत तुकड्यांमध्येही त्यांची निर्मिती ही बहुमोल अशीच होती. दुपल्ली, त्रिपल्ली, फर्माइशी चक्रदार आणि कमाली चक्रदार या बंदिश प्रकारांमध्ये त्यांनी अनेक सुंदर बंदिशी, अनेक तालांमध्ये बांधल्या.

उ. अल्लारखाँ यांनी पं. रविशंकरजींना जवळजवळ तीस वर्षे साथसंगत केली. अल्लारखाँ यांनी अत्यंत परिश्रमाने एक अनोखे, आकर्षक आणि अद्‌भुत असे संगीताचे नवे तंत्र निर्माण केले. वाद्यसंगीताच्या साथसंगतीचे हे तंत्र तबलावादन कलेतील उ. अल्लारखाँ यांचे एक महत्त्वपूर्ण योगदानच म्हणता येईल.

पं. रविशंकर आणि कधीकधी सरोदवादक उ. अली अकबर खाँ यांच्याबरोबर उ. अल्लारखाँ संगत करीत असताना, ते आपल्या वादनात ‘सवाल-जवाब’ पद्धतीचे प्रस्तुतीकरण करीत असत. हा ‘सवाल-जवाब’ खूपच उत्स्फूर्त, कलापूर्ण आणि चैतन्यकारक असा होत असल्यामुळे तो अत्यंत लोकप्रिय तर झालाच होता; पण त्या पद्धतीचे अनुकरण आज सर्वत्र होत असलेले पाहावयास मिळते. पुढे आपले पुत्र आणि शिष्य उ. झाकीर हुसेन यांच्याबरोबर त्यांनी युगल तबलावादनाचे (जुगलबंदी) असंख्य कार्यक्रम जगभरात सादर करून अमर्याद लोकप्रियता प्राप्त केली.

लयीचे सूक्ष्म विभाजन करणे आणि त्यामध्ये शब्दबंधाचे प्रयोग करणे यात त्यांचे मन रमत असे. सरळसोट लयीमध्ये वादन करण्यात त्यांना विशेष रस नव्हता. लय व लयकारीची विविध रूपे आणि अनोख्या लयीत बांधल्या जात असलेल्या विविध बंदिशी यांचा ते आस्वाद घेत असत. त्यावर अविरतपणे मनन व चिंतन करीत असत आणि या प्रक्रियेत त्यांची कायम तंद्री लागलेली असे. यातूनच त्यांच्याकडून नवनवीन बंदिशी निर्माण होत गेल्या. नवनवे चलनात्मक छंद निर्माण होत गेले. त्यांची ही निर्मितीची क्रिया त्यांच्या अखेरच्या क्षणापर्यंत चालूच राहिली होती.

उ. अल्लारखाँ यांच्या विचारांवर त्यांचे गुरू उ. मियाँ कादरबक्ष यांचा विशेष पगडा असणे स्वाभाविकच होते. पण असेही म्हणतात की त्यांच्यावर दिल्ली घराण्याचे उ. नथ्थू खाँसाहेब यांचाही प्रभाव होता.

वादक आणि रचनाकार म्हणून ते जेवढे मोठे होते, तितकेच ते गुरू म्हणूनही मोठे होते. आपल्या मुलांना आणि शिष्यांना त्यांनी दुर्मीळ अशी पंजाब घराण्याची शास्त्रोक्त तालीम गुरू-शिष्य पद्धतीने दिली. आपल्या विद्येचा लाभ तबल्याच्या सर्व उत्सुक विद्यार्थ्यांना व्हावा म्हणून त्यांनी १९८५ साली 'उ. अल्लारखाँ इन्स्टिट्यूट ऑफ म्यूझिक' ही संस्था मुंबईत स्थापन करून तेथे विद्यादानाचे काम केले. त्यांचे सुपुत्र आणि शिष्य, उ. झाकीर हुसेन हे वडिलांकडून मिळालेली विद्या आणि असामान्य वादनप्रभुत्व यांच्या जोरावर तबलावादक म्हणून विश्वविख्यात झाले आहेत. उ. अल्लारखाँ यांचे अन्य सुपुत्र फजल कुरेशी आणि तौफिक कुरेशी यांनाही त्यांनी तबल्याची दीक्षा दिली.

उ. अल्लारखाँ यांना 'पद्मश्री' पुरस्कार (१९७७), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९८२), 'इंडो-अमेरिकन अचीव्हमेंट' पुरस्कार, 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार आदी पुरस्कार प्राप्त झाले.

**– सुधीर माईणकर**

## अहमदजान थिरकवा

***अहमदजान, हुसेन***

**तबलावादक**

**१८८१ - १३ जानेवारी १९७६**



अहमदजान थिरकवा यांचा जन्म उत्तरप्रदेशातील मुरादाबाद येथे झाला. वडील हुसेन बक्श हे प्रसिद्ध सारंगीवादक होते व आजोबा (आईचे वडील) कलंदर बक्श हे एक नावाजलेले तबलावादक व रचनाकार होते. थिरकवांचे मामा फैयाझ हुसेन व बसवार खाँ हेही उत्तम तबलावादक व रचनाकार होते, तसेच त्यांचे चुलते शेर खाँ हेही प्रसिद्ध तबलावादक व रचनाकार होते. त्यामुळे थिरकवांवर बालपणापासूनच संगीताचे, विशेषत: घरंदाज तबल्याचे संस्कार घडले. अहमदजान दहा-बारा वर्षांचा असताना त्यांच्या मोठ्या भावाने, मियाँजानने त्याला लालीचानाला उ. मुनीर खाँकडे तबला शिकण्यास नेले. मुनीर खाँनी त्याचा हात पाहण्यासाठी तबल्यावर काही वाजवण्यास सांगितले. त्याचे वादन पाहून मुनीर खाँचे वडील उ. काले खाँ म्हणाले ''देखो, इस बच्चे का हाथ लय में कैसा थिरकता है।'' तेव्हापासून ते अहमदजानला 'थिरकू' म्हणू लागले. पुढे थिरकूचा 'थिरकवा' झाला.

१८९२ साली त्यांनी उ. मुनीर खाँ साहेबांचा गंडा बांधला. मुनीर खाँकडून त्यांना लखनौ, फरूखाबाद, दिल्ली व अजराडा घराण्याचा बाज मिळाला. सातत्याने अथक, अखंड रियाज करून ते स्वतंत्र तबलावादनात, तसेच साथसंगतीत तयार झाले.

त्यांचा हात नैसर्गिकरीत्या चपळ होता. १४-१५ तासांच्या रियाजाने निर्माण झालेली चपलता ही त्यांच्या हातांची वैशिष्ट्ये होत. चाटेवरील 'ना', तसेच तबल्याच्या लवेवर काढलेला जरबेचा 'ता' एवढा आसदार होता, की केवळ या नादावर श्रोते लुब्ध होत. बायाँवरील दाब-गाज अतिशय कर्णमधुर होता. तबल्यातील कोणतेही वर्ण त्यांच्या बोटांमधून सहजगत्या निघत. 'धिरधिर किटतक' या बोलावर तर त्यांचे प्रभुत्व होते. अतिशय वेगात, जोरकस व स्पष्ट उमटणाऱ्या या थिरकव्यामुळेच त्यांचे 'थिरकवा' हे नाव सार्थ झाले.

'पेशकार' हा प्रकार गायनातील आलापासारखा असतो. कायद्याच्या ठरावीक नियमांचे बंधन नसल्यामुळे उत्स्फूर्त सुचलेल्या उपज अंगांनी त्यांचा विस्तार होऊ शकतो. थिरकवांनी हा पेशकार अतिशय रंजकतेने मांडला. यात त्यांची प्रतिभा दिसून येते. कायदे, रेले, गती वगैरे वादनप्रकारांमध्येसुद्धा त्यांनी केलेला विस्तार त्यांच्या कलाशक्तीची ग्वाही देतो. हिंदुस्थानातील अव्वल दर्जाच्या अनेक गायक, वादकांबरोबरच थिरकवांनी भास्करबुवा बखले, बालगंधर्व, कृष्णराव फुलंब्रीकर, फैय्याजखाँ, विलायत हुसेन खाँ वगैरे गवयी, तसेच अनेक तंतुवाद्यकार यांची संगत केली.

महाराष्ट्रात थिरकवा विशेष प्रसिद्ध झाले ते बालगंधर्वांना केलेल्या साथीमुळे. भास्करबुवांच्या सांगण्यावरून बालगंधर्वांनी गंधर्व नाटकमंडळीत (१९१३-१९२०) दरमहा ६०० रु. पगार देऊन त्यांना नाट्यपदांच्या साथीस ठेवले. रामपूरच्या नवाबाकडे १९३५ ते १९४६ या दरम्यान थिरकवा दरबारवादक होते, तसेच मॉरिस महाविद्यालय (भातखंडे हिन्दुस्थानी संगीत महाविद्यालय, लखनौ) येथेही १९४८-१९४९ दरम्यान ते तबलावादनाचे शिक्षण देत. नॅशनल सेंटर फॉर परफॉर्मिंग आर्ट्स, मुंबई येथेही ते १९७१-१९७३ दरम्यान तबलावादनाचे मार्गदर्शन करीत. तबलावादनाच्या प्रसारात थिरकवा यांचा मोठा वाटा आहे.

खाँ साहेबांवर संगीताचे एवढे संस्कार होते, की एखादी सुंदर चीज त्यांच्या गळ्यातून सहजगत्या प्रकट व्हायची. त्यांच्या उल्लेखनीय शिष्यांमध्ये सर्वस्वी जगन्नाथबुवा पुरोहित, लालजी गोखले, लखनौचे एस.के. वर्मा, नारायण गजानन जोशी, निखिलज्योती घोष, भाई गायतोंडे, बापू पटवर्धन, अरविंद मुळगावकर यांचा समावेश होतो. भारत सरकारतर्फे त्यांना राष्ट्रपती पुरस्कार (१९५३-१९५४) व १९६० साली 'पद्मभूषण' पुरस्कार देऊन गौरवण्यात आले. अहमदजान थिरकवा यांच्या असंख्य ध्वनिफिती व अनुबोधपट आज उपलब्ध आहेत. त्यांच्या जीवनावर वाडिया यांनी एका लघुचित्रपटाची निर्मिती केली आहे.

– अरविंद मुळगावकर

## अहमदजान हुसेन

☛ अहमदजान थिरकवा

## आचरेकर, गंगाराम भिकाजी

**बीनकार, संगीतशास्त्रकार**

**१८८५ – ३ जून १९३९**

गंगाराम भिकाजी आचरेकर यांचा जन्म मालवण तालुक्यातील आचरे या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण जन्मगावीच झाले. नंतर त्यांचे नाभरंग्रे गावचे पं.



बळवंतराव बापट यांच्याकडे त्यांचे संगीतशिक्षण झाले. बापटबुवा हे गायनाचार्य बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचे गुरुबंधू होते. आचरेकरांनी आपल्या गुरुजींकडे ग्वाल्हेर गायकीचा व धृपद, ख्यालाचा अभ्यास केला. याचबरोबर ते एक उत्तम व प्रख्यात तंतकार होते. बीन या वाद्यावर त्यांनी मेहनत घेतली व खास करून सूक्ष्म स्वरश्रुतींत ते पारंगत झाले. बीन बरोबरच सतार, मृदंग व तबला या वाद्यांवरही त्यांनी प्रभुत्त्व मिळवले. शंकरभैयांसारख्या कसलेल्या पखवाजी बरोबर त्यांनी जुगलबंदीही केली.

आचरेकर १९०५ साली पुण्यात आले. नंतर १९०५ ते १९०९ अशी चार वर्षे राजकोट, कठियावाड येथील राजकुमार महाविद्यालयामध्ये संगीतशिक्षक म्हणून त्यांनी काम केले. 'पुणे ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन' येथील गायन अध्यापक बाळकृष्णबुवा नाटेकर यांच्या निधनामुळे गायनाध्यापकाच्या जागेसाठी १९०९ साली घेतलेल्या परीक्षेत आचरेकर पहिले आले व त्यांची अध्यापकपदी नेमणूक झाली. ते १९३९ साली मृत्यू होईपर्यंत या पदावर कार्यरत होते. एक उत्तम संगीतशिक्षक म्हणून त्यांचा लौकिक होता.

संगीतशास्त्र व कलेमध्येही त्यांनी अविश्रांत श्रमाने नैपुण्य मिळवले. त्यांचा प्राचीन संगीतग्रंथांचा उत्तम अभ्यास होता व त्यांनी आधुनिक संगीतास प्राचीन कलातत्त्वांची जोड देण्याचे सैद्धान्तिक कार्य केले. १९३२ साली प्रसिद्ध झालेल्या 'मत्सरीकृत मूर्च्छना' या ग्रंथात त्यांनी स्वरशास्त्रविषयक सिद्धान्त मांडला. प्राचीन ग्रंथांच्या विवरणाद्वारे आधुनिक संगीतातील बावीस श्रुतिंची उपपत्ती त्यांनी सांगितली. श्रुत्यंतरांची गणिती पद्धतीने व प्रात्यक्षिकासह गुणोत्तरे मांडली. षड्ज-पंचमभावामुळे येणारी २२ श्रुतिस्थाने, श्रुतींची स्वरांत विभागणी, विविध ग्राम व थाटांतील श्रुतिस्थाने, प्राचीन

व प्रचलित स्वरस्थानांची श्रुतिनिश्चय असे विषय त्यांनी या ग्रंथात श्लोकरूपाने मांडले आहेत. या ग्रंथामुळे श्रुतिचर्चेस एक निराळी दिशा मिळाली. त्यांनी मांडलेल्या श्रुतिविचारास अब्दुल करीम खां यांचे शिष्य बाळकृष्ण कपिलेश्वरी यांनी विरोध केला. आचरेकर हे एक हरहुन्नरी व्यक्तिमत्त्व होते. यंत्रशास्त्रातही गती असल्याने घड्याळासारख्या यंत्रांची ते सफाईने दुरुस्ती करत. बीन, मृदंग, हार्मोनिअम इ. वाद्ये बनवणे, दुरुस्त करणे याही बाबतीत त्यांनी प्रावीण्य मिळवले. या वाद्यनिर्मितीच्या नादातूनच त्यांनी श्रुतिहार्मोनिअमची नियर्मती केली. प्रचलित हार्मोनिअम इक्विटेंपर्ड पद्धतीने स्वरजुळणी केल्याने म्हणजे हिंदुस्थानी संगीताच्या संदर्भात बेसूरी असल्याची टीका होऊन हार्मोनिअमला त्या काळात विरोध होऊ लागला. हिंदुस्थानी संगीतातील २२ श्रुतींचा मेळ हार्मोनिअममध्ये बसवावा म्हणून देवल व क्लेमेंट्स् यांनी त्या प्रकारची पेटी बनवून प्रयत्न करून पहिला. पण ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत, निषाद यातील फरकासाठी त्यांना स्वररचनेसाठी टाइपरायटरप्रमाणे स्वरश्रेणी बसवाव्या लागल्या व हार्मोनिअम वाजवण्याचे काम सुकर होण्याऐवजी कष्टप्रद अवघड मात्र झाले. आचरेकरांनी सतत २० वर्षे अविश्रांत विचार व परिश्रम करून अखेर वाजविण्यास सोपी परंतु श्रुतिसाध्य अशी हार्मोनिअम १९२७ साली तयार केली.

महाराष्ट्रातील प्रमुख गावोगावी, संगीतपरिषदांमध्ये वेळोवेळी प्रात्यक्षिक व व्याख्याने देवून त्यांनी या श्रुतिमंजूषेचे महत्त्व लोकांच्या निदर्शनास आणले. त्यांच्या श्रमाचा मोबदला त्या काळच्या दैनिक व साप्ताहिकांतील त्यांविषयी गौरवपर लेखमालेतून दिसून येतो. या श्रुतिमंजूषेचे एकस्व एक घेऊन प्रचारकार्य करण्याचा त्यांचा मानस होता. परंतु १९३७ साली ते आजारी पडले व मुंबईत त्यांचा मृत्यू झाला.

आचरेकर हे संगीतकलनिपुण, शास्त्रज्ञ, तंतकार, त्याचप्रमाणे उर्दू भाषेचे तज्ज्ञ, जवाहिरपारखी व उत्तम ज्योतिषीही होते. त्यांच्या शिष्यगणांपैकी गायक ना. द. तांबेशास्त्री, बीनकार शिवरामबुवा दिवेकर ही मंडळी पुण्यात होती. त्यांचा संगीतशास्त्राभ्यासाचा व वाद्यनिर्मितीचा वारसा त्यांचे पुत्र बाळकृष्ण गं. आचरेकर यांनी समर्थपणे चालवला.

— चैतन्य कुंटे

## आचरेकर, भार्गवराम भिकाजी

**गायक, संगीत-नट**

**८ सप्टेंबर १९१० — २७ मार्च १९८७**



मराठी संगीत रंगभूमीवरील गायक-नट म्हणून गाजलेल्या भार्गवराम भिकाजी आचरेकरांचा जन्म कोकणातील मालवण तालुक्यातील आचरे या गावी झाला. संगीत त्यांच्या कुटुंबातच होते. वडील वैद्यकी करीत तर आई भिकाबाई गावातील श्री रामेश्वर मंदिरात गायिका होत्या. संगीताचे संस्कार झाल्यामुळे बालपणापासूनच ते गात असत. शालेय शिक्षणाकडे त्यांचे फारसे लक्ष नव्हते. नाटकांची ओढ जबरदस्त होती. गावात रामनवमीच्या उत्सवानिमित्त स्थानिक मंडळींची नाटके होत. यात भार्गवराम कामे करीत. एका वर्षीच्या उत्सवात 'शहा शिवाजी' या नाटकात भार्गवरामांनी केलेली व्यंकोजीची भूमिका खूप गाजली. योगायोगाने 'ललितकलादर्श'चे बापूराव पेंढारकर या नाटकाला उपस्थित होते. भार्गवरामांचे गाणे पेंढारकरांच्या चांगलेच लक्षात राहिले.

वयाच्या आठव्या-नवव्या वर्षी भार्गवरामांच्या आई-वडिलांचे निधन झाले. वडीलबंधू अवधूत यांनीच त्यांचा सांभाळ केला व संगीताची संथाही दिली. नाटकात जाण्याची अत्यंत ओढ असलेल्या भार्गवरामांची, बाकूराव टिळक या त्यांच्या मित्राने पुढाकार घेऊन ललितकलादर्शच्या बापूरावांशी ओळख करून दिली. बापूराव पेंढारकरांनी त्यांचे काम पाहिले होते व आवाजही ऐकला होता. त्यांनी वडीलबंधू अवधूत यांच्या परवानगीने त्यांना आपल्या कंपनीत ठेवून घेतले. अवधूत यांचा भार्गवरामाने नाटक कंपनीत जायला

विरोध होता; पण भार्गवरामाच्या हट्टामुळे त्यांनी परवानगी दिली.

भार्गवरामांचा १९२५ च्या आसपास ललितकलादर्शमध्ये प्रवेश झाला. या कंपनीत त्यांचे संगीत व अभिनयाचे शिक्षण सुरू झाले. सुरुवातीला ते छोट्या-मोठ्या स्त्री-भूमिका व इतर कामेही करत. ललितकलादर्शच्या अनेक नाटकांतून त्यांनी कामे केली. मामा वरेरकरांच्या 'सोन्याचा कळस' या नाटकातील 'बिजली' ही भूमिका अभिनय आणि गायन या दोन्ही दृष्टींनी गाजली. मा. भार्गवराम म्हणून त्यांचे नाव झाले. या नाटकाचे संगीत गायनाचार्य रामकृष्णबुवा वझे यांचे होते. त्यामुळे भार्गवरामांचे पुढील संगीत शिक्षण रामकृष्णबुवा वझेंकडे सुरू झाले. याबरोबरच वझेबुवांचे चिरंजीव शिवरामबुवा वझे, मुहंमद बशीर खाँ साहेब, कागलकरबुवा, रामकृष्णबुवा बापट इत्यादी बुजुर्गांकडूनही भार्गवरामांनी संगीतविद्या मिळवली. बैठकीचे शास्त्रोक्त गाणेही पक्के होत गेले. याशिवाय पेंढारकरांनी संस्कृत श्लोक वगैरेचे पठण करून घेतल्यामुळे त्यांची वाणी शुद्ध, स्वच्छ व अस्खलित झाली. हा गुण त्यांच्या गायनातून प्रकर्षाने जाणवतो.

त्यांनी ललितकलेत बारा वर्षे काढली. 'राक्षसी महत्त्वाकांक्षा', 'पुण्यप्रभाव', 'कृष्णार्जुन युद्ध', 'शिक्का कट्यार', 'सोन्याचा कळस', 'वधूपरीक्षा' इत्यादी ललितकलादर्शच्या नाटकांतून त्यांनी विविध भूमिका केल्या. त्यांना १९३७ साली कंपनीच्या दुरवस्थेमुळे पेंढारकरांनीच गावी जायला सांगितले. त्यांनी १९४०-४१ च्या सुमारास स्वत:ची 'ललितकला संवर्धक' ही कंपनी काढली. भार्गवरामांनी या कंपनीच्या 'संगीत सौभद्र' (कृष्ण), 'मानापमान' (धैर्यधर), 'पुण्यप्रभाव' (भूपाल) या नाटकांतून पुरुष-भूमिकाही समर्थपणे साकारल्या. आर्थिक जम न बसल्यामुळे ही कंपनीही बंद करावी लागली.

पुढे गंगाधरपंत लोंढे यांच्या राजाराम संगीत मंडळीच्या नाटकांतूनही त्यांनी भूमिका केल्या. त्यांच्या 'विद्याहरण' या नाटकातील कच, 'प्रेमसंन्यास'मधील जयंत, 'सौभद्र'मधील अर्जुन या भूमिका विशेष गाजल्या. याच दरम्यान भार्गवराम विवाहबद्ध झाले व पुण्यात स्थायिक झाले. दामुअण्णा मालवणकरांच्या 'प्रभाकर नाट्यमंदिर', तसेच 'भारत नाट्यकला' या काही नाट्यसंस्थांतूनही भार्गवरामांनी काम केले. भार्गवरामांनी जुन्या नाटकांबरोबरच 'लग्नाची बेडी' (पराग), 'उसना नवरा' (गिरीश) अशा काही नव्या नाटकांमधूनही भूमिका केल्या.

नाटकाबरोबरच शास्त्रीय संगीताच्या बैठका, गायनाच्या शिकवण्या, आकाशवाणीवरील कार्यक्रम असे उपक्रम चालू होते. जुन्या नाटकांचा जमाना संपत आला होता. नव्या संगीत नाटकांचे युग सुरू झाले. 'नाट्यसंपदा'चे १९६७ साली 'कट्यार काळजात घुसली' हे संगीत नाटक आले. या नाटकाद्वारे भार्गवराम आचरेकरांचे वयाच्या सत्तावन्नाव्या वर्षी संगीत रंगभूमीवर पुनरागमन झाले. या नाटकात त्यांनी पं. भानुप्रसादचे काम केले. अतिशय छोटी भूमिका असली तरी भार्गवरामांचे काम आणि गाणे प्रेक्षकांच्या मनावर ठसले. या नाटकातील 'दिन गेले भजनावीण' हे पद व यमनमधील 'तराण्यां'तून त्यांच्या गाण्याचा कस दिसतो. 'कट्यार'च्या जवळजवळ ५०० प्रयोगांतून त्यांनी काम केले. ललितकलादर्शच्या हीरक महोत्सवी वर्षात १९६८ साली 'सौभद्र' या नाटकातून त्यांनी श्रीकृष्णाची भूमिका साकारली होती.

भार्गवरामांचा आवाज वजनदार व गाणे कसदार होते. त्यांच्याजवळ विविध रागांतील बंदिशींचाही भरणा होता. ते सातत्याने गायनाची मेहनत करत. त्यांच्या शिष्यवर्गात अविनाश आगाशे यांचे प्रमुख नाव घ्यावे लागेल. ते बरीच वर्षे त्यांच्याकडे शिकले. याशिवाय मुकुंद उपासनी, मुकुंद मराठे यांनाही त्यांची तालीम मिळाली. अनेकांना नाट्यसंगीताचे, तसेच गायनाचे मार्गदर्शन लाभले.

त्यांच्या एकसष्टीनिमित्त 'आवडीने भावे' (संगीत : भार्गवराम आचरेकर) व 'दिन गेले भजनावीण' या

दोन गाण्यांची ध्वनिमुद्रिका एच.एम.व्ही.ने काढली. 'सोन्याचा कळस' या नाटकातील 'जगी वंचिता', 'अभिलाषा नाही' या नाट्यपदांची, 'वधूपरीक्षा' या नाटकातील 'सत्पात्र हा', 'संन्याशाचा संसार'मधील 'वांछित भावना', 'कुंजविहारी' नाटकातील 'त्यजी भक्तासाठी' अशा नाट्यपदांच्या अनेक ध्वनिमुद्रिका निघाल्या होत्या.

त्यांना १९८३ साली महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे त्यांचा सन्मान करून पुरस्कार देण्यात आला. पुणे महानगरपालिकेतर्फे 'बालगंधर्व' पुरस्कार (१९९६); अखिल महाराष्ट्र नाट्य परिषद, सांगलीतर्फे पुरस्कार (१९८९); याशिवाय मराठी रंगभूमी, पुणे; कालनिर्णय, मुंबई व अण्णा कराळे पुरस्कृत 'संगीत सूर्य केशवराव भोसले' पुरस्कार आदी पुरस्कारांचे ते मानकरी होते. त्यांचे वयाच्या सत्त्याहत्तराव्या वर्षी पुण्यात निधन झाले.

— माधव इमारते

## आठवले, विनायक रामचंद्र

**गायक, शिक्षक**

**२० डिसेंबर १९१८ – ३१ जुलै २०११**



विनायक रामचंद्र आठवले यांचा जन्म भोर येथे झाला. त्यांचे वडील हे संस्कृतचे पंडित व प्राध्यापक होते. पण त्यांनी मुलांना गायन, अभिनय, खेळ, पेटीवादन या सर्वांसाठी भरपूर प्रोत्साहन दिले. वडील उत्तम कीर्तनकारही होते. त्यामुळे ते आपल्या मुलांना कीर्तनाच्या साथीला नेत व त्या काळच्या उत्तम गवयांच्या बैठकीलाही नेत. अशा प्रकारे लहान वयातच त्यांच्यावर गायनाचे संस्कार झाले. त्यांना रागदारी शिक्षणात रस वाटू लागला. गाणे ऐकून ते नाट्यसंगीत, भजने इ. उत्तम प्रकारे गाऊ लागले. पुढे मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांनी गांधर्व महाविद्यालयात संगीताचे शिक्षण घेतले.

त्यांचे पदवी शिक्षण पूर्ण झाले, त्या सुमारास स्वातंत्र्य चळवळ जोरात चालू होती. स्वा. सावरकर, साने गुरुजी, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत यांच्या विचारांनी प्रेरित होऊन आपल्या आवडीचा विषयच जीवन व्यवसाय म्हणून निवडायचा असे त्यांनी मनाशी पक्के ठरवले व गिरणीमध्ये लागलेली नोकरी सोडून ते संगीत शिक्षणासाठी पुण्याला पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्याकडे दाखल झाले. तेथे त्यांनी १९३९ ते १९४३ अशी चार वर्षे ग्वाल्हेर घराण्याची तालीम घेतली. संगीत अलंकार ही पदवी घेऊन, संगीत शिक्षकाची नोकरी पत्करून त्यांनी आपल्या व्यवसायास सुरुवात केली.

काही वर्षे शिक्षकाची नोकरी केल्यानंतर त्यांना मुंबई आकाशवाणीवर नोकरी मिळाली. त्या दरम्यान कलकत्त्याला उद्योगपती बिर्लांनी एक संगीत महाविद्यालय सुरू केले होते. त्यासाठी प्राचार्य म्हणून योग्य व्यक्ती पाठविण्यासंबंधी पं. विनायकबुवा पटवर्धनांना सांगितले. त्यांनी विनायक आठवल्यांना तेथे जायचा सल्ला दिला. ही चांगली संधी आहे असे समजून त्यांनी आकाशवाणीची नोकरी सोडून कोलकात्याला बिऱ्हाड थाटले. पण दुर्दैवाने १९४६ साली कोलकात्यात मोठी दंगल उसळली व सर्व महाविद्यालये बंद पडली. वर्षभर तेथेच शिकवण्या करून ते अहमदाबाद येथे परत आले. त्या वेळी बडोद्याच्या संगीत विद्यालयात त्यांना उपप्राचार्याची नोकरी मिळाली; पण एक-दोन वर्षांतच काही मतभेदांमुळे ती सोडावी लागली. 'आता संगीत पुरे, इतर काही बघ,' असे वडिलांनी सांगितले; पण विनायक आठवले आपल्या ध्येयापासून मागे हटले नाहीत.

अहमदाबाद येथेच १९४९ साली नवीन आकाशवाणी केंद्र उभारण्यात आले व तेथे खऱ्या अर्थाने त्यांची कारकीर्द सुरू झाली. सहा वर्षांनंतर त्यांना जयपूर आकाशवाणी केंद्रावर निर्माता म्हणून

बढती मिळाली. जयपूरला दोन-अडीच वर्षे काम केल्यावर त्यांची दिल्ली आकाशवाणी केंद्रावर निर्माता म्हणूनच बदली झाली व दिल्लीतील वास्तव्याचा काळ हा त्यांच्या दृष्टीने सुवर्णकाळ ठरला.

येथील वास्तव्यातच विनायकरावांना उ. विलायत हुसेन खाँ यांची आग्रा घराण्याची तालीम मिळाली. आग्रा घराण्याचे बोल अंग, लयकारी यांतील सौंदर्य उमगत गेले. त्यांना अनेक अनवट व जोडराग शिकायला मिळाले. ग्वाल्हेरबरोबर आग्रा घराण्याची वैशिष्ट्येही त्यांना आत्मसात करता आली. त्यांनी १९७० नंतर दिल्ली विद्यापीठाच्या संगीत विभागाचे प्रमुख म्हणून काम केले. त्याचबरोबर त्यांनी अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाचे सचिव व 'संगीत कला विहार' या मासिकाचे संपादक म्हणून काम केले.

गोवा कला अकादमीचे संचालक म्हणून काम करताना आठवल्यांनी अनेक नवीन प्रयोग केले व तेथेच संगीताचे रसग्रहण, घराण्याचे विश्लेषण, ठुमरीचे रंग इ. विषयांची जाहीर व्याख्याने दिली. कला अकादमीचा अभ्यासक्रम ठरवण्यापासून विद्यार्थ्यांची निवड करून त्यांना शिकवण्याचेही काम त्यांनी केले. अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळासाठी वाशी येथे जागा खरेदी करून तेथे विद्यालय सुरू करण्याचे नक्की झाले. जागा ताब्यात आल्यावर १९८८ साली वास्तूचा तळमजल्याचा पहिला टप्पा पूर्ण झाला तेव्हापासून त्यांनी विद्यार्थ्यांना तेथे संगीत शिकवणे सुरू केले. हेच विद्यार्थी प्राथमिक वर्गांना शिकवत व विशारदनंतरचे शिक्षण स्वत: घेत. याप्रमाणे 'कमवा व शिका' ही पद्धतही तेथे विनायकरावांनी सुरू केली. शास्त्रीय संगीत, सुगम संगीत, वाद्यसंगीत, नृत्य या सर्व कलांचे शिक्षण या ठिकाणी दिले जाते. तेथे असताना आठवल्यांनी सतत नवीन कल्पना कार्यक्रमांतून लोकांसमोर मांडल्या.

त्यांना १९९७ साली मेंदूतील रक्तस्रावाचा मोठा आजार झाला. पुढे त्यातून ते सावरले. त्यांना मराठी साहित्य परिषद, गोवा येथील 'लता मंगेशकर' पुरस्कार (२००१), अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाने दिलेला 'महामहोपाध्याय' पुरस्कार, चतुरंगचा 'चैत्रपालवी' पुरस्कार (२००९) व मधला पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्या नावाचा पुरस्कार (२०१०), इत्यादी मोठे पुरस्कार मिळाले.

त्यांचे 'तरंगनाद' हे संगीतावरील वैचारिक निबंधाचे पुस्तक आहे, तर 'नादवैभव' हे स्वरचित बंदिशींचे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. त्यांच्या 'रागवैभव' या पुस्तकात पारंपरिक बंदिशी दिल्या आहेत.

— लीना हर्डीकर

## आपटे, अंतूबुवा

**गायक**

**जन्म-मृत्यू दिनांक अनुपलब्ध**

अंतूबुवा आपटे हे महाराष्ट्राच्या दक्षिण भागातल्या रामदुर्ग संस्थानाचे रहिवासी होते. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात रामदुर्गातील एका प्रतिष्ठित घराण्यात जन्मलेल्या अंतूबुवांचे बाळबोध पद्धतीने शालेय शिक्षण सुरू असताना त्यांची संगीताची आवड वाढली. एक दिवस त्यांना समजले की मिरजेत एक गवई आले आहेत आणि ते कुणालाही शिकवतात. मग घरात कोणालाही न सांगता अंतूबुवा मिरजेला गेले. तिथे ते उ. झाइन-उल्-अबदीन खाँसाहेब यांना भेटले. उस्तादांनी आपल्याला संगीत शिकवावे अशी अंतूबुवांनी त्यांना विनंती केली, तेव्हा त्यांनी घरात काम करून शिकावे लागेल अशी अट घातली. अंतूबुवांनी ती अट मान्य केली. त्यांनी ५-६ वर्षे कसून मेहनत केली. गुरूंनी शिकवलेले सर्व घोटून आपल्या गळ्यावर चढविले. गुरू आणि आपले सहाध्यायी महादेव गोखले यांच्यासह अंतूबुवांनी अनेक संस्थानांत व कुरुंदवाड येथील गणेशोत्सवांत हजेरी लावली.

अशा प्रकारे भरपूर अनुभवाची शिदोरी मिळवून अंतूबुवा रामदुर्ग येथे परतले. रामदुर्ग संस्थानिकांनी त्यांना आपले दरबार गायक म्हणून नेमले. उस्तादांकडून चिजांचा मोठा संग्रह अंतूबुवांना प्राप्त झाला होता, शिवाय

त्यांची गाण्याची शैलीही उत्तम होती. त्यामुळे महाराष्ट्रात त्यांची ख्याती दूरवर पसरली. त्यांच्या शिष्यांमध्ये प्रामुख्याने बळवंतराव केतकरांचे नाव उल्लेखनीय आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आपटे यांचे निधन झाले. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या पूर्वीच्या काळात महाराष्ट्रात पक्की गायकी, रागसंगीत गाणाऱ्या कलाकारांत आपटे यांचे नाव महत्त्वपूर्ण आहे.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*१. जोशी, ल.द.; 'संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास'; पुणे, १९३५.*

## आपटे, शांता रामचंद्र

☛ *पाहा चित्रपट खंड*

## आबान मिस्त्री

***मिस्त्री, आबान एचरशाह***

**तबलावादिका**

**६ मे १९४० – २० सप्टेंबर २०१२**



आबान एचरशाह मिस्त्री यांचे वडील हे व्हायोलिनवादक, तर आई खुर्शीद दिलरुबावादक होत्या. संगीताचे बाळकडू त्यांना आपल्या घरातूनच मिळाले. त्यांचे संगीताचे प्राथमिक शिक्षण गायनाच्या माध्यमातून त्यांच्या काकू मेहरू वर्किंगबॉक्सवाला यांच्याकडे झाले. त्यांचे उच्च शिक्षणदेखील गायनाच्याच माध्यमातून पं. लक्ष्मणराव बोडस यांच्याकडे झाले. तीस वर्षे इतक्या प्रदीर्घ काळापर्यंत त्या हे गायनाचे शिक्षण घेत होत्या.

दरम्यानच्या काळातच आबान मिस्त्री यांनी कथक नृत्यकलादेखील आत्मसात केली. पुढे प्रकृतीच्या काही कारणामुळे त्यांना कथक नृत्यकलेपासून परावृत्त व्हावे लागले. अशा परिस्थितीमध्ये त्यांच्या सांगीतिक जीवनात गुरू म्हणून पं. केकी जिजीना यांचा प्रवेश झाला. पं. जिजीनांनी आबानांना सतारच्या माध्यमातून शिक्षण दिले. इतकेच नव्हे, तर सतार हा विषय घेऊन अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाच्या विशारद परीक्षेत त्यांनी प्रथम क्रमांक मिळविला.

नृत्यकलेमधून निवृत्तीनंतरची लयीची कमी भरून काढण्यासाठी पं. जिजीना यांनी आबान यांना तबल्याचे धडे दिले. संगीताच्या एका माध्यमावर प्रभुत्व मिळण्यासाठी कलाकाराला अनेक वर्षे आणि बहुतांशी सबंध आयुष्य वेचावे लागते. आबानसारख्या बोटांवर मोजता येणाऱ्या कलाकारांनाच संगीताची इतकी माध्यमे केवळ आत्मसातच होत नाहीत, तर त्यांवर त्यांचे प्रभुत्व असते. ज्या काळात स्त्रीचे जीवन केवळ चूल आणि मूल यांतच व्यतीत व्हायचे, त्या काळात आबानसारख्या स्त्रीने इतक्या विविध माध्यमांवर हुकमत मिळवणे आणि मंचावर त्यांचे सुयोग्य प्रदर्शन करणे हे केवळ कौतुकास्पदच नव्हे, तर आदरासही पात्र आहे.

त्यांच्या या चौफेर व्यक्तिमत्त्वाला तबल्याच्या माध्यमातून पैलू पाडले ते उ. अमीर हुसैन खाँ यांनी. आबान मिस्त्रींचा तबला ऐकून उ. अमीर हुसैन खाँ यांनी त्यांना आपले शिष्यत्व बहाल केले. फरूखाबाद, दिल्ली, लखनौ, अजराडा या सर्व घराण्यांचे समृद्ध तबलावादन उ. अमीर हुसैन खाँसाहेबांकडून त्यांना मिळाले. या चारही घराण्यांच्या बंदिशी, त्यांचा निकास, विचार-प्रक्रिया या सर्व गोष्टी त्यांना मिळाल्या. त्यांनी या सर्व शैलींचा अभ्यास करून त्यावर चिंतन करून या शैलींनी युक्त असणारी स्वत:ची अशी एक शैली निर्माण केली.

आबान मिस्त्रींचे लयीवरील प्रभुत्व वाखाणण्याजोगे असल्यामुळे त्यांनी तीनतालाव्यतिरिक्त झपताल, रूपक, पंचम सवारी इत्यादी तालांतही समर्थपणे वादन केले. त्यांचे कार्यक्षेत्र त्यांनी तबल्यापुरतेच मर्यादित ठेवले नाही, तर त्यांनी पंडित नारायणराव मंगळवेढेकर

यांच्याकडून पखवाजाचीदेखील विधिवत तालीम घेतली. त्यावर सखोल विचार व चिंतन केले.

अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाकडून संगीताचार्य (पीएच.डी.) ही पदवी त्यांना त्यांच्या 'तबला और पखावज के घराने एवं परम्पराएँ' या प्रबंधासाठी मिळाली. यासाठी त्यांनी तबला व पखवाजची विविध घराणी व परंपरा यांवर अभ्यासपूर्ण विवेचन केले आहे. अनेक ऐतिहासिक पुरावे देऊन त्यांनी तबला हा भारतात पर्शियामधून अमीर खुस्रोने आणला हा गैरसमज खोडून काढला आहे.

त्यांनी अनेक सभा-संमेलनांमध्ये वादन केले आहे. त्यांनी परदेशाच्या अनेक वाऱ्या केलेल्या आहेत. युरोप, मध्य आशिया, रशिया इत्यादी देशांत त्यांचे कार्यक्रम झाले आहेत. तबल्याव्यतिरिक्त त्या हिंदी, संस्कृत विषयांत साहित्यरत्न आहेत. त्यांनी संगीतावर देश-विदेशांत अनेक प्रसिद्ध मासिकांतून लेखन केलेले आहे.

पारशी समाजाच्या हिंदुस्थानी संगीतातील योगदानावर त्यांनी 'दी पारसीज अ‍ॅण्ड इंडियन क्लासिक म्यूझिक' हा ग्रंथ लिहिला आहे. शिक्षण व प्रस्तुती या दोनच माध्यमांतून त्यांनी आपली संगीत सेवा थांबवली नाही. त्यापुढे जाऊन आबान यांनी अनेक चांगले शिष्य तयार केले. त्यांचे गुरू पं. जिजीना व त्यांनी एकत्रितपणे 'स्वरसाधना समिती' या संस्थेची स्थापना केली. या संस्थेच्या माध्यमातून त्या जवळजवळ ४० वर्षे सातत्याने नव्या, उदयोन्मुख कलाकारांना मंचप्रदर्शनाची संधी देत आहेत.

– सूर्याक्ष देशपांडे

## आमोणकर, किशोरी रवींद्र

**गायिका**

**१० एप्रिल १९३१**

जयपूर घराण्याच्या विख्यात गायिका गानतपस्विनी मोगूबाई कुर्डीकर व वडील माधवदास भाटिया यांच्या ज्येष्ठ कन्या असणाऱ्या किशोरी रवींद्र आमोणकर यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे शालेय शिक्षण बालमोहन



शाळेत झाले व नंतर जयहिंद महाविद्यालयात त्यांनी विज्ञान शाखेचे शिक्षण घेतले.

अगदी बालवयापासूनच उ. अल्लादिया खाँसाहेब मोगूबाई कुर्डीकरांना गायनाची जी तालीम देत असत, तिचा खोल संस्कार त्या अबोध वयातही किशोरीताईवर झाला. माधवदास यांचे १९३९ साली निधन झाल्यावर मोगूबाईंवर स्वत: अर्थार्जन करून तीन मुलांच्या संगोपनाची जबाबदारी आली. मोगूबाईंनी आपल्या या कन्येस जयपूर घराण्याची शिस्तशीर तालीम दिली. किशोरी यांचा १९५५ साली रवींद्र आमोणकर यांच्याशी विवाह झाला.

किशोरी आमोणकरांनी अण्णा पर्वतकर, आग्रा घराण्याचे अन्वर हुसेन खाँ, जयपूर घराण्याचे मोहनराव पालेकर, भेंडीबाजार घराण्याच्या अंजनीबाई मालपेकरांचे व अगदी अल्पकाळासाठी मास्तर कृष्णराव फुलंब्रीकरांचेही मार्गदर्शन घेतले. हिंदी चित्रपटसृष्टीतील हुस्नलाल-भगतराम या प्रसिद्ध संगीतकार जोडीपैकी हुस्नलाल यांच्याकडे त्या पंजाबी ढंगाची ठुमरी, गझल, लोकगीतेही शिकल्या. त्यांनी संतसाहित्य, विशेषत: संत ज्ञानेश्वरांच्या साहित्याचे वाचन-मनन केले. उपजत अत्यंत कुशाग्र सांगीतिक व सौंदर्यबुद्धी, अपेक्षित असणारी सांगीतिक अभिव्यक्ती स्वत:च्या गळ्यातून साकारण्यासाठी अट्टाहास करण्याची ईर्ष्या यांमुळे किशोरी आमोणकरांनी अल्पवयातच रागगायनात व ख्याल, ठुमरी, भजन अशा गानप्रकारांत प्रावीण्य मिळवले.

पुढे १९६० च्या दशकात सुमारे ७-८ वर्षे आवाजाची अनुकूलता न राहिल्याने, त्या सक्तीच्या विश्रांती काळात त्यांनी चिंतन करून, त्यांना वारशाने मिळालेल्या जयपूर गायकीला एक निराळे परिमाण दिले. मूलत: बिकट तानक्रिया व अनवट, जोड रागांवर भर देणाऱ्या जयपूर गायकीत संथ आलापचारीसारख्या

अन्य घटकांद्वारे या गायकीस त्यांनी अधिक विस्तृत, पसरट, भावाविष्कारजनक केले. व्याकरण व घराण्याच्या शिस्तीच्या चौकटीतून स्वत:स मोकळे करून बुद्धी व भावना दोन्हींस चालना देणारा गायकीचा घाट त्यांनी तयार केला. काही प्रसंगी ठरावीक रागांत त्या विशुद्ध जयपूर गायकीचे दर्शन घडवतात, मात्र त्यांचा भर स्वनिर्मित गायकी मांडण्याकडेच राहिला.

एच.एम.व्ही.ने १९६७ साली काढलेल्या आमोणकरांच्या पहिल्या ध्वनिमुद्रिकेतील जौनपुरी, पटबिहाग हे राग ऐकताना त्यांना मोगूबाईंकडून मिळालेल्या तालमीतील जयपूर घराण्याचे शिस्तशीर गायन दिसते. नंतर १९७१ साली प्रसिद्ध झालेली त्यांची राग भूप व बागेश्रीची ध्वनिमुद्रिका अतीव लोकप्रिय झाली. त्यात त्यांची स्वतंत्र विचाराने परिवर्तित झालेली ‘भाववादी’ गायकी दिसते. यानंतरही त्यांची अनेक व्यावसायिक ध्वनिमुद्रणे प्रसिद्ध व लोकप्रिय झाली आहेत.

गायकीच्या ढाच्यास अपेक्षित अशी अभिव्यक्ती करणाऱ्या अनेक भावपूर्ण बंदिशींची त्यांनी सौष्ठवयुक्त रचना केली. उदा. भूप (प्रथम सूर साधे, सहेला रे, मैं तेरी रे), यमन (मो मन लगन लागी, तोसे नेहा लागा, सब बन प्रीत री होई, तराना), बागेश्री (बिरहा ना जरा, आज सह्यो ना जाए बिरहा, एरी माई साजन नहीं आए), मालकंस (तुम बिन कौन सवारे, मन सुमिरन कर तू रामनाम), नंद (आजा रे बालमवा), खंबावती (रे निर्मोही सजना), खंबावती : झिंझोटी अंग (एरी जुग बीते), भूपनट (तराना), रागेश्री (आली री पलक न लागी), बिहारी (लागे ना जिया मोरा), हंसध्वनी (गणपत विघनहरन, आज सजनसंग मिलन, तराना), भिन्नषड्ज (उड जा रे कागा, अंगना मोरे आजा), ललितपंचम (छैला ना रंग डारो), ललितबिभास (चलो री सखी सौतन घर जैये), बिलासखानी तोडी (आली री मैं तो जागी, सजनी कवन देस गए), अहिरभैरव (नैनवा बरसे), हिंडोलबहार (आए हो नंदलाल), मधमाद सारंग (जबते मन लाग्यो, श्यामरंग मन भीनो), भीमपलास (रंग सो रंग मिला), श्री (परमपुरुष नारायण), मारवा (छांडो लंगर मोरी बैंया), जयत (नई रे लगन लागी बलमा), खेमकल्याण (मोरा मनहर ना आयो), भूपप्रकार (नवरंग बहार आयो), बिलावल प्रकार (डगर चलत मोरी छीन लई गगर), गौडमल्हार (बरखा बैरी भयो), तिलकमल्हार (रे बिरहा मैं तो जागी), अडानामल्हार (छाई रे बदरिया कारी कारी), बरवामल्हार (बरखा बैरन हमार) इ. तसेच आनंदमल्हार (बरसत घन आयो), सावनमल्हार (रे मेघा ना बरसो) हे रागही त्यांनी निर्माण केले आहेत.

‘गीत गाया पत्थरों ने’ (१९६४) या केवळ एकाच हिंदी चित्रपटासाठी किशोरी आमोणकरांनी पार्श्वगायन केले. त्यांनी गायलेल्या ‘हे श्यामसुंदर राजसा’ व ‘जाईन विचारित रानफुला’ (गीत : शांता शेळके व संगीत : हृदयनाथ मंगेशकर) या भावगीतांची एच.एम.व्ही.ने काढलेली ध्वनिमुद्रिका (१९६८) खूपच रसिकप्रिय झाली.

तसेच, त्यांनी स्वरबद्ध केलेल्या व गायलेल्या हिंदी भजनांच्या (म्हारो प्रणाम, घट घट में पंछी बोलता) व मराठी अभंगांच्या (रंगी रंगला श्रीरंग, पडिले दूर देशी) ध्वनिफितीही गाजल्या. तसेच, त्यांच्या आवाजात व्यंकटेशसहस्रनाम, राघवेंद्रस्वामींची कानडी भजनेही (१९८८) ध्वनिमुद्रित झाली आहेत.

मंगेश पाडगावकर लिखित व पु.ल. देशपांडे यांनी संगीत दिलेल्या ‘बिल्हण’ या संगीतिकेतही त्यांनी गायन केले होते. कर्नाटक संगीतातील विद्वान गायक बालमुरली कृष्णन यांच्याबरोबर गायनाची जुगलबंदी, तसेच हरिप्रसाद चौरासिया यांच्यासह बासरीबरोबर केलेले सहगायन असे काही वेगळे प्रयोगही त्यांनी केले. त्यांनी स्वरबद्ध केलेल्या संत मीराबाईंच्या भजनांचा ‘मगन हुई मीरा चली’ हा कार्यक्रम, तसेच मराठी संतांच्या अभंगांचा ‘तोचि नादू सुस्वरू झाला’ हे कार्यक्रमही त्यांनी सादर केले. किशोरी आमोणकरांनी मराठी नाट्यसंगीतास आपल्या मैफलींत क्वचित अपवादात्मक स्थान दिले, मात्र रणजित देसाई लिखित

'तुझी वाट वेगळी' (१९७८) या एकाच मराठी नाटकासाठी त्यांनी संगीत दिले होते. गोविंद निहलानी दिग्दर्शित 'दृष्टी' (१९९०) या हिंदी चित्रपटासही त्यांनी संगीत दिले.

अरुण द्रविड, सुहासिनी मुळगावकर, माणिक भिडे, मीना जोशी, मीरा पणशीकर, आरती अंकलीकर, देवकी पंडित, नंदिशी बेडेकर, विद्या भागवत, व्हायोलिनवादक मिलिंद रायकर, नात तेजश्री आमोणकर हे त्यांचे काही शिष्य; तसेच रघुनंदन पणशीकर हे शिष्योत्तम त्यांच्या गायकीचा वारसा पुढे नेत आहेत. किशोरी आमोणकरांनी निर्माण केलेल्या खास गानमुद्रेचा प्रभाव नंतरच्या सुमारे तीन पिढ्यांवर पडला असून विशेषत: गायिकांनी त्यांचे अनुकरण केले.

बालवयात झालेल्या हलाखीच्या परिस्थितीचा, माईंच्या सामाजिक स्थानामुळे गोव्यात त्यांना मिळणारी हीन वागवणूक यांचा परिणाम म्हणून की काय, ताईंचा स्वभाव काहीसा हट्टी, एककल्ली व आक्रमक बनला असावा. किशोरी आमोणकरांचे वैयक्तिक आचारविचार न पटणारे लोकही त्यांच्या गायनाने मोहित होतात, हे सामर्थ्य त्यांच्या सांगीतिक कर्तृत्वात आहे. अत्यंत मनस्वी असणाऱ्या या कलावतीच्या लहरीपणाच्या, चमत्कारिक वर्तनाच्या अनेक घटना असल्या तरी त्यांच्या या व्यक्तिगत रूपापेक्षा महत्त्वाचे असणारे त्यांचे अत्यंत संपन्न व लोभस असे सांगीतिक रूप डोळ्यांसमोर ठेवणे इष्ट ठरेल.

देशविदेशांतील महत्त्वाच्या सर्व स्वरमंचांसह आकाशवाणी, दूरदर्शन अशा माध्यमांतून किशोरी आमोणकरांचे गायन रसिकप्रिय झाले. त्यांचे सांगीतिक विचार, भरतनाट्यशास्त्रातील रससिद्धान्ताचा पाठपुरावा स्वत:च्या रागगायनाच्या संदर्भात करणारा त्यांचा 'स्वरार्थरमणी' हा ग्रंथ २००९ साली प्रसिद्ध झाला.

'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९८५), 'पद्मभूषण' (१९८७), 'सनातन संगीत सन्मान' (१९९७), 'गोदावरी गौरव' (१९९८), 'पद्मविभूषण' (२००२), 'आय.टी.सी.एस.आर.ए.' पुरस्कार (२००३), संगीत नाटक अकादमी रत्नसदस्यत्व (२००९), 'पु.ल. देशपांडे बहुरूपी पुरस्कार' (२००९) इ. अनेक पुरस्कारांनी त्यांना सन्मानित केले गेले. तसेच 'गानसरस्वती' (१९८७), 'संगीत सम्राज्ञी' (१९९७), भारत गानरत्न (२००१) असे किताबही त्यांना देण्यात आले. २०११ साली अमोल पालेकर व संध्या गोखले यांनी त्यांच्या सांगीतिक कारकिर्दीवर 'भिन्नषड्ज' हा अनुबोधपट केला.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**


१. *किशोरी आमोणकर विशेषांक; 'संगीत कला विहार'; १९८८.*

२. *मारुलकर, दत्ता; 'गानसरस्वती'; श्रीपाद प्रकाशन, पुणे; २००३.*


## आरोळकर, शरच्चंद्र आत्माराम

**गायक**

**२ डिसेंबर १९१२ - ४ जून १९९४**



शरच्चंद्र आत्माराम आरोळकर यांचा जन्म कराचीमध्ये झाला. बालपणी घरात संगीताला पोषक वातावरण नव्हते. परंतु गाण्याची ओढ असल्यामुळे कराचीतच विष्णू दिगंबर पलुस्करांचे शिष्य लक्ष्मणराव बोडस यांच्याकडे आरोळकर यांनी गायनाचे प्राथमिक धडे गिरविले. वडिलांच्या बदलीमुळे सोलापुरात आल्यावर शालेय शिक्षण चालू असतानाच त्यांनी रहिमत खाँच्या ध्वनिमुद्रिका ऐकल्या. याचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला व या गायकीचा ध्यास घेतलेल्या त्यांनी कुवलयानंद स्वामींचा आदेश घेण्यासाठी लोणावळ्यास प्रयाण केले. स्वामींच्या आदेशानुसार ते कृष्णराव शंकर पंडित यांच्याकडे तालीम घेण्यासाठी ग्वाल्हेरला गेले.

त्यांच्याकडे शिक्षण घेत असतानाच पंडितजींचे चुलते

एकनाथ पंडित यांचे गाणे ऐकण्याचा योग आरोळकरांना आला. हार्मोनिअमवर उत्तम हात असल्यामुळे त्या मैफलीत आरोळकर परवानगी घेऊन त्यांच्या साथीला बसले. त्या वेळी त्यांनी गायलेल्या ललत रागातल्या 'मन सुमिरन' या ख्यालाने आरोळकरांवर जबरदस्त मोहिनी पाडली व हेच ते आपल्याला अभिप्रेत असलेले गाणे याची त्यांना खात्री पटली.

पुढे एकनाथजी मुंबईत खार येथे स्थायिक झाले. चरितार्थासाठी वणवण फिरून बिकट परिस्थितीत शिकवण्या करताकरता वेळ काढून आरोळकर एकनाथजींकडे शिकत असत. आरोळकरांचे आयुष्य घडण्यास हेच शिक्षण कारणीभूत झाले. शिकताना बंदिशीचे शब्द, नोटेशन, टिपण इत्यादी माहिती एखाद्या कागदाच्या कपट्यावर आरोळकर लिहून घेत. रात्री घरी परतल्यावर शिकलेल्या बंदिशींचे चिंतन, मनन व त्यावरचा रियाज असा त्यांचा नित्यक्रम अनेक वर्षे असे. विषयाच्या शास्त्रीय अभ्यासासाठी त्यांना प्रसिद्ध संगीतज्ञ व बीनकार कृष्णराव मुळे यांच्याकडून उत्तम मार्गदर्शन मिळाले. मुळ्यांकडे त्यांनी ख्यालाव्यतिरिक्त ठुमरीचाही अभ्यास केला. बाबा दीक्षितांचे शिष्य गणपतराव आपटे व ठुमरीगायक गणपतभैय्या यांचे गुरुबंधू असल्यामुळे मुळ्यांकडे परंपरेचा वारसा चालत आलेला होता.

ख्यालाप्रमाणेच टप्पा, तराणा, ठुमरी, होरी, भजन हेही गायनप्रकार गाण्यात आरोळकर वाकबगार होते. गायला अवघड, पण ऐकायला सोपे असे त्यांचे गाणे होते. आपल्या विद्येचे आणि कलेचे त्यांनी कधी बाजारी प्रदर्शन केले नाही. आपल्या तत्त्वाशी ते अखेरपर्यंत प्रामाणिक राहिले. त्यांचे विचार मार्मिक आहेत. स्वर-धुन-राग, अक्षर-शब्द-कविता आणि मात्रा-ताल-ठेका या त्रयींचा म्हणजेच राग, कविता व ठेका यांचा एकसमन्वयाच्छेदे केलेला आविष्कार म्हणजे 'ख्यालगायन', हा त्यांचा सिद्धान्त होता.

अभिजात सौंदर्याचा शोध घेणे ही आरोळकरांच्या जीवनाची मुख्य प्रेरणा होती. या सौंदर्याचे अथांग स्वरूप ग्वाल्हेर गायकीच्या अगदी जवळ येते म्हणून त्यांनी ग्वाल्हेर घराण्याला श्रेष्ठ मानले. आपण घेतलेल्या शिक्षणाला स्वत:च्या विचारप्रणालीची उत्तम जोड देऊन त्यांनी श्रोत्यांना सात्त्विक आनंद दिला. यात केसरबाई केरकर, रातंजनकर, विलायत हुसेन, अंतूबुवा जोशी, मिराशीबुवा, मल्लिकार्जुन मन्सूर, सिंदे खाँ, बालगंधर्व, पु.ल. देशपांडे, शिल्पकार र.कृ. फडके अशा अनेक दिग्गजांनी आरोळकरांना उत्स्फूर्तपणे दिलेली दाद म्हणजे बुवांच्या गाण्याचे योग्य मूल्यमापनच म्हटले पाहिजे.

आरोळकरांच्या संगीतातील योगदानाबद्दल त्यांना अनेक मानसन्मान मिळाले. 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार, 'तानसेन' पुरस्कार, 'महाराष्ट्राचा गौरव' पुरस्कार, 'संगीत रिसर्च अकादमी' पुरस्कार, 'सुरसिंगार संसद'ची फेलोशिप हे त्यांतील काही विशेष. त्यांच्याकडील अनेक बंदिशींचे ध्वनिमुद्रण संगीत रिसर्च अकादमीने, तसेच नॅशनल सेंटरनेही आपल्या संग्रहासाठी केले आहे. भोपाळच्या कला परिषदेने त्यांच्यावर एक फिल्म तयार केली असून गोएंका फाउण्डेशननेही बुवांवर एक लघुपट तयार केला आहे. आकाशवाणी, संगीत नाटक अकादमी व संगीत रिसर्च अकादमीने त्यांच्या मुलाखती ध्वनिमुद्रित केल्या आहेत. शरद साठे, नीला भागवत हे त्यांचे प्रमुख शिष्य होत.

आरोळकर विद्याव्यासंगी, निर्व्यसनी, शिस्तप्रिय असे आदर्श गुरू होते. साधना हीच त्यांची आराधना होती. अविवाहित असल्यामुळे 'एकला चालो रे' हा त्यांचा जीवनप्रवास शेवटपर्यंत अव्याहतपणे चालू होता.

— शरद साठे

## इंगळे, केशव गुंडूबुवा

**गायक**

**३ एप्रिल १९०९ - २५ जानेवारी १९६५**

केशव गुंडूबुवा इंगळे यांचा जन्म फलटण येथे झाला. त्यांच्या घराण्यात तीन पिढ्यांचा संगीताचा वारसा होता. त्यांचे आजोबा भिकूबुवा व वडील गुंडूबुवा हे औंध संस्थानात दरबार गायक होते. गुंडूबुवा यांचा जन्म १८७६ साली फलटण येथे झाला. ते



गायनाचार्य बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचे पहिल्या फळीचे शिष्य होते. ते आपले वडील भिकूबुवा यांच्या पश्चात औंध संस्थानात दरबार गायक बनले व तेथे १९१८ पर्यंत होते. नंतर त्याच साली त्यांनी सांगलीत स्वत:चे संगीत विद्यालय काढले, ज्याचे उद्‌घाटन खुद्द बाळकृष्णबुवांच्या हस्ते झाले होते. मात्र ५-६ महिन्यांनी त्यांनी सांगली सोडली व ते मुंबईस आपले गुरुबंधू विष्णू दिगंबर पलुसकर यांच्या गांधर्व महाविद्यालयात गायन शिक्षक झाले. वर्षभरात पुन्हा सांगलीस परतून त्यांनी दुसरे गुरुबंधू अनंत मनोहर जोशी यांसह संगीत विद्यालय चालवले. मग १९२१ ते १९२८ या काळात ते सांगली संस्थानाचे दरबार गायक होते. त्यांनी १९२८ साली पुन्हा सांगलीत 'बाळकृष्ण संगीत विद्यालय' सुरू केले, तथापि १८ डिसेंबर १९२८ रोजी सांगली येथे त्यांचे निधन झाले.

गुंडूबुवांना बाळकृष्णबुवांकडे अस्सल ग्वाल्हेर गायकीची तालीम मिळाली होती. त्यांचा आवाज विशेष चांगला नसल्याने मैफलीचे गवई म्हणून त्यांचा खास लौकिक नसला तरी एक गायनगुरू म्हणून त्यांनी चांगले कार्य केले. त्यांच्या प्रमुख शिष्यांत संगीतशास्त्रकार ग.ह. रानडे, बळवंतराव सहस्रबुद्धे व चिंतामण यज्ञेश्वर जोशी यांचा उल्लेख होतो. आपल्या दोन्ही मुलांसही त्यांनी गायनात चांगले तयार केले होते.

केशव इंगळे यांनी १९०९ ते १९३१ हा जडणघडणीचा काळ औंध व सांगली येथे व्यतीत केला. ते १९२६ साली मॅट्रिक झाले, तर १९२७ साली त्यांनी सांगली येथे गणेशोत्सवात पहिली मैफल सादर केली. ते १ मार्च १९३१ पासून १९५० पर्यंत इचलकरंजी संस्थानचे दरबार गायक म्हणून कार्यरत होते. इचलकरंजीचे संस्थानिक महाराज नारायणराव घोरपडे यांनी १९३० साली संगीतशाळा स्थापन केली होती. या व अन्य शाळांत संगीत शिकवणे व रोज रात्री एक-दीड तास महाराजांस गायन ऐकवणे असा त्यांचा दैनंदिन कार्यपाठ असे. महाराज नारायणराव घोरपडे हे व त्यांचे अन्य नातलगही त्यांच्याकडे संगीत शिकत. त्यांच्या एकंदर संगीतकार्यास महाराजांचे प्रोत्साहन व मोलाचा सहयोग लाभला.

केशव इंगळे यांनी आपल्या वडिलांनी स्थापन केलेल्या बाळकृष्ण संगीत विद्यालयाची पुनर्स्थापना १९४७ साली केली. वडिलांकडून वारशाने मिळालेली ग्वाल्हेर गायकी व आवाजाची अनुकूलता यांमुळे त्यांनी मैफलीचे गायक म्हणूनही नाव कमवले. सोलापूर संगीत परिषद (१९३३), म्हैसूर दरबारचा दसरा उत्सव (१९३५), मॉरिस म्यूझिक कॉलेजने भरवलेली लखनौ संगीत परिषद व मुंबईतील महाराष्ट्र संगीत परिषद (१९३६), अजमेर परिषद (१९४५), जालंधरचा हरवल्लभ संगीत मेळा (१९५८) अशा समारोहांत त्यांचे गायन झाले. त्यांनी १९३८ साली दक्षिण आफ्रिकेत यशस्वी संगीतदौराही केला.

ते १९४२ पासून तत्कालीन मुंबई आकाशवाणीवरून गायन सादर करू लागले. त्यांनी १९४२ सालीच पुण्यात त्यांच्या वडिलांचे गुरुबंधू पं. यशवंतबुवा मिराशी यांचेही मार्गदर्शन घेतले व त्या काळात विनायकराव पटवर्धन यांनी पुण्यात त्यांच्या काही मैफली केल्या.

ते इचलकरंजी संस्थानातील दरबार गायकपदाचा राजीनामा देऊन १९५० साली पुण्यात स्थायिक झाले व तेथे त्यांनी संगीत विद्यालय सुरू केले. त्याचे उद्‌घाटन महर्षी धोंडो केशव कर्वे यांच्या हस्ते झाले होते. त्यांचे १९५० पासून १९६५ म्हणजे मृत्यूपर्यंत पुण्यातच वास्तव्य होते. एक गायनगुरू म्हणून ते कार्यरत असताना गांधर्व महाविद्यालय मंडळ व भारतीय संगीत प्रसारक मंडळीचे परीक्षक म्हणूनही ते काम करत. त्यांच्या योगदानाबद्दल गांधर्व महाविद्यालय मंडळाने १९६१ साली कोल्हापूर येथे मानपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

एक गायक व संगीत शिक्षक या भूमिकांव्यतिरिक्त

संगीतविषयक लेखक म्हणूनही महाराष्ट्रातील संगीतक्षेत्रास केशव इंगळे यांचे मोलाचे योगदान लाभले. 'गोखले घराने की गायकी' हा आपला पहिला ग्रंथ एप्रिल १९३५ साली त्यांनी प्रसिद्ध केला. लखनौचे गवय्ये झाएन-उल्-अबदीन खाँ यांचे शिष्य असणाऱ्या महादेवबुवा गोखले यांच्यामुळे एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून महाराष्ट्रात 'गोखले घराने की गायकी' म्हणून रूढ झालेल्या गायनपरंपरेतील दुर्मीळ बंदिशी, रागवाचक दोहे यांचा संग्रह असलेले बाड त्याच घराण्यातील सदाशिवबुवा गोखले यांच्याकडून केशव इंगळेंना प्राप्त झाले. या बाडाच्या आधारे त्यांनी हा ग्रंथ सिद्ध केला. बाळकृष्णबुवांच्याही आधीपासून महाराष्ट्रात प्रचलित झालेल्या व नंतर लुप्त झालेल्या या परंपरेच्या जतनीकरणाचे महत्त्वाचे कार्य त्यांनी या ग्रंथाद्वारे केले.

केशव इंगळेंनी लिहिलेले व जानेवारी १९३६ साली प्रकाशित झालेले दुसरे पुस्तक म्हणजे 'पंडित गायनाचार्य कै. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचे चरित्र' हे होय. बाळकृष्णबुवांचे पहिले सविस्तर व खात्रीशीर चरित्र म्हणून याचे महत्त्व मोठे आहे.

महाराष्ट्रात ख्यालगायकी रुजली, मात्र ख्यालाच्या बंदिशी ज्या भाषेत असतात, त्या ब्रजसारख्या बोलींचा इकडील गवय्यांचा अभ्यास नसल्याने त्यांचे शब्दोच्चार अशुद्ध असतात, बंदिशींत पाठभेद होतात हे लक्षात घेऊन केशव इंगळेंनी १९५४ साली 'गीतबोधिनी' हे पुस्तक लिहिले. यात त्यांनी अनेक खानदानी बंदिशींच्या ब्रज व अन्य बोलीभाषांतील काव्यांचे सार्थ व शुद्ध पाठ दिले. या तीन ग्रंथांबरोबरच त्यांनी संगीतविषयक अनेक स्फुट लेख तत्कालीन मासिकांत लिहिले. त्यांचा संगीताचा वारसा त्यांचे पुत्र माधव व नातू मिलिंद इंगळे यांनी चालू ठेवला आहे.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

*१. कुलकर्णी, श्यामराव; 'पं. केशवबुवा इंगळे : एक दीपस्तंभ'; न्यू व्हिजन प्रकाशन, पुणे; २००३.*

## इचलकरंजीकर, बाळकृष्णबुवा रामचंद्र

**गायक**

**२४ ऑगस्ट १८४९ - २५ फेब्रुवारी १९२६**



बाळकृष्णबुवा रामचंद्र इचलकरंजीकरांचा जन्म त्यांच्या आजोळी, बेडग येथे झाला. त्यांचे वडील रामचंद्रबुवा चंदूरकर हे कोल्हापूर जवळील चंदूर येथील प्रसिद्ध गवई होते. रामचंद्रबुवांचा भिक्षुकीचा व्यवसाय होता. काही परिस्थितीमुळे हे कुटुंब मिरजला स्थलांतरित झाले. गायकीचे प्राथमिक शिक्षण त्यांना वडिलांकडून प्राप्त झाले तरी आईचा मात्र याला विरोध होता व त्याने भिक्षुकी व्यवसायाकडे लक्ष द्यावे असे तिला वाटत असे.

बाळकृष्ण पाच वर्षांचे असताना त्यांच्या आईचे निधन झाले. वयाच्या पंधराव्या वर्षी बाळकृष्णांचे पितृछत्र हरपले. त्यामुळे काका-काकूंनी त्यांचा संभाळ केला. चुलत्यांनी दिलेल्या अपमानास्पद वागणुकीने व्यथित होऊन ते घरातून बाहेर पडले.

बाळकृष्णांची गायन शिकण्याची मनापासून इच्छा असल्याने त्या दृष्टीने ते प्रयत्न करू लागले. म्हैसाळ या गावी विष्णूबुवा जोगळेकर या गायक व कीर्तनकारांच्या घरी त्यांना आश्रय मिळाला. त्यांनी बाळकृष्णांना पदे व भजने शिकविली. नंतर जत संस्थानात ते आलिदात खाँ यांच्याकडे गायन शिकले. तिथून कोल्हापूरला ते भाऊराव कागवडकर यांच्याकडून गायकी शिकले. परंतु सतत स्थलांतर केल्याने त्यांच्या गायनाध्ययनात बाधा येऊ लागली. त्यांनी काही काळ अमरचंद वाडीकर नाटकमंडळीतही काम केले.

पुढे एक संतपुरुष माणिक प्रभू यांच्या सल्ल्यानुसार ते उत्तरेला धार येथे गेले. त्यांनी तिथले प्रसिद्ध गायक देवजीबुवा परांजपे धारकर यांचे शिष्यत्व पत्करले. देवजीबुवांनी धृपद, धमार-टप्पा गायन शिकवले. परंतु

तिथेसुद्धा गुरुपत्नीच्या कडक स्वभावामुळे धारकर यांचे घर सोडून त्यांना काशीला जावे लागले.

काशीला विजयनगरच्या महाराजांनी त्यांना आश्रय दिला. इथेही त्यांच्या गायन शिक्षणात खंड पडल्याने ते निराश झाले. काही काळ त्यांनी देवीची आराधना करण्यात घालवला. ग्वाल्हेरचे वासुदेवबुवा जोशी यांच्याकडे बाळकृष्णांची तालीम सुरू झाली. येथील शिक्षणानंतर मात्र बाळकृष्णबुवा गायक म्हणून नावारूपास आले. वासुदेवबुवांची तब्येत बिघडली असता त्यांनी त्यांची सेवा केली. मनापासून शुश्रूषा केल्याने गुरूंनी त्यांना, ''तुझी मैफल कधीही बेरंग होणार नाही व तुझा शिष्यसुद्धा विजयपताका फडकवेल,'' असा आशीर्वाद दिला. पुढे वासुदेवबुवांच्या निधनानंतर बाळकृष्णबुवा महाराष्ट्रात मिरजेला स्थायिक झाले. स्वतःला पडलेले कष्ट इतर शिष्यांना होऊ नयेत म्हणून त्यांनी मुंबईला १८८५ साली गायन विद्यालय स्थापन केले. अनेक विद्यार्थ्यांना त्यात त्यांनी गायनशिक्षण दिले व त्याचबरोबर 'संगीत दर्पण' नावाचे मासिक चालवले, जे पुढे पुस्तकरूपात प्रसिद्ध झाले.

अनेक बैठकी गाजवीत व गायनाचा प्रचार करीत बाळकृष्णबुवा मुंबईहून पुणे व पुण्याहून सातारा संस्थान व नंतर औंधला आले. औंधच्या राजेसाहेबांनी त्यांचे गायन ऐकले व त्यांना राजाश्रय दिला. पुढे १८८७ साली ते मिरजेला स्थायिक झाले. हद्दू-हस्सू खाँच्या वेळची अस्सल ग्वाल्हेर गायकी जी त्यांना वासुदेवबुवांकडून प्राप्त झाली होती, ती त्यांच्या गळ्यात होती. ही गायकी अस्ताई (स्थायी), अंतऱ्यासाठी प्रसिद्ध होती. शिवाय बडे महंमद खाँकडूनही त्यांना विद्या मिळाली होती. त्यांच्याजवळ अनेक चिजांचा भरणा होता.

घराण्याच्या शिस्तीप्रमाणे गायला बसल्यावर प्रत्येक चिजेची अस्ताई दोनदा व एकदा अंतरा भरल्यावरच ते गायनाला आरंभ करीत. मध्य षड्जापासून ते सप्तकाच्या मध्यम पंचमापर्यंत एकेक स्वर घेऊन बढत करून बुवा अंतऱ्यावर जात. अंतऱ्याचे आलाप करून पुन्हा स्थायीवर येऊन मग बोलबाट आणि शेवटी ताना हा गायकीचा क्रम असे. डाव्या हाताने स्वतः डग्गा धरून व उजव्या हाताने तंबोरा वाजवून ते कैक तास मेहनत करीत. त्यांची गायकी साधी आणि निर्मळ होती व त्यांच्या ख्यालाची लय ग्वाल्हेर पद्धतीप्रमाणे थोडी जलद असे.

बाळकृष्णबुवांच्या पूर्वीही महाराष्ट्रात रागदारी संगीत होते. मात्र बाळकृष्णबुवांनी या संगीताचा प्रसार आपल्या शिष्यवर्गाद्वारे विस्तृतपणे केला. म्हणून बाळकृष्णबुवांना ग्वाल्हेर घराण्याची ख्यालगायकी महाराष्ट्रात रुजवण्याचे श्रेय दिले जाते. त्यांची विशाल शिष्यशाखा अशी : गुंडूबुवा इंगळे, विष्णू दिगंबर पलुसकर, अनंत मनोहर जोशी, यशवंतबुवा मिराशी, वामन चाफेकर, नीळकंठ जंगम, भाटेबुवा, काळेबुवा, म्हैसकरबुवा, पाध्येबुवा इ. त्यांच्या सांगीतिक कार्यामुळे 'संगीताचार्य', 'ख्यालगायकीचे भीष्माचार्य' अशा शब्दांत त्यांना गौरविले गेले. महाराष्ट्राबाहेर लाहोर, अंबाला ते कलकत्ता आणि नेपाळ ते म्हैसूर असे भारतभ्रमण करून त्यांनी मैफली गाजवल्या. तत्कालीन थोर संगीतशास्त्री सौरिंद्रमोहन टागोर यांनी कलकत्ता येथे बुवांना सन्मानपूर्वक निमंत्रित करून त्यांना सुवर्णपदक प्रदान केले होते.

गायनामध्ये सातत्य, चिकाटी हे गुण शिष्यांमध्ये यावेत म्हणून ते सतत प्रयत्नशील असत. याचा एक अनुभव असा, की एकदा मिरजेला प्लेगची साथ पसरली असता लोक घरे सोडून जात, त्यामुळे चोऱ्यांचे प्रमाण वाढले. त्यावर बाळकृष्णबुवांनी एक उत्कृष्ट तोडगा काढून रोज रात्री ११ ते पहाटे ४ पर्यंत सर्व शिष्यांना तालीम द्यायला सुरुवात केली. रात्रभर तालीम होत असल्याने गावात जाग असे व त्यामुळे चोरीला आळा बसला, सोबतच आजाऱ्यांकडे लक्षही दिले जात असे. त्यांच्या शिष्यांना अनेक राग पाठ झाले. अनेक चिजा त्यांच्या पदरी पडल्या.

१८९८ साली पत्नीच्या निधनानंतर बाळकृष्णबुवांच्या तरुण पुत्राचे अण्णाबुवांचेसुद्धा १९२४ मध्ये निधन झाले, त्यामुळे बाळकृष्णबुवा दुःखी झाले.

त्यामुळे त्यांची प्रकृती ढासळली. त्यांना दम्याचा असह्य त्रास झाला. त्यामुळेच बाळकृष्णबुवांचे इचलकरंजी येथे निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*इंगळे, के. गुं.; गायनाचार्य बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचे चरित्र, इचलकरंजी; १९३६.*

## उत्पात, ज्ञानोबा विठ्ठल
### लावणी गायक, शिक्षक व रचनाकार
### २६ सप्टेंबर १९३५ - १९ जुलै २००६



ज्ञानोबा विठ्ठल उत्पात यांचा जन्म पंढरपूरला झाला. त्यांच्या आईचे नाव सत्यभामा होते. विठ्ठलभक्तीसाठी प्रसिद्ध असलेले पंढरपूर हे त्यांचे गाव आणि आध्यात्मिक विचारधारा जपणारे, पंढरपूरच्या विठ्ठलाची सेवा करणारे, भजन आणि कीर्तनाची परंपरा जपणारे असे त्यांचे कुटुंब आहे. प्रसिद्ध कीर्तनकार वा.ना. उत्पात हे ज्ञानोबांचे चुलतबंधू आहेत.

ज्ञानोबांवर लहानपणापासून घरातच कीर्तन, भजन आणि संगीताचे संस्कार झाले. ज्ञानोबा उच्चविद्याविभूषित होते. ते एम.ए.,बी.एड. झाले आणि सोलापूर जिल्ह्यातील मोडलिंब या गावी, माध्यमिक शाळेत त्यांनी शिक्षकाची नोकरी केली. मोडलिंब हे तमाशा आणि संगीतबारीसाठी प्रसिद्ध ठिकाण आहे. इथल्या कलाकेंद्रात सादर होणाऱ्या लावण्यांनी ज्ञानोबांतील सर्जनशील कलावंताला लेखनाची प्रेरणा दिली. त्यांच्या लोकसंगीत, तमाशा आणि लावणीच्या आवडीने त्यांना लावणी क्षेत्रातील श्रेष्ठ रचनाकार बनविले. उत्पातांनी जवळजवळ चाळीस वर्षे लावणीची सेवा केली. जुन्यातली जुनी लावणी ज्ञानोबांकडे हमखास मिळे. 'मराठी पारंपरिक लावणी संग्रह' आणि 'घुंगूरचाळा' अशी दोन लावणीची पुस्तके त्यांच्या नावावर प्रसिद्ध आहेत. 'घुंगूरचाळा' या पुस्तकात त्यांच्या स्वतःच्या लावण्या आहेत. शेकडो जुन्या आणि नव्या लावण्यांचे पाठांतर आणि त्यांचे मूळ चालींसह गायन हे ज्ञानोबांच्या व्यक्तिमत्त्वाचे खास वैशिष्ट्य होते.

स्वातंत्र्यानंतर तमाशात मोठा बदल झाला. तो अधिकाधिक व्यावसायिक बनला. प्रेक्षकांची अभिरुचीही बदलली. त्यात चित्रपट, नाटकाच्या प्रभावाने नवेनवे बदल होत गेले. लावणीचे सादरीकरण, व्यावसायिक मागणी आणि वाढती लोकप्रियता अशा बदलत्या सांस्कृतिक संक्रमणाच्या काळात ज्ञानोबांचे योगदान महत्त्वपूर्ण आहे.

ज्ञानोबांकडे जुन्या लावण्यांचा खजिना तर होताच; पण त्यांनी स्वतः रचलेल्या लावण्यांची संख्याही थोडी नाही. 'चला जेजुरीला जाऊ' ही चित्रपटात गाजलेली त्यांची लावणी प्रसिद्ध आहे. 'माडीवरती उभी राहिली, वाट पाहिली काल, वाटलं होतं तुम्ही याल' ही ज्ञानोबांची लावणी तर महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत गाजली आहे. ज्ञानोबांच्या लावणीत शृंगार होताच; पण त्यातल्या शृंगाराला शालीनता आणि विद्वत्तेची जोड असायची, त्यामुळेच त्यांची लावणी अश्लील न होता प्रासादिक झाली. 'नुसतं हसून चालायचं नाही, राया मी तुमच्याशी बोलायची नाही' किंवा 'तुमच्या आवडीचा शालू नेसले, चोळी किणखापी लाल, तुमच्यासाठी तयार ठेवले नरम गुलाबी गाल' अशा ज्ञानोबांच्या कितीतरी प्रसिद्ध लावण्या सांगता येतील. ज्ञानोबांनी लावणी वाङ्मयातील सर्व प्रकारांत लेखन केले. चौकाची लावणी, बालेघाटी लावणी, नगरी छक्कड, फटका, स्फुट लावणी असे लावणीचे विविध प्रकार त्यांनी लिहिले आणि सादर केले.

तमाशातल्या कलावंतिणीने शाहिराला लावणी लिहून मागावी व ती बोर्डावर सादर करावी, हा प्रकार शाहीर पठ्ठे बापूराव यांच्यानंतर लुप्त झाला होता; पण ती परंपरा ज्ञानोबा उत्पातांनी जतन केली. आजही महाराष्ट्रातील अनेक तमाशा फडांत, संगीत नाट्यगृहांत, संगीत पार्ट्यांत ज्ञानोबांच्या लावण्या गायल्या जातात.

ज्ञानोबांची लावणी जुन्या परंपरेतील आहे व त्यांच्या

लावणी रचनेला आधुनिकतेचा स्पर्श आहे. त्यांनी लावणीला दिलेल्या चाली मोहक व आकर्षक आहेत. साहित्य आणि संगीताचा सुरेख संगम त्यांच्या लावणीत पाहायला मिळतो.

शाहीर राम जोशी, होनाजी, सगनभाऊ आणि पठ्ठे बापूराव या पारंपरिक शाहिरांचा प्रभाव ज्ञानोबांच्या लावणीत स्पष्टपणे दिसतो. त्यामुळे भाषासौंदर्य, शृंगाराची उधळण आणि प्रासादिकता हे सारेच गुण ज्ञानोबांच्या लावणीरचनेत एकवटल्याचा प्रत्यय येतो. ज्ञानोबा उत्पातांच्या लावणीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या लावणीत अभिनयाची भावगर्भता आहे. नृत्यानुकूल लावण्यांची रचना करून त्यांना ज्ञानोबांनी दिलेल्या नादमधुर चाली आजही लावणी रसिकांच्या मनांचा ठाव घेतात.

ज्ञानोबा उत्पातांच्या लोकसंगीतातील या कार्याबद्दल महाराष्ट्र शासनाने त्यांना 'जीवनगौरव' पुरस्कार देऊन सन्मानित केले. पुणे महानगरपालिकेने त्यांचा 'पठ्ठे बापूराव' पुरस्कार देऊन गौरव केला, तर भुसावळ येथील दलित साहित्य अकादमीने त्यांना 'राम जोशी लावणी जतन' पुरस्कार देऊन सन्मानित केले. कॅलिफोर्निया विद्यापीठाने आपल्या संग्रहालयात त्यांच्या जुन्या लावण्यांच्या ध्वनिफिती ठेवून त्यांचा आंतरराष्ट्रीय स्तरावर बहुमान केला. त्यांचे वयाच्या एकाहत्तराव्या वर्षी पंढरपूर येथे निधन झाले.

– प्रा. डॉ. मिलिंद कसबे

***

क

# क



## कडकडे, अजित सदानंद

**गायक**

**११ जानेवारी १९५५**



अजित सदानंद कडकडे यांचा जन्म गोव्यातील डिचोली या गावात झाला. त्यांचे शालेय शिक्षण गोव्यातच झाले. त्यांच्या घरात तशी संगीताची परंपरा नव्हती, तरीही आईवडिलांच्या आग्रहाने लहान वयातच गुरू सखाराम बर्वे यांच्याकडे ते हार्मोनिअम शिकले. त्याचबरोबर त्यांनी माडिये गुरुजींकडे गाण्याचे शिक्षणही घेतले.

इंटरमध्ये शिकत असताना त्यांनी पं. जितेंद्र अभिषेकी यांची मैफल ऐकली. पंडितजींच्या गायकीने त्यांच्या मनात गाण्याची ओढ निर्माण झाली. वडिलांकडे हट्ट करून त्यांनी मुंबई गाठून पं. जितेंद्र अभिषेकी यांची भेट घेतली. त्यांना अभिषेकी यांनी इंटर सायन्सचे उर्वरित शिक्षण पूर्ण करून येण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी इंटर सायन्स पूर्ण करून पुन्हा मुंबई गाठली.

अजित कडकड्यांनी वयाच्या विसाव्या वर्षी गाणे शिकण्यास सुरुवात केली. दोन वर्षांनंतर त्यांची तयारी बुवांच्या पसंतीस उतरली व त्यांना ‘संत गोरा कुंभार’ या संगीत नाटकात संत नामदेवांची भूमिका वठविण्याचे बुवांनी सांगितले. नाटकाची आवड नसूनही, गुरूंची आज्ञा म्हणून त्यांनी ते काम स्वीकारले. पहिलेच काम असल्यामुळे अभिनयाव्यतिरिक्त नाटकातील इतर कामांची जबाबदारीदेखील त्यांच्यावर पडत असे. या नाटकाचे ऐंशी प्रयोग झाले. त्यानंतर ‘संगीत संशय कल्लोळ’, ‘महानंदा’, ‘कधीतरी, कोठेतरी’, ‘संगीत सौभद्र’, ‘संगीत शारदा’, ‘कुलवधू’ आणि ‘अमृत मोहिनी’ अशा नाटकांमध्ये त्यांनी वेगवेगळ्या भूमिका वठवल्या. अमृत मोहिनीनंतर त्यांनी नाटकांना रामराम ठोकला.

डोंबिवलीतील एका कार्यक्रमात पं. गोविंदप्रसाद जयपूरवाले यांनी अजित कडकडे यांचे गाणे ऐकले व त्यांना शिकवण्याची तयारी दर्शवली. त्याप्रमाणे त्यांच्याकडे कडकडे यांनी सुमारे अडीच वर्षे बंदिशी, गझल आणि हिंदी भक्तिगीतांचे धडेदेखील गिरवले.

अशोक पत्की या संगीत दिग्दर्शकांना कडकडे यांचा आवाज आवडला आणि त्यांनी ध्वनिमुद्रिकेसाठी त्यांना गायनाची संधी दिली. त्यानंतर ध्वनिमुद्रिका, ध्वनिफिती व ध्वनिचकत्या असा काळाबरोबर प्रवास करत अजित कडकडे यांनी गायन क्षेत्रात आपले स्थान पक्के केले.

प्रभाकर पंडित यांनी काढलेल्या ‘देवाचिये द्वारी’ ही पहिली स्वतंत्र ध्वनिफित खूप गाजली. त्यानंतर अजित कडकडे यांच्या स्वतंत्र गाण्याच्या ध्वनिफिती येऊ लागल्या. दरम्यानच्या काळात संगीतकार नंदू होनप यांची गाठ पडली आणि ‘अजित कडकडे-नंदू होनप’ हे समीकरण रसिकांनी उचलून धरले. महाराष्ट्रातील जवळपास सर्व देवदेवतांच्या गाण्यांच्या, तसेच भजनांच्या ध्वनिफिती या द्वयीने रसिकांपुढे आणल्या. ‘अष्ट स्तुती सुमनांजली’, ‘लाडोबा गोविंद’, ‘पांडुरंग श्रीरंग’ अशा ध्वनिफिती गाजल्या. त्यानंतर साईबाबा, अक्कलकोट स्वामी, गजानन महाराज, श्रीगुरुदेव दत्त अशा दैवी अवतारांवरची गाणीदेखील त्यांनी गायली. या द्वयीने सादर केलेली ‘दत्ताची पालखी’ ही ध्वनिफीत चिरकाल रसिकांच्या स्मरणात राहिली.

अजित कडकडे यांच्या ध्वनिफितींनी विक्रीचे नवे उच्चांक गाठले. ‘देवाचिये द्वारी’: डबल प्लॅटिनम, ‘शिर्डी माझे पंढरपूर’: प्लॅटिनम, ‘छंद विठ्ठलाचा’ : प्लॅटिनम अशा मानांकित सन्मानांनी त्यांचे कौतुक करण्यात आले. नाट्यसंगीतासाठी त्यांना ‘गोल्ड डिस्क’ देण्यात आली. ‘गोष्ट धमाल नाम्याची’ आणि ‘आई पाहिजे’ या चित्रपटांतील पार्श्वगायनासाठी महाराष्ट्र शासनाचा ‘सर्वोत्कृष्ट पार्श्वगायक’ हे सन्मानही त्यांना मिळाले आहेत.

— अमोल ठाकुरदास

## कपिलेश्वरी, बाळकृष्ण लक्ष्मण

**गायक**

**१४ नोव्हेंबर १८९६ — २६ सप्टेंबर १९८२**



किराणा घराण्याचे अध्वर्यू उ. अब्दुल करीम खाँसाहेब यांचे पट्टशिष्य बाळकृष्ण लक्ष्मण कपिलेश्वरी यांचा जन्म गोव्यात झाला. त्यांचे वडील लक्ष्मणराव कपिलेश्वरी हे मूळचे गोव्याचे. त्यांना संगीत व नाटक यांची अत्यंत आवड होती. ‘स्त्री संगीत नाटक कंपनी’चे ते चालक होते. अब्दुल करीम खाँ साहेबांना महाराष्ट्रात बस्तान बसवण्यासाठी लक्ष्मणराव कपिलेश्वरी यांनी सर्वतोपरी साहाय्य केले. लक्ष्मणरावांनी आपली तीन मुले (बाळकृष्ण, शंकर व हरिश्चंद्र) ‘आयुष्यभर संगीत साधना करणार’ अशा प्रतिज्ञेवर खाँ साहेबांच्या स्वाधीन केली. यांपैकी बाळकृष्णबुवा हे खाँ साहेबांच्या ‘उपदेशक वर्गा’चे विद्यार्थी बनले. जे विद्यार्थी भविष्यात गायक म्हणून मोठे नाव कमावण्याची क्षमता बाळगत व जे प्राथमिक विद्यार्थ्यांसाठी अध्यापनही करू शकत, असे विद्यार्थी ‘उपदेशक’ वर्गात असत. म्हणजेच प्रथमपासूनच खाँ साहेबांना बाळकृष्ण बुवांबाबत मोठ्या अपेक्षा होत्या. खाँ साहेबांच्या बहुतेक सर्व मैफलींमध्ये बाळकृष्णबुवा तंबोऱ्यावर बसून गायनसाथ करीत व शंकरबुवा कपिलेश्वरी पुढील काळात संवादिनीची साथ करीत.

बाळकृष्णबुवांनी बेळगाव येथे १९१४ मध्ये ‘सरस्वती संगीत विद्यालय’ स्थापन केले. हे विद्यालय २४ जून १९२० रोजी मुंबई येथे स्थलांतरित केले गेले. बाळकृष्णबुवा व शंकरबुवा मुंबईतील विद्यालय सांभाळत, तर हरिश्चंद्रबुवा खाँ साहेबांनी पुण्यात स्थापन केलेले ‘आर्य संगीत विद्यालय’ सांभाळत. १९३० मध्ये खाँ साहेबांनी बाळकृष्णबुवांना ‘खिलाफत’ दिली, म्हणजेच आपला उत्तराधिकारी म्हणून घोषित केले. त्यांना ‘खास-उल-खास’ अशी तालीम दिली. ते आयुष्यभर खाँ साहेबांच्या मागे सावलीसारखे वावरले.

बाळकृष्णबुवांनी ‘श्रुतिदर्शन’ १९६४ मध्ये हा ग्रंथ लिहिला. अब्दुल करीम खाँ साहेबांनी आयुष्यभर स्वर, श्रुती, सप्तक यांवर जे संशोधन केले, ते या ग्रंथामध्ये मांडलेले आहे. खाँ साहेब, क्लेमंट, देवल व अन्य पंडित यांच्यामध्ये झालेल्या चर्चा व २२ श्रुतींची सप्रमाण चिकित्सा या ग्रंथामध्ये केली आहे. प्राचीन भारताचे स्वरसप्तक हे भैरवी सदृश कोमल स्वरांचे असावे असा सिद्धान्त यामध्ये मांडला आहे.

बाळकृष्णबुवांनी लिहिलेला दुसरा महत्त्वपूर्ण ग्रंथ म्हणजे ‘अब्दुल करीम खाँ साहेब यांचे जीवनचरित्र’ (१९७२) होय. ऐतिहासिकदृष्ट्या हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे. मुंबईच्या ‘सरस्वती संगीत विद्यालया’मधून बाळकृष्णबुवांनी अनेक शिष्यांना शिकवले. बुवांची मुले चंद्रशेखर व सुधा पेडणेकर यांनाही उत्तम तालीम मिळालेली होती.

स्वत: एक कलाकार म्हणून मैफली करण्यापेक्षाही खाँ साहेबांची विद्या ग्रहण करून व्यासंग वाढवणे, खाँ साहेबांचे सांगीतिक व वैयक्तिक व्यवहार सांभाळणे, विद्यालय चालवणे, ग्रंथलेखन करणे यांमध्ये बाळकृष्णबुवांनी आपले जीवन व्यतीत केले.

— डॉ. पौर्णिमा धुमाळे

क

## कल्याणपूर, सुमन रमाकांत
**गायिका**
**२८ जानेवारी १९३७**



सुमन रमाकांत कल्याणपूर या मराठी चित्रपटगीते आणि भावगीतांच्या आघाडीच्या गायिका आहेत. आपल्या मधुर आवाजामुळे त्यांनी पार्श्वगायनाच्या क्षेत्रात मराठी व हिंदी चित्रपटसृष्टी गाजविली. त्यांचा जन्म बंगालमध्ये कोलकाता (भवानीपूर) येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव शंकरराव हेमाडी, तर आईचे नाव सीताबाई. हेमाडी हे चित्रापूर-सारस्वत ज्ञातीचे; अतिशय सुसंस्कृत, घरंदाज, साहित्यप्रेमी आणि संगीतप्रेमी असे कुटुंब होते.

सुमन हेमाडी यांचे वडील सेन्ट्रल बँकेमध्ये मोठे अधिकारी होते. त्या लहानपणी बंगाली भाषा उत्तम बोलत. त्यांनी गाणे आणि भरतकाम यांची प्रेरणा आपल्या आईकडून घेतली. पुढे त्यांच्या वडिलांची बदली ढाका येथे झाली. सुमन सेंट झेवियर्स कॉन्व्हेंटमध्ये शिकू लागल्या. त्यांना शाळेत आवडणारी एकमेव गोष्ट म्हणजे शाळेमधील मोठा पियानो. संधी मिळाल्यास त्या कधीकधी पियानोवर बोटे फिरवीत.

सुमन यांच्या शालेय शिक्षणाच्या काळात ढाक्यात दंगे होत. वातावरण अतिशय अस्थिर आणि असुरक्षित असे. त्यांचे वडील स्वभावाने अतिशय दयाळू होते. ढाक्यात दंग्याच्या वेळी बाजारातून तांदूळ गायब होई. अशा वेळी घरातील मोठमोठ्या साठवणीच्या भांड्यांतील तांदूळ त्यांचे वडील गोरगरिबांना व गरजूंना वाटत असत. याच सुमारास दुसऱ्या महायुद्धाचे आणि स्वातंत्र्याचे वारे वाहत होते; त्यामुळे बहुधा १९४२-४३ साली हेमाडी कुटुंबीय मुंबईला आले.

मुंबईला त्यांचे वास्तव्य मॉडेल हाउस येथे होते. त्यांच्या बिल्डिंगमध्ये सुप्रसिद्ध शिल्पकार जोग, तसेच सुप्रसिद्ध संगीतकार केशवराव भोळे राहत. शिल्पकार जोगांकडे सुमन हेमाडी तासन्‌तास त्यांचे काम पाहत बसत. त्यांनी शिकविलेल्या आकृत्या काढणे, ड्रॉइंग काढणे यांत सुमनचा बराच वेळ जात असे.

मुंबईला आल्यावर सुमन हेमाडी यांचे शिक्षण सेंट कोलंबा या शाळेत दुसरीपासून झाले. त्या काळी जनमानसावर चित्रपटाचा मोठा पगडा होता. घरात नभोवाणी ऐकणे ही एकमेव करमणूक असे. हेमाड्यांच्या घरी रेडिओ ऐकण्याला परवानगी होती. त्यामुळे सुमन यांना अशोककुमार, देविकाराणी, सुरैया, नूरजहाँ यांची गाणी म्हणायला गंमत वाटे. गजाननराव वाटव्यांची गाणीही त्या ऐकत असत.

याच काळात केशवराव भोळ्यांच्या पत्नी नामवंत अभिनेत्री व गायिका ज्योत्स्नाबाई भोळे यांचे देखणे रूप आणि सुरेल गाणे यांचा सुमन यांच्या मनावर सुरेल संस्कार झाला. केशवराव भोळे यांच्याकडे त्यांचे संगीत शिक्षण सुरू झाले. त्यांनी तानपुरा कसा लावायचा, शब्दोच्चार कसे करावेत, ऱ्हस्व-दीर्घोच्चाराचे भान कसे ठेवावे, स्वर आणि शब्द न तोडता गाणे सहज कसे म्हणावे, भावगीतात भावनाप्रधान गाणे कसे म्हणावे हेही सुमन यांना शिकविले.

सुमन हेमाडी या १३-१४ वर्षांच्या असताना केशवराव भोळ्यांनी त्यांच्यासाठी दोन गाणी स्वरबद्ध केली होती. ती त्यांनी आकाशवाणीच्या मुंबई केंद्रावर म्हटली होती. सुप्रसिद्ध संगीतकार यशवंत देव यांच्या गाण्याच्या क्लासमध्ये त्या तीन-चार महिने गायन शिकल्या.

मॅट्रिक झाल्यानंतर त्यांनी जे.जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये प्रवेश घेतला. त्या महाविद्यालयाच्या स्नेहसंमेलनामध्ये गाणे म्हणत. एका वर्षी स्नेहसंमेलनाचा प्रयोग खूप चांगला बसला होता. त्यानंतर तोच कार्यक्रम पुन्हा डोंबिवलीला आयोजित केला गेला. या कार्यक्रमाला प्रसिद्ध गायक तलत महमूद आले होते. त्यांनी सुमन यांचे गाणे ऐकून खूप कौतुक केले, तसेच एच.एम.व्ही. कंपनीकडे सुमनच्या आवाजाची शिफारस केली; परंतु त्या वेळी एच.एम.व्ही.ने त्यांचे गाणे

ध्वनिमुद्रित केले नाही.

सुमन हेमाडी यांचे पहिले पार्श्वगायन 'शुक्राची चांदणी' या चित्रपटासाठी झाले. शिल्पकार जोग यांच्या नातेवाइकांनी या चित्रपटाची निर्मिती केली होती. दुर्दैवाने हा चित्रपट प्रदर्शित झाला नाही. परंतु या चित्रपटाच्या ध्वनिमुद्रणाच्या वेळी हिंदीमधील प्रसिद्ध संगीतकार मुहम्मद शफी यांनी सुमनना ऐकले आणि १९५४ साली 'मंगू' नावाच्या हिंदी चित्रपटात त्यांना पार्श्वगायनाची संधी दिली. त्यानंतर त्यांचा हिंदीमधील पार्श्वगायनाचा प्रवास सुरू झाला आणि गाण्याची ओढ वाढली.

सुमन हेमाडी यांचा गाण्याच्या क्षेत्रात प्रवेश झाला, तेव्हा त्यांची मुळाक्षरे केशवराव भोळे यांनी पक्की करून घेतली होती. त्यानंतर तावडेबुवा हे त्यांचे गायन शिक्षक होते. त्यानंतर मास्टर नवरंग नागपूरकरांकडे त्या शिकत होत्या. पुढे त्या उस्ताद अब्दुल रहमान यांच्याकडे शिकू लागल्या.

सुमन यांचा मराठी चित्रपटात पार्श्वगायनाचा प्रवास साधारण १९५५-५६ पासून सुरू झाला. 'देवघर' या चित्रपटात त्या प्रथमच संगीतकार सुधीर फडके यांच्याकडे गायल्या. सुधीर फडके यांनी १९५७ सालचा 'घरचं झालं थोडं' तसेच १९६१ सालचा 'निरुपमा' आणि 'परीराणी' या दोन्ही चित्रपटांतील सगळी गाणी सुमन हेमाडी यांच्याकडून गाऊन घेतली.

सुमन यांनी मराठी चित्रपटांत शेकडो गाणी म्हटली आहेत. मराठीतील नामवंत संगीतकार वसंत प्रभू, वसंत पवार, वसंत देसाई, यशवंत देव, दत्ता डावजेकर, राम कदम, बाळ पळसुले, राम वढावकर, हेमंत केदार, के. दत्ता, मुहम्मद शफी, शंकरराव कुलकर्णी, विश्वनाथ मोरे, अविनाश व्यास, आदिल अहमद, एन. दत्ता, प्रभाकर जोग, श्रीनिवास खळे या संगीतकारांसाठी त्या विविध प्रकार गायल्या आहेत. त्यांची काही गाजलेली चित्रपटगीते : 'देवा दया तुझी की शुद्ध दैव लीला' (चित्रपट : बोलकी बाहुली, संगीतकार : श्रीनिवास खळे), 'जिथे सागरा धरणी मिळते तिथे तुझी मी वाट पाहाते' (चित्रपट : पुत्र व्हावा ऐसा), 'उमलली एक नवी भावना', 'बघत राहू दे तुझ्याकडे' (सोबत सुधीर फडके, चित्रपट : सुभद्राहरण, संगीत : वसंत पवार), 'अरे संसार संसार, जसा तवा चुल्यावर' हे बहिणाबाईंचे अजरामर काव्य (चित्रपट : मानिनी, संगीतकार : वसंत पवार). अशा प्रकारे सुमन हेमाडी यांचा हिंदी, मराठी व इतर भाषांतील गीतांचा आलेख वर चढत होता. साठच्या दशकात त्या विवाहबद्ध झाल्या. पूर्वीच्या सुमन हेमाडी आता सुमन कल्याणपूर झाल्या. नंदाशेठ (रमाकांत) कल्याणपूर यांच्याशी त्यांचा विवाह झाला. कन्या चारूलचे उत्तम संगोपन करून सुमन कल्याणपूर पुन्हा नवीन गाणी गात होत्या. त्यांतील काही उल्लेखनीय गाणी अशी : 'गेला सोडूनी मजसी कान्हा', 'कशी करू स्वागता', 'असे हे जगाचे चक्र फिरे बाळा', 'कशी गवळण राधा बावरली'. त्यांचे १९७७ सालच्या 'बाळा गाऊ कशी अंगाई' या चित्रपटात 'निंबोणीच्या झाडामागे चंद्र झोपला ग बाई, आज माझ्या पाडसाला झोप का ग येत नाही' हे हळुवार अंगाईगीत आहे. या गीताचे संगीतकार होते एन. दत्ता.

सुमन कल्याणपूर यांनी भारतातील तेरा विविध भाषांमध्ये गाणी म्हटली आहेत. महाराष्ट्र, गुजरात व ओरिसा राज्य सरकारांचे उत्कृष्ट पार्श्वगायनाचे पुरस्कार त्यांना लाभले आहेत. पार्श्वगायिकांमध्ये परदेशांत कार्यक्रम करणाऱ्या त्या पहिल्या गायिका आहेत. त्यांनी १९६९ आणि १९७१ मध्ये ब्रिटिश गयाना, सूरीनाम, त्रिनिदाद व अमेरिका या देशांचा दौरा केला.

सुमन कल्याणपूर यांनी १९८१ साली चित्रपटांसाठी गाणे थांबविले. चित्रपटसंगीत आणि चित्रपटांचे प्रवाह बदलत होते. त्यानंतर त्यांनी देशोदेशीचा प्रवास केला. त्यांच्या चित्रपटगीतांइतकीच भावगीतांची कारकीर्दसुद्धा समृद्ध आहे. वसंत प्रभू, दशरथ पुजारी, सुधीर फडके, विश्वनाथ मोरे, अशोक पत्की, श्रीनिवास खळे इत्यादी संगीतकारांकडे त्यांनी गायलेली अनेक भावगीते गाजलेली आहेत. सुरुवातीच्या काळात दशरथ पुजारी यांनी काव्यांना चाली लावाव्यात, सुमन कल्याणपूर यांनी ती गीते गावीत आणि त्या भावगीतांना उदंड लोकप्रियता

क

लाभावी हे साधारण एका तपापेक्षा जास्त काळ सुरू होते.

दशरथ पुजारी यांच्याकडे सुमन कल्याणपूर साधारणत: ४० गाणी गायल्या आहेत, त्यांपैकी जवळजवळ २५ भावगीते असावीत. 'असावे घर ते अपुले छान', 'आस आहे अंतरी या उर्मिला मी निरोप तुज देता', 'जुळल्या सुरेल तारा', 'ते नयन बोलले काहीतरी', 'मृदुल करांनी छेडित तारा', 'मस्त ही हवा नवी वाटते नवे नवे' (सोबत दशरथ पुजारी), 'झिमझिम झरती श्रावणधारा', 'रे क्षणाच्या संगतीने मी अशी भारावली'; वसंत प्रभूंकडे 'दिन रात तुला मी किती स्मरू', 'हले हा नंदाघरी पाळणा', 'पिवळी पिवळी हळद लागली'; 'शब्द शब्द जपुनी ठेव, बकुळीच्या फुलापरी' या सुंदर भावगीताला विश्वनाथ मोरे यांचे संगीत आहे. 'मी चंचल होऊन आले', 'जादू अशी घडे ही या दोन लोचनांची' (सोबत अरुण दाते) ही संगीतकार श्रीनिवास खळे यांच्याकडे गायलेली गाणी; 'कुणी निंदावे वा वंदावे', 'नाविका रे वारा वाहे', 'केतकीच्या बनी तिथे नाचला ग मोर' ही अशोक पत्की यांच्याकडे गायलेली काही भावगीते. सुरुवातीच्या काळात जसे दशरथ पुजारी चाल बांधत आणि सुमन कल्याणपूर त्यांच्या गोड गळ्याने गाऊन ती लोकप्रिय करीत, त्याचप्रमाणे सत्तरच्या दशकात अशोक पत्की उत्तमोत्तम काव्यांना चाली लावून त्या सुमन कल्याणपूर यांच्याकडून गाऊन घेत व त्या लोकप्रियतेचा उच्चांक गाठत.

दशरथ पुजारी यांनी 'अजून त्या झुडुपांच्या मागे' याआपल्या आत्मचरित्रात सुमन कल्याणपूर यांच्या गाण्यांविषयी अतिशय मार्मिकपणे लिहिलेले आहे : 'सुमन कल्याणपूर यांचा आवाज गोड तर आहेच; पण त्यामध्ये भाव प्रकट करण्याची एक महान शक्ती आहे व त्या गाताना इतक्या तल्लीन होऊन गात असत, की त्यांचं लक्ष तेव्हा आजूबाजूला कुठेही नसायचं - फक्त त्या गाण्यामध्ये, त्या स्वरांमध्ये. त्यांनी गायिलेली सर्व गाणी अप्रतिम आहेत. शब्दावर कुठे जोर द्यायचा, कुठे हलकेच म्हणायचा याबद्दल त्यांच्या मनातल्या कल्पना पक्क्या आहेत.' या साऱ्या गुणांमुळे सुमन कल्याणपूर यांची सगळी भावगीते आजही लोकप्रिय आहेत.

– अद्वैत धर्माधिकारी

**संदर्भ :**

१. *तेरणीकर, सुलभा; 'चंदेरी आठवणी'.*
२. *पुजारी, दशरथ; 'अजून त्या झुडुपांच्या मागे'.*

## कल्ले, कृष्णा
**गायिका**
**१८ डिसेंबर १९४०**



कृष्णा कल्ले यांचा जन्म मुंबईत झाला. परंतु, वडिलांच्या नोकरीमुळे त्यांचे वास्तव्य कानपूरमध्ये होते. त्यांचे वडील संगीताचे जाणकार होते आणि आत्या तारा कल्ले या एक प्रथितयश गायिका होत्या. शालेय शिक्षणाबरोबरच त्यांचे संगीताचे प्राथमिक शिक्षण दरभंगा घराण्याचे रामसेवक तिवारी आणि रामपूर घराण्याचे अफझल हुसैन निझामी यांच्याकडे झाले. नंतर सुगम संगीताचे शिक्षण त्यांनी कानपूरचे युनुस मलिक यांच्याकडे घेतले. महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना त्यांनी अनेक राष्ट्रीय स्तराच्या गायनस्पर्धांमध्ये पहिले स्थान पटकावले. कृष्णा कल्ले यांना १९५८ साली सैगल मेमोरिअलतर्फे होणाऱ्या गायनस्पर्धेमध्ये पहिले पारितोषिक व 'गोल्डन व्हॉइस ऑफ इंडिया' हा मानाचा किताब मिळाला.

कानपूरमध्ये शिक्षण पूर्ण करून, लग्नानंतर त्या १९६४ साली मुंबईमध्ये आल्या. कानपूरमध्ये त्या आकाशवाणीवर 'अ' श्रेणीच्या कलाकार होत्या. मुंबईमध्ये आल्यावर परत परीक्षा द्यावी लागेल का? हे विचारण्यासाठी त्या आकाशवाणी केंद्रावर गेल्या. त्या वेळी संगीत विभागाचे मुख्य यशवंत देव होते. कृष्णा कल्ले यांचा आवाज आवडल्यामुळे यशवंत देव यांनी त्यांच्या आवाजात मराठी गाणे ध्वनिमुद्रित करायचे

ठरवले. आपल्याला मराठी अजिबात येत नाही, आपण फक्त हिंदीमध्ये गाऊ शकतो, असे कृष्णा कल्ले यांनी नम्रपणे सांगितले. पण यशवंत देव यांनी त्यांच्याकडून मराठी गाणे गाऊन घेण्याची संपूर्ण जबाबदारी उचलली आणि त्यांच्याकडून 'मन पिसाट माझे अडले रे' हे पहिले मराठी गाणे आकाशवाणीसाठी गाऊन घेतले.

एच.एम.व्ही.ने कृष्णा कल्ले यांच्या स्वरात या गीतासह आणखी तीन गाण्यांची ध्वनिमुद्रिका काढली. ही सर्वच गाणी अतिशय लोकप्रिय झाली. त्यानंतर वंदना विटणकर यांचे 'परीकथेतील राजकुमारा' हे गीत संगीतकार अनिल मोहिले यांनी कृष्णा कल्ले यांच्याकडून गाऊन घेतले. त्या गाण्याने लोकप्रियतेचा उच्चांक गाठला आणि अनिल मोहिले यांना संगीतकार म्हणून मान्यता मिळाली.

संगीतकार दत्ता डावजेकर यांनी कृष्णा कल्ले यांच्याकडून 'पडछाया' या चित्रपटासाठी 'उठ शंकरा सोड समाधी....' हे शास्त्रीय बैठक असलेले गीत गाऊन घेतले. श्रीनिवास खळे यांनी 'मैना राणी चतुर शहाणी'सारखी सुंदर गाणी त्यांच्याकडून गाऊन घेतली. अशा सर्व मातब्बर संगीतकारांनी कृष्णा कल्ले यांच्याकडून मराठी गीते गाऊन घेतली. मराठी मातृभाषा नसतानाही अनेक मराठी गाणी गाणाऱ्या गायिका म्हणून त्या यशस्वी झाल्या. हिंदीतील संगीतकारांनीही कृष्णा कल्ले यांच्याकडून अनेक हिंदी चित्रपटांसाठी गीते गाऊन घेतली. त्यांची १०-१२ वर्षांच्या काळात जवळपास ५०० गाणी ध्वनिमुद्रित झाली.

त्यांच्या पतीचे १९७९ मध्ये निधन झाले. त्याच सुमारास चित्रपट संगीतसृष्टीच्या राजकारणाच्या त्या बळी ठरल्या. वैयक्तिक आयुष्यात आलेले एकटेपण आणि संगीत क्षेत्रामध्ये आलेले दारुण अनुभव यांमुळे चित्रपटसृष्टीतून त्यांना निवृत्ती पत्करावी लागली. त्यांनी १९८५ साली संगीतकार मनोहर राय यांच्याशी विवाह केला. त्यांच्यासह सुगम संगीत, भजन आणि गझलचे अनेक कार्यक्रम केले. आकाशवाणीकरिता त्या शंभरहून अधिक रचना गायल्या. काही रचनांना त्यांनी स्वत:ही संगीत दिले.

त्यांना महाविद्यालयात असताना १९५६ ते १९६० च्या दरम्यान चित्रपट संगीताची कारकीर्द सुरू होण्याआधी डॉ. राधाकृष्णन यांच्या हस्ते राष्ट्रपती पुरस्कार, डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते आकाशवाणीचे सुवर्णपदक, नभोवाणी मंत्री वसंत साठे यांच्या हस्ते राष्ट्रीय पुरस्कार, इंदिरा गांधी यांच्या हस्ते कानपूर येथील युवा महोत्सवात प्रथम पारितोषिक असे अनेक पुरस्कार मिळाले होते.

''अस्सल कोल्हापुरी उच्चार करून ग्रामीण लोकगीते, लावण्या, झगडे, नृत्यगीते आणि सवाल-जवाब असे सर्व गानप्रकार उत्तम प्रकारे हाताळणारी, तसेच गाण्याच्या अर्थाला धरून इतके इरसाल उच्चार करून गाण्यात ग्रामीण मराठी उच्चाराचा ठसका इतक्या सहजपणे आत्मसात करणारी आणि माझी सर्वाधिक गाणी गाणारी अमराठी गायिका म्हणजे कृष्णा कल्ले,'' या शब्दांत गीतकार जगदीश खेबूडकर यांनी या गायिकेचे कौतुक केले.

त्यांना १९९० च्या सुमारास उच्च रक्तदाबाचा त्रास सुरू झाला आणि त्यांची तब्येत खालावल्यामुळे १९९२ पासून त्यांनी कार्यक्रम बंद केले असून त्या पतींसह समाधानी आयुष्य व्यतीत करत आहेत.

— वसुधा कुलकर्णी

## कशाळकर, उल्हास नागेश

**गायक**

**१४ जानेवारी १९५५**



उल्हास नागेश कशाळकर यांचा जन्म विदर्भातील पांढरकवडा या तालुक्याच्या गावी झाला. त्यांचे वडील व्यवसायाने वकील होते. छोट्याशा गावात वकिली करता करता त्यांनी गाण्याचा छंद जोपासला. उल्हास हे

त्यांचे सर्वांत धाकटे चिरंजीव. अत्यंत कोवळ्या वयातच त्यांच्यावर संगीताचे संस्कार झाले. पाचव्या वर्षीच वीस वेगवेगळे राग ओळखून दाखवण्याबद्दल त्यांचे फार कौतुक झाले.

शालेय शिक्षण पूर्ण केल्यावर नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामध्ये संगीत विषय घेऊन त्यांनी एम.ए. या पदवी परीक्षेत सुवर्णपदक पटकावले. त्या वेळी खर्डेनवीस, राजाभाऊ कोगजे या गायकांचे त्यांना मार्गदर्शन लाभले. त्यानंतर त्यांना केंद्रशासनाची शिष्यवृत्ती मिळाली. त्या अंतर्गत त्यांना सुप्रसिद्ध गायक नट पं. राम मराठे यांच्याकडे तालीम मिळाली.

याच काळात त्यांनी ग्वाल्हेर घराण्याचे गायक पं. गजाननराव जोशी यांचे शिष्यत्व पत्करले. त्यांनी अनेक स्पर्धांमध्ये प्रथम पारितोषिक प्राप्त केले. नंतर काही वर्षे रत्नागिरी, पुणे आणि मुंबई आकाशवाणीवर अधिकारी म्हणून त्यांनी नोकरी केली. पण गाण्याच्या व्यवसायाला वेळ मिळत नसल्यामुळे त्यांनी आकाशवाणीची नोकरी सोडली व संगीत हेच त्यांच्या जीवनाचे ध्येय बनले. त्यानंतर कोलकाता येथील संगीत रिसर्च अकॅडमीमध्ये ते गुरू म्हणून रुजू झाले. भारतातील सर्व नावाजलेल्या संगीत परिषदांमध्ये आपली कला अत्यंत प्रभावीपणे सादर करून त्यांनी आपले वेगळे स्थान निर्माण केले आहे.

गुरू म्हणून कार्यरत असताना त्यांनी अनेक नामवंत शिष्य तयार केले. त्यांच्या संगीत क्षेत्रातील कार्याबद्दल त्यांना २००८ साली 'संगीत नाटक अकॅडमी'चा पुरस्कार मिळाला, २०१० मध्ये भारत सरकारने संगीत क्षेत्रातील उत्कृष्ट कामगिरीबद्दल 'पद्मश्री' पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला आहे. याव्यतिरिक्त 'आदर्श गुरू', 'कलागौरव' असे अनेक सन्मान त्यांना प्राप्त झाले आहेत.

त्यांच्या शास्त्रीय संगीताच्या अनेक ध्वनिचकत्या व ध्वनिमुद्रिका बाजारात उपलब्ध आहेत. ग्वाल्हेर गायकीबरोबरच आग्रा आणि जयपूर गायकीचा त्यांचा अभ्यास वाखाणण्याजोगा आहे.

— विकास कशाळकर

## कशाळकर, नागेश दत्तात्रेय

**संगीतज्ञ**

**१५ जुलै १९०६ - १२ फेब्रुवारी २००६**



नागेश दत्तात्रेय कशाळकर यांचा जन्म मालवणला झाला. त्यांच्या लहानपणीच आईचे निधन झाले व वडिलांना विरक्ती आली. म्हणून नागेश व इतर भावंडांना त्यांनी साताऱ्याला, मुलांच्या मामाकडे सुपूर्त केले आणि त्यांनी कीर्तनकार म्हणून गावोगाव भ्रमंती केली. साताऱ्याला न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिकत असताना एक हुशार विद्यार्थी म्हणून नागेश कशाळकर परिचित होते. वेगवेगळ्या स्पर्धांमध्ये त्यांना अनेक पुस्तके पारितोषिके म्हणून मिळाली. साताऱ्याला शिकत असताना त्यांना संस्कृत आणि संगीत या दोन विषयांची गोडी लागली. सदर शाळेत ग्वाल्हेर घराण्याची गायकी आत्मसात केलेले मदंगेबुवा 'संगीत' हा विषय शिकवीत होते. त्यांनी नागेश कशाळकरांना स्वतंत्र तालीम दिली आणि पंचवीस रागांतील वेगवेगळी धृपदे शिकवली.

पुढच्या शिक्षणासाठी नागेश पुण्याला आले. त्या वेळेला बालगंधर्वांची गायकी बहराला आली होती. बालगंधर्वांची संगीत नाटके बघून नागेश यांनी नाट्यगीतांचा अभ्यास केला. लहानपणापासून एकपाठी असल्यामुळे सगळी नाट्यगीते त्यांना बारकाव्यांसकट तोंडपाठ झाली. पुढे त्यांना याच अभ्यासाचा फायदा संगीताचा व्यासंग वाढवताना झाला. फर्गसन महाविद्यालयामधून बी.ए. झाल्यावर एलएल.बी. करण्यासाठी ते नागपूरला गेले. याच काळात त्यांना संस्कृत साहित्याचीही गोडी लागली. त्यांना कोल्हटकरांसारख्या व्यासंगी संस्कृत पंडितांबरोबर पातंजल सूत्रांचा अभ्यास करण्याचीही संधी मिळाली.

नागेश यांनी वकिली व्यवसाय हा उपजीविकेचे साधन ठरवून यवतमाळ जिल्ह्यातील पांढरकवडा या

तालुक्याच्या गावी वास्तव्य केले. तेथे त्यांनी संगीताचा छंद मनापासून जोपासला. याच काळात त्यांचा शांताबाई आठल्ये यांच्याशी विवाह झाला. गावातील संगीतातल्या जाणकार लोकांना एकत्र करून त्यांनी संगीताचा रियाज सुरू केला. भातखंडे व इतर संगीतज्ञांनी लिहिलेल्या पुस्तकांचा त्यांनी अभ्यास केला. जुन्या संस्कृत ग्रंथांतून संगीतविषयक माहिती गोळा केली. संगीताची प्राचीन शिक्षणपद्धती कशी होती व आजच्या काळात ती कशी असावी याचा सखोल अभ्यास करून त्यांनी १९६४ साली 'गांधर्व शिक्षा' हे संगीत शिक्षणपद्धतीवरील पुस्तक लिहिले.

संगीताबरोबरच त्यांना संतसाहित्याचीही आवड होती. महाराष्ट्रातील नामदेव, दासोपंत, एकनाथ, तुकाराम, रामदास अशा संतांच्या सांगीतिक योगदानावर त्यांनी 'संगीत कला विहार' मासिकात लेखन केले. सदर लेखमालेला वाचकांचा भरघोस प्रतिसाद मिळाला.

पांढरकवडा या गावी कार्यक्रमाच्या शोधात येणाऱ्या अनेक गायक व वादक यांच्या उतरण्याची सोय कशाळकर आपल्या घरी करत. त्या गायकांकडून मिळवलेले राग व चिजा ते आत्मसात करत व आपल्या मुलांना शिकवत. विविध घराण्यांच्या चिजा शिकविल्यामुळे समृद्ध गायकीचा वारसा त्यांच्या मुलांना मिळाला. अरुण कशाळकर, उल्हास कशाळकर आणि विकास कशाळकर ही त्यांची मुले त्यांच्याच तालमीत तयार झाली. नागेश कशाळकर हे गायक म्हणून प्रसिद्ध नसले तरी संगीतज्ञ व अभ्यासक म्हणून संगीत क्षेत्रात परिचित होते. जवळजवळ ३८ वर्षे अखंडपणे 'संगीत कला विहार' मासिकातून त्यांनी विपुल लेखन केले.

वयाच्या ऐंशीव्या वर्षानंतर त्यांचा अध्यात्माकडे ओढा वाढला. चाळीस वर्षे दररोज केलेल्या ज्ञानेश्वरीच्या वाचनामुळे त्यांना ज्ञानेश्वरी मुखोद्गत झाली होती. त्यावर त्यांनी साररूपाने 'बालज्ञानेश्वरी' ही छोटी, सहज समजेल अशी पुस्तिका लिहिली. परंतु त्यांचे मुख्य योगदान म्हणजे पातंजल सूत्रांवर त्यांनी साध्या, सोप्या भाषेत लिहिलेले भाष्य हे होय. वयाच्या नव्याण्णवाव्या वर्षी, पुणे येथे त्यांचे निधन झाले. त्यानंतर त्यांच्या मुलांनी 'सुबोध पातंजल' हे त्यांनी लिहिलेले भाष्य प्रकाशित केले.

- विकास कशाळकर

## कशाळकर, विष्णू अण्णाजी

**गायक**

**१८८४ - १३ जुलै १९६८**



अलाहाबाद येथे प्रयाग संगीत समितीची स्थापना करण्यात ज्यांचा सिंहाचा वाटा आहे, त्या पं. विष्णू अण्णाजी कशाळकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. लहानपणी कोल्हापूरला अप्पय्याबुवा यांच्याकडे त्यांनी दीड-दोन वर्षे संगीताचे धडे घेतले. घरच्या परिस्थितीमुळे मुन्सफ न्यायालयात नोकरी केली. पण संगीत शिकण्याच्या प्रबळ इच्छेमुळे ते १९०५ साली लाहोरला, गांधर्व महाविद्यालयात दाखल झाले. गाण्याची मनापासून आवड असल्यामुळे विष्णूजींनी उत्तम पगाराची नोकरी सोडून प्रसिद्ध कीर्तनकार डॉ. पटवर्धन यांच्या सल्ल्यानुसार पं. विष्णू दिगंबरांकडे लाहोर येथे जाऊन दहा वर्षे गाण्याची रीतसर तालीम घेतली. यासाठी काशीनाथपंत छत्रे यांनी आर्थिक मदतीचा हातभार लावला. त्यांना १९०५ ते १९१५ अशी दहा वर्षे विष्णू दिगंबर पलुस्करांकडून ग्वाल्हेर गायकीची तालीम मिळाली.

उत्तर भारतात संगीताचा प्रसार करण्यासाठी त्या काळी विष्णू दिगंबरांनी अनेक शिष्यांना वेगवेगळ्या गावांत पाठवले, त्यांत अलाहाबाद येथे संगीताचा प्रसार करण्याची जबाबदारी १९१५ साली, विष्णूजी कशाळकर यांच्याकडे सोपविली. मेजर रणजितसिंग यांनी स्थापन केलेल्या कायस्थ पाठशाला महाविद्यालयामध्ये पलुस्करांच्या प्रेरणेने संगीत शिक्षणाचे वर्ग सुरू झाले.

विष्णूजी कशाळकर हे तिथे संगीत गुरू म्हणून रुजू झाले.

त्यांनी महाविद्यालयामध्ये जेव्हा सामुदायिक प्रार्थना सुरू केली, तेव्हा सर्व प्राध्यापक प्रार्थनेला हजर राहत असत. त्या काळात अलाहाबादमध्ये प्रतिष्ठाप्राप्त मान्यवरांना कशाळकरांचे शिकवण्याचे कसब आवडले. हळूहळू काही विद्यार्थ्यांनी शिकायला सुरुवात केली. विष्णूजींच्या शिस्तप्रिय, आदर्शवत वागणुकीमुळे त्यांचे नाव आदराने घेतले जाऊ लागले. प्रा. सुरेंद्रनाथ देव व मुनशी कन्हैयालाल यांच्या सहकार्याने त्यांनी प्रयाग संगीत समितीची स्थापना केली.

एकदा खुद्द मोतीलालजी नेहरू त्यांचा गायनवर्ग बघायला आले. वर्गामधील व्यवस्था व वागणूक बघून त्यांनी आप्तेष्टांना संगीताच्या वर्गात जाण्यास प्रोत्साहन दिले. तो काळ स्वातंत्र्य चळवळीचा होता. विष्णू अण्णाजी कशाळकर यांनी बसवून घेतलेले राष्ट्रीय गीत १४ ऑगस्ट १९४७ रोजी स्वातंत्र्यपूर्वसंध्येला दिल्ली नभोवाणी केंद्राहून प्रसारित करण्यात आले. त्यात कृष्णा हाथीसिंग आणि विजयालक्ष्मी पंडित यांनी सहभाग घेतला होता.

प्रयाग संगीत समिती ही संगीताच्या पदवी परीक्षा घेणारी संस्था स्थापन झाल्यानंतर तिला शासनाची मान्यता प्राप्त झाली. या समितीच्या स्थापनेचे ते मुख्य आधारस्तंभ होते. उच्चभ्रू समाजात संगीताला मान्यता मिळवून देण्यासाठी त्यांनी अलाहाबाद व नजीकच्या क्षेत्रात अनेक संगीतसभांचे आयोजन केले. त्या काळातल्या अनेक गायक-वादकांना त्यांनी आपली कला सादर करण्याची संधी दिली.

अशा सभा- समारंभांना त्यांनी सामाजिक, राजकीय आणि साहित्य क्षेत्रातील मान्यवरांना निमंत्रित करून त्यांना भारतीय संगीताच्या उज्ज्वल परंपरेचा परिचय करून दिला, तसेच संगीतातील अनेक विषयांवर चर्चासत्रे आयोजित करून संगीताची शास्त्रीय माहिती अभ्यासकांना उपलब्ध करून दिली.

तत्कालीन वृत्तपत्रे व मासिकांमध्ये संगीत विषयावर लेख लिहून त्यांनी संगीताबद्दलचे जनमानसातील गैरसमज दूर केले. त्यांचे चिरंजीव शांताराम कशाळकर यांना हा संगीताचा वारसा लाभला आहे.

- विकास कशाळकर

## कांबळी, महादेव जगन्नाथ

☛ *पार्वतीकुमार*

## काणे, दत्तात्रेय विष्णू

**गायक**

**२ मार्च १९२१ – १२ ऑक्टोबर १९९७**



दत्तात्रेय विष्णू काणे यांचे मूळ गाव इचलकरंजी. वडील विष्णू बलवंत काणे राजदरबारी उत्तम हार्मोनिअम वादक म्हणून होते. त्यामुळे संगीताचे बाळकडू त्यांना घरातच मिळाले. त्यांच्या आईचे नाव काशीताई होते.

सुरुवातीला तिथेच काही काळ पं. काळेबुवा (बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांचे एक शिष्य) यांच्याकडेच काणे यांनी तालीम घेतली. कलासक्त श्रीमंत नारायण घोरपडे यांचे काण्यांकडे लक्ष गेले व त्यांना शिष्यवृत्ती देऊन पुण्याला गांधर्व महाविद्यालयात पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्याकडे शिक्षणासाठी पाठवले. नारायण घोरपडे यांचे देहावसान झाल्यावर काणे यांचे शिक्षण बंद पडले. परंतु त्या काळात ते ‘संगीत विशारद’ झाले. प्रो. ग.ह. रानडे यांनी काणे यांना डॉ. भडकमकरांची शिष्यवृत्ती मिळवून दिली व त्यांचे शिक्षण ग्वाल्हेर घराण्याचे आणखी एक नामांकित गायक पं. मिराशीबुवा यांच्याकडे सुरू झाले. ग्वाल्हेर गायकीचे राग, तानपलटा, बोलबनाव त्यांच्या गळ्यावर अतिशय सुंदर रितीने चढले.

याच काळामध्ये काणे यांना उ. विलायत हुसेन खाँ साहेबांचे गाणे ऐकायला मिळाले. त्यांच्या गायकीचा काण्यांवर खूप प्रभाव पडला आणि त्यांनी आग्रा

घराण्याचे गाणे शिकायचे ठरवले. त्यासाठी पं. जगन्नाथबुवा पुरोहित यांच्या साहाय्याने त्यांनी इचलकरंजीत एक मोठा गंडाबंधन समारोह केला. खाँ साहेबांना त्या काळी काणेबुवांनी एक हजार रुपये गुरुदक्षिणा दिली. त्या समारंभाचे अध्यक्ष ना.सी. फडके हे होते. विलायत हुसेन खाँ साहेबांनी काणेबुवांना आपल्या मुलाप्रमाणे शिकवले.

त्या वेळी काणेबुवा मुंबईत दादासाहेब आपटेंच्या घरी राहून शिकत असत. तेव्हा त्यांचे अनेक गायक - वादकांशी संबंध प्रस्थापित झाले. केसरबाई केरकर यांचाही काणे यांच्या गाण्यावर प्रभाव होता. उ. अब्दुल करीम खाँ साहेबांचे गाणेही त्यांनी खूप ऐकले होते. तसेच काणे कोल्हापूरला उ. भुर्जी खाँ साहेबांकडेही जात असत. उ. फैयाज खाँ साहेबांच्या गाण्याचे तर ते भक्तच होते. तसेच मास्तर कृष्णराव व बालगंधर्व यांच्याही गाण्याचा प्रभाव त्यांच्यावर पडला होता.

ग्वाल्हेर, आग्रा व जयपूर, तसेच किराणा या चारही घराण्यांतून अनेक गोष्टी घेऊन, त्या गोष्टींचा विचार करून काणे यांनी स्वत:ची अशी एक स्वतंत्र शैली विकसित केली. काणे बालगंधर्वांची नाट्यपदे व भजनेही अत्यंत सुंदर गात असत. उ. विलायत हुसेन खाँ साहेब गेल्यावर साधारणपणे १९६० नंतर काणे यांनी आपला मुक्काम हलविला व ते इचलकरंजी येथे कायमस्वरूपी स्थायिक झाले.

इचलकरंजी येथे काणे शेतीवाडी करत संगीताचा प्रचार – प्रसार करू लागले. यातून अनेक शिष्यगण तयार झाले. काण्यांनी इचलकरंजीला बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या नावाने एक संस्था सुरू केली. बाळकृष्णबुवांचे हे एक भव्य स्मारक इचलकरंजीत सध्या दिमाखाने उभे आहे. पु.ल. देशपांडे यांच्या हस्ते या स्मारकाचे उद्‌घाटन झाले. बाळकृष्णबुवांच्या तीन दिवस पुण्यतिथीचा महोत्सव काणे करीत, तसेच पलुस्करांची पुण्यतिथी, गुरुपौर्णिमा हेही अनेक कार्यक्रम करत. त्यामुळे अनेक नामवंत गायक वादकांचे येणे–जाणे तिथे सुरू झाले.

नवीन पिढीसाठी काणे यांनी शास्त्रीय व नाट्यसंगीत स्पर्धा सुरू केली. आयुष्यभर संगीतातील शाश्वत मूल्यांचा अभ्यास करून पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांची परंपरा पुढे चालू ठेवण्याचा त्यांनी अखंड प्रयत्न केला. नरेंद्र कणेकर, शरद जांभेकर, हृषिकेश बोडस, शिवानंद पाटील, मंगला जोशी, रेखा रायरीकर, मंगला आपटे, मंजूषा पाटील हे त्यांचे काही नावाजलेले शिष्य. इचलकरंजी भागात काणे यांनी अनेक शिष्य तयार केले. तसेच भजनी मंडळीतून रागदारीचा भजनाद्वारे प्रसारही केला.

गांधर्व महाविद्यालयाने काणे यांना 'संगीताचार्य' ही पदवी बहाल केली, तसेच फाय फाउण्डेशनने 'उत्तम गुरू व उत्तम गायक' म्हणून त्यांना पुरस्कार प्रदान केला. आकाशवाणीचे ते मान्यताप्राप्त गायक होते. मधुमेहाच्या विकाराने मिरजेच्या मिशन रुग्णालयात त्यांचे निधन झाले. त्यांच्या नावाने 'पं. द. वि. काणेबुवा संगीत प्रतिष्ठान' ही संस्था कार्यरत आहे.

— मंजुषा पाटील

## कादरबक्ष
**सारंगीवादक**
**१८८५ – २० ऑगस्ट १९३४**



सुप्रसिद्ध सारंगीवादक उस्ताद मुल्लाजी कादरबक्ष यांनी सारंगी हे वाद्य लोकप्रिय केले. जवळजवळ १५-२० वर्षे बालगंधर्वांच्या कंपनीत साथ करून मराठी जनतेला आपल्या सारंगीच्या साथीने मोहित केले. सारंगी या वाद्याचा सहवादनात वापर करूनही गायकी पद्धतीने वादन करून साथीच्या वाद्याला एक महत्त्वाचे स्थान मिळवून देण्याचा मान उस्ताद मुल्लाजी कादरबक्ष यांच्याकडे जातो.

कादरबक्ष यांचा जन्म हरियाणातील झज्जर या गावी

क

झाला. वयाच्या पाचव्या-सहाव्या वर्षापासून वडील अझीमबक्ष यांनी त्यांना संगीताचे शिक्षण देण्यास सुरुवात केली. कादरबक्ष यांनी अनेक राग आणि बंदिशींचे शिक्षण घेतले व नंतर सारंगीवादनाचे शिक्षण घेण्यास सुरुवात केली. त्यांनी रोज पाच-सहा तास रियाज केला. ते अत्यंत धिम्या गतीने गज चालवण्याचा रियाज करत आणि तो करताना थोडीसुद्धा घाई झाली तर हातावर काठीचा फटका बसत असे. अत्यंत कठीण परिश्रमातून कादरबक्ष यांचे सारंगीवादन तयार झाले.

गुडीयानीवाले बशीर खाँ यांच्या गाण्याला मुंबईमध्ये साथ करत असताना कादरबक्ष यांचे सारंगीवादन बालगंधर्वांनी प्रथम ऐकले आणि त्या वादनाने मंत्रमुग्ध झाले आणि त्यांनी खाँसाहेबांना आपल्या नाटक कंपनीत सारंगीवादन करण्याची विनंती केली. वास्तविक गंधर्व नाटक कंपनीत बाबालाल हे सारंगिये होते, तरीही कादरबक्ष यांची सारंगी साथ मिळावी अशी बालगंधर्वांची इच्छा होती. या विनंतीस मान देऊन त्यांनी गंधर्व कंपनीत नोकरी स्वीकारली.

बालगंधर्वांची गाण्याची पद्धत कादरबक्ष यांनी अचूक हेरली होती. त्यामुळे खाँसाहेबांचे सारंगीवादन त्याच पद्धतीने होत असे. कादरबक्ष यांच्यावर बालगंधर्वांची अत्यंत मर्जी होती. तसेच कादरबक्षही बालगंधर्वांशी एकनिष्ठ होते. बालगंधर्व खाँसाहेबांना ‘चाचाजी’ म्हणत असत.

म्हैसूरच्या राजदरबारातून सारंगीवादनासाठी खाँसाहेबांना बोलावणे आले. परंतु राजदरबारातील नोकरी त्यांनी स्वीकारली नाही. ते नेहमी म्हणत असत की, ‘‘गंधर्व नाटक कंपनीदेखील एक राजदरबार आहे आणि त्यात खुद्द राजा माझी अत्यंत काळजी घेतो, माझ्या प्रकृतीबद्दल कायम विचारपूस करतो. दुपारी नाटक असले तरीही संध्याकाळी मला नमाजासाठी पुरेसा वेळ देतो, असा काळजी घेणारा राजा मला राजदरबारात मिळणार नाही.’’

कादरबक्ष थिरकवा साहेबांच्या साथीत सारंगीवादनाचे कार्यक्रम करीत असत, त्यात ते प्रामुख्याने बालगंधर्वांच्या पदांचा समावेश करीत असत. बालगंधर्वांच्या गाण्यात शब्दफेक जितक्या प्रभावीपणे असे, तितक्याच प्रभावीपणे खाँसाहेबांच्या वादनातही दिसत असे. गायन कुठले आणि वादन कुठले असा संभ्रम ऐकणाऱ्याला पडत असे. कादरबक्षांचे वाजवणे बालगंधर्वांच्या गाण्याची सहीसही आठवण करून द्यायचे.

सारंगीवादनाच्या रियाजाच्या बाबतीत कादरबक्ष अत्यंत शिस्तीचे होते. जेव्हा वेळ मिळेल, तेव्हा ते आपले वाद्य काढून रियाज करीत. त्यांची सारंगी ऐकून मास्टर दीनानाथांनीसुद्धा कादरबक्ष यांना त्यांच्या कंपनीत येण्याबद्दल विचारले. मात्र कादरबक्ष बालगंधर्वांशी एकनिष्ठ राहिले होते.

खाँसाहेबांनी अनेक महान कलाकारांची साथसंगत केली. गुडीयानीवाले उस्ताद बशीर खाँ, पटियालाचे आशिक हुसेन खाँ, कलकत्त्याचे उस्ताद प्यारे खाँ यांची साथ ते करीत असत. मुंबईत असलेल्या अनेक महान कलाकारांना ते साथ करीत असत.

त्यांच्या शिष्यपरिवारात सांगलीचे बाबूराव गोरे, ॲड. खोत, तसेच गायकांमध्ये केशवराव भोळे, तसेच त्यांचे चिरंजीव उस्ताद मोहंमद हुसेन खाँ यांची नावे प्रामुख्याने घ्यावी लागतील. अत्यंत सात्त्विक असल्याने ‘मुल्लाजी’ असे संबोधले जाणाऱ्या कादरबक्ष यांचे पुण्यात निधन झाले.

— उस्ताद फैयाज हुसेन खाँ

## कामत, रामदास शांताराम

**गायक**

**१८ फेब्रुवारी १९३१**

रामदास शांताराम कामत यांचा जन्म गोव्यातील म्हापसा या गावी झाला. त्यांचे शालेय शिक्षण गोव्यातच झाले. वडील शांताराम कामत शास्त्रोक्त गायन शिकले नव्हते; पण त्यांना रागांची माहिती होती. त्यांचा आवाज पहाडी होता. १९३८ साली, वयाच्या सातव्या वर्षी ‘बेबंदशाही’ या नाटकात रामदास कामतांनी बालराजेंची



भूमिका केली. या नाटकात त्यांना पाच वाक्ये व दोन गाणी होती. हे त्यांचे रंगभूमीवरील पहिले पदार्पण होते.

ते १९४९ साली मुंबईला आले. त्यांनी १९५३ साली विल्सन महाविद्यालयातून अर्थशास्त्र या विषयात पदवी घेतली. वडीलबंधू उपेंद्र कामत यांच्याकडे त्यांनी काही काळ शास्त्रोक्त संगीताचे शिक्षण घेतले. उपेंद्र कामत हे मा. नवरंग नागपूरकर यांच्याकडे गाणे शिकत होते.

त्यांनी १९५३ पासून १९६० पर्यंत ए.जी. या सरकारी कार्यालयात नोकरी केली. त्यांनी १९६० पासून १९८९ पर्यंत 'एअर इंडिया'मध्ये सुरुवातीला ट्रॅफिक असिस्टंट व नंतर मॅनेजर म्हणून नोकरी केली.

पं. जितेंद्र अभिषेकी यांचे संगीत असलेल्या 'मत्स्यगंधा' या नाटकातून रामदास कामतांचे नाव विशेष प्रकाशात आले. यापूर्वी त्यांनी राज्य संगीत नाट्यस्पर्धेतून 'धि गोवा हिंदू असोसिएशन'तर्फे 'संशयकल्लोळ', 'शारदा', 'मृच्छकटिक' आदी नाटकांतून भूमिका केल्या होत्या. तसेच आकाशवाणीवरून कोकणी गीतेही ते गात होते. सुरेल, स्वच्छ, मोकळा आवाज, स्पष्ट व भावपूर्ण शब्दोच्चार व आटोपशीर गाणे यांमुळे रसिक प्रेक्षकांची त्यांना पुरेपूर दाद मिळाली.

'मत्स्यगंधा' या नाटकामुळे साठ-सत्तरच्या दरम्यानचा तरुण प्रेक्षकवर्ग संगीत नाटकांकडे पुन्हा वळू लागला, यात पं. जितेंद्र अभिषेकींच्या संगीताबरोबरच रामदास कामत यांच्या गायनाचा वाटा निश्चितच आहे. त्यानंतर त्यांनी 'ययाती देवयानी', 'धन्य ते गायनी कळा', 'मीरा मधुरा', 'हे बंध रेशमाचे', 'मदनाची मंजिरी' या नाटकांतूनही भूमिका केल्या. तसेच 'मानापमान', 'होनाजी बाळा', 'संन्याशाचा संसार', 'एकच प्याला' अशा काही जुन्या नाटकांतूनही भूमिका केल्या.

नाट्यसंगीत गायनात त्यांना प्रामुख्याने पं. जितेंद्र अभिषेकींचे मार्गदर्शन झाले. याचबरोबर पं. गोविंदराव अग्नी, भालचंद्र पेंढारकर व प्रभाकर भालेकर यांचेही मार्गदर्शन लाभले. तसेच त्यांना गोपीनाथ सावकारांचेही मार्गदर्शन सुरुवातीच्या काळात, स्पर्धेच्या नाटकाच्या वेळी लाभले होते. याचबरोबर बालगंधर्व, छोटा गंधर्व, दीनानाथ मंगेशकर इत्यादींच्या ध्वनिमुद्रिकांतील गायनाचाही त्यांनी अभ्यास केला. कुणाचीही नक्कल न करता त्यांनी आपला स्वतंत्र ठसा नाट्यसंगीतात उमटवला.

रामदास कामतांची अनेक नाट्यपदे लोकप्रिय झाली. 'देवाघरचे ज्ञात कुणाला', 'गुंतता हृदय हे', 'नको विसरू संकेत मिलनाचा' (मत्स्यगंधा), 'यती मन मम मानीत या', 'तम निशेचा सरला' (ययाती देवयानी), 'मीरा मधुरा'मधील 'प्रेम वरदान', 'आनंद सुधा' ही वेगळ्या गायकी वळणाची पदे, 'हे बंध रेशमाचे'मधील 'काटा रुते कुणाला' इत्यादी.

त्यांच्या पदांच्या ध्वनिमुद्रिकाही निघाल्या व त्यांना लोकप्रियताही लाभली. नाट्यसंगीताबरोबरच यशवंत देवांनी संगीत दिलेली भक्तिगीते, मा. कृष्णराव यांच्या कन्या वीणा चिटको यांचे संगीत असलेली भावगीतेही त्यांनी गायली आहेत.

अ.भा. मराठी नाट्यपरिषदेचे मा. दीनानाथ सुवर्णपदक (१९८६), संगीतभूषण राम मराठे पारितोषिक, महाराष्ट्र शासन पुरस्कृत अखिल भारतीय मराठी नाट्य परिषदेचा बालगंधर्व गौरव पुरस्कार (१९९५), असे अनेक पुरस्कार व पारितोषिकांचे ते मानकरी ठरले आहेत. त्यांना ५ नोव्हेंबर २००८ रोजी सांगली येथे विष्णुदास भावे या पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. २३ नोव्हेंबर २००८ रोजी बीड येथे झालेल्या नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची निवड करण्यात आली.

- माधव इमारते

क

## कायकिणी, दिनकर दत्तात्रेय

**गायक**

**२ ऑक्टोबर १९२७ – २३ जानेवारी २०१०**



पं. दिनकर दत्तात्रेय कायकिणी यांचा जन्म मुंबईतील सांताक्रूझ येथे झाला. आई कृष्णाबाई व वडील दत्तात्रेय हे दोघेही गानवेडे होते. त्यांची आई त्या भागात उत्तम भजने गाणारी म्हणून प्रसिद्ध होती. आईची भजने ऐकून त्यांच्यावर शिशुवयातच संगीताचे उत्तम संस्कार झाले. बालवयापासून ते अतिशय तल्लख बुद्धीचे व एकपाठी होते. तेथील देवळात होणाऱ्या कीर्तनकारांना 'जयजय रामकृष्ण हरी'पासून इतर चरणांना अगदी आलापीसहित वयाच्या चौथ्या वर्षी दिनकर गायनसाथ करीत असत.

सातव्या वर्षापासून गुरू नागेश करेकट्टी राव यांच्याकडे त्यांचे घराणेदार गाण्याचे शिक्षण सुरू झाले. पुढे दोन वर्षे पं. ओंकारनाथ ठाकूर यांच्याकडे शिक्षण झाल्यावर वयाच्या केवळ बाराव्या वर्षी ते लखनौच्या मॉरिस म्यूझिक कॉलेजमध्ये, तिथेच राहून संगीताचे शिक्षण घेण्यासाठी गेले. पं. एस.सी.आर. भट व पं. श्रीकृष्ण तथा अण्णासाहेब रातंजनकर यांच्याकडे त्यांचे संगीताचे शिक्षण झाले. लखनौला ते एस.एस.सी. झाले व 'संगीत विशारद' ही पदवी त्यांनी वयाच्या सोळाव्या वर्षी सुवर्णपदकासह प्राप्त केली.

दिल्ली आकाशवाणी केंद्रावर ते १९५४ मध्ये सहायक निर्माता (सुगम संगीत) म्हणून रुजू झाले. निर्माता (शास्त्रीय संगीत) व सुगम संगीत विभाग प्रमुख अशी बढती मिळून १९७१ मध्ये आकाशवाणीची नोकरी सोडेपर्यंत पं. दिनकर कायकिणी यांनी आकाशवाणीवर अत्युच्च दर्जा टिकून राहावा व अभिनव कार्यक्रमांची निर्मिती व्हावी यासाठी अनेक प्रयोग केले. 'प्रसारगीत' व 'वंदना' हे त्यांचे सुरुवातीच्या काळातील कार्यक्रम होते. 'प्रसारगीत' या त्या वेळच्या कार्यक्रमासाठी शास्त्रीय गायकांकडून त्यांच्या भाषांमधील भजने, भावसंगीत इ. घेण्याचे व प्रसारगीतच्या स्थानिक केंद्रांवरून नवनवीन गीते मिळवण्याचा उपक्रम त्यांनी सुरू केला. 'वंदना' हा कार्यक्रम लोकप्रिय करून दहा मिनिटांचा हा कार्यक्रम त्यांनी एका तासावर नेला. या दोन्ही उपक्रमांसाठी पं. दिनकर कायकिणी यांनी १५०० हून अधिक रचना केल्या आहेत.

भारतात युरोपातील देशांप्रमाणे स्फूर्तिगान लोकप्रिय व्हावे व त्या योगे संगीत व देशप्रेमाचा एकाच वेळी प्रचार व्हावा म्हणून त्यांनी 'कोरस ग्रूप' तयार केले होते व त्यांच्याकडून अनेक समूहगीते व स्फूर्तिगीते बसवून प्रसारित केली होती. याच ध्येयाने त्यांनी शाळाशाळांतून फिरून ५००० विद्यार्थी तयार केले होते व १९५७ सालच्या स्वातंत्र्यदिन समारंभात त्यांची राष्ट्रगीते सादर केली होती. दिल्लीतील खासदारांसाठी त्यांनी असाच उपक्रम चालवला. तेव्हापासून ते राष्ट्रगीते व स्फूर्तिगीते बसवणारे म्हणून प्रसिद्ध झाले. 'संगीत परिभाषा विवेचन' व 'संगीत चर्चा' हे त्यांचे आकाशवाणीवरील अभिनव कार्यक्रम होते.

कायकिणी १९७१ साली मुंबईच्या भारतीय विद्या भवनमध्ये संगीत विभागाच्या प्राचार्यपदी रुजू झाले. संस्थेत कलेचे मुक्त वातावरण तयार व्हावे म्हणून त्यांनी संस्था सरकारी अनुदानातून मुक्त करण्याचा धाडसी निर्णय घेतला. शिक्षकांचे प्रबोधन, पालकांसाठी व विद्यार्थ्यांसाठी व्याख्यान प्रात्यक्षिके, संगीत कार्यक्रमांच्या मासिक बैठका, वार्षिक संगीत सम्मेलने असे अनेकविध उपक्रम राबवून त्यांनी तेथे संगीताची रुची वाढवली आणि १९७१ मध्ये ६९ एवढी असलेली विद्यार्थी संख्या १९८७ मध्ये निवृत्त होताना ६०० एवढी केली.

दिनकर कायकिणी यांच्या रशिया, अमेरिका, जर्मनी, फ्रान्स इत्यादी देशांतही गायनाच्या मैफली झाल्या आहेत. त्यांच्या भावसंगीत, देशभक्तिपर रचना यांबरोबरच रागदारी संगीताच्या रचना प्रसिद्ध असून

त्यांचे ‘रागरंग’ हे रचनांचे पुस्तक प्रकाशित झाले आहे. संगीताची रुची वाढावी व व्याप्ती ध्यानात यावी म्हणून त्यांनी अनेक विषयांवर व्याख्यान प्रात्यक्षिकांचे कार्यक्रम केले आहेत. लोकप्रिय गायक, विचारवंत, विविध संगीत प्रकारांचे रचनाकार, शिक्षक, गुरू, मार्गदर्शक अशा अनेक वैशिष्ट्यांनी ते संगीत जगतात प्रसिद्ध आहेत.

त्यांना ‘टी.एम.ए. पै फाउण्डेशन’ पुरस्कार, ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार, ‘आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमी’ पुरस्कार, ‘स्वरसाधना रत्न’ इत्यादी पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहे.

– सदाशिव बाक्रे

## कारेकर, प्रभाकर जनार्दन

**गायक**

**४ जुलै १९४४**



प्रभाकर जनार्दन कारेकर यांचा जन्म गोव्यातील जुवे या गावी झाला. लहानपणापासूनच संगीताची आवड असलेले कारेकर संगीताच्या ओढीनेच मुंबईत दाखल झाले. सुप्रसिद्ध गायक पं. सुरेश हळदणकर यांच्याकडे राहून त्यांनी अनेक वर्षे संगीताची तालीम घेतली. त्यांच्या गायकीचे मूळ संस्कार घेऊन कारेकरांची कारकीर्द सुरू झाली. पं. सुरेश हळदणकर हे स्वत: मैफलीचे गायक व त्याचबरोबर संगीत रंगभूमीवरील गायक-नट असल्याने, त्यांनी लोकप्रिय केलेली नाट्यपदेही कारेकर त्यांच्याच ढंगाने गात असत. ‘श्रीरंगा कमलाकांता’ हे खास उदाहरण होय.

पुढे पं. जितेंद्र अभिषेकी आणि पं. सी.आर. व्यास या थोर गुरूंकडून कारेकरांना ग्वाल्हेर आणि आग्रा घराण्याची तालीम मिळाली. त्यामुळे अनेक प्रचलित-अप्रचलित रागांचे सादरीकरण करून कारेकर आपली मैफल सजवितात, त्याचबरोबर पारंपरिक आणि पं. अभिषेकींच्या संगीत दिग्दर्शनातील नाट्यपदेही आपल्या कार्यक्रमात सादर करतात.

मास्टर दीनानाथांच्या ढंगातील नाट्यपदेही ते विशेष तडफदारपणे सादर करतात. प्रत्यक्ष रंगभूमीवर भूमिका न करताही, नाट्यसंगीताच्या क्षेत्रात अफाट लोकप्रियता मिळालेले गायक म्हणून कारेकर प्रसिद्ध आहेत. दमसास, पल्लेदार ताना आणि गायनातील रंजकता यांमुळे कारेकर आपल्या गायनाने रसिकांना तृप्त करतात. गेली ४० वर्षे त्यांनी आपली लोकप्रियता टिकवून ठेवली आहे.

ते आकाशवाणीचे मान्यताप्राप्त कलाकार असून, दिल्लीहून प्रसारित होणाऱ्या राष्ट्रीय कार्यक्रमांत आणि आकाशवाणी संगीत संमेलनांत त्यांनी आपले गायन सादर केले आहे. त्याचप्रमाणे त्यांना आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरून गायन सादर करण्याची संधी मिळाली आहे.

आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या अनेक रेकॉर्डिंग कंपन्यांतर्फे त्यांचे अनेक ध्वनिमुद्रण संच निघालेले आहेत. त्यांनी अनेक आंतरराष्ट्रीय वादक-कलाकारांबरोबर गायन सादर केले आहे, उदा. कोलमन (अमेरिका), उस्ताद सुलतान खाँ (भारत). अनेक देशांमध्ये या तिघांनी एकत्रितपणे गायन-वादन सादर केले आहे. न्यूयॉर्कमधील ‘रागा फेस्टिव्हल’, इटलीमधील ‘अम्ब्रिआ ९८’ आंतरराष्ट्रीय महोत्सव यांतील त्यांचे कार्यक्रम विशेष गाजले होते.

अमेरिका, ब्रिटन, ऑस्ट्रेलिया, इटली, आखाती देश अशा अनेक देशांमध्ये त्यांनी आपले गायन यशस्वीपणे सादर करून हिंदुस्थानी संगीताची ध्वजा फडकत ठेवली आहे. प्रभाकर कारेकरांना ‘गानसम्राज्ञी लता मंगेशकर’ पुरस्कार मिळाला आहे. हिंदुस्थानी संगीताच्या प्रसारासाठी त्यांनी ‘स्वरप्रभा ट्रस्ट’ स्थापन केला असून त्याद्वारे विविध कार्यक्रमांचे आयोजन ते प्रतिवर्षी करत असतात.

– मधुवंती पेठे

क

## कुंटे, अनंत कृष्णाजी
**सारंगीवादक**
**१५ डिसेंबर १९३०**



अनंत कृष्णाजी कुंटे यांचा जन्म कल्याण येथे झाला. त्यांचे वडील पेशाने शाळाशिक्षक होते व उत्तम भजने गात, पखवाज आणि तबलाही वाजवत. अनंत कुंटे यांचे ज्येष्ठ बंधू विनायक हे पं. विनायकराव पटवर्धन व उ. अन्वर हुसेन खाँ यांच्याकडे ग्वाल्हेर व आग्रा गायकी शिकले होते. ते रेल्वेमध्ये नोकरी करत. दुसरे बंधू लक्ष्मण हे तबला व क्लॅरिओनेट वाजवत. त्यांनी शंकरभैया, अल्लारखा, जिरेखाँ व अमीर हुसेन खाँ यांच्याकडे तबल्याची उत्तम तालीम घेतली होती, तसेच आकाशवाणीत ते प्रथम तबलावादक व नंतर क्लॅरिओनेटवादक म्हणून नोकरी करत असत. त्यांनी उ. फैयाझ खाँ, रोशनआरा बेगम, कृष्णराव शंकर पंडित अशा अनेक दिग्गज कलाकारांना साथ केली होती. असे कलासंपन्न वातावरण असल्याने लहानपणापासूनच अनंत कुंटे यांच्यावर संगीताचे संस्कार कुटुंबातच झाले. त्यांचे शालेय शिक्षण छबिलदास शाळेत इंग्रजी तिसरीपर्यंत झाले.

अनंत कुंटे यांना उ. अमीरबक्ष खाँ साहेबांकडून १९४७ ते १९५५ या काळात सारंगीची उत्तम तालीम मिळाली व त्यांनी अथक रियाझातून या कठीण वाद्यात प्रावीण्य मिळवले. साथीच्या सरावासाठी ते नारायणराव व्यास, राम मराठे, सुरेश हळदणकर, माणिक वर्मा अशा गायकांकडे जात असत व यातूनच त्यांनी हळूहळू मैफलींतही साथसंगत करणे सुरू केले.

अनंत कुंटे १९५३-५४ साली मोहरमच्या काळात मुंबई आकाशवाणीवर बदली सारंगीवादक म्हणून साथ करू लागले. त्यांनी १९५३ साली आकाशवाणीतील संगीत दिग्दर्शक दिनकर अमेंबल (डी. अमेल) यांच्या वाद्यवृंद रचनांसाठी ‘चेलो’ हे वाद्यही वाजवले. त्यांना १९५५ साली राजकोट आकाशवाणीवर सारंगीवादक म्हणून नोकरी मिळाली. तेथून त्यांची १९५८ साली पुणे आकाशवाणीत बदली झाली. त्यांनी १९७३ ते १९९० अशी दीर्घकाळ मुंबई आकाशवाणीत नोकरी केली. या कारकिर्दीत अनेक दिग्गज कलाकारांस त्यांनी सारंगीची साथ केली, तसेच स्वतंत्र सारंगीवादनही सादर केले.

अनंत कुंटे यांची सारंगीची साथ अत्यंत सुरेल, तयार व तरीही संयत असल्याने गायकही आवर्जून त्यांना साथीसाठी पाचारण करू लागले. आपल्या बंधूंकडून रागदारीही उत्तम शिकल्याने व रागरूपांची सूक्ष्म समज असल्याने ग्वाल्हेर, आग्रा व विशेषत: जयपूर घराण्याच्या गायकांना त्यांनी केलेली संगत पसंत पडे.

मिराशीबुवा, कृष्णराव शंकर पंडित, विनायकराव पटवर्धन, गजाननबुवा जोशी, शरच्चंद्र आरोळकर, शरद साठे, अशोक दा. रानडे (ग्वाल्हेर घराणे), निसार हुसेन खाँ, मुश्ताक हुसेन खाँ (रामपूर घराणे), अझमत हुसेन खाँ, खादीम हुसेन खाँ, (आग्रा), मल्लिकार्जुन मन्सूर, निवृत्तीबुवा सरनाईक, पद्मावती शाळिग्राम, किशोरी आमोणकर, धोंडूताई कुलकर्णी, श्रुती सडोलीकर (जयपूर घराणे), हिराबाई बडोदेकर, सरस्वती राणे, गंगूबाई हनगळ, माणिक वर्मा, ज्योत्स्ना भोळे, भीमसेन जोशी (किराणा घराणे), रसूलनबाई, सिद्धेश्वरी देवी, बेगम अख्तर, शोभा गुर्टू (ठुमरी), थिरकवा, आमीर हुसेन खाँ, सामताप्रसाद (तबलावादन), बिरजू महाराज (कथक), इ. अनेक नामवंतांना त्यांनी समर्थपणे साथसंगत केली.

भारतातील सवाई गंधर्व महोत्सवासारख्या अनेक संगीतमंचांवर, तसेच अमेरिका, युरोप, ऑस्ट्रेलिया, आखाती देश इ. परदेशांतही त्यांनी कला सादर केली. ब्रिटन येथील एकल सारंगीवादनाच्या विशेष दौऱ्यांत २००१ व २००३ साली परदेशी रसिकांनीही त्यांना वाखाणले. जर्मनीत पाश्चात्त्य संगीतकारांसह त्यांनी जुगलवादनाचा प्रयोग केला. भारत व परदेशांत त्यांनी अनेकांना वादनासाठी मार्गदर्शन केले आहे.

अनंत कुंटे यांना ‘संगतकार’ पुरस्कार (गांधर्व महाविद्यालय, पुणे, २०००), ‘आयटीसी संगीत रिसर्च अकादमी’ पुरस्कार (२००३) व ‘गुणिजन’ पुरस्कार (ठाणे महानगरपालिका, २००९) देऊन सन्मानित करण्यात आले आहे.

महाराष्ट्रातील संगीतविश्वात विसाव्या शतकात सारंगी या वाद्याचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला होता. अमीरबक्ष, हैदरबक्ष, मेहबूब खाँ, मजीद खाँ, कादरबक्ष, मुहंमद हुसेन खाँ, राम नारायण, सुलतान खान इ. उत्तरेतून आलेले सारंगीवादक महाराष्ट्रातील कलासंगीताच्या मैफलीतच नव्हे, तर संगीत नाटक, चित्रपट अशाही माध्यमांतील संगीतासाठी सारंगीच्या ‘सौरंगी’ स्वरांचे कोंदण देत होते. या कलाकारांबरोबरच महाराष्ट्रातील बाबूराव कुमठेकर, बाबालाल, रामकृष्ण पर्वतकर, इ. अनेक सारंगीवादक मैफली गाजवू लागले होते. दुर्दैवाने १९६०-७० च्या दशकानंतर संगीतविश्वातून सारंगी हे वाद्य दुर्मीळ होत गेले व आज महाराष्ट्रातच काय, पण एकंदर भारतातही सारंगीवादकांची वानवा आहे. मात्र, सारंगीच्या या अस्तकालात ज्या वादकांनी या वाद्याचा नावलौकिक जागता ठेवला, त्यांत अनंत कुंटे हे सर्वांत नावाजलेले मराठी सारंगीवादक होत.

— चैतन्य कुंटे

## कुंदगोळकर, रामभाऊ गणेश

☛ *सवाई गंधर्व*

## कुमार गंधर्व

***कोमकली, शिवपुत्र सिद्धरामैया***

**गायक**

**८ एप्रिल १९२४ – १२ जानेवारी १९९२**

शिवपुत्र सिद्धरामैया कोमकली यांचा जन्म कर्नाटकातील सुळेभावी या गावी झाला. त्यांच्या आईचे नाव गुरुशुद्धौवा होते. वडील सिद्धरामैया हे अब्दुल करीम खाँसाहेब यांचे खास प्रेमी व प्रसिद्ध गायक



पंचाक्षरीबुवा यांचे मित्र होते व ते स्वतःही गात असत. घरात गाण्याची ध्वनिमुद्रिका लावली असताना अचानक शिवपुत्र यांनी ते गाणे गायला सुरुवात केली. ते गाणे त्यातील गायकीसकट शिवपुत्र बिनचूक गात असल्यामुळे घरातील सर्व जण आश्चर्यचकित झाले.

गुलबर्ग्याचे पूज्य गुरू मठकल शांतिवीर महास्वामी नेगिनहाळ येथे आले असता, त्यांच्या पाद्यपूजेच्या कार्यक्रमाच्या वेळी शिवपुत्र गायले. तेथे माघ पौर्णिमेच्या वेळी बागेवाडी येथे पब्लिक थिएटरमध्ये त्यांचे गाणे ऐकूण पूज्य स्वामीजींनी १९३२ साली शिवपुत्रांना ‘कुमार गंधर्व’ ही पदवी बहाल करून त्यांचा सन्मान केला. कुमारांची सांगीतिक प्रगती व्हावी म्हणून सिद्धरामैया त्यांना घेऊन बेळगावमध्ये राहू लागले. त्यांच्या तबलासाथीस प्रसिद्ध तबलावादक महबूब खाँ मिळाले. बेळगावच्या शिवानंद थिएटरमध्ये अनेक कार्यक्रम झाले. ‘कुमार गंधर्व ॲण्ड पार्टी’चे १९३१ ते १९३५ या काळात उत्तर भारतात अनेक कार्यक्रम झाले. कुमारांनी १९३५ मध्ये अलाहाबाद, कलकत्ता व मुंबई येथे अखिल भारतीय संगीत सभा, परिषदा गाजवल्या व संपूर्ण भारतात ‘कुमार गंधर्व’ या नावाचा दबदबा निर्माण झाला.

शंकरराव बोडसांच्या सांगण्यानुसार १९३५ पासून कुमार गंधर्वांनी मुंबई येथे प्रा. बा. र. देवधर यांच्याकडे राहून, गुरूकुल पद्धतीने शिक्षण घेण्यास आरंभ केला. तेव्हा कुमारांना कानडीशिवाय दुसरी भाषा येत नव्हती. शालेय शिक्षणाला रामराम ठोकलेला, तेव्हा ते गुरुपत्नीकडून मराठी लिहायला व वाचायला शिकले. गुरुवर्य देवधरांकडे शिक्षण चालू होते, तसेच इतर विद्यार्थ्यांना शिकविण्याचेही काम ते करत होते. सर्व मोठे कलाकार मुंबईभेटीत या ‘स्कूल’मध्ये आल्याशिवाय राहत नसत व ते आपल्याजवळील विद्या कुमार गंधर्वांना

देण्यास आतुर असत. देवधरांनी पं. भातखंड्यांची सर्व ग्रंथसंपदा कुमारांकडून वाचून घेतली, त्यावर चर्चा केली आणि समजावून सांगितले तसेच स्वरलेखनाचा सरावही करून घेतला. त्यांनी अनेक मोठ्या कलाकारांच्या ध्वनिमुद्रिका ऐकवून त्यांतील ग्राह्य-अग्राह्य कुमारांना समजावून सांगितले. अंजनीबाई मालपेकर, विलायत हुसेन खाँ, वाजिद हुसेन खाँ इ. अनेक कलाकारांकडूनही देवधरांच्याच सांगण्यानुसार कुमारांनी मार्गदर्शन घेतले.

कुमारांनी १९४७ साली भानुमती कंस यांच्याशी विवाह झाल्यावर स्वतंत्र बिऱ्हाड केले. त्यानंतर काही महिन्यांतच त्यांना क्षयाचा आजार झाला. काही दिवस उपचार घेतल्यानंतर डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार कुमारांनी देवासला कायमचे वास्तव्य करण्याचा निर्णय घेतला.

ते प्रदीर्घ काळ अंथरुणावर विश्रांती घेत होते व त्यांना गाण्यास बंदी होती. या आपत्तीचे रूपांतर संगीतावरील चिंतन करून सुसंधीमध्ये करणे ही कुमारांची महत्ता आहे. अंथरुणावर पडल्यापडल्याच कानांवर पडणाऱ्या लोकसंगीताकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. रागसंगीताची बीजे त्यांना लोकसंगीतात सापडू लागली. लोकसंगीतातील सुंदर बीजांचे परिष्करण करून काही नवीन रागरूपे कुमारांच्या मनामध्ये आकार धरू लागली. लोकसंगीतातील स्वरांच्या दर्जाच्या परिणामाचा अभिव्यक्तीसाठी उपयोग होतो हे त्यांनी शोधले.

याच काळात निर्गुण (नाथपंथीय) संगीतही त्यांच्या कानांवर पडले. देवासला शीलनाथ महाराजांचे वास्तव्य १९२१ पर्यंत होते. त्यामुळे नंतरही तेथील धुनीसंस्थानात नाथपंथीयांचे मोठ्या प्रमाणावर येणे-जाणे होते. एकांतातून व्यक्त होणारे त्यांचे संगीत वेगळी सृष्टी निर्माण करते हे कुमारांना जाणवले. निर्गुणी भजने हाती पडल्यावर संगीतकाराच्या नजरेतून त्यातील सौंदर्य लोकांपर्यंत पोहोचविण्याचे, तसेच मैफलीत भजनांना स्थान देण्याचे योगदान कुमारांकडून घडले. कुमार गंधर्व पं.विष्णू दिगंबरांच्या परंपरेतील असल्याने त्यांच्यावर भजनाचे संस्कार होतेच. त्यामध्ये पुढे खोल अवगाहन करून कबीर, सुरदास, मीरा, तुलसीदास, चंद्रसखी व इतरही अनेक संतकवींच्या भजनांना कुमारांनी आपल्या गायकीद्वारे स्वतंत्र कार्यक्रमांच्या रूपाने श्रोत्यांपर्यंत पोहोचविले. तसेच, 'तुकाराम-एक दर्शन' या कार्यक्रमातून मराठी अभंगांना संगीतकाराच्या नजरेतून वारकरी संप्रदायापेक्षा वेगळे कसे पाहता येईल हे श्रोत्यांपुढे मांडले.

आजारपणापूर्वीच कुमारांनी हिंदुस्थानी संगीतातील अग्रगण्य कलाकारांमध्ये आपले वेगळे, स्वतंत्र स्थान निर्माण केले होते. पाच वर्षांच्या सक्तीच्या विश्रांतीनंतर जेव्हा ते पुन्हा गाऊ लागले, तेव्हा चिंतन व मननामुळे त्यांच्या प्रस्तुतीमध्ये अधिक गहिरे व अनोखे रंग जाणवू लागले. त्यांना पूर्वीच्या स्वतःच्या प्रतिमेशी स्पर्धा करण्याचा प्रसंग आला. त्यांचे पूर्वीचे गाणे ऐकलेल्या श्रोत्यांना हा बदल पचविणे एकीकडे आवडत तर होते, पण दुसरीकडे सनातनी वृत्तीमुळे व पूर्वीचे हरविले या कल्पनेने कुमार विवाद्य ठरले. त्यांनी पुन्हा नव्याने आपला श्रोतृवर्ग घडविला व तत्कालीन अग्रगण्य कलाकारांत आपले स्वतंत्र, वेगळे स्थान निर्माण केले.

'अनुपरागविलास' भाग-१ हा कुमारजींचा स्वनिर्मित बंदिशींचा संग्रह १९६५ साली मौज प्रकाशनातर्फे प्रकाशित झाला. त्यात १३६ बंदिशी व १९ स्वनिर्मित धुनउगम राग व बंदिशी आहेत. या धुनउगम रागांचे संपूर्ण विवरण, त्यात बांधलेल्या १०/१२ तानांसह दिलेले आहे. दुसऱ्या भागात १११ बंदिशी आहेत. या दोन्ही पुस्तकांतील अनेक बंदिशी मैफलीत मांडलेल्या व ध्वनिमुद्रिकांमध्येही दिल्या आहेत. विषयांचे वैविध्य, स्वाभाविकता, परंपरेचा अभ्यास, रसपरिपोष इत्यादी गुणांमुळे या बंदिशी म्हणजे कुमारांनी पुढील काळासाठी दिलेला अनमोल ठेवा ठरला आहे.

कुमारांनी १९६३ ते १९८० या काळात अनेक वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रम पुस्तिकांसह सादर केले. 'गीत वर्षा', 'गीत हेमंत' व 'गीत बसंत' हे संपूर्ण वर्षाचे निसर्गचक्र संगीतातून मांडणारे तीन कार्यक्रम; 'ऋतुराज

मैफल' हा होळीउत्सवावर विशेष कार्यक्रम; 'त्रिवेणी' हा कबीर, सूरदास व मीराबाई यांच्या रचनांचा, भजनांचा कार्यक्रम; 'तुलसीदास - एक दर्शन', 'निर्गुण बानी', 'तुकाराम - एक दर्शन', 'सूरदास- एक दर्शन' हे संत-संगीताधारित; 'मला उमजलेले बालगंधर्व', 'भा.रा. तांबे रजनी', 'टप्पा-ठुमरी-तराणा', 'मालवा की लोकधुनें', 'गौड-मल्हार दर्शन' इत्यादी विशेष कार्यक्रमांचे कुमारांनी सादरीकरण केले.

कुमार गंधर्वांची व्यक्तिगत व जन्मजात गुणसंपदा फार मोठी होती. अर्थात तिचा विकासही त्यांनी आयुष्यभर अथक प्रयत्नांनी केला. त्यांनी अखेरच्या वीस वर्षांत अनेक मुलाखती व संवादांच्या जाहीर कार्यक्रमांतून आपले सांगीतिक विचार मांडले. त्यांपैकी बरेचसे ध्वनिमुद्रित, ध्वनिचित्रित व काही पुस्तकरूपानेही उपलब्ध आहेत. त्यांनी सुमारे ४०० हून अधिक लोकगीतांचा स्वरलिखित संग्रह केला. प्रत्येक वर्षीच्या पत्रव्यवहाराची स्वतंत्र फाईल केली. शाळेचे तोंडही न पाहिलेल्या कुमारजींच्या घरी विपुल अशी ग्रंथसंपदा आहे. पतंजलींची योगसूत्रे, भरताचे नाट्यशास्त्र, स्थापत्यकला, शिल्पकला, चित्रकला, छायाचित्रणकला इत्यादींचा त्यांनी व्यासंग केला व त्यांतून संगीतासाठी काय उपयुक्त ठरेल याचा त्यांनी सतत विचार केला. कुमारजींनी वाशी येथे घेतलेल्या संगीत-चर्चायुक्त शिबिरातील विचारांचे मो.वि. भाटवडेकरांनी संपादित केलेले 'मुक्काम वाशी' हे पुस्तक मौज प्रकाशनाने प्रसिद्ध केले आहे.

स्वतःच्या बंदिशींत 'शोक' हे नामाभिधान (तखल्लुस) घेणाऱ्या कुमारांना आयुष्यभर अनेक आपत्तींशी सामना करावा लागला तरी त्यांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन सकारात्मक होता.

कुमार गंधर्वांनी संगीत क्षेत्रात दिलेल्या योगदानामुळे डॉक्टर ऑफ म्यूझिक (१९६२, विक्रम विद्यापीठ, उज्जैन), डि.लिट. (१९७३), संगीत नाटक अकादमीची शिष्यवृत्ती (१९७४), 'पद्मभूषण' (१९७७, भारत सरकार), 'शिखर सन्मान' (१९७३, मध्यप्रदेश सांस्कृतिक विभाग), 'पद्मविभूषण' आणि हाफीज खाँ पुरस्कार (१९९०) आदी पुरस्कारांचे ते मानकरी ठरले. त्यांचे देवास येथे निधन झाले.

त्यांचा संगीतवारसा पत्नी वसुंधरा कोमकली, पुत्र मुकुल, कन्या कलापिनी, नातू भुवनेश तसेच पंढरीनाथ कोल्हापुरे, मीरा राव, सत्यशील देशपांडे, विजय सरदेशमुख, मधुप मुद्गल इ. अनेक शिष्य चालवत आहेत. वसंतराव देशपांडे, काशिनाथ बोडस, मालिनी राजुरकर, वीणा सहस्रबुद्धे इ. अनेक कलाकारांनी कुमारजींचा सांगीतिक प्रभाव घेऊन गायन केले .

'भानुकुल' या त्यांच्या निवासस्थानी प्रतिवर्षी संगीतसभा आयोजित होते. मध्यप्रदेश सरकारतर्फे, तसेच सोलापूरच्या पुजारी प्रतिष्ठानातर्फे 'कुमार गंधर्व पुरस्कार' देण्यात येतो.

— पं. विजय सरदेशमुख

## कुर्डीकर, मोगूबाई

**गायिका**

**१५ जुलै १९०४ – १० फेब्रुवारी २००१**



संगीताचे गुण जन्मतःच घेऊन आलेल्या मोगूबाई कुर्डीकर यांचे मूळ गाव गोव्यातील कुर्डी हे होय. मोगूबाईंच्या आजी गौरीबाई व आई जयश्री या दोघीही गायिका होत्या. नथ्थन खाँच्या शिष्या बाबलीबाई यांच्याप्रमाणे मोगूबाईंनीही महान गायिका व्हावे अशी आई जयश्री यांची दुर्दम्य इच्छा होती. त्यामुळे लहानग्या मोगूबाईंच्या संगीत शिक्षणासाठी आईने कष्ट घेतले. अगदी सुरुवातीला जांबवली येथील एका हरदासाकडे त्यांनी मोगूबाईंना शिक्षणासाठी पाठवले. पण पुढे हरदासांचा मुक्काम हलल्यावर मोगूबाईंचे शिक्षण थांबले. लहानपणीच छोट्यामोठ्या कार्यक्रमांत भाग घेऊन चांगली गायिका म्हणून मोगूबाईंनी उत्तम लौकिक

कमविला होता. त्या वेळी अंबूबाईंच्या 'सातारकर स्त्री संगीत मंडळी'चा गावात मुक्काम होता. तेथे प्रसिद्ध अभिनेते चिंतोबा गुरव नाट्यसंगीताचे शिक्षण देत. या 'मंडळी'ने मोगूबाईंना बोलावणे धाडले. त्यांचा निकोप आवाज व तीव्र आकलनशक्ती पाहून चिंतोबा प्रभावित झाले. त्यांनी मोगूबाईंना निरनिराळ्या संगीत नाटकांत महत्त्वाच्या भूमिका दिल्या. सं. सौभद्रमध्ये 'सुभद्रा', पुण्यप्रभावात 'किंकिणी', शारदात 'शारदा', मृच्छकटिकात 'वसंतसेना' या सर्व भूमिका त्यांनी प्रभावीपणे पार पाडल्या व श्रोत्यांची मने जिंकली. त्यांची 'किंकिणी'ची भूमिका विशेषत: गाजली होती.

मोगूबाईंनी त्याच कंपनीतील प्रसिद्ध नर्तक रामलाल यांच्याकडे शास्त्रीय नृत्याचे शिक्षण घेतले. त्यानंतर चुनीलाल व मझले खाँ यांच्याकडेही शिक्षण घेतले. या शिक्षणामुळे काही अवघड तालांवर त्यांचे प्रभुत्व आले. तसेच मोहक पदन्यास, भावपूर्ण मुद्रा, अभिनय यांचा पुढे गाण्यांत स्वराविष्कार करताना त्यांना उपयोग झाला. याच काळात त्या दत्ताराम नांदोडकरांकडे ठुमरी, गझल शिकल्या. या सर्व व्यापांमुळे मोगूबाईंच्या प्रकृतीवर विपरीत परिणाम झाला. त्या क्षीण दिसू लागल्या. मोगूबाईंच्या प्रकृतिस्वास्थ्यासाठी बाळकृष्णमामा पर्वतकर यांनी सांगलीला बिऱ्हाड हलवायचे ठरवले.

सांगलीला जाण्याचा हा निर्णय मोगूबाईंच्या सांगीतिक जीवनात महत्त्वाचा ठरला. कारण येथूनच पुढे त्यांना घरंदाज, खानदानी गायकीचे खरेखुरे शिक्षण मिळत गेले. त्यांच्या वैद्यकीय उपचारांबरोबरच आबासाहेब सांबारे वैद्य यांच्या घरी बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, रहिमत खाँ, अब्दुल करीम खाँ, पं. पलुस्कर, वझेबुवा आणि भावी गुरू गानमहर्षी अल्लादिया खाँसाहेब यांतील बऱ्याच गायकांची गाणी या अठरा वर्षांच्या मोगूबाईंच्या कानी पडली. त्यांच्यावर उच्च गायकीचे संस्कार झाले. योगायोगाने इनायत खाँ पठाण यांची शिष्या होण्याची संधी त्यांना मिळाली. परंतु ही तालीम वर्षभरच चालली. तरीही मोगूबाईंनी रियाज चालूच ठेवला. एके दिवशी अल्लादिया खाँ यांनी त्यांचा रियाज ऐकला. मोगूबाईंचे गाणे त्यांना आवडले व खाँ साहेबांनी त्यांना तालीम देण्याचे ठरवले. खाँसाहेबांकडे मोगूबाईंची तालीम दीड वर्ष सुखेनैव चालू होती. १९२१ मध्ये खाँसाहेबांना केसरबाईंना शिकवण्यासाठी सांगली सोडून मुंबईस स्थायिक व्हावे लागले. कोल्हापूरचे शाहू महाराज १९२२ मध्ये वारले आणि खाँसाहेबांचे राजछत्रही नाहीसे झाले. महाराजांच्या निर्वाणानंतर मुंबईत कायमचे वास्तव्य करण्यावाचून त्यांच्यापुढे दुसरा पर्यायच नव्हता. दरम्यान काही काळासाठी मोगूबाईंना गोव्यात परतावे लागले. परंतु घरातील वडीलधाऱ्या मंडळींचा निश्चय व मोगूबाईंची अनन्यसाधारण संगीत भक्ती यांमुळे घरातील मंडळींसह त्या १९२२ साली मुंबईत येऊन दाखल झाल्या. त्या वेळेस खाँसाहेब केसरबाई केरकर यांना तालीम देत होते व केसरबाई यांना शिकवीत असताना त्या दहा वर्षांच्या काळात खाँसाहेबांनी अन्य कुणालाही शिकविता कामा नये, ही केसरबाई यांची अट खाँसाहेबांनी मान्य केली होती. यामुळे तीव्र इच्छा असूनही खाँसाहेबांना मोगूबाईंना शिकवणे शक्य झाले नाही. एवढी धडपड करून मुंबईला येऊन त्यांच्या पदरी निराशाच आली. पर्याय म्हणून त्या आग्रा घराण्याच्या उ. बशीर खाँ या विद्वान गायकांकडे शिकू लागल्या.

वर्ष-सहा महिने ही तालीम व्यवस्थित चालू असताना अचानक एके दिवशी उ. बशीर खाँ मोगूबाईंना म्हणाले, ''उद्यापासून माझे काका उ. विलायत हुसेन खाँ तुला शिकवायला येतील. तू त्यांचा गंडा बांध.'' या अकल्पित कलाटणीने मोगूबाई गोंधळून गेल्या. पण गुरुआज्ञा प्रमाण मानावी लागली. त्यांनी विलायत हुसेन खाँचा गंडाही बांधला. ही तालीमही तीन-चार महिनेच टिकली. कारण प्रकृती खालावल्यामुळे खाँसाहेबांना आपल्या गावी जावे लागले. मोगूबाईंची ही अवस्था पाहून अल्लादिया खाँसाहेबांचे मन द्रवले आणि त्यांनी १९२६ साली आपले धाकटे बंधू हैदर खाँ यांना कोल्हापुरातून बोलावून घेतले आणि मोगूबाईंना शिकवण्याची आज्ञा केली. त्यांचा आवाज अतिशय

मधुर होता आणि त्यांची शिकवण्याची पद्धतही मोगूबाईंना फार आवडली.

खाँसाहेब एकच राग त्यांना नऊ महिने शिकवत होते. या प्रक्रियेत, रागाच्या चलनाखेरीज जयपूर गायकीची ख्याल भरण्याची रीत, रागाची विविध अंगांनी बढत, त्यासाठी लागणारा आवाजाचा लगाव या सर्व गोष्टी त्यांनी मोगूबाईंकडून साध्य करून घेतल्या. याच काळात त्यांना जयपूर गायकीची खरीखुरी तालीम मिळाली. तसेच हैदर खाँचे नादमधुर बोल बनवण्याचे तंत्र मोगूबाईंनी उचलले. यामुळेच जयपूर अत्रौली घराण्यात मोगूबाईंइतके आकर्षक आणि नादमधुर बोल दुसऱ्या कोणत्याही कलाकाराला येत नव्हते. हैदर खाँसाहेबांची ही तालीम १९२६ पासून एप्रिल १९३१ पर्यंत चालू होती. पुढे खाँसाहेबांची तब्येत बिघडत चालली. शिकवणे अशक्य होऊ लागले. तेव्हा अल्लादिया खाँच्या आज्ञेवरून त्यांना अत्रौलीस जावे लागले.

योगायोगाने त्याच सुमारास लयभास्कर खाप्रूमामा पर्वतकर मोगूबाईंच्या शेजारी राहावयास आले. खाप्रूजी म्हणजे लयीच्या बाबतीत संगीतातील एक आश्चर्यच होते. या सिद्धहस्त लयभास्कराच्या ज्ञानाचा बराचसा लाभ मोगूबाईंना झाला. खाप्रूमामांनी आपली विद्या त्यांना भरभरून दिली, आणि मोगूबाईंनीही ती मनापासून आत्मसात केली. पुढे १९३४ मध्ये अल्लादिया खाँसाहेबांनी त्यांना रीतसर गंडा बांधला. त्यानंतर बरीच वर्षे खाँसाहेबांच्या शिकवणुकीचा मोगूबाईंना लाभ झाला. मोगूबाईंच्या मैफली भारतातील सर्व प्रमुख शहरी झाल्या. मोगूबाईंना खाप्रूमामांकडून लयीचे जे सूक्ष्म ज्ञान प्राप्त झाले होते, त्याचे प्रत्यंतर त्यांच्या मैफलीतून दिसून येई. विद्या मिळवण्यासाठी अपार कष्ट केलेल्या मोगूबाईंनी उदारपणे विद्यादान करून अनेक शिष्य घडवले. त्यांच्या उल्लेखनीय शिष्यांमध्ये वामनराव देशपांडे, सुशीलाराणी पटेल, बबनराव हळदणकर, कमल तांबे, कौसल्या मंजेश्वर, सुहासिनी मुळगावकर, पद्मा तळवलकर व सुलभा पिशवीकर हे आहेत.

मोगूबाईंची आचारसंहिता त्यांच्या गुरूएवढीच कडक होती. गाताना आवाज लावण्यात जेवढी शुद्धता, निकोपता होती, तशीच ती आचरणातही होती.

अल्लादिया खाँ प्रणीत जयपूर घराण्यामध्ये द्रुत बंदिशी गाण्याचा विशेष कल नव्हता, मात्र मोगूबाईंनी अनेक अप्रचलित रागांतील विलंबित ख्यालांसाठी द्रुत बंदिशींची रचना करून मैफलीतील प्रस्तुती परिपूर्ण केली. अनेक बंदिशींच्या रचनेत त्यांनी आपल्या गुरूंचे स्मरण म्हणून ‘अहमदपिया’ हीच मुद्रा वापरली.

जयभारत रेकॉर्ड कंपनीने १९४८ साली त्यांच्या गायनाच्या पूर्वी, सावनी, जयजयवंती, नायकी कानडा या रागांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या. त्या खूप गाजल्या. तसेच १९४९ साली कोलंबिया कंपनीनेही त्यांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या. स्वातंत्र्यप्राप्तीनिमित्त वि.द. अंभईकरांनी खंबावती रागात स्वरबद्ध केलेले ‘वंदे मातरम्’ व स्नेहल भाटकरांनी स्वरबद्ध केलेले विहागबहार रागातील ‘फिर आई लौट बहारें’ हे मधुकर राजस्थानी यांचे गीतही मोगूबाईंच्या आवाजात ध्वनिमुद्रित करून एच.एम.व्ही.ने प्रसिद्ध केले. त्यांना संगीत नाटक अकादमी सन्मान (१९६८) व पद्मभूषण (१९७४) देऊन गौरविण्यात आले.

मोगूबाई कुर्डीकरांच्या मागे दोन मुली व एक मुलगा असा परिवार आहे. आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या श्रेष्ठ गायिका, किशोरी आमोणकर या त्यांच्या ज्येष्ठ कन्या होत. सत्त्याण्णव वर्षांचे दीर्घायुष्य जगून मुंबई येथे त्यांचे निधन झाले.

- पं. बबनराव हळदणकर

## कुलकर्णी, धोंडूताई गणपत

**गायिका**

**२३ जुलै १९२७**

धोंडूताई गणपत कुलकर्णी यांचा जन्म कोल्हापूर येथे एका कलाप्रेमी कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव सोनाताई होते. त्यांचे वडील शालेय शिक्षक होते व ते ग्वाल्हेर घराण्याची गायकी शिकले होते. कोल्हापूरसारख्या सांगीतिक वातावरण असलेल्या



शहराचा त्यांना फायदा झाला. ज्या काळात पांढरपेशा समाजात गायनाचे शिक्षण किंवा गायनाला अजिबात प्रतिष्ठा नव्हती, त्या काळात धोंडूताईंच्या वडिलांनी त्यांना गायनाचे शिक्षण देण्याचे धाडस दाखविले आणि धोंडूताईंनी त्याचे चीज केले.

सुरुवातीला जयपूर घराण्याचे अध्वर्यू उ. अल्लादिया खाँ यांचे भाचे नथ्थन खाँ यांच्याकडे धोंडूताई तीन वर्षे शिकल्या व त्यानंतर याच घराण्याची तालीम त्यांनी आयुष्यभर घेतली. वयाच्या आठव्या वर्षापासून त्या आकाशवाणीवर गाऊ लागल्या. नंतर उ. अल्लादिया खाँ यांचे पुत्र भूर्जी खाँसाहेबांकडून त्यांनी १९४० ते १९५० अशी दहा वर्षे शिक्षण घेतले व या काळात त्या स्वतंत्रपणे मैफलीही करू लागल्या. त्या व भगिनी शकुंतला या सहगायनही करत असत.

त्या १९५७ पासून बडोद्याच्या दरबार गायिका लक्ष्मीबाई जाधव व अल्लादिया खाँसाहेबांचे नातू अजिजुद्दिन खाँ ऊर्फ बाबा यांच्याकडे सरकारी शिष्यवृत्ती घेऊन शिकल्या. केसरबाई केरकर यांची तालीम मिळावी म्हणून त्यांनी व वडिलांनी खूप प्रयत्न केले. कोल्हापूरचे घर विकून ते मुंबईत स्थायिक झाले. अखेरीस त्यांना यश मिळून त्यांना केसरबाईंची तालीम १९६२ ते १९७१ या काळात लाभली. केसरबाईंच्या त्या एकमेव शिष्या होत.

जयपूर घराण्यातील खास खुला आकार, पेचदार आलापचारी व बोलतान, वक्रगतीची तानक्रिया, अनवट व जोडरागांची पेशकश ही धोंडूताईंच्या गायकीची वैशिष्ट्ये आहेत. आपले स्वतःचे गायकीबद्दलचे विचार कसोशीने जपणाऱ्या आणि लोकप्रियता मिळविण्यासाठी तडजोड न स्वीकारणाऱ्या काही गायिकांपैकी धोंडूताई आहेत. आपल्या कलामूल्यांबाबत धोंडूताई अतिशय जागरूक आहेत. जयपूर परंपरेत आपले वेगळे काही करावे असे त्यांना वाटत नाही. आपल्या गायकीची खोली आणि गांभीर्य ज्याने-त्याने जपावे, अशा मताच्या त्या आहेत. हलक्या तडजोडी त्यांना मान्य नाहीत. आपली विशुद्ध संगीतकला जोपासण्यासाठी त्या संसारविन्मुख झाल्या. व्रतस्थ राहून कला जोपासणे याचा पुढच्या पिढीसाठी एक आदर्श त्यांच्या व्यक्तित्वात दिसतो.

आकाशवाणीच्या 'अ' दर्जाच्या कलाकार म्हणून धोंडूताईंनी अनेक वर्षे गायन केले. केसरबाई केरकर संगीत संमेलनात त्यांचे प्रतिवर्षी गायन होते व संमेलनाच्या अखेरीस गाण्याचा मान त्यांचा असतो. त्यांच्या ध्वनिमुद्रिकाही निघाल्या. 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९९०), 'आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमी' पुरस्कार (२००४), 'देवगंधर्व' पुरस्कार (२०१०), इ. देऊन त्यांचा गौरव करण्यात आला आहे. नमिता देवीदयाल या धोंडूताईंच्या शिष्येने धोंडूताई, केसरबाई व अल्लादिया खाँ यांच्या संगीतपरंपरेवर 'म्यूझिक रूम' नावाचे एक पुस्तक लिहिले आहे. त्या आजही विद्यादानरत आहेत.

— डॉ. शुभदा कुलकर्णी

## कुळकर्णी, वसंतराव
**गायक**
**४ जानेवारी १९१८ — ३ मार्च १९९७**



वसंतराव कुळकर्णी यांचा जन्म सातारा शहरी झाला. सातारा - कऱ्हाडजवळच्या वऱ्हाड या गावचे राहणारे म्हणून त्यांचे मूळ नाव वऱ्हाडी होते. वडील बागायतदार होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण कोरेगावात झाले. सातवी अभ्यासासाठी ते बेळगावला चुलत्याकडे होते. या बेळगावातच त्यांच्यावर गाण्याचे संस्कार झाले. बेळगावाहून सातवी उत्तीर्ण झाल्यानंतर (त्या वेळची मराठी मॅट्रिक) वडिलांनी वसंतरावांना दुसऱ्या चुलत्याकडे इंग्रजी शिक्षणासाठी पाठविले. या चुलत्याला संगीत नाटकाची

आवड होती. आपल्या घराण्यात कुणीतरी गाणे शिकावे ही त्यांची इच्छा होती. वसंतरावांना त्यांनी लक्ष्मणराव बैरागी या मास्तरांची शिकवणी ठेवली. ही त्यांच्या संगीत शिक्षणाची सुरुवात होय.

औंध येथे अन्तूबुवा जोशींकडे शिकणाऱ्या बंडू कुळकर्णी या तरुणाच्या सुचवण्याने, तसेच गजाननबुवांच्या सल्ल्याने वसंतराव औंधला अन्तूबुवांकडे संगीत शिक्षणाकरिता गेले. औंध येथे राहून त्यांच्या अतिशय कडक शिस्तीत तब्बल आठ वर्षे त्यांनी संगीताचे शिक्षण घेतले. वयाच्या पंचविसाव्या वर्षी बुवांच्याच सांगण्यावरून वसंतरावांनी औंधमधून मुक्काम हलवला आणि शिकवण्या व संगीताचे कार्यक्रम करून आपल्या चरितार्थास सुरुवात केली.

याच दरम्यान, त्यांच्या आयुष्यात एक नाट्यपूर्ण स्थित्यंतर घडून आले. बॅ. खाजगीवाल्यांनी त्यांच्या महेश नाट्य कंपनीत वसंतरावांना ७५ रु. पगारावर घेतले. इथून त्यांचा नाट्यप्रवास सुरू झाला. या कंपनीच्या 'खलवधू', 'कृष्णकारस्थान', 'लक्षाधीश' आदी नाटकांतून संगीत भूमिका करून त्यांनी नट म्हणून आपला जम बसविला. नाटकांतून काम करत असतानाच त्यांना गोविंदराव टेंब्यांचाही सहवास लाभला. महेश नाटक मंडळी दोन वर्षांतच बंद पडली. त्या वेळी बालमोहन संगीत नाटक मंडळी जोरात सुरू होती. बालमोहनचे मालक दामूअण्णा जोशींनी त्यांना आपल्या कंपनीत बोलावून घेतले. आचार्य अत्रेंच्या संगीत 'पाणीग्रहण' या नाटकातील वसंतरावांची चंडोलची भूमिका गाजली. याच कंपनीच्या 'जग काय म्हणेल', 'लग्नाची बेडी' आदी नाटकांतून त्यांनी प्रमुख संगीत भूमिका केल्या. शिवाय अन्य ठिकाणांहून 'शारदा', 'संशयकल्लोळ', 'सौभद्र' या नाटकांतूनही त्यांनी भूमिका केल्या. 'संशयकल्लोळ' या नाटकाच्या शेकडो प्रयोगांत काम केले. त्यांनी १९४९ पासून नाट्यकलोपासक मंडळ, दादर या संस्थेच्या अनेक नाटकांचे नाट्य व संगीत दिग्दर्शन केले. याशिवाय इतर अनेक मंडळांची नाटकेही दिग्दर्शित केली. त्यांतील काहींना पारितोषिकेही मिळाली. वसंतरावांचा १९६१ पर्यंत रंगभूमीशी संबंध होता.

वसंतरावांनी अन्तूबुवांकडून ग्वाल्हेर घराण्याची गायकी आत्मसात केली. त्यानंतर त्यांनी आग्रा घराण्याचे गायक व वाग्गेयकार पं. जगन्नाथबुवा पुरोहितांकडे १९६८ पर्यंत म्हणजे बुवांच्या अखेरपर्यंत तालीम घेतली. त्यानंतर १९७७ पासून उ. खादीम हुसेन खाँ कडेही ते शिकत होते. वसंतराव कुळकर्णी यांचे गायकापेक्षाही एक उत्तम शिक्षक म्हणून योगदान फार मोठे आहे. 'गुरू समर्थ गायन विद्यालया'ची स्थापना १९५२ साली गोरेगावात झाली. सुरेश हळदणकरांच्या साहाय्याने त्यांच्याच जागेत हे विद्यालय १९५३ साली सुरू झाले. त्यानंतर १९५९ साली 'सफिया मंझिल'मध्ये हे विद्यालय आले व ते आजतागायत सुरू आहे.

अतिशय शिस्तबद्ध, वेळेच्या बाबतीत काटेकोर असलेल्या वसंतराव कुळकर्णींच्या हाताखाली आजवर अनेक विद्यार्थी शिकून गेले आहेत. विद्यार्थ्यांच्या कल्पनाशक्तीला चालना देऊन, शास्त्राच्या बाबतीत तडजोड न करता, विद्यार्थ्यांच्या वकुबानुसार, त्याचा मूळ आवाज बिघडू न देता त्याचे गाणे ते फुलवत. अस्थायी अंतऱ्यावर त्यांचा विशेष कटाक्ष असे. आरती अंकलीकर-टिकेकर, रघुनंदन पणशीकर, देवकी पंडित, प्रमिला दातार, विजया जोगळेकर-धुमाळे, नरेन्द्र दातार, राणी वर्मा, भारती वर्मा अशा अनेक गायक-गायिकांचा शास्त्रीय संगीताचा पाया पक्का करून घेण्यात व त्यांच्यामधील सांगीतिक गुण फुलविण्यात वसंतरावांचा वाटा निश्चितच मोठा आहे.

अनेक बंदिशी त्यांच्या संग्रही होत्या. त्यांचे कार्यक्रम जाहीररीत्या विशेष झाले नसले तरी खासगी कार्यक्रमात ते रंग भरत. त्यांचा आवाज तसा मैफिलीतील गायनाला अनुकूल नव्हता. मा. कृष्णराव, राम मराठे यांचा त्यांच्या गायनावर विशेष प्रभाव होता. 'गुनिये' या नावाने त्यांनी अनेक बंदिशी रचल्या होत्या.

— माधव इमारते

क

## केरकर, केसरबाई
**गायिका**
**१३ जुलै १८८२ – १५ सप्टेंबर १९७७**



केसरबाई केरकर यांचा जन्म गोव्यातील केरी फोंडा येथे झाला. त्यांच्या आईचे नाव भीमाबाई होते. त्यांच्या घरातच संगीताची परंपरा होती. गोव्यात जत्रेच्या दिवसांत होणाऱ्या गवळणकाला व नाटकांतून केसरबाई श्रीकृष्णाची भूमिका करीत. वयाच्या आठव्या वर्षी कोल्हापूर येथे अब्दुल करीम खाँ यांनी त्यांना दहा महिने शिकवले. त्यानंतर त्यांना वझेबुवांची तालीम तीन ते चार वर्षे मिळाली. त्या १९०९ साली मुंबईत राहण्यास आल्या. बर्कतुल्ला खाँची तालीम त्यांना खंडितच स्वरूपात १९१५ पर्यंत मिळाली. मध्यंतरात १९१२ मध्ये अल्लादिया खाँचा मुक्काम मुंबईत आठ महिने असताना त्यांना त्यांचीही तीन महिने तालीम मिळाली. तसेच, त्यांना भास्करबुवा बखल्यांचीही सुमारे ४-५ महिने तालीम मिळाली. जवळजवळ १९१७ पर्यंत त्यांचे शिक्षण नियमित न होता काहीसे खंडित स्वरूपाचे झाले. त्यांनी हिरालाल यांच्याकडून कथक नृत्याची तालीम घेतली होती. त्या मझले खाँ यांच्याकडून अदाकारी व ठुमऱ्याही शिकल्या.

केसरबाईंच्या जीवनाला वळण देणारी मुंबईतील घटना म्हणजे भास्करबुवांच्या पट्टशिष्या ताराबाई शिरोडकर यांच्याबरोबर एकाच मैफलीत गाण्याचा प्रसंग होय. केसरबाईंचे गायन ताराबाईंच्या आधी झाले होते, पण त्यात रंग भरला गेला नव्हता. त्यामुळे आपल्या गायनाला सुरुवात करण्याअगोदर, ‘‘आधी इथली बेसुरी हवा निघून जाऊ दे,’’ असे बोल ताराबाईंनी सुनावले. ते जिव्हारी लागल्यामुळे ज्याला हिंदुस्थानात तोड नाही अशा गुरूकडून तालीम घेण्याचा केसरबाईंनी निर्धार केला. गानसम्राट अल्लादिया खाँ हे या दृष्टीने योग्य नाव होते. पण खाँसाहेबांनी आधी केसरबाईंना १९१२ मध्ये मुंबईत असताना चार महिने शिकवून पाहिले होते व त्यांना ही विद्या पेलवणार नाही असे त्यांनी ठरवून टाकले होते. परंतु शेठ विठ्ठलदास द्वारकादास यांनी खाँसाहेबांचे मन वळवले, तसेच कोल्हापूर दरबारातून खाँसाहेबांना मुंबईला पाठविण्याचीही शाहू महाराजांना गळ घातली. पण खाँसाहेबांनी अतिशय कडक अटी समोर ठेवल्या : केसरबाईने किमान दहा वर्षे शिक्षण घेतले पाहिजे, या काळात आपण सांगू तसा आणि सांगू तितका वेळ रियाझ केला पाहिजे व बाहेर कोठेही मैफल करू नये. खाँसाहेब जर बाहेरगावी गेले तर केसरबाईने तेथे स्वखर्चाने येऊन तालीम सुरू ठेवली पाहिजे. ध्येयप्राप्तीकरिता केसरबाईंनी या सर्व अटी मान्य केल्या व १ जानेवारी १९२१ रोजी खाँसाहेबांकडून त्यांचे रीतसर गंडाबंधन झाले व त्यांच्या संगीतजीवनातील दुसरे पर्व सुरू झाले.

या दहा वर्षांच्या तालमीत केसरबाईंच्या गाण्याने जुनी कात टाकून नवे रूप धारण केले. केसरबाई १९३० नंतर जयपूर अत्रौली घराण्याच्या एक प्रथितयश गायिका म्हणून मानल्या गेल्या. भारतभरातील विविध संगीत परिषदांमधून त्यांचे गायन होई. एक मानी व मोठी बिदागी घेणाऱ्या करारी गायिका म्हणून त्यांचा दरारा होता. त्यांच्या गायकीची पुढील वैशिष्ट्ये सांगता येतील -: अतिशय चुस्त, लांब-रुंद असा स्थाई अंतरा भरणे, त्यानंतर विलंबितही संथ, दीर्घ आलापांनी भरणे, चिजेचा मुखडा गाठताना शेवटच्या स्वरावलीत आमदचा हटकून प्रयोग करणे. खाँसाहेबांचा हा खास गुण केसरबाईंनी बहुतांशी आत्मसात केला होता. या रीतीनुसार स्वत: केसरबाई विलंबित इतक्या भारदस्तपणे भरत, की आलाप चालू असताना अगदी किंचितसुद्धा हरकतीचा तुकडा घेत नसत. या घराण्याची तानकारी अतिशय आकर्षक असे. तान स्वच्छ व दाणेदार असे. त्यात निव्वळ जोरकसपणा नसून नादमाधुर्य होते. त्यांनी १९६६ मध्ये त्यांचे गाणे ऐन बहरात असतानाच संगीत संन्यास घेतला.

कलकत्त्याच्या अखिल भारतीय संगीत परिषदेत केसरबाईंचा एप्रिल १९३८ मध्ये मोठा सत्कार झाला होता. त्यांना दिल्लीची सरकारी सनद मिळाली. त्यांना १९६९ मध्ये 'पद्मभूषण' पुरस्कार देऊन त्यांचा गौरव करण्यात आला व महाराष्ट्र सरकारने 'राजगायिका' म्हणून त्यांचा गौरव केला. संगीत नाटक अकादमीने १९५३ मध्ये 'प्रमुख आचार्य' म्हणून त्यांना गौरविले. त्यांना १९४८ साली कलकत्ता येथील 'संगीत प्रवीण संगीतानुरागी सज्जन समाज समिती' या संस्थेने 'सूरश्री' हा किताब दिला व नेहमी याच पदवीने त्यांचा उल्लेख होई. कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोर त्यांच्या गायनाचे चहाते होते.

एच.एम.व्ही.ने त्यांच्या ललित, बिभास, तोडी, मुलतानी, ललितागौरी, तिलककामोद, मारुबिहाग, मालकंस, परज इ. रागांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या, ज्या विलक्षण गाजल्या. तसेच, 'ब्रॉडकास्ट लेबल'खाली त्यांच्या खंबावती, गौरी, काफी कानडा, देस या रागांच्या व काही ठुमऱ्यांच्याही ध्वनिमुद्रिका निघाल्या होत्या. 'व्हॉएजर' या अवकाशयानातून १९७७ साली केसरबाईंच्या भैरवी होरीतील 'जात कहाँ हो' या ठुमरीचे ध्वनिमुद्रण अवकाशात पाठविण्यात आले. एक भव्य गायकी सतत ३० वर्षे संगीत रसिकांना ऐकवून त्यांच्यासमोर केसरबाईंनी संगीताचा भव्य आदर्श उभा केला. त्यांचे मुंबईत निधन झाले.

धोंडूताई कुलकर्णी या त्यांच्या एकमेव शिष्या होत. त्यांच्या तेजस्वी गायकीची छाप अनेकांवर पडली होती. पं. गजाननबुवा जोशी, पं. भीमसेन जोशी यांच्यावरही त्यांचा प्रभाव होता.

— पं. बबनराव हळदणकर

## केळकर, उत्तरा विश्राम

**गायिका**

**४ नोव्हेंबर १९५१**

उत्तरा विश्राम केळकर यांचा जन्म रत्नागिरी येथे झाला. त्यांनी मुंबईच्या ग्रँट रोड येथील 'सेंट कोलंबा' या शाळेत शालेय शिक्षण, तर 'विल्सन



महाविद्यालया'मधून उच्चशिक्षण घेतले. त्यानंतर त्यांनी मुंबई विद्यापीठामधून अर्थशास्त्र या विषयात पदवी (बी.ए.) आणि शास्त्रीय संगीतामध्ये पदविका संपादन केली. उत्तरा केळकरांच्या आई शकुंतला फडके या वामनराव सडोलीकर यांच्याकडे गायन शिकत असत. त्यामुळे बालपणापासून आईच्या गायकीचे सूर उत्तराताईंच्या कानी पडू लागले. नकळत्या वयातच सुरांची ओढ आणि समज येत गेली. मग शिक्षणासोबतच संगीताचा प्रवासही सुरू झाला.

पं. फिरोज दस्तूर यांच्याकडे त्यांनी जवळपास पंचवीस वर्षे शास्त्रीय गायनाचे धडे गिरवले. संगीतकार यशवंत देव यांच्याकडून सुगम संगीत, तर संगीतकार श्रीकांत ठाकरे यांच्याकडून त्यांनी गीत, गझल आणि भजन या प्रकारांचे धडे घेतले. लहानपणापासूनच नानाविध गायनस्पर्धांमधून त्यांनी आपल्या गायकीची छाप रसिकांच्या मनावर उमटविली. ऑल इंडिया रेडिओवरील शास्त्रीय, उपशास्त्रीय आणि सुगम संगीत या तीनही गानप्रकारांमध्ये त्यांनी प्रथम स्थान पटकावले. विशेष म्हणजे, डिसेंबर २०१० मध्ये याच स्पर्धांसाठी त्यांनी परीक्षक म्हणून कार्यभारही सांभाळला.

एकाहत्तर साली 'हयवदन' या नाटकासाठी गायलेल्या गाण्याने उत्तराताईंची पार्श्वगायिका अशी ओळख बनली. उत्तरा केळकरांना १९७६ च्या सुमारास आलेल्या 'भूमिका' या हिंदी चित्रपटात शुद्ध कल्याण रागातील चीज गाण्याची संधी मिळाली. या छोट्या, पण महत्त्वाच्या संधीचे केळकरांनी सोने केले आणि त्या पाठोपाठ स्वतंत्र गाण्यांसाठी त्यांचे नाव नेहमी पुढे राहिले. केळकरांनी हिंदी, मराठी, गुजराती अशा जवळपास दहा ते बारा भाषांमध्ये चारशेहून अधिक चित्रपटगीते गायली आहेत.

दूरदर्शनवर कवयित्री बहिणाबाई यांच्या जीवनावर आधारित एक लघुपट प्रदर्शित झाला. या लघुपटातील बहिणाबाईंच्या अहिराणी भाषेतील ओव्या आणि गीते केळकरांच्या गायकीने लोकप्रिय झाली. यातील गीतांची ध्वनिफीत काढण्यात आली. या ध्वनिफितीनेदेखील भरघोस यश संपादन केले. केळकरांनी पाचशेहून अधिक ध्वनिफितींसाठी गाणी गायली आहेत.

जाहिरात क्षेत्रातदेखील कुबल मसाला, उज्ज्वला सुफला खत, रवी पंखे, अमृत मलम अशा अनेक जाहिरातींची गीते त्यांनी गायली. आवाजातील गोडवा आणि तोलूनमापून सहज उमटणारे हृदयस्पर्शी सूर यांमुळे केळकरांना चहात्यांचा एक मोठा वर्ग मिळाला. त्यांच्या गाण्यांचे अनेक कार्यक्रम देशातील आणि परदेशांतील रसिकांनीदेखील उचलून धरले.

उत्तरा केळकरांनी 'सलाम आशा' हा आशाजींच्या हिंदी गाण्यांवर आधारित कार्यक्रम रसिकांपुढे आणला. या कार्यक्रमाचे अनेक प्रयोग झाले.

'सुरसिंगार' या चित्रपटातील शास्त्रीय गायनासाठी त्यांना 'मियां तानसेन' या प्रतिष्ठेच्या पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. सर्वोत्कृष्ट पार्श्वगायनासाठी त्यांना महाराष्ट्र शासनाचे दोन पुरस्कार मिळाले. त्यांना २०१० साली 'संस्कृती कला दर्पण' पुरस्काराने सन्मानित करण्यात आले.

- अमोल ठाकूरदास

## कोगजे, राजाभाऊ केशव

**गायक**

**२५ फेब्रुवारी १९२६ – २६ एप्रिल १९९३**



राजाभाऊ केशव कोगजे यांचा जन्म पुण्यात, मामाच्या घरी झाला. राजाभाऊंचे वडील केशवराव मूळचे रत्नागिरीचे व आई सुशीलाबाई पुण्याच्या होत्या. वडील रेल्वेत नोकरीला असल्याने कुटुंबाचे गावोगावी स्थलांतर होत असे.

बालवयातली गानप्रतिभा बघून आरंभी राजाभाऊंच्या वडिलांनी त्यांना गायनाचे धडे दिले. नंतर जबलपूरला पं. गोविंदबुवा मुलतापीकरांकडे रीतसर शिक्षण सुरू झाले. गोविंदबुवांनी राजाभाऊंना ग्वाल्हेर घराण्याची तालीम दिली. पण गोविंदबुवांची प्रकृती ठीक राहत नसल्यामुळे त्यांनी राजाभाऊंना पुण्याला, पं. विनायकबुवा पटवर्धनांकडे जाण्यास सांगितले.

राजाभाऊ १९३९ मध्ये आपल्या जन्मग्रामी गांधर्व महाविद्यालयात दाखल झाले. पं. विनायकबुवांचे योग्य मार्गदर्शन, भरपूर रियाज, आत्मविश्वास यांच्या बळावर विविध गीतशैलींवर अधिकार संपादन करून राजाभाऊंनी ग्वाल्हेर घराण्याचे गायक म्हणून आपले नाव प्रस्थापित केले. ख्यालाबरोबरच ठुमरी व टप्पा गायकीचेही शिक्षण त्यांनी बाई रसूलनबाईंकडून घेतले. ते हार्मोनियमही उत्तम वाजवत.

नागपूर आकाशवाणीवर त्यांनी १९४७ ते १९५२ पर्यंत स्टाफ आर्टिस्ट म्हणून काम केले. प्रारंभापासूनच राजाभाऊ नागपूर आकाशवाणीचे 'अ' दर्जाचे गायक होते. भारतातल्या अनेक केंद्रांतून त्यांचे कार्यक्रम होत असत. राजाभाऊंचे कार्यक्रम भारतभर झाले आणि नंतर सर्वोच्च दर्जाचा सन्मान मिळविणारे ते एकमेव वैदर्भीय ठरले.

नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामध्ये १९५४ साली संगीत विषय सुरू झाला. तिथे १९५५ मध्ये प्रा. राजाभाऊ कोगजे संगीताध्यापक म्हणून नियुक्त झाले. राजाभाऊंची शिकविण्याची हातोटी उत्तम होती. रागातल्या जागा, शब्दार्थ, लयकारी, राग सांभाळून वाचक आलापी व तनाईत क्रिया हुबेहूब साधल्या पाहिजेत हा त्यांचा कटाक्ष असे. त्यांच्या प्रमुख शिष्यांत राजा बोबडे, अरुण कशाळकर, नारायण मंगरूळकर, पुष्पा शास्त्री, अनिरुद्ध देशपांडे, सरिता भावे इ. उल्लेखनीय आहेत.

राजाभाऊ विभागप्रमुख म्हणून कार्य करून यथावकाश सेवानिवृत्त झाले. राजाभाऊंना स्व.

शंकरराव प्रवर्तकांनी ‘संगीत शेखर’ पदवी देऊन गौरवान्वित केले होते.

— नारायण मंगरूळकर

## कोरगावकर, विठ्ठलराव

**हार्मोनिअमवादक**

**१८८४ – ३१ डिसेंबर १९७४**



हार्मोनिअमवादनाच्या संदर्भात गोविंदराव टेंबे यांच्यासमवेत विठ्ठलराव कोरगावकर यांचे नाव आदराने घेतले जाते. गोव्यातील कोरगाव हे त्यांचे मूळ गाव होय. त्यांचा जन्म मुंबईत झाला, नंतर ते कोरगाव येथे राहू लागले. तेथील कीर्तन, भजनामुळे त्यांची संगीताची रुची वाढली. बालपणीच आईवडिलांचे निधन झाल्याने भावंडांच्या पालनपोषणाची जबाबदारी त्यांच्यावर आली. तेथून त्यांनी मुंबईस प्रयाण केले व पाटणकर संगीत मंडळी या संगीत नाटक कंपनीत ते नोकरी करू लागले.

कंपनीतील भागवत या गायकनटाकडून कोरगावकरांनी बालपणी संगीताचे धडे घेतले. आरंभी ते गायनाचाही रियाझ करत असत; पण वयानुसार आवाज फुटल्यावर त्यांनी हार्मोनिअमकडेच पूर्ण लक्ष दिले. सुमारे १८९९ ते १९०५ पर्यंत त्यांनी भाचूभाई भांडारे यांच्याकडून हार्मोनिअमचे शिक्षण प्राप्त केले.

नंतर त्यांनी हुबळी येथे दुकान सुरू करून फ्रेंच बनावटीच्या हार्मोनिअम, सायकल, स्टोव्ह, शेवरोलेट मोटार, एच.एम.व्ही. ग्रामोफोन या वस्तूंची एजन्सी घेतली आणि हुबळी-कारवार अशी बससेवा सुरू केली. या व्यवसायामुळे त्यांना आर्थिक सुबत्ता व स्थैर्य मिळाले.

या काळात त्यांच्या घरी अनेक मैफली होत असत, बालगंधर्वांच्या ‘गंधर्व नाटक मंडळी’चा मुक्कामही त्यांच्याकडे असे. अब्दुल करीम खाँ, वझेबुवा, सवाई गंधर्व, सुरेशबाबू माने, हिराबाई बडोदेकर, मास्तर कृष्णराव, इ. अनेक कलाकारांचा या काळात त्यांना सहवास लाभला.

अब्दुल करीम खाँसाहेबांकडून किराणा घराण्याच्या गायकीची तालीमही त्यांना १९०६ ते १९२७ अशी सुमारे वीस वर्षे मिळाली. वझेबुवांकडूनही ते अनेक राग व बंदिशी शिकले. अल्लादिया खाँसाहेब, बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर अशा दिग्गजांनी त्यांच्या हार्मोनिअमवादनाची स्तुती केली होती.

दुर्दैवाने धंद्यात जबरदस्त आर्थिक तोटा आल्याने कोरगावकरांना आपला व्यवसाय बंद करावा लागला व १९३५ साली त्यांनी मुंबईस रुक्मिणी संगीत विद्यालय सुरू केले व ते चार वर्षे चालवले. त्यांनी अनेक बुजुर्ग गायकांना साथसंगत केली व स्वतंत्र वादनाचे कार्यक्रमही केले. सवाई गंधर्वांच्या एकसष्टीच्या पुण्यातील समारंभातील त्यांचे वादन गाजले होते. एच.एम.व्ही. कंपनीने त्यांच्या स्वतंत्र हार्मोनिअमवादनाच्या नऊ ध्वनिमुद्रिका काढल्या व त्याही खूप लोकप्रिय झाल्या.

कोरगावकरांच्या वादनात किराणा घराण्याची आलापचारी, जयपूर घराण्याची तानक्रिया व बालगंधर्वांच्या गाण्यातले लालित्य असा सुंदर संगम होता. ख्याल पद्धतीने ते रागदारी उत्तम वाजवत, शिवाय ठुमरी व नाट्यपदेही, विशेषतः बालगंधर्वांची पदे अगदी रंगतीने वाजवत. त्यांच्या वादनात मुलायमपणाबरोबरच अत्यंत तयारी होती. हातात गोडवा व सफाई होती. भात्यावरही त्यांचे प्रभुत्व होते. ते स्वतः हार्मोनिअमचे ‘हवा फिटिंग’ व ‘ट्यूनिंग’ उत्तम करत असत.

त्यांनी मुंबई ते बेळगाव अशा मोठ्या भागात बरेच शिष्य घडवले, ज्यांत रामभाऊ विजापुरे, वसंत शेवडे, म.वा. देसाई, पुरुषोत्तम वालावलकर यांचा उल्लेख होतो.

त्यांचा १९५७ साली बेळगाव येथे सत्कार समारंभ झाला. म्हैसूर संगीत अकादमीने १९७० साली त्यांचा गौरव केला. त्यांच्या अखेरच्या काळात, १९७४ साली गोमंतक कला अकादमीने त्यांच्या वादनाचे ध्वनिमुद्रणही करून ठेवले. वयाच्या एक्याण्णवाव्या वर्षी बेळगाव येथे त्यांचा मृत्यू झाला. बेळगावच्या

‘सुरेल संवादिनी संवर्धन’ या संस्थेतर्फे त्यांच्या नावे पुरस्कार देण्यात येतो.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

१. *मारुलकर, ना.र.; ‘गोमंतकीय संगीतकार’; मडगाव; १९७६.*

## कोरटकर, सुहासिनी रामराव

**गायिका**

**३० नोव्हेंबर १९४४**



सुहासिनी रामराव कोरटकर यांचा जन्म मुंबई येथे झाला. वडिलांच्या सेवानिवृत्तीनंतर हे कुटुंब पुण्यात स्थायिक झाले. सुहासिनी कोरटकरांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पुण्यात झाले. त्यांच्या वडिलांना शास्त्रीय संगीताची अतिशय आवड होती. आईला गायनाची, तसेच संवादिनी व व्हायोलिन वादनाची आवड होती. सुहासिनीचा आवाज सुरेल होता व लयतालाची समजही चांगली होती, त्यामुळे वयाच्या आठव्या वर्षापासून त्यांनी शास्त्रीय संगीत शिकण्यास सुरुवात केली.

त्यांनी १९५७ साली पुण्याला आल्यावर भेंडीबाजार घराण्याचे पं. त्र्यंबकराव जानोरीकर यांच्याकडे शिकण्यास प्रारंभ केला. पहिली तीन-चार वर्षे आलाप, तान, पलटे अशी सर्वसामान्य तयारी व पारंपरिक बंदिशींची तालीम त्यांना दिली गेली व नंतर १९५९ पासून घराण्याच्या गायकीची तालीम सुरू केली. आवाजातील गुंजन, लगाव, दीर्घ मींड, खंडमेरचे तत्त्व व त्याचा आलाप, सरगम व तानेतील प्रयोग, मुलायम स्वरकण, गमकेच्या ताना, फिरकीच्या व सपाट द्रुत ताना, कर्नाटक अंगाची लयदार सरगम, उ. अमानअली खाँ साहेबांच्या बंदिशी व त्यांचे आकर्षक प्रस्तुतीकरण अशी या घराण्याची वैशिष्ट्ये आहेत. पं. जानोरीकरांनी सुहासिनी कोरटकरांकडून अत्यंत आस्थेने, परिश्रमपूर्वक व काटेकोरपणे पुढील दहा वर्षे तालीम करून घेतली. त्यांनी कौटुंबिक संकटांना व शारीरिक व्याधींना धैर्याने तोंड देत ही गायकी आत्मसात केली.

त्या १९६६ साली गांधर्व महाविद्यालयाच्या ‘संगीत अलंकार’ परीक्षेत उत्तीर्ण झाल्या. त्यांनी १९६९ मध्ये ‘संगीताचे आध्यात्मिक महत्त्व’ हा प्रबंधाचा विषय घेऊन ‘संगीताचार्य’ ही पदवी मिळविली. त्यांनी शास्त्रीय संगीताबरोबर ठुमरी, दादरा या उपशास्त्रीय संगीताचाही सराव केला. बेगम अख्तर या त्यांच्या आवडत्या गायिका होत. त्यांच्या ढंगाचा डोळसपणे अभ्यास करून सुहासिनी कोरटकरांनी स्वत:ची अशी एक शैली बनवली. त्यानंतर दिल्लीच्या श्रीमती नैनादेवी यांच्याकडे त्यांनी विशेष मार्गदर्शन घेतले.

सवाई गंधर्व महोत्सवात १९६९ मध्ये त्यांचे गाणे झाले. शास्त्रीय व उपशास्त्रीय संगीतासाठी त्यांना १९७७ मध्ये आकाशवाणीची ‘ए’ ग्रेड मिळाली. त्यांनी ‘निगुनी’ या टोपणनावाने स्वर, लय व शब्द यांचा त्रिवेणीसंगम असलेल्या १००हून अधिक बंदिशी बांधल्या आहेत.

त्या १९७५ ते १९९६ पर्यंत आकाशवाणीच्या विविध केंद्रांवर केंद्र संचालकपदी कार्यरत होत्या. त्यांनी १९९६ मध्ये घराण्याची कामे पूर्ण करण्यासाठी स्वेच्छानिवृत्ती घेतली. गुरूचा आदर्श डोळ्यांपुढे ठेवून भेंडीबाजार गायकीचा प्रसार व प्रचार करायचा हेच त्यांनी स्वतःचे जीवनकार्य व ध्येय ठरवले व त्यासाठी विविध मार्गांनी निरंतर प्रयत्न केले. आपल्या मैफलीबरोबर घराण्याची गायकी समजावून सांगणारी प्रात्यक्षिकांसह भाषणे चर्चासत्रांमधून; मासिके, पुस्तके व वर्तमानपत्रांमधून लेख लिहून भेंडीबाजार घराना संमेलन दिल्ली, गोवा येथे भरवून त्यांनी हे कार्य केले . राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरांवर त्यांच्या या अथक प्रयत्नांना यश आले आहे. भेंडीबाजार घराण्याचे नाव व गायकी आता सर्वसामान्य रसिकांपर्यंत पोहोचली आहे व लोकप्रिय झाली आहे.

‘दिल चाहे सो गाओ’ (बा.भ. बोरकरांच्या हिंदी

कवितांचे गायन), ‘शब्दसुरांचे लेणे’ (स्वनिर्मित बंदिशी), ‘आपकी याद में’ (बेगम अख्तर यांच्या रचनांचे गायन) असे रंगमंचीय आविष्कार त्यांनी केले. त्यांच्या या कार्यासाठी त्यांना अनेक पुरस्कार मिळाले आहेत. सुरसिंगार संसदतर्फे ‘सुरमणी’, तसेच त्यांना केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्रालयाची ‘सीनियर फेलोशिप’ प्राप्त झाली. त्यांना गानवर्धन, पुणेतर्फे ‘स्वर-लय भूषण’ पुरस्कारही प्राप्त झाला.

— किशोरी जानोरीकर

## कोल्हापूरकर, लक्ष्मीबाई

**लावणी कलाकार**

**अंदाजे १९३० – २ डिसेंबर २००२**



महाराष्ट्रातील लावणी या पारंपरिक नृत्यशैलीस कथक या नृत्यशैलीतील अभिजाततेची, त्यातील तत्कार-तोडे-तुकडे यांची जोड देऊन अभिजाततेच्या पातळीवर नेणाऱ्या कुशल कलाकार म्हणून लक्ष्मीबाई कोल्हापूरकर यांचे योगदान मोठे आहे. लक्ष्मीबाईंचा जन्म कोल्हापूर येथे झाला. आई मंजुळाबाई व वडील सीताराम जावळकर हे दोघेही तमाशा कलावंत होते. त्यांना शंकर, हौसा, लक्ष्मी, सुशीला, हिराबाई अथवा बेबी व पांडुरंग ही सहा अपत्ये होती. लक्ष्मीबाईंच्या जन्मानंतर काही वर्षांनी ही मुलगी काळी, कुरूप आणि हडकुळी असल्याने बापाने एका ख्रिस्ती कुटुंबास तीनशे रुपयांसाठी तिला विकण्याचा घाट घातला. आईने त्याला विरोध केला व तरीही बाप जुमानत नाही हे लक्षात येताच आईने एका रात्री सर्व मुलांना घेऊन कोल्हापूर सोडले.

आईच्या गाण्याला लहानगी लक्ष्मी तुणतुण्यावर साथ देऊ लागली. पुढे चरितार्थासाठी यवतच्या बसस्थानकावर आईला गाणी गात भीक मागण्याचीही वेळ आली, तेव्हाही लक्ष्मी तिच्याबरोबर गाणी गात असे. एकदा यवतला लावणीच्या फडात मंजुळाबाई गात असताना त्यांचा आवाज बसल्याने प्रेक्षक हुल्लडबाजी करू लागले, तेव्हा मंजुळाबाईंनी आपल्या लेकीला झोपेतून उठवून गायला लावले व त्याबरहुकूम मंजुळाबाईंनी ओठ हलवत अदा सादर केली. बालवयीन लक्ष्मीबाईंनी आईवर आलेला हा प्रसंग निभावून नेला. चार्ली चॅप्लिनच्या जीवनातील घटनेशी साधर्म्य असणारा प्रसंग पुढे ‘एक होता विदूषक’ या चित्रपटात वापरला गेली.

नगरला ठुमरी, गझल गाणारी प्रेमाबाई नावाची पंजाबी नायकीण होती, तिच्याकडे लक्ष्मीबाई महिना आठ आणे पगारावर घरकाम, झाडलोट करत. संध्याकाळी नायकिणीकडे लोक गाणे ऐकण्यासाठी येत तेव्हा त्यांचे जोडे पुसणे, ते पायात चढवणे असेही काम त्या करत व त्यात थोडे वरकड पैसे मिळत. मात्र हे करतानाही लक्ष्मीबाईंचा कान सतत प्रेमाबाईच्या गाण्याकडेच असे. इथे त्यांच्यावर ठुमरी, गझलचे श्रवण-संस्कार झाले.

विसाव्या वर्षी लक्ष्मीबाईंनी १९५० च्या सुमारास यवत येथेच स्वत:चा लावणीचा फड सुरू केला. त्यात या चारही बहिणी गात-नाचत, शंकरराव पेटी वाजवे आणि पांडूभाऊ तबल्याची साथ देई. हळूहळू गावोगावी कार्यक्रम करत, थोडेफार नाव व पैसे कमवत त्यांनी मुंबई गाठली. मुंबईतील थिएटरमध्ये प्रथम त्यांचा कार्यक्रम ठेवण्यास नकार दिला गेला. मोठ्या मिनतवारीने त्यांनी एक खेळ केला व त्याला उत्तम प्रतिसाद मिळाला आणि इथून पुढे लक्ष्मीबाईंनी मुंबईतील पिला हाउस येथे अनेक वर्षे सातत्याने लावणी सादर करून लोकप्रियता मिळवली.

मुंबईच्या वास्तव्यात फकीर अहमद कुरेशी, गुलाम हुसेन खाँ, बिन्नी भय्या व गोविंदराव निकम यांच्याकडे लक्ष्मीबाईंनी लावणी व कथक नृत्याचे शिक्षण घेतले. पूर्वी बैठकीच्या लावणीत बसून अदा केली जायची व नृत्यप्रधान लावणी ही अधिकतर अभिनयाच्या अंगानेच पेश केली जायची. परंतु लक्ष्मीबाईंनी कथकमधील ‘नृत्त’

हा भाग, म्हणजे तत्कार, तोडे-तुकडे, तिहाया इ.चा लावणीच्या नृत्यात अधिक समावेश केला आणि या नृत्यात नवा बाज आणला, त्यास नवे रूप दिले. पंचबाई मुसाफिर, घोड्यावरची लावणी या त्यांच्या काही खास लावण्या होत्या, ज्यांत त्यांचे नृत्यकौशल्य विशेष रूपाने पुढे येई.

लक्ष्मीबाई लावणी गात, मात्र त्यांचा आवाज फारसा गायनानुकूल नव्हता. त्यामुळे लावणीतील स्वरांगापेक्षा भावांगाकडे त्यांनी जास्त लक्ष दिले, त्यामुळे लावणीतील काव्यात कोणत्या भावच्छटा आहेत, त्या कशा व्यक्त करायच्या, नृत्य करताना संचारीभाव दाखवण्यासाठी आवश्यक असणारा अवकाश गाताना कसा निर्माण करायचा, याचा फार चांगला व सखोल विचार त्यांनी केला होता. त्यामुळे त्यांची प्रस्तुती म्हणजे अभिनयाचा गायनासहित नृत्यात्मक असा आविष्कार असायचा.

विविध आशय-विषय असणाऱ्या जुन्या-नव्या लावण्यांसह त्या तराणाही उत्तम सादर करीत. लक्ष्मीबाई चणीने लहानखुऱ्या, सावळ्याशा; मात्र अत्यंत चपळ, लवचीक असल्याने पूर्ण रंगमंचावर त्यांचा अत्यंत सहज व गतिमान वावर असे. रंगमंचीय अवकाश त्या सहजपणे व्यापून टाकत.

बतावणीच्या प्रवेशात त्या गवळण बनून येत. मग सोंगाड्या व त्यांच्यात चटकदार संवादांची चकमक उडे. ती फार बहारदार असे. ढोलकीवादक पांडुरंग घोटकर यांच्यासह लक्ष्मीबाई बतावणीचा भाग फार रंगवत. त्यांचे अभिनयकौशल्यही वाखाणण्याजोगे होते. विनोदी, चुरचुरीत बोलून लोकांना गुंगवून ठेवण्याचे कसब त्यांच्यात होते. एकदा फडातील सोंगाड्याने आयत्या वेळी पळ काढल्याने लक्ष्मीबाईंनी पुरुषवेषात सोंगाड्या बनून प्रेक्षकांना पाच तास खिळवून ठेवले होते. ‘चांदगडचा किल्ला’, ‘येड्या बाळ्याचा फार्स’, ‘चिंचणीचा देशमुख’ अशी वगनाट्येही त्यांच्या फडाने सादर करून लोकप्रियता मिळवली होती.

संगीतबारीपासून तंबूचा धंदा आणि मग फड अथवा पार्टी असा प्रवास करत लक्ष्मीबाईंनी बरेच नाव कमवले व पुढे उतरत्या वयात १९८४ च्या सुमारास त्यांनी फड बंद केला. महाराष्ट्र शासनाच्या अनेक महोत्सवांत, तसेच देशभरातील अनेक ठिकाणी सरकारी व अन्य संस्थांसाठी त्यांनी लावण्या सादर केल्या. दिल्लीत १९६६ साली त्यांचा खास कार्यक्रम झाला व दूरदर्शननेही त्याचे चित्रीकरण केले. तेव्हा पंतप्रधान इंदिरा गांधींनीही त्यांचा तमाशा वाखाणला व त्यांच्या फडाला प्रवासासाठी एक बस दिली. त्यांना १९८४ साली संगीत नाटक अकादमी व कथक केंद्र या दिल्लीतील संस्थांनी लावणी नृत्याच्या पेशकशीसाठी निमंत्रित केले होते. बिहारमधील रांची, पटना, दरभंगा, बिलासपूर इ. ठिकाणी त्यांचे कार्यक्रम व आकाशवाणीसाठी ध्वनिमुद्रण झाले. जम्मू येथे सैन्यदलासाठी त्यांनी लोककला सादरीकरण केले.

‘सुधारलेल्या बायका’ (१९६५), ‘ही नार रूपसुंदरी’ (१९६६), ‘मानाचा मुजरा’ (१९६९) या चित्रपटांत लक्ष्मीबाईंनी लहानशा नृत्यप्रधान भूमिका व नृत्यदिग्दर्शन केले होते, मात्र ‘एक होता विदूषक’ (१९९२) या जब्बार पटेल दिग्दर्शित चित्रपटाच्या वेळी त्यांच्या नृत्यकौशल्याचा खरा उपयोग केला गेला. या चित्रपटातील लावण्यांचे त्यांनी नृत्यदिग्दर्शन केले. या कामगिरीसाठी चाळिसाव्या राष्ट्रीय चित्रपट महोत्सवात राष्ट्रपती शंकर दयाल शर्मा यांच्या हस्ते लक्ष्मीबाईंना १९९३ सालचा ‘सर्वोत्तम नृत्यदिग्दर्शना’चा पुरस्कार मिळाला व या कामाचे चीज झाले ! त्यानंतर ‘सुगंध आला मातीला’, ‘रावसाहेब’, ‘बेलभंडार’ इ. चित्रपटांसाठीही त्यांनी नृत्यदिग्दर्शन केले.

मधू कांबीकर यांना लक्ष्मीबाईंचे मार्गदर्शन मिळाले व मधूबाईंच्या अदाकारीतून लक्ष्मीबाईंच्या नृत्यकौशल्याचा पुन:प्रत्यय येतो. ‘सखी माझी लावणी’ (१९९९), तसेच ‘बेलभंडार’, ‘काटा रुते कुणाला’ या रंगमंचीय कार्यक्रमांसाठी मधूबाईंकडून लक्ष्मीबाईंनी अनेक पारंपरिक व काही नव्याही लावण्या बसवून घेतल्या. कथकशी संयोग करून बनवलेला लावणी नृत्याचा वेगळा बाज रुजवण्यासाठी लक्ष्मीबाईंनी महाराष्ट्र शासनाच्या

तमाशा शिबिरांमध्ये अनेकांना मार्गदर्शन केले.

महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक विभागाचा पुरस्कार (१९९४), अखिल भारतीय नाट्य परिषदेचा सत्कार (१९९५), 'शंकरराव मोहिते पाटील' पुरस्कार (अकलूज, १९९८), पुणे महानगरपालिकेचा 'पठ्ठे बापूराव' पुरस्कार (२०००), अमरावती येथे पंजाबराव देशमुख यांच्या हस्ते सन्मानपत्र इ. पुरस्कार लक्ष्मीबाईंना लाभले. अत्यंत बोलक्या, विनोदी, दिलखुलास, मनमिळाऊ तरीही शिस्तप्रिय असणाऱ्या लक्ष्मीबाईंचा विवाह बाबूराव यांच्याशी झाला होता, मात्र मूलबाळ नसल्याने त्यांनी मधूबाईंनाच मुलगी मानले होते.

या कलावतीचे श्रीरामपूर येथे हृदयविकारामुळे निधन झाले. लक्ष्मीबाईंच्या स्मृतीनिमित्त मधू कांबीकर यांनी 'लावणीसम्राज्ञी लक्ष्मीबाई कोल्हापूरकर कला प्रतिष्ठान' ही संस्था सुरू केली असून त्याद्वारे दरवर्षी लोककलाकारांना पुरस्कार दिला जातो.

— चैतन्य कुंटे

## कोळी, नारायण धर्माजी

**पखवाजवादक**

**७ मे १९१६ - ४ जानेवारी १९६८**



मृदंगाचार्य नारायण धर्माजी कोळी यांचा जन्म मुंबईत झाला. संगीताची आवड असल्याकारणाने त्यांनी सुरुवातीला हार्मोनिअमचे शिक्षण घेण्यास सुरुवात केली. ते सुरू असताना त्यांनी एका ठिकाणी पं. जयलाल यांचे कथक नृत्य पाहिले आणि आपणही नृत्य शिकायचे हे ठरवून त्यांनी पं. जयलाल यांच्याकडे कथक शिकण्याची सुरुवात केली. या कलेत त्यांची प्रगती खूपच चांगली होती. गुरू त्यांच्यावर खूश होते. कथकमध्ये पखवाजाचे अंग आहे हे पाहून कथकसाठी त्यांनी थोडेसे पखवाजाचे ज्ञान असावे म्हणून पखवाज शिकावा असे ठरवले. मृदंगाचार्य शंकरराव अळकूटकर यांच्याकडे त्यांनी पखवाजाचे शिक्षण सुरू केले. थोड्याच कालावधीमध्ये त्यांच्या जीवनात आमूलाग्र बदल झाला आणि त्यांनी पखवाज आणि फक्त पखवाज हेच ध्येय ठेवले.

संगीताचे शिक्षण चालू असतानाच त्यांनी महाविद्यालयाचेही शिक्षण चालू ठेवले. छोट्या-मोठ्या नोकऱ्याही केल्या आणि ते मुंबई उच्च न्यायालयात कायमस्वरूपी नोकरीला लागले. त्यांनी बी.ए.,एलएल.बी. ही पदवीदेखील घेतली. शेवटी ते मुंबई उच्च न्यायालयाचे निबंधक (रजिस्ट्रार)ही झाले.

पं. नारायणराव कोळी यांच्याकडे बरेच विद्यार्थी पखवाज शिकत असत, त्यांत प्रामुख्याने नरसू भोये, गजानन पाटील, राम दीक्षित, ज्ञानेश्वर डिंगोरकर आदी विद्यार्थी होते; पण त्यांचे अत्यंत उत्कृष्ट शिष्य म्हणजे मृदंगाचार्य पं. अर्जुन शेजवळ हे होत.

नारायणराव कोळी यांनी पखवाजवादनात आधुनिकता आणताना परंपरेला अजिबात धक्का लागू दिला नाही. अनेक नामवंत कलाकारांसह त्यांनी पखवाज वाजवला आणि जुगलबंदीचे कार्यक्रमही केले; परंतु त्यांची जुगलबंदी रंगत असे आपल्या लाडक्या पट्टशिष्यासह, अर्जुन शेजवळ यांच्याबरोबर. नारायणराव कोळी यांचा मृत्यू मुंबईत झाला.

— देवदास शेजवळ

***

# ख





## खडीकर, मीना दत्तात्रेय

**संगीतकार, गायिका**

**७ सप्टेंबर १९३१**



मीना मंगेशकर-खडीकर या अतिशय गोड आवाजाच्या गायिका व अनेक गाजलेल्या भावगीतांच्या, बालगीतांच्या संगीतकार म्हणून प्रसिद्ध आहेत. मीना या मा. दीनानाथ व माई मंगेशकर यांच्या द्वितीय कन्या. घरात संगीत असल्यामुळे मीना बालवयातच गायला लागल्या. मा. दीनानाथ यांनी मीना यांना शास्त्रीय संगीत शिकवायला सुरुवात केली. मीनाच्या स्मरणशक्तीवर ते फार खूश असत. मा. दीनानाथांनी रागदारी चिजांच्या दोन वह्या तयार केल्या होत्या; एक लतासाठी, तर दुसरी मीनासाठी. मास्टर दीनानाथ नेहमी म्हणत, ''माझी मीना शास्त्रीय संगीत उत्तम गाईल. तिचा आवाज शास्त्रीय संगीताला योग्य आहे.'' मीना दहा वर्षांची असताना मा. दीनानाथांचे दुःखद निधन झाले आणि त्यांच्या आयुष्यातील शास्त्रीय संगीत गायिका होण्याचे स्वप्न अपुरे राहिले.

१९४२ सालच्या एप्रिल महिन्यात मा. दीनानाथांचे निधन झाले. त्याच महिन्यात लता मंगेशकरांना 'पहिली मंगळागौर' या चित्रपटात काम मिळाले. नंतर मास्टर विनायकांच्या प्रफुल्ल चित्रपट कंपनीत त्यांना काम मिळाले आणि लतासह मंगेशकर कुटुंबीय कोल्हापूरला आले. लता मंगेशकरांनी तिथे मीना यांना शाळेत घातले. घरच्या परिस्थितीमुळे त्यांना पुढे कुणाकडे गाणे शिकणे शक्य झाले नाही; परंतु त्यांच्या आई, माईंच्या प्रोत्साहनामुळे, धाकामुळे घरी रियाझ सुरू होता.

मा. विनायकांनी १९४५ साली कंपनी मुंबईला आणायचे ठरविले. त्यामुळे लताबरोबर मीनाही मुंबईला आल्या व मा. विनायकांच्या घरी राहू लागल्या. वडिलांच्या नाटक कंपनीचा वैभवकाळ बघितल्यामुळे मीना यांना मा. विनायकांच्या घरी असताना मोकळेपणा जाणवत नसे. त्यामुळे पुन्हा त्यांचे गाणे मागे पडले. मा. विनायकांनी मीनास त्यांची मुलगी नंदाबरोबर बालमोहन शाळेत घातले. काही काळानंतर लता यांच्या वेगळ्या बिऱ्हाडाची सोय नाना शंकरशेट चौकात झाली आणि मग सारी मंगेशकर भावंडे माईंबरोबर एकत्र राहू लागली. तेवढ्यात १९४७ साली विनायकराव वारले आणि मंगेशकर कुटुंबीयांना पुन्हा दुःखद परिस्थितीला सामोरे जावे लागले. हळूहळू लता यांना पार्श्वगायनाच्या क्षेत्रात काम मिळू लागले आणि मंगेशकरांना पुन्हा सुखाचे दिवस आले. त्यानंतर लता मंगेशकरांनी मीनास पुन्हा बालमोहन शाळेतून काढून सेवासदन शाळेत घातले. 'माझं बाळ' या चित्रपटात मीना मंगेशकरांनी पहिल्यांदा गायन व अभिनय केला. त्यास दत्ता डावजेकरांचे संगीत होते. प्रभातफेरीच्या प्रसंगामध्ये लता, मीना, आशा, उषा व हृदयनाथ या सर्वांवर 'चला चला नवबाला' हे गाणे चित्रित करण्यात आले होते. या गाण्यामध्ये त्या पहिल्यांदा 'कोरस'मध्ये गायल्या. त्यानंतर मधली काही वर्षे त्या चित्रपटात अजिबात गायल्या नाहीत; पण उत्तमोत्तम गाणे ऐकणे मात्र सुरू होते, आणि सकाळी तंबोऱ्यावर गाण्याचा रियाझ मात्र न चुकता सुरू होता.

मा. विनायक गेल्यावर प्रफुल्ल कंपनीतील लोकांनी एक नवीन चित्रपट कंपनी काढली, तिचे नाव होते,

'उदय कला चित्र'. या कंपनीमध्ये दिनकर द. पाटील, माधवराव शिंदे व इतर अनेक कलावंत होते. त्यांनी एक चित्रपट काढायचे ठरविले. त्याचे नाव होते, 'राम राम पाव्हणं', आणि त्याच्या संगीत दिग्दर्शनाची जबाबदारी लता मंगेशकरांवर सोपविली. या चित्रपटाच्या गीतकार शांताबाई शेळके या होत्या. या चित्रपटामध्ये लता यांच्या संगीत दिग्दर्शनात मीना खडीकरांनी दोन गाणी म्हटली. त्यांतील एक गाणे, 'हात जोडिते, पदर पसरते, आई अंबिके तुला' हे एकलगीत होते, तर दुसरे गाणे, 'माझ्या शेतात सोनंच पिकतंय, पानापानांत लखलख करतंय' हे द्वंद्वगीत मीना यांनी सी. रामचंद्र यांच्याबरोबर गायले होते. ही दोन्ही गाणी अतिशय गाजली.

पुढे मीना वसंत प्रभू, वसंत देसाई, शंकरराव कुलकर्णी, सी. बालाजी इ. संगीतकारांकडे गायल्या. 'तारका' या वसंत प्रभूंच्या चित्रपटात मीना खडीकर लता मंगेशकरांबरोबर द्वंद्वगीत गायल्या, तर संगीतकार वसंत पवार यांच्या संगीत दिग्दर्शनात, 'गाठ पडली ठकाठका' या चित्रपटात, 'नको जाऊ नारी यमुनाकिनारी' हे गीत लता व उषा यांच्यासमवेत गायल्या. 'अंतरीचा दिवा' या चित्रपटात मीना आपले धाकटे बंधू हृदयनाथ यांच्या संगीत दिग्दर्शनात गायल्या, तर 'थोरातांची कमळा' या चित्रपटात दत्ता डावजेकर यांनी त्यांच्याकडून एक गाणे गाऊन घेतले.

'वसंत हसला' ('कांचनगंगा', संगीत : वसंत देसाई), 'बावरले मी बावरते' ('एक होता राजा', संगीत : शंकरराव कुलकर्णी), 'मनी वसे ते स्वप्नी दिसे' ('कांचनगंगा', संगीत : वसंत देसाई), 'दयाळा तूच आता सांभाळ' ('संत भानुदास', संगीत : सी. बालाजी), 'माझं नाव शोभलं मैना' ('पाटलाचं पोर', संगीत : वसंत प्रभू) ही मीना खडीकरांची काही गाजलेली चित्रपटगीते होत. पण नंतर त्यांनी पार्श्वगायन संपूर्ण सोडून दिले. लता आणि मीना यांच्या आवाजात कमालीचे साम्य आहे. त्यामुळे 'पाटलाचं पोर' या चित्रपटातील 'माझं नाव शोभलं मैना' ही लावणी अनेक लोकांना लता मंगेशकरांनी गायलेली आहे असे वाटते.

पुढे त्या संगीत दिग्दर्शनाच्या क्षेत्रात आल्या. माधवराव शिंदे यांच्या आग्रहामुळे 'माणसाला पंख असतात' या चित्रपटास त्यांनी संगीत दिले (१९६०). या चित्रपटात त्यांनी लता व हृदयनाथ यांचा आवाज पार्श्वगायनासाठी वापरला. या चित्रपटातील लता यांनी गायलेले 'ये जवळी घे जवळी प्रिय सखया भगवंता' हे गाणे आजही लोकप्रिय आहे. १९६२ साली मीना मंगेशकरांचे लग्न झाले आणि त्यांना योगेश व रचना ही अपत्ये झाली. मुले थोडी मोठी झाल्यावर त्यांनी पुन्हा संगीत क्षेत्राकडे वळायचे ठरविले आणि विशेषत: बालगीतांच्या क्षेत्रात कार्य केले. राजा मंगळवेढेकर, मंगेश पाडगावकर, शांता शेळके यांची बालगीते मीना खडीकरांनी निवडली आणि मुलगा योगेश, मुलगी रचना आणि शमा खळे (संगीतकार श्रीनिवास खळे यांची मुलगी) यांच्याकडून ती गीते बसवून घेतली.

'असावा सुंदर चॉकलेटचा बंगला', 'कोणास ठाऊक कसा पण शाळेत गेला ससा', 'सांग सांग भोलानाथ', 'खोडी माझी काढाल तर', इत्यादी बालगीते ध्वनिमुद्रित झाली आणि ती लोकप्रियही झाली. आज लहान मुलांची तिसरी पिढीसुद्धा ही गाणी आवडीने ऐकते.

बालगीतांबरोबर मीना खडीकर यांनी काही भावगीतांनासुद्धा संगीत दिले आहे. त्यांची बहुतांश भावगीते उषा मंगेशकरांनी गायलेली आहेत. 'साजणी सई ग', 'तू नुसता मजसंगे', 'कान्हु घेऊन जाय' ही उषा यांनी गायलेली भावगीते मीना खडीकरांनी स्वरबद्ध केलेली आहेत. 'मनी जे दाटले', 'आनंदघन क्षणाचा' ही गाजलेली भावगीते त्यांनी प्रसिद्ध गायक श्रीकांत पारगावकर यांच्याकडून गाऊन घेतलेली आहेत.

मीना खडीकर यांनी मराठीव्यतिरिक्त हिंदी, पंजाबी व बंगाली भाषांत गीते गायलेली आहेत. 'रथ जगन्नाथाचा' या चित्रपटाला त्यांनी संगीत दिले. त्यातील सुरेश वाडकरांच्या एका गाण्याला राज्य सरकारचा त्या वर्षीचा उत्कृष्ट पार्श्वगायकाचा पुरस्कार मिळाला. त्याच चित्रपटात मीना यांनी हिंदीतील पार्श्वगायक शैलेन्द्रसिंग यांच्याकडून मराठी भाषेत एक गीत गाऊन घेतले. आजचे तरुण गायक

शान, सागरिका, दुर्गा व शारंगदेव जसराज, साधना सरगम इत्यादींकडून मीना खडीकरांनी ते लहान असताना अनेक बालगीते गाऊन घेतली आहेत.

— अद्वैत धर्माधिकारी

**संदर्भ :**

१. *धर्माधिकारी, अद्वैत; मीना मंगेशकर-खडीकर यांची मुलाखत, 'स्वरप्रतिभा' दिवाळी अंक; २००६.*

ख

## खरवंडीकर, देवीप्रसाद खंडेराव

**शिक्षक**

**१ ऑक्टोबर १९३५**



देवीप्रसाद खंडेराव खरवंडीकर यांचा जन्म नगर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव म्हाळसाबाई होते. खरवंडीकर यांचे बालपण व शिक्षण नगरमध्येच गेले. खरवंडीकरांनी अहमदनगर महाविद्यालयात दीर्घकाळ संस्कृत आणि प्राकृत विषयांचे अध्यापन केले. प्राध्यापक म्हणून कार्यरत असतानाच त्यांनी संगीताचाही सखोल अभ्यास चालू ठेवला. त्यांनी १९७६ साली त्यांनी अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाची 'संगीत अलंकार' ही पदवी संपादन केली.

गेली ४५ वर्षे डॉ. खरवंडीकर हे 'गुंजारव' या संस्कृत त्रैमासिकाचे प्रमुख संपादक म्हणून कार्यरत आहेत. त्यांनी संस्कृतविषयक विपुल लेखनही केले आहे. त्याचबरोबर त्यांनी संगीत शिकणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांना आणि संगीत अभ्यासकांना मार्गदर्शन होईल असे संगीतविषयक लेखनही केले आहे. 'हाथरस'चे संगीत प्रकाशन, रोहिणी मासिक आणि बऱ्याच वृत्तपत्रांमधून त्यांचे संगीतविषयक लेख प्रसिद्ध झाले असून 'संगीत कला विहार' मासिकातही त्यांचे लिखाण प्रसिद्ध झाले आहे. याशिवाय संगीत महाभारती, मुंबईच्या सांगीतिक ज्ञानकोशासाठी त्यांनी योगदान दिले आहे.

डॉ. खरवंडीकर आकाशवाणीचे मान्यताप्राप्त गायक असून त्यांनी गायनाचे कार्यक्रम आकाशवाणीवरून सादर केले आहेत. संगीत विषयाला अनुसरूनही त्यांनी विविध कार्यक्रम सादर केले आहेत.

अहमदनगर येथे डॉ. खरवंडीकर यांच्या सुविद्य पत्नी कीर्तिदेवी यांनी स्थापन केलेल्या 'श्रुती संगीत निकेतन' या संगीत विद्यालयातर्फे विशारद, अलंकारच्या, तसेच एम.ए.पर्यंतच्या विद्यार्थ्यांना त्यांनी मार्गदर्शन केले.

अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाच्या 'अलंकार'पर्यंतच्या परीक्षांचे अहमदनगर येथील केंद्र संचालक म्हणून ते गेली २५ ते ३० वर्षे कार्यरत आहेत. तसेच, अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळातर्फे आयोजित होणाऱ्या 'अलंकार'च्या विद्यार्थी आणि शिक्षकांसाठीच्या शिबिरात ज्येष्ठ संगीतज्ञ म्हणून डॉ. खरवंडीकरांनी ठिकठिकाणी अनेक वेळा मार्गदर्शन केले आहे. 'भारतीय संगीताचा इतिहास व विकास' या पाठ्यपुस्तकाचे त्यांनी अन्य सहकाऱ्यांसह लेखन केले आहे.

पुणे विद्यापीठाच्या पदविका परीक्षेत संगीत विषयासाठी डॉ. खरवंडीकरांनी बी.एल. मोडक हे पारितोषिक पटकाविले. याशिवाय त्यांनी महाराष्ट्र शासनातर्फे १९९८ मध्ये संस्कृत पंडित, संस्कृत नाट्यलेखनाचे आकाशवाणीचे पुरस्कार संस्कृत बालसाहित्यासाठी दोनदा, एन.सी.ई.आर.टी.ची पारितोषिके त्यांनी प्राप्त केलेली आहेत. संस्कृतमधील लेखनकार्यासाठी २००९ सालचा राष्ट्रपती पुरस्कार प्राप्त झाला.

— धनश्री खरवंडीकर

**संदर्भ :**

१. *खरवंडीकर, देवीप्रसाद; 'भारतीय संगीताचा इतिहास व विकास'; महाराष्ट्र माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.*

२. *खरवंडीकर, देवीप्रसाद; 'भावगंगा'; खरवंडीकर प्रकाशन; २०१०.*

३. *खरवंडीकर, देवीप्रसाद; 'पंचरूपकम्'; प्रगत संस्कृत अध्ययन केंद्र, पुणे विद्यापीठ; २००९.*

## खर्डेनवीस, पुरुषोत्तम प्रल्हाद

*(☛ सावळाराम मास्तर)*

## खर्डेनवीस, प्रभाकर नीळकंठ

**गायक**

**३० मे १९२० - २ ऑगस्ट २००८**



प्रभाकर नीळकंठ खर्डेनवीस यांचा जन्म नागपूरपासून जवळ असलेल्या पाटणसांगवी या आजोळगावी झाला. वडील नीळकंठ व आई सीताबाई नागपूरच्या महाल विभागात राहत. वडील डी.ए.जी.पी.टी. मध्ये नोकरीला होते व त्यांना गायनाची आवड होती. वडिलांनी प्रभाकरला १९२८ सालीच अभिनव संगीत विद्यालयात दाखल केले. प्रभाकरकडे बालवयातच मधुर आवाज, कुशाग्र बुद्धी, गुणग्राहक प्रवृत्ती व उत्तम समज असा गुणसमुच्चय होता. त्यांना १९३२ साली 'बालभास्कर' ही पदवी मिळाली होती. खर्डेनवीस यांचे गुरू शंकरराव प्रवर्तक यांनी त्यांना बालवयातच चांगले तयार केले व त्यांच्या बालवयीन गाण्याचे सवाई गंधर्व, वि.ना. भातखंडे, राजाभैया पूछवाले या सर्वांनी कौतुक केले, त्यांना प्रशस्तिपत्रे दिली.

त्यांनी १९३५ मध्ये संगीत मध्यमा परीक्षा उत्तीर्ण केली. त्याच साली त्यांचे वडील निवर्तले, त्या वेळी त्यांचे शालेय शिक्षण कसेबसे चालू होते. ते व्यायामशाळेत जात, गणेशोत्सवातल्या मेळ्यात, नाटिकांमध्ये हौसेने भाग घेत. त्यांनी १९३६ मध्ये लखनौ येथे आयोजित संगीत परिषदेत, तसेच खैरागड येथेही मैफली गाजवल्या.

प्रभाकर खर्डेनवीस १९४० साली नीलसिटी हायस्कूलमधून मॅट्रिक होऊन हिस्लॉप महाविद्यालयात दाखल झाले; परंतु घरगुती अडचणीमुळे शिक्षणात खंड पडला. मात्र भातखंडे म्यूझिक वर्ग घ्यायची सुसंधी त्यांना मिळाली. नागपूरच्या दीक्षान्त समारंभात आलेले जोधपूरचे रसिक प्रभाकर खर्डेनवीस यांच्या गायनावर लुब्ध होऊन त्यांनी जोधपूरला एक महिनाभरासाठी त्यांना नेले. खर्डेनवीस यांनी १९४४ मध्ये जबलपूरच्या मिलिटरी अकाउण्ट्स कार्यालयामध्ये ८-९ महिने नोकरी केली, तसेच नागपूरच्या पी.एम.जी. कार्यालयात काही काळ नोकरी केली. ते १९४५ मध्ये संगीत प्राज्ञ विशारद झाले. त्यांची सीताबाई कला महाविद्यालयात संगीत अध्यापकपदी नियुक्ती झाली. ते स्वतः हार्मोनिअम, दिलरुबा, सारंगी, व्हायोलिन या वाद्यांचे निष्णात वादक होते व पं. विष्णू दि. पलुसकरांच्या गायनाला त्यांनी व्हायोलिनची संगत केली होती. चतुरस्र कलाकार असा त्यांचा लौकिक चारी दिशांना पसरला. त्यांनी 'संशयकल्लोळ' या नाटकाच्या प्रयोगांतही काम केले.

हिंदुस्थानी संगीत प्रसारक मंडळाने २४ ऑक्टोबर १९४८ रोजी 'संगीत शेखर' पदवी देऊन खर्डेनवीस यांचा गौरव केला. सुरेल आवाज, प्रभावी, डौलदार आलापी, अचूक स्वरफेक, सरगमचा आविष्कार, सफाईदार ताना, शास्त्रशुद्ध उठावदार गायकी ही त्यांची वैशिष्ट्ये होती. भातखंडे म्यूझिक कॉलेजची संपूर्ण जबाबदारी १९५१ पासून त्यांच्यावर सोपविली गेली.

या महाविद्यालयात अनेक विख्यात कलाकारांचे कार्यक्रम होऊ लागले. या संस्थेस १९५२ मध्ये केंद्रीय नभोवाणी मंत्री डॉ. केसकर यांनी व नंतर चीन व सिलोन सरकारच्या प्रतिनिधींनीही या संस्थेस भेट दिली होती. या महाविद्यालयात १९६३ पासून एम.ए.साठी संगीत विषय सुरू केला गेला. अनेक विद्यापीठांचे ते संगीत परीक्षक होते. त्यांनी अनेक विद्यार्थी तयार केले. त्यांच्या कुटुंबातील सर्व बंधुभगिनींना संगीताची आवड आहे. त्यांची पत्नी उषाताई या सुप्रसिद्ध लेखक-दिग्दर्शक पुरुषोत्तम दारव्हेकरांची चुलतबहीण होती. खर्डेनवीस यांनी बऱ्याच रचना स्वरबद्ध केल्या होत्या. 'गांधीराग' ही त्यांची अभिनव कलाकृती होती.

— वि.ग. जोशी

**संदर्भ:**

*१. मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय कलोपासक', भाग-१; १९७४.*

## खळे, श्रीनिवास विनायक

**संगीतकार**

**३० एप्रिल १९२६ – २ सप्टेंबर २०११**

ख



भावगीते, भक्तिगीते, बालगीते, नाट्यगीते, अभंग, लावणी आदी संगीतप्रकारांना नावीन्यपूर्ण चाली देणारे प्रयोगशील संगीतकार श्रीनिवास विनायक खळे यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांची प्रारंभीची पाच-सात वर्षे मुंबईतच गेली. पुढे वडिलांना नोकरीकरिता बडोद्याला जावे लागल्यामुळे खळे कुटुंब बडोद्यात स्थायिक झाले. त्यामुळे श्रीनिवास खळे यांचे बालपण व शिक्षण बडोद्यातच झाले. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई. त्यांच्या वडिलांना संगीताची आवड होती. ते बालगंधर्वांचे भक्त होते. श्रीनिवास खळे यांचा थोरला भाऊ काशीनाथ बासरी आणि बुलबुलतरंग वाजवायचा. पुढे त्यांनी हार्मोनिअममध्येही प्रगती केली. त्यांची बहीण शालिनी हीदेखील गायनात तयार होती. या सगळ्या भावंडांचे शिक्षण बडोद्यालाच झाले होते.

श्रीनिवास खळ्यांचे शालेय शिक्षण बडोद्याच्या महाराणी चिमणाबाई हायस्कूलमध्ये झाले. शालेय शिक्षणाबरोबरच बडोद्याच्या सयाजीराव महाराजांच्या पाठशाळेत संगीत शिक्षणही १९४० पासून, सुरुवातीला कंचनलाल नामक एका गुजराती शिक्षकाकडे सुरू झाले व त्यानंतर ते बन्सीलाल भारतीकडे शिकले. या विद्यालयात आग्रा घराण्याचे फैय्याज खाँ, गुलाम रसूल, अता हुसेन खाँ, मधुसूदन जोशी अशी संगीत क्षेत्रातील मोठी मंडळी होती. काही काळ गुलाम रसूल यांच्याकडूनही त्यांनी संगीताचे पाठ घेतले. नंतर फैय्याज खाँ साहेबांचे शिष्य मधुसूदन जोशी यांच्याकडे त्यांनी तालीम घेतली. अधूनमधून अता हुसेनचेही मार्गदर्शन त्यांना लाभत असे. आग्रा घराण्याच्या संस्कारांमुळेच त्यांच्यामधील लयीची जाणीव समृद्ध झाली. त्यांच्या चालीतील बांधणीत हा घटक विशेषत्वाने वावरला.

त्यांच्या थोरल्या भावाचे म्हणजे काशीनाथ खळ्यांचे त्यांना नेहमीच प्रोत्साहन मिळे. ते १९३९ साली श्रीनिवासांना आवाजाच्या चाचणीकरिता ‘यंग इंडिया कंपनी’त घेऊन गेले होते. त्या वेळी मा. दीनानाथांनी श्रीनिवास खळे यांना गायला सांगितले व त्यांचे मनापासून कौतुक केले व त्यांना आशीर्वादही दिला. बडोदा येथील काँग्रेस अधिवेशनात ‘वंदे मातरम्’ म्हणण्यासाठी त्यांना बोलावण्यात आले होते. अधिवेशनाचे अध्यक्ष नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी त्यांना शाबासकी दिली, ‘‘तू चांगला गातोस; मात्र गाण्याबरोबरच शरीर कमवायला शीक,’’ असा सल्लाही दिला.

श्रीनिवास खळ्यांच्या वडिलांना संगीताची आवड होती, तरी मुलांनी संगीत व्यवसाय करावा असे त्यांना मुळीच वाटत नव्हते. मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर वडिलांनी त्यांना लोकसेवा आयोगाच्या स्टेशनमास्तरच्या पदाच्या तयारीसाठी अजमेरला पाठविले. खळे ती परीक्षा उत्तीर्ण झाले; पण ते करारपत्र लिहून देण्यास नाराज होते. मात्र जबरदस्तीने त्यांना करारपत्र लिहून द्यायला लागले. खळे नोकरीत रमणारे नव्हतेच. त्यांनी थोड्याच दिवसांत राजीनामा दिला व ते बडोद्याला परतले. वडिलांचा प्रक्षोभ, संगीतात काहीतरी करावे ही ईर्षा व मित्र शांताराम रांगणेकरांचे मुंबईला येण्याचे निमंत्रण या सगळ्याचा परिपाक घर सोडून मुंबईला जाण्यात झाला. ते १९४८-५० च्या दरम्यान मुंबईला आले.

खरे तर बडोद्याला असतानाच खळे यांची संगीत दिग्दर्शक म्हणून वाटचाल सुरू झाली होती. त्यांनी १९४५ साली मित्राच्या आग्रहावरून एका कवितेला चाल लावली. ती सुमन बाणावलीकर (वरेरकर) यांनी गायली व आकाशवाणीवरून ते गीत प्रसारितही झाले. याबरोबरच आकाशवाणीवर शास्त्रीय संगीताचे कार्यक्रम देणे, मेळ्यांतून सुगम संगीत गाणे, नाटकांना व कवितांना चाली देणे वगैरे सुरू होतेच.

मुंबईला आल्यावर श्रीनिवास खळे यांनी अनेकांचे दरवाजे ठोठावले; पण सगळीकडून नकारघंटाच मिळाली. त्यांना दत्ता कोरगावकर ऊर्फ के. दत्ता यांनी राजा बढे यांच्या संगीतिकेला संगीत द्यायला सांगितले. त्यांच्या संगीताला कोरगावकरांची मान्यता मिळाली आणि श्रीनिवास खळे संगीत दिग्दर्शक झाले. पुढे कोरगावकरांबरोबर त्यांनी 'दामन', 'गुमास्ता' आणि 'कलगीतुरा' या चित्रपटांकरिता साहाय्यक म्हणून काम केले. पार्श्वनाथ आळतेकरांच्या कलापथकातही खळे काही दिवस पगारी नोकर म्हणून होते. त्यांनी १९५२ साली वसुमती प्रधान यांच्याशी विवाह केला.

कोरगावकरांच्या निधनानंतर खळ्यांनी मुंबई आकाशवाणीसाठी काम करण्यास सुरुवात केली. सुरुवातीला ते कंत्राटी पद्धतीने काम करीत. नंतर म्हणजे १९६०-६१ पासून १९६८ पर्यंत ते मुंबई आकाशवाणीवर नोकरी करत होते. त्याच वेळी ते अधूनमधून एच.एम.व्ही.साठीही स्वररचना करीत. पुढे १९६८ नंतर ते एच.एम.व्ही.त रेकॉर्डिंग ऑफिसर म्हणून काम करू लागले. प्रथम त्यांच्याकडे मराठी आणि गुजराती संगीताची जबाबदारी होती व पुढे शास्त्रीय संगीताचा विभागही त्यांच्याकडे आला.

मुंबईत खळे यांच्या संगीत दिग्दर्शनाखाली १९५० साली तलत महमूद या गायकाच्या आवाजात गुजराती भाषेतील गाण्यांची पहिली ध्वनिमुद्रिका निघाली. खळे यांनी १९५६ ते १९६०-६१ च्या काळात अनेक गीतांना सुरेख स्वरसाज चढवला, त्यांतील काही आकाशवाणीवर, तर काही एच.एम.व्हीत ध्वनिमुद्रित झाली : 'कळीदार कपुरी पान', 'कशी रे तुला भेटू', 'कशी ही लाज घडे मुलखाची' (राजा बढे), 'सहज सख्या एकटाच' (सूर्यकांत खांडेकर), 'निळासावळा नाथ' (गंगाधर महांबरे), तसेच योगेश्वर अभ्यंकरांच्या 'तव भगिनीचा धावा ऐकूनी', 'एकतारी गाते', 'रुसला मजवरती कान्हा' इत्यादी.

खळे यांनी मुंबई केंद्राच्या 'गंमत जंमत' या मुलांच्या कार्यक्रमासाठी मंगेश पाडगावकरांच्या 'टप टप पडती अंगावरती प्राजक्ताची फुले' या गीताला चाल दिली. 'भावसरगम' या कार्यक्रमातून १९६३ साली अरुण दाते आणि सुधा मल्होत्रांच्या आवाजातील खळ्यांचे संगीत असलेले मंगेश पाडगावकरांचे 'शुक्र तारा मंद वारा' हे द्वंद्वगीत प्रसारित झाले. याबरोबरच, 'हात तुझा हातातच' (१९६४), 'सर्व सर्व विसरू दे' ही द्वंद्वगीतेही प्रसारित झाली. अरुण दाते हे गझल गात; खळ्यांनीच त्यांना मराठी भावगीतसृष्टीत आणले. याबरोबरच, 'जादू अशी घडे ही', 'झुळझुळता हा पहाटवारा', 'दूर सूर चौघड्यात' अशी अनेक गाणी प्रसारित झाली व अजूनही या गाण्यांची लोकप्रियता ढळलेली नाही.

श्रीनिवास खळे यांनी अवघ्या सहा चित्रपटांना संगीत दिले. त्यांनी १९५२ साली 'लक्ष्मीपूजन' या चित्रपटाचे संगीत दिग्दर्शन केले; पण हा चित्रपट प्रदर्शित झाला नाही. यातील आशा भोसल्यांच्या स्वरात ध्वनिमुद्रित झालेल्या 'गोरी गोरी पान' व 'एका तळ्यात होती' या दोन गाण्यांनी लोकप्रियतेचा कळस गाठला. याशिवाय 'यंदा कर्तव्य आहे' (१९५६), 'बोलकी बाहुली' (१९६१), 'पळसाला पाने तीन', 'जिव्हाळा' (१९६८), 'पोरकी' (१९७०), 'सोबती' (१९७१) या सर्वच चित्रपटांतील गाणी गाजली.

'देवा दया तुझी', 'सांग मला रे, सांग मला' (बोलकी बाहुली), 'या चिमण्यांनो परत फिरा रे' (लता मंगेशकर) आणि 'लळा जिव्हाळा शब्दच खोटे' (सुधीर फडके) ही 'जिव्हाळा' या चित्रपटातील दोन गाणी त्यांच्या चित्रपटातील संगीताच्या उच्च दर्जाची साक्ष देतात.

चित्रपटाप्रमाणेच काही नाटकांनाही त्यांनी संगीत दिले. 'पाणिग्रहण' (आचार्य अत्रे), 'विदूषक' (वि.वा. शिरवाडकर), 'देवाचे पाय' (चिं.त्र्यं. खानोलकर) या तिन्ही नाटकांतील गीतांना चाली, त्या नाटकांच्या आशयांप्रमाणे भिन्न आहेत. 'पाणिग्रहण' या नाटकातील 'उगवला चंद्र पुनवेचा' व 'प्रीती सुरी दुधारी' (बकुल पंडित) व 'विदूषक' या नाटकातील

कुसुमाग्रजांच्या काव्य-गीताला भावगीताचा साज चढवून केलेली, 'स्वप्ननगरच्या सुंदर माझ्या राजस राजकुमारा', 'चांद भरली रात आहे' (आशालता वाबगावकर) ही गाणीही लोकप्रिय झाली. याशिवाय आकाशवाणीसाठी काही संगीतिका आणि नाटकांनाही त्यांनी संगीत दिले.

श्रीनिवास खळे यांनी भक्तिगीते, अभंगांच्या चालींतूनही आपला वेगळा ठसा उमटवला आहे. लता मंगेशकर यांनी गायलेल्या संत तुकारामांच्या अभंगांची 'अभंग तुकयाचे' ही ध्वनिमुद्रिका १९७१ साली निघाली. अभंग गायनाच्या पारंपरिक चालींपेक्षा या चाली वेगळ्या असूनदेखील त्या जनमानसात रुजल्या, तसेच प्रख्यात गायक पं. भीमसेन जोशी यांच्या आवाजातील 'अभंगवाणी'च्या ध्वनिफितीही गाजल्या. याबरोबरच 'रामगुणश्याम' ही ऐतिहासिक म्हणावी अशी ध्वनिफीत. पं. भीमसेन जोशी व लता मंगेशकर या दोन भारतरत्न सन्मानित दिग्गज कलाकारांच्या आवाजातील १९८४ साली निघालेली ही ध्वनिफीत महाराष्ट्रातच नव्हे, तर संपूर्ण भारतातच गाजली. 'नाथ माझा मी नाथांचा' हा त्यांचा शेवटचा अल्बम २००९ साली निघाला. याशिवाय अनेक भक्तिगीते, अभंगांना त्यांनी वैशिष्ट्यपूर्ण व नावीन्यपूर्ण चाली लावलेल्या दिसतात. श्रीनिवास खळ्यांच्या भक्तिगीतांतील स्वरयोजनेतून एक सात्त्विक आर्तता नेहमीच प्रतीत होते.

श्रीनिवास खळे यांची संगीत प्रतिभा चौफेर व बहुप्रसवा आहे. आजवर त्यांनी १४१ काव्यरचनांना संगीत दिले असून यांत मराठी, हिंदी, बंगाली, गुजराती, संस्कृत या भाषांतील विविध गीतप्रकारांचाही समावेश आहे. त्यांनी अनेक संगीतकारांना व तरुण नवोदित गायकांना त्यांनी प्रोत्साहन दिले आहे. त्यांच्या संगीत दिग्दर्शनाखाली अनेक बुजुर्ग ज्येष्ठ गायकांबरोबरच तरुण नवोदित गायक/गायिकांनीही गाणी गायली आहेत. लता मंगेशकर, आशा भोसले, उषा मंगेशकर, सुधा मल्होत्रा, सुमन कल्याणपूर, माणिक वर्मा, सुलोचना चव्हाण, शोभा गुर्टू, वीणा सहस्रबुद्धे, कविता कृष्णमूर्ती, पुष्पा पागधरे, कुंदा बोकील, कृष्णा कल्ले, देवकी पंडित यांबरोबरच भीमसेन जोशी, वसंतराव देशपांडे, सुधीर फडके, हृदयनाथ मंगेशकर, सुरेश वाडकर, रतिलाल भावसार, महेन्द्र कपूर, मन्ना डे, तलत महमूद अशा अनेक मराठी-अमराठीं कलाकारांनीही त्यांची गाणी गायली आहेत.

भावगीते, भक्तिगीते, चित्रपटगीते, अभंग, बालगीते, लावणी, गवळण, प्रेमगीते, युगुलगीते अशा अनेक गीतप्रकारांसाठी त्यांनी स्वरयोजना केल्या आहेत. रागदारी संगीताची पक्की तालीम, काव्याची उत्तम समज व नवनवीन स्वरसंगती हे त्यांच्या चालींचे वैशिष्ट्य. त्यांच्या रचनांत लयींचे सूक्ष्म-तरल आविष्कार असतात.

श्रीनिवास खळे यांना 'श्रीमती लता मंगेशकर' पुरस्कार (१९९३), 'दादासाहेब फाळके' पुरस्कार (२००३), 'पद्मभूषण' (२०१०) इ. अनेक मानसन्मान लाभले. त्यांच्या संगीत कारकिर्दीला पंचवीस वर्षे पूर्ण झाल्यावर 'श्रीनिवास खळे' : एक संकलन' ही पुस्तिका भा.ग. शेरे यांनी १९७० साली काढली. दत्ता मारुलकर यांनी २००९ साली श्रीनिवास खळे यांचा जीवनपट व सांगीतिक कारकिर्दीचा वेध घेणारे 'अंतर्यामी सूर गवसला' हे पुस्तक लिहिले. श्रीनिवास खळ्यांच्या जीवनात आर्थिक आणि कौटुंबिक अडचणींचा तोटा नव्हता. मात्र त्यांनी प्रसन्नता व संगीतविषयक उत्कटता हरवू दिली नाही. त्यांच्या संगीत प्रतिभेला नेहमीच नवे धुमारे फुटत राहिले. या प्रतिभावान संगीतकाराचे वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी मुंबईत निधन झाले.

**– माधव इमारते**

**संदर्भ :**


१. *शेरे, भा.ग.; 'श्रीनिवास खळे - एक संकलन'; मौज प्रकाशन; १९७०.*

२. *मारुलकर, दत्ता; 'अंतर्यामी सूर गवसला'; मॅजेस्टिक प्रकाशन; २००९.*

## खाडिलकर, आशा माधव
**गायिका**
**११ जानेवारी १९५५**



शास्त्रीय संगीताबरोबरच उपशास्त्रीय, भक्तिसंगीत, आणि मुख्यत्वेकरून नाट्यसंगीताच्या क्षेत्रात आशा खाडिलकर यांचे प्रभुत्व निर्विवाद आहे. संगीत रंगभूमीवरील संगीत नाटकांमध्ये भूमिका आणि नवीन संगीत नाटकांना संगीत दिग्दर्शन हेही त्यांच्या कलात्मक व्यक्तिमत्त्वाचे आणखी महत्त्वाचे पैलू आहेत.

आशा खाडिलकर यांचे मूळचे नाव आशा पाटणकर. त्या मूळच्या सांगलीच्या होत्या. त्यांचे संगीताचे प्राथमिक शिक्षण पं. बाळकृष्णबुवा मोहिते यांच्याकडे झाले. वयाच्या तेराव्या वर्षी आशा पाटणकर यांनी जाहीर कार्यक्रमात गायन केले. त्या १९७५ साली माधव खाडिलकर यांच्याशी विवाहबद्ध होऊन मुंबईत स्थायिक झाल्या.

पं. माणिक वर्मा यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांची पुढील तालीम सुरू झाली. माणिक वर्मांच्या शैलीत त्या शास्त्रीय संगीत, भक्तिगीते आणि नाट्यगीते गाऊ लागल्या व अल्पावधीतच गायिका म्हणून नावारूपास आल्या. पुढे त्यांनी पं. यशवंतबुवा जोशी, पं. जितेंद्र अभिषेकी, पं. वसंतराव देशपांडे, पंडिता पद्मावती शाळिग्राम, पं. शंकर अभ्यंकर अशा निरनिराळ्या गुरूंकडून ग्वाल्हेर, किराणा, आग्रा घराण्यांची वैशिष्ट्ये आत्मसात करून आपली गायकी अधिकाधिक समृद्ध केली.

‘धाडिला राम तिने का वनी’ या साहित्य संघाच्या संगीत नाटकात सीतेची भूमिका करून त्यांनी मराठी संगीत रंगभूमीचाही अनुभव घेतला. या नाटकामुळे त्यांना पं. जितेंद्र अभिषेकींच्या खास मार्गदर्शनाचा लाभ झाला. पं. अभिषेकींच्या संगीत दिग्दर्शनातील अनेक नाट्यपदे, भक्तिगीते त्यांनी आपल्या कार्यक्रमांत समर्थपणे गायली.

मुंबई दूरदर्शनच्या मराठी संगीत रंगभूमीविषयक कार्यक्रमातील सहभागामुळे त्यांना पं. वसंतराव देशपांडे यांच्याकडून पारंपरिक बंदिशी व नाट्यपदांचा खजिना लुटता आला. पं. वसंतरावांच्या बरोबरीने या कार्यक्रमातील त्यांच्या सहभागामुळे आशा खाडिलकरांचे अनुभवविश्व अधिक समृद्ध झाले आणि रसिकांमध्ये त्या अधिकाधिक लोकप्रिय झाल्या.

‘माणिकमोती’, ‘स्वराभिषेक’ अशा कार्यक्रमांत त्यांचा यशस्वी सहभाग होता. त्याचबरोबर ‘होरी रंगरंगीली’, ‘सावन रंग’, ‘ऋतुरंग’, ‘रचनाकार को प्रणाम’, असे खास विषयानुरूप साकारलेले विविध कार्यक्रमही त्यांनी स्वत: सादर केले. शास्त्रीय संगीतातील निरनिराळ्या रागांमध्ये त्यांनी बंदिशी बांधल्या. नेहरू सेंटर, मुंबईद्वारा निर्मित, ‘संगीत आराधना’ आणि ‘संगीत जयदेव’ या नवीन संगीत नाटकांचे त्यांनी संगीत दिग्दर्शनही केले.

आकाशवाणी आणि दूरदर्शनवर अनेक कार्यक्रम करतानाच त्यांचे परदेशी अमेरिका, कॅनडा, ब्रिटन, सिंगापूर या ठिकाणीही कार्यक्रम झाले. ‘पद्मश्री माणिक वर्मा’ पुरस्कार, ‘पं. कुमार गंधर्व’ पुरस्कार, ‘नटसम्राट बालगंधर्व’ पुरस्कार, ‘सह्याद्री’ वाहिनीचा ‘स्वररत्न’ पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांनी त्यांना सन्मानित करण्यात आले. त्या ‘झी मराठी’च्या ‘सा रे ग म प’ स्पर्धेच्या परीक्षकही होत्या.

हे सर्व करताना एक गुरू म्हणूनही शास्त्रीय व नाट्यसंगीताचे शिक्षण देऊन त्यांनी शिष्यवर्ग घडविला आहे. नवोदित कलाकारांना प्रोत्साहन देण्यासाठी माधव खाडिलकरांनी स्थापन केलेल्या ‘उत्तुंग’ या संस्थेच्या कामातही आशा खाडिलकरांचा मोठा सहभाग आहे.

— मधुवंती पेठे

## खादीम हुसेन खाँ
**गायक**
**१९०४/५ - २३ जानेवारी १९९३**



खादीम हुसेन खाँ यांचा जन्म उत्तर प्रदेशातील अत्रौली या गावी संगीत घराण्यात झाला. त्यांचे वडील अल्ताफ हुसेन हे अत्रौली घराण्याचे, तर मातोश्री फैयाझी बेगम या आग्रा घराण्याच्या होत्या. त्या विलायत हुसेन खाँ यांच्या ज्येष्ठ भगिनी होत्या. त्यामुळे खाँसाहेबांना दोन्ही घराण्यांची विद्या मिळाली. आजच्या आग्रा गायकीचे जनक घग्गे खुदाबक्ष यांचे सुपुत्र कल्लन खाँ यांच्याकडून खादीम हुसेन खाँसाहेबांना अस्सल आग्रा घराण्याच्या गायकीची तालीम मिळाली.

खादीम हुसेन खाँसाहेबांना कल्लन खाँसाहेबांकडून आग्रा घराण्याची विद्या जेवढ्या प्रमाणात मिळाली, तेवढी अत्रौली घराण्याची विद्या मिळाली नाही; कारण वडील अल्ताफ हुसेन हे परगावी नोकरी करत होते. मात्र या घराण्याचे 'दरसपिया' (मेहबूब खाँ) यांच्याकडून त्यांना विपुल बंदिशी मिळाल्या.

कल्लन खाँनी खादिम हुसेन खाँ यांना भरपूर विद्यादान केले. रोज बारा तास अशी दहा वर्षे त्यांना अखंड तालीम मिळाली. या दहा वर्षांच्या कालखंडात खादीम हुसेन खाँसाहेब प्रचलित, अप्रचलित मिळून ४०० राग शिकले. शिवाय प्रत्येक रागातील अनेकविध प्रकारच्या बंदिशीही शिकले. अवघ्या विसाव्या वर्षीच विपुल रागरागिण्यांचा व चिजांचा संग्रह खादिम हुसेन खाँसाहेबांपाशी झाला. याबरोबरच कल्लन खाँसाहेबांनी संगीताकडे पाहण्याची योग्य ती नजरही खाँसाहेबांना दिली. प्रत्येक रागाच्या स्वतंत्र भावप्रकृतीनुसार रागमांडणी सक्षम होण्यासाठी आवश्यक असणारी अठरा अंगेही ते कल्लन खाँकडून शिकले.

कल्लन खाँ खेरीज आणखी काही उस्तादांकडूनही त्यांनी शिक्षण घेतले. अर्थात कल्लन खाँचे सुपुत्र तसद्दुक हुसेन खाँ (विनोदपिया), मुहम्मद खाँ, अब्दुल्ला खाँ व नन्हे खाँ (उ. विलायतखाँचे बंधू ) विलायत हुसेन खाँ (प्राणपिया), उ. फैय्याज खाँ (प्रेमपिया), गणपतराव मणेरीकर, बशीर खाँ अलीगढवाले, आशीकअली खाँ, वजीर खाँ (जयपूर) इत्यादींकडून त्यांना काही रागरागिण्या व बंदिशी मिळाल्या. 'सजनपिया' या मुद्रेने त्यांनी उत्तम बंदिशीही रचल्या.

खाँसाहेबांचे वडील १९३० मध्ये निवर्तले व आपल्या भावंडांच्या पालनपोषणाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. तेव्हा नाइलाजाने त्यांना शिक्षकी पेशा पत्करावा लागला. आपल्या कुटुंबातील सर्व जबाबदारी पार पाडून त्यांनी ६० वर्षे अखंड विद्यादान केले. ते १९८६ मध्ये अर्धांगवायूमुळे विकलांग झाले.

खाँसाहेबांचा शिष्यवर्ग फार मोठा आहे. त्यात ज्योत्स्नाबाई भोळे, वत्सलाबाई कुमठेकर, दुर्गाबाई खोटे, सुरैया, मुकेश, बाबामहाराज सातारकर यांचा समावेश आहे. गोविंदराव अग्नी, मोहनराव चिकरमाने व कृष्णा उद्यावरकर, बबनराव हळदणकर व ललित राव, कनिष्ठ बंधू उ. लताफत हुसेन यांनाही खाँसाहेबांनीच घडवले.

कलकत्ता (कोलकाता) येथील संगीत रिसर्च अकॅडमीने गुरू म्हणून त्यांची नियुक्ती केली होती. त्यांना १९८० साली कोलकात्याच्या 'संगीत रिसर्च अकादमी'तर्फे पुरस्कार देण्यात आला. त्याच वर्षी 'पद्मभूषण' सन्मानही त्यांना प्राप्त झाला.

— पं. बबनराव हळदणकर

***

# घ





## घोटकर, पांडुरंग अण्णासाहेब

**ढोलकीवादक**

**२१ मे १९४७**



ढोलकीसम्राट पांडुरंग अण्णासाहेब घोटकर यांचे मूळ गाव औरंगाबाद जिल्ह्यातील गंगापूर तालुक्यातील भिवधानोरा होते. सध्या त्यांचे वास्तव्य पुण्यास असते. अनसूया व अण्णा हे त्यांचे आईवडील होत. रेणुराई गोंधळी समाजात संबळ वाजवण्याची कला पिढीजात असते, त्यानुसार वयाच्या आठव्या वर्षापासून पांडुरंग वडील अण्णासाहेब घोटकर यांच्याकडे संबळ वाजवण्यास शिकू लागले. अभ्यासापेक्षा संगीताकडे कल असल्याने दहाव्या वर्षापासून त्यांनी नांदेडला मामा लक्ष्मण काटे यांच्याकडे तबला व पखवाजाचे धडे घेतले. ढोलकी व तबल्याची साथ करताना गाणे रंगवण्याच्या उपजत गुणामुळे लवकरच ते लावणी गायिकांचे दिवाणखाने वाजवू गाजवू लागले.

वयाच्या दहाव्या वर्षीच १९५८ साली परभणी जिल्ह्यातील शिंगणापूर येथील तमाशा स्पर्धेतील त्यांच्या वादनापासून त्यांचे नाव वाखाणले जाऊ लागले. द्वारका-मथुरा समसापूरकर यांच्या संगीतबारीत त्यांना प्रथमच वाजवायची संधी मिळाली. तेव्हापासून ते व्यावसायिक संगीतबाऱ्यांमध्ये ढोलकी, संबळ, इ. लोकतालवाद्ये व तबलाही वाजवू लागले.

ते १९६० मध्ये पुण्यात आले व नृत्यशिक्षक बाळासाहेब गोखले यांच्याकडे कथक नृत्यास साथ करू लागले. बाळासाहेबांनी पुत्रवत प्रेमाने पांडुरंगांना सांभाळले व त्यांना पं. जी.एल. सामंत यांच्याकडे तबला शिकण्यास पाठवले. पं. सामंत यांच्याकडे पांडुरंग दहा वर्षे तबला शिकले. नंतर मुंबईमधील पिला हाउस थिएटरमध्ये त्यांना प्रसिद्ध तबलानवाज उस्ताद आमिर हुसेन खान यांच्याकडून शास्त्रशुद्ध मार्गदर्शन मिळाले. एखादा कार्यक्रम कसा पेश करावा याचे मार्गदर्शन त्यांना लावणी अभ्यासक अण्णासाहेब इनामदार यांच्याकडून मिळाले.

भारत-चीन युद्धादरम्यान १९६४ मध्ये जवानांच्या मनोरंजनासाठी संजीवनी बीडकर यांच्या कलापथकासह पांडुरंगरावांनी नेफा आघाडीवर दोन महिने दौरा केला. पुढे राधाबाई बुधगावकर, कमलाबाई फुलाबाई कळमकर, यमुनाबाई वाईकर, मथुराबाई इंदुरीकर, लक्ष्मीबाई कोल्हापूरकर, मधू कांबीकर, प्रभा काळे, छाया पंढरपूरकर, इ. लावणी कलावंतांची साथ त्यांनी अनेक वर्षे केली. लक्ष्मीबाईंबरोबर बतावणीचा प्रसंग ते फार खुमासदारपणे रंगवीत. दादू इंदुरीकर यांच्या ‘गाढवाचं लग्न’ या गाजलेल्या वगनाट्यासही ते साथ करीत. ‘विच्छा माझी पुरी करा’, ‘आतून कीर्तन वरून तमाशा’, ‘उधे ग अंबे उधे’, ‘राजकारण गेलं चुलीत’, ‘एक नार चार बेजार’ अशा लोकप्रिय वगनाट्यांतही त्यांचा सहभाग होता. लालबागच्या न्यू हनुमान थिएटरमध्ये त्यांनी बरीच वर्षे वादन केले. बीडचे नवरंग थिएटर उभारण्यातही त्यांचा मोठा वाटा होता.

पारंपरिक लावणी कलावंतांचे शेकडो कार्यक्रम व ध्वनिमुद्रणे यांसाठी त्यांनी साथ केली. संगीत नाटक अकादमीच्या संग्रहालयासाठी त्यांनी यमुनाबाई, भामाबाई, गौराबाई, लक्ष्मीबाई यांच्या लावणीगायनास

साथ केली. एच.एम.व्ही. रेकॉर्डिंग कंपनीमध्ये रोशन सातारकर, सुलोचना चव्हाण, गुलाबबाई संगमनेरकर यांच्या लावण्यांच्या ध्वनिमुद्रणांना त्यांनी साथ केली. मुंबईतील चित्रपटसृष्टीतही ध्वनिमुद्रणांसाठी ते साथ करू लागले. राम कदम, सुधीर फडके, हृदयनाथ मंगेशकर, विश्वनाथ मोरे, विठ्ठल शिंदे, बाळ पळसुले, इ. मराठी संगीतकार, तर लक्ष्मीकांत-प्यारेलाल, खय्याम, बप्पी लाहिरी यांपासून अन्नू मलिकपर्यंतच्या कित्येक हिंदी संगीतकारांसाठी त्यांनी ध्वनिमुद्रणांत साथ केली. लता मंगेशकर, आशा भोसले, उषा मंगेशकर, शोभा गुर्टू, उत्तरा केळकर, अनुराधा पौडवाल यांच्या चित्रपटगीतांना त्यांनी साथ केली.

घ

'अपनापन' (१९७७) या हिंदी चित्रपटातील अरुणा इराणी यांच्यावर चित्रित झालेल्या 'दिलपे जरा हाथ रखलो बाबू, फिर गंगूबाई की चाल देखो' या गाण्यात पांडुरंगरावांनीही अभिनय केला आणि तेव्हापासून त्यांची पडद्यावरील कारकीर्द सुरू झाली. अनेक मराठी व हिंदी चित्रपटांत त्यांचे ढोलकीवादक म्हणून व बतावणीच्या प्रसंगांत दर्शन घडले आहे. 'जोतिबाचा नवस', 'साताऱ्याची तऱ्हा', 'तेवढं सोडून बोला', 'फटाकडी', 'एक होता विदूषक' आदी चित्रपटांमधील लावण्या व गाण्यांना त्यांनी ढोलकी, तबला आणि संबळाची साथ दिली. 'फटाकडी' या चित्रपटातील 'कुठं कुठं जायाचं हनिमूनला' हे अभिनेत्री रेखावर चित्रित झालेले गाणे खूप गाजले.

मुंबईमध्ये न्यू हनुमान थिएटरमध्ये काम करत असताना जपानहून आलेल्या समितीतील लोकसंगीताचे अभ्यासक डॉ. फुजी यांनी पांडुरंग घोटकरांची निवड केली आणि १९८१ साली घोटकरांनी जपानला प्रथम परदेशवारी केली. जपानमधील टोकियो येथे 'नॅशनल ऑडिटोरिअम' येथे त्यांनी कार्यक्रम सादर केला. त्यांच्यासह माधव कुदळे, प्रभा काळे, बानू कोल्हापूरकर व शाहीर विभूते हे कलाकार होते व या दौऱ्यात परदेशात लावणी प्रथम सादर झाली. नंतर मॉरिशस (शाहीर साबळ्यांसह, १९९१), दुबई (सखी माझी लावणी, २००३), रशिया, इंडोनेशिया व जपान (२०१०) या देशांमध्येही त्यांनी कार्यक्रम सादर केले.

पांडुरंग घोटकर हे केवळ ढोलकी साथीदार नसून कार्यक्रमांची उत्तम आखणी व बांधणी करणारे लावणी कलाकारांचे मार्गदर्शक व खुसखुशीत 'बतावणी' करणारे कलाकार आहेत. महाराष्ट्र राज्य सरकारतर्फे होणाऱ्या तमाशा महोत्सव, लावणी समारोह, 'अपना उत्सव' सारखे लोककला मेळे यांत त्यांनी खूप वर्षे कलाप्रस्तुती केली व कित्येक कार्यक्रमांचे दिग्दर्शनही केले. २६ जानेवारी १९७७ रोजी दिल्लीत प्रजासत्ताक दिनानिमित्त आयोजित केलेल्या कार्यक्रमात मधू कांबीकर यांच्याबरोबर संबळ वाजवत असताना तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी त्यांना खुलेपणाने दाद दिली होती.

डॉ. अशोक दा. रानडे यांच्या 'बैठकीची लावणी' या आगळ्यावेगळ्या कार्यक्रमासही त्यांनी साथ दिली, तेव्हा पु.ल. देशपांडे यांनी पांडुरंग घोटकरांना दिलखुलास दाद दिली होती. 'फुलोरा', 'लावणी रूपदर्शन', 'सखी माझी लावणी' या लावणीवरील विशेष कार्यक्रमांत त्यांचा सहभाग होता. मधुकर नेराळे यांच्यासह त्यांनी उत्तर भारतातील अनेक आकाशवाणीच्या केंद्रांसाठी कार्यक्रम केले.

लावणीबरोबर ढोलकीची साथ करण्याबरोबरच त्यांनी काही वेगळे प्रयोगही केले. 'एन.सी.पी.ए.'मध्ये रोशनकुमारी व फकीर मुहंमद (कथक व तबला) यांच्याबरोबर त्यांनी जुगलबंदी केली. डॉ. अशोक दा. रानडे यांच्या 'स्वरचक्र' (१९९३) या कार्यक्रमात त्यांनी तबला, पखवाज या वाद्यांबरोबर सहवादन केले. 'दूरदर्शन'वरील 'प्रतिभा आणि प्रतिमा' या कार्यक्रमात अर्जुन शेजवळ (पखवाज) व भाई गायतोंडे (तबला) यांच्याबरोबर सहवादन केले. एन.सी.पी.ए.ने प्रस्तुत केलेल्या 'टेम्प्ट मी नॉट' ('विच्छा माझी पुरी करा' या वगनाट्याचा इंग्रजी अवतार, डॉ. रानडे यांचे संगीतदिग्दर्शन, १९९३) या नाटकासाठी त्यांनी साथ केली. पं. बिरजू महाराज व यमुनाबाई वाईकर यांच्या

कथक व लावणीच्या सहप्रस्तुतीतही त्यांनी आपल्या साथीने रंग भरला होता.

लावणीचा पारंपरिक बाज जपण्यासाठी ते आज अनेक तरुण लावणी कलाकारांना मार्गदर्शन करतात. शासनातर्फे होणाऱ्या कलाशिबिरांमध्ये ते अनेक वर्षे शिकवत आहेत व त्यांत सुमारे २०० लोककलाकारांना त्यांनी मार्गदर्शन केले आहे. कुसुम नेर्लेकर, मधू कांबीकर, छाया खुटेगावकर, राजश्री नगरकर, रेश्मा परितेकर यांसारख्या लावणी कलाकारांना घडवण्यात घोटकरांचा मोठा वाटा आहे. शंकर घोटकर (भाऊ), कृष्णा मुसळे (मुलगा) व मधुबने, बापट अशा इतर अनेकांना त्यांनी ढोलकी, संबळ, तबला ही वाद्ये शिकवली आहेत. महाराष्ट्रातील पारंपरिक लोकवाद्यांची पेशकश असणारा स्वतंत्र कार्यक्रमही ते सादर करतात. महाराष्ट्र राज्य सरकारचा पुरस्कार (२००२) व अकलूजचा 'शंकरराव मोहिते पाटील' पुरस्कार (२००९) देऊन घोटकरांच्या कार्याचा गौरव करण्यात आला आहे.

– चैतन्य कुंटे

## घोरपडकर, वसंत शंकर

**पखवाजवादक**

**८ जानेवारी १९२६ – ३० जून २०११**



वसंत शंकर घोरपडकर यांचा जन्म आजोळी, पुणे जिल्ह्यातील ओतूर या गावी झाला. पखवाजवादनाची तालीम त्यांना त्यांच्या वडिलांकडून मिळाली. इंदूर येथील सुप्रसिद्ध पखवाजवादक नानासाहेब पानसे यांचे ते शिष्य होत. शंकर घोरपडकर यांना तबला, सारंगी आणि गाण्याचेही चांगले ज्ञान होते. लहानपणापासूनच वसंत घोरपडकर घरामधल्या संगीतमय वातावरणात वाढले. ते १९४४ पर्यंत म्हणजे त्यांच्या वडिलांच्या निधनापर्यंत त्यांच्याकडून पखवाज आणि तबलाही शिकले.

ते १९४५ मध्ये मॅट्रिक झाल्यावर तबला व पखवाजाची साथ करू लागले होते, तरीही चरितार्थासाठी १९५० सालापासून ते पुणे महानगरपालिकेत नोकरी करू लागले. त्यांनी १९८२ मध्ये गणनाधिकारी म्हणून निवृत्त झाल्यानंतर पखवाजवादनावर पूर्ण वेळ लक्ष केंद्रित केले व नंतर स्वतंत्र वादन, साथसंगत आणि विद्यादानाचे कार्य केले.

घोरपडकरांचे १९५० पासूनच पुणे आकाशवाणी केंद्रावर कार्यक्रम सुरू झाले. पखवाजवादनातील सर्वोच्च श्रेणीचे कलाकार असलेल्या घोरपडकरांचे आकाशवाणी व दूरदर्शनच्या राष्ट्रीय प्रसारणांमध्येही कार्यक्रम झाले. स्वतंत्र वादन आणि धृपद गायनाची साथसंगत अशा दोन्ही प्रकारे त्यांनी आपले पखवाजवादन विकसित केले. इंदूर, अहमदाबाद, मुंबई, सिंगापूर, मलेशिया आणि फ्रान्स येथेही त्यांनी पखवाजवादन सादर केले. अत्यंत निगर्वी आणि विनम्र स्वभाव असलेल्या घोरपडकरांची तबलावादक पं. सुरेश तळवलकरांबरोबर सहवादनाची ध्वनिफीत प्रसिद्ध आहे. त्यांचे २००२ मध्ये चौताल, धमार, तेवरा, मत्त, झंपा आणि विश्व या तालांतील एकलवादन आणि पखवाजवादनाची माहिती सांगणाऱ्या मुलाखतीचा समावेश असलेल्या दोन ध्वनिचकत्यांचा संचही कलापिनी संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात आला.

पुण्यातील प्रसिद्ध जोगेश्वरी मंदिराच्या पूजेची व्यवस्था गेली अनेक वर्षे बघणाऱ्या घोरपडकरांनी त्यांच्या वडिलांप्रमाणेच पुण्यातील बेलबाग मंदिरात ४५ वर्षे सेवा म्हणून पखवाजवादन केले.

पं. घोरपडकरांनी धृपद गायक डागर बंधू, उ. सैफुद्दिन डागर, पं. फाल्गुनी मित्रा, उ. झिया मोइनुद्दिन डागर आणि भरतनाट्यम नर्तिका सुचेता भिडे यांना साथ केली. त्यांच्याकडून मिळालेल्या बंदिशींचा समावेश अनेक कथक नृत्यांगनांनी त्यांच्या कार्यक्रमांमध्ये केला. याशिवाय त्यांनी पखवाज आणि पखवाजवादनातील

घ

बंदिशी या विषयांवर पुणे, मुंबई, गोवा, औरंगाबाद या ठिकाणी सप्रयोग व्याख्यानेही दिली. ख्यालगायनाच्या प्रसारामुळे जशी धृपद गायकी मागे पडली, तसा पखवाजाचाही वापर कमी होऊ लागला. अशा वातावरणात पखवाजाला स्वतंत्र वाद्याचे स्थान मिळवून देण्यात पं. घोरपडकरांनी मोलाची कामगिरी केली आहे.

घोरपडकरांनी पखवाजावर प्रस्तार, रेले, परण (पखवाजातील जोरदार वाजणारी रचना), तिहाई असे प्रकार वाजवून रसिकांना लुब्ध केले. पखवाजावर हाताने ठेका वाजवून वेगवेगळ्या रचनांची पढंत करणे (तोंडाने बोल म्हणणे) हे त्यांचे वैशिष्ट्य होते. पानसे घराण्यातील मात्राभेद परण (समेनंतर अर्ध्या मात्रेच्या फरकाने सुरू होणारे परण) ते वाजवतच; पण त्याशिवाय त्या घराण्यात प्रचलित नसलेल्या श्री गणेश परण, दत्त परण, दुर्गा परण आणि शिव परण या ईशस्तुतिपर परणांची त्यांनी रचना केली.

नानासाहेब पानसे घराण्याच्या समृद्ध परंपरेतील सौंदर्यपूर्ण रचनांचा संग्रह असलेले पं. घोरपडकर हे एक महत्त्वाचे कलाकार होते. घराण्यातील रचनांचे सौंदर्य आणि त्यांच्या साहित्यातील विविधता व श्रीमंती त्यांनी जपली व विद्येचा दर्जा राखला हे पं. वसंत घोरपडकर यांचे पखवाजवादनातील योगदान आहे.

त्यांना इंदूरच्या धृपद कला केंद्राचा ‘नानासाहेब पानसे’ पुरस्कार १९९९ मध्ये मिळाला. त्यानंतर २००५ मध्ये मित्र फाउण्डेशन, पुणे; २००७ मध्ये महात्मा गांधी मिशन, औरंगाबाद; मृदंगज्ञान संस्था, देवाची आळंदी; २००८ मध्ये भारत विश्वज्ञान पीठम्, पुणे, तसेच दिल्ली पब्लिक स्कूल, पुणे या संस्थांतर्फे पखवाजवादनातील तपश्चर्येबद्दल त्यांचा गौरव करण्यात आला. घराणेदार विद्येची अत्यंत निष्ठेने जपणूक करून आपल्याला मिळालेली पखवाजवादनाची कला पुढच्या पिढीपर्यंत पोहोचवण्याचे कार्य पं. वसंत घोरपडकर ६० वर्षांहून अधिक काळ करत होते. त्यांचे वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी पुण्यात निधन झाले

— अरविंद परांजपे

## घोष, पन्नालाल अक्षयकुमार

**बासरीवादक**

**३१ जुलै १९११ – २० एप्रिल १९६०**



पन्नालाल अक्षयकुमार घोष यांचा जन्म बारीसाल (बंगाल) येथील सध्याच्या बांगलादेशातील अमलज्योती या खेड्यात झाला. आई सुकुमारदेवी त्यांना प्रेमाने पन्ना म्हणायची. आजोबा हरकुमार घोष हे धृपदिये आणि पखवाजवादक होते, तर वडील अक्षयकुमार घोष हे व्यवसायाने वकील होते आणि ते सतार वाजवीत. प्रसिद्ध तबलावादक पं. निखिल घोष हे पन्नालाल यांचे धाकटे भाऊ होत.

पन्नालाल घोषांनी सुरुवातीला सतारवादनाचे धडे घेतले. पण असे म्हटले जाते की, गंगाप्रवाहात वाहून आलेली बासरी त्यांच्या हातात आली व हा गंगाप्रसाद समजून ते बासरीवादनाशी एकरूप झाले. या वाद्याची संगीतक्षमता पन्नालाल घोषांनीच प्रथम निदर्शनास आणून दिली. धृपद ख्यालगायनातील आलापासारखे विलंबित विस्तार आणि तंतुवाद्यातील झालासारखे प्रकार त्यांनी आत्मसात केले. परंतु पारंपरिक छोटेखानी, सहा छिद्रांच्या मर्यादा त्यांना जाणवत होत्या.

अविश्रांत परिश्रमाने पन्नालाल यांनी वयाच्या अठराव्या वर्षी ९२ सेंमी. लांबीची व २.६ सेंमी. अंतर्व्यासाची, सात छिद्रांची (फुंकीसह आठ छिद्रांची) बासरी बनविली. त्यामुळे बासरीवादनाची मर्यादा दोन सप्तकांवरून तीन सप्तकांवर गेली.

पन्नालाल घोषांच्या बासरीवादनशैलीवर अनेक थोर संगीततज्ज्ञांचा प्रभाव होता. गुरुदेव टागोर यांच्या रवीन्द्र संगीताचे ते भक्त होते. कलकत्त्यातील न्यू थिएटर्समधील वाद्यवृंदात काम करीत असता त्यांना रामचंद्र बोराल यांचे मार्गदर्शन मिळाले. पं. गिरिजाशंकर चक्रवर्ती या संगीततज्ज्ञांकडून त्यांना

१९३९ साली सांगीतिक शिक्षण आणि दृष्टी लाभली. ते १९३८ साली ‘सराई नृत्यकला मंडळी’सह संगीतकार म्हणून युरोपच्या दौऱ्यावर गेले. अमृतसरच्या खुशी मुहंमद खाँकडून १९३७ साली त्यांना संगीतातील बारकावे अभ्यासायला मिळाले. त्यांची १९४७ मध्ये अल्लाउद्दिन खाँसाहेबांशी गाठ पडली व पन्नालालांनी त्यांचे शिष्यत्व पत्करले.

‘अंजान’ (१९४१), ‘बसंत’ (१९४२), ‘भलाई’, ‘सवाल’ (१९४३), ‘पोलीस’ (१९४४), ‘बीसवीं सदी’ (१९४५), ‘आंदोलन’ (१९५१) हे त्यांनी संगीत दिलेले काही चित्रपट गाजले. ‘मुगल-ए-आझम’, ‘बसंत बहार’ इत्यादी चित्रपटांच्या पार्श्वसंगीतात त्यांच्या बासरीवादनाचा सहभाग आहे.

त्यांनी ‘ऋतुराज’, ‘कलिंग विजय’, ‘आंदोलिका’ या वृंदरचनाही केलेल्या आहेत. याशिवाय त्यांनी चंद्रमौली, नूपुरध्वनी, दीपावली, पुष्पचंद्रिका या रागांची निर्मितीही केली आहे. त्यांच्या शिष्यपरिवारात हरिपद चौधरी, देवेन्द्र मुर्डेश्वर, बी.डी. देसाई, व्ही.जी. कर्नाड, रघुनाथ सेठ, हरिश्चंद्र कोकरे इत्यादी निष्णात बासरीवादकांचा समावेश आहे.

त्यांनी मुंबई ही आपली कर्मभूमी निवडली होती. १९४० च्या सुमारास ते मुंबईला आले. ते १९५६ पर्यंत मुंबईत होते. त्यांची १९५६ साली दिल्ली आकाशवाणीवर वाद्यवृंद संचालक म्हणून नियुक्ती झाली. अखेरपर्यंत ते दिल्लीतच होते.

पन्नालाल बाबू तरुणवयात बंगालमधील मुष्टियोद्धा होते. ते आध्यात्मिक वृत्तीचे होते. त्यांच्या पत्नी पारुल घोष या प्रसिद्ध संगीत दिग्दर्शक अनिल विश्वास यांच्या धाकट्या भगिनी होत. त्या १९३०-४० च्या कालखंडात प्रसिद्ध पार्श्वगायिका होत्या.

आकाशवाणीच्या प्रत्येक केंद्रावरून, तसेच अनेक संगीत संमेलनांमधून पन्नालाल घोषांची बासरी रसिकांपर्यंत पोहोचली आहे. तसेच एच.एम.व्ही.ने प्रसिद्ध केलेली त्यांची ध्वनिमुद्रणे अत्यंत गाजली. पन्नालाल घोष यांचे लोकवाद्य म्हणून दुर्लक्षित राहिलेल्या बासरीवर रागसंगीताचा गंभीर आविष्कार करून या वाद्याला कलासंगीताच्या रंगमंचावर मानाचे स्थान मिळवून देणे हे महत्त्वाचे योगदान होय.

– केशव गिंडे

✻✻✻

# च





## चंदावरकर, भास्कर मंगेश
**संगीत दिग्दर्शक, सतारवादक**
**१६ मार्च १९३६ – २५ जुलै २००९**



बहुआयामी व्यक्तिमत्त्व असणाऱ्या पं. भास्कर चंदावरकर यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांची मावशी सीता माविनकुर्वे (पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्या शिष्या) या गायिका होत्या. तसेच बालवयापासून पुण्यातील सरदार आबासाहेब मुजुमदारांसारख्या संगीतप्रेमीच्या सहवासात आल्याने भास्कर चंदावरकरांच्या संगीतप्रेमास प्रोत्साहन मिळाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण वाडिया महाविद्यालय व फर्गसन महाविद्यालय येथे झाले.

त्यांनी पं. रविशंकर आणि पं. उमाशंकर मिश्र यांच्याकडून सतारवादनाचे शिक्षण घेतले. त्यांनी पाश्चात्त्य संगीताचेही पद्धतशीर शिक्षण घेतले. त्यांनी १९६२-१९७८ आणि १९८५-८६ या काळात भारतात आणि युरोपियन देशांमध्ये आणि ऑस्ट्रेलिया, न्यूझिलंडमध्ये सतारवादनाच्या अनेक मैफली केल्या.

फिल्म अ‍ॅण्ड टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियामध्ये चंदावरकरांनी संगीताचे प्राध्यापक म्हणून १९६५ ते १९८० अशी चौदा वर्षे काम केले. तसेच अहमदाबादची नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ डिझाइन, पंजाब-हरियाणा विद्यापीठ, दिल्लीचे जवाहरलाल नेहरू विद्यापीठ, बंगलोर येथील मॅनेजमेंट इन्स्टिट्यूट या संस्थांमध्ये त्यांनी अतिथी प्राध्यापक म्हणूनही काम केले. अमेरिकेतही अनेक विद्यापीठांमध्ये व्याख्याने, चर्चासत्रे, कार्यशाळा, भारतीय संगीत शिकविणे अशा विविध प्रकारचे सांगीतिक कार्यही त्यांनी केले.

चंदावरकरांनी १९९२ ते १९९९ या काळात पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, जपान अशा विविध देशांत कलाविषयक संस्थांचे सल्लागार म्हणून काम केले. भारत आणि बांगलादेशाच्या सांस्कृतिक धोरण समितीचे सदस्य म्हणूनही त्यांनी या काळात काम केले. बांगलादेशात फोर्ड फाउण्डेशनचे सल्लागार म्हणूनही त्यांनी काम पाहिले. त्यांची १९८९ मध्ये दूरदर्शन व आकाशवाणीने मानद कार्यक्रम निष्पादक म्हणून नियुक्ती केली होती. राष्ट्रीय चित्रपट महोत्सव, अल्मा अटा (किरगिस्तान) येथील जागतिक जॅझ महोत्सव येथे त्यांनी अनेक वेळा परीक्षक म्हणून काम पाहिले.

संगीतकार म्हणून चंदावरकरांची कारकीर्द विशेष लक्षणीय म्हणावी लागेल. मराठी, कन्नड, हिंदी आणि इंग्रजी या भाषांतील अनेक नाटकांना त्यांचे संगीत होते. त्यांनी १९७२ साली संगीत दिलेले ‘घाशीराम कोतवाल’ हे नाटक आणि त्यातील संगीताचा वापर यांचा ठसा मराठी रंगभूमीवर आजही आहे. ‘तीन पैशांचा तमाशा’, ‘ये रे ये रे पावसा’, ‘आषाढ़ का एक दिन’, ‘गिरिबाला’, ‘रामनाम सत है’, ‘जेतेगिरी बेन चंदेरी’ ही त्यांनी संगीत दिलेली काही प्रमुख नाटके होत. तसेच जर्मन भाषेतील ‘नागमंडल’, जपानी भाषेतील ‘मीवा’ या नाटकांनाही त्यांचे संगीत होते.

चंदावरकरांनी सुमारे चाळीस चित्रपटांना संगीत दिले. ‘सामना’ (१९७४), ‘घाशीराम कोतवाल’ (१९७६), ‘सर्वसाक्षी’, ‘चांदोबा चांदोबा भागलास का’ (१९७८), ‘गारंबीचा बापू’ (१९८०), ‘आक्रित’ (१९८१), ‘एक

डाव भुताचा' (१९८२), 'कैरी' (२००२), 'बयो', 'सरीवर सरी' (२००५), 'श्वास' (२००४), 'मातीमाय' (२००६) या मराठी चित्रपटांना, तसेच 'जय जवान जय किसान' (१९७१), 'माया दर्पन' (१९७२), 'जादू का शंख' (१९७४), 'अरविंद देसाई की अजीब दास्तान' (१९७८), 'अल्बर्ट पिंटो को गुस्सा क्यूं आता है' (१९८०), 'हमीदाबाई की कोठी', 'खंडहर' (१९८४), 'परोमा' (अपर्णा सेन कृत, १९८४), 'रावसाहेब' (विजया मेहता कृत, १९८६), 'थोड़ासा रूमानी हो जाए' (अमोल पालेकर कृत, १९९०) या हिंदी चित्रपटांना त्यांचे संगीत होते. 'वंशवृक्ष' (१९७१), 'कनक पुरंदर', 'तब्बलियू नीनदे मगने' (१९७७) या कन्नड, 'स्वप्नादनम' या मल्याळी, 'मायामिरिग' (१९८४) या उडिया आणि 'नाइन अवर्स टू रामा', 'अ लँप इन द निश' या इंग्रजी चित्रपटांना त्यांनी संगीत दिले होते. समांतर नाटक व चित्रपटांच्या चळवळींच्या संदर्भात भास्कर चंदावरकरांचे संगीत दिग्दर्शक म्हणून मोलाचे योगदान आहे.

चंदावरकर कित्येक प्रांगणीय आणि रंगमंचीय प्रस्तुतींचे संचालक होते. 'नक्षत्रांचे देणे' हा काव्य-संगीताचा कार्यक्रम ही त्यांची शब्द-संगीताला दिलेली अनमोल देणगी आहे. तसेच 'स्वप्नकोश' हा बॅले, 'प्रतिमा' नृत्यनाट्य, 'रंगविविधा', 'व्होल्गा ते गंगा' अशी अनेक रंगमंचीय प्रस्तुतीकरणे त्यांनी सादर केली. गणराज्य दिवस (१९८७), सुषिर वाद्य महोत्सव (दिल्ली), चित्रपट शताब्दी महोत्सव (मुंबई, १९९५) असे अनेक कार्यक्रम प्रांगणीय प्रस्तुती म्हणून त्यांनी सादर केले होते.

भास्कर चंदावरकरांचे योगदान महाराष्ट्रातील नवविचारवादी कलेच्या बाबतीत अत्यंत मौलिक असे आहे. त्यांनी विविध नियतकालिकांत संगीतविषयक लेखन केले होते व त्यांच्या पश्चात 'वाद्यवेध व भारतीय संगीताची मूलतत्त्वे' हे त्यांच्या व्याख्यानांवर आधारित पुस्तक प्रकाशित झाले. याशिवाय अनेक लोकांना, 'नीनासम'सारख्या वेगळ्या धर्तीवरील संस्थांमध्ये प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष संगीतविषयक मार्गदर्शन, व्याख्याने असे त्यांचे कार्य तर मोजता-मापता येणार नाही असे होते.

त्यांना १९८८ साली 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार, २००२ साली 'चैत्र' या मराठी लघुपटासाठी 'सर्वोत्कृष्ट संगीतकार' म्हणून 'राष्ट्रीय चित्रपट सन्मान' मिळाला. वयाच्या त्र्याहत्तराव्या वर्षी पुणे येथे त्यांचे निधन झाले.

– डॉ. शुभदा कुलकर्णी

च

## चव्हाण, सुलोचना श्यामराव

**गायिका**

**१३ मार्च १९३३**



सुलोचना श्यामराव चव्हाण यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव सुलोचना महादेव कदम असे होते. त्यांच्या आईचे नाव राधाबाई होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण मराठी चौथीपर्यंत झाले. वयाच्या दहाव्या वर्षी सुलोचना कदम यांचे पहिले गाणे ध्वनिमुद्रित झाले. 'कृष्णसुदामा' या चित्रपटासाठी त्यांनी सर्वप्रथम मराठी गाणे गायले. या चित्रपटाच्या श्यामसुंदर पाठक व भट्टाचार्य या संगीत दिग्दर्शकांच्या जोडीने त्यांना प्रथम गायनाची संधी दिली.

वयाच्या अकराव्या वर्षापासून सुलोचना चव्हाण यांनी पार्श्वगायनास सुरुवात केली. संगीताचे कोणतेही शिक्षण नसताना आवड म्हणून सुलोचना चव्हाण संगीत क्षेत्राकडे वळल्या. कोणत्याही गुरूच्या तालमीत तयार नसलेल्या त्यांच्याकडे देण्यात आलेल्या गाण्याचा परिपूर्ण अभ्यास करून त्या गाण्याचा ताल, शब्द सर्व समजून घ्यायच्या. प्रत्येक तालमीच्या वेळी ते गाणे संगीतकाराकडून समजून घेण्याकडे त्यांचा विशेष कल होता. मराठीबरोबर सुलोचना चव्हाण यांनी अनेक हिंदी, पंजाबी व गुजराती गाणीही म्हटली आहेत.

च

वयाच्या विसाव्या वर्षी त्यांचे कोल्हापूरच्या श्यामराव चव्हाण यांच्याशी लग्न झाले. विशेष म्हणजे श्यामराव यांनाही संगीताची अत्यंत आवड होती व संगीत शिक्षण घेतलेले नसताना कुठले गाणे कसे म्हणायचे, कुठल्या जागी शब्द तोडायचे, गाण्याची तान कशी घ्यायची, याची त्यांना माहिती होती. श्यामराव तबलाही उत्तम वाजवीत. सुलोचना यांना शब्दांचे अर्थ समजून लावणी कशी गायची याचे शिक्षण श्यामराव चव्हाण यांनीच दिले. लावणी गाण्याचे शास्त्रशुद्ध प्रशिक्षण सुलोचना चव्हाण यांनी आपल्या पतीकडूनच घेतले, म्हणूनच आपल्या पतीलाच त्या गुरू मानत.

सुलोचना चव्हाण यांनी १९६२ मध्ये ‘रंगल्या रात्री’ या चित्रपटासाठी पहिली लावणी गायली. ती जगदीश खेबूडकर यांनी लिहिली होती व वसंत पवार यांनी संगीत दिले होते. ‘नाव गाव कशाला पुसता अहो मी आहे कोल्हापूरची, मला हो म्हणतात लवंगी मिरची’ या लावणीनंतर सुलोचना यांचे सर्व आयुष्यच बदलून गेले.

या लावणीनंतर मात्र त्यांनी ‘खेळताना रंग बाई होळीचा’, ‘पदरावरती जरतारीचा मोर नाचरा हवा’, ‘सोळावं वरीस धोक्याचं’, ‘फड सांभाळ तुऱ्याला ग आला’, ‘राग नका धरू सजना’, ‘पाडाला पिकला आंबा’, ‘लाडे लाडे बाई करू नका’, अशा एकापेक्षा एक ठसकेबाज लावण्या गायल्या.

सुलोचना चव्हाण यांनी स्वतःला समाजकार्यातही झोकून दिले आहे. कार्यक्रमातून मिळणाऱ्या मानधनातील मोठा हिस्सा त्या धार्मिक संस्थांसाठी किंवा एखाद्यासाठी मदतनिधी उभा करण्यासाठी वापरतात, तसेच कार्यक्रम व पुरस्कारांतून मिळणाऱ्या रकमेचा काही हिस्सा गरजूंपर्यंत पोहोचविण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे.

सुलोचना यांनी लावणीमधला ठसका व रुबाब बरोबर समजून घेतला आणि काही वर्षांतच त्या लावणीच्या अनभिषिक्त सम्राज्ञी बनल्या. आचार्य अत्रे यांनी सर्वप्रथम दिलेली ‘लावणी सम्राज्ञी’ ही उपाधी त्यांनी आयुष्यभर सांभाळली.

सुलोचना यांचा मोठा मुलगा जय याचे काही वर्षांपूर्वी निधन झाले. त्यांचा दुसरा मुलगा विजय उत्कृष्ट ढोलकी व तबलावादक आहे.

प्रेमनाथ, एस.एन. त्रिपाठी, अविनाश व्यास, चित्रगुप्त, वसंत देसाई, मोतीराम, सोनिक ओमी, के. दत्ता, प्रेमचंद प्रकाश अशा जुन्या जमान्यातील संगीतकारांच्या चित्रपटांत त्यांनी गाणी गायली आहेत. ‘मल्हारी मार्तंड’साठी मिळालेला सर्वोत्कृष्ट लावणी गायिकेचा सन्मान, ‘पी. सावळाराम-गंगा जमना’ पुरस्कार आणि राज्यशासनामार्फत २०१० या वर्षासाठी संगीत क्षेत्रातील अत्यंत मानाचा समजला जाणारा ‘गानसम्राज्ञी लता मंगेशकर’ पुरस्कार त्यांना मिळाला आहे. लावणीचा बाज आणि त्याची लोकप्रियता सुलोचना यांच्यामुळे टिकून राहिली आहे असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. सुलोचना चव्हाण यांनी ‘माझे गाणे माझे जगणे’ हे आत्मचरित्र लिहिले असून लावणीच्या संदर्भातील अनेक आठवणी त्यांत आहेत.

— वर्षा फडके-आंधळे

**संदर्भ** :

१. *‘अस्सल लावणी सम्राज्ञी’; दै. ‘लोकसत्ता’, चतुरंग पुरवणी; ३० ऑक्टोबर २०१०.*

२. *साप्ताहिक ‘मार्मिक’; १७ ऑक्टोबर २०१०.*

## चाफेकर, वामनबुवा

**गायक**

**१८७९ – १८ डिसेंबर १९६४**

ग्वाल्हेर घराण्याचे गायक वामनबुवा चाफेकर हे मिरजेचे होते. घरी अत्यंत गरिबी होती. वडील गावात येणाऱ्या हरिदासांच्या मागे टाळ धरून साथ करीत. यातून होणाऱ्या प्राप्तीतच ते चरितार्थ चालवीत. ही मिळकत संपली की वडील, आई दोघेही माधुकरी मागत.

वामनबुवा चाफेकरांना अत्यंत सुरेल व मधुर आवाजाची देणगी होती. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण



कागवाडकरीण नावाच्या गायिकेकडे झाले. या बाईंकडे ख्यालाबरोबरच धृपद धमारही होते. त्यांच्याकडून चाफेकरांना अनेक बंदिशी मिळाल्या. वयाच्या ९–१० वर्षापासून बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांकडे त्यांचे शिक्षण सुरू झाले. बाळकृष्णबुवांकडून त्यांनी अनेक वर्षे तालीम घेतली. बाळकृष्णबुवा १८९६ साली मिरज सोडून इचलकरंजीला गेले. दर वर्षी चार-पाच महिने चाफेकर इचलकरंजीला शिकण्याकरिता जात असत. बाळकृष्णबुवांकडून काही ठुमऱ्यादेखील ते शिकले.

वामनबुवा चाफेकरांची स्मरणशक्ती अतिशय तीव्र होती. ते ९–१० वर्षांपूर्वी त्यांच्याकडून घेतलेली एखादी चीज पाठात यत्किंचितही फरक न करता म्हणून दाखवत असत. चाफेकरांना चाळीस-पन्नास राग येत. पण दुसऱ्या गायकांच्या चिजाही ते लक्षपूर्वक ऐकून गात असत. याशिवाय ते ऐकूनऐकून नाट्यपदेही गात.

वामनबुवा चाफेकरांची गायकी ग्वाल्हेर वळणाचीच होती. आलाप, बोलतान आणि तान या तिन्ही अंगांना ते योग्य महत्त्व देऊन गात. रागाचे वातावरण ते तत्काल उभे करीत. त्यांची बोलतान लालित्यपूर्ण असे. लयकारीवर प्रभुत्व, तानेतील सहजता व हृदयाला भिडणारा अत्यंत सुरेलपणा हे त्यांचे विशेष होते. तिलवाडा ताल त्यांना अत्यंत प्रिय होता.

उ.अब्दुल करीम खाँ साहेबांना चाफेकरांचे गाणे फार आवडत असे. बाबासाहेब मिरजकरांच्या एका समारंभात १९३४–३५ च्या सुमारास वामनबुवा चाफेकरांच्या गाण्यानंतर अब्दुल करीम खाँचे गाणे होते. मैफलीत वामनबुवा चाफेकरांच्या गाण्याचा एवढा प्रभाव होता, की करीम खाँनी १५-२० मिनिटांतच गाणे बंद केले व सांगितले की, ‘‘वामनबुवांच्या गाण्याचा माझ्या मनावर इतका असर झाला आहे, की माझे गाणे मला सुचत नाही.’’ यावरून चाफेकरांच्या गायकीची महत्ता लक्षात येते.

गगनबावड्याचे राजे माधवराव पंत यांनी दरबारी गवई म्हणून वामनबुवा चाफेकरांची नियुक्ती केली होती. तसेच बाबासाहेब मिरजकरांनीही त्यांना किल्ल्यातील सरकारी माधोजीच्या देवळात गाण्याची नोकरी दिली. मिरज संस्थानचे दरबारी गवई म्हणूनही ते राहिले. मुंबई आकाशवाणीवर त्यांचे तीन वेळा गाणे झाले. महाराष्ट्र शासनातर्फे त्यांना दोन वेळा पाचशे रुपयांचे अनुदान मिळाले होते.

वामनबुवा चाफेकरांना लहानपणापासून मेंदूच्या विकृतीचा एक विचित्र आजार होता. विशेष म्हणजे थोडेसे सुखाचे दिवस आले, की हा आजार डोके वर काढत असे. तीन–चार महिने हा वेडाचा पगडा राहत असे. क्वचित त्यांना इस्पितळामध्येही दाखल करावे लागे. त्यामुळे त्यांचे जीवन काहीसे अस्थिर होते. त्यांच्या आई-वडिलांच्या मृत्यूनंतर चाफेकरांना त्यांच्या थोरल्या भगिनीने सांभाळले. मात्र, या बहिणीच्या मृत्यूनंतर जवळजवळ ३५ वर्षे त्यांनी एकट्यानेच जीवन व्यतीत केले.

बा. रं. देवधरांनी चाफेकरांकडून बऱ्याच चिजा घेतल्या. देवधरांना त्यांच्याबद्दल अतिशय आदर होता. देवधरांनी त्यांना बरीच मदतही केली. प्रा. ना.र. मारुलकरांनीही त्यांच्याकडून बऱ्याच बंदिशी शिकून घेतल्या.

आयुष्यात समाधानकारक चरितार्थ चालावा असा पैसा चाफेकरांना कधीच मिळाला नाही. शेवटपर्यंत त्यांनी गरिबीत आयुष्य काढले, मात्र ते मनाने समाधानी होते. ‘‘शापित गंधर्वाचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे वामनबुवा चाफेकर,’’ असे बा. रं. देवधर म्हणत. वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी वामनबुवांचे निधन झाले.

– डॉ. सुधा पटवर्धन, माधव इमारते

## चिमोटे, मनोहर
**संवादिनीवादक**
**२७ मार्च १९२९ – ९ सप्टेंबर २०१२**



मनोहर चिमोटे यांचा जन्म संगीताची रुची असणाऱ्या कुटुंबात नागपूर येथे झाला. त्यांना पं. भीष्मदेव वेदींचे मार्गदर्शन अगदी थोडा काळ मिळाले; मात्र त्यांनी आपल्या आकलनशक्तीद्वारे 'संवादिनी' या वाद्यावर पकड मिळवली. कुँवरश्याम परंपरेतील गायक लक्ष्मणप्रसाद जयपूरवाले यांच्याकडेही ते शिकले. चिमोटे हे काही काळ गायनास साथ करत असत. त्यांनी बडे गुलाम अली खाँ, आमीर खाँ, सलामत नझाकत अली खाँ, सिद्धेश्वरी देवी अशा नामवंत कलाकारांना साथ केली होती. मात्र संवादिनीवादकास त्या काळी मिळणारी दुय्यम वागणूक त्यांच्या स्वाभिमानी स्वभावाला अपमानास्पद वाटू लागली. पुढे त्यांनी साथीदार ही भूमिका सोडून दिली व संवादिनीच्या एकलवादनासाठी प्रयत्न केले.

भीष्मदेव वेदींनी संवादिनीला तारांची जोड देऊन 'सूरदर्पण' हे वाद्य तयार केले होते. चिमोटे यांनी १९७० साली या 'सूरदर्पण'मध्ये अजून काही सुधारणा करून तिला 'सूरमनोहर' असे नाव दिले. मात्र पुढे १९७२ साली हार्मोनिअमला स्वरमंडलची जोड देऊन त्यांनी जी हार्मोनिअम बनवली, तिला 'संवादिनी' असे नाव देऊन त्यांनी प्रसिद्ध केले. आज हार्मोनिअमसाठी 'संवादिनी' हा शब्द सरसकटपणे वापरला जातो, त्याचे श्रेय चिमोटे यांना जाते.

त्यांनी संवादिनीवादनासाठी ख्याल गायकीचा साचा अंगीकारला व गायनाच्या जवळ जाणारे वादन केले. त्यांच्या वादनावर उ. आमीर खाँ यांच्या गायकीचा मोठा परिणाम झाला. त्यांनी ख्यालाप्रमाणे बढत करून तंत अंगाने 'झाला' वाजवण्याचे तंत्र आत्मसात केले. पुण्याचा सवाई गंधर्व महोत्सव (१९६९), मुंबईचा सुरेशबाबू-हिराबाई समारोह (१९९४), गांधर्व महाविद्यालय, पुणे (१९९५), कोलकाता येथील संगीत रिसर्च अकादमी, मुंबई, बेळगाव इ. ठिकाणची संवादिनी संमेलने, 'स्पीक मॅके' अशा मंचांवरून त्यांनी एकल संवादिनीवादनाचे कार्यक्रम केले. श्रीधर पार्सेकर (व्हायोलिन), गोविंदराव पटवर्धन (संवादिनी), शाहिद परवेझ (सतार) व रोणू मुजुमदार (बासरी) अशा वादकांबरोबर त्यांनी जुगलबंदीचेही कार्यक्रम केले.

विरार येथे स्थायिक झाल्यावर त्यांनी आपले संगीत शिक्षण वर्ग मुंबईत गोरेगाव येथे सुरू केले व संवादिनीबरोबरच ते गायन, तबला व सतारही शिकवू लागले. त्यांच्या शिष्यांत प्रमोद मराठे, राजेंद्र वैशंपायन, जितेंद्र गोरे, भानू जोशी, संजय गहलोत, शारंगधर साठे, अमित दिवाडकर हे मुख्य आहेत. तसेच साधना सरगम, वैशाली सामंत, माधुरी करमरकर, माया माटेगावकर या त्यांच्या गायनातील विद्यार्थिनी होत. त्यांच्या शिष्यांनी 'संवादिनी फाउण्डेशन'तर्फे या वाद्याचा प्रसार करण्याचे कार्य चालवले आहे.

मुंबईच्या सुरसिंगार संसदतर्फे 'सुरमणि' हा किताब, गांधर्व महाविद्यालयाचा 'आदर्श संगीत शिक्षक' पुरस्कार (१९९५), 'महाराष्ट्र राज्य सरकार गौरव' पुरस्कार, 'वर्तक अवॉर्ड', गानवर्धनतर्फे 'स्व. लीलाबाई जळगावकर' पुरस्कार (२००९) इ. पुरस्कारांनी त्यांना गौरविण्यात आले आहे. वयाच्या ८३व्या वर्षी मुंबईत त्यांचे निधन झाले.

– चैतन्य कुंटे

## चौधरी, रवींद्रशंकर श्यामशंकर
☛ *रविशंकर*

## चौरसिया, हरिप्रसाद छेदीलाल
**बासरीवादक**
**१ जुलै १९३८**

हरिप्रसाद छेदीलाल चौरसिया यांचा जन्म उत्तर प्रदेशातील अलाहाबाद येथे झाला. त्यांचे वडील पट्टीचे



कुस्तीगीर होते व त्यांना आपल्या मुलांनी आपल्यासारखेच कुस्तीगीर व्हावे असे वाटत असे. परंतु कुस्तीक्षेत्रात हरिप्रसाद कधीच रमले नाहीत.

छेदीलालजींच्या घरात त्या वेळी पंडित राजाराम भाड्याने राहत होते. त्यांनी हरिप्रसादना गाणे शिकविण्याची तयारी दर्शविली. अशा तऱ्हेने ते हरिप्रसादांचे गायन क्षेत्रातले पहिले गुरू झाले.

आवाज फुटण्याच्या वयात हरिप्रसाद गायन सोडून बासरीवादनाकडे वळले. बासरीवादनाचे प्राथमिक धडे न घेता, नैसर्गिक सहजतेने ते बासरीवर गीत-भजन-धुना वाजवू लागले.

वयाच्या सोळाव्या वर्षी त्यांना प्रथमच प्रत्यक्षपणे रसिकांसमोर बासरीवादन करण्याची संधी मिळाली. आणि हरिप्रसाद यांनी या संधीचे सोने केले. गुलाम जिलानी या वाद्यविक्रेत्याने हरिप्रसादना ह्या बासरीवादनाचे बक्षीस म्हणून 'पांढरी पाच' सुरातील बासरी प्रदान केली.

पंडित भोलानाथजी हे हरिप्रसादजींना बासरीतील पहिले गुरू लाभले. पंडित भोलानाथ हे अलाहाबाद आकाशवाणी केंद्रावर कार्यरत होते. दोघांच्या वयात खूप अंतर नव्हते, तसेच भोलानाथजी संसारी नसल्यामुळे दोघे एकत्र राहू लागले. भोलानाथ आकाशवाणीतून काम संपवून येत आणि मग हरिप्रसादना बासरी शिकवत.

हरिप्रसादजींनी १९५७ साली आकाशवाणीवर पहिली संगीत चाचणी परीक्षा दिली आणि 'ऑल इंडिया रेडिओ', कटक, ओरिसा येथे त्यांची नोकरी सुरू झाली. आकाशवाणीवर ते सकाळी सहा ते अकरा आणि नंतर संध्याकाळी पाच ते नऊ अशा दोन वेळा काम करत. दुपारच्या फावल्या वेळात त्यांचे तासन्‌तास, बंद स्टूडिओत बासरीवादन चाले.

त्यांची १९६२ साली मुंबईला बदली झाली आणि इथूनच त्यांच्या प्रवासाला आणि खऱ्या कारकिर्दीला सुरुवात झाली. मुंबईला येताच त्यांनी मुंबईच्या चित्रपटसृष्टीवर आपल्या बासरीचा मोहक ठसा उमटविला. सगळ्याच संगीतकारांकडे त्यांनी बासरीवादन केले. हरिप्रसादजींना बऱ्यापैकी पैसाही मिळू लागला. त्यांनी १९६५ साली आकाशवाणीतील नोकरीचा राजीनामा दिला.

च

एक संगीतकार म्हणूनही त्यांनी चित्रपटसृष्टीत काम केले. '२७ डाउन' हा त्यांनी संगीत दिलेला पहिला चित्रपट असला, तरी नंतर त्यांनी शिवकुमार शर्मा यांच्यासह 'शिव-हरी' या नावाने सिलसिला, चांदनी, लम्हे, डर, विजय, साहेबा इ. अनेक चित्रपटांना संगीत दिले व ते विलक्षण जनप्रियही झाले.

हरिजींनी १९६८ सालापासून अन्नपूर्णादेवी यांच्याकडून मैहर-सेनिया घराण्याची तंतकारी वादनपद्धतीची तालीम घेतली. तत्पूर्वी ते ख्यालगायनास अनुसरून वादन करीत, मात्र हरिप्रसादजींचे शास्त्रीय संगीतातले अतिशय मोठे योगदान म्हणजे बासरीतून तंतुवाद्यासारखे आलाप, जोड आणि झाला वाजविण्याची तंत्रपद्धत हे होय. त्यांनी इंदिराकल्याण, हरिप्रिया, प्रभातेश्वरी, कलारंजनी, मधुमल्हार इ. रागांची निर्मिती केली. त्यांच्या सर्वांगपरिपूर्ण अशा बासरीवादनामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय ख्याती प्राप्त झाली.

पाश्चिमात्य संगीताबरोबर भारतीय (हिंदुस्थानी) शास्त्रीय संगीताचा मेळ करून, त्यांचा अप्रतिम संगम (फ्यूजन) त्यांनी जगविख्यात यहुदी मेन्युइन, जॉर्ज हॅरिसन, हेन्री ट्युनिए, जॉन मॅक्लोग्लिन इत्यादी संगीतकारांसमवेत घडविला. पं. रविशंकरांच्या अनेक संगीतप्रकल्पांत ते वादक म्हणून सहभागी होते.

हरिजींनी २००२ साली मुंबई येथे गुरुशिष्य परंपरेला पुढे नेणारे 'वृंदावन गुरुकुल' सुरू केले. मल्हारराव कुलकर्णी, रमाकांत पाटील, देवप्रिया व शुचिस्मिता चॅटर्जी, समीर राव, सुनील अवचट अशा शिष्यांसह हरिजींचा शिष्यपरिवार फ्रान्स, जर्मनी, जपान, अमेरिका

अशा अनेक देशांत कार्यरत आहे. ‘रॉटरडॅम कॉन्झर्व्हेटोरिअम ऑफ म्यूझिक’मध्ये भारतीय संगीत विभागाचे ते प्रमुख आहेत.

हरिप्रसादजींच्या सुमारे पाचशे ध्वनिमुद्रिका उपलब्ध आहेत. ‘कॉल ऑफ द व्हॅली’, ‘सृष्टी’, ‘मुक्ती’, ‘रीव्हर्स’, ‘नथिंग बट द विंड’, इ. ध्वनिमुद्रिका खूप गाजल्या. त्यांना ‘संगीत नाटक अकादमी’, ‘महाराष्ट्र गौरव’ पुरस्कार, ‘कालिदास सन्मान’, ‘पद्मभूषण’, ‘पद्मविभूषण’ आणि ‘मास्टर दीनानाथ मंगेशकर’, तसेच २०१० मध्ये फ्रेंच सरकारचा सर्वोच्च नागरी सन्मान असे अनेक सन्मान प्राप्त झाले आहेत.

– रूपक कुलकर्णी

(शब्दांकन : उज्ज्वला संजीव)

✻✻✻






## छोटा गंधर्व
***गोरे, सौदागर नागनाथ***
**गायक, गायकनट, संगीतकार**
**१० मार्च १९१८ – ३१ डिसेंबर १९९७**



सौदागर नागनाथ गोरे म्हणजेच ‘छोटा गंधर्व’ यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील भाडळे या गावी झाला. त्यांनी १९२८ साली दामुअण्णा जोशी यांच्या बालमोहन नाटक कंपनीत नाटकातून भूमिका करण्यास सुरुवात केली. संगीत ‘प्राणप्रतिष्ठा’ आणि संगीत ‘स्वर्गावर स्वारी’ अशी ती दोन नाटके होती. जेमतेम दहा वर्षे वयाच्या सौदागरची गाणी त्या वेळी खूपच गाजली.

मराठी नाट्यसंमेलनात १९२९ साली शंकराचार्य डॉक्टर कूर्तकोटी यांच्या हस्ते सौदागरचा सत्कार झाला आणि त्याला ‘स्वरकिन्नर’ अशी पदवी दिली गेली. यानंतर बालमोहन कंपनीच्या प्रत्येक नाटकात सौदागरला प्रमुख स्त्री-पात्राची भूमिका मिळत गेली. यांमध्ये ‘संशयकल्लोळ’, ‘माझा देश’, ‘स्वर्गावर स्वारी’, ‘मूर्तिमंत सैतान’, तसेच त्यानंतरच्या काळात आचार्य अत्रे यांची ‘साष्टांग नमस्कार’, ‘लग्नाची बेडी’, ‘वंदे मातरम्’ यांसारखी अनेक नाटके होती.

त्यांनी १९४३ मध्ये ‘बालमोहन’मधून बाहेर पडून अन्य सहकारी कलाकारांसमवेत ‘कलाविकास मंडळी’ची स्थापना केली. ‘मैलाचा दगड’, ‘फुलपाखरे’, ‘गुणी बाळे’ अशी अनेक नाटके या ‘कलाविकास’ने सादर केली. मात्र सर्वांत जास्त प्रसिद्धी ज्याला मिळाली ते नाटक म्हणजे ‘देवमाणूस’. यातली पदे छोटा गंधर्वांनीच रचली होती आणि चालीही त्यांनीच दिल्या होत्या. ‘दिलरुबा मधुर हा’, ‘चांद माझा हा हासरा’, ‘सुखवीत या संसारा’, ‘छळी जीवा दैवगती’ अशी त्या नाटकातील काही प्रसिद्ध गीते होती, जी अजूनही रसिकांच्या कानांत आणि गायकांच्या ओठांवर आहेत.

‘कलाविकास’ १९४९ मध्ये बंद पडली आणि कंपनीचे कर्ज फेडण्याची जबाबदारी प्रामुख्याने छोटा गंधर्वांवरच पडली. त्यांनी त्यातूनच १९५० पासून इतर विविध नाटक मंडळींच्या नाटकांत रोजंदारी पद्धतीने कामे करायला सुरुवात केली. मात्र ही नाटके म्हणजे प्रामुख्याने किर्लोस्कर आणि गंधर्व नाटक मंडळींनी गाजवलेली नाटके होती जसे की, ‘सौभद्र’, ‘मानापमान’, ‘विद्याहरण’, ‘संशयकल्लोळ’ वगैरे. त्यांनी १९५७ मध्ये स्वतःची ‘छोटा गंधर्व कन्सर्न्स’ ही संस्था स्थापन केली आणि हीच नाटके त्यांनी हाती घेतली. यांतल्या त्यांच्या भूमिका आणि त्यांचे गायन यांना इतकी अफाट लोकप्रियता लाभली, की नाटकाच्या प्रयोगाची तिकीटविक्री सुरू झाली की तासाभरात सगळी तिकिटे संपायची.

त्यांनी १९६० साली ‘सुवर्णतुला’ या नाटकासाठी चाली दिल्या आणि त्यात नारदाची भूमिकासुद्धा केली. ‘पठ्ठे बापूराव’, ‘रंगल्या रात्री अशा’, ‘पुढारी’ या मराठी चित्रपटांसाठी त्यांनी पार्श्वगायनही केले. त्यांनी १९७८ साली त्यांचे गायन भरात असूनही संगीत रंगभूमीवरून मानाने निवृत्ती स्वीकारली. त्यानंतर त्यांनी गायनाच्या मैफलींवर लक्ष केंद्रित केले, तसेच १९८८ साली लंडनचा दौराही केला. छोटा गंधर्व यांचा लौकिक संगीत रंगभूमीवरील गायकनट म्हणून जास्त होता हे जरी खरे

असले, तरी ते कसलेले ख्यालगायक होते. बागलकोटकर, गोवित्रीकरबुवा, नरहरबुवा पाटणकर, सवाई गंधर्व, भुर्जी खाँ यांसारख्या गायकांकडून त्यांनी ख्यालगायकीचे शिक्षण घेतले होते. त्याचबरोबर सिंदे खाँ या अवलिया गायकाकडून त्यांनी रागरागिण्यांचे अमाप भांडार प्राप्त केले होते. उपजत मधुर, लडिवाळ आवाज, कुशाग्र बुद्धिमत्ता, जास्तीतजास्त विद्या मिळविण्याचा हव्यास आणि अमाप कष्ट या भांडवलावर त्यांनी आपली स्वतःची आगळीवेगळी आणि आकर्षक गायनशैली बनविली होती.



ग्वाल्हेर, जयपूर आणि आग्रा यांसारख्या घराण्यांच्या शैलींचा त्यांच्या गायनात मिलाफ होता, शिवाय या गायनाला त्यांचा स्वतःचा रंग होता. प्रचलित, तसेच अनवट रागांचा भरणा, शिस्तबद्ध तरीही रंगतदार आलापी, बढत, लयकारी, तीनही सप्तकांत सहज फिरणारा आवाज आणि कोणत्याही लयीत अफाट फिरणारी तान या गोष्टींमुळे त्यांचे गाणे वेगळे आणि रंजक असायचे.

कर्नाटक संगीतातले वाचस्पती, वागधीश्वरी, शुद्धरसाळी, जनसंमोहिनी यांसारखे अनेक राग त्यांनी उत्तर हिंदुस्थानी गायनशैलीत प्रचलित केले. त्याचबरोबर नंदबसंत, भुवनेश्वरी, चंद्रशेखर, गुनकंस, बसंतकोश, मालतीकोश यांसारख्या स्व-निर्मित रागांनी हिंदुस्थानी रागसंगीताच्या खजिन्यात मोलाची भर टाकली. ख्यालगायकीसाठी त्यांनी अनेक बंदिशींची रचना केली. सुरुवातीला या बंदिशींमध्ये त्यांनी 'गुणरंग' हे टोपणनाव म्हणून धारण केले होते. मात्र स्वतः आध्यात्मिक वृत्तीचे असल्याने, तशाच काही तात्त्विक विचारसरणीने त्यांनी हे नाव नंतर वगळले.

ख्यालगायनाबरोबरच, उपशास्त्रीय गायन प्रकारातील ठुमरी, दादरा, कजरी, झूला, फाग, सावन यांसारख्या प्रकारांचा मोठा साठा त्यांच्याकडे होता आणि अतिशय रसाळ पद्धतीने ते त्यांचे गायन करीत. तराणे ते सर्रास असे गात नव्हते. फरमाइशी तराणे, म्हणजे ज्यांचा अंतरा हा काही फारसी ओळींमधून बनलेला असतो, त्यांचे गायन ते करीत. मात्र त्या फारसी ओळींचा अर्थ ते स्वतः समजून घेत आणि श्रोत्यांनाही सांगत. जुन्या ढंगाची बैठकीची लावणीही ते उत्तम गात. तसेच ते खास मराठी अभंग गायनाच्याही मैफली करत.

ख्यालगायकीतही चिजा गाताना त्या अर्थपूर्ण असल्याच पाहिजेत या गोष्टीवर त्यांचा कटाक्ष होता. त्यामुळे अनेक प्रसिद्ध बंदिशींचे मूळ अर्थपूर्ण शब्द त्यांनी प्रयासाने मिळवले आणि मगच त्यांचा समावेश आपल्या गायनात केला. यासाठी ब्रज, भोजपुरी, उर्दू आदी भाषांचा त्यांनी खास अभ्यास केला. संतकवींच्या अनेक रचना त्यांनी स्वरबद्ध केल्या आणि ते अत्यंत भक्तिभावाने त्या आपल्या कार्यक्रमात सादर करीत. ठुमरी-दादरा किंवा नाट्यपद गात असताना मूर्च्छनाभेद या अद्‌भुत क्रियेतून ते षड्ज बदलून गाण्याचा आभास करीत आणि सामान्य श्रोत्यांबरोबरच जाणकारांनासुद्धा चक्रावून टाकत.

छोटा गंधर्व यांना निसर्गदत्त अशा गोड आवाजाची देणगी तर होतीच; पण त्यांनी जाणीवपूर्वक इतर कलाकारांच्या गायनशैलींचा आणि आवाजांचा अभ्यास केला आणि मग स्वतःचा वेगळा असा आवाज बनवला. ते बालगंधर्व आणि उस्ताद अब्दुल करीम खाँ यांना आदर्श मानत. वझेबुवा, मास्टर दीनानाथ मंगेशकर, बडे गुलाम अली खाँ, विलायत हुसेन खाँ, मास्तर कृष्णराव यांसारख्या ख्यालगायनातील धुरंधरांचे गाणे त्यांनी आपल्या कानांत साठवले.

जुन्या जमान्यातील मौजुद्दीन खाँ, मलकाजान, गोहरजान, सुंदराबाई, जानकीबाई, प्यारासाहेब यांसारख्या अनेक गायक आणि गायिकांच्या ध्वनिमुद्रिकांचाही त्यांनी डोळसपणे अभ्यास केला आणि त्यांतील उत्तमोत्तम तत्त्वे आपल्या स्वतःच्या शैलीत, आपल्या गायकीतून मांडली. समकालीन कलाकारांबाबत कधीही त्यांच्या तोंडून अनुद्‌गार बाहेर पडले नाहीत. उलट जे त्यांना चांगले वाटत, अशा अनेकांच्या बाबतीत ते फार प्रेमाने आणि आदराने बोलायचे. ते मितभाषी नक्कीच होते; पण जे काही

थोडेसेच बोलायचे, ते अत्यंत मार्मिक आणि बोधप्रद असायचे. त्यांनी संस्कृतचाही व्यासंग केला होता व काही संस्कृत काव्य, स्तोत्रांची रचनाही केली होती.

‘स्वरराज’ आणि ‘छोटा गंधर्व’ ही नामाभिधाने त्यांना रसिक श्रोत्यांकडूनच मिळाली होती. ‘संगीत अकादमी’ पुरस्कार (१९९०), ‘विष्णुदास भावे पुरस्कार’ व मराठी नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद (१९८०), महाराष्ट्र सरकारचा ‘महाराष्ट्र गौरव’ पुरस्कार (१९९२) वगैरेंमधून त्यांचा यथोचित गौरव झाला. ‘पुणे भारत गायन समाजा’चे ते अनेक वर्षे अध्यक्ष होते. शिवाय छोटा गंधर्व यांच्या नावाने अनेक संस्थांनी पुरस्कारसुद्धा ठेवले आहेत.

छोटा गंधर्वांच्या एकुलत्या एक पुत्राचे अपघाती निधन त्यांच्या उतारवयात झाले. त्यांची १९९७ नंतर प्रकृती खालावतच गेली होती आणि पुणे येथे त्यांचे दुःखद निधन झाले.

– विश्वनाथ ओक

***

छ

# ज





## जसराज
**गायक**
**२८ जानेवारी १९३०**



पंडित जसराज यांचा जन्म हरियाणा राज्यातील हिस्सार जिल्ह्यामध्ये, पिली मंडोरी येथे झाला. त्यांचे वडील पं. मोतीरामजी आणि काका पं. ज्योतिरामजी हे दोघेही गायक होते. पंडितजींना आणि त्यांच्या आठही भावंडांना वारशाने संगीतकला प्राप्त झाली. त्यांच्या वयाच्या पाचव्या वर्षीच पितृछत्र हरपले. पंडित जसराज यांनी जगविख्यात गायक म्हणून स्वत:ची ओळख निर्माण केली तरी सुरुवातीची चौदा वर्षे त्यांनी प्रतापनारायणजी म्हणजे आपल्या बंधूंकडे तबलावादनाचे धडे गिरवले.

तबलावादनातील त्यांच्या कौशल्यामुळे मोठे बंधू पं. मणिरामजी यांच्या सोबत ते साथीला जात असत. अशातच एका कार्यक्रमादरम्यान त्यांना दुय्यम वागणूक मिळाली आणि या घटनेने इतिहास घडवला. पंडितजींनी तबलावादन सोडून गायक होण्याचा निर्धार केला. आणि पं. मणिरामजींकडून हिंदुस्थानी रागसंगीताची तालीम घेण्यास प्रारंभ केला. त्यांच्याकडून उ. घग्गे नझीर खाँ साहेब यांनी स्थापन केलेल्या मेवाती घराण्याचे संस्कार तर जसराजजींना मिळालेच; पण अनेक रागरागिण्या आणि बंदिशींचा खजिनाही मिळाला.

पंडितजींनी आग्रा घराण्याच्या स्वामी वल्लभदास यांच्याकडून थोड्या कालावधीसाठी संगीताचे शिक्षण घेतले. साणंद येथील महाराजा जयवंतसिंहजी वाघेला यांच्याकडून पंडितजींवर संगीताचे संस्कार झाले, तसेच आध्यात्मिक संस्कारही खोलवर रुजले. त्यांना संगीताकडे पाहण्याची नवी दृष्टी मिळाली. सुरुवातीच्या शालेय शिक्षणानंतर त्यांना सोम तिवारी यांचे मोलाचे मार्गदर्शन लाभले. कालांतराने त्यांनी श्याम मनोहर गोस्वामी यांच्याकडून हवेली संगीताचे शिक्षण घेतले.

पंडितजींनी वयाच्या एकविसाव्या वर्षी म्हणजे १९५१ साली कलकत्ता आकाशवाणी केंद्रामध्ये सर्वप्रथम पंधरा मिनिटे मुलतानी राग सादर केला. त्यांनी पहिला जाहीर कार्यक्रम २० जून १९५२ रोजी काठमांडू येथे केला. या कार्यक्रमाला मिळालेला प्रतिसाद आणि नेपाळच्या राजाने पाच हजार मोहरा देऊन केलेले कौतुक यांमुळे कलोपासना आणि चरितार्थाकरिता केवळ संगीत हेच माध्यम निश्चित झाले. आणि पुढे हिंदुस्थानी रागसंगीतातील क्षेत्रात त्यांनी अढळपद प्राप्त केले.

लयकारीयुक्त आलाप, सरगम, मींड, गमक यांच्या आधारे रागाची लालित्यपूर्ण बढत, बंदिशींचे सुस्पष्ट शब्दोच्चार, तीनही सप्तकांत लीलया विहार करणारा भावपूर्ण स्वर या मेवाती घराण्याच्या वैशिष्ट्यांना पंडितजींनी स्वत:च्या खास शैलीने आणि प्रतिभेने उच्च दर्जा प्राप्त करून दिला.

पंडितजींचे वास्तव्य अनेक ठिकाणी असल्यामुळे त्यांना हिंदी, मराठी, गुजराती, मारवाडी, तेलुगू, बंगाली, इंग्रजी अशा अनेक भाषा अवगत झाल्या. मुंबई येथील कंठसंगीताला असलेले महत्त्व लक्षात घेऊन ते मुंबईला स्थायिक झाले. अनेक भाषांचे ज्ञान आणि उपजत असलेल्या काव्यरसग्रहणाच्या गुणामुळे आजपर्यंत शंभराहून अधिक बंदिशींची रचना त्यांनी केली आहे. त्यांनी रचना केलेल्या बंदिशींपैकी ‘तुम पर

वारी जाऊँ मैं' (रामकली), 'मेरी अंखियन की'(गुजरी तोडी), 'तुम बिन कैसे कटे रतियाँ' (जोग), 'अब ना मोहे समझाओ तुम' (बैरागी), 'बरखा ऋतु आई' (धुलिया-मल्हार), 'जब से छब देखी' (नटनारायण) अशा काही बंदिशी अतिशय रसिकप्रिय आहेत. मधुरा भक्तिरसपूर्ण अशा रचनांमुळे त्यांना 'आचार्य जियालाल वसंत वाग्गेयकार' पुरस्काराने गौरविण्यात आले. त्यांनी हवेली संगीतातही अनेक रचना केल्या. पंडितजी मैफलींमधून पारंपरिक बंदिशींप्रमाणेच काही वेळा आदिशंकराचार्य, वल्लभाचार्य, चैतन्य महाप्रभू यांच्या संस्कृत रचनांचा समावेश करताना दिसतात.

पंडित जसराज यांनी १९६० साली झालेल्या पहिल्या आकाशवाणी संगीत संमेलनात आपल्या गायनाने रसिकांना मंत्रमुग्ध केले. पंडितजींचा १९६२ साली चित्रपटसृष्टीतील दिग्गज निर्माता-दिग्दर्शक चित्रपती व्ही. शांताराम यांची कन्या मधुरा यांच्याशी विवाह झाला.

देशविदेशांत कार्यक्रम करत असताना हिंदुस्थानी संगीताच्या व्यासंगातून आणि साधनेतून 'जसरंगी जुगलबंदी' या अनोख्या जुगलबंदीचा परिचय जसराजजींनी संगीतप्रेमींना करून दिला. शास्त्रीय संगीतातील 'मूर्च्छना' या तत्त्वावर आधारित या जुगलबंदीमध्ये स्त्री आणि पुरुष गायकांनी आपले सूर जुळवून घेण्याऐवजी आपापल्या नैसर्गिक सुरांमध्ये षड्ज-मध्यम वा षड्ज-पंचम संवादाच्या आधारे रागगायन करून जुगलबंदी सादर करावयाची असते.

सवाई गंधर्व, तानसेन फेस्टिव्हल, श्री हरिदास संगीत महोत्सव, तसेच वडिलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ हैदराबाद इथे होणारा पं. मोतीराम संगीत महोत्सव या आणि अशा अनेक संगीत महोत्सवांमध्ये पं. जसराज यांचे गायन आवर्जून होते. अशा काही मैफलींचे ध्वनिमुद्रण ध्वनिमुद्रिकांच्या रूपात आजही आपल्याला ऐकायला मिळते. मारवा, शंकरा, देस, भटीयार, मधमाद सारंग, बागेश्वरी, धुलिया मल्हार, दरबारी कानडा, बैरागी भैरव(म्यूझिक टुडे), बिहागडा गौड गौरी-मल्हार(सोनी) याशिवाय 'महेश्वर मंत्र', 'इन्स्पिरेशन', 'दरबार', 'तपस्या', 'उपासना' अशा ध्वनिमुद्रिकाही उपलब्ध आहेत.

पंडित जसराज यांना मिळालेला कलेचा वारसा त्यांचा मुलगा शारंगदेव (संगीतकार) आणि दुर्गा जसराज (दूरदर्शन कलाकार) यांनाही मिळाला आहे. त्याचप्रमाणे मेवाती घराण्याचा वारसा त्यांचे अनेक यशस्वी वादक-गायक शिष्यगण पुढे नेत आहेत. संजीव अभ्यंकर, रतन मोहन शर्मा, श्वेता झव्हेरी, कृष्णकांत पारिख, साधना सरगम (घाणेकर), पद्मजा फेणाणी-जोगळेकर, सौगत बॅनर्जी, गिरीश वझलवार, चंद्रशेखर स्वामी तसेच डॉ. अरविंद थत्ते (हार्मोनिअम) व कला रामनाथ (व्हायोलिन) या शिष्यांचा विशेष नामोल्लेख करावा लागतो.

केवळ भारतातच नाही, तर आंतरराष्ट्रीय स्तरावरही जसराज यांनी हिंदुस्थानी संगीताचा प्रसार केला. १९९० साली त्यांनी कॅनडामधील व्हॅंकुव्हर येथे पं. जसराज स्कूल ऑफ म्यूझिक फाउण्डेशनची संकल्पना प्रथम प्रत्यक्षात आणली. आता अमेरिकेत ॲटलांटा व न्यू जर्सीमध्ये टँपा येथील त्यांच्या संगीतशाळांत संगीतशिक्षणाचे काम सुरू आहे. या कामामध्ये जसराज यांच्या शिष्यांचाही मोठा वाटा आहे.

जसराज यांनी १९६६ साली वसंत देसाई यांनी संगीत दिलेल्या 'लड़की सह्याद्री की' या चित्रपटासाठी पार्श्वगायन केले. याशिवाय 'बिरबल माय ब्रदर' (संगीत : शाम प्रभाकर), '१९२०' (संगीत : अदनान सामी) या चित्रपटांत, तसेच स्वत: जसराज यांच्या पत्नीने दिग्दर्शित केलेल्या 'आई तुझा आशीर्वाद' (संगीत : मयुरेश पै) या मराठी चित्रपटामध्ये पार्श्वगायन केले.

पं. जसराज यांनी मेवाती घराण्याची वैशिष्ट्ये गायकीमध्ये साकारताना तीव्र ग्रहणशक्तीने आणि सखोल स्वरविचारांनी प्रत्येक रागाच्या विस्ताराला, रागाच्या अभिव्यक्तीला वलयांकित केले. सहजसुंदर मृदू आवाजाने अधिक समृद्ध केले. पंडितजी मैफलीची सुरुवात 'ओम अनंता हरी नारायण' या श्लोकाने करतात. ज्या रागाचे सादरीकरण होणार आहे त्या रागामध्ये बांधलेला हा श्लोक त्या रागाचे संपूर्ण

चित्र ऐकणाऱ्यांच्या मनांत उभे करतो. प्रत्येक रागातील स्वरांचे परस्परबंध, त्या रागातील सुरांविषयी विचारधारा अत्यंत घुमारदार, सहजस्वरांत श्रोत्यांच्या मनांपर्यंत पोहोचवण्याचे कसब जसराज यांच्या गायकीमध्ये आहे.

अन्य सांगीतिक घराण्यांतील समकालीन मातब्बर गायक-गायिकांमध्ये पंडित जसराज यांनी स्वत:चे स्थान निर्माण केले. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीतातील व्यापक अशा योगदानासाठी त्यांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित केले आहे. हरियाणा सरकारने त्यांना 'संगीत मार्तंड', बंगाल सरकारने 'सुरेर गुरू', मध्यप्रदेश सरकारने 'संगीत कला रत्न', तर उत्तर प्रदेश सरकारने 'स्वामी हरिदास संगीत रत्न' अशा उपाधींनी त्यांना गौरवले आहे.

याशिवाय अतिशय महत्त्वाचे असे 'पद्मश्री' (१९७५), 'पद्मभूषण' (१९९०), 'पद्मविभूषण' (२०००), 'संगीत नाटक अकॅडमी' पुरस्कार (१९८७), 'राजीव गांधी' पुरस्कार, 'कालिदास सन्मान' (१९९७-९८), 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, 'पं. दीनानाथ मंगेशकर' पुरस्कार, 'उ. हाफीज अली खाँ' पुरस्कार, 'स्वाती संगीत पुरस्कारम्' (२००८), 'जायंट्स इंटरनॅशनल' अवॉर्ड, 'अमेरिकन अकॅडमी ऑफ आर्टिस्ट' अवॉर्ड, 'डिस्टिंग्विश्ड व्हिजिटर' अवॉर्ड हे पुरस्कार त्यांना मिळाले आहेत.

पंडित जसराज यांच्या पत्नी मधुरा जसराज यांनी २००९ साली पंडितजींचा जीवनप्रवास उलगडून दाखवणाऱ्या 'संगीत मार्तंड पंडित जसराज' या लघुपटाची निर्मिती केली.

— नेहा वैशंपायन

**संदर्भ :**

१. *'संगीत कला विहार'*, पद्मविभूषण विशेषांक.
२. *संकेतस्थळ :* www.panditjasraj.com

## जळगावकर, अप्पा

☛ *जळगावकर, सखाराम प्रभाकर*

## जळगावकर, सखाराम प्रभाकर

***जळगावकर, अप्पा***

**हार्मोनिअमवादक**

**४ एप्रिल १९२२ — १७ सप्टेंबर २००९**



मराठवाड्यातील जालना जिल्ह्यातील जळगाव या छोट्या गावी, एका भिक्षुक घराण्यात सखाराम प्रभाकर ऊर्फ अप्पासाहेब जळगावकरांचा जन्म झाला. वडिलांच्या अकाली निधनामुळे ते दोन वर्षांचे असताना आईने त्यांना गावातीलच प्रभाकरबुवांना दत्तक दिले. प्रभाकरबुवांच्या मठात जालन्याचे कीर्तनकार बाळकृष्णबुवा चिखलीकर येत असत. त्यांच्यामागे गाण्याची साथ अप्पा ९-१० वर्षांचे असताना करू लागले. जालन्याच्या शाळेत शिक्षणाचे उर्दू माध्यम असल्याने त्यांना वडिलांनी शाळेतून काढले, त्यामुळे त्यांचे शालेय शिक्षण जेमतेम पाचवीपर्यंत होऊन थांबले. मग चिखलीकरबुवांबरोबर जालन्याला येऊन अप्पा प्रथम थोडे धृपद, मग काही जलद चिजा शिकले.

तेव्हा गावातल्या मेळ्यांमध्येही अप्पा गात असत. पण पुढे आवाज फुटल्यावर हातात हार्मोनिअम आली. हार्मोनिअमचे शिक्षण अप्पांनी कुणाकडे घेतली नाही; पण सूरतालाची उपजत जाण व थोडे शिक्षण यांच्या बळावर ते कीर्तन-भजनाला साथ करू लागले. अमरावतीचे तानरस घराण्याचे गवैये शब्बू खाँ हे १९४४ च्या सुमारास काही काळ जालन्यास स्थायिक होते, त्यांच्याकडेही अप्पा साथ करत शिकले. भीमसेन जोशींच्या पत्नी वत्सलाबाई मुधोळकर याही तेव्हा शब्बू खाँकडे शिकत असत.

शब्बू खाँ यांनीच अप्पांना पुण्या-मुंबईसारख्या शहरांत जाण्याबद्दल प्रोत्साहन दिले. त्या दरम्यान तर्कतीर्थ महादेवशास्त्री जोशी यांची मेहुणी, उत्तम कीर्तनकार मथुताई फडके जालन्याला आल्या होत्या.

त्यांच्या कीर्तनास अप्पांनी साथ केल्यावर त्या खूष झाल्या. त्यांनी अप्पांना पुण्यात जाण्याविषयी सांगून त्यांची २-३ महिन्यांची तेथे राहण्याची सोयही केली.

अप्पा जळगावकर १९४६ साली पुण्यास आले. काही काळ त्यांनी ब्रास बॅण्डमध्ये क्लॅरिओनेटवादक म्हणूनही काम केले. शब्बू खाँचे मेहुणे रमझान खाँ तेव्हा पुण्यातल्या कोठ्यांवर सारंगी वाजवत. त्यांच्या ओळखीने अप्पांनी कोठ्यांवरील बायकांनाही साथ केली. इथेच अप्पांना मैफलीत पटकन आपला रंग जमवण्याचे तंत्र गवसले असावे. शिवाय ठुमरी-दादरा, लावणीची साथ करण्यातला ढंगदारपणाही मिळाला.

हळूहळू पुण्यातील संगीत क्षेत्राशी त्यांचा परिचय होऊ लागला. मग माणिक वर्मा, विमल वाकडे, गंगूबाई हनगल अशा कलाकारांना ते साथ करू लागले. कथक नृत्यांगना रोहिणी भाटे यांच्याकडे अप्पा नृत्याच्या साथीसाठी जाऊ लागले. पुण्यातल्या तेव्हाच्या होतकरू गायिका, हिराबाई बडोदेकरांच्या शिष्या लीला मुधोळकर यांच्याशी १९५७ साली त्यांचा विवाह झाला.

गायनास पोषक अशी साथ, आकर्षकपणा, वादनातील आसयुक्त सलगता, वैविध्य, लडिवाळपणा, खास करून ठुमरीतला नखरा यांमुळे त्यांची साथ अनेक कलाकारांस प्रिय होती. अनेक बुजुर्ग गायक, नृत्यकलाकारांना व तबलावादनाला नगम्याची संगत करून ते 'रंगतदार हार्मोनिअमवादक' म्हणून प्रसिद्ध झाले.

अप्पा जळगावकर यांनी साथसंगत केलेल्या कलाकारांत हिराबाई बडोदेकर, रोशनआरा बेगम, मोगूबाई कुर्डीकर, कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, किशोरी आमोणकर, जसराज, गंगूबाई हनगल, माणिक वर्मा, बसवराज राजगुरू, वसंतराव देशपांडे, प्रभा अत्रे, परवीन सुलताना, मालिनी राजूरकर, प्रभाकर कारेकर, आरती अंकलीकर, संजीव अभ्यंकर, जयतीर्थ मेवुंडी असा मोठा कालपट आहे. अहमदजान थिरकवा, निजामुद्दिन खाँ, हबीबुद्दिन खाँ, किशन महाराज, सामताप्रसाद, अल्लारखा खाँ, झाकिर हुसैन अशा मातब्बर तबलावादकांसाठी व बिरजू महाराजांसारख्या कथक नर्तकांना त्यांनी केलेली नगम्याची साथही गाजली. अप्पांनी साथसंगतीच्या निमित्ताने देशातच नव्हे, तर परदेशांतही अनेक दौरे केले व एकल हार्मोनिअमवादनही केले.

भीमसेन जोशी यांच्याशी अप्पांच्या साथीचे सूर दीर्घ काळ जुळले. सवाई गंधर्व महोत्सवात त्यांनी एकल हार्मोनिअमवादनही सादर करून वाहवा मिळवली होती. 'सूर गवसलेली साथ' हे भारत गजेंद्रगडकर यांनी संपादित केलेले आत्मचरित्रवजा पुस्तक २००६ साली प्रसिद्ध झाले. अनेक अनुभवांचे व आठवणींचे भंडार यात आहे.

त्यांनी १९७० च्या सुमारास एकल हार्मोनिअमवादनास सुरुवात केली व आपली स्वत:ची अशी शैली सादर केली. ते बा.गं. आचरेकरांनी बनवलेली श्रुति-हार्मोनिअम वाजवत असत. मींडेचा आभास निर्माण करून ते गाण्याला जवळ जाणारे वादन करत. मंजूळपणा व गोडवा हा खास अप्पांच्या वादनातील स्वरविशेष आहे. त्यांना 'संगतकार' पुरस्कार (१९९७), 'आय.टी.सी.' पुरस्कार (१९९९), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (२०००), 'महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक' पुरस्कार (२००१), कै. विठ्ठलराव कोरगावकर स्मृतिनिमित्त पहिला 'संवादिनी साधक' पुरस्कार (२००३) हे सन्मान व गानवर्धन संस्थेकडून 'स्वर-लय-रत्न' (१९९३) ही उपाधीही प्राप्त झाली होती.

अखेरीच्या काळात अर्धांगवायूच्या झटक्यामुळे त्यांची डावी बाजू निकामी झाली होती, तरीही ते भाता मारण्यासाठी शिष्यास बसवून जिद्दीने वादन करत होते. त्यांच्या पत्नीच्या नावाने 'स्व. लीलाताई जळगावकर स्मृती पुरस्कार' हा श्रेष्ठ हार्मोनिअमवादकांस देण्यात येतो. हार्मोनिअम या वाद्यास मैफलीत मानाचे स्थान मिळवून देणाऱ्या अप्पा जळगावकरांचे पुणे येथे निधन झाले.

— चैतन्य कुंटे

ज

## जाधव, लक्ष्मीबाई

**गायिका**

**१५ सप्टेंबर १९०२ - ५ मार्च १९६५**



लक्ष्मीबाई जाधव यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव यशोदाबाई होते. बालपणीच माता-पित्याचे छत्र हरपल्यामुळे त्यांच्या मावशीनेच त्यांचे पालनपोषण केले. लक्ष्मीबाईंचा आवाज अत्यंत नाजूक व गोड होता. मावशीच्या पतिराजांना गाण्याचा शौक होता. त्यांनी लक्ष्मीबाईंना चांगला गुरू मिळावा म्हणून खूप धडपड केली. लक्ष्मीबाईंनी १९१७ साली अल्लादिया खाँ साहेबांचे बंधू हैदर खाँ यांचा गंडा बांधला. दुर्दैवाने ऐन तारुण्यातच त्यांना गंडमाळेचा आजार झाला. शस्त्रक्रिया झाल्यावर त्यांनी पुन्हा गाण्याची मेहनत सुरू केली. हैदर खाँकडून १९३० पर्यंत त्यांना तालीम मिळाली. नंतर उ. अल्लादिया खाँ व त्यांचे पुत्र भूर्जी खाँ यांच्याकडूनही त्यांना मार्गदर्शन मिळत राहिले.

लक्ष्मीबाईंच्या गाण्यात आम व अनवट रागांची सहजसुंदर पेशकश, सूक्ष्म लयकारी, दाणेदार ताना व सर्वांत महत्त्वाचे म्हणजे उत्तम बोलतान ही वैशिष्ट्ये होती. लक्ष्मीबाईंनी शास्त्रग्रंथांचा अभ्यास करून आपली दृष्टी व्यापक केली होती. त्यांच्या गुरुभगिनी मोगूबाई यांच्याशी त्यांचे सौहार्दपूर्ण सांगीतिक संबंध होते. ख्यालाखेरीज ठुमरी, गझल, भावगीत, भजन हे प्रकारही त्या उत्तम गात. त्यांनी अनेक द्रुत बंदिशी, दादऱ्यांच्या रचना केल्या होत्या. 'सारे छंद सोड कन्हैया' अशी त्यांनी गायलेली काही भावगीते त्या काळी गाजली होती.

लक्ष्मीबाई १९२२ पासून ते १९४५ पर्यंत बडोदा दरबारात दरबार गायिका म्हणून होत्या. याबद्दलची एक कथा अशी सांगितली जाते. सयाजीराव निद्रानाशाच्या विकाराने ग्रासले असता, त्यांना स्वस्थ झोप लागावी म्हणून बऱ्याच गायक-वादकांना अंगाई गीत गाण्यावाजवण्याकरिता बोलावण्यात आले, परंतु कोणालाच यात यश आले नाही. लक्ष्मीबाई मात्र यात यशस्वी झाल्या. अर्थात दुसऱ्या दिवशी दरबार गायिका म्हणून त्यांची नेमणूक झाली. सयाजीरावांनी त्यांना भरजरी वस्त्रे, अलंकार देऊन त्यांचा यथोचित सन्मान केला, तसेच दरबारात येण्याकरिता बग्गीही दिली. बडोद्यातील त्यांच्या कारकिर्दीमुळे त्या काळात 'लक्ष्मीबाई बडोदेकर' या नावानेही त्या ओळखल्या जात.

बडोद्यात त्यांना धन, प्रसिद्धी आणि मानसन्मानही मिळाले. बडोद्यात आणि बाहेरही बनारस, कलकत्ता, इ. ठिकाणी गाण्याकरिता त्यांना निमंत्रणे मिळत गेली. बडोदा दरबारामध्ये वर्षातून चार महिने रजा मिळे. या काळात त्यांनी भारतात अनेक ठिकाणी गायनाचे कार्यक्रम केले. प्रयागच्या संगीत परिषदेतही त्या गाजल्या. शंकराचार्य डॉक्टर कूर्तकोटींनी लक्ष्मीबाईंना 'संगीत चंद्रिका' ही पदवी दिली.

लक्ष्मीबाईंचा आवाज अत्यंत सुरेल व गोड होता. ख्यालाबरोबरच त्या ठुमरीही गात. एच.एम.व्ही आणि यंग इंडिया कंपनीनेही त्यांच्या जवळजवळ ५० ध्वनिमुद्रिका काढल्या. आकाशवाणी, मुंबई व पुणे केंद्रांवरूनही त्यांचे कार्यक्रम प्रसारित झाले.

लक्ष्मीबाई जाधवांनी कोल्हापुरातील स्वतःचे घर आणि बरीचशी संपत्ती शाळा आणि रुग्णालयाला दान दिली. कोल्हापूर विद्यापीठालाही त्यांच्या उदारतेचा लाभ झाला. धारवाड विद्यापीठात संगीत अध्यापनासाठी त्या काही काळ कार्यरत होत्या. धोंडूताई कुलकर्णी या त्यांच्या प्रमुख शिष्या होत. तसेच मल्लिकार्जुन मन्सूर यांनीही त्यांच्याकडून काही बंदिशींचे मार्गदर्शन घेतले होते.

कलावंतांच्या जगात वावरणाऱ्या लक्ष्मीबाई आचारविचारांत अत्यंत सुसंस्कृत होत्या. १९४५ नंतर त्यांचे वास्तव्य कोल्हापुरात होते. वयाच्या साठाव्या वर्षाच्या पूर्वार्धापर्यंत त्यांनी गायनाला पूर्ण वाहून घेतले

होते. त्यांना पोटशुळाची व्यथा होती; पण शस्त्रक्रिया केली तर गाणे जाईल, म्हणून उपचार न करता ही व्यथा घेऊनच त्या गात राहिल्या. शेवटी या आजारातच त्यांचा अंत झाला.

— माधव इमारते

## जाधव, सिद्राम भीमण्णा

**सुंद्रीवादक**

**२१ जून १९२२ - ४ फेब्रुवारी १९९१**



सिद्राम भीमण्णा जाधव यांचा जन्म सोलापूर जवळील अहिरवाडी या गावात झाला. त्यांचे वडील शेतमजुरी सोबतच टोपले विणण्याचा व्यवसाय करीत असत. त्यांच्या आईचे नाव बायव्वा होते. तीसुद्धा शेतीच्या अनुषंगाने येणाऱ्या कामात मदत करीत असे. सिद्राम जाधव अशिक्षित होते. सिद्राम जाधवांचे पणजोबा परसप्पा जाधव, आजोबा लक्ष्मण जाधव व वडील भीमण्णा जाधव हे तिघेही सनईवादनाचे काम करीत. त्यांच्यापैकी भीमण्णा हे सुरसनईदेखील वाजवत असत.

सिद्राम जाधवांचे बंधू बाबूराव आणि लक्ष्मण जाधव हे सनईसोबतच ताशा, ढोल, स्वरपेटी वाजवत. गावात लग्नसमारंभ, बारसे व धार्मिक कार्यांत वाजंत्रीवादनाचे काम या घराण्याकडे परंपरेने चालत आले होते. त्या काळी वाजंत्रीवादनाच्या कामाला प्रतिष्ठा नव्हती. त्यामुळे शिंदीच्या झाडाच्या फोकांपासून टोपल्या विणण्याचे काम हा त्यांचा पोट भरण्याचा व्यवसाय होता.

भीमण्णा जाधवांच्या मृत्यूनंतर घरची जबाबदारी सिद्राम जाधवांचे मोठे बंधू बाबूराव यांच्यावर आली. बाबूरावांना १९२८ च्या दरम्यान खेळण्यांच्या दुकानात एक लाकडाचे पिपाणीसदृश खेळणे सापडले. तीन छिद्रे असलेल्या या पिपाणीला बाबूरावांनी आणखी पाच छिद्रे पाडली. सर्व छिद्रांचे स्वरमेलन (ट्यूनिंग) होण्यासाठी त्यांनी या सुषीरवाद्याला पावी जोडून वाजवून बघितले. या वाद्याचा आवाज मधुर होता. सुरुवातीला सोलापूरकरांनी या वाद्याचे नाव ‘बॉबीन’ असे ठेवले. बॉबीन म्हणजे धागा गुंडाळण्यासाठी पुठ्ठ्याची अथवा प्लॅस्टिकची पोकळ नळी होय. यंत्रमाग किंवा हातमागावर कापड विणण्यासाठी ही बॉबीन वापरतात. या बॉबीनशी रोजी-रोटीचा संबंध असल्याने हेच नाव या वाद्याला दिले गेले.

अक्कलकोट संस्थानचे राजे फत्तेहसिंह यांच्या राज्यारोहणाच्या कार्यक्रमात २७ फेब्रुवारी १९३६ रोजी बाबूरावांच्या या वाद्याच्या सुमधुर आवाजाने महाराज खूपच प्रभावित झाले व त्यांनी ‘सुंदर, सुंदर’ असे उद्‌गार काढले. इतक्या सुंदर वाद्याचे नाव सुंदरच असले पाहिजे म्हणून त्याचे नाव ‘सुंदरी’/‘सुंद्री’ असे ठेवले गेले. ज्या मिलमध्ये बाबूराव जाधव काम करायचे, त्या मिलच्या मालकांनी याबद्दल त्यांचा सत्कार केला. राजस्थानातील ‘नाफिरी’, कर्नाटकातील ‘मुखवीण’, दक्षिणेकडील नादस्वरम या वाद्यांचे स्वरूप, साज आणि सूर सुंद्रीसारखेच आहेत. अकरा इंच लांबीच्या सुंद्रीची निर्मितिप्रक्रिया सनईप्रमाणेच असते. ती खैराच्या किंवा शिसमाच्या लाकडापासून बनवतात. या वाद्याला वरच्या बाजूस आठ स्वररंध्रे व खालच्या बाजूला एक स्वररंध्र असे एकूण नऊ स्वररंध्रे असतात.

बाबूराव जाधवांच्या देहावसानानंतर सिद्राम जाधवांनी सुंद्रीवादनाचे काम पुढे नेले. त्यांचे भाऊ लक्ष्मण जाधव हे त्यांना तबल्यावर साथ करीत असत. सुंद्रीवादनात विशेष प्रावीण्य मिळवलेल्या सिद्राम जाधवांचे नाव सोलापूरच्या सांगीतिक क्षेत्रातही प्रसिद्ध झाले.

एकदा सोलापूरमध्ये हिराबाई बडोदेकरांच्या बैठकीपूर्वी सिद्राम जाधवांच्या सुंद्रीवादनाचे स्वर त्यांच्या कानांवर पडले आणि बाहेर बसूनच सुंद्री ऐकण्याचा हिराबाईंनी आग्रह धरला. शेवटी आयोजकांनी व स्वत: हिराबाईंनी बैठकीत सिद्राम जाधवांना सुंद्री वाजवण्यास

सांगितले. पुढे हिराबाईंच्या सांगण्यावरून लक्ष्मण व सिद्राम या बंधुद्वयांनी मुंबई आकाशवाणीची ऑडिशन दिली. त्यात त्यांना ‘अ’ हा दर्जा मिळाला. आकाशवाणीच्या निमित्ताने या बंधुद्वयांचे भारतभर सुंद्रीवादनाचे कार्यक्रम झाले. भारताचे पहिले पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांच्या हस्ते १९५४ साली चांदीचा चषक देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. इंदिरा गांधी १९८० साली तुळजापूरला देवीच्या दर्शनासाठी आल्या असता, त्यांनी सिद्राम जाधवांचे सुंद्रीवादन ऐकले व त्यांना ‘सुंद्रीसम्राट’ या पदवीने सन्मानित केले.

आकाशवाणीवरून व बीबीसी (लंडन) या वाहिनीवरून सिद्राम जाधवांचे सुंद्रीवादन प्रसारित झाले. बाबूराव व सिद्राम जाधवांच्या सुंद्रीवादनाच्या ध्वनिफिती एचएमव्ही कंपनीने काढल्या होत्या. यात तिलक कामोद, भूप, मालकंस, पहाडी, यमन, बागेश्री व भैरवी या रागांचा समावेश केला आहे. सिद्राम जाधवांनी आपल्या मुलांना दिलेला सुंद्रीवादनाचा वारसा चिदानंद जाधव यांनी विशेष करून जपला. आज चिदानंद जाधवांची मुले म्हणजेच सिद्राम जाधवांचे नातू गुरुनाथ, गोरखनाथ व भीमण्णा हा वारसा समर्थपणे पुढे नेत आहेत.

सिद्राम जाधवांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कुटुंबीयांनी सिद्राम जाधव सांस्कृतिक कला मंडळाची स्थापना केली. भारत सरकारच्या पर्यटन आणि सांस्कृतिक मंत्रालयाच्या सहयोगाने ‘सुंद्री’ या वाद्याविषयीचे चर्चासत्र व प्रशिक्षण कार्यशाळा घेऊन सुंद्री सर्वांपर्यंत पोहोचवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. या वाद्याच्या प्रचारार्थ www.sundarivadya.org हे भारत सरकारच्या वतीने संकेतस्थळ उपलब्ध करून दिले आहे.

— भीमण्णा जाधव

## जाधव, सुंदराबाई
### गायिका
### १८८५ – ३ जून १९५२

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात लावणी, ठुमरी, गझलचा बाज रुजवणाऱ्या, भावगीतांच्या प्रवर्तक



असलेल्या, बहुरंगी गायनशैली असणाऱ्या गायिका म्हणून बाई सुंदराबाई जाधव यांचा आदरपूर्वक उल्लेख केला जातो. मूळच्या साताऱ्याकडच्या असणाऱ्या सुंदराबाईंची गायन कारकीर्द पुण्यात सुरू झाली. दाभाडे गोंधळींकडून त्या लावणी शिकल्या, शंकरभैया घोरपडकरांकडून ख्याल शिकल्या. मुंबईत गिरगावातील राममंदिरातील कनौजी ठाकूरदासबुवांकडून त्या उत्तरेतील ठुमरी, भजने शिकल्या. इंदूरच्या वास्तव्यात गम्मन खाँ, गुलाम रसूल खाँ यांच्याकडून त्या ठुमरी व गझलचा उर्दू-हिंदी ढंग शिकल्या. त्या काळात सुंदराबाईंनी गायकीत हे सर्व गानप्रकार व त्या योगे येणारे अलंकरण, लगाव, भावदर्शन, उच्चारण, ढंग आत्मसात केले.

काहीसे स्थूल शरीर, रूप बेताचेच, सावळा वर्ण; पण उपजत विचक्षण बुद्धी व प्रखर धारणाशक्तीमुळे सुंदराबाईंनी आपले स्थान निर्माण केले. टिपेचा, परंतु अत्यंत भरदार, जव्हारीदार आवाज, अतीव सुरेलता, स्वरांचे सूक्ष्म दर्जे आणि रेखीव हरकती-मुरक्या यांमुळे सुंदराबाईंचे गाणे श्रुतिमनोहर वाटे. त्यांच्याकडे नाना रागतालांचा भरणा नव्हता; पण जे होते ते अस्सल, चोख आणि पूर्ण पक्के होते.

सुंदराबाईंच्या स्वरशब्दांच्या उच्चारणात लयांगाच्या सूक्ष्म अवधानाची जाणीव होते. गाताना योग्य तेथे थांबून जो भावपरिणाम होतो, त्याची बरोबरी हजार बिकट तानांनी होणार नाही या तत्त्वाची सूक्ष्म, तारतम्ययुक्त जाण त्यांना होती, त्यामुळे त्यांच्या गायनातील विरामही बोलके असत.

ठसकेदार गावे, पण सूरतालाशी धक्काबुक्की शत्रुवत समजावी हे रंजकतेचे आद्यतत्त्व त्यांनी हस्तगत केले होते. सर्वच गानप्रकार त्या सहजतेने पेश करत. बनारस, हैद्राबाद, कलकत्ता असे चोहीकडून त्यांना जलशाचे निमंत्रण यायचे. गायनाचार्य भास्करबुवा

बखले, बालगंधर्व, विष्णूपंत पागनीस हेही त्यांच्या गायकीवर लुब्ध होते.

एच.एम.व्ही., ओडियन, रीगल, कोलंबिया, यंग इंडिया या ध्वनिमुद्रण कंपन्यांसाठी सुंदराबाई जाधव यांनी ख्याल, ठुमरी, दादरा, होरी, लावणी, गझल, कव्वाली, भावगीते या प्रकारांची ध्वनिमुद्रणे केली. सुरुवातीच्या काळातील त्यांच्या ध्वनिमुद्रिकांतील गायनाच्या शेवटी त्यांची 'सुंदराबाई ऑफ पूना' अशी उद्घोषणा असे. त्यांच्या ध्वनिमुद्रिकांची संख्या सुमारे ७५ (१५० गीते) आहे. या ध्वनिमुद्रिकांच्या विलक्षण खप व लोकप्रियतेमुळे एच.एम.व्ही.ने त्यांना विशेष सुवर्णपदक देऊन गौरविले होते.

'एरी माँ मोरा मन हर लीनो' (भीमपलास), 'अत मन भाये' (कामोद), 'तू सांई सब का दाता' (दुर्गा), 'कुंजबन में सखी' (यमन) या ख्यालांच्या ध्वनिमुद्रिका; 'तुम्ही माझे सावकार', 'कठीण बडोद्याची चाकरी', 'खूण बाळपणात', 'सखे नयन कुरंग', 'ऐकुनी दर्द आले डोळ्याला पाणी', 'कुठवर पाहू वाट' अशा खास लावण्या त्यांनी ध्वनिमुद्रिकांसाठी गायल्या. 'भोळे ते नेत्र खुळे', 'देवा मी बाळ तुझे', 'तुझ्याविण गोपगोपींना' अशी भावगीते त्या स्वत: चाली लावून गायल्या. 'कौन तऱ्हा से तुम खेलत', 'कान्हा मुखसे न बोले', 'पिया गये परदेस', 'बारी उमर लरकैया', 'नाही परे मैंको चैन', 'ना कभी सुख मन पायो', 'मतवारे तोरे नैना' या ठुमरी, दादरा, होरींमधील भावविभोरता; 'कत्ल मुझे कर डाला', 'मानूंगी न हरगिज' या गझलांतील नर्म शृंगार, आर्तता; 'ये गं ये गं गाई' या शिशुगीतातील मुग्धता, 'राधेकृष्ण बोल मुख से', 'मथुरा न सही', 'भुवन पधारे प्रभू', 'वनवासी राम माझा' अशा भजनांतील समर्पणभाव त्यांच्या गायनातून प्रतीत होतो.

सुंदराबाईंच्या मधुर गायकीचा परिणाम १९१७-१८ साली बालगंधर्वांवर झाला होता असे म्हणतात. बालगंधर्वांनी आपल्या या मानलेल्या बहिणीस १९२० साली 'एकच प्याला' नाटकाकरिता चाली देण्यासाठी पाचारण केले व सुंदराबाईंनी आपल्या संग्रहातून उत्तम चाली काढून दिल्या. त्यांतील 'कशी या त्यजू पदाला' (दिल बेकरार तूने), 'सत्य वदे वचनाला' (कत्ल मुझे कर डाला), 'दयाछाया घे' (पिया मनसे बिसार ना), 'प्रभु अजि गमला' ही पदे फारच लोकप्रिय झाली. प्रभात फिल्म कंपनीच्या 'माणूस' या चित्रपटातील (१९३९, हिंदीत 'आदमी') त्यांची भूमिका व मास्तर कृष्णरावांच्या संगीत दिग्दर्शनाखाली गायलेली 'तोड मोहजाल' आणि 'मन पापी भूला' ही गाणी अविस्मरणीय आहेत. त्यांनी 'संगम' (१९४१) याही चित्रपटात भूमिका करून दादा चांदेकरांच्या संगीत दिग्दर्शनाखाली गीते गायली होती.

बाई सुंदराबाई जाधव यांनी गायनावर अमाप यश, कीर्ती, पैसा मिळविला. बोरीबंदर येथे एका इमारतीचा अख्खा मजला व दोन मोटारी त्यांनी स्वत: विकत घेतल्या होत्या. आकाशवाणीवर गायिका म्हणून त्यांनी भरपूर लौकिक कमवला. 'नवभारत रेकॉर्ड कंपनी' या ग्रामोफोन कंपनीच्या कारभारात त्यांना मोठा आर्थिक फटका बसला, सारे वैभव लयास गेले व त्यांच्यावर एका छोट्या खोलीत राहण्याची वेळ आली. त्यांच्या एकुलत्या एका मुलीच्या अकाली निधनाने त्या खचल्या. या अखेरच्या काळात मुंबई आकाशवाणीवर केंद्रप्रमुख झेड.एच. बुखारी यांनी सुंदराबाईंना मानद सल्लागाराचे पद देऊन मदत केली. कुमुदिनी पेडणेकरांसारख्या मोजक्या गायिकांनी त्यांच्याकडून गाण्याचे शिक्षणही घेतले. सुंदराबाईंचे मुंबईत निधन झाले.

— डॉ. शुभदा कुलकर्णी, चैतन्य कुंटे

## जानोरीकर, त्र्यंबक दत्तात्रेय

**गायक**

**१३ जून १९२१ – २३ नोव्हेंबर २००६**

शास्त्रीय संगीताचे अध्यापन करणारे गुरुजन अनेक आहेत; पण समृद्ध गायकीबरोबरच शिष्यांना गायकीची नजर देणारे जे थोडे गुरुजन आहेत, त्यांपैकी जानोरीकर हे एक होते.



त्र्यंबक जानोरीकर यांचा जन्म अहमदाबाद येथे झाला. त्यांचे आई-वडील अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. त्यांच्या आईचा आवाज अत्यंत मधुर होता व त्या सुंदर भजने म्हणत असत. बालपणातच त्यांच्यावर संगीताचे संस्कार झाले. बालपणातच जानोरीकरांच्या आईचे निधन झाल्यामुळे त्र्यंबक त्यांच्या आजोबांकडे, पुण्याला आले. त्यांच्या आजोबांनाही शास्त्रीय संगीताची आवड असल्याने पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्या संगीत विद्यालयात संगीताचे शिक्षण घेण्यासाठी त्यांनी त्र्यंबकला दाखल केले. इथून जानोरीकरांच्या सांगीतिक जीवनाची सुरुवात झाली. संगीतावरील निष्ठा व तीव्र ग्रहणशक्ती पाहून पं. विनायकबुवांनी त्यांना बारा वर्षे ग्वाल्हेर घराण्याची खास तालीम दिली. या शिष्यानेही निष्ठेने रियाज करून ग्वाल्हेर गायकी पूर्णपणे आत्मसात केली. तसेच पं. विनायकबुवांची शिस्त, नियोजन, चारित्र्यसंपन्नता हे गुणही जानोरीकरांनी अंगी बाणविले. पं. विनायकबुवा आपल्या शिष्याला आपल्याबरोबर गायनाच्या कार्यक्रमासाठी भारतभर नेत असत. त्यामुळे मोठमोठ्या संगीत संमेलनांतून आपली गायनकला सादर करण्याची, तसेच मोठमोठ्या कलाकारांचे गायन ऐकण्याची संधी त्यांना मिळत गेली. आपले गायन समृद्ध करण्यासाठी पं. जानोरीकरांनी या संधीचा चांगला उपयोग करून घेतला.

संगीताच्या शिक्षणाबरोबरच त्यांचे शालेय शिक्षणही उत्तम रितीने चालू होते. मॅट्रिकची परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्यावर संगीताच्या वेडापायी संगीत क्षेत्रातच कार्य करण्याचे जानोरीकर यांनी ठरविले. पं. विनायकबुवांनीही त्यांना संगीताच्या प्रसाराचे कार्य करण्यास उद्युक्त केले. गुरुच्या आज्ञेप्रमाणे संगीताच्या प्रसाराचे कार्य करण्यासाठी त्यांनी अहमदनगरमध्ये आपले वास्तव्य ठेवले. परंतु स्वत:च्या गायनाचा विकास इथे होणार नाही हे ध्यानात आल्यावर त्यांनी पुण्याला परतण्याचे ठरविले. अर्थार्जनाच्या दृष्टीने तो काळ फार अस्थिर व अनिश्चित होता. परंतु जानोरीकरांनी धैर्याने या समस्येला तोंड दिले. याच काळात ते आकाशवाणीचे मान्यताप्राप्त गायक कलाकार झाले. निरनिराळ्या मैफलींतून त्यांचे गायनाचे कार्यक्रम होऊ लागले.

इतक्यात पं. जानोरीकरांच्या जीवनाला एक महत्त्वपूर्ण वळण मिळून त्यांचे सांगीतिक जीवनच बदलून गेले. त्या काळी पं. शिवकुमार शुक्ल हे भेंडीबाजार घराण्याचे उ. अमानअली खाँ यांचे शिष्य, यांचे नाव महान गायक म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचे सौंदर्यपूर्ण आणि पूर्णत: वेगळ्या ढंगातील गायन ऐकण्याचा योग पं. जानोरीकरांच्या जीवनात आला. आगळा स्वराविष्कार, अप्रतिम बंदिशी, अजोड सरगम, विजेसारखी चपळ तानक्रिया हे सर्व पैलू पाहून पं. जानोरीकर विलक्षण प्रभावित झाले आणि त्यांनी निश्चय केला, की यापुढे शिकेन तर या कलाकाराच्या गुरूकडेच शिकेन. पं. शिवकुमार शुक्ल यांचे गुरू उ. अमानअली खाँ त्या वेळी मुंबईत वास्तव्य करून होते. परंतु १९४७ मध्ये ते पुण्यात वास्तव्यास आले. खाँसाहेबांच्या खानदानी रीतिरिवाजाप्रमाणे गंडाबंधनाचा कार्यक्रम १९४८ मधील वसंतपंचमीच्या दिवशी संपन्न झाला आणि खाँसाहेबांची तालीम सुरू झाली.

त्या दिवसापासून जानोरीकरांच्या समोर संगीताच्या नवीनच विश्वाचा उदय झाला. संपूर्ण दिवस गायनाच्या शिकवण्या करून रोज रात्री ८ ते १ वाजेपर्यंत खाँसाहेबांची तालीम चालत असे. खाँसाहेबांनी जानोरीकरांची निष्ठा आणि ग्रहणशक्ती पाहून उदार मनाने भेंडीबाजार घराण्याच्या गायकीची सर्व वैशिष्ट्ये शिकविली. मुलायम कण-स्वरांची गायकी, खंडमेराची बढत, लयीशी निगडित पेशकारी, शब्दांचे भावपूर्ण उच्चारण, लयीशी खेळत कर्नाटकी अंगाची सरगम या सर्व गोष्टी जानोरीकर श्रद्धापूर्वक शिकत होते. खाँसाहेबांनी आपल्या आगळ्यावेगळ्या ढंगदार बंदिशी आत्मीयतेने जानोरीकरांना शिकवल्या. अशा तऱ्हेने

जानोरीकरांना पाच वर्षांपर्यंत खाँसाहेबांची तालीम मिळाली व खाँसाहेबांचे आशीर्वादही मिळाले.

उ. अमानअली खाँसाहेबांचे १९५३ मध्ये निधन झाल्यावर जानोरीकरांनी भेंडीबाजार घराण्याच्या ज्येष्ठ कलाकार गानतपस्विनी अंजनीबाई मालपेकर यांच्याकडे शिकण्यास प्रारंभ केला. दोन्ही गुरू एकाच घराण्याचे असल्याने गायकीची मूलतत्त्वे समान होती. परंतु प्रत्येकाची प्रतिभा, सौंदर्यदृष्टी, आवाजाची जात ह्या गोष्टी भिन्न असतात. त्यानुसार खाँसाहेबांपेक्षा अंजनीबाईंची गायनशैली अधिक विलंबित लयीची होती. खुला आवाज व दीर्घ मींडकाम, दीर्घ श्वास ही अंजनीबाईंची वैशिष्ट्ये होती. खाँसाहेब मध्यलय जास्त पसंत करीत असत. मींडकामही मध्यम स्वरूपाचे असे.

जानोरीकरांनी चार ते पाच वर्षे अंजनीबाईंकडे तालीम घेतली. त्यांच्या गायकीचे मर्म आत्मसात केले. खाँसाहेबांकडून मध्यलयीची गायकी, तर अंजनीबाईंची विलंबित गायकीची तालीम मिळाल्याने जानोरीकरांना ज्ञानाचे भांडारच उपलब्ध झाले. मिळालेल्या या सर्व विद्येचे चिंतन-मनन व रियाज करून ते ज्ञान आत्मसात करून श्रोत्यांसमोर घराण्याची गायकी सादर करण्याचे कार्य सुरू झाले.

उ. अमानअली खाँसाहेब आध्यात्मिक वृत्तीचे असल्याने मैफलीत जास्त गात नसत. अंजनीबाईंनी ऐन उमेदीतच गायन-संन्यास घेतला व पं. शिवकुमार शुक्ल यांचा आवाज अचानक खराब झाल्यामुळे घराण्याची गायकी श्रोत्यांपर्यंत जाणे दुरापास्त झाले होते. विद्वान लोकांना या घराण्याच्या गायकीची व कलाकारांची माहिती होती. पण सर्वसामान्य रसिकांना या गायकीचा लाभ न मिळाल्याने हे घराणे संपले अशीच धारणा लोकांमध्ये रुजली होती.

भेंडीबाजार घराण्याची ही स्थिती पाहून जानोरीकर व्यथित झाले. त्यांनी ही अजोड गायकी जपण्यासाठी कंबर कसली. सर्व समस्यांना तोंड देत, परिस्थितीशी झगडत त्यांनी विद्यादानाचे कार्य सुरू केले. अनेक शिष्यांना विद्यादान करत असताना निवडक ५-६ शिष्य चांगले तयार झाले. जे पुढच्या पिढीपर्यंत ही गायकी पोहोचवू शकतील असे साधना जोशी, सुहासिनी कोरटकर, श्रीकांत पारगावकर, शरद करमरकर, कुमुदिनी मुंडकूर, वसुंधरा पंडित, पद्माकर कुलकर्णी आणि अनुराधा कुबेर हे उल्लेखनीय शिष्य आहेत.

घराण्याचे नाव पुन्हा उज्ज्वल करण्यासाठी उ. अमानअली खाँसाहेबांची पुण्यतिथी साजरी करण्यासाठी १९८१ मध्ये शिष्यांच्या सहकार्याने जानोरीकरांनी कार्यक्रम करण्यास सुरुवात केली. गोवा, पुणे, मुंबई, दिल्ली, सातारा, चिंचवड अशा विविध ठिकाणी दरवर्षी जानोरीकर व त्यांच्या शिष्यांचे, तसेच घराण्यातील इतर गुरुजनांच्या शिष्यांना सामावून घेत गायनाचे कार्यक्रम खाँसाहेबांच्या पुण्यतिथीला साजरे केले. त्या निमित्ताने घराण्याची माहितीपत्रके, स्मरणिका, वर्तमानपत्रांतून लेख प्रकाशित केले गेले.

शिष्या डॉ. सुहासिनी कोरटकर या दिल्लीला आकाशवाणीमध्ये अधिकारी म्हणून सेवेत असताना जानोरीकरांचे दिल्लीला जाणेयेणे सुरू झाले. उत्तर भारतात अनेक संगीतसभांमधून त्यांनी घराण्याची दुर्मीळ गायकी प्रभावीपणे श्रोत्यांसमोर मांडली. त्यांचे गायन ऐकून रसिकांना वेगळ्याच आनंदाची अनुभूती मिळाली.

प्रसिद्ध बासरीवादक व समीक्षक श्री. प्रकाश वढेरा आपल्या एका लेखात लिहितात : ‘पं. जानोरीकरांचे गाणे ऐकणे हा एक अनोखा अनुभव होता. धीरगंभीर आवाज, गुंजनयुक्त स्वरलगाव, दीर्घ मींडयुक्त आलापी, लयदार सरगम, गमकेच्या ताना, बंदिशींचे सुंदर सादरीकरण ही भेंडीबाजार घराण्याच्या गायकीची सर्व अंगे त्यांच्या गायनातून प्रकट होत असत.’

संगीत नाटक अकॅडमी, आकाशवाणी या संस्थांनी पं. जानोरीकर यांचे विशेष ध्वनिमुद्रण त्यांच्या संग्रहात समाविष्ट करून ठेवले आहे. त्यामुळे पुढील पिढ्यांसाठी भेंडीबाजार घराण्याची गायकी ऐकण्याची सुविधा उपलब्ध झाली आहे.

कोलकाताच्या संगीत रिसर्च अकॅडमीने १९९० मध्ये पं. जानोरीकरांना भेंडीबाजार घराण्याचे गुरू म्हणून

ज

आवर्जून आमंत्रित केले. तीन वर्षे राहून तेथे त्यांनी शिष्यांना विद्यादान केले. तेथील संगीत लायब्ररीने घराण्याच्या बंदिशींचे ध्वनिमुद्रणही करून घेतले आहे.

पं. जानोरीकरांना शारीरिक व्याधींशीही खूप झगडावे लागले. अनेक शस्त्रक्रियांना सामोरे जावे लागले. आर्थिक विवंचनेलाही तोंड द्यावे लागले. पण त्यांच्या पत्नी श्रीमती सुमनताई त्यांच्या पाठीशी खंबीरपणे उभ्या होत्या. पं. जानोरीकरांची स्नुषा किशोरी जानोरीकर ही संगीताची परंपरा पुढे चालवीत आहे.

पं. जानोरीकरांना महाराष्ट्र शासनाचा सांस्कृतिक पुरस्कार, शारदापीठ, पुणे द्वारा 'गानमहर्षी' पुरस्कार, गानवर्धनचा 'स्वर-लय-रत्न' पुरस्कार, 'बाबासाहेब गाडगीळ ट्रस्ट' पुरस्कार, 'वसुंधरा पंडित स्मृती' पुरस्कार व संगीत रिसर्च अकॅडमी पुरस्कार असे अनेक पुरस्कार प्राप्त झाले. त्यांनी अनेक संस्थांना देणग्या देऊन सामाजिक जाणीवही जोपासली.

— शरद करमरकर

## जोग, प्रभाकर गणेश
**व्हायोलिनवादक, संगीतकार**
**२५ डिसेंबर १९३२**



प्रभाकर गणेश जोग यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील हरेगाव बेलापूर इथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण अहमदनगर व पुण्यात झाले. सर परशुरामभाऊ महाविद्यालयामध्ये त्यांनी पदवी शिक्षणासाठी प्रवेश घेतला. वडिलांच्या अकस्मात निधनानंतर अवघ्या बाराव्या वर्षी अनेक छोटीमोठी कष्टाची कामे करून त्यांनी अर्थार्जन केले आणि नादारीमध्ये शिक्षण पुरे केले. ते गायन – वादनही शिकले. तसेच व्हायोलिनची साथ करून त्यांनी पैसेही मिळवले. लहानपणापासून त्यांना गायनाची आवड असल्याने त्यांनी गजाननबुवा जोशी व नारायणराव मारुलकर यांच्याकडून गायनाचे धडे घेतले. थोरले बंधू वामनराव यांच्याकडून त्यांनी व्हायोलिनचे शिक्षण घेतले. गायन-वादनाचे स्वरांकन (नोटेशन) करण्याची कला त्यांना चांगलीच अवगत होती.

त्यांची आकाशवाणी, नागपूर केंद्रावर 'व्हायोलिन–वादक' म्हणून नियुक्ती झाली होती. कीर्तनकार नावडीकरांनी जोगांना पुण्यात आश्रय दिला, आर्थिक साहाय्य केले. त्यानंतर जोगांनी मालती पांडे, कालिंदी केसकर, गजाननराव वाटवे, बबनराव नावडीकरांच्या गायनाला, तर नृत्यांगना रोहिणी भाटे यांच्या नृत्यांच्या कार्यक्रमांना व्हायोलिनची साथ केली.

एस.पी. महाविद्यालयामध्ये शिक्षण घेत असताना त्यांची व्हायोलिनवादनाची साथ चालू होती. महाविद्यालयाच्या संमेलनाच्या वेळी जोग यांनी व्हायोलिनवर वाजवलेल्या सुमधुर गाण्यांना 'वन्समोअर' मिळाला. ही गाणी समोरच राहणारे सुधीर फडके यांच्या कानावर पडली. त्यांचे वादन आवडल्याने बाबूजींनी जोग यांना भेटायला बोलावले. जलद व अचूक स्वरांकन लिहिण्याच्या कौशल्यामुळे बाबूजींनी त्यांना साहाय्यक म्हणून काम करण्यास सांगितले.

आकाशवाणी, पुणे केंद्र निर्मित ग.दि. माडगूळकर व बाबूजींच्या अजरामर 'गीतरामायणा'च्या निर्मितीत (१९५५-५६) जोग यांचा मोठा सहभाग होता. पुण्यातील जोगांच्या घरातच गायक-वादकांच्या तालमी घेणे, स्वरांकन करणे, व्हायोलिनची साथ करणे अशी कामे रात्रंदिवस चालायची. दर आठवड्याला सकाळी ८-४५ वाजता गाणे प्रत्यक्ष सादर होत असे. 'चला राघवा चला' हे गीत विख्यात नट चंद्रकांत गोखले यांनी गायलेले होते. हे गीत जोग यांनी स्वत: स्वतंत्रपणे स्वरबद्ध केलेले होते. एचएमव्ही कंपनीच्या एल.पी. रेकॉर्ड्समध्येसुद्धा जोग यांनी स्वरांकन करून व्हायोलिनची साथ केलेली आहे.

आकाशवाणी, पुणे केंद्रात, संगीतकाराची 'बी' ग्रेड मिळाल्यावर त्यांनी अनेक गीते, संगीतिका स्वरबद्ध केल्या. 'ब्रह्मकुमारी अहिल्या' ही त्यांची पहिली

संगीतिका होय. त्यांनी मासिक गीतासाठी आपल्या पत्नी नीला यांच्या आवाजात गदिमांचे ‘लपविलास तू हिरवा चाफा’ हे गीत स्वरबद्ध करून सादर केले. नंतर याच गीताची मालती पांडे बर्वे यांच्या स्वरातली जोगांची पहिली ध्वनिमुद्रिका (१९५६) प्रकाशित होऊन लोकप्रिय झाली.

जोग हे स्वरांकन जलद करून देत असल्याने सुधीर फडक्यांनी राजा परांजपे यांच्या ‘ऊनपाऊस’या चित्रपटापासून सहायक संगीत दिग्दर्शक म्हणून जोग यांची निवड केली. बाबूजींबरोबरच्या अनुभवांची शिदोरी त्यांना यशस्वी संगीतकार बनण्यात उपयोगी पडली. त्यांनी ती जोपासली, वाढवली आणि आपली स्वतंत्र शैली निर्माण केली. ‘फडके सुवर्णयुगाचे साक्षीदार’ बनण्याचे भाग्य त्यांना मिळाले. बाबूजींच्या ‘गीतरामायणा’च्या जाहीर कार्यक्रमात १९५८पासून त्यांनी ५००च्यावर प्रयोगांत तबलावादक अण्णा जोशी यांच्यासह जोगांनी व्हायोलिनची साथ केली व लोकांची दाद मिळवली. माहिती घेऊन, अभ्यासून त्यांनी आपल्या संगीतासाठी स्वत:ची नोटेशनची शैली निर्माण केली. कोणत्याही गाण्याचे, चालीचे ते चटकन स्वरांकन करत. त्यामुळे पं. भीमसेन जोशी त्यांना ‘टीपकागद’ असे म्हणत.

अनेक दिग्गज संगीतकारांकडे त्यांनी व्हायोलिन गीतवादक (साँग व्हायोलिनिस्ट) म्हणून काम केले. त्यांनी १९६२ मध्ये मुंबईत येऊन कारकीर्दिला सुरुवात केली. संगीत दिग्दर्शक मदनमोहन, जयदेव, आर.डी. बर्मन, लक्ष्मीकांत-प्यारेलाल, उषा खन्ना, रवींद्र जैन यांबरोबरच नवीन पिढीतले अन्नू मलिक, नदिम-श्रवण, राजेश रोशन यांबरोबरही त्यांनी काम केले. ‘व्हायोलिन गीतवादक’ म्हणून त्यांनी ३५ वर्षे सतत काम केले. लता मंगेशकर, आशा भोसले, किशोर कुमार, मन्ना डे असे दिग्गज गायक, तसेच सुधीर फडके, स्नेहल भाटकर, कल्याणजी-आनंदजी, सज्जाद हुसेन यांच्यासारख्या श्रेष्ठ संगीतकारांसाठी जोगांनी वादन केले.

जोग यांनी २२ चित्रपटांचे स्वतंत्रपणे संगीत दिग्दर्शन केले आहे. ‘जावई माझा भला’ हा त्यांचा पहिला चित्रपट. ‘दाम करी काम’, ‘सतीचं वाण’, ‘चांदणे शिंपीत जा’, ‘आंधळा मारतो डोळा’, ‘भैरू पैलवान की जय’, ‘कैवारी’ इ. अनेक चित्रपटांत त्यांनी संगीत दिलेले आहे.

जोगांचे मित्र, विख्यात अरेंजर, हार्मोनियम वादक शामराव कांबळे आणि प्रभाकर जोग यांनी ‘बिरबल माय ब्रदर’ या इंग्रजी चित्रपटाचे संगीत दिग्दर्शन ‘श्याम-प्रभाकर’ या नावाने केले.

त्यांनी ‘स्वर आले दुरुनी’, ‘प्रिया आज माझी’ (सुधीर फडके), ‘कोटी कोटी रूपे तुझी’ (सुरेश वाडकर), ‘वृंदावनात माझ्या’ (माणिक वर्मा) ही भावगीते-भक्तिगीते स्वरबद्ध केली.

‘‘अरे, गाण्याच्या साथीला बसले की स्वर सगळेच वाजवतात; पण तू स्वरांबरोबर व्यंजनही वाजवतोस, आहेस कुठे!’’ अशी दाद रसिकाग्रणी रामूभैया दाते यांच्याकडून मिळवणारे, तसेच ‘पराधीन आहे जगती, पुत्र मानवाचा’ हे गीत व्हायोलिनवर ऐकल्यानंतर, ‘‘माणूस केवळ पराधीन नसतो, तर तो स्वराधीनही असतो याची अनुभूती आज आपण घेतली,’’ असे गौरवोद्गार पु.ल. देशपांडे यांनी प्रभाकर जोग यांच्याबद्दल काढले होते.

जोग यांना ‘चुडा तुझा सावित्रीचा’, ‘चांदणे शिंपीत जा’ आणि ‘कैवारी’ या चित्रपटांतील शास्त्रीय संगीतावर आधारित स्वररचनेबद्दल ‘सूरसिंगार, मुंबई’ या संस्थेचे तीन पुरस्कार ‘सरस्वती’, ‘मियाँ तानसेन’ आणि ‘स्वामी हरिदास संगीत पुरस्कार’, प्राप्त झाले आहेत. तसेच अरुण मेमोरियल फाउण्डेशन, मुंबई यांचा शारदा गौरव पुरस्कार इ. अनेक पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत.

— रवींद्र आपटे

## जोग, विष्णू गोविंद

**व्हायोलिनवादक**

**१४ फेब्रुवारी १९२२ — ३१ जानेवारी २००४**

विष्णू गोविंद जोग यांचा जन्म वाई येथे झाला. त्यांना संगीताची उपजतच आवड होती. बेळगाव येथे त्यांच्या

ज



वडिलांची गोपाळ संगीत नाटक मंडळी होती. लहानपणीच त्यांचे पितृछत्र हरपले, तरीसुद्धा त्यांनी शालेय व महाविद्यालयीन शिक्षणात खंड पडू दिला नाही. आपल्या मुंबईतील वास्तव्यात त्यांनी आपले मामा शंकरराव आठवले यांच्याकडे संगीताचे, तसेच गणपतराव पुरोहित यांच्याकडे, विशेषत: कंठसंगीताचे मार्गदर्शन घेणे सुरू केले. पण व्हायोलिन या वाद्याची त्यांना एवढी ओढ होती, की 'देवधर स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक'मध्ये तत्कालीन संगीत शिक्षक पं. विघ्नेश्वर शास्त्री यांच्याकडे त्यांनी व्हायोलिनचे तंत्रशुद्ध शिक्षण घेतले. पुढे पं. श्रीकृष्ण नारायण रातंजनकर आणि उस्ताद अल्लाउद्दिन खाँ यांच्यासारख्या संगीत महर्षींकडून त्यांनी मार्गदर्शन मिळविले.

ज

जोगांनी या वाद्याच्या तंत्राचा अभ्यास करून आपले वादनतंत्र विकसित केले. एकूणच या सर्व वादनकौशल्याचा उपयोग त्यांनी स्वतंत्र वादन, साथसंगत आणि इतर अनेक वाद्यांबरोबर सहवादन करताना करून घेतला.

लखनौच्या मॉरिस म्यूझिक कॉलेजमधून त्यांनी संगीतातील एम.ए. पदवी प्राप्त केली व १९४४ मध्ये पं. रातंजनकरांनी जोगांची नेमणूक मॉरिस म्यूझिक कॉलेजमध्ये व्हायोलिनसाठी 'व्याख्याता' या पदावर केली. जोग येथे विद्यादानात १०-१५ वर्षे व्यस्त होते. या काळात उत्तर हिंदुस्थानातील अनेक दिग्गज गायकांचे गायन ऐकून ते प्रभावित झाले. आपल्या वादनात त्यांनी उत्तरेतील ढंगदार, रंगतदार गायकीचा समावेश केला.

पं. रविशंकर, उस्ताद बिस्मिल्ला खाँ, पं. हरिप्रसाद चौरसिया, अली अहमद हुसेन आणि सध्याच्या पिढीतील उस्ताद शाहीद परवेझ अशा दिग्गज कलाकारांबरोबर जोगांनी सहवादन केले. तसेच त्यांनी पं. एम.एस. गोपालकृष्णन, डॉ. एन. राजम या दिग्गज व्हायोलिनवादकांबरोबरही सहवादन केले. उस्ताद बिस्मिल्ला खाँसाहेबांबरोबर वाजविलेल्या जुगलबंदीची तर देश-विदेशांत खूपच प्रशंसा झाली.

'बेला शिक्षा' हे त्यांचे व्हायोलिनवादनावरचे पुस्तक १९४४ मध्ये प्रकाशित झाले. व्हायोलिनला तरफा लावून त्यांनी व्हायोलिनचा नादगुण समृद्ध केला आणि त्याला 'जवारी व्हायोलिन' असे नाव दिले.

ते १९५५ पासून आकाशवाणी, लखनौ केंद्रावर संगीत विभागात कार्यक्रम निर्देशक म्हणून कार्यरत झाले व त्यांनी १९७१ साली स्वेच्छानिवृत्ती घेतली.

यानंतर पं. जोग हे कोलकाता येथे स्थायिक झाले आणि आय.टी.सी. कंपनी पुरस्कृत 'संगीत रिसर्च अकादमी'च्या सल्लागार मंडळाचे सदस्य म्हणून ते कार्यरत राहिले.

चाळीस वर्षे अव्याहत स्वतंत्र व्हायोलिनवादन, सहवादन करून पं. जोगांनी आपला स्वतंत्र ठसा संगीत जगतावर उमटविला. पं. ओंकारनाथ ठाकूर, उस्ताद बडे गुलामअली खाँ, फैय्याज खाँ, हिराबाई बडोदेकर, विनायकबुवा पटवर्धन अशा अनेक मान्यवर गायक-गायिकांची साथसंगतही त्यांनी वेळोवेळी केली. श्रीमती माणिक वर्मा यांच्या 'भटियार' आणि 'जोगकंस' रागांच्या ध्वनिमुद्रिकेतही पं. जोग यांच्या व्हायोलिनची साथसंगत आहे.

त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण योगदानाबद्दल १९८० मध्ये संगीत नाटक अकादमी पुरस्कार आणि १९८३ मध्ये त्यांना भारताच्या राष्ट्रपतींकडून 'पद्मभूषण' किताब बहाल करण्यात आला. उत्तर प्रदेश संगीत नाटक अकादमीनेही त्यांचा यथोचित गौरव केला. कोलकात्याच्या संगीत रिसर्च अकादमीनेही त्यांना १९९८ साली पुरस्कार दिला.

त्यांचे वेळोवेळी परदेश दौरे झाले. ते १९६८ मध्ये अमेरिकेला जाणारे भारतातील पहिले हिंदुस्थानी व्हायोलिनवादक होते. कॅलिफोर्नियामध्ये बर्कले येथे अली अकबर स्कूल ऑफ म्यूझिकमध्ये त्यांनी व्हायोलिन आणि गायनाचे अध्यापन केले. ते १९४८

मध्ये भारताच्या सांस्कृतिक कला पथकाबरोबर नेपाळला जाऊन आले होते. त्यांचे १९९५ मध्ये वयाची ७५ वर्षे पूर्ण झाल्यावर मात्र प्रकृतिस्वास्थ्य खालावले. त्यांच्यावर काही कौटुंबिक आघातही झाले. वयाच्या ब्याऐंशीव्या वर्षी कोलकाता येथेच त्यांचे पार्किन्सनच्या विकाराने निधन झाले.

— रत्नाकर गोखले

## जोगळेकर, आशा अनंत
**नर्तिका**
**१० सप्टेंबर १९३६**



आशा अनंत जोगळेकर म्हणजेच पूर्वाश्रमीच्या नंदिनी नाना जोशी यांचा जन्म त्यांच्या आजोळी, वाईला झाला. त्यांचे आजोबा डॉ. ह.भ.प. दत्तोपंत पटवर्धन राष्ट्रीय कीर्तनकार होते व वडील नाना जोशी सांगली संस्थानात वकील होते. त्यांनी सांगलीला साबणाचा कारखाना काढला होता. आजोबांप्रमाणेच आशा जोगळेकर यांच्या आई सुरेखा जोशी यांना कीर्तन करण्याची आवड होती. गांधीहत्येनंतर जेव्हा साबण कारखाना बंद झाला, तेव्हा याच गुणांच्या जोरावर आईने नाटकांत कामे करण्यास सुरुवात केली.

नंदिनीला लहानपणापासूनच नृत्य, गायन, चित्रकला, अभिनय या साऱ्या कलांमध्ये विशेष रस होता व चार वर्षांची असतानाच तिने कार्यक्रमांना सुरुवात केली. सांगली संस्थानचे राजगवई नानासाहेब गोडबोले यांच्याकडे ती शास्त्रीय संगीत शिकत होती. गणपती उत्सवात, मेळ्यांमध्ये, नाटकांत ती समरसून काम करत असे. सांगली संस्थानाच्या आसपासच्या मिरज, कोल्हापूरसारख्या शहरांत ‘गायन-नृत्य-अभिनयादी कलांमध्ये निपुण बालकलाकार’ म्हणून तिची ख्याती पसरली. वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी ‘महाराष्ट्र कर्नाटक नृत्यस्पर्धे’त नंदिनीने पारितोषिक मिळवले. तिच्या नृत्याची कीर्ती ऐकून सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयाने तिचा कार्यक्रम आयोजित केला आणि कवी प्रा. गिरीश यांच्या हस्ते नंदिनीचा सत्कारही झाला.

गांधीहत्येच्या वेळी झालेल्या दंग्यांमुळे जोशी कुटुंब पुण्यात आले. नंदिनी जोशी (आशा जोगळेकर) सुगम संगीत, चित्रकला, शिवणापासून ते टंकलेखनापर्यंत सर्वकाही शिकल्या. नृत्यात हव्या असलेल्या निर्दोषपणाच्या, अचूकतेच्या ध्यासाचे बीज इथेच दिसून येते.

घरच्या परिस्थितीमुळे अर्थार्जन करणे गरजेचे होते. त्यांचे मामा विख्यात गायक, संगीतकार सुधीर फडके यांनी त्यांना टंकलेखिकेची नोकरी दिली. पु.भा. भावे, गदिमांसारखे दिग्गज पटकथालेखनाच्या चर्चेसाठी बाबूजींकडे येत असत तेव्हा त्यांना वेळोवेळी चित्रपटात काम करण्यासंबंधी विचारत असत. वयाच्या सतराव्या वर्षी आशा जोगळेकरांना पु.ल. देशपांडे यांच्याबरोबर ‘अंमलदार’ नाटकात नायिकेचे काम करण्याची संधी मिळाली. तेव्हा पु.लं.नी स्वत: त्यांची गाणी बसवली होती.

चित्रपटांसाठी सतत विचारणा होऊनही ‘चित्रपटात काम करावयाचे नाही’, असा फार महत्त्वाचा निर्णय त्यांनी घेतला आणि वयाच्या सतराव्या वर्षी अनंत जोगळेकर यांच्याशी त्या विवाहबद्ध झाल्या. अनंत यांनी त्यांच्या कलासाधनेला पूर्ण पाठिंबा दिला. अनंत जोगळेकरांची सार्वजनिक बांधकाम खात्यामधील नोकरी बदलीची होती. जेव्हा त्यांची चंद्रपूरला बदली झाली, तेव्हा दोन मुलांची आई असलेल्या आशा जोगळेकरांनी पुन्हा नृत्यसाधना सुरू करण्याचे ठरविले.

पुण्याला एक/दोन महिने राहून पं. रोहिणी भाटे यांच्याकडून त्या नृत्याचे शास्त्रशुद्ध धडे गिरवू लागल्या. रोहिणी भाटे उन्हाळ्यात कानपूरला जात, तेव्हा त्यांच्या आज्ञेने जयश्री कीर्तने यांच्याकडे त्या शिकू लागल्या. त्याच वेळी बाळासाहेब गोखले यांचे शिष्य हिरालाल जैन त्यांना आठवड्यातून दोन दिवस घरी येऊन शिकवत

ज

असत. त्या नियमाने, निष्ठेने शिकत आणि शिकलेल्या तोड्यांचा चंद्रपूरला जाऊन कसून रियाझ करत. याप्रमाणे सलग सहा वर्षे नृत्यशिक्षण घेतल्यावर १५ ऑगस्ट १९६३ रोजी त्यांनी 'अर्चना नृत्यालया'ची स्थापना केली. पुढे मुंबईला बदली झाल्यावर 'अर्चना नृत्यालय' मुंबईत सुरू झाले.

मुंबईला येताच पं. नटराज गोपीकृष्ण, त्यांच्या पत्नी सावित्रीदेवी, पं. लच्छू महाराजांच्या पत्नी श्रीमती रमादेवी यांच्याकडे त्यांनी नृत्यसाधना सुरू केली. आशा जोगळेकर लय, ताल, अंगसंचालन, भावप्रदर्शन मनापासून शिकत आणि अतिशय प्रभावीपणे सादर करत. गुरू गोपीकृष्णांबरोबर त्यांनी कार्यक्रमही केले. वयाच्या बत्तिसाव्या वर्षी अशा तऱ्हेने त्यांचे खरे नृत्यशिक्षण चालू झाले. वयाच्या चाळिसाव्या वर्षी त्या 'नृत्यविशारद' झाल्या. दिग्गजांचे मार्गदर्शन आपल्या विद्यार्थिनींनाही लाभावे म्हणून त्यांनी पं. तीरथराम आजाद, पं. रोहिणी भाटे, पं. बिरजू महाराज यांची शिबिरे वेळोवेळी आयोजित केली. पं. रोहिणी भाटे यांची तंत्रशुद्धता व पं. बिरजू महाराजांचे लास्य त्या वेचत राहिल्या आणि आपली शैली अधिकाधिक परिपूर्ण व्हावी म्हणून त्या प्रयत्नशील राहिल्या.

बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या संगीत विभागाच्या 'संभवामि युगे युगे' या नृत्यनाट्यातील त्यांची द्रौपदीची भूमिका नावाजली गेली. गोवा हिंदू असोसिएशनच्या हिंदी आणि मराठी 'शाकुंतल'मधील नटी आणि अप्सरेचे कामही रसिकांना भावले. त्यांनी याचे ७०-७५ प्रयोग केले. त्यांनी १९८४ मध्ये 'अर्चना नृत्यालया'तर्फे 'ऋतुरागदर्शन' हा कार्यक्रम बसवला. त्याचे अनेक प्रयोग झाले.

त्यांच्या आजवरच्या सुमारे तीन हजार शिष्यांपैकी १५० जणांनी नृत्याला व्यवसाय म्हणून स्वीकारले आहे. त्यांच्या शिष्यपरंपरेत अभिनेत्री, कन्या अर्चना जोगळेकर, स्मृती तळपदे, मंजिरी देव, रंजना फडके, उर्मिला कानेटकर या सर्व जणी आणि मयूर वैद्य नृत्यक्षेत्रात उत्तम कामगिरी करत आहेत.

आशा जोगळेकर मुंबईच्या 'नर्तक मिलन' या संस्थेच्या दहा वर्षे कार्यवाह होत्या. महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पारितोषिक निवड समितीवर नृत्य परीक्षक म्हणून त्या काम करतात. 'सूरसिंगार', मुंबईच्या 'कल के कलाकार' संमेलनाच्या परीक्षक मंडळावर त्या गेली पंधरा वर्षे काम पाहत आहेत. त्यांना १९७८ पासून अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळावर परीक्षक म्हणून आमंत्रित केले जाते. अर्चना नृत्यालयाच्या शिष्यवर्गाचे भारतात सर्वत्र, तसेच जर्मनी, आइसलँड, अमेरिकेतही अनेक कार्यक्रम झाले आहेत.

'लास्य अकादमी'तर्फे सत्कार (२००३), 'गणेश कल्चरल अकादमी'तर्फे 'कृतार्थ कलाजीवन' पुरस्कार (२००४), 'सूरसिंगार संसदे'तर्फे 'शारंगदेव' फेलोशिप (२००८), पं. बिरजू महाराजांच्या 'कलाश्रम', मुंबईतर्फे सत्कार (२०१०), 'सेवाभारती', मुंबईतर्फे 'जीवन गौरव' पुरस्कार (२०१०), 'श्रीमती हिराबाई झवेरी आणि श्रीमती श्यामला माजगावकर स्मृती' पुरस्कार (२०११) असे विविध सत्कार, सन्मान आशा जोगळेकर यांना लाभले आहेत.

— सुषमा जोशी

## जोगळेकर, रंजना
**गायिका**
**६ ऑक्टोबर १९५६**



रंजना पेठे-जोगळेकर यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे वडील राम पेठे हे स्वतः उत्तम गायक आणि संगीतकार होते. त्या काळी त्यांचे आकाशवाणीवर कार्यक्रम होत असत, त्यामुळे रंजनाला जन्मापासूनच संगीताचे बाळकडू मिळू लागले. वडिलांकडे येणाऱ्या गजाननराव वाटवे, बबनराव नावडीकर, दत्ता वाळवेकर अशा दिग्गजांचे कृपाशीर्वाद रंजना पेठे यांना अगदी लहान

वयातच मिळाले. सुरुवातीला सरस्वती राणे आणि त्यानंतर जयपूर घराण्याचे पं. राजाभाऊ देव यांच्याकडून त्यांनी गायनाचे शिक्षण घेतले. बी.ए. आणि एम.ए. (मानसशास्त्र आणि हिंदुस्थानी राग संगीत) अशा दोन पदव्या त्यांनी संपादन केल्या.

शिक्षण सुरू असतानाच सार्वजनिक गणेशोत्सवातील कार्यक्रमांमधून त्यांनी मंचावर गाण्यास सुरुवात केली. पुण्याच्या स्वरानंद संस्थेने १९७८ च्या सुमारास ग.दि. माडगूळकरांच्या गीतांवर आधारित ‘मंतरलेल्या चैत्रबनात’ हा पहिला मराठी वाद्यवृंद मंचावर आणला. या कार्यक्रमातून रंजना पेठे-जोगळेकर यांचे गायन क्षेत्रात पदार्पण झाले. त्यांनी या कार्यक्रमाचे अडीचशे प्रयोग केले. त्यानंतर त्यांना आकाशवाणीवर गाण्याची संधी मिळाली. रसिकांबरोबरच रंजना यांचा आवाज तत्कालीन प्रसिद्ध संगीतकारांच्या पसंतीसही उतरला.

राम कदम यांनी ‘दुनिया करी सलाम’ या चित्रपटातून रंजना जोगळेकरांना पार्श्वगायनाची पहिली संधी दिली. त्यानंतर त्यांनी श्रीधर फडके, यशवंत देव, प्रभाकर जोग, श्रीकांत ठाकरे अशा दिग्गजांसाठी गाणी गायली. दूरदर्शनवरील ‘शब्दांच्या पलीकडले’ या लोकप्रिय कार्यक्रमात त्यांनी अनेक गाणी गायली आहेत. ‘शब्दांच्या पलीकडले’मध्ये आपल्या वडिलांनी संगीतबद्ध केलेल्या गाण्यांचा एक संपूर्ण कार्यक्रमदेखील त्यांनी सादर केला. दूरदर्शनवरील ‘युवदर्शन’ या कार्यक्रमात रंजना यांनी सुरेश भटांच्या मराठी गझला गायल्या. अरुण दाते यांचा ‘शुक्रतारा’, श्रीधर फडके यांचा ‘फिटे अंधाराचे जाळे’, भास्कर चंदावरकर यांनी संगीतबद्ध केलेला ‘नक्षत्रांचे देणे’ असे अनेक दर्जेदार कार्यक्रम रंजना जोगळेकरांच्या आवाजामुळे फुलले.

भावगीतांच्या या काळात रंजना अनेक ध्वनिफितींसाठीदेखील गाणी गायल्या. त्यांनी गायलेल्या ‘रानात सांग कानात’, ‘माझं कोकरू’, ‘मृगजळाचे गाव माझे’, ‘सजणा पुन्हा स्मरशील ना’, ‘माघाची थंडी’ या ध्वनिफिती गाजल्या. स्वतः तयार केलेला ‘भावधारा’ हा जुन्या-नव्या गीतांवर आधारित कार्यक्रम त्या सादर करतात. रंजना जोगळेकरांनी परदेशांतही अनेक कार्यक्रम सादर केले. अमेरिकेमध्ये त्यांनी तीन महिन्यांचा दौरा केला. याव्यतिरिक्त ऑस्ट्रेलिया, दुबई, शारजा, मॉरिशस अशा देशांमध्ये त्या गायल्या आहेत.

त्यांना २०१०-२०११ या वर्षात ‘भारत गायन समाजा’तर्फे ‘मालती पांडे-बर्वे’ या प्रतिष्ठित पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. आपले यजमान वास्तुविशारद आणि घरातील बरीचशी मंडळी डॉक्टर असूनही घरच्यांच्या प्रोत्साहनामुळे जागतिक पातळीवर मराठी गाण्यांची ओळख मांडणाऱ्या रंजना जोगळेकरांचा गायकीचा प्रवास जोमाने सुरू आहे. नव्या पिढीला गाणी आणि त्याचबरोबर चांगले संस्कार देण्यासाठी त्या सदैव तत्पर असतात. पुणे, नाशिक, गोवा या ठिकाणी त्या सुगम संगीताच्या कार्यशाळा घेतात. ‘संस्कार भारती’ या संस्थेच्या दादर विभागाच्या त्या अध्यक्षा आहेत.

— अमोल ठाकुरदास

## जोशी, अंतूबुवा

☛ *जोशी, अनंत मनोहर*

## जोशी, अनंत मनोहर

***जोशी, अंतूबुवा***

**गायक**

**८ मार्च १८८१ - २ सप्टेंबर १९६७**



पं. अनंत मनोहर जोशी ऊर्फ अंतूबुवांचा जन्म औंध संस्थानातल्या किन्हई या गावी झाला. त्यांचे वडील मनोहरबुवा जोशी यांचा आवाज गोड होता. ते भजने छान म्हणत. त्यांच्या गायनामुळे सांगलीच्या संस्थानिकांनी त्यांना गणपती देवस्थानाच्या सेवेसाठी नेमले. ते सांगलीस राहू लागले. तिथे गाण्याच्या मैफलीत ते नेहमी शेवटी गायचे. कारण त्यांच्या गोड

गायनामुळे त्यांच्यानंतर कुणाच्या गायनाचा रंग जमत नसे. त्यांच्या कीर्तीमुळे औंधच्या संस्थानिकांनी त्यांना सन्मानपूर्वक परत बोलावून घेतले होते. लहानगा अनंत फक्त सात वर्षांचा असतानाच त्याच्या वडिलांचे निधन झाले. त्याची आई त्याला घेऊन पुन्हा मूळ गावी किन्हईला परतली. अनंताचे तिथे थोडेबहुत शालेय शिक्षण झाले. देवस्थानाचे गायक बापूराव अयाचित हे छोट्या अनंताचे प्रथम गुरू. मुलाची गायनातील प्रगती अतिशय चांगली आहे हे सर्वांनाच जाणवू लागले. मग त्याच्या शालेय शिक्षणाचा फारसा विचार न करता आईने त्याला मिरजेच्या महादेवबुवा गोखल्यांची तालीम द्यायचे ठरवले. पण मिरजेत गेल्यावर समजले की गोखलेबुवा स्वतःच्या मुलांनाच शिकवतात. त्याच सुमारास पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर ग्वाल्हेरहून विद्या संपादून मिरजेला परतले होते. त्यांनी अनंताला शिकवण्याची तयारी दाखविली.

अनंताला औंध दरबाराकडून थोड्या प्रमाणात शिष्यवृत्ती मिळत होती. पं. विष्णू दिगंबर पलुसकर आणि गुंडूबुवा इंगळे हेही त्या वेळी बाळकृष्णबुवांकडे शिकत असत. अनंतराव १८८८ ते १८९६ अशी सलग तालीम घेऊन पं. विष्णू दिगंबरांबरोबर बाहेरगावी गायन करण्यासाठी निघाले. दोन वर्षे फिरती करून पुन्हा पं. बाळकृष्णबुवांकडे ते तालीम घेऊ लागले. गुरुजी त्या वेळी इचलकरंजी संस्थानात होते, त्यामुळे ही तालीम तेथे चालू राहिली. औंधच्या महाराजांचे निधन झाल्यावर ते उस्ताद रहिमत खाँ यांच्या साथीला तंबोऱ्यावर बसू लागले. उस्तादजी साताऱ्यास होते व नंतर गायनासाठी फिरतीवर जात असत. त्यांना १९०७ सालापर्यंत उस्तादांची तालीम मिळत होती.

अंतूबुवा शुद्ध ग्वाल्हेर घराण्याची गायकी गात. शिवाय रहिमत खाँसाहेबांचे वळण त्यांच्या गायकीत होते. आलापांची लय, तानप्रक्रिया ही सर्व ग्वाल्हेरी वळणाची होती. ख्याल, तराना व कधीतरी सरगम हे प्रकार ते गात असत. त्यांचे गायन जोमदार, प्रभावशाली होते. त्यानंतर अंतूबुवांनी गृहस्थाश्रम स्वीकारायचे ठरवून १९०७ साली मुंबईत ‘श्री गुरुसमर्थ गायन वादन विद्यालय’ नावाची संस्था स्थापन केली. विद्यालय १९२० सालापर्यंत साधारणपणे चालू राहिले. छान जम बसला. त्यांचे चिरंजीव पं. गजाननबुवा जोशी, रातंजनकर, वसंतराव कुलकर्णी, निंबर्गी, चौगुले, गोखले, गोडबोले हे त्यांचे शिष्य होत. मथुरेच्या वास्तव्यात अंतूबुवांनी ब्रजभाषेचाही उत्तम अभ्यास केला. त्यांनी रचलेल्या ‘एरी मालनिया गुंदे लावो’ (छायानट), ‘ननदिके बचनवा’ (यमन), ‘रैन कारी डरावन’ (मालगुंजी) अशा अनेक उत्तम बंदिशींत गायकीचा ढंग व साहित्यिक मूल्यही दिसते. त्यांनी ‘संगीत प्रवेश’- तीन भाग आणि ‘हार्मोनिअम डिलायटर’- दोन भाग अशी पुस्तके लिहिली.

प्रथम महायुद्ध, फ्लूची साथ, नंतर पत्नी व तीन मुलांचा मृत्यू या सर्व गोष्टींमुळे १९२९ साली ते विरक्त झाले. याच सुमारास गुरू शिवानंद स्वामी यांच्याशी त्यांची भेट झाली. पुढे रसिक श्रोत्यांच्या आग्रहास्तव विरक्तपणातून ते १९४७ च्या सुमारास बाहेर आले. सहासष्टाव्या वर्षी त्यांनी मुंबई आकाशवाणी केंद्रावरून गायन केले. त्यांना संगीत नाटक अकादमीचा पुरस्कारही प्राप्त झाला. अंतूबुवांचे डोंबिवली येथे निधन झाले.

– डॉ. सुधा पटवर्धन

## जोशी, गजानन अनंत

**व्हायोलिनवादक, गायक, गुरू**

**३० जानेवारी १९११ – २८ जून १९८७**



व्हायोलिनवादक, गायक व गुरू म्हणून सुविख्यात असणाऱ्या पं. गजाननराव अनंत जोशी यांचा जन्म मुंबईतील गिरगाव येथे झाला. त्यांच्या आईचे नाव इंदिराबाई होते. त्यांचे घरगुती नाव ‘राम’ असे होते. पं. गजाननबुवांच्या घराण्यात संगीताची परंपरा होती. गजाननबुवांचे आजोबा

मनोहरपंत हे सुमारे १८५०-१८७० या काळातील गायक होते. त्यांनी इचलकरंजीच्या रावजीबुवा गोगटे यांच्याकडे तालीम घेतली होती, तर वडील अनंत मनोहर जोशी तथा अंतूबुवा हे ग्वाल्हेर घराण्याचे उत्तम गायक म्हणून विख्यात होते.

वडील अंतूबुवा हेच गजाननबुवांचे पहिले गुरू होते. गिरगावात अंतूबुवांचे 'श्रीसमर्थ गायन वादन विद्यालय' होते, त्यामुळे गजाननबुवांवर बालवयातच संगीताचे संस्कार झाले. अंतूबुवांच्या पत्नी व मुलांचे पाठोपाठ आकस्मिक निधन झाल्याने ते विद्यालय बंद करून प्रथम सांगलीस आले व नंतर त्यांची नेमणूक औंध संस्थानात दरबार गायक म्हणून झाली. वडिलांकडून गजाननबुवांना पारंपरिक पद्धतीने गायनाची तालीम मिळाली. शिवाय तबला, हार्मोनिअम ही वाद्येही सरावाची झाली. लहानपणी ते जलतरंग हे वाद्य अत्यंत तयारीने वाजवीत.

दहा वर्षांच्या छोट्या गजाननाचा जलतरंगवादनाचा पहिला कार्यक्रम औंधमध्ये भवानराव पंतप्रतिनिधींनी आयोजित केला व ते वादन संपूर्ण संस्थानामध्ये कौतुक व कुतूहलाचा विषय होता.

औंधचे राजे पंतप्रतिनिधी यांनी स्वत:च्या कीर्तनाच्या साथीसाठी गजाननास हे वाद्य वाजवण्याची आज्ञा केली. वयाच्या तेराव्या-चौदाव्या वर्षी १९२३ च्या आसपास गजाननाने व्हायोलिन हे वाद्य हाती घेतले व स्वत:च्या एकलव्य परिश्रमाने साध्य केले. गजाननबुवांनी रूढ अर्थाने कोणाकडेही व्हायोलिनवादनाचे शिक्षण घेतले नव्हते. त्या काळात हिंदुस्थानी संगीतात या वाद्याचा प्रसार विशेष झाला नव्हता व हे वाद्य अल्पपरिचित होते. या वाद्यावर उत्तर हिंदुस्थानी रागसंगीताचा आविष्कार करणाऱ्या कलाकारांच्या पहिल्या पिढीतील गजाननबुवा जोशी हे एक अग्रश्रेणीचे कलाकार म्हणून नावाजले गेले. त्यांचे १९२८ पासून मुंबई रेडिओवर कार्यक्रम होऊ लागले. प्रभात फिल्म कंपनीच्या 'अयोध्येचा राजा' या पहिल्या बोलपटाच्या वाद्यवृंदात ते १९३० मध्ये सामील होते.

व्हायोलिनच्या स्वतंत्र मैफलींबरोबर पं. रविशंकर व उ. विलायत खाँ यांच्यासह केलेल्या जुगलबंदीच्या मैफलीही त्या काळी खूप गाजल्या. तत्कालीन महाराष्ट्रात 'व्हायोलिन म्हणजे पं. गजाननराव जोशी' असे समीकरण सिद्ध करणाऱ्या बुवांनी वादनाची एक स्वतंत्र शैली निर्माण केली. या पाश्चात्त्य वाद्यावर भारतीय रागसंगीताच्या प्रस्तुतीचे तंत्र व ढाचा त्यांनी तयार केला. व्हायोलिनसाठी त्यांनी खास अशा अनेक गतींच्या रचनाही केल्या. 'भारताचा यहुदी मेनुइन' म्हणून गजाननबुवांचा गौरव करण्यात आला.

आधी व्हायोलिनवादक म्हणून नावलौकिक कमवणाऱ्या पं. गजाननबुवा जोशी यांनी आपले वडील व गुरू अंतूबुवा, तसेच गायनाचार्य रामकृष्णबुवा वझे, भूर्जी खाँ, विलायत हुसेन खाँ अशा दिग्गजांकडून गायकीचीही तालीम प्राप्त केली. पुण्याच्या वास्तव्यात १९३५ पासून पुढची तीन-चार वर्षे गजाननबुवांनी पं. वझेबुवांकडून तालीम घेतली. उ. अल्लादिया खाँसाहेबांच्या शिष्या सूरश्री केसरबाई केरकर यांच्या गायनाचा गजाननबुवांवर खूप प्रभाव पडला व जयपूर घराण्याची गायकी आत्मसात करण्याचा त्यांनी निश्चय केला. ते पुण्यातले बिऱ्हाड मोडून कोल्हापूरला उस्ताद भूर्जी खाँ यांच्याकडे गाणे शिकायला गेले. १९४५ मध्ये गंडाबंधनाचा विधी करून उ. भूर्जी खाँसाहेबांकडे त्यांनी तालीम घेतली.

गजाननबुवांनी १९५३ ते १९६८ या काळात आकाशवाणीवर संगीत कार्यक्रमांचे सल्लागार म्हणून काम केले. तिथे त्यांची विलायत हुसेन खाँसाहेबांशी ओळख झाली व १९६३ साली, म्हणजे वयाच्या बावन्नाव्या वर्षी रीतसर गंडाबंधन करून त्यांनी उ. विलायत हुसेन खाँसाहेबांकडून आग्रा घराण्याची तालीम घेतली. अशा प्रकारे या तीन घराण्यांची तालीम मिळवून बुवांनी आपले गाणे व्यापक केले व ते ग्वाल्हेर-आग्रा-जयपूर घराण्यांचे मातब्बर गायक म्हणून प्रसिद्ध झाले.

आवाजाची अनुकूलता नसूनही त्यांनी अविरत रियाझाने, गायकीच्या प्रगल्भ चिंतनाने व रागमांडणीतील

ज

अस्सलपणाने एक गायक म्हणूनही मान्यता प्राप्त केली. गजाननबुवा हे एक नावाजलेले ‘तालिये’ होते, त्यांची तालावर विलक्षण हुकमत होती. उ. अहमदजान थिरकवा, शमसुद्दिन खाँ, दाऊद खाँ, अल्लारखा, विनायकराव घांग्रेकर, सामताप्रसाद, अनोखेलाल यांसारख्या कसलेल्या तबलावादकांसह त्यांच्या व्हायोलिन वादनाच्या व गायनाच्या अनेक मैफली गाजल्या.

गुरू गजाननबुवांचे सांगीतिक कार्य म्हणून फार उच्च दर्जाचे आहे. अशोक दा. रानडे, जयश्री पाटणेकर, मधुसूदन कानेटकर, उल्हास कशाळकर, अरुण कशाळकर, शुभदा पराडकर, पद्मा तळवलकर, वीणा सहस्रबुद्धे, तसेच कन्या सुचेता बिडकर व पुत्र मधुकर जोशी यांनी त्यांच्याकडून गायकीचे शिक्षण घेतले. श्रीधर पार्सेकर, जी.आर. निंबर्गी, पुत्तुर देवीदास जोशी, सुरेंद्र राव, त्र्यंबकराव तारे, राजाभाऊ देसाई, विष्णू सप्रे, वामनराव केतकर, भालचंद्र देव हे त्यांचे व्हायोलिनचे शिष्य होत.

गजाननबुवांनी आकाशवाणीवर संगीत सल्लागार म्हणून काम केले. तसेच मुंबई विद्यापीठाचे म्यूझिक सेंटर, आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमी (कोलकाता), इंदिरा कला विश्वविद्यालय (खैरागड) येथे संगीत-अध्यापनही केले. औंध येथे अनेक वर्षे शिवानंद संगीत समारोह आयोजित करून त्यांनी ग्रामीण भागात रागसंगीताची अभिरुची रुजवण्याचे कार्य केले.

व्हायोलिनवादनातील कार्यासाठी ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार (१९७२), सूरसिंगार संसद, मुंबई यांच्याकडून ‘तंत्रीविलास’ पुरस्कार (१९७४), गायनातील कारकिर्दीसाठी संगीत रिसर्च अकादमीचा ‘आय.टी.सी.’ पुरस्कार (१९८२), मध्यप्रदेश सरकारचा अत्यंत मानाचा ‘तानसेन सन्मान’ (१९८५) देऊन त्यांना सन्मानित केले.

गजाननबुवा जोशी यांनी प्रचलित, अप्रचलित रागांत सुमारे सत्तर-ऐंशी उत्तम बंदिशींची निर्मिती केली होती. गजाननबुवांच्या जन्मशताब्दी वर्षात अंतूबुवा व गजाननबुवांच्या बंदिशींचा ‘मालनिया गुंदे लावो’ हा संग्रह ध्वनिमुद्रिकेसह प्रकाशित झाला. गजाननबुवांचे डोंबिवली येथे निधन झाले.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**


१. *केतकर, वा.वि.; ‘पं. गजाननबुवा जोशी यांचे आत्मचरित्र आणि व्हायोलिनच्या गती’; मुंबई; १९७१.*

२. *बिडकर, सुचेता; ‘पुत्र व्हावा ऐसा’; पुणे; २०००.*


## जोशी, गोविंद नारायण

**गायक**

**६ एप्रिल १९०९ — २२ सप्टेंबर १९९४**



भावसंगीताच्या क्षेत्रात आरंभीच्या काळात ज्या कलाकारांनी पायाभरणीचे काम केले, त्यांपैकी एक महत्त्वाचे नाव म्हणजे जी.एन. (गोविंद नारायण) जोशी.

गोविंद नारायण जोशी यांचा जन्म खामगाव येथील एका सुशिक्षित कुटुंबात झाला. जोशींना उंच पट्टीच्या, खणखणीत, पण गोड आवाजाची निसर्गदत्त देणगी लाभली होती. गळ्यात सहज फिरत, चापल्य होते व शब्दोच्चारही सुस्पष्ट होते. त्यांचे वडील नारायण महादेव ऊर्फ अप्पासाहेब जोशी हे खामगावामधील नामांकित वकील होते. त्यांच्या शेजारीच नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर राहत. त्यामुळे तेथे अनेक कलाकार, साहित्यिकांची नित्य वर्दळ असे. या कारणाने लहान वयातच जी.एन. जोशींना मास्तर कृष्णराव, मास्टर दीनानाथ, इ. अनेक दिग्गज कलाकारांचा सहवास मिळाला.

खामगावला त्यांच्या वाड्यातच बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या परंपरेतील रामभाऊ सोहोनी यांनी गायनवर्ग सुरू केला व सोहोनींकडे जोशींचे पायाभूत संगीतशिक्षण झाले. पुढे ते शिक्षणाच्या निमित्ताने पुण्यास

फर्गसन महाविद्यालयात आले. त्यांनी या वास्तव्यात मिराशीबुवा, कृष्णराव पंडित, बापूराव केतकर, इ. कलाकारांना ऐकले. बालगंधर्वांनी आपल्या गायन-अभिनयाने १९२६-२७ च्या काळात साऱ्या मराठी मनावर मोहिनी पसरविली होती, त्यांचा प्रभाव जोशींवरही पडला. याच काळात ते छोट्याखानी मैफली करू लागले. त्यांनी प्रख्यात कवी हरिंद्रनाथ व कमलादेवी चट्टोपाध्याय यांच्या 'हारून उल् रशीद' या नाटकाच्या एका प्रयोगात फकिराची भूमिकाही केली. नंतर नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामध्ये ते दाखल झाले व तेथे दिनकरराव पटवर्धन यांच्याकडे ग्वाल्हेर घराण्याच्या गायकीचे शिक्षण झाले.

कवी ना.घ. देशपांडे हे जोशींचे वर्गमित्र होते. त्यांनी १९२९ साली 'शीळ' ही कविता लिहिली आणि जोशींनी तिला चाल लावून गायला सुरुवात केली. जोशींनी १ जानेवारी १९३१ रोजी मुंबईच्या आकाशवाणीवर आपला पहिला कार्यक्रम दिला, त्यात ही कविता गायली आणि अल्पावधीतच ती लोकप्रिय ठरली. ते १९३१ साली मुंबईस राहू लागले. एका मैफलीत एच.एम.व्ही. कंपनीच्या रमाकांत रूपजींशी ओळख झाली व त्यांनी या तरुण गायकाचे कसब लक्षात घेऊन त्यांच्याकडून पहिल्याच बैठकीत १४ गाणी ध्वनिमुद्रित करून घेतली.

जोशी यांच्या आवाजात १९३२ साली 'रानारानात गेली बाई शीळ' (कवी ना.घ देशपांडे), 'डोळे हे जुल्मी गडे' (कवी भा.रा. तांबे), 'प्रेम कोणीही करेना' (कवी माधव ज्युलिअन) अशी भावगीते, तसेच राग नंद, 'जाके मथुरा' व 'गोरी धीरे चलो' असे दादरे, यांच्या ध्वनिमुद्रिका एच.एम.व्ही.ने काढल्या. त्या कमालीच्या लोकप्रिय ठरल्या व जोशींचे नाव एक भावगीत गायक म्हणून मराठी, पारशी, गुजराती समाजात गाजू लागले. त्यांनी १९३३ साली 'तुळसीदास' या बोलपटातही मुख्य भूमिका व गायन केले. त्यांनी १९३६ साली आफ्रिकेत चार महिन्यांचा, ५० मैफलींचा यशस्वी दौरा केला. रागदारी व ठुमरीच्या ढंगाची त्यांनी गायलेली भावगीते त्या काळात खूप गाजली व त्यामुळे भावगीत गायनास विलक्षण लोकप्रियता मिळाली.

'मोही जनास' - कवी अज्ञातवासी (१९३४ ), 'प्रिय जाहला कशाला', 'माझ्या फुला उमल जरा' -कवी विठ्ठलराव घाटे (१९३६), 'मंजूळ वच बोल' (लीला लिमयेसह), 'चल रानात सजणा, 'जादुगारिणी सखे साजणी' - कवी स.अ. शुक्ल (१९३९), 'कन्हैया दिसशी किती साधा' - कवी स.अ. शुक्ल (१९४०), 'नदी किनारी, फार नको वाकू' - कवी ना.घ. देशपांडे (१९४१) अशी त्यांची अनेक भावगीते विलक्षण गाजली.

त्या काळात ख्यालगायकीचे मराठीतील प्रतिरूप शोभतील अशी चीजवजा पदेही जोशींनी गायली. त्यात त्यांच्या गळ्याची तयारी, ख्यालगायकीतील लकब जाणवते. उदा. 'गोड गोड मुरली वाजवी' (तिलंग), 'उगाच रुसवा' (काफी), 'वसुंधरा ही सुंदरा' (बहार), 'कान्हा तव बासरी' (पटदीप), 'बावरी संभ्रमा' (मिश्र देस), 'या तारका' (मालकंस).

कवी स.अ. शुक्ल यांची 'चकाके कोर चंद्राची' व 'तू तिथे अन् मी इथे' ही दोन युगुलगीते तेव्हाच्या गांधारी, नंतर गंगूबाई हनगल यांच्यासह जी.एन. जोशींनी गायली. तसेच अभंग, अंगाईगीत, कव्वाली, गझल असेही गीतप्रकार त्यांनी समर्थपणे हाताळले. कवी यशवंत यांची 'आई' ही कविता, माधव जूलिअन यांची 'संगमोत्सुक डोह' (आठ कडव्यांची दीर्घ कविता), ना.घ. देशपांडे यांची 'अंतरीच्या गूढगर्भी' अशा गाजलेल्या मराठी कवितांचे गायनही त्यांनी केले. ते खऱ्या अर्थाने काव्यगायन होते, त्यांची गायकी शब्दप्रधान होती.

काव्य सादर करताना चालींत सुंदर हरकती, छोट्याच व दाणेदार ताना, रागमिश्रणे असत. त्यांच्या या भावगीतगायनावर ख्याल, ठुमरी व नाट्यसंगीताचा प्रभाव होता; पण या शैलींना त्यांनी फार कल्पकतेने शब्दप्रधान गीत मांडण्यासाठी वापरले. गीतात मुखडा तालासह गायचा व अंतऱ्यांना विनाताल, मोकळेपणाने पेश करायचे हा गझलमधील ढंगही

ज

त्यांनी प्रभावीपणे वापरला. त्यांनी लोकसंगीत व भजनाचाही बाज वापरला.

जी.एन. जोशी यांचे रूढ शिक्षण बी.ए., एलएल.बी. असे झाले असले, तरी त्यांनी वकिली व्यवसायात न गुंतता आपली कारकीर्द गायक म्हणूनच गाजवली. त्यांनी १ जून १९३८ ते ३१ मार्च १९७० या काळात एच.एम.व्ही. कंपनीत ध्वनिमुद्रण अधिकारी म्हणूनही महत्त्वपूर्ण कार्य केले. कलाकारांची मिजास सांभाळून, त्यांना खूष करून त्यांच्याकडून उत्तम कलाविष्कार ध्वनिमुद्रित करून घेण्याचे कसब जी.एन. जोशींकडे होते. त्यांच्या पुढाकारामुळे कित्येक कलाकारांनी ध्वनिमुद्रणासाठी मान्यता दिली व अनेक महान कलाकारांची अद्भुत कला ध्वनिमुद्रणांच्या रूपाने उपलब्ध करून देण्याचे श्रेय जोशींना द्यावे लागते.

गोविंद जोशींनी 'स्वरगंगेच्या तीरी' (१९७७, मुंबई) हे 'स्वानुभवकथन' करणारे पुस्तक लिहिले. या पुस्तकात जोशींनी स्वतःचे सांगीतिक आयुष्य रेखाटले, शिवाय एच.एम.व्ही. कंपनीतील कारकिर्दीत अनेक कलाकारांचे आलेले अनुभवही शब्दबद्ध केले.

त्यांच्या या लेखनात सहजसोपी, पण नर्मविनोदी भाषा आहे व त्यातून त्यांचे एक व्यक्ती व गायक म्हणून असणारे अनेक पैलू उलगडत जातात. या पुस्तकाचे इंग्लिशमध्ये 'डाउन मेमरी लेन' (१९८४) या नावाने प्रकाशन झाले. खास करून विदेशी अभ्यासकांना भारतीय संगीताची तोंडओळख व्हावी या उद्देशाने त्यांनी 'अंडरस्टॅण्डिंग इंडियन म्यूझिक' हेही पुस्तक लिहिले होते.

मुंबईत असताना गोविंद जोशी यांना आग्रा घराण्याच्या गायकीसाठी जगन्नाथबुवा पुरोहित यांचेही मार्गदर्शन लाभले. त्यांनी मैफलींच्या निमित्ताने ब्रिटन (१९७०), अमेरिका व कॅनडा (१९७२-७३) असे परदेश दौरेही केले. त्यांचे मुंबई येथे निधन झाले.

जी.एन. जोशींच्या जन्मशताब्दीनिमित्त २००९ साली अनेक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले, तसेच त्यांच्या 'स्वरगंगेच्या तीरी' या पुस्तकाची वाढीव आवृत्ती प्रसिद्ध झाली, तसेच एच.एम.व्ही. कंपनीनेही त्यांच्या गायनाच्या दोन ध्वनिचकत्यांचा संच प्रकाशित केला.

— चैतन्य कुंटे

## जोशी, दत्तात्रय केशव
**संगीत शास्त्रकार**
**१८६० — १९३७**



दत्तात्रेय केशव जोशी यांच्या जन्म व मृत्यू यांचे निश्चित तपशील उपलब्ध नाहीत. ते पुण्याचे रहिवासी होते. ते १८९६ साली पुण्यात नूतन मराठी विद्यालयात शिक्षक म्हणून नोकरीत रुजू झाले. तेव्हापासूनच त्यांनी गायनाची कला व शास्त्र या दोहोंचा अभ्यास सुरू केला. प्रसिद्ध गायक गणपतीबुवा भिलवडीकर यांच्याकडे ते सात वर्षे गायन शिकले. हरिभाऊ आपटे यांच्या मध्यस्थीने १९०५ पासून ते 'पुणे गायन समाजा'चे मानद सचिव झाले. सदर संस्थेचे काम त्यांनी नेटाने पाहिले. पुढे बलवंतराव सहस्रबुद्धे यांच्याशी मतभेद झाल्यामुळे त्यांनी संस्था सोडली.

त्यांचा १९१० पासून पं. विष्णू नारायण भातखंडे यांच्याशी परिचय झाला व त्या दोघांमधील स्नेह शेवटपर्यंत राहिला. पं. भातखंडे व जोशी हे परममित्र व सहयोगी बनले. ग्वाल्हेर घराण्याच्या, भिलवडीकरबुवा यांच्याकडून शिकलेल्या चारशे बंदिशींचे स्वरलेखन जोशी यांनी केले. या बंदिशी १९१२ साली भातखंडे यांना दिल्या. त्यांचा समावेश भातखंडे यांनी 'क्रमिक पुस्तक मालिके'त केला. सदर चारशे अस्सल बंदिशी प्रसिद्धीसाठी उपलब्ध करून देऊन बंदिशींचे जतन करण्याचे महत्त्वपूर्ण कार्य जोशी यांनी केले.

संगीताचे एक शास्त्रकार म्हणूनही जोशी यांचे योगदान महत्त्वाचे आहे. अनेक संगीत परिषदांमध्ये त्यांनी संगीतविषयक शोधनिबंधांचे वाचन केले.

‘दहाव्या शतकानंतर रागगायन विकसित झाले, तेराव्या शतकापर्यंत श्रुती हे ध्वनिमापनाचे साधन समप्रमाण होते, तसेच या शतकापर्यंत भारतभरात एकच संगीतपद्धती प्रचलित होती, सध्याचे बिलावलचे सप्तक तानसेनच्या काळात मुख्य स्वरसप्तक म्हणून प्रचारात आले’, अशी संगीताच्या इतिहासासंदर्भातील काही महत्त्वपूर्ण प्रमेये त्यांनी मांडली.

जोशी यांनी ‘रागलक्षण’ व नारदकृत ‘चत्वारिंशच्छतरागनिरूपणम्’, (१९१४), लोचनपंडितकृत ‘रागतरंगिणी’, श्रीनिवासपंडितकृत ‘रागतत्त्वविबोध’, पुंडरिक विठ्ठलरचित ‘रागमंजिरी’, हृदयनारायणदेवविरचित ‘हृदयप्रकाश व हृदयकौतुकम्’, व्यंकटमखीकृत ‘चतुर्दण्डिप्रकाशिका’ (१९१८), संगीतराय भावभट्टविरचित ‘अनुपसंगीतरत्नाकर व अनुपसंगीतांकुश’ (१९१९), ‘अनुपसंगीतविलास’ (१९२१) हे संगीतविषयक संस्कृत ग्रंथ संपादित करून प्रसिद्ध करण्याचे मोलाचे कार्यही केले. या संस्कृत ग्रंथाच्या उपलब्धतेमुळे संगीत क्षेत्रातील संशोधन सुरू झाले व संगीतशास्त्रात मोठी भर पडली. भातखंडे यांनी १९२० साली ‘क्रमिक पुस्तक मालिका’ प्रसिद्ध केली, त्यांचे संपादनही जोशी यांनी केले. त्यांनी ‘रागकोश’, ‘हिंदुस्थानी संगीत प्रकाश’ ही पुस्तकेही स्वतंत्रपणे लिहिली.

दत्तात्रेय जोशी यांनी केतकरांच्या मराठी ज्ञानकोशासाठीही लेखन केले होते. या ज्ञानकोशात संगीत, राग, ताल, वाद्य, वृंदसंगीत अशा विषयांवर त्यांनी लेख लिहिले, तसेच ‘महाराष्ट्र शब्दकोशा’साठी सुमारे अठराशे संगीतविषयक संज्ञांचे लेखन विनामूल्य केले. मराठी भाषेतील संगीतविषयक शास्त्रलेखनात त्यांनी ही मोलाची भर घातली आहे. संगीताच्या इतिहासाचे संपादन करून तो प्रकाशात आणण्याचे कामही दत्तात्रेय जोशी यांनी केले.

पं. भातखंडे यांच्या विनंतीवरून लखनौच्या ‘मॉरिस म्यूझिक महाविद्यालया’त ते दोन वर्षे उपप्राचार्य म्हणून कार्यरत होते. तेथे शास्त्र व गायन यांच्या प्रात्यक्षिक वर्गांना त्यांनी शिकविले. पुण्यातील हिंगणे येथील महर्षी कर्वे यांच्या स्त्री-शिक्षण संस्थेसाठी त्यांनी संगीताचा अभ्यासक्रम आखून दिला. तेथे दोन वर्षे विनामूल्य व्याख्याने दिली व अनेक वर्षे परीक्षक म्हणूनही काम पाहिले. संगीत शिक्षणाच्या संदर्भात त्यांचे हे नि:स्वार्थी कार्य दखल घेण्याजोगे आहे.

व्यवसायाने वकील असणारे त्यांचे पुत्र लक्ष्मण जोशी यांनी त्यांच्या संगीतकार्याचा वारसा काही अंशी चालवला. त्यांचे १९३५ साली ‘संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास’ हे पुस्तक प्रकाशित झाले.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

१. *जोशी, लक्ष्मण दत्तात्रेय; ‘संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास’; पुणे; १९३४.*
२. *सिंह, ठाकूर जयदेव; ‘इंडियन म्यूझिक’; संगीत रिसर्च अकादमी, कोलकाता; १९९५.*

## जोशी, दमयंती

**नर्तिका**

**५ डिसेंबर १९२८ - १९ सप्टेंबर २००४**



भारतातील ख्यातनाम कथक नृत्यांगनांपैकी एक म्हणून महाराष्ट्रातील गुरू दमयंती जोशी यांचे नाव घेतले जाते. त्यांचा जन्म मुंबई येथे एका सामान्य चाळीतील सर्वसामान्य कुटुंबात झाला. त्यांच्या जन्मानंतर काही महिन्यांतच त्यांच्या वडिलांचे निधन झाले. या दुर्दैवी घटनेनंतर दमयंती यांना मातु:श्रीसोबत खडतर परिस्थितीला सामोरे जावे लागले.

त्या चार वर्षांच्या असतानाच त्यांचे नृत्यातील गुण ओळखून त्यांच्या मातोश्रींनी त्यांना सीताराम प्रसाद यांच्याकडे नेले व त्यांचे प्राथमिक नृत्यशिक्षण सुरू झाले. थोड्या काळातच गुरूंनी या शिष्येला शालेय व

नृत्यातील उत्तम शिक्षणाकरिता एका उच्चभ्रू कुटुंबात सोपवावे असे त्यांच्या मातु:श्रींना सांगितले. याप्रमाणे दमयंती यांना हाफकिन इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर श्री. सोखी यांच्या पत्नी श्रीमती लीला सोखी ऊर्फ विश्वविख्यात नर्तिका मॅडम मेनका यांनी आश्रय दिला.

यामुळे दमयंती यांना लहान वयातच उच्चभ्रू व उत्तम जीवनशैली मिळाली. त्याचबरोबर इंग्रजांच्या काळात युरोपियन गव्हर्नेसकडून दीक्षा व उत्तम शाळेत शिक्षण मिळाले. हे शिक्षण चालू असतानाच हाफकिन इन्स्टिट्यूटमुळे नृत्याची तालीमपण उत्तम प्रकारे सुरू होती. स्वत: मॅडम मेनका यांच्या डोळस निगराणीत त्या अत्यंत दर्जेदार, शिस्तबद्ध व लालित्यपूर्ण नृत्यांगना म्हणून बहरत गेल्या. पुढे रुइया महाविद्यालय, मुंबई येथून इंग्रजी विषय घेऊन त्यांनी ऑनर्स ही पदवी संपादन केली. याबरोबर त्यांनी कथकनृत्यातील श्रेष्ठ गुरू पं. शंभू महाराज, पं. लच्छू महाराज, पं. रामगोपाल यांच्याकडून उत्तम मार्गदर्शन घेतले. तसेच मणिपुरी, भरतनाट्यम् या नृत्यशैलींचेही त्यांनी शिक्षण घेतले होते.

खंडाळा येथील मॅडम मेनका यांच्या नृत्यालयात विविध शैलींतील ख्यातनाम गुरू शिकवण्यासाठी येत असत, ज्याचा लाभ दमयंती जोशी यांना झाला. मॅडम मेनका यांच्या चमूसह भारतात व परदेशात (लंका, मलाया, ब्रह्मदेश, युरोप) त्यांनी आपले कलाप्रदर्शन केले.

कालांतराने दमयंती जोशी यांनी मॅडम मेनका यांचे नृत्यपथक सोडून स्वतंत्र कार्यक्रम करण्यास सुरुवात केली. त्यांची नृत्यशैली अत्यंत नजाकतीची, ठहराव असलेली व लालित्यपूर्ण अशी होती. लखनौ व जयपूर या दोन्ही घराण्यांच्या तालमींसह इतरही नृत्यशैली शिकण्यामुळे त्यांच्या कथक नृत्यप्रस्तुतीला बाधा न येता एक वेगळी मिती प्राप्त झाली होती. विलंबित लयीत थाट, गत निकास यांमध्ये त्यांचे नैपुण्य दिसून येत असे. त्या कथकमधील सूक्ष्मतम हावभाव अतिशय सौंदर्यपूर्ण तऱ्हेने पेश करीत असत. विशेष म्हणजे, नृत्याबरोबर त्यांची वेशभूषा, अलंकार इ. अतिशय आकर्षक असत. कधी भरजरी घागरा नेसून, तर कधी भरजरी राजेशाही शालू नेसून त्या जेव्हा रंगमंचावर येत असत, तेव्हा नृत्यातील निपुणतेबरोबर चोखंदळ निवड असलेले शालीन व सुंदर रूप पाहून रसिक मंत्रमुग्ध होत असत.

भारतात व भारताबाहेर अनेक संगीत-संमेलनांमध्ये त्यांना आमंत्रित केले जाऊ लागले व त्यांचे दौरेही यशस्वी झाले. भारतातील अनेक मान्यवर संस्थांमध्ये त्यांनी महत्त्वाची पदे भूषविली. भारत सरकारद्वारा चीन व जपान येथे जे सांस्कृतिक मंडळ पाठविले गेले, त्याच्या सदस्यत्वाचा मान दमयंती जोशी यांना मिळाला. ज्या काळी महाराष्ट्रात नृत्यकलेकडे, विशेषत: महिला कलाकारांकडे तेवढे आदराने पाहिले जात नव्हते, त्या काळी नृत्यक्षेत्रात त्यांनी स्वत:चा ठसा उमटविला व नंतर येणाऱ्या अनेक पिढ्यांना एक दालनच उघडून दिले व नृत्यकलेला समाजामध्ये मानाचे स्थान मिळवून दिले. त्यांचे एक ज्येष्ठ शिष्य बिरेश्वर गौतम यांना त्यांच्याकडून विशेष मार्गदर्शन मिळाले. त्यांना बर्लिन (जर्मनी) येथे 'डान्स ऑलिम्पियाड'मध्ये, 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार, दिल्ली व 'महाराष्ट्र राज्य संगीत नृत्य अकादमी' पुरस्कार, भारत सरकारतर्फे 'पद्मश्री' इत्यादी महत्त्वाचे पुरस्कार मिळाले आहेत.

अशा एका बाणेदार, करारी व एकांतप्रिय कलावतीचे निधन मुंबईतील राहत्या घरी झाले. शेवटचे काही दिवस त्या पूर्ण एकाकी आणि विविध व्याधींशी झगडत होत्या. भारत सरकारने त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ एक चित्रपट तयार केला आहे.

— आसावरी राहाळकर

## जोशी, नरहर विष्णू

***जोशी, बाबूराव***

**संगीतविषयक लेखक व प्रसारक**

**३१ डिसेंबर १९०८ – ११ नोव्हेंबर १९८४**

महाराष्ट्रात संगीताच्या क्षेत्रात ज्या व्यक्तींनी आपले लेखन व अन्य उपक्रमांद्वारे संगीताची अभिरुची संवर्धित



करण्यासाठी मोठे योगदान दिले, त्यांत नरहर विष्णू तथा बाबूराव जोशी यांचे नाव अग्रक्रमाने नोंदवावे लागते. त्यांचा जन्म संगीताने भारलेल्या कोल्हापुरात झाला. विष्णू विनायक जोशी व लक्ष्मीबाई हे त्यांचे पिता-माता होत. त्यांचे वडील व्यवसायाने वकील होते.

नरहर जोशी यांचे शिक्षण कोल्हापुरात राजाराम महाविद्यालय व नंतर पुण्यात डेक्कन महाविद्यालयात झाले. त्यांनी १९३० च्या सुमारास एलएल.बी. ही वकिलीची पदवी प्राप्त केली व कोल्हापुरात दिवाणी न्यायालयात अत्यंत यशस्वितेने सुमारे १९७८ पर्यंत व्यवसाय केला. पत्नी शांताबाई व चार अपत्यांचा संसारही त्यांनी नेटका केला. मात्र, या वकिलीच्या व्यवसायाबरोबरच त्यांचे संगीत क्षेत्रातील महत्त्वाचे कार्य नावाजले गेले.

वडिलांच्या प्रोत्साहनाने नरहरांचे संगीताचे शिक्षण प्रथम वामनराव पाध्ये (ग्वाल्हेर घराणे) यांच्याकडे सुरू झाले. तसेच गुंडोपंत वालावलकर, विश्वनाथबुवा जाधव, अण्णाबुवा इचलकरंजीकर यांचेही मार्गदर्शन त्यांना अल्पकाल मिळत गेले. मग जयपूर अत्रौली घराण्याची तालीम उ. नथ्थन खाँ, उ. भुर्जी खाँ आणि पं. गोविंदबुवा शाळिग्राम यांच्याकडे मिळाली. उ. अल्लादिया खाँसाहेबांचा सहवास व गोविंदराव टेंब्यांचा स्नेहही त्यांना लाभला. पं. जगन्नाथबुवा पुरोहित तथा 'गुणिदास' यांचेही मार्गदर्शन त्यांना लाभले. याखेरीज उ. घम्मन खाँ यांनी ठुमरी-दादरा, लावणी यांचीही खास नजर त्यांना दिली. उत्तम रितीने मैफली ढंगाचे गायन करू शकणाऱ्या नरहर जोशी यांनी आपले लक्ष संगीताच्या प्रसार व उद्बोधनाकडे वळवले.

संगीतकला व कलाकार यांविषयी असणाऱ्या आस्थेमुळे बाबूराव जोशी यांनी रसिकांना अभिजात संगीत अधिक उमजावे, त्यांची अभिरुची समृद्ध व्हावी या उद्देशाने अनेक उपक्रम केले. 'संगीताचे रसग्रहण' (१९५६, दुसरी आवृत्ती : १९६१) हे त्यांचे पुस्तक संगीतरसिकांस संगीताची मर्मस्थळे सांगत संगीताचा आस्वाद कसा घ्यावा याची योग्य दिशा देते. याच तऱ्हेने त्यांनी 'अंडरस्टॅण्डिंग इंडियन म्यूझिक' (१९६३) व ॲन्थशर लोबो यांसह लिहिलेल्या 'इंट्रोड्युसिंग इंडियन म्यूझिक' (४ ध्वनिमुद्रिकांसह, १९६५) या इंग्रजी ग्रंथाद्वारे परदेशीय श्रोत्यांना भारतीय संगीताच्या रसास्वादाची सूत्रे सांगितली आहेत.

'संगीताने गाजलेली रंगभूमी' (१९५९; दुसरी आवृत्ती : १९७४) या पुस्तकात त्यांनी मराठी संगीत रंगभूमीचा ऐतिहासिक पट उलगडला आहे. लहान वयातील मुलांस भावतील अशा साध्यासोप्या (मनोहर कवीश्वर कृत) गीतांद्वारे संगीताची मूलतत्त्वे रुजवण्याचा प्रयत्न त्यांच्या 'बालसंगीत' या पुस्तकाद्वारे त्यांनी केला. या पुस्तकाचा हिंदी अनुवादही प्रसिद्ध झाला. 'छंदशास्त्र आणि संगीत' (१९८०) हा त्यांचा ग्रंथ अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. काव्यछंदांच्या पारंपरिक चाली मिळवून एकंदर मराठी संगीतातील वृत्तछंद व त्यांचे सांगीत रूप यांचे समग्र दर्शन घडवणारा हा मौलिक ग्रंथ आहे.

'माझी मुशाफिरी' (१९८४) हे त्यांचे आत्मचरित्रपर पुस्तक त्यांच्या काळातील महाराष्ट्रातील संगीताच्या स्थितीवर चांगला प्रकाश पाडते. बाबूराव जोश्यांच्या या एकंदर सात ग्रंथांतील लेखनाचे वैशिष्ट्य असे, की संगीताच्या अभिरुचीचे संवर्धन करण्याचा उद्देश असल्याने अत्यंत सरलतेने, आकर्षकपणे त्यांनी हे लेखन केले आहे, तसेच 'छंदशास्त्र व संगीत' या ग्रंथात एका शास्त्रकाराची शिस्तही आहे. 'संगीताचे रसग्रहण', 'इंट्रोड्युसिंग इंडियन म्यूझिक', 'बालसंगीत' व 'छंदशास्त्र आणि संगीत' या चार पुस्तकांसह विवेचन व गायन असलेल्या ध्वनिमुद्रिकांद्वारे प्रत्यक्ष कर्णप्रत्यय देण्याचा स्त्युत्य उपक्रम बाबूरावांनी केला. यातून आधुनिक काळातील तंत्रज्ञानाचा वापर करून आपले कार्य सुकर करण्याची त्यांची पुरोगामी दृष्टीही लक्षात येते. (या संगीतविषयक पुस्तकांखेरीज 'कोल्हापूरचे जे.पी.

ज

नाईक' हे पुस्तकही बाबूरावांनी १९८२ साली लिहिले.) या ग्रंथलेखनासह त्यांनी गावोगावी संगीतविषयक व्याख्याने (विशेषत: 'संगीताचे रसग्रहण' या विषयावर), शिबिरे, कार्यक्रम करून अभिरुचिसंवर्धन केले. त्यांनी लोबोंसह इंग्रजी भाषेतूनही सप्रयोग व्याख्याने दिली. हे कार्य त्यांनी 'मिशनरी' वृत्तीने केले. अगदी खेडोपाडी जाऊन तेथील संगीत शिक्षकांस ते आपल्या 'बालसंगीत' पुस्तक व ध्वनिमुद्रिकेद्वारे शालेय स्तरावर संगीतशिक्षण कसे द्यावे याचा वस्तुपाठ देत असत.

ज

ते १९५६ साली झालेल्या महाराष्ट्र तमाशा परिषदेच्या पुणे अधिवेशनाचे उद्घाटक होते व त्यांनी या प्रसंगी लावणी संगीतावर व्याख्यान दिले होते. दर आठवड्यातून दोन भागांत प्रसारित होणारी, सुमारे ५० भागांची 'धन्य ते गायनी कळा' ही संगीतरसग्रहणपर मालिका त्यांनी आकाशवाणीवरून सादर केली. यात त्यांचे भाष्य व सरला भिडे यांचे गायन असे स्वरूप होते.

बाबूरावांनी अनेकांना संगीताचे मार्गदर्शन केले, त्यांत भारती वैशंपायन, माणिक भिडे या काही ठळक गायिका होत. डॉ. भारती वैशंपायन (शिवाजी विद्यापीठाच्या संगीत विभाग प्रमुख) यांनी त्यांच्याकडे विशेषत: उपशास्त्रीय संगीताचे मार्गदर्शन घेतले व त्यांना बाबूरावांचा दीर्घकाळ सहवास लाभला. ध्वनिमुद्रिकांतील गायनाच्या निमित्ताने सरला भिडे, सुधीर पोटे यांनीही त्यांचे मार्गदर्शन घेतले.

संगीतात अखेरपर्यंत रममाण असलेल्या बाबूराव जोशी यांचे पुण्यात वृद्धापकाळाने निधन झाले. महाराष्ट्र राज्य सरकारचा ललित आणि सौंदर्यशास्त्र गटातील सर्वोत्कृष्ट लेखनासाठीचा १९८१-८२ सालचा पुरस्कार 'छंदशास्त्र आणि संगीत' या ग्रंथाच्या लेखनासाठी बाबूराव जोशी यांना मरणोत्तर देण्यात आला.

– चैतन्य कुंटे

## जोशी, बाबूराव

☛ *जोशी, नरहर विष्णू*

## जोशी, भीमसेन गुरुराज

**गायक**

**४ फेब्रुवारी १९२२ – २४ जानेवारी २०११**



मध्ययुगात तानसेन हा गायक-नायक जसा धृपदगायनाच्या संदर्भात एक मानदंड मानला गेला होता, तसेच पंडित भीमसेन गुरुराज जोशी यांचे नाव आधुनिक काळात ख्यालगायकीच्या संदर्भात घेतले जाते. किराणा घराण्याच्या कक्षा रुंदावणारे त्यांचे ख्यालगायन, आर्त ठुमरी, सात्त्विक संतवाणी, रंगतदार रंगवाणी, भावपूर्ण भाव-चित्रगीते यांचा गहिरा ठसा भारतीय जनमानसावर गेली सुमारे सात दशके व चार पिढ्यांवर उमटला आहे.

कर्नाटकातील गदगजवळच्या होंबळ या छोट्याशा गावी ज्योतिषी असणाऱ्या जोशी घराण्यातील भीष्माचार्य जोशी हे गोड आवाजात पुराण सांगत. त्यांचे ज्येष्ठ पुत्र गुरुराज जोशी हे गदग येथे शिक्षकी पेशा करत. गुरुराज व रमाबाई जोशी या दांपत्यास रोण या गावी रथसप्तमीस पहिला मुलगा झाला व आजोबांच्या नावावरून त्याचे नाव 'भीमसेन' असे ठेवले.

लहानपणी आईच्या सुरेल ओव्या, भजनांचा संस्कार भीमसेनवर झाला. स्वरांचे विलक्षण आकर्षण या बालकास होते व किराणा घराण्याचे अध्वर्यू गायक अब्दुल करीम खाँसाहेब यांच्या ध्वनिमुद्रिकांतले 'फगवा ब्रिज देखन को' (बसंत) व 'पिया बिन नहीं आवत चैन' (ठुमरी) या रचनांचे गायन बालवयातच त्याच्या मनावर ठसले. मुलाचे हे गायनवेड वडिलांनी ओळखले व हुच्च हणमंताचार्य यांच्याकडे भीमसेन जोशींनी १-२ वर्षे प्राथमिक धडे घेतले.

त्यांनी १९३२ साली गदग येथे सवाई गंधर्वांचा जलसा प्रथमच ऐकला व त्या गायनाने त्यांच्या मनावर विलक्षण मोहिनी घातली. हे स्वरप्रधान अस्सल रागसंगीत ऐकून त्यांनी रागविद्या आत्मसात करायचा

दृढनिश्चय केला. त्यासाठी त्यांनी आपले घर, गाव सोडून पलायन केले व मुंबई गाठली. पण कानडीशिवाय अन्य भाषा येत नाही, इतर शिक्षण नाही व कुणाशी परिचयही नाही – त्यामुळे ते विजापूरमार्गे घरी परतले. या प्रथम पलायनानंतरही जोशींच्या मनात गाणे शिकण्याची तळमळ त्यांना स्वस्थ बसू देणारी नव्हती. वडिलांनी त्यांना अगसरू चनप्पा कूर्तकोटी यांची शिकवणी लावली; पण त्याने भीमसेन यांचे समाधान झाले नाही. त्यांच्या मनाने पुन्हा उसळी घेतली व पलायन केले.

गदगपासून प्रवास करत भीमसेन जोशी ग्वाल्हेरला पोहोचले. त्यांनी प्रख्यात सरोदिये हफिज अली खाँ यांच्याकडे शागिर्दी केली. राजाभैया पूछवाले यांच्या सांगण्यावरून ते खडगपूरला केशव लुखे यांच्याकडे शिकले, तसेच कलकत्ता (कोलकाता) येथे प्रख्यात बंगाली गायक पहाडी सन्याल यांच्याकडे उमेदवारी केली. पुढे दिल्लीला चांद खाँ, जालंधर येथे अंध धृपदिये मंगतराम यांच्याकडेही शागिर्दी केली. या काळात भीमसेन जोशींनी अनेक बुजुर्गांचे गाणेबजावणे खूप ऐकले. जालंधरच्या संगीत संमेलनात पं. विनायकबुवा पटवर्धन यांची भेट झाली. त्यांनी भीमसेन जोशींचा कष्टदायक प्रवास ऐकून कुंदगोळ येथे सवाई गंधर्वांकडे तालीम घेण्याचा सल्ला दिला.

भीमसेन जोशींचे १९३५ सालापासून कुंदगोळ येथे सवाई गंधर्वांकडे संगीतशिक्षण सुरू झाले. भीमसेन जोशींनी कष्टाची कामेही गुरुगृही श्रद्धेने केली. आपल्या शिष्याची चिकाटी, परिश्रमाची तयारी जोखून मगच सवाई गंधर्वांनी खरी तालीम सुरू केली. वर्षभर पूरिया रागाची तालीम मिळाली. तो राग कंठसिद्ध झाल्यावर तोडी, मुलतानी, मल्हार, ललित, यमन, मालकंस, दरबारी अशा किराणा घराण्याच्या खास आलापप्रधान रागांची विस्तृत तालीम सवाई गंधर्वांनी दिली. शिवाय गंगूबाई हनगळ यांचीही तालीम जोशींना ऐकायला मिळाली. सवाई गंधर्वांच्या मैफलींत स्वरसाथ करताना मैफलीत रंग जमवण्याचे तंत्रही समजत गेले. ही तालीम त्यांना १९३९ पर्यंत सलगपणे मिळाली.

नंतर भीमसेन जोशींनी वर्षभर रामपूरला उ. मुश्ताक हुसेन खाँ यांची तालीम घेऊन नटमल्हार हा राग शिकून घेतला. लखनौला सिद्धेश्वरीदेवी, बेगम अख्तर, बिस्मिल्ला खाँ, अनोखेलाल, रातंजनकर, व्ही.जी. जोग, गिंडे, भट, इ. अनेक उत्तमोत्तम कलाकारांचा सहवास त्यांना लाभला. लखनौच्या वास्तव्यात भीमसेन जोशींनी स्वरसाधनेबरोबरच बलोपासनाही पुष्कळ केली, व्यायामाने शरीर कमवले, दमसास मिळवला. तेथे ते आकाशवाणीवर नियमितपणे गाऊही लागले. दुसऱ्या महायुद्धाच्या अनिश्चिततेच्या काळात ते पुन्हा गदगला परतले. त्यांनी १०-१२ तासांचा रियाज अविरतपणे केला व त्यातून आपला आवाज घडवला, गायकीचे शिल्प साकारले. मग मैफलींचा अनुभव घेण्यासाठी त्यांनी धारवाडपासून मद्रासपर्यंत पहिला दौरा यशस्वीपणे केला.

पहिल्या दौऱ्यानंतर त्यांनी मंत्रालय येथे राघवेंद्रस्वामींच्या मठात काही काळ गानसेवा केली व आशीर्वाद मिळवले. सवाई गंधर्वांच्या एकसष्ठीनिमित्त पुण्यात १९४६ साली आयुर्वेदाचार्य देशपांडे, डॉ. पाबळकर, इ.नी सत्कार समारंभ आयोजित केला होता. या समारंभात भीमसेन जोशी प्रथमच पुण्यात गायले. राग मल्हार व 'चंद्रिका ही जणू' या नाट्यपदाच्या गायनाने त्यांनी श्रोत्यांची मने काबीज केली. तेव्हा पंचविशीतल्या भीमसेन जोशींनी श्रोत्यांच्या मनात मिळवलेले स्थान आजतागायत अढळ आहे. यानंतर 'मैफलीचा रंगतदार गायक' म्हणून त्यांची यशस्वी कारकीर्द सुरू झाली. भीमसेन जोशींनी भारतातल्या १७ राज्यांतील ३००हून अधिक ठिकाणी हजारो मैफली रंगवल्या. भारतभरातील सर्व मानाची संगीतसंमेलने भीमसेन जोशींच्या गायनावाचून पूर्ण होत नसत. महाराष्ट्र, कर्नाटक, मध्यप्रदेश व बंगालमधील रसिकांवर त्यांचा विशेष प्रभाव होता.

ब्रिटन, फ्रांस, जर्मनी, ऑस्ट्रिया, स्वीडन, हॉलंड, इटली, स्वित्झर्लंड, अमेरिका, कॅनडा, ब्राझिल, आखाती देश, अफगाणिस्तान, जपान, इंडोनेशिया, नेपाळ, इ.

ज

देशांत सातत्याने होणाऱ्या त्यांच्या मैफलींमुळे पु.लं.नी त्यांना गमतीने ‘हवाई गंधर्व’ अशी पदवी दिली.

गुरू सवाई गंधर्व यांच्या पुण्यतिथीनिमित्त भीमसेन जोशींनी १९५३ साली डॉ. नानासाहेब देशपांडे व अन्य मित्रमंडळींसह ‘सवाई गंधर्व संगीत संमेलन’ सुरू केले व ते अल्पावधीतच भारतातील एक महत्त्वाचे रंगपीठ बनले. आर्य संगीत प्रसारक मंडळातर्फे चालवल्या जाणाऱ्या या महोत्सवासाठी भीमसेन जोशींनी अनेक कलाकार प्रेमाने जोडले व भीमसेन जोशींबद्दलच्या आदरामुळे भारतभरातले अनेक दिग्गज कलाकार आपली कला या महोत्सवात सादर करत. त्यांचा अमृतमहोत्सव पुण्यात १९९६ साली अटलबिहारी वाजपेयी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. त्यांनी वयाच्या ८० वर्षांपर्यंत मैफलींत गायन केले.

अब्दुल करीम खाँ प्रणीत व सवाई गंधर्वांकडून प्राप्त केलेल्या किराणा घराण्याच्या स्वरप्रधान गायकीला पं. भीमसेन जोशींनी स्वतःच्या व्यक्तित्वानुसार निराळा आकार दिला. केसरबाई केरकर व उ. आमीर खाँ यांच्या गायकीचाही प्रभाव त्यांच्या गायनावर पडला. घराण्याच्या गायकीच्या कक्षा ओलांडून पुढे जात भीमसेन जोशींनी स्वतःची खास मुद्रा असणारी ‘भीमसेनी मर्दानी गायकी’ रुजवली. भीमसेनजींचा बुलंद, अचूक, सुरेल आवाज, हळुवारपणे रागाचे व्यक्तित्व उलगडत नेणारी विलंबित लयीतील आलापी हे त्यांचे सर्वांत मोठे संमोहनास्त्र ठरले. त्यांची दीर्घ दमश्वासाची, तिन्ही सप्तकांत संचार करणारी जोरकस तनयैतही स्तिमित करते.

मैफलींत त्यांनी मुख्यतः ललित, भैरव, रामकली, तोडी, मुलतानी, मारवा, पूरिया, पूरिया धनाश्री, यमन, शुद्धकल्याण, मारुबिहाग, अभोगी, मालकंस, दरबारी कानडा, मल्हार, इ. आलापीस पोषक असे, किराणा घराण्यात प्रचलित असणारे राग गायले. मात्र किराणा घराण्यात कमी गायले जाणारे शुद्ध केदार, शुद्ध बहार, गौडसारंग, नटजयजयवंती, नटमल्हार, छायामल्हार, सुहा, देसकार, मधुवंती, प्रदीपकी, हेमावती, इ. अनवट, मिश्र व संकीर्ण गटांतील रागही त्यांनी वेळोवेळी गायले.

किराणा घराण्यात रूढ असणारी ख्याली अंगाची, पण अत्यंत भावपूर्ण ठुमरी भीमसेन जोशी गात. जोगिया (पिया मिलन की आस), तिलंग (सजन तुम काहे को), काफी (बावरे दम), खमाज (पानी भरेली), भैरवी (जमुना के तीर, बाबुल मोरा) यांतील भावार्त ठुमरीगायन हाही त्यांच्या मैफलींतील महत्त्वाचा पक्ष होता.

भीमसेन जोशींना ‘रागसंगीताच्या मैफलीचा बादशाह’ अशी मान्यता मिळाली होतीच; पण त्यांचे नाव सर्वदूर पोहोचवण्यास साहाय्यभूत झाले ते त्यांचे अभंगगायन हे होय. भीमसेन जोशींनी पुण्यात प्रथमच ५ जुलै १९७२ रोजी आषाढी एकादशीला ‘संतवाणी’ हा कार्यक्रम सादर केला. त्यानंतर अक्षरशः खेड्यापाड्यांपर्यंत त्यांनी ही संतवाणी पोहोचवली व दिगंत कीर्ती मिळवली. भीमसेन जोशींनी गायलेले तीर्थ विठ्ठल, नामाचा गजर, ज्ञानियांचा राजा, इ. (संगीतकार राम फाटक), तसेच विठ्ठल गीती गावा, राजस सुकुमार, जे का रंजले, इ. (संगीतकार श्रीनिवास खळे) अभंग विलक्षण लोकप्रिय झाले. त्यांनी गायलेली हिंदी भजने (जो भजे हरि को सदा) व कन्नड भजनेही (भाग्यदा लक्ष्मी) अत्यंत लोकप्रिय ठरली. लता मंगेशकर यांसह त्यांचे गायन असणारी, श्रीनिवास खळे यांचे संगीत असणारी ‘राम श्याम गुण गान’ ही ध्वनिफीतही अतिशय गाजली.

आरंभीच्या काळात नाट्यगीतांवाचून भीमसेन जोशींची मैफल पूर्ण होत नसे. बालगंधर्व, मास्तर कृष्णराव व सवाई गंधर्व यांच्या नाट्यसंगीताच्या धाटणीचे रंजक मिश्रण करून त्यांनी नाट्यपदे सादर केली. नाट्यसंगीताची ‘रंगवाणी’ ही विशेष मैफलही त्यांनी १९९९ साली सादर केली.

‘परंपरेच्या चौकटीत राहून अत्युच्च शिखर गाठणारा एक कलाकार’ अशी भीमसेन जोशींची प्रतिमा झाली असली तरी ते एक सर्जक कलाकारही होते. त्यांनी निर्माण केलेले नवीन राग व बंदिशी ही बाब स्पष्ट करतात. ‘मारवाश्री’ हे मारवा व श्री या रागांचे मिश्रण (सब जगत के गुणियन), ‘कलाश्री’ हे कलावती व गावती या रागांचे मिश्रण (धन धन मंगल व धन धन भाग

सुहाग या दोन बंदिशी), 'ललितभटियार' हे ललित व भटियारचे मिश्रण (ओ करतार), 'हिंदोलिता' हे हिंडोल व ललितचे मिश्रण (ए री मैं आज शुभमंगल) असे मिश्रराग त्यांनी निर्माण केले.

त्यांनी १९६८ साली गोपालकृष्ण भोबे यांच्या 'धन्य ते गायनी कळा' या नाटकास संगीत दिले होते. या नाटकासाठी त्यांनी प्रामुख्याने शुद्ध केदार, तोडी, बसंत, मुलतानी, पटदीप व स्वनिर्मित राग ललितभटियार व कलाश्री यांतील बंदिशींचा वापर केला. या नाटकातील 'दान करी रे' (बागेश्री), 'हे करुणाकरा ईश्वरा' (मारवा) व 'सांजवात मम गात भैरवी' (भैरवी) ही नाट्यगीते गाजली.

भीमसेन जोशी यांनी अनेक चित्रपटांसाठी पार्श्वगायन केले. त्यांच्या आवाजातील रागसंगीतातील बंदिशींचे गायन मुख्यतः चित्रपटांसाठी वापरले गेले. सुधीर फडके यांनी 'सुवासिनी' चित्रपटासाठी भीमसेन जोशी व ललिता फडके यांच्याकडून तोडी रागातील 'आज मोरे मन लागो' ही बंदिश गाऊन घेतली. 'इंद्रायणी काठी' (गुळाचा गणपती; संगीतकार पु.ल. देशपांडे, १९५३), 'रम्य ही स्वर्गाहून लंका' (स्वयंवर झाले सीतेचे; संगीतकार वसंत देसाई, १९६४), 'टाळ बोले चिपळीला' (भोळी-भाबडी; संगीतकार राम कदम, १९७३), 'विठ्ठलाच्या पायी थरारली वीट' (देवकीनंदन गोपाला; संगीतकार राम कदम, १९७७) ही भीमसेन जोशींनी गायलेली मराठी चित्रपटगीते विशेष गाजली. 'मी तुळस तुझ्या अंगणी' (१९५५), 'पतिव्रता' (१९५९), 'भैरवी' (१९६०), 'सुवासिनी' (१९६१), 'क्षण आला भाग्याचा' (१९६२), 'शेरास सव्वाशेर' (१९६६), 'संत तुलसीदास' (१९७२), 'राजा शिवछत्रपती' (१९७४), 'पंढरीची वारी' (१९८८), 'रेशीमगाठी' (१९८८) या मराठी चित्रपटांसाठी त्यांनी पार्श्वगायन केले.

त्यांनी हिंदी चित्रपटांसाठी गायलेली 'केतकी गुलाब जूही' (मन्ना डे यांच्यासह; 'बसंत बहार'; संगीतकार शंकर जयकिशन, १९५६), 'ठुमक ठुमक पग, रघुवर तुमको' (अनकही; संगीतकार जयदेव, १९८५) ही गीतेही संस्मरणीय आहेत. 'अनकही'तील गाण्यांसाठी १९८५ साली नॅशनल फिल्म फेस्टिव्हलमध्ये त्यांना 'सर्वोत्तम पार्श्वगायक' पुरस्कार देण्यात आला होता. याशिवाय कन्नड (संध्याराग, १९६६), बंगाली (तानसेन, १९५८) व इंग्रजी (बिरबल माय ब्रदर, १९७३) या चित्रपटांसाठीही त्यांनी गायन केले.

आकाशवाणीसाठी त्यांनी रागसंगीताखेरीजही भक्तिगीते, नाट्यगीते, भावगीते या प्रकारांसाठी विपुल गायन केले. 'सखी मंद झाल्या तारका' हे भावगीत प्रथम त्यांच्याच आवाजात पुणे आकाशवाणीसाठी ध्वनिमुद्रित करण्यात आले होते. दूरदर्शनसाठी राष्ट्रीय एकात्मता योजनेसाठी 'मिले सुर मेरा तुम्हारा' व 'देस राग' या अनुबोधपटांसाठीही त्यांनी गायन केले व पडद्यावरही त्यांचे दर्शन घडले. ह.वि. दात्ये यांनी संगीतबद्ध केलेल्या 'सूर्यनमस्कार' संगीतरचनेसाठीही त्यांनी श्लोकगायन केले होते.

भीमसेन जोशींना १९५४ साली पुण्यातील रामेश्वर मंदिराच्या ब्रह्मवृंदाकडून 'पंडित' ही पदवी प्रदान करण्यात आली. अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाने त्यांस १९६४ साली 'गायनाचार्य' व १९८२ साली 'महामहोपाध्याय' या पदव्या दिल्या. भारत सरकारने 'पद्मश्री' (१९७२), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९८७), 'पद्मभूषण' (१९८९) व सर्वोच्च असा नागरी सन्मान 'भारतरत्न' (२००८) देऊन त्यांचा गौरव केला. 'कर्नाटक संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९७२), 'महाराष्ट्र गौरव' (महाराष्ट्र शासन, १९९०) हेही सरकारी पुरस्कार त्यांना मिळाले. 'संगीतरत्न' (राघवेंद्रस्वामी), 'स्वरभास्कर' (शंकराचार्य), 'संगीताचार्य' (जयपूर गांधर्व विद्यालय), 'डी.लिट.' (गुलबर्गा विद्यापीठ १९८६, पुणे विद्यापीठ १९९१, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ १९९४), 'तानसेन' पुरस्कार (१९९१), 'दीनानाथ मंगेशकर' पुरस्कार (१९९२), 'देशिकोत्तम' (विश्वभारती, १९९३), 'पुण्यभूषण', इ. अनेक पुरस्कार व पदव्या त्यांना मिळाल्या.

भीमसेन जोशी यांच्या काही प्रमुख शिष्यांत श्रीकांत देशपांडे, रामकृष्ण पटवर्धन, माधव गुडी, श्रीपती

पाडीगार, उपेंद्र भट, आनंद भाटे, राजेंद्र कांदळगावकर, राजेंद्र राठोड, इ. नावे नमूद करता येतील. श्रीनिवास जोशी व आनंद जोशी हे पुत्रही त्यांचा गायनवारसा चालवत आहेत. राशीद खान, व्यंकटेशकुमार, जयतीर्थ मेउंडी, इ. अनेक ख्यातनाम गायकांवर भीमसेन जोशींच्या गायकीची स्पष्ट छाप दिसते.

भीमसेन जोशींचा प्रथम विवाह १९४४ साली नात्यातल्याच सुनंदा कट्टी यांच्याशी झाला. त्यांनी १९५१ साली वत्सलाबाई मुधोळकर यांच्याशी द्वितीय विवाह केला. द्वितीय पत्नी वत्सला या उ. शब्बू खाँकडे गायन शिकलेल्या होत्या. भीमसेन जोशींना त्यांनी कौटुंबिक व सांगीतिकही साथ भक्कमपणे दिली. ते १९५२ पासून पुण्यात स्थायिक झाले.

पुणे विद्यापीठात गुरुकुल पद्धतीने संगीतशिक्षण देण्याच्या उद्देशाने स्थापन झालेल्या ‘ललित कला केंद्रा’च्या स्थापनेपासून भीमसेन जोशींचा त्यात सक्रिय सहभाग होता.

पुणे विद्यापीठात संगीतविषयक शैक्षणिक उपक्रम राबवण्यासाठी ‘भीमसेन जोशी अध्यासना’ची स्थापना २२ फेब्रुवारी १९९९ रोजी झाली. भीमसेन जोशींवर मराठी, कन्नड, बंगाली, हिंदी व इंग्रजी अशा अनेक भाषांत विपुल लेखन झाले आहे. गुलजार, जेम्स बेवरिज या दिग्दर्शकांनी त्यांच्या सांगीतिक आयुष्यावर लघुपटांची निर्मिती केली. भीमसेन जोशींची व्यक्तिचित्रे अनेक कलाकारांनी रेखाटली. शिल्पेही निर्माण केली. वयाच्या ८९व्या वर्षी पुणे येथे त्यांचे निधन झाले. त्यांच्या पश्चात फेब्रुवारी २०११ मध्ये पुण्यात ‘भारतरत्न पंडित भीमसेन जोशी कलादालन संकुल’ निर्माण करण्यात आले.

– चैतन्य कुंटे

*संदर्भ :*


*१. अभ्यंकर, शंकर; ‘स्वरभास्कर’, पुणे; १९८३.*

*२. अकलूजकर, संपादक; ‘स्वराधिराज’, पुजारी, संगोराम, पुणे; १९९६.*

*३. रानडे, अशोक दा.; ‘मला भावलेले संगीतकार’, पुणे; २०१०.*


## जोशी, यशवंत बाळकृष्ण

**गायक**

**१२ सप्टेंबर १९२७ – ५ ऑक्टोबर २०१२**



ग्वाल्हेर घराण्याचे गायक यशवंत बाळकृष्ण जोशी यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे वडील भजने वगैरे गात असत. यशवंत जोशी यांना बालपणापासूनच संगीताची आवड होती. त्यांचे प्रारंभिक संगीत शिक्षण त्यांचे चुलते नथूबुवा जोशी यांच्याकडे झाले. नथूबुवांचे संगीत शिक्षण विष्णू दिगंबर पलुसकरांच्या गांधर्व महाविद्यालयात झाले होते. नथूबुवांची इच्छा होती की यशवंतांनी बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांचे शिष्य, मिराशीबुवा (यशवंत सदाशिव पंडित) यांच्याकडे तालीम घ्यावी. जवळजवळ १९३६-३७ पासून म्हणजे वयाच्या दहाव्या वर्षापासून चौदा-पंधरा वर्षे यशवंत जोशी यांनी मिराशीबुवांकडे तालीम घेतली.

यशवंतांचे शालेय शिक्षण पुण्याच्या नूतन मराठी विद्यालय येथे, त्या काळची इंग्लिश सहावीपर्यंत झाले. गायन हाच पेशा करायचा असे ठरवून १९५० साली ते मुंबईला आले. पं. राम मराठे यांच्या मध्यस्थीने १९५० पासून आग्रा घराण्याचे गायक, रचनाकार पं. जगन्नाथबुवा पुरोहित, ‘गुणिदास’ यांच्याकडे त्यांनी १९६८ पर्यंत शिक्षण घेतले. पं. गजाननबुवांचा सहवासही यशवंतबुवांना लाभला होता. त्यांच्याबरोबर ते अनेकदा साथीलाही बसत. मिराशीबुवांच्या उदार दृष्टिकोनामुळे त्यांनी इतरांचीही गाणी मन:पूर्वक ऐकली. त्यांनी अनेक बंदिशींचा उत्तम संग्रह केला. पं. छोटा गंधर्व यांच्या बंदिशी व नवनिर्मित रागही त्यांनी मैफलींत गाऊन रसिकांसमोर आणले.

यशवंतबुवांच्या गायनावर ग्वाल्हेर-आग्रा घराण्याचे संस्कार आहेत. स्वच्छ, खणखणीत आवाज, खुला आकार, आरोही-अवरोही सपाट तानांचे विलक्षण

वेगवान सट्टे आणि तयार बोलअंग ही त्यांच्या गायनाची वैशिष्ट्ये. लयकारीच्या गाण्याकडे त्यांची विशेष ओढ आहे. मुखबंदीची तान हे त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य होय. हमीर, पूर्वी, केदार, छायानट, भैरव बहार, देवगिरी बिलावल इत्यादी राग ते विलक्षण तयारीने गात. कृश प्रकृती असूनही त्यांच्या गाण्यात भरपूर दमसास व जोरकसपणा दिसून येतो.

त्यांना १९९४ साली महाराष्ट्र सरकारचा राज्य पुरस्कार मिळाला, तसेच २००५ मध्ये 'संगीत नाटक अकादमी'तर्फे त्यांचा गौरव करण्यात आला.

'स्वरश्री'तर्फे हमीर गौडमल्हार, बहार या रागांची त्यांची ध्वनिफीत असून मॅग्नासाउण्ड कंपनीनेही त्यांची ध्वनिफीत काढली आहे. 'अत्यंत उत्तम रितीने ख्यालगायकीची तालीम देणारे गानगुरू' असा त्यांचा लौकिक आहे व अनेक कलाकारांनी त्यांच्याकडून रागदारीचे पायाभूत शिक्षण घेतले आहे. यशवंतबुवांच्या शिष्यवर्गातील राम देशपांडे, आशा खाडिलकर, कै. शिवानंद पाटील, कै. प्रकाश घांग्रेकर, इत्यादी काही प्रमुख नावे होत. वयाच्या ८५व्या वर्षी यशवंतबुवा जोशी यांचे निधन मुंबईत झाले.

– माधव इमारते

ज

***

# झ





## झाकीर हुसेन
**तबलावादक**
**९ मार्च १९५१**



उ. झाकीर हुसेन यांचा जन्म मुंबईत झाला. पंजाब घराण्याचे खलिफा उ. अल्लारखा यांचे ते सुपुत्र आणि शिष्य आहेत. पंजाब घराण्याचा पारंपरिक तबला, उ. अल्लारखा यांनी निर्माण केलेला तबला, त्याचबरोबर त्यांची वादन करण्याची कलात्मक शैली, या सगळ्यांची तालीम उ. झाकीर हुसेन यांना बालवयातच आपल्या वडिलांकडून मिळाली. प्रखर बुद्धिमत्ता आणि कठोर रियाझ यांच्या साहाय्याने उ. झाकीर हुसेन वयाच्या बाराव्या वर्षीच आपल्या पिताश्रींचा तबला प्रस्तुत करू लागले.

उ. झाकीर हुसेन यांना बालपणी तबलावादक उ. अहमदजान थिरकवा यांचा सहवास आणि मार्गदर्शन प्राप्त झाले. या सहवासामुळे उ. झाकीर हुसेन यांना लखनौ - फरूखाबाद घराण्यांच्या भाषाप्रधान तबल्याशीही ओळख झाली. हळूहळू त्यांचे वादनविषयक विचार अधिक सखोल आणि व्यापक झाले.

उ. झाकीर हुसेन यांचे वादन अधिक प्रगल्भ आणि परिपक्व होऊ लागले. तबल्यातील सर्व घराण्यांच्या सौंदर्यतत्त्वांचा त्यांनी अभ्यास केला असून ते वेगवेगळ्या मैफलीतून वेगवेगळ्या घराण्यांच्या बंदिशी आणि निवडक वेगवेगळी सौंदर्यतत्त्वे सादर करीत असतात. उ. झाकीर हुसेन यांची सौंदर्यदृष्टी अत्यंत संवेदनशील आणि तरल असल्यामुळे तबला आणि डग्गा या दोघांमधून मनमोहक आणि कर्णमधुर नादांची निर्मिती कशी करावी, याचा अभ्यास करून त्यांनी स्वतःचे असे एक ‘नाद-निकास’ तंत्र निर्माण केले आहे. या चित्ताकर्षक कर्णमधुर नादांच्या प्रभावाने त्यांनी जागतिक स्तरावर रसिकांची मने जिंकली आहेत; कारण त्यांनी प्रस्तुत केलेले नाद हे कलापूर्णतेने नटलेले असतातच; पण त्याचबरोबर प्रसंगानुरूप ते कधी नाजूक असतात, सशक्त असतात, तर कधी जोशपूर्ण, जोरकस असतात; आणि हीच त्यांच्या वादनाची खासियत आहे.

एकल तबलावादनात किंवा साथसंगतीत लघु-मात्राकालाच्या गणिताचा उपयोग केला असता ते वादन अनोखे असे आकर्षक रूप प्राप्त करते, हे तत्त्व ओळखून त्यांनी आपल्या वडिलांकडून, तसेच दाक्षिणात्य अवनद्ध वाद्यपटू यांच्या संगतीत व अभ्यास करून ती पद्धती आत्मसात केली. त्याचबरोबर लयीवर असामान्य प्रभुत्व असलेल्या पाश्चिमात्य चर्मवाद्यपटू (ड्रमर्स) यांच्याबरोबर वादन करताकरता त्यांच्या वादनातील बिकट लयकारीवर आणि गतिमानतेवरही उ. झाकीर हुसेन यांनी प्रभुत्व प्राप्त केले.

लयकारीवर प्रभुत्व आहे म्हणून त्याचेच प्रदर्शन करीत राहणे हे झाकीर हुसेन यांना मान्य नाही. श्रोतृवर्गाची समज पाहून ते आपला तबला सादर करतात. म्हणूनच प्रत्येक प्रकारच्या श्रोत्याला उ. झाकीर हुसेन यांचा तबला प्रोत्साहित करतो.

उ. झाकीर हुसेन यांचा ‘एकल’ तबला हा सर्वांगसुंदर असतोच आणि पेशकार, कायदा-रेला, गत-तुकडा हे सर्व वादनप्रकार ते समर्थपणे प्रस्तुत करतात. पण ‘उपज अंगाचे’ त्यांचे पेशकार वादन ही त्यांची खासियत होय.

उ. अल्लारखा यांच्याकडून प्राप्त झालेली साथसंगतीची नवनिर्मित शैली उ. झाकीर हुसेन यांनी आत्मसात तर केलीच; पण त्याचबरोबर ती अधिक विकसित केली. गायन - बासरीसोबतची त्यांची संगत अत्यंत संयमित असते, तर सतार, सरोद आणि संतूर या वाद्यांबरोबर त्यांची साथसंगत कलात्मक लयकारीने नटलेली असते. दाक्षिणात्य पद्धतीच्या तालवाद्य कचेरीच्या कार्यक्रमात त्यांच्याच शैलीला अनुरूप असे आपले वादन ते प्रस्तुत करतात. या पार्श्वभूमीवर पाश्चात्त्य ‘ड्रम’ वादकांबरोबर ते इतके लीलया सहवादन करीत असतात, की त्यांचा तबला हा पाश्चात्त्य वाद्यवृंदाचे एक नैसर्गिक अंगच बनते. कथक नृत्यसम्राट पं. बिरजू महाराज यांच्याबरोबर वादन करताना हजरजवाबी अशी उत्स्फूर्त वादनकौशल्याची प्रचिती ते श्रोत्यांना देतात. भारतात आणि भारताबाहेर, दरवर्षी त्यांचे सुमारे दीडशे कार्यक्रम होत असतात. विविध प्रकारच्या संगीत प्रकारांमध्ये त्यांच्या पन्नासपेक्षा जास्त आंतरराष्ट्रीय दर्जाच्या ध्वनिमुद्रिका प्रकाशित झाल्या आहेत. त्यांनी जागतिक स्तरावरील जॉन मॅकलॉलिन, मिकी हार्ट, बेला फ्लेक, आणि एडगर मेयेर यांच्यासह सांगीतिक कलाकृती निर्माण केल्या, त्यांची नावे अशी : १) शक्ती, २) दिगा ऱ्हिदम बँड, ३) मेकिंग म्यूझिक, ४) प्लॅनेट ड्रम विथ मिकी हार्ट, ५) तबला बीट सायन्स व ६) संगम विथ चार्ल्स लॉइड अँड एरिक हारलँड. याशिवाय जॉर्ज हॅरिसन, जो हँडरसन, व्हॅन मॉरिसिन, अॅरिटो मोरेइरा आणि इतर अनेक जागतिक स्तरावरील श्रेष्ठ कलाकारांबरोबर उ. झाकीर हुसेन यांनी संयुक्त सहवादनाचे अनेक कार्यक्रम जगभर प्रस्तुत केले आहेत.

आपले वडील व गुरू उ. अल्लारखा यांचा संगीत दिग्दर्शनाचा वारसाही उ. झाकीर हुसेन यांनी यशस्विरीत्या पुढे चालविला आहे. त्यांना १९९६ साली अटलांटा येथील ‘समर ऑलिम्पिक’ स्पर्धांच्या उद्‍घाटन प्रसंगी प्रस्तुत केलेल्या संगीत रचनेचे सहदिग्दर्शन करण्याचा मान मिळाला होता. जागतिक स्तरावर त्यांच्या असामान्य अशा योगदानाबद्दल त्यांना इंडो-अमेरिकन पुरस्कार (१९९०), भारत आणि अमेरिकेच्या संबंधात केलेले सांस्कृतिक योगदान (१९९९), अमेरिकेतील अत्यंत प्रतिष्ठेचा समजला जाणारा ‘नॅशनल हेरिटेज फेलोशिप’ हा सन्मान (१९९०), भारताच्या साठाव्या स्वातंत्र्यदिनानिमित्त ‘जय हिंद’ या राष्ट्रीय गीताचे संगीत दिग्दर्शन करण्यासाठी भारत सरकारतर्फे उ. झाकीर हुसेन यांची निवड (२००७), ‘मॉडर्न ड्रमर अँड ड्रम’ या जागतिक स्तरावरील नियतकालिकातर्फे पुरस्कार (२००७), उ. झाकीर हुसेन व मिकी हार्ट यांनी निर्माण केलेल्या ‘प्लॅनेट ड्रम’ या सांगीतिक कलाकृतीला ‘ग्रॅमी अवॉर्ड’(२००९), तसेच इतर अनेक पुरस्कार मिळाले आहेत.

उ. झाकीर हुसेन यांना भारतात ‘पद्मश्री’ (१९८८), ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार (१९९१), ‘पद्मभूषण’ (२००२), ‘कालीदास’ पुरस्कार (२००६) तसेच इतर अनेक पुरस्कार मिळाले आहेत.

– सुधीर माईणकर

✻✻✻

झ




ट

## टेंबे, गोविंद सदाशिव
**हार्मोनिअमवादक, संगीतकार, नाटककार, साहित्यिक, गायकनट**
**५ जून १८८१ – ९ ऑक्टोबर १९५५**



गोविंद सदाशिव टेंबे यांना विसाव्या शतकातील महाराष्ट्राचे सांस्कृतिक आधारस्तंभ म्हणून गौरविले गेले. एक हार्मोनिअमवादक, संगीत दिग्दर्शक, संगीत रंगभूमीवरचे गायकनट, नाटककार, मराठी बोलपटाचे पहिले नायक, गीतकार, संगीतकार, संगीतिकांचे कर्ते, मराठीतील आस्वादक संगीत समीक्षेचे अध्वर्यू असे पैलू असणारे गोविंद टेंबे यांचे व्यक्तित्त्व रसिले व बहुआयामी होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची विलक्षण जादू तेव्हाच्या जनमानसावर होती. भारतीय संगीताच्या नकाशावर हार्मोनिअमचे स्थान उंचावण्यात ज्या व्यक्तींचे महत्त्वपूर्ण योगदान होते, त्यांतले एक अग्रगण्य नाव म्हणजे कोल्हापूरचे गोविंद टेंबे हे होय!

गोविंद सदाशिव टेंबे यांचा जन्म कोल्हापूरजवळच्या सांगवडे या गावी सदाशिव व अंबा या दांपत्याच्या पोटी झाला. कोल्हापुरातील शुक्रवार पेठेतील शाळेत मराठी दुसरी इयत्तेत शिकताना, आपल्या बालसुलभ उंच आवाजात दिंडी गाऊन ते कौतुकास पात्र झाले. राजाज्ञेवाड्यात राहत असताना नवरात्रीच्या उत्सवातील हरदासी कीर्तनांत विष्णूबुवा यांची हार्मोनिअमची साथ त्यांनी प्रथम ऐकली व या वाद्याची मोहिनी त्यांच्या मनावर कायमचीच पडली. अंतःप्रेरणेने निरीक्षणातूनच ते हार्मोनिअम वाजवू लागले. पुढे एका अमेरिकन पाद्र्याचा ऑर्गन त्यांना योगायोगाने हाताळायला मिळाला. शेजारच्या धोंडोपंत बर्वे यांच्याकडून त्यांनी आरंभीचे जुजबी धडे घेतले. ‘वाईकर संगीत मंडळी’तील नाटकांतील पदांच्या तालमींदरम्यान त्यांना पांडोबा यवतेश्वरकर यांचेही मार्गदर्शन मिळाले. १८९८-९९ दरम्यान गुंडोपंत पिशवीकरांच्या मेळ्यात, केदारलिंग प्रासादिक मेळ्यात त्यांचा सहभाग होता. करवीरनिवासिनी नाटक मंडळी, माणिक प्रभू प्रासादिक संगीत नाटक मंडळीत ‘वीरतनय’, ‘शापसंभ्रम’, ‘रामराज्यवियोग’, ‘सौभद्र’ अशा संगीत नाटकांसाठी ऑर्गनची साथ करण्याचा अनुभवही त्यांनी घेतला. या साऱ्या अनुभवांतून त्यांच्या हार्मोनिअमवादनात हळूहळू सराईतपणा आला.

टेंब्यांच्या घरात संगीताची आवड वा परंपरा नव्हती. वडिलांच्या इच्छेनुसार त्यांनी वकिलीची सनद मिळवली; मात्र त्यांचे मन संगीत-नाट्य या कलांमध्येच रमले. मुंबईत मॅट्रिक करताना तेथील मैफली, नाटकांचा आनंद त्यांनी पुरेपूर घेतला. गिरगावातील ट्रिनिटी क्लबमध्ये त्यांचे जाणे-येणे सुरू झाले. मुंबईतील धनिक विठ्ठलदास द्वारकादास मेहता यांच्या स्नेहामुळे गोविंद टेंबे यांचा मुंबईतील उच्चभ्रू वर्गाशी परिचय झाला, त्यातूनच त्यांना भास्करबुवा बखले व अल्लादिया खाँसाहेबांचाही सहवास मिळाला. भास्करबुवा बखल्यांना मनोमन गुरू मानून टेंबे त्यांना हार्मोनिअमची संगतही करू लागले.

म्हैसूर संस्थानचे राजपुत्र हे त्यांचे मित्र असल्याने त्यांच्यासह टेंबे यांनी १९०८ साली जपानची व १९३९ मध्ये युरोपची सफर केली. देवल सर्कसबरोबर त्यांनी व्यवस्थापक म्हणून मद्रास इलाख्याचा दौरा केला.

गोविंदरावांनी १९११ ते १९२२ हा काळ प्रामुख्याने मराठी संगीत रंगभूमीवर गायक-अभिनेते व संगीतकार म्हणून व्यतीत केला. त्यांनी १९२२ ते १९२९ या काळात म्हैसूरच्या युवराजांकडे नोकरी करत असताना नाट्यलेखन व संगीत दिग्दर्शनही केले. टेंब्यांनी १९३० ते १९३४ हा काळ कोल्हापूरला प्रभात फिल्म कंपनीत गायक-अभिनेते, संगीतकार, गीतकार, लेखक या नात्याने घालवला. त्यांनी शालिनी सिनेटोन, नटराज फिल्म्स इ. चित्रपट कंपन्यांच्या चित्रपटांसाठी १९३४ ते १९३९ दरम्यान कार्य केले.

कोल्हापुरातील पोहरेबुवा, शाळिग्रामबुवा, गणपतीबुवा मिरजकर या गवयांच्या गाण्याचा, देवल क्लबमधील मैफली, तसेच तत्कालीन नाटके, मेळे, लावणी व कीर्तनांतील पदांचा संस्कार टेंब्यांवर बालपणीच झाला. किर्लोस्कर नाटक मंडळीतील भाऊराव कोल्हटकरांच्या गायनाचाही त्यांच्यावर खूप प्रभाव पडला. शाहू क्रिकेट क्लबने ‘रत्नपाल’ या नाटकातील पदांच्या चाली बसवायला मुंबईतील ख्यातनाम हार्मोनिअमवादक लक्ष्मीकांत ऊर्फ भाचूभाई भांडारे यांना पाचारण केले. तेव्हा गोविंदरावांना भांडाऱ्यांचा थोडा सहवास मिळाला. तसेच, मुंबईच्या वास्तव्यात त्यांनी हैद्राबादच्या लक्ष्मणराव यांचेही हार्मोनिअमवादन ऐकले. ग्वाल्हेरचे, हार्मोनिअम वाजवून ठुमरी गाणारे भैया गणपतराव यांच्याही मैफली त्यांनी लाला दुलीचंदांकडे ऐकल्या. या साऱ्यांच्या हार्मोनिअमवादनाचाही ठसा त्यांच्या मनावर उमटला.

पं. भास्करबुवा बखले यांचे ते एकलव्य शिष्य होते. बुवांचा सहवास व हार्मोनिअमची साथ करत टेंब्यांनी संगीतातील मर्मस्थळे टिपली. अल्लादिया खाँ व भास्करबुवा बखले यांच्या गायकीचा प्रभाव त्यांच्यावर होता व त्याचे प्रतिबिंब त्यांच्या हार्मोनिअमवादनावर पडले होते. तसेच मौजुद्दिन, गोहरजान, मलकाजान अशा ठुमरी गायकांच्या गाण्याचा ढंगही त्यांनी वादनात व रंगभूमीवर आणला. त्यांनी सतारिये बरकतुल्लांचा गंडा बांधला होता. प्रत्यक्ष संगीतशिक्षण फारसे घेतले नसले तरी त्यांनी या साऱ्या दिग्गजांच्या कलेचे निरीक्षण करून मेहनत व स्वतःचे चिंतन यांद्वारे संगीत व्यासंग केला.

विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांच्या काळात हार्मोनिअमची २-३ तासांची स्वतंत्र मैफल ही कल्पनाच नावीन्यपूर्ण होती व गोविंद टेंबे यांनी हार्मोनिअमच्या एकलवादनाची प्रस्तुती करून या वाद्याला लोकप्रियतेचा एक वेगळा आयाम दिला. ‘हार्मोनिअम व गोविंद टेंबे’ हे समीकरणच निर्माण झाले. समन्यूनीकृत (इक्विटेंपर्ड) स्वरजुळणीच्या हार्मोनिअमवर रागदारी वाजवणे मुश्कील असले तरी गोविंदराव आपल्या अंगुलिकौशल्याने रागमूर्ती चांगली उभी करत. अखेरच्या काळात ते श्रुतितज्ज्ञ गं.भी. आचरेकर यांनी बनवलेली श्रुति-हार्मोनिअम वाजवत असत. गायकीनुसार रागमांडणी, सतारीचे तोडे, सारंगीचे तानपलटे व हार्मोनिअमच्या खास खटके-मुरक्यांच्या जागा या साऱ्यांचा समावेश करून त्यांनी आपली शैली घडवली. टेंब्यांच्या वादनात भीमपलास, यमन, सिंधुरा, बिहाग, इ. रागांतील विलंबित व द्रुत चीज, ठुमरी-दादरा, लोकप्रिय नाट्यगीते यांचा समावेश असे. जयपूर घराण्याच्या अनवट वा जोडरागांचाही नमुना ते आवडीने सादर करत. त्यांचा भर मुख्यतः चिजा व नाट्यपदे वाजवून दाद घेण्यात होता, त्यामुळे गायनानुसारी असे हे वादन होते. त्यांच्या हार्मोनिअमवादनाच्या ध्वनिमुद्रिका एच.एम.व्ही., ट्विन, ओडियनतर्फे निघाल्या व लोकप्रियही ठरल्या.

लालित्य वा नजाकत हा टेंब्यांच्या स्वभावाचा स्थायीभाव त्यांच्या वादनात पूर्णांशाने उतरला होता. मुलायमपणा व जोरकसपणा हे दोन्ही गुण त्यांच्या वादनात होते. मींडेचा आभास निर्माण करणे, नखरेल हरकती व गुंतागुंतीच्या तानांनी पद सजवणे ही त्यांची हातोटी होती. भात्याचाही ते प्रभावी वापर करत असत. वादन करताना टेंबे काही सूचक हातवारे करत व त्याद्वारे अभिप्रेत असणाऱ्या गायकीचा इशारा करीत. ही त्यांची लकब फार मोहक होती व नंतरच्या अनेक हार्मोनिअमवादकांनी याच

ट

लकबीचे अनुकरण केले. त्यांची वादनशैली राजारामबापू पुरोहित, गणपतराव पुरोहित, अनंत जमदग्नी, विठ्ठलराव सरदेशमुख, ना.र. मारुलकर, बाळ माटे, इ. शिष्य व गायक सुरेशबाबू माने, गुंडोपंत वालावलकर यांनी अंगीकारली होती. त्यांच्या वादनशैलीचा प्रभाव नंतरच्या दोन पिढ्यांवर गहिरा राहिला.

टेंबे यांचा १९११ पासून किर्लोस्कर नाटक मंडळीशी संबंध आला. पुढे १९१३ साली 'गंधर्व नाटक मंडळी'ची स्थापना झाली, तिचे ते संस्थापक-भागीदार होते. किर्लोस्कर व गंधर्व नाटक मंडळीसाठी त्यांनी तेरा नाटकांत प्रमुख व बहुतेक वेळा नायकाच्या भूमिका केल्या. मानापमान, विद्याहरण (कच या पात्राच्या चाली) या नाटकांसाठी त्यांनी गोहरजान, मलकाजान, प्यारासाहेब, जानकीबाई यांच्या पूरबबाजाच्या ठुमरी-दादऱ्यांच्या चालींची लयलूट केली. या नाटकांतील चालींमुळे महाराष्ट्रातील जनतेस हा ढंग सुपरिचित झाला. त्या काळात प्रचलित रचनेवरून गीतरचना केली जाई, अर्थात या चाली नव्याने बांधलेल्या नसत, केवळ नाटकातील प्रसंगानुरूप त्या-त्या चालीची योजना संगीत दिग्दर्शक करीत असे. मानापमान, विद्याहरण या नाटकांत त्यांनी मुख्यतः प्रचलित चाली वापरल्या. शिवराज कंपनीच्या नाटकांसाठी मात्र त्यांनी स्वतंत्रपणे चाली बांधायला सुरुवात केली.

टेंबे यांनी १९१७ साली शिवराज संगीत मंडळीची स्थापना करून नवनवीन मराठी व हिंदी नाटकांचे प्रयोग केले. त्यांनी 'वरवंचना', 'तुलसीदास', 'वत्सलाहरण', 'वेषांतर', 'देवी कामाक्षी', 'मत्स्यवेध' आदी नाटकांचे लेखन व संगीत दिग्दर्शनही केले. 'चित्रवंचना', 'कृष्णकांचन', 'सिद्धसंसार', 'चंद्रग्रहण', 'देशदीपक', 'गोरक्षण', 'धर्मसिंहासन', 'पंचांगी जुगार', 'खलवधू कोण' या नाटकांसाठी त्यांनी चाली दिल्या. 'तारिणी नववसनधारिणी, मितभाषिणी', 'रामरंगी रंगले मन', 'नच पार नादनिधीला', 'मधुसूदना हे माधवा', अशी त्यांची काही पदे अविस्मरणीय झाली.

'अयोध्येचा राजा' या प्रभात फिल्म कंपनीच्या पहिल्या बोलपटासाठी टेंबे यांनी १९३२ साली हरिश्चंद्राची मुख्य भूमिका साकारली, म्हणून 'मराठी बोलपटांचा पहिला नायक' व संगीत दिग्दर्शक होण्याचा मान त्यांना मिळाला. प्रभात कंपनीच्या 'अयोध्येचा राजा', 'अग्निकंकण', 'माया मच्छिंद्र', 'सिंहगड', 'सैरंध्री' या चित्रपटांसाठी त्यांनी संगीतकार, पद्यकार, पटकथाकार अशा अनेक भूमिकांतून कार्य केले. 'सती महानंदा', 'मंजरी', 'सीता' या चित्रपटांसाठी संगीत दिग्दर्शन व भूमिकाही केल्या. शालिनी सिनेटोनसाठी त्यांनी 'उषा' (संगीत व भूमिका, १९३५), 'झीनत महल' (संगीत, १९३६), 'सावकारी पाश' (गीत-संगीत, १९३६), 'प्रतिभा' (गीत-संगीत, १९३७), 'राजमुकुट' (भूमिका, पटकथालेखन, दिग्दर्शन व संगीत, १९३५), तसेच अन्य चित्रसंस्थांत 'विषवमन' (संगीत, १९३६), 'वासंती' (भूमिका, १९३८), 'नंदकुमार' (भूमिका, १९३८), 'सवंगडी' (गीत व संगीत, १९३८), 'साथी' (संगीत, १९३८), 'निर्दोष' (संगीत, १९४१), 'कृष्णसुदामा' (भूमिका, १९४७) असे कार्य केले. संगीतकार, पद्यकार, गायक-अभिनेते अशा अनेक भूमिकांमधून टेंब्यांनी मराठी व हिंदी चित्रपटसृष्टीवर पहिल्या दोन दशकांत आपला ठसा उमटवला.

युरोपच्या सफरीनंतर पाश्चात्त्य संगीतातील 'ऑपेरा' या प्रकाराच्या प्रभावातून त्यांनी 'महाश्वेता', 'जयदेव', 'प्रतिमा' अशा सुंदर संगीतिका (स्वरनाटिका हा त्यांचा शब्द) निर्माण केल्या. मराठी भाषेत रागांची लक्षणगीते रचून ती 'लक्षणगीते' पुस्तकात प्रकाशितही केली. त्यांनी प्रचलित, तसेच सावनी नट, बिहागडा, मालश्री इ. जयपूर घराण्याच्या खास रागांत बंदिशीही केल्या. त्यांनी कौंसीललत या रागाचीही निर्मिती केली.

'माझा संगीत व्यासंग' (१९३९), 'रंगाचार्य' (१९४०), 'जीवन विहार' (१९५०), 'अल्लादिया खाँसाहेबांचे चरित्र' (१९५४), 'कल्पना संगीत' (१९५५), 'जीवन व्यासंग' (१९५६), 'लक्षणगीते' (१९७०) हे गोविंद टेंबे यांचे सात ग्रंथ म्हणजे संगीत व रंगभूमीविषयक मराठी साहित्यास मोलाचे योगदान

आहे. त्यांचे संगीतविषयक लेखन मुख्यतः अनुभवकथन व चरित्रवर्णनपर असले तरी 'कल्पना संगीत' या ग्रंथात टेंब्यांनी स्वतंत्र स्वरलिपी, रागवर्गीकरणपद्धतीसह वेगळा सांगीतिक सिद्धान्त मांडला. याखेरीज त्यांनी आठ संगीत नाटकांसह 'गंभीर घटना' (गद्य नाटक), 'कावळा' व 'तालीम मास्तर' (विनोदी लेख) आणि 'नर्तकीविलास' हा काव्यसंग्रह, संगीत, रंगभूमी, चित्रपटविषयक ५० स्फुटलेख, १७ व्यक्तिचित्रे, तसेच अनेक पुस्तक अभिप्राय, प्रस्तावना असे विपुल, दर्जेदार लेखन केले.

एकंदर १९२० ते १९५० अशा तीन दशकांतील वाङ्मयीन घडामोडींवर त्यांच्या लेखणीचा, त्यांच्या भाषाशैली व विवेचनाचा दाट प्रभाव पडला. वामनराव देशपांडे, अरविंद मंगरूळकर, बाबूराव जोशी, कृ.द. दीक्षित यांच्याही लेखनावर त्यांची छाप दिसते.

भास्करबुवांनी स्थापन केलेल्या 'भारत गायन समाजा'च्या व 'पुणे भारत गायन समाजा'च्या कार्यातही त्यांचा वाटा होता. त्यांनी १९५० नंतर आकाशवाणीच्या श्रवणकसोटी समितीचे सल्लागार सदस्य म्हणून कार्य केले. आकाशवाणी, पुणे केंद्रासाठी त्यांनी जुनी संगीत नाटके नभोनाट्याच्या स्वरूपात बसवून घेतली, संगीतिका सादर केल्या.

टेंब्यांच्या रूपवान, रसिल्या व रुबाबदार व्यक्तित्वाचा, ढंगदार संगीताचा व सुकुमार लेखनशैलीचा प्रभाव अनेकांवर पडला. संगीत दिग्दर्शनाच्या निमित्ताने बालगंधर्व, हिराबाई, मोहनराव पालेकर, वामनराव सडोलीकर, सरस्वती राणे, जयमाला शिलेदार, दुर्गा खोटे, मास्टर विनायक, लीला पेंढारकर, वसंत देसाई इत्यादींना, तसेच संगीतिकांच्या निमित्ताने सुरेश हळदणकर, राम मराठे, माणिक वर्मा, मालती पांडे, पद्माकर बर्वे, सुमन माटे अशा अनेक कलाकारांना त्यांचे मार्गदर्शन मिळाले. शिवाय जगन्नाथबुवा पुरोहित, शांता आपटे, पद्मावती शाळिग्राम, वामनराव देशपांडे, मधुसूदन कानेटकर, नीलकंठ अभ्यंकर, अरविंद मंगरूळकर, कृ.द. दीक्षित, म्हैसूर युवराज कृष्णराज वाडियार इत्यादींनी त्यांच्याकडून वेळोवेळी मार्गदर्शन घेतले. त्यांचे पुत्र माधव टेंबे यांनीही त्यांच्या संगीत दिग्दर्शन व हार्मोनिअमचा वारसा चालवला.

सत्ताविसाव्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष (पुणे), मराठी रंगभूमी शतसांवत्सरिक उत्सवाचे अध्यक्ष (नागपूर) अशी मानाची पदेही त्यांनी भूषविली. आचार्य अत्रे यांच्या अध्यक्षतेखाली १९५१ साली गोविंद टेंबे यांचा सत्तरीनिमित्त सत्कार करण्यात आला होता. त्यांचा मृत्यू दिल्ली येथे झाला.

त्यांची जन्मशताब्दी १९८१ साली साजरी करण्यात आली व त्यांचे नातू दीपक टेंबे यांनी 'गोविंदराव टेंबे स्मृती प्रतिष्ठाना'ची स्थापना केली.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**


१. *टेंबे, दीपक; स्मरणिका : 'गोविंद गुणी रंगले'; गोविंदराव टेंबे स्मृती प्रतिष्ठान, मुंबई; १९९३.*

२. *दिवेकर, चारुशीला; 'सांस्कृतिक महाराष्ट्राचे शिल्पकार : गोविंदराव टेंबे'; श्रीराम कल्चरल ट्रस्ट, मुंबई; २००६.*


***

ट

# ठ



## ठकार, वामन नारायण
**गायक**
**१२ डिसेंबर १८९८ – २८ मे १९७७**



वामन नारायण ठकार यांचा जन्म कोल्हापुरात झाला. त्यांच्या घरात कोणालाही संगीताची आवड नव्हती. वामन यांना मात्र बालपणापासूनच संगीतात रस होता. आपले हातातले काम सोडून ते कीर्तन ऐकण्याकडे लक्ष देत. त्यांचा आवाजही भरदार आणि त्याचबरोबर गोड होता. त्या वेळी गायनाचार्य पं. विष्णू दिगंबर पलुसकर कोल्हापुरात आले होते. वामनरावांचे थोरले बंधू त्यांना पलुसकरांकडे घेऊन गेले आणि पलुसकरांनी वामनरावांना शिकवावे, अशी त्यांना विनंती केली. वामनरावांना १९१२ साली पं. पलुसकरांकडे पाठविण्यात आले.

पं. विष्णू दिगंबरांकडे, लाहोरच्या गांधर्व महाविद्यालयात वामनरावांचे शिक्षण सुरू झाले. गुरुजींबरोबर संगीताच्या दौऱ्यांच्या निमित्ताने वामनराव भारताच्या कानाकोपऱ्यांत गेले. त्यांचे नाशिक, नागपूर, कोलकाता, मुंबई, वाराणसी, अलाहाबादपासून ते जम्मू-काश्मीरपर्यंत भ्रमण झाले.

वामनराव १९२५ पर्यंत पं. पलुसकरांच्या सहवासात राहून घरी परतले आणि त्याच वर्षी त्यांचा विवाह झाला. मग भावनगरमध्ये ‘दक्षिणामूर्ती विद्यालया’त संगीत शिक्षक म्हणून त्यांना नोकरी मिळाली. तिथेच त्यांनी ‘सौराष्ट्र संगीत विद्यालया’ची स्थापना केली. पण भावनगरमध्ये संगीताचे वातावरण नव्हते. त्याच वेळी गुरुबंधू विष्णू अण्णा कशाळकरांनी वामनरावांना प्रयागला येण्याचा आग्रह केला. म्हणून १५ जुलै १९२९ रोजी ते प्रयाग संगीत समितीत गेले. प्रयाग विद्यापीठात १९४६ पर्यंत ते प्राध्यापक म्हणून कार्यरत राहिले. त्या दरम्यान के.पी. इंटर कॉलेज, अलाहाबादमध्ये ते सहा वर्षे सेवारत राहिले.

त्यांचे पुत्र श्रीकांत ठकार हे संगीत शिक्षणाचे कार्य करीत आहेत. वामनरावांनी आपल्या शिष्यांवरही पुत्रवत प्रेम केले. त्यांचे अक्षर छान होते, त्यामुळे नाशिकच्या रामनाम आधार आश्रमात गायनाचार्य पलुसकरांसाठी जी ‘रामचरितमानसा’ची मोठ्या अक्षरातली प्रत शिष्यांनी लिहून तयार केली होती, त्या लिखाणात वामनरावांचाही सहभाग होता. वामनराव ठकार यांचे वाराणसी येथे निधन झाले.

– डॉ. सुधा पटवर्धन

## ठकार, सुलभा निशिकांत
**गायिका व लेखिका**
**१४ ऑक्टोबर १९३९**



सुलभा निशिकांत ठकार यांचा जन्म पुणे येथे वसंतराव व आनंदीबाई लोणकर यांच्या पोटी झाला. त्यांचे वडील उत्तम ऑर्गन वाजवत व त्यांच्या आईला अनेक पदे पाठ होती. त्यामुळे त्यांना बालपणापासून संगीताचे संस्कार प्राप्त झाले. शालान्त परीक्षेत संस्कृत

विषयासाठी त्यांना महामंडळातर्फे पारितोषिक व शिष्यवृत्ती प्राप्त झाली, तसेच संस्कृत विषयात त्यांनी विद्यापीठातून प्रथम क्रमांकही पटकावला. पुढे त्यांचा निशिकांत ठकार यांच्याशी विवाह झाला. ते समीक्षक व अनुवादक म्हणून प्रसिद्ध आहेत.

ग्वाल्हेर घराण्याचे प्रसिद्ध गायक केशवबुवा इंगळे तसेच त्यांचे शिष्य पं. ना.वा. दिवाण यांच्याकडून सुलभा ठकार यांनी शास्त्रीय संगीताचे प्राथमिक शिक्षण घेतले. त्यांच्यावर विजय (दाजी) करंदीकर यांच्याकडून किराणा घराण्याच्या गायकीचे संस्कार झाले. तसेच, ठुमरी व सुगम संगीताचेही शिक्षण त्यांना मिळाले. वयाच्या सोळाव्या वर्षी त्यांना आकाशवाणीच्या स्पर्धांमध्ये अखिल भारतीय स्तरावर पारितोषिक मिळाले.

यानंतर त्यांना किराणा घराण्याच्या ज्येष्ठ व श्रेष्ठ गायिका हिराबाई बडोदेकर यांची दीर्घ तालीम मिळाली. पटबिहाग, रामदासी मल्हार, चारुकेशी, जयंत मल्हार यांसारख्या अनवट रागांत त्यांनी नवीन बंदिशींची निर्मिती केली.

अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाच्या ‘संगीत अलंकार’ या परीक्षेत त्यांनी संपूर्ण भारतातून प्रथम क्रमांक मिळविला. पं. वसंतराव राजोपाध्ये यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी ‘संगीत आणि सौंदर्यशास्त्र’ या विषयावर प्रबंध लिहून गांधर्व महाविद्यालयाची ‘संगीताचार्य’ ही सर्वोच्च पदवी मिळविली. त्यांचे ‘संगीत आणि सौंदर्यशास्त्र’ हे पुस्तक प्रकाशित झाले आहे.

आकाशवाणी, पुणे केंद्रावरून वयाच्या पंधराव्या वर्षापासून त्यांनी सातत्याने शास्त्रीय गायनाचे कार्यक्रम सादर केले. ‘सूरसिंगार’ या मुंबई येथील संस्थेकडून त्यांना ‘सूरमणी’ ही पदवी प्राप्त झाली. त्यांनी भारतातील विविध भागांमध्ये संगीताच्या मैफली सादर केल्या.

त्यांच्या ‘संगीत इंद्रधनू’ या संगीत नाटकास नाट्यलेखनाचे पारितोषिक प्राप्त झाले. संगीतविषयक प्राचीन संस्कृत ग्रंथांचा अभ्यास करून प्रचलित संगीताचा त्याच्याशी असणारा संबंध स्पष्ट करणारे ‘भारतीय संगीतशास्त्र - नवा अन्वयार्थ’ हे त्यांचे पुस्तकही लक्षवेधी ठरले.

‘संगीत कला विहार’ या मासिकामध्ये त्यांनी सातत्याने लेखन केले. ‘गानवर्धन’ पुणे या संस्थेतर्फे प्रकाशित ‘वेध नाट्यसंगीताचा’ या ग्रंथामध्ये त्यांनी ‘नाट्यसंगीत ही एक स्वतंत्र गायनशैली आहे’ हे स्पष्ट करणारा लेख लिहिला.

ठकार यांनी ‘संगीत रत्नाकर’ या ग्रंथावर, तसेच ‘वैदिक संगीत ते हिंदुस्थानी शास्त्रीय संगीत’ या विषयावर अनेक विद्यापीठे व दूरदर्शनवरून सप्रयोग व्याख्याने दिली आहेत. टोकियोच्या संगीत विद्यापीठामध्ये त्यांनी भारतीय संगीतावर व्याख्यान दिले. त्यांच्या कन्या डॉ. पौर्णिमा धुमाळे या त्यांच्या शिष्या आहेत. सोलापूर येथील आयुर्वेद महाविद्यालयात त्यांनी सुमारे वीस वर्षे संस्कृत विषयाचे अध्यापन केले.

— डॉ. पौर्णिमा धुमाळे

## ठोमरे, केशव भगवंत

**व्हायोलिनवादक**

**१७ सप्टेंबर १९१९**



अकोला जिल्ह्यात लाडाचे कारंजे या गावी जन्मलेल्या केशव भगवंत ठोमरे यांचे वडील रॅली ब्रदर्समध्ये कपाशीचा व्यवसाय करीत. वयाच्या चौथ्या वर्षी झालेल्या विषमज्वराने ठोमरे पूर्ण अंध झाले. बरेच उपाय करूनही काहीच फायदा झाला नाही. या पराधीन अवस्थेत त्यांनी संगीताचा आधार घेतला व ते खामगावला आले. त्यांना १९३० मध्ये वडिलांच्या निधनाने पुन्हा एक धक्का बसला.

ठ

केशव ठोमरे १९३१ साली नागपूरला आले आणि त्यांनी अंधविद्यालयात प्रवेश घेतला. संगीत शिक्षक सावळाराम यांच्याकडे त्यांचे संगीत अध्ययन सुरू झाले. व्हायोलिन या वाद्याची विशेष आवड असल्याने त्यांनी दादासाहेब इंगळे व अप्पासाहेब सप्रे यांच्याकडून व्हायोलिनची तालीम घेतली. ठोमरे लवकरच व्हायोलिनवादनात तरबेज झाले व त्यांना लोकप्रियताही लाभली.

ठोमरे यांनी सुब्बारावांकडे विचित्रवीणेचा अभ्यास केला. अंधशाळेचे संस्थापक रावसाहेब वाडेगावकरांच्या हाताखाली काम करून त्यांनी संस्थेच्या कामाचा अनुभव घेतला. त्यांनी १९३९ ते १९४८ पर्यंत स्वत:चा अभ्यास चालू ठेवून शिक्षकाचे कार्य केले. वाडेगावकरांच्या निवृत्तीनंतर केशवराव अंधविद्यालयाचे मुख्याध्यापक व जनसंपर्काधिकारी या नात्याने कार्यरत झाले. या पदांवर काम करत असतानाच ते मॅट्रिक झाले. ठोमरे १९५८ मध्ये व्हायोलिनवादनात ‘संगीत अलंकार’ झाले. त्यांनी १९६४ मध्ये बी.ए.ची पदवी प्राप्त केली.

केशव ठोमरेंचे इंग्रजी खणखणीत असून त्यांना हिंदी, मराठी भाषा व ब्रेललिपी चांगली अवगत होती. व्हायोलिनवादनातील त्यांची मुख्य वैशिष्ट्ये म्हणजे सुरेल हात, अचूक स्वरफेक, मींडकाम, बढत, तानांची व गजाच्या वापरातील सफाई, लयकारी, कल्पकता ही होत. पाश्चात्त्य वादनशैलीचा त्यांचा अभ्यासही चांगला होता. कार्यतत्परता हा त्यांचा स्थायीभाव होता.

त्यांनी १९६८ मध्ये भोपाळला दृष्टिहीन कल्याण संघ स्थापन केला आणि अमरावतीला अंधविद्यालय स्थापन केले. ठोमरेंचे कर्तृत्व अंधविद्यालयाच्या विकासाला निस्संशय फलदायी ठरले.

— वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; ‘वैदर्भीय संगीतोपासक’; १९७४.*

✻✻✻

ठ

# त



## तळवलकर, सुरेश दत्तात्रेय

**तबलावादक**

**१८ जुलै १९४८**



ख्याल गायन, वाद्यसंगीत, कथक नृत्य यांना साथसंगत आणि एकल तबलावादन या तबलावादनाच्या चार दालनांमध्ये स्वत:चा एक वेगळा आणि स्वतंत्र असा ठसा निर्माण करणारे पंडित सुरेश दत्तात्रेय तळवलकर हे बहुधा एकमेव मराठी कलाकार असावेत. सुरेश यांचे पिताजी दत्तात्रेय ऊर्फ अण्णा तळवलकर यांनी सुरेश यांना तबलावादनाचे प्राथमिक शिक्षण देऊन पंडित पंढरीनाथ नागेशकर यांच्याकडे पुढील शिक्षणाकरिता सुपूर्द केले. नागेशकर गुरुजींनी पायाभूत शिक्षणापासून प्रगत शिक्षणापर्यंत सखोल असे शिक्षण सुरेश यांना दिले. या शिक्षणामुळे आणि विशेषत: लखनौ, फरूखाबाद या घराण्यांची विद्या त्यांना प्राप्त झाली.

सूक्ष्म लयकारीविषयी गोडी असल्यामुळे कर्नाटक संगीतातील लयशास्त्राचे गुरू, मृदंगवादक पंडित रामनाड ईश्वरन यांच्याकडे सुरेश तळवलकरांनी दाक्षिणात्य लयकारीचे शिक्षण घेतले आणि ते आत्मसात केले. ‘अत्यंत अवघड लयकारी प्रस्तुत करीत असताना, ती सहजतेने कशी करावी हा संस्कार पंडित ईश्वरन यांनीच आपल्यात रुजवला’, अशी कबुली ते स्वत:च देतात. ताल-सौंदर्याचा आविष्कार पाश्चात्त्य वाद्यात आणि विदेशी संगीतातही व्हावा किंवा कसा करावा यासाठी सुरेश तळवलकर विदेशी संगीतकारांना जे मार्गदर्शन करीत असतात, त्याचा गुरुमंत्रही त्यांना ईश्वरन यांच्याकडून प्राप्त झालेल्या लयशास्त्राच्या अध्ययनातून मिळाला आहे, असे ते मानतात.

आध्यात्मिक वृत्तीचे तबलागुरू पंडित विनायकराव घांग्रेकर यांच्या वैचारिक प्रभावामुळे सुरेश तळवलकरांना तबल्याचा रियाझ ही तबल्याची अक्षरसाधनाच असे वाटू लागले. पंडित गजाननराव जोशी यांना ते गुरुस्थानी मानतात. मूलत: गतिमान असलेल्या लयीचे स्थिरस्वरूप कसे असते याची जाणीव आणि अनुभूती गजाननबुवांमुळे प्राप्त झाली, असे ते कृतज्ञतापूर्वक मानतात. पंडित निवृत्तीबुवा सरनाईक यांच्या सहवासातूनही त्यांना रागसंगीत आणि लयतालाचे ज्ञान प्राप्त झाले असल्याने सुरेश त्यांनाही गुरुस्थानी मानतात.

लयशास्त्राचे सुरेश तळवलकरांनी सखोल अध्ययन केले आणि आपल्या वादनात ते सूक्ष्म लयकारीचे प्रयोग करू लागले. अशा प्रकारच्या वादनशैलीला ‘लघुमात्राकालयुक्त’ वादन असेही म्हणतात. या प्रकारचे वादन सातत्याने करून सुरेश तळवलकरांनी ते लोकप्रियही केले आहे.

स्वतंत्र तबलावादन प्रस्तुत करणारी एक नवी विचार-शैली तळवलकरांनी निर्माण केली आहे. तबल्याचा लोकप्रिय ताल ‘त्रिताल’ यामध्येच तबल्याची विद्या प्रामुख्याने निर्माण झाली आहे. बहुसंख्य तबलावादक हे स्वतंत्र वादन त्रितालातच करतात. आपल्या विद्यार्थ्यांनाही ते त्रितालाचीच सखोल अशी तालीम देत असतात. परंतु गेली कित्येक वर्षे सुरेश तळवलकर रूपक, झपताल, आडाचौताल इत्यादी त्रितालेतर तालांत आपले एकल तबलावादन जाणीवपूर्वक करीत आहेत. एकल वादनात कलापूर्ण, तसेच विद्वत्तापूर्ण असा

धिम्या लयीतील पेशकार प्रस्तुत करणे ही त्यांची खासियत आहे. यानंतर ते स्वत: बांधलेले कायदे आणि चलने पेश करतात.

तळवलकर यांची आणखी एक खासियत म्हणजे विविध मात्राकालांच्या विरामांच्या (दम) तिहाई, चक्रदार बंदिशींचे विविध प्रकार ते तडफेने वाजवितात. पूर्वांगातील तबला तळवलकर दिल्ली शैलीने वाजवितात, तर उत्तरांगातील त्यांचे तबलावादन हे पूरब आणि पखावजी अंगाचे असते. गवई जसा गाण्याकरिता साथीला तानपुरावादक घेत असतो, त्याचप्रमाणे तळवलकरसुद्धा आपल्या एकल वादनात एक किंवा दोन शिष्य साहाय्यक वादक म्हणून घेत असतात.

सर्वसाधारणपणे तबलावादनात लेहऱ्याकरिता हार्मोनिअम किंवा सारंगीची मदत घेतली जाते, पण तळवलकर आपल्या एकलवादनात लेहऱ्याची बंदिश प्रस्तुत करण्याकरिता प्रत्यक्ष गाण्याची मदत घेतात. या त्यांच्या अभिनव प्रयोगामुळे त्यांचे तबलावादन गाण्याच्या अधिक जवळ येते, जे श्रोत्यांना भावते.

सुरेश तळवलकरांचे गाण्यावर प्रेम आहे आणि गायनाच्या सर्व साथी ते डोळसपणे आणि एकाग्रतेने करीत असल्याने गाण्याच्या शेकडो बंदिशी त्यांना पाठ आहेत. यामुळे त्यांची गायनाची साथसंगत ही सुंदर तर असतेच; पण त्यांच्या साथीमुळे गवय्याचे गाणे रंगते. गजाननबुवांसारख्या कसलेल्या गवय्याबरोबर वर्षानुवर्षे साथ करता करता तळवलकर यांनी गजाननबुवांची गायकीच अत्यंत बारकाईने समजून घेतली. जी गोष्ट गजाननबुवांची, तीच गोष्ट पंडित निवृत्तीबुवा सरनाईक, पंडित रामभाऊ मराठे, उस्ताद खादिम हुसेन, पंडित उल्हास कशाळकर आणि अन्य गायकांची. गायकांच्या गायकीचा अभ्यास करून ग्वाल्हेर गायकीकरिता ‘तिलवाडा-झूमरा’ या तालांचा ठेका आणि ठेकाभरी कशी असावी किंवा जयपूर-अत्रौलीच्या गायकीकरिता धिम्या त्रितालाचा ठेका कसा वाजवावा यांचा अभ्यास करून सुरेश तळवलकरांनी ख्याल गायकीकरिता तबल्याच्या साथसंगतीचे नवे तंत्रच विकसित केले आहे.

कथक नृत्यकलेतील बंदिशींचा आणि त्यांतील लयकारीचा सखोल अभ्यास केला असल्यामुळे त्यांची कथक नृत्याची साथ ही अत्यंत समर्पक आणि उत्स्फूर्त असते. कथक नृत्यप्रकारात खानदानी तबल्याशी नाते सांगणाऱ्या लयकारी आणि रियाझाची आवश्यकता असते. ही गरज लक्षात घेऊन कथक नृत्याच्या विद्यार्थ्यांकरिता तळवलकर यांनी विविध प्रकारच्या रचना, शब्दबंध, छंद, त्यांच्या विस्ताराचे मार्ग, त्यांतील गणित आणि लयकारी यांची निर्मिती केली असून त्यांच्या साहाय्याने कथकच्या विद्यार्थ्यांना ते मार्गदर्शन करीत असतात. पुणे, नाशिक, मुंबई, कोल्हापूर येथील कथकच्या विद्यार्थ्यांना त्यांनी हा विचार आणि विविध रचना शिकवल्या असून ते त्यांच्याकडून कठोर रियाझ करून घेत असतात. परिणामत: कसदार, सशक्त, कलात्मक आणि विचारप्रगल्भ अशा लयकारीयुक्त कथकचा एक वेगळाच आणि आकर्षक आविष्कार आज आपल्याला त्यांच्या विद्यार्थ्यांकडून पाहायला आणि ऐकायला मिळतो.

वाद्यसंगीताची साथ याविषयी सुरेश तळवलकरांनी केलेला विचार इतका परिपूर्ण आहे, की कुठल्याही वादक किंवा नृत्यकलाकाराची ते अत्यंत सक्षमतेने साथ करू शकतात. समर्पक आणि परिणामकारक साथसंगत होण्याकरिता, आपल्या शिष्यांसाठी त्यांनी अनुरूप छंद बांधले, चलने बांधली, त्यांचे पलटे बांधले आणि त्या रचना कलापूर्ण पद्धतीने संपवणाऱ्या विविध प्रकारच्या ‘तिहाई’सुद्धा बांधल्या. हा सर्व तपशील ते शिष्यांकडून बसवून घेतात. त्यामुळे त्यांचे शिष्य विजय घाटे, रामदास पळसुले आदी प्रभावीपणे साथ करताना आपण पाहतो.

कलाकार हा ज्ञानग्रहण आणि कौशल्यप्राप्तीच्या प्रवासात विकसित आणि समृद्ध व्हायला लागला की त्याला मनापासून असे वाटायला सुरुवात होत असावी, की आपले ज्ञान आपण आणखी कोणाला द्यावे का? अशा प्रकारची जाणीव तळवलकरांना तरुणपणीच झाली आणि त्यांनी ‘तबला-विद्या-ज्ञानाच्या’ प्रशिक्षणाचा

त

वसाच हाती घेतला. तळवलकर गुरु-शिष्य परंपरेनुसार निवडक शिष्यांना तबला शिकवीत असतात. संपूर्ण भारतात त्यांचे शंभरच्या वर शिष्य पूर्णवेळ तबला-वादक म्हणून व्यवसाय करीत आहेत.

तबला-विद्या अधिकाधिक लोकांपर्यंत पोहोचावी या उद्देशाने महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही सुरेश तळवलकर कार्यशाळा पद्धतीने (वर्कशॉप्स) तबला शिकवीत असतात आणि अशा या कार्यशाळांच्या माध्यमातून त्यांनी हजारो विद्यार्थ्यांना तबल्याची विद्या दिली आहे. इतक्या मोठ्या संख्येने कार्यशाळांच्या माध्यमातून भारतभर तबला-विद्येचे वर्षानुवर्षे शिक्षण प्रदान करणारे सुरेश तळवलकर हे एकमेव कलाकार आहेत. त्यामुळे ते एक चालते-बोलते विद्यापीठच झाले आहेत.

तबल्याचे शिक्षण-प्रशिक्षण कसे व्हावे, या विषयाच्या विविध उपांगांमध्ये संशोधन व्हावे आणि विविध तज्ज्ञ, विचारवंतांचे परिसंवाद व्हावेत या विचाराने सुरेश तळवलकर झपाटलेलेच असतात. एस.आर.ए. कोलकाता, पुणे विद्यापीठ, संगीत नाटक अकादमी यांच्या साहाय्याने तळवलकर यांनी अत्यंत प्रभावकारक, यशस्वी परिसंवाद आयोजित केले आहेत.

सुरेश तळवलकरांकडून गुरु-शिष्य पद्धतीने शिक्षण घेऊन व्यावसायिक कलाकार म्हणून लौकिक पावलेले कलाकार पुढीलप्रमाणे आहेत : विजय घाटे, रामदास पळसुले, सुप्रीत देशपांडे, जावेद, मुकुल डोंगरे (पाश्चात्त्य ड्रम), चारुदत्त फडके, राजप्रसाद धर्माधिकारी, त्यांचा मुलगा आणि शिष्य सत्यजित तळवलकर, शमा भाटे (कथक) आदी.

राष्ट्रीय-राज्यस्तरीय, तसेच विविध सांस्कृतिक संस्थांतर्फे पंडित सुरेश तळवलकरांना अनेक पुरस्कार व मानपत्रे प्राप्त झाली आहेत. यांतील ‘तालयोगी’ पुरस्कार पू. शंकराचार्यांच्या हस्ते (२००१); ‘त्यागराज’ पुरस्कार, नादब्रह्म, चेंबूर, (२००२); ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार(२००४); ‘पंडित पलुसकर’ पुरस्कार, गांधर्व महाविद्यालय, पुणे (२००४); ‘श्री. वसंतराव नाईक’ पुरस्कार, महाराष्ट्र शासन (२००५); मानपत्र : अभिनव कला समाज, इंदूर (२००५); ‘जायंट्स इंटरनॅशनल’ पुरस्कार (२००७); ‘आयटीसी-एसआरए’ पुरस्कार, ‘स्वर साधना रत्न’ पुरस्कार (२००८) हे निवडक पुरस्कार आहेत.

— सुधीर माईणकर

## तारळेकर, गणेश हरी

**संगीतज्ञ**

**७ मे १९१४ - ११ डिसेंबर २००२**



गणेश हरी तारळेकर यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील तारळे या गावी झाला. ते संस्कृत व संगीत या दोन्ही विषयांचे गाढे विद्वान होते. ‘संगीत रत्नाकर’ या शार्ङ्गदेवांच्या ग्रंथाचे त्यांनी कलानिधी टीकेसह केलेले सटीप भाषांतर अतिशय प्रसिद्ध आहे.

मुंबई विद्यापीठातून त्यांनी संस्कृत विषयात एम.ए.ची पदवी संपादन केली, तसेच बनारस हिंदू विद्यापीठातून हिंदी विषयात एम.ए. केले. त्यांनी मुंबई विद्यापीठाची बी.टी. ही पदवी, तसेच पुणे विद्यापीठातून संस्कृत विषयाची पीएच.डी.ही मिळवली.

कोल्हापूरच्या नीळकंठबुवा चिखलीकर यांच्याकडे डॉ. गणेश तारळेकरांनी चार वर्षे गायनाची तालीम घेतली. जळगावच्या एम.जे महाविद्यालयामध्ये आणि धुळ्याच्या एस.व्ही.पी. महाविद्यालयामध्ये त्यांनी संस्कृतचे प्राध्यापक म्हणून कार्य केले. ते संस्कृत व संगीत या विषयांसाठी संशोधकांना मार्गदर्शन करीत असत.

‘दी सामन चँट्स ए रिव्ह्यू ऑफ रिसर्च’ हे त्यांनी लिहिलेले पुस्तक (१९८५) बडोद्याच्या इंडियन म्यूझिकॉलॉजिकल सोसायटीने प्रसिद्ध केले. याखेरीज ‘सामन चँट्स इन थिअरी अ‍ॅण्ड प्रॅक्टिस’ (१९९५) हे पुस्तक त्यांनी लिहिले. ते मुंबईच्या महाराष्ट्र राज्य

त

साहित्य संस्कृती मंडळातर्फे प्रकाशित झाले. 'स्टडीज इन नाट्यशास्त्र विथ स्पेशल रेफरन्स टू संस्कृत ड्रामा इन परफॉर्मन्स' हा त्यांचा ग्रंथ १९९१ साली प्रसिद्ध झाला. सामवेदातील 'पुष्प सूत्र' प्रातिशाख्यावरील त्यांचा ग्रंथही (२००१) प्रकाशित झाला. भारतीय वाद्यांविषयीची त्यांची 'इंडियन म्युझिकल इंस्ट्रुमेंट्स इन स्कल्प्चर्स' व 'भारतीय वाद्यांचा इतिहास (१९७२ व १९७३) ही इंग्रजी व मराठी पुस्तके गाजली.

पुण्यातील 'पुणे भारत गायन समाजा'चे अध्यक्षपद, तसेच महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक समितीचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेचे ते विश्वस्त होते. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये त्यांचा सहभाग असे. उत्तर भारतातील शास्त्रीय व लोकसंगीत, संस्कृत नाटके, वेदवाङ्मय यांवर त्यांनी पुष्कळ लिखाण केले आहे. त्यांच्या सुविद्य पत्नी नलिनी तारळेकर यांचेही मोलाचे सहकार्य त्यांना सांगीतिक संशोधनात लाभले. त्यांचे पुण्यात निधन झाले.

त

निवृत्त प्राध्यापकांना विशेष योगदानासाठी यू.जी.सी.कडून दिला जाणारा पुरस्कार त्यांना मिळाला. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचा 'आदर्श संस्कृत शिक्षक' पुरस्कार, 'स्वरसाधना रत्न' पुरस्कार, 'राष्ट्रपती' पुरस्कार, मुंबईच्या 'म्यूझिक फोरम'चा 'अनुसंधान' पुरस्कार (२०००) असे विविध पुरस्कार त्यांना लाभले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भः**

*'संगीत कला विहार'; डिसेंबर २००५.*

## तेलंग, मंगेश रामकृष्ण

**संगीतशास्त्रकार**

**२५ ऑगस्ट १८५९ – ११ ऑगस्ट १९४९**

मंगेश रामकृष्ण तेलंग यांचा जन्म कन्नड प्रांतात कारवार जवळील बाड या गावी सारस्वत ब्राह्मण कुळात झाला. त्यांचे वडील रामकृष्ण हे सरकारी नोकरीत मामलेदार होते. मंगेश तेलंग १८८० साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर ते चरितार्थासाठी मुंबईत आले.



मुंबईच्या उच्च न्यायालयात तीस वर्षे नोकरी करून, सहायक निबंधक (असिस्टंट रजिस्ट्रार)च्या हुद्द्यावर पोहोचून ते निवृत्त झाले.

मंगेश तेलंग व त्यांचे बंधू पुरुषोत्तम हे दोघेही गायन-वादनाचे शौकीन होते. मंगेश तेलंगांना लहानपणापासूनच संगीताची आवड होती. संस्कृत, इंग्रजी या विषयांवर त्यांचे प्रभुत्व होते. साहित्य, वेदान्त, न्याय, काव्य अशा अनेक विषयांत ते रमलेले असायचे. त्यांना संशोधनाची आवड होती. ते १८८२ साली बडोद्याला गेले व तेथे त्यांनी संगीताचा अभ्यास केला. पं. पन्नालालजी सतारिये, प्रसिद्ध बीनकार अली हुसेन खाँ, बंदे अली खाँ यांच्याकडून त्यांनी सतार व बीनवादनाचे शिक्षण घेतले. तसेच, तानरस खाँ व खादिम हुसेन यांचे गायन ऐकून त्यातले बारकावे टिपले.

जनतेत संगीताच्या बाबतीत विशेष जागृती याच काळात निर्माण होऊ लागल्यामुळे अनेक हस्तलिखिते छापली जात होती. तेलंगांचा संस्कृत काव्यशास्त्र, प्राचीन न्याय, वेदांत, दर्शन शास्त्र यांचाही गाढा व्यासंग होता. त्यांनी गोविंदसिंह, मंगलगिरी शास्त्री, सुदर्शनाचार्य अशा विद्वांनाकडून विद्या ग्रहण केली होती. यातूनच त्यांनी पुढे अनेक विषयांवरील प्राचीन, दुर्मिळ संस्कृत ग्रंथांचे संपादन कार्य केले. पुण्याच्या आनंदाश्रम छापखान्याने प्रकाशित केलेल्या शारंगदेवांच्या 'संगीत रत्नाकर' या ग्रंथाच्या संपादनाचे काम, तसेच १९२० साली बडोदा राज्य मध्यवर्ती ग्रंथालयाने प्रसिद्ध केलेल्या 'संगीत मकरंद'चे कामही त्यांनी केले असून या ग्रंथातील प्रस्तावना, ग्रंथावरील टिपणे व स्पष्टीकरण हेही मंगेश तेलंगांनीच केले आहे. संगीतावर स्वतंत्र असा ग्रंथ त्यांनी लिहिला नाही; पण विविध नियतकालिकांतून त्यांनी संगीतविषयक अनेक महत्त्वपूर्ण लेख लिहिलेले आहेत. त्यांनी १९३६ साली 'कलकत्ता ओरिएंटल जनरल' या मासिकात लिहिलेला 'एइन्शन्ट संस्कृत

वर्क्स ऑन इंडियन म्यूझिक अ‍ॅण्ड इट्स प्रेझेंट प्रॅक्टिस' हा लेख विशेष गाजला होता. यातून त्यांचे उदारमतवादी धोरणही दिसून येते.

'संगीत हे परिवर्तनशील असल्यामुळे सध्याची गायनपद्धती आणि जुन्या ग्रंथातील लक्षणे जुळत नसल्यास ती दुरुस्त केली पाहिजेत किंवा बदलली पाहिजेत; वर्तमान संगीताला ती लावून उपयोगाची नाहीत,' असा आशय या लेखात होता. त्यांचे आणि पं. विष्णू नारायण भातखंडे यांचे मतभेद होते. भातखंडे यांच्या लक्ष्य संगीत आणि हिन्दुस्थानी संगीत पद्धती यांवर त्यांनी टीकाही केली होती. मंगेश तेलंग यांनी केलेल्या विविध ग्रंथांवरचे सर्व लिखाण पुण्याच्या भांडारकर प्राच्य विद्यामंदिर या संस्थेस अर्पण करण्यात आले आहे.

मंगेश तेलंगांचे आवडीचे विषय अनेक होते. संगीताव्यतिरिक्त इंग्रजी वाङ्मय, वेद, पुराणे, चित्रकला, बुद्धिबळ अशा विषयांचाही त्यांचा व्यासंग होता. त्यांनी 'भगवद्गीतासार' तयार केले. 'संगीत हजामत' हे प्रहसनही त्यांनी लिहिले होते, तसेच 'बुद्धिबळाचा खेळ' हे पुस्तकही लिहिले.

त्यांनी १९१४ साली सेवानिवृत्त झाल्यावर भारतभर पर्यटन केले. त्यांना विद्वान लोकांत चांगलीच मानमान्यता मिळाली होती. म्हणून बनारस हिंदू विद्यापीठ, भारत महाधर्ममंडळ, अखिल भारतीय सारस्वत समिती, अयोध्या संस्कृत कार्यालय आदी संस्थांनी त्यांचा सत्कार केला. त्यांना 'वीणाविशारद', 'शास्त्रवाचस्पती' अशा पदव्याही देण्यात आल्या. यानंतर ते कारवार येथे स्थायिक झाले. पुढे कारवारमध्येच त्यांचे निधन झाले.

– माधव इमारते

**संदर्भ :**


१. *देवधर, बी.आर; 'थोर संगीतकार', पॉप्युलर प्रकाशन, १९९९.*

२. *गोखले, श.वि.; टिपा : टेंबे, गोविंदराव; 'माझा संगीत व्यासंग', संपादक : देशपांडे, वामनराव.*


✻✻✻

त

थ



थ

## थत्ते, अरविंद दिगंबर
**हार्मोनिअमवादक**
**१७ नोव्हेंबर १९५८**



डॉ. अरविंद थत्ते यांचे कार्य साथ, एकलवादन, संशोधन व अध्यापन या सर्वच संदर्भांत वैशिष्ट्यपूर्ण ठरले आहे. कलेशी व माणुसकीशी तडजोड न करणारा एक तत्त्वनिष्ठ, विचारवंत कलाकार व सहृदय माणूस म्हणून त्यांचा गौरव केला गेला आहे.

अरविंद दिगंबर थत्ते यांचा जन्म कोकणातील रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली तालुका येथे झाला. संगीत व विश्लेषक बुद्धिमत्ता यांचे बाळकडू त्यांना दिगंबर व वत्सला या आई-वडिलांकडूनच मिळाले. त्यांचे आजोबा हरहुन्नरी होते व कीर्तन, संगीत नाटकांत काम, चित्र काढणे, उत्तम कलमे बांधणे असे अनेक कलागुण त्यांच्यात होते. वडील व्यवसायाने शिक्षक, पण हार्मोनिअमही चांगली वाजवत. रत्नागिरीस असताना ते हार्मोनिअमची साथ व क्वचित संगीत नाटकांत ऑर्गनची साथही करत. त्यामुळे वयाच्या पाचव्या वर्षापासूनच अरविंद थत्ते हे हार्मोनिअम वाजवू लागले. नंतर हे कुटुंब पुण्यात आले व त्यांच्यासमोर संगीताचे अधिक मोठे दालन खुले झाले. थत्ते यांना स्वरांची सूक्ष्म जाण बालपणापासूनच होती व स्वरलेखन करण्याची हातोटीही होती. बाराव्या वर्षी थत्ते यांचे भारत गायन समाजात संगीताचे रूढ शिक्षण सुरू झाले. तिथे त्यांनी सुहास दातार व सुधीर दातार यांच्याकडे गायनाचे शिक्षण घेतले, तसेच त्यांनी तबल्याचे शिक्षण पुण्यात जी.एल. सामंत यांच्याकडे घेतले. वयाच्या एकविसाव्या वर्षापासून पुढे चौदा वर्षे पंडित जसराज यांच्याकडे त्यांनी कंठसंगीताचे शिक्षण घेतले.

त्यांचे शालेय शिक्षण पुण्यातील भावे विद्यालयामध्ये झाले. गरवारे महाविद्यालयामधून बी.एस्सी. व नंतर पुणे विद्यापीठातून एम.एस्सी. व एम.फिल. केल्यानंतर त्यांनी ‘विशुद्ध गणित’ या विषयात १९८७ साली पीएच.डी. मिळवली. मात्र, त्यांनी आपला व्यासंग संगीताच्या क्षेत्रातच चालू ठेवला. मुळातच मर्मवेधी अशी कुशाग्र बुद्धी व गणिताचा अभ्यास यांतून आलेल्या चिकित्सेमुळे त्यांनी संगीताकडेही एका वेगळ्या दृष्टीने पाहिले. त्यांची सांगीतिकता ही वैज्ञानिक दृष्टी व कलाकारी वृत्ती या दोन्हींच्या मिश्रणातून बनलेली आहे.

ते १९८२ साली आकाशवाणीच्या राष्ट्रीय संगीत स्पर्धेत ते प्रथम क्रमांकाचे मानकरी ठरले. या दरम्यान रागसंगीताच्या मैफलींना ते हार्मोनिअमची साथही करू लागले. ‘स्वरानंद’ संस्थेच्या ‘मंतरलेल्या चैत्रबनात’, ‘आपली आवड’ अशा भावगीतांच्या कार्यक्रमांनाही त्यांनी साथ केली. ज्येष्ठ कथक गुरू रोहिणी भाटे यांना व काही तबलावादकांना नगम्याची साथही थत्ते यांनी केली. काही काळ जयमाला शिलेदार यांच्या संगीत नाटकांना व भीमसेन जोशींच्या ‘अभंगवाणी’लाही त्यांनी ऑर्गनची साथ केली.

एक व्यावसायिक हार्मोनिअमवादक म्हणून अरविंद थत्ते यांनी मोगूबाई कुर्डीकर, निवृत्तिबुवा सरनाईक, गजाननबुवा जोशी, मल्लिकार्जुन मन्सूर, के.जी. गिंडे, कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, जसराज, राम मराठे, यशवंतबुवा जोशी, बाळासाहेब पूछवाले, वसंतराव

देशपांडे, जितेंद्र अभिषेकी, सी.आर. व्यास, गंगूबाई हनगल, माणिक वर्मा, प्रभा अत्रे, किशोरी आमोणकर, शोभा गुर्टू, गिरिजा देवी, परवीन सुलताना, लक्ष्मी शंकर इ. सुप्रसिद्ध कलाकारांना साथसंगत केली. गायकाचा संगीतविचाराचा ओघ तुटू न देता, वादनातले सातत्य टिकवून स्वराचा भरणा देणारी, गायकाच्या मांडणीला खुलवत जाणारी, अगदी तंतोतंत, नेमकी साथ हे त्यांचे वैशिष्ट्य ठरले. अरविंद थत्ते यांनी मालिनी राजूरकरांना केलेली साथ लक्षणीय ठरली आहे. साथीच्या निमित्ताने त्यांनी भारतभर, तसेच अमेरिका, युरोप, आखाती देश, इ. विदेशांतही दौरे केले.

गायकावर कधीही कुरघोडी न करता, गायकीतले बारकावे नेमकेपणाने टिपत, त्याला पोषक अशी साथ करण्याबाबत अरविंद थत्ते यांचा लौकिक आहे. साथीसाठी नॅचरल ट्यूनिंगच्या हार्मोनिअमचा वापर मोठ्या प्रमाणात करून त्यांनी वादनातील सुरेलपणाचा एक मानदंडच निर्माण केला. अत्यंत नेमकी, संयमित व पूरक साथ करून देशातील अग्रगण्य हार्मोनिअम साथीदारांत त्यांनी स्वतःचे स्थान निर्माण केले. गेल्या काही काळात प्रामुख्याने डॉ. अरविंद थत्ते यांच्या परिश्रमांमुळे विशिष्ट स्वरपट्टीसाठी स्वरजुळणी केलेल्या ‘स्पेशल ट्यूनिंग’ हार्मोनिअम कटाक्षाने वापरण्याकडे महाराष्ट्रातील गायक-वादकांचा कल आहे.

त्यांनी १९९५ नंतर मात्र साथसंगत करणे सीमित केले. त्यानंतर डॉ. थत्ते यांनी प्रामुख्याने एकल हार्मोनिअमवादनाद्वारे या वाद्यातून उत्तम रागसंगीत निर्माण करणे व त्याद्वारे या वाद्याला मैफलीतला मानाचा दर्जा (कॉन्सर्ट स्टेटस) देणे यांकडे आपले लक्ष केंद्रित केले.

डॉ. अरविंद थत्ते यांनी एकलवादनाची स्वतंत्र शैलीच निर्माण केली व तिचा प्रसारही त्यांनी नेटाने केला. हार्मोनिअमवादनाच्या गायकी-अंग वा तंत-अंग अशा कुठल्याही साच्यात स्वतःला अडकवून न घेता, गायकी वा तंत्राच्या सामायिक आयामांबरोबरच हार्मोनिअमच्या स्वतंत्र क्षमतांना जोपासून त्यांनी सर्वसमावेशक अशी वादनशैली विकसित केली. तारता, गरिमा, घनता व आघात या संदर्भांत असणाऱ्या हार्मोनिअमच्या क्षमतांचा पुरेपूर वापर करून त्यांनी या वाद्याच्या कक्षा रुंदावणारे विशुद्ध रागसंगीत वाजवले. चिंतन, रियाजातून आलेला घोटीवपणा आणि उत्स्फूर्ततेचा ओलावा यांचा मेळ घालण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यांनी एकलवादनात अनेक कलाकारांच्या बाबतीत दिसणारे दोष, हिणकसपणा टाळला. वादन करताना हातवारे व हावभावांपेक्षा वादनातील स्पष्टता, नेमकेपणा याला महत्त्व दिले.

डॉ. थत्ते यांनी हार्मोनिअमला साजेसे राग निवडणे, त्यांत गतींची बांधणी करणे, तसेच आलाप-जोड-झाला, द्रुत गतींबरोबरचा झाला, छंदवादन, विविध जातींमधील सूक्ष्म लयकारीचे व तयारीचे वादन असे अनेक आयाम विकसित केले. ललित, अहिरभैरव, नटभैरव, तोडी, चारुकेशी, शुद्धसारंग, भीमपलास, मधुवंती, दिन की पूरिया, पूरिया, पूरिया धनाश्री, कल्याण, दुर्गा, झिंझोटी, बागेश्री, औडव बागेश्री, मालकंस, कैशिकरंजनी, इ. राग मैफलींत वाजवून हार्मोनिअमवर उच्च दर्जाचे रागसंगीत वाजू शकते याची साक्ष पटवली आहे. ‘श्री’सारख्या रागाची पेशकश हार्मोनिअमवर करण्याचे आव्हानही त्यांनी समर्थपणे पेलले. गौरी, बिहागडा, संपूर्ण मालकंस, मालवती, श्रीकल्याण असे विशिष्ट घराण्याशी वा कलाकाराशी जोडले गेलेले रागही त्यांनी वेगळी वाट चोखाळत वाजवले, तसेच बसंतीकेदार, पूरियाकल्याण, जोगकंस असे जोडराग वाजवण्यात त्यांचा हातखंडा आहे. चंद्रबसंती, त्रिवेणी मध्यम, संपूर्णकंस असे रागही त्यांनी निर्माण केले. अशा हार्मोनिअमवादनासाठी त्यांनी खास गतींची निर्मिती केली. हार्मोनिअमवादनाच्या कक्षेत ‘टप्पा’ हा प्रकार त्यांनी प्रथमच आणला. खमाज, काफी, भैरवी यांबरोबर जयजयवंती, मारुबिहाग, वाचस्पती यांसारख्या रागांमध्ये त्यांनी टप्पे बांधले व सादर केले.

अरविंद थत्ते यांनी तीनताल, एकताल, झपताल,

थ

रूपक या तालांतील गतकारीबरोबर झूमरा तालात मध्यविलंबित लयीत ख्यालवादन केले. शिवाय मत्तताल, मिश्रजाति-रूपक, तिस्रजाति-रूपक, खंडजाति-रूपक, अष्टरूपक, साडेसात मात्रांचा नीलताल, मिश्रजाति-पंजाबी, आडा झपताल अशा अनवट तालांतही त्यांनी वादन करून लयतालावरचा आपला अधिकार सिद्ध केला आहे.

विष्णू दिगंबर जयंती समारोह (दिल्ली), मणिराम मोतीराम संगीत समारोह (हैदराबाद), कुमार गंधर्व स्मृती समारोह (देवास), बंडूभैया चौघुले स्मृती समारोह (इंदूर), सवाई गंधर्व संगीत महोत्सव (कुंदगोळ), शिवानंद संगीत महोत्सव (औंध संस्थान), शाहू संगीत समारोह (कोल्हापूर), दादर माटुंगा म्यूझिक सर्कल (मुंबई), स्वरगंगा संगीत महोत्सव व राम मराठे पुण्यतिथी (ठाणे), भुवनेश्वर, धारवाड, इ. ठिकाणी त्यांनी एकलवादनाच्या मैफली प्रस्तुत केल्या. एकल हार्मोनिअमवादनासाठी त्यांनी पहिला अमेरिका दौरा २००६ साली केला.

त्यांच्या एकल हार्मोनिअमवादनाच्या अनेक ध्वनिफिती प्रकाशित झाल्या आहेत. त्यांच्या वादनाची ध्वनिचकती (सी.डी.) १९९६ साली प्रसिद्ध झाली.

आपल्या संशोधक वृत्तीने त्यांनी हार्मोनिअमच्या ट्यूनिंगची वेगळी पद्धत तयार केली, तसेच रागसंगीतावरही संशोधन केले. केवळ हार्मोनिअमबद्दलच नव्हे, तर संपूर्ण रागसंगीतावर महत्त्वपूर्ण भाष्य करणारा ‘संगीत विमर्श’ हा डॉ. अरविंद थत्ते यांचा इंग्रजी भाषेतला ग्रंथ २०१० मध्ये प्रसिद्ध झाला. त्यात त्यांनी श्रुतिविचार, चतु:सारणाप्रयोग, रागनिर्मिती व रागविस्तार, आवाज व वाद्याचा रियाज, मैफलीतील प्रस्तुती, गुरु-शिष्य नाते, इ. अनेक बाबींवर त्यांचे मूलगामी विचार व्यक्त केले आहेत.

त्यांना पहिला कुमार गंधर्व पुरस्कार (१९९३, सोलापूर), बंडूभैया चौघुले पुरस्कार (२००२, इंदूर), गोविंदराव टेंबे संगतकार पुरस्कार (२००३, पुणे), लीलाताई जळगावकर पुरस्कार (२००८, पुणे) असे पुरस्कार देऊन गौरविण्यात आले. गायन व हार्मोनिअम या दोन्हींसाठी ते खऱ्या अर्थाने विद्या ‘दान’ करत आहेत. सुयोग कुंडलकर, चैतन्य कुंटे, चिन्मय कोल्हटकर, मानसी महाजन हे त्यांचे शिष्य आघाडीचे हार्मोनिअमवादक आहेत.

डॉ. थत्ते यांच्यातील उच्च दर्जाची कला व तत्त्वनिष्ठा यांमुळे समकालीन कलाकारांमध्ये एक कृतिशील विचारवंत कलाकार व सहृदय व्यक्ती म्हणून त्यांचे आदराचे स्थान निर्माण झाले आहे.

– चैतन्य कुंटे

**थोरपे, नारायण**

☛ **पानसे, नानासाहेब**

✻✻✻




द

## दस्तूर, फिरोझ बेजनजी

**गायक**

**३० सप्टेंबर १९१९ – ९ मे २००८**



फिरोझ बेहरामजी दस्तूर यांचा जन्म मुंबईत, एका पारसी कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव जेरबाई असे होते. फिरोझ यांचे मूळ नाव फर्दुनजी असे होते. वडील बेजनजी यांना संगीताची आवड व जाणही चांगली होती. ते बिलिअर्डगृह चालवीत असत. आपला पुत्र फर्दुनजी याने उत्तम गायक व्हावे व नावलौकिक मिळवावा अशी त्यांची तीव्र इच्छा होती. त्यानुसार त्यांनी फर्दुनजी यांना गाण्याच्या नियमित शिक्षणासाठी पं. कृष्णराव जावकर यांच्याकडे पाठविले.

देखणे रूप व मधुर आवाज लाभलेल्या फर्दुनजी यांना त्या वेळचे चित्रपटनिर्माते जे.बी. वाडिया यांनी १९३२ साली आपल्या चित्रपटांतून भूमिका करण्यासाठी पाचारण केले व मूळचे फर्दुनजी असलेले आता 'फिरोझ' या चित्रपटसृष्टीतील नावाने ओळखले जाऊ लागले. त्या वेळी त्यांचे वय तेरा वर्षांचे होते.

त्या काळी पार्श्वगायनाचे तंत्र विकसित झालेले नसल्याकारणाने व फिरोझ दस्तूर यांचा आवाज अत्यंत मधुर असल्यामुळे वाडिया यांच्या अनेक ऐतिहासिक व पौराणिक चित्रपटांतून उदा. लाले-यमन (१९३३), गुल-ए-बकावली (१९४८), वामन अवतार इ. चित्रपटांतून त्यांनी प्रमुख भूमिका केल्या होत्या. या विविध चित्रपटांतून त्यांनी गायलेल्या गीतांपैकी काही गीते त्या वेळी फारच लोकप्रिय ठरली होती. एकूण चित्रपटसृष्टीने त्यांना बालवयातच खूप लोकप्रियता मिळवून दिली.

चित्रपटसृष्टीत नाव कमविल्यानंतरही त्यांच्यातला गायक त्यांना स्वस्थ बसू देईना. परिणामी, आपल्या व वडिलांच्याही स्वप्नपूर्तीच्या दृष्टीने त्यांनी रामभाऊ कुंदगोळकर ऊर्फ सवाई गंधर्वांसारख्या किराणा घराण्याच्या एका महान व अत्यंत लोकप्रिय गायकाकडून शास्त्रीय संगीताची तालीम घेण्यास सुरुवात केली. रामभाऊंनी त्यांना सुमारे पाच वर्षे पक्की तालीम दिली व फिरोझजीही स्वतंत्र कार्यक्रम करू लागले. सवाई गंधर्व यांना १९४२ साली अर्धांगवायूचा झटका आला व १९५२ साली त्यांचे पुणे येथे निधन झाले. त्यानंतर फिरोझ दस्तूर यांना पं. बाळकृष्णबुवा कपिलेश्वरी यांच्याकडूनही काही काळ मार्गदर्शन प्राप्त झाले.

अशा रितीने प्रथम श्री. जावकर, त्यानंतर सवाई गंधर्व व शेवटी पं. कपिलेश्वरी बुवा या तीन मातब्बर गानगुरूंकडून त्यांना शास्त्रीय संगीताची तालीम प्राप्त झाली. हे तिघेही गुरू उ. अब्दुल करीम खाँ साहेबांचेच शिष्य होते. उ. अब्दुल करीम खाँ यांची आठवण ते आपल्या गायनातून, विशेषतः ठुमरीच्या आर्त स्वरोच्चारांतून करून देत. सवाई गंधर्व संगीत महोत्सवातील त्यांचे दरवर्षीचे गायन 'गोपाला मेरी करुणा क्यूं नहीं आवे' या भजनाच्या फर्माइशीशिवाय पूर्ण होत नसे.

मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागात त्यांनी सलग ३६ वर्षे किराणा घराण्याचे प्राध्यापक गुरू म्हणून काम केले होते. त्याशिवाय त्यांच्या निवासस्थानीही विद्यार्थी-विद्यार्थिनींना ते शास्त्रीय संगीत शिकवीत असत. त्यांनी

विविध रागांत रचलेल्या सुमारे पन्नास चिजा, तसेच दुर्गामल्हार व चंद्रमुखी या दोन स्वतंत्र रागांची निर्मिती त्यांच्या सर्जनशीलतेची साक्ष देणाऱ्या आहेत.

भारतात, तसेच परदेशांतही त्यांचे कार्यक्रम झाले. कराची येथे १९३९ साली त्यांची प्रथम मैफल झाली. ते १९३३ ते १९९५ पर्यंत आकाशवाणीवर नियमितपणे गायन करत. अच्युत अभ्यंकर, सुधा दिवेकर, श्रीकांत देशपांडे, मिलिंद चित्ताल, गिरीश संझगिरी, चंद्रशेखर वझे इ. शिष्यवर्गही त्यांनी तयार केला.

पं. फिरोज दस्तूर यांना हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताबद्दलचा १९८७ चा 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार, मध्यप्रदेश सरकार पुरस्कृत 'तानसेन सन्मान' पुरस्कार, दक्षिण गुजरात विद्यापीठ, सुरत यांच्यातर्फे सन्माननीय 'डॉक्टरेट' सन्मान हे दोन्ही १९८८ साली, तसेच 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार असे सन्माननीय पुरस्कार प्राप्त झाले. अविवाहित असलेल्या पं. फिरोझ दस्तूर यांचे मुंबईत निधन झाले. त्यांचे शिष्य गिरीश संझगिरी यांनी त्यांच्यावर हिंदू पद्धतीने अंत्यसंस्कार केले.

— अच्युत अभ्यंकर

**संदर्भ :**

*नाडकर्णी, मोहन; 'द ग्रेट मास्टर्स, प्रोफाइल्स इन हिंदुस्थानी क्लासिकल व्होकल म्यूझिक'; हार्पर कॉलीन्स पब्लिशर्स, इंडिया; १९९९.*

## दातार, दामोदर केशव

**व्हायोलिनवादक**

**१४ ऑक्टोबर १९३२**

दामोदर केशव दातार यांचा जन्म कुरुंदवाड संस्थानातील नरसोबाची वाडी येथे झाला. वडील केशवराव दातार गायनाचार्य पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या सान्निध्यात होते. पं. विष्णू दिगंबर पलुसकर हे त्याच वेळी बाळकृष्णबुवांकडे विद्याध्ययन करीत होते. केशवराव आणि विष्णू दिगंबर हे गुरुबंधू होते. कालांतराने विष्णू दिगंबर यांनी केशवराव दातार यांची नियुक्ती मुंबईतील गांधर्व महाविद्यालयाच्या संचालक पदावर केली. त्यामुळे दातार कुटुंबीय १९१४ ते १९१८ च्या दरम्यान मुंबईत वास्तव्यास राहिले.



दामोदर दातारांचे पितृछत्र लहानपणीच हरपल्याने थोरले बंधू नारायणराव दातार यांनी सर्व कुटुंबाची जबाबदारी घेतली. नारायणराव दातार हे संगीत शिक्षक होते. लहानपणीच नारायण दातारांकडून दामोदर दातारांवर गाण्याचे संस्कार झाले. दामोदर यांनी व्हायोलिन शिकावे ही नारायणरावांची इच्छा होती. गिरगावमधील 'देवधर स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक' मध्ये पं. विघ्नेश्वर शास्त्री यांच्याकडे त्यांचे व्हायोलिन शिक्षण रीतसर सुरू झाले. त्याचबरोबर त्यांचे महाविद्यालयीन शिक्षणही सुरू होते.

त्यांनी विघ्नेश्वर शास्त्री यांच्याकडे सलग १०-११ वर्षे शिक्षण घेतले. वादनातील सातत्यता, अतूट स्वरोत्पादन, त्याचबरोबर गजाचा संथपणा व ओघ या वैशिष्ट्यांचा त्यांनी पाठपुरावा केला. विघ्नेश्वर शास्त्रींनी व्हायोलिनवादनाचा पाया पक्का करून घेतला. याबरोबरच त्यांना थोरल्या बंधूंचे अमोल मार्गदर्शन लाभले. त्या वेळच्या अनेक प्रथितयश गायक-गायिकांची गाणी ऐकण्याकरिता ते दामोदरांना घेऊन जात व त्यांच्या गायनातील मर्म उलगडून दाखवत. त्यामुळे वादन हे गायन अंगानेच प्रस्तुत व्हायला हवे ही भूमिका त्यांच्या मनात पक्की झाली.

पं. द.वि. पलुसकर हे दातारांचे मामा होते. ते कार्यक्रमाला येत तेव्हा गिरगावात, दातारांच्या घरी उतरत. त्यांना १९४५ ते १९५५ या काळात पं. पलुसकरांचा सुरेल सहवास लाभला. पहिली काही वर्षे दातारांनी तानपुऱ्यावर, नंतर व्हायोलिनवर पलुसकरांच्या कार्यक्रमात साथ केली. पलुसकरांबरोबर दातारांनी मुंबईखेरीज भारतातील इतर शहरांतही साथ केली. पलुसकरांच्या सहवासातून दातारांचे वादन अधिक समृद्ध,

द

प्रासादिक, तसेच परिपक्व झाले. पलुसकरांच्या स्वभाववैशिष्ट्यांचाही दातारांच्या एकंदर सांगीतिक कारकिर्दीवर खोल परिणाम झाला. पलुसकरांच्या अचानक झालेल्या निधनानंतर दातारांनी आपल्या स्वतंत्र व्हायोलिनवादनाच्या बैठकी सुरू केल्या.

साधारणतः १९५७ - १९५८ च्या सुमारास दातारांचे स्वतंत्र वादनाचे कार्यक्रम सुरू झाले. आकाशवाणीवरूनही त्यांचे कार्यक्रम नियमितपणे व्हायला लागले. आकाशवाणीच्या दिल्ली केंद्रावरून प्रसारित होणाऱ्या संगीताच्या अखिल भारतीय कार्यक्रमातून त्यांच्या वादनाचे प्रसारण झाले. आकाशवाणी या माध्यमामुळे त्यांचे नाव सर्वदूर झाले.

मुंबईच्या फिल्म्स डिव्हिजनमध्ये दातारांनी बराच काळ नोकरी केली. अनेक अनुबोधपटांसाठी त्यांनी पार्श्वसंगीत-वादन केले. पं. रविशंकर यांच्या 'मेलडी आणि ऱ्हिदम' या कार्यक्रमात त्यांचा सहभाग होता. चित्रपटसृष्टीत सी. रामचंद्र, एस.एन. त्रिपाठी, एस.डी. बर्मन, लक्ष्मीकांत प्यारेलाल इ. संगीतकारांसाठी त्यांनी 'साँग व्हायोलिनवादक' म्हणून काम केले. त्यांनी १९८० - ८२ नंतर हे क्षेत्र सोडले.

मैफली कलाकार म्हणून दातारांचे नाव १९६५ - ६६ पासून होऊ लागले होते. भारतात, तसेच पाश्चिमात्य देशांतही त्यांचे व्हायोलिनवादनाचे कार्यक्रम झाले. प्रत्येक वेळी वेगवेगळी आमद घेऊन दाखवलेले समेवर येण्याचे कसब, स्वर-लय यांच्या योग्य मिलाफाने केलेले त्यांचे सादरीकरण व खर्जापासून तारसप्तकापर्यंत होत जाणारा स्वरविस्तार ही त्यांच्या वादनातील खास वैशिष्ट्ये म्हणता येतील.

पं. दामोदर दातारांना अनेक पुरस्कार व मानसन्मान लाभले. 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार, 'पद्म' पुरस्कार, 'कुमार गंधर्व' पुरस्कार हे काही मानाचे, विशेष पुरस्कार त्यांना लाभले. आइसलँडच्या अध्यक्षांकरवी दिला जाणारा 'सन्मान पुरस्कार' हा आंतरराष्ट्रीय पातळीवरचा पुरस्कारही त्यांना लाभला आहे. दातारांच्या पत्नी सुधाताई या स्त्री-रोगतज्ज्ञ आहेत. वयाची पंचाहत्तरी उलटली तरी पं. दातार यांचा रियाझ व नवनवीन प्रयोग करण्याची त्यांची वृत्ती यांत खंड पडलेला नाही. दातारांनी व्हायोलिनवादनात अनेक शिष्यही तयार केले आहेत.

— रत्नाकर गोखले

## दाते, अरविंद रामचंद्र

***दाते, अरुण***

**भावगीत गायक**

**४ मे १९३४**



अरविंद रामचंद्र दाते यांचा जन्म इंदूरला झाला. त्यांचे मूळ नाव अरविंद असले तरी संगीताच्या क्षेत्रात ते 'अरुण दाते' याच नावाने ओळखले जातात. रसिकाग्रणी, कलासक्त म्हणून प्रसिद्ध असलेले रामूभैया दाते हे त्यांचे वडील होते. घरात सतत मोठमोठ्या कलावंतांचा राबता असल्याने अरुण दाते यांच्यावर लहानपणापासूनच संगीत, साहित्य व उत्तम कलेचे संस्कार झाले. गायनाकडे त्यांचा लहानपणापासूनच ओढा होता. त्यांचा गोड आवाज व गाण्याची आवड बघून कुमार गंधर्वांनी त्यांना पहिली उर्दू गझल शिकवली.

शास्त्रीय संगीत व गझल गायकीवर उत्तम प्रभुत्व असलेले के. महावीर हे त्यांना गुरू म्हणून लाभले. मुंबईत वस्त्रोद्योग अभियांत्रिकी (टेक्स्टाइल इंजिनिअरिंग) चे शिक्षण घेत असतानाच त्यांचे संगीत शिक्षणही सुरू होते. वस्त्रोद्योग अभियांत्रिकीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर ते बिर्ला उद्योगसमूहात कामाला लागले. नोकरीत प्रगतीचे अनेक टप्पे पार करीत उपाध्यक्ष ह्या उच्चपदावरून ते निवृत्त झाले. सुरुवातीला ते हिंदी व उर्दू गझला रेडिओवर व लहान कार्यक्रमांमधून गात असत. श्रीनिवास खळे यांनी त्यांच्याकडून १९६२ साली आकाशवाणीसाठी 'शुक्रतारा' हे गीत गाऊन घेतले व

मराठी भावगीत गायनाच्या क्षेत्रात नवीन ताऱ्याचा उदय झाला. त्यानंतर ते सातत्याने श्रीनिवास खळे, यशवंत देव व इतर अनेक संगीतकारांच्या दिग्दर्शनाखाली मंगेश पाडगावकर, शंकर वैद्य व इतर अनेक उत्तमोत्तम कवींच्या रचना गात राहिले व अत्यंत लोकप्रिय गायक म्हणून त्यांनी कीर्ती व अनेक मानमरातब मिळवले. त्यांची शुक्रतारा मंद वारा, भेट तुझी माझी स्मरता, अखेरचे येतील माझ्या, धुके दाटलेले, स्वरगंगेच्या काठावरती, जेव्हा तुझी नी माझी, इत्यादी गाणी गाजली.

त्यांनी गायलेल्या गाण्यांची संख्या एकशेतीस आहे. मराठी भावगीत विश्वात अरुण दातेंनी आपला ठसा उमटवला आहे. 'शुक्रतारा' या रसिकप्रिय कार्यक्रमाचे त्यांनी आतापर्यंत २,५२० प्रयोग केले आहेत व अजूनही करीतच आहेत. एकाच गायकाचे, फक्त स्वत:चीच गाणी गाऊन इतके कार्यक्रम होणे हा मराठी संगीत विश्वातला विक्रमच होय.

१९९३ साली अमेरिकेतील तूसाँ सिटीतर्फे त्यांना मानद नागरिकत्व प्राप्त झाले. तसेच त्यांना 'शनिवारवाडा कला महोत्सव' पुरस्कार (२००२), 'पूर्णवाद कला उपासक' पुरस्कार (२००८), पहिला 'स्व. महेंद्र कपूर' पुरस्कार (२००९), पहिला 'गजाननराव वाटवे' पुरस्कार (२०१०) व महाराष्ट्र पत्रकार संघातर्फे 'महाराष्ट्र भूषण' असे विविध पुरस्कार प्राप्त झाले.

— ज्योती दाते

द

## दाते, अरुण

☛ *दाते, अरविंद रामचंद्र*

## दाते, रामचंद्र सदाशिव

***दाते, रामूभैया***

**कलाश्रयदाते**

**२५ मार्च १९०५ — ३ ऑगस्ट १९६७**



रामचंद्र सदाशिव दाते (रामूभैया) यांचा जन्म मध्य प्रदेशातील दमोह जवळील कृष्णगंज ह्या गावात झाला. त्यांचे आजोबा कृष्ण सदाशिव दाते हे इंदूर संस्थानात उच्च न्यायालयाचे न्यायाधीश होते. रामूभैयांचे वडील सदाशिव कृष्ण दाते हे गांधीवादी विचारांचे होते.

रामूभैयांचे शालेय शिक्षण इंदूर येथे झाले. इंदूरच्या सिटी हायस्कूलमधून ते मॅट्रिकची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. इंदूरच्या होळकर महाविद्यालयामधून त्यांनी शिक्षण घेतले व अलाहाबादला जाऊन कला शाखेची पदवी मिळवली, तसेच महाराजा शिवाजीराव पदकही प्राप्त केले. त्यापुढे ते कायद्याच्या अभ्यासासाठी पुण्याला गेले. पुण्याला जाण्यामागे बालगंधर्वांची नाटके पाहायला मिळावीत हाही सुप्त हेतू होता. ह्या काळातच त्यांचे गाण्याचे प्रेम बहरत गेले.

कायद्याचा अभ्यास पूर्ण झाल्यावर त्यांनी काही दिवस अमरावतीला निष्णात वकील रावसाहेब खरे यांच्याकडे उमेदवारी केली. त्यांचे १९२७ साली धामणगाव येथील मालगुजार जोशींची कन्या माणिक हिच्याशी लग्न झाले. ते इंदूर संस्थानाच्या नोकरीत रुजू झाले. सनावद, हातोद, मानपूर या तहसीलदारांच्या जागी न्यायाधीशाचे काम केल्यानंतर इंदूरला ग्रेन कंट्रोल अधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती झाली. त्यानंतर त्यांना कामगार आयुक्त, शाजापूर व राजगढ येथे जिल्हाधिकारी अशा बढत्या मिळाल्या. ते १९५७ मध्ये आय.ए.एस. अधिकारी झाले. त्यानंतर मध्य भारताच्या औद्योगिक कोर्टाचे न्यायाधीशपद भूषवून १९६० साली ते निवृत्त झाले.

रामूभैया दाते हे संपूर्ण महाराष्ट्राला रसिकाग्रणी म्हणून परिचित आहेत. ते स्वत: गायक अथवा वादक नसूनही त्यांनी त्यांच्या कलेवरील, विशेषत: संगीतावरील आत्यंतिक प्रेमामुळे व रसिकतेने दाद देण्याच्या वृत्तीमुळे अनेक थोर कलाकारांच्या मनांत मानाचे, श्रद्धेचे स्थान मिळवले. त्यांनी आपल्या आयुष्यात अनेक कलाकारांना भरभरून दाद देऊन प्रोत्साहित केले.

संगीताच्या क्षेत्रात बेगम अख्तर व कुमार गंधर्व ही त्यांची दैवते होती. त्यांच्या संगीतावर रामूभैयांनी अतोनात प्रेम केले. कुमार गंधर्वांना क्षयरोगाने ग्रासल्यावर त्यांना देवासला आणून उपचार करण्यात रामूभैयांचा मोलाचा वाटा आहे. बालगंधर्व, विंदा करंदीकर, श्री.ना. पेंडसे, भीमसेन जोशी, पु.ल. देशपांडे, किशोरी आमोणकर, लता मंगेशकर व इतर अनेक मोठमोठ्या कलावंतांशी त्यांचे अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध होते.

पु.ल. देशपांडे यांनी आपल्या 'गणगोत' ह्या पुस्तकाद्वारे रामूभैयांवर लेख लिहून त्यांच्या रसिकवृत्तीचा संपूर्ण महाराष्ट्राला परिचय करून दिला. तसेच, आपल्या 'तुझे आहे तुजपाशी' ह्या नाटकात रामूभैयांच्या व्यक्तिमत्त्वावर आधारलेले काकाजींचे पात्र रंगवून त्यांच्या लोभस व्यक्तित्वाचे व जीवन समरसून जगण्याच्या वृत्तीचे दर्शन घडवले.

रामूभैयांच्या व्यक्तित्वाला रसिकवृत्तीखेरीज अनेक वैशिष्ट्यपूर्ण पैलू होते. ते अत्यंत बुद्धिमान कायदेतज्ज्ञ होते. मराठी, इंग्रजी, हिंदी व उर्दू या भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. उदार वृत्ती, दुसऱ्यांना मदत करण्याची कळकळ त्यांच्या रोमारोमांत भिनली होती. विनोदी, मिस्कील वृत्तीची त्यांना उपजतच देणगी होती. गझल या काव्यगायन प्रकाराची त्यांना अत्यंत आवड होती. मित्रमंडळींच्या बैठकीत अनेक मनोरंजक किस्से खुलवून सांगण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. त्यांचा आवाज किंचित बसका असला तरी आपल्याला आवडलेली गझल अथवा गीत, पेटीच्या सुरावटीवर ऐकवण्याची त्यांना हौस होती. कोणतेही संगीत शिक्षण न घेताही त्यांना तालासुराचे उत्तम ज्ञान होते.

निवृत्तीनंतर १९६१ साली रामूभैयांनी मुंबईत स्थलांतर केले. मुंबईत ते काही काळ औद्योगिक कोर्टात वकिली करीत असत. इंदूरच्या सार्वजनिक जीवनातही त्यांचा महत्त्वाचा सहभाग होता. ते १९४४-४५ साली इंदूरच्या मराठी नाट्य शताब्दी महोत्सवाचे कार्याध्यक्ष होते, तसेच १९५१ साली मध्य भारत मराठी साहित्य संमेलन व शारदोत्सव यांचे स्वागताध्यक्ष म्हणून त्यांनी काम केले. 'रामूभैया दाते – एक आनंदप्रवाह' हे त्यांच्या आठवणींना उजाळा देणारे पुस्तक २००५ साली त्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने प्रकाशित झाले. रामूभैयांचे ज्येष्ठ पुत्र, गायक अरुण दाते यांच्या आत्मचरित्रातही रामूभैयांच्या अनेक आठवणी नमूद केलेल्या आहेत.

– ज्योती दाते

## दाते, रामूभैया

☛ *दाते, रामचंद्र सदाशिव*

## दाते, रोशन चित्तरंजन

**कथक कलाकार व संशोधिका**

**२४ ऑगस्ट १९४८**



कथक नृत्याचे अध्यापन व नृत्यसंरचना करणाऱ्या रोशन चित्तरंजन दाते यांचा जन्म नाशिक येथे झाला. वडील कृष्णाजी दत्तात्रेय बेदरकर व आई मीरा बेदरकर यांचे संस्कार, कविवर्य कुसुमाग्रज यांच्या दीर्घ सहवासातून मिळालेली जीवनदृष्टी आणि प्रा. डॉ. तारा भवाळकर यांकडून मिळालेली शिस्त यांच्यामुळे रोशनताईंचे व्यक्तिमत्त्व विकसित होत गेले. त्यांचे वडील शैक्षणिक क्षेत्रास महत्त्वपूर्ण योगदान देणारे, न्यू एज्युकेशन सोसायटीचे संस्थापक व प्राध्यापक होते; तर आई डी. एड्. महाविद्यालयामध्ये प्राध्यापिका होत्या. त्यामुळे शिक्षण, शिस्त व सामाजिक भान यांचा वारसा रोशनताईंना मिळाला. शालेय व महाविद्यालयीन काळात कला-क्रीडाविषयक अनेक स्पर्धा, कार्यक्रमांत त्यांचा उत्साहपूर्ण सहभाग असे. त्यांनी भोसला मिलिटरी स्कूलचा अभ्यासक्रमही केला. बी.ए., बी.एड्. आणि

द

पुणे विद्यापीठातून बी.कॉम. या पदव्यांसह गांधर्व महाविद्यालयाची नृत्यालंकार ही पदवी त्यांनी संपादन केली. नाशिक येथे सात वर्षे त्यांनी शालेय शिक्षिकेचे कामही केले.

रोशन दाते यांनी नाशिक येथे गुरु हैदर अली शेख यांच्याकडे दहा वर्षे कथक नृत्याचे आरंभीचे शिक्षण घेतले. त्यांचा १९७७ साली चित्तरंजन दाते यांच्याशी विवाह झाला व त्या पुण्यास स्थायिक झाल्या. त्यांच्या एकंदर कलाप्रवासात दाते कुटुंबियांचा पाठिंबा सतत मिळाला. पुणे येथे प्रख्यात कथक कलाकार व गुरु नृत्यपंडिता रोहिणी भाटे यांच्याकडे त्यांनी तीस वर्षे प्रगत अध्ययन केले.

रोहिणीताईंच्या सहवासात कथक नृत्यशैलीचे विविध आयाम, मूलभूत सूक्ष्म संकल्पना, कलाविषयक बहुमुखी विचार व त्यांचे प्रात्यक्षिक स्वरूप याची सखोल तालीम त्यांना मिळाली आणि नृत्यसंरचना करण्याचा मूलमंत्रही मिळाला. गुरु रोहिणी भाटे यांच्या नृत्यभारती कथक डान्स अकॅडमी या संस्थेत त्यांनी चोवीस वर्षे अध्यापन केले. याच संस्थेचे सचिवपद त्यांनी बारा वर्षे सांभाळले व तीन वर्षे सहसंचालिका म्हणूनही कार्य केले. त्यांचा या संस्थेच्या नृत्यविषयक उपक्रमांत गेली तीस वर्षे समायोजक या नात्याने सक्रीय सहभाग आहे.

रोशन दाते यांनी अभिजात नृत्यशैलीच्या एक कुशल नृत्यांगना व संरचनाकार, सक्षम गुरु व व्यासंगी कलासंशोधिका या तिन्ही भूमिकांतून कार्य केले आहे. त्यांनी 'रोचित कथक अकादमी' ही संस्था १९८० मध्ये नृत्यभारतीची शाखा म्हणून सुरु केली. या संस्थेच्या अनेक विद्यार्थिनींना राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरचे पुरस्कार व शिष्यवृत्ती मिळाल्या आहेत व या विद्यार्थिनीही परिपूर्ण कलाकार म्हणून रंगमंचीय प्रस्तुती करत आहेत. २००४-०५ या काळात एकंदर आठ वैविध्यपूर्ण कार्यक्रम सादर करून संस्थेची रजतजयंती साजरी झाली. संस्थेमार्फत एकल नृत्यप्रस्तुतींना प्रोत्साहन देण्यासाठी 'एकलविधा' हा उपक्रम राबवला जातो. तसेच कृ.द. बेदरकर कलाविचार मंच या उपक्रमात विविध मान्यवर तज्ज्ञांची कलाविषयक व्याख्याने आयोजित होतात.

एक कथक नृत्यकार म्हणून रोशनताईंनी प्रचलित व अप्रचलित तालांत नृत्यप्रस्तुती; धृपद, सरगम, चतुरंग, तराणे, होरी, रास, अष्टनायिका, ऋतू अशा पारंपरिक नाना विषयांवरच्या अभिनयप्रस्तुती प्रभावीपणे केल्या आहेत. मात्र त्यांचे वैशिष्ट्य असे की अधमा नायिका शूर्पणखा, धीरोद्धत नायक रावण, धीरललित नायक कृष्ण, एकश्लोकी रामायण, सूर्यवंदना, दिशा और रेषा, अहिनकुल या विषयांवर नृत्यरचना केल्या. तसेच कथक नृत्याच्या नेहमीच्या प्रस्तुतीत नसणाऱ्या बैठकीची लावणी व पोवाडा या गीतप्रकारांवरही त्यांनी आगळीवेगळी प्रस्तुती करून कथकचा परीघ व्यापक केला. पृथ्वीचे प्रेमगीत या कुसुमाग्रजांच्या कवितेवरचा त्यांचा नृत्याविष्कारही वेधक होता.

नावीन्य व परंपरेचा समतोल असणाऱ्या अत्यंत अभ्यासपूर्ण नृत्यसंरचना हे रोशन दाते यांचे वैशिष्ट्य आहे. केवळ मनोरंजन म्हणून नव्हे तर सामाजिक व सांस्कृतिक विचार पोचवण्याचे एक साधन म्हणूनही कलेचा हेतू जबाबदारीने स्वीकारणाऱ्या रोशनताईंनी या नृत्यसंरचनांतून कलाविष्कारासह समाजप्रबोधनही साधले आहे. कथकादिकथक, व्योम, मेघदूतम्, स्पेस - कलाकाराची, ललित अलंकृत महाराष्ट्र अशा संशोधनपर नृत्यरचना आणि सृष्टी (पर्यावरण विषयक), नारीशक्ती (सावित्रीबाई फुले, कस्तुरबा गांधी व जोन ऑफ आर्क यांच्या कार्यावर आधारित), एकरूप (समूहशक्ती), कॅक्टस (सकारात्मक दृष्टिकोन) या सामाजिक आशयाच्या तसेच पारंपरिक संकल्पनांवरच्या पंचायतनपूजा, नृत्यसौरभ, विठ्ठल संकीर्तन अशा वैविध्यपूर्ण नृत्यसंरचना त्यांनी केल्या व त्या जाणकारांनीही वाखाणल्या आहेत.

कालका-बिंदादिन महोत्सव, शरच्चंद्रिका महोत्सव, कथक महोत्सव (दिल्ली), विरासत बॅले फेस्टिवल (लखनौ), नर्मदा उत्सव (होशंगाबाद), उदयशंकर बॅले

द

फेस्टिवल (जयपूर), कालाघोडा समारोह (मुंबई), कालिदास महोत्सव (उज्जैन), फिल्म फेस्टिवल (गोवा), इ. महत्त्वाच्या मंचांवर तसेच अमेरिका, कॅनडा, ब्रिटन, व्हिएटनाम, स्पेन, पोर्तुगाल, रोमानिया, बल्गेरिया, हंगेरी, आफ्रिकेतील केनिया, झांबिया, टांझानिया, झिंबाब्वे, इ. परदेशात रोशन दाते यांनी अनेकदा यशस्वीपणे एकल, युगल व समूह नृत्यप्रस्तुती केली आहे. भारतीय सांस्कृतिक संबंध परिषदेच्या (आय्.सी.सी.आर्.) त्या मान्यताप्राप्त कलाकार आहेत.

रोशन दाते या पुणे विद्यापीठाच्या ललित कलाकेंद्र गुरुकुल येथे गुरु व मानद प्राध्यापिका म्हणूनही कार्यशील आहेत. त्या सप्रयोग व्याख्याने, कार्यशाळांद्वारे भरतनाट्यशास्त्रातील नृत्यविधा यासारख्या अनेक विषयांवर मार्गदर्शन करतात. गुरु-शिष्य परंपरा, कथक नृत्य व अवकाश, नृत्य आणि प्राचीन शिल्प-चित्र व साहित्य, नृत्यातील कथाकथन परंपरा, कथक व नृत्यसंरचना, नाटयशास्त्रातील नृत्तकरण, अभिनयदर्पण व नाट्यशास्त्रातील नृत्यविचार, मेघदूतम् काव्याच्या संदर्भात आंगिक अभिनय, इ. अनेक विषयांवर त्यांनी दिल्ली, लखनौ, ग्वाल्हेर, मुंबई, पुणे, धारवाड तसेच एडमंटन, विनिपेग (कॅनडा), लेस्टर (ब्रिटन) इ. ठिकाणी झालेल्या परिसंवाद व अधिवेशनांत व्याख्याने दिली आहेत.

कथक नृत्य आणि प्राचीन शिल्प, मध्ययुगीन लघुचित्र यांतील परस्पर संबंध या संशोधनप्रकल्पासाठी २००२-०४ या काळात भारत सरकारच्या सांस्कृतिक मंत्रालयातर्फे त्यांना शोधवृत्ती प्रदान करण्यात आली. या संशोधनावर आधारित ‘कथक-आदिकथक’ या हिंदी ग्रंथाचे प्रकाशन २०१०मध्ये झाले. केवळ ग्रांथिक रुपातच नव्हे तर कथकादिकथक या नृत्यप्रस्तुतीतून रोशनताईंनी प्राचीन नृत्यपरंपरेचे प्रयोगरूपही पुढे आणले. नियतकालिके, वृत्तपत्रे व ग्रंथांमध्ये त्यांचे शोधलेख प्रसिद्ध झाले आहेत. रोशनताईंच्या कार्याबद्दल कॅनडातील सिटी ऑफ थंडर बे येथील मेयरकडून सन्मान (१९९८), नॅशनल डिफेन्स अकॅडमीच्या कार्यावर आधारित लघुपटाच्या निर्मितीतील योगदानाबद्दल माजी राष्ट्रपती डॉ. अब्दुल कलाम यांच्या हस्ते सन्मान (२००९), ‘कलाभक्ती’ सन्मान (नाशिक, २००९), रोटरी क्लबचा पुरस्कार (२०१०) इ. अनेक पुरस्कारांनी त्यांना गौरविण्यात आले आहे.

- चैतन्य कुंटे

## दात्ये, हरी विनायक
**भारतीय प्रांगणीय संगीताचे शिल्पकार**
**८ ऑगस्ट १९१८ – २९ एप्रिल १९९८**



रागदारी संगीत वा कलासंगीत हे प्रामुख्याने ‘चेंबर म्यूझिक’ म्हणजे बंदिस्त जागेत; पूर्वीच्या काळी मंदिर वा दरबार, दिवाणखाना, तसेच आजच्या काळात प्रामुख्याने बंद, प्रायः वातानुकूलित सभागृह, रंगमंचांवर सादर होते. मात्र संगीताच्या काही विधा अशा आहेत, की ज्यांचे सादरीकरण हे मुख्यतः खुल्या आकाशाखाली, क्रीडांगण वा संघस्थान अशा मोकळ्या जागी, मैदानांवर होते. अशा संगीताचा हेतू व्यायाम, कवायत, क्रीडासंचलने असा असल्याने या संगीतास ‘प्रांगणीय संगीत’ अथवा ‘मैदानी संगीत’ (आउटडोअर म्यूझिक) अथवा व्यायाम संगीत (म्यूझिक फॉर एक्सरसाइज), रणसंगीत (मार्शल म्यूझिक), घोषसंगीत (बॅण्ड म्यूझिक) असे म्हटले गेले आहे. थोडक्यात सांगायचे तर, ‘मैदानावर वाजवले-गायले जाणारे संगीत म्हणजे प्रांगणीय संगीत होय.’

हरी विनायक दात्ये यांनी हिंदुस्थानी रागांचा वापर करून संचलनासाठी अनेक रचना केल्या, भारतीय व पाश्चात्त्य वाद्यमेळ्यांचा वेगळा विचार करून वादनपद्धती सुनियोजित बनवली. त्यांनी प्रांगणीय संगीताला उपयोगी

द

अशी नवी संगीतलिपी तयार केली व 'गायनी कळा' हे त्यांचे पुस्तक प्रांगणीय संगीताचे शास्त्र सांगणारे मराठी भाषेतील एकमेव पुस्तक आहे. प्रांगणीय संगीताच्या संदर्भात असे मोठे कार्य दात्ये यांनी केले.

'घोष' म्हणजेच वाद्यवृंदाच्या रचना, सूर्यनमस्काराचे संगीत अशा अनेक रचनांचे कर्ते हरी विनायक तथा बापूराव दात्ये यांचा जन्म पुण्याला झाला. श्रीक्षेत्र नृसिंहवाडीजवळचे गणेशवाडी हे त्यांचे मूळ गाव, मात्र त्यांची जन्मभूमी व कर्मभूमी पुणे होती. त्यांचे वडील विनायक नारायण दात्ये व आई दुर्गाबाई हे एक सुसंस्कारित कुटुंब होते. त्यांच्या एकूण आठ मुलांपैकी हरिभाऊ हे सर्वांत मोठे चिरंजीव होत. त्यांच्या वडिलांचा छापखाना होता. बालवयापासूनच बापूरावांनी चित्रकला, मूर्ती बनवणे अशा कलाकुसरींत प्रावीण्य मिळवले. मुळातच विचक्षण बुद्धी असणाऱ्या बापूरावांचे मॉडर्न हायस्कूलमधील शालेय शिक्षण कौटुंबिक कारणांनी मॅट्रिकपूर्वीच थांबले.

द

वडिलांच्या छापखान्याच्या व्यवसायात त्यांना रस नसल्याने तो व्यवसाय त्यांचे बंधू माधवरावांनी चालवला. मात्र बापूरावांनी छपाईच्या तंत्राचा बारकाईने अभ्यास केला होता व नंतर त्यांनी 'हिंदुस्थान साहित्य' या नावाने स्वतःचा छपाई, प्रकाशन व वितरणाचा व्यवसाय १९६२ ते १९८० या काळात मुख्यतः संघसाहित्याच्या प्रसारार्थ चालवला. स्वतःचे चार ग्रंथही त्यांनी 'हिंदुस्थान साहित्य'द्वारेच प्रकाशित केले. आयुष्यात उपजीविकेसाठी त्यांनी अनेक उद्योग केले, मात्र खरे पाहता त्यांनी आपले जीवन राष्ट्रीय स्वयंसेवक संघास व प्रांगणीय संगीताच्या उन्नतीसाठीच समर्पित केले.

बापूरावांना बालपणापासूनच संगीताची गोडी होती, स्वरज्ञान उपजतच होते. कोणतेही वाद्य हातात घ्यावे व सहजपणे, सफाईने त्यावर वादन करावे असे त्यांचे कौशल्य होते. ते वाद्यांची निगराणी व दुरुस्ती यांतही वाकबगार होते. नारायणशास्त्री तांबे यांच्या सहवासातून व त्यांच्या संगीतविषयक लेखनाचा अभ्यास करून त्यांनी संगीताचे शास्त्र जाणून घेतले. गायनाचार्य भास्करबुवा बखले यांचे शिष्य, उत्तम गवय्ये पं. नरहरबुवा पाटणकर यांच्याकडे ते काही काळ गायन शिकले. छोटा गंधर्व, कमल तांबे, इ. गायकमंडळींशी त्यांचा स्नेह होता.

सांप्रदायिक भजनाचीही त्यांना आवड होती व झांजले विठ्ठल मंदिरातील कृष्णराव मेहेंदळे यांच्या भजनी मंडळात ते नियमितपणे गाण्याची हजेरी लावत. स्काउटच्या घोषविभागाचे काम पाहणाऱ्या भाऊसाहेब देशमुखांकडून त्यांनी प्रांगणीय संगीताचे मूलभूत स्वरूप जाणून घेतले. ते १९३७ साली पाश्चात्त्य स्टाफ स्वरलेखन- पद्धती शिकले व त्यांनी पुढे आपली स्वतंत्र स्वरलेखनपद्धती विकसित केली.

नागपूर येथे १९२५ च्या सुमारास राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे कार्य सुरू झाले व ते अल्पावधीतच पुण्यातही रुजले. संघाकडे बापूराव आकृष्ट झाले व स्वातंत्र्य आंदोलनात ते सहभागी झाले. ते १९३८ साली मद्रास प्रांतात संघकार्याच्या प्रचारार्थ गेले व अत्यंत प्रतिकूल परिस्थिती असूनही त्यांनी दीड वर्षे हे कार्य नेटाने केले. पुण्यात परतल्यावर संघाचे कार्यालय व भांडार यांचे व्यवस्थापन करण्याचे काम ते करू लागले. नंतर पुणे शहर घोषविभागाचे प्रमुख म्हणून ते काम करू लागले.

घोषविभागात तेव्हा आनक (ड्रम्स), शंख (बिगुल) व वंशी (पितळेची फ्ल्यूट) एवढीच वाद्ये होती. बापूरावांनी वेळोवेळी नवनवी वाद्ये मिळवून, त्यांची डागडुजी करून, निगा राखून ती त्यांनी घोषदलात सामील केली व तो समृद्ध केला, नवे शृंगपथकही तयार केले. घोषदलात प्रामुख्याने पाश्चात्त्य वाद्ये वापरली जातात. संगीताच्या परिभाषेतही त्यांनी काही नवे शब्द दाखल केले. ड्रम, कॉर्नेट, ट्रम्पेट, युफोनिअम, ट्रंबोन, स्लाइड ट्रंबोन, बिगुल, हॉर्न, फ्ल्यूट, सॅक्सोफोन, बॅगपाइप, क्लॅरिओनेट, इ. वाद्यांसाठी त्यांनी अनुक्रमे आनक, शृंग, तूर्यशृंग, गोमुखी, प्रतूर्य, प्रतान-प्रतूर्य, शंख, विषाण, वंशी, नागांग, कोंबडा, स्वरद अशी नावे वापरायला सुरुवात केली.

घोषदंडाचे संचलन रेखीव करण्यासाठी त्यांनी सैन्यदलातील निवृत्त अधिकाऱ्यांशी चर्चा केल्या व निरीक्षणाद्वारे ते कौशल्य मिळवले. बालविभागासाठी काम करताना त्यांनी व्यायाम योगाचे मंदगती, प्रचलन गती व द्रुतगती अशा क्रमाने प्रत्येकी सोळा अंकांतील प्रात्यक्षिक बसवून घेतले व बालगटाकडून उत्तम तऱ्हेने प्रार्थना, गीते बसवली. संघाच्या विद्युत ध्वनिविभागाचे काम पाहताना त्यांनी ध्वनिक्षेपण, ध्वनिमुद्रण तंत्रज्ञानही आत्मसात केले. त्यांनी अनेक ध्वनिमुद्रणे व चित्रफिती तयार केल्या. देशभरात प्रांगणीय संगीताच्या प्रसारार्थ त्यांनी घोषवर्ग घेतले. बापूरावांचे कान अगदी तीक्ष्ण होते, १००-१५० वादकांतही एखादी चूक नेमकी कुठून होत आहे हे ते टिपत असत.

ब्रिटिश काळापासून भारतात कवायती वा संचलनांसाठी पाश्चात्त्य पद्धतीच्या स्वररचना वाजवल्या जात. मात्र प्रांगणीय संगीताच्या रचना रागाधारित असाव्यात या उद्देशाने बापूरावांनी भारतीय रागसंगीतावर आधारित अशा प्रांगणीय संगीताच्या अनेक रचना केल्या. या रचनांना 'सुसंवादी व समांतर स्वरावली'सारख्या (हार्मनी व कॉन्ट्रा) पाश्चात्त्य संगीतातील तंत्राने सजवले. हरी दात्ये यांनी प्रत्येक वाद्यानुसार, वादकांसाठी स्वरलिपीची वादनपत्रे लिहिण्याची एक सुघड पद्धत तयार केली. त्यांनी आपल्या मोत्यासारख्या हस्ताक्षरात अचूकपणे या रचना एकटाकी लिहून काढल्या.

त्यांनी १९५२ साली सारंग रागावर आधारित 'गणेश' ही पहिली घोषरचना तयार केली. बापूरावांनी रचलेल्या चेतक, स्वराज, प्रतिध्वनी, किरण, श्रीराम, मंगला, वरंची, अजेय, हररंजनी, परमार्थ, इ. रचना 'प्रांगणीय संगीताच्या उत्तम रचना' म्हणून अभ्यासता येतील. ध्वजारोपणम् (रागेश्री), प्रणाम (हिंडोल), शिवराजः (भूप), भारतम् व एकता (देशकार), देवदत्त (शंकरा), केकावली (देस), श्रीपाद (मांड), गुणवंत (पिलू), हंस प्रचोदयात् (हंसध्वनी), बदरी (केदार), शारदा (दुर्गा), विजया (कल्याण), कालगती (कलावती), आरुणी, केशवः व षड्जांतर (भैरवी) या रचनांतून उद्‌धृत रागांचा वापर फार सुंदरपणे केला आहे. तसेच भीमपलास, कल्याण, तिलककामोद, गौडमल्हार, बागेश्री, शिवरंजनी, कालिंगडा, तिलंग, आसावरी, खमाज, हरिकांबोजी, इ. रागांतही त्यांनी प्रसंगानुरूप रचना केल्या.

या रचना प्रथम एखाद्या घोषाद्वारे प्रायोगिक तत्त्वावर वाजवून पाहण्यासाठी बापूरावांनी बी.ई.जी.चे घोषप्रमुख मेघासिंग यांना सांगितले. त्यांच्या घोषावर जौनपुरी, केदार इ. रागांतील रचना यशस्वीपणे वाजवल्या गेल्यावर या रचना पोलीसदल, सेनादल, नौदलाच्या घोषांमधूनही वाजवल्या जाऊ लागल्या. संगीतरचना बसवून घेण्याच्या निमित्ताने नौसेनेच्या घोषातील प्रमुख कमांडर एम.एन. वाइज, रॉड्रिक्स, जोसेफ व्हाइट, सेनादलाच्या पचमढी येथील संगीतविभागातील सायमन, गुरुंग, रायचौधरी इत्यादींशी बापूरावांचा घनिष्ठ संबंध आला. तसेच आकाशवाणी व दूरदर्शनवरूनही या रचना गाजू लागल्या.

'एशियाड' या आशियाई क्रीडा स्पर्धेच्या उद्‌घाटन सोहळ्यात १९८२ साली बापूरावांनी रचलेली 'शिवराजस्तवः' ही भूप रागावर आधारित रचना वाजवली गेल्याने त्यांचे नाव जगभर झाले. नौदल घोषाने बापूरावांच्या रचनांचे ध्वनिमुद्रण करून ठेवले. 'घोषनाद' ही बापूरावांच्या रचनांची ध्वनिफीत बंगलोर येथील संगीतज्ञ डॉ. सत्यनारायण यांच्या हस्ते प्रकाशित झाली होती. गायक, संगीतकार सुधीर फडके हे बापूरावांचे स्नेही होते व परस्परांना आपल्या कार्याबद्दल आत्मीयता होती. बापूरावांनी बाबूजींकडून अनेक संघगीते गाऊन घेतली होती, तर चिनी आक्रमणकाळात 'रक्षणार्थ ठाकूनी उभे चहूकडे' हे गीत ध्वनिमुद्रित झाले होते.

'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत व्हावे असे वाटणाऱ्या मास्तर कृष्णराव फुलंब्रीकरांच्या तत्संबंधित प्रयत्नांत बापूराव त्यांना मदत करू लागले. मास्तरांनी झिंझोटी रागात स्वरबद्ध केलेले 'वंदे मातरम्' बापूरावांनी मुंबईच्या

द

नौदलाच्या घोषविभागाच्या साथीने विविध वाद्यांच्या मेळात, संचलनाच्या उद्देशाने ध्वनिमुद्रित केले व ते संसदेत सादर केले. बापूरावांनी १९४८ ते १९५० अशी दोन वर्षे 'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत व्हावे यासाठी मास्तर कृष्णरावांबरोबर व्यतीत केली.

'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत म्हणून तत्कालीन राजकारण्यांनी स्वीकारले नाही, तरी त्यास राष्ट्रगीतासमान दर्जा मिळाला व त्या योगे मास्तर व बापूरावांचे कार्य काही अंशी सफल झाले. पुढे १९७४ साली बापूरावांनी पं. विनायकराव पटवर्धन यांच्या आवाजातही 'वंदे मातरम्' ध्वनिमुद्रित केले होते. याशिवाय अन्य संगीतकारांनी स्वरबद्ध केलेल्या 'वंदे मातरम्'च्या ध्वनिमुद्रणांचा संग्रह व अभ्यास त्यांनी केला. बापूरावांनी स्वतः 'वंदे मातरम्'ची वेगळी स्वररचना संघाच्या घोषासाठी केली व ती आजही संघ घोषदलात वाजवली जाते.

द

सूर्यनमस्कार हा एक परिपूर्ण व्यायामप्रकार असून त्याचा प्रसार करण्यासाठी बापूराव दीर्घकाळ प्रयत्नशील होते. सूर्यनमस्कारांसाठी त्यांनी 'आरुणी' ही विशेष संगीतरचना केली व बिभास रागात स्वरबद्ध केलेला सूर्यस्तुतीचा श्लोक पं. भीमसेन जोशी यांच्याकडून गाऊन घेतला. या संगीताच्या साथीने वैयक्तिक व सांघिक स्वरूपात हे सूर्यनमस्कार घालण्याचा पायंडा त्यांनी घातला.

ह.वि. दात्ये यांनी एकूण चार ग्रंथांद्वारे साहित्यसामग्रीत नोंद करावी अशी भर घातली. या चार ग्रंथांपैकी 'तेजाची आरती' हे गोळवलकर गुरुजींचे चरित्र (१९७७), हिंदीत 'आरती आलोक की' (१९८१) व 'सूर्यनमस्कार : उपासना व व्यायाम' (१९९०, हिंदी आवृत्ती १९९६) या ग्रंथांचे लेखनही बापूरावांनी केले. प्रांगणीय संगीतावर माहितीपर अशा त्यांच्या 'घोषपरिचय' पुस्तिका प्रकाशित झाल्या. 'गायनी कळा' (१९६८) व 'स्वरांजली' (१९९६) या दोन प्रांगणीय संगीतविषयक पुस्तकांचे लेखनही त्यांनी केले.

'गायनी कळा' हा प्रांगणीय संगीतावर भाष्य करणारा, त्याचे शास्त्र समग्रतेने मांडणारा मराठीतील एकमेव ग्रंथ आहे. एकूण सोळा प्रकरणे व तेरा परिशिष्टांमध्ये बापूरावांनी प्रांगणीय संगीताची मूलतत्त्वे व प्रत्यक्ष उपयोजन यांबद्दल सविस्तर विवेचन केले आहे. प्रांगणीय संगीतास अनुकूल अशी, सर्वांगसुंदर, नवीन संगीतलेखनाची लिपी त्यांनी या ग्रंथात मांडली आहे; अनेक सांगीतिक पारिभाषिक संज्ञा तयार करून त्यांची विस्तृत शब्दसूचीही त्यांनी दिली आहे. आबासाहेब मुजुमदार, पु.ल. देशपांडे, अशोक दा. रानडे यांसारख्या मर्मज्ञांनी या ग्रंथाला वाखाणले. या ग्रंथाला 'समीक्षा व सौंदर्यशास्त्र प्रकारातील उत्कृष्ट साहित्यनिर्मितीबद्दल' राज्य पुरस्कार मिळाला.

बापूरावांनी प्रांगणीय संगीताच्या स्वरचित ५० रचना स्टाफ पद्धतीने लिहून त्यांचे 'स्वरांजली' हे पुस्तक प्रसिद्ध केले. या पुस्तकात या रचनांसाठी विविध संघोष (म्यूझिकल अरेंजिंग) व अन्य वाद्यांसाठीचे अक्षरसंकेतही (इन्स्ट्रुमेन्टेशन) नमूद केले.

मेहनतीपणा, अचूकपणाचा आग्रह, नियोजनातील काटेकोरपणा, वक्तशीरपणा, अत्यंत कठोर शिस्त (त्या शिस्तीच्या नियमांतून ते स्वतःलाही सूट देत नसत), टापटीप, समयसूचकता अशा गुणांमुळे वैयक्तिक अस्वास्थ्य असूनही बापूराव प्रचंड मोठे कार्य करू शकले. मात्र याचबरोबर एक व्यक्ती म्हणून अत्यंत कनवाळूपणा, स्नेहशीलता, गुणग्राहकता, माणसे जोडण्याची हातोटी व त्यामुळे प्रचंड वैयक्तिक व सांघिक स्वरूपाचा जनसंपर्क असल्याने ब्रह्मचर्याश्रमातच संपूर्ण आयुष्य व्यतीत करणाऱ्या बापूरावांचे घर अनेक कार्यकर्त्यांचे हक्काच्या निवाऱ्याचे, मुक्त आश्रयाचे ठिकाण होते.

प्रांगणीय संगीताबद्दल समाजात एकूणच उदासीनता असल्याने व बापूरावांच्या प्रसिद्धिपराङ्मुख स्वभावामुळे त्यांच्या कार्याची फारशी दखल घेतली गेली नाही. डॉ. अशोक दा. रानडे यांनी 'मुलखावेगळी माणसे' या सदरात दूरदर्शनवर त्यांची मुलाखत घेतली होती.

'आरुणी' या संगीतरचनेवर घातलेल्या सूर्यनमस्कारांची चित्रफीतही त्या वेळी दूरदर्शनने दाखवली. पुणे महानगरपालिका सत्कार (१९८७ व १९९७), 'हेडगेवार जन्मशताब्दी' पुरस्कार (१९८९), 'हेडगेवार स्मृती समिती' पुरस्कार (१९९७), 'कृतज्ञता सार्वजनिक निधी गौरव' (१९९५) असे मोजकेच पुरस्कार त्यांना मिळाले. ह.वि. दात्ये हे एक व्रतस्थ व ऋषितुल्य जीवन जगले व पुणे येथे त्यांनी देह ठेवला.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

*कुंटे, शरद; 'प्रांगणीय संगीताचे स्वदेशी भाष्यकार बापूराव दात्ये'; श्रीराधादामोदर प्रतिष्ठान, पुणे; २००९.*

## देवधर, बाळकृष्ण रघुनाथ

**संगीतशास्त्रकार, गुरू**

**११ सप्टेंबर १९०१ – १० मार्च १९९०**



बाळकृष्ण रघुनाथ देवधर हे पं. विष्णू दिगंबर पलुसकर आणि पं. विष्णू नारायण भातखंडे या दोन महान संगीतकारांच्या कार्याची दिशा कायम ठेवून, आधुनिक काळाचा रोख ओळखून परंपरा आणि नवता यांच्या संयोगाने विसाव्या शतकात संगीत क्षेत्रात भरीव पायाभूत योगदान केलेले, पं. विष्णू दिगंबरांचे एक आगळे शिष्य होत. देवधर म्यूझिक स्कूलचे संस्थापक, संगीतकार, मार्गदर्शक गुरू, उत्तम संघटक, संपादक, लेखक व आवाज जोपासना शास्त्राचे भारतातील प्रथम अभ्यासक व प्रचारक अशा अनेकविध आघाड्यांवर देवधर अखंडित कार्यरत राहिले.

बाळकृष्ण रघुनाथ देवधर यांचा जन्म महाराष्ट्रातील मिरज या गावी वैदिक ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांच्या बालपणीच माता-पित्यांचे छत्र हरविले. थोरले बंधू दत्तात्रेय शास्त्री संगीत शिक्षक होते व पौरोहित्यही करत, तसेच त्यांना भजन, कीर्तन करण्याचीही आवड होती. त्यांच्या सहवासात बाळकृष्णांना गाण्याची आवड निर्माण झाली.

देवधरांचे प्राथमिक शालेय शिक्षण मिरजेमध्येच झाले. संगीताचे प्रारंभिक शिक्षण मिरजेत, पं. नीळकंठबुवा जंगम यांच्याकडे सुरू झाले. वामनबुवा चाफेकर यांच्याकडेही ते काही काळ संगीत शिकत. त्यानंतर पं. विनायकराव पटवर्धन यांच्या गणेश संगीत विद्यालयात त्यांनी प्रवेश घेतला. या विद्यालयात विष्णू दिगंबर पलुसकर येत. देवधरांचे गाणे ऐकून व संगीत शिकण्याची आस्था पाहून विष्णू दिगंबरांनी त्यांना मुंबईला गांधर्व महाविद्यालयात संगीत शिकण्याकरिता येण्यास सांगितले. शालेय शिक्षणात खंड पडणार नाही असे अभिवचन देवधरांच्या थोरल्या बंधूंना देऊन १९१८ साली पलुसकर देवधरांना आपल्याबरोबर मुंबईला घेऊन आले.

त्यांचे शिक्षण १९१८ ते १९२२ पर्यंत गांधर्व महाविद्यालयात झाले. पंडितजींच्या व्यस्त कार्यक्रमांमुळे, विद्यालयातील अन्य वरिष्ठ विद्यार्थ्यांकडूनही त्यांचे संगीत शिक्षण झाले. संगीत शिक्षणाबरोबरच गिरगावच्या आर्यन एज्युकेशन सोसायटी या शाळेमध्ये त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले. त्यांनी १९२३ मध्ये मुंबईतील विल्सन महाविद्यालयात प्रवेश घेऊन नंतर पुढे १९३० मध्ये वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी इतिहास व अर्थशास्त्र हे विषय घेऊन मुंबई विद्यापीठाची बी.ए. ही पदवी त्यांनी संपादन केली. शैक्षणिक कालखंडात असहकार चळवळीतही त्यांचा सहभाग होता.

देवधरांनी १९२२ मध्ये गांधर्व महाविद्यालय सोडल्यावर संगीत शिक्षक म्हणून व्यवसायास सुरुवात केली. गांधर्व महाविद्यालयात शिकत असतानाच पंडितजींनी देवधरांची निवड पाश्चात्त्य संगीत शिक्षणाकरिता केली. ते १९२१ पासून प्रो. जिओवानी स्क्रिंजी या इटालियन संगीतकारांकडून पाश्चात्त्य संगीत व पिआनोवादनाचे धडे घेऊ लागले. जिओवानी

द

स्क्रिंजी हे टाइम्स ऑफ इंडियामधून संगीतसमीक्षा-देखील करीत. देवधरांनी १९२५ पर्यंत पाश्चात्त्य संगीताचे शिक्षण घेतले. नंतर प्रो. स्क्रिंजी यांच्याच सूचनेनुसार त्यांनी हा अभ्यास थांबविला. मात्र स्क्रिंजींच्या सहवासातून देवधरांचा संगीतविषयक दृष्टिकोन उदार आणि व्यापक झाला.

प्रा. स्क्रिंजी देवधरांना पाश्चात्त्य कलाकारांचे 'ऑपरा' पाहण्यास घेऊन गेले. त्या ऑपरातील कलाकारांच्या गायनांनी ते भारावून गेले. त्या आवाजांची देवधरांनी स्तुती केल्यावर प्रो. स्क्रिंजी यांनी भारतीय गवयांच्या आवाजांचे विश्लेषण केले. यातूनच देवधरांची आवाज जोपासनाशास्त्राबद्दलची जिज्ञासा बळावली. पुढे आवाज जोपासनाशास्त्र हा विषय देवधरांच्या सांगीतिक कारकिर्दीतील एक महत्त्वाचा ध्यास ठरला.

देवधरांनी १९२५ साली पं. विष्णू दिगंबरांच्या आज्ञेनुसार 'स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक'ची स्थापना केली. सँडहर्स्ट रोडवरील गांधर्व महाविद्यालयाचा १९२४ साली लिलाव झाला. या दरम्यान देवधर पंडितजींना भेटायला गेले असताना, ''तुम्ही पाच- सहा शिष्य कायमचे मुंबईत राहत असताना माझं संगीतप्रचाराचं कार्य पुढे नेण्याची धमक कुणातच नाही का?'' असे पंडितजी बोलले. या पंडितजींच्या उद्गाराच्या परिणामातूनच 'स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक'ची निर्मिती झाली.

देवधरांनी १ जुलै १९२५ रोजी हे विद्यालय सुरू केले. श्रीमती सरोजिनी नायडू यांनी हे नाव सुचवले होते. सुरुवातीला हे विद्यालय प्रार्थना समाजात होते. विद्यालयाची लोकप्रियता, व्याप व विद्यार्थी संख्या जसजशी वाढत गेली, तसतसे या विद्यालयाचे स्थलांतर होत गेले. ते १९३० साली बनाम लेनमधील नारायण चंदावरकर प्राथमिक शाळेत आले. नंतर बनाम लेनमधून वल्लभभाई पटेल रस्त्यावरील जागेत व तिथून १९४१ मध्ये मोदी चेंबर्स येथे विद्यालयाचे स्थलांतर झाले. या संस्थेची १९५८ साली नोंदणी झाली व 'देवधर्स स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक' असे तिचे नामकरण झाले.

हे विद्यालय म्हणजे गांधर्व महाविद्यालयाचीच आधुनिक आवृत्ती होती. ते एक सांस्कृतिक केंद्रच बनले होते. फक्त गायन-वादन शिकवण्याची ही संस्था नव्हती, तर गायन-वादनाची चर्चा, सप्रयोग व्याख्याने अशा अनेक सांगीतिक घटना तेथे होत. संगीतातील बुजुर्ग, कलावंतांना इथे आमंत्रित केले जाई व देवधरांच्या प्रेमामुळे तेही या विद्यालयात येत. शिकाऊ विद्यार्थ्यांनादेखील गायला प्रोत्साहन मिळे. समाजातील सुशिक्षित, प्रतिष्ठित व्यक्तीदेखील या विद्यालयाला भेट देत. सरोजिनी नायडू, बिपीनचंद्र पॉल, ॲनी बेझंट, मदन मोहन मालवीय अशा अनेकांनी या विद्यालयाला भेटी दिल्या. सर्वच घराण्यांचे उस्ताद, पंडित, गवय्ये-बजवय्ये या विद्यालयात आपली कला सादर करण्यास उत्सुक असत. रजबअली, अल्लाउद्दीन खाँसाहेब, पं. रविशंकर, सिंदेखाँ, बुंदू खाँ, विलायत हुसेन, खादिम हुसेन, अजमत हुसेन, मोगूबाई कुर्डीकर, मा. नवरंग, बापूराव पलुसकर अशा अनेकांनी या विद्यालयात येऊन आपले गायन-वादन सादर केले.

या विद्यालयातील महत्त्वाच्या घटना म्हणजे देवधरांनी पं. पलुसकर व पं. भातखंडे या दोन्ही विष्णूंना विद्यालयातील कार्यक्रमासाठी १९२९ साली एकाच व्यासपीठावर आणले. पलुसकर पुण्यतिथीनिमित्त १९४२ साली सतारवादक रविशंकर आणि सरोदवादक अली अकबर खाँ यांची महाराष्ट्रात प्रथमच एकत्र मैफल झाली.

भारतातील अत्यंत प्रतिभावान गायक पं. कुमार गंधर्वांच्या उपजत प्रतिभेला फुलवण्याकरिता देवधर मास्तर आणि देवधर स्कूलचे वातावरण नि:संशय कारणीभूत आहे. या विद्यालयातून अनेकांनी संगीताचे धडे घेतले. उद्योगपती मदनमोहन रुइया, राधाकृष्ण रुइया, लीलावती मुन्शी, सुमती ओक, शांता अमलाडी, कांचनमाला शिरोडकर अशा बऱ्याच व्यक्तींनी या विद्यालयातून संगीताचे धडे घेतले. मुंबईचे मेयर बोमन बेहराम हे देवधरांपाशी खास वर्गात गाणे शिकत होते. सुभाषचंद्र बोसांची त्यांच्याशी खास मैत्री झाली होती.

पुढे त्यांची मैत्री घट्ट झाली व त्या दोघांत पत्रव्यवहारही झाला होता.

देवधरांनी भारतीय संगीताच्या प्रचारार्थ देशा-विदेशांत अनेक भेटी दिल्या. एप्रिल १९३३ मध्ये भारतीय प्रतिनिधी म्हणून इटलीमधील फ्लॉरेन्स येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय संगीत संमेलनात त्यांनी हजेरी लावली होती. याच वर्षात सप्टेंबरमध्ये फ्रान्स येथील स्ट्रॉसबर्ग येथील समकालीन संगीत संमेलनालादेखील ते हजर होते. याशिवाय युरोप व आशिया खंडांतील अनेक देशांना त्यांनी भेटी दिल्या. युनेस्कोने १९५५ मध्ये आयोजित केलेल्या मनिला येथील 'साउथइस्ट एशिया' संमेलनाकरिता संगीतशास्त्रज्ञ म्हणून भारत सरकारने त्यांना पाठवले होते. जपान, हाँगकाँग आणि बँकॉक येथे भारतीय संगीतातील तत्त्वांच्या प्रसारार्थ त्यांनी भेटी दिल्या. त्यांनी १९५८ साली विविध कलाक्षेत्रांतील पाच अन्य व्यक्तींसमवेत भारतीय संगीताचे प्रतिनिधी म्हणून रशिया, पोलंड, युगोस्लाव्हिया, झेकोस्लोव्हाकिया या देशांना भेटी दिल्या.

प्रो. स्क्रिंजींकडे शिकत असताना देवधरांना आवाज जोपासनाशास्त्राची आवड निर्माण झाली होती व त्याचे महत्त्व त्यांना पटले होते. भारतीय कंठसंगीतात आवाज जोपासनाशास्त्र शिकण्याची नितांत गरज आहे हे त्यांच्या लक्षात आले. त्यानुसार त्यांनी या विषयावरील अनेक पुस्तके वाचून काढली. आवाजशास्त्राचे महत्त्व आणि देवधरांचा अभ्यास पाहून संगीत अकादमीने त्यांना अमेरिकेत जाऊन 'व्हॉइस कल्चर'चा अभ्यास करण्याकरिता खास शिष्यवृत्ती प्रदान केली. ते १९५६ मध्ये वयाच्या छप्पन्नाव्या वर्षी आवाजशास्त्राचा शास्त्रशुद्ध अभ्यास करण्याकरिता अमेरिकेला गेले. डॉ. सिलास एच. एंगम या आवाजशास्त्रातील तज्ज्ञाकडे त्यांनी दोन ते तीन वर्षे विधिवत शिक्षण घेतले. अमेरिकेहून परत आल्यावर देवधरांनी या शास्त्राचा प्रचार/प्रसार करण्यास सुरुवात केली. देवधरांनी स्वत:वरच व नंतर इतरांवरही प्रयोग केले. सुरुवातीला अनेकांकडून हेटाळणीच झाली; पण पुढे या शास्त्राचे फायदे व सुपरिणाम दिसायला लागल्यानंतर अमीर खाँसारख्या गुणिजनांनीही देवधरांच्या अभ्यासाला मोकळेपणी दाद दिली. निर्मला गोगटे, अशोक रानडे, वामनराव देशपांडे इत्यादींनी त्यांच्याकडून आवाज जोपासनाशास्त्राचे धडे घेतले. 'आवाज साधना शास्त्र' नावाचे एक पुस्तकही त्यांनी लिहिले. आज आवाज जोपासनाशास्त्राचा जो प्रचार झाला आहे, त्याचे श्रेय देवधरांच्या प्रयत्नांना नि:संशय जाते.

अमेरिकेहून परत आल्यावर १९६१-१९६४ या काळात बनारस हिंदू विद्यापीठात त्यांनी संगीत आणि ललित कला महाविद्यालयाचे प्राचार्य आणि संगीत विभाग प्रमुख म्हणून काम पाहिले, तर १९६४ ते १९६८ पर्यंत राजस्थान येथील वनस्थली विद्यापीठात संगीत विभागाचे प्रमुख म्हणून ते कार्यरत होते. इंडियन म्यूझिकॉलॉजिकल सोसायटीच्या स्थापनेत १९७१ साली त्यांचा सहयोग होता. त्यांना अध्यक्ष म्हणूनही नेमण्यात आले होते. त्यांना १९६९ मध्ये लंका ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनने हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताच्या आवाज चाचणी परीक्षेकरिता तज्ज्ञ म्हणून आमंत्रित केले होते.

देवधरांनी १९२९ साली मुंबईत संगीत विद्यालय स्थापल्यानंतर वाद्यवादनात निपुण असलेल्या व्यावसायिकांना घेऊन काफी व सारंग या दोन रागांतील ध्वनिमुद्रिका ग्रामोफोन कंपनीकरिता दिल्या. या दोन ध्वनिमुद्रिका मूकपटाच्या प्रक्षेपणाच्या वेळी वाजवण्यात येत असत. 'आलम आरा' या चित्रपटाअगोदर १९३० मध्ये 'नकली तानसेन' हा बोलपट रिआल्टो थिएटरमध्ये लागला व या चित्रपटाचे संगीत बी.आर. देवधरांचे होते, अशी नोंद आहे. त्यामुळे भारतीय मूकपट व बोलपटांचेही ते पहिले संगीतकार ठरतात. कृष्णा आणि इंपीरिअल चित्रपट कंपन्यांच्या सांगण्यावरून प्रदर्शनासाठी विविध संगीत कार्यक्रम देवधरांनी चित्रित करून दिले. हे कार्यक्रम १९३१ साली निरनिराळ्या चित्रपटगृहांमध्ये दाखवण्यात येत होते.

पं. देवधर १९३०-३१ नंतर कृष्णाटोन कंपनीत भरती झाले. त्यांनी १९३२ ते १९४३ या काळात जवळजवळ

द

दहा चित्रपटांना संगीत दिले. काहींची नावे अशी : 'हीर रांझा' (१९३१), 'शशी पुन्नू', 'शिकारी' (१९३२), 'पतितपावन वा अहिल्योद्धार', 'जहरे इश्क' (१९३३), 'मास्टरजी' (१९४३) इत्यादी. देवधरांनी १९३५ साली स्वत:च 'नीला' या चित्रपटाची हिंदी आणि मराठी या दोन्ही भाषांत निर्मिती केली होती. त्यांनी संगीत दिलेल्या एकंदर ९० गीतांपैकी आज एकही उपलब्ध नाही. याशिवाय 'नीला' या मुख्य चित्रपटाआधी दाखविण्याकरिता त्यांनी दोन लघुपटांची निर्मिती केली होती. यात भारतीय वाद्यवृंदरचना, सरोद, सितारवादन, तबलातरंग, मेंडोलिनवादन असे कार्यक्रम होते. 'नीला' या चित्रपटामुळे मात्र त्यांना आर्थिक नुकसान सोसावे लागले. त्यामुळे चित्रपटसृष्टीला त्यांनी कायमचा रामराम ठोकला.

प्रो. देवधरांनी १९४८ साली अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाच्या 'संगीत कला विहार' या मासिकाचे संपादकत्व स्वीकारले व १९७३ पर्यंत, जवळजवळ २५ वर्षे त्यांनी ही जबाबदारी अनेक अडचणींना तोंड देऊन धैर्याने सांभाळली. या पंचवीस वर्षांतील 'संगीत कला विहारा'चे अंक पाहता, ते सर्व मिळून संगीताचा ज्ञानकोशच होईल एवढे सांगीतिक साहित्य त्यांच्यात ठासून भरले आहे. देवधरांनी स्वत: तर लेखन केलेच, पण इतरांनाही लिहिते केले. इतिहास, सौंदर्यशास्त्र, ध्वनिशास्त्र, संगीतशास्त्र, दुर्मीळ ग्रंथांची भाषांतरे, अशा अनेक विषयांवरील लेखमालिकांचा यांत समावेश आहे. शिवाय स्वत: देवधरांनी अनेक ज्ञात-अज्ञात संगीतकार, गायक, वादक यांच्या प्रत्यक्ष मुलाखती घेऊन वा माहिती मिळवून लेखन केले आहे. या लेखांतून देवधरांनी तत्कालीन संगीत जगतावर प्रकाश टाकला.

घराण्यांचा अभिमान, कडवेपणा, संगीत शिक्षणाकरिता सोसलेल्या हालअपेष्टा, गुरूवरील श्रद्धा, आर्थिक अडचणी, गायक-वादकांचे जगणे आणि गुणदोष, अशा अनेक घटनांनी हे लेख भरलेले आहेत. कितीतरी गायक-वादकांची चरित्रे/आत्मवृत्ते देवधरांनी साध्या, सरळ सहानुभूतीने अनलंकृत भाषेत वाचकांसमोर मांडली आहे. हे दस्तऐवजीकरणाचे फार मोठे कार्य देवधरांनी केले आहे. 'थोर संगीतकार' व 'थोर संगीतकारांची परंपरा' या दोन पुस्तकांतून हे लेख पुन:प्रकाशित झाले आहेत. याशिवाय पं. विष्णू दिगंबर पलुसकरांचे चरित्र, 'राग बोध' (एकूण पाच भाग) व 'आवाज साधना शास्त्र' ही पुस्तकेही त्यांनी लिहिली.

देवधरांनी 'बंदिश संग्राहका'चे एक अतिशय मौलिक कार्य केले. विविध घराण्यांच्या गायकांकडून त्यांनी प्रचलित-अप्रचलित रागांतील बंदिशींचा संग्रह केला. त्यांचा १९२४ सालच्या आसपास भातखंड्यांशी परिचय झाला व नंतर १९२६ ते १९३० या कालखंडात त्यांचा भातखंड्यांशी दृढ स्नेह झाला. भातखंड्यांच्या सूचनेनुसार व प्रेरित होऊनच १९३५ पासून त्यांनी बंदिशींचा संग्रह करण्यावर भर दिला. संग्रह करताना देवधरांनी आपली दृष्टी उदार ठेवली आणि कुठल्याही घराण्याबाबत दुराग्रह न ठेवता, वेगवेगळ्या उस्तादांशी मैत्री करून, काही वेळा स्वत:च्या खिशातील पैसाही खर्च करून, चातुर्याने त्यांनी अत्यंत दुर्मीळ व वेगवेगळ्या ढंगाच्या बंदिशींचा व अनवट रागांचा संग्रह केला. सिंदे खाँसारख्या फकीर व लहरी गायकांकडूनही ते बंदिशी मिळवण्यात यशस्वी झाले. स्वत: देवधरांनीही चंद्रकंस, बंगाल भैरव, भूपाल तोडी इ. रागांत बंदिशी बांधल्या आहेत.

देवधर हे मैफली-गायक नव्हते व तसे त्यांचे ध्येयही नव्हते. मात्र बंदिशींचे प्रस्तुतीकरण ते फार उत्तम प्रकारे करत. एकच बंदिश वेगवेगळ्या घराण्यांतून व गायकांकडून कशी गायली जाते याचे ते उत्तम सादरीकरण करत. त्या-त्या घराण्यातील स्वरलगाव, गायकी आणि बंदिशीतील सौंदर्यस्थळे यांतील भेद दाखवून त्यांचे ते उत्तम विश्लेषण करीत. बंदिश भरण्याचा त्यांचा एक स्वत:चाही 'अंदाज' होता. आकाशवाणीवरून ते गात असत, शिवाय प्रात्यक्षिकांसह रागसंबंधी विवरण करत असत. बंदिशीतील शब्दांचा अर्थ जाणून केलेला उच्चार, आवाजाचा सुरेल लगाव, एकंदर आकृतिबंधाचा कल्पक

द

व नेमका आविष्कार असे त्यांच्या गायनाचे काहीसे प्रात्यक्षिकासारखे रूप असे.

उत्तम गुरू म्हणून देवधरांचे फार मोठे योगदान आहे. संगीत क्षेत्रातील अतिशय सर्जनशील व दैवी देणगी लाभलेल्या, पं. कुमारगंधर्व या प्रतिभासंपन्न गायकाच्या व्यक्तिमत्त्वासह त्यांस घडवण्यात देवधरांचा अमोल वाटा आहे. अवघ्या अकरा-बाराव्या वर्षीच प्रसिद्धीस पावलेल्या कुमारांच्यावर देवधरांनी जवळ-जवळ बाराव्या वर्षापासून ते तेविसाव्या वर्षापर्यंतच्या काळात देवधरांचे आणि देवधर्स स्कूल ऑफ म्यूझिकच्या निष्पक्ष व निर्भेळ वातावरणाचे जे संस्कार झाले व जी जाणीवपूर्वक तालीम लाभली, त्यांतूनच 'कुमार गंधर्व' नावाचे शिल्प घडले. याशिवाय श्याम गोगटे, चंद्रशेखर रेळे, शरद साठे, पंढरीनाथ कोल्हापुरे, वसुंधरा श्रीखंडे-कोमकली, कांचनमाला शिरोडकर, लक्ष्मी शंकर, पाश्चात्त्य संगीतकार वॉल्टर कॉफ्मन, चित्रपटसंगीत दिग्दर्शक वनराज भाटिया आदींनीही त्यांच्याकडून संगीताची तालीम घेतली. संगीत क्षेत्रातील एक विद्वान व्यक्तिमत्त्व, डॉ. अशोक दा. रानडे यांनी देवधरांकडून संगीतातील तालीम / बंदिशी तर घेतल्याच, शिवाय आवाज जोपासनाशास्त्राचे धडेही घेतले.

देवधरांना अनेक सन्मान मिळाले. संगीत नाटक अकादमीच्या सल्लागार समितीत ते एक सदस्य म्हणून होते. देवधरांच्या सांगीतिक क्षेत्रातील योगदानाबद्दल १९६१ साली अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळातर्फे 'संगीत महामहोपाध्याय' ही पदवी त्यांना देण्यात आली. त्यांना संगीत नाटक अकादमीची फेलोशिप (१९६४), भारत सरकारचा 'पद्मश्री' पुरस्कार (१९७५), मध्यप्रदेश सरकारचा 'तानसेन' पुरस्कार (१९८३) असे विविध पुरस्कार मिळाले. त्यांच्या 'थोर संगीतकार' या पुस्तकाला महाराष्ट्र सरकारचे पारितोषिक मिळाले.

अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाच्या मिरज येथील कार्यालयात त्यांचे ध्वनिमुद्रण संग्रहित केले आहे, तसेच 'संवाद फाउण्डेशन'नेही देवधरांच्या गायनाचे ध्वनिमुद्रण संग्रहित केले आहे. संगीत नाटक अकादमीमध्येही देवधरांनी काही अप्रचलित रागांचे ध्वनिमुद्रण दिले आहे. ते १९३० साली 'बनाओ बतिया' (भैरवी) व 'सावन आयो आज' (सावन) व १९३७ साली ओडियनच्या एका ध्वनिमुद्रिकेत 'सजसज आवत' (सिंधूरा) व 'कोयलिया बोले' (हिंडोल बहार) हे राग गायले होते.

देवधरांनी संगीत क्षेत्रात एखाद्या मिशनरीसारखे काम केले. कुमारांच्या सांगीतिक जडणघडणीत त्यांचा वाटा होताच; पण बडे गुलामअली खाँ, उ. बिस्मिल्ला खाँ, पं. रविशंकर यांचा परिचय महाराष्ट्राला करून देण्यातही त्यांचा पुढाकार होता. संगीत क्षेत्रात बहुविध कार्य करणाऱ्या देवधरांचे वयाच्या एकोणनव्वदाव्या वर्षी मुंबईत निधन झाले.

— माधव इमारते

## देव, मंजिरी श्रीराम
**नर्तिका**
**१५ फेब्रुवारी १९५०**



मंजिरी श्रीराम देव यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव मृणालिनी गोपाळराव मराठे होते. त्या काळच्या कर्मठ सामाजिक वातावरणातदेखील त्यांच्या आई इंदूताई यांनी त्यांना 'कथक' नृत्य शिकण्यास प्रोत्साहित केले. कथक नृत्याबरोबर त्यांचे शालेय शिक्षण व अभिनय कारकीर्दही कोल्हापुरात रुजली व फुलली.

वयाच्या अठराव्या वर्षी, श्रीराम देव यांच्याबरोबर नाटकातून भूमिका करतानाच त्यांच्याशी सूर जुळले व मृणालिनी मराठे या मंजिरी देव झाल्या. लग्नानंतर प्रापंचिक जबाबदाऱ्या सांभाळत एस.एस.सी.नंतर अर्धवट राहिलेले आपले शिक्षण पुढे सुरू करून त्या एम.ए. (मराठी) झाल्या.

द

लग्नामुळे त्यांचे नृत्यशिक्षण अर्धवट राहिले होते. पतीच्या प्रोत्साहनाने गुरुवर्या आशाताई जोगळेकर यांच्याकडे त्यांनी विशारद व अलंकार या कथकमधील पदव्या प्राप्त केल्या. पुढे कथक नृत्यातील अध्वर्यू पं. नटराज गोपीकृष्ण यांच्याकडून कथकचे उच्चशिक्षणही घेतले. गेली ३७ वर्षे त्या ठाण्यात कथकचा प्रचार व प्रसार करीत आहेत. या प्रदीर्घ कालावधीत त्यांनी शिष्यांच्या पिढ्या घडवल्या.

अभिजात भारतीय शास्त्रीय संगीताचा प्रसार व प्रचार आणि या पिढीवर संस्कार व्हावा म्हणून त्यांनी आपल्या गुरूंच्या नावाने ठाण्यात संगीत महोत्सव सुरू केला. गणेश कल्चरल अकादमी या त्यांनी स्थापन केलेल्या संस्थेमार्फत आयोजित होणारा 'पं. नटराज गोपीकृष्ण संगीत महोत्सव' गेली सतरा वर्षे ठाण्यात मोठ्या दिमाखाने साजरा होत आहे व देशातील अत्यंत प्रतिष्ठित संगीत महोत्सवांमध्ये आज याची गणना होत आहे. तसेच या संस्थेतर्फे सादर होणाऱ्या 'अमृतवासंतिक', 'आषाढरंग' या प्रकारच्या इतर कार्यक्रमांतून निव्वळ कलाकारच नव्हे, तर रसिक प्रेक्षकही घडला गेला आहे.

कथकचे प्रकांड पंडित डॉ. पुरू दाधिच यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी कथक नृत्यामधील 'कथक नृत्य में प्रयुक्त होने वाले कवित्त-छंदों का विश्लेषणात्मक अध्ययन' या विषयामध्ये पीएच.डी.ची पदवी मिळवली. त्यांच्या या कार्याची अनेक संस्थांनी दखल घेऊन त्यांना 'उत्कृष्ट वाङ्मय' पुरस्कार (महाराष्ट्र शासन), 'ठाणे गौरव' पुरस्कार, 'ठाणे नगर-रत्न' पुरस्कार, 'मधुरिता सारंग स्मृती' पुरस्कार, 'पंडिता' पुरस्कार (लोकमत, पुणे) या पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले.

— मुकुंदराज देव

द

## देव, यशवंत त्र्यंबक
**संगीतकार**
**१ नोव्हेंबर १९२६**

यशवंत त्र्यंबक देव यांचा जन्म पूर्वीच्या कुलाबा जिल्ह्यातील पेण येथे झाला. त्यांचे वडील त्र्यंबक गोविंद



देव हे संगीतप्रेमी होते. ते स्वतः अनेक वाद्ये उत्तमरीत्या वाजवत. यशवंत देवांचे शालेय शिक्षण प्रथम पेण खाजगी विद्यालय येथे व त्यानंतर नवीन समर्थ विद्यालय, तळेगाव, नूतन मराठी विद्यालय, पुणे आणि चिकित्सक समूह विद्यालय, गिरगाव, मुंबई अशा विविध शिक्षणसंस्थांमध्ये झाले. ते १९४४ मध्ये चिकित्सक समूह विद्यालयातून मॅट्रिकची परीक्षा सर्व विषयांत प्रावीण्य मिळवून उत्तीर्ण झाले. नंतर सेंट झेवियर्स महाविद्यालय, मुंबई आणि राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर येथून १९४८ मध्ये पदार्थविज्ञान आणि गणित हे विषय घेऊन त्यांनी बी.एस्सी.ची पदवी मिळवली.

शास्त्रशाखेचे विद्यार्थी असलेल्या यशवंत देव यांनी आपली कारकीर्द विशेषत: सुगम संगीतामध्ये घडवली. यशवंत देव यांच्यावर संगीताचे प्राथमिक संस्कार त्यांच्या वडिलांनी केले. त्यांच्या घरी नेहमी संगीत क्षेत्रातील दिग्गज कलाकार येत असत. त्यांचे गाणे सतत कानांवर पडत असे. नकळत घडलेल्या या संस्कारांचा त्यांच्या संगीत कारकिर्दीवर मोठा प्रभाव पडला.

देवांनी निदान सुरुवातीच्या काळात तरी पूर्णपणे संगीताला वाहून घ्यायचे असे ठरवले नव्हते, ते आपोआप घडत गेले. पुण्याला शाळेत असताना त्यांनी शास्त्रीय संगीताचे शिक्षण घेण्याचा प्रयत्न केला होता; पण लवकरच हे शिक्षण थांबले. स्वयंअध्ययन करून त्यांनी शास्त्रीय संगीत आत्मसात केले आणि १९६८ साली शास्त्रीय संगीताची पदवी मिळवली. नागपूर आकाशवाणीवर काम करताना त्यांनी सतारवादनामध्ये 'संगीत विशारद' ही पदवी प्रथम श्रेणीमध्ये उत्तीर्ण होऊन मिळवली.

दीर्घकाळ आकाशवाणीवरची नोकरी त्यांच्या दृष्टीने एक प्रयोगशाळाच ठरली. काही काळ त्यांनी शिधावाटप कार्यालयात काम केले. नंतर एच.एम.व्ही. आणि शेवटी

धारवाड, मुंबई, नागपूर या आकाशवाणी केंद्रांवर, तसेच 'विविध भारती'च्या हिंदी विभागात त्यांनी कार्यक्रम निर्माता म्हणून काम केले.

विविध भारतीवर होणाऱ्या 'रंजनी' या खास सुगम संगीताच्या कार्यक्रमासाठी हृदयनाथ मंगेशकर यांच्या संगीत दिग्दर्शनाखाली लता मंगेशकर व आशा भोसले यांनी सादर केलेल्या गाण्यांचे ध्वनिमुद्रण यशवंत देव यांनी केले. आकाशवाणीवर काम करताना त्यांनी अनेक संगीतिका, नाटकांचे पार्श्वसंगीत, संगीत आणि स्वतंत्रपणे अनेक गीतांचे संगीत दिग्दर्शन केले. त्यांनी १९६१-६२ मध्ये सुगम संगीताचा विशेष कार्यक्रम 'भावसरगम' याची निर्मिती करून मराठीतल्या अनेक कवींच्या रचना रसिकांपर्यंत पोहोचवल्या. देव यांनी अनिल विश्वास यांना आपले गुरू मानले आणि त्यांच्या संगीतनियोजनातून प्रेरणा घेतली. अनिल विश्वास यांचा परिचय देवांशी आकाशवाणीवरच झाला. त्यांना १९५८ ते १९८४ इतक्या दीर्घकाळच्या आकाशवाणीवरील नोकरीत नवनवीन प्रयोग करण्याची संधी मिळाली, त्यांचे अनुभवविश्व समृद्ध झाले.

त्यांनी १९५० पासून सुगम संगीत शिक्षणाचे वर्ग सुरू केले. सुगम संगीतातले बारकावे आणि आवाजाची योग्य तऱ्हेने जोपासना करण्यासाठी रियाजाची पद्धत यांचे मार्गदर्शन त्यांनी विद्यार्थ्यांना केले. त्यांनी संपूर्ण महाराष्ट्रात, देशभर इतकेच नव्हे, तर परदेशांतही अनेक विद्यार्थी घडवले.

त्यांनी १९५७ मध्ये 'झालं गेलं विसरून जा' या चित्रपटासाठी गीतकार - संगीतकार म्हणून प्रथम काम केले. त्यानंतर 'उतावळा नारद', 'चोरावर मोर', 'कामापुरता मामा', 'सुखी संसार', 'मंत्र्यांची सून', 'कशाला उद्याची बात', 'साज' (हिंदी) आणि अलीकडच्या काळात 'जोशी की कांबळे' या चित्रपटांचे त्यांनी संगीत दिग्दर्शन केले, तसेच गीतेही लिहिली.

चित्रपटांप्रमाणेच नाट्यक्षेत्रातील त्यांचे योगदान लक्षणीय आहे. आजवर चाळीसहून अधिक नाटकांसाठी त्यांनी गीत, संगीत, पार्श्वसंगीत देण्याची जबाबदारी सांभाळली आहे. 'वळणाचे पाणी वळणावर', 'घनश्याम नयनी आला', 'आम्रपाली', 'बावनखणी', 'आषाढातील एक दिवस', 'सख्खे शेजारी', 'धिक ताम्', 'घास रे रामा', 'चाकरमानी', 'नस्तं झेंगट', 'शेवटचे घरटे माझे', 'देवापाशी उत्तर नाही' ही त्यांपैकी काही उल्लेखनीय नावे आहेत.

ख्यातनाम नर्तक सचिनशंकर यांच्या 'शिवपार्वती','द रेन' आणि 'कथा ही रामजानकीची' या नृत्यनाट्यांचे संगीत दिग्दर्शन देवांनी केले आहे. त्यांनी दूरदर्शनवरील अनेक मालिकांच्या शीर्षकगीतांना संगीत दिले, तसेच 'बहिणाबाई', 'गीतगोपाल', 'रथचक्र', 'आव्हान' अशा विशेष कार्यक्रमांनाही देवांनी संगीताचा साज चढवला आहे. अलीकडच्या काळात जुन्या जमान्यातील गाजलेल्या २८ संगीतकारांच्या ६४ गाण्यांच्या चालींवर पूर्णपणे नवीन मराठी गीते लिहिण्याचा अभिनव उपक्रम त्यांनी केला आहे.

संगीत दिग्दर्शनासाठी येणाऱ्या सदोष रचना सुधारून घेता घेता देवांमधल्या कवीला प्रेरणा मिळाली आणि त्यांनी स्वतंत्रपणे अनेक गीते लिहिली. मात्र केवळ गीतकार आणि संगीतकार एवढेच यशवंत देवांचे कर्तृत्व नाही. ते उत्तम संगीत शिक्षक व संगीत संयोजक आहेत, काव्याचे डोळस अभ्यासक आहेत, अनेक कार्यक्रमांचे सूत्रसंचालन त्यांनी केले आहे. 'असे गीत जन्मा येते' या गीतजन्मावर आधारित व्याख्यानांचे अनेक सप्रयोग कार्यक्रम त्यांनी केले आहेत. 'घनश्याम नयनी आला' या नाटकासाठी 'देवांगिनी' या नव्या रागाची त्यांनी निर्मिती केली. तसेच, 'अक्षरफुले' या वेगळ्या संकल्पनेवरील कार्यक्रमाचेही त्यांनी अनेक प्रयोग केले आहेत.

सहा दशकांहून अधिक काळ यशस्वीपणे चाललेल्या त्यांच्या या संगीत प्रवासात त्यांना अनेक पुरस्कार, सन्मान मिळाले आहेत. त्यांना १९७४ साली 'आम्रपाली', १९८१ मध्ये 'आषाढातील एक दिवस' या नाटकांसाठी, १९८१ मध्ये 'भाई सावध व्हा' या आकाशवाणीवरील कार्यक्रमासाठी, १९८४, १९९३ मध्ये 'बावनखणी', 'सौभाग्यवती भव' या

द

नाटकांसाठी, १९९९ मध्ये 'सख्खे शेजारी' या नाटकासाठी 'सर्वोत्कृष्ट संगीतकार' म्हणून, १९८१ मध्ये 'आषाढातील एक दिवस'साठी मराठी नाट्य परिषदेचा 'सर्वोत्तम गीतकार' असे अनेक पुरस्कार त्यांना मिळाले आहेत. याशिवाय, १९९६ मध्ये 'सु.ल. गद्रे मातु:श्री' पुरस्कार, २००१ मध्ये नाट्य परिषदेचा 'मराठी रंगभूमी सेवा कृतज्ञता' आणि महाराष्ट्र शासनाचा 'उपशास्त्रीय संगीत क्षेत्रातील उत्कृष्ट कामगिरीबद्दल'चा पुरस्कार, २०१० मध्ये दत्ता डावजेकर प्रतिष्ठानचा 'जीवनगौरव' पुरस्कार, आणि महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त 'संगीत क्षेत्रातील अतुलनीय कामगिरी'बद्दलचा पुरस्कार, अशी ही पुरस्कारांची मोठी यादी आहे.

मुंबई विद्यापीठ संगीत केंद्र, ना.दा. ठाकरसी विद्यापीठ संगीतविषयक अभ्यास, महाराष्ट्र राज्य चित्रपट सल्लागार मंडळ, बालभारती संगीत ध्वनिफितीविषयक सल्लागार, आकाशवाणी सल्लागार, शारदा संगीत विद्यालयाचा संगीतविषयक पदविका अभ्यासक्रम अशा अनेक ठिकाणी विशेष सल्लागार सदस्य म्हणून यशवंत देवांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली आहे.

द

यशवंत देवांनी 'शब्दप्रधान गायकी' (राज्य पुरस्कार) आणि 'रियाजाचा कानमंत्र' ही संगीतविषयक पुस्तके, 'कधी बहर कधी शिशिर' हे आत्मचरित्रपर लेखन, 'चार लोचनांची दुनिया', 'साई गीत प्रसाद', 'या रे सारे गाऊ या', 'गाणारे शब्द' हे गीतांचे संग्रह, 'कृतज्ञतेच्या सरी' हा काव्यमय शब्दचित्रांचा संग्रह, 'ओशो ही ओशो' ही हिंदी गीतमाला, 'करुणा त्यांची' आणि 'जिथे गाभारा तिथेच कळस' हे दोन रुबायांचे संग्रह, प्रसिद्ध हिंदी गीतांच्या चालीबरहुकूम लिहिलेल्या मराठी गाण्यांचा संग्रह 'अक्षरफुले', तसेच 'पत्नीची मुजोरी' हा विडंबन गीतांचा संग्रह असे विपुल लेखन केले आहे. तसेच, त्यांनी जवळजवळ ४० ध्वनिफितींसाठी संगीतही दिले आहे.

आपल्या प्रदीर्घ संगीत कारकिर्दीत आपल्या क्षेत्रात घडणाऱ्या घटना, नवनवे उपक्रम, प्रयोग यांचे डोळस नजरेने त्यांनी निरीक्षण केले. संगीतकाराला अनेक वाद्यांची उत्तम माहिती आणि आकलन असले पाहिजे. चाल बांधण्यासाठी निवडलेल्या गीतातील शब्दांची बांधणी, त्यांचा आशय, तालसूचकता या सर्वांवर त्याचे प्रभुत्व हवे. गीतातील शब्दभावाला योग्य असा वाद्यवृंद, हिंदुस्थानी आणि पाश्चात्त्य स्वरलेखनपद्धती यांचा सखोल अभ्यास यांची नितांत आवश्यकता असते. हे सर्व त्यांनी स्वत: कष्टाने आत्मसात केले आहे. त्यांच्या वाटचालीत पत्नी, प्रख्यात अभिनेत्री करुणा देव यांचा त्यांना उत्तम पाठिंबा लाभला.

— संगीता बापट

**संदर्भ** :

*१. देव, यशवंत; 'शब्दप्रधान गायकी'; पॉप्युलर प्रकाशन; १९७८.*
*२. देव, यशवंत; 'कधी बहर कधी शिशिर'; अनघा प्रकाशन; २००४.*

## देवल, कृष्णाजी बल्लाळ
**संगीतशास्त्रकार**
**६ मे १८४७ – १६ मार्च १९३१**



कृष्णाजी बल्लाळ देवल यांचा जन्म सांगलीजवळच्या हरिपूर येथे झाला. त्यांचे वडील बळवंत ऊर्फ बल्लाळ देवल हे सरकारी कारकून होते. रामचंद्र देवल (संगीत नाटकांत काम करणारे) व गोविंद देवल (नाट्याचार्य म्हणून प्रसिद्ध असलेले) ही कृष्णाजी देवल यांची दोन लहान भावंडे होत. मातापित्यांचा १८६७ साली मृत्यू झाल्याने बेळगावी सरदार्स विद्यालयामधून नुकतेच मॅट्रिक झालेल्या कृष्णाजींवर संसाराची जबाबदारी पडली. कृष्णाजींनी सरकारी नोकरी पत्करली व बढती मिळवत ते मामलेदार पदापर्यंत पोहोचले. १८९६ साली ते रत्नागिरीस उपजिल्हाधिकारी बनले. त्यांना 'रावबहादूर' हा किताबही इंग्रज सरकारने दिला.

१९०४ साली ते या फिरतीच्या नोकरीतून निवृत्त झाले व सांगलीस स्वतःच्या वाड्यात स्थायिक झाले.

त्यांचे बाह्यांग प्रभावी व आकर्षक नसल्याने त्यांची बरीच कुचेष्टा झाली; मात्र ते स्वभावाने अत्यंत शांत, सात्त्विक, गंभीर होते. आपल्या दोन्ही भावांचे शिक्षण करणे, लग्न लावणे व संसार सांभाळणे अशा जबाबदाऱ्या त्यांनी निगुतीने पार पाडल्या. त्यांनी १८६८ पासून मृत्यूपर्यंत संगीताचा व्यासंग केला. बेळगाव येथे त्यांनी सतारीचा रियाज केला. त्यांना चांगले स्वरज्ञान होते व संस्कृत भाषेचा अभ्यास असल्याने त्यांनी संगीतविषयक संस्कृत ग्रंथांचे अध्ययन केले. रत्नागिरी येथे घरातच त्यांनी तंबोरे, सतारी, इ. वाद्ये बनवण्याचा प्रयत्न केला.

त्यांनी स्वतः नारळाच्या करवंटीपासून बनवलेला एक छोटा तंबोरा त्यांची भाची, गायिका व नाटककार हिराबाई पेडणेकर यांना दिला. तो नंतर हिराबाईंनी आपली मैत्रीण, श्रेष्ठ गायिका अंजनीबाई मालपेकर यांना दिला होता असा उल्लेख मिळतो. एक संगीतरसिक व व्यक्ती म्हणूनही देवल हे उदार व कनवाळू होते. त्यांच्या घरी ते अनेक कलाकारांना आश्रय देत. उस्ताद रहिमत खाँ यांना सांगलीत ते स्वतःच्या घरीच आश्रय देत. वासुदेवबुवा जोशी यांचा पुत्र भैया हा अखेरच्या काळात काहीसा भ्रमिष्ट झाला असताना त्याला आश्रय देऊन त्याच्याकडील दुर्मीळ विद्येची तालीम त्यांनी बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांना मिळवून देण्याची सोय केली. कीर्तनकार रघुनाथ जोशींचा मुलगा विष्णू याची त्यांनी बडोद्यास स्वखर्चाने सोय करून त्याला नासर खाँ पखवाजियाची तालीम मिळवून दिली. अन्य शास्त्रकलांतील अभ्यासकांनाही ते मदत करत असत.

‘जर्नल ऑफ द रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्स’, लंडन या संस्थेने प्रसिद्ध केलेल्या नियतकालिकाच्या २७ मार्च १८८५ च्या अंकात अलेक्झांडर जॉन एलिस याने लिहिलेला ‘ऑन द म्यूझिकल स्केल्स ऑफ व्हेरियस नेशन्स’ हा लेख कृष्णाजी देवलांच्या वाचनात आला. त्यात भारतीय संगीतातील स्वरसप्तकावरची ‘स्वैर, नियमहीन’ अशी बेतुकी टीका वाचून ते अस्वस्थ झाले व त्यांनी या अनाठायी टीकेस उत्तम उत्तर लेखाद्वारेच देण्याचे ठरवले. मग १८८६ ते १९०८ अशी २२ वर्षे त्यांनी भारतीय स्वरश्रुती व्यवस्था यांच्या संशोधनात व्यतीत केली. त्यांनी भरत, शार्ङ्गदेव, सोमनाथ व अहोबल अशा प्राचीन, मध्ययुगीन शास्त्रकारांचे ग्रंथ अभ्यासले. अण्णा घारपुरे, मंगेशराव तेलंग, भवानराव पिंगळे यांसारख्या तत्कालीन अभ्यासकांशी त्यांनी विचारविनिमय केला. श्रुतिशास्त्रास भौतिकशास्त्राच्या प्रयोगांची जोड देण्याचाही प्रयत्न केला. त्यांचा १९०२ पासून अब्दुल करीम खाँ साहेबांशी परिचय झाला व ग्रांथिक श्रुतिशास्त्राचा प्रत्यक्ष सांगीतिक व्यवहार यांची जोड त्यांना घालता आली. प्राचीन २२ श्रुतींपेक्षा अधिक, २४ श्रुती सध्याच्या सांगीतिक व्यवहारात असल्याचा त्यांनी निष्कर्ष काढला.

आधी १९०८ साली एक पुस्तिका व नंतर १९१० साली ‘हिंदू म्यूझिकल स्केल ॲण्ड ट्वेन्टिटू श्रुतीज्’ या ग्रंथात रावबहादूर देवलांनी आपले श्रुतिशास्त्रविषयक संशोधन प्रसिद्ध केले. त्यांनी १९१८ पर्यंत सप्रयोग व्याख्यानांचे दौरे काढून आपला श्रुतिसिद्धान्त महाराष्ट्रभर मांडला. सातारा येथील न्यायाधीश ई. क्लेमन्ट्स यांनी ‘इंट्रोडक्शन टू दी स्टडी ऑफ इंडियन म्यूझिक’ या ग्रंथात देवलांच्या संशोधनाची प्रशंसा केली. क्लेमन्ट्स यांच्याशी देवलांचा परिचय हा परस्परांच्या कार्यास पोषक ठरला. क्लेमन्ट्सनी देवलांचे संशोधन लंडनपर्यंत पोहोचवले.

देवल व क्लेमन्ट्स या जोडीने १८६२ साली स्थापन झालेल्या ‘फिलहार्मोनिक सोसायटी’चे जून १९१२ साली ‘फिलहार्मोनिक सोसायटी ऑफ वेस्टर्न इंडिया’ या नावाने पुनरुज्जीवन केले. क्लेमन्ट्स यांनी देवलमतानुसार स्वरजुळणी केलेले, सूक्ष्म स्वरांतरे वाजू शकतील असे तीन ऑर्गन ‘मूर ॲण्ड मूर’ या युरोपियन कंपनीकडून मागवले व या ऑर्गनवरील प्रात्यक्षिकासह देवल व क्लेमन्ट्स आपली श्रुतिविषयक व्याख्याने देऊ लागले. (या श्रुति-ऑर्गनमध्येच नंतर आचरेकरांनी केलेल्या श्रुतिमंजूषेचे मूळ आहे.)

द

त्यांनी ‘रागाज ऑफ हिंदुस्थान’ व ‘ट्यूनिंग ऑफ सितार’ ही पुस्तके पाश्चात्त्य स्टाफ स्वरलेखनपद्धतीनुसार प्रसिद्ध केली. कृष्णाजी देवलांनी ‘आर्य संगीतशास्त्राची उपपत्ती व भारतीय गायन पद्धतीची मूलतत्त्वे’, इ. तीन मराठी पुस्तकेही लिहिली होती. (देवल-क्लेमन्ट्स यांच्या या श्रुतिसिद्धान्ताच्या मांडणीमुळे या विषयावर बरीच चर्चा सुरू झाली व नंतर कृ.ग. मुळे, गं.भि. आचरेकर, ओंकारनाथ ठाकूर, इ. अनेकांनी श्रुतिसिद्धान्तात भर घातली.)

अब्दुल करीम खाँ यांचे १९१४ नंतर देवलांशी मतभेद होऊ लागले व भातखंड्यांनी देवलांचे सिद्धान्त अमान्य केले. क्लेमन्ट्स १९२८ साली निवृत्त होऊन इंग्लंडला परतले. देवलांच्या विरोधकांनी त्यांच्या मतांचा बराच अपप्रचार केला. अखेरीच्या काळात देवल काहीसे एकाकी पडले व सांगली येथे त्यांचा मृत्यू झाला. मात्र, आधुनिक काळात श्रुतिशास्त्रास भौतिकशास्त्रीय प्रयोगांची जोड देणारा भारतातील एक शास्त्रकार म्हणून रावबहादूर देवलांचे योगदान नक्कीच महत्त्वपूर्ण आहे.

द

— चैतन्य कुंटे

## देशपांडे, पुरुषोत्तम लक्ष्मण
**नट-गायक, संगीतकार**

**८ नोव्हेंबर १९१९ – १२ जून २०००**

**☛ मुख्य नोंद - साहित्य खंड**



महाराष्ट्राचे ‘बहुरूपी खेळिया’ कलाकार पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे यांना बालगंधर्वांच्या नाट्यपदांची, हार्मोनिअमवादनाची व गायनाची आवड असा संगीताचा वारसा त्यांची आई लक्ष्मीबाई यांच्याकडून मिळाला. दत्तोपंत राजोपाध्ये यांच्या भास्कर संगीतालयात देशपांडे यांनी संगीताचे धडे घेतले.

पु.ल. हे बालगंधर्व, हिराबाई बडोदेकर यांना संगीतातील आदर्श मानत व त्यांच्या गायकीचा प्रभाव त्यांच्यावर होता. पुण्यामुंबईतील वास्तव्यात त्यांना केशवराव भोळे, वामनराव देशपांडे यांसारखे बुजुर्ग, तसेच वसंतराव देशपांडे, भीमसेन जोशी, मल्लिकार्जुन मन्सूर, कुमार गंधर्व, मधुकर गोळवलकर, मधू ठाणेदार असे संगीतसुहृद भेटले व त्यांच्यात खुलेपणाने आदानप्रदान होत असे. यातून पु.लं.चे सांगीतिक व्यक्तित्व बनत गेले.

महाविद्यालयीन दिवसांत पु.ल. एक हौशी भावगीत गायक म्हणून तांबे, अनिल, ना.घ. देशपांडे इ. कवींच्या कवितागायनाच्या मैफली करत. या मैफलींत ते एखाद्या रागातील छोटी चीज, ठुमरी वा भजन व नाट्यगीतही गात. ‘वाकू नको राया’, ‘नदीकिनारी’, ‘चल गडे नौकेत बसू’, ‘आणिले टिपून अमृतकण’, ‘नादात गुंगसी’ व ‘सावळ्या रुखावळीत धूर’ या बोरकरांच्या कविता, राजा बढे यांची ‘तुजसाठी राया मी लाख बोल साहिले’ अशी भावगीते ते उत्कटतेने गात. गडकऱ्यांचे ‘नाचत ना गगनात’ हे नाट्यगीतही ते स्वत:च्या निराळ्या चालीत पेश करत. त्यांनी गायलेल्या कवी अनिलांच्या ‘बाई या पावसानं’ व ‘उघड दार’ या दोन कवितांची ध्वनिमुद्रिका एच.एम.व्ही.ने प्रसिद्ध केली होती.

उमेदवारीच्या काळात त्यांनी मो.ग. रांगणेकरांच्या ‘नाट्यनिकेतन’ या संस्थेतून काही नाटकांत गायक-नट म्हणून काम केले. ‘वहिनी’ या नाटकासाठी श्रीधर पार्सेकरांच्या संगीतदिग्दर्शनात त्यांनी गायलेल्या ‘पाखरा जा त्यजुनिया’ व ‘ललना कुसुमकोमला’ या दोन नाट्यगीतांच्या ध्वनिमुद्रिका निघाल्या होत्या. चिंतामणराव कोल्हटकरांच्या ‘ललितकलाकुंज’ या नाट्यसंस्थेतही त्यांनी ‘संगीत शारदा’, ‘भावबंधन’, ‘राजसंन्यास’ या नाटकांत गायन-अभिनय केला.

‘कुबेर’ (१९४७, संगीत : भोळे व पार्सेकर), ‘भाग्यरेखा’, ‘वंदे मातरम्’ (१९४८, संगीत : सुधीर फडके), ‘पुढचं पाऊल’ (१९५०, संगीत : सुधीर फडके) या चित्रपटांत त्यांनी अभिनय व गायन केले.

संगीतकार म्हणून त्यांनी ‘मोठी माणसं’, ‘मानाचं

पान' (१९४९), 'देव पावला', 'नवराबायको' (१९५०), 'दूधभात', 'घरधनी' (१९५२), 'अंमलदार', 'माईसाहेब', 'विठ्ठला पायी', 'देवबाप्पा', 'गुळाचा गणपती' (१९५३) या अकरा चित्रपटांना संगीत दिले. 'नवराबायको' या चित्रपटातील 'सखूबाई साळूबाई' (विष्णूपंत जोग), 'गुळाचा गणपती'मधील 'ही कुणी छेडिली तार' (वसंतराव देशपांडे व आशा भोसले), 'इथेच टाका तंबू', 'करू देत शृंगार', 'केतकीच्या वनात' (आशा भोसले), 'इंद्रायणी काठी' (भीमसेन जोशी), आशा भोसले यांनी गायलेले 'देवबाप्पा'तील 'नाच रे मोरा', 'देव पावला'तील माणिक वर्मांनी गायलेली 'कौसल्येचा राम बाई', 'जा मुली शकुंतले सासरी' ही पु.लं.चे संगीत असणारी चित्रपटगीते सर्वपरिचित आहेत.

त्यांच्या चालींवर मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर व केशवराव भोळे या पूर्वसुरींचा प्रभाव स्पष्ट जाणवतो ('इंद्रायणी काठी'ची चाल थेटपणे मास्तरांच्या 'अवघाची संसार'शी नाते सांगते!); मात्र या चाली स्वत:चा चेहरा घेऊन येतात. मर्यादित वाद्यमेळात शब्दांना न्याय देत, सहजता व प्रसंगानुरूपता जपत केलेली गुणगुणण्याजोगी चाल हे त्यांच्या संगीताचे वैशिष्ट्य म्हणता येईल. चित्रपटांना संगीत देताना त्यांनी कथानकाच्या आशयानुसार 'अंमलदार'साठी कवायती सुरावट, 'दूधभात'साठी तोडी रागातील करुण सुरावट असे श्रेयनामावलीचे संगीत रचले. त्यांनी चाली देताना पारंपरिक स्त्री-गीते, लोकगीते, लावण्या यांचा वापर योजकतेने केला.

त्यांचे संगीत असलेल्या 'हसले मनी चांदणे' व 'तुझ्या मनात कुणीतरी लपलं गं' या माणिक वर्मांनी गायलेल्या गीतांची, तसेच ज्योत्स्ना भोळ्यांनी गायलेल्या 'माझिया माहेरा जा' व 'झाली पहाट' या गीतांची, अशा ध्वनिमुद्रिका खूपच गाजल्या.

आकाशवाणीसाठी त्यांनी मंगेश पाडगावकरांची 'बिल्हण' ही संगीतिका बसवली, यातील 'शब्दावाचून कळले सारे' आणि 'माझे जीवनगाणे' या गीतांच्या अभिषेकींनी गायलेल्या ध्वनिमुद्रिका लोकप्रिय ठरल्या. 'पुढारी पाहिजे' (१९५१), 'भाग्यवान' (१९५३) या स्वलिखित नाटकांचे संगीतदिग्दर्शनही त्यांनी केले होते. 'बटाट्याची चाळ', 'असा मी असामी', 'वाऱ्यावरची वरात' या त्यांच्या प्रस्तुतींमध्येही त्यांच्या गायन-वादनातील कौशल्याचा आस्वाद रसिकांना मिळे.

वसंतराव देशपांडे, भीमसेन जोशी, मल्लिकार्जुन मन्सूर अशा गायकमित्रांना ते कधीकधी हार्मोनिअमची साथ दिलखुलासपणे करत व आपले वादन, अदा आणि प्रसन्न दाद यांद्वारे मैफलीची रंगत वाढवत. तरुणपणी कोल्हापुरात संगीतरसिक वकील बाबूराव जोश्यांच्या घरी झालेल्या त्यांच्या हार्मोनिअमवादनाच्या मैफलीत त्यांनी गोविंदराव टेंबे यांचीही वाहवा मिळवली होती. पुढे खूप वर्षांनंतर 'बटाट्याची चाळ'च्या वेळी त्यांनी डॉ. पाबळकरांच्या मार्गदर्शनाने हार्मोनिअमवरचा हात साफ करून घेतला होता.

हार्मोनिअमवादनाच्या मैफलीत ते एखाद्या रागातील छोटी चीज वाजवून मग नाट्यगीते वाजवत. त्यांचे हार्मोनिअमवादन हे प्रामुख्याने बालगंधर्वांच्या पदांचे वाद्यातून चित्रण असे, त्यामुळे ते वादन खूप लोकप्रिय झाले – गंधर्वगीतांचा तो वाद्याविष्कार ठरे! पु.लं.च्या वादनातील चुरचुरीतपणा, गीतातील शब्दाक्षरांचे आणि हरकती-मुरक्यांचे नेमके वाजणे यांमुळे ते आकर्षक वाटे. गोविंदराव पटवर्धनांच्या एकसष्टीच्या कार्यक्रमात गोविंदराव व पु.ल. अशी जुगलबंदीही रंगली होती. त्यांच्या हार्मोनिअमवादनाची ध्वनिफीत अलूरकर म्यूझिक हाउसने काढली होती.

मराठी नाट्यसंगीत हा पु.लं.च्या विशेष जिव्हाळ्याचा विषय असल्याने त्यांनी नाट्यसंगीताचे विविध कार्यक्रम घडवून आणले. पुण्यातील बालगंधर्व रंगमंदिराच्या उद्घाटनप्रसंगी त्यांनी मराठी नाट्यगीतांचा विशेष कार्यक्रम सादर केला, ज्यात वसंतराव देशपांडे, भीमसेन जोशी व सुधीर फडके यांनी नाट्यगीते गायली होती. तसेच 'चतुरंग रंगसंगीत' ही मैफल वसंतराव देशपांडे, भीमसेन जोशी, भार्गवराम आचरेकर व माणिक वर्मा

यांच्या गायनासह पु.लं.च्या खुमासदार निवेदनानेही गाजली होती.

केसरबाई केरकर (एका तेज:पुंज स्वराचा अस्त), बालगंधर्व (दया छाया घे), केशवराव भोळे (म्यूझिक डा(यरे)क्टर केशवराव भोळे), ज्योत्स्ना भोळे (ज्योत्स्ना भोळे नावाची माझी एक बालमैत्रीण), बेगम अख्तर (जाने क्यूं आज तेरे नाम पे रोना आया), कुमार गंधर्व (मंगल दिन आज), माणिक वर्मा (शरदाचे चांदणे), पंडित विष्णू दिगंबर, हिराबाई बडोदेकर, मल्लिकार्जुन मन्सूर, रामूभैया दाते या संगीतक्षेत्रातील व्यक्तींची शब्दचित्रे पु.लं.नी रेखाटली आहेत. बालगंधर्व आणि सुधीर फडके यांच्या गानमुद्रेचे वर्णन करणारे लेखही (अनुक्रमे 'जोहार मायबाप जोहार' व 'कुश-लव रामायण गाती') त्यांनी लिहिले.

पु.ल. हे एक रंजक वृत्तीचे कलाकार आणि आस्वादक वृत्तीचे रसिक होते. त्यामुळे त्यांचे संगीतविषयक लेखन संगीताभ्यासकांपेक्षा सर्वसामान्य वाचकाला रमवणारे आहे. कलाकाराच्या संगीतपर वर्णनांपेक्षा त्याचे व्यक्तित्व, त्याच्या काळातील सांस्कृतिक पैस, त्याचा जनमानसावरील परिणाम या साऱ्याचे रम्यसुंदर वर्णन करण्याकडे त्यांचा कल असे, अर्थात हे वर्णन करताकरता ते कलाकाराच्या कलेतील मर्मस्थळेही आस्वादकपणे उलगडवून दाखवतात.

पु.लं.च्या भाषणांचा संग्रह असणाऱ्या 'रसिक हो' या पुस्तकात त्यांची संगीतविषयक भाषणे आहेत, त्यांतून त्यांच्या संगीताच्या व्यासंगाचे नेमके स्वरूप लक्षात येते. पु.लं.च्या साहित्यात त्यांच्या संगीतपरतेचा प्रत्यय येतो, तर संगीतात नाट्यात्मकता व साहित्यिक अंगही दिसते.

एक गायक-नट, हार्मोनिअमवादक, संगीतकार अशा रूपाने संगीतक्षेत्रात वावरलेल्या पु.लं.नी अखेरच्या काळात अनेक कलाकारांची प्रस्तुती ऐकून त्यांना प्रोत्साहन दिले, ज्यामुळे कित्येकांचे कलाजीवन बहरले. पु.लं.च्या एकंदर व्यक्तित्वाची अविचल मोहिनी मराठी रसिकमनावर असल्याने त्यांचे संगीतही त्यास अपवाद नाही.

(या लेखात पु.लं.नी पटकथा-संवाद वा गीतलेखन केलेले चित्रपट, त्यांना मिळालेले पुरस्कार, इ. संगीतेतर बाबींचा उल्लेख केलेला नाही; कारण तो तपशील साहित्य खंडातील नोंदीत आहे.)

— चैतन्य कुंटे

## देशपांडे, वसंत बाळकृष्ण

**गायक, संगीतनट**

**२ मे १९२० — ३० जुलै १९८३**



वसंत बाळकृष्ण देशपांडे यांचा जन्म मूर्तिजापूर, जिल्हा अकोला येथे झाला. वऱ्हाडातील कमळापूरच्या मूळच्या वतनदार घराण्यातील आजोबा गोविंद देशपांडे हे गायन शिकले होते, तर वसंतरावांचे वडील तबला वाजवत. त्यांची आई राधाबाई पारंपरिक स्त्री-गीते उत्तम, सुरेल आवाजात गात असे. त्यांच्यावर तो पहिला संगीतसंस्कार झाला. नागपूर येथे विष्णू दिगंबर पलुसकरांच्या पठडीतील शंकरराव सप्रे यांच्याकडे 'श्रीराम संगीत विद्यालया'त त्यांचे प्राथमिक संगीत शिक्षण झाले. तिथे रामचंद्र चितळकर (प्रख्यात संगीतकार सी. रामचंद्र) हे त्यांचे सहाध्यायी होते. हे दोघे बालवयात मेळ्यांमध्ये गात, मूकपटांना प्रत्यक्ष पार्श्वसंगीत वाजवत असत. बालवयातच मास्टर दीनानाथ यांच्या गाण्याच्या आकर्षणामुळे त्यांनी अनेक संगीत नाटके पाहिली, त्यांचा सहवासही केला. दीनानाथांच्या गायनातील तडफदारपणा, तेजस्विता त्यांनी अंगीकारली.

वसंत देशपांडे १९३६ ते ३८ या काळात मामा शंकर पांडे यांच्यासमवेत लाहोरला राहिले. तिथेच ते मॅट्रिक झाले. लाहोरच्या वास्तव्यात त्यांनी तिकडच्या अनेक उस्तादांचे तयारीचे गाणे ऐकले. पतियाळा घराण्याचे उस्ताद आसद अली खाँ यांच्याकडून त्यांना सहा महिने केवळ 'मारवा' या रागाची विशेष तालीम मिळाली.

१९४० साली प्रापंचिक जबाबदारी ओळखून मिलिटरी अकाउण्ट्समध्ये नोकरी पत्करून ते पुण्यात स्थायिक झाले. त्यांनी १९४२ ते ५२ अशी दहा वर्षे सुरेशबाबू माने यांच्याकडून किराणा घराण्याच्या स्वरप्रधान बढत अंगाच्या गायकीची तालीम घेतली. याच काळात त्यांना गायनाचार्य रामकृष्णबुवा वझे यांचाही सहवास लाभला. वसंत देशपांडे यांनी १९५० च्या सुमारास भेंडीबाजार घराण्याच्या उ. अमान अली खाँ यांच्याकडूनही काही काळ खंडमेरू पद्धतीने स्वरप्रस्तार करणाऱ्या या गायकीची तालीम घेतली. त्यांनी त्या गायकीतील लयीशी खेळत डौलदारपणे केलेले बोलबनाव व विशेषतः 'सरगम' करण्याचा खास अंदाज उचलला. जटिल तानक्रिया हा तर देशपांडेंच्या गायकीतील एक विशेष भाग होता. पं. कुमार गंधर्व हे त्यांचे जिवलग मित्र होते. त्यांना देशपांडे यांनी गुरुसमान मानून त्यांच्या अनेक बंदिशीही स्वतःच्या ढंगात गायल्या. अनेक घराण्यांतील गायकींचा सूक्ष्म अभ्यास करून त्यांनी स्वतःच्या बुद्धिमत्तेस व गळ्याच्या धर्मास अनुकूल अशी वेगळी गायकी तयार केली.

त्यांनी १९६२ साली 'ट्रान्सफॉर्मेशन ऑफ म्यूझिक' या विषयावर प्रबंध सादर करून अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाकडून डॉक्टरेट मिळवली. मिलिटरी अकाउण्ट्समधील नोकरीमुळे त्यांची १९६३ साली नेफा आघाडीवर बदली झाली. त्यांच्या संगीतस्नेही, प्रख्यात गायिका बेगम अख्तर यांच्या आग्रहामुळे या नोकरीचा त्यांनी १९६५ साली राजीनामा दिला व त्यांनी स्वतःस संगीत क्षेत्रात पूर्णपणे झोकून दिले. एच.एम.व्ही.ने त्यांच्या मारवा, मधुकंस, नटभैरव, राजकल्याण या रागांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या.

ख्यालाबरोबरच ठुमरी शैलीवरही देशपांडे यांचा पूर्ण अधिकार होता. बनारस व पंजाब अंगाची ठुमरी ते मोठ्या नखरेल अंदाजाने पेश करत. 'मैं कैसे आऊँ बालमा', 'रस के भरे तोरे नैन' या ठुमऱ्या आणि 'आनबान जिया में लागी', 'बिंदिया ले गई', 'जमुना किनारे मेरा गाँव' हे दादरे ते फार खुलवून गात. ठुमरीतील चमत्कृतिपूर्ण सरगम व खास 'खाँसाहेबी' स्वरोच्चार हे त्यांचे वैशिष्ट्य होते. बेगम अख्तर आणि त्यांची सांगीतिक मैत्री १९३५ सालापासून होती व गझल हाही देशपांड्यांचा जिव्हाळ्याचा विषय होता. त्यांच्याकडे पारंपरिक, बैठकीच्या लावण्यांचाही संग्रह होता.

वसंतराव एक चतुरस्र कलाकार होते. गायनाबरोबरच ते तबला, सारंगी, हार्मोनिअम, ऑर्गन उत्तम वाजवत. पं. कुमार गंधर्वांच्या काही व्यावसायिक ध्वनिमुद्रिकांत त्यांनी तबल्याची साथही केली होती. त्यांनी १९४९ साली हिराबाई बडोदेकरांसह तबलावादक व गायक म्हणून आफ्रिकेचा दौरा केला. 'गुळाचा गणपती' या चित्रपटातील 'इंद्रायणी काठी' या भीमसेन जोशींनी गायलेल्या भजनास त्यांनी ऑर्गनची साथही केली. मराठी नाट्यसंगीताच्या इतिहासाचे ते चालतेबोलते कोशच होते. आशा भोसले यांना १९५२ साली नाट्यपदांच्या ध्वनिमुद्रिकेसाठी दीनानाथांच्या पदांची तालीम देशपांड्यांनीच दिली होती. 'मराठी नाट्यसंगीताची वाटचाल' असा कार्यक्रम त्यांनी मोठ्या विद्वत्तेने व रंजकतेने सादर केला.

सुखदेव कथक यांच्याकडून त्यांनी कथकी बाजाची, अदाकारीची ठुमरी आत्मसात केली. त्यांचा ज्योतिष, योग, आयुर्वेद, जीवशास्त्र, बागकाम, पाककला, कुस्ती, इ. अनेक शास्त्रांचा व्यासंग होता. ते उत्तम वक्ते होते. बालगंधर्व, मा. दीनानाथ, अब्दुल वहीद खाँ, सुरेशबाबू, विनायकबुवा, ग.ह. रानडे यांच्या गाण्यांची ते इतकी हुबेहूब प्रस्तुती करत, की ती नक्कल न वाटता अस्सल गायकी ऐकल्याचे समाधान देऊन जाई. आर्य संगीत प्रसारक मंडळाचे ते एक सभासद होते व सवाई गंधर्व समारोहात त्यांची गायन हजेरी ही ठरलेली असायची.

वसंतरावांनी अनेक उत्तम बंदिशी रचल्या होत्या, उदा. मारुबिहाग (उनही से जाय कहो, मैं पतिया लिख भेजी), राजकल्याण (हमारी अरज सुनो, ऐसी लाडली प्रीत), जोगकंस (खेलन आयो री), चंद्रकंस (री मोरी मुरकी कलाई), बसंतमुखारी (कित हो गए बनवारी), नटभैरव

(मान अब मोरी, सुजान करिए गुण की चर्चा). कुमारजींना त्यांनी स्थायीतून विचारलेला प्रश्न व तिला कुमारजींनी अंतऱ्यातून दिलेले उत्तर असणारी मधुवंती रागातील ‘मैं आऊँ तोरे मंदरवा’ ही बंदिश प्रसिद्ध आहे. त्यांनी गझल, भजनांना चाली लावल्या व काही संगीत नाटकांसाठीही चाली दिल्या होत्या.

देशपांडे यांनी १९४१ पासून मराठी संगीत रंगभूमीवर अनेक भूमिका आपल्या तेजस्वी गायन व प्रभावी अभिनयाने रंगविल्या. अश्विनशेट (संशयकल्लोळ), नारद (सौभद्र) या त्यांच्या भूमिकाही गाजल्या. दीनानाथांची पदे, ‘सकल चराचरी या’, ‘मधुमीलनात या’, ‘वितरी प्रखर’, ‘परवशता पाश’, ‘शतजन्म शोधिताना’, ‘सुकतातची जगी या’, ते अत्यंत तडफेने गात. ‘रवि मी’, ‘प्रेम सेवाशरण’ (मानापमान), ‘मृगनयना रसिकमोहिनी’, ‘मानिली आपुली’, ‘कर हा करी’ (संशयकल्लोळ), ‘मालिनीकण वाही’, ‘कांते फार तुला’, ‘लाविली थंड उटी’ (शाकुंतल) इ. जुन्या नाटकांतील त्यांच्या नाट्यपदांच्या ध्वनिमुद्रिका अत्यंत गाजल्या.

‘एकदाच गाऊ दे’ (१९६१), ‘मी जिंकलो मी हरलो’ (१९६२), ‘हे बंध रेशमाचे’ (१९६८), ‘वरदान’ (१९७५) या नवीन संगीत नाटकांतही त्यांनी भूमिका केल्या. ‘तुका म्हणे आता’ (लेखक : पु.ल. देशपांडे), ‘मेघमल्हार’ (‘गुलजार नार ही’, ‘धीर धरी’ या दोन पदांसाठी), ‘वीज म्हणाली धरतीला’ (१९७०), ‘वरदान’ (१९७५) या नाटकांना त्यांनी संगीत दिले होते.

जितेंद्र अभिषेकींनी संगीत दिलेले पुरुषोत्तम दारव्हेकर लिखित ‘कट्यार काळजात घुसली’ हे संगीत नाटक १९६७ साली रंगमंचावर आले. हे संगीत नाटक म्हणजे देशपांडे यांच्या जीवनातले एक अनोखे पर्व होते. या नाटकाच्या ५२७ प्रयोगांत त्यांनी काम केले. या नाटकातील आफताब हुसेन खाँसाहेबांची भूमिका ते अक्षरशः जगले. आपल्या गायन-अभिनयक्षमतेचा पुरेपूर वापर त्यांनी या संगीत नाटकात केला. या भूमिकेने व त्यातील ‘तेजोनिधी लोहगोल’, ‘या भवनातील गीत पुराणे’, ‘घेई छंद’, ‘सुरत पिया की’, ‘लागी करेजवा कटार’ इ. पदांनी त्यांना दिगंत कीर्ती बहाल केली व रसिकांच्या मनांत त्यांचे अढळ स्थान निर्माण झाले.

कोल्हापूरच्या शालिनी सिनेटोन निर्मित, भालजी पेंढारकर दिग्दर्शित ‘कालिया मर्दन’ या बोलपटाच्या हिंदी आवृत्तीत त्यांनी १९३५ साली बालकृष्णाची भूमिका साकारली व गायनही केले. ‘म्युनिसिपालिटी’, ‘दूधभात’ (हिंदीत तनहाई), ‘गुळाचा गणपती’ या मराठी चित्रपटांत त्यांनी भूमिकाही केल्या. दादा चांदेकर, वसंत पवार, दत्ता डावजेकर, सुधीर फडके, पु.ल. देशपांडे, वसंत देसाई, वसंत प्रभू, राम कदम, इ. संगीतकारांसाठी ‘पेडगावचे शहाणे’, ‘गुळाचा गणपती’, ‘वैजयंता’, ‘झाला महार पंढरीनाथ’, ‘छंद प्रीतीचा’, ‘भोळी- भाबडी’, इ. सुमारे ८० मराठी चित्रपटांसाठी त्यांनी पार्श्वगायन केले.

‘अष्टविनायक’ (१९७९) हा त्यांनी अभिनय केलेला चित्रपट व त्यातील त्यांची गाणी (‘दाटून कंठ येतो’, ‘तू सुखकर्ता’, ‘प्रथम तुला वंदितो’) अतिशय लोकप्रिय ठरली. रंगबिरंगी (१९८३) या हिंदी चित्रपटातील ‘ओ मृगनयनी चंद्रमुखी’ या टप्पा अंगाच्या युगुलगीतासाठी संगीतकार आर.डी. बर्मन यांनी खास करून देशपांडे व फैयाझ यांना पाचारण केले.

भावसंगीताच्या क्षेत्रातही वसंत देशपांडे यांनी आपली खास मुद्रा उमटवली. ‘चंद्रिके चकोर भुलला तुला’ व ‘गुलगुल बोलती राघूमैना’ (१९४८), ‘बगळ्यांची माळ’, ‘राहिले ओठातल्या ओठात’ (कवी : वा.रा. कांत, संगीत : श्रीनिवास खळे, १९७२), ‘वाटेवर काटे’, ‘कुणी जाल का’ (कवी : अनिल, संगीत : यशवंत देव, १९७५) ही त्यांची भावगीतेही विशेष गाजली.

त्यांनी आकाशवाणीवरील संगीत नाटके, संगीतिका व अनेक कार्यक्रमांतून गायन केले. त्यांनी १९८० साली अमेरिकेचा दौरा केला. त्यांच्या एकसष्टीनिमित्त १९८१ साली त्यांचा सत्कार समारंभ झाला. अकोला येथे १९८२ साली झालेल्या बासष्टाव्या नाट्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. याच वर्षी संगीत नाटक अकादमीतर्फे तत्कालीन राष्ट्रपतींच्या हस्ते त्यांचा दिल्ली येथे सत्कार

द

करण्यात आला. पुण्यात राहत्या घरी त्यांचे निधन झाले.

संगीतात वादळी तर वैयक्तिक जीवनात स्नेहशील, दिलदार व्यक्तित्व असणाऱ्या देशपांडे यांनी प्रपंचही नेटका केला व संगीताचा संसारही खुलवला; मात्र त्यांच्या कार्याला व्यावहारिक यशाची, पुरस्कारांची सोनेरी झालर फार उशिरा लाभली. कृ.द. दीक्षित, रामकृष्ण बाक्रे, पु.ल. देशपांडे, सुनीता देशपांडे, प्रभाकर जठार इ. अनेकांनी त्यांच्या गायकीचे व व्यक्तित्त्वाचे मनोज्ञ दर्शन आपल्या लेखांमध्ये घडवले. त्यांच्या पश्चात 'वसंतराव देशपांडे ट्रस्ट'तर्फे 'वसंतोत्सव' हा संगीतमहोत्सव आयोजित केला जातो व त्यांच्या नावाने पुरस्कारही देण्यात येतो. नागपूर येथे त्यांच्या गौरवार्थ 'वसंतराव देशपांडे नाट्यगृह' उभारण्यात आले आहे.

मधू नाडकर्णी, विलास इनामदार, पद्माकर कुलकर्णी, उषा चिपलकट्टी, लता देव, चंद्रकांत लिमये, विजय कोपरकर हे त्यांचे प्रमुख शिष्य होत. शैला दातार व आशा खाडिलकर यांनाही त्यांचे मार्गदर्शन लाभले. नृत्यपंडिता रोहिणी भाटे याही सुमारे वीस वर्षे वसंतराव देशपांडे यांच्याकडे गायन शिकल्या. त्यांचा नातू राहुल देशपांडे त्यांच्या गायकीची व संगीत नाटकांचीही परंपरा पुढे नेत आहे.

ख्याल, ठुमरी, नाट्यसंगीत, भावगीत अशा गानविधा समर्थपणे गाणारे एक चतुरस्र बुद्धीचे गायक, 'कट्यार काळजात घुसली'सारख्या नाटकांतील गायन व अभिनयाने संगीत रंगभूमीस नवसंजीवनी देणारे संगीतनट, संगीत दिग्दर्शक, कलामर्मज्ञ असे अनेक आयाम असणारे वसंतराव देशपांडे हे एक आगळेवेगळे व्यक्तिमत्त्व होते.

— चैतन्य कुंटे

## देशपांडे, वामन हरी
**संगीतसमीक्षक**

**२७ सप्टें. १९०७ – २७ फेब्रु. १९९०**

आपल्या संगीतविषयक लेखनाने मराठी संगीतसमीक्षेच्या विश्वाला मोठे योगदान देणाऱ्या वामनराव देशपांडे यांचे सत्यभामाबाई व हरी सखाराम देशपांडे आईवडील होत. साताऱ्यातील शिरवळ येथे प्राथमिक शिक्षण झाल्यावर वामनरावांनी पुण्यात न्यू इंग्लिश स्कूल येथून मॅट्रिक (१९२५) केले. नंतर १९२५ ते १९२८ या काळात मुंबईला 'बाटलीबॉय आणि पुरोहित' या अकाउंटन्सी फर्ममधून जी.डी.ए., एफ.सी.ए., एच.सी.ए. या परीक्षा देऊन ते व्यावसायिक चार्टर्ड अकाउंटंट झाले व १९३० पासून याच कंपनीत ते नोकरीस लागले. निवृत्तीनंतर त्यांचे पुण्यात वास्तव्य होते.



वामनरावांच्या घरातच संगीतास अनुकूल वातावरण होते. त्यांचे वडील बंधू पांडुरंगशास्त्री हे आयुर्वेदाचार्य होते व त्यांना किराणा घराण्याची तालीम होती. त्यांच्याकडे अनेक कलाकारांचे जाणे-येणे असे. साताऱ्याला मटंगेबुवांकडे वामनरावांचे आरंभीचे संगीतशिक्षण झाले. पुण्यातील वास्तव्यात १९२२च्या सुमारास ते सन्मित्र समाजाच्या मेळ्यात रामभाऊ लिमये या संगीतशिक्षकाच्या मार्गदर्शनाखाली गात असत व त्यांच्या या गाण्याची चांगलीच तारीफ झाली. १९२५ ते १९२८ या काळात मुंबईत शंकरराव कुलकर्णी, यादवराव जोशी यांजकडून वामनरावांनी गायनाचे शिक्षण घेतले. बापूराव केतकर, तांबेशास्त्री यांजकडूनही ते वेळोवेळी मार्गदर्शन घेत असत. किराणा घराण्याचे प्रसिद्ध गायक सुरेशबाबू माने यांचे गायन वामनरावांनी ऐकले आणि ते या गायनाने अतिशय प्रभावित झाले. त्यांनी सुरेशबाबूंकडून १९२८ ते १९४० अशी बारा वर्षे शिक्षण घेतले.

सुरेशबाबूंकडून इतकी वर्षे शिकल्यावरही आपल्या गळ्यावर ती तरल-तलम गायकी चढत नाही असे त्यांना वाटू लागले. गोविंदराव टेंब्याशी त्यांचा परिचय झाल्यावर त्यांच्या सांगण्यानुसार त्यांनी गानमहर्षी अल्लदियाखाँसाहेबांचे शिष्य नत्थनखाँ यांजकडून शिक्षण घेण्याचे ठरविले. त्यानुसार खुद्द अल्लादियाखाँसाहेबांच्या उपस्थितीत रीतसर गंडाबंधन होऊन ते उ.नत्थनखाँचे

द

शिष्य झाले. विशेष म्हणजे त्या काळात घराण्यांची बंधने कठोर आणि काटेकोर असूनही याबाबत त्यांचे आधीचे गुरू सुरेशबाबू माने हे यावरून यत्किंचितही नाराज झाले नाहीत आणि या दोघांच्या स्नेहात दुरावा आला नाही. नत्थनखाँची तालीम १९४० ते १९४६ अशी सहा वर्षे चालली. नत्थनखाँ वारल्यावर वामनराव जयपूर परंपरेच्या बुजुर्ग गायिका मोगूबाई कुर्डीकरांकडे ते शिकले.

१९२८-२९ सालापासून वामनराव संगीतावर लिहू लागले होते. संगीताच्या मराठीकरणावर 'विविध वृत्त'मध्ये त्यांचा पहिला लेख आला होता. त्यानंतर घरंदाज गायकी (मौज प्रकाशन, १९६१ - 'बिटवीन टू तानपुराज' या नावाने याचा इंग्रजी अनुवाद प्रसिद्ध), पं. कुमार गंधर्वांच्या 'अनूपरागविलास' या बंदिशींच्या पुस्तकाची प्रदीर्घ आणि अभ्यासपूर्ण अशी प्रस्तावना (मौज प्रकाशन, १९६५), 'आलापिनी' (मौज प्रकाशन, १९७९) तसेच अनेक स्फुट लेख असे विपुल लेखन त्यांनी केले. 'महाराष्ट्राज काँट्रिब्यूशन टू म्युझिक' हे इंग्रजी पुस्तक त्यांनी लिहिले. या ग्रंथाचा 'महाराष्ट्राचे संगीतातील कार्य' हा स.ह. देशपांडे यांनी केलेला मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने १९७४ साली प्रकाशित केला. 'एका गायकाचा ताळेबंद' (संपादक अ.पां. देशपांडे, ग्रंथघर, मुंबई) हे त्यांचे आत्मचरित्रात्मक पुस्तकही १९८८साली प्रकाशित झाले.

महाराष्ट्राच्या स्वातंत्र्योत्तर सांगीतिक घडणीत वामनरावांचे मोठे योगदान आहे. त्यांनी आपल्या लेखनाद्वारे समाजाच्या सांगीतिक जाणिवा विकसित केल्या, तसेच संगीत महोत्सवांचे व परिसंवादांचे आयोजन, कलाकारांस व संशोधकांस आर्थिक पाठबळ देऊन प्रोत्साहित करणे, विविध शासकीय समित्यांच्या कार्यातून सरकार व कलाकार यांत दुवा जोडणे, 'आर्य संगीत प्रसारक मंडळा'द्वारे सवाई गंधर्व संगीत महोत्सवाचे नियोजन करणे, 'संगीत कलाविहार'सारख्या संगीतविषयक मासिकास अर्थसाहाय्य मिळवून देणे, असे वामनरावांचे कितीतरी उपक्रम सांगीतिक वातावरणाच्या अभिवृद्धीसाठी पोषक ठरले.

द

एक माणूस म्हणून वामनराव हे अतिशय वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्त्व होते. बाटलीबॉय कंपनीसारख्या प्रसिद्ध आणि मोठ्या ऑडिटिंग कंपनीचे ते वरिष्ठ भागीदार होते. त्यांच्या कामानिमित्त तीस-चाळीस वर्षे ते साऱ्या देशात फिरले. अनेक बड्या कंपन्यांच्या धंद्यातील लबाड्या शोधून काढायचे काम त्यांच्याकडे असायचे. ती प्रकरणे उघडकीस येऊ नयेत म्हणून काही लाख रुपयांपर्यंत प्रलोभने त्यांना दाखविली गेली, कधी त्यांना जीवे मारण्याच्या अप्रत्यक्ष, कधी प्रत्यक्ष धमक्याही दिल्या गेल्या. पण पैशांच्या प्रलोभनालाही ते बळी पडले नाहीत, ना जिवाची पर्वा केली. व्यासंगी वृत्तीने ऑडिट आणि संगीत वाढवीत राहिले. लक्ष्मी आणि सरस्वती यांचा सुयोग्य मेळ वामनरावांच्या व्यक्तिमत्त्वात आणि आयुष्यात प्रतीत होतो.

'घरंदाज गायकी'साठी उत्कृष्ट समीक्षेचा महाराष्ट्र राज्य सरकार पुरस्कार (१९६२), 'आलापिनी'साठी राज्य सरकारचा पुरस्कार (१९७९), संगीतविषयक लेखनातील उत्कृष्ट कामगिरीसाठी संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार अशा पुरस्कारांनी त्यांना सन्मानित केले गेले. अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाने त्यांना डॉक्टरेट प्रदान केली होती. पुणे येथे त्यांचे निधन झाले. त्यांनी मंजिरी आलेगावकर, लता गोडसे, ज्योत्स्ना चोळकर इ.ना शिकवले. त्यांचे पुत्र सत्यशील देशपांडे हे त्यांचा वारसा चालवीत आहेत.

— डॉ. शुभदा कुलकर्णी

## देशपांडे, विनायक वामन

**दिलरुबावादक**

**१४ ऑक्टोबर १९२७**

वामन विनायक देशपांडे यांचा जन्म दिग्रसला संगीतप्रेमी, श्रीमंत घरात झाला. नवसासायासाने झालेल्या पुत्ररत्नाला आजोबांचेच 'वामन' नाव ठेवले गेले. वडिलांना संगीताची आवड म्हणून त्यांनी वामनला सातव्या वर्षीच गणपत परांजपे यांच्याकडे



संगीताभ्यासासाठी पाठविले. पण १९४० मध्ये विषमज्वर व ब्रॉंकोनिमोनिया झाल्याने छातीवर भयंकर दुष्परिणाम होऊन त्यांचे गायन कायमचे बंद झाले.

वामन देशपांडे १९४५ मध्ये मॅट्रिक झाल्यावर त्यांनी वाद्यशिक्षणास सुरुवात केली. संगीतज्ञ स.भ. देशपांडे यांच्या सल्ल्यानुसार त्यांनी पुण्याला दिलरुबा खरेदी करून, दिग्रसला येऊन मेहनत सुरू केली. वामन देशपांडे बनारस येथून १९४६ मध्ये 'जीवशास्त्र' हा विषय घेऊन इंटरसायन्स उत्तीर्ण झाले. अमरावतीला त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण व संगीत, दोन्ही छंद चालू राहिले.

ते १९५१ मध्ये बी.एस्सी. झाले व १९५२ मध्ये वाद्यवादनात विशारद, १९५४ मध्ये अलंकार व १९५९ मध्ये प्रवीण परीक्षा देऊन गांधर्व महाविद्यालय मंडळातून देशपांडे संगीताचे 'डॉक्टर' झाले. पुढे दिलरुबा वाद्याला ध्वनिवर्धक जोडून त्यांनी त्यात नावीन्य निर्माण केले.

देशपांडे यांनी दिग्रस येथे ३१ ऑक्टोबर १९५६ रोजी 'गंधर्व संगीत विद्यालय' स्थापन केले व संगीत प्रचार, तसेच लेखनही सुरू केले. पाच वर्षे विद्यालय चांगले चालले. त्यांचा विवाह १९६९ साली शैलजा पिंपळीकरांशी झाला. नंतर त्यांना जयपूर व नागपूर या दोन्ही ठिकाणांहून संगीताध्यापकांचे नियुक्तिपत्र मिळाले. प्रा. प्रभाकर खर्डेनविसांच्या सल्ल्याने त्यांनी नागपूरला एल.ए.डी. महाविद्यालयामध्ये नोकरी पत्करली. तीन वर्षांनी बुटी संगीत महाविद्यालयात संगीत शिक्षणाचे काम १९६७ पर्यंत केल्यावर ते नागपूर महाविद्यालयात संगीताचे प्राध्यापक झाले व त्यांनी एम.ए. (संगीत) च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले.

त्यांचे १९५० पासून नागपूर आकाशवाणीवर तारशहनाईचे कार्यक्रम होऊ लागले. त्यांनी १९५० मध्येच कलकत्ता येथे 'तानसेन विष्णू दिगंबर' स्पर्धांमध्ये तंतुवाद्यवादनातून प्रथम क्रमांकाने यशस्वी होऊन पारितोषिक मिळविले.

वामन देशपांडे कलेचे सच्चे उपासक, अभ्यासू होते, तसेच ते स्टाफ नोटेशन, लोकसंगीत, नवरागनिर्मिती, चिजांच्या बंदिशी, विविध लेखसंग्रह करीत होते. त्यांची वादनशैली पद्धतशीर, वक्तशीर होती. ख्याल, ठुमरी, दादरा इत्यादी संगीत प्रकारांत ते तरबेज होते.

— वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; १९७४.*

## देशपांडे, सखाराम भगवंत

**गायक, शिक्षक**

**१ ऑगस्ट १९१६ — ११ ऑगस्ट २००६**

सखाराम भगवंत देशपांडे यांचा जन्म यवतमाळ जिल्ह्यातील दिग्रसजवळील पोहरादेवी येथे झाला. पोहरादेवीजवळचे वडगाव हे त्यांचे जमीनदारीचे गाव म्हणून त्यांना वडगावकर देशपांडे म्हणून ओळखले जाई.

आईकडून आवाजातील गोडवा वारसारूपाने मिळालेल्या सखाराम देशपांडे यांना आई पहाटे जात्यावर दळत असताना तिने म्हटलेल्या ओव्या आणि अभंगांमुळे संगीताची गोडी लागली. वडिलांनी त्यांना पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्याकडे, पुण्याला शिकण्यासाठी पाठवले. सात-आठ वर्षांच्या सततच्या मेहनतीने व गुरूंच्या उत्तम तालमीने ते चांगले गायक व त्याचबरोबर चांगले शिक्षकही झाले.

काही वर्षे हिंगण्याला संगीत शिक्षणाचे कार्य करून ते पुण्याला आले. त्याच वेळी हैदराबादच्या काही मंडळींवर त्यांचा चांगला प्रभाव पडून त्यांना हैदराबादला शिकवण्यासाठी बोलावणे आले. तेथील विवेकवर्धिनी प्राथमिक शाळेत ते शिक्षक झाले आणि संध्याकाळी चालणाऱ्या विवेकवर्धिनी संगीत विद्यालयाची स्थापना करून तेथे त्यांनी अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाच्या परीक्षा सुरू केल्या. त्यांनी त्या संस्थेला नावारूपाला आणले.

अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाचे सचिव व कोषाध्यक्ष या पदांवर राहिलेले देशपांडे हे उत्तम संघटक व कार्यकर्ते होते. मंडळाच्या परिषदा भरवून त्या यशस्वी करण्यात त्यांचा मोलाचा वाटा राहिला. मंडळाचे गुरुकुल स्थापन झाले, त्याचे काम त्यांनी मिरजेत राहून काही वर्षे केले. मराठवाडा, हैदराबाद येथे संगीताचे वातावरण तयार करण्याचे बरेच श्रेय त्यांना जाते. त्यांनी संगीत नाटकांमध्येही भूमिका केल्या. त्यांना अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाकडून महामहोपाध्याय या सर्वोच्च मानाच्या पदवीने मंडित केले गेले. देशपांडे यांचे नांदेड मुक्कामी निधन झाले.

— सुधा पटवर्धन

## देशपांडे, सत्यशील वामन
**गायक, संगीतज्ञ, रचनाकार, लेखक**
**९ जानेवारी १९५१**



हिंदुस्थानी संगीत परंपरेचे गाढे अभ्यासक, सर्जनशील गायक, रचनाकार व लेखक अशा अनेक भूमिका समर्थपणे राबवणारे सत्यशील वामनराव देशपांडे एक बहुआयामी, बहुपेडी व्यक्तिमत्त्व म्हणून ओळखले जातात. प्रसिद्ध संगीतज्ञ वामनराव देशपांडे यांचे ते सुपुत्र होत. त्यांच्या आईचे नाव वसुंधरा होते. सत्यशील यांचे शिक्षण मुंबई येथे, बी.कॉम.पर्यंत झाले. वडिलांचा ‘घरंदाज गायकी’ हा विविध घराण्यांच्या सौंदर्यशास्त्रीय मूल्यांचा शोध घेणारा ग्रंथ सिद्ध होत असताना, त्यात मांडलेल्या सिद्धान्तांचे व त्यावर वेगवेगळ्या घराण्यांच्या गायकांच्या गाऊन व्यक्त झालेल्या क्रिया-प्रतिक्रियांचे संस्कार लहानपणीच सत्यशीलना मिळत गेले व खोलवर रुजले.

पुढे १९७२ साली पं. कुमार गंधर्व यांच्या घरी, देवास येथे राहून सत्यशील यांनी सलग तीन वर्षे सर्वंकष तालीम घेतली. लहानपणी मिळालेला ‘घरंदाज गायकी’चा संस्कार आणखी दृढमूल करणारी, परंपरेच्या आधारावर स्वतःचे असे सौंदर्यशास्त्रीय दृष्टिकोन घडवण्यास उत्तेजित करणारी अशी ही तालीम होती.

‘कलेचे गूढरम्य प्रदेश हे शास्त्र-व्याकरणाच्या सीमेला चिकटून तिथेच असतात व या सीमेवर एकामागून एक येणाऱ्या आवर्तनांची शृंखला गायक आपले संस्कार, आपली तत्काळ-स्फूर्तता व आपली कलाकारी वापरून आंदोलित करत राहतो’, हा गुरुमंत्र घेऊन सत्यशील देशपांडे मुंबईला परतले.

याच संगीतकलेच्या व्याकरणाच्या प्रदेशात मुशाफिरी करण्यासाठी, शास्त्रीय संगीताच्या अनेक प्रसिद्ध-अप्रसिद्ध गायकांचे व अभ्यासकांचे गाणे त्यांच्या सांगीतिक विचारांसह ध्वनिमुद्रित करून जतन करण्याचा उपक्रम फोर्ड फाउण्डेशनच्या साहाय्याने सत्यशील यांनी सुरू केला. त्यांनी मुंबई येथे १९८३ साली स्थापन केलेल्या ‘संवाद फाउण्डेशन’ या संस्थेत आजतागायत हे त्यांचे कार्य अविरत चालू आहे.

आजमितीला सुमारे पाच हजार तासांच्यापेक्षा जास्त संकलित ध्वनिमुद्रण व अनेक बुजुर्ग गायकांकडून गोळा केलेल्या बंदिशींच्या अप्रकाशित अशा स्वरलेखनांचा मोठा संग्रह, असे या आर्काइव्ह्जचे स्वरूप आहे. अनेक तरुण गायक-अभ्यासकांना आज संवाद फाउण्डेशनमुळे आपली परंपरा पडताळून पाहण्याची संधी मिळत आहेच; पण या व्यासंगामुळे सत्यशील देशपांडे यांचे स्वतःचे बहुआयामी सांगीतिक व्यक्तिमत्त्वही घडत गेले आहे. एकाच रागाच्या अनेक छटा, वेगवेगळ्या बंदिशींच्या माध्यमांतून ते स्वतःही अनेक मैफलींतून, तसेच कार्यशाळांतून गाऊन श्रोत्यांपर्यंत पोहोचवत असतात.

परंपरेत दडलेली व स्वतःच्या प्रतिभेतून निघणारी सौंदर्याची विविध रूपे दाखवणारी प्रगल्भ गायकी ते स्वतः उत्तम गातातच; परंतु स्वर-राग-लय-ताल-काल-भाव आणि साहित्याच्या माध्यमातून काहीतरी सांगायचे जे उरते, त्यासाठी उत्तम स्वररचनेबरोबरच बंदिशीला

पोषक अशी काव्यरचनाही ते उत्तमरीत्या करतात. कुठलाही सांगीतिक विषय असो अथवा एखादी नवीन बंदिश असो, त्यांचे हिंदी, उर्दू व मराठी या भाषांवरील प्रभुत्व जाणवल्याशिवाय राहत नाही. संगीतावर वेळोवेळी मार्मिक लेखन व सप्रात्यक्षिक भाष्य करणारे संगीतज्ञ म्हणूनही ते ओळखले जातात.

एक चिंतनशील गायक ते चिंतनशील नायक असा गूढरम्य प्रवास म्हणजे पं. सत्यशील देशपांडे. देश-विदेशांत अनेक मैफली गाजवणारे पं. सत्यशील देशपांडे यांची आणखी एक ओळख म्हणजे 'लेकिन' या चित्रपटासाठी आशा भोसले यांच्याबरोबर त्यांनी गायलेले युगलगीत, ज्यासाठी त्यांना 'सर्वोत्तम पार्श्वगायका'चा पुरस्कार (१९९२) प्राप्त झाला. तसेच 'कहन' हा पारंपरिक, तसेच स्वरचित बंदिशींचा त्यांचा ध्वनिमुद्रित संग्रह भारतरत्न लतादीदींच्या हस्ते लोकार्पण झाला व त्यात मांडलेल्या विविधांगी सौंदर्यमूल्यांसाठी तो अतिशय लोकप्रिय ठरला.

पं. सत्यशील देशपांडे हे १९९६ साली 'होमी भाभा' फेलोशिप, १९९९ साली 'कुमार गंधर्व' फेलोशिप, 'सूरसिंगार संसद-तानसेन पुरस्कार' आणि 'विमला देवी' पुरस्कार जो संवाद फाउण्डेशनला सांगीतिक समाजसेवेसाठी दिला गेला आहे, अशा अनेक पुरस्कारांचे मानकरी ठरले आहेत.

— भूपाल पणशीकर, सृजन देशपांडे

## देशपांडे, हरी नारायण

**ऑर्गनवादक**

**२३ मार्च १९०७ – २२ जून १९८२**

महाराष्ट्राच्या संगीत रंगभूमीच्या इतिहासात ऑर्गन या वाद्यास मान मिळवून देणारे हरी नारायण देशपांडे यांचा जन्म जावळीच्या खोऱ्यातील बामणोली या खेडेगावात झाला. लहानपणी आई-वडिलांचे छत्र गेले. त्यांचे वडील नारायण हरी देशपांडे यांचा आवाज चांगला होता व ते भजन, अभंग म्हणत. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई व पत्नीचे नाव मनोरमा होते.



हरिभाऊंचा आवाज गळी आणि फिरता होता. लहानपणापासून त्यांना गंधर्व कंपनीबद्दल फार आकर्षण होते. सातारच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये चौथीपर्यंत शिक्षण घेतल्यानंतर, १९२३ साली ते मुंबई येथे बालगंधर्व कंपनीत दाखल झाले.

सुरुवातीस हरिभाऊंनी गंधर्व कंपनीत 'शापसंभ्रम', 'विधिलिखित', 'आशानिराशा', 'मूकनायक', 'मृच्छकटिक' अशा नाटकांतून छोट्यामोठ्या भूमिका केल्या. कंपनीत आल्यावर संगीत कलानिधी मास्टर कृष्णराव यांच्याकडे त्यांनी शास्त्रीय शिक्षण घेण्यास सुरुवात केली. त्याचा फायदा पुढे मास्टर कृष्णराव यांच्या मैफलीत ऑर्गनची साथ करताना झाला. मास्तरांची शास्त्रीय संगीताची बैठक व हरिभाऊंच्या ऑर्गनची साथ असे त्या काळात समीकरण होऊन बसले.

यासिवाय मास्तरांच्या गैरहजेरीत गंधर्वांच्या नाटकांतून ते करत असलेल्या सर्व स्त्री-भूमिका व इतरही काही पुरुष भूमिका हरिभाऊ करत असत, उदा. 'सावित्री' (नारद), 'स्वयंवर' (महाराणी), 'अमृतसिद्धी' (मैनावती), 'कान्होपात्रा' (शेवंती) 'विधिलिखित' (कपिला), 'एकच प्याला' (शरद), 'मृच्छकटिक' (चेट विट) वगैरे. रुईकर प्रॉडक्शनच्या बाबूराव रुईकर यांनी बालगंधर्वांच्या 'अमृतसिद्धी' या नाटकाचे चित्रीकरण केलेले आहे. त्यामध्ये मीरेच्या सासूच्या (मैनावती) स्त्री-भूमिकेत आजही आपण हरिभाऊंना पाहू शकतो व त्यांचे गाणेही त्यात ऐकावयास मिळते.

त्यांनी १९२३ ते १९२७-२८ पर्यंत बालगंधर्वांच्या सर्व नाटकांत स्त्री व पुरुष-भूमिका केल्या. भूमिका करत असताना सोबत विंगेमधील ऑर्गनच्या सुरांवरून ते साथ करीत असत. अशा प्रकारे १९२७-२८ च्या दरम्यान त्यांची बाहेरच्या मुख्य ऑर्गनवर साथीस बसण्यास सुरुवात झाली.

द

मास्तर कृष्णराव यांच्याप्रमाणेच हरिभाऊंनी नटसम्राट बालगंधर्व, गंगाधरपंत लोंढे, विनायकबुवा पटवर्धन या तिघांबरोबर ऑर्गनची साथ केली. यांच्या काही ध्वनिमुद्रिकांतूनही हरिभाऊंची साथ आहे.

कंपनीत असताना त्यांना कृष्णाजी खाडिलकर, गणपतराव बोडस, चिंतोबा गुरव अशा दिग्दर्शकांकडून गद्य संवादांची तालीम मिळाली. गंधर्व कंपनी १९३८ साली बंद पडल्यानंतर त्यांनी पुणे येथे आपले बिऱ्हाड करून पुण्यामधील अनेक हौशी व व्यावसायिक नाट्य संस्थांना व अनेक नामांकित गायक-गायिकांना भास्करबुवा बखले, मास्तर कृष्णराव व बालगंधर्व यांच्या गायकीचे व संगीत नाटकातील गद्य व संगीताचे शिक्षण देण्यास प्रारंभ केला. श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालय, पुणे, हुजूरपागा शाळा विद्यार्थिनींचे संगीत शाकुंतल व संशयकल्लोळ, नाट्यकला प्रवर्तक मंडळी, तसेच संध्या थिएटर्स (पुणे) ही त्यांतील काही संस्थांची नावे होत.

शांता मोडक, विमल कर्नाटकी, योगिनी जोगळेकर, माणिक वर्मा, शांता आपटे, इंदिराबाई खाडिलकर, वनमाला, मोहिनी निमकर, मिस लीला इ.ना त्यांनी नाट्यपदांचे मार्गदर्शन केले. न.चिं. केळकरसुद्धा काही काळ त्यांच्याकडे गाणे शिकले.

स्वतंत्र ऑर्गनवादनाची सुरुवात करणारे हरिभाऊ देशपांडे हे पहिले ऑर्गनवादक होत. वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षापर्यंत त्यांचे अनेक ठिकाणी स्वतंत्र ऑर्गनवादनाचे कार्यक्रम झाले. हरिभाऊ देशपांडे यांचे पुणे येथे त्यांच्या मुलाकडे निधन झाले. त्यांचे पुत्र चंद्रशेखर, संजय, अनिल व विष्णू हेसुद्धा ऑर्गनवादक आहेत.

— संजय देशपांडे

**संदर्भ** :

*देसाई, वसंत शांताराम; 'मखमलीचा पडदा'; प्रकाशक : व्हीनस बुक स्टॉल, पुणे-२; १९४७.*

द

## देसाई, गोविंदराव गोपाळ

**गायक**

**१८८९ - २० मे १९७९**



गोविंदराव गोपाळ देसाई यांचा जन्म कोकणातील नांधवडे या गावी झाला. अण्णासाहेब विजापूरकरांसारखे गुरू मिळाल्याने त्यांची साहित्याची जाण प्रगल्भ झाली आणि पं. विष्णू दिगंबर पलुसकरांकडे संगीताचे शिक्षण घेतल्याने त्यांचे सांगीतिक व्यक्तिमत्त्व प्रभावी झाले. पं. पलुसकरांच्या उपदेशक वर्गातील विद्यार्थ्यांमध्ये त्यांचा समावेश होता. राष्ट्रीय भावना, नैतिकतेची प्रखर जाणीव असलेले गोविंदराव स्वातंत्र्यलढ्यात खणखणीत स्वरात पोवाडे म्हणून लोकांमध्ये राष्ट्रभक्ती जागृत करत असत. पारतंत्र्याच्या काळातील हे त्यांचे मोठे कार्य होते.

पं. विष्णू दिगंबरांच्या आदेशानुसार १ जुलै १९१८ रोजी त्यांनी पुण्यात 'गोपाल गायन समाज' या संस्थेची स्थापना केली. विशेष म्हणजे, पुढे त्यांनी स्वत:च्या वास्तूत हे विद्यालय हलवले तेव्हा ३ एप्रिल १९२७ रोजी विद्यालयाच्या उद्घाटनाला स्वत: महाराज पलुसकर आले होते. गोविंदरावांनी सतत साठ वर्षे या महाविद्यालयात शिकवले.

स्वर हा नेहमी शंभर टक्के सुरेलच लावावा लागतो. स्पष्ट शब्दोच्चार, खुला, मोकळा आवाज यांचे महत्त्व ते पटवून देत. चिजेच्या शब्दांचा अर्थ समजून गायला हवे, असे त्यांचे आग्रही मत होते.

गाण्याचा सराव करताना उजव्या हाताने तंबोरा वाजवून डाव्या हाताने डग्ग्यावर ताल धरावा असे विद्यार्थ्यांना सांगणाऱ्या जुन्या, बुजुर्ग गवयांच्या पिढीतले गोविंदराव हे हाडाचे शिक्षक होते. त्यांचे चिरंजीव हरिभाऊ हे उत्तम संवादिनीवादक होते. त्यांचे धाकटे चिरंजीव कृष्णराव गात असत, पुढे ते त्यांच्या विद्यालयाचे प्राचार्य झाले. गोपाळ गायन समाजातील कृष्णाष्टमीचा

जलसा, पळणीटकर संगीत स्पर्धा जुन्या काळात विख्यात होत्या. पारतंत्र्याच्या काळात संगीतमेळे व प्रभातफेऱ्या होत असत. त्यात गोपाळ गायन समाजाचा मेळा त्यातील सुरेल पदांसाठी प्रसिद्ध होता. या मेळ्यांतून अनेक होतकरू संगीत कलाकार पुढे आले.

या संस्थेच्या शिष्यशाखेत गजानन वाटवे, कृष्णराव मेहंदळे, यशवंत मराठे, उषा चिपलकट्टी, दुर्गा फळणीकर ही काही ठळक नावे होत. देसाई यांना नव्वद वर्षांचे प्रदीर्घ आयुष्य मिळाले व पुण्यातच त्यांचे निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भः**

*चाफेकर, अरुणा; (लेख); 'संगीत कला विहार'; ऑगस्ट २००८.*

## देसाई, चैतन्य पुंडरीक

**संगीतज्ञ**

**२९ एप्रिल १९११ – मृत्यूदिन अनुपलब्ध**

महाराष्ट्रातील महत्त्वाचे संगीतशास्त्रकार म्हणून महत्त्वाचे असणारे चैतन्य पुंडरीक देसाई यांनी किराणा घराण्याच्या गायकीचे शिक्षण उ. अब्दुल करीम खाँसाहेबांकडून घेतले, तसेच भैयासाहेब अष्टिवाले यांच्याकडेही ते शिकले. कौटुंबिक पार्श्वभूमी वैद्यकाची असल्याने त्यांनी आयुर्वेदाची पदवी संपादन केली. संस्कृत भाषेचाही त्यांचा उत्तम व्यासंग होता.

भारतीय संगीताचा इतिहास व मूलभूत सिद्धान्त यांचा गाढा व्यासंग करून त्यांनी या विषयावर एक संशोधन प्रबंध लिहिला. विशेषतः प्राचीन संगीताच्या संदर्भात ते एक अधिकारी व्यक्ती मानले जात. 'भारतीय संगीत' (१९३१ ते १९३३) हे द्वैमासिक व 'संगीत कला विहार' या मासिकासह अनेक माध्यमांतून त्यांचे संगीतविषयक लेखन वेळोवेळी प्रसिद्ध झाले. या लेखांतून त्यांनी संगीतशास्त्रविषयक अनेक समस्यांचे निराकरण केले.

खैरागड येथील इंदिरा कला संगीत विद्यापीठात ते संशोधक अधिकारी म्हणून कार्यरत होते. या विद्यापीठातर्फे 'श्रीनान्यभूपाल प्रणीत भरतभाष्यम्' या ग्रंथाची संपादित आवृत्ती दोन खंडांत अनुक्रमे १९६१ व १९७६ साली प्रसिद्ध करण्यात आली. या खंडांचे संपादन चैतन्य देसाई यांनी केले. या खंडांमध्ये इसवीसन बाराव्या शतकातील 'भरतभाष्यम्' या ग्रंथाचे देसाईंनी विवेचक टिपांसह हिंदी भाषांतर केले. हे संपादनकार्य त्यांचे मोठे योगदान आहे.

'संगीतविषयक संस्कृत ग्रंथ' हा चैतन्य देसाई लिखित ग्रंथ महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळासाठी सुविचार प्रकाशन मंडळाने १९७९ साली प्रकाशित केला. यात प्राचीन काळातील 'नारदीय शिक्षा', 'भरतनाट्य-शास्त्रम्', 'दत्तिलम्', 'बृहद्देशी'पासून आधुनिक काळातील 'श्रीमल्लक्ष्यसंगीतम्', 'रागकल्पद्रुम', 'संगीत सुधाकर', 'अभिनव रागमंजरी' अशा सुमारे ११० ग्रंथांची, त्यांचे ग्रंथकार, वर्ण्यविषय, त्यांवरील टीकाग्रंथ, मतांतरे, अनेक प्रचलित मतांची योग्यायोग्यता इ.चा सखोल आढावा घेतला आहे. या ग्रंथाच्या वाचनाद्वारे प्राचीन काळापासून संगीताची शास्त्रपरंपरा कशी बदलत गेली आहे याचे आकलन होऊ शकते. या दृष्टीने हे एक मोठेच कार्य चैतन्य देसाई यांनी केले. एकोणीसशे ऐंशीच्या दशकात मुंबईत त्यांचे निधन झाले.

— चैतन्य कुंटे

द

## देसाई, प्रेरणा शैलेश

**नर्तिका**

**७ एप्रिल १९४०**



प्रेरणा शैलेश देसाई यांचा जन्म मुंबई येथे झाला. नारायणदास व सुमनबेन किल्लावाला यांच्या त्या कन्या आहेत. त्यांनी महाराजा सयाजी विद्यापीठ, वडोदरा म्यूझिक कॉलेज येथून भरतनाट्यम् नृत्य या विषयात बी.ए.ची पदवी प्राप्त केली. त्याकरिता त्यांना कलाक्षेत्र शैलीच्या ज्येष्ठ गुरू श्रीमती अंजली मेहर यांचे मार्गदर्शन मिळाले.

मुंबईत परतल्यानंतर त्यांना पंदनल्लूर शैलीचे ज्येष्ठ गुरू नाना कासार यांच्या मार्गदर्शनाचा लाभ मिळाला. प्रेरणा देसाई यांच्या ज्येष्ठ भगिनी डॉ. अंजनी अरुणकुमार, ज्यांनी हिंदुस्थानी शास्त्रीय संगीत व भरतनाट्यम् नृत्यशैली या दोन्हींचाही अभ्यास केला होता, त्यांचेही मार्गदर्शन त्यांना लाभले.

प्रेरणा देसाई यांनी ८ जून १९६८ रोजी पुणे येथे 'आराधना नृत्यसंस्थे'ची स्थापना करून नृत्याचे शिक्षण देण्यास प्रारंभ केला. पारंपरिक भरतनाट्यम् मार्गम्च्या शिक्षणाबरोबरच त्यांनी आधुनिक भरतनाट्यम् मार्गम्चेही शिक्षण विद्यार्थिनींना दिले. 'भरतनाट्यम् नृत्याचे प्रशिक्षण देणारी पुण्यातील महत्त्वाची संस्था' ही या संस्थेची ओळख होती. मात्र, पारंपरिक कर्नाटक संगीताऐवजी हिंदुस्थानी संगीतावर आधारित भरतनाट्यम् रचना सादर करण्याचे प्रथम श्रेय प्रेरणा देसाई यांना जाते. डॉ. अंजनी अरुणकुमार यांनी धृपद-धमार व हवेली संगीताचा वापर करून अभ्यासपूर्ण रितीने व कलात्मकतेने भरतनाट्यम् नृत्यासाठी तीन नवीन मार्गम् तयार केले. मात्र, या सर्व रचनांना नृत्याचा साज चढविणे व त्याचे प्रस्तुतीकरण करणे हे फार मोठे काम प्रेरणा देसाई यांनी केले.

बालपणीचे संस्कार व आई-वडिलांकडून आलेली अध्यात्माची ओढ, तसेच महर्षी अरविंद यांच्या विचारांचा पगडा प्रेरणा देसाई यांच्यावर आहे व त्यामुळेच नृत्यप्रस्तुतीतही कला आणि अध्यात्म यांची सांगड त्यांनी घातलेली दिसते. 'संतों की अमृतवाणी' सारख्या अनेक रचनांतून याची अनुभूती रसिकांनी घेतली आहे. कलेची आराधना हा मोक्षप्राप्तीचा मार्ग आहे असे मानून त्यांनी सातत्याने त्याचा ध्यास घेतला आहे.

सूर सिंगार परिषदेतर्फे १९७५ साली 'सिंगारमणी' हा किताब, तसेच १९९१ मध्ये लायनेस क्लबकडून 'उत्कृष्ट शिक्षक' पुरस्कार देऊन त्यांना गौरविण्यात आले. तसेच त्यांना अनेक दिग्गजांकडून कौतुक व शाबासकी मिळाली. 'बाबुल मोरा नैहर छुटो ही जाय' या ठुमरीवरील त्यांचे सादरीकरण विशेष प्रसिद्ध झाले. भक्ताची परमेश्वरप्राप्तीची आस त्यात दिसून येते.

शुमिता महाजन, स्वाती दातार, संध्या धर्म, सुलभा तेंडुलकर, नीता सुरा या त्यांच्या शिष्या, तसेच पुत्र स्नेहलकुमार देसाई हे नृत्याची प्रस्तुती व अध्यापन या क्षेत्रांत कार्यरत आहेत.

– स्वाती दातार

## देसाई, वसंत

☛ **पाहा चित्रपट खंड**

***

द




## नंदनपवार, उषा लक्ष्मण

**गायिका**

**२५ नोव्हेंबर १९२६**



उषा लक्ष्मण नंदनपवार यांचा जन्म नागपूरला झाला. त्यांच्या वडिलांचे नाव नारायण मंगळमूर्ती व आईचे इंदिराबाई होते. वडील व दोन्ही काका वकील होते. धाकटे काका केशव ऊर्फ अण्णासाहेब मंगळमूर्ती न्यायाधीश व नागपूर विद्यापीठाचे कुलगुरू होते. त्यांना संगीताची आवड व जाणही होती, तर काकू मालतीबाई गात असत. या काका-काकूंनी उषाला संगीताकडे वळविले आणि तिच्यासाठी छोटा तंबोरा विकत घेतला.

त्यांचे शिक्षण भिडे कन्याशाळेत आणि संगीत शिक्षण भातखंडे म्यूझिक कॉलेजमध्ये संपन्न झाले. संगीत हा विषय घेऊन त्या १९४४ साली मॅट्रिक, १९४८ मध्ये बी.ए. व १९५३ मध्ये बी.टी. झाल्या. त्यांनी १९५०-१९५४ या काळात साहाय्यक जिल्हा शाळा निरीक्षिका म्हणून सरकारी शिक्षणखात्यात नोकरी केली.

त्यांचा विवाह १९५४ मध्ये लक्ष्मण श्रीनिवास नंदनपवार यांच्याशी झाला. तरीदेखील उषा मंगळमूर्ती या नावानेच त्या अधिक सुपरिचित आहेत. पती एम.एस्सी., एलएल.बी व लखनौ संगीत विद्यापीठाचे पदवीधर, तसेच संगीताचे कसलेले जाणकार होते. उषा नंदनपवारांनी या प्रोत्साहनाने व मेहनतीने १९५८ मध्ये कंठसंगीतात गांधर्व महाविद्यालय मंडळाची 'डॉक्टर ऑफ म्यूझिक' ही पदवी पहिल्या वर्गात, पहिल्या क्रमांकाने प्राप्त केली. त्यांनी बैठकी गाजविल्या. मध्यप्रदेशातल्या प्रथम दर्जाच्या संगीतज्ञांत उषा नंदनपवारांची गणना होते. सहृदयता, व्यवहारदक्षता व निगर्वी स्वभावामुळे त्या लोकप्रिय कलाकार झाल्या. स्वातंत्र्यदिनाचा पहिला वर्धापन महोत्सव ऑगस्ट १९४८ मध्ये दिल्लीला आयोजित केला गेला. त्यात विदर्भातून पहिल्या महिला गायिकेचा मान उषा नंदनपवार यांना लाभला होता.

त्यांचे १९४८ ते १९५० च्या दरम्यान आकाशवाणीच्या इंदूर, हैदराबाद, औरंगाबाद, बडोदा व दिल्ली केंद्रांवरून कार्यक्रम झाले. नागपूर विद्यापीठाच्या व गांधर्व महामंडळाच्या त्या परीक्षिका होत्या. त्यांची ख्याल, ठुमरी गायनशैली प्रभावी होती. आवाज सुरेल, फिरतीचा, सहजसाध्य होता. उत्तम लयकारी, आलापी व तानप्रकार तयारीच्या असून ग्वाल्हेर व किराना घराण्याच्या मिश्रित गायकीची त्यांची विशेषता होती.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; प्रथमावृत्ती, मार्च १९७४.*

## नगरकर, गोविंद परशुराम

***नगरकर, पंडितराव***

**गायक, नट**

**२६ डिसेंबर १९१० – २८ जुलै १९७७**

गोविंद परशुराम उपाख्य पंडितराव नगरकरांचा जन्म नगर जिल्ह्यातील भातवडी-पारगाव या खेड्यात झाला, तर बालपण मुंबईला, गिरगावात गेले. वडील एका मोठ्या पेढीचे भागीदार असल्यामुळे त्यांच्या घरची

न



आर्थिक परिस्थिती चांगली होती. त्यांचे वडील त्यांना पंडित म्हणत, म्हणून पुढे सारेच त्यांना पंडित म्हणू लागले.

पंडितरावांचे शिक्षण आंग्रेवाडीतील आर्यन शाळेत झाले. अभ्यासापेक्षा त्यांचे लक्ष नाटक-सिनेमे पाहण्याकडे, तसेच खेळात व व्यायामात असायचे. बालगंधर्व व बापूराव पेंढारकर यांची अनेक पदे ते उत्तम प्रकारे गात असत.

एकदा 'संत तुकाराम' चित्रपटाचे लोकप्रिय नट व गायक विष्णुपंत पागनीस यांनी पंडितरावांचे गाणे ऐकले आणि त्यांच्या गाण्यावर खूष होऊन त्यांना गाण्याची तालीम देण्यास सुरुवात केली. याच वेळी शाळेच्या संमेलनातील गायनस्पर्धेत पंडितरावांनी भाग घेतला. 'सत्तेचे गुलाम' या नाटकातील पद खास बापूराव पेंढारकरांच्या पद्धतीने गाऊन त्यांनी विशेष बक्षीस मिळविले. हे बक्षीस आणि पागनिसांची तालीम यांमुळे त्यांचे अभ्यासावरचे लक्ष साफ उडाले. मॅट्रिकच्या परीक्षेला दोन-तीन महिने असताना त्यांनी शाळेला रामराम केला.

पंडितरावांचे लग्न १९२९ साली झाले. त्यानंतर त्यांनी चरितार्थासाठी शास्त्रीय संगीताच्या मैफली करण्यास सुरुवात केली. भारत गायन समाजाचे बापूराव केतकर यांच्याकडून त्यांनी रागदारी गायनाचे शिक्षण घेतले. ओडियन रेकॉर्ड कंपनीने त्यांच्या आठ ध्वनिमुद्रिका 'जी.पी. नगरकर' या नावाने १९३० साली काढल्या. त्यांमधील 'जाके मथुरा' या गाण्याने फार लोकप्रियता मिळविली, आणि पंडितराव नगरकर 'जाके मथुरा नगरकर' या नावाने लोकप्रिय झाले. याच सुमारास पंडितरावांचा परिचय सुलोचना पालकर या नटीशी झाला. त्या 'संशयकल्लोळ' नाटकात रेवतीची भूमिका करत. त्यानंतर पंडितराव 'संशयकल्लोळ'मध्ये अश्विन शेठचे काम करू लागले. पंडितराव व सुलोचना पालकर यांनी १९३२ साली 'सुलोचना नाटक मंडळी'ची स्थापना केली आणि 'संशयकल्लोळ', 'मृच्छकटिक' इत्यादी नाटके गाजविली.

आचार्य अत्रे यांना पंडितरावांचा अभिनय आणि गाणे फार आवडत असे. त्यांनी 'लग्नाची बेडी' या त्यांच्या लोकप्रिय नाटकात पंडितरावांना 'पराग' ही नायकाची भूमिका दिली. या नाटकातील पंडितरावांचे 'ती पाहताच बाला' हे पद प्रचंड लोकप्रिय झाले. 'लग्नाची बेडी' नाटकाच्या सुमारे ५०० प्रयोगांत पंडितरावांनी काम केले. सुलोचना पालकर, वनमाला, शांता आपटे, उषा किरण, नलिनी बोरकर, स्नेहप्रभा प्रधान, पद्मा चव्हाण, आशू, बापूराव माने यांनी पंडितरावांबरोबर रश्मीचे काम केले.

पंडितराव मुंबईच्या खासगी आकाशवाणी केंद्रावरून महिन्यातून दोन-तीनदा गाऊ लागले. त्यातून त्यांना मुंबईच्या इंपिरिअल फिल्म कंपनीमध्ये तीन वर्षांच्या कराराने नोकरी मिळाली. 'मायाबाजार' (१९३९) या मराठी चित्रपटात पंडितरावांनी भूमिका केली व संगीतदिग्दर्शनही केले. 'अमर भूपाळी' या चित्रपटात त्यांनी १९५१ साली केलेली शाहीर होनाजीची भूमिका आणि लता मंगेशकरांबरोबर गायलेल्या 'घनश्याम सुंदरा' या भूपाळीने पंडितराव महाराष्ट्रातल्या घराघरांत लोकप्रिय झाले.

सवाई गंधर्व, जगन्नाथबुवा पंढरपूरकर, मिराशीबुवा इत्यादी मान्यवर गायकांचेही त्यांना मार्गदर्शन लाभले. त्यामुळे पंडितराव एक चतुरस्र गायक झाले. त्यांनी गायलेल्या शास्त्रीय संगीत, नाट्यसंगीत, भजने व भावगीते यांच्या बऱ्याच ध्वनिमुद्रिका निघाल्या. 'मी गातो नाचतो, आनंदे वेडा झालो' हे 'देहू रोड' या नाटकातील त्यांचे विशेष गाजलेले पद, तर 'डोळे तुझे बदामी', 'सखे भावगीत माझे' या त्यांच्या भावगीताच्या ध्वनिमुद्रिका खूप गाजल्या. पुणे येथे त्यांचे निधन झाले.

— अद्वैत धर्माधिकारी

**संदर्भ :**

*गाडगीळ, वा.य.; 'हिरव्या चादरीवर', भाग १.*

न

## नगरकर, चिदानंद दत्तात्रेय

**गायक, रचनाकार**

**२८ नोव्हेंबर १९१९ – २६ मे १९७१**



चिदानंद दत्तात्रेय नगरकर यांचा जन्म बंगळूर येथे मल्लेश्वरम गावात, एका सुविद्य कुटुंबात झाला. चिदानंद यांना सहा भाऊ व तीन बहिणी होत्या. बाल्यावस्थेतच चिदानंदांवर संगीताचे योग्य संस्कार होत गेले. वयाच्या सातव्या वर्षापासून चिदानंद उत्तम भजने गात असत. त्यांचे वडील कीर्तनाच्या वेळी भजन मंडळींबरोबर मृदंग, तबला वाजवीत असत.

त्यांनी १९३३ मध्ये शालेय शिक्षण अर्धवट सोडले आणि गांधर्व महाविद्यालयात गोविंद विठ्ठल भावे यांच्याकडे स्वरज्ञान व काही रागांचे प्राथमिक शिक्षण सुरू केले. चिदानंदांनी उच्चशिक्षण घ्यावे अशी त्यांच्या वडिलांची तीव्र इच्छा होती. म्हणून वडीलबंधू पांडुरंग यांच्या सल्ल्याने ते संगीत व शिक्षण, दोन्हींकडे लक्ष देऊ लागले.

त्यांच्या वडिलांचे १९३४ मध्ये निधन झाले. त्यानंतर चिदानंदांचे पालनपोषण त्यांच्या वडीलबंधूंनी केले. त्यांनी चिदानंद यांना संगीताचे नियमित शिक्षण घेण्यासाठी १९३५ मध्ये लखनौ येथे पं. विष्णू नारायण भातखंडे यांनी स्थापन केलेल्या 'मॉरिस कॉलेज ऑफ हिंदुस्थानी म्यूझिक'चे प्राचार्य पं. श्रीकृष्ण नारायण रातंजनकर यांच्या स्वाधीन केले आणि गुरु-शिष्य परंपरेला अनुसरून चिदानंद नगरकरांचे संगीताचे नियमित शिक्षण सुरू झाले. पुढे चिदानंदांनी प्रसिद्ध नृत्यकार पं. शंभू महाराज यांच्याकडे कथक नृत्याची तालीम घेतली. त्यांची नृत्यातील प्रगती पाहून शंभू महाराजांनी त्यांना गंडाबंध शिष्य करून घेतले. 'संगीत विशारद'पर्यंतचे शिक्षण पूर्ण केल्यानंतर संगीतात संशोधन करण्याचा चिदानंदांचा विचार होता; परंतु घरची आर्थिक परिस्थिती अनुकूल नसल्यामुळे त्यांना तो विचार सोडावा लागला.

त्यानंतर जवळजवळ एक वर्ष त्यांनी आपल्या गावी जाऊन संगीत शिक्षक म्हणून काम केले आणि पुन्हा लखनौ येथे जाऊन अण्णासाहेब रातंजनकर यांच्या मार्गदर्शनाखाली नित्य, नियमित साधना सुरू केली. त्यांनी वेदान्ताचाही व्यासंग केला होता.

चिदानंदांचा १२ मार्च १९४२ रोजी माविनूकुर्वे या सारस्वत कुटुंबातील दुर्गाबाईंशी राणेबेन्नर (तत्कालीन म्हैसूर राज्यात) येथे विवाह झाला. त्यांनी आपल्या चिरस्मरणीय मैफलींनी १९४२ ते १९४५ या कालावधीत देशातील विविध संगीत समारंभांत रसिक श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले. ते तबला व हार्मोनियअम उत्तम वाजवीत असत.

पं. रातंजनकर यांच्या सल्ल्यानुसार कन्हैयालाल मुन्शी यांनी १९४६ मध्ये भारतीय विद्या भवनच्या अंतर्गत भारतीय संगीत व नर्तन शिक्षापीठाची स्थापना केली. चिदानंद नगरकर यांची वयाच्या सव्विसाव्या वर्षी प्राचार्य म्हणून तेथे नेमणूक झाली. या पदावर असताना त्यांनी भातखंडे संगीत शिक्षण पद्धतीनुसार विद्यालयाचा पाठ्यक्रम निश्चित केला.

'चित्-आनंद' या टोपणनावाने त्यांनी विविध रागांमध्ये पन्नासपेक्षा अधिक बंदिशी केल्या आहेत. पं. एस.सी.आर. भट, पं. के.जी. गिंडे, पं. सी.आर. व्यास, पं. दिनकर कायकिणी, श्रीमती मालिनी राजूरकर अशा अनेक प्रसिद्ध गायकांनी त्यांच्या बंदिशी मैफलीत गाऊन त्यांचा खूप प्रचार केला. त्याचबरोबर चिदानंद यांनी 'कैशिक रंजनी', 'जनरंजनी', 'अंबिका सारंग', 'सुजन सारंग', 'योगेश्री' या नवीन रागांची रचनाही केली.

त्यांच्या शिष्यपरिवारात शशिकला कायकिणी, सुशीला नाडकर्णी, दुर्गेश चंदावरकर, सुमन सवूर, वसंत पणशीकर, रामदास भटकळ व गुरुदत्त हेबळेकर यांचा समावेश आहे. नगरकरांनी सत्यसाईबाबांच्या चरित्राचा हिंदी अनुवाद करून नोव्हेंबर १९६६ मध्ये प्रकाशित केला होता.

त्यांना भातखंडे विद्यापीठाचे सुवर्णपदक (१९०४), म्हैसूर महाराजाद्वारे सिल्व्हर प्लेट (१९५१), महाराष्ट्र शासनाचा गौरव पुरस्कार (१९५६) आणि भारतीय विद्या भवनचा गौरव पुरस्कार (१९६०) असे पुरस्कार लाभले.

– प्रा. यशवंत महाले

## नगरकर, पंडितराव

☛ *नगरकर, गोविंद परशुराम*

## नजीर खाँ

**गायक**

**जन्मवर्ष अनुपलब्ध - १९२०**



नजीर खाँसाहेबांचा जन्म उत्तर प्रदेशातील मुरादाबाद जवळील बिजनौर या गावी झाला. त्यांचे वडील उ. दिलावर हुसेन खाँ यांच्याकडे त्यांचे संगीताचे लहान वयातच शिक्षण सुरू झाले. वडिलांनी या कुशाग्र मुलाला सर्व विद्या देऊन गायकीत निष्णात केले. त्यानंतर गायकी समृद्ध करण्याच्या उद्देशाने त्यांनी उ. इनायत हुसेन खाँसाहेब यांच्याकडे गायनाचे धडे घेतले. जयपूरनिवासी डागर घराण्यातील धृपद-धमार गायक डागर घराण्याचे संस्थापक उ. बहराम खाँ यांचे नातू उ. इनायत खाँ यांच्याकडे त्यांनी धृपद गायकीचेही शिक्षण घेतले.

इनायत खाँ हे गायनाव्यतिरिक्त विविध हिंदू शास्त्रांचे विद्वान जाणकार असल्याने त्यांना 'षट्शास्त्री' ही उपाधी मिळाली होती. त्यांच्या मार्गदर्शनाखाली उ. नजीर खाँनी संगीताचे शास्त्र, हिंदू तत्त्वज्ञान, ब्रजभाषा, भारतीय संस्कृती इत्यादी विषयांचा सखोल अभ्यास केला.

आपल्या दोन्ही भावांसह नजीर खाँ १८७० साली मुंबईला आले. नजीर खाँ यांचे चौथे बंधू विलायत हुसेन मुंबईत स्थायिक होते व त्यांचा मोठा व्यापार होता. या विलायत हुसेन यांचे घर मुंबईतील भेंडीबाजार या भागात होते. त्या वेळी भेंडीबाजार येथे उच्चभ्रू लोकांची वस्ती होती. मोठमोठे व्यापारी, तसेच श्रीमंत लोकांची वस्ती या भागात होती.

नजीर खाँ व त्यांचे दोन बंधू उ. छज्जू खाँ व उ. खादिम हुसेन खाँ यांनी वेगवेगळ्या गुरूंकडून गायनविद्या आत्मसात करून त्यावर चिंतन-मनन करून या विविध गायकींतील सौंदर्यपूर्ण स्थळांचा आपल्या गायकीत समावेश करून आपली स्वतंत्र शैली विकसित केली. या तीनही बंधूंची ही गायनशैली अत्यंत लोकप्रिय होऊन ही गायकी 'भेंडीबाजार' घराण्याची गायकी म्हणून प्रसिद्ध झाली.

नजीर खाँसाहेबांच्या गायकीचे वैशिष्ट्य म्हणजे भरदार आवाज, आवाजातील गुंजन, प्रदीर्घ दमसास, बीनवादनाच्या अंगाने मींडयुक्त आलापी, खंडमेर पद्धतीने वैविध्यपूर्ण बढत, रागाचा विस्तार, ढंगदार सरगम, गमकाचा प्रभावी प्रयोग, तसेच बलपेचाची हुंकारयुक्त तान, तसेच शब्द-स्वर-लय यांचा अनोखा मिलाफ असलेल्या बंदिशी ही त्यांची खासियत होती.

रागाच्या स्वरूपाप्रमाणे रागाचे चलन सांभाळून खंडमेराचा सौंदर्यपूर्ण वापर करणे हे प्रतिभेचे काम आहे. नजीर खाँसाहेबांचे खंडमेर पद्धतीच्या स्वरविस्तारावर कमालीचे प्रभुत्व होते.

गायनाव्यतिरिक्त नजीर खाँसाहेबांना संगीत शास्त्राचीही आवड होती. त्या काळी पारसी समाजाच्या लोकांनी 'पारसी गायनोत्तेजक मंडळी' या नावाने एक संस्था स्थापन केली होती. या संस्थेत काही लोकांना शिकविण्यासाठी नजीर खाँसाहेब जात असत.

पं. भातखंडे हे त्या संस्थेचे सभासद होते. ते तेव्हा देशभरातील वेगवेगळ्या गायक कलाकारांकडून विविध राग आणि बंदिशी मिळवून त्यांचा संग्रह करण्याचे कार्य करीत होते. भातखंडे संगीतशास्त्रावर ग्रंथ लिहिण्याची तयारी करत होते. या विषयावर ते पारसी गायनोत्तेजक मंडळीमध्ये व्याख्यानेही देत असत. या व्याख्यानांना नजीर खाँसाहेब उपस्थित राहत असत आणि भातखंडे यांच्याशी शास्त्रावर चर्चाही करत

असत. या दोघांमध्ये विचारांची देवाणघेवाण चालत असे. यातूनच नजीर खाँसाहेब व भातखंडे यांच्यात मैत्रीचे नाते दृढ होत गेले.

भातखंडे यांनी विविध रागांची लक्षणगीते रचली होती. या लक्षणगीतांच्या प्रचारासाठीही नजीर खाँनी प्रयत्न केले. संगीतशास्त्राविषयी कलाकारांमध्ये रुची निर्माण केली. नजीर खाँसाहेबांनी संग्रहातील खास रागांची माहिती, तसेच अनेक बंदिशी पं. भातखंडे यांना दिल्या. इतर कलाकारांना संगीतशास्त्राचे महत्त्व समजावून देऊन पं. भातखंडे यांच्या कार्यासाठी त्यांच्याजवळील राग व बंदिशी देण्यास उद्युक्त केले.

उ. नजीर खाँ स्वत:ची गायनशैली निर्माण करणारे, संगीतशास्त्राविषयी आवड असणारे, त्या काळीसुद्धा नावीन्याचा स्वीकार करणारे असे प्रतिभावान आणि पुरोगामी गायक कलाकार होते हे त्यांचे आगळेवेगळे वैशिष्ट्य म्हणता येईल. शाहमीर खाँ (उ. अमीर खाँचे वडील), चांद खाँ, झंडे खाँ (संगीत दिग्दर्शक), कादरबक्ष, वाडिलाल शिवराम असे अनेक गायक ‘भेंडीबाजार गायकी’ शिकण्यासाठी या तीन बंधूंकडे येत.

उ. नजीर खाँसाहेबांचे चिरंजीव मुबारक अली यांनी आपल्या वडिलांकडे तालीम घेऊन घराण्याची गायकी आत्मसात केली होती. ते तयारीने गात असत. परंतु प्लेगच्या साथीत दुर्दैवाने त्यांचा मृत्यू झाला.

उ. नजीर खाँसाहेबांचे घराण्याच्या गायकीच्या प्रसारातील मुख्य योगदान म्हणजे त्यांची पट्टशिष्या, गानतपस्विनी अंजनीबाई मालपेकर ही गायिका होय. त्यांनी अंजनीबाईंना वयाच्या आठव्या वर्षापासून सलग आठ वर्षे १०-१२ तासांची तालीम दिली आणि वयाच्या सोळाव्या वर्षी अंजनीबाई एका महान गायिकेच्या स्वरूपात रसिकांसमोर आल्या.

एखाद्या ऋषीप्रमाणे उ. नजीर खाँसाहेबांनी गायनकलेचे अध्यापन करून विद्यादानाचे कार्य अखेरपर्यंत व्रतस्थपणे केले. त्यांचे मुंबईत निधन झाले.

— शरद करमरकर

## नाईक, श्रीपाद रामचंद्र
**संगीत शिक्षक**
**२७ एप्रिल १९१५ — ३ सप्टेंबर १९९४**



महाराष्ट्रात, विशेषत: धुळे भागात रागसंगीताचा प्रचार-प्रसार करणारे श्रीपाद रामचंद्र तथा बाळासाहेब नाईक यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील यावल येथे वडील रामचंद्र जनार्दन नाईक व आई जानकी या कुटुंबात झाला. त्यांच्या वडिलांचे सोन्याचांदीच्या वस्तूंचे दुकान होते व त्यांना संगीताची आवड असल्याने अनेक कलाकारांच्या मैफली ते घरी करत. यातूनच श्रीपादवर बालवयात संगीताचे संस्कार झाले. वडिलांचे अकाली निधन झाल्याने आत्या तानूबाई यांनी दोघा भावंडांचे पालन केले.

श्रीपादची गायनाची आवड ओळखून त्यांस शालेय शिक्षणाबरोबर धुळ्यातील शंकरबुवांकडे गायनाचेही शिक्षण दिले. नंतर त्यांचे संगीताचे शिक्षण आग्रा घराण्याच्या उ. फैयाझ खाँसाहेबांचे शिष्य व नंदूरबार येथील सूरसिंगार संगीत विद्यालयाचे संचालक पं. श्री.बा. शास्त्री यांच्याकडे गुरुकुल पद्धतीने, पंधरा वर्षे झाले. आग्रा घराण्याची गांभीर्यपूर्ण नोमतोम, भरदार ख्याल, रसीली ठुमरी यांवर त्यांचे प्रभुत्व तर होतेच, शिवाय आवाजातील नैसर्गिक गोडवा व फिरत यांमुळे श्रीपाद नाईक नाट्यगीत व भावगीतही उत्तम गात असत.

अंमळनेरला प्रतापशेट यांच्याकडे त्यांची पहिली मैफल झाली व मग नागपूर, इंदूर, मुंबई, पुणे इ. ठिकाणीही त्यांनी मैफली गाजवल्या. आकाशवाणीच्या मुंबई, पुणे, औरंगाबाद व जळगाव केंद्रांवरून त्यांचे गायनाचे कार्यक्रम प्रक्षेपित होत असत.

‘सांगीतिक मानसशास्त्र व संगीत शिक्षणाची आधुनिक पद्धती’ या विषयावर शोधप्रबंध लिहून त्यांनी १९५९ साली अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाची ‘संगीताचार्य’ (डॉक्टरेट) ही पदवी प्राप्त केली.

मात्र, एक व्रतस्थ संगीत शिक्षक व संगीतविषयक लेखक म्हणून त्यांची खास, खरी ओळख राहिली.

गुरूंच्या आज्ञेने त्यांनी १९४७ साली धुळे येथे 'आदर्श संगीत विद्यालय' सुरू केले व शेकडो विद्यार्थ्यांस त्यांनी मार्गदर्शन केले. त्यांचे अनेक विद्यार्थी 'संगीत अलंकार', 'संगीताचार्य' पदवीपर्यंतचे शिक्षण घेऊन संगीत क्षेत्रात कार्यरत झाले. बालगंधर्व, भीमसेन जोशी, बिस्मिल्ला खाँ, वसंत देसाई, प्रभा अत्रे, व्यंकटेश माडगूळकर, मंत्री रत्नाप्पा कुंभार अशा अनेक ज्येष्ठ कलाकार, साहित्यिक, अधिकारी व्यक्तींना या विद्यालयात त्यांनी वेळोवेळी निमंत्रित केले. संगीताबरोबरच वक्तशीरपणा, स्वच्छता, निर्व्यसनीपणा यांचेही संस्कार केले. त्यांनी स्वत: तीनशेहून अधिक बंदिशींची रचना केली होती.

धुळे जिल्ह्यातील आगाव येथील ट्रेनिंग कॉलेज (१९४० ते १९४३), कमलाबाई कन्या शाळा (१९४३ ते १९७३), विद्यावर्धिनी महाविद्यालय या संस्थांतूनही ते संगीताचे प्राध्यापक व विभागप्रमुख (१९६७ ते १९७५) म्हणून कार्यरत होते. पुणे विद्यापीठाच्या संगीत अभ्यासक्रम समितीचे अध्यक्ष व अभ्यासक्रम मंडळाच्या विद्वत्सभेचे सदस्य (१९६८ ते १९७३) म्हणून ते कार्यरत होते. बी.ए. पदवीचा संगीतविषयक अभ्यासक्रम तयार करण्यासाठी त्यांची नियुक्ती झाली होती. बहि:शाल शिक्षण मंडळासाठी ठिकठिकाणच्या शाळा व महाविद्यालयांत त्यांनी संगीतविषयक सप्रयोग व्याख्याने दिली.

न

या अनुभवांतून संगीताच्या शालेय व महाविद्यालयीन शिक्षणपद्धतीवर श्रीपाद नाईक यांनी मूलभूत असे लेखन केले. 'संगीतविषयक पाठांची टाचणे' हे पुस्तक अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाने प्रकाशित केले व 'संगीत शिक्षा विशारद' या पदवीच्या अभ्यासक्रमासाठी हे पाठ्यपुस्तक म्हणून मान्य झाले. 'सांगीतिक मानसशास्त्र आणि आधुनिक शिक्षणपद्धत' हे त्यांचे पुस्तक पुणे विद्यापीठाच्या बहि:शाल शिक्षण मंडळाने १९८२ साली प्रकाशित केले. हे लेखन संगीत शिक्षक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना व शालेय स्तरावरील प्रत्यक्ष संगीत शिक्षकांना अत्यंत उपयुक्त ठरले. 'संगीत कला विहार' या मासिकातही ते सातत्याने अनेक वर्षे लेखन करत असत.

जळगावच्या आकाशवाणी केंद्रावरून त्यांनी संगीतविषयक प्राथमिक पाठ देणारी ५२ भागांची मालिका दोन वर्षे सादर केली होती. मराठवाडा-विदर्भातील अनेक विद्यालये व महाविद्यालयांतून त्यांनी संगीतावर सप्रयोग व्याख्याने दिली.

संगीतशिक्षणाच्या क्षेत्रात भरीव कामगिरी केलेल्या बाळासाहेब नाइकांना १९७३ साली महाराष्ट्र शासनातर्फे 'आदर्श संगीत शिक्षक' पुरस्कार देऊन गौरविण्यात आले. सुधीर फडके यांच्या हस्ते त्यांचा पंचाहत्तरीनिमित्त सत्कार झाला. त्यांच्या सांगीतिक व सांसारिक आयुष्यात त्यांना त्यांच्या पत्नी इंदूताईंची मोलाची साथ लाभली.

त्यांचा मोठा शिष्यवर्ग महाराष्ट्रात पसरलेला आहे, ज्यांत श्री.बा. शास्त्रींच्या कन्या नलिनी रोकडे, राजश्री शाह, सुनीता नांदेडकर, शुभांगी पाटणकर इत्यादींचा समावेश आहे. भावगीत गायिका अनुराधा मराठे याही त्यांच्याच शिष्या होत. धुळे येथेच वयाच्या एकोणनव्वदाव्या वर्षी वृद्धापकाळाने श्रीपाद नाईक यांचा मृत्यू झाला. त्यांचे स्मारक म्हणून धुळ्यातील महाविद्यालयातील संगीतकक्षास त्यांचे नाव देण्यात आले आहे.

— चैतन्य कुंटे

## नागेशकर, पंढरीनाथ गंगाधर

**तबलावादक**

**१६ मार्च १९१३ – २६ मार्च २००८**

प्रसिद्ध तबलावादक आणि गुरू पंढरीनाथ गंगाधर नागेशकर यांचा जन्म गोव्यात नागेशी येथे झाला. त्यांच्या आईचे नाव आवडूबाई होते. वयाच्या आठव्या वर्षीच ते चौघडा व ताशा वाजविण्यास शिकले. तबल्याचे प्राथमिक धडे त्यांनी आपल्या मामांकडे घेतले. मामांचा व मास्टर दीनानाथांचा चांगला घरोबा होता.



मा. दीनानाथ मंगेशकरांची बलवंत संगीत मंडळी पणजीत आली असताना त्यांनी पंढरीनाथांना तबला वाजवताना ऐकले व ते म्हणाले, ‘‘तबला हे शास्त्र अति गहन आहे. नागोशीस राहून त्याचा थांगपत्ता लागणार नाही. माझ्या कंपनीत ये, मी तुला तयार करीन.’’ दीनानाथांच्या याच शब्दांनी पंढरीनाथ नागेशकरांची पुढील कारकीर्द घडवली. दीनानाथ मंगेशकरांचे हे बोल व तबलावादन शिकण्याची पंढरीनाथांची तळमळ यांचा परिणाम घर सोडण्यात झाला. पंढरपुरात बलवंत संगीत मंडळी आली असताना ते घरातून पळून बलवंत संगीत मंडळीत आले. या संगीत मंडळीचे तबलावादक विठ्ठल नाईक ऊर्फ वल्हेमामा यांच्याकडे त्यांचे तबलाशिक्षण सुरू झाले. हळूहळू ते तबलावादनात तयार व्हायला लागले. दीनानाथांच्या खाजगी बैठकीलाही त्यांनी साथ केली. दोन वर्षे बलवंत कंपनीत राहून ते परत नागोशीला परतले.

त्यानंतर ते नाटकात व कीर्तनात तबला वाजवीत. त्यांनी काही महिने कोल्हापूरला किर्लोस्कर नाटक कंपनीत काढले, नंतर कोल्हापूर सोडून ते मुंबईत आले. अर्थार्जन करण्यासाठी त्यांनी दिग्वीर सिनेमाच्या कंपनीतही काम केले, मेनका पिक्चर्समध्ये नोकरी केली. मुंबई हीच आपली कर्मभूमी आहे याची त्यांना जाणीव झाली. कला शिकण्याची व वाढविण्याची संधी मुंबईतच आहे असे मनोमन पटल्यामुळे मुंबईलाच स्थायिक होण्याचा त्यांनी निर्णय घेतला. साथसंगत करणे, शिकवण्या करणे यांतून ते आपला उदरनिर्वाह करीत.

त्यानंतर उस्ताद मुनीर खाँचे शिष्य सुब्रामामा अंकोलेकर यांचे ते गंडाबंध शिष्य झाले. सुब्रामामांच्या मृत्यूनंतर त्यांनी खाप्रूमामा पर्वतकर यांचा गंडा बांधला. तसेच अन्वर हुसेन खाँ आणि पंजाबचे जतीनबक्ष खाँ यांच्याकडून काही कायदे त्यांनी आत्मसात केले. पुढे योगायोगाने हैद्राबादचे ज्ञानी व विद्वान तबलावादक अमीर हुसेन खाँसाहेब यांची ओळख झाली. तब्बल बारा वर्षे अमीर हुसेन खाँसाहेबांकडे त्यांनी नित्यनियमाने शिक्षण घेतले इतकेच नव्हे, तर अमीर हुसेन खाँना मुंबईला बोलावून त्यांची राहण्याची व्यवस्था केली. मुंबईच्या संगीतविश्वात अमीर हुसेन खाँसाहेबांची ख्याती पसरविण्याचे श्रेय नि:संशय पंढरीनाथ नागेशकरांना जाते.

अजराडा, दिल्ली, पूरब, फरुखाबाद या चारही घराण्यांतील वादनशैलीचा पंढरीनाथ नागेशकरांनी अभ्यास केला असल्यामुळे, या वादनशैलीतील नेमकी सौंदर्यस्थळे टिपून त्यांनी आपली तबलावादनशैली समृद्ध केली. अनेक कायदे, रेले, बोल यांच्या त्यांनी रचना केल्या. त्यांनी एका विशिष्ट बाजालाच स्वत:ला कधी बांधून ठेवले नाही. पंचमसवारीसारख्या अवघड तालातही त्यांनी विपुल रचना केल्या आहेत. नागेशकरांच्या उजव्या हाताचे मधले बोट जन्मापासून उंचीलाच कमी होते, त्यामुळे तबलावादनात या बोटाची ताकद कमी पडत असे; पण यावरही त्यांनी मात केली.

पंढरीनाथ नागेशकरांनी अनेक नामवंत गायकांना तबल्यावर साथ केली; पण नंतर विद्यादान हेच ध्येय ठेवले. अनेकांना मुक्तहस्ते व सौंदर्यदृष्टी ठेवून विद्या देऊन अनेक दर्जेदार तबलावादक निर्माण केले. त्यांचे काही शिष्य असे : वसंतराव आचरेकर, मुकुंद काणे, राजेंद्र अन्तरकर, नाना मुळे, संदीप संझगिरी, सुरेश तळवलकर आणि सुपुत्र विभव नागेशकर.

पंढरीनाथ नागेशकरांना संगीत रिसर्च अकादमीचा पुरस्कार (१९९९), गोमंतक मराठी अकॅडमीतर्फे ‘मंगेशकर’ पुरस्कार (२०००), मुंबईत वसंतराव नाईक प्रतिष्ठानातर्फे राज्यपाल पी.सी. अलेक्झांडर यांच्या हस्ते सन्मान असे काही सन्मान्य पुरस्कार मिळाले. जवळजवळ ५३ वर्षे अखंडित विद्यादान करून वयाच्या पंचाणवाव्या वर्षी त्यांचे मुंबईत निधन झाले.

— माधव इमारते

न

**नातू, सुजाता सुरेश**
**नर्तिका**
**३० मार्च १९४१**



सुजाता सुरेश नातू या पूर्वाश्रमीच्या बडोद्याच्या मंदाकिनी आंबेगावकर होत. त्यांचे वडील जयराम हे अबकारी विभागात (एक्साइज डिपार्टमेंटमध्ये) सरकारी नोकरीत होते. आई इंदुमती या उत्कृष्ट ब्रिजपटू असल्याने महाराणी शांतादेवी यांच्या सहखेळाडू होत्या. सुजाता (मंदाकिनी) यांनी बडोद्याच्या महाराजा सयाजीराव विद्यापीठामधून बी.ए. व एम.ए. (संगीत व कथक) या पदव्या प्राप्त केल्या. पदवीसाठी द्वितीय विषय म्हणून त्यांनी सतार-वादनाचेही शिक्षण घेतले होते. त्या गुरू पंडित सुंदरलालजी गंगाणी यांच्या कठोर शिस्तीखाली नृत्यात पारंगत झाल्या आणि त्यांनी गुरूंची वाहवा मिळवली.

न

डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन, पं. जवाहरलाल नेहरू, इंदिरा गांधी यांसारख्या मान्यवरांसमोर सुजाता यांनी एकल नृत्य सादर केले. नृत्यरचना (कोरियोग्राफी) ही त्यांची खासियत होती. त्यांनी अनेक विद्यार्थिनींना मार्गदर्शन केले. नृत्याबरोबरच त्यांना खेळाचीही आवड होती. त्या विद्यापीठाच्या खो-खो संघाच्या कप्तानही होत्या. बी.ए.च्या कनिष्ठ वर्गात शिकत असताना धावण्याच्या स्पर्धेसाठी त्यांची ऑलिम्पिकमध्ये निवड झाली होती. काही वैयक्तिक कारणांनी त्या सदर स्पर्धेत सहभागी होऊ शकल्या नाहीत.

सुजाता यांची १९६५ साली सरकारी स्पर्धापरीक्षेत यश मिळाल्यावर आकाशवाणीमध्ये ‘प्रक्षेपण अधिकारी’ या पदावर नियुक्ती झाली. तिथे त्यांनी ‘वीणानो मृग’ ही संगीतिका बसवली आणि सादर केली. सुरेश नातू यांच्याबरोबर १९६५ साली विवाह झाल्यावर त्या प्रथम मुंबई व नंतर पुणे येथे स्थायिक झाल्या. त्यांनी १९७० साली पुण्यात ‘पदन्यास’ ही नृत्यसंस्था चालू केली. त्यांनी सातत्याने चाळीस वर्षे बी.ए., एम.ए.पर्यंतच्या अनेक विद्यार्थिनींना शिक्षण दिले.

‘पदन्यास’तर्फे त्यांनी एकल नृत्ये, समूहरचना, काव्यरचनांवर नृत्य बसविणे, असे अनेक प्रकारचे सादरीकरण केले. त्यांनी अनेक काव्यबोल रचले आहेत. नृत्यासाठी त्यांनी भारतभर, तसेच परदेशांतही दौरे केले. त्यांना हिंदू महासभेकडून ‘नृत्यचंद्रिका’ ही पदवी देण्यात आली. तसेच पद्मभूषण गुरू बिरजू महाराज यांच्या हस्ते त्यांना ‘पंडिता’ म्हणून भूषविण्यात आले.

त्यांच्या प्रयत्नाने १९७६ साली टिळक महाराष्ट्र विद्यापीठात नृत्याच्या पदविका परीक्षा चालू झाल्या. पुढे पदवी आणि पदव्युत्तर अभ्यासक्रम चालू करण्यात त्या अग्रभागी होत्या. शालेय शिक्षणात ‘नृत्य’ हा विषय शिकवला जावा अशी नातूंची इच्छा होती. तत्कालीन शिक्षणाधिकारी डॉ. चिपळूणकर यांच्या सहकार्याने त्यांची ही इच्छा पूर्ण झाली. अनेक शाळांमध्ये १९८५ पासून प्रात्यक्षिकांद्वारे ‘नृत्य’ हा विषय पहिल्या इयत्तेपासून सुरू झाला. महाराष्ट्र शासनाच्या ‘बाल भारती’ या संस्थेमध्ये शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका तयार करण्यासाठी त्यांना ‘नृत्य’ या विषयाचे तज्ज्ञ म्हणून आमंत्रित करण्यात आले.

नृत्याच्या ओढीने त्यांनी वयाच्या पासष्टाव्या वर्षी ‘जयपूर नृत्यशैलीचे संगीतात्मक विश्लेषण’ हा अभ्यासग्रंथ सादर करून एस.एन.डी.टी. विद्यापीठातून पीएच.डी.ची पदवी मिळवली. तसेच, त्यांनी ‘भारतीय नृत्यशैली’, ‘कथक : एक सौंदर्यशास्त्र’, ‘कथकमय मीरा’ ही पुस्तके व नृत्य-काव्य-बोलांवर दोन पुस्तके लिहिली आहेत.

— अनुराधा आगाशे

**नारायणगावकर, आत्माराम पांडुरंग**
**गायक व लेखक**
**३० ऑगस्ट १९१७ — २३ ऑक्टोबर २००१**

आत्माराम पांडुरंग नारायणगावकरांचा जन्म पुणे जिल्ह्यातील सासवड या गावी झाला. त्यांच्या मूळ गावी



नारायणगाव येथे त्यांचे बालपण गेले. समर्थ रामदासांचे शिष्य बाळकराम महाराज यांच्या परंपरेतील बापू महाराज वैद्य हे त्यांचे वडील आणि चंद्रिकाबाई या त्यांच्या आई होत्या. रामसंकीर्तनाचे संस्कार त्यांना घरातूनच मिळाले. पण संगीत शिकणे व संगीत हाच व्यवसाय करणे यासाठी घरातून वडिलांचा विरोध असल्याने कुमारवयातच घर सोडून ते औंध संस्थानाचे राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांच्या पाठिंब्याने १९३३ मध्ये सातारा जिल्ह्यातील संस्थान औंध येथे वास्तव्यास आले.

दरबार गवई पं. अनंत मनोहर जोशी ऊर्फ अंतूबुवा यांच्याकडे सात वर्षे त्यांनी शास्त्रशुद्ध तालीम घेतली. शालेय शिक्षण आणि कीर्तनाचे शिक्षण त्यांनी औंध येथेच पूर्ण केले. महाराजांकडून त्यांना 'संगीत रत्न' आणि 'कीर्तन विशारद' या पदव्या प्राप्त झाल्या. पुढे त्यांनी समाजप्रबोधनाच्या उद्देशाने अनेक वर्षे कीर्तने केली आणि त्यांना 'राष्ट्रीय कीर्तनकार' हा बहुमान मिळाला.

पुण्यात १९४० पासून पं. बापूराव केतकर आणि मास्तर कृष्णराव यांच्याकडून त्यांना मार्गदर्शन मिळाले. मुंबई आकाशवाणीवर १९४२ साली त्यांचा पहिला गायन कार्यक्रम झाला आणि १९४३ मध्ये त्यांची पहिली ध्वनिमुद्रिका एच.एम.व्ही.तर्फे प्रकाशित झाल्यावर १९६५ पर्यंत मैफलींचे लोकप्रिय कलाकार म्हणून त्यांचे नाव झाले. त्याच काळात 'नंदादीप', 'मदिरा', 'अर्ध्या वाटेवर', 'नवे जग' अशा काही संगीत नाटकांमधून त्यांनी केलेल्या भूमिकाही गाजल्या. त्या नाटकांना संगीतही त्यांचेच असल्याने एच.एम.व्ही. या नावाजलेल्या ग्रामोफोन कंपनीत संगीत दिग्दर्शक म्हणून त्यांना बोलावण्यात आले. त्यांनी तिथे १९४४ ते १९५५ अशी ११ वर्षे संगीत दिग्दर्शक म्हणून काम केले. आत्माराम नारायणगावकरांनी संगीत दिलेल्या गीतांच्या ध्वनिमुद्रिका राम मराठे, जयमाला शिलेदार, सुरेश हळदणकर, शाहीर साबळे अशा अनेक गायक कलाकारांच्या आवाजात निघाल्या.

त्यांनी १९५२ सालापासून चेंबूर येथे 'श्रीराम संगीत विद्यालय' या संस्थेची स्थापना करून अनेक शिष्यांना संगीताची तालीम दिली. या त्यांच्या कार्याची दखल घेऊन महाराष्ट्र शासनाने १९९५ साली त्यांना 'कलादान पुरस्कार' देऊन सन्मानित केले .

संगीत समीक्षक म्हणून त्यांनी 'लोकसत्ता', 'महाराष्ट्र टाइम्स', 'नवशक्ती', 'नवाकाळ' अशा वृत्तपत्रांतून लेखन केले. संगीत क्षेत्रातील गायक, वादक कलाकारांवर त्यांनी लिहिलेल्या लेखांची 'स्वरयोगी' आणि 'स्वरयोगिनी' ही पुस्तके प्रकाशित झाली. वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षी त्यांचे निधन झाले.

– मधुवंती पेठे

## नारायणगावकर, विठाबाई भाऊ
**लावणी कलाकार**
**जुलै १९३५ – १५ जानेवारी २००२**



जुन्या जमान्यातील प्रख्यात शाहीर पठ्ठे बापूराव यांचे शिष्य असणाऱ्या भाऊ खुडे यांचा 'भाऊ-बापू मांग नारायणगावकर तमाशा मंडळ' हा फड स्वातंत्र्यपूर्व काळात गाजलेला होता. विठाबाईंचा जन्म भाऊ व शांताबाई खुडे या तमाशा कलावंतांच्या पोटी पंढरपूर मुक्कामी झाला. विठाबाईंचे वडील भाऊसाहेब, काका बापू व सावळा, बहिणी मनोरमा, केशर आणि बंधू शंकर व पांडुरंग हे सारेच या फडात आपली कला पेश करत. शेलाट्या बांध्याच्या, उंच, गोऱ्या विठाबाईंना तमाशाचे बाळकडू असे घरातच मिळाले.

मामा वरेरकर यांच्या कलापथकात विठाबाई आठव्या वर्षी आपल्या बहिणी, भाऊ व काका यांच्यासह सामील

न

झाली. या पथकात चार वर्षे असताना अनेक लोकनाट्ये व नृत्याचे कार्यक्रम विठाबाईंनी महाराष्ट्रात व दिल्लीपर्यंत अन्यही राज्यांत केले. यामुळे लहान वयातच विठाबाईंना रंगभूमीचा उत्तम अनुभव मिळाला.

वयाच्या तेराव्या वर्षी १९४८ साली विठाबाई वडिलांच्या फडात परतली. बहिणी केशर आणि मनोरमा या लावणी गात असत, मात्र विठाबाईंनी नृत्याला प्राधान्य दिले आणि या फडात लावणी अधिक नाचलीही जाऊ लागली. विठाबाईंच्या नृत्यामुळे १९५० च्या सुमारास या फडाची लोकप्रियता अत्यंत वाढली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर फडाला आर्थिक स्थैर्यही लाभले होते. काका बापूसाहेबांना १९६१ साली संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार तत्कालीन राष्ट्रपती राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते मिळाला, तेव्हा विठाबाईंनी राष्ट्रपतींसमोर नृत्य पेश केले. विठाबाईंनी १९६२ साली भारत-चीन युद्धादरम्यान नेफा सीमेवर आपल्या फडासह जवानांचे मनोरंजन केले होते.

विठाबाईची कारकीर्द भरात असताना हौसा-मंजुळा कोल्हापूरकर, काळू-बाळू कवलापूरकर, दादू इंदुरीकर, दत्तोबा तांबे-शिरोलीकर, दत्ता महाडिक-पुणेकर असे नावाजलेले फड होते. अंतर्गत मतभेदांमुळे 'भाऊ-बापू मांग नारायणगावकर तमाशा मंडळ' हा फड सोडून विठाबाईंनी स्वत:चा 'विठा भाऊ मांग नारायणगावकर तमाशा मंडळ' हा फड १९७० मध्ये सुरू केला. विठाबाईंनी 'आईचं काळीज', 'रायगडची राणी', 'रक्तात न्हाली कुऱ्हाड' अशी अनेक नवी वगनाट्ये बसवली, मात्र 'मुंबईची केळीवाली' हे त्यांचे सर्वाधिक लोकप्रिय वगनाट्य होते.

विठाबाईंचे रूप, अदा व नृत्य या साऱ्यांची प्रेक्षकांवर खूपच मोहिनी होती. विठाबाईंचे नाव 'तमाशाची राणी' म्हणून गाजू लागले. विठाबाईंनी १९५० ते १९८० अशी तीन दशके तमाशाच्या क्षेत्रात एखाद्या सम्राज्ञीसारखी गाजवली. पुण्यात १९६८ साली भरलेल्या 'अखिल भारतीय तमाशा परिषदे'च्या त्या स्वागताध्यक्षा होत्या. विठाबाईंच्या नृत्यकौशल्याचा वापर तमाशाबरोबरच चित्रपटांतही केला गेला. 'कलगी तुरा' (१९५५), 'उमज पडेल तर' (१९६०), 'छोटा जवान' (१९६३), 'सर्वसाक्षी' (१९७८) या चित्रपटांत त्यांनी नृत्ये केली होती.

तमाशात नाचताना 'दौलतजादा' घेताना वाह्यात प्रेक्षकांचे वात्रट इशारे, छेडछाड, धक्के आणि लगट या साऱ्यांस विठाबाई धीराने, चतुराईने तोंड देत. विठाबाईंना गावगुंडांचे असे अनेक अनुभव आले, मात्र या प्रसंगांना त्या अदब, हजरजबाबीपणा आणि करारी कठोरपणानेही सामोऱ्या जात. पुढे तर विठाबाईंची खोड काढण्याची हिंमत कुणी करत नसे, असा त्यांचा दरारा होता. विठाबाईंची आपल्या कलेशी विलक्षण बांधीलकी होती. शिखर शिंगणापूरच्या जत्रेतील कार्यक्रमात, नऊ महिन्यांच्या गर्भवती असतानाही त्या फडात नाचत होत्या, आणि तिथेच त्या प्रसूत झाल्या! नाळ कापून विठाबाईंनी आपला कार्यक्रम पुढे चालू ठेवला – ही दंतकथा वाटावी अशी सत्य घटना आहे !

विठाबाईंनी मारुती सावंत ऊर्फ अण्णा मर्चंट यांच्याशी विवाह केला. पण तो संसार फारसा यशस्वी ठरला नाही. अशिक्षित विठाबाईंच्या भाबडेपणाचा गैरफायदा घेऊन तिचा सारा पैसा सावंतांनी हडप केला. एकीकडे विठाबाईंचे वय वाढत होते, तर दुसरीकडे तमाशातील व्यावसायिक समीकरणे आणि अभिरुचीही बदलू लागली होती. फड चालवणे बिकट होऊ लागले. विठाबाईंनी मोठी मुलगी मंगला आणि पुढे संध्या आणि भारती, मालती या मुलींना उभे केले, त्यामुळे फडाला थोडा आधार मिळाला. मात्र पुढे मुलींनी वेगळे फड काढल्याने हे सुख फार काळ टिकले नाही. फड कर्जबाजारी झाला. फड १९९० च्या सुमारास बंद करण्याचा निर्णय घेऊन विठाबाई निवृत्त झाल्या.

विठाबाईंना 'विष्णुदास भावे' पुरस्कार (१९८६), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार, 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार (१९९०), 'विखेपाटील' पुरस्कार (१९९७), 'जागतिक महिला दिन' पुरस्कार, 'लोकशाहीर भाऊ फक्कड' सन्मान, 'अण्णाभाऊ साठे' पुरस्कार (२०००)

न

इ. अनेक पुरस्कार मिळाले. त्या १९९६ सालच्या अखिल भारतीय दलित नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षा होत्या. मुंबई दूरदर्शनवर 'प्रतिभा आणि प्रतिमा'मध्ये त्यांची मुलाखत दाखवली गेली. 'स्पॅरो' या महिला अभ्यास संस्थेने विठाबाईंवर २००१ साली लघुपट काढला.

एके काळी तमाशातील अदाकारीने जो प्रचंड पैसा कमावला, त्या पैशांचा संचय मात्र विठाबाईंना करता आला नाही. परिणामी, आयुष्याच्या संध्याकाळचे दिवस तिला अतिशय खडतरपणे काढावे लागले. आर्थिक चणचण तर होतीच; परंतु वार्धक्यात त्यांना अनेक व्याधींनी घेरले. पत्रकार माधव गडकरी यांच्यासारख्या काही कलाप्रेमींनी विठाबाईंना आर्थिक साहाय्य मिळवून दिले. साहित्यिका दुर्गा भागवत आणि पंतप्रधान नरसिंह राव व अन्यही राजकारणी लोकांनी विठाबाईंना देणगी पाठवली, यामुळे उपचार चालू राहिले. मात्र दौऱ्यांच्या धांदलीत गेलेले आयुष्य, दारूचे व्यसन, पतीची मारहाण, बेछूट स्वभाव आणि हृदयविकार या साऱ्यांचा परिपाक म्हणून विठाबाईंचे शरीर क्षीण झाले होते. अखेरीस अर्धांगवायू आणि मेंदूज्वराच्या आजारामुळे विठाबाईंचे पुण्यात निधन झाले.

— चैतन्य कुंटे

## निस्ताने, अमृत झांगोजी
**संगीत शिक्षक**
**८ सप्टेंबर १९०९**



अमृत झांगोजी निस्ताने यांचा जन्म गोकुळाष्टमीच्या दिवशी हरदोली येथे, आत्याच्या घरी झाला. त्यांच्या आईचे नाव बयाबाई होते. त्यांचे वडील झांगोजी ऊर्फ बाबाजी हे चांदूर तालुक्यात शिदोडी गावी शेतीवाडी व तंबाखूचा व्यवसाय करीत आणि एकतारीवर भजने म्हणत असत. अमृत निस्तानेंचे शालेय शिक्षण वर्धा येथे झाले. तिथे संगीत शिक्षक राघोबाजी मुठाळ त्यांना संगीताचे पाठ देऊ लागले. त्यांनी १९२७ मध्ये शिक्षक प्रशिक्षण घेण्यासाठी नागपूर येथील नॉर्मल स्कूलमध्ये प्रवेश घेतला.

नागपूर नगरपालिकेच्या महाल प्राथमिक शाळेत ९ सप्टेंबर १९२८ पासून अमृत निस्ताने शिक्षक या नात्याने रुजू झाले. तेव्हापासून ते नागपूरलाच स्थायिक झाले. मुठाळ गुरुजी यांचीही बदली होऊन त्याच शाळेत आल्याने त्यांचा संगीताचा अभ्यास त्यांच्याकडेच चालू राहिला. १९२९ मध्ये निस्ताने चतुर संगीत महाविद्यालयात विद्यार्थी म्हणून दाखल झाले. सहाध्यायांशी झालेल्या मतभेदामुळे निस्ताने यांनी १९३३ साली संस्था सोडली व घरीच रियाज सुरू केला. त्यांचा आवाज जाडाभरडा होता. पण जिद्द व मेहनती स्वभावामुळे ते घरी वर्ग घेऊ लागले.

ते १९३४ मध्ये संगीत विशारद झाले. ते १९५६ मध्ये लखनौ संगीत विद्यापीठातर्फे 'संगीत निपुण' झाले. त्यांचा १९३२ मध्ये सुलोचनाबाई शिंदे यांच्याशी विवाह झाला होता. दुर्दैवाने त्यांच्या पत्नीचे १९४५ मध्ये निधन झाले. पुढच्याच वर्षी त्यांनी कमलाबाई घोंगे यांच्याशी विवाह केला .

भाटेबुवांच्या नाट्यकला प्रवर्तक संगीत नाटक कंपनीचे नागपुरात आगमन झाले आणि कंपनीतील नारूकाका पुणेकर या कलाकारांकडून निस्ताने यांनी दुर्मीळ चिजा घेतल्या. संगीत दिग्दर्शनाचे तंत्र समजून घेऊन त्यांनी 'दोन बायका' या नाटकाचे संगीत दिग्दर्शनही केले. मास्तरांनी १९४४-४५ मध्ये 'नाथ गायन वादनालया'त संगीत शिक्षकाचे काम केले.

ते १९४५ मध्ये चतुर संगीत महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून कार्य करू लागले. संस्थेची १९४९ मध्ये घटना व १९५० मध्ये नोंदणी करून सरकारी मान्यताही मिळवली. संस्थेला १९५४ पासून सरकारी अनुदानही मिळू लागले. ही संस्था १९४१ ते १९५८ पर्यंत लखनौ विद्यापीठाशी संलग्न होती. नंतर १९५८ ते १९७० पर्यंत खैरागडच्या इंदिरा संगीत कला विद्यापीठाशी व पुढे

न

अ.भा. गांधर्व महाविद्यालय मंडळाशी संलग्न होती. ते १९६६ मध्ये प्राथमिक शाळेतून मुख्याध्यापक पदावरून निवृत्त झाले.

अमृत निस्ताने यांनी अरुणकंस, गोपीकंस व रामबहार या नवीन रागांची निर्मिती केली व चिजाही रचल्या. त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले. त्यांच्या शिष्यपरिवारात राजेश्वर बोबडे, बाळासाहेब पुरोहित, प्रमिला बेलसरे, पुष्पा जोशी, कमल इंगळे, नागरीकर, सुषमा चितळे, अळेकर भगिनी, कल्पना गोखले, कृष्णा दयमवार, गीता मुजुमदार, सुरेखा झाडगावकर, अशोक मंजुळे, माईसाहेब चांदूरकर, विमल कुलकर्णी इत्यादी शिष्यांचा समावेश होता.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग१; १९७४.*

## नेरळकर, कृष्णनाथ गणपती

***नेरळकर, नाथराव***

**गायक, संगीत शिक्षक**

**२० नोव्हेंबर १९३५**



कृष्णनाथ गणपती नेरळकर ऊर्फ नाथराव नेरळकर यांचा जन्म नांदेड येथे झाला. मराठवाड्यात संगीताचा प्रसार मोठ्या प्रमाणात करणारे नाथराव हे गणपतिशास्त्री व प्रयागबाई यांचे पुत्र होत. कृष्णनाथांचे वडील पौरोहित्य करणाऱ्या कर्मठ कुटुंबाचे सदस्य होते व धर्माबाद येथील धनगिरिराज गिरणीत कार्यवाह म्हणून नोकरी करत. कृष्णनाथांचे काका धोंडोपंत यांना संगीताची आवड होती व ते मराठवाड्यातील गायनाचार्य पं. अण्णासाहेब गुंजकर यांचे शिष्य होते. त्यांच्या प्रोत्साहनाने १९४७ पासून कृष्णनाथही गुंजकरांच्या संगीतशाळेत गायन शिकू लागले. लवकरच त्यांनी गायनात प्रावीण्य मिळवले. शालेय वयातच त्यांनी नकला, गाणी यांनी रंगभूमी गाजवायला आरंभ केला. त्यांनी १९५७ साली अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाची 'संगीत विशारद' ही पदवी 'विष्णू दिगंबर पारितोषिका'सह मिळवली.

आरंभीच्या काळात कृष्णनाथ नेरळकरांनी 'सौभद्र', 'शारदा', 'मानापमान', 'कुलवधू', 'सुवर्णतुला', 'देवमाणूस', 'देव नाही देव्हाऱ्यात', 'सोन्याचा कळस' या संगीत नाटकांतून भूमिका व गायन यशस्वीपणे केले. त्यांनी मराठी अभंग, गझल, भावगीते स्वरबद्ध करून त्यांचे 'शाम-ए-गझल'सारखे कार्यक्रमही केले. मराठवाड्याखेरीज मुंबई, पुणे, कोल्हापूर, भोपाळ, बडोदा (वडोदरा), दिल्ली, कलकत्ता (कोलकाता), हैदराबाद, इ. ठिकाणच्या महोत्सवांत त्यांनी गायन केले. एच.एम.व्ही.ने त्यांच्या गायनाची ध्वनिफीत वितरित केली होती, तसेच महाराष्ट्र शासनाच्या 'मराठवाडा मुक्ती संग्राम', 'साक्षरता अभियान' अशा ध्वनिफीतसंचांसाठी त्यांनी संगीत दिग्दर्शनही केले.

अनेक प्रचलित रागांसह कृष्णकल्याणसारख्या अप्रचलित रागांत व पंचमसवारीसारख्या अनवट तालांत त्यांनी ढंगदार बंदिशी बांधल्या असून त्या 'मितवा' या संग्रहातून प्रसिद्धही केल्या आहेत. प्रभाकर कारेकर, श्रीकांत देशपांडे, आरती अंकलीकर इ. कलाकारांनी त्या मैफलींतून सादरही केल्या आहेत.

कृष्णनाथ नेरळकरांनी एक कुशल संघटक म्हणूनही कामगिरी केली, ती अशी : त्यांनी नांदेड येथे १९६४ पासून संगीतसभांचे आयोजन सुमारे दहा वर्षे केले, मग औरंगाबाद येथे युवक महोत्सव सुरू केला. तेरखडे हे गाव सांगीतिक विकासासाठी दत्तक घेतले. त्यांनी मराठवाडा संगीत प्रसारक मंडळाची स्थापनाही केली. कृष्णनाथांचा दांडगा लोकसंग्रह असून संगीत क्षेत्रातील अनेक नामवंतांसह अनंत भालेराव, गोविंदभाई श्रॉफ, नरहर कुरुंदकर, पु.ल. देशपांडे, कुसुमाग्रज अशा अन्य क्षेत्रांतील व्यक्तींशी त्यांचे ऋणानुबंध होते.

मैफलीचे गायक, संगीतनट, संघटक, संगीत दिग्दर्शक व बंदिशकार अशी बहुआयामी ओळख असणाऱ्या

नाथराव नेरळकरांचे खरे श्रेय गायनगुरू म्हणून अधिक आहे. संगीत शिक्षक म्हणून त्यांची कारकीर्द नांदेडच्या प्रतिभा निकेतन विद्यालयात (१९५२ ते १९७३) सुरू झाली. नंतर औरंगाबाद येथील सरस्वती भुवन महाविद्यालयात १९७३ पासून त्यांनी संगीत विभागाचे प्रमुख म्हणून कार्य केले. औरंगाबाद विद्यापीठात संगीत विभाग सुरू करून तो वाढवण्याचे श्रेय नाथरावांना आहे. त्यांनी नांदेड येथे अनंत संगीत विद्यालय (१९५६ ते १९७३) व औरंगाबाद येथे (१९७३ पासून आजवर) हिंदुस्थानी संगीत विद्यालय सुरू केले. नाथरावांनी गुरुकुल पद्धतीने शिष्यांचा सांभाळ करत विद्यादान केले. शिवदास देगलूरकर, चित्रा देशपांडे, शिवराम गोसावी, संदीप देशमुख, प्रियदर्शनी कुलकर्णी व शशांक मक्तेदार असे अनेक शिष्य त्यांनी घडविले, त्यांपैकी काहींनी राष्ट्रीय पातळीवर नावलौकिक मिळवला आहे. कोलकात्याच्या संगीत रिसर्च अकादमीनेही नाथरावांना मानद गुरू म्हणून पाचारण केले होते.

नाथरावांच्या पत्नी सुशीला यांनीही त्यांच्या सांगीतिक वाटचालीत हातभार लावला. नाथरावांचा संगीतवारसा अनंत, जयंत (गायन, हार्मोनिअम व तबलावादन) व हेमा उपासनी (गायन) ही त्यांची अपत्येही चालवत आहेत.

नाथराव नेरळकरांना ‘श्रेष्ठ गायक-अभिनेता’ पुरस्कार (राज्य नाट्य महोत्सव, मुंबई - १९५७), ‘कलादान’ पुरस्कार (महाराष्ट्र शासन - १९९८-९९), ‘उत्कृष्टता’ पुरस्कार (रोटरी क्लब - २००१), ‘औरंगाबाद भूषण’ (२००२) या सन्मानांनी गौरविण्यात आले आहे.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

*डॉ. वैष्णव, मंगला; ‘स्वरयात्री नाथराव नेरळकर’; प्रतिभा प्रकाशन, औरंगाबाद; २०११.*

## नेरळकर, नाथराव

☛ ***नेरळकर, कृष्णनाथ गणपती***

***

न




## पंडित, एकनाथ विष्णुशास्त्री

**गायक, बीनवादक**

**१८७० – ३० एप्रिल १९५०**



पं. एकनाथ विष्णुशास्त्री पंडित यांचा ग्वाल्हेर येथे जन्म झाला. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात पुण्याजवळच्या चिंचवड या देवस्थानाचे मूळ रहिवासी असणारे पंडित हे कुटुंब ग्वाल्हेरला शिंदे सरकारांकडे देवसेवेत रुजू झाले होते. शिंदे सरकारांच्या वाड्यावर ख्यालाबरोबरच भजनेही गावी लागत असल्याने ग्वाल्हेर घराण्याचे प्रसिद्ध गायक उ. हद्दू व हस्सू खाँ यांना कीर्तनकार पंडित विष्णुशास्त्री चिंचवडकर हे संस्कृत श्लोक व मोरोपंतांच्या आर्या शिकवत. गोपाळ, गणपत, शंकर व एकनाथ हे विष्णुशास्त्रींचे चारही पुत्र गात असत.

उ. हद्दू खाँसाहेबांनी विशेषत: शंकर पंडित व एकनाथ पंडित यांना गायन शिकवायला सुरुवात केली. त्यांच्या मृत्यूनंतर (१८८३) या दोघांना उ. नत्थू खाँची तालीम १८८४ पर्यंत मिळाली. नंतर उ. निसार हुसेन खाँ यांचा १९१६ पर्यंत त्यांना आजीवन सहवास मिळाला. खाँसाहेब १८८६ पासून शंकर पंडितांच्या घरीच राहू लागले. तेथील ब्राह्मणी वातावरण आवडल्याने खाँसाहेबही जानवे घालून शुद्ध शाकाहारी झाले आणि स्वत:स ‘निसारभट्ट’ म्हणवण्यात भूषण मानू लागले. संगीताद्वारे धार्मिक सलोख्याचे हे एक अद्भूत उदाहरण आहे! खाँसाहेब स्वत: संस्कृत श्लोक, अष्टपदी, आर्या गात असत. या तीन उस्तादांच्या तालमीमुळे शंकर पंडित व एकनाथ पंडित हे ग्वाल्हेर गायकीचे मूर्धन्य गायक बनले. पं. एकनाथ पंडित हे गायनाबरोबरच बीन, सतार, पखवाजवादनातही निपुण होते. त्यांनी बीनची तालीम उ. बंदे अली खाँ व उ. मुशर्रफ खाँ, सतारची तालीम उ. बाबू खाँ आणि पखवाजाचे शिक्षण पं. अग्निहोत्रीबुवांकडून घेतले होते. ते तानपुऱ्यावरही गोटाबीनप्रमाणे वादन करीत असत. नंतर ते मुंबईला स्थायिक झाले. कुष्णराव मुळे, डॉ. ह.ग. मोघे, शरच्चंद्र आरोळकर, भैयासाहेब मावळणकर, शिवरामशास्त्री पिंगळे हे त्यांचे महत्त्वाचे शिष्य होते. एकनाथजींचे पुत्र काशीनाथ, रघुनाथ व सीताराम हेही गायक होते. एकनाथ पंडितांनी पं. वि.ना. भातखंडे यांना ग्वाल्हेर घराण्यातील सुमारे चार-पाचशे बंदिशी ‘क्रमिक पुस्तक मालिका’साठी दिल्याने या घरंदाज बंदिशींचे जतन झाले. मात्र यामुळे त्यांच्यावर घराण्यातीलच काहींचा रोष होता. त्यांचे ग्वाल्हेर येथेच निधन झाले.

– चैतन्य कुंटे

## पंडित, कृष्णराव शंकर

**गायक**

**२६ जुलै १८९३ – २२ ऑगस्ट १९८९**

महाराष्ट्राबाहेर ग्वाल्हेर या मराठी संस्थानात राहून घरंदाज गायकी जपणाऱ्या कृष्णराव शंकर पंडित यांचा उल्लेख विसाव्या शतकातील ‘संगीत भीष्माचार्य’ म्हणून केला जातो. ग्वाल्हेर येथे पंडित घराण्यात त्यांचा जन्म झाला. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई होते.

आपले पिता गायक शंकर पंडित (१८६३ - १९१७) यांच्याकडून कृष्णराव पंडितांना ग्वाल्हेर



घराण्याच्या अष्टांग गायकीची तालीम मिळाली. निसार हुसेन खाँसह तत्कालीन अनेक गवैयांचा सहवास त्यांना लाभला. गायनाबरोबर तबला, पखवाज, सतारही ते शिकले. ख्यालासह धृपद, ठुमरी, होरी, टप्पा, तराणा, त्रिवट, चतुरंग, अष्टपदी, भजन इ. प्रकार ते पेश करत. तीनही सप्तकांत सहज व चपळाईने फिरणारा लवचीक आवाज लाभलेल्या पंडितजींच्या गायकीत दमसांसयुक्त आलापचारी, बेहलावा, गमकेच्या बोलताना, दाणेदार सङ्घाच्या ताना व तालावरची हुकूमतही दिसे. महाराष्ट्रात प्रचलित झालेल्या ग्वाल्हेर घराण्याच्या ख्यालगायकीपेक्षा निराळी, मूलस्रोत मानली जावी अशी जोशपूर्ण व गतिप्रधान गायकी ते गात. त्यांच्या ख्यालगायकीत टप्पा अंग बरेच आढळते. मींड-गमक-बेहलाव्यासह खटका-मुरकी-झमझमा-गिटकडी यांचाही ते प्रचुर वापर करीत.

त्यांनी ३१ जानेवारी १९१४ रोजी ग्वाल्हेर येथे संगीत विद्यालय सुरू केले. वडिलांच्या स्मृतिनिमित्त १९१७ साली त्याचे नामकरण 'शंकर महाविद्यालय' असे केले. विद्यालयात संगीतशिक्षणाबरोबरच अनेक नामवंत व शिकाऊ कलाकारांच्या मैफली 'गुरुवासरीय सभा'मध्ये होत. त्यांनी १९१२ च्या सुमारास स्वतःची स्वरलिपी निर्माण केली होती व या लिपीतच त्यांनी पुस्तके लिहिली. त्यांनी संगीत सरगम सार व हार्मोनिअम शिक्षा- २ भाग (१९२४), संगीत प्रवेश- २ भाग (१९२८), संगीत आलाप संचारी (१९३०), सितार और जलतरंग शिक्षा (१९३३), तबला वादन शिक्षा (१९४१) ही पुस्तके प्रकाशित केली. त्यांनी अनेक बंदिशींची रचनाही केली.

१९११-१२ साली सातारा संस्थानने त्यांना राजगायकाचा किताब दिला. त्यांनी १९२५ ते १९३६ या काळात दोनदा ग्वाल्हेर दरबारचे राजगायकपद स्वीकारले व त्यागले. ते १९३६ ते १९४८ या काळात ग्वाल्हेर दरबारचे राजगायक होते.

वयाच्या चौदाव्या वर्षी म्हणजे १९०७ साली पहिली जाहीर मैफल करणाऱ्या पंडितजींनी १९८६ साली वयाच्या ९३व्या वर्षी सार्वजनिक कार्यक्रमांत गायन थांबवले. मुलतानपासून ढाक्यापर्यंत आणि काश्मिरपासून मद्रासपर्यंत भारतभर त्यांच्या यशस्वी मैफली झाल्या. ते १९४० पासून आकाशवाणीसाठी नियमितपणे गायन करू लागले. कोलंबिया कंपनीने १९४८च्या सुमारास त्यांच्या २ ध्वनिमुद्रिका काढल्या, यांत ते दरबारी कानडा, गौडसारंग व भैरवी टप्पा गायले होते. एच.एम.व्ही.ने १९७२ साली त्यांची जयजयवंती, हमीर व काफी टप्पा अशी दीर्घ ध्वनिमुद्रिका काढली. आकाशवाणीनेही त्यांच्या गायनाचे ध्वनिमुद्रण प्रसिद्ध केले आहे. फिल्म डिव्हिजन ऑफ इंडियाने १९८७ साली 'पंडित कृष्णराव शंकर पंडित' हा चरित्रपट निर्माण केला. भोपाळ येथील भारत भवन या संस्थेने नोव्हेंबर १९८५ मध्ये 'कृष्णराव पंडित प्रसंग' हा महोत्सव केला.

त्यांना सांगीतिक योगदानासाठी अनेक सन्मान लाभले, ते असे- गायक शिरोमणी (१९२१, अखिल भारतीय काँग्रेस, अहमदाबाद), भारत सरकारतर्फे राष्ट्रपतींच्या हस्ते 'राष्ट्रीय गायक' किताब (१९५९), सन्माननीय डॉक्टरेट (खैरागढ विद्यापीठ, १९६१), पद्मभूषण (१९७३), शिखर सम्मान (मध्यप्रदेश सरकार, १९७३), तानसेन सम्मान (मध्यप्रदेश सरकार, १९८०), संगीत रिसर्च अकादमी पुरस्कार (१९८६).

प्रदीर्घ कारकीर्द गाजवणाऱ्या पंडितजींचा मोठा शिष्यवर्ग भारतभर पसरलेला होता. त्यांचे पुत्र लक्ष्मण, नारायण, चंद्रकांत, भाचे सदाशिवराव अमृतफळे, केशवराव सुरंगे (व्हायोलिनवादक) तसेच एकनाथ सारोळकर, पांडुरंग उमडेकर, मानवलकर (ग्वाल्हेर), पुरुषोत्तम व रामचंद्र सप्तर्षी (दिल्ली), नारायण जोशी (कानपूर), विश्वनाथ रिंगे (इंदूर), शरच्चंद्र आरोळकर,

गोपाळराव पटवर्धन (मुंबई), सुमन चौधरी, दत्तात्रेय पनके (अमरावती), केशवराव राजहंस (नागपूर), गोविंदराव कुलकर्णी (जळगाव), काशीनाथ तुळपुळे इ. त्यांचे मुख्य शिष्य होत. ग्वाल्हेर येथे वयाच्या शहाण्णवव्या वर्षी वृद्धापकाळ व न्यूमोनियाने या गानमहर्षींचे निधन झाले.

— चैतन्य कुंटे

## पंडित, देवकी सुधाकर
**गायिका**
**६ मार्च १९६५**



देवकी सुधाकर पंडित यांचा जन्म व शिक्षण मुंबईत झाले. त्यांची गाण्याची साधना लहानपणापासूनच सुरू झाली. त्यांच्या आई उषा पंडित या गायिका असल्याने गाण्याचे सुरुवातीचे संस्कार त्यांनीच केले.

वयाच्या नवव्या वर्षी देवकी पंडित यांनी पहिली मैफल सादर केली. वयाच्या बाराव्या वर्षी त्यांची पहिली ध्वनिमुद्रिका पॉलिडॉर कंपनीतर्फे प्रसिद्ध झाली. त्यांना अत्यंत प्रतिष्ठित अशी ‘केसरबाई केरकर शिष्यवृत्ती’ मिळाली.

पहिली काही वर्षे देवकी पंडित पं. वसंतराव कुलकर्णींकडे शिकल्या. कुलकर्णी यांनीच त्यांना शास्त्रीय संगीताची ओळख करून दिली. वयाच्या अठरा-एकोणिसाव्या वर्षीच त्यांनी भावसंगीत, गझल, दूरदर्शनवरील मालिकांची शीर्षकगीते, चित्रपटगीते असे सुगम संगीताचे अनेक प्रकार गायला आरंभ केला. १९८६ मध्ये त्यांना ‘अर्धांगी’ या चित्रपटातील गीतासाठी महाराष्ट्र राज्यसरकारचा, सर्वोत्कृष्ट पार्श्वगायिकेचा पुरस्कारही मिळाला. परंतु शास्त्रीय संगीताच्या ओढीमुळे पुढील काही वर्षे त्यांनी किशोरी आमोणकरांकडून मार्गदर्शन घेतले.

त्यानंतरची जवळजवळ अकरा वर्षे गायक, संगीतकार व गुरू असलेल्या पं. जितेन्द्र अभिषेकींकडे देवकी पंडित यांनी शिक्षण घेतले. त्यांच्याकडे शिकताना गाण्याच्या विविध अंगांचे, प्रकारांचे व सादरीकरणाबद्दलचे ज्ञान वाढतच गेले. पं. बबनराव हळदणकरांचेसुद्धा त्या वेळोवेळी मार्गदर्शन घेत असतात.

गाण्याच्या विविध प्रकारांचा सखोल अभ्यास, त्यांची साधना, त्यांवरील पकड आणि उत्कृष्ट सादरीकरण यांमुळेच देवकी पंडित यांचे संगीत क्षेत्रातील वेगळेपण उठून दिसते. शास्त्रीय संगीत, उपशास्त्रीय संगीत, सुगम संगीत, चित्रपट संगीत, इ. अनेक प्रकार त्या समर्थपणे गातात.

देवकी पंडित गेली अनेक वर्षे देश-विदेशांत आपली कला सादर करीत आहेत. अत्यंत प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या सवाई गंधर्व संगीत महोत्सव, मैहर संगीत महोत्सव, देवगंधर्व संगीत महोत्सव, स्पिरिट ऑफ युनिटी कॉन्सर्ट्स ऑफ युनिव्हर्सल इंटिग्रेशन इ. महोत्सवांत त्यांना गाण्याचा मान मिळाला आहे.

नौशाद, जयदेव, सुधीर फडके, श्रीनिवास खळे, यशवंत देव, पं. शिवकुमार शर्मा, पं. हरिप्रसाद चौरासिया, उस्ताद झाकीर हुसेन, आनंद मोडक, पं. हृदयनाथ मंगेशकर, सुधीर मोघे, अशोक पत्की आणि इतर अनेक संगीतकारांसाठी विविध चित्रपटगीते, गीतमाला (अल्बम्स), दूरचित्रवाणीवरील मालिकांची शीर्षकगीते यांचे, तसेच अनेक कार्यक्रमांतून त्यांनी गायन केले आहे. ‘झी मराठी’ वाहिनीवरील ‘सारेगम’ या कार्यक्रमात माननीय परीक्षक म्हणून त्यांनी काम पाहिले आहे. त्यांनी आराधना महाकाली, रामरक्षा स्तोत्रम्, गणाधीश इ. गीतमालांसाठी संगीत दिग्दर्शनही केले आहे.

त्यांना महाराष्ट्र राज्य शासनाचे सर्वोत्कृष्ट पार्श्वगायनाचे तीन पुरस्कार (१९८६, २००१, २००२) प्राप्त झाले. तसेच, ‘अल्फा गौरव’ पुरस्कार व मेवाती घराना अवॉर्ड (२००२) आणि राष्ट्रपती ए.पी.जे.

अब्दुल कलाम यांच्या हस्ते इंडियन म्यूझिक अकादमीचे ‘यंग माइस्ट्रो अवॉर्ड’ मिळाले.

– मनीषा जोशी

## पंडे, बळीराम कृष्ण

**तबला व मृदंगवादक**

**१ ऑगस्ट १८८५ – १३ ऑक्टोबर १९४५**



बळीराम कृष्ण पंडे यांचा जन्म नागपूर जिल्ह्यातील मोहपा या गावी झाला. श्रीमंती थाट असणाऱ्या कृष्ण यांचा मालगुजारीचा व्यवसाय होता. त्यांना तबला-मृदंगाची मनापासून आवड होती. मुलाने तालज्ञ होऊन घराण्याचे नाव राखावे यासाठी मुलाला योग्य गुरू शोधून शिक्षण देण्याच्या उद्देशाने कृष्णराव गाव सोडून नागपूरला आले.

बळीराम पंडे यांनी नागपूरला अलकुटकर बुवांजवळ बरीच वर्षे मेहनत करून पानसे घराण्याचा शुद्ध बाज आत्मसात केलाच, शिवाय सखारामबुवा आगले आणि शंभुप्रसाद पखवाजी या गुणिजनांकडून मार्गदर्शन घेऊन लयताल व गणितशास्त्रात नैपुण्य मिळविले. श्रीमंत राजे रघुजीराव भोसले हे रसिक व कलाकारांचे चहाते असल्याने त्यांनी पंड्यांना दरबारी संगीतज्ञ म्हणून नेमले. त्यामुळे लाहोरला तबलानवाज फकीरबक्ष यांच्याशी पंड्यांचा परिचय झाला. कलकत्त्याला स्वामी विवेकानंदांच्या गायनाला त्यांनी तबला संगत करून खूप प्रशंसा मिळिविली.

ऐश्वर्यसंपन्न व जमीनदार असलेले बळीराम पंडे साधे, शांत, निरभिमानी, मनमिळाऊ होते आणि अत्यंत आतिथ्यशील, तसेच लोकसंग्रही होते. त्यामुळे त्यांचे घर म्हणजे कलाकारांचे माहेरघरच होते. बऱ्हाणपूरकर बुवा, हिराबाई बडोदेकर, अब्दुल करीम खाँ, नत्थन खाँ, अलकुटकर बुवा, हरिभाऊ घांग्रेकर, वल्यावस्ताद इ. अनेकांचा मुक्काम त्यांच्याकडेच असे. नेहमी चालणाऱ्या बैठकींमुळे त्यांचे घर सदैव स्वर-तालाने निनादत असे. गृहस्थ जीवनात मात्र पंडे दुर्दैवी ठरले. त्यांची पत्नी व एकुलता एक मुलगा परलोकवासी झाले. पुनर्विवाह न करता त्यांनी सारे आयुष्य संगीताच्या प्रचार-प्रसारासाठी वेचले.

बळीराम पंडे यांनी १५ मार्च १९२६ रोजी ‘बलवंत वादन कलाभुवन’ या नावाने संगीत विद्यालय सुरू केले. नऊ वर्षे त्यांनी स्वत: विद्यालयाचे संचालन करून बराच शिष्यपरिवार तयार केला. बाळासाहेब आठवले, शांताराम यावलकर, नीळकंठराव मूर्ते, कृष्णराव दलाल, गंगाराम पखावजी हे त्यांपैकी काही जण होत.

पंडे यांची शिक्षणपद्धती कडक होती. तालाचे विशिष्ट बंधन, हातावर टाळी देऊन बोल मुखोद्गत करणे, लयकारी अंगी बाणवणे व गणित पक्के करणे हे त्यांच्या शिकवण्याचे आणि पानसे घराण्याचे वैशिष्ट्य होते. पाठ पूर्णत: पक्का झाल्यावरच ते विद्यार्थ्याला तबल्याला हात लावू देत. हातावरचा ठेका अनेक दिवस चाले.

नि:स्पृहपणा, निष्पक्षता व निस्संकोचपणा हे त्यांचे शिक्षणाविषयीचे तत्त्व होते. वादनाचार्य पं. बळीराम पंडे यांनी पानसे घराण्याचा शुद्ध बाज अंगी बाणवला. तबला-मृदंग वादनशैलीचा नागपूर व इतरत्र प्रसार करण्याचे श्रेय त्यांचेच आहे.

– वि. ग. जोशी

## पई, रत्नाकर शांताराम

**गायक**

**१७ ऑगस्ट १९२८ – ९ ऑगस्ट २००९**

जयपूर गायकीशी एकनिष्ठ राहून श्रद्धेने आणि इमानाने गाणारे गायक रत्नाकर शांताराम पई यांचा जन्म सावंतवाडी येथे झाला. वडिलांना गायनाची आवड होती. त्यांच्या आईचे नाव रमाबाई होते. रत्नाकर पई यांना लहानपणापासूनच गाण्याची आवड होती.

प



शाळेत, तिसऱ्या इयत्तेत शिकत असतानाच त्यांचे गाणे उ. अब्दुल करीम खाँसाहेबांचे शिष्य बेहेरेबुवा यांनी ऐकले. बेहेरेबुवा हे त्याच शाळेत संगीत शिक्षक होते. ‘‘तुला मोठी मंडळी गातात तसं गायचं असेल तर पद्धतशीर गाणं शिकायला हवं,’’ असे बेहेरेबुवांनी सांगितले, आणि रत्नाकर पई यांचे शालेय शिक्षणाबरोबर गायनाचे शिक्षणही सुरू झाले.

रत्नाकर पई यांचे संगीताचे प्रारंभिक शिक्षण बेहेरेबुवांचेच शिष्य एन.एल. रानडे यांच्याकडे सुरू झाले. पुढे बेहेरेबुवा कोकणात गेल्यामुळे रानडे यांच्यानंतर रत्नाकर पई मोहनराव पालेकर यांच्याकडे शिकू लागले. रानडे कौटुंबिक अडचणी सोडविण्यासाठी अलिबागला गेले ते परत आलेच नाहीत; त्यामुळे रत्नाकरांच्या वडिलांनी पालेकरांनाच त्यास तालीम देण्याची विनंती केली. रत्नाकर पई १९४१ पासून यांना मोहनराव पालेकरांची तालीम सुरू झाली. मोहनराव पालेकर हे जयपूर घराण्याचे विद्वान गायक आणि अनवट बंदिशीतील मर्मज्ञ जाणकार. मोहनरावांनी जहांगीर खाँसाहेबांचे नातू अहमदभैया यांच्याकडून जयपूर-अत्रौली घराण्याची पक्की तालीम घेतली होती. १९४१ ते १९६२ अशी जवळजवळ अठरा वर्षे रत्नाकर पईंनी मोहनराव पालेकरांकडून तालीम घेतली. रत्नाकर पईंचे गायन शिक्षणाबरोबरच शालेय शिक्षणही सुरू होते. मॅट्रिक झाल्यानंतर सिडन्हॅम महाविद्यालयामधून त्यांनी मुंबई विद्यापीठाची वाणिज्य शाखेची पदवी घेतली. त्यानंतर वडील ज्या कंपनीत काम करत होते, त्याच म्हणजे फोर्ब्स ॲण्ड फोर्ब्स कंपनीत त्यांनी नोकरी केली.

मोहनराव पालेकरांचे १९६२ साली निधन झाले, त्यानंतर रत्नाकर पईंनी जयपूर घराण्याचे गायक गुलूभाई जसदनवाला यांच्याकडे तालीम घेतली. गुलूभाई हे व्यापारी क्षेत्रातले, गाणे हा त्यांचा शौक होता. गुलूभाईंनी प्रथम मंजी खाँसाहेबांची व त्यानंतर अल्लादिया खाँसाहेबांची तालीम घेतली होती. जवळजवळ तीन हजारांच्या आसपास बंदिशी त्यांच्या संग्रहात होत्या. रत्नाकर पई यांची गायकी व बंदिशींचा संग्रह गुलूभाईंच्या तालमीमुळे अधिक समृद्ध झाला.

गुरुजनांकडून मिळालेल्या परंपरागत अभिजात आणि अवघड गायकीचे जतन करून, कुठल्याही प्रकारची भेसळ न करता ती सातत्याने व श्रद्धेने मांडणे हे रत्नाकर पईंचे योगदान होय. जयपूर गायकी ही बुद्धिप्रधान गायकी. रत्नाकर पईंनी या श्रीमंत गायकीचा बोज व आब राखून, करमणुकीच्या वा रंजकतेच्या पातळ थरावर येऊ न देता पेश केली. त्यांच्याकडे वेगवेगळ्या रागांतील व तालांतील विविध बंदिशींचा प्रचंड संग्रह होता. मेघावली, गोधनी, बरारी, कौशी बहार, बागेश्री बहार, बसंती केदार, तसेच कानडा व नटाचे असंख्य प्रकार त्यांच्या संग्रहात होते. आमराग, अनवट राग, जोडराग, ते सहजपणे मांडत. रत्नाकर पई म्हणजे जयपूर घराण्याच्या राग-बंदिशींचा महाकोषच होते.

पातळ, सुरेल व टोकदार आवाज, बंदिशींची काटेकोर मांडणी, आडलयीशी सतत चाललेला खेळ, लयीला लपेटून अनाघाती आलापी आणि बलपेचाच्या दुहेरी पेडाच्या गुंतागुंतीच्या ताना हे पईंच्या गायनाचे वैशिष्ट्य; परज, पटबिहाग, डागोरी इत्यादी रागांत ते अधिक खुलत. ते १९६७ पासून मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागात जयपूर घराण्याचे उस्ताद म्हणून कार्यरत होते. आकाशवाणीवर ते ‘ए’ ग्रेड कलावंत होते. त्यांना १९९५ साली महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक पुरस्कार मिळाला. त्यांना २००१ साली आयटीसी संगीत रिसर्च अकॅडमीचे पारितोषिक मिळाले.

अनेक जणांनी त्यांच्याकडून तालीम घेतली, तसेच मार्गदर्शनही घेतले. त्यांच्या प्रमुख शिष्यांत पं. जितेंद्र अभिषेकी, नरेंद्र कणेकर, अश्विनी भिडे-देशपांडे,

प

मिलिंद मालशे, भालचंद्र टिळक यांचा समावेश आहे. वयाच्या ऐंशीव्या वर्षी त्यांचे मुंबईत निधन झाले.

— माधव इमारते

## पटवर्धन, गुरुदेवजी

***पटवर्धन, दत्तात्रेय वासुदेव***

**मृदंगवादक**

**१८७० — १९१७**



दत्तात्रेय वासुदेव पटवर्धन यांचा जन्म दक्षिण महाराष्ट्रातील मिरज संस्थानात झाला. त्यांचे पूर्वज राजांकडे पौरोहित्य करत असत. घराणे वैदिकांचे असल्यामुळे घरात संस्कृत अध्ययनाची परंपरा होती. त्यांनी संस्कृत शिकून गुरुजनांकडून वेदविद्या ग्रहण केली. कुशाग्र बुद्धीमुळे ते लवकरच घनपाठी झाले.

माधवजींच्या मंदिरात पटवर्धन यांचे संगीत शिक्षणही चालले होते. मिरजेच्या रामभाऊ गुरवांकडे ते तबल्याचे शिक्षण घेत होते. पुढे त्यांनी दक्षिण हैदराबादचे रहिवासी पं. वामनराव चांदवडकर यांच्याकडे पखवाजाची रीतसर तालीम घेतली. अभ्यास आणि सराव या दोन्हींसाठी भरपूर कष्ट घेतले. नंतर ते ‘मृदंगाचार्य’ या पदवीने अलंकृत झाले.

पं. विष्णू दिगंबर पलुसकर यांचे ते मित्र होते. पं. विष्णू दिगंबरांनी ५ मे १९०१ रोजी लाहोर येथे गांधर्व महाविद्यालयाची स्थापना केली. तेव्हापासून दत्तात्रेय पटवर्धन तेथे उप-प्राचार्य म्हणून कार्यरत होते. ते महाविद्यालयात तबला व मृदंग या दोन्हींचे शिक्षण देत असत. त्यांचे पुष्कळ विद्यार्थी पुढे ख्यातनाम झाले. याच सुमारास त्यांना ‘गुरुदेवजी’ ही पदवी बहाल झाली.

भारतातील विभिन्न प्रांतांतील संगीत परिषदांमध्ये मोठमोठ्या कलाकारांची तबला-संगत ते कौशल्याने करीत. यात गायकांप्रमाणे वादक कलाकारांबरोबरही ते तबला वाजवत. त्याचप्रमाणे स्वतंत्र वादनातही त्यांचे नैपुण्य वादातीत होते. पं. पलुस्करांबरोबर ते नेहमी साथ करत. त्यांनी ‘तबलातरंग’ हा नवीन उपक्रम त्या काळी केला आणि तज्ज्ञांनी त्यांची खूप प्रशंसा केली. गुरुमुखी शिक्षणाप्रमाणेच पुस्तकांच्या माध्यमातही ज्ञान द्यायला हवे ही गोष्ट ध्यानी घेऊन १९०३ साली त्यांनी ‘मृदंग तबला वादन पद्धती’ हे पुस्तक लिहिले. पुढे त्याची द्वितीय आवृत्ती त्यांचे पुतणे पं. विनायकराव पटवर्धनांनी १९३८ साली आणि नंतर १९८२ साली संगीत नाटक अकादमीने प्रसिद्ध केली.

ते १९१४ सालच्या आसपास लाहोरहून मिरजेस परत आले. नानासाहेब पानसे यांचे शिष्य चांदवडकर यांच्याकडून घेतलेली विद्या शिष्यांना ते शेवटपर्यंत देत होते. त्यांचे १९१७ साली साथीच्या रोगाने अवघ्या सत्तेचाळिसाव्या वर्षी निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*गर्ग, लक्ष्मीनारायण; ‘हमारे संगीत रत्न’; संगीत कार्यालय, हाथरस; जून १९५७.*

प

## पटवर्धन, गोविंदराव विठ्ठल

**हार्मोनिअमवादक**

**२१ सप्टेंबर १९२५ — ३१ जानेवारी १९९६**



हार्मोनिअमवादनाच्या संदर्भात दोन ‘गोविंदरावांचा’ उल्लेख आदराने केला जातो : पहिले गोविंदराव टेंबे व दुसरे गोविंदराव पटवर्धन. कितीही मुश्कील गायकी असली तरी टीपकागदाप्रमाणे ती उचलून आपल्या वादनात सहीसही उतरवणारे गोविंदराव पटवर्धन हे उत्तम एकल हार्मोनिअमवादक म्हणूनही प्रसिद्ध होते.

आपल्या आजोळी, गुहागरजवळच्या अडूर या कोकणातल्या गावी गोविंदराव विठ्ठल पटवर्धन यांचा

जन्म झाला. ते १९३० च्या सुमारास वडिलांबरोबर मुंबईस आले. व्हर्न्याक्युलर फायनलनंतर त्यांचे आर्यन एज्युकेशन स्कूलमध्ये शिक्षण झाले व १९४२ साली ते मॅट्रिक झाले. ते १९४७ साली पोलीस खात्यात नोकरीला लागले. उपजीविकेसाठी त्यांनी पोलीस खात्यात नोकरी केली, मात्र त्यांची खरी निष्ठा संगीतावरच होती.

त्यांना घरातूनच संगीताचा वारसा लाभला होता. त्यांचे काका शंकरराव पटवर्धन व मामा गोविंदराव कानिटकर हे चांगल्यापैकी गात असत. शंकररावांना पेटी शिकवायला हरिभाऊ पराडकर हे येत असत. ती शिकवणी झाली की बालगोविंदाही पेटी वाजवू लागे. गोविंद सहाव्या वर्षी स्वातंत्र्यचळवळीत होणाऱ्या प्रभातफेऱ्यांत गाण्यांना साथ करू लागला. सूरतालाची उपजत जाण घेऊन जन्मलेले गोविंदराव कुणाकडे रूढ शिक्षण न घेताच तेराव्या वर्षापासून हार्मोनिअम व तबला वाजवू लागले.

त्यांनी काही काळ हरिभाऊ पराडकर व पुरुषोत्तम सोलापूरकर यांच्याकडे शिक्षण घेतले. पी. मधुकर, राईलकर, नन्हेबाबूंचे शिष्य नागपूरचे चौरीकर अशा वादकांचे एकलवादनही त्यांना प्रभावित करून गेले. गोविंदराव टेंबे, शंकरराव खातू व पी. मधुकर यांच्याही सहवासातून त्यांनी काही गोष्टी टिपून घेतल्या.

गोविंदराव पटवर्धनांनी प्रथम पुरुषोत्तम सोळांकुरकर यांना हार्मोनिअमची साथ केली व त्यांचा हार्मोनिअम साथसंगतीचा अध्याय सुरू झाला.

गोविंदरावांनी १९४२ पासून मुंबई मराठी साहित्य संघ, ललितकलादर्श व इतर अनेक नाट्यसंस्थांच्या संगीत नाटकांच्या हजारो प्रयोगांना ऑर्गनची साथ केली. त्यांची स्मरणशक्ती व अंगातील धमक जबरदस्त होती, त्यामुळे शेकडो संगीत नाटके त्यांना मुखोद्गत होती व त्यांचे तासन्तास चालणारे शेकडो प्रयोग त्यांनी लीलया वाजवले. नाटकात गायकाची पट्टी कोणतीही असो, ऑर्गनवर ते नेमकेपणाने सूर देऊन त्या पट्टीत सहजपणे साथ करत. आपल्या वादनातून नाट्यपदांतल्या शब्दांचाही प्रत्यय देणे हीसुद्धा त्यांची खासियत होती.

नाट्यसंगीतासाठी बालगंधर्व, दीनानाथ, हिराबाई बडोदेकर, भालचंद्र पेंढारकर, राम मराठे, छोटा गंधर्व, सुरेश हळदणकर, वसंतराव देशपांडे, जयमाला शिलेदार, सुहासिनी मुळगावकर, प्रसाद सावकार, इ. अनेक कलाकारांना त्यांनी मनापासून साथ केली. जुन्या संगीत नाटकांबरोबरच ‘जय जय गौरीशंकर’, ‘पंडितराज जगन्नाथ’, ‘मंदारमाला’, ‘कट्यार काळजात घुसली’ अशी साठोत्तर संगीत नाटकेही त्यांनी वाजवली.

कुमार गंधर्व, राम मराठे, वसंतराव देशपांडे, माणिक वर्मा, सुरेश हळदणकरांच्या नाट्यसंगीताच्या ध्वनिमुद्रिकांतील गोविंदरावांची साथ आदर्शवत आहे. त्यांनी १९७६ साली गुहागरच्या गावकऱ्यांनी बसवलेल्या ‘संगीत सौभद्र’ या नाटकात अर्जुनाची भूमिकाही केली होती. अनेक नवोदित गायक-गायिकांना ते उत्साहाने नाट्यपदे बसवून देत असत.

रागसंगीताच्या मैफलींत गोविंदराव १९४२ पासून कुमार गंधर्व, १९४४ पासून राम मराठे, १९६१ पासून माणिक वर्मा, १९६८ पासून वसंतराव देशपांडे यांना साथ करू लागले व त्यांनी शेकडो मैफली रंगवल्या. रामकृष्णबुवा वझे, विलायत हुसेनखाँ, लताफत हुसेनखाँ, मोगूबाई कुर्डीकर, सुरेशबाबू माने व हिराबाई बडोदेकर, बी.आर. देवधर, अंतूबुवा व गजाननबुवा जोशी, हरिभाऊ घांग्रेकर, कागलकरबुवा, निवृत्तीबुवा सरनाईक, मल्लिकार्जुन मन्सूर, वामनराव सडोलीकर, गिंडे-भट, कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, छोटा गंधर्व, माणिक वर्मा, शोभा गुर्टू, तसेच नंतरच्या पिढीतील मालिनी राजूरकर, प्रभाकर कारेकर, उल्हास कशाळकर, अश्विनी भिडे, इ. कितीतरी घराण्यांच्या श्रेष्ठ कलाकारांना गोविंदरावांनी संगत केली.

राम मराठे यांच्या मुश्कील गायकीला साथ करतेवेळी गोविंदराव ते सगळे गाणे हार्मोनिअमवर तंतोतंत वाजवत असत. त्यांच्या वादनातील सफाई, नेमकेपणा विलक्षण

प

होता. 'साथ करायला बसलो की गायक गुरू व आपण शिष्य', ही गोविंदरावांची भावना असे.

गायक गाईल ते सर्व आपल्या वाद्यातून वाजवण्याची ईर्षा व क्षमता गोविंदरावांमध्ये होती; पण त्यामुळे साथ करताना त्यांनी कधी गायकावर कुरघोडी केली नाही. एका बाजूला राम मराठे यांची बिकट तनैयत ते जशीच्या तशी वाजवून 'वाहवा' घेत, मात्र दुसऱ्या बाजूला आलापचारी चालू असताना संयमही बाळगत असत. कुमार गंधर्वांबरोबर साथ करताना, सुरुवातीला स्वर-श्रुतींचे सूक्ष्म दर्जे दाखवणारी आलापचारी चालू असताना कित्येकदा गोविंदराव केवळ षड्ज-पंचम स्थिरपणे धरून त्याचा भरणा देत आणि तेही असे, की जणूकाही त्या षड्ज-पंचम स्वरांतून कुमारजींच्या श्रुतींशी त्यांचा मूकसंवाद चालू आहे! पुढे बंदिशी व तानेची कामगत चालू झाली की मग गोविंदरावांच्या हातांतून ते गाणे तेवढ्याच नेमकेपणाने उतरत असे. कुमारजींच्या रागसंगीताच्या अनेक ध्वनिमुद्रणांत, तसेच 'त्रिवेणी' या भजनांच्या ध्वनिमुद्रिकेत या नेमकेपणाचा प्रत्यय येतो.

कलाकाराला आपल्या वादनातून खुलवणे हेही त्यांचे वैशिष्ट्य होते. वयाने त्यांच्यापेक्षा लहान असणाऱ्या मालिनी राजूरकरांना साथ करताना त्यांचे ख्याल व टप्पा-गायन चालू असताना सूचक व पोषक स्वरसंगतीतून ते प्रोत्साहन देत असतच, शिवाय महाराष्ट्राबाहेर लहानपण गेलेल्या मालिनीताईंना नाट्यसंगीत गाण्यासंबंधी त्यांनी मार्गदर्शनही केले.

गोविंदरावांचे हात अतिशय चपळ, तयार, चुरचुरीत होते. नजाकतीपेक्षा तयारी व तानक्रियेवर त्यांचा भर होता. अगदी अवघड अशी कामगतही ते सफाईने, सहजतेने वाजवत असत. हरकती, खटके, मुरकी, कणस्वर, लहानलहान स्वराकृती त्यांच्या हातांतून कोणत्याही लयीत अगदी अलगदपणे व साफ वाजत.

पूर्वसुरींप्रमाणेच गोविंदरावांचे एकलवादन म्हणजे एखाद्या रागातील झपताल, रूपक तालातील मध्यलयीची चीज व द्रुत बंदिश, नंतर रसिकप्रिय अशी अनेक नाट्यगीते अशा साच्याचे होते. मधुवंती, मारवा, पूरियाकल्याण, तिलककामोद, बागेश्रीकंस, चंद्रकंस, बसंत, सोहनी असे राग, तर 'दे हाता शरणागता', 'युवती मना', 'प्रभू अजि गमला', इ. नाट्यपदे त्यांची अगदी आवडती होती.

विलंबित ख्याल वा गतकारी त्यांनी फारशी वाजवली नाही किंवा हे एक स्वतंत्र वाद्य म्हणून त्याचा काही वेगळा विचार व्हावा असे त्यांना वाटले नाही; केवळ 'गाणे' वाजवणे अशीच त्यांची एकलवादनाबद्दलची भूमिका होती. अर्थात ते वाद्यवादनातील लयकारीचे पलटे, अतिद्रुत लयीतील झाला वाजवत असत. गोविंदराव पटवर्धन अनेक गायकांची 'शिष्यभावने'ने उत्तम साथ करत आणि त्या-त्या गायकीतले बारकावे वेचून आपले एकलवादनही सादर करत. त्यांच्या एकलवादनात पं. राम मराठ्यांच्या गायकीची सुंदर छाप दिसत असे. एकलवादनाच्या त्यांच्या ध्वनिफितीही प्रसिद्ध झाल्या होत्या.

कोकणात जन्मलेला व वृत्तीनेही कोकणी असणारा हा साधासुधा माणूस शेवटपर्यंत व्यवहाराच्या बाबतीत अगदी अलिप्त, तरीही समाधानी राहिला. आपल्या चौरस संसाराचा त्यांनी नेटका पट मांडला. गोविंदरावांनी कन्या वासंती व कालिंदी यांना अनुक्रमे व्हायोलिन व हार्मोनिअममध्ये तयार केले; पण कलाक्षेत्रात राहण्याची सक्ती केली नाही. मात्र आपले शिष्य विश्वनाथ कान्हेरे, डॉ. विद्याधर ओक, मकरंद कुंडले इत्यादींना मुक्तहस्ताने शिकवले.

रूढार्थाने दिल्या जाणाऱ्या पुरस्कारांपासून ते वंचित राहिले. पण त्यांच्या वादनाला मिळणारी गवैयांची व रसिकांची दाद हा पुरस्कार-शिरोमणी त्यांच्या मुकुटात नेहमीच होता. गोविंदरावांना मुंबईतील राहत्या घरी पहाटे हृदयविकाराचा सौम्य झटका आला व त्यांनी शांतपणे या जगाचा निरोप घेतला. जन्मभर हार्मोनिअम या वाद्याशी सान्निध्य असल्याने कुणी कोटीबहाद्दराने त्यांना गोविंदराव पटवर्धनऐवजी 'पेटीवर्धन' म्हटले, ते सार्थच होय!

— चैतन्य कुंटे

प

## पटवर्धन, दत्तात्रेय वासुदेव

☛ *पटवर्धन, गुरुदेवजी*

## पटवर्धन, विनायक नारायण

**गायक, गुरू**

**२२ जुलै १८९८ – २३ ऑगस्ट १९७५**



विनायक नारायण पटवर्धन यांचा जन्म मिरजेला झाला. त्यांचे घराणे पुरोहितांचे होते. मिरज संस्थानाचे कुलपुरोहित म्हणून त्यांच्या वाडवडिलांपासून घरात वैदिक संस्कार होते. प्लेगच्या साथीत, १९०२ साली आई गंगाबाई व वडिलांचे निधन झाले. काका केशवराव पटवर्धन यांनी विनायकरावांचे संगोपन केले व संगीताचे प्रारंभिक धडेही दिले. त्या काळी संगीताचार्य पं.विष्णू दिगंबर पलुसकरांचा गायक म्हणून मोठा लौकिक होता आणि त्यांनी लाहोरमध्ये गांधर्व महाविद्यालयाची स्थापना केल्याचे सर्वविदित होते. मिरजेचे संस्थानिक श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन यांनी शिष्यवृत्ती देऊन विनायकरावांना विष्णूबुवांच्या स्वाधीन केले.

विनायकरावांचे १९०७ सालापासून पं. विष्णू दिगंबरांकडे संगीत शिक्षण झाले. त्यांचा आवाज मुळात ढाला होता, मात्र मेहनतीने त्यांनी तो सफेद तीन या उंच पट्टीत गाण्यास अनुकूल केला. त्यामुळे त्यांचे गाणे बुलंद, पहाडी झाले.

बुद्धी चांगली आणि स्वभाव मेहनती, त्यामुळे भरपूर सराव करून ते शिकवलेल्या विद्येचे चोख पाठांतर करीत. गुरूंबद्दल अतिशय श्रद्धा व निष्ठा असलेल्या विनायकरावांनी गायनाबरोबर कथक नृत्य, तबलावादन आणि सतार, जलतरंग, बीनसारख्या वाद्यांचे वादन अवगत करून घेतले होते. वाद्यदुरुस्तीच्या कामातही ते तरबेज होते.

पंडितजींनी मुंबई व नागपूरच्या गांधर्व महाविद्यालयात त्यांना शिक्षणकार्य करावयास सांगितले. त्यांचे १९०७ ते १९१४ सालापर्यंत शिक्षण झाल्यावर पुढील काळात अध्यापन करीत असताना मैफली गायक म्हणून विनायकरावांना प्रसिद्धी मिळत होती. मे १९२२ पर्यंत त्यांचे नागपूरला अध्यापन चालू होते.

ऑगस्ट १९२२ मध्ये त्यांनी गंधर्व नाटक मंडळीत प्रवेश केला. पर्यंत नाटक कंपनीत १९३२ सूत्रधार, नारदादी भूमिकांपासून मुख्य गायक नटापर्यंत त्यांचा अभिनय प्रवास झाला. त्यांच्या ‘अश्विनशेट’ (संशयकल्लोळ), ‘धैर्यधर’ (मानापमान), ‘अर्जुन’ (सौभद्र) वगैरे भूमिका गाजल्या. त्यांच्या नायिकेच्या भूमिकेत बालगंधर्व असत.

त्यांचे गुरू पं.विष्णू दिगंबर पलुसकर यांचे १९३१ साली, २१ ऑगस्टला मिरजेत देहावसान झाले. डिसेंबरमध्ये सर्व गुरुबंधूंनी एकत्र येऊन पलुसकर महाराजांचे कार्य पुढे चालविण्यासाठी गांधर्व महाविद्यालय मंडळाची स्थापना केली. पुढे विनायकराव या मंडळाचे अध्यक्षही झाले. त्यांनी ५ मे १९३२ रोजी पुण्यात गांधर्व महाविद्यालयाची स्थापना केली आणि गंधर्व नाटक कंपनी सोडली.

सदाचरणी, अनुशासनप्रिय आणि उत्तम शिकवणारे असा त्यांचा लौकिक झाला. वर्ग वेळेवर सुरू करणे व वर्गात शिस्तीत अध्यापन करणारा शिक्षकवर्ग यांमुळे विद्यालयाची लोकप्रियता वाढू लागली.

पं. द.वि. पलुसकर, मुकुंदराव गोखले, त्रि.द. जानोरीकर, नागेश खळीकर, राजाभाऊ कोकजे, स.भ. देशपांडे, भीमशंकर राव, वि.दा. घाटे, कालिंदी केसकर, कमल केतकर, शरद गोखले, शकुंतला पळसोकर, गंगाधर पिंपळखरे, वि.रा. आठवले, द.कृ. जंगम, द.वि. काणे, विनयचंद्र मौद्‌गल्य, सुनंदा पटनायक, प्राणलाल शहा, मधुकर खाडिलकर (सारंगी), पुष्पलता कुलकर्णी (व्हायोलिन) अशी कितीतरी शिष्यमंडळी विनायकरावांनी तयार केली.

प

त्यांचे चिरंजीव नारायणराव, रामचंद्र मधुसूदन, कन्या सौ. कमल केळकर यांनाही त्यांनी शिकवून तयार केले.

विनायकबुवांनी १९४२ साली ‘भारतीय संगीत प्रसारक मंडळी’ व १९५२ साली ‘विष्णू दिगंबर संगीत विद्यालय’ या संस्थांची स्थापना केली. ‘संगीताचे मराठीकरण’ या संदर्भात त्यांनी आपली विशेष भूमिका मांडून मराठी भाषेत ख्यालगायन केले व अनेक व्याख्याने, लेख यांद्वारे याविषयी प्रसार केला.

पं. विनायकराव पटवर्धन यांच्या भारतभर मैफली होत असत. नेपाळ (१९३६) व रशियालाही (१९५४) त्यांनी गायनासाठी दौरे केले. लहान विद्यार्थ्यांना शास्त्रशुद्ध, पद्धतशीर संगीत शिक्षणासाठी ‘शालेय बालसंगीत’ अशी पुस्तके त्यांनी लिहून प्रकाशित केली. पुढील विद्यार्थ्यांसाठी ‘रागविज्ञान’ (१९३६ ते १९६४) ही सात भागांची मालिका लिहून प्रकाशित केली.

ही त्यांची पुस्तके पुढील काळात विद्यापीठांमध्ये संदर्भ ग्रंथ म्हणून मान्यता पावली. याखेरीज ‘नाट्य संगीत प्रकाश’(१९३० व १९३४), ‘तबला व मृदंग वादनपद्धती’ आणि आपल्या गुरुवर्यांविषयीचे, ‘माझे गुरुचरित्र’ (१९५६) अशी पुस्तके त्यांनी लिहून प्रकाशित केली.

उ. रहिमत खाँसाहेबांना तंबोऱ्यावर साथ करण्याची संधी विनायकरावांना १९१९ साली पुष्कळदा मिळाली. तसेच पं. बाळकृष्णबुवांच्या साथीला बसण्याचे भाग्यही पुष्कळ वेळा त्यांच्या वाट्यास आले. त्यांनी १९३२ साली पं. रामकृष्णबुवा वझे यांचेही मार्गदर्शन घेतले. त्यामुळे गुरुवर्य पलुसकरांखेरीज इतरांचेही गायनाचे ढंग त्यांना अभ्यासता आले. त्यांनी १९२० साली पं. बाळकृष्णबुवांकडून शंभर ते दीडशे बंदिशी शुद्ध, अचूक करून घेतल्या होत्या.

त्यांनी गायलेली ‘राग अडाना’ची पहिली ध्वनिमुद्रिका १९२५ साली प्रसिद्ध झाली. पं. नारायणराव व्यास व विनायकरावांच्या जुगलबंदीचे कार्यक्रम बरेच झाले. या जुगलगायनाची ध्वनिमुद्रिकाही १९६६ साली प्रसिद्ध झाली.

संगीत शिक्षणाच्या प्रसारासाठी ‘म्यूझिक लेसन’च्या त्यांनी ध्वनिमुद्रिका दिल्या. ‘कोलंबिया’ या कंपनीने अशा दहा ध्वनिमुद्रिका काढल्या. ‘हिज मास्टर्स व्हॉइस’ या कंपनीने त्यांच्या सत्तावीस ध्वनिमुद्रिका काढल्या, त्यांतील बव्हंशी रागसंगीताच्या आणि काही इतरही (मराठीपदांच्या) होत्या. ‘माधुरी’ या हिंदी चित्रपटात बुवांनी १९३२ साली कामही केले होते. त्यातील रागदारीवर आधारित चार गीतांच्या ध्वनिमुद्रिका ‘हिज मास्टर्स व्हॉइस’ने काढल्या होत्या. वरील सर्व ध्वनिमुद्रिकांखेरीज त्यांच्या विलंबित व दीर्घकालीन (एक्स्टेण्डेड प्ले व लाँग प्ले) अशा ध्वनिमुद्रिकाही निघाल्या.

संगीत नाटक अकादमीची फेलोशिप (१९६५) आणि भारत सरकारची ‘पद्मभूषण’ (१९७२) पदवी यांबरोबरच तानसेन समारोह, ब्रिजनारायणांची संस्था, मुंबई मराठी साहित्य संघ, ग्वाल्हेर नगरपालिका, पुणे महानगरपालिका यांच्याकडून विनायकबुवांचा पदवी, मानचिन्हे, सभासदत्व देणे इत्यादी प्रकारे गौरव केला गेला. कूर्तकोटी शंकराचार्यांनी त्यांना ‘संगीत चूडामणी’ पदवी देऊन अलंकृत केले.

पं. विष्णू दिगंबरांच्या समस्त शिष्यपरिवारापैकी पं. विनायकरावांनी त्यांच्या कार्यानुकरणाचा जास्तीतजास्त प्रयत्न केला.

ध्येयवादी शिक्षक, यशस्वी गायक, भरपूर प्रमाणात शिष्यवर्ग तयार करणारे गुरू, रागविज्ञानासारख्या पुस्तकमालेचे लेखक असलेल्या विनायकराव पटवर्धन यांचे वयाच्या सत्त्याहत्तराव्या वर्षी, पुणे मुक्कामी निधन झाले.

- डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*मौद्गल्य, विनयचंद्र; ‘वंदे विनायकम्’; १९८८; पं.विनायकराव पटवर्धन स्मारक समिती, पुणे.*

प

## परांजपे, झेलम अविनाश
**नर्तिका**
**२४ सप्टेंबर १९५४**



पूर्वाश्रमीच्या झेलम वर्दे म्हणजेच आताच्या झेलम परांजपे यांचे आईवडील हे दोघेही समाजसेवा करणारे कार्यकर्ते होते. त्यांच्या आईचे नाव सुधा आणि वडिलांचे नाव सदानंद शंकर वर्दे. लहानपणी वसंत बापट व रमेश पुरव यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी राष्ट्र सेवा दलातून अनेक नृत्यनाटिकांत काम केले. झेलम वर्दे यांनी १९७७ साली स्टॅटिस्टिक्समध्ये एम.एस्सी. केले. 'भारत दर्शन', 'महाराष्ट्र दर्शन', 'शिव दर्शन' आणि 'आजादी की जंग' या राष्ट्र सेवा दल पथकाच्या अनेक प्रयोगांत त्यांनी काम केले. १९७७ साली त्यांनी गुरू शंकर बहेरा यांच्याकडे ओडीशी नृत्याचे धडे घ्यायला सुरुवात केली.

त्या अविनाश मुकुंद परांजपे यांच्याशी १९७९ साली विवाहबद्ध झाल्या. गुरू पद्मविभूषण केलुचरण महापात्र यांच्याकडे झेलम १९८० पासून ओडीशी नृत्य शिकू लागल्या. गुरू केलुचरण महापात्रांच्या मार्गदर्शनाखाली ओडीशी शिकणे आणि कार्यक्रम करणे हे १९८३ ते २००४ पर्यंत चालू राहिले.

त्यांच्या नृत्याच्या कारकिर्दीत त्यांनी अनेक कार्यक्रम केले. उदा. केलुचरण महापात्र पुरस्कार सोहळा, खजुराहो महोत्सव, कोणार्क महोत्सव, दशहरा महोत्सव, एलिफन्टा उत्सव, कालाघोडा महोत्सव, एलोरा महोत्सव, हंपी महोत्सव इ. 'नृत्यप्रभा' या कार्यक्रमात ज्येष्ठ गायिका डॉ. प्रभा अत्रे यांच्या बंदिशींवर त्यांनी ओडीशी नृत्य केले. त्या दूरदर्शनच्या प्रथम श्रेणीच्या कलाकार आहेत आणि अनेक कार्यक्रमांसाठी त्यांनी परीक्षक म्हणूनही काम केले आहे.

त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत, उदा. २००९ चा 'विद्या विभूषण' पुरस्कार, महाराष्ट्र सरकारचा २००८ सालचा सांस्कृतिक पुरस्कार, २००५ साली 'संजुक्ता पाणिग्रही' राष्ट्रीय पुरस्कार. २००१ सालचा 'महारी' पुरस्कार त्यांना ओडीशी नृत्य राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर पोहोचवल्याबद्दल मिळाला. भीमसेन जोशी यांच्या हस्ते १९९९ चा 'कुमार गंधर्व' पुरस्कारही त्यांना मिळाला.

आपली बालपणीची मैत्रीण अभिनेत्री स्व. स्मिता पाटील हिच्या स्मरणार्थ साने गुरुजी आरोग्य मंदिराची नृत्यशाखा म्हणून १९८९ साली त्यांनी 'स्मितालय' ही ओडीशी नृत्याची संस्था सुरू केली. झेलम परांजपे स्मितालयात १९८९ पासून ओडीशी नृत्य शिकवताहेत. त्यांनी अनेक नावीन्यपूर्ण नृत्यरचना केल्या आहेत. हुंडाबळी, शिशुकन्या, स्त्री–शिक्षण अशा सामाजिक विषयांबरोबरच ओडीशी नृत्यातील पारंपरिक रचनाही त्यांनी प्रस्तुत केल्या आहेत.

त्यांनी गणिताचार्य भास्कराचार्यांची कन्या 'लीलावती'(१९९९) ही नृत्यनाटिका बसवली. तर हिंदी सिनेमा संगीतावर 'रसमंजिरी' (२०००), 'कुमारसंभवम्' (२००१) , कालिदासांच्या काव्यांवर 'उमा', 'नर्मदा' (२००३), हिंदीतील नवीन व जुन्या गाण्यांवर ओडीशी नृत्य हा आधार घेऊन 'बॉलिवुड हंगामा ओडीशी इस्टाइल'(२००५), 'स्त्री' (२००६), 'पाणी वाचवा' या विषयावर 'जलश्री' (२००८) व 'मेघदूत' (२००९) हा नेहरू सेंटरसाठी असे अनेक कार्यक्रम, नृत्यनाटिका त्यांनी केल्या आहेत. स्त्री-शिक्षणावर त्यांनी 'सावित्री वदते' (२०१०)हे नृत्यनाट्य प्रेक्षकांसमोर आणले.

दरवर्षी ८ मार्चला 'स्मितालय' ही संस्था आंतरराष्ट्रीय महिलादिनाच्या निमित्ताने स्त्रीविषयक अनेक कार्यक्रम सादर करते. झेलम परांजपे यांनी अमोल पालेकर दिग्दर्शित 'दायरा', राजेन्द्र तालक दिग्दर्शित 'सावली' या चित्रपटांचे नृत्यदिग्दर्शन केले आहे. चंद्रकांत कुलकर्णी दिग्दर्शित 'ज्याचा त्याचा

विठोबा' या नाटकाचेही नृत्यदिग्दर्शन त्यांनी केले आहे. भारताबरोबरच रशिया, कॅनडा, अमेरिका, इटली, स्कॉटलॉण्ड, आयर्लॉण्ड, चीन, हवाई अशा देशांत त्यांनी कार्यक्रम केले आहेत.

— अंकुर बल्लाळ

## पराडकर, राजाराम नारायण

**गायक**

**२४ जुलै १८९९ — ४ जून १९७५**



राजाराम नारायण पराडकर यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील वेरळ या खेडेगावात, भिक्षुक ब्राह्मण कुळात झाला. त्यांच्या वडिलांचे नाव नारायण गणेश पराडकर व आईचे नाव लक्ष्मीबाई होते. पराडकरांचे सातवीपर्यंतचे शिक्षण त्यांच्या बहिणीकडे, शिपोशीला झाले. वडिलांकडे ब्रह्मचर्य कर्म शिकून ते १९१३ साली मुंबईत आले.

झावबा वाडीतील श्रीराम मंदिरात त्यांचे वडील पुजारी असल्याने पराडकरांना अनेक कीर्तनकारांचा सहवास लाभला. त्यातून त्यांनी हार्मोनिअमवादनाची कला अवगत केली. यामुळे अभिजात संगीताची आवड निर्माण होऊन पराडकरांनी प्रथम नरहरबुवा गोखले यांच्याकडे तालीम घेतली. गायनाचार्य पं. भास्करबुवा बखल्यांशी परिचय होऊनही त्यांची तालीम घेण्याचे भाग्य दुर्दैवाने पराडकरांना लाभले नाही.

त्यांना महापालिकेत संगीत-शिक्षकाची नोकरी मिळाली. १९२७-२८ च्या सुमारास बाळकृष्ण इचलकरंजीकरांचे शिष्य यशवंतबुवा मिराशी हे पराडकरांना गुरूच्या रूपाने लाभले. त्यांच्याकडे पराडकरांनी दहा ते बारा वर्षे तालीम घेतली. ही तालीम रोज आठ-दहा तास चालत असे. पराडकरांच्या गायनशैलीवर भास्करबुवा व यशवंतबुवा या महान कलाकारांच्या शैलीचा प्रभाव होता. परिपूर्ण असलेला निकोप आवाज, बोल, आलाप, उपज अंग, लयदार शैली त्यांच्या गायनात दिसून येत असे. ते राग 'मलुहा केदार' फार चांगला गात व त्यामुळे आचार्य रातंजनकर त्यांना 'मलुहा पराडकर' असे गौरवाने संबोधत.

विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास होईल अशी विद्या पराडकर यांनी विद्यार्थ्यांना भरभरून दिली. जोड राग, अभिजात संगीतातील आम राग पराडकर प्रभावीपणे सादर करत. तबला, हार्मोनिअम सफाईने वाजवणाऱ्या पराडकरांच्या विद्यार्थिवर्गात पद्मभूषण पं. सी.आर. व्यास, पं. जे.व्ही. भातखंडे, आर.व्ही. सोहोनी, श्रीपाद व राम (पुत्र), दर्शना पराडकर, निर्मलाताई गोगटे इत्यादी शिष्यांचा समावेश आहे. त्यांचे वयाच्या शहात्तराव्या वर्षी मुंबईत निधन झाले.

— श्रीपाद पराडकर

## पर्वतकर, दत्ताराम आत्माराम

**सारंगीवादक, गायक**

**५ जानेवारी १९०५ — १५ जुलै १९७२**



दत्ताराम आत्माराम पर्वतकर यांचा जन्म गोव्यातील पर्वत या गावी झाला. त्यांच्या आईचे नाव अबोली होते. दत्तारामजींच्या घरात मूर्तिमंत संगीतसाधनाच चालू होती. त्यांचे आजोबा व पणजोबा गाण्या-वाजविण्याचे दर्दी होते. वडीलबंधू बाळकृष्णबुवा पर्वतकर हे निष्णात सारंगीवादक होते. ते अत्यंत विद्वान, संगीतरचनाकार व गायक होते. त्यांना वेगवेगळ्या अनवट रागांचे व अनवट तालांचे ज्ञान होते. त्यांचे दुसरे बंधू सदानंद पर्वतकर हे तबलावादक होते. अशा रितीने त्यांना घरातूनच संगीताचा वारसा प्राप्त झाला होता. वडीलबंधू हेच त्यांचे परमपूज्य आद्यदैवत व गुरू होते.

बालपणापासूनच त्यांना सारंगीवादनाचे वेड लागले होते. घरी कोणी नसले की वडिलबंधूंची सारंगी घेऊन ते सारंगी वाजविण्याचा प्रयत्न करीत. शिक्षणासाठी वडीलबंधूंनी त्यांना पणजीला ठेवले होते; पण तेथेही सारंगीने त्यांची साथ सोडली नाही. विनायकराव म्हार्दोळकरांची सारंगी ऐकून त्यांचे अभ्यासावरचे मन उडाले. विनायकरावांना ते ओळखत नव्हते; परंतु सारंगी शिकण्यासाठी ते म्हार्दोळला पळून गेले.

एके दिवशी सारंगी वाजवत असताना लयभास्कर खाप्रूमामाजींनी त्यांना ऐकले व त्यांचे खूप कौतुक केले. पुढे दत्तारामजींनी सारंगीचे शिक्षण पांडूमामा मंगेशकर यांच्याकडे घेतले. पांडूमामांकडे सारंगीवादन व खाप्रूमामाजींकडून त्यांनी तबलावादनाचे शिक्षण घेतले. त्यामुळे स्वर व लय असा त्यांच्या संगीत शिक्षणाचा पाया पक्का झाला.

पुढे दत्तारामजी आपली सारंगी घेऊन बेळगाव व सांगलीच्या बाजूला गेले. आणि या भ्रमंतीमध्ये त्यांची आणि अब्दुल करीम खाँसाहेबांशी ओळख झाली. ही संधी साधून ते त्यांच्याकडे गाणे शिकले.

प

संगीत व सारंगी अशी दुहेरी कला हस्तगत करून दत्तारामजी कोल्हापूरमार्गे मुंबईला आले. ‘हिज मास्टर्स व्हॉइस’, ‘ऑल इंडिया रेडिओ’, ‘इम्पीरिअल फिल्म कंपनी’ या ठिकाणी त्यांनी नोकरी केली. प्रत्येक वाद्य शिकणे हा त्यांचा छंदच होता. ते ‘जलतरंग’ सतारीच्या अंगाने वाजवीत असत. ‘हिज मास्टर्स व्हॉइस’ने त्यांच्या जलतरंगाच्या रेकॉर्ड्स काढल्या होत्या. त्याचबरोबर ते दिलरुबा, सतार व तबला वाजवत असत. अशा रितीने नोकरीव्यतिरिक्त दत्ताराम पर्वतकर यांच्या आयुष्याचा बहुतेक काळ नामांकित गायक–गायिकांना साथ करण्यात गेला. गानतपस्विनी मोगूबाई कुर्डीकर व सूरश्री केसरबाई केरकर यांना त्यांनी सारंगीची साथ दिली. दत्तारामांनी केसरबाई केरकरांच्या संगीत संन्यास घेण्यापूर्वीच्या शेवटच्या मैफलीलाही साथ केली होती. त्यांची साथ करताना, अल्लादिया खाँसाहेबांचाही त्यांना सहवास लाभत असे.

दत्ताराम पर्वतकर त्यांच्याकडे शिकायला येणाऱ्या विद्यार्थ्यांना गुरुकुल पद्धतीने शिकवीत. ते कोणत्याही प्रकारची बिदागी घेत नसत. त्यांचे मुंबईत निधन झाले.

— डॉ. अमिता नातू

## पलुसकर, दत्तात्रेय विष्णू
**गायक**
**२८ मे १९२१ – २६ ऑक्टोबर १९५५**



गायनाचार्य पं. विष्णू दिगंबर पलुसकर आणि रमाबाई यांचे हे बारावे अपत्य. दत्तात्रेय विष्णू पलुसकर यांचा जन्म कोल्हापूरजवळील कुरुंदवाड या संस्थानात झाला. प. विष्णू दिगंबरांच्या महान कार्याचा आणि संगीतकलेचा वारसा दत्तात्रेयांना जन्मजात लाभला. दहा महिने झाल्यानंतर त्यांच्या आई रमाबाई त्यांना नाशिकला घेऊन आल्या. वयाच्या चौथ्या-पाचव्या वर्षीच पंडितजींनी त्यांना गाणे शिकविण्यास सुरुवात केली. पण कार्यबाहुल्यामुळे व सततच्या फिरतीमुळे पंडितजींनी पं. चिंतामणराव पलुसकर या आपल्या पुतण्याला त्यांस संगीत शिकविण्यास सांगितले. १९३५ पर्यंत दत्तात्रेय पलुसकरांचे चिंतामणरावांकडे संगीत शिक्षण सुरू होते. पंडितजींचा मुक्काम जेव्हा नाशिकमध्ये असेल, तेव्हा तेही त्यांना शिकवत असत. गायनाबरोबर पलुसकरांचे शालेय शिक्षणही सुरू होते. पलुसकरांचे सुरुवातीचे शालेय शिक्षण नाशिकमध्ये व नंतर पुण्याच्या मॉडर्न हायस्कूलमध्ये झाले. चिंतामणरावांनी बापूरावांना (दत्तात्रेयांना) तीन-साडेतीनशे चिजा व चाळीस – पन्नास राग चांगल्या तऱ्हेने शिकविले. ख्यालगायनातही त्यांची प्रगती झाली होती.

संगीताच्या पुढील शिक्षणासाठी त्यांच्या आई त्यांना घेऊन मुंबईस पं. नारायणराव व्यासांकडे आल्या.

त्यांच्याकडे तीन वर्षे शिक्षण झाले; परंतु नारायणराव व्यासांना मैफलीच्या निमित्ताने अनेक वेळा दौऱ्यावर जावे लागत असल्यामुळे पुण्यात विनायकबुवा पटवर्धनांकडे जाण्यास त्यांच्या आईंना सुचवले. पुण्यात विनायकबुवांकडे बापूरावांचे संगीत शिक्षण सुरू झाले. याच वेळी गांधर्व महाविद्यालयात ते शिकवीतही असत. तसेच पं. यशवंतबुवा मिराशी यांच्याकडे व मुंबईला येऊन पं. केशवराव दातार यांच्याकडूनही त्यांनी गायनाचे शिक्षण घेतले.

जालंधरच्या हरवल्लभ मेळाव्यात १९३५ मध्ये बापूराव पलुसकरांचे पहिल्यांदाच स्वतंत्र गायन झाले. या गायनामुळे त्यांची बरीच प्रसिद्धी झाली व त्यांना अहमदाबाद, कलकत्ता इत्यादी संगीत परिषदांतून गाण्याची आमंत्रणे येऊ लागली. त्यांचे २१ ऑगस्ट १९३८ रोजी मुंबई रेडिओ (आकाशवाणी) केंद्रावर गाणे झाले व त्यानंतर त्यांना रेडिओवर नियमित कार्यक्रम मिळू लागले.

ते १९४३ पर्यंत पुण्याच्या गांधर्व महाविद्यालयात नियमित शिकवीत असत. मात्र त्यानंतर निरनिराळ्या संगीत परिषदेसाठी, तसेच आकाशवाणीवर गाण्यासाठी वारंवार जावे लागत असल्यामुळे त्यांनी ती नोकरी सोडली. त्यांच्या शास्त्रीय गायनाच्या व भजनाच्या ध्वनिमुद्रिका १९४४ पासून निघू लागल्या. या ध्वनिमुद्रिका अत्यंत लोकप्रिय झाल्या. त्यांचा विवाह १९४४ मध्येच झाला.

बापूरावांचे शिक्षण पूर्णपणे पलुसकर पठडीतले झाले, तसेच त्यांच्यावर यशवंतराव मिराशीबुवांकडून बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या गायनाचेही संस्कार झाले होते. त्यांचा आवाज अत्यंत भारदस्त व गोड असल्यामुळे त्यांना अतिशय प्रासादिक आणि निर्मळ आवाज लाभला होता. बोलअंगाचे आलाप व स्वच्छ तान व पद्धतशीर गायन या त्यांच्या अंगभूत गुणांचे वर्णन करताना सुप्रसिद्ध संगीतज्ञ डॉ. अशोक दा. रानडे म्हणतात, ''बापूरावांचं गाणं निर्मळ झऱ्यासारखे. पाण्यातून तळ दिसावा तसं आवाजातून गाणं कळावं अशी त्यांची गायकी होती.'' आम राग गाण्यावरच बापूराव पलुसकरांचा अधिक भर होता.

शास्त्रोक्त संगीताबरोबरच पलुसकरांनी भजनेही अतिशय भावपूर्ण म्हटली आहेत. 'रघुपती राघव राजाराम', 'पायोजी मैंने', 'ठुमक चलत रामचंद्र' यांसारखी त्यांची भजनेही लोकप्रिय झाली. या सर्व भजनांच्या चाली पं. विष्णू दिगंबरांच्या आहेत. संगीतकार नौशाद यांचे संगीत असलेल्या 'बैजू बावरा' या चित्रपटात बैजूसाठी बापूरावांनी आवाज दिला होता. भारत सरकारच्या सांस्कृतिक प्रतिनिधी मंडळाचे एक सदस्य म्हणून चीनच्या दौऱ्यासाठी १९५५ साली त्यांची निवड झाली होती.

त्यांच्या शिष्यवर्गात कमल केतकर, शरद साठे, शरद आपटे, कालिंदी केसकर, शांता हेमाडी यांची नावे प्रामुख्याने येतात. 'श्री', 'हमीर', 'केदार', 'यमन', 'गौडसारंग' इत्यादी रागांमधील त्यांचे ध्वनिमुद्रित गायन, तसेच त्यांच्या भजनांच्या ध्वनिमुद्रिका पलुसकरांच्या निर्मळ व प्रासादिक आवाजाची व पद्धतशीर गायनाचा अजूनही आनंद देतात. वयाच्या अवघ्या चौतिसाव्या वर्षी त्यांचे दुर्दैवी निधन झाले.

— मधुवंती पेठे

## पलुसकर, धुंडिराज

**व्हायोलिनवादक**

**१९०१ - ६ जून १९७२**

पं. विष्णू दिगंबर पलुसकरांचे पुतणे धुंडिराज पलुसकर हे एक नामवंत व्हायोलिनवादक होते. ते दीड वर्षांचे असतानाच त्यांच्या मातु:श्रींचे निधन झाले. त्यानंतर गायनाचार्य पं. विष्णू दिगंबर त्यांना आपल्याबरोबर लाहोरला घेऊन गेले. तिथेच धुंडिराज लहानाचे मोठे झाले, पंडितजींकडेच संगीत शिकले.

त्यांचा ओढा व्हायोलिन या वाद्याकडे होता, त्यामुळे गांधर्व महाविद्यालयात त्या काळात शिक्षक असलेले पी.एस. सुंदरम् अय्यर यांची तालीम त्यांनी

घेतली आणि पुढे ते अग्रेसर व्हायोलिनवादक झाले. त्यांची गजावर उत्तम पकड असे. त्यांनी आपली स्वतंत्र वादन–शैली विकसित केली. त्यांच्यामुळे व्हायोलिन शिकण्याची प्रेरणा अनेक लोकांना मिळाली.

पं. विष्णू दिगंबर पलुसकरांच्या सर्व पुस्तकांच्या मुद्रणप्रती धुंडिराज यांनी तयार केल्या. पुस्तकांची मुद्रिते निर्दोष व्हावीत यासाठी ते दक्ष असत. ते स्वरलिपी करण्यातही अत्यंत प्रवीण होते. मुंबईच्या गांधर्व महाविद्यालयात ते काही काळ होते. तेव्हा पं. विष्णू दिगंबरांची पुण्यतिथी सार्वजनिकरीत्या सर्वप्रथम साजरी करण्याचा मान त्यांनी मिळविला. वरील कार्यक्रमात पलुसकर महाराजांच्या सर्व शिष्यांनी गायन केले होते आणि गुरुवर्यांची पुढची पिढी तयार आहे हे सर्वांना विदित झाले. या दृष्टीनेदेखील धुंडिराज पलुसकर हे अनुपम शिष्य ठरतात.

पं. धुंडिराज पलुसकर 'धोंडोपंत' या नावाने सर्वत्र ओळखले जात असत. आयुष्याच्या शेवटच्या काळात ते बनारस हिंदू विद्यापीठाच्या संगीत विभागात व्हायोलिन शिकवत असत. 'क्यों मन जीवन सार बिताया' ही त्यांची एक ध्वनिमुद्रिकाही निघाली होती. ते हार्मोनिअम व ऑर्गन ही वाद्येदेखील वाजवत असत.

– डॉ. सुधा पटवर्धन

## पलुसकर, विष्णू दिगंबर

**गायक**

**१८ ऑगस्ट १८७२ – २१ ऑगस्ट १९३१**



पंडित विष्णू दिगंबर पलुसकर यांचा जन्म नारळीपौर्णिमेच्या दिवशी कुरुंदवाड येथे झाला. त्यांचे मूळ आडनाव गाडगीळ असे होते; पण पलुस गावचे म्हणून पलुसकर हे आडनाव प्रचलित झाले. त्यांचे वडील दिगंबर गोपाळ पलुसकर हे कुरुंदवाडचे प्रसिद्ध कीर्तनकार होते. कुरुंदवाडच्या धाकट्या पातीचे राजे श्रीमंत दाजीसाहेब यांचे दिगंबरबुवांवर, त्यांच्या कीर्तनावर फार प्रेम होते. खेरीज त्यांचे चिरंजीव राजपुत्र नानासाहेब आणि लहानगा विष्णू हे समवयस्क असल्याने दोघांचे पालनपोषण, व्रतबंध समारंभ एकत्रच झाले.

बालवयात विष्णू एक हुशार, चुणचुणीत विद्यार्थी होता. शाळेत त्याची प्रगती चांगली असायची. पण १८८७ साली कुरुंदवाडच्या प्रख्यात दत्तजयंतीच्या उत्सवात फटाक्यांच्या दारूने त्याच्या डोळ्यांना इजा झाली आणि श्रीमंत दाजीसाहेबांनी डोळ्यांवर उपचार करण्यासाठी त्यांना मिरजेला पाठविले. डोळ्यांची जखम बरी झाली; पण दृष्टी अधू झाली. आणि यापुढे लिहिण्या-वाचण्याचे काम करता येणार नाही, असे डॉक्टरांनी सांगितले.

या घटनेमागे दैवी संकेत असावा असे पुढे घडलेल्या घटनाक्रमावरून अनेकांचे मत झाले. शालेय शिक्षण सोडून संगीत शिक्षण सुरू करायचे ठरले. मिरजेतही कुरुंदवाडप्रमाणे श्रीमंत बाळासाहेब मिरजकर या संस्थानिकांचा आश्रय लहानग्या विष्णूला लाभला. या बाबतीत ते मोठे सुदैवी ठरले. त्या वेळी मिरज दरबारात पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर हे गायनाचार्य दरबार गवई होते. तत्कालीन पद्धतीप्रमाणे विष्णू दिगंबर गुरुगृही कामे करीत, गुरुसेवा करीत आणि बाळकृष्णबुवांकडून प्रत्यक्ष तालीम घेत. सवड मिळाली की शिकलेल्या ज्ञानावर मेहनत, उजळणी यांत वेळ खर्च करीत असत. सकाळी स्वरसाधना, नंतर सकाळच्या रागांची मेहनत, दुपारचे भोजन, थोडी विश्रांती, पुन्हा दुपारच्या रागांचे अध्ययन, संध्याकाळी, रात्री मेहनत असा क्रम असे.

पं. बाळकृष्णबुवा रागांचे आलाप, बंदिशी, लयकारी, ताना, सर्वकाही बारकाव्यांसह घोटून घेत. एकट्याने मेहनत करताना विष्णूबुवा एकेक पलटा, तुकडा शेकडो वेळा घोटून पक्का करीत. मुळात पहाडी असलेल्या आवाजाला त्यांनी मेहनतीने फिरत आणली आणि ते आपल्या गुरुजींसारख्या ताना घेऊ लागले. त्यांचा आवाज घुमारदार, पल्लेदार आणि त्याचबरोबर

प

चपळ, फिरतदार असा तयार झाला. ख्याल, धृपदे, धमार, टप्पे, तराणे, भजने वगैरे सर्व गीतप्रकार गाण्यासाठी योग्य असा दमसासयुक्त भरदार आणि फिरतीचा आवाज बनल्यामुळे त्यांचे गाणे प्रभावपूर्ण वाटू लागले. गुरुजींचे ते प्रिय शिष्य झाले. कुरुंदवाडच्या राजकुमारांचा – नानासाहेबांचा विवाह ठरला आणि त्याच मंडपात विष्णूबुवांचा विवाहदेखील पार पडला. काही काळ थांबून मिरजेच्या अधिपतींनी विष्णूबुवांना परत मिरजेस बोलावून घेऊन साधनेत गुंतवले. भरपूर शिक्षण झाल्यावर १८९६ साली दोन शिष्यांना घेऊन विष्णूबुवा मैफली करण्यासाठी बाहेर पडले.

संस्थानिकांच्या सहवासात असताना विष्णूबुवांनी समाजाचे सूक्ष्म निरीक्षण करून आपल्या मनाशी काही एक ध्येय निश्चित केले होते. संगीताला व कलाकाराला समाजात मानाचे स्थान मिळवून देणे, तसेच संगीतविद्या सर्वांना सुलभ व्हावी म्हणून संगीत विद्यालय काढणे, त्यासाठी शिक्षित असा शिष्यवर्ग तयार करणे, अशा त्यांच्या मनातील योजना होत्या. पण त्यासाठी आधी स्वत: प्रथितयश गायक होणे ही पहिली पायरी होती. त्या दिशेने त्यांनी प्रयत्न सुरू केले. प्रथम सातारा, औंध करत ते बडोद्यास गेले. त्यांच्या गायनाचा बडोद्यातील श्रोत्यांवर व मुख्यत्वे बडोद्याच्या राणीसाहेब जमनाबाई यांच्यावर खूप प्रभाव पडला. राणीसाहेबांनी गुजरात, काठेवाड आणि राजस्थानातील काही राजेलोकांसाठी शिफारसपत्रे दिली. त्यामुळे त्या सर्व ठिकाणी पं. पलुसकरांचे कार्यक्रम यशस्वी झाले. मानसन्मान व धनप्राप्तीही बरीच झाली. कैक संस्थानिकांनी दरबार गवई म्हणून राहण्याचा आग्रह केला. पण आपल्या ध्येयाकडे दृष्टी ठेवून पलुसकरांनी त्यांना नम्रपणे नकार दिला.

ध्येयसिद्धीसाठी एखाद्या शहरी कायम वास्तव्य करणे आवश्यक होते. याच सुमारास गिरनार पर्वतावरील दत्तात्रेयाच्या मंदिरी जाणे झाले. विष्णूबुवांच्या घराण्यात दत्तभक्ती होती, त्यांच्या मूळ गावाजवळ ‘नरसोबाची वाडी’ हे दत्तक्षेत्र आहे. त्या कारणाने ते गिरनारच्या दत्तमंदिरात गेले. तिथे एका सिद्धपुरुषाने त्यांना पंजाबात जाऊन कार्य सुरू करण्याविषयी आशीर्वादपूर्वक सांगितले. काठेवाडचा दौरा संपवून गायकांची पंढरी, जी ग्वाल्हेरनगरी, तिथे जायचे ठरवून ते मार्गस्थ झाले.

ग्वाल्हेरच्या रसिकांना महाराष्ट्रीय गायकाने खास त्यांचे ग्वाल्हेरी गायन ऐकवल्याने तेथे विष्णूबुवांचा दबदबा निर्माण झाला. ते सुमारे चार महिने ग्वाल्हेरात राहिले. शंकर पंडित, बाळ गुरुजी, आपटे गुरुजींसारख्या तत्कालीन बुजुर्गांनी विष्णूबुवांच्या गाण्याचे कौतुक केले. ग्वाल्हेरच्या महाराजांनी त्यांचे गाणे ऐकले व खूष होऊन मानसन्मान केला, शिवाय भरतपूर, मथुरा वगैरे पुढील मुक्कामांची व्यवस्था लावून दिली.

पुढे विष्णू दिगंबर मथुरेस गेले, तेथे सात महिने वास्तव्य झाले. या काळात पलुसकरांनी गाणी केलीच; पण ब्रजभाषेचा अभ्यासही केला, हिंदीवर प्रभुत्व मिळविले, पुढील कार्यासाठी वक्तृत्वकलेची साधना केली. ग्रंथांचे अध्ययन, परिशीलन केले. त्या शास्त्राचा आधुनिक संगीताशी कसा मेळ घालता येईल यासंबंधी त्यांच्या मनात विचार सुरू झाले. त्यांनी धृपद गायकीचा अभ्यास केला, काही नवीन धृपदांची रचना केली. एकूण या काळात पुढील कार्यसिद्धीसाठी योग्य असे व्यक्तिमत्त्व घडत गेले. जोधपूरच्या मुक्कामात जेम्स या बॅण्डमास्तरांनी बुवांना पाश्चात्त्य नोटेशन दाखविले. या व इतर अर्जित ज्ञानाच्या आधारे त्यांनी आपली स्वरलिपी तयार केली. त्या पद्धतीने काही पुस्तके लिहिली. ५ मे १९०१ रोजी पलुसकरांनी लाहोरला गांधर्व महाविद्यालय सुरू केले.

अशा प्रकारे मनात ठरविलेल्या योजनेनुसार प्रथम स्वत:ला सिद्ध करणे, अर्थात नावाजलेला कलाकार बनणे आणि सर्वसामान्यांना संगीत शिक्षण सुलभ व्हावे यासाठी संगीत विद्यालय स्थापित करणे या गोष्टी झाल्या. गावोगावची मुले या विद्यालयात दाखल होऊ लागली. प्राचीन गुरुकुलांप्रमाणे वसतिगृह निर्माण करून त्यांच्या निवासाची व्यवस्था झाली. नऊ वर्षांचा सलग

प

अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांनी हौशी विद्यार्थ्यांना शिकवावे आणि प्रचाराचे कार्य सुरू ठेवावे, यासाठी विशेष असा 'उपदेशक वर्ग' नऊ वर्षांसाठी तयार झाला.

या अभ्यासक्रमातून उत्तीर्ण झालेले बरेच विद्यार्थी पुढे नामांकित गायक, शिक्षक, प्रचारक झाले. या विद्यालयाचा पुढे मुंबईत गांधर्व महाविद्यालयाची शाखा काढून विस्तार झाला. पुढेपुढे मुंबईचे विद्यालय मुख्य केंद्र बनले. संगीताच्या परीक्षा घेण्यास सुरुवात झाली. पदवीदान समारंभ इतर क्षेत्रांतील नामवंतांच्या अध्यक्षतेखाली पार पाडले जाऊ लागले. संगीत परिषदा भरविण्याचे मोठे कार्य पं. विष्णू दिगंबरांनी केले. संगीताचे जलसे वारंवार भरवून जनसामान्यांना उत्तम संगीत ऐकविण्याची प्रथा त्यांनी सुरू केली. मुंबईत स्वत:ची इमारत होईपर्यंत सात वर्षे इतरत्र व नंतर आपल्या हक्काच्या इमारतीत, असे जलसे होत असत. जलशांचे उत्पन्न विद्यालयाच्या खर्चासाठी, अर्थात लोककार्यासाठीच वापरले जाई.

भारतातील सर्व प्रांतांत पंडितजींनी संगीताचा प्रसार केला. वेळेवर कार्यक्रम सुरू करून वेळेवरच संपविणे ही शिस्त विष्णूबुवांनी सुरू केली. संगीताच्या प्रांतात हे सर्व नवीनच होते. कुलीन स्त्रिया व मुलींना – सर्व जातीजमातींतील मुलींना – रंगमंचावर/व्यासपीठावर बसवून गाण्याची संधी देण्याचे मोठे कार्य पंडितजींनी केले. त्यामुळे पुढील काळात स्त्रियांना गाण्याचा मार्ग प्रशस्त झाला.

मुळात संशोधक वृत्तीचे असल्याने पं. विष्णू दिगंबरांनी जलशांमध्ये नावीन्य आणले. त्यांनी तबलातरंगाची कल्पना प्रत्यक्षात आणली. प्रत्येक स्वरात तबला मिळविणे, रागात लागणारे स्वर आणि बसवलेल्या पदात किती उंच जावे लागते तितके तबले मिळवून प्रत्येक तबल्यावर एकेक मनुष्य बसवून तबलातरंग वाजवून घेणे हे अभिनव वाटणारे तबलातरंग- वादनाचे कार्य केले. इंग्रजी ऑर्केस्ट्राचे डोळसपणे निरीक्षण करून त्यांनी आपल्या भारतीय वाद्यांचा वाद्यवृंद बसवला. मुळात पंडितजींच्या अभ्यासक्रमात मुलांना गायनाबरोबर किमान २-३ वाद्यांचे वादन शिकावे लागे, त्यामुळे विद्यार्थ्यांचा वाद्यवृंद बसविताना त्यांना फारसे अवघड गेले नाही.

व्यायामाला संगीताची जोड दिल्यास तो सुखद, सहज वाटू शकतो हे लक्षात आल्यावर बनारसच्या मुक्कामात त्यांनी व्यायामपटू प्रो. माणिक यांच्या क्लब ड्रिल, फ्लॅग ड्रिल व बारबेल ड्रिल या व्यायामांचे, प्रोफेसर माणिक यांच्याकडून आपल्या विद्यार्थ्यांना शिक्षण देवविले आणि त्याला संगीताची जोड दिली. शरीराशी संबंधित कार्य: व्यायाम आणि हृदयाला जाऊन भिडणारी ललितकला: संगीत – या दोन्हींचा समन्वय प्रत्यक्ष जलशात श्रोत्यांकडून टाळ्यांचा कडकडाट मिळविणारा ठरला. पारतंत्र्यातील भारताला राष्ट्राभिमानी बनविण्यासाठी केल्या गेलेल्या प्रयत्नांत पं. विष्णू दिगंबर सहभागी झाले होते. अनेक मोठमोठ्या राष्ट्रीय पुढाऱ्यांचा त्यांच्यावर लोभ जडला होता. महात्मा गांधींना नारायण मोरेश्वर खरे हा आपला विद्यार्थी पलुसकरांनी राष्ट्रसेवेसाठी समर्पित केला होता. पाचवे जॉर्ज बादशहा भारतात आले, तेव्हा मुंबई त्यांना पाहायला लोटली होती. पण ''माझा हिंदुस्थानचा राजा मंडालेच्या तुरुंगात असताना या राजाचे तोंड मी कधीच पाहणार नाही,'' असे बाणेदार उद्‌गार काढून पंडितजींनी आपले जाज्वल्य देशप्रेमच प्रकट केले!

उण्यापुऱ्या ५९ वर्षांच्या आयुष्यात विष्णू दिगंबरांनी ओंकारनाथ ठाकूर, विनायकराव पटवर्धन, नारायणराव व्यास, पाध्येबुवांसारखे नामवंत गायक - शिष्य तयार केले. ना.मो. खरे, गोविंदराव देसाई, बोडस बंधू, ठकार इत्यादी प्रचारक, गायक, शिक्षक तयार केले. शंकरराव व्यास, ना.मो खऱ्यांनी उत्तम बंदिशी, लक्षणगीते वगैरे बांधली. विनायकबुवा, ओंकारनाथ, बी.आर. देवधरांनी संगीतविषयक पुस्तके लिहिली. पं. पलुसकरांनी स्वरलिपी बनवून, पुस्तके लिहून स्वत:चा छापखाना घेऊन मुलांना छपाईचे शिक्षणही दिले. त्यांनी सुरू केलेले 'संगीतामृत प्रवाह' हे मासिक याच छापखान्यात छापले जात असे.

डोळ्यांनी अधू असलेल्या विष्णू दिगंबरांचे द्रष्टेपण व दूरदृष्टी स्तुत्य होती. संगीताला व सांगीतिकाला समाजात प्रतिष्ठा मिळावी यासाठी ते जन्मभर झटले. स्वत:ची उत्तम गायकाची कारकीर्दही गाजविली. कौटुंबिक आयुष्यात स्वत:ची १०-११ मुले अल्पायुषी झालेली, लहानपणीच देवाघरी गेलेली पाहिली. मुंबईच्या गांधर्व महाविद्यालयाच्या इमारतीचा लिलाव झाल्यावर, ''माझे भारतात ठिकठिकाणी संगीताचे कार्य करीत असलेले विद्यार्थी याच माझ्या इमारती आहेत,'' अशा आशयाचे उद्‌गार काढणारे विष्णू दिगंबर आयुष्याच्या उत्तरार्धात वीतरागी होऊन, कफनी परिधान करून नाशिकमध्ये रामनाम आधार आश्रम स्थापून रामायणावर प्रवचने करीत राहिले होते. तिथेच त्यांचे देहावसान झाले.

मुंबई महानगरपालिकेने ऑपेरा हाउसजवळील अत्यंत रहदारीच्या चौकाला 'पं. विष्णू दिगंबर पलुसकर चौक' हे नाव दिले. फिल्म्स डिव्हिजनने त्यांच्या जीवनावर अनुबोधपट बनवून देशातील सिनेमागृहांतून तिचे प्रदर्शन केले. भारतातील सर्व प्रमुख शहरांत त्यांची जन्मशताब्दी (१९७२ साली) थाटामाटाने साजरी झाली. पुढे त्यांच्या जगलेल्या एकुलत्या एक सुपुत्राने, पं. दत्तात्रेय विष्णू पलुसकर यांनी, नामांकित गायक म्हणून लौकिक मिळविला.

– डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*१. देवधर, बा.र.; 'थोर संगीतकार' पॉप्युबर प्रकाशन, १९९९.*
*२. पटवर्धन, वि.ना.; 'माझे गुरुचरित्र'.*

## पांडे, मालती

***बर्वे, मालती पद्माकर***

**गायिका**

**१९ एप्रिल १९३० – २७ डिसेंबर १९९७**

मालती पद्माकर बर्वे, पूर्वाश्रमीच्या मालती वामन पांडे यांचा जन्म वर्धा येथे झाला. मालतीबाईंच्या गळ्यातला सूर हा त्यांना आईकडून मिळालेला वारसा



होता, मात्र गळा गोड असूनही आईला चारचौघांत गाण्याची परवानगी नव्हती. म्हणून आपल्या मुलीने खूप गाणे शिकावे, गाण्यात पुढे यावे, नाव मिळवावे अशा ईर्षेनेच आईने त्यांना गाणे शिकवायला सुरुवात केली.

त्यांचा पहिला सुगम संगीताचा कार्यक्रम १९४५ साली, वयाच्या पंधराव्या वर्षी मुंबई आकाशवाणी केंद्रावरून झाला. त्यानंतर संगीताच्या शिक्षणासाठी त्या पुण्यात आल्या. त्या वेळी प्रख्यात संगीत दिग्दर्शक सुधीर फडके ऊर्फ बाबूजी 'आगे बढ़ो' या हिंदी चित्रपटाचे दिग्दर्शन करीत होते. त्यातील एका गाण्यासाठी ते नवीन आवाजाच्या शोधात होते. त्या-वेळी प्रसिद्ध भावगीतगायक गजानन वाटवे यांच्या वतीने वसंत थिटे हे मालतीबाईंना 'प्रभात' स्टुडिओमध्ये आवाजाच्या चाचणीसाठी घेऊन गेले आणि मालतीबाईंच्या संगीत क्षेत्रातील कारकिर्दीला सुरुवात झाली. त्यांनी गायलेले 'वंदे मातरम्' या चित्रपटातील 'अपराध मीच...' हे युगुलगीत, पु.ल. आणि सुनीताबाई देशपांडे या नायक-नायिकेच्या तोंडी चित्रित झाले. त्यानंतर मालतीबाईंनी अनेक चित्रपटांमध्ये पार्श्वगायन केले.

'जिवाचा सखा', 'कल्याण खजिना', 'मायाबाजार', 'जिवाची मुंबई', 'वंशाचा दिवा', 'पारिजातक', 'श्रीकृष्णदर्शन', 'मालतीमाधव', 'अपराधी', 'सती अनसूया', 'गावगुंड', 'विठ्ठलपायी', 'जरा जपून', 'कुंकवाचा धनी', 'स्वराज्याचे शिलेदार', 'गुरुदेव दत्त', 'लाखाची गोष्ट' अशा अनेक बोलपटांमधून त्या गायल्या. 'लपविलास तू हिरवा चाफा', 'या कातरवेळी', 'त्या तिथे पलीकडे', 'खेड्यामधले घर कौलारू', 'कुणीही पाय नका वाजवू' यांसारखी त्यांची अनेक अवीट गोडीची गाणी रसिकांच्या मनात घर करून आहेत.

प

सुधीर फडके, गजानन वाटवे, श्रीनिवास खळे, प्रभाकर जोग, राम फाटक, दत्ता डावजेकर, मधुकर पाठक अशा अनेक मातब्बर संगीतकारांच्या रचना मालतीबाईंनी गायल्या आहेत.

मालतीबाईंनी १९४७ ते १९६४ या सोळा-सतरा वर्षांच्या कालावधीत हिराबाई बडोदेकर, विनायकबुवा पटवर्धन, पं. जगन्नाथबुवा पुरोहित (गुणिदास) आणि पती पं. पद्माकर बर्वे यांच्याकडे शास्त्रीय संगीताचे शिक्षण घेतले.

मालती पांडे यांनी मधुर आवाज, शास्त्रीय संगीताची अभ्यासपूर्ण जाण, लवचीक गळा, काव्यातील आणि प्रसंगातील भाव योग्य प्रकारे जाणून ते स्वरांच्या साहाय्याने गळ्यातून व्यक्त करण्याचे नैसर्गिक कौशल्य या गुणांमुळे चित्रपट पार्श्वगायनाच्या क्षेत्रात आपला स्वतंत्र ठसा उमटवला.

शास्त्रीय संगीतातील त्यांचे गुरू पं. पद्माकर बर्वे यांच्याशी १९६४ मध्ये त्यांचा विवाह झाला. मात्र १९६४ नंतर जवळजवळ १४-१५ वर्षे महाराष्ट्राबाहेर राहिल्यामुळे त्यांचा पार्श्वगायन क्षेत्राशी संबंध तुटल्यासारखा झाला. याच काळात, १९७४ मध्ये त्यांनी गांधर्व महाविद्यालयाची डॉक्टरेट पदवी प्राप्त केली. त्यांना त्याचबरोबर शास्त्रीय गायनासाठी आकाशवाणीच्या ‘अ’ दर्जाच्या कलाकार श्रेणीत मान्यता मिळाली.

मध्यमवर्गातील मुलींनी गायन क्षेत्रात काम करणे कठीण होते अशा प्रतिकूल काळात मालती पांडे यांनी ध्वनिमुद्रण, पार्श्वगायन, मैफली अशा संगीताच्या विविध क्षेत्रांत कार्य करून आपला ठसा उमटवला.

मालतीबाईंचे जीवन कलासक्त होते. ज्या दिवशी त्यांचे निधन झाले तेव्हाही, २७ डिसेंबर १९९७ रोजी काही जर्मन पाहुणे घरी आले असताना त्यांच्यासमोर त्या गायल्या होत्या. त्यानंतर तासाभरातच हृदयविकाराने त्यांचे निधन झाले. मालतीबाईंच्या आवाजातील २३ भावगीते एकत्रित करून २००६ मध्ये सारेगामा इंडिया लिमिटेड या कंपनीने व्हिंटेज ७८ आर.पी.एम. ध्वनिफितीद्वारे त्यांच्या गाण्यांचा संगीतमय ‘हिरवा चाफा’ रसिकांसाठी सादर केला.

— डॉ. संगीता बर्वे

प

## पाठक, नारायण विनायक

**गायक, संगीतशिक्षक**

**२ फेब्रुवारी १९०५ — ७ फेब्रुवारी १९७०**



नारायण विनायक पाठक यांचा जन्म ग्वाल्हेरमध्ये झाला. त्यांना लहानपणीच संगीताची आवड निर्माण झाली. माधव संगीत विद्यालयाचे प्राचार्य राजाभैया पूछवाले हे त्यांचे गुरू होते. १९२४ मध्ये ते ‘संगीतरत्न’ परीक्षा उत्तीर्ण झाले. पाठकांनी ग्वाल्हेर गायकीचा चांगला अभ्यास केला. प्रवर्तक मास्तरांच्या ‘चतुर संगीत महाविद्यालया’मध्ये त्यांनी २-३ वर्षे अध्यापन केले. नंतर १९२५ मध्ये प्रवर्तक यांनी ‘अभिनव संगीत विद्यालय’ सुरू केले आणि १९२६ पासून नारायण पाठक यांची प्राचार्यपदी नियुक्ती केली. पाठकांनी अथक परिश्रमाने विद्यालयाला समृद्ध केले.

पाठक मास्तरांची शिकवण्याची पद्धत सुसूत्र, सोपी व आकर्षक होती. ते अभिनव रागमंजिरी, संस्कृत श्लोक, दोहे पाठ करून घेत. ख्याल, धृपदे, धमार, तराणे, चिजा व रागविवेचन यांवर त्यांचा भर असे. पाठांतरावर त्यांचा खास भर असे. त्यांनी चरितार्थाकरिता टिळक विद्यालय, अंधविद्यालय व हिंदू मुलींची शाळा इ. संस्थांमध्ये संगीत शिक्षकाचे काम केले. लोकसंग्राहक वृत्तीमुळे त्यांना कुशल शिक्षकवर्ग, घनिष्ठ मित्रमंडळी व उत्तम शिष्य लाभले. त्यांच्या शिष्यवर्गात दादाजी तुळाणकर, भैयासाहेब सराफ, विद्याधर वझलवार, कृष्णराव कर्वे, रामाजी एलकुंचवार, लीला कुलकर्णी, वत्सला वडाभात (पालकर), उषा तांबे, घुमरे भगिनी यांचा समावेश

आहे. बर्डी व धरमपेठ विभागात पाठकांनी विद्यालयाच्या शाखा सुरू केल्या. काशी येथील मैफलीत त्यांना 'गायनाचार्य' पदवी देण्यात आली.

त्यांची १९४५ मध्ये लखनौजवळ सीतापूर महाविद्यालयामध्ये संगीत अध्यापक म्हणून नियुक्ती झाली. नंतर त्यांना खैरागडला आमंत्रित केले गेले. तेथील संगीत अकादमीत त्यांनी १९५८ पर्यंत मुख्याध्यापक पदावर कार्य केले. नंतर प्रकृती अस्वास्थ्यामुळे त्यांनी डोंगरगडला घर बांधले व ते सहकुटुंब तेथे स्थायिक झाले. योगायोगाने भंडारा येथे वनिता समाजाने सुरू केलेल्या संगीत विद्यालयात त्यांना पाचारण केले गेले. पाठक व दादाजी तुळाणकर या गुरुशिष्यांनी काही वर्षे विद्यालय चालविले; पण पुढे प्रकृती ढासळू लागल्याने ते डोंगरगडला गेले. तेथेच त्यांचे निधन झाले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; १९७४.*

## पाध्ये, गणेश

**गायक**

**१८७५ - ७ एप्रिल १९४७**

गणेश पाध्ये यांचा जन्म धुळे येथे झाला. त्यांच्या घरची परिस्थिती गरीब होती. गणेश आठ वर्षांचे असताना त्यांचे वडील निवर्तले. त्यांचे प्राथमिक शिक्षण रत्नागिरी जिल्ह्यातील देवरूख या गावी मामांकडे राहून झाले. गणेश पाध्यांनी संस्कृत शिकावे अशी घरच्यांची इच्छा होती; पण त्यांचा ओढा संगीताकडे होता. त्यामुळे शालेय शिक्षण अर्धवट सोडून ते बडोद्याला गेले. त्या वेळी बडोदा दरबारात फैज मोहम्मद आणि फतेह मोहम्मद हे दोघे गवई दरबार गायक म्हणून नोकरीत होते. गणेशपंतांनी त्यांची सेवा करून त्यांच्याकडून गायनविद्या मिळवली.

संत ब्रह्मीभूत बालकृष्णानंद स्वामी यांच्याकडून पाध्यांनी टप्पा गायकीही शिकून घेतली. धृपद, धमार गायकीही अनेक गवयांकडून अत्यंत कष्टपूर्वक मिळवली. नंतर ग्वाल्हेरला जाऊन उ. निसार हुसेन खाँ यांच्याकडून त्यांनी खास ग्वाल्हेर गायकीचे शिक्षण घेतले.

या सर्व संगीत शिक्षणात एक तप घालवून ते पुण्यात आले. पुण्यातील पर्वती देवस्थानातील विष्णूच्या मंदिरात त्यांनी काही काळ गायनसेवा केली. कीर्तनकार हरिभाऊ कऱ्हाडकर, त्यांचे पुत्र शामराव पाध्ये, फडकेबुवा, हे त्यांचे मुख्य शिष्य. छोटा गंधर्वांना त्यांनी टप्पा गायकी शिकवली होती.

गणेश पाध्ये एक उत्तम रचनाकारदेखील होते. त्यांच्या अनेक बंदिशींना पं. वि.ना. भातखंड्यांनी आपल्या क्रमिक पुस्तक मालिकांमध्ये स्थान दिले. याखेरीज औषधनिर्मिती आणि सुगंधी तेल, अत्तरे वगैरे बनविण्यातही त्यांचा हातखंडा होता.

– डॉ. सुधा पटवर्धन

## पाध्ये, वामन हनुमंत

**गायक**

**८ जून १८९८ – २८ जानेवारी १९५८**



कोल्हापुरातील अंबाबाईच्या सुप्रसिद्ध मंदिरात रोज प्रात:समयी उ. अल्लादिया खाँसाहेबांचे गायन होत असे. छोट्या वामनला लहानपणापासून संगीताची गोडी होती. खाँसाहेबांच्या संगीताच्या श्रवणाने त्यांना गाण्याची समज आली.

पुढे पं. विष्णू दिगंबरांच्या आवाहनाला प्रतिसाद देत ते मुंबईच्या गांधर्व महाविद्यालयात गेले. तिथल्या शिस्तीप्रमाणे नऊ वर्षे वामनराव गाणे शिकले. 'संगीत प्रवीण' ही पदवी त्यांना प्राप्त झाली. मग कोल्हापूरला गांधर्व महाविद्यालयाची स्थापना करून ते संगीताचे शिक्षण देऊ लागले. त्यांच्या विद्यार्थ्यांमध्ये सुप्रसिद्ध गायक व संगीत दिग्दर्शक सुधीर फडके होते.

क्लिष्ट लयकारी करणे हा वामनरावांचा हातखंडा असलेला भाग. त्यांच्या 'अनाघाती' (ऑफ बीट) गायकीमुळे ते भारतात विख्यात झाले. सिंध प्रांतातील हैद्राबादच्या 'हंडा' या संगीतोत्सवात पं. विनायकराव पटवर्धन व पं. नारायणराव व्यास यांच्याबरोबर गाऊन त्यांनी सभेला चकित केले. त्यानंतर या तिघांचे मिळून 'तिगलबंदी' कार्यक्रम हे आकर्षण ठरले.

वामनराव सिंध प्रांतातील अतिशय लोकप्रिय गायक झाले. गुरुबंधू बाबूराव गोखले यांच्या मुंबईतील 'महाराष्ट्र संगीत विद्यालया'त ते प्रतिवर्षी हजेरी लावत. पुढे बनारस हिंदू विद्यापीठात ते प्राध्यापक म्हणून कार्यरत होते. त्यांचे चिरंजीव शशिकांत यांना त्यांनी गायनाची दीक्षा दिली. त्यांनीही संगीत क्षेत्रात कार्य केले. अवघ्या ६० वर्षांच्या आयुष्यात त्यांनी गायक म्हणून कारकीर्द गाजवली.

- डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*डॉ. राजोपाध्ये, वसंत; 'संगीत कला विहार'; डिसेंबर २००५.*

प

## पानसे, नानासाहेब
***थोरपे, नारायण***
**मृदंग, तबलावादक**
**१७७५ – १८८०**



नानासाहेब पानसे यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील वाई येथील एका धार्मिक कुटुंबात झाला. त्यांचे मूळ नाव नारायण थोरपे होते. प्रथम त्यांना त्यांच्या संगीतप्रेमी वडिलांनी ताल-ठेका व लयीचे शिक्षण दिले. नंतर त्यांना पुण्याचे दरबारी मृदंगवादक मन्याबा कोडीतकर आणि पखवाजी चौंडे महाराज यांचे मार्गदर्शन लाभले. गाणाऱ्याची साथसंगत करण्याइतकी त्यांची तयारी झाली.

वाईचे कीर्तनकार ह.भ.प. पानसेबुवा यांच्या कीर्तनाला केलेल्या साथीमुळे नानासाहेब प्रसिद्धीस पावले व थोरपे या मूळ आडनावाऐवजी पानसे हेच उपनाम त्यांना मिळाले.

पुढे काशीचे मृदंगसम्राट बाबू ज्योतिसिंहजी यांच्याकडे त्यांची तालीम सुरू झाली. त्यांनी बारा वर्षे काशीत गुरुमुखी पद्धतीने पखवाजचे शिक्षण घेतले. गुरूंचा आशीर्वाद घेऊन त्यांनी प्रयागला साक्षात्कारी योगी माधवमहाराज स्वामींकडे प्रयाण केले. त्यांना स्वामींनी मार्गदर्शन केले आणि प्रसाद म्हणून स्वत:चा मृदंग भेट दिला.

यानंतर नानासाहेबांनी मैफली करत देशभर भ्रमण केले. त्यांनी अनेक कलाकारांना साथसंगत केली. इंदूरच्या महोत्सवात इंदूरनरेश तुकोजीराव होळकरांनी त्यांचे वादन ऐकून त्यांना राजदरबारात आश्रय दिला. नानासाहेबांचे स्वतंत्र वादन व साथसंगत हा क्रम तिथेही चालू राहिला.

अनुकूल परिस्थिती, राजाश्रय यांमुळे निवांत वातावरण मिळून नानासाहेबांनी पखवाज-तबला-वादनात नवे शोधकार्य केले. त्यांनी संगीताच्या शास्त्रग्रंथांचाही अभ्यास केला होता. ज्या परण व बोलांमध्ये त्यांना गणितदृष्ट्या काही न्यून दिसले, त्यात शास्त्रमर्यादेनुसार त्यांनी काही सुधारणा केल्या. कायदे-तिहाई-चक्रदारांची बांधणी केली. विद्यार्थ्यांना सोप्या पद्धतीने वादन शिकविण्याच्या त्यांच्या हातोटीमुळे खूप शिष्यवर्ग निर्माण झाला.

पखवाज व तबलावादन यांबरोबरच नानासाहेब नृत्यकलेतही पारंगत होते. त्यांनी काही शिष्यांना नृत्यही शिकविले. ताल-बंध, लयीचे ज्ञान, पाठांतर, बोलांचा निर्दोष व अचूक निकास, स्पष्ट उच्चार यांमुळे 'पानसे-बाज' अस्तित्वात आला. त्यांनी पखवाज व तबला या दोन्हींचे कायदे, बोल रचले, नृत्योपयोगी रचनाही निर्माण केल्या. त्यांनी 'सुदर्शन' या नव्या ठेक्याची निर्मिती केली.

व्यक्ती म्हणून नानासाहेब निगर्वी, निर्मत्सर, सालस, मनमिळाऊ स्वभावाचे होते. आयुष्याच्या शेवटच्या

पर्वात पुत्रवियोगाचे दारुण दु:ख त्यांच्या वाट्याला आले. त्यांचे इंदूर येथे निधन झाले. नाना पानसे यांच्या या ‘पानसे घराण्याचा’ प्रसार त्यांच्या अत्यंत मोठ्या शिष्यशाखेमार्फत महाराष्ट्र, मध्यभारतात झाला. त्यांचे पुत्र बळवंतराव पानसे, तसेच शिष्य वामनराव चांदवडकर (हैदराबाद), शंकरभैया घोरपडकर (पुणे), सखाराम गुरव (बुऱ्हाणपूर), विठोबा शाईवाले (तासगाव), जगन्नाथ (मुंबई) व बळवंतराव वैद्य (जमखिंडी व मिरज) यांनी पानसे – बाजाचा पुढे प्रसार केला.

– डॉ. सुधा पटवर्धन

## पाबळकर, वामन नारायण

**हार्मोनिअमवादक**

**६ सप्टेंबर १९०६ – २७ जुलै १९८२**



वामन नारायण पाबळकर यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे वडील नारायण यांचे अकाली निधन झाल्यावर आई सावित्रीबाई यांनी अत्यंत कष्टाने दोन्ही मुलांना वाढवले. बालवयापासूनच वामन पाबळकरांना संगीताची रुची होती. त्या काळी चालणाऱ्या मेळ्यांमध्ये ते गात व हार्मोनिअमही वाजवत असत.

गोविंद टेंबे यांच्याकडे ते हार्मोनिअमवादन शिकले. मात्र नंतर गायनाची रुची वाढून त्यांनी मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर यांचा गंडा बांधला. मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर यांच्या सहवासातून त्यांनी रागसंगीताची मर्मस्थळे जाणून घेतली. गायन व हार्मोनिअम–वादनाबरोबरच ते जलतरंग हे वाद्यही उत्तम वाजवत असत.

१९४५ साली हार्मोनिअम या वाद्यास आकाशवाणीवर बंदी घालण्यात आली. ही बंदी उठवण्यासाठी पाबळकरांनी प्रदीर्घ काळ लढा दिला. तत्कालीन प्रसारणमंत्री वसंत साठे व अन्य शासकीय अधिकाऱ्यांशी चर्चा घडवून आणल्या व त्यांच्या प्रयत्नांना काही अंशी यशही आले. १९७२ साली इंदिरा गांधी यांनी ही बंदी आंशिक प्रमाणात उठवल्याचे जाहीर केले व त्याप्रमाणे केवळ ‘अ’ दर्जा प्राप्त कलाकारांच्या साथीसाठी हार्मोनिअम वापरण्याची परवानगी देण्यात आली. हा निर्णय पाबळकरांना मोठे समाधान देणारा होता. दिल्ली दूरदर्शनवर १९७८ साली एकल हार्मोनिअमवादनाचा कार्यक्रमही प्रसारित झाला. मुंबई दूरदर्शनवरही त्यांची हार्मोनिअमविषयक मुलाखत प्रक्षेपित झाली.

पाबळकरांनी हार्मोनिअम या वाद्यास मैफलीत प्रतिष्ठा देण्याच्या हेतूने अनेक ठिकाणी सप्रयोग व्याख्याने दिली, तसेच एकल हार्मोनिअमवादनाच्या मैफली केल्या. पु.ल. देशपांडे हे ‘बटाट्याची चाळ’च्या दरम्यान स्वतंत्र हार्मोनिअम वादनाच्या दृष्टीने पाबळकरांकडे काही शिकत होते. तसेच डॉ. माधव थत्ते व डॉ. अरविंद थत्ते यांनीही काही काळ पाबळकरांचे मार्गदर्शन घेतले.

‘पूना म्युझिकल सर्कल’ या संस्थेची १९३३ साली स्थापना करून पुढची ३५-४० वर्षे पाबळकरांनी अनेक दिग्गज कलाकारांचे कार्यक्रम करून रागसंगीताबद्दलची रसिकांची अभिरुची संपन्न करण्याचे मोठे कार्य केले. बडे गुलाम अली, मोगूबाई कुर्डीकर, केसरबाई केरकर, कुमार गंधर्व, आमीर खाँ, गंगूबाई हनगल, भीमसेन जोशी, किशोरी आमोणकर, इ. गायक व अली अकबर खाँ, रविशंकर, बिस्मिल्ला खाँ, पन्नालाल घोष, विलायत खाँ, सामताप्रसाद, किशन महाराज, इ. वादक आणि नर्तकांमध्ये गोपीकृष्ण, सितारादेवी, बिरजू महाराज, वैजयंतीमाला अशा अनेक कलाकारांचे कार्यक्रम त्यांनी पुण्यात आयोजित केले.

हार्मोनिअम या वाद्यास प्रतिष्ठा मिळवून देण्यास अपार परिश्रम घेणारे पाबळकर व्यवसायाने एक यशस्वी डॉक्टर होते. त्यांचे ‘पाबळकर नर्सिंग होम’ आजही पुण्यातील सुभाषनगर भागात आहे. मात्र डॉक्टरकीच्या

पेशापेक्षा संगीत क्षेत्रासाठी त्यांचे अधिक संस्मरणीय योगदान आहे. हार्मोनिअमला आकाशवाणीवर असलेली बंदी उठवण्यासाठी व एकल हार्मोनिअमवादनाच्या प्रसारासाठी त्यांनी आपल्या जीवनाचा मोठा काळ व्यतीत केला. डॉ. पाबळकरांनी संगीताकडे व्यावसायिक दृष्टिकोनातून न पाहता एक सांस्कृतिक कार्य म्हणून पाहिले.

त्यांचे निधन पुण्यात झाले. त्यांच्या निधनानंतर १९८३ साली तत्कालीन प्रसारणमंत्री बॅ. विठ्ठलराव गाडगीळ यांच्या हस्ते पुणे आकाशवाणी केंद्रात त्यांच्या छायाचित्राचे अनावरण पं. भीमसेन जोशी यांच्या उपस्थितीत करण्यात आले.

— चैतन्य कुंटे

## पारीख, अरविंद नटवरलाल

**सतारवादक**

**१९ ऑक्टोबर १९२७**



अरविंद नटवरलाल पारीख यांचा जन्म अहमदाबाद येथे, मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांच्या वडिलांचा छोटा, स्वतंत्र व्यवसाय होता, तर आई चंद्रकला श्रीमंत कुटुंबातील होती. आजोबा गोवर्धन पारीख हे शैक्षणिक अधिकारी असून त्यांना गाण्याची आवड होती. बडोद्यात असताना पारीख सतार शिकले होते. आकाशवाणीवरील संगीत सभाही ते ऐकत. यातूनच अरविंद पारीखांनाही संगीतामध्ये रुची निर्माण झाली. त्यांच्या आईने त्यांना संगीत शिकण्यास विशेष प्रोत्साहन दिले.

अरविंद पारीख यांनी अकराव्या वर्षी संगीत शिकायला प्रारंभ केला. सुरुवातीला अहमदाबाद येथील गांधर्व महाविद्यालयाचे प्राचार्य व ग्वालियर घराण्याचे गायक गोपाळ जोशी यांच्याकडून ते दिलरुबा शिकले. त्यांचे शालेय शिक्षण अहमदाबादच्या चिमणलाल नगिनदास विद्यालयातून झाले. याच शाळेतील संगीत विभागातील प्राणलाल शहांकडून ते व्हायोलिन शिकले. याबरोबरच त्यांना मॅण्डोलिनदेखील येत होते. शाळेमध्ये असताना त्यांनी दिलरुबावर पंकज मलिकचे गाणे वाजवून सर्वांना आश्चर्याचा धक्का दिला होता. तसेच, ज्युथिका रॉय या बंगाली गायिकेबरोबर मॅण्डोलिनची साथ केली होती.

वयाच्या बाराव्या वर्षी पारीख यांनी मकरंद बादशहा या वादकाकडे सतार शिकायला सुरुवात केली. मकरंद बादशाह हे आग्रा घराण्याचे उस्ताद अताहुसेन आणि मुशर्रफखान बीनकार यांचे शिष्य होते. याच सुमारास पारीख यांनी विलायत खाँची सतार ऐकली व ते प्रभावित झाले व मनोमन त्यांनाच गुरू करायचे असा त्यांनी निर्धार केला. त्यांची १९४४ साली विलायत खाँकडे तालीम सुरू झाली. ते १९४५ साली ते मुंबईत आले. पुढे १९५६ साली त्यांनी विलायत खाँचा गंडा बांधला.

अरविंद पारीख यांचे महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत, एलफिन्स्टन महाविद्यालयामध्ये झाले. १९४८ साली ते मुंबई विद्यापीठाचे पदवीधर झाले. घरच्या पारंपरिक कापड उद्योगात त्यांना फारसा रस नव्हता. ते वडिलांच्या ‘ली ॲन्ड म्युरिहेड’ कंपनीचे काम पाहू लागले.

विलायत खाँसाहेबांची तालीम पारीख यांना अव्याहत चाळीस वर्षे मिळाली. १९४७ साली पारीख यांनी पहिल्यांदा आकाशवाणीवर कार्यक्रम सादर केला. येथून त्यांची सांगीतिक कारकीर्द सुरू झाली. अनेक संगीत संमेलनांतून त्यांचे कार्यक्रम झाले आहेत. याचबरोबर परदेशांतही त्यांचे अनेक कार्यक्रम झाले आहेत. त्यांचा १९४९ साली मुंबईच्या किशोरी जव्हेरी यांच्याशी विवाह झाला. किशोरी पारीख नृत्य आणि संगीतात प्रवीण असून इंडियन नॅशनल थिएटरच्या नृत्यनाट्यांमध्ये काम करीत.

संगीताच्या क्षेत्रातील त्यांचा एक महत्त्वपूर्ण उपक्रम म्हणजे १९९० पासून संगीत क्षेत्रातील विविध

विषयांवर आयोजित केलेल्या कार्यशाळा व चर्चासत्रे होय. इंटरनॅशनल म्यूझिक काउन्सिल आणि संगीत रिसर्च अकॅडमी यांच्या संयुक्त विद्यमाने, तसेच एनसीपीए आणि म्यूझिक फोरम (प.) यांच्या सहकार्याने ही चर्चासत्रे गेली वीस वर्षे होत आहेत. भारतातील आणि भारताबाहेरील भारतीय संगीतातील कलाकार, तसेच संगीतशास्त्राचे अभ्यासक यांचा यात सहभाग असतो.

अनेक विषयांवर या चर्चासत्रांमध्ये चर्चा झाल्या असून या चर्चेचे लिखित स्वरूपही उपलब्ध करून दिले जाते. परंपरा आणि बदल, वैश्विकीकरण आणि भारतीय संगीत, वाद्यनिर्माते, सतार, सारंगी, तानपुरा इत्यादी विषय या चर्चासत्रांत आजवर घेतले गेले आहेत. त्यांचे भारतीय संगीतातील विचारमंथनाच्या दृष्टीने केलेले हे कार्य महत्त्वाचे आहे. याशिवाय अनेक गायक-वादकांचे ध्वनिमुद्रण (दस्तऐवजीकरण) त्यांनी करून ठेवले आहे. त्यांनी स्वतः निर्माण केलेल्या ‘गुंजीकौंस’ या रागाच्या प्रत्यक्ष सादरीकरणाची सीडी, इंडियन म्यूझिक, न्यूयॉर्क यांनी निर्माण केली आहे. याशिवाय इतरही कंपन्यांनी त्यांच्या वादनाच्या ध्वनिचकत्या काढल्या आहेत.

अरविंद पारीख यांनी अनेक शिष्य तयार केले असून सुवर्णलता राव, दीपक राजा, गणेश मोहन, विनायक चित्तार, भूपाल पणशीकर, शुभाषा मिश्रा, वंदना शहानी इत्यादींचा यांत समावेश होतो.

— रंजना पोहनकर, माधव इमारते

## पार्वतीकुमार

***कांबळी, महादेव जगन्नाथ***

**नर्तक**

**२७ फेब्रुवारी १९२१ – २९ नोव्हेंबर २०१२**

आचार्य पार्वतीकुमारांचे मूळ नाव जगन्नाथ महादेव कांबळी. त्याचे मूळ गाव मालवण होय. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई होते. कापड गिरणीमध्ये काम करण्यासाठी त्यांचे वडील मुंबईतील परळ येथे येऊन



स्थायिक झाले. येथेच पार्वतीकुमारांचा जन्म झाला आणि येथेच त्यांचे बालपण गेले. त्यांना नृत्याची उपजत आवड स्वस्थ बसू देईना. शाळा सोडून ते नृत्यगुरूंच्या शोधात वणवण फिरले. कथक, कथकली, भरतनाट्यम्, मणिपुरी इ. पारंपरिक शैलींच्या पुनरागमनाचा तो काळ होता. कांबळी मास्तरांनी सारीच तंत्रे आत्मसात केली व त्या काळास अनुरूप असे ‘पार्वतीकुमार’ हे टोपण नाव स्वीकारले. प्रसिद्ध नर्तक उदयशंकर व त्यांचे सहकारी शांतिवर्धन यांच्या कामाचा पार्वतीकुमार यांच्यावर सर्वाधिक पगडा होता. पार्वतीकुमारांनी १९४७ ते १९६५ च्या दोन दशकांत आचार्य इंडियन नॅशनल थिएटर या संस्थेच्या विद्यमाने जवळजवळ वीस नृत्यनाटिका रचल्या व सादर केल्या. त्यांतील ‘व्हिदम ऑफ कल्चर’, ‘देख तेरी बम्बई’, ‘डिस्कव्हरी ऑफ इंडिया’, तसेच खास छोट्या प्रेक्षकांसाठी दिग्दर्शित केलेले ‘पंचतंत्र’, ‘बिल्ली मौसी की फजीहत’, ‘अपना हाथ जगन्नाथ’ आणि ‘दुर्गा झाली गौरी’ ही नृत्यनाट्ये खूपच गाजली. त्यांनी काही हिंदी व तेलुगू चित्रपटांसाठीदेखील नृत्यदिग्दर्शन केले. परंतु त्यांच्या अंतरात्म्याचा ओढा शास्त्रीय नृत्याकडे होता व त्यास अनुसरून त्यांनी भरतनाट्यम्‌वर लक्ष केंद्रित करण्याचे ठरविले. दरम्यानच्या काळात त्यांच्या शिष्या सुमती लाजमी यांच्याशी त्यांनी विवाह केला. लाजमी यांनी संगीत-नृत्यातील स्वतःच्या प्रावीण्याने मास्तरांना योग्य ती साथ दिली.

भरतनाट्यम्‌मधील पारंपरिक शिक्षणासाठी पार्वतीकुमार यांनी बडोद्याचे चंद्रशेखर पिल्लै यांना गुरू मानले. त्या काळात परंपरेतील गुरू कुटुंबाबाहेरील शिष्यास ज्ञान देण्यास तितकेसे उत्सुक नसत. परंतु मास्तरांनी एकलव्याच्या निष्ठेने त्यांच्याकडून अनेक पारंपरिक रचना मिळविल्या. पुढे तंजावरहून मुंबईस

प

येऊन स्थायिक झालेल्या कुप्पय्या पिल्लै व त्यांचे पुत्र महालिंगम पिल्लै यांच्याकडूनही त्यांनी भरतनाट्यम्‌चे पारंपरिक शिक्षण घेतले. चेन्नई येथील कपालीश्वर मंदिराशी निगडित देवदासी परंपरेतील श्रीमती गौरी अम्मा या अभिनयासाठी सुप्रसिद्ध होत्या, ज्यांच्याकडून डॉ. रुक्मिणीदेवी अरुंडेल यादेखील पदम्‌ शिकल्या होत्या, त्यांच्याकडून अभिनय शिकावयास मिळावा अशी मास्तरांची खूप इच्छा होती; पण त्या पुरुषांना शिकवत नसत. तेव्हा सौ. सुमतीबाईंमार्फत मास्तर त्यांच्याकडून अनेक क्षेत्रज्ञ पदे शिकले व त्यांच्या शिष्यांना त्याचा लाभ मिळाला.

तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयाने १९६० च्या सुमारास प्रसिद्ध केलेले ‘कोर्व्याच्या साहित्याचे जिन्नस’ हे पुस्तक मास्तरांच्या पाहण्यात आले. त्यातील भरतनाट्यम्‌सदृश कर्नाटक शैलीतील रचना, घाट व त्यासाठी वापरलेले मराठी काव्य पाहून मास्तर अचंबित झाले. त्यांच्यामधील संशोधक तत्काळ जागा झाला व या ग्रंथाचे कर्ते, रचनाकार सर्फोजीराजे भोसले आणि पर्यायाने तंजावरचे मराठी राजे यांच्या इतिहासाचा मागोवा घेण्यास त्यांनी सुरुवात केली.

या काळात भरतनाट्यम्‌ अधिकाधिक लोकप्रिय होत असताना मराठी भाषेतून त्यातील रचना रंगमंचावर आल्याने महाराष्ट्रात शास्त्रोक्त नृत्यशैली पुन:प्रस्थापित होण्यास हातभार लागणार होता. त्यामुळे मास्तर जोमाने या कामास लागले. मुंबई आकाशवाणीतील मराठी जाणणारे कर्नाटक संगीतज्ञ जनार्दनपंत तांजोरकर यांच्याकडून त्यांनी या ग्रंथातील काही निवडक रचना संगीतबद्ध करून घेतल्या व डॉ. सुचेता भिडे-चापेकर यांनी १९६६ साली मुंबई येथील राज्यस्तरीय नृत्यमहोत्सवात त्याचे प्रथम सादरीकरण केले.

महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळाचे तत्कालीन अध्यक्ष, सुप्रसिद्ध साहित्यिक पु. ल. देशपांडे या कार्यक्रमास उपस्थित होते. या अनुपम प्रयोगास त्यांनी तत्काळ गौरविले व मास्तरांना या विषयावरील पुढील संशोधनासाठी मंडळातर्फे अनुदान दिले गेले. त्यामुळे उत्साहित होऊन मास्तर स्वतः तंजावर येथे गेले व सर्फोजीराजांच्या अनेक रचना त्यांनी सरस्वती महालातील हस्तलिखितांतून निवडून आणल्या व त्यास संगीतनृत्याचा साज चढविला. महाराष्ट्रात शास्त्रीय नृत्याने मूळ धरण्याच्या दृष्टीने आचार्य पार्वतीकुमार यांचे हे फार मोठे योगदान आहे. ‘तंजावर नृत्य प्रबंध’ हा त्यांचा या विषयावरील ग्रंथ महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळातर्फे प्रसिद्ध झाला आहे.

आचार्य पार्वतीकुमार यांचे दुसरे महत्त्वाचे योगदान म्हणजे त्यांनी परंपरागत शिक्षणात शास्त्राधार अतिशय शिस्तबद्धपणे पुन:प्रस्थापित केला. आज प्रत्येक नृत्यशाळेतून ‘अभिनयदर्पण’ शिकवले जाते, हस्तमुद्रांचे जुन्या संस्कृत ग्रंथात दिलेले विनियोग शिकवले जातात, याचे पूर्ण श्रेय मास्तरांकडे जाते. आपल्या सर्वच शिष्यांना ते पूर्ण अभिनयदर्पण शिकवीत असत. अलीकडच्या काळात त्यांनी त्यांच्या नवीन शिष्यांकडून हा ग्रंथ प्रात्यक्षिक रूपात नाचण्याचा अभिनव प्रयोगही केला होता. शास्त्र आणि परंपरा यांचा अतूट संबंध यामुळे स्पष्टपणे पुढे आला आहे, हे महत्त्वपूर्ण आहे.

महाराष्ट्रात आज परंपरेने चालत आलेली, याच मातीतून उपजलेली स्वत:ची अशी शास्त्रीय नृत्यपरंपरा नाही. पण अर्वाचीन काळात ते बीज पेरून त्यास खतपाणी घालून रुजवण्याचे काम करणारे जे शेलके मराठी कलावंत आहेत, त्यांमध्ये आचार्य पार्वतीकुमार ‘मास्तर’ किंवा ‘मास्टरजी’ हे नाव अग्रक्रमांकाने घ्यावे लागेल. यांना स्वयंभू नर्तक म्हणणे उचित ठरावे. ते जेवढे उत्तम गुरू होते, तेवढेच उत्तम नर्तकही होते. ते स्वतःच्या प्रज्ञेने अधिक शिकले. त्यांच्यामध्ये स्वतंत्र विचार करण्याची ताकद होती आणि त्याच गोष्टी त्यांनी शिष्यांपर्यंतही पोहोचविल्या.

आचार्य पार्वतीकुमार शिष्यांना शिकविताना अडवू (भरतनाट्यम्‌चे प्राथमिक धडे) स्वतः उभे राहून करून दाखवीत. त्यांच्या सर्व हालचाली रेखायुक्त, संतुलित व सौष्ठवपूर्ण असत. अभिनय करताना प्रथम डोळ्यांतून सर्वच भावछटा ते उत्तम दाखवीत आणि विद्यार्थिनींच्या

प

चेहऱ्यावरही तोच भाव उमटावा म्हणून ते अक्षरशः हजारो उदाहरणे देत. पुराणकथांचे व व्यक्तिरेखांचे वास्तवाशी नाते जोडीत.

त्यांच्या शिष्यवर्गापैकी काही शिष्यांचा उल्लेख करावा लागेल. डॉ. सुचेता भिडे-चापेकर, संध्या पुरेचा, पारुल शास्त्री, जयश्री आणि वेणुगोपाल पिल्ले इत्यादी.

फाय फाउण्डेशन, मुंबई सूरसिंगार संसद, साहित्य संघ मंदिर इत्यादी मान्यवर संस्थांनी त्यांच्या अमूल्य कार्याचा गौरव केला आहे. महाराष्ट्र राज्य सरकारने, तसेच राष्ट्रीय संगीत नाटक अकादमीनेही त्यांना उच्च पुरस्कारांनी सन्मानित केले आहे.

- डॉ. सुचेता भिडे-चापेकर

## पार्सेकर, श्रीधर

**व्हायोलिनवादक व संगीतकार**

**१९२० - १० सप्टेंबर १९६४**



व्हायोलिन वाद्यावर विलक्षण हुकूमत असणारा हनहुन्नरी कलाकार म्हणून श्रीधर पार्सेकर यांचे नाव घेतले जाते. पार्सेकर हे मूळचे गोव्यातील पेडणे महालातील रहिवासी व त्यांचा जन्म पार्से गावी झाला. मामा परशुरामबुवा पार्सेकर यांच्याकडून संगीताचे आरंभीचे धडे घेतलेल्या पार्सेकरांनी बालवयातच गायन, तसेच तबला, हार्मोनिअम, जलतरंग या वाद्यांच्या वादनात प्राविण्य मिळवले. अकराव्या वर्षी गोव्यातील बॅन्डमध्ये ते क्लॅरिनेटही वाजवू लागले, संगीत नाटके व कीर्तनांसाठी ते पायपेटीची साथ करू लागले. या सावळ्या वर्णाच्या तरतरीत मुलाचे हे वादन बार्देस महालात नावाजले जाऊ लागले.

संगीताची अधिक सखोल आराधना करण्याचे स्वप्न घेऊन पार्सेकर चौदाव्या वर्षी मुंबईत आले व त्यांनी आपला मित्र, हार्मोनिअमवादक मधुकर पेडणेकर यांच्या बरोबरीने जबरदस्त रियाज सुरु केला. त्या काळात पं. गजाननबुवा जोशींचे मुंबईत संगीत विद्यालय होते. तेथील व्हायोलिनच्या स्वरांनी पार्सेकरांवर मोहिनी घातली व त्यांनी १९३४ ते १९३७ या काळात गजाननबुवांकडून व्हायोलिनवादनाचे धडे घेतले. आग्रा व अत्रौली घराण्याच्या खादीम हुसेन खां, नथ्थन खां, अन्वर हुसेन खां व रत्नकांत रामनाथकर यांचेकडून गायनाचीही तालीम घेतली. या सुमारास संगीतदिग्दर्शक अण्णासाहेब माईणकर यांच्याकडे मधुकर पेडणेकर हे साहाय्यक म्हणून काम करीत, त्यामुळे पेडणेकरांनी चित्रगीतांच्या ध्वनिमुद्रणांत व्हायोलिनवादक म्हणून पार्सेकरांना पाचारण केले. त्यामुळे उमेदवारीच्या काळात पार्सेकरांना चित्रपटांच्या वाद्यवृंदाचा अनुभव मिळाला.

रामनाथकरांच्या सूचनेनुसार पार्सेकरांनी मुंबई आकाशवाणीमध्ये व्हायोलिनवादक म्हणून सहा वर्षे (१९३७ ते १९४२) नोकरी केली. आकाशवाणीवर दिनकर अमेंबल यांच्या वाद्यवृंदासाठी त्यांनी वादन केले, तसेच अमेंबलांसह बासरी-व्हायोलिन जुगलबंदीही केली. एकल प्रस्तुती व साथसंगत या दोन्हींत त्यांचे सारखेच प्राविण्य होते. गायनाचार्य वझेबुवा, मास्तर कृष्णराव, मास्तर दीनानाथ, ओंकारनाथ ठाकुर, फैयाज खां, विलायत खां अशा अनेक गवैयांना त्यांनी तोडीस तोड अशी साथसंगत केली. मात्र हा मनस्वी, अजातशत्रू कलावंत कोणत्याच नोकरीत टिकेल अशा स्वभावाचा नव्हता. पुढे नोकरी व साथ करणे सोडून त्यांनी एकलवादनाच्या मैफली गाजवल्या.

व्हायोलिन या विदेशी वाद्यावर भारतीय संगीत वाजवण्यासाठी पार्सेकरांनी आपल्या गुरुंप्रमाणेच अत्यंत परिश्रम घेतले व त्यावर कमालीची हुकूमत मिळवली. व्हायोलिनवादनाचे तंत्र व माधुर्य या बाबतीत पार्सेकर आपल्या गुरूंच्याही पुढे गेले व त्यांनी आपली आगळीवेगळी शैली निर्माण केली. डाव्या हाताच्या अंगुलीचालनाबरोबरच उजव्या हाताचे गजकामही ते फार सफाईने करत. सतार, सरोद, शहनाई इ. वाद्यांच्या

प

वादनतंत्रातील खासीयती त्यांनी आपल्या व्हायोलिनवादनात आणल्या. आलापचारी करताना सलगपणा, मींडकामातील नजाकत, तानेतील चापल्य आणि लयकारीतील पक्केपणा, चमकदारपणा हे विशेष गुण त्यांच्या वादनात दिसत. लयतालावर जबरदस्त पकड असल्याने ते तिहायांचे अनेक प्रकार वाजवत, मात्र लयकारी करतानाही त्यांचे वादन अत्यंत सुरेल असे. सौम्यपणा व आक्रमकता यांचा अजब खेळ त्यांच्या वादनात असे. मल्हार, दरबारी कानडा, जोगकंस, अहीरभैरव, पूरियाकल्याण असे मींडप्रधान, गंभीर राग ते भारदस्तपणे वाजवत; तर ठुमरी, धुना वाजवताना पंजाबी ढंगाच्या खटकामुरक्यांनी ते नखरेलपणा निर्माण करत. व्हायोलिन या वाद्यास सतारीप्रमाणे गुंजन नाही व चिकारीची तार नसल्याने स्वरावकाश भरण्याची सोयही नाही, म्हणून पार्सेकरांनी डाव्या हाताच्या करंगळीने व्हायोलिनची तारषड्जात जुळवलेली चौथी तार स्वरवाक्यांच्या दरम्यान वाजवणे सुरू केले. हे तंत्र इतके रूढ झाले की पुढे अनेक व्हायोलिनवादकांनी ही लकब अंगिकारली व आजही ती प्रचलित आहे. पं. रविशंकर, विलायत खां यांसारख्या सतारवादकांबरोबर जुगलबंदी करतानाही त्यांनी आपल्या वादनाचा वेगळा ठसा उमटवला. पार्सेकरांनी त्या काळात एकल व्हायोलिनवादक म्हणून भारतभर कीर्ति मिळवली. स्वरनिनाद (१९४८) हे व्हायोलिनविषयीचे पुस्तक त्यांनी लिहिले होते.

नाटक व चित्रपटांचे संगीतकार म्हणून पार्सेकरांनी १९४०-५०च्या दशकांत आपला ठसा उमटवला. भक्त दामाजी (१९४२), पैसा बोलतो आहे (१९४३), कुबेर (केशवराव भोळे यांच्यासह, १९४७), भाग्यरेखा (१९४८), सोन्याची लंका (१९५०), मर्द मराठा (१९५०), वाकडं पाऊल (१९५६) या सात चित्रपटांना त्यांनी संगीत दिले. त्यांनी स्वरबद्ध केलेले 'भक्त दामाजीतील' 'विठ्ठल गजरी अवघी दुमदुमली पंढरी' हे भजन लोकप्रिय झाले व ते दिंडीतही म्हटले जाई. नाटककार मो. ग. रांगणेकरांच्या नाट्यनिकेतन संस्थेसाठी कन्यादान (१९४३), माझे घर (१९४५), माहेर (१९५१), रंभा (१९५२), वहिनी, अपूर्व बंगाल, जयजयकार (१९५३), अर्ध्या वाटेवर (कोरगावकरांसह, १९५५), हिमालयाची बायको (१९६२) या नऊ नाटकांना त्यांनी संगीतसाज चढवला. 'वहिनी'तील पु.ल.देशपांडेंनी गायलेली 'पाखरा जा' व 'ललना कुसुम कोमला' ही पदे गाजली होती. एच्.एम्.व्ही. कंपनीसाठी त्यांनी भावगीतेही स्वरबद्ध केली व हिराबाई बडोदेकर, सरस्वती राणे, ज्योत्स्ना भोळे, वत्सला कुमठेकर, लोंढे, कृष्णराव चोणकर अशा कलाकारांच्या आवाजात ती ध्वनिमुद्रित झाली.

अखेरच्या काळात पार्सेकरांना दारूचे व्यसन लागले आणि यात त्यांच्या आयुष्याचा व कलेचाही ऱ्हास झाला. अनेक चाहत्यांनी त्यांना सावरण्यासाठी मदत केली, मात्र ते या व्यसनातून कधीच वर येऊ शकले नाहीत. एके काळी उदंड मान व धनही मिळवून, त्या काळात स्वतःच्या कारमधून रुबाबात फिरणारा हा कलावंत अक्षरशः रस्त्यावर आला. त्यांचा दुर्दैवी अंत मुंबईत झाला.

व्हायोलिनवादनातील खास 'पार्सेकर शैली'चा प्रभाव पुढील अनेक वादकांवर झाला. पुष्पलता कुलकर्णी, व्ही. के. प्रधान, मो. रा. गोडबोले, अनंतराव फाटक, पांडुरंग शिवलकर, उकिडवे असे काही शिष्य पार्सेकरांनी तयार केले. व्ही. जी. जोगांवर पार्सेकरांचा प्रभाव होता. शिवाय मुंबईचे बळवंत गोठस्कर, पुण्याचे बा. शं. उपाध्ये, दफ्तरदार, नागपुरचे विष्णूपंत कावळे, तळेगावचे शशिकांत शेटये (प्रथम मुंबई व नंतर बडोदे आकाशवाणी) अशांनी पार्सेकरांना आदर्श मानले.

– चैतन्य कुंटे

## पिंपळखरे, गंगाधर वामन

**संगीत शिक्षक**

**१२ जून १९११ – १० ऑगस्ट २००३**

संगीत क्षेत्रात गायक म्हणून नव्हे, तर गुरू म्हणून गाजलेली काही व्यक्तिमत्त्वे आहेत, त्यांच्यामध्ये

प



गंगाधरबुवांचे नाव प्रामुख्याने घेतले जाते. धोतर, टोपी असा साधा वेष आणि निगर्वी स्वभावाचे गंगाधरबुवा 'गुरुजी' किंवा 'सर' या नावाने सर्वपरिचित होते.

गंगाधर वामन पिंपळखरे यांच्या मातु:श्रींचे नाव लक्ष्मीबाई होते. पुण्यातील न्यू इंग्लिश स्कूल, रमणबाग येथे बुवांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले. त्यानंतर कँप एज्युकेशन सोसायटीतून त्यांनी एस.टी.सी. केले. आर्थिक अडचणींमुळे त्यांना महाविद्यालयीन शिक्षण घेता आले नाही. त्यांचे पूर्वायुष्य अतिशय कष्टाचे व खडतर असे गेले. सदाशिव पेठेमध्ये त्यांच्या भावाचा दुधाचा व्यवसाय होता. तेथे म्हशी पिळणे, गोठा साफ करणे अशी कामे करत त्यांनी शिक्षण केले. त्यांना व्यायामाची आणि मर्दानी खेळांची फार आवड होती. दांडपट्टा, लेझीम, फरी गदगा, कुस्ती अशा खेळांत ते तरबेज होते. नियमित व्यायाम व मिताहार हे त्यांच्या दीर्घायुष्याचे रहस्य होते.

त्यांचा १९३८ साली विवाह निर्मलाबाई शिदोरे यांच्याशी झाला. ते १९४२ मध्ये हिंगणे स्त्री-शिक्षणसंस्थेच्या आनंदीबाई कर्वे प्राथमिक शाळेत मुख्याध्यापक म्हणून रुजू झाले. ही शाळा त्या वेळी कोथरूडला होती. ही शाळा नावारूपाला येण्यासाठी, गावच्या अशिक्षित नागरिकांना शिक्षण मिळण्यासाठी, त्यांना स्वच्छता व चांगले संस्कार देण्यासाठी बुवांनी अपार परिश्रम केले. शाळेच्या खोल्या शेणाने सारवण्यापासून, बालवाडी सुरू करण्यापासून, रात्री ९ ते १२ दरम्यान लोकांसाठी साक्षरतेचे वर्ग घेण्यापासून ते घरोघरी जाऊन लोकांच्या भेटी घेऊन त्यांना सुजाण नागरिक करण्यापर्यंत त्यांनी अफाट मेहनत केली. त्यांनी १९६१ च्या महापुरात शाळेत पूरग्रस्तांसाठी मदत केंद्रही चालवले. कोथरूडमध्ये ते आदर्श व लोकप्रिय गुरुजी होते. पुढे ही शाळा महानगरपालिकेच्या ताब्यात गेल्यावर त्यांच्या नियमांप्रमाणे त्यांना ही नोकरी सोडावी लागली.

महाविद्यालयीन शिक्षण अपुरे राहिले तरी संगीत शिक्षणाच्या बाबतीत ते सुदैवी ठरले. संगीताचे सुरुवातीचे शिक्षण त्यांनी गोपाळ गायन समाजात पं. गोविंदराव देसाईंकडे घेतले. गायनाचार्य पं. विष्णू दिगंबर पलुसकर हे गोविंदरावांचे गुरू. तीन-चार वर्षे गोपाळ गायन समाजात शिकल्यानंतर गंगाधरबुवांनी विष्णू दिगंबरांचे आणखी एक शिष्य व भारतभर कीर्ती मिळवलेले पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्याकडे पाच-सहा वर्षे शिक्षण घेतले व ते 'संगीत विशारद' झाले. पुण्याच्या गांधर्व महाविद्यालयात व विष्णू दिगंबर संगीत विद्यालयात त्यांनी काही काळ अध्यापनाचेही काम केले. सवाई गंधर्व तथा पं. रामभाऊ कुंदगोळकर यांचाही सहवास त्यांना पाच-सहा वर्षे लाभला. त्यांच्याबरोबर मद्रास, म्हैसूर, बंगलोर इथल्या मैफलींमध्ये त्यांनी स्वरसाथ केली.

शाळेची नोकरी जवळजवळ अठ्ठावीस वर्षे करून झाल्यावर १९६३ सालापासून त्यांनी पत्र्या मारुतीजवळील स्वत:च्या राहत्या घरातून अत्यंत व्रतस्थ वृत्तीने विद्यार्थ्यांना संगीत शिकवण्यास सुरुवात केली. पं. विनायकबुवा पटवर्धनांच्या 'राग-विज्ञान' पुस्तकांना प्रमाण मानून, त्यानुसारच ते शिकवीत असत. हाडाचे शिक्षक असल्याने विद्यार्थ्यांचा वकूब ओळखून ते विद्यादान करत असत. शिकवताना ते अत्यंत कठोर व काटेकोर असत; पण इतर वेळी ते विद्यार्थ्यांवर स्वत:च्या मुलाप्रमाणे माया करीत असत. बंदिशींची तालातली मांडणी अचूक व नेमकी असावी, रागाचे नियम काटेकोरपणे पाळले जावेत यांबाबत ते आग्रही असत; पण तरीही विद्यार्थ्यांच्या कल्पकतेला ते यथोचित वाव देत असत. विद्यालय पद्धतीने आलाप, ताना लिहून देण्याच्या किंवा घेण्याच्या ते विरोधात असत. त्यांच्या विद्यार्थ्यांकडे 'गाण्याची वही' नसे. गाणे डोक्यात ठेवून रियाझाने आत्मसात करण्यावर त्यांचा भर असे.

गायक म्हणून नावारूपाला आलेल्या त्यांच्या

प

शिष्यांपैकी प्रमुख म्हणजे पद्मा तळवलकर व संजीव अभ्यंकर हे होत. डॉ. शोभा अभ्यंकर, डॉ. माधुरी जोशी, जयश्री रानडे, अनुराधा गरुड, इ. शिष्यांनीही एसएनडीटी विद्यापीठात एम.ए. करण्यात उज्ज्वल यश संपादन केले व संगीतासंबंधी वेगवेगळ्या क्षेत्रांत हे व इतर अनेक शिष्य व शिष्या कार्यरत आहेत. संगीता नेरुरकर या विद्यार्थिनीने 'झी'टीव्हीच्या 'सारेगमप'च्या आंतरराष्ट्रीय महोत्सवात विजेतेपद पटकावले. युवा पिढीतील राहुल देशपांडे, पुष्कर लेले इ. अनेक कलाकारांचे पायाभूत शिक्षण पिंपळखरेबुवांकडेच झाले.

पुणे विद्यापीठाच्या ललित कला केंद्राच्या पहिल्या गुरूंमध्ये बुवांचा समावेश झाला. त्यांना अनेक पुरस्कार व सन्मान लाभले. पुणे नगरपालिकेचा सन्मान, पं. जसराज मित्रमंडळाकडून सत्कार, बाबासाहेब गाडगीळ मेमोरिअल फाउण्डेशनतर्फे 'संगीतश्री' पुरस्कार, पं. वसंतराव गाडगीळ यांच्या 'शारदा ज्ञानपीठम्'तर्फे आयुष्यभर राष्ट्रसेवा करणाऱ्या ऋषितुल्य तपस्वींपैकी एक म्हणून सत्कार, गांधर्व महाविद्यालयातर्फे 'विष्णू दिगंबर संगीत शिक्षक गौरव' पुरस्कार (१९९९), नाशिक जिल्हा, पुणे जिल्हा, नगर जिल्हा यांच्यातर्फे 'आदर्श शिक्षक' पुरस्कार, 'सुरेल सभे'कडून गुरुबंधू भीमसेन जोशी यांच्या हस्ते सत्कार, इ.

वयाच्या एक्याण्णवाव्या वर्षापर्यंत ते कार्यरत होते. ब्याण्णवाव्या वर्षी त्यांचे पुण्यात निधन झाले. त्यांच्या नावाने उभरत्या युवा शास्त्रीय गायकाला २००८ सालापासून पुरस्कार दिला जात आहे. त्यांच्या संगीताचा वारसा त्यांचे पुण्यात व इतरत्र पसरलेले अनेक शिष्य पुढे चालवीत आहेत.

— अनुराधा गरुड

## पिंपळघरे, कोलबाजी द्रोणाजी

**तबला व पखवाजवादक**

**१ फेब्रुवारी १९२४**

कोलबाजी द्रोणाजी पिंपळघरे यांचा जन्म नागपूर जिल्ह्यातील सावनेर तालुक्यात वाकोडी गावी, विणकर



कुटुंबात झाला. त्यांचे चुलते लक्ष्मण तबला व पखवाजवादक होते. पिंपळघरे यांच्या आईचे नाव पूर्णाबाई होते. लक्ष्मणकाकांबरोबर कोलबाजीही तबला, पखवाज वाजवू लागले. वादनकलेत उत्तम शिक्षण मिळावे म्हणून पिंपळघरे कुटुंबीय नागपूरला स्थायिक झाले आणि बळीराम पंडे यांच्याकडे पिंपळघरेंनी १९३७ ते १९४५ पर्यंत रीतसर अध्ययन केले. विख्यात पखवाजी शंकर अलकुटकरांचे मार्गदर्शनही त्यांना लाभले. पुढे बळीराम पंड्यांनी त्यांना लखनौला नेऊन सखारामजींच्या स्वाधीन केले. तेथे पिंपळघऱ्यांना तबला-पखवाजाची खरी जाण आली. विशारदपर्यंतचा अभ्यास पूर्ण करून आपल्या वादनाने त्यांनी बऱ्याच बैठकी गाजवून लोकप्रियता संपादन केली.

संगीत परिषदा, उत्सवांमध्ये कार्यक्रम, साथसंगत केल्याने पिंपळघरे यांचे अनेकांशी चांगले संबंध निर्माण झाले. डॉ. सुमती मुटाटकर, राजाभैया पूछवाले यांच्यासारख्या गवय्यांना त्यांनी साथ केली. इंदूरचे प्रसिद्ध पखवाजवादक अंबादासपंत आगळे यांचे मार्गदर्शन घेऊन त्यांनी वादनाची खुबी आत्मसात केली.

डॉ. सुमती मुटाटकरांच्या साहाय्याने गोविंद बऱ्हाणपूरकरांकडून त्यांनी नवनवीन बोल, संगत तंत्र ज्ञात करून घेतले. धारचे शिल्पकार, संगीतज्ञ र.कृ. फडके, तसेच मैहरचे उ. अल्लाउद्दिन खाँ यांच्याशीही त्यांचा संगीत-संवाद होता. श्रम व श्रद्धा, गुणग्राही स्वभावाने त्यांनी स्वत:ची उत्तम प्रगती केली. गुरूंच्या पश्चात 'बळवंत वादन कलाभुवन' सांभाळले.

पिंपळघरे १९३९ साली 'चतुर संगीत महाविद्यालया'त तबलाध्यापक म्हणून नियुक्त झाले. तेथेच त्यांनी ३५ वर्षे आदर्श तबलाशिक्षक म्हणून सेवा केली. त्यांनी १९६१ ते १९६४ पर्यंत अध्यापनाचे कार्य

प

केले. त्यांनी १९६५ मध्ये बिंझाणी महिला महाविद्यालयात तबलावादकाची नोकरी लागली. नागपूर आकाशवाणीवर १९४८ पासून त्यांचे कार्यक्रम सुरू झाले. पिंपळघऱ्यांनी अनेक विख्यात कलाकारांची साथसंगत कुशलतेने केली. त्यांनी १९५८ मध्ये पंचमढीला राष्ट्रपतींसमोर एका कार्यक्रमात भाग घेतला होता. संगीताची विद-ऑनर्स पदवी परीक्षा खैरागड विश्वविद्यालयात सुरू करण्यासाठी प्रयत्न करणाऱ्यांमध्ये ते एक आहेत.

पिंपळघरे यांचा स्वभाव शांत, सौम्य, सोज्ज्वळ, विनम्र असून त्यांचा शिष्यपरिवार मोठा आहे. तबला-पखवाजाचे एकल वादन व सुसंबद्ध साथसंगतीत ते तरबेज आहेत. त्यांच्या शिष्यपरिवारात गजानन ताडे (खैरागड), बाळ तुळाणकर (अमरावती), भैयाजी पिंपळखरे, मुरलीधर दीक्षित यांचा समावेश आहे.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण गोविंद; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; प्रथमावृत्ती, मार्च १९७४.*

## पिळगावकर, अरविंद गडबडनाथ

**गायक, नट**

**१८ ऑक्टोबर १९३७**



मराठी संगीत रंगभूमीवरील ज्येष्ठ गायक - नट अरविंद गडबडनाथ पिळगावकर यांचा जन्म मुंबईत झाला. गडबडनाथ दिनानाथ पिळगावकर आणि सुमतीबाई यांचे हे सुपुत्र. वडील सचिवालयात (सेक्रेटरिएट) महसूल खात्यात नोकरीला होते. घरात संगीत वा नाटकाचा वारसा नव्हता. मात्र आई गाणे चांगले म्हणत असे. मंगलाष्टके रचून त्यांना चाली लावत असे. तिला गाण्याची बुद्धी व आकलन होते.

अरविंद पिळगावकर शेठ धरमशी गोविंदजी ठाकरसी हायस्कूलमधून १९५४ साली मॅट्रिक उत्तीर्ण झाले, तर १९५८ साली विल्सन महाविद्यालयामधून 'इतिहास' आणि अर्थशास्त्र हा विषय घेऊन बी.ए.ची पदवी घेतली. १९६० ते १९७० या काळात त्यांनी उच्च न्यायालयात नोकरी केली. १९७० पासून त्यांनी पूर्णवेळ संगीतनाटक करण्याचा निर्णय घेतला.

त्यांनी वयाच्या विसाव्या वर्षांपासून शास्त्रोक्त संगीताचे शिक्षण घेण्यास सुरुवात केली. सुरुवातीला के.डी. जावकरांकडे त्यांनी सात वर्षे तालीम घेतली. के.डी. जावकर हे अंतुबुवा जोशींचे पहिले शागीर्द व नंतर ते अब्दुल करीमखाँकडे शिकले.

'वासवदत्ता' या नाटकाच्या निमित्ताने अरविंद पिळगावकरांचा पं. जितेंद्र अभिषेकी यांच्याशी संबंध आला. त्यानंतर जवळ जवळ दहा वर्षे त्यांना पं. जितेंद्र अभिषेकींचा सहवास लाभला व शास्त्रोक्त संगीताची तालीम मिळाली. पं. अभिषेकींनंतर गोविंदबुवा अग्नींकडे १९७५ पासून त्यांनी वीस वर्षे तालीम घेतली. या शिवाय जुन्या संगीत नाटकांतील भूमिका तयार करण्यासाठी प्रभाकर भालेकर यांच्याकडून व भार्गवराम आचरेकर यांच्याकडून नाट्यसंगीताचे खास शिक्षण घेतले.

संगीत रंगभूमीवर त्यांचे पदार्पण १९६४ साली, मुंबई मराठी साहित्य संघाच्या यशवंतराव होळकर या ऐतिहासिक नाटकाद्वारे झाले. त्यांचे संगीत रंगभूमी कारकीर्दीतील पहिले महत्त्वाचे नाटक वसु भगत यांचे 'संगीत वासवदत्ता' (१९६७) होय. त्याचे संगीत पं. जितेंद्र अभिषेकींचे होते. अरविंद पिळगावकरांनी नाटकातील नायक उदयनची भूमिका साकारली होती. सुहासिनी मुळगावकर त्यांच्या सहनायिका होत्या. 'तुझा गे नितनूतन सहवास', 'तू येता सखी माझ्या सदनी' इ. या नाटकातील गाणी गाजलीत. याचवर्षी पुरुषोत्तम दारव्हेकरांच्या 'नयन तुझे जादूगार' या नाटकातील 'उडूनी जा पाखरा' या गाण्यामुळे ते विशेष प्रसिद्धीच्या झोतात आले.

प

अरविंद पिळगावकरांची संगीत रंगभूमीवरील वाटचाल पाहता त्यांनी सामाजिक, ऐतिहासिक, पौराणिक-भक्तिरसपूर्ण, लोकनाट्य-प्रधान, अशा विविध प्रकारच्या संगीत नाटकांतून भिन्न-भिन्न प्रकारच्या भूमिका केलेल्या दिसतात.

अरविंद पिळगावकर यांच्या भूमिका असलेल्या काही नाटकांची नावे अशी : 'घनश्याम नयनी आला' (सं. यशवंत देव), 'धाडिला राम तिने का वनी' (सं. जितेंद्र अभिषेकी), 'सोन्याची द्वारका' (सं. जितेंद्र अभिषेकी), 'संत नामदेव', 'भाव तोच देव', 'जय जगदीश हरे', (सं. सी.आर. व्यास), 'आतून कीर्तन वरून तमाशा' (विश्वनाथ मोरे), 'दशावतारी राजा' (अनंत अमेंबल), 'विठो रखुमाय' (यशवंत देव) इत्यादी. याशिवाय 'राया तुम्ही गादीवर बसा', सुहासिनी मुळगावकरांचे 'बाई एके बाई' व पु.ल. देशपांडे यांच्या 'वाऱ्यावरची वरात' यातूनही कामे केलेली आहेत.

याशिवाय सं. मानापमान, सं. सौभद्र, सं. मृच्छकटिक, सं. संशयकल्लोळ, सं. विद्याहरण, सं. शारदा आदि जुन्या अभिजात संगीत नाटकांतूनही अरविंद पिळगावकर यांनी प्रमुख भूमिका साकारलेल्या आहेत. इतकेच नव्हे तर १९९१ साली 'संयुक्त मानापमान' या नाटकाला सत्तर वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने केलेल्या 'मानापमान' या नाटकात सूत्रधार, पहिल्या दोन अंकात धैर्यधराची, तर पुढील दोन अंकात लक्ष्मीधराची भूमिका साकारून विक्रमच केला होता.

मुंबई मराठी साहित्य संघातर्फे घेतल्या जाणाऱ्या साभिनय नाटक-संगीत प्रशिक्षण वर्गात त्यांनी मार्गदर्शक म्हणून काम केले आहे. तसेच विद्याधर गोखले प्रतिष्ठानतर्फे घेण्यात येणाऱ्या नाट्यसंगीत प्रशिक्षण वर्गातही गेल्या काही वर्षांपासून प्रशिक्षक म्हणून सहभाग आहे. 'नाट्यगान निपुण कला' हा नाट्य संगीतावर आधारित साभिनय एकपात्री कार्यक्रमही ते सादर करतात.

रंगभूमीवरील प्रदीर्घ कारकीर्दीच्या निमित्ताने अनेक पुरस्कार- पारितोषिकांचे ते मानकरी ठरलेले आहेत. नानासाहेब फाटक पुरस्कृत 'गणपतराव जोशी सुवर्णपदक' (१९८२), अखिल भारतीय नाट्य परिषदेचे 'बालगंधर्व' पारितोषिक (१९९६), अ.भा. नाट्य परिषदेचा 'संगीतसूर्य केशवराव भोसले' पुरस्कार (२०००), 'नाट्याचार्य गोविंद बल्लाळ देवल' पुरस्कार, सांगली (२०१०), महाराष्ट्र शासनाचा 'अण्णासाहेब किर्लोस्कर जीवन पुरस्कार' (२०१३) इत्यादी पुरस्कारांचा उल्लेख करता येईल.

सत्त्याहत्तर वर्षीय अरविंद पिळगावकर अजूनही कार्यक्षम असून संगीत-नाटक क्षेत्रात कार्यरत आहेत. तरुण पिढीतील संगीत नाटकातील गायकनटांना ते मार्गदर्शन करत असतात. तसेच संगीत नाटकाचे संपादन व दिग्दर्शनही ते करतात. रागदारी संगीताची तालीम व उत्तम ग्रहणशक्ती व स्मृती यामुळे अनवट, अप्रचलित रागातील विविध बंदीशी, तसेच नाट्यसंगीताच्या जुन्या-नव्या चाली, नुसत्याच संग्रही नसून कंठोद्‌गत आहेत. अरविंद पिळगावकरांचे वास्तव्य मुंबईत असते.

**— माधव इमारते**

## पी. मधुकर

***पेडणेकर, मधुकर गंगाधर***

**हार्मोनिअमवादक, संगीतकार**

**२७ फेब्रुवारी १९१६ — २० जुलै १९६७**

मधुकर गंगाधर पेडणेकरांचा जन्म मुंबईत झाला. गोव्यातील पेडणे महालातील गाळी हे लहानसे गाव त्यांचे मूळ ठिकाण होते. १९व्या शतकातले गोव्यातले सुप्रसिद्ध संगीतज्ञ मुरारबा पेडणेकर याच भागातले असल्याने त्यांची शिष्यशाखाही तिथे रुजली होती आणि त्याच परंपरेतील शंकरराव राजापूरकर 'गुणिजन' हे हार्मोनिअमवादक हे पेडणेकरांचे मामा होते. मामांकडूनच त्यांनी वादनाचे आरंभीचे धडे घेतले. तसेच बखलेबुवांच्या परंपरेतील मुंबईतील तेव्हाचे

प



नामवंत हार्मोनिअम शिक्षक बहुलकर यांच्याकडेही ते शिकले. वयाच्या आठव्या वर्षीच ते वादनात निपुण झाले आणि इतक्या बालवयातच सवाई गंधर्वांसारख्या मातबर गवयाला त्यांनी साथ केली, त्याबद्दल त्यांना डॉ. कूर्तकोटींकडून सुवर्णपदकही मिळाले.

तत्कालीन ख्यातकीर्त हार्मोनिअमवादक, मराठी चित्रपटांचे संगीत दिग्दर्शक अण्णासाहेब माईणकर यांच्याकडे पेडणेकरांचे शिक्षण सुरू झाले. इथे पेडणेकरांची सर्वांगीण प्रगती झाली व सांगीत व्यक्तित्व घडले. माईणकरांच्या घरात अनेक उस्तादांचे येणे-जाणे असे. त्यामुळे पेडणेकरांना आग्रेवाले उ. फैयाजखाँ, बशीरखाँ, किराणावाले अब्दुल करीमखाँ, घम्मनखाँ, हाफीज अलीखाँ, इ. गायकांचा, बुंदूखाँ आणि कादरबक्ष अशा सारंगीवादकांचा, अहमदजान थिरकवा यांसारख्या तबलावादकांचा मनमुराद सहवास लाभला. अण्णासाहेबांच्याच शिफारशीनुसार पंजाबातील सक्कर येथील संगीत महोत्सवात पेडणेकरांनी पतियाळा घराण्याच्या आशिक अलीखाँसाहेबांना हार्मोनिअम संगत केली व त्यांच्याकडे सहा महिने राहून ते शिकलेही. किराणा घराण्याच्या बेहरेबुवांनाही त्यांनी गुरुस्थानी मानले होते व संगीतशास्त्रासाठी आचार्य बृहस्पतींचे मार्गदर्शन ते घेत.

एक उत्तम हार्मोनिअमवादक म्हणून १९३०च्या दशकात पेडणेकरांचा लौकिक होऊ लागला. वझेबुवा, गोविंदराव टेंबे, रातंजनकर इ. गुणिजनांनी त्यांना वाखाणले. १९३४ सालच्या सुमारास ते एच.एम.व्ही. कंपनीत वादक म्हणून नोकरीस होते, तसेच ओडियन, यंग इंडिया अशा ध्वनिमुद्रण कंपन्यांच्या अनेक ध्वनिमुद्रणांत वादक म्हणून पेडणेकर सहभागी झाले. ओंकारनाथ ठाकूर, रोशनआरा बेगम, शराफत हुसेनखाँ, बडे गुलाम अली, इंदूरवाले अमीरखाँ, सलामत - नजाकत अली, नियाज – फैयाज अहमद खाँ, कुमार गंधर्व अशा त्या काळच्या अत्यंत तयार गळ्याच्या अनेक गवयांना पेडणेकरांनी तोडीस तोड अशी साथसंगत केली. अत्यंत मुश्कील तानपलटा, लयकारी, बोलतानाही ते हुबेहूब वाजवत असत – जणू त्यांच्या साथसंगतीत 'अशक्य' असे काही नव्हतेच! कोणत्याही सांगीत आविष्काराचे अत्यंत जलदगतीने स्वरलेखन ते करू शकत.

पेडणेकरांचे हार्मोनिअमवादन हे हररंगी होते. विलंबित ख्यालाने सुरुवात करून अती द्रुतलयीतील गतकारी, मग ठुमरी, नाट्यगीते असा त्यांच्या एकल वादनाचा ढाचा होता. सतारीच्या बाजाचे 'झालावादन' व 'दिर-दिर' असे बोल असणाऱ्या हार्मोनिअमसाठी बनवलेल्या ढंगदार गती हे पेडणेकरांचे हार्मोनिअमवादनात एक वैशिष्ट्य ठरले. ख्यालवादनात अत्यंत बिकट लयीचे विभ्रम ते निर्माण करत, तसेच नजाकतीने ठुमरीही वाजवत. गोविंदराव टेंबे यांनीही त्यांच्या वादनाबद्दल 'अजब आणि तयारीचे वादन' असे कौतुकोद्गार काढले होते. त्यांच्या एकल हार्मोनिअमवादनाच्या एच.एम.व्ही. कंपनीने काढलेल्या ध्वनिमुद्रिका त्या काळी लोकप्रिय होत्या. हार्मोनिअम या वाद्यात पेडणेकरांनी काही रचनात्मक बदल केले, स्वर जुळणीचेही विविध प्रयोग केले. वाजवले जाणारे स्वर दिसतील असा विद्युत्चलित दृश्यपटल हार्मोनिअमला जोडून त्यांनी एक अभिनव प्रयोग केला होता. मुळात पाश्चात्त्य असणारे क्लेव्हायोलिन हे पट्टीफलक (की-बोर्ड) वाद्य भारतात त्यांनीच प्रथम मागवले व त्याचे वादन केले. पुढे अनेक हिंदी, मराठी चित्रपटांच्या संगीतासाठी हे वाद्य वाजवले गेले. हार्मोनिअमला सतारीप्रमाणे तरफांच्या तारा लावून त्याद्वारे हार्मोनिअमच्या काहीशा एकेरी ध्वनिला गुंजन देण्याचा आणि मींड निर्माण करण्याचा प्रयत्नही ते अखेरच्या काळात करत होते.

प

अण्णासाहेबांनी चित्रपटसृष्टीत प्रवेश केल्यावर पेडणेकरांनी अनेक चित्रगीतांच्या ध्वनिमुद्रणांसाठी ऑर्गन वाजवला. नंतर ते अण्णासाहेबांचे संगीत-साहाय्यकही झाले व वाद्यवृंदाचे संयोजन करू लागले. माईणकरांनी संगीत दिलेल्या ‘धर्मवीर’, ‘लपंडाव’, ‘प्रेमवीर’, ‘छाया’, ‘भक्त प्रल्हाद’ या मराठी व हिंदी चित्रपटांसाठी पेडणेकरांनी संगीत साहायक म्हणून काम केले. तसेच ‘वकीलसाहेब’, ‘धर्मपत्नी’ या चित्रपटांना माईणकरांसमवेत संगीत दिले.

आपले गुरू माईणकर यांच्या १९४५ साली झालेल्या निधनामुळे पेडणेकर काहीसे सैरभैर झाले. तेव्हा ते गोव्यात गेले आणि पेडणे ते काणकोण भागात त्यांनी अनेक मैफिली केल्या, काही श्रीमंताकडे शिकवण्याही केल्या. पण त्या काळात गोव्यात पोर्तुगीजांची सत्ता होती व त्या संकुचित वातावरणात त्यांचे मन न रमल्याने ते पुन्हा मुंबईला आले. या काळात त्यांनी चित्रपटसृष्टीत एक स्वतंत्र संगीतकार म्हणून ‘चोखामेळा’ (१९४१), ‘चाळीतील शेजारी’ (१९५०) या मराठी बोलपटांना आणि ‘सावित्री’ या तेलगू चित्रपटांस संगीत दिले.

प

कल्पक, असामान्य बुद्धिमत्तेच्या मधुकर पेडणेकर यांचा स्वभाव कलंदर, मिश्कील, स्वाभिमानी, करारी होता. मुंबईतील ‘सूरसिंगार संसद’सारख्या अनेक संगीत संस्थांशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते आणि अनेक सरकारी कार्यक्रम ते मध्यस्थीने यशस्वीपणे ठरवत असत. मुंबईतील मुगभाटात त्यांचे ‘तानसेन संगीत विद्यालय’ होते, तेथे त्यांनी अनेकांना संगीत शिकवले. त्यांची मोठी शिष्यशाखा असून अनंत केमकर, तुलसीदास बोरकर, विश्वनाथ पेंढारकर, चंद्रचूड वासुदेव, अनंत राणे हे त्यांचे नामवंत शिष्य होत.

मुंबईत कुमार गंधर्वांच्या ध्वनिमुद्रिकांसाठी त्यांनी एच.एम.व्ही. कंपनीत साथ केली आणि या ध्वनिमुद्रणानंतर काही तासांनीच हृदयक्रिया बंद पडून पेडणेकरांचे अकस्मिक निधन झाले. त्यांच्या स्मृतिनिमित्त त्यांचे शिष्य दरसाल एक संगीत सभा आयोजित करतात.

- चैतन्य कुंटे

*संदर्भ :*

*मारुलकर ना. र., गोमंतकीय संगीतकार, मडगाव, गोवा, १९७६*

## पुजारी, दशरथ धनकोडी
**गायक, संगीत दिग्दर्शक**
**३० ऑगस्ट १९३० – १३ एप्रिल २००८**



दशरथ धनकोडी पुजारी यांचा जन्म बडोदा येथे झाला. त्यांचे वडील हे आयुर्वेदाचार्य व मालीशतज्ज्ञ होते. त्यांच्या आईचे नाव कमलाबाई होते. पुजारी यांचे आई-वडील सुरुवातीला मुंबईमध्ये राहत. पुढे बडोद्याच्या राजांच्या व्याह्यांवर उपचार करण्याकरिता ते बडोद्याला गेले. दशरथ पुजारी यांचे शालेय शिक्षण मुंबईतील युनियन हायस्कूलमध्ये झाले. तेव्हा ते मुंबईतील गिरगाव भागात राहत होते. नंतर त्यांनी आई-वडिलांसोबत मुंबई सोडून बार्शी येथे स्थलांतर केले. तेथे योगायोगाने त्यांना शास्त्रीय गायक गोपाळ भातंबरेकर यांचा शेजार लाभला. गोपाळ भातंबरेकरच पुजारी यांना गुरू म्हणून लाभले.

आपल्याला गायन जमणार नाही या भीतीपोटी एच.एम.व्ही. कंपनीच्या अधिकाऱ्यांना भावगीते गायला नकार देणारे पुजारी पुढे भावगीत क्षेत्रात गायक, संगीतकार म्हणून गजानन वाटवे, सुधीर फडके यांच्या पंक्तीत जाऊन बसले. त्यांनी अनेक गीतांना चाली लावल्या.

सुरुवातीला जे. एल. रानडे, जी. एन. जोशी, ज्योत्स्ना भोळे यांची गाणी ऐकून पुजाऱ्यांनी भावगीतांचा अभ्यास केला. गीतांना चाली लावण्याचा

छंदच त्यांना जडला. पुढे त्यांनी ‘श्रीराम घनश्यामा’ व ‘हास रे मधु हास ना’ ही दोन गीते, संगीत दिग्दर्शकाच्या भूमिकेतून स्वरबद्ध केली व ती प्रमोदिनी देसाई यांनी सुरेल आवाजात गायिली, आणि तेव्हापासून खऱ्या अर्थाने पुजारी यांच्या संगीत दिग्दर्शकाच्या कारकिर्दीला सुरुवात झाली.

१९५२ साली ते आकाशवाणीची स्वरचाचणी देऊन आकाशवाणीवर नियमित गाऊ लागले. डोळसपणे संगीताची दुनिया पाहणारा व अनुभवणारा सुजाण संगीतकार, गायक म्हणून पुजारी यांची प्रतिमा निर्माण झाली. त्यांनी संगीत दिग्दर्शक या नात्याने सुमन कल्याणपूर, माणिक वर्मा, सुलोचना चव्हाण, मधुबाला जव्हेरी, शोभा गुर्टू, उषा वर्तक, कुमुद भागवत, वाणी जयराम इत्यादी गायकांकडून उत्तमोत्तम गाणी गाऊन घेतली. पुजारी यांनी ध्वनिमुद्रित केलेली भावगीते, भक्तिगीते, युगुलगीते विलक्षण लोकप्रिय ठरली.

‘रिमझिम झरती श्रावणधारा’, ‘केशवा माधवा’, ‘वाऱ्यावरती घेत लकेरी’, ‘जगी ज्यास कोणी नाही’, ‘मृदुलकरांनी छेडीत तारा’, ‘आकाश पांघरूनी जग शांत झोपले हे’, ‘आस आहे अंतरी या’, ‘रात्र आहे पौर्णिमेची’, ‘ऊर्मिला मी निरोप तुज देता’, ‘चल ऊठ रे मुकुंदा’, ‘जुळल्या सुरेल तारा’, ‘ते नयन बोलले काहीतरी’, ‘देव माझा विठू सावळा’, ‘नकळत सारे घडले’, ‘नंदाघरी नंदनवन फुलले’, ‘पैंजण रुमझुमले’, ‘प्रीत सागरी तुझ्या स्मृतीचे’ इ. सुमन कल्याणपूर यांनी गायिलेली व पुजारी यांनी स्वरबद्ध केलेली गाणी अविस्मरणीय ठरली, तर माणिक वर्मांनी गायिलेली, ‘कृष्णा पुरे ना थट्टा किती ही’, ‘चरणी तुझिया मज देई वास हरी’, ‘जनी नामयाची रंगली कीर्तनी’, ‘त्या सावळ्या तनूचे मज लागले’, ‘नका विचारू देव कसा’, ‘निळ्या नभातून नील चांदणे’, ‘या मुखीचे कौतुक केले’, ‘रंग रेखा घेऊनी मी भावरेखा रेखिते’, ‘क्षणभर उघड नयन देवा’ इ. हृदयस्पर्शी गीतेही पुजारींनीच संगीतबद्ध केली आहेत.

त्यांनी सुरेख चाली लावलेल्या गीतांना सुरेश वाडकर, गोविंद पोवळे, रवींद्र साठे, उषा मंगेशकर, सरस्वती राणे, जयवंत कुलकर्णी, सुधा मल्होत्रा, मोहनतारा अजिंक्य, अपर्णा मयेकर, आशा भोसले यांसारख्या मान्यवर गायक कलाकारांचा आवाज लाभला व त्या रचना लोकप्रिय झाल्या.

कवी म.पा. भावे लिखित ‘गीत कृष्णायन’ हा काव्यसंग्रह पुजाऱ्यांनी स्वरबद्ध केला. त्याचे ५०० हून अधिक जाहीर कार्यक्रम झाले.

हिंदीतील सुप्रसिद्ध पार्श्वगायक महंमद रफी यांच्याकडून त्यांनी फिरोज जालंदरी यांची ‘तू है दिलबर तो मैं हूँ दीवाना’ ही उत्कृष्ट गझल गाऊन घेतली.

दशरथ पुजारी हे एक उत्तम हार्मोनिअमवादक होते. परंतु त्यांच्या स्वत:च्या गळ्यातून निघणारा स्वर हा हातातल्या हार्मोनिअमवादनावर कधीच अवलंबून नव्हता. भावगीतातल्या अवघड जागाही योग्य त्या नजाकतीने त्यांचा सूर उलगडून दाखवत होता. त्यामागे दशरथ पुजारी यांनी केलेली रागदारी गायनाची मेहनत होती.

दशरथ पुजारी यांनी गीताला अर्थानुसार चाली दिल्या व त्यामुळेच त्या गीतांतील भाव रसिकांच्या मनांपर्यंत परिणामकारकरीत्या पोहोचले. या दृष्टीने दशरथ पुजारी यांचे सुगम संगीत क्षेत्रातील योगदान महत्त्वाचे व लक्षणीय ठरले आहे.

‘अजून त्या झुडुपांच्या मागे’, ‘मी नयन स्वप्नवेडा’, ‘अशीच अमुची आई असती’, ‘पावन खिंडीत पावन झालो’, ‘का ग रुसलासी कृपाळू बा हरी’ इ. भावपूर्ण गीते गायिलेल्या दशरथ पुजारी यांचे ‘भावगीत’ विश्वातले स्थान अढळ आहे.

दशरथ पुजारी यांना ‘पी. सावळाराम’ पुरस्कार, ‘ग.दि.मा.’ पुरस्कार व ‘झी-मराठी’चा ‘जीवन गौरव’ पुरस्कार यांनी गौरवले गेले.

**– डॉ. प्रकाश कामत**

प

## पुजारी, धनंजय हरी

**सतारवादक**

**५ फेब्रुवारी १९२१ – २५ मे १९६९**



खानदेशातील ‘वरणगाव’ हे धनंजय हरी पुजारी यांचे मूळ गाव होय. त्यांचे वडील हरिभाऊ वरणगावकर (१८८५ – १९५५) हे नावाजलेले गायक व पुजारी होते. हरिभाऊंनी ग्वाल्हेरच्या शंकर पंडित यांच्याकडून धृपद व ख्यालगायनाची तालीम घेतली होती, तसेच बीनकार बंदेअली खाँ यांचे शिष्य मुराद खाँ यांच्याकडे ते सतारही शिकले. ते तबलाही वाजवत.

आपल्या वडिलांकडेच धनंजय पुजारी यांनी सतार, गायन व तबल्याचे शिक्षण घेतले. हे पितापुत्र अमरावतीजवळच्या शिरजगाव बंड येथे स्थायिक होऊन तेथे पुजारी म्हणून व्यवसाय करत, तसेच सतारवादनाच्या जुगलबंदीचेही कार्यक्रम करत.

धनंजय पुजारी यांनी प्रथम हैद्राबाद येथे आकाशवाणीवर नोकरी सुरू केली. ते १९४९ साली नागपूर आकाशवाणीवर रुजू झाले. सतारवादनातील आलाप-जोड-झाला, लयकारीयुक्त गतकारीवर त्यांचे प्रभुत्व होते. शेख दाऊद खाँ यांसारखे नावाजलेले तबलावादक त्यांची मनसोक्त साथ करत. अब्दुल हलीम जाफर खाँ, पं. संपतलाल, यशवंत देव यांच्याशी त्यांचे मैत्रीपूर्ण संबंध होते. १९६८ साली हिंगणघाट येथे त्यांना मानपत्र देण्यात आले होते. त्यांचे वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षी नागपूर येथे निधन झाले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; ‘वैदर्भीय संगीतोपासक’; भाग १; प्रथमावृत्ती, मार्च १९७४.*

प

## पुरोहित, जगन्नाथ जनार्दनपंत

*गुनिदास (गुणिदास)*

**गायक व बंदिशकार**

**१२ मार्च १९०४ – २० ऑक्टोबर १९६८**



पंडित जगन्नाथबुवा जनार्दनपंत पुरोहितांचा जन्म दक्षिण हैद्राबादेत, एका गरीब ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांचे वडील भिक्षुकी करीत. बुवा अगदी लहान असताना त्यांची आई १९१० साली स्वर्गवासी झाली. त्या काळात मुसलमानी अमलात राजाश्रय असलेल्या ललितकलांच्या परंपरांना संस्थानांतून पुन्हा ऊर्जितावस्था येऊ लागली होती. निजामाच्या दरबारात, पाच-पंचवीस बडे गवई असत. जुम्म्यानंतर दुपारी तीन वाजल्यापासून रात्री दहा वाजेपर्यंत अनेक मुसलमान गवयांच्या बैठकी होत. त्याशिवाय, गावात भजने, कीर्तने चालूच असत. एकूणच गाणे बजावण्याने गजबजलेल्या वातावरणात जगन्नाथबुवांचे बालपण गेल्यामुळे त्यांना शास्त्रीय संगीताची विलक्षण गोडी लागली होती.

वयाच्या अवघ्या अकराव्या वर्षी, म्हणजे १९१५ साली वडील वारल्याने जगन्नाथबुवांनी शाळेला कायमचा रामराम ठोकला. मित्रमंडळींसमवेत गाण्याबजावण्यात स्वत:ला झोकून दिले. त्यांच्या कष्टाळू स्वभावामुळेच मुहम्मद अल्ली खाँपासून विलायत हुसेन खाँपर्यंत एकापेक्षा एक नामवंत घरंदाज गवयांकडून वर्षानुवर्षे तालीम घेऊन प्रत्येकाच्या गायकीची वैशिष्ट्ये त्यांनी आत्मसात केलीच, शिवाय सर्वांकडून चिजांचा बहुमोल खजिना संपादन केला आणि तबल्याचेही उत्तम शिक्षण प्राप्त करून घेतले.

मुसलमानांच्या सान्निध्यात बराच काळ व्यतीत केल्यामुळे त्यांना ‘जगन्नाथ खाँ’ किंवा ‘जगन खाँ’ असे संबोधत. खूश झालेल्या याच सर्व हैद्राबादी ‘खाँ’

मंडळींनी त्यांना, 'तू खरा गुणांचा दास', 'गुनिदास' आहेस अशी पदवी बहाल केली. पुढे जगन्नाथबुवांनी चिजा बांधताना 'गुनिदास' (गुणिदास) हे नाव त्यांत गुंफून अजरामर केले. जगन्नाथबुवा संगीतात विलायत हुसेन खाँ यांचे, तर तबल्यात मेहबूब खाँ आणि थिरकवा खाँ साहेबांचे गंडाबध शागिर्द होते.

त्यांनी १९३९ साली म्हैसूरच्या युवराजांबरोबर संगीताच्या सेवेसाठी युरोप दौरा केला आणि नंतर ते कोल्हापूरहून मुंबईत कायम वास्तव्यास आले. संगीतात त्यांनी बहुसंख्य शिष्यवर्ग निर्माण केलाच, शिवाय तबल्यातही उत्तम शिष्य घडवले.

तबल्यातील भाई गायतोंडे, नाना मुळे, कलंदर हे काही नामवंत शिष्य, तर गायनात पं. राम मराठे, पं. सी.आर. व्यास, पं. जितेंद्र अभिषेकी, पं. यशवंतबुवा जोशी, विदुषी माणिक वर्मा असे ख्यातनाम गवई त्यांचे शिष्य होते.

मिळालेल्या चिजांचे मनन, चिंतन व अभ्यास हाच बुवांचा ध्यास होता. म्हणूनच त्यांनी अनेक जुन्या रागांत नवीन बंदिशी बांधल्या व आकर्षक नवरागनिर्मितीही केली. 'जोगकंस' 'जौनभैरव', 'स्वानंदी', 'मारूवसंत', हे त्यांचे सर्व राग, मान्यवर गायकांच्या मैफली रंगविण्यात हुकमी एक्के बनले आहेत. पं. जगन्नाथबुवांच्या काळात, कोल्हापूर-मुंबईमध्ये घराण्यांच्या भिंतींमुळे संगीतकला बंदिस्त झाली होती.

जगन्नाथबुवांनी या वातावरणात निखळ, नितळ आणि स्वच्छ वातावरणनिर्मितीच्या कार्याची सुरुवात केली. प्रत्येक घराण्यात जे-जे सुंदर दिसेल, त्याचा–त्याचा आदराने स्वीकार केला. त्यामुळे त्यांची गायकी विविध अंगांनी नटलेली होती. आपल्या जवळील विद्येचे मुक्तहस्ते फक्त शिष्यांनाच नव्हे, तर जो मागेल त्याला त्यांनी दान केले. बुवांची गुरुभक्ती आणि गुरुप्रेम अतिशय उदात्त आणि लोकविलक्षण होते. आदर्श गुरू व आदर्श शिष्य परंपरेचा उच्चादर्श बुवांनी घालून दिला.

माहीम येथील ले. दिलीप गुप्ते मार्गापासून ते जमशेटजी मार्गापर्यंतच्या त्यांच्या निवासस्थानासमोरील रस्त्याचे नाव (कै. पं. जगन्नाथबुवा पुरोहित ऊर्फ गुणिदास यांच्या स्मरणार्थ) मंगळवार, १२ मार्च १९७४ रोजी 'पं. गुणिदास मार्ग' असे ठेवून महाराष्ट्र शासनाने त्यांचा गौरव केला.

संगीताचे चालते-बोलते विद्यापीठ असलेल्या पं. जगन्नाथबुवांचे निधन, आकस्मिकपणे डोंबिवली मुक्कामी, त्यांच्या मानसकन्या लीला करंबेळकर यांच्या घरी झाले. त्यांच्या स्मरणार्थ स्थापन झालेले 'पं. गुनिदास प्रतिष्ठान' मुंबई येथे कार्यरत आहे.

– डॉ. मंगला आपटे

**संदर्भ :**

आपटे, मंगला; 'गुनिगुरू'; अनुबंध प्रकाशन, पुणे; २०१०.

## पेंढारकर, भालचंद्र बापूराव

**गायक - नट**

**२५ नोव्हेंबर १९२१**



भालचंद्र बापूराव पेंढारकर यांचा जन्म दक्षिण हैदराबाद येथे झाला. त्यांचे वडील बापूराव हे सुप्रसिद्ध गायक-नट होते. भालचंद्र ऊर्फ अण्णांनी खूप शिकावे अशी बापूरावांची इच्छा होती. म्हणून त्यांनी अण्णांना नाटकापासून दूर ठेवले होते. परंतु, अण्णांचा नाटकाकडेच अधिक ओढा होता.

बापूरावांचे १५ मार्च १९३७ रोजी अकाली निधन झाले. गुरुवर्य पं. रामकृष्णबुवा वझे यांचे ते गंडाबंध शिष्य होते. संगीतसूर्य केशवराव भोसले यांनी १ जानेवारी १९०८ रोजी स्थापन केलेली ललितकलादर्श ही नाट्यसंस्था, आपल्या पश्चात सांभाळण्यासाठी त्यांनी मोठ्या विश्वासाने ती बापूरावांच्या हवाली केली आणि बापूरावांनीही ती नेटाने चालविली.

प

बापूरावांच्या मृत्यूमुळे वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी ललितकलादर्शची जबाबदारी भालचंद्रअण्णांच्या खांद्यावर आली. अण्णा १९३८ पासून वझेबुवांचे गंडाबंध शिष्य झाले.

वझेबुवांच्या कसदार गायकीची तालीम अण्णांना मिळाली, आणि अण्णांनी अविश्रांत मेहनतीने ती आत्मसात केली. आपल्या वडिलोपार्जित नाट्यसंस्थेचा ठेवा जतन करण्याची आणि तो वाढविण्याची जिद्द मनात होतीच. म्हणूनच वडिलांच्या निधनानंतर अवघ्या पाच वर्षांनी, १९४२ मध्ये ‘सत्तेचे गुलाम’ या नाटकाचा खेळ प्रेक्षकांसमोर सादर करून, त्यांनी ललितकलादर्शचे पुनरुज्जीवन केले. तसेच ललितकलादर्शने पूर्वी सादर केलेली इतरही जुनी नाटके त्यांनी रसिकांसमोर पुन्हा आणली आणि अल्पावधीतच ते एक यशस्वी गायक-नट म्हणून मान्यता पावले.

थोडा जम बसल्यावर, त्या वेळच्या इतर यशस्वी नाट्यसंस्थांमध्ये ललितकलादर्शला अग्रभागी आणण्याची प्रबळ इच्छा पेंढारकरांच्या मनात घोळू लागली. त्यासाठी ललितकलेच्या पुढच्या प्रवासात त्यांनी बदलत्या प्रवाहानुसार नवीन नाटककार, नवे संगीत, नवे नेपथ्य या सर्वांचा डोळसपणे अभ्यास केला.

त्यानंतर त्यांनी पु.भा. भावे, बाळ कोल्हटकर, विद्याधर गोखले अशा नाटककारांची ‘स्वामिनी’, ‘दुरितांचे तिमिर जावो’, ‘पंडितराज जगन्नाथ’, ‘जयजय गौरीशंकर’, ‘मंदारमाला’, ‘बावनखणी’, ‘गीता गाती ज्ञानेश्वर’, ‘रंगात रंगला श्रीरंग’,‘शाबास बीरबल शाबास’, ‘आनंदी गोपाळ’ इत्यादी नाटके रंगभूमीवर आणली. नीळकंठ अभ्यंकर, यशवंत देव, वसंत देसाई अशा संगीतकारांनी या नाटकांना संगीत दिले. या सर्व नाटकांनी अमाप लोकप्रियता मिळवली.

अण्णांनी स्वत: ५२ नाटकांतून, ५५ भूमिका करण्याचा विक्रम केला आहे. त्याचबरोबर, मराठी रंगभूमीच्या इतिहासात कोणत्या नाट्यसंस्थेने केला नसेल असा पराक्रम अण्णांनी करून दाखविला, तो म्हणजे आपली नाटक मंडळी साथीला घेऊन, वर्षभर संपूर्ण भारतात त्यांनी केलेला नाटकांचा दौरा. यांत मुंबई, वर्धा, जबलपूर, हैदराबाद, बंगलोर(बंगळुरू), मद्रास (चेन्नई), कलकत्ता (कोलकाता), इंदूर, भोपाळ, दिल्ली, अहमदाबाद, बडोदा अशा शहरांचा समावेश होता.

अण्णांनी साठ ते बासष्ट नव्या-जुन्या मराठी नाटकांचे संपूर्ण आणि निर्दोष असे ध्वनिमुद्रण करून ठेवले आहे.

त्याचबरोबर अनेक दुर्मीळ छायाचित्रे, ध्वनिफिती, वृत्तपत्रांतील कात्रणे, असा रंगभूमीच्या अभ्यासकांसाठी अत्यंत मोलाचा असा संग्रह करून ठेवला आहे.

अण्णांना ‘विष्णुदास भावे’ पुरस्कार सुवर्णपदक (१९७३), नाट्यपरिषदेतर्फे ‘बालगंधर्व’ सुवर्णपदक पुरस्कार (१९८३), महाराष्ट्र शासनाचा ‘केशवराव भोसले’ पुरस्कार (१९९०), जागतिक मराठी परिषदे–तर्फे इस्रायल येथे सत्कार (१९९६), संगीत नाटक अकादमी, दिल्ली, राष्ट्रीय पारितोषिक (२००४), चतुरंग, मुंबईतर्फे ‘जीवन गौरव’ पुरस्कार (२००६) असे विविध मानसन्मानही प्राप्त झाले आहेत. यवतमाळ येथे १९७५ साली झालेल्या अखिल भारतीय मराठी नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद, त्यांनी भूषविले होते.

पेंढारकर घराण्याच्या सलग तीन पिढ्या, मराठी संगीत रंगभूमीची सेवा करीत आहेत. त्यांचा संगीत नाटकाचा वारसा मुलगा ज्ञानेश व सून नीलाक्षी हे चालवत आहेत.

- मधुवंती पेठे

## पेडणेकर, मधुकर गंगाधर

☛ *पी. मधुकर*

प

## पेडणेकर, हिराबाई
**गायिका, संगीतकार व नाटककार**
**१८८५ – १९५१**



हिराबाई पेडणेकर या गोव्यातील कलोपजीवी कुळातील एक बुद्धिमान कलाकार होत्या. त्यामुळे अगदी अल्पवयातच त्यांनी संगीतावर प्रभुत्व संपादन केले होते. अंजनीबाई मालपेकर या त्यांच्या जीवश्च कंठश्च मैत्रीण होत्या. त्यांचे वास्तव्य मुंबईत होते. पं. भास्करबुवा बखले यांजकडून त्या रागसंगीत शिकल्याचे उल्लेख मिळतात. हिराबाई पेडणेकरांची सांगीतिक कारकीर्द १९२०-२५ च्या सुमारास अस्तास गेली. अवघ्या १८-२० वर्षांची ही सांगीतिक कारकीर्द होती.

हिराबाईंना त्यांच्या कुळामुळे व उपजीविकेसाठीच्या सामाजिक स्थानामुळे समाजात मान्यता मिळाली नाही. त्यांचे साहित्यिक, सांगीतिक कर्तृत्व हे दर्जेदार व महत्त्वाचे असूनही त्याची योग्य ती दखल घेतली गेली नाही. संगीत रचनाकार म्हणून हिराबाईंनी बरेच काम केले असावे; पण त्याचा पुरेसा स्पष्ट उल्लेख फारसा कुठे आढळत नाही. विसाव्या शतकाच्या सुरुवातीची समाज- मानसिकता, स्त्री-कलावंतांविषयक धारणा यांचे प्रातिनिधिक उदाहरण म्हणून हिराबाई पेडणेकरांची कारकीर्द पाहता येते.

नाट्यसंगीताच्या संगीतरचनेच्या संदर्भात हिराबाई पेडणेकरांचे काम महत्त्वाचे आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या आत्मचरित्रात हिराबाईंच्या गाण्यांचे आणि रचनांचे उल्लेख सापडतात. हिराबाईंनी ‘दामिनी’ हे संगीत नाटक लिहिले आणि त्यातील सर्व पदांना संगीतही त्यांचेच होते. दामिनी नाटकात एकंदर ७२ पदे होती. एकाही पदात चालीची पुनरावृत्ती नव्हती. हे नाटक ‘ललितकलादर्श’ने रंगभूमीवर आणले.

हिराबाईंपाशी चालींचा चांगलाच भरणा होता व त्यांपैकी काही श्री.कृ. कोल्हटकरांनी ‘मतिविकार’ नाटकातील पदे रचताना उपयोगात आणल्या होत्या. कोल्हटकरांच्या ‘प्रेमशोधन’च्याही चाली हिराबाईंनीच दिल्या होत्या. खाडिलकरांनीही त्यांच्याकडून काही चाली घेतल्या होत्या व गडकऱ्यांच्या ‘पुण्यप्रभावा’त त्यांनी दिलेल्या बऱ्याच चाली आहेत.

‘मानापमान’पूर्वी ‘दामिनी’ लिहिले गेले व मानापमानाच्या संगीताचा प्रेरणास्रोत दामिनीत आहे ही गोष्ट मराठी रसिकांच्या लक्षात आली नाही. ‘मानापमान’ आजही तेजाने तळपत आहे व ‘दामिनी’ मात्र विस्मरणाच्या धुक्यात गुरफटून अदृश्य झाले आहे, असे काही जाणकारांचे मत आहे. ‘या तव बघुनि मधुर वचना’ या ‘जयद्रथ विडंबन’ नाटकातील पदाच्या चालीवर पुढे ‘मानापमान’ नाटकातील ‘या नव नवल नयनोत्सवा’ हे पद रचले असल्याचे लक्षात येते.

हिराबाई पेडणेकरांचा संगीताबरोबरचा साहित्याचा व्यासंग ही बाबही त्या काळात विशेष न आढळणारी गोष्ट आहे. त्यांचा संतसाहित्याचा अभ्यास होता व त्या बंगाली भाषाही शिकल्या होत्या हे सर्व सांगीतिक कारकिर्दीच्या संदर्भात नमूद करावेसे वाटते; कारण एकंदर समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा परिणाम कलाकाराच्या जडणघडणीवर व पर्यायाने कलेवर होत असतो. या सर्व गोष्टींवरून हिराबाई पेडणेकर या काळाच्या पुढे विचार करणाऱ्या, दूरदृष्टीच्या, स्वतंत्र बुद्धीच्या कलाकार होत्या असे जाणवते.

– डॉ. शुभदा कुलकर्णी

## पोहनकर, अजय जनार्दन
**गायक**
**२८ जानेवारी १९४८**

जनार्दन शंकर पोहनकर व सुशीलाबाई यांच्या पोटी अजय पोहनकर यांचा जन्म जबलपूर येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण महाराष्ट्र हायस्कूल येथे तर सेंट

प



अलायन्सेस महाविद्यालय जबलपूर येथे महाविद्यालयीन शिक्षण झाले. अजय पोहनकर यांच्या मातोश्री सुशीलाबाई या किराणा घराण्याच्या गायिका होत्या. त्यामुळे त्यांच्यावर गाण्याचे मुख्य संस्कार त्यांच्या आईकडूनच झाले.

अजय पोहनकरांना गायनाची संधी वयाच्या सातव्या वर्षी नागपूर येथील एका संगीत संम्मेलनामध्ये मिळाली. नऊ वर्षांचे असताना त्यांना कलकत्ता येथील कार्यक्रमात तत्कालीन नामांकित गायक केसरबाई केरकर, विलायत खाँ, ओंकारनाथ ठाकूर यांच्या बरोबरीने गाण्याची संधी मिळाली. त्यानंतर संगीत अलंकार परीक्षेत त्यांनी सुवर्णपदक प्राप्त केले. १९५९-१९६० साली पोहनकरांना सवाई गंधर्व कार्यक्रमात गाण्याचा बहुमान मिळाला.

गाण्यात सौंदर्याची स्थळे दाखवून देणे हे अजय पोहनकरांच्या गाण्याचे वैशिष्ट्य आहे. ख्याल शास्त्रीय गायनाबरोबरच ते ठुमरी, दादरा, गझल इत्यादी उपशास्त्रीय संगीताचे प्रकारही मनःपूर्वक व खुलावून गातात.

गायन सादरीकरणात मूर्च्छना हा प्रकार ते वैशिष्ट्यपूर्णतेने सादर करतात. गायनाचे कुठलेच प्रकार ते निषिद्ध मानत नाहीत. ह्या सर्व गायनाच्या वाटचालीत त्यांच्या पत्नी अंजली पोहनकर यांची तेवढीच समर्थ साथ त्यांना लाभली आहे.

अजय पोहनकरांनी गाण्याचे नाते आधुनिक रूपात त्यांचा मुलगा अभिजित पोहनकर याच्या सोबत 'फ्यूजन' या प्रकारातील 'पिया बावरी', 'सजनवा' या ध्वनिमुद्रिकांतून सादर केले आहे. 'संगीत प्रवीण', 'सूरमणी', 'माणिक वर्मा पुरस्कार', या पुरस्कारांनी ते सन्मानित झाले आहेत. त्यांना मध्यप्रदेश सरकारकडून 'तानसेन' पुरस्काराने (२००९-१०) सन्मानित करण्यात आले तसेच 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (२०१२) मिळाला.

— सुपर्णा कुलकर्णी

## पौडवाल, अनुराधा अरुण

**गायिका**

**२७ ऑक्टोबर १९५४**



अनुराधा अरुण पौडवाल (पूर्वाश्रमीच्या अलका नाडकर्णी) यांचा जन्म मुंबई येथे झाला. घरामध्ये संगीताची परंपरा नसतानाही त्यांना संगीताची उपजतच विशेष आवड होती. बालवयात त्यांचा आवाज गायनासाठी अनुकूल नव्हता. पण मूलतः असलेली संगीतविषयक जाण चांगली असल्यामुळे कुठलेही गाणे त्या ऐकताक्षणी आत्मसात करत असत. त्यांचा गाण्याकडे असलेला कल पाहून त्यांच्या आईने त्यांना प्रोत्साहन दिले.

वयाच्या पाचव्या वर्षी महाराष्ट्र महिला मंडळात त्यांनी सर्वप्रथम जाहीरपणे गीत सादर केले. अलका नाडकर्णी यांनी महाविद्यालयीन शिक्षण मुंबईतील सेंट झेवियर्स या महाविद्यालयात घेतले. त्यांना तंत्रशुद्ध संगीताचे शिक्षण जरी घेता आले नाही, तरी मान्यवर गायिकांची गाणी ऐकूनच त्यांनी स्वतःच्या आवाजाची तयारी केली. दरम्यानच्या काळात आजारी असताना त्यांच्या आवाजामध्ये आमूलाग्र बदल झाला. गाण्यांच्या विविध कार्यक्रमांत आणि वाद्यवृंदांमध्ये त्या गाऊ लागल्या. त्यांचा १९७२ साली, वयाच्या अठराव्या वर्षी संगीतकार अरुण पौडवाल यांच्याशी विवाह झाला.

साधारणपणे १९७३ च्या सुमाराला दत्ता डावजेकर यांचे संगीत असलेल्या 'यशोदा' या चित्रपटासाठी त्यांना पार्श्वगायनाची प्रथम संधी मिळाली. या

चित्रपटातील ‘घुमला हृदयी निनाद’ आणि ‘माळते मी माळते’ ही गाणी लोकप्रिय झाली. याच वर्षी ‘अभिमान’ या अनेक कारणांनी लोकप्रिय झालेल्या हिंदी चित्रपटामध्ये त्यांना एक संस्कृत श्लोक गाण्याची संधी मिळाली. अशा प्रकारे हिंदी आणि मराठी चित्रपटसृष्टीत हळूहळू पार्श्वगायिका म्हणून अनुराधा पौडवाल यांनी स्वतःची जागा निर्माण केली. आकाशवाणीवरून प्रसारित होणाऱ्या ‘बिनाका गीतमाला’ कार्यक्रमातही त्यांचा दाद देण्यासारखा लक्षणीय सहभाग होता.

एच.एम.व्ही.ने १९७४ मध्ये मराठी भावगीतांची ध्वनिमुद्रिका आणली. त्यांपैकी ‘रसिका मी कैसे गाऊ’, ‘सजणा कशासी अबोला’ यांसारख्या सुमधुर गीतांनी अनुराधा पौडवाल हे नाव रसिकांच्या मनांत कायमस्वरूपी कोरले गेले. संगीतकार अशोक पत्की यांची ‘अनुरागाचे थेंब झेलती’, ‘मी अशी ही बांधलेली’, ‘चंद्र वाटेवरी एकटा’ ही गाणी, तसेच ‘रजनीगंधा’ आणि ‘बंदिनी’ या अरुण पौडवाल यांनी संगीतबद्ध केलेल्या गीतांच्या ध्वनिमुद्रिकांनी लोकप्रियतेचा उच्चांक गाठला.

सुरुवातीला ‘डबिंग आर्टिस्ट’ म्हणून काम करण्यास त्यांनी नकार दिला. पण बऱ्याच वेळा गायक कलाकारांना याच पद्धतीने संधी मिळते हे लक्षात आल्यावर त्यांनी अनेक चित्रपटांच्या गाण्यांकरिता डबिंग केले. यामुळे ‘हीरो’ या चित्रपटात त्यांना पार्श्वगायनाची संधी मिळाली. संगीत क्षेत्रात स्वतःची ओळख निर्माण करत असतानाच १९७६ साली ‘कालीचरण’ या हिंदी चित्रपटात त्यांना पार्श्वगायनाची संधी मिळाली.

लक्ष्मीकांत-प्यारेलाल या संगीतकार जोडीने ‘आपबीती’ या चित्रपटात खऱ्या अर्थाने त्यांना स्वतंत्रपणे एकल पार्श्वगायनाची संधी दिली. पार्श्वगायिका म्हणून स्वतःला सिद्ध करताना त्यांनी ‘देस-परदेस’ (राजेश रोशन), ‘दूरीयाँ’, ‘लैला मजनू’ (जयदेव), ‘कलाकार’, ‘विधाता’(कल्याणजी-आनंदजी), ‘सौतन’ (उषा खन्ना) अशा काही प्रथितयश संगीतकारांकडे पार्श्वगायन केले.

विशेष करून लक्ष्मीकांत-प्यारेलाल या संगीतकार जोडीची अनुराधा पौडवाल यांनी गायलेली गाणी सर्वाधिक लोकप्रिय झाली.

उपजत असलेली गाण्याची समज, सुमधुर आवाज, तरलता यांमुळे त्यांना संधी मिळत गेल्या. ‘तेजाब’, ‘हीरो’, ‘बंटवारा’, ‘नगीना’, ‘मेरी जंग’ (१९८५), ‘कर्मा’ (१९८६), ‘रामलखन’ (१९८९), ‘साजन’ (१९९१), ‘संगीत’ (१९९२), ‘बेटा’ (१९९२), ‘साहिबान’ (१९९३) ‘प्यार किया तो डरना क्या’(१९९८), ‘हम आपके दिल में रहते हैं’ (१९९९), ‘दाग - द फायर’ (१९९९), ‘बुलंदी’, ‘पुकार’ (२०००), ‘लज्जा’ (२००१), ‘शक्ती-द पॉवर’ (२००२), ‘मर्डर’ (२००४) अशा काही महत्त्वपूर्ण चित्रपटांत त्यांनी पार्श्वगायन केले.

संगीताचे शास्त्रशुद्ध शिक्षण घेण्याचा योग नसल्यामुळे लता मंगेशकर, आशा भोसले, मुहम्मद रफी अशा मान्यवर, तसेच प्रतिभाशाली गायकांची गाणी ऐकूनच त्यांनी रियाझ केला. स्वतःच्या मेहनतीने आणि संगीतक्षेत्रात घडणाऱ्या आणि नव्याने येऊ पाहणाऱ्या घडामोडींविषयक विचारपूर्वक चिंतनाने त्यांनी हिंदी चित्रपटसृष्टीमध्ये स्वतःची जागा आणि वलय निर्माण केले.

मराठी सिनेजगताशीही त्यांचे ऋणानुबंध जोडले गेले. मूलतः आवाजात असलेला अभिनय, आवाजातील माधुर्य, संगीतावर असलेली नितांत श्रद्धा यांमुळे मराठी चित्रपटांतील त्यांनी गायलेली सुरेल गाणी घराघरांत निनादू लागली. ‘अष्टविनायक’, ‘थोरली जाऊ’, ‘हेच माझे माहेर’, ‘जावयाची जात’, ‘अरे संसार संसार’, ‘चांदणे शिंपीत जा’, ‘कळत नकळत’, ‘सगळीकडे बोंबाबोंब’, ‘नवरा माझा नवसाचा’ अशा मराठी चित्रपटांमध्ये त्यांनी चित्रपटसृष्टीतील यशस्वी संगीतकारांकडे गाणी गाऊन ती लोकप्रिय केली.

मराठी आणि हिंदीबरोबरच त्यांनी नेपाळी, ओरिया, गुजराती, भोजपुरी व बंगाली चित्रपटांसाठीही पार्श्वगायन केले.

अरुण पौडवाल यांचे १ नोव्हेंबर १९९१ साली अकाली निधन झाले. कालांतराने चित्रपट निर्माते गुलशन कुमार यांच्याबरोबर त्यांचे सूर जुळले. ‘लाल दुपट्टा मलमल का’, ‘आशिकी’, ‘दिल है कि मानता नहीं’, ‘मीरा का मोहन’ या नव्या धर्तीच्या चित्रपटांबरोबरही अनुराधा पौडवाल हे सुरेल नाव जोडले गेले आणि पुन्हा एकदा नव्याने यशाचा मार्ग खुला झाला. साधारणतः २००५ साली आलेल्या ‘कलयुग’ या चित्रपटापर्यंत त्यांचा पार्श्वगायनाचा प्रवास सुरू राहिला.

याशिवाय त्यांच्या ‘शिवभजन’, ‘जय अंबे गौरी’, ‘गायत्रीमंत्र’, ‘महालक्ष्मी अमृतवाणी’, ‘ओम गंगा माँ’ या भक्तिरसपूर्ण ध्वनिमुद्रिका, तसेच समर्थ रामदासांचे ‘मनाचे श्लोक’ आणि ‘करुणाष्टका’च्या ध्वनिमुद्रिकाही उपलब्ध आहेत.

आजवरच्या कामाची पावती म्हणून त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. ‘उत्सव’ या १९८६ साली आलेल्या चित्रपटातील ‘मेरे मन बजा मृदंग’ या गीताला ‘फिल्मफेअर’ पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. ‘आशिकी’ (नजर के सामने) १९९१ साली , १९९२ साली ‘दिल है कि मानता नहीं’ या शीर्षकगीतासाठी आणि १९९३ साली ‘बेटा’ (धक धक करने लगा) या गीतांसाठी उत्कृष्ट पार्श्वगायनाकरिता फिल्मफेअर पुरस्काराने गौरवण्यात आले. याशिवाय ‘कळत नकळत’ (१९८८) या मराठी चित्रपटातील ‘हे एक रेशमी घरटे’ या गीतासाठी त्यांना पार्श्वगायनाचा राष्ट्रीय पुरस्कारही मिळाला. संगीत क्षेत्रातील दीर्घकालीन योगदानासाठी २०११ साली ‘मदर तेरेसा जीवन गौरव’ पुरस्कारही त्यांना देण्यात आला.

गायिका कविता पौडवाल आणि संगीतकार आदित्य पौडवाल या दोन्ही मुलांना त्यांचा संगीताचा वारसा लाभला आहे. त्यांच्या आधीच्या आणि नंतरच्या पिढीचे सांगीतिक काम जवळून पाहिल्यामुळे आणि प्रत्यक्ष अनुभवांमुळे आज अनुराधा पौडवाल नव्या संगीतप्रवाहाचे अवलोकन प्रगल्भतेने करताना दिसतात.

— नेहा वैशंपायन

**संदर्भ :**

१. *छिब्बर, कविता यांनी घेतलेली मुलाखत.*
२. *www.anuradhapaudwal.com*
३. *www.arunpaudwal.com*

## प्रधान, अनीष वसंत

**तबलावादक**

**१९ जुलै १९६५**



अनीष वसंत प्रधान यांचा जन्म संगीतप्रेमी कुटुंबात झाला. त्यांचे वडील पत्रकार आणि लेखक होते. १९४२ च्या ‘भारत छोडो’ चळवळीत त्यांचा सहभाग होता, तसेच ट्रेड युनियनच्या चळवळीतही त्यांचा सहभाग होता. आई किरण या व्यवसायाने वकील होत्या. त्या लहानपणी संगीत शिकत होत्या. अनीष प्रधान यांच्या भगिनींनीही पाश्चात्त्य संगीताचे शिक्षण घेतले होते.

अनीश प्रधानांनी वयाच्या सहाव्या वर्षापासून संगीताचे शिक्षण घेण्यास सुरुवात केली. वयाच्या नवव्या वर्षापासूनच ते तबल्याचे कार्यक्रम देऊ लागले. लहानपणी दूरदर्शन, तसेच आकाशवाणीवरून त्यांनी कार्यक्रम सादर केले. पुढे ‘संगीत महाभारती’ या विद्यापीठातून पाच वर्षे निखिल घोष यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी तबलावादनाचा अभ्यासक्रम पूर्ण केला. दिल्ली, अजराडा, लखनौ, फरुखाबाद या तबलावादनातील घराण्यांच्या शैलींची तालीम त्यांना निखिल घोषांकडून मिळाली.

प

अनीष प्रधानांनी मॅट्रिकनंतर मुंबईतील एल्फिन्स्टन महाविद्यालयातून 'इतिहास' हा विषय घेऊन १९८२ साली मुंबई विद्यापीठाची बी.ए. पदवी प्राप्त केली. पुढे याच विषयात १९८७ मध्ये एम.ए. केले. महाविद्यालयीन शैक्षणिक काळातच त्यांना 'दक्षिणा फेलोशिप' प्राप्त झाली. त्यांनी २००२ साली 'वसाहतकालीन स्थितीत मुंबईतील भारतीय संगीताचे बदलते प्रवाह' (Changing Trends in Indian Music in a Collonial Situation : A Case Study of Bombay) या विषयावर प्रबंध सादर करून डॉक्टरेट मिळवली.

अनीष प्रधान हे एकल तबलावादक व उत्तम साथीदार म्हणूनही संगीतक्षेत्रात ख्यातनाम आहेत. आजवर भारतात, तसेच परदेशांतही त्यांच्या एकल तबलावादनाचे कार्यक्रम झाले असून भारतातील प्रसिद्ध गायक-वादकांना त्यांनी तबल्यावर साथसंगत केली आहे. भारतीय आकाशवाणी व दूरदर्शनवरील ते 'ए' ग्रेड कलाकार आहेत. 'उत्तर हिंदुस्थानी संगीतातील परिदर्शने'(पर्स्पेक्टिव्हज) ही मालिका ऑस्ट्रेलिया ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनवरून सादर करण्यात आली असून उत्तर हिंदुस्थानी संगीतातील तालपद्धतीवर अनीष प्रधानांनी या मालिकेमधून विशेष प्रकाश टाकला होता.

मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागात 'संगीतकारांची चरित्रे व निबंध' हा विषय शिकवण्याकरिता ते अभ्यागत प्राध्यापक म्हणून जात. न्यू इंग्लंडच्या संगीत विद्यापीठातील विभागात 'संस्कृतिसंगीतशास्त्र' (Ethno musicology) आणि तत्कालस्फूर्तता (Improvisation) या विषयांकरिता 'निवासी कलाकार' म्हणून त्यांना आमंत्रित करण्यात आले होते. त्याचबरोबर 'पिट्सबर्ग' विद्यापीठातही पाहुणे व्याख्याते म्हणून ते कार्यरत होते. ते २००८-२०१० मध्ये मॅक्वेअर विद्यापीठाच्या (सिडने, ऑस्ट्रेलिया) माध्यम, संगीत आणि संस्कृती अभ्यास(Music and Cultural Studies) या विभागात वरिष्ठ संशोधक म्हणून ते कार्यरत होते.

याशिवाय भारतात आणि भारताबाहेरील अनेक विद्यापीठांतून, संस्थांतून, कार्यशाळांतून ते तबलावादन प्रात्यक्षिके आणि हिंदुस्थानी संगीतातील इतिहास, परंपरा इत्यादी विषय शिकवत असतात.

अनीष प्रधानांनी अनेक संगीत संबंधित विषयांवर लेखन केले आहे, तसेच परिषदांतून प्रबंधही वाचले आहेत. त्यांचे लेख, इंडियन म्युझिकॉलॉजिकल सोसायटीचे प्रबंध, तसेच आयटीसी - संगीत रिसर्च अकॅडमीच्या परिषदांच्या पुस्तकांतूनही प्रकाशित झाले आहेत. तसेच 'टाइम्स ऑफ इंडिया', 'डीएनए', 'टाइम आउट' इत्यादी प्रकाशनांतूनही त्यांनी लेखन केले आहे.

त्यांची 'बाजा गाजा' ही भारतीय संगीतातील वाद्यांची ओळख करून देणारी पुस्तक – मालिकाही प्रकाशित होत असून, यातील पहिला भाग २००८ साली प्रकाशित झाला आहे. अनीष प्रधानांनी एकल तबलावादनात, तसेच लघुपट आणि रंगभूमीकरिताही रचना केल्या आहेत. त्यांच्या सुविद्य पत्नी, प्रख्यात गायिका व रचनाकार शुभा मुद्‌गल यांच्या समवेत त्यांनी नृत्याकरिता व कंठसंगीताकरिताही रचना केल्या आहेत. तसेच भिन्न संस्कृतींमधील संगीत-सहयोगाच्या सादरीकरणातूनही एक रचनाकार आणि प्रस्तुतकर्ता म्हणून त्यांचा सहभाग राहत आला आहे. 'एशियन फॅन्टसी ऑर्केस्ट्रा' या संस्थेचे ते १९९८ पासून सभासद आहेत, तसेच 'एन्सेम्बल मॉडर्न' (फ्रँकफर्ट, जर्मनी) करिताही त्यांनी रचना केल्या असून त्यांच्या सादरीकरणातही प्रधानांचा सहभाग असतो.

अनीष प्रधानांनी सुनील शानभाग यांनी दिग्दर्शित केलेल्या 'तुम्बारा' या नाटकाचे संगीत दिग्दर्शन केले असून त्यांना १९९८ चे 'नाट्यदर्पण' पारितोषिक मिळाले आहे. त्यांना भारतीय सरकारची 'कल्चरल टॅलन्ट' शिष्यवृत्ती मिळाली होती, तसेच त्यांना 'आदित्य बिर्ला किरण' पुरस्कारही प्राप्त झाला आहे.

प

अंडरस्कोअर रेकॉर्ड प्रा.लि.चे ते संचालक असून ही एक स्वतंत्र ‘ऑनलाइन’ कंपनी त्यांनी शुभा मुद्‌गल यांच्यासह प्रस्थापित केली आहे. या कंपनीने काही ध्वनिसंचही काढले आहेत. डॉ. अशोक रानडे (संचय) याबरोबरच कौशल्या मंजेश्वर, केसरबाई केरकर यांच्याही ध्वनिचकत्या त्यांनी काढल्या आहेत. ‘तबला-सोलो ट्रॅडिशन’ आणि ‘तबला-ए कंटिन्युइंग ट्रॅडिशन’ हे त्यांच्या तबलावादनाचे दोन संच अंडरस्कोअर रेकॉर्ड प्रा.लि.तर्फे निघाले आहेत.

‘बाजा गाजा : एकविसाव्या शतकातील भारतातील संगीत’ अशा एका उत्सवाचे आयोजनही ते करतात. अनीष प्रधान ह्यांचे वास्तव्य मुंबईत असून ते अनेक प्रकारच्या सांगीतिक कार्यवैशिष्ट्यांत, घटनांत, कार्यक्रमांत, सादरीकरणांत व्यग्र असतात.

— माधव इमारते

## प्रवर्तक, शंकर लक्ष्मण

**गायक**

**२७ ऑक्टोबर १८९० — २० जानेवारी १९५४**



शंकर लक्ष्मण प्रवर्तक यांचा जन्म अमरावती जिल्ह्यात लोणी येथे कुलकर्णी कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई होते. लहानपणापासून शंकर प्रवर्तकांची विचारसरणी प्रखर व वृत्ती बाणेदार होती म्हणून त्यांनी आपले नाव कुलकर्णीऐवजी ‘प्रवर्तक’ ठेवले आणि त्याच नावाने ते ख्यातनाम झाले. बालपणापासून संगीताची आवड असल्याने त्यांनी संगीत क्षेत्रातच भरघोस कार्य करण्याच्या निश्चयाने घर सोडले.

शंकर प्रवर्तकांनी ग्वाल्हेरला ढोलीबाबांच्या मठात मुक्काम केला. अन्नछत्रात भोजन करून पं. विष्णूबुवा फलटणकर यांच्याकडे संगीताचा अभ्यास केला. आपल्या सुरेल गायनाने अल्पावधीतच त्यांना प्रसिद्धी मिळाली. वयाच्या बाविसाव्या वर्षी ते बनारसला जाऊन पं. गोपाळशास्त्री नेने व पं. भालचंद्र शास्त्री तेलंग यांच्याकडे संस्कृतचा अभ्यास आणि धृपद गायकी शिकू लागले. ते १९१५ साली अमरावतीला आले व तेथून नांदगावला गेले. त्यांनी १९१७ पर्यंत पुण्याला अब्दुल करीम खाँसाहेबांकडे अध्ययन केले. त्याच अवधीत त्यांनी पं. भास्करबुवा बखले यांचेही मार्गदर्शन घेतले.

शंकर प्रवर्तक १९१९ मध्ये ग्वाल्हेरला गेले आणि त्यांनी पं. भातखंडे यांनी स्थापन केलेल्या ‘माधव संगीत विद्यालया’त साधना केली. भातखंडे यांची प्रवर्तकांवर अतिशय मर्जी बसली. त्यांच्या सुरेल आवाजाने, पद्धतशीर गायकीने, हुकमी रंगतीने बैठकी खूप गाजल्या व त्यांना चौफेर लोकप्रियताही लाभली. परंतु कुणीतरी त्यांना द्वेषभावाने विड्यातून शेंदूर दिल्याने त्यांचा सुरेल आवाज कायमचा लुप्त झाला व आवाज घोगरा, जाडाभरडा झाला. तरी हताश न होता त्यांनी संगीत शिक्षक होऊन संगीताचाच प्रचार-प्रसार करण्याचे दृढ व्रत घेतले.

यानंतर १९२४ साली प्रवर्तक काहीसे विरक्त होऊन नागपूरजवळ पाटसावगी येथे राहिले. मात्र नंतर पुन्हा नागपूर येथे परतले व शहराच्या महाल विभागात त्यांनी ‘चतुर संगीत महाविद्यालया’ची व ‘अभिनव संगीत विद्यालया’ची १९२५ साली स्थापना केली. पुढच्याच वर्षी ‘हिंदुस्थानी संगीत शिक्षण प्रसारक मंडळ’ स्थापन करून त्यांनी विद्यार्थ्यांना परीक्षा केंद्र मिळवून दिले.

प्रवर्तकांनी १९४० मध्ये धंतोली भागात ‘म्यूझिक कॉलेज’ स्थापन केले. बरीच वर्षे प्रवर्तक या महाविद्यालयाचे प्राचार्य होते. त्यांनी १९४५ मध्ये ‘संगीत शिक्षक महासभा’ स्थापन केली. त्यांनी स्थापन केलेले ‘चतुर संगीत महाविद्यालय’ आणि ‘भातखंडे म्यूझिक कॉलेज’ अजूनही कार्यरत आहेत.

त्यांच्या शिष्यांपैकी प्रभाकर जोशी व यादव जोशी ही जोडी खूप गाजली. यांशिवाय प्रभाकर खर्डेनवीस,

देवीदास देवघरे, दत्तोपंत वझलवार, डॉ. उषा नंदनपवार, प्रभा वसू (राज्यमंत्री प्रभा राव), वसंत मांडे वगैरे अनेक जण नावारूपास आले.

त्यांनी चिजांचे मराठीकरण करून 'महाराष्ट्र गीतांजली' नावाचे पुस्तक लिहून प्रकाशित केले. तसेच मराठी चिजा विद्यार्थ्यांना शिकविल्या. उतारवयात प्रवर्तकांनी भातखंडे महाविद्यालयाचा सर्व कारभार शिष्य प्रभाकर खर्डेनवीस यांच्या हाती दिला. ते टापटीप व शिस्तप्रिय असल्याने त्यांनी संस्थेचे बोधचिन्ह, प्रमाणपत्रे, नोंदणीबुके व्यवस्थित ठेवली.

आजन्म ब्रह्मचर्य पत्करून, शास्त्रीय संगीताला योग्य व मानाचे स्थान प्राप्त करून देण्याचे श्रेय चार संगीत- संस्थांचे संस्थापक, 'प्रवर्तक' शंकर प्रवर्तक यांना आहे. त्यांचे नागपूर येथे निधन झाले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', प्रथमावृत्ती, मार्च १९७४.*

✻✻✻

प




## फडके, रामचंद्र विनायक

☛ फडके, सुधीर

## फडके, ललिता सुधीर

**गायिका**

**१९२५ – २५ मे २०१०**



ललिता सुधीर फडके, पूर्वाश्रमीच्या ललिता देऊळकर यांचा जन्म मुंबईतील मध्यमवर्गीय सारस्वत कुटुंबात झाला. त्यांचे वडील कापडाचे व्यापारी होते. आर्थिक परिस्थिती बिकट असल्याने त्यांचे शालेय शिक्षण जेमतेम पूर्ण झाले. सात भावंडे, आजी व दोन काका उत्तम गाणारे होते. त्यांच्या शेजारच्या बंगाली कुटुंबाकडे अभिनेते, कवी हरींद्रनाथ चट्टोपाध्याय यांनी ललिताचा गोड आवाज ऐकून ‘तिला चित्रपटात गायला-अभिनयाला पाठवा’, अशी शिफारस केली व वयाच्या नवव्या वर्षी ललिताला चित्रपटसृष्टीत बॉम्बे टॉकीजमध्ये प्रवेश मिळवून दिला. लहानपणी दोन वर्षे गायनाचे शिक्षण त्यांनी बाबूराव गोखले व किराणा घराण्याचे दत्तोबा तावडे आणि वालावलकर यांच्याकडे घेतले.

ललिता फडके यांनी सुरुवातीला हिंदी, इंग्रजी भाषा अवगत करून जाहिरातीसाठी आवाज दिला. त्यांना ‘दुर्गा’ या चित्रपटात छोटी भूमिका मिळाली. विभूती मित्रांच्या ‘अंगूठी’मध्ये त्यांना प्रथम पार्श्वगायनाची संधी मिळाली. १९४६ साली ‘रुक्मिणीस्वयंवर’साठी ललितातार्इंनी बाबूजींकडे प्रथम पार्श्वगायन केले. त्यांनी बव्हंशी प्रथितयश संगीतकारांसाठी (उदाहरणार्थ, शंकरराव व्यास, सी. रामचंद्र, एस. डी. बर्मन, मास्टर गुलाम हैदर) पार्श्वगायन केले. गीतरामायणातील कौसल्येची सर्व गीते त्यांनी गायली आहेत.

मराठीत डॉ. वसंतराव देशपांडे यांच्यासह त्यांनी ‘वंशाचा दिवा’, तर ‘सुवासिनी’मध्ये पं. भीमसेन जोशी यांच्यासह त्यांनी एक चीज गायली आहे. हिंदीत मुहंमद रफी, चितळकर इ. गायकांसह त्यांनी पार्श्वगायन केले. ‘संत जनाबाई’, ‘माया बाजार’, ‘उमज पडेल तर’, ‘जशास तसे’ या चित्रपटांत त्यांनी पार्श्वगायन केले आहे.

श्रीधर पार्सेकरांच्या संगीत नाटकात त्यांनी १९४५ साली शांता आपटे, राम मराठे, दत्ता डावजेकर व सुधीर फडके यांसह गायन केले होते. सुधीर फडके आणि ललिता देऊळकर यांचा विवाह २९ मे १९४७ रोजी पुण्यात झाला.

‘रंगू बाजाराला जाते’, ‘पाव्हनं येवढं ऐका’ (वंशाचा दिवा), ‘नखानखांवर रंग भरा’ (माया बाजार), ‘मोठं मोठं डोळं तुझं’ (जशास तसे), ‘डोहात बुडाला श्याम’ (माझं घर, माझी माणसं), ‘मी तर प्रेमदिवाणी’ (सुवासिनी) ही त्यांची काही गाजलेली चित्रपटगीते आहेत. ‘संत जनाबाई’ या चित्रपटातील जवळजवळ सर्व गाणी त्यांनी गायली होती. त्याचप्रमाणे, ‘आठ दिन’, ‘विद्या’, ‘रामबान’, ‘बेदर्द’, ‘दौलत’, ‘शहीद’, ‘जलन’, ‘मेरा मुन्ना’ आदी हिंदी चित्रपटांतूनही त्यांनी पार्श्वगायन केले.

दादरा-नगरहवेली ‘मुक्तिसंग्रामा’तही त्यांनी बाबूजींना साथ दिली. देश व सामाजिक बांधीलकीचे उभयतांचे उदाहरण म्हणजे अरुणाचल प्रदेशातील ‘लेकी फुन्चो’ ह्या

मुलाला त्यांनी आपल्या घरी ठेवले. त्याचे ‘दीपक’ असे नामकरण करून त्यास श्रीधरप्रमाणेच संस्कार देऊन, चांगले शिक्षण दिले. तो आता उच्च पदावर कार्यरत आहे. बाबूजींचे गुरू कै. पाध्येबुवा यांच्या स्मरणार्थ त्यांनी ‘सुलश्री’ प्रतिष्ठानाची स्थापना केली. ग.दि. माडगूळकर प्रतिष्ठानातर्फे त्यांना मिळालेला ‘गृहिणी-सखी-सचिव’ पुरस्कार त्यांच्या कर्तृत्वाचा मानाचा तुरा ठरला.

– रवींद्र आपटे

## फडके, श्रीधर सुधीर

**संगीतकार, गायक**

**९ सप्टेंबर १९५०**



श्रीधर सुधीर फडके यांचा जन्म विख्यात गायक व संगीत दिग्दर्शक सुधीर फडके आणि विख्यात पार्श्वगायिका ललिता फडके यांच्या पोटी मुंबई येथे झाला. त्यामुळे श्रीधर फडके यांना घरातून संगीताचा वारसा मिळाला आणि त्यांच्यावर बालपणापासून संगीताचे उत्तम संस्कार झाले.

मुंबईतील बालमोहन विद्यामंदिर, लोकमान्य विद्यामंदिरात त्यांचे शालेय शिक्षण झाले व रूपारेल महाविद्यालयातून एम.एस्सी. पदवी घेऊन पॉलिटेक्निक इन्स्टिट्यूट ऑफ न्यूयॉर्क येथून त्यांनी एम.एस. कॉम्प्यूटर पूर्ण केले आणि त्यात चांगले करिअरसुद्धा केले.

शिकत असताना त्यांनी भावगीतांची ध्वनिफीत काढली होती. संगीत क्षेत्रातील श्रीधर फडके यांची पहिली लक्षणीय कामगिरी म्हणजे त्यांनी संत ज्ञानदेव विरचित हरिपाठातील ‘देवाचिये द्वारी’ या अभंगाला लावलेली सुमधुर चाल. या वेळी ते अमेरिकेत शिक्षण घेत होते.

‘लक्ष्मीची पावले’ हा श्रीधर फडके यांनी संगीत दिलेला पहिला चित्रपट होय. यातील ‘फिटे अंधाराचे जाळे’ हे गीत फारच गाजले. सुधीर फडके आणि आशा भोसले या दिग्गज कलाकारांनी हे गीत गायले होते. याला अमाप लोकप्रियता लाभल्यामुळे संगीत विश्वातील श्रीधर फडके यांचे स्थान भक्कम झाले.

‘ओंकार स्वरूपा’, ‘ऋतु हिरवा’ या ध्वनिफितींतील त्यांनी स्वरबद्ध केलेली गीते अत्यंत लोकप्रिय ठरली. ‘काही बोलायाचे आहे’ ही त्यांनी गायलेल्या गीतांची ध्वनिफीत, पद्मजा फेणाणी-जोगळेकर यांच्या सहगायनातील ‘हे गगना’, आरती अंकलीकर व सुरेश वाडकर यांनी गायलेली ‘तेजोमय नादब्रह्म’ आणि ‘सुखरदा रामा’, ‘संगीत मनमोही रे’, इ. ध्वनिचकत्यांतील गीते लोकप्रिय झालेली आहेत. लोकप्रियतेच्या मानांकनासाठी त्यांच्या चार ध्वनिचकत्यांना ‘प्लॅटिनम डिस्क’ बहाल झाली आहे.

एअर इंडियातील वरिष्ठ पदावरून ते निवृत्त झालेत. हा संगीताचा छंद, त्यांनी नोकरी सांभाळून जोपासला. निवृत्तीनंतर पूर्ण वेळ संगीतकार व गायक म्हणून त्यांची वाटचाल चालू आहे.

महाराष्ट्र शासनाचा ‘उत्कृष्ट पार्श्वगायक’ पुरस्कार १९९७ (चित्रपट : विश्वविनायक) त्यांना प्राप्त झाला आहे. संगीत दिग्दर्शनासाठी ‘फिल्मफेअर’ पुरस्कार, ‘वारसा लक्ष्मीचा’ (१९९५), ‘पुत्रवती’ (१९९७), ‘लेकरू’ (१९९९) या तीन चित्रपटांसाठी त्यांना मिळाला. दूरदर्शनचा ‘स्वरतीर्थ’ पुरस्कार, भारत गायन समाज, पुणे यांचा ‘वसुंधरा पंडित’ पुरस्कार त्यांच्या नावावर आहेत.

– रवींद्र आपटे

## फडके, सुधीर

***फडके, रामचंद्र विनायक***

**गायक, संगीतकार**

**२५ जुलै १९१९ – २९ जुलै २००२**

रामचंद्र ऊर्फ सुधीर विनायक फडके यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांच्या वडिलांना संगीताची आवड होती. त्यामुळे त्यांच्यावर बालपणापासूनच प्रख्यात गायक, वादक यांच्या ध्वनिमुद्रिका ऐकून

फ



संगीताचे संस्कार झाले. वयाच्या सातव्या वर्षी कोल्हापूरचे प्रख्यात संगीतज्ञ, गायक वामन पाध्ये यांच्याकडे त्यांचे गायनाचे शिक्षण सुरू झाले. मातापित्यांच्या अकाली निधनाने व प्रतिकूल कौटुंबिक परिस्थितीमुळे बालवयातच त्यांच्यावर अर्थार्जनाची जबाबदारी येऊन पडली. यामुळे त्यांचे शालेय शिक्षण अर्धवटच राहिले. कोल्हापूरच्या एका संगीत विद्यालयात संगीत शिक्षकाचे काम करीत असताना, त्या विद्यालयाच्या संचालकांनी त्यांचे 'सुधीर फडके' असे नामकरण केले आणि पुढे हेच नाव जनमानसात रुळले आणि खूप लोकप्रिय झाले.

मुंबईत गायक, संगीतकार म्हणून प्रस्थापित होण्यापूर्वी सुधीर फडके अर्थार्जनासाठी भारतभर हिंडले. त्यांनी विविध ठिकाणी गायनाचे कार्यक्रम केले आणि त्या योगे विविध प्रांतांतील संगीतशैली, लोकसंगीत यांचा त्यांनी अभ्यास केला. प्रथम कोल्हापूर व नंतर मुंबई येथे आलेल्या तत्कालीन 'हिज मास्टर्स व्हॉइस' या प्रसिद्ध ग्रामोफोन कंपनीतून त्यांची व्यावसायिक संगीतकार, गायक अशी कारकीर्द सुरू झाली आणि उत्तरोत्तर यशस्वी होत राहिली. त्यांनी १९४१ साली ग.दि. माडगूळकर यांच्या 'दर्यावरी नाच करी होडी चाले कशी भिरीभिरी' या कवितेला चाल लावली. त्यांच्याच आवाजात त्याची ध्वनिमुद्रिकाही निघाली आणि ती लोकप्रिय झाली.

फडके यांनी प्रख्यात गायिका हिराबाई बडोदेकर यांना आपले गुरू मानले. संगीतकार म्हणून हिराबाईंकडून त्यांनी काही गीते गाऊन घेतली. शांता हुबळीकर, माणिक दादरकर (वर्मा), गोविंद कुरवाळीकर, सुमन हेमाडी, जे.एल. रानडे, पद्मा पाटणकर अशा नामवंत गायक-गायिकांकडूनही एच.एम.व्ही.चे संगीतकार म्हणून त्यांनी गीते ध्वनिमुद्रित केली.

चित्रपट व्यवसायात संगीतकार-गायक म्हणून १९४५ साली सुधीर फडके यांचा प्रवेश प्रभात कंपनीच्या 'गोकूळ'या चित्रपटाद्वारे झाला. याच कंपनीच्या 'आगे बढ़ो', 'संत जनाबाई' अशा चित्रपटांना त्यांनी संगीत दिले. एव्हांना सुधीर फडके हे रसिकांचे लाडके 'बाबूजी' झाले. बाबूजी म्हणून रसिकांनी त्यांना अक्षरश: डोक्यावर घेतले. प्रभात कंपनीव्यतिरिक्त 'जिवाचा सखा', 'जशास तसे', 'लाखाची गोष्ट', 'प्रपंच', 'जगाच्या पाठीवर', 'हा माझा मार्ग एकला', 'मुंबईचा जावई', 'पुढचं पाऊल', 'शापित' या चित्रपटांना त्यांनी दिलेले संगीतही कमालीचे यशस्वी झाले.

सुधीर फडके २९ मे १९४९ रोजी गोड गळ्याच्या प्रतिभावंत गायिका ललिता देऊळकर यांच्याशी विवाहबद्ध झाले. त्यांनी १९५१ साली 'विठ्ठल रखुमाई' हा चित्रपट निर्माण केला. त्या चित्रपटात त्यांनी गुरू मानलेल्या बालगंधर्वांना गाणी गाण्याचा मान दिला.

मराठीप्रमाणेच हिंदी चित्रपटांनाही त्यांनी संगीत दिले. 'पहली तारीख', 'मालती माधव', 'भाभी की चूडियां' हे काही ठळक हिंदी चित्रपट होत. माणिक वर्मा, लता मंगेशकर, आशा भोसले, मुकेश, मुहंमद रफी, किशोरकुमार अशा श्रेष्ठ पार्श्वगायकांसोबत काम करण्याची संधी त्यांना मिळाली. मराठी चित्रपटांतील 'वेदमंत्रांहून आम्हां...', 'एक धागा सुखाचा', 'त्या तिथे पलीकडे', 'विठ्ठला तू वेडा कुंभार', 'जिवलगा कधी येशील तू', 'देहाची तिजोरी', 'धुंदी कळ्यांना', 'एकाच या जन्मी जणू', 'दिस जातील दिस येतील' ही काही अत्यंत गाजलेली गीते, तर हिंदीतील 'खुश है जमाना,' 'बांध प्रीत फुलडोर', 'ज्योति कलश छलके', 'लौ लगाती गीत गाती' ही लोकप्रिय झालेली गीते होत.

त्यांची १९४६ ते १९८८ अशी प्रदीर्घ चित्रपटसंगीताची कारकीर्द संपन्न झाली. बाबूजींचे संगीत ८३ मराठी चित्रपटांना लाभले आहे. त्यांचे सुपुत्र श्रीधर फडके यशस्वी संगीतकार, गायक म्हणून कार्यरत आहेत. 'लक्ष्मीची पाउले' या चित्रपटात श्रीधर फडक्यांच्या संगीत दिग्दर्शनात सुधीर फडके 'फिटे अंधाराचे जाळे' हे द्वंद्वगीत आशा भोसले यांच्या सोबत गायले आहेत.

फ

'गीतरामायण' हा सुधीर फडके यांच्या सांगीतिक कारकिर्दीतील अत्यंत महत्त्वाचा टप्पा होता. हिंदूंचे आराध्यदैवत प्रभू श्रीरामचंद्रांच्या जीवनावर ग.दि. माडगूळकर यांनी ५६ गीते लिहिली. या गीतांना सुधीर फडके यांनी अद्वितीय संगीतसाज चढविला. पुणे आकाशवाणीने १९५५ साली ही गीते पुणे केंद्रावरून प्रक्षेपित करून करोडो श्रोत्यांपर्यंत ती पोहोचवली आणि साऱ्यांना मंत्रमुग्ध केले. पुणे आकाशवाणीच्या या प्रकल्पात सुधीर फडके, गजानन वाटवे, माणिक वर्मा, राम फाटक, मालती पांडे, वसंत देशपांडे, सुरेश हळदणकर अशा मोठ्या गायकांनी ही गीते गायली. लता मंगेशकरांनी यांतील 'मज सांग लक्ष्मणा जाऊ कुठे' हे एकमेव गीत गायले. पुढे सुधीर फडक्यांनी सर्व ५६ गीते स्वत:च्या आवाजात एच.एम.व्ही.तर्फे ध्वनिमुद्रित केली. आणि लाखोंच्या संख्येने या ध्वनिमुद्रिकांची विक्री झाली. मराठी भावसंगीतातील अत्युच्च शब्द-स्वराविष्कार म्हणून 'गीतरामायण' ओळखले जाते.

संख्यात्मकदृष्ट्या सुधीर फडक्यांचे काम त्यांच्या समकालीन संगीतकारांहून खूपच अधिक आहे. यामुळे मराठी भावसंगीत म्हणजे सुधीर फडके असे समीकरणच झाले होते. गेयता हा त्यांच्या संगीताचा प्रमुख पैलू असल्याने ते अफाट लोकप्रिय झाले. ते स्वतः गायक आणि संगीतकार असल्याने त्यांचे संगीत अधिक परिणामकारक ठरले. गायक म्हणून त्यांचे उच्च स्थान वादातीत आहे. भावसंगीताचा आत्मा म्हणजे शब्दोच्चार आणि शब्दफेक. सुधीर फडके यांची ही दोन्ही वैशिष्ट्ये म्हणून ओळखली जातात. शब्दोच्चार अतिशय स्पष्ट, अर्थवाही आणि अतिशय लयदार शब्दफेक. त्यांच्या शब्दफेकीतील आवाजाचा चढउतार हा त्या लयकारीचाच एक भाग. या चढउतारामुळेच त्यांचे गायन भावनांनी ओथंबलेले आणि काळजाला हात घालणारे आहे. हे सगळे गाताना ज्या सहजतेने ते गायलेत, ते तर एकमेवाद्वितीयच. 'गीतरामायणा'तील त्यांचे गायन हे भावसंगीत गायकाचा अभ्यासक्रम ठरावा इतके परिपूर्ण आहे. त्यात आशयानुरूप चाली आणि गायन, अभिव्यक्ती, लयकारी, शब्दोच्चारण, शब्दफेक हे सर्व अद्वितीय आहे. त्यांचा शास्त्रीय संगीताचा गाढा अभ्यास त्यांच्या गीतरामायणातील गायनात स्पष्ट जाणवतो. 'दशरथा, घे हे पायसदान', 'वाली वधना', 'तात गेले माय गेली', 'सन्मित्र राघवांचा', 'मज सांग लक्ष्मणा...', 'रघुराजाच्या नगरी जाऊन ...' ही त्यांची गीतरामायणातील काही ठळक गीते.

या असामान्य गायक-संगीतकाराच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रखर राष्ट्रभक्ती हा अतिशय महत्त्वाचा पैलू होता. सुधीर फडक्यांनी निस्सीम राष्ट्रभक्ती आणि कट्टर हिंदुत्ववाद आयुष्यभर जपला. ते राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे आजन्म निष्ठावान स्वयंसेवक म्हणून जगले. तसेच त्यांनी संघप्रचारक म्हणूनही कार्य केले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरही पोर्तुगिजांच्या ताब्यात असलेल्या गोमंतकाला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या सशस्त्र लढाईत १९५४ साली सुधीर फडके यांनी सक्रिय भाग घेतला आणि गोमंतकाला पोर्तुगिजांच्या ताब्यातून मुक्त केले. आझाद गोमंतकाच्या दलात सामील होऊन त्यांनी हे कार्य पार पाडले. परिणामतः पोर्तुगिजांच्या अटकेत असलेल्या भारतीय क्रांतिवीर मोहन रानडे आणि डॉ. मस्कारेन्हास यांची सुटका झाली.

सुधीर फडके हे थोर क्रांतिवीर वि.दा. सावरकर यांचे भक्त होते. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या जीवनावरील चित्रपटाच्या निर्मितीचे स्वप्न त्यांनी पाहिले. अतिशय जिद्दीने, तळमळीने, कष्टाने 'वीर सावरकर' या चित्रपटाची यशस्वी निर्मिती करून त्यांनी आपले स्वप्न साकारले.

सुधीर फडक्यांना संगीतात दिलेल्या योगदानाबद्दल काही उल्लेखनीय पुरस्कार मिळाले आहेत. प्रथम महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट महोत्सवात 'प्रपंच' या चित्रपटासाठी 'सर्वोत्कृष्ट संगीत दिग्दर्शक' (१९६२ - ६३), श्रीराम चित्र निर्मित 'हा माझा मार्ग एकला' या चित्रपटासाठी राष्ट्रपती रौप्यपदक (१९६३-६४), दुसऱ्या राज्य मराठी चित्रपट महोत्सवात श्रीराम चित्र निर्मित 'हा माझा मार्ग एकला' या चित्रपटासाठी दुसरे पारितोषिक (१९६३-६४), सहाव्या राज्य मराठी चित्रपट

महोत्सवात 'संथ वाहते कृष्णामाई' या गीतासाठी 'सर्वोत्कृष्ट पार्श्वगायक' (१९६७-६८), सुरसिंगार संसदतर्फे 'भाभी की चूडियां' या चित्रपटातील 'ज्योति कलश छलके' या उत्कृष्ट गीताबद्दल 'स्वामी हरिदास' पुरस्कार (१९६८), सातव्या राज्य मराठी चित्रपट महोत्सवात 'आम्ही जातो अमुच्या गावा' या चित्रपटासाठी 'उत्कृष्ट संगीतकार' (१९६८-६९), सुरसिंगार संसदतर्फे 'मुंबईचा जावई' या चित्रपटातील 'प्रथम तुज पाहता' या गीताच्या स्वररचनेबद्दल 'स्वामी हरिदास' पुरस्कार (१९७०), नवव्या राज्य मराठी चित्रपट महोत्सवात 'धाकटी बहीण' या चित्रपटातील 'धुंदी कळ्यांना, धुंदी फुलांना' या गीतासाठी 'उत्कृष्ट पार्श्वगायक' (१९७०-७१), बाराव्या महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट महोत्सवात 'कार्तिकी' या चित्रपटासाठी 'उत्कृष्ट पार्श्वगायका'चे पारितोषिक (१९७४-७५) आदी पुरस्कारांचे ते मानकरी ठरले.

संगीत नाटक अकादमीने १९८१ साली संगीतातील सर्जनशील प्रमुख कलाकार म्हणून ताम्रपट देऊन त्यांचा सन्मान केला तर, १९९३ मध्ये मराठी साहित्य संमेलन, खार, मुंबईतर्फेही त्यांना सन्मान प्राप्त झाला. कुसुमाग्रज प्रतिष्ठानातर्फे १९९६ साली संगीत क्षेत्रातील कामगिरीबद्दल त्यांचा 'गोदावरी गौरव' हा पुरस्कार देऊन गौरव करण्यात आला.

— प्रमोद रानडे

फ

## फलटणकर, वामन गोविंद

**गायक**

**सुमारे १८३० - १९०७**

वामन गोविंद फलटणकर हे प्रसिद्ध धृपदगायक होते. त्यांचे वडील गोविंदबुवा गोसावी फलटणकर हे कीर्तनकार होते. ते ग्वाल्हेरमध्ये लष्कर भागात राहत असत. प्रसिद्ध धृपदिये पं. चिंतामणी मिश्र यांचे शिष्य नारायण शास्त्री यांचे शिष्यत्व वामनबुवांनी पत्करले.

मथुरेच्या शेठ लक्ष्मीचंद यांनी द्वारकाधीश मंदिराची स्थापना केली आणि संगीत सेवेसाठी वामनबुवांना लष्करकडून मथुरेला आमंत्रित केले. तिथे फलटणकरबुवांच्या गायकीने लोक प्रभावित झाले. तसेच तेथील कित्येक जण बुवांचे शिष्य झाले. एकदा करौली संस्थानाचे अधिपती महाराज मदनपाल यांनी मथुरेस, ते तीर्थयात्रेस आले असताना त्यांनी बुवांचे गाणे ऐकले. त्यांना ते गायन इतके आवडले, की त्यांनी शेट लक्ष्मीचंदांकडून बुवांना आपल्या संस्थानासाठी मागून घेतले. मग द्वारकाधीश मंदिरात गानसेवेसाठी वामनबुवांचे धाकटे बंधू भैयाजी यांना बोलावून घेतले गेले.

करौली संस्थानात वामनबुवांचे कार्यक्रम गाजू लागले. त्यांच्याविषयीची एक आख्यायिका अशी: एकदा वामनबुवांचे गाणे ठेवले होते. उन्हाळा कडक होता, म्हणून उघड्यावरील चौकात मैफल भरवली होती. उकाड्याने हैराण झालेले संस्थानिक म्हणाले, ''बुवा, आज संगीताचा काही चमत्कार दाखवा.'' बुवा म्हणाले, ''मला थोडा वेळ द्या, मी स्नान करून येतो.''

स्नान करून, शुचिर्भूत होऊन बुवा पुन्हा आपल्या आसनावर बसले. गुरूंचे स्मरण करून मेघमल्हार आळवू लागले. हळूहळू पखवाजाबरोबर धृपदाच्या रंगतीबरोबर धुवांधार पाऊस पडला. त्या घटनेनंतर करौलीच्या मुरलीधर मंदिराचे पिढ्यान्‌पिढ्यांचे वतन आणि मासिक पगार वगैरे गोष्टी वामनबुवांना बहाल केल्या गेल्या.

करौलीचे संस्थानिक वारल्यावर लष्करचे महाराज जयाजीराव शिंदे यांनी वामनबुवांना बोलावून घेतले आणि दरबारातल्या इतर कलावंतांमध्ये त्यांचा समावेश केला. महाराजांची फलटणकरबुवांवर अतिशय श्रद्धा होती. रात्री आठ वाजल्यापासून महाराज निद्राधीन होईपर्यंत बुवा त्यांच्या शयनागाराजवळ बसून राग आळवत असत. फलटणकरबुवांच्या निधनानंतर त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव शिवराम शास्त्री हेही पित्याप्रमाणे यशस्वी गवई झाले. वामनबुवांनी रचलेले तराणे पं. भातखंडे यांनी त्यांच्या क्रमिक पुस्तक मालिकेत छापले आहेत.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*गर्ग, लक्ष्मीनारायण; 'हमारे संगीतरत्न'; हाथरस; १९५७.*

## फुलंब्रीकर, कृष्णराव गणेश

**☛ मास्टर कृष्णराव**

## फेणाणी-जोगळेकर, पद्मजा सुनील

**गायिका**

**७ जुलै १९६२**



चतुरस्र गायिका व संगीतकार पद्मजा सुनील फेणाणी- जोगळेकरांचा जन्म मुंबईतील एका कलासक्त कुटुंबात झाला. फेणाणी हे सारस्वत ब्राह्मण कुटुंब मूळ कारवारचे. वडील शंकर फेणाणी हे व्यावसायिक चित्रकार व संगीताचे विशेष प्रेमी. आई शैलजा फेणाणी या हस्तकलाकौशल्यात निपुण. थोरल्या भगिनी उषा फेणाणी या उत्तम व्यक्तिचित्रणकार. बालपणापासूनच पद्मजावर अभिजात संगीताचे संस्कार होत गेले. त्यांच्या थोरल्या भगिनी श्रीमती उषा फेणाणींनीच त्यांना संगीताचे प्राथमिक धडे दिले.

पद्मजा फेणाणींचे शालेय शिक्षण दादरच्या बालमोहन विद्यालयातून झाले. त्यानंतर रुपारेल महाविद्यालयामधून बारावी उत्तीर्ण झाल्यानंतर, सोमय्या महाविद्यालयामधून सूक्ष्मजीवशास्त्र हा विषय घेऊन त्यांनी विज्ञानाची पदवी संपादन केली.

वयाच्या आठव्या-नवव्या वर्षी वडिलांचे मित्र सुप्रसिद्ध सतारवादक अब्दुल हलीम जाफरखाँ यांनी पद्मजाचे गाणे ऐकल्यावर तिला शास्त्रीय गायन शिकविण्याचा सल्ला दिला. वयाच्या अठराव्या वर्षापर्यंत त्यांना गुरू लाभला नव्हता; परंतु ग्रहणशक्तीतून त्यांचे गायन विकसित होत होते. वयाच्या चौदाव्या वर्षी मुंबई दूरदर्शनच्या ‘किलबिल’ या कार्यक्रमातून त्या गायल्या. वयाच्या अठराव्या वर्षी, १९८० साली या एकाच वर्षात वेगवेगळ्या २५ स्पर्धांत भाग घेऊन त्यांनी प्रत्येक स्पर्धेत प्रथम पारितोषिक पटकावले होते. सी. रामचंद्र, जयदेव आणि एस.एन. त्रिपाठी यांसारख्या मातब्बर संगीत दिग्दर्शक असलेल्या परीक्षकांकडून पद्मजाला १९८० साली ‘सुरसिंगार’चा ‘एस.डी. बर्मन’ पुरस्कार लाभला.

त्यांचे खऱ्या अर्थाने शास्त्रोक्त संगीत शिक्षण १९८० सालापासून रीतसर सुरू झाले. उत्तर भारतीय रागदारी संगीतातील सुप्रसिद्ध गायक पं. जसराज यांच्या त्या गंडाबंध शागिर्द झाल्या. पं. जसराज यांच्याकडे शिकत असतानाच पं. हृदयनाथ मंगेशकरांची त्यांच्याशी ओळख झाली. पुढे हृदयनाथांच्याही त्या शिष्या झाल्या. चार वर्षांच्या पं. जसराजांच्या तालमीनंतर त्या सुप्रसिद्ध सारंगीवादक पं. रामनारायण यांच्याकडेही पाचसहा वर्षे शिकल्या.

दूरदर्शनवरील ‘शब्दांच्या पलीकडे’ या कार्यक्रमातून त्या खऱ्या अर्थाने रसिकांपर्यंत पोहोचल्या. ‘शब्दांच्या पलीकडे’ या कार्यक्रमात १९८१ साली शांताराम नांदगावकरांचे ‘धुंद मंद ही अशीच सांज उतरली’ हे अनिल मोहिल्यांनी संगीतबद्ध केलेले गाणे त्यांनी सादर केले. दूरदर्शनवर हे त्यांचे पहिलेच सादरीकरण होते. या गाण्याने अनेकांचे लक्ष वेधून घेतले. लता मंगेशकरांनी तिच्या गाण्याबद्दल गौरवोद्गार काढले. यानंतर त्यांची सांगीतिक कारकीर्द झपाट्याने फुलत गेली. ‘निवडुंग’ या चित्रपटासाठी १९८४ साली ‘केव्हातरी पहाटे’ व ‘लव लव करी पातं’ ही दोन गाणी हृदयनाथांनी पद्मजाच्या आवाजात ध्वनिमुद्रित केली.

उपजत चांगल्या काव्याची जाण, भावपूर्ण व उत्कटतेने गाणे व जात्याच सुरेल आवाज यांमुळे त्यांची गाणी काव्यासह रसिकांच्या हृदयापर्यंत पोहोचतात. शास्त्रोक्त संगीतासह त्यांनी गझल, भावगीत, चित्रपटगीते, भक्तिगीते गायली असून, मराठीप्रमाणेच हिंदी, बंगाली, गुजराती, उर्दू, पंजाबी, कन्नड इत्यादी भाषांतीलही गाणी गायली आहेत.

त्यांच्या गायनाच्या अनेक ध्वनिफिती व गीतसंच निघाले आहेत. पद्मजा फेणाणी यांच्या सांगीतिक प्रवासातील अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे अटल

फ

बिहारी वाजपेयी यांच्या कवितेचे गायन असलेला ‘गीत नया गाता हूँ’ हा एच.एम.व्ही.ने काढलेला गीतसंच. स्वतः पद्मजा यांनीच या स्वरबद्ध केलेल्या रचना आहेत. विशेष म्हणजे या गीतसंचाच्या उत्पन्नाची रक्कम मानधन म्हणून न घेता त्यांनी पंतप्रधानांच्या आपद्ग्रस्त निधीस दिली होती. माजी पंतप्रधान व्ही.पी. सिंग यांच्याही मुक्तछंदातील कवितांना त्यांनी चाली दिल्या होत्या.

याशिवाय ‘ही शुभ्र फुलांची ज्वाला’, ‘रंग बावरा श्रावण’ आणि ‘घर नाचले नाचले’ या तीन गीतसंचांमधून मराठीतील दिग्गज कवींच्या कविता त्यांनी गायल्या आहेत. कविवर्य कुसुमाग्रज, विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर, शांता शेळके, शंकर रामाणी, सुरेश भट, ग्रेस यांच्या कविता यात आहेत. याबरोबरच मराठी गझल, तसेच त्यांचे ‘हे गगना’, ‘हे स्पर्श चांदण्याचे’ आणि ‘मेघा रे’ हे गीतसंचदेखील प्रसिद्ध झाले आहेत. दाग, जिगर अहमद् फराज इत्यादींच्या गझलांचाही त्यांचा संच असून ‘रंग’ हा सूफी शैलीतील हिंदी गीतांचा संचही प्रसिद्ध झाला आहे.

भारतात, तसेच परदेशांतही त्यांचे अनेक कार्यक्रम झाले आहेत. ‘मंगलदीप’, ‘भक्तिरंग’, ‘महफिल ए गजल’, ‘तेरे सुर और मेरे गीत’ असे वैविध्यपूर्ण कार्यक्रमही त्या सादर करतात. हृदयनाथ मंगेशकरांच्या ‘भावसरगम’ या कार्यक्रमांतूनही त्या गात असत.

त्यांना भारत सरकारचा ‘पद्मश्री’ (२००१) हा पुरस्कार मिळाला. त्यांना ‘मियां तानसेन’ पुरस्कार (१९८५), ‘भारत निर्माण’ पुरस्कार (१९८८), ‘आदर्श नागरिक’ पुरस्कार (१९८५), ‘माणिक वर्मा’ पुरस्कार (२०००) इत्यादी पुरस्कार प्राप्त झाले. कुसुमाग्रजांनी त्यांना ‘स्वरचंद्रिका’ म्हणून संबोधले आहे.

‘सगुण-निर्गुण’ या ‘महाराष्ट्र टाइम्स’मधील सदरातून त्यांनी आपल्या सांगीतिक जीवनातील अनुभव अतिशय संवेदनक्षमतेने शब्दबद्ध केले आहेत. त्या १९८८ साली व्यवसायाने अभियंता असलेल्या सुनील जोगळेकरांबरोबर विवाहबद्ध झाल्या. कलावंताची संवेदनक्षमता जपतानाच त्या सामाजिक बांधीलकीही तेवढ्याच मानतात.

– माधव इमारते

***

फ




## बकुळ पंडित

☛ ***वाडेकर, अलकनंदा अशोक***

## बखले, भास्कर रघुनाथ

**गायक**

**१७ ऑक्टोबर १८६९ – ८ एप्रिल १९२२**



भास्कर रघुनाथ बखले यांचा जन्म बडोदा संस्थानातल्या कठोर या गावी झाला. घराण्यात संगीताची गोडी कुणालाच नव्हती. त्यांचे वडील हे सरकारी तलाठी असल्याने त्यांची फिरतीची नोकरी होती. आठव्या वर्षी म्हणजे आई-वडिलांजवळ राहिलेल्या बाल भास्करला नंतर दोन वर्षे बहिणीकडे, त्यानंतर वडिलांच्या शेजारी देव नावाच्या गृहस्थांकडे राहावे लागले. संस्कृत पाठशाळेत शिकायचे, वार लावून जेवायचे अशा दिनक्रमात आवाज मधुर व पल्लेदार असलेल्या भास्करने श्लोकगायनात प्रावीण्य मिळवले.

विष्णूबुवा पिंगळे हे कीर्तनकार भास्करबुवांचे पहिले गुरू. पिंगळ्यांनी त्यांना विविध पदे शिकवली होती. हळूहळू गावात उत्सव असेल तेव्हा त्यांना गाण्यासाठी आमंत्रण दिले जाई. एकदा संस्थानिक सयाजीराव यांनी त्यांचे गाणे ऐकल्यावर त्यांची चौकशी केली आणि बडोद्यातील मौलाबक्षांच्या सरकारी गायनशाळेत त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था केली. या संगीतशाळेच्या समारंभात भास्करबुवा गायले आणि त्या कार्यक्रमाचा वृत्तान्त ‘सयाजी-विजय’ या अंकात छापून आला. १८८४ साली किर्लोस्कर कंपनीत श्री. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनी त्या वृत्तान्तानुसार पत्रव्यवहार करून भास्करबुवांना आपल्या नाटक कंपनीत ठेवून घेतले.

किर्लोस्कर नाटक मंडळीत पंधरा वर्षांच्या भास्करबुवांना बाळकोबा नाटेकर हे गायनगुरू मिळाले. अभिनय शिकवायला गोविंद बल्लाळ देवल होते. अभिनय व गायन या दोन्ही गोष्टींमध्ये भास्करबुवांनी प्रगती केली. ८ नोव्हेंबर १८८४ रोजी ‘रामराज्यवियोग’ या संगीतनाटकात कैकेयीच्या भूमिकेद्वारे भास्करने रंगभूमीवर प्रवेश केला. यासह ‘सौभद्र’ व ‘शाकुंतल’ याही नाटकांत त्यांनी मुख्य स्त्री-भूमिका केल्या. दरम्यान घरी त्यांच्या नाटक प्रवेशाची बातमी कळली. वडील भेटायला आले आणि सुशिक्षित मंडळींत मुलगा वावरतोय, बिघडणार नाही या विश्वासाने, समाधानाने परत गेले.

यानंतर काही काळातच त्यांचे वडील वारले, तसेच अण्णासाहेब किर्लोस्करही अचानक वारले. भास्करबुवा अगदी पोरके झाले. पण कंपनी १८८५ साली इंदूरला खेळ करण्यासाठी गेली असताना तिथे बीनकार उ. बंदेअलीखाँनी नाटकात बुवांचे गाणे ऐकून त्यांना गंडाबंध शिष्य करून घेतले. इंदूरचा नाटककंपनीचा मुक्काम संपेपर्यंत बुवांना बीनवादक बंदेअलींकडून तालीम मिळाली.

भास्करबुवांचा आवाज १८८६ मध्ये फुटला, त्यामुळे कंपनीतल्या स्त्री-भूमिका मिळणे अवघड होणार हे ओळखून त्यांनी आवाजाची मेहनत सुरू केली. पण एकदा कंपनीत अपमानास्पद वागणूक मिळाल्यावर ते बडोद्याला निघून गेले. तिथे त्यांना उ. फैज महंमदखाँसारखे गुरू मिळाले. त्यांना १८८६ ते १८९४ या आठ वर्षांच्या तालमीत ग्वाल्हेर घराण्यातील १५० ते २०० उत्तम ख्याल व ठुमऱ्यांचा लाभ झाला.

त्यांचे लग्न १८९२ साली झाले. भाऊराव कोल्हटकरांनी गणेशोत्सवात त्यांचे गाणे ऐकून त्यांना १८९५ मध्ये सर्व जुने अपमान विसरून पुन्हा किर्लोस्कर कंपनीत येण्याविषयी सुचविले आणि थोर मनाचे भास्करबुवा पुन्हा कंपनीत दाखल झाले. पुढे १८९६ ते १९०१ या काळात त्यांनी सुमारे पाच वर्षे आग्रा घराण्याच्या उ. नत्थनखाँची तालीमदेखील घेतली आणि त्यांच्या मृत्यूनंतर गुरुपत्नी-मुलांची पोषणाची जबाबदारीदेखील घेतली.

त्यांना १९०३ साली उ. अल्लादियाखाँचा घरी पाहुणचार करण्याची संधी मिळाली. खाँसाहेबांचा त्यांच्यावर विश्वास बसला, सूर जुळले आणि ते १९०३ ते १९२२ या काळात खाँसाहेबांची अवघड गायकी शिकले. बडोदा, मुंबई वगैरे ठिकाणी राहून, गुरूंचा सहवास मिळवून नंतर स्थैर्यासाठी भास्करबुवांनी १९०६ पासून धारवाडच्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये तीन वर्षे नोकरी केली. शेवटी ते पुण्यात स्थायिक झाले.

पुढे नटवर्य नानासाहेब जोगळेकरांच्या प्रेरणेने ‘किर्लोस्कर भारत गायन समाजा’ची स्थापना १९११ साली पुण्यात झाली. नानासाहेबांच्या मृत्यूनंतर नुसते ‘भारत गायन समाज’ हे नाव झाले. या ‘समाजा’साठी त्यांनी खूप कष्ट सोसले. पण आपल्यासारखे कष्ट गाणे शिकणाऱ्याला पडू नयेत म्हणून ते दक्ष राहिले. ते उत्तम प्रकारे तालीम देत. गणपतराव पुरोहित, गुंडोपंत वालावलकर, बापूराव केतकर, ताराबाई शिरोडकर, ठाकुरदास, पित्रे, पं. मास्तर कृष्णराव, नटश्रेष्ठ बालगंधर्व, गोविंदराव टेंबे, दिलीपचंद्र वेदी वगैरे त्यांचे प्रमुख शिष्य होत. बाई रहीमूबाई, नरहरबुवा पाटणकर, जगन्नाथबुवा पंढरपूरकर, दत्तोबा बागलकोटकर, पित्रे वकील हेही त्यांचेच शिष्य होत. त्यांचे गुरू उ. नत्थन खाँ यांचे पुत्र विलायत हुसेन खाँ यांनाही भास्करबुवांनी काही काळ शिकवले. सूरश्री केसरबाई केरकर यांनीही भास्करबुवांकडून वर्षभर तालीम घेतली होती.

पंजाब व सिंध प्रांतात त्यांची गाणी १९०४ पासून झाली. सर्व भारतभर त्यांचे नाव गाजू लागले. त्यांच्या गायकीत तीन गुरूंची शैली एकजीव झाली होती. रागवाचक स्वरवाक्ये मींडेने परस्परांना जोडून युक्तीने व मोहकपणे संपवत समेवर येणे, चिजा म्हणताना वेगवेगळ्या स्वररचनांच्या योजना करून ती चीज नटवणे, त्याच वेळी रागाचे शुद्ध स्वरूप व वातावरण कायम राखणे हे उ. फैज महंमद खाँच्या गायकीचे ढंग भास्करबुवांच्या गाण्यात होते. लयकारी, बोलबनाव, तानेची विविधता, अनपेक्षित असा तानेचा उठाव आणि तिची सुंदर गुंफण हा उ. नत्थन खाँच्या गाण्यातला विशेष भाग बुवांच्या गाण्यात होता. सौंदर्ययुक्त डौलदार गायकी व अप्रसिद्ध रागांचे सिद्धकंठाने प्रस्तुतीकरण हा उ. अल्लादिया खाँच्या गायकीतून घेतलेला वैशिष्ट्यपूर्ण गायकीचा ‘अंदाज’ त्यांच्या गाण्यात होता. ख्यालाबरोबर ठुमरी-दादरा, टप्पा, अष्टपदी, होरी, गझल, गरबा, लावणी असे अनेकविध गीतप्रकारही ते तन्मयतेने गात. ग्वाल्हेर, आग्रा व जयपूर या तीन घराण्यांच्या एकत्रीकरणाने त्यांची अनोखी गायकी घडली व या गायकीचा प्रभाव महाराष्ट्रावर पुढची शंभर वर्षे टिकला.

भास्करबुवांचे मराठी संगीतरंगभूमीलाही मोठे योगदान आहे. त्यांची कारकीर्द संगीतनट म्हणून सुरू झाली होती व पुढे एक गवई म्हणून सिद्ध झाल्यावर त्यांनी घडवलेले बालगंधर्व, मा. कृष्णराव, टेंबे, इ. अनेक शिष्यही संगीतरंगभूमीवर गाजले. त्यांच्या मार्फत भास्करबुवांची गायकी नाट्यपदांत आली. तसेच भास्करबुवांनी ‘संगीत स्वयंवर’ (१९१६, कृ.प्र. खाडिलकर), ‘संगीत द्रौपदी’ (१९२०, खाडिलकर), ‘संगीत विद्याहरण’ (१९१३, खाडिलकर; केवळ ‘देवयानी’ या पात्राच्या पदांच्या चाली) या नाटकांना जे संगीत दिले, ते संगीतरंगभूमीच्या इतिहासात ‘सोन्याचे पान’ ठरले.

त्यांनी संगीतबद्ध केलेली ही पदे अत्यंत गाजली व आजही विलक्षण लोकप्रिय आहेत : ‘नाथ हा माझा’, ‘स्वकुलतारकासुता’, ‘सुजन कसा’, ‘नरवर कृष्णासमान’, ‘एकला नयनाला’, ‘मम आत्मा गमला’, ‘मधुकर वन वन’, ‘थाट समरीचा’, इ. पदांद्वारे

ब

भास्करबुवांनी कित्येक राग, बंदिशी सर्वसामान्य वर्गात रुजवल्या. अशा या ‘देवगंधर्व’ भास्करबुवा बखले यांचे रक्तक्षयाच्या आजाराने पुण्यात निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**


*१. केळकर, नी.म.; ‘भास्करबुवा बखले’, १९६७.*

*२. देवधर, बी.आर.; ‘थोर संगीतकार’; प्रथमावृत्ती पॉप्युलर प्रकाशन १९९८.*

*३. दातार, शैला; ‘देवगंधर्व’.*


## बडे गुलाम अली खाँ

***गायक***

**२ एप्रिल १९०२ – २३ एप्रिल १९६८**



बडे गुलाम अली खाँ यांचा जन्म पंजाबातील कसूर या गावी झाला. त्यांचे वडील अलिबक्ष व चुलते काले खाँ हे दोघेही पतियाळा घराण्याचे गायक होते. गुलाम अली हे अलिबक्ष यांचे थोरले पुत्र होत. अलिबक्ष व काले खाँची तालीम बन्ने खाँ व नंतर कालुमियाँकडे झाली होती. गुलाम अलींना त्यांनी वयाच्या सातव्या वर्षापासूनच सारंगीवादनाचे आणि गायनाचे शिक्षण देण्यास सुरुवात केली. पुढे वडिलांकडूनही त्यांना तालीम मिळाली.

सुरुवातीच्या काळात बडे गुलाम अली खाँ सावत्र आईच्या सांगण्यावरून उदरनिर्वाहाकरिता सारंगी वाजवत. मुंबईत आल्यानंतरही ते सारंगी वाजवीत होते. मात्र गायन त्यांना अधिक प्रिय होते. ते गाण्याची मेहनत सातत्याने करत. पुढे त्यांचे गायनातच नाव झाले. मुंबईच्या वास्तव्यात त्यांची सिंदे खाँ यांच्याशी भेट झाली. खाँसाहेबांनी त्यांची तालीम घेतली. नंतर ते वडिलांकडे म्हणजे अलिबक्षांकडे, लाहोरला गेले.

खाँसाहेबांची गाणी पंजाबकडे विशेष होत असत. कलकत्त्यातील संगीत परिषदांतून ते प्रथम प्रसिद्धीस आले. त्यांचे १९४४ साली मुंबईतील विक्रम संगीत परिषदेत प्रथम गायन झाले व तेव्हापासूनच ते महाराष्ट्राला परिचित झाले. त्यानंतर मुंबईत, मुंबई आकाशवाणी केंद्रावरून, तसेच महाराष्ट्रात विविध ठिकाणी त्यांची गाणी झाली व त्यांचे महाराष्ट्रात नाव झाले.

धिप्पाड देहयष्टी असलेले खाँसाहेबांचे व्यक्तिमत्त्व भारदस्त असले तरी त्यांचा आवाज अतिशय मुलायम, मधुर व बुलंद होता. तिन्ही सप्तकांत लीलया संचार करणारा लवचीक व सुरेल आवाज, दाणेदार सरगमचा वैचित्र्यपूर्ण वापर व चमत्कृतिपूर्ण मांडणी ही त्यांच्या गायकीची प्रमुख वैशिष्ट्ये होती. याशिवाय भावपूर्णता व शब्दांचे अर्थवाही उच्चार हेदेखील त्यांच्या गायन-शैलीतील महत्त्वाचे वैशिष्ट्य होते.

लोकरंजन हाच प्रमुख हेतू बाळगल्याने किंवा सर्वसामान्य रसिकांना गाणे भावायला हवे ही इच्छा असल्यामुळे त्यांचे मैफलीतील चमत्कृतींनी भरलेले गाणे संगीतातील अनेक जाणकारांना विस्कळीतही वाटे व त्यावर टीकाही झाली; पण गुणिजनांच्या बैठकीत ते सकस व शिस्तबद्ध गायकीही तेवढ्याच ताकदीने मांडत अशी नोंद आहे. आम मैफलीत त्यांचा प्रामुख्याने जरी प्रचलित रागांवरच भर असला, तरी खास मैफलीत अप्रचलित रागही ते खुबीने पेश करीत. सृष्टिसौंदर्याचे त्यांना विलक्षण आकर्षण होते व त्याचा प्रभाव आपल्या गायनातून अतिशय संवेदनशीलतेने आविष्कृत करण्याचा त्यांचा प्रयत्न असे.

रागदारी गायनापेक्षा, किंबहुना अधिकच खाँसाहेबांच्या ठुमरी गायनाचा प्रभाव महाराष्ट्रातील गानरसिकांवर विशेष पडला. महाराष्ट्रात प्रचलित असणाऱ्या ठुमरीपेक्षा ते निराळा रंग असणारी पंजाबी अंगाची ठुमरी गात. प्रादेशिक विशेषांचा प्रभाव, खटक्या-मुरक्यांचा सढळ वापर, टप्पा अंगातील गुंतागुंत व आवाहक शब्दोच्चार यांमुळे त्यांच्या ठुमऱ्यांना सर्वसामान्य श्रोत्यांकडूनही भरघोस प्रतिसाद लाभला. ‘का करूं सजनी आए ना बालम’, ‘याद पिया की आए’ इत्यादी त्यांनी गायलेल्या ठुमऱ्या विलक्षण लोकप्रिय झाल्या. काश्मीर व

सिंध प्रांतांतील अनेकविध लोकगीते त्यांच्या संग्रहात होती, तसेच अरबी, इराणी संगीताशी त्यांचा परिचय होता.

फाळणीनंतर गुलाम अली खाँसाहेब पाकिस्तानचे रहिवासी झाले. मात्र भारतात त्यांच्या गायनाची कदर करणारा चहातावर्ग फार मोठा असल्यामुळे भारताचे नागरिकत्व मिळावे अशी त्यांची तीव्र इच्छा होती. त्यांना १९५७-५८ साली भारताचे नागरिकत्व मिळाले.

'मुगल-ए-आझम' या चित्रपटाकरिता १९६० मध्ये नौशाद यांच्या संगीत दिग्दर्शनाखाली तानसेनच्या भूमिकेसाठी त्यांनी पार्श्वगायन केले. रागेश्री आणि सोहनी या रागांतील त्यांचे गायन अतिशय परिणामकारक व स्मरणात राहणारे आहे. 'सबरंग' या नावाने त्यांनी निरनिराळ्या रागांमध्ये बंदिशी, तसेच काही ठुमऱ्याही रचल्या आहेत. एच.एम.व्ही. कंपनीने त्यांच्या रागदारी संगीताच्या, तसेच ठुमऱ्यांच्याही ध्वनिमुद्रिका काढल्या. या ध्वनिमुद्रिकांवरून त्यांच्या गायनात कसे विविध रंग होते हे लक्षात येते.

खाँसाहेबांना १९६१ साली अर्धांगवायूचा झटका आला. ते १९६२ साली थोडे बरे होऊन पुनश्च गाऊ लागले. महाराष्ट्र सरकारने त्यांना पाच हजारांचे अनुदान दिले, तसेच संगीत नाटक अकादमीने देशातील महान गवई म्हणून त्यांचा सन्मान केला. भारत सरकारने 'पद्मभूषण' हा किताब देऊन त्यांचा गौरव केला. आजारपणात कलकत्ता व मुंबई येथील त्यांच्या चाहत्यांकडून त्यांना बरीच मदत मिळाली. शरीर अधू असतानाही त्यांची गायनाची मेहनत चालू असे व अशा परिस्थितीतदेखील ते काही संगीत परिषदांतून गायले होते.

नवाब जहिरयारजंग अमीर-इ-पारगा या हैदराबादच्या त्यांच्या निस्सीम भक्ताने खाँसाहेबांना हैदराबादला नेऊन त्यांच्यावर निष्णात डॉक्टरांतर्फे इलाज केले; शेवटी हैदराबादलाच त्यांचे निधन झाले. महाराष्ट्र हीच त्यांची कर्मभूमी होती असे ते अभिमानाने सांगत. त्यांचे पुत्र मुनव्वर अली खाँना गुलाम अलींची तालीम मिळाली; पण १९८९ साली मुनव्वर अलींचे आकस्मिक निधन झाले.

— मधुवंती पेठे, माधव इमारते

ब

## बडोदेकर, हिराबाई
**गायिका**
**२९ मे १९०५ – २० नोव्हेंबर १९८९**



किराणा घराण्याच्या पहिल्या ख्यातनाम स्त्री-गायिका हिराबाई बडोदेकर या अब्दुल करीम खाँ आणि ताराबाई माने यांच्या कन्या होत. त्यांचा जन्म मिरजेत झाला. हिराबाईंची जन्मकथा विलक्षण आहे. जन्मत:च मृत बालक समजून सुइणीने त्यांस फडक्यात बांधून बाजूला ठेवून दिले. त्यानंतर डॉक्टरांनी येऊन पाहिले असता, त्यांत थोडी धुगधुगी दिसली. तत्पर उपाय योजून डॉक्टरांनी त्यांना जगवले.

सुरेशबाबू, हिराबाई, कृष्णराव, कमलाबाई आणि सरस्वतीबाई अशी ही पाच भावंडे होत. सगळी संगीताचा वारसा घेऊनच जन्मली. ताराबाई माने यांची आई हिराबाई माने. या बडोदे सरकारच्या सेवेत होत्या. हिराबाईंनी त्यांचेच नाव लावले. हिराबाईंचे आप्तइष्टमित्र त्यांना 'चंपूताई' म्हणत. ताराबाईही संगीतात तयार होत्या. ताराबाई १९२२ साली अब्दुल करीम खाँपासून वेगळ्या झाल्या. ताराबाईंनी सर्वांची नावे बदलली. सुरेशबाबू, कृष्णराव व सरस्वतीबाईंना माने, तर हिराबाई, कमलाबाई यांना बडोदेकर असे आडनाव दिले.

हिराबाईंनाही लहानपणापासून गाण्याचे वेड होते; पण ताराबाईंना आपल्या मुलींनी शिकून समाजात प्रतिष्ठितपणे जगावे असे वाटे. त्या वेळी घरंदाज मुलींना गाणे शिकवण्याची प्रथाही नव्हती. पुण्याच्या हुजुरपागा शाळेत हिराबाई सातवीपर्यंत शिकल्या. ताराबाईंनी १९१८ साली आपल्या पाचही मुलांना घेऊन मुंबईला बिऱ्हाड केले. एका ज्योतिषाने 'ही मुलगी गाण्यात नाव कमवेल' असे सांगितल्यावर ताराबाई हिराबाईंना गाणे शिकवण्यास तयार झाल्या.

त्यांचे सुरुवातीचे शिक्षण ताराबाई व सुरेशबाबूंकडे झाले, तसेच काही महिने आग्रा घराण्याचे उस्ताद मुहंमद खाँ यांच्याकडेही झाले. पण त्यांना खरी तालीम मिळाली ती किराणा घराण्याच्या अब्दुल वहीद खाँची (१९१८ - १९२२ अशी चार वर्षे).

हिराबाई वयाच्या तेराव्या वर्षापासून सुरेशबाबूंबरोबर खाजगी बैठकीत गात होत्या. हिराबाईंचे पहिले जाहीर गाणे वयाच्या सोळाव्या वर्षी १९२१ साली मुंबईतील गांधर्व महाविद्यालयाच्या संगीत परिषदेत झाले. त्यात त्यांनी पटदीप राग इतका चांगला गायला, की राग पटदीप म्हणजे हिराबाई असे समीकरण झाले. ताराबाईंनी १९२१ साली अर्थार्जनाकरिता म्हणून ‘नूतन संगीत विद्यालय’ सुरू केले होते. त्यातही हिराबाई शिकवत होत्या.

हिराबाई १९२२ पासून संगीताच्या व्यवसायात उतरल्या व त्यांनी जाहीर कार्यक्रम करण्यास सुरुवात केली. थोड्या कालावधीतच त्यांचे नाव होऊ लागले. त्यांची पहिली ध्वनिमुद्रिका १९२३ मध्ये निघाली. त्यांनी १९२४ मध्ये तिकिटे लावून आपल्या गायनाचा जाहीर जलसा लावला. एका स्त्रीने स्वत:चा जलसा तिकीट लावून करणे हा त्या काळातील पहिलाच धाडसी व क्रांतिकारकच प्रयोग होता.

त्यांनी १९२८ सालापासून आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरून गायन प्रसारित करण्यास सुरुवात केली. जवळजवळ चाळीस केंद्रांवरून त्यांचे गाणे होई. आकाशवाणी आणि ध्वनिमुद्रिका यांतून त्यांचे गाणे महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत पोहोचले. ‘उपवनी गात कोकिळा’, ‘राधेकृष्ण बोल’, ‘ब्रिजलाला गडे’ अशी कितीतरी गाणी जनमानसात लोकप्रिय झाली. महाराष्ट्राच्या बाहेर १९३७ नंतर त्यांची कीर्ती पसरली. कलकत्त्याच्या अखिल भारतीय संगीत परिषदेत त्यांना गाण्याचे आमंत्रण मिळाले. जालंधरच्या १९४१ सालच्या हरवल्लभ मेळ्यात गाणाऱ्या त्या पहिल्या स्त्री- कलाकार होत्या.

ताराबाईंनी ‘नूतन संगीत विद्यालया’ची नाट्यशाखा म्हणून नवी नाटक मंडळी सुरू केली. या नाट्यशाखेच्या ‘सौभद्र’ या नाटकातून सुभद्रेच्या भूमिकेत ५ सप्टेंबर १९२९ रोजी मुंबईतील बॉम्बे थिएटरात झालेल्या प्रयोगातून त्यांचे रंगभूमीवर पदार्पण झाले. त्यानंतर हिराबाईंनी ‘संशयकल्लोळ’, ‘सौभद्र’, ‘पुण्यप्रभाव’, ‘विद्याहरण’ इत्यादी जुन्या नाटकांतून, तसेच ‘साध्वी मीराबाई’ (स.अ. शुक्ल), ‘युगांतर’ (ना.सी. फडके), ‘जागती ज्योत’ (मामा वरेरकर), ‘स्त्री-पुरुष’ (कमतनूरकर) इत्यादी नव्या नाटकांतूनही भूमिका केल्या. हिराबाईंचे अतिशय गोड गायन व संयत अभिनय असला तरी हा नाटकधंदा फारसा जोर धरू शकला नाही. त्यामुळे कर्ज मात्र भरपूर झाले.

ही नाट्यशाखा १९३३ मध्ये बंद करावी लागली. पण हिराबाईंचे मनोधैर्य भक्कम होते. त्यांच्या भागीदारांनी लबाडी केली होती. हिराबाईंच्या नाचक्कीकरिता नादारी घ्यावी असाही त्यांनी अर्ज केला. परंतु नादारी घ्यायला स्पष्ट नकार देऊन, ‘‘कर्ज कसे फेडणार?’’ या न्यायाधीशांच्या प्रश्नावर ‘‘नाटक कंपनी बंद झाली असली तरी माझ्या गळ्यातलं गाणं गेलेलं नाही,’’ असे त्यांनी सडेतोड उत्तर दिले. त्यांनी हिमतीने गावोगावी जलसे करून दोन-चार वर्षांत कर्ज फेडले.

त्यानंतर रंगभूमीवर जायचे नाही असा हिराबाईंनी निश्चय केला असला तरी २२ एप्रिल १९४४ रोजी मराठी रंगभूमीच्या शताब्दी महोत्सवानिमित्त झालेल्या साहित्य संघाच्या ‘सौभद्र’ या नाटकात बालगंधर्वांबरोबर (अर्जुन) हिराबाईंनी सुभद्रेची भूमिका केली. पुढे हिराबाईंचे बंधू कृष्णराव यांनी ‘सौभद्र’, ‘विद्याहरण’, ‘एकच प्याला’ वगैरे नाटके कंत्राटदारी पद्धतीवर नटसंच उभारून दौरे काढले, त्यात हिराबाई भूमिका करत होत्या. त्या रंगभूमीवर १९६५ पर्यंत अधूनमधून भूमिका करत होत्या.

त्यांनी १९३४ ते १९३८ या काळात चित्रपटांतूनही भूमिका केल्या. मो.ग. रांगणेकर यांच्या ‘सुवर्णमंदिर’, बाबूराव पेंटरांच्या ‘प्रतिभा’ व नंतर ‘रवीन्द्र चित्र’च्या ‘संत जनाबाई’मध्ये त्यांनी भूमिका केल्या. या चित्रपटांतून थोडाफार आर्थिक फायदाही झाला, तरी

फारसे यश मात्र पदरात पडले नाही.

त्यांनी १९४९ साली गाण्यासाठी आफ्रिकेचा दौरा केला. तसेच भारतीय शिष्टमंडळाबरोबर १९५३ साली त्यांनी चीनचा दौराही केला.

त्यांचा १९२४ साली सोलापूरमधील माणिकचंद गांधी या खानदानी श्रीमंत गृहस्थाशी रीतसर विवाह झाला. हिराबाईंना त्यांनी सन्मानाने वागविले. त्यांना गुरुनाथ नावाचा एक पुत्रही झाला. पुढे हिराबाईंनी नाटकात काम करायला सुरुवात केल्यावर त्यांच्यात काहीसा दुरावा निर्माण झाला. पुढे नाट्यशाखा बंद झाल्यावर त्यांचे संबंध पुन्हा पूर्ववत झाले. हिराबाईंनी माणिकचंदांचा आर्थिक धक्क्याने डळमळलेला संसार सावरला, तसेच त्यांची दृष्टी अधू झाल्यावरही त्यांची मनोभावे सेवा केली. १९७९ साली माणिकचंदांचे निधन झाले.

हिराबाई रागसंगीताबरोबरच नाट्यपदे, ठुमरी, भावपदे, भजन-अभंग आवर्जून गात. त्यांच्या एकंदर १७५ ध्वनिमुद्रिका निघाल्याची नोंद आहे. ‘हिज मास्टर्स व्हॉइस’ कंपनीने १९२३ साली हिराबाईंच्या गाण्याची पहिली ध्वनिमुद्रिका काढली होती. यात ‘जया अंतरी भगवंत’ हे भजन व दुर्गा रागातील ‘सखी मोरी समझुम’ ही चीज त्यांनी गायली होती. पुढे १९३५ ते १९४० पर्यंत ओडियन व कोलंबिया रेकॉर्ड कंपन्यांनीही त्यांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या.

त्यांच्या नाट्यगीतांवर बालगंधर्वांचा प्रभाव होता. त्यांच्या नाट्यपदे, भावपदे व ठुमरीच्या ध्वनिमुद्रिका लोकप्रिय झाल्या. याबरोबरच पटदीप, वृंदावनी सारंग, यमन इत्यादी रागदारी गायनाच्या ध्वनिमुद्रिकाही निघाल्या. हिराबाई आपल्या धाकट्या भगिनी सरस्वती राणे यांच्याबरोबर जुगलबंदी करीत. स्त्री-जुगलबंदी गायनाची सुरुवात हिराबाईंनी केली व या जुगलबंदीची ध्वनिमुद्रिकादेखील निघाली होती.

हिराबाईंच्या गायनातील वैशिष्ट्य म्हणजे तारषड्जाचा हमखास प्रभावी लगाव. हिराबाईंचे गाणे सहज, भावपूर्ण होते. सोज्ज्वळता व शालीनता हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील गुण त्यांच्या सादरीकरणातूनही प्रतीत होत होता. शांत व संयत भाव हे त्यांच्या अभिव्यक्तीचे वैशिष्ट्य होते.

हिराबाईंना अनेक सन्मान मिळाले. वयाच्या एकविसाव्या वर्षीच किर्लोस्कर थिएटरमध्ये झालेल्या जलशात सर चुनीलाल मेहता यांनी त्यांना ‘गानहिरा’ ही पदवी दिली. मुंबई आकाशवाणीने त्यांना १५ ऑगस्ट १९४७ या पहिल्या स्वातंत्र्यदिनी राष्ट्रगीत गायला आमंत्रित केले. त्यांना संगीत नाटक अकादमीचा १९६५ मध्ये पुरस्कार, मराठी नाट्यपरिषदेचे १९६६ मध्ये ‘बालगंधर्व’ सुवर्णपदक मिळाले व याच वर्षी महाराष्ट्र शासनानेही त्यांचा गौरव केला. त्यांना १९७० मध्ये भारत सरकारने ‘पद्मभूषण’ देऊन गौरविले. त्या १९७४ मध्ये ‘विष्णुदास भावे’ सुवर्णपदकाच्या मानकरी ठरल्या. कलकत्त्याच्या आयटीसी संगीत रिसर्च अकादमीने त्यांचा सन्मान केला. हिराबाई यांचा शिष्यपरिवार मोठा आहे. हिराबाईंनी बहीण सरस्वती राणे यांनाही तयार केले होते. त्यांच्या शिष्यवर्गातील प्रभा अत्रे, मालती पांडे, जानकी अय्यर, सीता कागल या प्रमुख शिष्या होत.

हिराबाई या कुटुंबवत्सल होत्या. देव व ज्योतिषशास्त्रावरही त्यांचा गाढा विश्वास होता. वयाच्या साठीनंतर आपले गाणे पहिल्यासारखे होत नाही असे जाणवल्यावर त्यांनी जाहीर मैफली थांबवल्या. स्त्री-गायिकांना त्यांनी समाजात प्रतिष्ठा मिळवून दिली. स्त्रियांनी बैठकीत कसे गावे याचा आदर्शच त्यांनी समाजापुढे ठेवला. अशा या असामान्य गायिकेचे वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षी पुण्यात निधन झाले.

— माधव इमारते

## बर्वे, मनहर गणपत

**गायक, वादक**

**२० डिसेंबर १९१० – २६ मे १९७२**

पंडित मनहर गणपत बरवे यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांच्या आईचे नाव आनंदीबाई होते. संगीतशास्त्री गणपतराव बरवे राजकोट विद्यापीठात संगीत विषयाचे

ब



प्राध्यापक होते. वडिलांनी शरीरसौष्ठवाच्या बाळगुटी-बरोबरच संगीताचे बाळकडू आपल्या नर्मदा व मनहर या दोन्ही मुलांना पाजायला सुरुवात केली. मनहर दोन वर्षांचे असतानाच अचानक आनंदीबाईंचे निधन झाले. पण गणपतरावांनीच आई-वडील या दोन्ही भूमिका यशस्वीरित्या बजावत त्यांना सुसंस्कारित केले. दोघांनाही पुस्तकी शिक्षणाबरोबर संगीत व वादनकलेचे शास्त्रोक्त शिक्षण दिले. मनहर तीन वर्षांचे असताना, त्यांस पाश्चात्त्य व पौर्वात्य अशा दोन्ही कलांचे शिक्षण मिळाले. त्यांचे शालेय शिक्षण मात्र चौथीपर्यंतच झाले.

छोट्या मनहरची आकलनशक्ती व वडिलांचे प्रयत्न या सगळ्यांचे फलित म्हणजे छोट्या मनहरला सातव्या वर्षी श्रीमती सरोजिनी नायडू यांच्या हस्ते 'बालस्वरभास्कर' (१९१८) ही पदवी सुवर्णपदकासह देण्यात आली. आठव्या वर्षी (१९१९) 'संगीत सरस्वती' व 'संगीत पारिजात', नवव्या वर्षी (१९२०) 'बाल गायनाचार्य', 'बाल-संगीत भानू', 'स्वर कार्तिकेय', 'बाल-विद्याधर' या चारही पदव्या मिळाल्या, तर 'संगीत सम्राट' ही पदवी त्यांना वयाच्या अवघ्या दहाव्या वर्षी (१९२१) मिळाली.

छोटे मनहर उत्कृष्ट गायक तर होतेच; पण कसलेले वादकही होते. ते एकूण ३४ वाद्ये वाजवीत असत. त्यांत १२ प्रकारची तंतुवाद्ये, ११ प्रकारची घनवाद्ये, १० प्रकारची सुषिरवाद्ये होती. ते तबलाही वाजवीत. प्रत्येक वाद्य तितक्याच तन्मयतेने, कौशल्याने वाजवीत. भारतातील सर्वांत जुनी व सर्वांत नवी तंतुवाद्ये ते अगदी लीलया वाजवीत असत. एकाच मंचावर अनेक वाद्ये वाजवीत असतानाच ते गातही असत. त्यामुळे गायन-वादनाचा एक अनोखा संगम पाहताना व ऐकताना रसिकांचे नेत्र व कान, दोन्हीही तृप्त होत. म्हणूनच नागपूरच्या तत्त्वज्ञान परिषदेने श्रीमान जगद्‌गुरू शंकराचार्य महाराज डॉ. कूर्तकोटी, यांनी मनहर यांना 'गीतवाद्य-सुधाकर' ही पदवी १९२४ साली बहाल केली. वयाच्या सातव्या वर्षापासून सतराव्या वर्षापर्यंत त्यांना एकूण नऊ पदव्या व १६९ सोन्याची पदके मिळाली. त्यांनी पूर्ण भारतभर आपल्या पिताश्रींसमवेत दौरे केले. अनेक संस्थानिक, राजे-महाराजे यांच्या दरबारी त्यांचे जलसे होत. प्रत्येक दौऱ्याच्या शेवटच्या जलशाचे उत्पन्न ते धर्मादाय दान करीत असत. म्हैसूरच्या राजदरबारात त्यांचा १३ फेब्रुवारी १९२७ रोजी कार्यक्रम झाला. तेथे असलेला काष्ठतरंग त्यांनी इतका अप्रतिम वाजविला, की राजाने खूष होऊन त्यांना तो भेट म्हणून देऊ केला.

सिलोन, सिंगापूर, नेपाळ, ब्रह्मदेश इ. ठिकाणीही त्यांनी दौरे केले. ग्वाल्हेरच्या महाराजांनी त्यांना त्यांच्या कलेचा सन्मान म्हणून २१०० रु. मानधन दिले. दौऱ्यावर असताना ज्या प्रांतात ते असतील, त्या प्रांतातील उत्तमोत्तम कलाभिज्ञ लोकांना बोलावून आवडत्या चिजांचे नोटेशन करून ते पद बसवीत असत.

अनेक वर्षे गायन-वादनाचे जलसे करीत भ्रमण केल्यानंतर मुंबई ही त्यांची जन्मभूमी, तिथेच स्थायिक व्हावे या विचाराने १९३९ साली दादरला, खोदादाद सर्कल येथील 'एम्प्रेस महल'मध्ये त्यांनी खोली घेतली. तेथे 'मनहर संगीत विद्यालया'ची स्थापना केली. या विद्यालयामध्ये मनहर बरव्यांच्या तालमीत संगीतकार रोशन, मा. अनंत दामले, राम मराठे व प्रसाद सावकार असे अनेक गायक व वादक तयार झाले. श्रीमती जयमाला शिलेदार मुंबईत आल्या की काही गाण्यांसाठी त्यांचे मार्गदर्शन घेत असत. अनिल मोहिलेही काही वर्षे गायन व व्हायोलिन शिकण्यासाठी बरव्यांकडे येत होते.

शिष्यांना प्रोत्साहन देण्यासाठी दर शनिवारी मोठमोठ्या गायक व वादक कलाकारांना मनहर बरवे बोलावीत असत. संगीत शिक्षक संघाचे काम त्यांनी प्रदीर्घ काळ पाहिले.

एचएमव्हीने १९३० मध्ये त्यांच्या वाद्यवादनाच्या अनेक ध्वनिफिती काढल्या. पं. मनहरजींनी गुजराती,

ब

मराठी, हिंदी, बंगाली, सिंहली, उर्दू, कानडी, तेलुगू, तामीळ, मल्याळी, इंग्रजी, बरमीज इ. भाषांमध्ये गाणी गायली. महात्मा गांधींसमोर आपली कला सादर करून त्यांनी शाबासकीही मिळविली. गांधी हत्येनंतर उपोषणाला बसलेल्या साने गुरुजींनी मनहरजींची दोन पदे ऐकून आपले उपोषण सोडले होते.

अनेक भाषीय वृत्तपत्रांमधून त्यांची केलेली भरभरून स्तुती वाचल्यानंतर पं. मनहर बरवे हे किती थोर व्यक्तिमत्त्व होते याचा अंदाज येतो. साधेपणा, आदरपूर्वक वागणूक, संगीतशास्त्रातील असामान्य प्रभुत्व, संभाषण करण्याची हातोटी असे सर्वार्थानेच एक थोर व्यक्तिमत्त्व असणाऱ्या पं. मनहर बरवे यांचे मुंबईत निधन झाले.

— मृदुला दामले

## बर्वे, मालती पद्माकर

☛ पांडे, मालती

## बऱ्हाणपूरकर, गोविंद

**मृदंगवादक**

**१८७७ – २० जून १९५७**



गोविंदराव बऱ्हाणपूरकरांचा जन्म बऱ्हाणपूर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव राधाबाई होते. वयाच्या पाचव्या वर्षीच त्यांना संगीताचे आकर्षण असल्याचे दिसून आले. वडिलांना संगीताची आवड असल्यामुळे गोविंदरावांना संगीताचे शिक्षण घेण्यासाठी प्रोत्साहन मिळाले. त्यांना मृदंगवादनाचा पहिला धडा वडिलांनीच दिला.

घरची आर्थिक परिस्थिती साधारणच असल्यामुळे बऱ्हाणपूरकरांचे शालेय शिक्षण मराठी फायनलपर्यंतच झाले. परंतु, बऱ्हाणपूर राज्याचे सरदार श्रीमंत बाबासाहेब भुस्कुटे यांच्या प्रयत्नाने आणि प्रोत्साहनामुळे बऱ्हाणपूरकर यांना प्राथमिक शाळेत शिक्षकाची नोकरी मिळाली. त्यामुळे वयाच्या विसाव्या वर्षापासून कुटुंबाच्या चरितार्थासाठी आणि वडिलांना आर्थिक साहाय्य करण्यासाठी दिवसा ते शिक्षकाची नोकरी व रात्री मृदंगवादनाचा अभ्यास करत.

मृदंगवादनात वडिलांकडून प्राथमिक शिक्षण लाभल्याकारणाने त्यांना त्या कलेचे आकर्षण अधिक वाटू लागले. त्या काळात बऱ्हाणपूर हे संगीताचे केंद्रस्थान होते, त्यामुळे तेथे प्रसिद्ध गायक-वादक आपली कला प्रदर्शित करण्यास नेहमी येत असत. बऱ्हाणपूरकरांना त्या सर्वांचे गायन-वादन ऐकण्याची संधी मिळत असे.

वयाच्या विसाव्या वर्षी म्हणजे १८९७ मध्ये त्या काळातले प्रसिद्ध तबलावादक नथ्थूबुवा पाडसेकर यांच्या मार्गदर्शनाखाली बऱ्हाणपूरकरांचे तबल्याचे प्राथमिक शिक्षण सुरू झाले. परंतु त्यांच्या सुदैवाने त्या वेळेस प्रसिद्ध मृदंगाचार्य पं. नानासाहेब पानसे यांचे पट्टशिष्य पं. सखारामबुवा पंत आगळे यांच्याशी गोविंदरावांचा परिचय झाला. मृदंग शिकण्याचा त्यांचा उत्साह सखारामबुवांच्या लक्षात आला. त्यांनी गोविंदरावांना मृदंगवादनाची नियमित तालीम देण्यास सुरुवात केली. कालांतराने त्यांनी निसार हुसेन खाँ व हरिहरबुवा कोपरगावकर यांच्याकडे धृपद-धमार गायकीची तालीम घेतली. परंतु त्यांनी मृदंगवादनाकडे विशेष लक्ष दिले. अखंड पंधरा वर्षे मृदंगाची साधना व तपश्चर्या करून त्यांनी त्यात विशेष सौंदर्यात्मक कौशल्य आत्मसात केले व निष्णात मृदंगवादक म्हणून प्रसिद्धी मिळविली.

बऱ्हाणपूरकरांचे वादन अतिशय नियमबद्ध होते. स्पष्ट बोल, लयदार आणि मधुर वादन ही त्यांची वैशिष्ट्ये होती. त्यांनी १९२० च्या काळात हैदराबादचे प्रसिद्ध तबलावादक पं. वामनरावजी चांदवडकर यांच्याकडे तबलावादनाचे शिक्षण घेतले. १९२१ मध्ये अहमदाबाद येथे अखिल भारतीय काँग्रेस अधिवेशनानंतर संगीत परिषदेत ग्वाल्हेर घराण्याचे ख्यातनाम गायक पं. विष्णू दिगंबर पलुस्कर यांच्या गायनास त्यांनी साथ केली होती. त्यांच्या वादनकौशल्यावर मुग्ध होऊन सरदार

ब

वल्लभभाई पटेल यांनी बऱ्हाणपूरकरांना ‘मृदंगाचार्य’ ही उपाधी देऊन त्यांचा गुणगौरव केला.

पं. विष्णू दिगंबर पलुस्करही त्यांच्या वादनावर खूष झाले होते. परिणामी, ते आपल्या अखिल भारतातील आणि श्रीलंका, ब्रह्मदेश वगैरेंच्या दौऱ्यांवर गोविंदरावांना साथीला घेऊन जात असत. पुढे पलुस्करांनी मुंबईत गांधर्व महाविद्यालयाची स्थापना केल्यावर बऱ्हाणपूरकरांची अध्यापक म्हणून नेमणूक केली होती. त्यांनी मृदंग व तबलावादन यांची माहिती देणारी ‘मृदंग-तबलावादन सुबोध भाग १ ते ३’ आणि ‘भारतीय तालमंजरी’ अशी चार पुस्तके लिहिली. पं. बऱ्हाणपूरकरांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले होते. २७ मार्च १९५५ रोजी दिल्ली येथे राष्ट्रपती डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्ते त्यांना ‘संगीत नाटक अकादमी’चा पुरस्कार देण्यात आला. सुप्रसिद्ध नृत्यकार उदयशंकर यांच्या ‘कल्पना’ या चित्रपटात त्यांनी मृदंग वाजविला होता. गोविंदरावांचे वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी बऱ्हाणपूर येथे निधन झाले.

— प्रा. यशवंत महाले

## बाबा सिंदे खाँ

☛ सिंदे खाँ

## बालगंधर्व

***राजहंस, नारायण श्रीपाद***

**संगीतनट व गायक**

**२६ जून १८८८ – १५ जुलै १९६७**



संगीत रंगभूमीवर सतत ५० वर्षे नानाविध स्त्री- भूमिका करीत असताना आपल्या मधाळ गायकीने आणि स्त्री-सुलभ मोहक अभिनयाने रसिकांना मंत्रमुग्ध करणारा कलाकार म्हणजे नारायण श्रीपाद राजहंस ऊर्फ बालगंधर्व. सातारा जिल्ह्यातील तासगाव तालुक्यातले नागठाणे हे राजहंस घराण्याचे मूळ गाव. राजहंसांचे मूळ आडनाव कुलकर्णी. नारायणाच्या जन्मापूर्वीच कुलकर्ण्यांचे ‘राजहंस’ झाले होते. श्रीपादराव आणि अन्नपूर्णाबाई या दाम्पत्याच्या पोटी, संध्याकाळी ६ वाजून २ मिनिटांनी नारायणरावांचा जन्म झाला. त्यांचे वडील उत्तम सतारिये होते. सकाळच्या वेळी वडील, आई, तसेच हरिआत्या हे मंजूळ आवाजात भूपाळ्या गात असत. नारायणरावांवर गाण्याचे प्रथम संस्कार हे असे झाले. त्यांचे मामा वासुदेवराव पुणतांबेकर हे नाट्यकला प्रवर्तक मंडळीच्या संस्थापकांपैकी एक होते. अशा तऱ्हेने नाटकाचा वारसा त्यांना मातुलगृहाकडून मिळाला.

वडिलांची नोकरी फिरतीची असल्याने छोट्या नारायणाला शिक्षणासाठी आत्येबहिणीचे यजमान आबासाहेब म्हाळस यांच्याकडे जळगाव येथे ठेवण्यात आले. तिथे नारायणास संगीत नाटके पाहण्याची संधी मिळाली. शिक्षणापेक्षा त्याचा गायनाकडे जास्त ओढा आहे हे लक्षात येताच मेहबूब खाँ यांच्याकडे तालीम घेण्यास सुरुवात झाली. स्पष्ट शब्दोच्चार आणि सुरेल गायनाचे संस्कार तेथेच झाले. वयाच्या दहाव्या वर्षी चुलत चुलते यशवंतराव कुलकर्णी यांच्याकडे, पुण्यात आल्यानंतर लोकमान्य टिळक यांच्यासमोर त्यांना गायन सादर करण्याची संधी मिळाली. त्याच वेळी डिसेंबर १८९८ मध्ये नारायण राजहंसांना ‘बालगंधर्व’ ही पदवी टिळकांनी दिली. शाहू महाराजांच्या आशीर्वादाने १९०५ मध्ये त्यांचा किर्लोस्कर नाटक मंडळीत प्रवेश झाला.

शारदा नाटकातल्या नटीच्या भूमिकेत त्यांची प्रथम रंगीत तालीम घेण्यात आली. ती यशस्वी झाल्यानंतर किर्लोस्कर नाटक मंडळीत नारायणरावांची सर्व नायिकांच्या भूमिकांसाठी निवड झाली.

अभिनयाच्या मार्गदर्शनासाठी गोविंद बल्लाळ देवल हे गुरू लाभल्याने स्त्री-भूमिकांसाठी आवश्यक असलेले सर्व बारकावे शिकायला मिळाले. पुढे काकासाहेब खाडिलकर, गणपतराव बोडस यांनीपण बालगंधर्वांना गद्याची तालीम दिली. स्त्री-भूमिका करताना सौंदर्याबरोबरच त्यांनी शालीनता, सोज्ज्वळता व

ब

घरंदाजपणा यांचे दर्शन घडवले. त्यांची कोणतीही स्त्री-भूमिका कधीही छचोर वाटली नाही. त्यांना ईश्वरदत्त गोड गळा लाभला होता. स्वराशी, लयीशी आत्मविश्वासाने चाललेला सहजसुंदर खेळ हे त्यांच्या गाण्याचे वैशिष्ट्य होते. खास त्यांच्यासाठी काकासाहेब खाडिलकरांनी ‘मानापमान’ हे नाटक लिहिले. त्याची संगीतरचना गोविंदराव टेंबे यांनी केली. दादरा-ठुमरी हा बाज मराठी संगीत रंगभूमीवर आला आणि बालगंधर्वांनी तो त्याच नजाकतीने सादर केला.

‘स्वयंवर’ नाटकासाठी भास्करबुवा बखले यांनी रागदारी चिजांवर आधारित संगीतरचना केली. त्यांनी प्रत्येक मूळ चीज आधी बालगंधर्वांना शिकवली व नंतर त्यावर आधारित पद शिकवले. त्यामुळे कोणत्याही रागाचे मूर्तिमंत स्वरूप अल्पावधीतच प्रकट करण्याचे कसब बालगंधर्वांना प्राप्त झाले. १९०५ ते १९२० हा बालगंधर्वांचा, संगीत रंगभूमीवरचा सुवर्णकाळ होता. सुभद्रा, शकुंतला, भामिनी, रुक्मिणी, देवयानी, द्रौपदी, सिंधू अशा वेगवेगळ्या स्वभावाच्या आणि वेगवेगळ्या संगीताने नटलेल्या नायिका सादर करताना बालगंधर्वांनी स्वर्गीय गायनाचा आणि मोहक अभिनयाचा आविष्कार घडवला. त्यांच्याइतक्या विविध स्त्री-भूमिका कोणत्याही पुरुष नटाने केलेल्या नाहीत.

ब

त्यांनी १९१३ मध्ये स्वत:ची गंधर्व नाटक मंडळी स्थापन केली. सुरुवातीला भागीदारीत असलेल्या या कंपनीची पुढे त्यांच्या एकट्याकडेच मालकी राहिली. गंधर्व नाटक मंडळीचे मालक म्हणून त्यांनी नेहमी गुणी कलावंतांचा संग्रह केला. गायक, साथीदार, सहकलाकार, बॅकस्टेजचे कलाकार असे मिळून १०० जण कंपनीत असत. सगळ्यांची यथोचित बडदास्त ठेवलेली असे. सर्वांना राहण्यासाठी जागा, सुग्रास जेवण, प्रत्येकाला अगत्याची वागणूक या सगळ्यांमुळे नाट्यसंस्थेच्या इतिहासात असा मालक होणे नाही, असे म्हटले जात असे.

नाटकाची निर्मिती करताना कथानकाला आवश्यक ती सर्व वेशभूषा, दागदागिने, पडदे, सेट तयार केले जात. कोणत्याही गोष्टीची कमतरता भासू नये असाच विचार असायचा. या गोष्टींमुळे कंपनीचा खर्च वाढून कर्ज झाले तरी प्रयोग त्याच दिमाखदार पद्धतीने सादर केले जायचे. आलेल्या रसिकांना नाटकाचा शंभर टक्के आनंद मिळाला पाहिजे हाच हेतू त्यामागे होता. त्यांच्या रसिकांमध्ये मराठी, गुजराती, पारशी अशा सर्वांचा समावेश होता.

बालगंधर्व स्त्री-भूमिका करत असले तरी रंगमंचाखेरीज इतर वेळी त्यांनी कधीही स्त्रीचा पोशाख केला नाही. सत्चारित्र्याची त्यांची वागणूक पाहून एकूणच नटांविषयीची अनिष्ट भावना नाहीशी होऊ लागली. सामाजिक बांधीलकीचे भान ठेवून त्यांनी कित्येक प्रयोग मदतीकरिता, विनामूल्य केले. केशवराव भोसले यांच्यासह केलेल्या ‘संयुक्त मानापमाना’च्या प्रयोगातून टिळक स्वराज्य फंडाला त्यांनी १६,५०० रुपये देणगीदाखल दिले.

गंधर्व कंपनीला आर्थिक अडचणीतून मुक्त करण्यासाठी नाइलाजाने त्यांनी प्रभात कंपनीशी करार करून चित्रपटात जाण्याचा निर्णय घेतला.त्यांची प्रमुख भूमिका असलेला ‘धर्मात्मा’ हा चित्रपट १९३५ साली आला. पण चित्रपटाने त्यांना विशेष आनंद दिला नाही व पुन्हा ते रंगभूमीकडेच आले.

‘साध्वी मीराबाई’ हा त्यांचा दुसरा चित्रपट प्रदर्शित १९३७ साली झाला. वसंत शांताराम देसाई यांचे ‘अमृतसिद्धी’ हे नाटक बालगंधर्व करीत असत, त्यावरून केलेला हा नाट्य-चित्रपट (स्टेज टॉकी) होता. बालगंधर्वांचे स्त्री-वेशातील दर्शन यात घडते. ‘विठ्ठल रखुमाई’ हा त्यांचा तिसरा व अखेरचा चित्रपट. यातील संत तुकारामांच्या भूमिकेत त्यांनी गायलेल्या (संगीत : सुधीर फडके) पाच अभंगांची ध्वनिमुद्रिका निघाली होती.

एकंदर १९०५ ते १९५५ या पन्नास वर्षांत त्यांनी साकारलेल्या नायिकांना रसिकांनी दिलेली उदंड दाद आणि रसिकांचे निरपेक्ष प्रेम हा त्यांच्या आयुष्यातला सर्वांत मोठा आनंद होता. वैयक्तिक दु:ख नेहमीच मागे

सारून त्यांनी संगीत रंगभूमीची एकनिष्ठपणे सेवा केली. त्यांना १९४४ साली रंगभूमीच्या शतसांवत्सरिक महोत्सवाचे अध्यक्षपद मिळाले. त्यांना १९४५ साली कोल्हापूर नगरपालिकेने मानपत्र देऊन त्यांचा गौरव केला. त्यांना १९५५ मध्ये संगीत नाटक अकादमीतर्फे राष्ट्रपतिपदक मिळाले, तर १९६४ मध्ये भारत सरकारने 'पद्मभूषण' ही पदवी देऊन बालगंधर्वांचा सन्मान केला.

त्यांचा अमृतमहोत्सव ९ फेब्रुवारी १९६४ रोजी भव्य प्रमाणात साजरा करण्यात आला. स्त्री-भूमिका साकारताना फक्त स्त्री-सौंदर्याचेच नाही, तर स्त्रीच्या अंतरंगाचे दर्शन घडवणाऱ्या आणि रसिक प्रेक्षकांची 'मायबाप' म्हणून पूजा करणाऱ्या ह्या कलावंताला पुणे येथे देवाज्ञा झाली. त्यांच्या पश्चात पुणे, मिरज येथे बालगंधर्व रंगमंदिर बांधण्यात आले आहे. पुणे आणि पिंपरी-चिंचवड महानगरपालिका ज्येष्ठ कलावंताला दरवर्षी 'बालगंधर्व' पुरस्कार देऊन गौरव करीत आहेत. तसेच अखिल भारतीय मराठी नाट्य परिषदेतर्फे माधवराव शिंदे पुरस्कृत बालगंधर्व सुवर्णपदक, तर महाराष्ट्र सरकारतर्फे बालगंधर्व पुरस्कार दरवर्षी प्रदान केला जात आहे.

महाराष्ट्रभर १९९७-९८ मध्ये बालगंधर्व जन्मशताब्दी साजरी करण्यात आली. यात संगीत नाटकांचे प्रयोग, नाट्यसंगीत स्पर्धा, संगीत नाटक शिबिर असे वेगवेगळे उपक्रम विविध संस्थांनी आणि महाराष्ट्र सरकारने राबवले.

— वर्षा जोगळेकर

**संदर्भ :**

*१. देसाई, वसंत शांताराम; 'बालगंधर्व : व्यक्ती आणि कला'.*

## बालापोरिया, जाल कैखुश्रू

**गायक**

**२९ डिसेंबर १९२५ – ३० जानेवारी २०१३**

महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या पलुसकर पठडीतील गायकीपेक्षा आगळ्यावेगळ्या ढंगाची, निसार हुसेन खाँसाहेबांपासून शंकर पंडितांपर्यंत आलेली, ग्वाल्हेरी पारंपरिक ग्वाल्हेर घराण्याची गायकी जपणारे गायक जाल कैखुश्रू बालापोरिया यांचा जन्म सूरत येथे झाला. बाळापूरचे म्हणून ते बालापोरिया. वडील कैखुश्रू सोलापूरमध्ये रेल्वे गार्ड होते. त्यांच्या आईचे नाव हिराबाई कोहिना. वडील निवृत्त झाल्यावर बलसाड जवळील बिलिमोरा या गावात ते स्थायिक झाले. वडिलांना गाण्याची आवड होती व ते चांगले गात.



वयाच्या सहाव्या वर्षीच कैखुश्रूंनी जालजींना रागावर आधारित गाणी शिकवायला सुरुवात केली. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण बिलिमोराला झाले. त्यानंतर सूरतमधूनच त्यांनी विद्युत अभियांत्रिकेत पदविका अभ्यासक्रम केला. ते १९४८ च्या सुमारास मुंबईला आले. त्यांनी काही वर्षे इंडियन ऑक्सिजन या कंपनीत काम केले. नंतर ३० वर्षे एअर इंडिया वर्कशॉपमधील इलेक्ट्रॉनिक पार्ट्स यातील देखभाल विभागात नोकरी केली. जाल १९६० मध्ये विवाहबद्ध झाले.

वयाच्या चौदाव्या वर्षी, शालेय शिक्षण सुरू असतानाच त्यांचे रागदारी गायनाचे शिक्षण एकनाथ पंडितांचे सुपुत्र सीताराम पंडितांकडे सुरू झाले. एकनाथ पंडित हे कृष्णराव शंकर पंडितांचे चुलते होत. सीताराम पंडित हे बिलिमोरात संगीताचे वर्ग चालवीत. त्यानंतर सूरतमध्ये पंडित कृष्णराव मुळे यांचे शिष्य हरेन्द्र घाणेकर यांच्याकडे ते शिकले. त्यानंतर मुंबईला आल्यावर त्यांनी एकनाथ पंडितांचे शिष्य डॉ. हरिहर गंगाधर मोघे यांच्याकडे शिकण्यास सुरुवात केली. डॉ. मोघे हे दातांचे डॉक्टर होते. त्यांच्याकडे ग्वाल्हेर घराण्यातील इतर गायकांपासून आलेल्या बंदिशींचाही मोठा साठा होता. कृष्णराव मुळ्यांचे शिष्य विनायक जोगळेकर यांचेही

ब

मार्गदर्शन जाल यांना लाभले. विनायक जोगळेकरांकडून त्यांना सांगीतिक सौंदर्यदृष्टी, तालाविषयीची वैचारिक दृष्टी लाभली.

जाल यांनी आपल्या गायन शिक्षणात ग्वाल्हेर घराण्याची कास सोडली नाही. श्रोता म्हणून त्यांनी आपली दृष्टी खुली ठेवली होती, तरी आपली अष्टांग-प्रधान असलेली ग्वाल्हेरी गायकी मात्र कुठलीही भेसळ न करता शुद्ध राखली.

जाल यांच्या संग्रहात विविध रागांतील ख्याल, ख्यालनुमा, टप्पा, तराना, होरी, चतुरंग, अष्टपदी, त्रिवट असे बहुविध संगीत प्रकार असून तिलवाडा, झपताल, आडाचौताल, सवारी, पश्तो अशा विविध तालांतील रचना होत्या. पारंपरिक बंदिशींचा फार मोठा खजिनाच त्यांच्याकडे होता. याशिवाय मुलतानी, जुनी पंजाबी, मराठी, संस्कृत, हिंदी, जौनपुरी, फारसी अशा विविध भाषांतील रचना असून त्यांचे सादरीकरणही जाल नेमकेपणाने करत. बंदिशीच्या अंगाने रागविस्तार, बंदिशीतील शब्द, स्वर, ठेका यांतून विस्तार, गाण्यात नेमकेपणा व आटोपशीरपणा, अर्थपूर्ण शब्दोच्चारांवर भर, लहान लहान स्वर-वाक्यांनी, नियंत्रित अलंकरणाने व संयमित भाव ठेवून केलेले त्यांचे सादरीकरण असे.

मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागात ते जवळजवळ २५ वर्षे शिकवत होते. ते २००० साली निवृत्त झाले. १९९७ साली त्यांना सूरसिंगार समितीचा 'सूरमणी' हा किताब मिळाला, तर संगीत रिसर्च अकादमी आणि म्यूझिक फोरम यांच्यातर्फे १९९७ साली त्यांना पुरस्कार देण्यात आला. त्यांना १९९८ साली महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक पुरस्कारही लाभला.

जाल बालापोरियांकडे शांता गोखले, रोशन शहानी, नीला भागवत, अनिल दिघे, रमेश पांचाळ, शर्मिला शहा इत्यादींनी संगीत शिक्षण घेतले आहे. मुंबई विद्यापीठातून शिकलेल्या अनेक विद्यार्थ्यांना त्यांचा लाभ झाला आहे. त्यांचे मुंबई येथे निधन झाले.

— माधव इमारते

ब

## बिनीवाले, शंकर गोपाळ

**व्हायोलिनवादक**

**१० नोव्हेंबर १९०९ – १५ जुलै १९९५**



शंकर गोपाळ ऊर्फ अप्पासाहेब बिनीवाले यांचा जन्म पुण्यातील सरदार बिनीवाले यांच्या घराण्यात झाला. ते केवळ चौदा वर्षांचे असताना त्यांचे पितृछत्र हरपले. त्यांचे शालेय शिक्षण मध्येच थांबले आणि ते पिढीजात सराफी दुकानावर बसू लागले. पण त्यांचे मन मात्र दुकानात रमत नव्हते. वडिलांनी आणलेले एक व्हायोलिन त्यांच्या घरात होते. ते कसे स्वरात लावायचे हे शंकर यांनी एच.व्ही. मेहेंदळ्यांच्या दुकानात जाऊन विचारले. नंतर त्यांनी हळूहळू त्यावर स्वर वाजवायला सुरुवात केली. आधी एका गाण्याची एक ओळ वाजवली, मग हळूहळू सबंध गाणे बसवले. अशा प्रकारे अनेक गाणी बसवली.

प्रख्यात व्हायोलिनवादक गजाननराव जोशी यांचा एके ठिकाणी कार्यक्रम होता. तेव्हा शंकरचे मोठे बंधू त्यांना कार्यक्रमाला घेऊन गेले. कार्यक्रम झाल्यावर गजाननरावांशी त्यांनी शंकरची ओळख करून दिली. गजाननरावांच्या सांगण्यावरून शंकरने व्हायोलिनवर एक गाणे वाजवले. गजाननराव जोशी यांनी त्यांस व्हायोलिनवादन शिकवण्याचे मान्य केले.

अशा तऱ्हेने त्यांचे शिक्षण सुरू झाले. दोनचार महिने झाल्यावर आपला वर्ग शंकरवर सोपवून गजाननराव औंध संस्थानात गेले. नंतर त्यांनी शंकरला औंधला बोलावून घेतले. पाचसहा महिने औंधला राहून शंकर पुण्याला परत आले. नंतर ते काही स्वतंत्र कार्यक्रमांमध्ये व्हायोलिनवादनाची साथ करू लागले. मग त्यांना काही मूकपटांच्या संगीताचे काम मिळाले. प्रभात कंपनीच्या 'अयोध्येचा राजा' या चित्रपटाचे प्रसिद्ध संगीत दिग्दर्शक गोविंदराव टेंबे यांनी

चित्रपटाच्या पार्श्वसंगीतात व्हायोलिनवादनाकरिता त्यांना बोलावून घेतले.

पाश्चात्त्य संगीताचा अभ्यास करायला आपण परदेशी जावे असे त्यांच्या मनात आले. त्यांनी ‘कॉन्टे रोस्सो’ या बोटीने परदेशी प्रस्थान केले. त्यांना बोटीवर फेरेदेन्ने मरिआनो नावाचे इटालियन गृहस्थ भेटले. तेही व्हायोलिनवादक होते. त्यांनी शंकररावांना पाश्चात्त्य संगीत शिकवायचे व त्या बदल्यात शंकररावांनी त्यांना भारतीय संगीत शिकवायचे असे त्यांच्यात ठरले. पाचसहा महिने शंकरराव इटलीत राहिले. इटलीत असताना इटलीचे शासक मुसोलिनी यांना व्हायोलिन ऐकवण्याची संधी शंकररावांना मिळाली. हा मान मिळालेले ते पहिले आणि एकमेव भारतीय होते.

पुढे शंकरराव इंग्लंडला गेल्यावर त्यांचे अनेक थिएटरांमध्ये कार्यक्रम झाले. ब्रिटिश ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनच्या प्रसारण सेवेवरही शंकररावांचा व्हायोलिनवादनाचा कार्यक्रम झाला. असा मान मिळालेले ते पहिलेच भारतीय होत.

वर्षभराने ते भारतात परत आले. त्यानंतर ‘श्यामसुंदर’, ‘अयोध्येचा राजा’, ‘सत्यवान सावित्री’ अशा अनेक चित्रपटांसाठी त्यांनी व्हायोलिन वाजवले, तसेच ‘राधामाई’, ‘कुलवधू’ या नाटकांमधून व्हायोलिनवादन केले. त्यानंतर मुंबईत एका रेकॉर्डिंग कंपनीत आणि आकाशवाणीवर ते काम करत होते.

१९४२ साली ते पुण्याला आले. शांता आपटे, पंडितराव नगरकर, सुलोचना पालकर, शाहू मोडक, पु.ल. देशपांडे, ज्योत्स्ना भोळे इत्यादी अनेकांना त्यांनी व्हायोलिनवादनाची साथ केली. त्याच सुमारास त्यांनी अनेक स्वतंत्र वादनाचे कार्यक्रमही केले. नंतर ते पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्याबरोबर नेपाळला साथ करण्यासाठी गेले होते.

गजानन खेर, व्हायोलिना उमराणीकर, रमाकांत परांजपे हे त्यांचे शिष्य पुढे नावारूपाला आले. शंकररावांचे पुणे येथे निधन झाले.

— व्हायोलिना उमराणीकर

## बियावत, रामनारायण नाथूजी

☛ रामनारायण

## बेहरे, गणेश रामचंद्र

**गायक**

**१८९० – १० मार्च १९६५**



गणेश रामचंद्र बेहरे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील कुर्धे गावी झाला. त्यांचे शालेय शिक्षण मराठी पाचव्या इयत्तेपर्यंत झाले. त्यांचे वडील संगीतप्रेमी असल्याने संगीताची आवड निर्माण झाली होती; पण वडिलांची आर्थिक स्थिती फारशी बरी नसल्याने आणि गावात शिकण्याची सोय नसल्याने वयाच्या चौदाव्या वर्षी त्यांनी घर सोडले आणि १९०४ साली ‘नाट्यकला प्रवर्तक मंडळी’त ते दाखल झाले. बालवयातल्या नटांना तिथे गणपतीबुवा भिलवडीकर शिकवत असत. तिथे त्यांचे प्राथमिक संगीतशिक्षण झाले. पुढे नाटक कंपनी सोलापूरला पोहोचली. तिथे उ. अब्दुल करीमखाँचे वास्तव्य होते. त्यांनी शिकवायचे कबूल केल्यावर बेहऱ्यांनी नाटक कंपनी सोडून दिली.

उ. अब्दुल करीम खाँची तालीम वर्षभर चालली. मात्र आर्थिक अडचणींमुळे खाँसाहेबांनी बेहरेबुवांना घरी परत पाठवले. मग बुवा कुर्ध्यास घरी परतले. नंतर रावबहादूर देवलांच्या मदतीमुळे बेळगावी पं. रामकृष्णबुवा वझे यांच्याकडे त्यांचे शिक्षण सुरू झाले. पुढे इंदूरला रजब अली खाँकडे बेहऱ्यांना तनैयतीचे विशेष शिक्षण मिळाले. त्यांच्याबरोबर कैक ठिकाणी बेहरेबुवा फिरले. त्यानंतर पुण्याला वर्षभर जमखिंडी संस्थानात बेहरे यांनी काही काळ नोकरी केली. त्यांना भास्करबुवा बखले यांचीही तालीम मिळाली.

ब

उ. अब्दुल करीम खाँनी १९१८ साली मुंबईत कांदेवाडी येथे विद्यालय स्थापन केले. तिथे बेहरेबुवा शिकवू लागले. त्यांना तेथे काही शिकवण्या मिळाल्या आणि ते चरितार्थ चालवू लागले.

अत्यंत तयार ताना, स्पष्ट व गंभीर आवाज, आकर्षक व्यक्तिमत्त्व असलेले बेहरेबुवा गायक म्हणून मान्यता पावले. त्यांच्या आवाजात कधीही कंप नव्हता. विविध गुरूंच्या शिकवण्याने त्यांची गायकी समृद्ध झाली होती.

१९१५ साली ते मुंबई म्युनिसिपालिटी शाळेत संगीत शिक्षक म्हणून काम करू लागले. परंतु १९३२ साली पत्नी निवर्तल्यावर ते संन्यस्त वृत्तीने राहू लागले. ते १९४० साली आपल्या मूळ गावी, कुर्धे येथे परतले व १९६५ साली तेथेच वृद्धापकाळी त्यांचे निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*१. देवधर, बी.आर.; 'थोर संगीतकार'; पॉप्युलर प्रकाशन, १९९९ मुंबई.*

## बोडस, लक्ष्मणराव

**गायक**

**२४ जुलै १९०४ – १५ जानेवारी १९९१**



लक्ष्मणराव बोडस यांचा जन्म सांगलीत झाला. शंकरराव बोडसांचे ते धाकटे बंधू होत. बालपणी संगीत रंगभूमीशी लक्ष्मणरावांचा परिचय झाला. वृत्तीने ते थोडे हूड होते आणि शिक्षणात त्यांना कमी गोडी होती. मुंबईच्या गांधर्व महाविद्यालयात ते दाखल झाल्यानंतर त्यांचे इंग्रजी चौथ्या इयत्तेपर्यंतचे शालेय शिक्षण झाले. त्यांनी सांगलीत भूगंधर्व रहिमत खाँ, उ. अल्लादिया खाँ वगैरेंची गाणी खूप ऐकली होती. गांधर्व महाविद्यालयात शिकून ते चांगले गवई झाले व पं. पलुसकरांनी त्यांना कराची येथे संगीत प्रचारार्थ पाठविले.

त्यामुळे कराचीत १९३२-३३ च्या सुमारास बृहन्महाराष्ट्र ब्राह्मण सभेचे तत्कालीन अध्यक्ष तात्यासाहेब गोखले यांच्या पुढाकाराने त्यांना जागा मिळाली व गायन-वादनाचे संगीत वर्ग सुरू झाले.

सुरुवातीला त्या भागात संगीताचे वातावरण निर्माण करताना कष्ट घ्यावे लागले. नंतर पुष्कळ विद्यार्थी शिकायला येऊ लागले. होळीच्या दिवसांत सिंध प्रांतात 'हंडा' या नावाचे संगीताचे कार्यक्रम होत असत. लक्ष्मणराव या मैफलीत गाण्यासाठी जात असत.

आकारयुक्त स्वरलगाव, भरावदार आवाज, आक्रमक गायनशैली, लयकारीच्या बोलताना, ताना, वेगवेगळे मुखडे घेऊन समेवर येणे ही लक्ष्मणरावांची गानवैशिष्ट्ये होती. खाँसाहेब मुबारक अली तेव्हा कराचीला होते. त्यांच्याकडून लक्ष्मणरावांनी गायनकला प्राप्त केली. त्यामुळे ग्वाल्हेर ढंगाच्या गमकयुक्त तानांबरोबरच मुबारक अलींच्या गाण्याचा ढंगही ते आपल्या गाण्यात मिसळत असत.

गायनासोबत वाचन आणि चित्रकला यांचीही त्यांना आवड होती. फाळणीनंतर १९४८ च्या सुमारास ते भारतात आले. नाशिक व अन्य ठिकाणी राहून शेवटी ते मुंबईत स्थायिक झाले. त्यांचे थोरले चिरंजीव नारायणराव बोडस हे चांगले गायक आहेत. धाकटे चिरंजीव अनंतराव अमीर हुसेन खाँचे गंडाबंध शागिर्द होते. ते चांगला तबला वाजवत. दुर्दैवाने त्यांचे लवकर निधन झाले.

लक्ष्मणरावांनी विद्यार्थ्यांचा वाद्यवृंद तयार केला होता. त्यात दिलरुबा, सतार, जलतरंग, हार्मोनियम, व्हायोलिन, बासरी व तबला या वाद्यांचा समावेश होता. सिंध प्रांतात पुष्कळ उत्सवांमध्ये या वाद्यवृंदाचे कार्यक्रम होत असत. अमूभाई दोशी, खानोलकर भगिनी, सुलक्षणा राणे, गग्गू आडवाणी, आबान मिस्त्री, अशोक दा. रानडे, नारायणराव व अनंतराव बोडस हे त्यांचे शिष्य होत.

लक्ष्मणराव वृत्तीने भाविक, रामभक्त व अजातशत्रू गायक होते. त्यांचे वयाच्या सत्त्याऐंशीव्या वर्षी मुंबईत निधन झाले. त्यांचे पुत्र नारायणराव व नातू केदार बोडस हे त्यांचा गान-वारसा चालवत आहेत.

- डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**


१. *बोडस, नारायणराव, (लेख); 'संगीत कला विहार'; जुलै २००४.*

२. *राजोपाध्ये, (लेख); 'संगीत कला विहार'; डिसेंबर २००५.*


## बोडस, शंकर श्रीपाद
**संगीत शिक्षक**
**२० एप्रिल १९०० – १० जुलै १९८६**



शंकर श्रीपाद बोडस यांचा जन्म सांगलीत झाला. त्यांचे वडील श्रीपाद विष्णू बोडस हे एक हुशार, सुशिक्षित गृहस्थ होते. सांगलीतील गाडगीळ सराफांकडे हिशेबनीस असणारे श्रीपादराव त्या काळी बुद्धिबळपटू म्हणून नावाजलेले होते. आपल्या मुलांनी विधिवत शिक्षण घेऊन नोकरी करावी अशी त्यांची इच्छा होती. शंकर बोडसांना मात्र लहान वयापासून गायनाची रुची होती. बालगंधर्वांच्या नाट्यपदांचा प्रभाव त्यांच्यावर बालवयात होता. सांगलीतील सांबारे वैद्यांच्या घरी होणाऱ्या मैफलींत त्यांनी उ. अल्लादिया खाँ साहेबांचेही गायन ऐकले होते व या संगीतश्रवणाचा त्यांच्यावर विलक्षण प्रभाव झाला होता.

एकदा पं. विष्णू दिगंबर पलुसकर सांगलीस आले असता त्यांनी शंकर बोडसांनी गणेशोत्सवात गायलेले 'रामरंगी रंगले' हे पद ऐकले व पलुसकरांनी त्यांस गायन शिकण्याबद्दल सुचवले, तेव्हा वडिलांच्या संमतीचा विषय आला. वडिलांनी त्यांस विद्यालयीन शिक्षण देण्याच्या अटीवर गाणे शिकण्यास संमती दिली. त्यानुसार पलुसकरांनी त्यांच्या शिक्षणाची जबाबदारी घेऊन शंकर व लक्ष्मण या दोघा बंधूंस शिष्य म्हणून स्वीकारले. एका बाजूला पलुसकरांकडे ग्वाल्हेर गायकीचे शिक्षण व दुसऱ्या बाजूस विद्यालयीन शिक्षण चालू झाले. त्यांचे गुरुबंधू बा.र. देवधर हे त्यांचे विद्यालयातीलही सहाध्यायी होते. दोघेही सांगलीच्या सिटी महाविद्यालयामधून इंटरमीजिएटची परीक्षा उत्तीर्ण झाले.

पलुसकरांनी शंकर बोडसांना गायनासह स्वरलेखनपद्धती, तबला, सतार, जलतरंग, हार्मोनिअम या वाद्यांचे वादन व वाद्यदुरुस्तीही शिकवली. तसेच पलुसकरांना विविध वृत्तपत्रे, पत्रव्यवहार वाचून दाखवण्याचे कामही त्यांच्याकडे असल्याने त्यांना एकंदर व्यावहारिक दृष्टिकोन लाभला. बोडसांचे १९१८ ते १९२६ अशी आठ वर्षे पलुसकरांकडे संगीतशिक्षण झाले.

कानपूर येथील १९२४ साली काँग्रेस अधिवेशनासाठी महात्मा गांधींच्या बोलावण्यावरून पलुसकर हे बोडस, कशाळकर व ठकार या आपल्या शिष्यांसह गेले होते. तेव्हा पलुसकरांच्या गायनाचा जनमानसावर होणारा विलक्षण परिणाम पाहून प्रभावित झालेल्या कानपूरच्या पी.पी.एन. महाविद्यालयाच्या प्राचार्यांनी एक उत्तम शिष्य तेथील महाविद्यालयात संगीत शिक्षक म्हणून देण्याची पलुसकरांना विनंती केली. त्यानुसार १९२६ साली शंकरराव बोडस हे पं. पृथ्वीनाथ इंटर महाविद्यालयात रुजू झाले.

त्या काळात कानपूरमध्ये संगीताचे वातावरण नव्हते व कलाकारांस प्रतिष्ठा नव्हती. या वातावरणात बोडसांनी आपल्या सभ्य वर्तणूक व शिस्तशीर अध्यापनाद्वारे संगीतास अनुकूल वातावरण निर्माण केले. त्यांच्या अध्यापनकौशल्याने प्रभावित होऊन तत्कालीन इंग्रजी अधिकाऱ्याने त्यांना बढती दिली. स्वातंत्र्यपूर्व काळात बोडसांनी प्रभातफेऱ्या सुरू करून त्यांतील देशभक्तिपर गीतांद्वारे स्वातंत्र्य चळवळीची ज्योत तेवती ठेवली होती.

शंकररावांचा १९२८ साली विवाह इचलकरंजीतील सावित्री जोशी यांच्याशी झाला. शंकररावांनी पत्नीस

ब

शालेय व सांगीतिक शिक्षण घेण्यास प्रोत्साहन दिले आणि सावित्रीबाईंनी विवाहानंतर शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करत संगीतशिक्षणही घेतले. त्याही सुरेंद्रसेन बालिका विद्यालयात शिक्षिकेची नोकरी करू लागल्या. या दाम्पत्याने कानपूरसारख्या महाराष्ट्रापासून दूरस्थ ठिकाणी तेथील उर्दू, हिंदी व इंग्रजी भाषा आत्मसात करून जनसंपर्क साधला.

बोडसांनी विशेषत: प्राथमिक स्तरावरील मुलांसाठी संगीताची सुलभ, रंजक शिक्षणपद्धती तयार केली व तिच्याद्वारे संगीताचा प्रसार केला. बालकांना रागसंगीत शिकवताना त्याचे रूपांतर लहान चुटकुल्यात करून, बालसुलभ गीते व सरगमींच्या आधारे त्यांना रंजक वाटेल अशा पद्धतीने ते रागसंगीताचे पाठ देत. त्यासाठी त्यांनी अनेक संगीतरचना, धुनी, बंदिशींची रचना केली. स्वरांच्या स्वाभाविक भावाभिव्यक्तीशी कुणा मुलांचे स्वभाव, घटना, कथावस्तू यांचा मेळ घालून ते सुगम रितीने स्वरज्ञान देत. शालेय कवायतीची जोड देऊन दुगुन, तिगुन, चौगुन अशी लयकारी ते मुलांना सहजपणे शिकवत.

वयाच्या सत्तरीपर्यंत सकाळी दहा ते सायंकाळी आठ वाजेपर्यंत ते संगीतशिक्षणाचे कार्य अथकपणे करत. शंकरराव बोडस हे संगीतशिक्षणाच्या कार्यात पूर्णपणे झोकून दिल्याने मैफलीचे कलाकार होऊ शकले नाहीत, मात्र त्यांचे गायन मैफलीच्या दर्जाचे होते. ख्यालासह भजन, देशभक्तिपर गीते ते प्रभावीपणे गात. त्यांच्या गायनाची एक ध्वनिमुद्रिका तेव्हाच्या मॅक्सिटोन कंपनीने काढली होती. ते उत्तम वाग्गेयकारही होते. त्यांनी काही काळ विख्यात नृत्यकलाकार उदय शंकर यांच्या चमूत संगीतकार विष्णूपंत शिराळी यांचे सहायक-संगीत दिग्दर्शक म्हणूनही काम केले होते. त्यांनी स्वरबद्ध केलेली अनेक भजने आकाशवाणीवरून प्रसारित होत असत.

शंकरराव बोडसांनी कानपूरमध्ये संगीतविषयक संघटनात्मक कार्यही केले. पी.पी.एन. महाविद्यालयामधील कामाबरोबरच अन्य संस्थांशीही त्यांचा जवळचा संबंध होता. त्यांनी १९४८ साली गांधी संगीत विद्यालयाची स्थापना करून गायन, वादन व नृत्य या तिन्ही विधांचे परीक्षाक्रमवत अध्यापन सुरू केले. त्यांनी १९६९ साली जुहारीदेवी परास्नातक महाविद्यालयामध्ये संगीतात एम.ए.पर्यंतचे अभ्यासक्रम तयार केले. त्यांनी १९२७ साली कानपूरमध्ये संगीत समाज सुरू करून त्याद्वारे अनेक कलाकारांच्या मैफली घडवून आणल्या व त्या योगे कानपूरमध्ये रसिकवर्ग घडवला. 'संगीत समाज पत्रिका' व 'संगीत कला विहार' या मासिकांतील अंकांमधून त्यांनी संगीतविषयक विपुल लेखनही केले.

कानपूर येथे वयाच्या शाऐंशीव्या वर्षी त्यांचे निधन झाले. त्यांनी पुत्र काशीनाथ बोडस व कन्या वीणा सहस्रबुद्धे यांना संगीतात प्रवीण केले. या दोघांनीही कला, अध्यापन, रचनात्मक कार्य या बाबतींत वडिलांचा संगीताचा वारसा समर्थपणे पुढे नेला.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

*सहस्रबुद्धे, वीणा; 'उत्तराधिकार'; २०००.*

## बोरकर, तुळशीदास
**हार्मोनिअमवादक**
**१८ नोव्हेंबर १९३४**



तुळशीदास बोरकर यांचा जन्म गोव्यातील फोंडा महाल भागातील बोरी या लहानशा निसर्गरम्य गावात झाला. बोरी गावातील श्री नवदुर्गेच्या मंदिरात नित्यक्रमाने होणाऱ्या कीर्तन, भजनातून गोव्यातील स्थानिक संगीताचा, स्वर-लयीचा संस्कार लहान वयातच त्यांच्या मनावर झाला. मंदिरातील कीर्तनात कीर्तनकार बाळूबुवा अभिषेकी यांना साथ करणारे हार्मोनिअमवादक जनार्दनबुवा बोरकर यांचाही त्यांच्यावर प्रभाव पडला.

वयाच्या पाचव्या वर्षी आई जयश्रीबाई बोरकर यांनी त्यांना संगीताचे प्राथमिक धडे देणे सुरू केले. पुढे वडिलांच्या निधनानंतर त्यांनी सावंतवाडीस, आजोळी काही काळ शालेय शिक्षण घेतले. मग कुटुंबातील आर्थिक अस्थिरतेमुळे त्यांनी उदरनिर्वाहासाठी पुणे गाठले. अभिनेत्री बहीण नलिनी बोरकर यांच्यासह ते १९४५ साली बॅ. खासगीवाले यांच्या ‘महेश नाटक मंडळी’मध्ये दाखल झाले.

पुण्यात १९४८ पासून छोटा गंधर्वांच्या ‘कलाविकास’ नाटक कंपनीत काम करत असताना ऑर्गनवादक विष्णुपंत वष्ट व गायक छोटा गंधर्व यांच्याकडून त्यांना शिक्षण मिळाले. मुंबईत १९५७ ते १९६७ अशी सुमारे दहा वर्षे त्यांनी पी. मधुकर यांच्याकडून एकल हार्मोनिअमवादनाचे तंत्र, तसेच संवादिनीच्या स्वरजुळणीचीही जाणकारी मिळवली. संगीतकार मधुकर गोळवलकर, व्हायोलिनवादक अनंतराव फाटक, बासरीवादक देवेंद्र मुर्डेश्वर, दुर्गेश चंदावरकर, राजाराम शुक्ल, मुरली मनोहर शुक्ल, पं. गिंडे व भट यांच्या सहवासातून बोरकरांनी संगीतातील अनेक बारकावे जाणून घेतले.

अनेक नामांकित नाटकमंडळींसाठी त्यांनी १९५० ते १९८० अशी तीस वर्षे संगीत नाटकांना ऑर्गनची संगत केली. छोटा गंधर्वांना त्यांनी दीर्घकाळ ऑर्गनची साथ केली, शिवाय हिराबाई बडोदेकर, सरस्वती राणे, ज्योत्स्ना भोळे, शांता आपटे, जयमाला शिलेदार, माणिक वर्मा, भालचंद्र पेंढारकर, पंडितराव नगरकर, भार्गवराम आचरेकर, श्रीपाद नेवरेकर, सुरेश हळदणकर, रामदास कामत इ. गायक नटांना संगीत नाटकांमधून साथ केली. तुळशीदास बोरकरांनी ‘संगीत पंढरपूर’, ‘बकुळ फुला’ या दोन संगीत नाटकांना संगीतही दिले.

बोरकरांनी सुमारे ५०-६० वर्षे देशात व अमेरिका, युरोप, आखाती देश अशा परदेशांतील अनेक महत्त्वाच्या रंगमंचांवरून शेकडो मैफलींत मान्यवर कलाकारांना संवादिनीची साथ अत्यंत तन्मयतेने केली. अमीर खाँ, मल्लिकार्जुन मन्सूर, कुमार गंधर्व, गंगूबाई हनगल, पद्मावती शाळिग्राम, भीमसेन जोशी, राम मराठे, के.जी. गिंडे, एस.सी.आर. भट, किशोरी आमोणकर, प्रभा अत्रे, शोभा गुर्टू, अशा जुन्या काळातील ज्येष्ठांपासून आजच्या काळातील अनेक मान्यवर कलाकारांना त्यांनी साथ केली.

वादनातील ऋजुता, गोडवा हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. तुळशीदास बोरकरांचे एकल हार्मोनिअमवादन हे मुख्यत: पी. मधुकर शैलीला अनुसरून असले तरी त्यात त्यांचा स्वत:चा असा ठसाही दिसतो.

ते मैफलीत बरेचदा ललत, तोडी, मधुवंती, पूरिया कल्याण, यमन, बिहाग अशा मोठ्या रागांत, विलंबित एकतालात ख्याल पद्धतीने रागविस्तार करतात; नंतर द्रुत त्रितालात गतकारी पद्धतीने वादन करून शेवटी झाला-वादन करतात. मिश्र काफी, तिलक कामोद, खमाज, मांड यांसारख्या धुनरागांत बांधलेल्या ठुमरीवजा गती वाजवताना त्यांच्या पेशकशीत एक नखरा असतो. लोकप्रिय नाट्यगीते हा तर त्यांच्या वादनातला अनिवार्य भाग आहे.

वादन हे अधिकतर कंठसंगीताच्या जवळ जावे असा त्यांचा प्रयत्न असतो. हार्मोनिअम या वाद्याच्या स्वतंत्र क्षमतांच्या शोधापेक्षा गायनानुसारी अभिव्यक्ती त्यांच्या वादनात आढळते. व्यामिश्र लयकारीपेक्षा गायनातील बोलतत्त्वाचा वापर करून छोटे छोटे स्वरसमूह वापरून त्यात तालाशी लडिवाळ क्रीडा करणे त्यांच्या वादनात अधिक आहे. अर्थात पी. मधुकर शैलीप्रमाणे सतारीच्या ‘झाल्या’स अनुसरणारा झाला, खटका, कृंतन यांचा वापरही ते करतात. पी. मधुकरांनी बांधलेल्या अनेक ढंगदार गतींचा साठा बोरकरांच्या संग्रहात आहे व त्यांचे ते कौशल्यपूर्ण रंगतदार वादन करतात. त्यांनी १९७५ साली आकाशवाणीवर प्रथमच एकल हार्मोनिअमवादन केले. आजवर अनेक मान्यवर रंगमंचांवरून त्यांनी एकल हार्मोनिअमवादन केले आहे. ‘संवादिनी संमेलनां’मध्येही त्यांचा सहभाग अनेक वर्षे होता.

ब

त्यांनी अनेकांना विद्यादान केले असून अनेक शिष्य तयार केले. त्यांचे 'संवादिनी साधना' (२००१, मुंबई) हे हार्मोनिअमच्या गती, विस्तार व आत्मवृत्त असणारे पुस्तक प्रसिद्ध आहे. या पुस्तकात हार्मोनिअमच्या दृष्टीने तयार केलेल्या अभ्यासक्रमानुसार रागांच्या गती, आलाप-ताना, बोटांचा अनुकूल क्रम, भाता मारण्याचे तंत्र इ. बाबींचे विवेचन केले आहे. सोबत एका ध्वनिफितीमध्ये हा मजकूर ध्वनिमुद्रित स्वरूपात दिल्याने त्याचे श्रवणही करता येते. यामुळे एक 'प्रात्यक्षिक दिग्दर्शिका' (वर्किंग मॅन्युअल) अशा स्वरूपाचे हे पुस्तक विद्यार्थ्यांना उपयुक्त ठरले आहे.

या पुस्तकाचा हिंदी अनुवादही २००७ मध्ये प्रसिद्ध झाला आहे. तुळशीदास बोरकरांचे 'साथ-संगत' हे आत्मवृत्त २००९ साली प्रकाशित झाले.

त्यांनी काही काळ बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शिक्षण विभागातर्फे प्राथमिक व उच्च माध्यमिक मराठी शाळांतून संगीत अध्यापनही केले. वांद्रे येथील 'शारदा संगीत विद्यालया'तही ते २००० पासून पारंपरिक पद्धतीने हार्मोनिअमचे शिक्षण देतात. पुणे व कोल्हापूर येथील विद्यापीठांसाठी त्यांनी हार्मोनिअमचा अभ्यासक्रम तयार करून दिला.

बोरकरांचे योगदान हार्मोनिअमचे गुरू म्हणून मोठे आहे. जयंत फडके, केदार नाफडे, सीमा शिरोडकर, सुधीर नायक, अजय जोगळेकर, रविंद्र चारी, श्रीराम हसबनीस, निरंजन लेले, प्रकाश वगळ हे त्यांचे शिष्य आज व्यावसायिक हार्मोनिअमवादक म्हणून कार्यरत आहेत.

ते अनेक पुरस्कारांचे मानकरी ठरले आहेत. 'गोविंदराव टेंबे संगतकार' पुरस्कार (१९९८, गांधर्व महाविद्यालय, पुणे), 'आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमी गौरव' पुरस्कार (२००१, कोलकाता), 'पं. बंडूभैया चौघुले' पुरस्कार (२००४, इंदूर), संगीत नाटक अकादमी पुरस्कार (२००५, दिल्ली) इ. पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत.

– चैतन्य कुंटे

***

ब



# भवाळकर, उदय वसंत
**धृपद गायक**
**५ फेब्रुवारी १९६६**



उदय वसंत भवाळकर यांचा जन्म मध्यप्रदेशातील उज्जैन येथे झाला. मालती व वसंतराव शंकरराव भवाळकर हे त्यांचे आई-वडील. बालपणात संगीताचे प्राथमिक धडे त्यांनी आपल्या बहिणीकडे (माधवी सुभेदार) घेतले. ख्याल गायकीचे शिक्षण घेत असताना, पंधराव्या वर्षी भोपाळच्या धृपद केंद्राकडून त्यांना धृपदाच्या शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (१९८१ ते १९८५) मिळाली. धृपद गायकीची एकोणीस पिढ्यांची परंपरा असणाऱ्या डागर घराण्याच्या उस्ताद झिया फरिदुद्दीन डागर व त्यांचे ज्येष्ठ बंधू रुद्रवीणावादक उ. झिया मोहिउद्दीन डागर यांच्याकडून उदयजींना बारा वर्षे धृपद गायकीची सखोल तालीम भोपाळ व मुंबई येथे मिळाली.

या गुरुकुल पद्धतीतील पारंपरिक तालमीत गुरूसमोर सातत्याने होणारा रियाझ, चिंतन यांमुळे त्यांनी धृपद गायकीची सर्व अंगे आत्मसात केली. एका मैफलीतील यशस्वी प्रस्तुतीच्या निमित्ताने उ. नसीर अमिनुद्दीन डागर खाँसाहेबांनी १९८७ साली त्यांना सुवर्णपदक दिले. तसेच त्यांना राष्ट्रीय शिष्यवृत्तीही (१९८६ ते १९८९) मिळाली. यानंतर त्यांची धृपद गायक म्हणून लखलखीत कारकीर्द सुरू झाली.

दीर्घ दमसास, सुरेल व श्रुतियुक्त गानोच्चार, नोमतोम आलापचारीतून रागाचा सविस्तर व धीरगंभीर बर्ताव, धृपद-धमारच्या बंदिशी गाताना पखावजच्या तालावर केलेली सहजसुंदर लयक्रीडा या वैशिष्ट्यांमुळे त्यांचे गायन लोकप्रिय ठरले आणि अल्पावधीतच त्यांनी जागतिक कीर्ती प्राप्त केली. त्यांच्यासारखा एक ताज्या दमाचा धृपद गायक रंगमंचावर इतकी उच्च दर्जाची प्रस्तुती करतो हे पाहून नव्या पिढीत या शैलीचे आकर्षण वाढले व त्यामुळे धृपद गायकीचा प्रसार तरुणवर्गात वाढला, हे उदयजींचे मोठे योगदान आहे.

देशविदेशांतील मैफलींत त्यांनी लक्षणीय प्रस्तुती केली आहे. तसेच ‘स्पिकमॅके’ या संस्थेच्या उपक्रमात त्यांचा अनेक वर्षे सहभाग आहे. दूरदर्शन, आकाशवाणीसारख्या माध्यमांतूनही त्यांची कलाप्रस्तुती सातत्याने होत असते. वर्ल्ड म्यूझिक फेस्टिव्हल (इंग्लंड व बेल्जियम), इंटरनॅशनल व्हॉइस फेस्टिव्हल (रॉटरडॅम व बार्सिलोना), इंडियन फेस्टिव्हल (ॲमस्टरडॅम), संगीत परंपरा महोत्सव (बर्लिन), स्फिंक्स महोत्सव (बेल्जियम), क्विन एलिझाबेथ हॉल (लंडन) इ. जागतिक स्तरावरील अनेक महत्त्वाच्या समारोहांत त्यांनी आपली कला सादर केली आहे. संगमसंगीताच्या प्रयोगांतही त्यांनी रुची दाखवून आन्साम्बल मॉडर्न (जर्मनी), समकालिक नर्तनशैलीतील कलाकार अस्ताद देबू, तसेच स्पेन व अमेरिकेतील कलाकारांसह त्यांनी नावीन्यपूर्ण आविष्कार केले आहेत. त्यांच्या गायनाची अनेक व्यावसायिक ध्वनिमुद्रणे जगभरात वाखाणली गेली आहेत. ‘क्लाउड डोअर’, ‘मिस्टर ॲण्ड मिसेस अय्यर’, ‘अनाहत’, ‘रसिकप्रिया-लोकप्रिया’, ‘रीटा’ या चित्रपटांसाठी त्यांनी पार्श्वगायनही केले आहे.

मैफलींसह प्रत्यक्ष अध्यापन व धृपद गायकीवर सप्रयोग व्याख्यानांद्वारे या लुप्तप्राय झालेल्या प्राचीन

संगीत शैलीस पुनरुज्जीवित करण्याचे त्यांच्या गुरुजनांचे कार्य त्यांनी मोठ्या साफल्याने पुढे नेले आहे. पुणे येथील त्यांच्या निवासी गुरुकुलात देशा-विदेशांतून अनेक विद्यार्थी पारंपरिक पद्धतीने धृपद गायकीचे मार्गदर्शन घेतात. कोलकाता येथील संगीत रिसर्च अकादमी, नाशिक येथील संगीत विद्यापीठ यांसारख्या भारतातील, तसेच परदेशात हॉलंड येथील रॉटरडॅम कॉन्झर्व्हेटरिअम ऑफ म्यूझिक व अमेरिकेतील वॉशिंग्टन विद्यापीठाच्या संस्कृती संगीतशास्त्र विभागात उदय भवाळकर निवासी अभ्यागत कलाकार गुरू म्हणून कार्यरत आहेत. त्यांनी युरोपमधील अनेक देशांत कार्यशाळा घेतल्या आहेत.

त्यांनी २००२ साली वीणा फाउण्डेशनची स्थापना केली व त्याद्वारे ते धृपद गायकीचे प्रशिक्षण, प्रसार व मैफलींचे आयोजन करतात. तसेच आर्थिकदृष्ट्या अक्षम विद्यार्थ्यांस धृपदाच्या अभ्यासासाठी शिष्यवृत्तीही दिली जाते. धृपदाच्या प्राचीन परंपरेचा वारसा ते अशा प्रकारे पुढच्या पिढीकडे सोपवण्याचेही कार्य करत आहेत.

‘कुमार गंधर्व सन्मान’ (मध्यप्रदेश सरकार, २००१), ‘विश्व संगीत रत्न’ (डेला हेरिटेज फाउण्डेशन, मुंबई, २००५), रझा फाउण्डेशनचा पुरस्कार (दिल्ली, २००६) यांद्वारे उदयजींना गौरविण्यात आले आहे.

— चैतन्य कुंटे

भ

## भांडारे, लक्ष्मीकांत सदानंद
***भांडारे, भाचूभाई***
**हार्मोनिअमवादक**
**१८७८ — १९०९**

लक्ष्मीकांत सदानंद तथा भाचूभाई भांडारे हे मुंबईतील सुखवस्तू सारस्वत कुटुंबात जन्मले. त्यांचे वास्तव्य झावबाच्या वाडीत होते व भाचूभाईंनी आपल्या अवघ्या बत्तीस वर्षांच्या अल्पायुषी कारकिर्दीत एक हौशी पायपेटीवादक म्हणून पुष्कळ नाव मिळवले होते.

त्या काळात पायपेटी हे वाद्य सर्वसामान्य घरांत पोहोचले नव्हते, त्यामुळे काही मोजक्याच सधन घरांत पायपेटी असे व त्याचा एक फॅशन म्हणूनही वापर होई.



अशा परिस्थितीत भाचूभाई यांनी पायपेटीवादन सुरू केले. रूढ अर्थाने त्यांनी संगीताचे शिक्षण घेतल्याचा उल्लेख आढळत नाही. ठाकूरद्वारचे शेणव्यांचे राममंदिर हे भांडारे कुटुंबाच्या मालकीचे होते व कीर्तनकार ह.भ.प. विनायकबुवा ठाकूरदास यांची तेथे कीर्तने होत. त्यांच्या कीर्तनांची साथ करत भाचूभाईंनी वादनकला साध्य केली.

त्यांना वादनाची देणगी व उपजत सौंदर्यदृष्टी होती. त्यांच्या वादनात नाजूकपणा, गोडवा होता; सर्व थरांतील लोकांना आकर्षून घेईल असे त्यांचे वादन होते. साधारणत: ‘पांढरी दोन’ या स्वरपट्टीत ते एकलवादन करत. यमन वा भूपासारख्या प्रचलित रागांतील गत दहा-पंधरा मिनिटे वाजवून खमाज, पिलू यांसारख्या धुनरागांतील ठुमरी वा धून वाजवावी, एखादी नाचाची वा बॅण्डची धून, मग एखादे रंजक, विनोदी असे उर्दू वा कर्नाटकी पद आधी गायचे व तसेच वाजवून दाखवायचे असा त्यांच्या मैफलीचा थाट असे.

त्यांची साधनसामग्री मर्यादित होती, वाजवण्यात मजकुराचा विस्तार फारसा नसे; पण त्यांनी जे काही वाजवले, त्यात लोकांना खूष करण्याची तरकीब होती. तत्कालीन मुंबईतील कलाकार व रसिकांचे ते आवडते वादक होते. त्यांचा लौकिक महाराष्ट्रभर पसरला होता.

अनेक हौशी नाटक मंडळींच्या ‘बलसिंह-तारा नाटक’सारख्या नाटकांची पदे बसवणे, चाली बांधणे यांसाठी भाचूभाई उत्साहाने सांगीतिक साहाय्य देत असत. ‘शाहू क्रिकेट क्लब’ने ‘रत्नपाल-शशिकला’ या नाटकाची पदे बसवण्यासाठी पाचारण केले असता, कोल्हापूर येथे रावबहादूर शिरगावकर यांच्याकडे त्यांचा दीड-दोन महिने मुक्काम होता.

या काळात गोविंदराव टेंबे यांना भाचूभाईंचा सहवास मिळाला, त्यांचे वादन जवळून ऐकायला, पाहायला

मिळाले. त्यामुळे गोविंदराव भाचूभाईंना वादनातले गुरू मानत असत. भाचूभाईंच्या वादनापासून प्रेरणा घेऊनच पुढे गोविंदराव टेंबे यांनी हार्मोनियमचे एकलवादन सुरू केले व त्याचा प्रभाव पूर्ण महाराष्ट्रावर दीर्घकाळ पडला.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

१. टेंबे, गोविंदराव; *'माझा संगीत व्यासंग'; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, द्वितीय आवृत्ती; १९८४.*

## भांडारे, भाचूभाई

☛ **भांडारे, लक्ष्मीकांत सदानंद**

## भाटे, रोहिणी गणेश

**नर्तिका व गुरू**

**१४ नोव्हेंबर १९२४ – १० ऑक्टोबर २००८**



रोहिणी गणेश भाटे यांचा जन्म बिहार राज्यात पाटणा येथे प्रा. गणेश सदाशिव भाटे आणि लीलाताई यांच्या पोटी झाला. वडिलांचे निधन झाले त्या वेळी रोहिणी भाटे यांचे वय फक्त अडीच वर्षे होते. त्यानंतर त्यांचे कुटुंब पुण्यात स्थलांतरित झाले. रोहिणी भाट्यांच्या वडिलांचे विचार अत्यंत पुरोगामी व क्रांतिकारक होते आणि त्यांच्या आईने त्याच विचारांचा पाठपुरावा करून या सर्व भगिनींना अत्यंत शिस्तीने, तत्त्वनिष्ठतेने व उदार मनाने वाढविले.

पुण्यात मुला-मुलींचे सहशिक्षण असलेल्या भावे स्कूलमध्ये रोहिणी भाट्यांचे शिक्षण झाले. मराठी, संस्कृत, हिंदी व इंग्रजी या भाषांचे त्यांना उत्तम ज्ञान होते. शालेय शिक्षणानंतर त्यांचे भाषांवरील प्रेम, गायनाची आवड व नवीनच लागलेला नृत्याचा छंद पाहून मातु:श्रींनी सल्ला दिला, की कलाशाखेत प्रवेश घ्यावा. त्याप्रमाणे रोहिणी भाटे यांनी मराठी, संस्कृत हे विषय घेऊन फर्गसन महाविद्यालयातून बी.ए.ची पदवी मिळवली.

प्रतिकूल सामाजिक परिस्थिती असूनही आंतरिक दृढनिश्चयामुळे आणि कुटुंबाच्या खंबीर पाठिंब्यामुळे त्यांनी नृत्यकलेत प्रवेश केला. १९४७ साली त्यांचा नृत्यवर्ग सुरू झाला. रोहिणी भाट्यांनी 'नृत्यभारती'ही शास्त्रीय नृत्यकलेची संस्था स्थापन केली आणि तिला समाजात दर्जा व प्रतिष्ठाही मिळवून दिली. जयपूर घराण्यातील ख्यातनाम गुरू पं. मोहनराव कल्याणपूरकर यांची भेट झाली. त्यांच्याकडे लखनौला जाऊन रोहिणीताई विद्याग्रहण करू लागल्या. पहिल्या दोन वर्षांत त्यांनी रोहिणी भाटे यांना विलंबित ते द्रुत लयीपर्यंत, उत्तमोत्तम बंदिशी तीनतालामध्ये शिकवल्या. पुढच्या ३-४ वर्षांतच तालमालेसारखी अनवट रचना (६ ताल व ७० मात्रांचा नगमा) – परणांची मालाही शिकायला मिळाली. तसेच क्रमलय, लयतालातील 'जाती'विचार, विषममात्रांच्या तालांचे ठेके व अर्ध्या मात्रेचा हिशेब करणारे 'भिन्नलोभा' (६॥ मात्रा) व 'चित्ररूपक' (१०॥ मात्रा) अशा अनवट तालांचा परिचय मोहन कल्याणपूरकरांनी करून दिला व या तालांचे (कथक नृत्याच्या एकल प्रस्तुतीबाबत) अत्यंत प्रगत स्वरूप रोहिणी भाटे यांनी निर्माण केले. संगीताच्या आवडीमुळे रोहिणी भाटे केशवराव भोळे आणि वसंतराव देशपांडे यांच्याकडे गायन शिकल्या. त्यानंतर त्यांनी पं. लच्छू महाराज यांच्याकडे कथकचे शिक्षण घेतले. पं. लच्छू महाराज हे लखनौ घराण्यातील नामवंत नर्तक व गुरू होते. रोहिणी भाटे त्यांच्याकडे लखनौ घराण्याच्या खास बंदिशी, रचना शिकल्या. भाव-आमद, गत-निकासमधील चालींची विविधता, 'दक्षयज्ञ' ही कविता, स्व. पं. बिन्दादीन महाराजांच्या काही ठुमऱ्या व गीते हे शिकल्यामुळे त्यांचे नृत्य अधिक सौंदर्यपूर्ण झाले.

या काळाच्या दरम्यान भारतामध्ये विविध ठिकाणी त्यांचे यशस्वी कार्यक्रम, अनेक महत्त्वाच्या कथक महोत्सवांत तर झालेच; परंतु एक दर्जात्मक, विचारवंत, ज्ञानसंपन्न कथक कलाकार म्हणून त्यांच्याकडे पाहिले जाऊ लागले. केवळ भारतातच नव्हे, तर भारताबाहेर

पूर्व जर्मनी (१९८०, १९८७), फ्रान्स (१९७०, १९८५), हॉलंड (१९८७), आफ्रिका (१९८८), अमेरिका व कॅनडा (१९८९), व्हिएतनाम (१९९६), इंग्लंड (१९९८) व जपान अशा देशांत त्यांना आमंत्रित केले जाऊ लागले व ते दौरे अतिशय यशस्वीपणे पार पाडून रोहिणी भाटे ख्यातनाम सुप्रसिद्ध कलाकार म्हणून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर मान्यताप्राप्त झाल्या.

कथक नृत्याकडे पाहण्याचा त्यांचा स्वत:चा स्वतंत्र दृष्टिकोन (शैली) त्यांनी कथकच्या क्षेत्रात रुजवला व वाढवला. हस्तकांची विविधता, लयकारी, ततकार, बोलांची-बंदिशींची विविधता, हावभाव, भावाभिव्यक्ती, भाषेचा वापर, संगीत, अवकाशाचे भान, एकल-युगुल-समूह संरचना, पढंत, काव्य, कथावस्तू, मांडणीतील लालित्य, आहार्य, अभिनय या सर्वच बाबींवर (कथक नृत्याच्या प्रस्तुतीच्या संदर्भात) त्यांनी विस्तृत आणि खोलवर विचार करून स्वत:ची शैली बनवली व त्यामुळेच हे त्यांचे अत्यंत मोलाचे असे योगदान कथक नृत्याला मिळाले.

त्यांच्या अनेकविध संरचनांपैकी काहीच इथे नमूद करीत आहे : तालप्रस्तुतीत नीलताल (७॥ मात्रा), बैजमोहन (८॥ मात्रा), शिखर (१७ मात्रा), लक्ष्मी (१८ मात्रा), गणेश (२१ मात्रा), रूपकथक (समग्र तीनताल), तरंग (तिस्र, चतुस्र, खंड, मिश्र जातीतील आविष्कार), तसेच काव्य-स्वर-ताल अशी समग्र निर्मिती असणाऱ्या 'सिंधुरवदन', 'गणनाथ गौरीसुत', इ. बंदिशी, 'त्रिवेणी' ही त्रिताल, झपताल व रूपक या तीन तालांची गुंफण, अनेक कवित्त, दोहे, वंदना, अभिनयपदांच्या त्यांनी रचना केल्या, तर 'बॅले'सदृश्य नृत्यसंरचनांत मल्हार, ऋतुसंहार, बिंदा कहे, उष:सूक्त, उद्गार, पावस, समय, मौन, उडान, तन्मात्र, पर्जन्यसूक्त या त्यांच्या चिंतनातून साकारलेल्या श्रेष्ठ कलाकृती होत. 'उष:सूक्त'सारखा विषय असो (उष:कालाचे वर्णन करणारा) किंवा 'तन्मात्र'सारखा पंचमहाभूतांवर आधारित व संस्कृत श्लोकांतून उलगडणारा वर्णनात्मक विषय असो, समकालीन विषयात – 'समय' ( थांबलेला काळ व खोडकरपणे पळविणारा काळ) 'कविताली'मधील कठपुतली (समाजातील स्त्रीचे स्वत:च असे ठरवलेले स्थान व स्वातंत्र्य), 'मैं उदास हूँ' (आजच्या पिढीतील सकारात्मक व नकारात्मक वृत्तींचे द्वंद्व) अशा नृत्यांचे यशस्वी अर्थानुवाही सादरीकरण – प्रयोग केले आहेत. याबरोबरच 'पावस', 'ऋतुसंहार', 'मौन' या संरचना, तसेच जपानी हायकूवर नृत्यरचना, रवींद्रनाथ टागोरांच्या गीतांजलीतील वेचक काव्यांवर नृत्यरचना, अशा वैविध्यपूर्ण रचना, तसेच अनेक संगीतरचना, काव्यरचनाही केल्या आहेत.

स्वातंत्र्यपूर्वकाळात महाराष्ट्रात नृत्यकलेला प्रतिष्ठा नव्हती; मात्र रोहिणी भाटे यांच्या सहा दशकांच्या नृत्यसाधनेच्या भरीव योगदानामुळे आज महाराष्ट्रात अभिजात नृत्यशैली रुजल्या, बहरल्या आहेत. त्यांनी मराठी समाजात नृत्यविषयक अभिरुची व सकारात्मक जाणीव निर्माण केली. शरदिनी गोळे, प्रभा मराठे, शमा भाटे, रोशन दात्ये, अमला शेखर, नीलिमा आध्ये, आशा जोगळेकर, संध्या केळकर, शर्वरी जमेनीस, ऋजुता सोमण, मनीषा अभय इ. शिष्यांच्या तीन पिढ्यांद्वारे रोहिणी भाटे यांचे कार्य प्रसारित होत आहे.

रोहिणी भाटे यांना १९७७ साली नृत्यासाठी 'महाराष्ट्र राज्य' पुरस्कार, १९७९ साली 'संगीत नाटक अकॅडमी' पुरस्कार, 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार (१९९०), पुणे विद्यापीठाचा 'जीवनसाधना गौरव' (१९९९) आणि कुसुमाग्रज प्रतिष्ठानातर्फे दिला जाणारा 'गोदावरी गौरव' पुरस्कार १९९४ साली मिळाला. २००२ साली त्यांना 'कालिदास' सन्मान प्राप्त झाला, तर २००४ साली डेक्कन कॉलेजतर्फे त्यांना 'डी.लिट.' ही पदवी प्राप्त झाली. २००६ मध्ये त्यांना संगीत नाटक अकादमीचा 'रत्न' पुरस्कारही मिळाला. रोहिणी भाटे यांनी नृत्यकलेतील मूलभूत, संकल्पनात्मक विचारमूल्ये व सिद्धान्त मांडणारे लेखन केले. त्यातील विचारांची स्पष्टता, व्यापकता व भाषाशैलीही वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांनी 'माझी नृत्यसाधना', 'कथक दर्पण दीपिका' व 'लहेजा' या पुस्तकांचे लेखन केले. अमेरिकन नृत्यकर्मी

इझाडोरा डंकन हिच्या आत्मवृत्ताचा ‘मी इझाडोरा’ हा रोहिणी भाटे यांनी केलेला अनुवाद गाजला होता. वयाच्या ८६व्या वर्षी पुण्यात त्यांचे निधन झाले.

— आसावरी राहाळकर

## भाटे, शमा सनतकुमार

**नर्तिका**

**६ ऑक्टोबर १९५०**



शमा सनतकुमार भाटे यांचा जन्म बेळगाव (कर्नाटक) येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव गंगाधर आबाजी नाईक व आईचे नाव गुलाब होते. पुण्यातील शनिवार पेठेतील मुलींच्या अहिल्यादेवी हायस्कूल या शाळेतून शालेय शिक्षण पूर्ण केल्यानंतर त्यांनी फर्गसन महाविद्यालयातून रसायनशास्त्र या विषयात बी.एस्सी. ही पदवी संपादन केली. मात्र, हे सर्व करत असतानाच शालेय पातळीवर विविध खेळांमध्ये भाग घेणे व त्यांच्या गुरू पं. रोहिणी भाटे यांच्याकडे कथक नृत्याचे शास्त्रोक्त शिक्षण घेणे सुरू होते. बी.एस्सी. झाल्यानंतर मात्र त्या काळी अत्यंत अप्रचलित असलेल्या नृत्याच्या क्षेत्रातच कार्य करण्याचे त्यांनी निश्चित केले व अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळ, मिरज येथील ‘नृत्य अलंकार’ ही पदवी त्यांनी संपादन केली.

या सर्व औपचारिक शिक्षणाच्या बरोबरीने शमा भाटे यांनी त्यांच्या गुरू पं. रोहिणी भाटे यांच्याकडे प्रदीर्घ काळ कथक नृत्याची तालीम घेतली. रोहिणी भाटे यांच्या ‘नृत्यभारती’ या संस्थेमध्ये शिकत असताना त्यांच्या दोन्ही गुरूंकडून : पं. मोहनराव कल्याणपूरकर व पं. लच्छू महाराजजी यांच्याकडून प्रत्यक्षपणे व अप्रत्यक्षपणे कथक नृत्यातील बारकावे शिकण्याचे भाग्य शमा भाटे यांना लाभले. याच काळात आपल्या गुरूंच्या अनेक नृत्यसंरचनांमधून भाग घेत त्यांनी एकल, युगल (आपल्या गुरुभगिनी प्रणती प्रताप यांच्या समवेत) व समूह नृत्यप्रस्तुतींसाठी दौरे केले. १९८५ पर्यंत त्या ‘नृत्यभारती’मध्येच नृत्याच्या शिक्षिका म्हणूनही कार्यरत होत्या.

ताल व लयीचा सखोल अभ्यास करण्याच्या हेतूने शमा भाटे यांनी तालयोगी पं. सुरेश तळवलकर यांचे शिष्यत्व स्वीकारले. पाच वर्षे सुरेशजींच्या मार्गदर्शनाखाली लय-तालाचा अत्यंत सखोल अभ्यास शमाताईंनी केला. याशिवाय त्यांनी गंगाधरबुवा पिंपळखरे यांच्याकडे गायनाचे शिक्षणही घेतले.

या सर्व तालमींची परिणती म्हणून त्यांनी स्वत:ची वैशिष्ट्यपूर्ण शैली निर्माण केली आहे. कथक हे अनिवार्यत: दृक्-श्राव्य माध्यम आहे हा विचार त्यांनी आपल्या शैलीतून रुजवला आणि त्यामुळेच कथकमधील परंपरागत सौंदर्य व लालित्याच्या बरोबरीने लयकारीतील अचूकता व छंदांतील श्राव्यविविधता त्यांच्या नृत्यशैलीची वैशिष्ट्ये होत. तबल्याच्या परंपरेत प्रचलित असलेल्या ‘धाकिड्तक धुमकिड्तक धेत्ता किड्धेत्ता’, ‘धाकिट धिन् ताकिट धिन् ता’ आदी बंदिशी, तबल्याच्याच फरूखाबादी बंदिशी, विविध तालांतील नवनवीन छंद, अनेक प्रकारचे अवघड व अप्रचलित दम असलेल्या तिहाई / बंदिशी त्यांनी कथकच्या परंपरेत आणल्या. त्याचबरोबर ‘भस्मासुर-मोहिनी’, ‘रेणुका-गौतम’, ‘समुद्रमंथन’ अशा अनवट कथांवर रचलेले गतभाव, पंचजाती तीनताल हे त्यांचे कथकच्या क्षेत्राला योगदान आहे.

आज त्या कथक नृत्यातील अग्रगण्य नृत्यसंरचनाकार म्हणून ओळखल्या जातात. पारंपरिक ते आधुनिक अशा बहुविध विषयांवरील त्यांच्या अनेक नृत्यसंरचनांपैकी काही खाली नमूद करीत आहे : ‘पर्स्पेक्टिव्ह’ (उ. शाहिद परवेझ यांच्या सतारीवर आधारित), ‘दुर्गाम् त्रिनेत्राम् भजे’ (देवी दुर्गेची विविध रूपे), ‘एन्काउण्टर’ (जॉन मॅक्लॉलिन यांच्या जॅझ संगीतावर आधारित), ‘कृष्णगान’, ‘रिदम कोलाज’ (ऑस्ट्रियन जॅझ बॅण्ड अक्कूबरोबर), ‘फ्रेंच पोएम्स’ (चार्ल्स बोदलेर या फ्रेंच

कवीच्या कवितांवर आधारित), ‘नाद-बिंदू’ (सैयद हैदर रझा यांच्या चित्रांवर आधारित), ‘नि:शब्द भेद’ (‘ल मोन्द द्यू सीलाँस’ या समुद्री जीवनावरील माहितीपटावर आधारित), ‘पीड पराई जाणे रे’ (कस्तुरबा गांधींच्या जीवनावर आधारित), ‘यत्र नार्यस्तु पूज्यन्ते’ (स्त्री-भ्रूणहत्या) इ. १९९३ साली त्यांनी ‘नाद-रूप’ ही नृत्य व संगीताचे शिक्षण देणारी संस्था स्थापन केली. गेल्या २५ वर्षांत या संस्थेने अनेक व्यावसायिक नर्तिका कथक नृत्याच्या क्षेत्राला दिल्या आहेत. या संस्थेच्या माध्यमातून शमा भाटे यांनी अनेक नामांकित नर्तकांना कार्यक्रम, कार्यशाळा, व्याख्यानांच्या निमित्ताने पुण्यात आमंत्रित केले, तसेच अनेक प्रख्यात गायक-वादक कलाकारांनाही आमंत्रित केले.

आज त्या ‘नाद-रूप’च्या संस्थापिका-संचालिका म्हणून कार्यरत आहेत. याव्यतिरिक्त ललित कला केंद्र (पुणे विद्यापीठ), कला अकादमी (गोवा), कथक केंद्र (दिल्ली) यांच्या सल्लागार समित्यांतही त्या कार्यरत आहेत. ललित कला केंद्राच्या त्या मानद गुरू आहेत, तसेच नालंदा डान्स रिसर्च सेंटर (मुंबई) व कला अकादमी (गोवा) येथे त्या अध्यागत शिक्षक म्हणून कार्यरत आहेत. याव्यतिरिक्त कार्यक्रम -कार्यशाळा इ.च्या निमित्ताने भारतभर, तसेच इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, ऑस्ट्रिया, मलेशिया, सिंगापूर इ. देशांत त्यांचे दौरे झाले आहेत. मतिमंद व स्पॅस्टिक मुलांसाठी नृत्याद्वारे उपचार यांसारख्या कार्यशाळांद्वारे त्यांचे कार्य विस्तारतच आहे. त्यांच्या या कार्याची दखल घेत महाराष्ट्र राज्य सरकारच्या संस्कृती विभागाचा पुरस्कार त्यांना २०११ साली देण्यात आला.

— शिल्पा भिडे

भ

## भातखंडे, विष्णू नारायण

**संगीतशास्त्रकार**

**१० ऑगस्ट १८६० – १९ सप्टेंबर १९३६**



भारताच्या इतिहासात एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध हा नवजागृतीचा, अत्यंत उज्ज्वल असा एक कालखंड मानला जातो. साधारणत: १८५० ते १९०० या अर्धशतकाच्या कालावधीत भारताच्या क्षितिजावर राष्ट्रकार्याला जीवन अर्पण करणाऱ्या अनेक स्वार्थत्यागी व्यक्तींचा उदय झाला. नवे विचार, नवे ध्येयवाद आणि नवे वैज्ञानिक दृष्टिकोन यांच्यामुळे सुशिक्षित वर्गाच्या मनात नव्या जाणिवा निर्माण होत होत्या, तेव्हा अशा या सर्वांगीण वैचारिक मंथनापासून संगीतकलेचे क्षेत्र अलिप्त राहणे शक्य नव्हते. त्या काळाची परिस्थिती लक्षात घेता, संगीतक्षेत्रातील आपली पूर्वकालीन प्रगती व प्रतिष्ठा पुन्हा साध्य करणे आवश्यक झाले होते. आणि म्हणून नवे विचार व जाणिवा, त्याचप्रमाणे जागृती व सुधारणा यांच्याद्वारे स्थित्यंतर घडवून आणणे अपरिहार्य झाले होते. ईश्वरकृपेने हे महान व अवघड कार्य पार पाडण्यासाठी या भूतलावर दोन विष्णूंनी (पं. विष्णू नारायण भातखंडे व पं. विष्णू दिगंबर पलुसकर) जन्म घेतला आणि संगीतोद्धाराच्याच कार्याला जीवनसर्वस्व वाहून घेतले.

पं. विष्णू नारायण भातखंडे यांचा जन्म शके १७८२ च्या श्रीकृष्ण जन्माष्टमीच्या शुभदिनी, अर्थात इ.स. १८६० च्या शुक्रवार, दि. १० ऑगस्ट रोजी सकाळी साडेआठ वाजता बाणगंगा, वाळकेश्वर येथे झाला. त्यांचे वडील श्री. नारायणराव भातखंडे हे मुंबईतील एका मोठ्या मालमत्तेचे वहिवाटदार व हिशेब तपासनीस होते. त्यांना तीन पुत्र व दोन कन्या अशी पाच अपत्ये झाली. थोरले चिरंजीव अप्पाजी हे मुंबई प्रांताच्या पोलीस खात्यात अधिकारी होते. दुसऱ्याचे नाव गजानन असे होते; परंतु ते विष्णू या नावाने ओळखले जात.

भातखंडे कुटुंब कोकणातील नागाव या खेड्यातून मुंबईस आले होते. येथील समुद्रकिनाऱ्यालगत असलेल्या ‘मलबार हिल’ नावाच्या टेकडीच्या पायथ्याशी, वालुकेश्वर नावाने प्रसिद्ध असलेल्या पवित्र

देवस्थानी ते राहत असत. कुटुंबाचे कुलदैवत दत्तात्रेय असल्यामुळे नारायणरावांच्या घरी छोटेसे दत्तमंदिर होते.

लहानग्या विष्णूमध्ये संगीताचे बीज बाल्यावस्थेपासून उत्कटतेने रुजले होते व लहानपणी सुस्वर कंठाने बालगीते व कविता गाऊन त्याने शाळेत बक्षिसेही मिळवली. पुढे त्यास बासरी वाजविण्याचा नाद लागला. वाळकेश्वरच्या वस्तीत तेथील रहिवासी धार्मिक उत्सव साजरे करीत. अशा उत्सवांतील कार्यक्रमांत लहानसा विष्णू आपले गायन व बासरीवादन करीत असे.

त्यांचे शालेय शिक्षण घरापासून पाच-सहा मैल दूर, परळनजीक एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये झाले. पुढे १८८० मध्ये त्यांनी एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये प्रवेश घेतला व १८८५ मध्ये ते बी.ए.ची परीक्षा आणि १८८७ मध्ये एल.एल.बी.ची परीक्षा उत्तीर्ण झाले.

कॉलेजमध्ये असताना त्यांना सतार वाजविण्याचा छंद लागला. वाळकेश्वर येथे राहणाऱ्या एका अंध सतार व बीनवादनकार वल्लभदास दामुलजी यांच्याकडे त्यांनी सतारवादनाचे शिक्षण घेतले. घरी आई-वडिलांचा विरोध असणार हे ओळखून त्यांच्या नकळत, रात्री उशिरा विष्णू वल्लभदासांकडे तालमीला जात असत. कॉलेजचे शिक्षण पूर्ण होईपर्यंत त्यांनी सतारवादनात बरीच प्रगती केली होती व बऱ्याच लहान, खाजगी बैठकांत विष्णू सतारवादन करीत असत.

१८८७ ते १८८९ या दोन वर्षांत त्यांनी कराची येथे वकिली केली. वकिलीच्या व्यवसायात 'क्रिमिनल लॉ' व 'अ‍ॅक्ट ऑफ एव्हिडन्स' ही त्यांची विशेषता होती. त्यानंतर १८८९ ते १९१० पर्यंत त्यांनी मुंबईत वकिली चालविली व त्याचबरोबर ते कायदे-शिक्षणाचे वर्गही घेत असत. उलटतपासणीत त्यांचा हातखंडा होता व प्रत्येक खटला ते हमखास जिंकत असत. त्यांनी एव्हिडन्स अ‍ॅक्टची कलमे श्लोकबद्ध रचून वर्गात शिकविली. त्यामुळे विद्यार्थी ती कलमे व पोट-कलमे चटकन तोंडपाठ करू शकत.

मुंबईतील पारशी लोकांनी स्थापन करून चालविलेल्या 'गायन-उत्तेजक मंडळी' नामक संस्थेत इ.स. १८८४ मध्ये त्यांनी प्रवेश मिळवला. या मंडळात शिकवणारे एक गायक रावजीबुवा बेलबागकर यांच्याकडून भातखंडे यांनी जवळजवळ ३०० धृपदांची तालीम घेऊन ती कंठस्थ केली. याच मंडळात नोकरी करीत असलेले उस्ताद अली हुसेनखाँ व त्यांचे मामा विलायत हुसेनखाँ यांच्याकडून त्यांनी अदमासे १५० ख्यालांची तालीम घेतली व त्या सर्व बंदिशी स्वरबद्ध करून ठेवल्या.

१८९० पर्यंत त्यांनी गायन-उत्तेजक मंडळीत शिक्षण घेतले. इ.स. १८९० ते १९०५ या काळात त्यांनी जर्मन, ग्रीक, इंग्रजी, संस्कृत, हिंदी, तेलुगू, बंगाली आणि गुजराती भाषांमधील उपलब्ध प्राचीन व अर्वाचीन संगीतविषयक साहित्याचा संग्रह करून मनन व पठण केले. १८९६ मध्ये त्यांनी पश्चिम भारत यात्रा केली आणि सुरत, भडोच, बडोदा, नवसारी, अहमदाबाद, राजकोट, भावनगर इ. प्रमुख शहरांतील ग्रंथसंग्रहालयांना भेटी देऊन महत्त्वाची ऐतिहासिक माहिती मिळवली.

१९०० मध्ये धर्मपत्नी श्रीमती मधूबाई आणि १९०३ मध्ये त्यांची कन्या सीताबाई यांचे निधन झाले. त्यामुळे प्रापंचिक जबाबदारीतून मुक्त होऊन विरक्ती निर्माण झाली. याच काळात भातखंडे यांनी जयपूर घराण्याचे प्रसिद्ध गायक उ. आशिक अलीखाँ व उ. महम्मद अलीखाँ यांच्याकडून गीतांचा संग्रह करण्यास आरंभ केला. त्यांनी भारतीय संगीतातील साहित्याचा अभ्यास व संकलन करण्याच्या उद्देशाने देशव्यापी भ्रमण करण्याची योजना केली.

१९०४ मध्ये त्यांनी दक्षिण भारत यात्रा केली. त्या यात्रेत त्यांनी अनेक शहरांतील ग्रंथालयांना भेटी दिल्या व ग्रंथसंग्रह केले. अनेक विद्वानांशी चर्चा केली व दक्षिणोत्तर संगीतपद्धतींच्या एकात्मतेचे सूत्र, थाट-मेल, तज्ज्ञ रागवर्गीकरणाच्या उपयुक्ततेबद्दल आपले विचार मांडले. या यात्रेत त्यांनी 'चतुर्दण्डिप्रकाशिका' नावाच्या ग्रंथाचा निर्माता पं. व्यंकटमखी यांचे वंशज सुब्राम दीक्षितार यांची भेट घेऊन उपयुक्त माहिती मिळवली व 'चतुर्दण्डिप्रकाशिका'ची हस्तलिखित प्रत

भ

मिळवली. त्याचबरोबर ग्रंथालयातून पं. रामामात्य लिखित 'स्वरमेलकलानिधि', 'संगीत सारामृत' व 'रागलक्षण' या ग्रंथाच्या नकला करवून घेतल्या. मुंबईस परत आल्यावर त्यांनी ते सर्व ग्रंथ छापून घेऊन प्रसिद्ध केले.

१९०६ व १९०७ मध्ये त्यांनी पूर्व भारताची यात्रा केली. या यात्रेत पं. भातखंडे यांनी नागपूर, कलकत्ता, जगन्नाथपुरी इ. प्रमुख शहरांतील ग्रंथालयांना भेटी दिल्या आणि उपयुक्त सांगीतिक साहित्याचा संग्रह केला. विशेष म्हणजे या यात्रेत पं. काशिनाथ ऊर्फ अप्पा तुलसी आणि राजा सर सौरेंद्रमोहन टागोर यांच्याबरोबर विस्तृतपणे विचारांचे आदानप्रदान केले. १९०८ मध्ये त्यांनी उत्तर भारतात भ्रमण करून अनेक महत्त्वाच्या ग्रंथसंग्रहालयांना भेटी दिल्या. विशेष करून बीकानेर येथील प्रसिद्ध अनुप ग्रंथसंग्रहालयामधून पुष्कळ महत्त्वाचे साहित्य संग्रहित केले आणि अलाहाबाद येथील पं. श्रीकृष्ण जोशी यांच्या मदतीने लोचन पंडितांच्या 'रागतरंगिणी' या ग्रंथाची एक प्रत मिळवली.

इ.स. १८९६ ते १९०८ दरम्यान भारताचे सर्व दौरे संपविल्यावर संग्रहित केलेले प्राचीन व अर्वाचीन ग्रंथ, महत्त्वाचे हस्तलिखित साहित्य, प्रवासांची दैनंदिन तारीखवार हकिकत, त्याचप्रमाणे अनेक कलाकार व संगीतज्ञांशी केलेली विस्तृत चर्चा या सर्वांचे त्यांनी सूक्ष्म अध्ययन करण्यास सुरुवात केली. त्यातून काही प्रश्न उद्भवले. प्राचीन ग्राम-मूर्च्छना, जाति-राग- पद्धतीशी पुढील काळातल्या राग-रागिणी व मेल-रागपद्धतीचा काही मेळ जमतो का हे शोधून काढण्याचा त्यांनी खूप प्रयत्न केला. संपूर्ण भारतात या शंकांचे समाधान करणारा कोणीही विद्वान त्यांना आढळला नाही.

आपल्या सर्व मुद्यांबाबत एक विस्तृत प्रश्नपत्रिका ते आपल्याजवळ नित्य बाळगीत असत व दौऱ्यावर असताना भेटलेल्या गायक-वादकांशी व शास्त्री-पंडितांशी त्याविषयी चर्चा करीत असत. शारंगदेव लिखित 'संगीत रत्नाकर' या ग्रंथापूर्वी व नंतरच्या काळातील प्रचलित संगीतपद्धतींचा परस्पर मेळ बसविणे अशक्य आहे अशी पक्की खात्री झाल्यावर त्यांनी नवीन संगीतशास्त्र लिहिण्यास सुरुवात केली.

१९०९ मध्ये त्यांनी 'श्रीमल्लक्ष्यसंगीतम्' नावाचा श्लोकबद्ध ग्रंथ संस्कृत भाषेत लिहिण्यास आरंभ केला व १९१० मध्ये तो प्रकाशित केला. पुढे त्याचीच टीका म्हणून 'हिन्दुस्थानी संगीत-पद्धती' भाग १ ते ४ हे मराठी भाषेत लिहिले व प्रकाशित केले. या ग्रंथांत हिंदुस्थानी संगीताचे मूळ सिद्धान्त परंपरागत घराणेदार चिजांच्या आधारावर मांडले आहेत. कल्याण, बिलावल, खमाज वगैरे दहा थाटांच्या रागांचे नियम व विस्तारपूर्वक वर्णन, प्रत्येक रागाच्या पूर्वपीठिकेसहित, प्राचीन ग्रंथांतील त्या-त्या रागांची वर्णने व ते राग कालानुसार बदलत जाऊन आपापल्या प्रचलित स्वरूपांपर्यंत कसकसे पोहोचले इत्यादी माहिती व त्याचे आजचे स्वरूप, शेवटी थोडक्यात रागविस्तारासह दिले आहे.

१९१० मध्ये त्यांनी वकिलीचा पेशा सोडून दिला व उर्वरित सर्व जीवन संगीतसेवेसाठी अर्पण केले. १९११ मध्ये आपले शिष्य श्रीकृष्ण नारायण रातंजनकर यांना त्यांनी प्रत्यक्ष तालीम देण्यास आरंभ केला.

१९११ मध्ये रतनसी लीलाधर व वाडीलाल शिवराम यांच्या मदतीने भातखंडे यांनी 'संगीत रत्नाकर' व 'संगीत दर्पण' या ग्रंथांच्या स्वराध्यायांच्या मूळ पाठासहित गुजरातीमध्ये भाषांतर करून प्रकाशित केले. याच वर्षात स्वत: रचलेली सर्व रागांतील लक्षणगीते त्यांनी प्रकाशित करण्यास सुरुवात केली. याच काळात त्यांनी स्वरचित 'अष्टोत्तरशतताललक्षणम्' या शीर्षकांतर्गत तालशास्त्रावर संस्कृत भाषेत एक पुस्तिका प्रकाशित केली, तसेच अप्पाशास्त्री तुलसी रचित 'रागकल्पद्रुमांकुर' या ग्रंथाचे प्रकाशनही केले.

१९१२ साली त्यांनी उत्तर भारतीय संगीतावर आधारित पुण्डरीक विठ्ठल लिखित 'सद्राग-चंद्रोदय' या ग्रंथाचे प्रकाशन केले. पुढे १९१३ मध्ये त्यांनी 'हिन्दुस्थानी संगीतपद्धतीचे भाष्य' या ग्रंथाचे लेखन व प्रकाशन केले. १९१४ मध्ये त्यांनी अप्पा तुलसी लिखित 'अभिनव-ताल-मंजिरी' या पुस्तकाचे प्रकाशन केले.

त्याबरोबर ‘रागलक्षणम्’, पुण्डरीक विठ्ठल लिखित ‘रागमाला’ तथा ‘रागमंजिरी’ या ग्रंथांचे प्रकाशन केले. त्याशिवाय सर्व लोकप्रिय रागांत तालबद्ध स्वररचना अथवा सरगमींची ‘स्वरमालिका’ या नावाने एक छोटी पुस्तिकाही प्रसिद्ध केली. त्यात सुमारे १०० स्वररचना आहेत.

सुमारे १९१५ मध्ये बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांच्याशी विष्णू भातखंडे यांची प्रथम भेट झाली. या भेटीत संगीताच्या शिक्षणाबद्दलची प्रगती होण्यासाठी चर्चा झाली. संगीतातील पारंपरिक गुरु-शिष्य पद्धतीच्या तत्त्वानुसार विद्यालयीन शिक्षण योजना आखण्यासाठी व त्याकरिता पाठ्यपुस्तकांची आवश्यक निर्मिती करणे आणि मुख्यत: घराण्या-घराण्यांतील रागरागिण्यांचे नियम, चिजांचे पाठ यांतील मतभेद मिटवण्यासाठी भारतातील सर्व घराणेदार गायक-वादक व संगीत शास्त्रज्ञांना एकत्र बोलावून चर्चा करणे यासाठी अखिल भारतीय संगीत परिषदेचे आयोजन करण्याची आवश्यकता पं. भातखंडे यांनी सयाजीरावांना पटवून दिली. १९१६ च्या मार्च महिन्यात, होळीच्या दिवसांत पहिली अखिल भारतीय संगीत परिषद भरविण्याचे संपूर्ण श्रेय पं. भातखंडे यांना देण्यात आले.

१९१७ मध्ये भातखंडे यांच्या मातु:श्री बालूबाई यांचे निधन झाले. या वर्षात गायन-उत्तेजक मंडळींच्या नव्या व्यवस्थापकांशी काही मतभेद झाल्यामुळे पंडितजींनी राजीनामा दिला आणि ‘गुड लाइफ लिग’ नावाच्या पारशी लोकांच्याच दुसऱ्या एका संस्थेच्या जागेत, फ्लोरा फाउण्टनजवळ ‘शारदा संगीत मंडळ’ नावाने स्वतंत्र मंडळ स्थापन केले व गायनाचे वर्ग चालविण्यास सुरुवात केली. यात वाडीलालजी त्यांना साहाय्य करू लागले. याच वर्षात ग्वाल्हेर नरेश माधवराव शिंदे यांच्याशी पंडितजींची ओळख व ऐतिहासिक भेट झाली. पुढे १९१८ मध्ये ग्वाल्हेर येथे पं. भातखंडे यांनी माधव संगीत महाविद्यालयाची स्थापना केली. शहराच्या मध्यभागी गोरखी नावाच्या इमारतीत हे विद्यालय सुरू झाले.

१९१८ च्या डिसेंबर महिन्यात दिल्ली येथील दुसऱ्या अखिल भारतीय संगीत परिषदेचे आयोजन करण्यात आले. त्या परिषदेचे अध्यक्ष स्वत: रामपूरचे नवाब हमीद अली खाँसाहेब होते. या परिषदेत रामपूर परंपरेतील बंदिशींच्या आधारावर रागांच्या स्वरूपांवर खुली चर्चा झाली. याच कालावधीत ‘हृदयकौतुक’, ‘हृदयप्रकाश’, ‘राग-तरंगिणी’, ‘रागतत्त्वविबोध’, ‘सुगम रागमाला’, ‘चतुर्दण्डिप्रकाशिका’ इत्यादी ग्रंथांचे प्रकाशन पंडितजींनी केले.

मध्यंतरी बडोद्याच्या गायनशाळेची पुनर्रचना पं. भातखंडे यांच्या नेतृत्वाने झाली होती. १९२० मध्ये बडोदा व ग्वाल्हेरच्या विद्यालयांकरिता पाठ्यक्रमाचे निर्धारण व पाठ्यपुस्तकांची व्यवस्था करण्यात आली. यानंतर १९१९ च्या नोव्हेंबर महिन्यात बनारस येथे तृतीय अखिल भारतीय संगीत परिषदेचे आयोजन झाले. १९२४ व १९२५ मध्ये क्रमश: चौथ्या व पाचव्या (अखेरच्या) अखिल भारतीय संगीत परिषदांचे आयोजन लखनौ येथे पं. भातखंडे यांच्या नेतृत्वाखाली पार पडले.

अखेरच्या संगीत परिषदेचा मुख्य उद्देश लखनौ येथे संगीताचे शिक्षण देणारी संस्था स्थापण्याबाबत ठराव पास करून घेणे हा होता व तो सर्वानुमते पास झाला. या ऐतिहासिक परिषदेत त्या वेळचे शिक्षणमंत्री राय राजेश्वर बली यांनी त्या वेळचे उत्तर प्रदेशचे गव्हर्नरसाहेब सर विल्यम मॉरिस यांच्याशी संपर्क साधून त्यांना त्या परिषदेचे अध्यक्ष होण्याची विनंती केली आणि त्यांनी ती आनंदाने मान्य केली. त्यानंतर दि. १६ सप्टेंबर १९२६ रोजी गव्हर्नर साहेबांच्या उपस्थितीत ‘मॉरिस कॉलेज ऑफ हिन्दुस्थानी म्यूझिक’ या नावाने कैसरबाग बारादरीमध्ये गायनवर्ग सुरू झाले.

त्या सुमारास पं. भातखंडे यांनी आपल्या जीवनातील बहुतेक कार्य संपविले होते. १९३० साली त्यांनी ‘हिंदुस्थानी संगीत पद्धती’चा चौथा भाग लिहून पूर्ण केला व १९३२ मध्ये प्रसिद्ध केला. मॉरिस कॉलेजमधून त्यांनी ‘संगीत’ या नावाचे एक त्रैमासिक १९३० साली प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. पं. भातखंडे स्वत: या मासिकात संगीतावर लेख लिहीत असत. पंधराव्या,

सोळाव्या, सतराव्या व अठराव्या शतकांतील काही प्रमुख संगीतपद्धतींचे तुलनात्मक विवरण त्यांनी हप्त्याहप्त्याने या त्रैमासिकात प्रसिद्ध केले. पुढे १९४० नंतर ते सर्व लेख पुस्तकरूपात प्रसिद्ध झाले.

लखनौच्या मॉरिस महाविद्यालयातून कित्येक नामवंत व गुणसंपन्न पदवीधर बाहेर पडले असून ते इतर संगीत संस्थांमध्ये व अखिल भारतीय नभोवाणीमध्ये मोठ्या हुद्द्यांवर कार्य करीत आहेत. आपल्या उतारवयात पं. भातखंडे यांनी १९३३ मध्ये मॉरिस महाविद्यालयाला अखेरची भेट दिली. त्यांचे मुंबईत १९ सप्टेंबर १९३६ रोजी गणेश चतुर्थीच्या दिवशी पक्षाघाताच्या आजाराने देहावसान झाले.

एक संशोधक व ग्रंथकार या रूपांत त्यांची कामगिरी प्रचंड आहे. भरतनाट्यशास्त्रापासून एकोणिसाव्या शतकापर्यंतच्या सर्व संकलित ग्रंथांचे परिशीलन करून त्यांनी मराठी, इंग्रजी व संस्कृत भाषांतून जवळजवळ ३००० पृष्ठांचे संगीतसाहित्य निर्माण करून भावी पिढ्यांसाठी ज्ञानदानाची कायमची सोय करून ठेवली आहे. त्यांनी वर्तमान प्रचलित संगीताला पोषक अशा ज्या नवीन शास्त्राची मुळापासून उभारणी केली, त्याचा प्रचार-प्रसार करण्यासाठी प्रत्यक्ष गायन व शास्त्र यांचा समन्वय साधून संगीताची नवीन शिक्षणपद्धती तयार केली व त्यासाठी सुसूत्र असा अभ्यासक्रम आखला, पाठ्यपुस्तकेही तयार केली.

भ

निरनिराळ्या घराण्यांच्या सुमारे २००० चिजा पं. भातखंडे यांनी शिकून घेतल्या व त्या क्रमिक पुस्तक मालिका भाग १ ते ६ मध्ये स्वरलिप्यांसहित छापून प्रकाशित केल्या. त्याव्यतिरिक्त त्यांत सर्व रागांचे वर्णन, राग-नियम आणि स्वर-विस्तारही दिले आहेत. त्यांनी प्रत्येक रागात स्वरमालिका व लक्षणगीते लिहिली. ‘चतुर’ व ‘हररंग’ या टोपणनावांनी त्यांनी एकूण ४०० बंदिशी रचल्या आहेत. या सर्व रचनांचा समावेश क्रमिक पुस्तक-मालिकांमध्ये झाला आहे. पं. भातखंडे यांनी पद्मभूषण पं. श्री.ना. रातंजनकर, पं. वाडीलाल शिवराम नायक, शंकरराव कर्नाड, सीताराम मोदी व खोरशेद मिनोचर होमजीसारखे शिष्य तयार केले. पं. विष्णू नारायण भातखंडे हे केवळ एक शास्त्रकार व ग्रंथकारच नव्हते, तर ते एक उच्च कोटीचे वाग्गेयकार, गायक व उत्तम गुरूही होते.

— प्रा. यशवंत महाले

## भिडे-चापेकर, सुचेता अनिल

**नर्तिका**

**६ डिसेंबर १९४८**



‘भरतनाट्यम्’ या दाक्षिणात्य नृत्यशैलीस महाराष्ट्रात लोकप्रिय करणाऱ्या पहिल्या कलाकार, उत्तम नृत्यांगना, विदुषी, गुरू, संशोधक, विचारप्रवर्तक आणि प्रसारक अशा विविध भूमिकांमधून महाराष्ट्रातील रसिकांपर्यंत नृत्य पोहोचवण्याचे मूलभूत कार्य करणाऱ्या सुचेता भिडे यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांची आई वीणा या संगीताच्या अभ्यासक होत्या, तर वडील विश्वनाथ भिडे हे उत्तम चित्रकार होते.

लहान वयातच आचार्य पार्वतीकुमार यांच्याकडे सुचेता भिड्यांचे भरतनाट्यम्चे शिस्तबद्ध शिक्षण सुरू झाले. त्यांच्याच मार्गदर्शनातून तंजावर येथे मराठी राजवटीत लिहिल्या गेलेल्या मराठी काव्यांवर आधारित पहिले भरतनाट्यम् सादरीकरण सुचेता भिडे यांनी केले. पुढे तंजावरमधील गुरू किटप्पा पिल्लै यांच्याकडे अनेक पारंपरिक रचना शिकत असताना नृत्याची सांगीतिक बाजू आणि इतर बारकावे बघण्याची त्यांची दृष्टी तयार झाली.

तंजावरमधील मराठी राजे शहाजी आणि सरफोजी भोसले यांच्या रचनांचे संशोधन, संकलन करून ती काव्ये संगीतबद्ध करून घेऊन त्यांचे सादरीकरण करण्याचे महत्त्वाचे योगदान त्यांनी भरतनाट्यम् शैलीच्या कलाकारांसाठी दिले. महाराष्ट्रातील रसिक भरतनाट्यम्

शैलीच्या जवळ येण्यास हे संशोधन आणि सादरीकरण पायाभूत ठरले.

नृत्यसाधनेबरोबरच मुंबईच्या जे.जे. स्कूल ऑफ आर्ट या कला महाविद्यालयातून घेतलेला डिप्लोमा, कर्नाटक संगीताचे श्रीमती कृष्णन यांच्याकडील शिक्षण, अथक परिश्रम, जिज्ञासा, अभ्यास या सर्वांमधून त्यांचे नृत्य परिपूर्ण होण्यास मदत झाली. त्यांनी १९६३ साली नृत्याचा पहिला जाहीर कार्यक्रम म्हणजे अरंगेत्रम् सादर केल्यानंतर अनेक नृत्यमहोत्सव, सभा, परिषदा इ. मधून महाराष्ट्र आणि भारतभर, तसेच लंडन, पॅरिस, फ्रान्स, जर्मनी, इटली, ऑस्ट्रेलिया, अमेरिका, न्यूझीलंड अशा परदेशांमध्ये कार्यक्रम केले. दूरदर्शन, एज्युकेशन मीडिया रिसर्च यांसाठी नृत्यावरील शैक्षणिक मालिका सादर केल्या.

डॉ. अनिलकुमार चापेकर यांच्याशी १९७४ साली विवाहबद्ध झाल्यावर घरातील सर्व जबाबदाऱ्या हसतमुखाने स्वीकारणारी गृहिणी आणि आपल्या ओघवत्या आणि रसाळ निवेदनांमधून नृत्याचे अनेक कार्यक्रम रंगवत नेणारी कलाकार, या दोन्ही भूमिका त्यांनी समर्थपणे पेलल्या. नृत्यातील अंगशुद्धता, रेखा, सौष्ठव या सर्वांचा समन्वय, अत्यंत सहज होणारा तरल अभिनय, शास्त्रशुद्धता आणि कल्पकता, बुद्धी आणि सौंदर्यवाद या सर्वांचा चपखल असा मेळ साधणारी त्यांची सादरीकरणाची शैली आहे.

एक शिक्षक म्हणून शिकवत असताना त्यात पूर्णपणे रमून जाणे, हातचे काहीही राखून न ठेवता ज्ञानाचे भांडार पूर्णपणे आपल्या शिष्यांपुढे खुले करणे, नृत्याच्या संगीत, साहित्य, शिल्प, चित्र या विविध आयामांवर उत्तम विवेचन करणे, यापलीकडे जाऊन शिष्याची स्वभाववैशिष्ट्ये, गुण-अवगुण, अधिक-वजा क्षमता आणि मानसिकता या सर्वांचा विचार करून त्याला योग्य पथावरून नेण्याचे, खऱ्या अर्थाने एका गुरूचे कार्य त्या करत असतात.

एखाद्या निरागस मुलामध्ये दिसणारी उत्सुकता, उत्साह आणि एखाद्या तत्त्वज्ञाठायी असणारी स्थितप्रज्ञता आणि विवेक यांचे अजब मिश्रण हे सुचेता भिडे-चापेकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

नृत्यकला ही आपल्या दैनंदिन जीवनाचाच एक भाग आहे असे मानणाऱ्या आणि तसा विश्वास रसिकांच्या मनांत निर्माण करणाऱ्या सुचेता या अतिशय संवेदनशील कलाकार आहेत. नृत्याचा प्रसार आणि नृत्यरसिक निर्माण करण्याचे व्रत स्वीकारून आपल्या ‘कलावर्धिनी चॅरिटेबल ट्रस्ट’ या संस्थेतर्फे नृत्याचे शिक्षण देणाऱ्या अनेक शाखा त्यांच्या मेहनतीतून उभ्या राहिल्या. नृत्याच्या कार्यशाळा, व्याख्याने, चर्चासत्रे या सर्वांमधून त्यांचा मोठा शिष्यपरिवार आणि रसिकवर्ग तयार झाला आहे. भरतनाट्यम् नृत्याच्या अनेक पैलूंवर अगदी मार्मिक विचार मांडणारे ‘नृत्यात्मिका’ हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. उत्तर भारतीय संगीत आणि भरतनाट्यम् या दाक्षिणात्य शैलीचे तंत्र यांचा सखोल अभ्यास करून दोन्हींचा समन्वय साधणारी ‘नृत्यगंगा’ ही सादरीकरणाची खास शैली त्यांनी निर्माण केली, आणि नृत्यगंगा सादरीकरणही लोकप्रिय झाले.

त्यांना आतापर्यंत ‘महाराष्ट्र गौरव’, ‘नृत्यविलास’, ‘सु.ल. गद्रे’ पुरस्कार, ‘महिला जीवन गौरव’ पुरस्कार, ‘पुणेज प्राइड’, ‘संगीत नाटक अकादमी’ राष्ट्रीय पुरस्कार (२००७) असे अनेक पुरस्कार मिळाले आहेत.

साधी राहणी आणि उच्च विचारसरणी हे तत्त्व अंगी बाळगून भरतनाट्यम् नृत्यशैलीस एका वेगळ्या सर्जनशील, कलात्मक आणि सौंदर्यवादी पातळीवर नेणाऱ्या एकमेवाद्वितीय मराठी कलाकार म्हणून त्यांचे नाव कायम रसिकांच्या स्मरणपटलावर राहील.

— स्मिता महाजन

## भिडे-देशपांडे, अश्विनी
**गायिका**
**७ ऑक्टोबर १९६०**

अश्विनी भिडे यांचा जन्म मुंबईत एका कलाप्रेमी कुटुंबात झाला. त्यांचे वडील मोहन भिडे हे तबला- वादन शिकले होते, आत्या मुक्ता व सरला भिडे याही गायिका,



तर आई माणिक भिडे या किशोरी आमोणकर यांच्या ज्येष्ठ शिष्या होत. अर्थातच अश्विनीताईंना घरातूनच संगीताचा समृद्ध वारसा मिळाला. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण पं. नारायणराव दातार यांच्याकडे झाले. त्यानंतर आई माणिक भिडे व पं. रत्नाकर पै यांच्याकडे अश्विनी भिड्यांनी जयपूर गायकीचे शिक्षण घेतले. सरला भिडे व डॉ. अनिता सेन यांच्याकडून त्यांनी ठुमरीसाठी मार्गदर्शन घेतले. सोळाव्या वर्षीच त्यांनी 'संगीत विशारद' ही पदवी मिळवली, तसेच १९७७ साली आकाशवाणी संगीतस्पर्धेत प्रथम क्रमांकाचे राष्ट्रपतिपदकही प्राप्त केले. सूक्ष्मजीवशास्त्रामधून एम.एस्सी. (मुंबई विद्यापीठ) व भाभा अणू संशोधन संस्थेतून जैवरसायनातील डॉक्टरेट मिळवूनही डॉ. अश्विनी भिडे-देशपांडे यांनी गायन हाच व्यवसाय म्हणून पत्करला.

आपल्या सुरेल, मोकळ्या आवाजाने श्रोत्यांवर क्षणातच काबू मिळविणाऱ्या अश्विनी भिडे या उत्तम मैफली गायिका म्हणून मान्यता पावल्या आहेत. आत्मविश्वास आणि वैचारिक स्पष्टता हे गुण त्यांच्या गायनातही जाणवतात. स्पष्ट, तरीही रसमय स्वरोच्चारण करत, अतिशय चुस्तपणे आणि खुमारीने बंदिश मांडून त्या बढत करतात. जोशपूर्ण, चपळ, दाणेदार, खास जयपूरच्या लयबंधांची तानक्रिया त्यांच्या गायनाचे वैशिष्ट्य आहे. किशोरी आमोणकर यांच्या गायनशैलीला त्यांनी समर्थपणे अंगीकारले आहे व जयपूर-अत्रौली घराण्याच्या गायिका म्हणून त्या प्रस्थापित झाल्या आहेत.

एच.एम.व्ही., म्यूझिक टुडे, सोनी इ. अनेक कंपन्यांनी त्यांच्या रागसंगीत, ठुमरी, भक्तिसंगीताच्या ध्वनिफिती प्रकाशित केल्या असून त्या लोकप्रिय झाल्या आहेत. भारत व विदेशांतल्या सर्वच महत्त्वाच्या रंगमंचांवरून, संगीत महोत्सवांतून, तसेच आकाशवाणी, दूरदर्शनसारखी माध्यमे यांतून त्यांची गायनकला सातत्याने रसिकांना ऐकावयास मिळते व त्यांच्या कलाकौशल्यास मोठ्या प्रमाणात कलाप्रेमींनी दाद दिली आहे. तरुणवर्ग त्यांचे अनुकरण करू पाहतो.

अश्विनी भिडे-देशपांडे या वाग्गेयकारही आहेत. 'रागरचनांजली' हे त्यांच्या बंदिशींचे पुस्तक ध्वनिमुद्रिकेसह दोन भागांत, २००४ व २०१० साली प्रकाशित झाले आहे. या पुस्तकातील बंदिशी आणि त्यांचे स्वनिर्मितीबाबतचे विचार त्यांची बुद्धिमत्ता आणि उत्कट संवेदनशीलता दर्शवितात. या दोन्ही पुस्तकांत त्यांनी काही नवीन रागरूपेही मांडली आहेत.

त्यांनी अनेक प्रचलित व अप्रचलित रागांत व मत्तताल, साडेसात, साडेनऊ मात्रांच्या तालांसारख्या कंठसंगीतात कमी वापरल्या जाणाऱ्या तालांतही बंदिशी रचल्या आहेत. याखेरीज त्यांनी ठुमरी-दादरा शैलीतीलही रचना केल्या आहेत. अनेक संतांची हिंदी, मराठी भजने, अभंग, संस्कृत स्तोत्रे स्वरबद्ध करून त्यांचेही कार्यक्रम त्यांनी सादर केले आहेत. संजीव अभ्यंकर या मेवाती घराण्याच्या गायकासह त्या 'जसरंगी जुगलबंदी'चाही अनोखा प्रयोग करतात.

सानिया पाटणकर, रेवती कामत, श्रुती आंबेकर, धनश्री घैसास, सायली ओक, शिवानी हळदीपूर, इ. शिष्यांना त्यांनी शिकवले आहे. या भरघोस कार्याबद्दल 'पं. जसराज' पुरस्कार, मध्यप्रदेश शासनाचा 'पं. कुमार गंधर्व' पुरस्कार (२००५), दूरदर्शनचा 'संगीतरत्न' पुरस्कार (२०१०), महाराष्ट्र शासनाचा सांस्कृतिक पुरस्कार (२०११) असे अनेक पुरस्कार त्यांना मिळाले आहेत.

— डॉ. शुभदा कुलकर्णी

## भिडे, सरला केशव

**गायिका**

**३ ऑगस्ट १९४० – २० एप्रिल १९९४**

सरला केशव भिडे यांचा जन्म मुंबईला एका सुशिक्षित, सुखवस्तू, मध्यमवर्गीय कुटुंबात झाला.

भ



त्यांच्या घरातच संगीताची आवड होती. त्यांची आई आकाशवाणी, मुंबईची ‘दिलरुबावादक’ कलाकार होती. त्यांना गायन शिकण्यास प्रोत्साहन आईकडूनच मिळाले. मुंबईतच ‘महाराष्ट्र संगीत विद्यालय’ या संस्थेत पं. नारायणराव दातार यांच्याकडे त्यांनी संगीताचे धडे घेण्यास सुरुवात केली. स्वरज्ञान उपजतच असल्याने सरला भिडे यांची खूपच प्रगती झाली. निकोप आवाज असलेल्या सरला भिडे ख्यालगायन तर शिकल्याच, तथापि त्यांचे मन ख्यालगायनापेक्षा उपशास्त्रीय म्हणून गणल्या गेलेल्या ठुमरी, होरी, दादरा, चैती, झूला वगैरे गीतप्रकारांत अधिक रमू लागले. नंतर माणिक वर्मा यांचेही मार्गदर्शन त्यांना लाभले.

एकीकडे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण चालू होतेच; त्यातच वयाच्या पंधराव्या, सोळाव्या वर्षी १९५५-५६ मध्ये ‘आकाशवाणी’ने घेतलेल्या गायनाच्या स्पर्धेत सरला भिडे यांना प्रथम क्रमांक (सुवर्णपदक) प्राप्त झाला. स्वतंत्र भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते हे पदक स्वीकारण्याचा बहुमान त्यांना लाभला.

सरला भिडे यांनी १९५९ मध्ये रसायनशास्त्रात मुंबई विद्यापीठाची पदवी मिळविली. त्यानंतर मात्र आपल्या उपजत प्रवृत्तीला अनुसरून त्यांनी आपले जीवनच संगीत विषयाला वाहून घेतले. म्हणूनच विवाह करून कौटुंबिक जबाबदाऱ्यांच्या बंधनांत न पडता पूर्ण वेळ संगीताच्या व्यासंगासाठी देण्याचे त्यांनी ठरविले. शोभा गुर्टू यांच्याकडे त्यांनी उपशास्त्रीय संगीताचे धडे घेण्यास प्रारंभ केला.

एकाग्र बुद्धीने अनेक वर्षे संगीत साधना केल्याने त्यांची गणना उपशास्त्रीय संगीताची धुरा वाहण्यात अग्रणी म्हणून होऊ लागली. त्यांच्या आधीच्या पिढीत बेगम अख्तर, सिद्धेश्वरी देवी, नंतर गिरिजादेवी, शोभा गुर्टू वगैरेंनी ठुमरी गायनपरंपरा समृद्ध करून ठेवलीच होती. त्यानंतर ठुमरी प्रस्तुतीकरणात त्यांच्या गायनातून एक सात्त्विक, सौंदर्यपूर्ण शृंगाररस अधिक दिसू लागला असा अभिप्राय या क्षेत्रातील जाणकार रसिक देत असत.

सरला भिडेंनी मुंबईच्याच श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठातून संगीत विषयात एम.ए. पूर्ण करून तेथेच संगीत शिकविण्यावर लक्ष केंद्रित करून स्वत:चा व्यासंग चालू ठेवला. दरम्यान १९७०-८० च्या दशकात पं. रविशंकरांच्या समूहगानवृंदात सामील होण्याची त्यांना संधी मिळाली. या निमित्ताने त्यांच्या सांगीतिक व्यक्तिमत्त्वाचा भिडेंवर बराच प्रभाव पडला. पंडितजींनी स्वरबद्ध केलेल्या रचनांत सहभाग असल्याने दिल्लीतील आशियाई खेळांच्या उद्घाटन समारोहात त्यांनी महत्त्वाची जबाबदारी उचलली होती. या काळातच पं. विजय राघवराव यांच्याबरोबर सरला भिडेंनी इंग्लंडचा सांगीतिक दौराही केला.

जुन्या ठुमऱ्यांचा संग्रह असलेल्या सत्येंद्रभाई त्रिवेदी यांच्याकडून दोनशे ठुमऱ्या शिकून त्यांचे ध्वनिमुद्रण सरला भिडेंनी अभ्यासकांसाठी करून ठेवले आहे.

सरला भिडे यांनी त्यांच्या स्वत:च्या संशोधनात्मक अभ्यासासाठी ठुमरीचीच निवड केली. त्यानुसार ‘संगीताचार्य’ या पदवीसाठी पं. विनायकराव आठवले यांच्या मार्गदर्शनाखाली प्रबंध लिहून तो त्यांनी अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाकडे सादर केला होता.

‘संगीताचार्य’ (डॉक्टरेट) पदवी प्राप्त झाल्यानंतर सरला भिडे नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाच्या संगीत विभागाच्या विभागप्रमुख झाल्या. या संगीत विभागासाठी त्यांनी एक महत्त्वाकांक्षी सुधारणा आराखडा सादर केला होता; परंतु दुर्दैवाने आराखड्यानुसार संगीत विभागाची उभारणी करणे त्यांना शक्य झाले नाही. कारकिर्दीच्या उत्कर्षबिंदूकडे तडफदारपणे वाटचाल करणाऱ्या सरला भिडेंचे छोट्याशा आजाराचे निमित्त होऊन मुंबईत निधन झाले.

— गो.के. भिडे

भ

## भिलवडीकर, गणपती वेदोनारायण

**गायक**

**१८६० – २३ ऑगस्ट १९२७**



गणपतीबुवा वेदोनारायण भिलवडीकर यांचा जन्म वाठार गावी झाला. त्यांचे वडील वेदोनारायण सखाराम भट्ट हे पुरोहित होते. त्यामुळे लहानपणीच भिलवडीकरबुवांना वेदपठणाची दीक्षा मिळाली.

वाठार गावी होणाऱ्या हरिकीर्तनात, भजनांमध्ये बालपणापासूनच गणपतीबुवा भाग घेत असत. कीर्तनकारांना मिळणारा मानसन्मान पाहून आपणही कीर्तनकार व्हावे असे गणपतीबुवांस वाटू लागले. त्यासाठी गायनविद्या शिकणे आवश्यक होते. म्हणून त्यांनी ग्वाल्हेरला प्रयाण केले. वासुदेवबुवा जोशींच्या आज्ञेनुसार त्यांचे शिष्य कृष्णशास्त्री शुक्ल यांच्याकडे उज्जैनी येथे राहून गणपतीबुवांनी बरीच वर्षे संगीताध्ययन केले. त्यांना बंदिशींचा संग्रह करण्याची आवड होती व त्यामुळे एक 'कोठीवाले गायक' अशी त्यांची कीर्ती होती.

उज्जैनीहून महाराष्ट्रात परतल्यावर १८९०च्या सुमारास त्यांनी काही वर्षे बेळगावला आणि मग कोल्हापूरला वास्तव्य केले. पुढे त्यांनी अनेक जलशांमध्ये गायन केले, संगीत शिकवण्याचे कार्यही केले. ते १९०२ साली पुण्याला आले व 'पुणे गायन समाजा'त शिकवू लागले. तेथे दत्तात्रेय केशव जोशी यांना त्यांच्याकडून तालीम लाभली. 'नाट्यकला प्रवर्तक मंडळी' या संगीत नाटक संस्थेने गायनगुरू म्हणून पाचारण केले असता गणपतीबुवांनी गणेश रामचंद्र बेहरेबुवांनाही पायाभूत शिक्षण दिले. कृष्णाबाई नावाच्या गायिकेलाही त्यांनी शिकवले. नंतर पं. भातखंडे यांनी त्यांना मुंबईला बोलावून घेतले. त्यांच्याकडून बऱ्याच चिजा घेऊन, स्वरलिपिबद्ध करून पं. भातखंड्यांनी त्या क्रमिक पुस्तक मालिकेत प्रकाशित केल्या. मधुर आवाजी लाभलेले बुवा टप्पा, तराणा, सरगम छान म्हणत. त्यांनी बरेच शिष्यही तयार केले.

भिलवडीकरबुवांना मुंबईची हवा मानवली नाही. म्हणून १९२५ साली ते सांगलीला परतले आणि 'चतुर संगीत विद्यालया'ची घरीच स्थापना करून विद्यार्थ्यांना ते विद्यादान करू लागले. दमा आणि वार्धक्य यांमुळे प्रकृती त्यांना साथ देत नव्हती. शेवटी सांगलीत त्यांचे निधन झाले.

- डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ :**

*१. जोशी, ल.द.; संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास; १९३५, पुणे.*

## भूगंधर्व

☛ रहिमत खाँ

## भैया, गणपत

☛ गणपत भैया

## भोबे, गोपाळकृष्ण

☛ नाट्य खंड

## भोसले, आशा

**गायिका**

**८ सप्टेंबर १९३३**



आशा भोसले या जागतिक कीर्तीच्या गायिका असून अलीकडेच जगात सर्वांत जास्त गाणी (१२,०००) गायल्याची विक्रमी नोंद त्यांच्या नावावर जमा आहे. आशा भोसले यांचा जन्म सांगली येथे झाला. मा. दीनानाथ मंगेशकर व माई मंगेशकर यांचे हे तिसरे अपत्य. लता मंगेशकर व मीना मंगेशकर (खडीकर) या

भ

त्यांच्या थोरल्या बहिणी, तर उषा मंगेशकर व हृदयनाथ मंगेशकर ही त्यांची धाकटी भावंडे.

आशा भोसले यांचा बालपणाचा काही काळ अतिशय सुखाचा गेला व त्या आपल्या वडिलांच्या फार लाडक्या होत्या. दीनानाथ मंगेशकर आपल्या दोन मुली लता व मीना यांना गाणे शिकवीत असत त्या वेळी आशा यांचा गायनाकडे विशेष ओढा नव्हता.

दीनानाथ मंगेशकर यांचे १९४२ साली अकाली निधन झाले. त्यामुळे थोरली बहीण लता मंगेशकर यांना मा. विनायक यांच्या कंपनीमध्ये गायिका, अभिनेत्री म्हणून काम करावे लागले. मंगेशकर कुटुंबीय पुण्याहून कोल्हापूरला झाले. कोल्हापूरच्या वास्तव्यात आशा यांनी 'माझं बाळ' या मा. विनायकांच्या चित्रपटात प्रभात फेरीच्या प्रसंगात एक छोटीशी भूमिका केली. या प्रसंगावर 'चला चला नवबाला' हे गाणे चित्रित केले होते. या गाण्यात लता, मीना, आशा, उषा आणि हृदयनाथ या सर्व भावंडांचा सहभाग होता. तसेच मा. विनायक यांच्या 'बडी माँ' या हिंदी चित्रपटात त्यांनी छोटीशी भूमिका केली होती.

याच काळात मा. विनायकांनी आपली कंपनी कोल्हापुराहून मुंबईला आणली. त्या वेळी लता मंगेशकर व मीना मंगेशकर मुंबईला राहत, तर आशा, उषा, हृदयनाथ ही भावंडे माईंसह आजोळी, थाळनेरला राहत होती. त्यानंतर लता मंगेशकरांना नाना शंकरशेट चौकात घर मिळाले आणि सगळी मंगेशकर भावंडे आपल्या आईसह मुंबईत एकत्र राहू लागली.

याच सुमारास मंगेशकरांच्या ओळखीचे गणपतराव भोसले यांच्याशी आशा यांनी लग्न करण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय त्यांच्या माहेरच्या मंडळींना पसंत नव्हता, त्यामुळे लग्नानंतर काही काळ त्यांचे माहेरच्या मंडळींशी संबंध दुरावले. लग्नानंतर त्या बोरिवलीला राहू लागल्या आणि त्यांच्या पतीने त्यांना गायनासाठी प्रोत्साहन दिले.

आशा भोसले यांच्यावर लहानपणासूनच संगीताचे संस्कार होते, तरी त्यांना गायनाचे शास्त्रशुद्ध शिक्षण मिळाले नव्हते. शास्त्रीय संगीताच्या शिक्षणासाठी त्या शंकरराव व्यासांच्या विद्यालयात शिकू लागल्या. व्यास संगीत विद्यालयात त्यांनी शास्त्रीय संगीताच्या परीक्षा दिल्या. एका परीक्षेच्या वेळी शंकररावांनी आशा भोसले यांना बडे गुलाम अली खाँ यांची 'आए न बालम' ही ठुमरी म्हणण्यास सांगितली. आशा भोसले यांनी अतिशय तन्मयतेने ही ठुमरी गायली आणि त्या परीक्षेत पहिल्या आल्या. नंतर काही काळ त्या मास्टर नवरंग नागपूरकर यांच्याकडेही रागसंगीत शिकल्या.

आशा भोसले १९४८ सालापासून मराठी व हिंदी चित्रपटांत पार्श्वगायन करू लागल्या. आज 'आशा भोसले' या नावाला जे वलय आहे, त्यामागे त्यांची प्रचंड मेहनत, जिद्द आणि संघर्ष आहे. पार्श्वगायनाची कामे आशा भोसले यांना मिळू लागली तरी त्यांचा मार्ग सुकर नव्हता. त्या काळात मराठी-हिंदी क्षेत्रात अनेक नामवंत गायिका होत्या, तसेच त्यांची मोठी बहीण लता मंगेशकर यांनी स्वत:चे वेगळे स्थान निर्माण केले होते. त्यामुळे आशा भोसले यांना स्वत:ची वेगळी ओळख निर्माण करायची होती. त्यासाठी त्यांनी प्रचंड मेहनत केली आणि त्यामुळेच आज त्यांची ओळख 'एक चतुरस्र गायिका' अशी आहे.

गाण्यातील कोणताही प्रकार आपल्याला सहज गाता आला पाहिजे अशाच पद्धतीने त्यांनी मेहनत घेतली आहे. अस्सल रागदारीवर आधारित गाणी, नाट्यगीते, लावणी, पारंपरिक स्त्री-गीते, बालगीते, भक्तिगीते, देशभक्तिगीते, अंगाईगीते, पाश्चिमात्य ढंगाची गाणी इत्यादींचा त्यांचा गायनप्रवास थक्क करणारा आहे.

'गोकुळचा राजा', (संगीत : पुरुषोत्तम सोळांकुरकर), 'स्वराज्याचा शिलेदार' व 'शिवा रामोशी' (संगीत : दत्ता डावजेकर) हे त्यांचे काही सुरुवातीचे चित्रपट होत. हळूहळू मराठीमधील सारेच संगीतकार आशा भोसले यांचा आवाज प्रामुख्याने वापरू लागले.

याच सुमारास आशा भोसले यांच्या कौटुंबिक जबाबदाऱ्या वाढत होत्या. हेमंत, वर्षा आणि आनंद या तीन मुलांच्या त्या आता आई होत्या आणि मुलांना

वाढवत त्या एकीकडे पार्श्वगायन करीत होत्या. आपण फारसे शालेय शिक्षण घेतले नसले तरी आपल्या मुलांनी उत्तम शिक्षण घ्यावे असा त्यांचा कटाक्ष असे.

साधारणत: १९५० सालापासून त्या मराठी, हिंदी व अन्य भाषांतील पार्श्वगायनात अतिशय व्यस्त झाल्या. १९५१ सालच्या 'पुढचं पाऊल' या चित्रपटापासून त्या मराठीतील अग्रगण्य संगीतकार सुधीर फडके यांच्या संगीतदिग्दर्शनात गाऊ लागल्या. सुधीर फडक्यांनी संगीत द्यावे आणि आशा भोसल्यांनी गाऊन लोकप्रिय करावे हा सिलसिला अनेक दशके सुरू होता. सुधीर फडक्यांकडे आशा भोसले विविध प्रकारची गाणी गायल्या आहेत. 'जगाच्या पाठीवर'मधील 'तुला पाहते रे', 'सुवासिनी' चित्रपटातील 'जिवलगा कधी रे येशील तू' हे रागमालिकेतील गीत, 'जशास तसे'मधील 'चिंचा आल्यात पाडाला'सारखी अवखळ लावणी, 'जगाच्या पाठीवर' या चित्रपटातील 'बाई मी विकत घेतला श्याम'सारखे भक्तिगीत, 'मुंबईचा जावई'मधील 'आज कुणीतरी यावे' हे आणि अनेक गीते. सुधीर फडके यांच्या संगीतदिग्दर्शनात आशा भोसले यांनी १९१ चित्रपटगीते गायलेली आहेत. आशा भोसले सुधीर फडक्यांव्यतिरिक्त वसंत प्रभू, वसंत पवार, शंकरराव कुलकर्णी, राम कदम, पु.ल. देशपांडे, श्रीनिवास खळे, दत्ता डावजेकर, आनंदघन, हृदयनाथ मंगेशकर, श्रीधर फडके, बाळ पळसुले, अनिल अरुण इत्यादी अनेक संगीतकारांकडे गायल्या आहेत.

भ

'बुगडी माझी सांडली ग'सारखी लावणी, 'मलमली तारुण्य माझे'सारखे प्रेमगीत, 'मामाच्या गावाला जाऊ या', 'नाच रे मोरा'सारखी बालगीते, 'मागे उभा मंगेश'सारखे भक्तिगीत, 'या डोळ्यांची दोन पाखरे'सारखे गूढ गीत, 'सैनिक हो तुमच्यासाठी'सारखे देशभक्तिगीत, तर 'एक झोका'सारखे अलीकडच्या काळातील गीत, इतके वैविध्य आशा भोसले यांच्या चित्रपटगीतांत आहे. त्यांनी गजाननराव वाटवे, सुधीर फडके, वसंतराव देशपांडे, दशरथ पुजारी, सुरेश वाडकर, पंडितराव नगरकर इत्यादी गायकांबरोबर अनेक द्वंद्वगीते गायली आहेत. नव्वदच्या दशकात आशा भोसले यांच्या आवाजाचा उपयोग संगीतकार आनंद मोडक यांनी केला आहे. त्यांच्या संगीत दिग्दर्शनात आशा भोसले यांना उत्कृष्ट पार्श्वगायनाचे चार पुरस्कार मिळाले आहेत.

त्यांना २००० साली 'दादासाहेब फाळके' पुरस्कार मिळाला. भारत सरकारने २००८ मध्ये 'पद्मविभूषण' या पुरस्काराने त्यांना सन्मानित केले. मध्यप्रदेश (१९८९), महाराष्ट्र (१९९९) शासनांचे 'लता मंगेशकर' पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत.

दत्ता डावजेकरांच्या संगीतदिग्दर्शनात १९४८ साली आशा भोसले प्रथम भावगीत गायल्या. पुढे १९४९ साली डावजेकरांच्याच संगीतदिग्दर्शनातील 'कुणी बाई गुणगुणले' हे भावगीत लोकप्रिय झाले. वसंत प्रभूंकडे १९५० साली 'गळ्यात माझ्या तूच जिवलगा' हे भावगीत त्या प्रथम गायल्या आणि पुढे एक तप त्या वसंत प्रभूंकडे उत्तमोत्तम भावगीते गायल्या. साठच्या दशकात यशवंत देव, श्रीनिवास खळे, हृदयनाथ मंगेशकर या तीन संगीतकारांकडे त्यांची उत्तमोत्तम भावगीते, उदा. 'विसरशील खास मला', 'सहज सख्या एकटाच', 'एका तळ्यात होती', 'जिवलगा राहिले रे दूर घर माझे', 'तरुण आहे रात्र अजुनी', 'मी मज हरवून बसले ग', 'चांदण्यात फिरताना' इत्यादी आहेत.

पुढच्या काळात अनिल-अरुण या जोडीबरोबर त्यांनी काही भावगीते गायली. आशा भोसले यांचा मुलगा हेमंत भोसले यांनी काही भावगीते आपल्या आईकडून गाऊन घेतली. 'मी अशी भोळी कशी ग', 'शारदसुंदर चंदेरी राती' ही त्यांची काही गाजलेली भावगीते आहेत.

श्रीधर फडके यांच्या संगीत दिग्दर्शनात १९९३-९४ साली आशा भोसले यांचा 'ऋतु हिरवा' नावाचा भावगीतांचा गीतसंच आला. यातील सारीच गीते अतिशय लोकप्रिय झाली. वयाच्या अठ्ठ्याहत्तराव्या वर्षीसुद्धा आशा भोसले यांचा आवाज तरुण आहे आणि त्यांचा गाण्याचा उत्साह तरुणांना लाजवेल असा आहे.

**– अद्वैत धर्माधिकारी**

## भोळे, केशव वामन
**संगीतकार, लेखक**
**२४ मे १८९६ - १० नोव्हेंबर १९७७**



चित्रपटसंगीत, नाट्यसंगीत, भावगीत या क्षेत्रांबरोबर संगीतसमीक्षेच्या क्षेत्रातही मौलिक योगदान करणाऱ्या केशवराव भोळे यांच्या युगप्रवर्तक संगीतविचाराचा प्रभाव पुढच्या तीन पिढ्यांवर पडला. त्यांचे वडील वामनराव अनंत भोळे हे ब्रिटिश आमदानीत वऱ्हाड प्रांतात सार्वजनिक बांधकाम विभाग खात्यात ओव्हरसियर म्हणून भरती होऊन कर्तबगारीने सहअभियंता पदापर्यंत पोचले व मूळचे पुण्याचे भोळे कुटुंबीय वऱ्हाडात स्थायिक झाले. वडिलांचा पक्षाघाताने अकाली मृत्यू झाल्यावर एका महिन्यानंतर केशवराव भोळ्यांचा जन्म अमरावती येथे झाला. आई गंगाबाई यांनी मोठ्या खंबीरपणे त्यांना व अन्य भावंडांना मोठे केले. वडिलांना सतारवादनाची आवड होती, तर आई स्त्रीगीते, पदे, व ठुमरी हौसेने गात असे. अमरावतीस भोळ्याच्या घरी रहिमत खाँ, विष्णूपंत छत्रे यांच्या गायनाच्या बैठकी होत. स्वदेश हितचिंतक नाटकमंडळीचे जनूभाऊ निमकर हे वामनरावांचे व्याही असल्याने केशवराव भोसल्यांसारख्या नाट्यकलाकारांचे वास्तव्य त्यांच्या घरी असे. त्यामुळे लहान वयातच अनेक कलाकारांचा सहवास भोळ्यांना लाभला. ध्वनिमुद्रिका हे माध्यम त्या काळी नवीनच उदयास आले होते. त्यांच्या वाड्यातील सबनीस बंधूंच्या दुकानात गोहरजान, जोहराबाई, मौजुद्दिन अशा कलावंतांच्या नवीन ध्वनिमुद्रिका ते ऐकत, त्या अनुकरणातून त्यांचे गायन सुरू झाले.

केशवराव भोळ्यांचे इंटर सायन्सपर्यंतचे शिक्षण अमरावतीस झाले, मग दोन वर्षे नागपुरास मॉरिस महाविद्यालयात शिकले. डॉक्टरकीच्या शिक्षणासाठी १९१५ साली मुंबईस ग्रँन्ट वैद्यकीय महाविद्यालयामध्ये ते दाखल झाले. चार वर्षे पूर्ण केल्यावर मलेरिया झाल्याने हे वैद्यकीय शिक्षण अपूर्ण राहिले. मात्र या शिक्षणातून मिळालेली चिकित्सक दृष्टी त्यांना पुढेही उपयोगी ठरली. त्या काळात ऐन बहरात असणारे बालगंधर्व, केशवराव भोसले याची संगीतनाटके त्यांनी मुंबईत पाहिली, भास्करबुवा, वझेबुवा, मंजीखाँ इ. गवैयांच्या मैफिली ऐकल्या. ते स्वत:ही ख्याल, नाट्यगीते गायनाच्या मैफिली करू लागले. बॉम्बे ब्रॉडकास्टिंग कंपनी या तत्कालीन नभोवाणीवर त्यांचे गायनाचे कार्यक्रम होऊ लागले. १९२८ पासून भोळ्यांनी अनंत कणेकर, अनिल, इ. कवींच्या कवितांना काव्यरसानुकूल चाली देऊन भावगीत हा नवागत संगीतप्रकार मैफिलींत गाण्यास आरंभ केला. याच सुमारास गिरिजाबाई केळेकर व केसर बांदोडकर या भगिनींचा परिचय झाला व त्यांची धाकटी बहीण दुर्गा हिला ते भावगीत, ठुमरी-दादरे शिकवू लागले. याच दुर्गाशी त्यांनी विवाह केला व त्या पुढे ज्योत्स्ना भोळे या नावाने सुपरिचित झाल्या.

१९३० साली स. अ. शुक्ल यांच्या साध्वी मीराबाई या संगीतनाटकात भोळ्यांनी काही चाली दिल्या, पैकी हिराबाई बडोदेकरांनी गायलेली ‘ब्रिजलाला गडे’, ‘असार पसारा’ ही पदे लोकप्रिय ठरली. तसेच ना. सी. फडके यांच्या युगांतर नाटकासही त्यांचे संगीत होते, त्यातील ‘जनमानस मंदिरात’ या हिराबाईंनी गायलेल्या पदाची ध्वनिमुद्रिकाही गाजली. १९३२ साली रेडिओ स्टार्स या नाट्यसंस्थेच्या बेबी, स्वस्तिक बँक, खरा ब्राह्मण या नाटकांस त्यांचे संगीत होते. भोळ्यांची नाटकांतील संगीताबद्दलची निराळी दृष्टी ओळखून आधुनिकतावादी नाटयकलाकारांच्या नाट्यमन्वंतर संस्थेने ‘आंधळ्यांची शाळा’ (१९३३) या नाटकाचे संगीत देण्यास त्यांना निमंत्रित केले. यात मराठी नाटकांत प्रत्यक्ष नाट्यप्रवेशानुरूप वाद्यवृंदाद्वारे पार्श्वसंगीताचा वापर प्रथमच त्यांनी केला. या नाटकातील ‘एकलेपणाची आग’, ‘आला खुषीत समींदर’, ‘तू माझी अन् तुझाच मी’ या पदांना नव्या शैलीच्या भावगीतात्मक

भ

चाली देऊन मराठी नाट्यसंगीतात एक नवा प्रयोग त्यांनी केला. या अर्थाने त्यांनी मराठी नाटकाच्या संगीतात खऱ्या अर्थाने मन्वंतर घडवले. हे संगीत उ. अल्लादिया खाँसाहेबांनीही वाखाणले होते.

या प्रयोगशील संगीतामुळे पुण्याला 'प्रभात फिल्म कंपनीत' भोळ्यांना संगीतदिग्दर्शक म्हणून पाचारण करण्यात आले. भोळ्यांना चित्रपटांस संगीत देण्याचा आधीही अनुभव होताच. 'संत सखू' (१९३२, श्रीकृष्ण फिल्म कंपनी) हा केशवरावांनी संगीत दिलेला पहिला चित्रपट होय. 'नूर-ए-इमान' (१९३२) या हिंदी चित्रपटास त्यांचे संगीत होते. नंतर 'कृष्णावतार' (१९३३) या चित्रपटाचे संगीत देताना वसुदेवाचे काम करणाऱ्या नटास त्यांनी उसना आवाज दिला आणि हे भारतीय चित्रपटसृष्टीतील पहिले पार्श्वगायन होय. पण त्याकाळी श्रेयनामावलीत अशा बाबींचा निर्देश होत नसल्याने, दुर्दैवाने याचे श्रेय केशवरावांना दिले गेले नाही.

'प्रभात'मधील १९३४ ते १९४४ ही दहा वर्षे भोळ्यांच्या कारकीर्दीतील सुवर्णकाळ होता. 'अमृतमंथन' (१९३४, हिंदीतही), 'रजपूत रमणी' (हिंदी, १९३५), 'संत तुकाराम' (मराठी, १९३६), 'कुंकू' / 'दुनिया ना माने' (१९३७), 'माझा मुलगा' / 'मेरा लडका' (१९३७), 'संत ज्ञानेश्वर' (१९४०, हिंदीतही), 'संत सखू' (१९४१, हिंदीतही), 'दहा वाजता' / 'दस बजे' (१९४२), 'रामशास्त्री' (१९४४, हिंदीतही) या प्रभात चित्रपटांना त्यांनी संगीत दिले. केशवरावांचा चौफेर व्यासंग, सौंदर्यदृष्टी, चोखंदळ, स्पष्टवक्ता स्वभाव यामुळे व्ही. शांताराम, विष्णुपंत दामले, शांताराम आठवले हे सारेच त्यांचा सल्ला घेत असत. त्यामुळे 'प्रभात'च्या यशात केशवरावांचा वाटा मोठा होता.

'आधी बीज एकले' (संत तुकाराम), 'मन सुद्द तुजं', 'भारती सृष्टीचे सौंदर्य' (कुंकू), 'सोनियाचा दिवस', 'एक तत्त्व नाम' (संत ज्ञानेश्वर), 'दोन घडीचा डाव' (रामशास्त्री) ही त्यांनी संगीत दिलेली गीते आजही लोकप्रिय व चिरतरूण आहेत. 'अमृतमंथन' मधील 'रात आई है नया रंग जमाने के लिए' या ढंगदार गझलने भारतभर त्यांचे नाव झाले. निराळे पार्श्वसंगीत न योजता पार्श्वध्वनींचा प्रभावी वापर करण्याचा 'कुंकू'तील प्रयोग भारतात प्रथमच घडला, तर संत तुकाराम आणि संत ज्ञानेश्वर या संतपटांना त्यांच्या प्रासादिक संगीताने अधिकच भावगर्भता मिळाली. 'प्रभात' सोडल्यानंतर अलंकार या नाटकास (मो. ग. रांगणेकर, १९४४), तसेच 'तारामती' (हिंदी, १९४५), 'कुबेर' (१९४७, श्रीधर पार्सेकरांसह), 'भाग्यरेखा' (१९४८), 'पारिजातक' (१९५१) या चित्रपटांना त्यांचे संगीत होते. 'अण्णासाहेब कर्वे', 'मराठा किसान' या अनुबोधपटांना त्यांचे पार्श्वसंगीत होते. केशवरावांनी या नव्या माध्यमाच्या आवश्यकता आणि त्याची बलस्थाने ओळखून चित्रपटसंगीतास नाट्यसंगीताच्या प्रभावातून बाहेर काढून ते अव्वल दर्जाचे संगीतकार बनले. एवढेच नव्हे तर 'माझे संगीत' या पुस्तकात आपले संगीत देण्यामागची विचारप्रक्रिया आणि प्रयोग यांचेही प्रांजल वर्णन करून चित्रसंगीताची आगळी परिभाषा तयार केली.

मराठी भावसंगीताच्या आरंभीच्या काळातील एक महत्त्वाचे भावगीतगायक व रचनाकार म्हणूनही भोळ्यांचे योगदान उल्लेखनीय आहे. त्यांनी स्वरबद्ध केलेली आणि ज्योत्स्ना भोळे यांनी गायलेली अनेक गीते ही भावगीताच्या उदयकालात या प्रकारास स्वत:चा चेहरामोहरा देणारी म्हणून वैशिष्ट्यपूर्ण ठरतात. काही ठळक उदाहरणे अशी - 'थकले रे डोळे', 'नदी किनारी गं' (अनिल), 'तुजसाठी राया रे लाख बोल साहिले', 'झाली पहाट' (राजा बढे), 'शिरी घागर पाझरते' (कवि मंजूमाधव), 'नाचती ओठावरी' (रांगणेकर). 'पुढल्या पिढीतीलही ग. दि. माडगुळकर' (तुजसाठी रे घननीळा), 'इंदिरा संत' (अजून नाही जागी राधा), 'आज पहाटे उमले स्वप्न कांचनाचे', 'तू असतिस तर झाले असते' (पाडगावकर) या कवींच्या भावकविता भोळ्यांनी आकाशवाणीसाठी स्वरबद्ध केल्या. त्यांनी

भ

१९३० च्या दशकात संगीतबद्ध केलेल्या ‘आला खुषीत समिंदर’, ‘दर्यावरी डोले’, ‘नको वळून बघू माघारी’ या ‘दर्यागीतांनी’, तसेच ‘दारी फुलला मोगरा’, ‘उंच डोंगराच्या आड’ या ‘माहेरगीतांनी’ही मराठी भावसंगीतात एक नवा प्रवाह आणला होता.

भोळे हे स्वत: उत्तम गायक असल्याने एच.एम.व्ही. आणि ओडियन या कंपन्यांनी त्यांच्या गायनाच्या ध्वनिमुद्रिका १९३०-३२ सुमारास प्रसिद्ध केल्या. ख्याल, ठुमरी, गझल, भावगीत, नाट्यगीत, भजन अशा संगीतप्रकारांच्या त्यांच्या गायनात भावदर्शी गायनोच्चार, स्वरोच्चारांतील माधुर्य व दाणेदारपणा, लयीला खेळवत गीत पेश करण्याची मोहक शैली दिसते. वंदे मातरम् या राष्ट्रीय गीताचे गायन त्यांनी भूप रागात एखाद्या बंदिशीप्रमाणे केले, जे नंतर त्यांना यथायोग्य वाटले नाही. नंतरच्या काळात प्रगल्भ संगीतविचारानुसार भोळ्यांना आपले तरूणपणातील गायन हे फारसे इष्ट वाटले नाही व त्यांनी आपल्या ध्वनिमुद्रिकांचा उल्लेखही क्वचितच केला, मात्र आज त्यांच्या ध्वनिमुद्रिका ऐकताना त्यातील मोठी गुणवत्ता जाणवते. कुंकू (सुखशयनी शय्येवरती), संत ज्ञानेश्वर (आम्ही चकोर हरी चंद्रमा), दहा वाजता (चल थरकत मुरकत डौलात) या चित्रपटांतही त्यांनी फार प्रभावी असे पार्श्वगायन केले होते.

संगीतविषयक अनेक उत्तम ग्रंथ, ध्वनिमुद्रिका यांचा संग्रह भोळ्यांनी केला होता, तसेच अनेक दिग्गज कलाकारांच्या सहवासात त्यांनी विद्या जोपासली. वझेबुवा, अब्दुल वहिद खाँ, मंजी खाँ अशा गवयांकडून तसेच सारंगिये कादरक्ष यांच्याकडून खानदानी बंदिशी, बाई सुंदराबाईंकडून ठुमरी-दादरे, लावण्या यांचे भांडार जमा केले आणि पुढे ते अनेकांना मुक्तकंठाने शिकवलेही. गीतातील शब्दांचे भावप्रसारी उच्चारण करण्याचे त्यांचे खास तंत्र होते, तसेच गळ्याची निगा कशी राखावी याचा वैद्यकीय बाजूनेही त्यांनी विचार केला होता. आपले गीतगायनाचे विकसित तंत्र त्यांनी अनेकांना शिकवले. ‘प्रभात’मध्ये शांता आपटे, शांता हुबळीकर, शाहू मोडक, परशराम, गजाननराव वाटवे, विनोदिनी देसाई, इ.ना त्यांनी शिकवले. वसंत देसाई यांनाही त्यांच्या संगीतदृष्टीचा लाभ झाला. भावगीताच्या संदर्भात त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ पत्नी ज्योत्स्ना भोळे व कन्या वंदना खांडेकर यांच्याखेरीज मालती पांडे, भानुमती कंस (कुमार गंधर्वांच्या प्रथम पत्नी), कथक नृत्यकलाकार रोहिणी भाटे, विमल वाकडे, उषा अत्रे-वाघ, सुमन कल्याणपुर यांनाही झाला. १९५३ ते १९६० या काळात ते कार्यक्रम निर्माते म्हणून ‘आकाशवाणी’च्या सेवेत होते.

मराठीतील संगीतविषयक लेखनाचे एक अध्वर्यू म्हणूनही भोळ्यांचे कर्तुत्त्व मोलाचे आहे. मो. ग. रांगणेकरांच्या आग्रहामुळे १९३० पासून वसुंधरा मासिकासाठी ‘एकलव्य’ या टोपणनावाने त्यांनी समीक्षात्मक लेख लिहिले. मौज, सत्यकथा, नवभारत, अभिरुची अशा नियतकालिकांतून त्यांचे लेखन प्रसिद्ध होत असे. ‘आजचे प्रसिद्ध गायक’ (१९३३), ‘आवाजाची दुनिया’ (शुद्धसारंग या नावाने, १९४८), ‘संगीताचे मानकरी’ (१९४९), ‘अस्ताई’ (१९६२, महाराष्ट्र सरकारचे पारितोषिक), ‘वसंतकाकांची पत्रे’ (१९६४), ‘माझे संगीत’ (१९६४), ‘अंतरा’ (१९६७), ‘जे आठवते ते’ (१९७४, आत्मचरित्र) हे आठ ग्रंथ म्हणजे भोळ्यांनी मराठी संगीत-सारस्वतास दिलेले भरीव देणगी आहे. त्यांचे साक्षेपी लेख कलाकारांच्या कलेतील गुणदोषांसह त्यांची थोरवी मांडतात. ‘वसंतकाकांची पत्रे’ हे संगीताचा व्यासंग, रियाज कसा करावा याचे सोप्या भाषेत मार्गदर्शन करणारे पुस्तक मराठीतील या प्रकारचे पहिलेच म्हणता येईल. केशवराव भोळे हे मराठीतील विश्लेषक संगीतसमीक्षेचे जनक होते. त्यांच्या लेखनातील सौंदर्यास्वादाबरोबरच वस्तुनिष्ठ चिकित्साही आहे. त्यांचे लेखन हे खऱ्या अर्थाने समीक्षा म्हणता येते. समकालीन कलाकारांच्या नव्याने प्रसिद्ध होणाऱ्या ध्वनिमुद्रिकांवरचे त्यांचे लेख म्हणजे चिकित्सक संगीतसमीक्षेचा आदर्श वस्तूपाठच होत. या आठ ग्रंथांखेरीज, संगीताबरोबरच क्रिकेट

विषयावरही स्फुट लेख, पुस्तकांसाठी प्रस्तावना, पुस्तक परीक्षणेही त्यांनी लिहिली.

'संगीत सुधारक' भोळ्यांचा ८१व्या वर्षी पुणे येथे मृत्यू झाला. त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'केशवस्मरणी' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यांच्या नावाने युवा पिढीतील प्रतिभावान संगीतकारास स्वरानंद प्रतिष्ठान तर्फे पुरस्कार दिला जातो.

- चैतन्य कुंटे

## भोळे, ज्योत्स्ना केशव

**गायिका, अभिनेत्री**

**११ मे १९१४ – ५ ऑगस्ट २००१**



ज्योत्स्ना केशव भोळे या पूर्वाश्रमीच्या दुर्गा केळेकर होत. त्यांचा जन्म गोव्यातल्या बांदिवडे या छोट्याशा गावात झाला. त्यांच्या आईचे नाव राधाबाई व वडिलांचे नाव वामन केळेकर होते. एकूण चौदा भावंडांपैकी त्या एक होत्या. त्यांना गाण्याचे उपजतच अंग आणि फार वेड होते.

वयाच्या आठव्या वर्षी पहिल्या दोन इयत्ता बांदिवड्याच्या शाळेत पूर्ण करून दुर्गा आपल्या थोरल्या गायिका भगिनी गिरिजाबाई यांच्यासह मुंबईत वास्तव्यास आल्या. संगीत शिक्षणासाठी मुंबईस येणे भागच होते. त्या लॅमिंग्टन रोडवर राहत असत व तिथल्याच महानगरपालिकेच्या शाळेत त्यांनी चौथीपर्यंत शिक्षण घेतले. संगीत हेच मुख्य ध्येय असल्याने त्यांनी शाळा सोडली.

गिरिजाबाई आग्रा घराण्याचे प्रसिद्ध गवई खाँसाहेब विलायत हुसेन यांच्याकडे तालीम घेत असत. ज्योत्स्नाबाईही आग्रा घराण्याचे खादिम हुसेन खाँ यांची तालीम घेऊ लागल्या. मुंबईत शालेय, आंतरशालेय गायनस्पर्धांमध्ये नेहमीच पहिला नंबर पटकावून त्यांचे बरेच नाव झाले होते. 'बॉम्बे ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशन' या आकाशवाणीवर ज्योत्स्नाबाई महिन्यातून तीन-चार वेळा गात असत. बालगायिका म्हणून त्या खूपच प्रसिद्ध झाल्या. तेराव्या-चौदाव्या वर्षापर्यंत त्या रागदारी संगीतातही उत्तमपणे पारंगत झाल्या.

याच सुमारास महाराष्ट्रात, खास करून मुंबईत काव्यगायन, त्यातूनच निर्माण होऊ पाहणारे 'भावगीत' हा गानप्रकार मूळ धरू लागला होता. केशवराव भोळे हे यात अग्रेसर असून, भावगीत गायक म्हणून संगीत शौकिनांमध्ये चांगलेच प्रसिद्ध व लोकप्रिय होते. त्यांच्या नाट्यपदांनी त्यांनी अगोदरच नाव मिळविले होते. केशव 'एकलव्य' या टोपणनावाने संगीतावर समीक्षापर लेखनही करीत होते. त्यामुळे याही क्षेत्रात त्यांच्या नावाची खूप चर्चा होती. ज्योत्स्नाबाईंचा भाऊ रामराय हा केशवराव भोळ्यांचा मित्र व चहाता होता. त्याने केशवराव भोळ्यांना आपल्या बहिणीला भावगीत शिकवण्याची विनंती केली. या वेगळ्याच, नवीन व सुंदर गानप्रकाराचे ज्योत्स्नाबाईंना वेडच लागले. मनापासून, लक्षपूर्वक शिकून घेऊन त्यांनी 'भावगीत' आत्मसात केले. गाण्यातले भावनेचे महत्त्व त्यांना जाणीवपूर्वक असे प्रथमच या वेळी कळले. तोवरचे त्यांचे गायन हे नकळतपणे स्वाभाविक भावनेने होत असे. लवकरच ज्योत्स्नाबाई भावगीत गायिका म्हणूनही अतिशय लोकप्रिय झाल्या.

केशवराव भोळ्यांशी १९३२ साली त्यांचा विवाह झाला. केशव भोळे यांचे संगीत असलेल्या 'कृष्ण सिनेटोन' या कंपनीच्या 'संत सखू' या चित्रपटाचे चित्रीकरण चालू होते. ज्योत्स्नाबाई यात सखूची भूमिका करीत होत्या. त्या वेळी त्यांचे नाव दुर्गा भोळे असेच होते; पण सिनेमात आणखी एक दुर्गा शिरोडकर नावाच्या नटी काम करीत होत्या. या दोन दुर्गांमुळे जरा गोंधळ होऊ लागल्याने लहान दुर्गाचे 'ज्योत्स्ना' असे नामकरण झाले व त्या ज्योत्स्ना भोळे झाल्या.

केशवराव भोळ्यांचे, ज्योत्स्नाबाईंच्या सांगीतिक आयुष्यातलेही स्थान आत्यंतिक महत्त्वाचे होते.

भ

विवाहानंतर त्यांचे कलागुण अधिकच बहरू लागले. विवाहसमयी त्या जेमतेम अठरा वर्षांच्या होत्या. त्यानंतर काही महिन्यांतच प्रो. बा.र. देवधर यांच्या म्यूझिक सर्कलमध्ये मैफल करून ज्योत्स्नाबाईंनी देवधर मास्तर व जाणकार श्रोत्यांची दाद मिळवली.

केशवराव भोळे यांचा मंजी खाँ, रामकृष्णबुवा वझे, मल्लिकार्जुन मन्सूर, मास्तर कृष्णराव इ. अनेक गवयांशी स्नेह होता. त्यांनी अनेक बंदिशींचा संग्रह केला. वेगवेगळ्या घराण्यांच्या रंगांमुळे ज्योत्स्नाबाईंच्या गायकीचे एक स्वतंत्र, प्रभावी असे रसायन तयार झाले. पक्का सूर, लयतालावरची पकड, तडफ, लालित्य आणि माधुर्य या गुणांनी युक्त असे त्यांचे गायन श्रोत्यांना खिळवून ठेवी.

बशीर खाँ, घम्मन खाँ (ठुमरीची तालीम) या उस्तादांकडेही त्यांनी थोडी तालीम घेतली. बरीच वर्षे त्या 'तानरस खाँ' घराण्याचे खाँसाहेब इनायत हुसेन यांच्याकडे शिक्षण घेत होत्या. त्यांनी अनेक गुरूंकडे डोळसपणे तालीम घेतली.

गोरख कल्याण, भीम, मधमाद सारंग, शुद्ध भटियार, शामकल्याण, जलधर-केदार इ. काही राग खास ज्योत्स्नाबाईंचे म्हणून लोकप्रिय झाले. भेंडीबाजार घराण्याचे मोहंमद हुसेन खाँ (सारंगिये कादरबक्ष यांचे चिरंजीव) यांनी बांधलेला 'शिवकंस' हा रागही ज्योत्स्नाबाईंनी गाऊन लोकप्रिय केला.

ज्योत्स्नाबाईंनी देशभरातल्या महत्त्वाच्या संगीत सभांमधून अनेक वर्षे गायन केले. असरदार गायन, तसेच आवाजावरची हुकमत, उत्तम दमसास, सूक्ष्म सांगीतिक जाण, रंगतदार आलापी, प्रभावी तानक्रिया, शास्त्र आणि भाव यांचा सहजसुंदर मेळ आणि सुधमुद्रा-सुधबानी म्हणजेच ज्योत्स्नाबाई.

लग्नानंतर वर्षभरातच, म्हणजे १९३३ मध्ये ज्योत्स्नाबाईंना नाटकात काम करण्याचा योग आला. 'आंधळ्यांची शाळा' हे ते नाटक. लेखक वर्तक, के. नारायण काळे, पार्श्वनाथ आळतेकर, केशवराव दाते, केशवराव भोळे या नवमतवादी मंडळींनी 'नाट्य मन्वंतर' ही संस्था स्थापन केली. रंगभूमीवर स्त्रियांनीच स्त्रियांची कामे करावीत या आग्रहाने ज्योत्स्नाबाई व वर्तकांची पत्नी रंगभूमीवर उभ्या राहिल्या. यापूर्वीही हिराबाई बडोदेकर व त्यांच्या भगिनींनी नाटकमंडळी काढून रंगभूमीवर कामे केली होती. पण 'आंधळ्यांची शाळा' हे सर्वार्थाने आधुनिक नाटक तर होतेच; पण यात संगीत म्हणजे अनंत काणेकरांची भावगीते घेतली होती व ती फार परिणामकारक, प्रसंगोचित होती. त्यामध्ये पार्श्वसंगीताचा वापरही प्रथमच केला होता. केशवराव भोळेच याचे संगीतकार होते.

ज्योत्स्नाबाईंचे हे प्रथम पदार्पण त्यांच्या ठायी असलेल्या रूप, संगीत व अभिनय या त्रिवेणी संगमामुळे ऐतिहासिक महत्त्वाचे ठरले. पुढे १९४१ साली 'नाट्यनिकेतन' या संस्थेत प्रवेश केल्यावर संगीत अभिनेत्री म्हणून त्या चांगल्याच प्रस्थापित झाल्या. त्यांनी या संस्थेत एकूण अकरा नाटकांतून प्रमुख भूमिका केल्या, पैकी 'संगीत कुलवधू'ने त्यांना अजरामर कीर्ती दिली. मास्तर कृष्णरावांचे संगीत या नाटकाचे महत्त्वाचे यश होते.

ज्योत्स्नाबाईंचे अभिनयमंडित गायन, तेही संयम ठेवून नेटके व वेधक असे. हा बदल घडवून आणण्याचे मोठे श्रेय ज्योत्स्नाबाईंना, लेखक-दिग्दर्शक मो.ग. रांगणेकरांना, तसेच मास्तर केशव, श्रीधर पार्सेकर, स्नेहल भाटकर इ. संगीतकारांनाही जाते. ज्योत्स्नाबाईंच्या अत्यंत लोकप्रिय नाट्यपदांमध्ये, 'कुलवधू'तील सर्व पदे, 'क्षण आला भाग्याचा', 'मन रमणा मधुसूदना', 'बोला अमृत बोला'; 'एक होता म्हातारा'मधील 'छंद तुझा मजला', 'ये झणी येरे माघारी'; 'कोणे एके काळी'मधील 'का रे ऐसी माया' ही भैरवी; 'राधामाई' या नाटकातले 'खेळेल का देव माझिया अंगणी'; 'भूमिकन्या सीता'मधील 'मी पुन्हा वनांतरी फिरेन', 'मानसी राजहंस पोहतो' इ. वानगीदाखल सांगता येतील. 'कुलवधू'तील 'बोला अमृत बोला'ने लोकांच्या अंत:करणाचा ठाव घेतला.

ज्योत्स्नाबाईंना उत्कृष्ट भावगीत गायिकेचाही मान

भ

मिळाला. आकाशवाणीवरही त्यांच्या भावगीतांना वाढती मागणी येऊन अधिक प्रसार झाला. त्या बहुतांशी राजा बढे, अनंत काणेकर, कवी अनिल, मो.ग. रांगणेकर अशा कवी-गीतकारांच्या रचना गात असत. त्यांच्या लोकप्रिय भावगीतांमध्ये राजा बढे यांची 'माहेर'विषयीची तीन गीते, यांतील 'माझिया माहेरा जा' हे पुलंनी चाल दिलेले फारच लोकप्रिय झाले. अनंत काणेकरांचे 'किती गोड गोड वदला' व 'आला खुशीत समींदर'; मो.ग. रांगणेकरांचे 'नको वळून बघू माघारी' इ.च्या 'यंग इंडिया', 'कोलंबिया', 'हिज मास्टर्स व्हॉइस' अशा कंपन्यांनी ध्वनिमुद्रिकाही काढल्या.

ज्योत्स्नाबाईंच्या भावगीतांत विस्तार-शक्यता असूनही त्या खूप तारतम्याने, जडपणा आणू न देता, चालीच्या अंगाने आकर्षकपणे गायल्या याची प्रचिती त्यांची कोणतीही ध्वनिमुद्रिका ऐकताना येते. खानदानी गाण्याच्या तालमीमुळे आवाजाला जी झिलई व तेज लाभले, त्याचा त्यांनी नाट्यपदे व भावगीते यांत वेगळा आणि खुबीने वापर केला. त्यांनी गीतांचा व नाट्यगीतांचाही दर्जा जो प्रथमच उंच करून ठेवला, याचे महत्त्व फार मोठे आहे. ती त्यांची या क्षेत्राला देणगी आहे. कारण त्यामुळेच श्रोत्यांना विशिष्ट दर्जाची भावगीते ऐकण्याची चोखंदळ वृत्ती आली. त्यांची अभिरुची घडली.

ज्योत्स्नाबाईंनी गीतापासून भावगीत, भावगीतापासून पद, पदापासून ख्याल ही सगळी स्थित्यंतरे मोठ्या सहजपणे केली. सुगम संगीत पुढे नेण्याच्या वेगवेगळ्या पद्धती आहेत. त्यात एक पद्धत अशी की, आकार तोच ठेवायचा; पण त्यात स्वत:च्या आवाजाच्या पोताची भर घालायची, आणि हे ज्योत्स्नाबाईंनी केले.

ज्योत्स्नाबाईंनी थोडे लेखनही केले. १९६० च्या सुमाराला त्यांनी 'आराधना' हे संगीत नाटक लिहिले. निर्मिती, दिग्दर्शन, काव्य, संगीत सर्वकाही त्यांचेच होते. चारएक वर्षांनी 'अंतरीच्या खुणा' हे पत्ररूपी पुस्तक, तसेच नभोवाणीसाठी 'घराण्याचा पीळ' ही नाटिका लिहिली व १९९९ मध्ये, त्यांच्या निधनाच्या तीन वर्षे आधी 'तुमची ज्योत्स्ना भोळे' हे आत्मचरित्र लिहिले.

अखिल भारतीय नाट्य परिषदेचा 'बालगंधर्व' पुरस्कार, 'विष्णुदास भावे' पुरस्कार (१९८०), संगीत नाटक अकादमीचा संगीत अभिनेत्रीचा पुरस्कार (१९७७), 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, चौसष्टाव्या नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षा म्हणून १९८४ साली बिनविरोध निवड, गोमंतक मराठी अकादमीचा 'लता मंगेशकर' पुरस्कार (१९९५), महाराष्ट्र सरकारचा 'लता मंगेशकर' पुरस्कार (१९९९) असे काही महत्त्वाचे पुरस्कार त्यांना प्राप्त झाले. त्यांचे पुण्यात ८६व्या वर्षी निधन झाले.

– वंदना खांडेकर

**संदर्भ :**


१. *मोटे, ह.वि. (संपा ह.वि. ); 'विश्रब्ध शारदा', खंड -२; प्रकाशक : मोटे; १९७५.*

२. *भोळे, ज्योत्स्ना; 'तुमची ज्योत्स्ना भोळे'; अनुबंध प्रकाशन, पुणे; १९९८.*


✻✻✻

भ

# म



## मंगरूळकर, नारायण गोविंद
**संगीत शिक्षक व लेखक**
**२१ फेब्रुवारी १९३८**



नारायण गोविंद मंगरूळकर यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव मनोरमा होते. त्यांनी १९५० साली, वयाच्या बाराव्या वर्षी पं. सावळाराम मास्तर यांच्याकडून तालीम घेण्यास सुरुवात केली. पुढे पं. शंकरराव सप्रे यांनी त्यांच्यावर संगीताचे संस्कार केले. यानंतर नामांकित गायक पं. राजाभाऊ कोगजे यांच्याकडे ते गायन शिकले.

गायकीचे अंग विकसित होत असताना त्यांनी पदवी परीक्षा देऊन संशोधनही केले. ‘विदर्भातील संगीत परंपरा - १७५० ते १९७५’ यावर दिल्लीच्या डॉ. सुमती मुटाटकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी मौलिक संशोधन केले. त्यांनी १९८३ मध्ये हा प्रबंध नागपूर विद्यापीठाला सादर करून आचार्य (पीएच.डी.) ही पदवी प्राप्त केली.

त्यांनी ‘वैदर्भीय संगीतोपासक - भाग १’ (१९७४), ‘वैदर्भीय संगीतोपासक - भाग २’ (१९७६) ही पुस्तके लिहिली. मंगरूळकरांनी लिहिलेली ‘संगीतशास्त्र विजयिनी’ (१९८९), तसेच एकूण १५० संगीत कलावंतांची चरित्रपर माहिती देणारे ‘संगीतातील घराणी आणि चरित्रे’ (१९९२) ही दोन पुस्तके नागपूर, अमरावती विद्यापीठ व अ.भा. गांधर्व महाविद्यालय मंडळातर्फे संदर्भ ग्रंथ म्हणून अभ्यासक्रमात मान्यताप्राप्त झाली. मंगरूळकरांनी १९७० साली ‘गुरुकृपा संगीत मंडळ’ स्थापन करून शिस्तबद्ध संगीत सभांचे आयोजन केले. त्यांनी १९७८ मध्ये ‘स्वरसंपदा’ हा वार्षिकांक प्रकाशित केला होता. परंतु तीन वर्षांनंतर हा अभिनव उपक्रम आर्थिक अडचणींमुळे बंद पडला.

मंगरूळकर यांचे ‘संगीत कला विहार’, विविध स्मरणिका, गौरवांक व विविध वृत्तपत्रे यांमधून संगीतविषयक शंभराहून अधिक लेख प्रकाशित झाले आहेत. त्यांनी १९७२ ते १९९० अशी सलग अठरा वर्षे दै. ‘लोकमत’मधून संगीतसमीक्षात्मक लेखन केले आहे.

मंगरूळकर यांनी विविध राग-तालांतील सुमारे ९० बंदिशी रचल्या. ते नागपूर व अमरावती विद्यापीठांचे संगीत विषयाचे मान्यताप्राप्त मार्गदर्शक आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाखाली बारा विद्यार्थ्यांनी पीएच.डी. पदवी संपादन केली आहे. ते १९९६ मध्ये नागपूर महानगरपालिकेतून निरीक्षक पदावरून निवृत्त झाले. त्यांच्या संगीतविषयक सर्व उपक्रमांत त्यांची पत्नी विजया हिची उत्तम साथ लाभली आहे.

— संगीता गलांडे

## मंगळवेढेकर (जोशी), दत्तात्रेय केशव
**मृदंग, तबला व जलतरंगवादक**
**२४ जून १९०६ — ३ नोव्हेंबर १९८७**

दत्तात्रेय केशव जोशी यांचा जन्म मंगळवेढ्याला झाला. त्यांच्या आईचे नाव गीताबाई होते. त्यांचे चौथीपर्यंतचे प्राथमिक शिक्षण पंढरपूरला झाले. पंढरपूर येथे १९१४ साली गायनाचार्य पंडित नारायणराव थिटे व वादनाचार्य पंडित नारायणराव जोशी (मंगळवेढेकर) या द्वयीने स्थापन केलेल्या ‘धर्मार्थ महाराष्ट्र संगीत विद्यालय’ पंढरपूर येथे दत्तोपंतांचे गायन, वादन व विशेष करून



मृदंगवादनाचे शिक्षण वादनाचार्य ज्येष्ठ बंधू नारायणराव जोशी यांच्याकडे झाले.

जोशी यांचा तब्बल बारा ते चौदा वर्षांचा काळ मृदंगवादनकला शिकण्यात व मेहनतीत गेला. त्या काळी मोठ्या शहरांतून संगीत जलसे लावले जात असत. दत्तोपंतांनी सर्व भारतभर भ्रमण करून १९३८ सालापर्यंत जलसे लावून मृदंगवादनाचे, तसेच जलतरंग, तबला-तरंगवादनाचे कार्यक्रम केले. भारतातील पहिले आकाशवाणी केंद्र मुंबई येथे सुरू झाले होते. रेडिओवर मृदंगवादन करणारे ते पहिले कलाकार होते.

गुरुवर्य नारायणराव थिटे व नारायणराव जोशी यांनी विद्यालयाचा रौप्यमहोत्सव साजरा करून ते विद्यालय चालविण्याची दत्तोपंतांवर सोपवलेली जबाबदारी विद्यालयाचा हीरकमहोत्सव साजरा करून त्यांनी पार पडली. त्यांच्या कारकिर्दीत असंख्य विद्यार्थ्यांनी या विद्यालयात गायन, वादन यांचे शिक्षण घेतले. साहित्यसम्राट न.चिं. केळकर, पं. आबासाहेब मुजुमदार व संगीत क्षेत्रातील थोर कलावंतांनी या विद्यालयास भेटी दिल्या. मंगळवेढेकर घराणे हे संगीत क्षेत्रात महाराष्ट्रातील महत्त्वाचे घराणे असून सध्या सातवी पिढी चालू आहे. पं. दत्तोपंतांनी तालशास्त्रात उल्लेख केलेले एकशे आठ ताल मृदंगावर वाजविले व आज त्या तालांचे ध्वनिचकतीमध्ये मुद्रण उपलब्ध आहे.

पं. दत्तोपंतांनी तालशास्त्रातील घराण्याची बोलरचना करण्याची पद्धत, तसेच साधा चक्रधार, कमाली चक्रधार कसे रचावेत, त्यांचे हिशेब 'फ्रॉम हिअर टू एटर्निटी अलाइज वन हंड्रेड अँड एट इंडियन ऱ्हिदम तालाज' या पुस्तकात दिले आहेत, ते अभ्यासूंना अतिशय उपयुक्त आहेत. त्या काळात प्रसिद्ध असलेली सिनेतारका कु. शांता आपटे हिला पं. दत्तोपंतांनी नृत्याचे शिक्षण दिले.

भारतातील अनेक आकाशवाणी केंद्रांवर पं. दत्तोपंतांच्या संगीत सभा झालेल्या आहेत. एकोणीसशे पंचावन्न साली धृपद गायक डागरबंधू यांच्या दिल्ली येथील राष्ट्रीय कार्यक्रमास मृदंग-साथीसाठी त्यांना आमंत्रित केले होते. पं. सियाराम प्रसाद तिवारी यांना बंगळुरू येथील हिवाळी संमेलनात त्यांनी मृदंगावर साथ केली.

दत्तोपंतांची गानमहर्षी पंडित विष्णू दिगंबर पलुसकर यांनी प्रशंसा केली होती. त्यांना विशेष फाय फाउण्डेशन पुरस्कार, इचलकरंजी येथे प्राप्त झाला. शंकराचार्य, कांचीपीठ यांजकडून त्यांना 'वादनाचार्य' ही पदवी मिळाली. त्यांचे 'भजनी मृदंग' हे पुस्तक १९३५ मध्ये प्रसिद्ध झाले. इंदूर येथे त्यांना 'नानासाहेब पानसे पुरस्कार' देण्यात आला.

भोपाळ येथे भरलेल्या धृपद - धमार मेळाव्यात कार्यक्रम करून परत येत असता, हरियाणातील होडल या गावी त्यांचा मोटार अपघातात मृत्यू झाला.

त्यांच्या शिष्यवर्गात पं. शंकरराव मंगळवेढेकर, पं. दामुअण्णा जोशी-मंगळवेढेकर, पं. एस.व्ही. पटवर्धन, पं. सखाराम देशमुख, ज्ञानोबा लटपटे, सरोदवादक वसंत देव आदींचा समावेश होतो.

— नरसिंह जोशी-मंगळवेढेकर

## मंगळवेढेकर (जोशी), दामोदर काशिनाथ

**मृदंग व तबलावादक**

**८ फेब्रुवारी १९०८ — १९७५**



दामोदर काशिनाथ ऊर्फ दामूअण्णा जोशी यांचा जन्म मंगळवेढ्याला झाला. त्यांच्या वडिलांचे नाव काशिनाथ जनार्दन जोशी होते. पं. दत्तोपंतांचे हे कनिष्ठ बंधू असल्यामुळे पंढरपूर येथे स्थापन झालेल्या धर्मार्थ महाराष्ट्र संगीत विद्यालयात पं. दत्तोपंत जोशी-

म

मंगळवेढेकर यांच्या मार्गदर्शनाखाली दामोदर जोशी मृदंग, तबला, जलतरंग इत्यादी वाद्ये शिकले.

पं. दामूअण्णांनी विद्यालयासाठी भरपूर काबाडकष्ट घेतले. विद्यालयाची झाडलोट करणे, जमीन सारवणे, रंग देणे अशी कामे त्यांना करावी लागत असत.

भल्या पहाटे मृदंगाचा रियाज सुरू व्हायचा तो सकाळी संपायचा. सकाळी नऊच्या सुमारास नवीन ताल, बोल, रचना यांची प्रात्यक्षिके चालायची. बसविलेले बोल दुपारच्या भोजनानंतर पुन्हा चारच्या सुमारास वाजवून दाखवावे लागत. रात्री वेगळा रियाज करावा लागे. एका तपाच्या, बारा वर्षांच्या शिक्षणानंतर त्यांनी नाव कमविण्यासाठी पुणे गाठले. पुण्यात प्रभात फिल्म कंपनीमध्ये त्यांनी वादक-कलाकार म्हणून नोकरी केली. मायामच्छिंद्र, अमृतमंथन इ. चित्रपटांतील पार्श्वसंगीतात त्यांनी मृदंग, तबला, जलतरंग यांची साथ दिली.

पं. दत्तोपंतांच्या सांगण्यावरून त्यांनी आकाशवाणी पुणे केंद्रावर 'स्टाफ आर्टिस्ट' म्हणून नोकरी स्वीकारली. नोकरी दरम्यान त्यांना आकाशवाणी केंद्रांवर धृपद गायकांच्या मृदंगसाथीसाठी जावे लागले. त्यांनी अनेक गायक कलाकारांना, तसेच वादकांना साथ केली. पुणे आकाशवाणी केंद्रावर एखाद्या कलाकाराच्या अनुपस्थितीमुळे निर्माण झालेली वेळेची अवधी भरून काढण्यासाठी त्यांनी मृदंगवादन, जलतरंगवादनही केले.

जलद बोल टिपेच्या आवाजात स्वर कमी-अधिक करून उंचावण्याची त्यांची लकब विशेष म्हणता येईल. मुखबाजी ही त्यांची खासियत होती. आकाशवाणीच्या नोकरीतून निवृत्त झाल्यानंतर त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना तबला, मृदंगाचे शिक्षण देणे चालू ठेवले. पं. भीमसेन जोशी यांचे ते अतिशय आवडते तबला साथीदार म्हणून सर्व पुणेकर त्यांना ओळखत असत.

मनमिळाऊ स्वभावामुळे कलाकार मंडळीत ते प्रसिद्ध होते. अनेक धृपद गायकांना मृदंगाची, तर शास्त्रीय गायनाला त्यांनी तबल्याची साथ दिली. प्रदीर्घ आजारानंतर ते कालवश झाले.

— नरसिंह जोशी-मंगळवेढेकर

## मंगेशकर, उषा दीनानाथ

**गायिका**

**१५ डिसेंबर १९३५**



आपल्या ठसकेबाज गायनाने मराठी चित्रपटसृष्टी गाजविणाऱ्या उषा मंगेशकर या मास्टर दीनानाथ मंगेशकर व माई मंगेशकर यांचे चौथे अपत्य. मा. दीनानाथांचे १९४२ साली निधन झाले त्या वेळी उषाताईंचे वय अवघे सात वर्षांचे होते. मास्टर दीनानाथ आपल्या दोन मोठ्या मुली, लता व मीना यांना गाण्याची तालीम देत, त्या वेळी आशा व उषा खेळत असत. मा. दीनानाथांना भविष्य उत्तम अवगत होते. ''माझी पाचही अपत्ये मोठी झाल्यावर माझं नाव काढणार आहेत व मोठे कलावंत होणार आहेत,'' असे भविष्य त्यांनी वर्तविले होते. त्यातही उषाबद्दल असे भविष्य वर्तविले होते, की तिच्या पत्रिकेत बालरवी आहे, त्यामुळे तिचा भाग्योदय उशिरा होणार आहे. मा. दीनानाथांचे उषा मंगेशकरांबद्दलचे भविष्य पुढे तंतोतंत खरे ठरले.

मा. दीनानाथांच्या निधनानंतर पुढची पाच वर्षे मंगेशकर कुटुंबीयांसाठी अतिशय कष्टदायक होती. लता मंगेशकरांना मा. विनायकांच्या कंपनीत काम मिळाले आणि सगळे मंगेशकर कुटुंबीय पुण्याहून कोल्हापुरात जाऊन राहू लागले. पुढे १९४५ साली मा. विनायकांनी कंपनीचा मुक्काम कोल्हापुराहून मुंबईला हलविला. त्यामुळे आशा, उषा, हृदयनाथ आपल्या आई, माईंबरोबर थाळनेरला, आपल्या आजोळी राहू लागले. पुढे काही दिवसांनी लता मंगेशकरांना मुंबईमध्ये राहावयास जागा मिळाली आणि सगळी मंगेशकर भावंडे आपल्या आईबरोबर पुन्हा एकत्र राहू लागली. या काळात उषा मंगेशकरांचा चित्रपटसृष्टीशी संबंध फक्त मा. विनायकांच्या 'माझं बाळ' या चित्रपटातील एका गाण्याच्या प्रसंगापुरता आला. 'चला चला नवबाला' या

म

गाण्यात प्रभातफेरीच्या प्रसंगी एक छोटीशी भूमिका त्यांनी केली होती.

पुढे १९४७ साली लता मंगेशकर यांना हिंदी, मराठी चित्रपटांत पार्श्वगायनाचे काम मिळाले आणि अल्पावधीतच त्या सर्वोच्च स्थानावर पोहोचल्या. त्यामुळे घरात पुन्हा सुबत्ता आली आणि लता मंगेशकरांनी आपल्या भावंडांना उत्तम शिक्षण घेण्यास सांगितले. शालेय शिक्षणाबरोबर उषा मंगेशकरांचा गाण्याचा रियाझ घरी सुरू होता. त्यांनी १९५२ साली प्रथम हिंदी चित्रपट 'सुबह का तारा'मध्ये पार्श्वगायन केले. मराठीमध्ये मात्र त्यांचे पार्श्वगायन उशिरा सुरू झाले.

गायनाव्यतिरिक्त उषा मंगेशकरांना नृत्य व चित्रकलेचीपण आवड आहे. एम. आर. आचरेकर या प्रख्यात चित्रकारांकडे उषा मंगेशकरांनी चित्रकलेचे शिक्षण घेतले. लता मंगेशकरांचे काम वाढल्यामुळे घरातील पैशांची आवक वाढली, त्यामुळे घरामध्ये योग्य शिस्त आणि आर्थिक नियोजन करण्याची गरज निर्माण झाली. उषा यामुळे लहान वयातच प्रौढ झाल्या आणि तेव्हापासून घरातील सर्व महत्त्वाचे निर्णय त्याच घेत असतात. घरातील व्यवस्थापनाला उषा मंगेशकरांनी प्राधान्य दिल्यामुळे सुरुवातीच्या काळात त्यांनी पार्श्वगायनासाठी विशेष प्रयत्न केले नाहीत.

मराठी चित्रपटगायनात उषा मंगेशकरांची कारकीर्द प्रदीर्घ आहे. ही कारकीर्द दोन टप्प्यांतील आहे. पहिला टप्पा साठच्या दशकातील; त्यांची गाणी जी वेगवेगळे भाव दर्शविणारी आहेत, तर दुसरा टप्पा 'पिंजरा', 'सोंगाड्या', 'एकटा जीव सदाशिव' या चित्रपटांतील गीतांचा. येथपासून त्यांच्या गाण्यांची संख्या वाढली आणि त्या लोकप्रियतेच्या शिखरावर आरूढ झाल्या. दादा कोंडके, राम कदम आणि ग्रामीण बाजाचे चित्रपट यांसाठी उषा मंगेशकरांचा आवाज असणे अविभाज्य झाले. याच सुमारास त्यांच्या आवाजात अनेक ध्वनिमुद्रिकाही आल्या. त्यांच्या खाजगी ध्वनिमुद्रिकांमध्ये भावगीते, भक्तिगीते, बालगीते इत्यादी वैविध्य आहे. एकाच वेळी चित्रपटातील लावणी, ग्रामीण ढंगाची गाणी गाऊन ग्रामीण श्रोत्यांची आवडती गायिका बनणे, तर दुसरीकडे खाजगी ध्वनिमुद्रिकांद्वारे भावगीते, भक्तिगीते गाऊन शहरी वर्गाची दाद मिळवणे, असे दुहेरी आव्हान उषा मंगेशकरांनी पेलले.

वसंत पवार यांनी संगीत दिलेल्या, 'गाठ पडली ठकाठका' या १९५६ सालच्या चित्रपटात उषा मंगेशकरांनी मीना व लता यांच्यासमवेत 'नको जाऊ नारी यमुनाकिनारी' हे गीत गायिले. त्यानंतर 'गुरूची विद्या गुरूला' (संगीत : दादा चांदेकर), 'भाव तेथे देव' (संगीत : जितेंद्र अभिषेकी), 'थोरातांची कमळा' (संगीत : दत्ता डावजेकर), 'वैशाख वणवा' (संगीत : दत्ता डावजेकर), 'स्वयंवर झाले सीतेचे' (संगीत : वसंत देसाई), तर 'सोंगाड्या' या राम कदमांच्या गाजलेल्या चित्रपटापूर्वी, 'सुख आले माझ्या दारी', 'पाटलाची सून', 'वारणेचा वाघ' या काही चित्रपटांत राम कदमांच्या संगीत दिग्दर्शनात उषा मंगेशकर गायल्या होत्या.

लता मंगेशकरांनी 'आनंदघन' या नावाने ज्या मराठी चित्रपटांना संगीत दिले होते, त्यांतील 'साधी माणसं' या चित्रपटात लता व उषा यांचे 'राजाच्या रंगम्हाली सोन्याचा बाई पलंग' हे एक सुंदर मराठमोळे गीत आहे. उषा मंगेशकरांनी १९६५ साली गो.नी. दांडेकर यांच्या कथेवर 'पवनाकाठचा धोंडी' या चित्रपटाची निर्मिती केली. या चित्रपटातील एक ठसकेबाज गाणे, 'काय बाई सांगू, कसं ग सांगू मलाच माझी वाटे लाज' आजही लोकप्रिय आहे. पुढे उषा मंगेशकर यांनी 'जैत रे जैत' या चित्रपटाची निर्मिती केली, त्यालाही पं. हृदयनाथ मंगेशकर यांचे संगीत होते.

मराठी चित्रपटांत १९७० नंतर तमाशाप्रधान चित्रपटांची लाट आली. शाहीर दादा कोंडके यांनी १९७१ साली 'सोंगाड्या' या चित्रपटाची निर्मिती केली. या चित्रपटाला राम कदम यांचे संगीत होते. उषा मंगेशकरांनी उषा चव्हाणांसाठी पार्श्वगायन केले, तर जयवंत कुलकर्णी दादा कोंडक्यांसाठी गायले. या चित्रपटातील 'माळ्याच्या मळ्यामधी कोण ग उभी', 'काय ग सखू बोला दाजिबा' (सोबत जयवंत

कुलकर्णी), 'राया मला पावसात नेऊ नका' ही गाणी महाराष्ट्रभर लोकप्रिय झाली. 'एकटा जीव सदाशिव' या चित्रपटासाठी त्यांना १९७२ साली राज्य सरकारचा उत्कृष्ट पार्श्वगायिकेचा पुरस्कार मिळाला. पुढे दादा कोंडक्यांच्या प्रत्येक चित्रपटांत उषा चव्हाणांसाठी उषा मंगेशकरांनीच पार्श्वगायन करायचे असा अलिखित करारच झाला. काही चित्रपटांना राम कदम यांच्याऐवजी राम लक्ष्मण, प्रभाकर जोग यांचे संगीत होते, तसेच दादा कोंडक्यांसाठी जयवंत कुलकर्णी यांच्याऐवजी महेन्द्र कपूर पार्श्वगायन करू लागले.

उषा मंगेशकरांनी १९७२ साली 'आई मी कुठं जाऊ' या चित्रपटाला संगीत दिले. या चित्रपटाचे वैशिष्ट्य म्हणजे पार्श्वगायिका म्हणून गाजत असताना या चित्रपटात त्यांनी एकही गाणे गायले नाही, तर लता, आशा व हृदयनाथ यांच्याकडून त्यांनी गीते गाऊन घेतली. याच सुमारास व्ही. शांताराम यांचा 'पिंजरा' हा चित्रपट प्रदर्शित झाला. या चित्रपटाला राम कदम यांचे संगीत होते. 'छबीदार छबी मी तोऱ्यात उभी', 'मला लागली कुणाची उचकी', 'तुम्हांवर केली मी मर्जी बहाल', 'मला इष्काची इंगळी डसली', 'दिसला ग बाई दिसला' ही उषा मंगेशकरांच्या आवाजातली सगळी गाणी लोकप्रिय झाली. त्यानंतर व्ही. शांताराम यांचा 'चंदनाची चोळी माझं अंग अंग जाळी' हा चित्रपट प्रदर्शित झाला. या चित्रपटातील 'एक लाजरा न् साजरा मुखडा' हे उषा मंगेशकरांनी अरुण सरनाईक यांच्याबरोबर गायलेले द्वंद्वगीत अतिशय गाजले.

'एकटा जीव सदाशिव' या दादा कोंडक्यांच्या पहिल्या चित्रपटापासून ते 'येऊ का घरात' या चित्रपटापर्यंत त्यांच्या प्रत्येक चित्रपटात उषा मंगेशकरांनी पार्श्वगायन केले. 'सोंगाड्या', 'पिंजरा' या चित्रपटांपासून संगीतकार राम कदम यांनी प्रामुख्याने उषा मंगेशकरांच्या आवाजाला प्राधान्य दिले. विश्वनाथ मोरे, राम लक्ष्मण, भास्कर चंदावरकर, अनिल अरुण, बाळ पळसुले, दत्ता डावजेकर, आदि नारायणराव, ऋषिराज इत्यादी अनेक संगीतकारांकडे त्या अनेक गीते गायल्या आहेत, तर २०१० सालच्या 'मुंबईचा डबेवाला' या चित्रपटातही उषा मंगेशकरांनी पार्श्वगायन केले आहे. मराठीव्यतिरिक्त हिंदी, गुजराती, बंगाली, आसामी, भोजपुरी इत्यादी अनेक भाषांत त्यांनी गीते गायली आहेत. लता मंगेशकरांबरोबर परदेशांत त्यांनी अनेक कार्यक्रम केले आहेत. त्यांच्या अनेक गीतांना पुरस्कार लाभले आहेत.

उषा मंगेशकर या एक उत्तम चित्रकार आहेत आणि याची प्रचिती त्यांनी केलेल्या 'चाला वाही देस', 'अभंग तुकयाचे', 'गालीब', 'आदिनाथची गाणी' इ. ध्वनिमुद्रिकांच्या वेष्टणांवरील चित्रांवरून आपल्याला येते. प्रभाकर पंडितांच्या 'असेच मूक राहू या' या १९६८ सालच्या भावगीताने उषा मंगेशकरांच्या भावगीतगायनाची सुरुवात झाली. पुढे यशवंत देव, श्रीनिवास खळे, हृदयनाथ मंगेशकर, मीना मंगेशकर, अनिल-अरुण, विश्वनाथ मोरे, मानस मुखर्जी इत्यादी संगीतकारांकडे त्या अनेक भावगीते गायल्या. 'केळीचे सुकले बाग', 'ससा तो ससा', 'थांब रे घना', 'वेळ झाली भर माध्यान्ह', 'सूर सनईत नादावला', 'साजणी सई ग', 'खिन्न या वाटा', 'धुंदीत गंधित होऊनी सजणा' ही त्यांची काही गाजलेली भावगीते आहेत. उषा मंगेशकरांचे 'रंग उषेचे' या शीर्षकाचे कार्यक्रम महाराष्ट्रभर होत असतात.

— अद्वैत धर्माधिकारी

**संदर्भ :**

*शेळके, शांता; 'वडीलधारी माणसे'.*

म

## मंगेशकर, दीनानाथ गणेशभट

☛ ***मास्टर दीनानाथ मंगेशकर***

## मंगेशकर, लता दीनानाथ

**गायिका, संगीतकार**

**२८ सप्टेंबर १९२९**

लता मंगेशकर या सात अक्षरांनी संगीताच्या दुनियेत चमत्कार घडविला आहे. गेली सहा दशके हा आवाज भारत आणि भारताबाहेर संगीतप्रेमींच्या मनावर गारूड



करून आहे. लता मंगेशकर यांचा आवाज विसाव्या शतकातील एक अनमोल ठेवा आहे.

लता दीनानाथ मंगेशकर यांचा जन्म इंदूर (मध्यप्रदेश) येथे झाला. त्यांचे वडील मास्टर दीनानाथ मंगेशकर हे मराठी रंगभूमीवरील एक नामवंत गायक व नट होते. बलवंत नाटक कंपनीचे ते मालक होते. लताबाईंच्या आईचे नाव शुद्धमती; परंतु सर्व जण त्यांना माई म्हणत.

लताबाईंचे जन्मनाव 'हृदया' होते; परंतु मा. दीनानाथ त्यांना 'लतिका' या गाजलेल्या भूमिकेमुळे लता म्हणत. लताबाई या मा. दीनानाथ व माई यांचे थोरले अपत्य. त्यांना मीना, आशा व उषा या तीन बहिणी आणि बाळ (हृदयनाथ) हा एकमेव भाऊ. या सर्व मंगेशकरांनी संगीत क्षेत्रात स्वकर्तृत्वाने मानाचे स्थान निर्माण केले आहे. लताबाईंच्या घरात त्यांच्या लहानपणापासून संगीताचे वातावरण होते, त्यामुळे शालेय शिक्षणापेक्षा त्यांचा ओढा गाण्याकडे होता. मा. दीनानाथांनी त्यांना लहानपणीच शास्त्रशुद्ध गाण्याची तालीम देण्यास सुरुवात केली. वयाच्या सहाव्या वर्षी लताबाईंनी 'मानापमान' नाटकातील 'शूरा मी वंदिले' हे पद मोठ्या तयारीने व आत्मविश्वासाने गाऊन श्रोत्यांना आश्चर्यचकित केले.

मा. दीनानाथ यांना आपल्या लाडक्या लताला रागदारी गाणारी गायिका म्हणून घडवायचे होते. बलवंत नाटक कंपनीत 'संगीत सौभद्र' नाटकात लहानग्या लताने नारदाची भूमिका मोठ्या तडफेने केली व पदांना वन्समोअरही घेतला. नियतीच्या मनामध्ये मात्र काहीतरी वेगळे होते; लताबाईंचा गायिका म्हणून प्रवास सुकरपणे घडायचा नव्हता. बोलपटांच्या आगमनाने संगीत नाटकांचा प्रेक्षक बोलपटांकडे आकर्षित झाला आणि नाटकमंडळींना हा व्यवसाय करणे अवघड झाले. मा. दीनानाथांनी ढासळत्या नाटक कंपनीला सावरण्यासाठी 'कृष्णार्जुन युद्ध' या चित्रपटाची निर्मिती केली. चित्रपट चालला नाही, त्यामुळे मा. दीनानाथांना प्रचंड आर्थिक तोटा झाला. या साऱ्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर झाला. पल्लेदार आवाजाच्या व करारी बाण्याच्या मा. दीनानाथांचे २४ एप्रिल १९४२ रोजी, वयाच्या अवघ्या बेचाळिसाव्या वर्षी दु:खद निधन झाले.

वडिलांच्या दु:खद निधनानंतर सारी मंगेशकर भावंडे पोरकी झाली. त्यानंतर कुटुंबाच्या चरितार्थासाठी लतादीदींना चित्रपटात काम करावे लागले. न्यू महाराष्ट्र पिक्चर्सच्या 'किती हसाल' या चित्रपटात १९४२ साली सदाशिव नेवरेकर यांच्या संगीत दिग्दर्शनात 'नाचू या गडे, खेळू दारी' हे गीत त्या गायल्या; परंतु हे गीत चित्रपटात समाविष्ट झाले नाही. या सालीच नवयुग चित्रपट लिमिटेडच्या 'पहिली मंगळागौर' या चित्रपटात लतादीदींनी अभिनय व गायन केले. या चित्रपटाला दादा चांदेकर यांचे संगीत होते. 'नटली चैत्राची नवलाई' हे स्नेहप्रभा प्रधानबरोबर गायलेले लतादीदींचे पहिले चित्रपटगीत. लतादीदींना नवयुग चित्रपट कंपनीत प्रख्यात दिग्दर्शक व अभिनेते मा. विनायक यांनी घेतले होते. 'पहिली मंगळागौर' या चित्रपटादरम्यान मा. विनायकांनी नवयुग कंपनी सोडली आणि 'प्रफुल्ल पिक्चर्स' या कंपनीची स्थापना करून कोल्हापुरात चित्रपटनिर्मितीला प्रारंभ केला.

लतादीदींना आपल्या आई व भावंडांसमवेत पुणे सोडून कोल्हापूरला जावे लागले. मा. विनायकांच्याकडे लतादीदींनी 'माझं बाळ' (१९४३), 'चिमुकला संसार' (१९४३) आणि 'गजाभाऊ' (१९४४) या तीन मराठी चित्रपटांत अभिनय व गायन केले. या तिन्ही चित्रपटांना ज्येष्ठ संगीतकार दत्ता डावजेकर यांचे संगीत होते. 'माझं बाळ' या चित्रपटात प्रभातफेरीच्या एका प्रसंगावर 'चला चला नवबाला' हे गाणे लतादीदी, मीना, आशा, उषा व हृदयनाथ या सर्व मंगेशकर भावंडांवर चित्रित करण्यात आले होते. सर्व मंगेशकर भावंडे व दत्ता डावजेकर यांनी हे गाणे गायले होते.

म

'गजाभाऊ' या चित्रपटात दत्ता डावजेकरांनी लतादीदींकडून प्रथमच एक हिंदी गाणे 'माता एक सपूत की दुनिया बदल दे तू' गाऊन घेतले होते. 'गजाभाऊ' या चित्रपटानंतर मा. विनायकांनी कंपनीचा मुक्काम कोल्हापूरहून मुंबईला हलविला. लताबाई आता कोल्हापूर सोडून आपली धाकटी बहीण मीनाबरोबर मुंबईला राहायला आल्या. माई आणि बाकी भावंडे खानदेशात थाळनेरला, आपल्या आजोळी राहू लागली.

मा. दीनानाथ असेपर्यंत त्यांनी लताला शास्त्रीय गायनाचे शिक्षण दिले, त्यानंतर कुटुंबाच्या चरितार्थासाठी लताला अभिनय व गायन करावे लागले. शास्त्रीय संगीताचा अभ्यास पुढे सुरू राहावा यासाठी ११ जून १९४५ रोजी गायक उ. अमान अली खाँ (भेंडीबाजारवाले) यांचा लतादीदींनी गंडा बांधला. एक वर्षाच्या आतच अमान अली खाँसाहेबांनी मुंबई सोडली. त्यामुळे देवासचे अमानत अली खाँ यांच्याकडे लतादीदी शास्त्रीय संगीत शिकू लागल्या. पुढे उस्ताद बडे गुलाम अली खाँ यांच्या गायकीने त्या खूप प्रभावित झाल्या व त्यांचे शिष्य पं. तुलसीदास शर्मा यांच्याकडे त्या शिकत होत्या.

मा. विनायकांचे १८ ऑगस्ट १९४७ रोजी निधन झाले व लतादीदींवर आता पुन्हा काम शोधायची पाळी आली. सुदैवाने त्याच वर्षी त्यांना दत्ता डावजेकर आणि मास्टर गुलाम हैदर यांच्या संगीत दिग्दर्शनांत हिंदी चित्रपटांत पार्श्वगायनाची संधी मिळाली. लतादीदी आणि त्यांच्या कुटुंबीयांना १९४२ ते १९४६ दरम्यान प्रतिकूल परिस्थितीशी झगडावे लागले. आर्थिक समस्यांचा सामना करावा लागला. पण नंतर ते सारे संपले. त्यांच्या सुरेल, मधुर व अलौकिक आवाजामुळे हिंदी चित्रपटांतील पार्श्वगायनाचे दार त्यांना खुले झाले. माई व धाकट्या भावंडांबरोबर त्या मुंबईत राहू लागल्या. हिंदी पार्श्वगायनात लतादीदी प्रचंड व्यस्त झाल्या. त्यामुळे मराठीमध्ये त्यांनी मोजकीच गाणी (हिंदी भाषेच्या तुलनेत) गायलेली आहेत.

'राम राम पाव्हणं' या चित्रपटाला लतादीदींनी १९५० साली संगीत दिले होते. स्वत: लतादीदी, मीना मंगेशकर आणि चितळकर (सी. रामचंद्र) यांनी या चित्रपटात गाणी गायली. हा चित्रपट आणि त्यातील गाणी त्या काळात खूप गाजली. याच सुमारास 'संत जनाबाई' (संगीत : सुधीर फडके), 'पाटलाचा पोर' (वसंत प्रभू), 'साखरपुडा' (वसंत देसाई) या चित्रपटांतील लतादीदींनी गायलेली गाणी फार गाजली.

'अमर भूपाळी' या १९५१ सालच्या चित्रपटाने लता मंगेशकरांच्या गाण्याच्या लोकप्रियतेचा कळस गाठला. संगीत दिग्दर्शक वसंत देसाई यांनी या चित्रपटासाठी खास मराठमोळे संगीत तयार केले. 'लटपट लटपट तुझं चालणं' ही लावणी, 'घनश्याम सुंदरा श्रीधरा' (सोबत पंडितराव नगरकर) ही भूपाळी, 'तुझ्या प्रीतीचे दु:ख मला', 'घडी घडी मोहना रे' ही सारीच गाणी लोकप्रिय झाली. 'अमर भूपाळी' हा चित्रपट प्रचंड गाजल्यामुळे त्याची बंगाली आवृत्तीपण निघाली होती. त्या निमित्ताने लतादीदी पहिल्यांदा बंगाली भाषेत गायल्या. 'छत्रपती शिवाजी' या चित्रपटात (संगीतकार : सी. रामचंद्र) लता मंगेशकरांनी स्वत: पडद्यावर शिवाजी महाराजांचा पाळणा म्हटला होता. त्यांनी अभिनय केलेला हा शेवटचा चित्रपट. त्यानंतर त्यांनी सारे लक्ष पार्श्वगायनावर केंद्रित केले.

पुढील काळात मराठी चित्रपटात अनेक स्थित्यंतरे घडली आणि याच काळात लतादीदी हिंदी चित्रपटांतील पार्श्वगायनात अधिकाधिक व्यस्त झाल्या. त्यामुळे त्या मराठी चित्रपटगीतांसाठी फार कमी उपलब्ध झाल्या. संख्येने लतादीदींची मराठी चित्रपटगीते कमी असली तरी ती चिरस्मरणीय आहेत. दत्ता डावजेकर, दादा चांदेकर, सुधीर फडके, वसंत देसाई, वसंत पवार, वसंत प्रभू, मीना मंगेशकर (खडीकर), हृदयनाथ मंगेशकर, श्रीनिवास खळे, उषा मंगेशकर, राम कदम, भास्कर चंदावरकर, मा. कृष्णराव, मुहम्मद शफी, हेमंत कुमार, सलील चौधरी, यशवंत देव, प्रभाकर जोग, शंकरराव कुलकर्णी इत्यादी नामवंत संगीतकारांकडे त्यांनी मराठी चित्रपटगीते गायली. लता मंगेशकरांनी 'आनंदघन' या टोपणनावाने

म

चित्रमहर्षी भालजी पेंढारकरांच्या ‘तांबडी माती’, ‘साधी माणसं’, ‘मोहित्यांची मंजुळा’, ‘मराठा तितुका मेळवावा’ या चित्रपटांना संगीत दिले. अनेक वर्षे संगीतकार ‘आनंदघन’ कोण याविषयी श्रोत्यांच्या मनांत कुतूहल आणि औत्सुक्य होते. नंतर आनंदघन म्हणजे लता मंगेशकर हा गौप्यस्फोट झाला.

हिंदी चित्रपटांमध्ये काही नायिका पार्श्वगायनासाठी लतादीदींच्या आवाजाचा आग्रह करीत. उदा. मधुबाला, नूतन, मीनाकुमारी. तसे मराठीमध्ये घडले नाही, तरी ‘शिकलेली बायको’ (उषा किरण), ‘मोलकरीण’ (सुलोचना), ‘मोहित्यांची मंजुळा’, ‘साधी माणसं’ (जयश्री गडकर) ही काही उल्लेखनीय उदाहरणे आहेत. मराठी चित्रपटांत भक्तिगीते, प्रेमगीते, लावणी, द्वंद्वगीते, अस्सल रागदारीवर आधारित गीते, स्त्री-गीते इत्यादी अनेक प्रकार लतादीदींनी गायले आहेत. परंतु कारुण्यरसाची गाणी गायला त्यांना जास्त आवडते.

‘मराठा तितुका मेळवावा’ या चित्रपटात लतादीदींनी स्वत:चे संगीत असताना ‘रेशमाच्या रेघांनी’ (गीतकार : शांता शेळके) ही लावणी आशा भोसल्यांच्या आवाजात ध्वनिमुद्रित केली. लता मंगेशकरांनी गायलेल्या, संगीतबद्ध केलेल्या चित्रपटांमध्ये ‘साधी माणसं’ या चित्रपटाचा विशेष उल्लेख करावा लागेल. ‘साधी माणसं’ या चित्रपटाला त्या वर्षीचे नऊ पुरस्कार मिळाले. त्यांमध्ये लतादीदींना दोन (उत्कृष्ट संगीतकार व उत्कृष्ट पार्श्वगायिका) पुरस्कार मिळाले. लतादीदींनी ‘वादळ’ (१९५३), ‘कांचनगंगा’ (१९५५) या दोन मराठी चित्रपटांची निर्मिती केली आहे.

लतादीदींची काही गाजलेली चित्रपटगीते : ‘धुंद मधुमती’, ‘असा नेसून शालू हिरवा’ (सोबत सुधीर फडके, चित्रपट : ‘कीचकवध’), ‘लेक लाडकी या घरची’, ‘माझिया नयनांच्या कोंदणे’, ‘कोण दूजा आधार’ (अंतरीचा दिवा), ‘ये जवळी घे जवळी’ (माणसाला पंख असतात), ‘तुजसाठी शंकरा’ (चिमुकला पाहुणा), ‘मज आवडते हे गाव’ (गाठ पडली ठकाठका), ‘चंद्र माझा’ (शशी), ‘या चिमण्यांनो परत फिरा रे’ (जिव्हाळा), ‘नीलकंठा चंद्र मौळी’ (श्रीमान बाळासाहेब), ‘प्रीत रंगली’ (सोबत मन्ना डे), ‘माझे न मी राहिले’ (मंगळसूत्र), ‘दे रे कान्हा चोळी लुगडी’ (पिंजरा), ‘विसरू नको श्रीरामा मला’ (जानकी), ‘शुभंकरोती म्हणा’ (थांब लक्ष्मी कुंकू लावते), ‘माझे राणी माझे मोगा’ (महानंदा), ‘तुझे नी माझे इवले गोकूळ’ (सोबत हृदयनाथ मंगेशकर; चित्रपट : सुखाची सावली), तसेच ‘शारदा’ नाटकावर बनलेल्या ‘शारदा’ या चित्रपटात संगीतकार शंकरराव कुलकर्णी यांनी लतादीदींकडून ‘मूर्तिमंत भीती उभी’ हे गाजलेले पद गाऊन घेतले.

लता मंगेशकरांनी १९४८ साली ‘तुज स्वप्नी पाहिले रे गोपाळा’ आणि ‘गेला कुठे बाई कान्हा’ ही दोन भावगीते दत्ता डावजेकर यांच्या संगीत दिग्दर्शनात गायली आणि त्या काळी प्रचलित असलेल्या भावगीत पद्धतीपेक्षा ती वेगळी असल्यामुळे आणि लतादीदींच्या कोवळ्या, सुरेल आवाजामुळे प्रचंड लोकप्रिय झाली. पुढे १९४९ साली पी. सावळाराम यांनी लिहिलेले आणि वसंत प्रभूंचे संगीत असलेल्या ‘गंगा जमुना डोळ्यांत उभ्या का’ या गाण्याने लताबाई आणि संगीतकार वसंत प्रभू यांच्या भावगीतपर्वाला सुरुवात झाली.

वसंत प्रभूंनी लतादीदींकडून १९४९-१९६४ या कालावधीत पी. सावळाराम, कवी बी, भा.रा. तांबे, कुसुमाग्रज इत्यादी नामवंत कवींच्या गीतांना सुमधुर चाली लावून अनेक भावगीते गाऊन घेतली. सहज, सोप्या चाली, लक्षात राहणारे ध्रुवपद आणि लतादीदींच्या आवाजाचा आवाका इत्यादी गोष्टी लक्षात ठेवून वसंत प्रभूंनी लतादीदींसाठी चाली बांधून एकापेक्षा एक सरस भावगीते निर्माण केली. सुरेलपणा, शब्दांचा योग्य उच्चार, कवींच्या भावना श्रोत्यांपर्यंत पोहोचवण्याचे लतादीदींचे कौशल्य यांमुळे ही भावगीते आजही लोकप्रिय आहेत. वसंत प्रभूंच्या संगीतात गाजलेली काही भावगीते : ‘चाफा बोलेना’, ‘मधू मागशी माझ्या सख्या परी’, ‘आड वाटेला दूर एक माळ’, ‘अनामवीरा’, ‘नववधू प्रिया मी बावरते’, ‘घट डोईवर’, ‘जो आवडतो सर्वांना’, ‘ते दूध तुझ्या त्या घटातले’,

म

'जन पळभर म्हणतील हाय हाय', 'कल्पवृक्ष कन्येसाठी लावुनिया बाबा गेला' इत्यादी. भारतरत्न महर्षी अण्णासाहेब तथा धोंडो केशव कर्वे यांच्या वयाला शंभर वर्षे पूर्ण झाली, त्या वेळी कवी पी. सावळाराम यांनी काव्य रचले : 'घरोघरी वाढदिन माझ्या वडिलांचा आला'. पुन्हा प्रभूंनी समर्पक चाल बांधली आणि लतादीदींनी या गीताचे सोने केले.

वसंत प्रभूंच्या भावगीतपर्वाबरोबर लतादीदी आणि पं. हृदयनाथ मंगेशकर यांच्याही भावगीतांचे एक नवीन पर्व सुरू झाले. उत्तम काव्य, स्वच्छ शब्दोच्चार, काव्यानुरूप भावाविष्कार, ऐकायला सुमधुर; परंतु गायला अतिशय कठीण हे पं. हृदयनाथ मंगेशकरांच्या संगीताचे वैशिष्ट्य. भा.रा. तांबे, बालकवी, आरती प्रभू, राजा बढे, शांताबाई शेळके, सुरेश भट इत्यादी नामवंत कवींच्या काव्यांना त्यांनी स्वरसाज चढविला. हृदयनाथ मंगेशकरांनी लतादीदींकडून गाऊन घेतलेली काही गाजलेली भावगीते : 'तिन्ही सांजा सखे मिळाल्या', 'दे मला गे चंद्रिके प्रीती तुझी', 'आनंदी आनंद गडे', 'माझे गाणे', 'कशी काळनागिणी', 'कसे कसे हासायचे', 'मेंदीच्या पानावर', 'मालवून टाक दीप', 'संधिकाली या अशा' (सोबत अरुण दाते) इत्यादी.

ज्येष्ठ संगीतकार श्रीनिवास खळे यांच्याकडे लता मंगेशकरांनी मोजकीच भावगीते गायली आहेत; परंतु ही गाणी अतिशय श्रवणीय आहेत. खळ्यांची स्वररचना गायला अतिशय कठीण असते. तसेच तालाला समांतर असणे ही त्यांच्या संगीतरचनेची वैशिष्ट्ये होत. 'श्रावणात घन निळा', 'भावनांचा तू भुकेला रे मुरारी', 'जाहल्या काही चुका', 'नीज माझ्या नंदलाला' ही गाणी चिरस्मरणीय आहेत.

लतादीदींनी भावगीत गायला सुरुवात केली तेव्हा जी.एन. जोशी, जे.एल. रानडे, गजाननराव वाटवे, माणिक वर्मा इत्यादी गायकांचा प्रभाव होता. परंतु कुणाचीही नक्कल न करता लतादीदींनी स्वत:ची शैली विकसित केली आणि आज नवोदित गायक, गायिका त्यांच्याच शैलीचा आदर्श गाताना ठेवतात.

लता मंगेशकरांनी गायलेल्या पसायदानाने २ ऑक्टोबर १९७२ रोजी मुंबई दूरदर्शनची सुरुवात झाली. या पसायदानाचे संगीत वसंत देसाई यांनी केले होते.

पुणे आकाशवाणी केंद्रावरील 'गीत रामायण' या संगीतकार सुधीर फडके यांच्या कार्यक्रमात 'मज सांग लक्ष्मणा जाऊ कुठे' हे ग.दि. माडगूळकरांचे गीत लता मंगेशकर गायल्या होत्या. चित्रपट व भावगीतगायनाच्या प्रदीर्घ कारकिर्दीसाठी लता मंगेशकरांना 'पद्मभूषण' (१९६९), 'दादासाहेब फाळके' पुरस्कार (१९८९), 'पद्मविभूषण' (१९९९) आणि भारतातील सर्वोच्च नागरी सन्मान 'भारतरत्न' (२००१) आदी पुरस्कारांनी गौरविण्यात आले आहे. महाराष्ट्र आणि मध्यप्रदेश शासन उत्कृष्ट गायक-गायिकांना 'लता मंगेशकरां'च्या नावाने पुरस्कार प्रदान करतात.

— अद्वैत धर्माधिकारी

**संदर्भ :**


१. *'चित्रसंपदा'.*

२. *भालेकर, वसंत; 'स्वरलता'.*

३. *महाम्बरे, गंगाधर; 'मौलिक मराठी चित्रगीते'.*

४. *पोतदार, मधू; 'मानसीचा चित्रकार तो'.*


## मंगेशकर, हृदयनाथ दीनानाथ

**गायक, संगीतकार**

**२६ ऑक्टोबर १९३७**



पं. हृदयनाथ दीनानाथ मंगेशकर यांचा जन्म सांगली येथे झाला. मराठी संगीत रंगभूमीवरचे असामान्य गायक-नट, मा. दीनानाथ व श्रीमती माई मंगेशकर यांचे लता, मीना, आशा, उषा या मुलींनंतर जन्मलेले हे पाचवे अपत्य होय. जन्मानंतर अल्पावधीतच झालेल्या बोन टी.बी.मुळे दुखावलेल्या व्याधिग्रस्त पायामुळे सामान्य मुलाला लाभणारे बालपण त्यांच्या वाट्याला आले नाही.

म

मा. दीनानाथ यांचे २४ एप्रिल १९४२ रोजी अकाली निधन झाले. त्या वेळी हृदयनाथ अवघे साडेचार वर्षांचे होते. छोट्या लतादीदींनी चरितार्थासाठी 'नवयुग'मध्ये बालकलाकार म्हणून नोकरी धरली आणि तिथून १९४३ सालापासून मंगेशकर कुटुंब पुणे, कोल्हापूर, खानदेशातले थाळणेर व अखेर १९४५ मध्ये मुंबई येथे स्थिरावले. या वेळी हृदयनाथांच्या आई म्हणजे माई मंगेशकर यांनी हृदयनाथांना घरातच शिक्षणाचे धडे दिले. संग्रहातली राम गणेश गडकरी, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, स्वातंत्र्यवीर सावरकर यांची नाटकाची पुस्तके वाचून दाखवली. त्यामुळे त्यांच्यावर तेजस्वी, प्रभावी भाषेचा खोल संस्कार झाला व त्यांना साहित्याची गोडी लागली. मुंबईत शाळेत गेल्यावर प्राथमिक शाळेतला अभ्यासक्रम फारच बाळबोध वाटू लागला व शाळेत जाण्यात त्यांना रस वाटत नव्हता.

लतादीदींनी १९४७ साली मुंबईच्या चित्रपटक्षेत्रात पार्श्वगायनात पाऊल टाकले व पुढे वैभवाचे दिवस पुन्हा आले. मंगेशकरांच्या घरात साहित्यिक, संगीतकार, कवी यांचा ओघ सुरू झाला. आचार्य अत्रे, वि.स. खांडेकर, बाबासाहेब पुरंदरे, गो.नी. दांडेकर, मजरूह, साहिर यांच्यासारख्यांच्या सहवासातून, देशोदेशीच्या कलाकारांच्या गायन-वादनाच्या श्रवणातून, इतिहास व साहित्याच्या प्रचंड वाचनातून हृदयनाथ मंगेशकर हे बहुश्रुत व्यक्तिमत्त्व घडत गेले. 'ये दुनिया कैसी है भगवान' हे 'दीवाना' (१९५२) व 'छडी लागे छम छम' हे 'श्यामची आई' (१९५३) या चित्रपटांतील अशी गाणी ऐकली तर लहान वयातल्या हृदयनाथांच्या सुरेल गळ्याची झलक दिसते.

'सुरेल कला केंद्र' येथे उषा, मीना या बहिणी व प्यारेलाल, अरविंद मयेकर इत्यादी यांच्याबरोबर किशोरावस्थेत असताना त्यांनी कलापथक चालवले व रंगमंचावरील अनेक कार्यक्रम केले. विख्यात गायक उस्ताद अमीरखाँ साहेब यांची शागिर्दी पत्करून त्यांनी संगीताची रीतसर तालीम घेतली. संगीतकार सलील चौधरी यांनी केलेला पाश्चात्त्य संगीतातला कॉर्ड्सचा वापर आणि अभिजात पाश्चात्त्य संगीताचे श्रवण आणि खुद्द सलीलदांचे मार्गदर्शन यांचा प्रभाव हृदयनाथांवर झालाच; शिवाय वडिलांच्या म्हणजे मा. दीनानाथांच्या बंदिशींचा अभ्यास, जुन्या-नव्या कवितांचे वाचन या रसायनातून हृदयनाथांची आगळीवेगळी शैली समोर आली.

वयाच्या सतराव्या वर्षी त्यांनी आपल्याला संगीत द्यायची इच्छा आहे असे सांगितले आणि लतादीदींच्या आवाजात भा.रा. तांबे यांच्या दोन रचना, 'तिन्ही सांजा सखे मिळाल्या' व 'कशी काळनागिणी सखे ग वैरीण झाली नदी', त्यांनी १९५६ च्या सुमारास ध्वनिमुद्रित केल्या. त्याच वेळी एच.एम.व्ही.साठी लतादीदींच्या आवाजात संगीतबद्ध केलेली सुरदासांची रचना, 'निसदिन बरसत नैन हमारे' व मीराबाईंची 'बरसे बुंदियाँ सावन की' व मुंबई आकाशवाणीसाठी केलेले राजा बढे यांचे 'चांदणे शिंपीत जाशी' हे आशाताईंनी गायलेले गीत श्रोत्यांसमोर आले आणि जाणकारांचे लक्ष वेधले गेले.

हृदयनाथांनी १९५९ साली 'आकाशगंगा' या चित्रपटाला प्रथम संगीत दिले होते. 'पवनाकाठचा धोंडी' (१९६६), 'धर्मकन्या' (१९६८), 'जैत रे जैत' (१९७७), 'जानकी' (१९७९), 'उंबरठा' (१९८१), 'निवडुंग' (१९८९), तर 'प्रार्थना', 'मशाल', 'धनवान', 'माया मेमसाब', 'लेकिन' असा मराठी-हिंदी निवडक चित्रपटांचा आलेख वैशिष्ट्यपूर्ण संगीताची साक्ष देतो.

गोड भावगीत आणि विशिष्ट धाटणीचे, वळणाचे चित्रपट संगीत ऐकणाऱ्या श्रोत्यांना हृदयनाथांच्या 'येरे घना', 'जिवलगा राहिले हे दूर घर माझे', 'ही वाट दूर जाते', 'समईच्या शुभ्र कळ्या', 'दे मला गे चंद्रिके', 'मावळत्या दिनकरा' या व अशा गीताबद्दल औत्सुक्य वाटले. साठ व सत्तरच्या दशकांतल्या हृदयनाथांच्या रचनांकडे तरुण श्रोते आकर्षित झाले. काहीशा अवघड, दुर्बोध वाटणाऱ्या चाली नव्या पिढीने डोक्यावर घेतल्या.

संत ज्ञानेश्वरांच्या विराण्या, 'पैल तो गे काऊ कोकताहे', 'मोगरा फुलला', 'अवचिता परिमळु', 'पांडुरंगकांती', 'पसायदान', लतादीदींच्या स्वरातला भगवद्गीतेचा चौथा व नववा अध्याय, मीरेची भजने,

म

गालिबच्या गझला, ना.धों. महानोर, आरती प्रभू, सुरेश भट, ग्रेस यांच्या रचनांनी जाणकारही आकर्षित झाले. शांता शेळके यांच्याबरोबर केलेली कोळीगीते, गणपतीची गाणी आजही वारंवार ऐकली जातात.

१९६९ पासून हृदयनाथ 'भावसरगम'या कार्यक्रमातून स्वतःची गीते सादर करू लागले. लता मंगेशकर, आशा भोसले हे अद्वितीय भगिनीद्वय त्यांच्या संगीताचा प्राणाधार असला तरी किशोरी आमोणकर, अरुण दाते, महेंद्र कपूर, सुरेश वाडकर, अनुराधा पौडवाल हे कलावंत त्यांच्या रचना गायले आहेत.

'मानसीचा चित्रकार तो', 'लाजून हासणे', 'वेगवेगळी फुले उमलली', 'शूर आम्ही सरदार', 'नको देवराया अंत आता पाहू' ही त्यांनी गायलेली गाणीही लोकप्रिय आहेत. हृदयनाथांनी वैजनाथ व राधा या मुलांना, तसेच अनुराधा पौडवाल, सोनाली राठोड या शिष्यवर्गाला तयार केले आहे. राधा मंगेशकरचा अल्बम 'नाव माझं शामी' (२००९) तसेच 'कस' व 'खेळ सातबाराचा' (२००९) या चित्रपटांचे संगीत हे त्यांचे अलीकडच्या काळातील संगीत दिग्दर्शन होय.

हृदयनाथ 'लेकिन' (१९९०) च्या संगीतासाठी सर्वोत्कृष्ट संगीतकार म्हणून राष्ट्रीय पुरस्काराचे मानकरी ठरले. संकेश्वर पीठाच्या शंकराचार्यांनी त्यांना २००३ साली 'भावगंधर्व' ही पदवी दिली. भारत सरकारने हृदयनाथांना २००९ साली 'पद्मश्री' देऊन सन्मानित केले, तर रसिकांनी उत्स्फूर्तपणे त्यांना 'पंडित' म्हणून गौरविले.

— सुलभा तेरणीकर

## मंजी खाँ

**गायक**

**१८८८ – १९३७**

जयपूर-अत्रौली घराण्याचे अध्वर्यू अल्लादियाखाँ साहेबांच्या तीन पुत्रांपैकी मधले पुत्र मंजी खाँ होते. तिघांपैकी मधले म्हणून मंजी खाँ हे नाव पडले. त्यांचे मूळ नाव बद्रुद्दीन होते. बालवयापासूनच संगीताचे



पायाशुद्ध व खास गायकीचे शिक्षण, धृपद गायकीची तालीम मंजी खाँनी आपले चुलते हैदर खाँ यांच्याकडून घेतली.

अल्लादिया खाँसाहेब १८९५ साली आपल्या दोन मुलांना घेऊन कोल्हापूरला आले. त्यांना शाहू महाराजांचा आश्रय मिळाला. मंजी खाँचे बालपणापासूनचे आयुष्य कोल्हापुरात व नंतर मुंबईत गेले. कोल्हापुरातच त्यांना रहिमत खाँचे गाणे ऐकण्याची संधी मिळाली. हे गाणे त्यांना आवडले व त्यांच्या गायकीवर त्याचा परिणामही झाला. त्यांच्या गायनात रहिमत खाँची गायकी दिसायला लागली. अल्लादिया खाँसाहेबांना ही बाब पसंत नव्हती. त्यामुळे त्या दोघांत वितुष्ट आले. याचाच परिणाम म्हणून ऐन उमेदीत मंजी खाँनी गाणे सोडून दिले होते. त्यांनी सात वर्षे कोल्हापूर दरबारात जंगल अधिकारी म्हणून नोकरी केली. बापूसाहेब कागलकर या हितचिंतकाने मोठ्या प्रयासाने त्यांचे मन वळवून त्यांना पुन्हा गायनाकरिता प्रवृत्त केले. शाहू महाराजांनी त्यांच्याकरिता संगीत अधीक्षक (म्यूझिक सुपरिन्टेंडंट) या हुद्द्याची जागादेखील निर्माण केली.

मंजी खाँ यांचा आवाज अत्यंत निकोप, मधुर, सुरेल व भावपूर्ण होता. त्यांच्यापाशी घराण्याचा वृथा अभिमान नव्हता. त्यामुळेच आपल्या घराण्याच्या गायकीव्यतिरिक्त इतर घराण्यांच्या गायकीचे विशेषही आपल्या गायनात ते सहजपणे अंतर्भूत करत होते. रहिमत खाँच्या प्रभावाबरोबरच नत्थन खाँ आग्रेवाले यांचेही काही विशेष त्यांच्या गायनात दिसून येत, असे तज्ज्ञांचे म्हणणे आहे. धृपद-धमार, ख्याल, होरी या प्रकारांबरोबरच मराठी पदे व ठुमरीही ते रसिलेपणाने व भावपूर्ण गायचे.

गोविंदराव टेंबे लिखित 'गानमहर्षी अल्लादिया खाँचे चरित्र' या पुस्तकात 'मंजी खाँ हे गायन क्षेत्रातील

म

विवेकानंद होते' असे म्हटले आहे. अल्लादिया खाँची सामान्य श्रोत्यांना आकलन न होणारी बिकट व पेचदार अशी गायकी अगदी सामान्य श्रोत्यांनादेखील आकर्षक वाटेल अशा ढंगांनी, निरनिराळ्या रूपांत, अगदी सहजपणे मांडून त्या गायकीला त्यांनी लोकप्रिय केले. मंजी खाँ काही दिवस कलकत्त्यात राहिले होते. तिथे त्यांच्यावर पूरब अंगाच्या ठुमरीचे संस्कारही झाले. हा रंगदेखील त्यांच्या गाण्यात होता.

सुरुवातीला कोल्हापूर व नंतर मुंबईत म्हणजेच महाराष्ट्रातच त्यांचे आयुष्य गेले असल्यामुळे मराठी भाषेवर त्यांचे मातृभाषेइतकेच प्रेम होते. त्यामुळे मराठी कवींची 'ऐकव तव मधुबोल'सारखी पदे ते अत्यंत भावपूर्ण रितीने गात असत. त्यांनी १९३० ते १९३५ च्या दरम्यान आपल्या सुमधुर गायनाने मुंबईकरांची मने जिंकली होती. अत्यंत रसिकवृत्तीचा, स्वच्छ मनाचा व दिलदार गायक म्हणून ओळखल्या जाणाऱ्या मंजी खाँचे वयाच्या अवघ्या अठ्ठेचाळिसाव्या वर्षी निधन झाले. पं. मल्लिकार्जुन मन्सुरांना त्यांची चांगली तालीम मिळाली होती.

— माधव इमारते

## मराठे, अनुराधा
**गायिका**
**१५ जुलै १९५१**



निसर्गरम्य कोकणातील चिपळूण जवळील वहाळ या गावी अनुराधा मराठे यांचा जन्म झाला. वडील स्वातंत्र्यसैनिक असल्यामुळे सेवादलाची नवी शाखा उघडण्याची जबाबदारी त्यांच्यावर आली. म्हणून त्यांना धुळ्यामध्ये स्थायिक व्हावे लागले. आई सुधा व वडील विष्णू वामन नेने या दोघांनाही गाण्याची जाण असल्यामुळे धुळ्यासारख्या संगीताचा दुष्काळ असलेल्या भागातही अनुराधावर संगीताचे संस्कार लहानपणापासून झाले. आग्रा घराण्याचे अप्पा शास्त्री यांनी अनुराधाची वयाच्या सातव्या वर्षी परीक्षा घेतली. गळ्यातील गोडवा आणि सुरांची समज यांमुळे प्रभावित होऊन अप्पांनी त्यांचे शिष्य श्रीपाद रामचंद्र नाईक यांना अनुराधाला शास्त्रीय गायन शिकवण्याचा आदेश दिला. नाईक यांनी अनुराधा यांना तब्बल अठरा वर्षे (१९५७ ते १९७४) आग्रा घराण्याच्या शास्त्रीय गायनाचे धडे दिले.

त्यांचे बालपण धुळ्यातच गेले, आणि कला शाखेतील महाविद्यालयीन शिक्षण त्यांनी तेथेच पूर्ण केले. बी.ए.चे शिक्षण घेत असतानाच त्यांनी गायन हा मुख्य विषय घेतला. त्यांना १९७० साली पदवी संपादन केल्यावर नाईक सरांकडून स्वतंत्र गाण्याची परवानगी मिळाली. त्यानुसार धुळे आणि आसपासच्या परिसरात त्यांनी छोटेखानी मैफली केल्या. शिक्षण पूर्ण झाल्यावर 'धुक्यात हरवली वाट' आणि 'बुडत्याचा पाय खोलात' अशा दोन नाटकांमधून त्यांनी अभिनेत्री म्हणून रंगमंचावर पदार्पण केले. या दोनही नाटकांसाठी त्यांनी महाराष्ट्र राज्य शासनाचे अभिनयाचे रौप्यपदक मिळवले.

त्यांचे १९७४ साली लग्न झाल्यावर त्या पुण्यात स्थायिक झाल्या. संसार सांभाळून जमेल तेवढे गावे असा त्यांचा उद्देश होता. पं. त्र्यंबकराव जानोरीकर यांच्याकडून १९७५ ते १९८० या काळात भेंडीबाजार घराण्याची गायकी शिकण्याचा योग आला. तसेच, त्यांनी आकाशवाणीची स्वरचाचणी देण्याचे ठरवले व त्या निमित्ताने १९७८ पासून गजाननराव वाटवे यांच्याकडून त्या भावगीते शिकल्या. त्या १९७८ पासून आकाशवाणीवर चाळीसहून अधिक 'स्वरचित्रे' गायल्या आहेत. अभ्यासू वृत्ती असल्यामुळे प्रत्येकाकडून त्या काहीतरी नवे शिकत होत्या आणि आपल्या गायनाच्या शैलीला नवे पैलू पाडत होत्या.

यशवंत देवांकडून शब्दोच्चार, श्रीनिवास खळे यांच्याकडून अवघड गाण्यांमधील लयीचा अचूक अंदाज, राम कदम यांच्याकडून लावणी, चित्रपटगीते आणि अभंग अशा वेगवेगळ्या शैलींमधील फरक आणि बारकावे त्यांनी टिपले. पं. हृदयनाथ मंगेशकर यांच्या

म

‘भावसरगम’ या प्रसिद्ध कार्यक्रमात त्या गायल्या. माया गोविंदांच्या पदांवर संगीतकार जयदेवांनी ठुमरीच्या धाटणीवर संगीतबद्ध केलेल्या हिंदी रचना त्या पुणे आकाशवाणीसाठी गायल्या.

स्वरानंद प्रतिष्ठानाच्या ‘मंतरलेल्या चैत्रबनात’ या मराठी वाद्यवृंदात त्यांनी गायलेल्या गाण्यांना रसिकांनी ‘वन्समोअर’ने नेहमीच दाद दिली. त्यानंतर पु.ल. देशपांडे यांच्या गीतांवर आधारित ‘पुलकित गीते’, सुधीर मोघे यांच्या देशभक्तिपर गीतांवर आधारित ‘स्वतंत्रते भगवती’, अरुण दाते यांचा ‘शुक्रतारा’, सुधीर फडके यांचा ‘फिटे अंधाराचे जाळे’, यशवंत देवांचा ‘स्वर आले दुरुनी’, प्रभाकर जोग यांचा ‘गाणारं व्हायोलिन’ अशा अनेक कार्यक्रमांतून अनुराधा मराठे यांनी आपल्या समर्थ गायकीचे दर्शन घडविले.

‘साज ठुमरीचा’, ‘ओंजळीत स्वर तुझेच’, ‘गंध प्रीतीचा’, ‘माय लेकरू’ या अलीकडच्या काळात नव्या संगीतरचनांच्या कार्यक्रमांतही त्या गायल्या आहेत. दूरदर्शनवरील ‘शब्दांच्या पलीकडले’, ‘नक्षत्रांचे देणे’ या कार्यक्रमांतही त्यांचा सहभाग होता. ‘विठ्ठल विठ्ठल’ या चित्रपटात त्यांनी भूमिकाही केली होती. ‘बंदा रुपया’ (राम कदम यांनी स्वरबद्ध केलेल्या लावण्या)व ‘मी काय तुला वाहू’ (गजानन वाटवे यांनी स्वरबद्ध केलेली भावगीते) या दोन स्वतंत्र ध्वनिफिती त्यांच्या नावावर जमा असून, अन्यही अनेक ध्वनिफितींसाठी त्यांनी गायन केले आहे. यशवंत देव यांच्या ‘संपूर्ण ज्ञानेश्वरी’ या प्रकल्पात त्यांनी ५०० ओव्या गायल्या.

अनंत माने यांच्या ‘गाव तसं चांगलं, पण वेशीला टांगलं’ या चित्रपटासाठी अनुराधा मराठे यांनी पार्श्वगायन क्षेत्रात पदार्पण केले. ‘मायेची सावली’, ‘लावण्यवती’, ‘आभाळाची सावली’ असे चित्रपट करत नव्या पिढीतील संगीत दिग्दर्शकांसोबत ‘दहावी फ’, ‘हापूस’ यांसारख्या चित्रपटांत त्यांनी पार्श्वगायन केले. चित्रपट क्षेत्रातील त्यांच्या योगदानाबद्दल त्यांना अखिल भारतीय चित्रपट महामंडळाचा ‘चित्रकर्मी’ हा सन्माननीय पुरस्कार मिळाला. स्वरानंद प्रतिष्ठानाचा ‘माणिक वर्मा बहुस्पर्शी गायिका’ हा पुरस्कार पं. भीमसेन जोशी यांच्या हस्ते त्यांना देण्यात आला. भारत गायन समाजाचा ‘मालती पांडे’ पुरस्कार, ‘खानदेश भूषण’, ‘स्वरगायत्री’ पुरस्कार असे अनेक पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत.

— अमोल ठाकुरदास

## मराठे, प्रमोद धोंडूमामा

**हार्मोनिअमवादक**

**२९ सप्टेंबर १९६२**



प्रमोद धोंडूमामा मराठे यांचा जन्म संगीताचा वारसा असणाऱ्या परिवारात, पुणे येथे झाला. त्यांचे वडील हे पं. विनायकबुवा पटवर्धन यांचे मेहुणे व शिष्य होते, तसेच ते पुण्यातील गांधर्व महाविद्यालयाचे संचालक होते. प्रमोद मराठे यांनी वडिलांकडून विद्यालयीन संगीत शिक्षण घेतले. दिलीप वसंत गोसावी यांच्याकडून त्यांनी हार्मोनिअमवादनाचे धडे घेतले. नंतर त्यांनी संवादिनीवादक मनोहर चिमोटे यांचे शिष्यत्व स्वीकारले.

संवादिनीच्या (हार्मोनिअम) स्वतंत्र वादनापेक्षा साथसंगत करण्यावर त्यांनी भर दिला व एक सफल संगतकार म्हणून कारकीर्द गाजवली. त्यांनी पं. भीमसेन जोशी, पं. जसराज, प्रभा अत्रे, मालिनी राजुरकर, प्रभाकर कारेकर, वीणा सहस्रबुद्धे अशा अनेक कलाकारांना देश-विदेशांत अनेक मैफली, ध्वनिमुद्रणांसाठी साथ केली. ते १९८५ पासून आकाशवाणीवरून साथ करत आहेत.

मुंबई, पुणे, कल्याण, बेळगाव, कुंदगोळ येथे त्यांनी एकल संवादिनीवादन केले आहे, तसेच ऑस्ट्रेलिया, अमेरिका व सिंगापूर येथेही गायनाच्या साथीसाठी गेले असताना त्यांनी एकलवादन केले आहे.

वडिलांच्या पश्चात पुण्यातील गांधर्व महाविद्यालयाची धुरा प्रमोद मराठे यांच्या हाती आली व

म

ते ती समर्थपणे पुढे नेत आहेत. गांधर्व महाविद्यालयाची नवी इमारत बांधून त्यांनी त्यात ‘विष्णू-विनायक स्मृती मंदिर’ हे सभागृह निर्माण केले. हे ठिकाण आज पुण्याच्या सांगीतिक जगाचा केंद्रबिंदू बनले आहे.

प्रमोद मराठे यांनी या विद्यालयामार्फत अनेक वैविध्यपूर्ण उपक्रम हाती घेतले व सातत्याने राबवले आहेत. ‘विनायकबुवा पटवर्धन जन्मशताब्दी महोत्सव’, ‘बुजुर्ग संगीत संमेलन’, ‘शकुंतला स्मृती युवा महोत्सव’ असे कित्येक संगीत समारोह ते घडवून आणतात.

गांधर्व महाविद्यालयातर्फे ‘संगतकार’ पुरस्कार, ‘संगीत शिक्षक गौरव’ पुरस्कार, ‘रामकृष्णबुवा वझे गायन’ पुरस्कार असे पुरस्कार देऊन त्यांनी अनेक कलाकारांचा गौरव केला आहे. त्यांनी २००७ साली बारामती येथे गांधर्व महाविद्यालयाची शाखा सुरू केली. हार्मोनिअमच्या अभ्यासक्रमाची पुस्तके व ध्वनिचकत्या (सीडी) मराठे यांनी तयार केल्या आहेत. सातत्याने नवनवीन माध्यमांद्वारे संगीताचा व्यवसाय वाढवणे हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. नव्या काळानुसार ते इंटरनेटच्या माध्यमातून ‘ऑनलाइन’ संगीत शिक्षणही देतात.

मिलिंद कुलकर्णी, तन्मय देवचके, राजीव तांबे हे त्यांचे शिष्यही आज मैफलींतून यशस्वीपणे साथसंगत करत आहेत. संगीतकार सलील कुलकर्णी हेही त्यांचे हार्मोनिअम विद्यार्थी होते. आजच्या काळातील एक उत्तम हार्मोनिअम संगतकार, कुशल संघटक व पुण्याच्या गांधर्व महाविद्यालयाचे संचालक, शिक्षक अशी चौफेर कामगिरी प्रमोद मराठे पार पाडत आहेत.

– चैतन्य कुंटे

म

## मराठे, रामचंद्र पुरुषोत्तम

***राम मराठे***

**गायक, नट**

**२३ ऑक्टोबर १९२४ – ४ ऑक्टोबर १९८९**

रामचंद्र पुरुषोत्तम मराठे यांचा जन्म पुण्याला झाला. त्यांच्या आई-वडिलांना गाण्याची आवड होती. रामभाऊंचे वडील त्या वेळी गावाला उत्सवात होणाऱ्या संगीत नाटकांत ‘स्त्री’भूमिका करत. घरातून गाण्याला पोषक असेच वातावरण होते. वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत पुण्याच्या भावे स्कूलमध्ये त्यांचे शालेय शिक्षण झाले.



रामभाऊ लहान असताना ते घरातील डबे डग्गा-तबला म्हणून वाजवत. तबल्याची आवड ओळखून त्यांच्या वडिलांनी अंबीटकर मास्तर यांच्याकडे त्यांचे तबलावादनाचे शिक्षण सुरू केले. त्यांनी १९३३ ते १९३५ च्या दरम्यान सागर फिल्म कंपनीमधून हिन्दी आणि गुजराती बोलपटांतून प्रसिद्ध दिग्दर्शक मेहबूब यांच्या हाताखाली ‘मनमोहन’, ‘जहागीरदार’, ‘वतन’ या बोलपटांत भूमिका केल्या.

रामभाऊंची मोठी बहीण ‘गोपाळ गायन समाजा’त गाणे शिकत होती. रामभाऊ तिच्याबरोबर तबल्याच्या साथीला जात. ‘प्रभात फिल्म कंपनी’मधील मंडळी ‘गोपाळकृष्ण’ या चित्रपटासाठी बाल कलाकाराच्या शोधात गोपाळ गायन समाजात गेली. तेव्हा कृष्णाच्या भूमिकेसाठी रामभाऊंची निवड झाली. ‘गोपाळकृष्ण’ हा संगीतप्रधान चित्रपट खूप गाजला. त्यानंतर रामभाऊंनी प्रभातच्याच ‘माणूस’ या चित्रपटातील ‘रामू चायवाला’ ही महत्त्वपूर्ण भूमिका केली. ते १९३७ ते १९४० या काळात ‘प्रभात’मध्ये होते.

नंतर मिनर्व्हा मुव्हिटोन, जयंत पिक्चर्स, मेहबूब फिल्म्स, विजय भट्ट यांच्या ‘संत तुळशीदास’, ‘डेक्कन क्वीन’ अशा हिंदी चित्रपटांत रामभाऊंनी महत्त्वपूर्ण भूमिका केल्या. रामभाऊंनी १९५३ मध्ये ‘अनंतफंदी’ या शाहिराच्या जीवनावर आधारित चित्रपटात अनंतफंदीची भूमिका केली.

घरंदाज गायक म्हणून नाव मिळवायचे अशी त्यांची इच्छा होती. मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर यांच्याजवळ त्यांचे शिक्षण सुरू झाले. मास्तरांच्या मागे तंबोऱ्याच्या साथीला बसण्याची एकही संधी त्यांनी सोडली नाही.

मास्तरांचे गाणे ते टिपकागदाप्रमाणे टिपत गेले. राम मराठे यांनी पं. मिराशीबुवा यांच्याकडे ग्वाल्हेर गायकीचे शिक्षण घेतले. मध्यंतरीच्या काळात ते पुण्याहून दादरला स्थायिक झाले. खोदादाद सर्कलला पं. मनहर बर्वे यांच्याकडे विद्यार्थ्यांना शिकवून रात्री १२ पर्यंत मनहर बर्वे यांच्याजवळ ते शिकत असत. मनहर बर्व्यांचे मेहुणे श्री. काळे हे देवगंधर्व भास्करबुवा बखले यांचे शिष्य. वामनराव सडोलीकर यांच्याकडून त्यांनी जयपूर गायकीची तालीम घेतली.

याच सुमारास स्नेहल भाटकरांसारख्या संगीतकारांनी काही भावगीते रामभाऊंकडून गाऊन घेतली, उदा.: ‘शाम मनोहर माझा’, ‘प्रेमळ भाव तुझ्या मनीचा’. तसेच आकाशवाणीचे कार्यक्रमही सुरू होते.

रामभाऊंनी ‘संगीत सौभद्र’, ‘संगीत मानापमान’, ‘संगीत स्वयंवर’, ‘संगीत शारदा’, ‘संगीत संशयकल्लोळ’, ‘एकच प्याला’, ‘मृच्छकटिक’ या नाटकांत नायकांच्या भूमिका केल्या.

रामभाऊ कोल्हापूरला कार्यक्रमानिमित्त गेले असताना गुणिदास ऊर्फ जगन्नाथबुवा पुरोहित यांच्याशी त्यांची गाठ पडली. बुवा मुंबईला आले, तेव्हापासून रामभाऊ जगन्नाथबुवांकडे शिकायला जाऊ लागले. रामभाऊंनी उ. विलायत हुसेन खाँसाहेबांकडूनही आग्रा गायकीचे शिक्षण घेतले. थोडा काळ बी.आर. देवधरांकडूनही ते शिकले. विद्याधर गोखल्यांची ‘सुवर्णतुला’, ‘मंदारमाला’, ‘जय जय गौरीशंकर’, ‘मेघमल्हार’ अशी नाटके १९६० च्या सुमारास रंगभूमीवर आली. त्यांत रामभाऊ नायकांच्या भूमिका करत. रामभाऊंनी ‘मंदारमाला’, ‘मेघमल्हार’, ‘रंगात रंगला श्रीरंग’ या नाटकांचे संगीत दिग्दर्शन केले. ते तबला उत्तम वाजवत. ‘मंदारमाला’ नाटकात शिकवणीच्या दृश्यात रामभाऊ स्वत: तबला वाजवून गात असत.

रामभाऊंनी विविध रागांमध्ये सुंदर बंदिशी केल्या. त्यांनी भारतभर असंख्य मैफली केल्या. स.का. पाटील यांच्या हस्ते त्यांना १९५१ मध्ये महाराष्ट्र शासनातर्फे ‘संगीत भूषण’ ही पदवी प्राप्त झाली. शंकराचार्यांच्या हस्ते ‘संगीत चूडामणी’, ‘बालगंधर्व’ सुवर्णपदक, ‘नाट्यदर्पण’ पुरस्कार, ‘विष्णुदास भावे’ पुरस्कार, तसेच जागतिक मराठी नाट्य परिषदेतर्फे त्यांना विशेष सन्मान मिळाला. १९८७ चा संगीत नाटक अकादमीचा ‘राष्ट्रपती पुरस्कार’ही त्यांना प्राप्त झाला. ते ‘ऑल इंडिया रेडियो’च्या ऑडिशन कमिटीवर होते.

आपल्या गुरुजनांखेरीज रहिमत खाँ, बडे गुलाम अली, सलामत अली, विनायकराव पटवर्धन, केसरबाई, सिद्धेश्वरी देवी, मास्टर दीनानाथ व वझेबुवांसारख्या गवैयांच्या गायकीची नक्कल ते अस्सलपणे करीत व तोही रंग आपल्या मैफलीत आणत. पल्लेदार, बिकट तानक्रिया, लयतालावर विलक्षण हुकमत, बोलअंगाचा उत्तम वापर करणारे रामभाऊ ‘जोडरागांचे बादशहा’ म्हणून गौरविले जात.

ग्वाल्हेर, जयपूर व आग्रा या तीन घराण्यांचा संगम असणाऱ्या पं. भास्करबुवा बखले प्रणीत गायकीचा वारसा पं. राम मराठे यांनी पुढे नेला. योगिनी जोगळेकर, विश्वनाथ बागूल, सुहास व सुधीर दातार, अरुण व उल्हास कशाळकर, प्रदीप नाटेकर, राजेंद्र मणेरीकर, तसेच पुत्र संजय व मुकुंद मराठे हे त्यांचे प्रमुख शिष्य होत. त्यांचे निधन ठाणे येथे १९८९ साली झाले.

— प्रदीप नाटेकर

## माईणकर, सुधीर विष्णुपंत

**तबलावादक**

**१६ मे १९३७**

सुधीर विष्णुपंत माईणकर यांचा जन्म मुंबई येथे झाला. सुधीर यांचे वडील हे त्या काळी संगीत क्षेत्रात एक जाणकार रसिक म्हणून ओळखले जात. ते स्वत: गायक होते व ते तबलाही वाजवत असत. उस्ताद अमीर हुसेन, उस्ताद इनाम अली, उस्ताद हमदू खाँ, पं. सामताप्रसाद, उस्ताद अकबर हुसेन अशा अनेक घराणेदार वादकांचा तबला सुधीर यांनी लहानपणी त्यांच्या घरीच होणाऱ्या मैफलीत ऐकला. आपल्या तबलावादक मित्रांबरोबर लहान वयातच त्यांनी अनेक

म



मैफली ऐकल्या. यातूनच त्यांची नजर बनत गेली.

सुधीर माईणकरांनी तबलावादनाचे प्रारंभिक धडे आपल्या वडिलांजवळ गिरवले. त्यानंतर त्यांनी दिल्ली घराण्याचे सुप्रसिद्ध कलाकार पं. मारुतीराव कीर यांच्याकडे काही काळ तालीम घेतली. पुढे त्यांनी दिल्ली घराण्याचे खलिफा उस्ताद इनाम अली खाँ यांचा गंडा बांधला. खाँसाहेबांच्या तालमीमध्ये सुधीर यांच्यावर तबल्याच्या पारंपरिक विचारांबरोबर उस्ताद नत्थू खाँ यांच्या सौंदर्यवादी विचारांचाही संस्कार झाला.

याच दरम्यान आयुर्विम्यातील नोकरीत त्यांना पदोन्नती मिळून त्यांची बदली बडोद्याला झाली. बडोद्यात उस्ताद हबीबुद्दीन खाँसाहेबांचे शिष्य प्रो. सुधीरकुमार सक्सेना यांच्याकडे त्यांनी अजराडा घराण्याची तालीम जवळजवळ सात वर्षे घेतली. तेथून मुंबईला परतल्यावर उस्ताद थिरकवा खाँसाहेबांचे शिष्य पं. भिडेसाहेब यांच्याकडेही त्यांनी काही काळ मार्गदर्शन घेतले. तबलावादनात अशी प्रगती होत असतानाच आपल्यातील कार्यक्षमतेच्या जोरावर आयुर्विम्याच्या नोकरीतही त्यांना सतत बढती मिळत गेली आणि कारकिर्दीच्या अखेरीस ते तेथून वरिष्ठ प्रबंधक म्हणून निवृत्त झाले. याच काळात विमा अधिकाऱ्यांच्या मार्गदर्शनासाठी आयुर्विमा प्रशिक्षण महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली होती. तबलावादन क्षेत्रात सुधीर माईणकरांनी रचनाकार, शास्त्रकार, गुरू, लेखक, समीक्षक अशा विविध स्तरांवर मौलिक कामगिरी केली आहे.

दिल्ली, अजराडा घराण्यातील खाली-भरी, पूरक/विरोधी नादतत्त्व यांबरोबरच लघुकाल गणित, यति-विराम, छंद इ. अनेक सौंदर्यतत्त्वांचा सुरेख उपयोग करून पेशकार व कायदा यांच्या विस्तारक्रिया त्यांनी अधिक कलात्मक केल्या आहेत.

घराणेदार विस्तारक्रिया कशी असते हे अभ्यासकांना कळण्यासाठी त्यांनी ‘तबला वादन में विस्तार क्रिया’ या नावाची एक ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध केली आहे. त्यांनी तबलावादनातील सर्व प्रकारच्या रचनांचा, भाषेतील स्वर-व्यंजन, वाक्यरचना, यती, गण, अलंकार व वृत्त या संकल्पनांच्या पार्श्वभूमीवर अभ्यास केला आहे. यातूनच पुढे त्यांनी छंद-वृत्त व अलंकार यांवर आधारित बंदिशींची निर्मिती केली आणि एका सर्वस्वी नवीन विषयाचा तबलावादन क्षेत्रात उदय झाला. विविध छंद आणि त्यांतून निर्माण होणारे नवनवीन शब्दबंध यांच्या योजनेतून भाषाप्रधान तबल्याला सुधीर माईणकरांनी एक वेगळाच आयाम प्राप्त करून दिला आहे.

सुधीर यांनी कायदा, पेशकार, लय-लयकारी, इ. व्याख्या अधिक सुस्पष्टपणे तयार केल्या. त्यांनी तालाचे दशप्राण, लिपी, घराणी व इतिहास अशा जुन्या विषयांकडे आधुनिक दृष्टिकोनातून बघण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी पूरक आणि विरोधी नादसंगती, भाषेतील वृत्तांवर आधारित बंदिशी, गेस्टॉल्टचा बोधनक्रियेतील विचार आणि तबलावादन असे पूर्णपणे नवीन विषय मांडले. आपले हे विचार आणि संशोधन भावी पिढीला उपयुक्त ठरावे यासाठी सुधीर माईणकरांनी ‘तबला वादन कला और शास्त्र’ आणि ‘ तबला वादन में निहित सौंदर्य’ या हिंदी, तर ‘Aesthetics of Tabla’ या इंग्रजी अशा तीन ग्रंथांची निर्मिती केली.

भारतातील अनेक विद्यापीठे, तसेच एन.सी.पी.ए. यासारख्या मान्यवर संस्था डॉ. माईणकरांना विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शनासाठी वेळोवेळी बोलावत असतात. मुंबई, पुणे, लखनौ, बनारस, कोल्हापूर अशा अनेक विद्यापीठांमध्ये, तसेच गांधर्व महाविद्यालयासारख्या मान्यवर संस्थांमध्ये त्यांनी अभ्यासक्रमाच्या आखणीपासून ते परीक्षा घेण्यापर्यंत आणि विविध चर्चासत्रे, कार्यशाळा, व्याख्याने यांच्या माध्यमातून विद्यार्थ्यांसाठी फार मोठे योगदान दिले आहे. त्यांनी गुरु-शिष्य परंपरेनेही काही निवडक विद्यार्थ्यांना तालीम दिली आहे.

म

तबलावादन क्षेत्रात त्यांनी हे जे कार्य केले आहे, त्यासाठी त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत, त्यांपैकी ‘तबला वादन कला और शास्त्र’ या ग्रंथासाठी हिंदी साहित्य अकादमीचा ‘होमी जहांगीर भाभा’ पुरस्कार, स्वर साधना समिती, मुंबईतर्फे ‘स्वर साधना रत्न’ पुरस्कार, ‘श्रीमती विजया जोशी साहित्य संगीत कला’ पुरस्कार, ओंकार संगीत सभा, म्यूझिक फोरमचा उत्कृष्ट संशोधनासाठीचा पुरस्कार, इ. महत्त्वाचे होत.

— प्रवीण करकरे

## माने, सुरेश

**गायक**

**मे १९०२ — १५ फेब्रुवारी १९५३**



महाराष्ट्रात किराणा घराण्याची गायकी रुजवणारे उ. अब्दुल करीम खाँ हे सुरेश माने यांचे पिता व गुरू होते. अब्दुल करीम खाँसाहेब बडोदा दरबारात काही काळ दरबारी गायक म्हणून चाकरी करीत असताना तेथील दरबार गायिका हिराबाई व सरदार माने यांच्या कन्या ताराबाई माने यांनी खाँसाहेबांचे शिष्यत्व पत्करले. हिराबाई माने यांच्या मृत्यूनंतर ताराबाईंनी खाँसाहेबांसोबत १८९८ साली विवाह केला व बडोदा सोडून ते दोघे मिरजेस येऊन स्थायिक झाले. तिथे सुरेश मानेंचा जन्म झाला. त्यानंतर हिराबाई बडोदेकर (१९०५), कमलाबाई (१९०७), कृष्णराव (१९१०) आणि सरस्वतीबाई राणे (१९१६) अशा एकूण पाच अपत्यांना ताराबाईंनी जन्म दिला.

सुरेश मानेंना वयाच्या पाचव्या वर्षापासूनच किराणा गायकीचे शास्त्रशुद्ध शिक्षण मिळण्यास सुरुवात झाली. मानेंचा आवाज खाँसाहेबांसारखाच अतिशय गोड, पातळ आणि नाजूक होता. त्यांची बुद्धी अतिशय तल्लख आणि संग्राहक असल्यामुळे खाँसाहेबांची संपूर्ण गायकी त्यांनी आत्मसात केली. माने गायला बसले, की प्रत्येक स्वराबरोबर खाँसाहेबांची हटकून आठवण यावी, इतकी खाँसाहेबांची गायकी त्यांच्या नसानसांत भिनली होती. आठ/दहा वर्षे त्यांना प्रत्यक्ष गुरुमुखातून तालीम मिळाली. खाँसाहेब स्वतः बीन, दिलरुबा, जलतरंग, तबला, पेटी, सारंगी ही वाद्ये वाजविण्यात निपुण होते. त्यांनी मानेंनाही सर्व वाद्ये वाजवायला शिकविले.

खाँसाहेबांच्या जलशातून माने तबलातरंग वाजवीत असत. त्यांची लहानवयातील स्वरांची सुंदर कशिदेकारी ऐकून लोक आश्चर्यचकित होत असत. वयाच्या सोळा वर्षांपर्यंत त्यांना खाँसाहेबांची भरपूर तालीम मिळाली. त्यांच्या जलशांतून कधी पेटीची, कधी तबल्याची, तर कधी गायनाची साथ केल्यामुळे मानेंचे गाणे सर्वार्थानेच समृद्ध झाले.

ताराबाई माने या स्वतः एक उत्तम गायिका होत्या. विवाहानंतर त्यांना स्वत:ची कला वाढविण्यास आणि हिराबाईंना गाणे शिकण्यास खाँसाहेबांकडून विरोध झाल्यामुळे त्या दोघांचे पटेनासे झाले आणि खाँसाहेब म्हैसूरच्या दौऱ्यावर गेले असता, आपल्या पाचही मुलांना घेऊन त्या मुंबई येथे आल्या व तिथे त्यांनी बिऱ्हाड केले. हिराबाईंनी आपल्या आजीचे माहेरचे नाव बडोदेकर लावले, तर सुरेशबाबूंनी आजीचे माने आडनाव लावण्यास सुरुवात केली. या वेळी सुरेश १६ वर्षांचे होते.

मुंबईत आल्यावर सुरेशबाबूंनी हिराबाईंना गाणे शिकविण्यास सुरुवात केली आणि बहीण-भावंडे प्रतिकूल परिस्थितीवर मात करत आपली प्रगती करीत होते. मुंबईत काही काळ वहीद खाँसाहेब (खाँसाहेबांचे भाचे) यांच्याकडे तालीम घेतल्यावर १९२० साली ‘गिरगाव टेरेसेस’ या इमारतीमध्ये ताराबाई व सुरेश मानेंनी ‘नूतन संगीत विद्यालया’ची स्थापना केली. १९२३ साली मुंबई सोडून ते सर्वजण वास्तव्यासाठी पुण्यास आले.

मुंबई आकाशवाणीवरून दर महिन्याला सुरेश माने यांचे कार्यक्रम प्रसारित होत असत. शिवाय ‘ऑल इंडिया रेडिओ’ची भारतात जिथे-जिथे केंद्रे होती, तिथे-

म

तिथे कॉन्फरन्समध्ये सुरेशबाबूंना गायला बोलवीत असत. या निमित्ताने अमृतसर, जालंधर, दिल्ली, लखनौ, चंडिगढ, पतियाळा, अहमदाबाद, बडोदा, बंगलोर अशा अनेक ठिकाणी त्यांच्या मैफली झाल्या. जालंधरला डिसेंबर महिन्यात संगीत महोत्सव होत असे, तिथे सुरेश माने हजेरी लावत असत.

ते दोन तंबोरे इतके सुरेल लावत, की अर्धी मैफल आधीच जिंकून जायचे. तीन-चार स्वरांचा गुच्छ घेऊन त्यांची वेगवेगळी रूपे दाखविण्यात मानेंचा हातखंडा होता. ही मेरखंड पद्धतीची रचना, मींडयुक्त आलापी, सरगम करणे ही त्यांच्या ख्यालगायकीची वैशिष्ट्ये होत. ख्यालाप्रमाणेच त्यांची ठुमरी वेगवेगळी रूपे घेऊन यायची. त्यांना ठुमरीचे बादशहा म्हणून ओळखले जायचे. उत्तरेकडे त्यांची वैशिष्ट्यपूर्ण ‘महाराष्ट्रीय ठुमरी’ विलक्षण लोकप्रिय झाली होती. ठुमरीतील बोलांच्या साहाय्याने उपज अंगांनी ते नजाकती करीत.

माने हार्मोनिअम उत्कृष्ट वाजवीत व हार्मोनिअमवादनाच्या स्वतंत्र मैफलीही करीत असत. आफ्रिकेच्या दौऱ्यावर ख्यालगायनाबरोबरच जलतरंग वाजवून त्यांनी लोकांची वाहवा मिळविली होती.

सुरेशबाबू आणि हिराबाईंनी १९२९ साली ‘नूतन संगीत विद्यालय’ची नाट्यशाखा स्थापन करून अनेक संगीत नाटकांचे गावोगावी प्रयोग केले. ही पाचही भावंडे या नाटकांमधून भूमिका करीत असत. त्यांनी ‘संशयकल्लोळ’मध्ये अश्विन शेठ, ‘संगीत सौभद्र’मध्ये अर्जुन, ‘एकच प्याला’मध्ये रामलाल, ‘साध्वी मीराबाई’मध्ये भोजराज, ‘संगीत मानापमान’मध्ये धैर्यधर अशा महत्त्वपूर्ण भूमिका करून एक गायक-नट म्हणून नावलौकिक मिळवला.

नाटकाबरोबरच त्यांनी चित्रपटांतही गायक, नट म्हणून भूमिका केल्या. ‘अमृतमंथन’ हा प्रभात कंपनीचा चित्रपट १९३४ मध्ये निघाला. त्यात मानेंनी माधव गुप्ताची महत्त्वपूर्ण भूमिका केली. ‘चंद्रसेना’ (१९३५) मध्ये रामाची भूमिका केली. यात त्यांनी ‘तबलातरंग’ही वाजवला होता. ‘सावित्री’ (१९३६), ‘संत जनाबाई’ (१९३८), ‘नंदकुमार’ (१९३८), ‘भगवा झेंडा’ (१९३९), ‘देवयानी’ (१९४०) या चित्रपटांचे त्यांनी संगीत दिग्दर्शन केले होते. चित्रपटसृष्टीत ते नट आणि संगीत दिग्दर्शक अशा दुहेरी नात्याने वावरले. त्या काळी त्यांनी संगीत दिलेली गीते अतिशय लोकप्रिय झाली होती. ते आपल्या मैफलीत ती गीते गात असत.

सुरेशबाबू जसे श्रेष्ठ कलाकार होते, तसेच ते एक समर्थ गुरूही होते. त्यांनी अनेक कलाकार घडविले. त्यांनी शेवटपर्यंत आपल्याजवळचे ज्ञान मुक्तहस्ताने आपल्या शिष्यांना दिले. हिराबाई बडोदेकर या त्यांच्या पहिल्या शिष्या. सुरेश मानेंची धाकटी बहीण सरस्वतीबाई राणे, ज्येष्ठ समीक्षक वामनराव देशपांडे, संगीतज्ञ ग. वा. पंडित, वैद्य पांडुरंगशास्त्री देशपांडे, सवाई गंधर्वांचे जावई नानासाहेब देशपांडे, ज्येष्ठ गायिका माणिक वर्मा, वसंतराव देशपांडे, बसवराज राजगुरू, डॉ. प्रभा अत्रे या सर्वांना ते गुरू म्हणून लाभले. प्रत्येक शिष्याची आवाजाची जात, बौद्धिक पातळी बघून वेगवेगळ्या पद्धतीचा अवलंब ते करीत असत. एक व्यक्ती म्हणूनही ते थोर होते. त्यांचे मन निर्मळ आणि उदार होते. त्यांनी आयुर्वेदाचाही अभ्यास केला होता व ते आयुर्वेदिक औषधे देत असत.

सुरेशबाबूंचे वयाच्या एकावन्नाव्या वर्षी पुण्यात अकाली आणि आकस्मिक निधन झाले. त्या काळी ध्वनिमुद्रणाच्या फारशा सोयी नसल्याने त्यांचे फार थोडे गायन ध्वनिमुद्रित झाले.

त्यांच्या शिष्या डॉ. प्रभा अत्रे यांनी आपल्या गुरूंच्या स्मृतीप्रित्यर्थ ‘हिराबाई-सुरेशबाबू संगीत महोत्सव’ मुंबई येथे अनेक वर्षे केला आहे.

— डॉ. अश्विनी वळसंगकर

**संदर्भ :**


*१. हुमणे, राजाराम; ‘धन्य जन्म जाहला’.*

*२. डॉ. अत्रे, प्रभा; ‘स्वरमयी’.*

*३. अब्दुल करीम खाँ जीवन चरित्र*


म

## मारुलकर, अलका प्रमोद
**गायिका**
**४ डिसेंबर १९५१**



अलका प्रमोद मारुलकरांचा जन्म सोलापूर येथे झाला. त्यांचे वडील म्हणजे प्रसिद्ध गायक व गुरू पं. राजाभाऊ देव हे होत. राजाभाऊ देव यांना जगन्नाथबुवा पंढरपूरकर, राजाभैया पूछवाले, रजबअलीखाँ व बी.आर. देवधर यांच्याकडून तालीम मिळाली होती. त्यामुळे आपले वडील राजाभाऊ देव यांच्याकडे संगीत शिकताना अलका देव यांनी ग्वाल्हेर, किराणा, जयपूर या घराण्यांची सौंदर्यमूल्ये आत्मसात केली. तसेच गिरीजादेवी यांच्याकडून त्या ठुमरी-दादरा शैलीही शिकल्या.

लग्नानंतर पुण्यातील वास्तव्यात पं. मधुसूदन कानेटकर यांच्याकडेही त्यांनी जयपूर घराण्याचे प्रगत अध्ययन केले. वडिलांच्या नोकरीतील भ्रमंतीमुळे त्यांचे शिक्षण नागपूर, रांची, बनारस व वनस्थली (राजस्थान) येथे झाल्यामुळे त्यांनी तेथील भाषांबरोबर ठुमरी, दादरा, होरी, कजरी, राजस्थानी मांड वगैरे उपशास्त्रीय गायनप्रकारांवरही प्रभुत्व मिळवले.

वयाच्या अगदी दहाव्या वर्षापासून सर्व महत्त्वाच्या संमेलनांतून त्यांचे कार्यक्रम झाले. आकाशवाणीच्या ‘अ’श्रेणीच्या कलाकार असलेल्या अलका मारुलकर यांनी देश व विदेशांतही गायनानिमित्त दौरे केले, संगीतसभा गाजवल्या.

अलका मारुलकर यांनी इंग्रजी वाङ्मयात एम.ए.ची पदवी प्राप्त केली. महर्षी अरविंदांच्या ‘सावित्री’ या महाकाव्याचा त्यांनी अभ्यास केला. ‘कोरिलेशन ऑफ द बंदिश इज विथ द रागाज ॲण्ड स्कोप फॉर द नवरसाज इन द बंदिशीज’ या विषयावर प्रबंध लिहून त्यांनी पीएच.डी. मिळवली.

त्यांनी ‘प्रेमांजली’, ‘कबीर’, ‘मधुघट’, ‘आजि आनंद आनंद’, ‘सूरदास’, ‘तीरथ’ यांसारखे कार्यक्रम केले. त्यांनी जोगेश्री, आनंदकल्याण, पंचमगौरी इ. रागांची निर्मिती केली व अनेक रागांतील नवीन बंदिशी तयार केल्या. मारुलकरांचे परिपूर्ण आलाप, बोल-आलाप व ताना यांना लययुक्त पद्धतीने जोडणारे बेहेलावे, वैशिष्ट्यपूर्ण रचनात्मक ताना यांमधून किंवा स्वरांच्या विणकामातून, तर कधी रागाच्या स्वरसमूहाच्या विस्तारातून त्यांच्या गायनाचे सर्वांगसुंदर दर्शन घडते.

गोव्याच्या कला अकादमीच्या संगीत विभागप्रमुख असतानाही आणि नंतर निवृत्त झाल्यावर अनेक शिष्यांना सखोल तालीम देताना रागाच्या अंतरंगात खोलवर जाण्याची क्षमता निर्माण व्हावी, स्वत:सारखा नवनिर्मितीचा, प्रयोगशीलतेचा ध्यास त्यांनाही लागावा, असा त्यांचा आग्रह असतो. ट्रिनिटी क्लब, मुंबई यांनी ‘संगीतकौमुदी’, तर गायनाचार्य भास्करबुवा बखले स्मृती संगीत समारोह, चंडिगढ येथे ‘गानसरस्वती’ या किताबांनी त्यांना गौरवण्यात आले.

— मधुवंती देव

## मारुलकर, नारायण रघुनाथ
**हार्मोनिअम वादक व शास्त्रकार**
**२५ जानेवारी १९१५ – २० मे १९८१**



नारायण रघुनाथ मारुलकर यांचा जन्म मिरजेला झाला व त्यांचे बालपण सांगली, कोल्हापूर येथे गेले. लहानपणी कोल्हापुरात त्यांना उ. अल्लादिया खाँसाहेबांसारख्या उच्च कोटीच्या कलाकाराची कला ऐकायला मिळाली. त्यांचे मोठे बंधू दत्तात्रेय व नारायण मारुलकर हे बालकीर्तनकार म्हणून प्रसिद्ध होते. बालवयातच आपल्या बंधूंना ते हार्मोनियमची साथही करू लागले.

सांगलीस शिवरामबुवा उंचीठाणेकर यांच्याकडे

म

संगीताचे शिक्षण घेतल्यानंतर ग्वाल्हेर घराण्याची पक्की तालीम त्यांना गायनाचार्य बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचे शिष्य पं. वामनबुवा चाफेकर व पं. अनंत मनोहर जोशी यांच्याकडून मिळाली.

उ. अल्लादिया खाँ यांचे शिष्य गोविंदबुवा शाळीग्राम यांच्याकडून ते जयपूर घराण्याचीही गायकी शिकले. आग्रा घराण्यातील खास चिजा त्यांना पं. रत्नकांत रामनाथकर यांच्याकडून मिळाल्या. याशिवाय गोखले घराण्यातील अनेक अनवट बंदिशीही त्यांनी पं. विश्वनाथबुवा गोखले यांच्याकडून आत्मसात केल्या होत्या. गोविंदराव टेंबे यांच्या सहवासातून त्यांनी हार्मोनिअम वादनातील खुब्या अभ्यासल्या, तसेच काही काळ पं. गजाननबुवा जोशी यांचेही मार्गदर्शन त्यांना लाभले. प्रा. ग.ह. रानडे यांच्याशी त्यांच्या संगीतशास्त्रविषयक चर्चा होत असत. अशा रितीने त्यांनी हिंदुस्थानी रागसंगीताचा चौफेर व सखोल व्यासंग केला होता.

त्यांनी १९६० साली 'हिंदुस्थानी संगीतातील घराणी' या विषयावर संशोधन प्रबंध सादर करून अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाची 'संगीत प्रवीण' (डॉक्टर ऑफ म्यूझिक) ही पदवी संपादन केली.

मारुलकर १९३८ च्या सुमारास पुण्यात स्थायिक झाले. अनेक कलाकार, संगीताचे विद्यार्थी , अभ्यासक, रसिक यांच्याशी त्यांचा संवाद होत असे.

एक उत्कृष्ट हार्मोनिअम वादक म्हणूनही त्यांनी लौकिक प्राप्त केला व हिराबाई बडोदेकरांसारख्या अनेक नामवंत कलाकारांना त्यांनी हार्मोनिअमची सुयोग्य साथ केली. त्यांनी 'नट-कली' या रागाची निर्मिती केली होती, तसेच काही ढंगदार बंदिशींचीही रचना केली, आकाशवाणी व शालेय कार्यक्रमांसाठी काही नाटकांना व स्फुट पदांना चाली दिल्या.

पुण्यातील अहिल्यादेवी हायस्कूलमध्ये ते संगीत शिक्षक म्हणून दीर्घकाळ कार्यरत होते. पुणे विद्यापीठाच्या संगीत अभ्यासक्रम मंडळाचे, तसेच एस.एस.सी. बोर्डाचे संगीत विषयाचे सदस्य व परीक्षक म्हणूनही त्यांनी कार्य केले. आकाशवाणी या माध्यमासाठी त्यांनी संगीतविषयक भाषणे, विशेष विषयांवर आधारित मैफली इ. कार्यक्रमांचे नियोजन केले. आकाशवाणीवर ते संगीत परीक्षक म्हणूनही कार्यरत होते.

'संगीतातील घराणी' व 'गोमंतकीय संगीतकार' हे डॉ. मारुलकरांचे महत्त्वाचे असे दोन संगीतविषयक ग्रंथ म्हणजे मराठीतील संगीतविषयक लेखनासाठी त्यांनी दिलेले मोठे योगदान आहे. 'संगीतातील घराणी' (१९६२, पुणे) हा त्यांचा ग्रंथ विशेष नावाजला गेला. या ग्रंथात डॉ. मारुलकर यांनी घराणे ही संकल्पना, तिचे कार्य, आवश्यकता, घराण्यांची सद्य:स्थिती यांवर भाष्य केले आहे. त्यांनी अतिशय मार्मिकपणे व तटस्थपणे, चिकित्सात्मक असे लेखन केले आहे. याशिवाय 'स्त्रियांचे घराणे', 'घराण्यांची सांगता' व 'संगीताचे भाष्यकार' हे या ग्रंथातील लेखही मारुलकरांच्या मर्मदृष्टीची साक्ष देतात.

गोव्यातील अनेक ज्येष्ठ गायक-वादक कलाकारांचा परिचय 'गोमंतकीय संगीतकार' (१९७६) या ग्रंथातून दिसतो. त्यांनी लयभास्कर खाप्रूमामा पर्वतकर, रामकृष्ण पर्वतकर, श्रीधर पार्सेकर, वझे बुवा, अंजनीबाई मालपेकर, केसरबाई केरकर, गोपाळकृष्ण भोबे, मलबाराव सरदेसाई इत्यादी  सतरा व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. याशिवाय मराठीतील अनेक वृत्तपत्रे, 'संगीत कला विहार'सारखी मासिके यांतून त्यांनी व्यासंगपूर्ण लेखन केले.

डॉ. मारुलकरांनी अत्यंत निरलसपणे अनेकांना मुक्तहस्ते विद्यादान केले. विमल वाकडे, शुभदा चिरमुले, बबनराव नावडीकर, श्यामा घाणेकर, कुमुदिनी काटदरे हे त्यांचे प्रमुख शिष्य होत. डॉ. प्रभा अत्रे यांनीही काही काळ डॉ. मारुलकर यांचे मार्गदर्शन घेतले होते. त्यांच्या स्नुषा डॉ. अलका देव-मारुलकर या प्रसिद्ध गायिका आहेत.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

*१. मारुलकर, नारायण रघुनाथ; 'संगीतातील घराणी'; पुणे, १९६२.*

म

२. *मारुलकर नारायण रघुनाथ; 'गोमंतकीय संगीतकार'; मडगाव, १९७६.*

३. *मुलाखती : सदानंद मारुलकर, माधव पंडित, कुमुदिनी काटदरे, हेमा गुर्जर.*

## मालपेकर, अंजनीबाई नारायण
### गायिका
### २२ एप्रिल १८८३ – ७ ऑगस्ट १९७४



अंजनीबाई नारायण मालपेकर यांचा जन्म गोव्यातील मालपे या गावी झाला. मालपेकर घराणे संगीतोपासक होते. त्यांची आजी गुजाबाई ही संगीताची, तसेच संस्कृत भाषेची चांगली जाणकार होती. त्यांचे वडील अभियंता असून संगीताचे प्रेमी होते. अंजनीबाईंचे मामा तबला व मृदंगवादक होते. अंजनीबाईंचा आवाज निसर्गतः अत्यंत सुंदर होता. मालपेकर परिवार नंतर मुंबईत स्थायिक झाला.

अंजनीबाईंची धाकटी बहीण कमला यांचाही आवाज मधुर होता. मुंबईतील नवीवाडी येथील मिशनरी विद्यालयातून त्यांचे शालेय शिक्षण झाले. शालेय शिक्षणाबरोबर आईकडून त्यांना संगीताचे प्राथमिक शिक्षणही मिळत होते. आई नबूबाई आपल्या दोन्ही मुलींना गीत-भजने व छोट्याछोट्या बंदिशी शिकवत.

पं. भातखंडे यांच्या मध्यस्थीने या दोन्ही बहिणींची उ. नजीर खाँसाहेबांकडे तालीम सुरू झाली. अंजनी आणि कमला यांचे शिक्षण चालू असतानाच त्यांची छोटी बहीण प्लेगच्या साथीला बळी पडली. तसेच, उ. नजीर खाँ यांचे सुपुत्रही प्लेगचे बळी ठरले. नजीर खाँसाहेबांनी आपले सर्व लक्ष अंजनीबाईंवर केंद्रित करून तिला भेंडीबाजार घराण्याची वारसदार बनविण्याचा निश्चय केला .

नजीर खाँसाहेब गायनाच्या शिकवणीसाठी सूर्योदयापूर्वीच अंजनीच्या घरी येत असत. एक-एक सूर स्थिर करीत, त्यात गुंजन निर्माण करणे, दमसास वाढविणे, मींड व घसीट यांनी एका सुरावरून दुसऱ्या स्वरावर जाताना अतूट प्रवाहीपण निर्माण करणे, खंडमेराच्या ५०४० अलंकारांचा रियाझ, त्यातून निर्माण होणारे स्वरविस्तार व त्यांचा आपल्या गायकीत सौंदर्यपूर्ण आविष्कार, गमकेच्या जोरकस ताना, लयदार-ढंगदार सरगम, याशिवाय एका श्वासात विलंबित ख्यालाची पूर्ण स्थायी आणि एका श्वासात पूर्ण अंतरा भरणे, विलंबित लयीमध्येही लयबद्धता जपणे, अशा अनेक अंगांची तालीम आणि रियाझ खाँसाहेब अंजनीबाईंकडून करून घेत असत.

अंजनीबाईंची यमन रागाची तालीम साडेतीन वर्षे आणि भैरवी रागाची तालीम दीड वर्षापर्यंत चालू होती. अशा प्रकारे तालीम घेतल्यामुळे त्यांना इतर राग शिकणे फार सोपे झाले. यमन व भैरवी रागाच्या या कठोर मेहनतीमुळे इतर रागांचे नुसते चलन सांगताच अंजनीबाई त्या रागाचे प्रस्तुतीकरण अचूक करून दाखवू लागल्या.

भेंडीबाजार गायकीमध्ये बंदिशींचेही असाधारण महत्त्व आहे. खाँसाहेब बंदिशीतील साहित्य, बंदिशीचा भाव, शब्दोच्चार, सादरीकरण या गोष्टींचा लक्षपूर्वक अभ्यास करण्याबाबत आग्रही असत. अंजनी मालपेकरांना छज्जू खाँ, खादिम हुसेन खाँ, पं. भातखंडे यांच्याकडूनही तालीम मिळाली.

वयाच्या सोळाव्या वर्षी मुंबईतील एका मोठ्या संगीत संमेलनात अंजनीबाईंचा कार्यक्रम झाला. अल्पावधीतच अंजनीबाईंचे नाव सर्वत्र झाले. खणखणीत जव्हारीदार आवाज, बुद्धिमत्तेचे रंजक आणि भावपूर्ण गायन व असाधारण सौंदर्य यांमुळे त्यांची मैफलीवर छाप पडत असे. देशभरातील संस्थानिकांच्या दरबारातून, तसेच अनेक संगीत संमेलनांतून त्यांचे कार्यक्रम होऊ लागले होते. मुंबईच्या धनिक आणि रसिक सेठ वसनजी वेद यांच्याबरोबर त्यांचा विवाह झाला.

म

बापूतारा कोठीतील एका मैफलीनंतर त्यांचा आवाज अचानक पूर्णपणे बसला. उपचार करूनदेखील आवाज बरा होत नव्हता. काही हितचिंतकांनी त्यांना केडगावचे सिद्धपुरुष नारायण महाराजांचे नाव सुचवले. महाराजांच्या प्रसादाने त्यांचा आवाज पूर्ववत झाला.

आवाज पूर्ववत झाल्यावर अंजनीबाई पुन्हा गायला लागल्या. त्यांची धार्मिक वृत्ती पुढे पुढे वाढत गेली व गायनाच्या मैफलीत त्यांचे मन रमेनासे झाले. ईश्वरसेवा व गुरुसेवा करण्यात त्यांना जास्त आनंद वाटू लागला. वयाच्या चाळिसाव्या वर्षी त्यांनी मैफलीमध्ये न गाण्याचा निर्णय घेतला. मुंबईतील टाउन हॉलमध्ये त्यांची १९२३ साली शेवटची मैफल झाली. मात्र, विद्यादानाचे कार्य त्यांनी सुरूच ठेवले.

पं. कुमार गंधर्व, श्रीमती किशोरी आमोणकर, पं. त्र्यंबकराव जानोरीकर यांना अंजनीबाईंची तालीम लाभली. त्यांनी इतरही अनेकांना संगीताचे मार्गदर्शन केले, तसेच बेगम अख्तरांना ठुमरीचे मार्गदर्शन केले.

अद्वितीय संगीतसेवेबद्दल अंजनीबाई मालपेकरांना १९५८ मध्ये राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते ‘फेलो ऑफ दी संगीत नाटक अकादमी’ हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. मुंबईत वृद्धापकाळाने त्यांचे निधन झाले.

— शरद करमरकर

म

## मास्टर कृष्णराव

***फुलंब्रीकर, कृष्णराव गणेश***

**गायक, संगीतनट, संगीतकार**

**२० जानेवारी १८९८ — २० ऑक्टोबर १९७४**

एक ढंगदार ख्यालिये, रंगदेवता प्रसन्न असणारे संगीतनट, सिद्धहस्त नाट्य-चित्र-संगीतकार, प्रतिभावान बंदिशकार म्हणून महाराष्ट्राच्या जनमनावर पाच दशके अधिराज्य गाजवणारे कृष्णा मास्तर म्हणजे ‘संगीतकलानिधी’ कृष्णराव गणेश फुलंब्रीकर यांचा जन्म औरंगाबादजवळच्या फुलंब्री गावातील पाठक या भिक्षुक घराण्यातील गणेशपंत व मथुराबाई यांच्या पोटी, पुण्याजवळील देवाची आळंदी येथे झाला.



नाट्यकलाप्रवर्तक मंडळीच्या ‘संत सखू’ या नाटकातील विठ्ठलाच्या भूमिकेत ‘भक्तजन सदा’ या गाण्याला ‘वन्स मोअर’ मिळवत कृष्णरावांनी रंगभूमीवर पदार्पण केले. त्यांनी कंपनीतील सवाई गंधर्वांकडे संगीताचे जुजबी शिक्षण घेतले. त्यांना १९०९ साली न.चिं. केळकर यांनी ‘मास्टर कृष्णा’ अशी पदवी दिली व पुढे याच नावाने लोक त्यांना ओळखू लागले.

फुलंब्रीकरांचे भास्करबुवा बखले यांच्याकडे १९११ सालापासून संगीतशिक्षण सुरू झाले. भास्करबुवांनी त्यांना मैफली गाण्याची तालीम दिली. मास्तरांचा आवाज मुळात हलका, पातळ, पण चपळ असल्याने भास्करबुवांनी त्यांच्यावर मर्दानी, जोरदार, घरंदाज गायकीचे संस्कार केले. ऐन उमेदीच्या काळात मास्तर हुबेहूब भास्करबुवांसारखे गात. वझेबुवा, अल्लादिया खाँ, फैयाझ खाँ अशा अनेक ज्येष्ठ गवयांनी त्यांचे गायन वाखाणले. भास्करबुवांची ग्वाल्हेर, आग्रा व जयपूर या तीन घराण्यांचा संगम असणारी गायकी मास्तरांनी पुढे चालवली. अर्थात स्वतःचा गळा व बुद्धी यांनुसार ते आपली खास मुद्रा असणारी गायकी मांडत. त्यांच्याकडे आम व अनवट रागांतील अनेक उत्तमोत्तम चिजांचा खजिना होता.

ख्यालगायकीबरोबर ठुमरीसाठीही मास्तर प्रसिद्ध होते. त्यांची ठुमरी ही ख्यालीठुमरी वा मध्यमग्राम ठुमरी म्हणून ओळखली जायची. भैरवीतील अनेक सुंदर रचनांच्या गायनामुळे ‘भैरवीचे बादशाह’ म्हणूनही त्यांची ख्याती होती. पारंपरिक अभंगगायनाला रागदारीची चौकट देऊन भक्तिसंगीताचा वेगळा ढंग त्यांनी निर्माण केला. त्याचे पुढच्या पिढीतील संगीतकार व गायकांनी अनुकरण केले.

धुळ्याला चौदाव्या वर्षी त्यांची पहिली जाहीर मैफल झाली. भास्करबुवांच्या पश्चात जालंधरचा हरवल्लभ मेळा,

कराची-लाहोरपासून ब्राह्मणसभेतील मैफलींचा वारसा मास्तरांनी सांभाळला. त्यांनी १९२२ ते १९६८ असा प्रदीर्घ काळ मुंबईतील ब्राह्मणसभेच्या गणेशोत्सवातील मैफलींत लोकांना भरभरून गाणे ऐकवले. अनेक संस्थानिक, राजेरईस, राजकीय नेत्यांनी त्यांना मानाने निमंत्रित करून, वेळोवेळी त्यांच्या मैफली केल्या.

मास्तरांचा स्वभाव त्यांच्याच एका बंदिशीतल्याप्रमाणे ‘मेरो मन अत उल्हासा’ असा मुळातच खेळकर व हसरा होता. त्यांची मैफलही सदाबहार असे. त्या काळात ‘हमखास रंग भरणारे मैफलीचे बादशाह’ म्हणून त्यांची ख्याती होती. त्यांच्या गाण्यात विद्वान गवयांपासून माळकरी-मळेकरी वर्गाला झुलवायला लावणारी विद्वत्ता व रंजकता होती.

बालपणी केलेल्या ‘संत सखू’ या नाटकातील विठ्ठलाच्या भूमिकेनंतर मास्तरांनी १९१५ मध्ये बडोदा येथे शारदेच्या भूमिकेद्वारे रंगभूमीवर पुनश्च पाऊल टाकले. त्यांनी १९१५ ते १९३३ पर्यंत बालगंधर्वांच्या ‘गंधर्व नाटक मंडळी’त सोळा संगीतनाटकांतून भूमिका केल्या. आपल्या रंगगायनाने त्यांनी रंजन केलेच; पण ‘आशानिराशा’मधील ‘वेडी लंका’, ‘एकच प्याला’तील शरद, ‘मेनका’तील बालमूर्ती, ‘सौभद्रा’तील नारद या भूमिकांतील अभिनयानेही ठसा उमटवला.

भास्करबुवांच्या सांगण्यावरून ‘नयनाला विषय’ (स्वयंवर) व ‘विराट ज्ञानी’ (द्रौपदी) या पदांच्या चालीही त्यांनी लावल्या. त्यांनी ‘गंधर्व संगीत नाटक मंडळी’च्या सात नाटकांतील मुख्यत्वे बालगंधर्वांच्या तोंडच्या पदांना संगीतकार म्हणून चाली दिल्या व त्या विलक्षण लोकप्रिय झाल्या. रागदारीतील अधिकार व नाट्यसंगीतातील प्रतिभा या दोन्हींमुळे बालगंधर्वही या आपल्या गुरुबंधूस आदराने ‘बुवासाहेबांनंतर तुम्हीच माझे गुरू’ असे म्हणत. ‘तिमिरपटल भार’ (नंदकुमार, १९२५), ‘मजला घडावी’ (सावित्री, १९३३), ‘भूषण संसारा’, ‘अजि पुरवा ही हौस’ (मेनका, १९२६), ‘पतितपावना भेट नच’ (विधिलिखित, १९२८), ‘धाव घाली विठू’, ‘अवघाची संसार’, ‘नुरले मानस’, ‘देवा धरिले चरण’, ‘पतित तू पावना’, ‘जोहार मायबाप’, ‘अगा वैकुंठीच्या राया’ (कान्होपात्रा, १९३१), ‘गमते सदा’, ‘धावत येई सख्या’, ‘तुम बिन मेरी’ (अमृतसिद्धी, १९३३), ‘नाचत रसा रसिका’, ‘तात करी’, ‘दिलरुबा हा या जिवाचा’ (आशानिराशा, १९३३) ही बालगंधर्वांनी गायलेली, मास्तरांनी संगीतबद्ध केलेली काही प्रसिद्ध नाट्यपदे होती.

मो.ग. रांगणेकरांच्या नाट्यनिकेतनच्या ‘कुलवधू’ (१९४२), ‘एक होता म्हातारा’ (१९४८), ‘कोणे एके काळी’ (१९५०), ‘भाग्योदय’ (१९५७) या नाटकांनाही त्यांनी संगीत दिले. जुन्या संगीतनाटकांपेक्षा ही नाटके आशय व सादरीकरण यांत भिन्न आहेत व लोकाभिरुचीही बदलली आहे हे लक्षात घेऊन त्यांनी रागदारीतच, पण पाल्हाळिक वाटणार नाहीत अशी भावगीताच्या बाजाची नाट्यगीते दिली. ‘क्षण आला’, ‘मनरमणा’, ‘बोला अमृत बोला’, ‘का रे ऐसी माया’ या स्वररचना सहज गुणगुणण्याजोग्या असल्याने फारच गाजल्या.

प्रभात फिल्म कंपनीत १९३५ साली ‘धर्मात्मा’ या चित्रपटाच्या निमित्ताने मास्तरांचा प्रवेश झाला व त्यांच्या यशाला चंदेरी झळाळी मिळाली. संगीतकार म्हणून मास्तरांनी १९३५ ते १९६२ या काळात पंधरा मराठी व हिंदी चित्रपटांना संगीत दिले व भारतभर नाव मिळवले. ‘अमरज्योती’मधील ‘सुनो सुनो बन के प्राणी’ या गाण्याच्या ध्वनिमुद्रिकेने ८०,००० असा विक्रीचा १९३६ साली उच्चांक गाठला होता. ‘प्रभात’च्या ‘धर्मात्मा’ (हिंदीसह, १९३५), ‘अमरज्योती’ (हिंदी, १९३६), ‘वहां’ (हिंदी, १९३७), ‘गोपाळकृष्ण’ (हिंदीसह, १९३८), ‘माणूस’ व ‘आदमी’ (मराठी व हिंदी, १९३९), ‘शेजारी’ व ‘पड़ोसी’ (मराठी व हिंदी, १९३९), ‘लाखारानी’ (हिंदी, १९४५) या चित्रपटांना त्यांनी संगीत दिले.

नंतर अत्रे पिक्चर्ससाठी त्यांनी ‘वसंतसेना’ (हिंदीसह, १९४२), ‘राजकमल’साठी ‘भक्तीचा मळा’ (हिंदीत ‘माली’, १९४४), शिवाय ‘मेरी अमानत’ (हिंदी, १९४७), ‘संत रामदास’ (१९४९), ‘ताई

म

तेलीण' (१९५३), 'कीचकवध' (हिंदीसह, १९५९) व 'विठू माझा लेकुरवाळा' (१९६२) या चित्रपटांनाही संगीत दिले. 'भक्तीचा मळा' या चित्रपटात फुलंब्रीकरांनी साकारलेली 'सावता माळी' ही मुख्य भूमिका व पदे गाजली. 'मेरी अमानत'मध्ये त्यांनी शिक्षकाचीही भूमिका केली. बालगंधर्वांच्या 'अमृतसिद्धी' या नाटकाची चित्रावृत्ती १९३७ साली 'साध्वी मीराबाई' नावाने निघाली, त्यातही त्यांनी मूळ नाटकासाठी दिलेल्या चाली होत्याच.

'गोपालकृष्ण' ही तर एक संगीतमय चित्रकथाच होती. त्यातील 'वंदित राधाबाला', 'भाग्यवती ही कपिला', 'गौळणी गे', 'तुझाच छकुला', 'उमगायाची नाही कुणा', 'हासत नाचत जाऊ' ही गीते अविस्मरणीय आहेत. बालगंधर्वांपासून सुधीर फडके, मन्ना डे, महंमद रफी हे गायक आणि ज्योत्स्ना भोळे, दुर्गा खोटे, शांता आपटेंपासून लता मंगेशकर, आशा भोसले या गायिकांनी त्यांची नाट्य-चित्रगीते गायली. मास्तरांची 'भाव तोची देव', 'आवडीने भावे', 'रोडगा वाहीन तुला', 'सुनो सुनो बन के प्राणी', 'हर गली में', 'कशाला उद्याची बात', 'दिवाळी आली', 'मन पापी भूला', 'राधिका चतुर बोले', 'हासत वसंत ये', 'लखलख चंदेरी तेजाची', 'श्याम बजाए', 'राजा पंढरीचा', 'विश्वाचे हे अमुचे वैभव', 'धुंद मधुमती रात', 'असा नेसून शालू' इ. चित्रपटगीते गाजली.

एक बंदिशकार म्हणूनही मास्तरांनी कीर्ती मिळवली. त्यांच्या बंदिशी सहजस्फूर्त असत. भर मैफलीतही त्यांनी अनेक बंदिशी रचल्या. मास्तरांच्या बंदिशींत साहित्यिक सौंदर्य अभावानेच असले, तरी रागाचे सुंदर रूप, पकड घेणारा मुखडा, लयीचा खेळकरपणा अशा गुणांमुळे त्या अत्यंत आकर्षक व गेय असत. त्यांनी अनवट व जोडरागांत बांधलेल्या बंदिशींतही अवघडलेपणा जाणवत नाही, तर ओघवतेपणा, सहजपणातले माधुर्य प्रत्ययास येते. उदा. 'रंग रंग मुख पे' (अडाणा), 'चहु बरसन लागी' (भूप), 'काहू की रीत' (मालकंस), 'होरी खेलत बहार' (पटदीप), 'रतिया मैं जागी' (नायकी कानडा), 'लालन तुमबिन' (कौशी कानडा), 'सदा चिरंजीव रहो' (सोहनी भटियार), 'मधुवा पीवन' (बसंती केदार), 'महादेव की बानी' (अजद हिंडोल), 'माई री आज' (हिंडोलबहार), इ. त्यांनी 'तुम मत जावो मुरारी', 'सावरिया मत रोको', 'मोरा मेंदी का रंग', 'श्याममोहन प्यारे' अशा ठुमऱ्याही रचल्या. तिलककेदार, मंगल तोडी, देवीकल्याण, शिवकल्याण, बिल्वबिभास, जौनकली असे नवे जोडरागही त्यांनी निर्माण केले.

कमीतकमी स्वरांत, पण चटकन पकड घेणारी चाल, रसाळ प्रासादिकता, सहज-सोपेपणा ही वैशिष्ट्ये फुलंब्रीकरांच्या चालींत प्रकर्षाने जाणवतात. त्यांनी स्वतःच्या नाट्य-चित्रगीतांच्या चालींवरून बांधेसूद बंदिशी केल्या! 'नुरले मानस' (मन में मोहन), 'गमते सदा' (कवन बताई), 'प्रियकर वश' (बन बन देखे), 'कृष्णकन्हैया निकले' (भाग्यवती ही कपिला), 'दे मज देवा' (प्रीतम सैया लागी रे), 'मानो पूजा ये' (वंदित राधाबाला), इ. काही नाट्य-चित्रगीते व या बंदिशीही ते आपल्या मैफलीत रंगवून पेश करत!

एक संगीतकार म्हणून मास्तरांना कोणत्या माध्यमासाठी काय स्वरूपाचे संगीत असावे याची, त्या-त्या माध्यमाच्या वैशिष्ट्यांची, सामान्यजनांच्या अभिरुचीची नेमकी समज होती. त्यांनी १९३४ पर्यंत दिलेल्या नाट्यपदांच्या चाली मुख्यतः भारदस्त रागदारीवर आधारित, तर १९४० नंतर नाट्यनिकेतनच्या नाटकांसाठीच्या चाली भावगीतसदृश आहेत. त्यांच्या चित्रपटसंगीताचा गौरव पाश्चात्त्य कलाकारांनीही केला होता.

फुलंब्रीकरांच्या अडाणा, मालकंस, बागेश्री, तोडी, हिंडोल, पूरिया, देस, जयजयवंती, तुम मत जाओ – खमाज ठुमरी, काफी होरी, इ. ध्वनिमुद्रिकाही गाजल्या. जौनपुरी व 'मोपे डार गयो' ही खमाज ठुमरी या गाजलेल्या ध्वनिमुद्रिकांमुळे ते लाहोर-कराची, पंजाब या ठिकाणी 'बाजे झनन मास्टर' आणि निजाम संस्थानात 'पिचकारीवाले मास्टर' म्हणून ओळखले जायचे. 'लपविला लाल', 'हजरत सलाम घ्यावा', 'सनातन नाद

म

हा', 'कुसुमाविधी चारुकांत', 'तेजा नभीच्या', 'ताराया दीन अबलांना', 'मानभंग दाही' इ. त्यांनी गायलेली व गाजलेली नाट्यगीते; 'परब्रह्म निष्काम', 'तुझिये निढळी', 'कृष्ण माझी माता', 'जो पिया जोडूं', 'म्हारा रघुवीर रे', 'विदुर घर जावे' अशा त्यांच्या भक्तिरचना अत्यंत लोकप्रिय होत्या.

'रागसंग्रह'च्या सात भागांतून मास्तरांनी पारंपरिक व स्वरचित बंदिशी प्रसिद्ध केल्या. तसेच राष्ट्रसंगीत, शालेय शिशू संगीत, मोहनमाळ, नाट्य-चित्रगीतांच्या स्वरलिपींची पुस्तकेही प्रसिद्ध केली. सुधाकर अनवलीकर यांनी शब्दबद्ध केलेले त्यांचे 'बोला अमृत बोला' हे आत्मकथन १९८५ मध्ये, त्यांच्या मृत्युपश्चात प्रसिद्ध झाले.

हरिभाऊ देशपांडे, माणिकराव ठाकुरदास, बापूराव अष्टेकर, अंजनीबाई कलगुटकर, डॉ. पाबळकर, सुहास दातार, रंगनाथ करकरे, शिवराम गाडगीळ, नारायण फुलंब्रीकर, सुधाकर जोशी यांना मास्तरांचे मार्गदर्शन मिळाले. मात्र, मास्तरांची गायकी खऱ्या अर्थाने आत्मसात करून राम मराठे यांनी पुढे नेली. ज्योत्स्ना भोळे यांना संगीतदिग्दर्शनाच्या निमित्ताने मास्तरांचे मार्गदर्शन मिळाले. शिवाय त्यांच्या सहवासातून दिनकर अमेंबल, मधुसूदन कानेटकर, मोहनराव कर्वे, छोटा गंधर्व, इत्यादींनी गायकीचा प्रभाव घेतला. संगीतकार सुधीर फडके, वसंत देसाई, स्नेहल भाटकर, गजानन वाटवे, पु.ल. देशपांडे यांनीही आपल्या संगीतावर मास्तरांची छाप असल्याचे नमूद केले आहे. त्यांच्या कन्या वीणा चिटको यांनी वडिलांचा संगीतदिग्दर्शनाचा वारसा चालवला.

राष्ट्रप्रेमाने भारलेल्या स्वातंत्र्यपूर्व काळात फुलंब्रीकरांनी 'वंदे मातरम्' या गीतास समूहास म्हणता येईल अशी सोपी, पण भारदस्त चाल लावली. ब्रिटिश राजवटीत आकाशवाणीवरून गाण्याचा आग्रह मास्तरांनी धरला व त्या कारणाने आकाशवाणीवर चार वर्षे बहिष्कारही टाकला. 'वंदे मातरम्' गाऊनच पुन्हा मुंबई आकाशवाणीवर गायनाला आरंभ झाला.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर १९४७ साली 'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत व्हावे म्हणून नेहरू, राजेंद्रप्रसाद इ. नेत्यांनाही ते फैजपूरच्या अधिवेशनात भेटले. ही चाल पोलीसदलाच्या बॅण्डवर बसवून त्याचेही त्यांनी ध्वनिमुद्रण केले. हे गीत राष्ट्रगीत झाले नाही, मात्र मास्तर आपल्या मैफलीतही 'वंदे मातरम्' गात असत. 'वंदे मातरम्'सह 'अमर हिंदुस्थान', 'सबको अपना धर्म ही प्यारा' अशा देशभक्तिपर गीतांची त्यांची ध्वनिमुद्रिकाही गाजली होती.

शंकराचार्य डॉ. कूर्तकोटी यांनी फुलंब्रीकरांना १९३३ साली 'संगीतकलानिधी' ही पदवी दिली, तर देवासचे महाराज 'राजगंधर्व', सरोजिनी नायडू 'वंदे मातरम्वाले मास्तर' अशा नावांनी त्यांचा उल्लेख करीत. १९५३ मध्ये भारत सरकारने आयोजित केलेल्या चीनच्या दौऱ्यातील सांस्कृतिक मंडळात फुलंब्रीकरांचा समावेश होता व तेथेही त्यांनी गायन पेश केले. पुणे भारत गायन समाजाचे ते अखेरपर्यंत अध्यक्ष होते. त्यांच्या षष्ठ्यब्दीपूर्तीनिमित्त १९५८ साली नऊ दिवस झालेला व ७० कलाकारांची हजेरी असलेला समारंभ पुण्यात खूप गाजला. त्यांना 'विष्णुदास भावे सुवर्णपदक' (१९६९) मिळाले. भारत सरकारने 'पद्मभूषण' (१९७१), संगीत नाटक अकादमी रत्नसदस्यत्व (१९७२) देऊन त्यांचा गौरव केला.

त्या काळच्या कलाकारांत अभावानेच असणारा निर्व्यसनीपणा, व्यवहारी वृत्ती यांमुळे कलेच्या क्षेत्रातील देदीप्यमान यशाबरोबरच मास्तरांना सांसारिक सुख व समाधानी आयुष्य लाभले. त्या काळात पुण्यातील लिमयेवाडीतील 'गणेशभुवन' हा त्यांचा सुंदर बंगला लोकांच्या कौतुक व अभिमानाचा विषय होता.

मास्तरांनी १९५१ पासून मधुमेह व १९६१ मध्ये अर्धांगवायूचा झटका यांमुळे मैफली कमी केल्या. त्यांनी १९६९ साली भास्करबुवांच्या स्मृतीनिमित्त अखेरचे जाहीर गायन केले. पुणे येथे त्यांचा मृत्यू झाला.

त्यांच्या स्मृतिदिनी पुणे भारत गायन समाज व मुंबईस ट्रिनिटी क्लब येथे संगीतसभा होतात. पुण्याच्या बालगंधर्व रंगमंदिराच्या आवारात त्यांचा अर्धपुतळा १९७५ साली उभारण्यात आला. त्यांची जन्मशताब्दी

१९९८ साली साजरी करण्यात आली. साहित्य परिषद, पुणे यांच्यातर्फे संगीतविषयक लेखकास त्यांच्या नावे पुरस्कारही देण्यात येतो.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**


*१. धामणकर, भय्यासाहेब; 'मास्टर कृष्णराव गौरव ग्रंथ', मुंबई; १९८३.*

*२. अनवलीकर, सुधाकर; 'बोला अमृत बोला' ( निवेदन : मास्टर कृष्णराव) पुणे; १९८५.*

*३. 'साधना', मास्तर कृष्णराव विशेषांक, पुणे; १९९७.*


## मास्टर दीनानाथ मंगेशकर

***मंगेशकर, दीनानाथ गणेशभट***

**गायक, नट**

**२९ डिसेंबर १९०० – २४ एप्रिल १९४२**



दीनानाथ गणेशभट मंगेशकर (अभिषेकी) यांचा जन्म गोव्यातील मंगेशी येथे झाला. त्यांचे वडील गणेशभट भिकाजी अभिषेकी (नवाथे) आणि आई येसूबाई हे मंगेशी देवस्थानाचे, म्हणून त्यांचे 'मंगेशकर' हे आडनाव पडले. पांडीमामा मंगेशकरांकडून त्यांना सारंगीचे प्राथमिक शिक्षण मिळाले. शालेय शिक्षणापेक्षा कलेकडे असलेली ओढ पाहून आईने दीनानाथांना रघुनाथ (बाबा) माशेलकर यांच्याकडे गायन शिकण्यास पाठवले. बाबा माशेलकर हे पं. भास्करबुवा बखले यांचे गुरुबंधू, उत्कृष्ट तबलावादक आणि गायक होते.

दीनानाथांची कीर्ती ऐकून किर्लोस्कर संगीत मंडळाच्या चालकांनी त्यांना आपल्या कंपनीत आग्रहपूर्वक बोलावले. त्या वेळी दीनानाथांचे वय अवघे तेरा वर्षे होते. किर्लोस्कर कंपनीत दीनानाथांनी 'ताज-ए-वफा' या उर्दू संगीत नाटकातून मुग्धा कमलेची भूमिका केली. या नाटकातील त्यांची पदे अतिशय गाजली. 'सुंदोपसुंद' या नाटकात १९१६ साली सुविभ्रमा ही भूमिका करताना 'संदेश'कार अच्युत बळवंत कोल्हटकरांनी त्यांना 'मास्टर' ही पदवी दिली, तीच पुढे रूढ झाली.

वयाच्या अठराव्या वर्षी मा. दीनानाथांनी १९१८ साली चिंतामणराव कोल्हटकर आणि कृष्णराव कोल्हापुरे या सहकाऱ्यांच्या साथीने 'बलवंत संगीत मंडळी' स्थापन केली.

बलवंतच्या १९१८ ते १९४० या २२ वर्षांच्या काळात दीनानाथांचे कलाकर्तृत्व झळाळून उठले. बलवंत संगीत मंडळीतील कारकिर्दीत दीनानाथांच्या शकुंतला (सं. शकुंतला), सुरुची (धरम का चांद), कांता (जन्मरहस्य), उत्तरा (वीर विडंबन), लतिका (भावबंधन), शिवांगी (राजसंन्यास), तेजस्वी (रणदुंदुभी), सुलोचना (संन्यस्त खड्ग), सिंधू (एकच प्याला), देवयानी (विद्याहरण), सरोजिनी (मूकनायक) या स्त्री-भूमिका, तसेच गौतम (ब्रह्मकुमारी), राम (रामराज्यवियोग), अर्जुन (सौभद्र), धैर्यधर (मानापमान), सदानंद (गैरसमज), हिंमतराव (देशकंटक), या पुरुष भूमिका गाजल्या.

मा. दीनानाथांची कारकीर्द प्रामुख्याने मराठी संगीत रंगभूमीवर घडली असली तरी त्यांचा शास्त्रीय संगीताचा व्यासंगही मोठा होता. पं. रामकृष्णबुवा वझे यांचे शिष्यत्व त्यांनी विधिवत पत्करले असले, तरी त्या काळात अनेक नामवंत गवयांना ऐकूनही त्यांनी आपली गायकी समृद्ध केली होती. दीनानाथांचे गाणे शास्त्रीय आधाराचे, तसेच उत्स्फूर्त होते. मा. दीनानाथांनी आकाशवाणीवरूनही गायन केले. मलुहा केदार, हेमकल्याण, बागेश्री बहार, बागेश्री कानडा असे अनवट राग त्यांनी आकाशवाणीवरून सादर केले.

संगीतकार म्हणूनही दीनानाथांचे योगदान मोलाचे आहे. 'संन्यस्त खड्ग', 'ब्रह्मकुमारी', 'उग्रमंगल' अशा नाटकांना त्यांनी संगीत दिले. 'मानापमान' नाटकातील धैर्यधराच्या पदांच्या चाली त्यांनी बदलल्या. 'शूरा मी वंदिले', 'प्रेम सेवा शरण', 'रवि

म

मी’, ‘चंद्रिका ही जणू’ या त्यांच्या चाली लोकप्रिय झाल्या.

मराठी संगीत रंगभूमीवर नाट्यसंगीताचा घाट सुस्थापित झाला. नाट्यसंगीताच्या सुवर्णकाळातच मा. दीनानाथांनी आपली तेजस्वी, तडफदार तरीही मधुर अशी गायनशैली प्रस्थापित केली व नाट्यसंगीतात एक नवीन पर्व सुरू केले. मा. दीनानाथांनी पंजाब बाज प्रथमच नाट्यसंगीतात आणला. ‘उग्रमंगल’ नाटकात प्रथमच कथक नृत्य आणले. रागदारी संगीतातील उत्तमोत्तम बंदिशी, गझला त्यांनी रंगभूमीवर आणल्या.

मा. दीनानाथांचे गाणे आक्रमक व स्वरतालावर प्रभुत्व असणारे होते. लागोपाठचे स्वर आणि श्रुती एका मागोमाग वेगाने घेऊन ते चमत्कृती साधत. उदंड दमश्वास, आक्रमक तान, चमत्कृतिजन्य स्वरयोजना, निसर्गदत्त दैवी आवाज, अनुनासिकाचा कलात्मक वापर, आवाजाचा विस्तृत पल्ला, तीन सप्तकांतील सहज फिरत, अनपेक्षित स्वरसंगतीने साधलेला कलात्मक अपेक्षाभंग, अस्खलित वाणी व उत्तुंग प्रतिभाविलास अशा विविध गुणांनी दीनानाथांचे गाणे नटलेले असे.

संगीत रंगभूमीच्या पडत्या काळात आणि नवनवीन बोलपटांच्या आकर्षणामुळे ‘बलवंत’ने १९३३ मध्ये चित्रपट क्षेत्रात पदार्पण केले. त्यांचा ‘कृष्णार्जुन युद्ध’ हा पहिला चित्रपट होय. त्यातील ‘सुहास्य तुझे मनास मोही’ हे गाणे गाजले; पण चित्रपट चालला नाही. त्यानंतरचेही सर्व चित्रपट अयशस्वी झाल्यामुळे त्यांना नैराश्य आले.

मा. दीनानाथ व्यक्तिगत आयुष्यात एक अजातशत्रू सहृदय व्यक्ती होते. त्यांचा ज्योतिषशास्त्राचा व्यासंग दांडगा होता, तसेच देशभक्तीही त्यांच्या ठायी भरलेली होती. सिमला येथे तत्कालीन ब्रिटिश गव्हर्नरसमोर झालेल्या जलशात ‘परवशता पाश दैवे’ हे पद ते निर्भयपणे गायले. देशभक्तीमुळेच त्यांनी स्वातंत्र्यवीर सावरकरांकडून ‘संगीत संन्यस्त खड्ग’ हे नाटक लिहून घेऊन सादर केले.

चित्रपटातील अपयशाने निराश झालेल्या मास्टर दीनानाथांचे वयाच्या अवघ्या एकेचाळिसाव्या वर्षी पुणे मुक्कामी निधन झाले. मा. दीनानाथांच्या ध्वनिमुद्रिकांतून त्यांच्या गायनाची कल्पना येते. लता मंगेशकर, आशा भोसले, उषा मंगेशकर, मीना खडीकर या त्यांच्या कन्या व हृदयनाथ हे पुत्र यांनी आज संगीत क्षेत्रात त्यांनी आपला अमीट ठसा उमटवला आहे.

– डॉ. रवींद्र घांगुर्डे

## मिराशी, यशवंत सदाशिव

**गायक**

**१८८३ – ५ जानेवारी १९६६**



यशवंत सदाशिव मिराशी यांचे मूळ आडनाव पंडित होते; पण घरच्या पिढीजात मिरासदारीमुळे मिराशी हे आडनाव रूढ झाले. त्यांचा जन्म इचलकरंजीला झाला. यशवंतांच्या बालपणी पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर योगायोगाने त्यांच्या घरासमोर वास्तव्यास होते. यशवंत बाळकृष्णबुवांच्या गाण्याच्या नकला करायचे; पण त्या नकलांमधूनही त्यांची ग्रहणशक्ती तीव्र आहे हे दिसून आले, तसेच त्यांच्या आवाजातील गोडवाही कळून आला. त्यामुळे बाळकृष्णबुवांचे छोट्या यशवंतांकडे लक्ष गेले आणि त्या नकलांचा राग न मानता आई-वडिलांच्या परवानगीने पं. इचलकरंजीकर त्यांना तालीम देऊ लागले.

ध्रुपद, ख्याल, तराणे, इतर पदे अशी सर्वांगीण तालीम देऊन पं. बाळकृष्णबुवांनी यशवंतांना छान तयार केले. यशवंत मिराशी १९११ साली नाट्यकलाप्रवर्तक मंडळीत दाखल झाले. रुबाबदार व्यक्तिमत्त्व, पल्लेदार आवाज, तयारीच्या ताना आणि आत्मसात केलेले अभिनयकौशल्य यांमुळे अल्पावधीतच त्यांनी गायक, नट म्हणून खूप प्रसिद्धी मिळवली. ते १९३२ पर्यंत कंपनीत होते.

म

नाटक कंपनी सोडल्यावर मिराशीबुवा पुण्यात स्थायिक झाले. कंपनीत असताना त्यांनी तीनचार शिष्य तयार केले होते. पण आपली गायकी गाणारे आणखी शिष्य असावेत या इच्छेने पुण्यात त्यांनी विद्यादानास सुरुवात केली. राजारामबुवा पराडकर, उत्तुरकर बुवा, पंडितराव नगरकर, यशवंतबुवा जोशी, मालती जोशी, डी. बी. खिरे, राम मराठे, काणेबुवा, सी.आर. व्यास ही त्यांच्या शिष्यांपैकी काही प्रसिद्ध नावे आहेत. पं. द. वि. पलुसकरांनीही त्यांचे मार्गदर्शन घेतले. पं. विनायकबुवा पटवर्धनांनी भारतीय संगीत प्रसारक मंडळातर्फे पं. मिराशीबुवांची पुस्तके छापून ग्वाल्हेर घराण्याच्या चिजांचा संग्रह प्रसिद्ध केला. मिराशीबुवा 'संगीत नाटक अकादमी' पुरस्काराने सन्मानित झाले. त्यांचे पुण्यात निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

## मिस्त्री आबान एचरशाह

☛ *आबान मिस्त्री*

## मिश्रा, बैजनाथ कालिकाप्रसाद

☛ *लच्छू महाराज*

## मुजुमदार, गंगाधर नारायण

***मुजुमदार, आबासाहेब***

**संगीत रसिक व संग्राहक**

**१ फेब्रुवारी १८८६ – १६ सप्टेंबर १९७३**

संगीताचे जाणकार रसिक म्हणून महाराष्ट्राच्या सांगीतिक जीवनात भर घालणारे सरदार आबासाहेब तथा गंगाधर नारायण मुजुमदार हे एक अष्टपैलू व्यक्तिमत्त्व होते. मुजुमदार घराणे हे शहाजीराजे भोसल्यांच्या काळापासून पुणे-सुपे प्रांतातील जहागीरदार होते. गंगाधर मुजुमदारांचा जन्म भावनगर येथे झाला व त्यांचे वडील पांडुरंग नारायण प्रभुणे हे भावनगर संस्थानात मुलकी अधिकारी होते. वयाच्या सहाव्या वर्षी गंगाधरला प्रभुण्यांकडून नारायण मुजुमदारांच्या घराण्यात दत्तक दिले



गेले. ते १९०४ साली मॅट्रिक झाल्यावर काही काळ डेक्कन महाविद्यालयामध्येही शिकले, मात्र पुढे घराण्यातील जबाबदारीमुळे त्यांनी महाविद्यालय सोडले.

त्यांचे एक मामा काशिनाथपंत पोहरे हे गायक व बीनकार होते, तर दुसरे मामा बळवंतराव पोहरे हे कोल्हापूरला दरबार गायक होते. त्यांचे दत्तक घरातील मामा सरदार चंद्रचूड हेही शौक म्हणून सतार व गायन शिकलेले होते. या मामांकडून त्यांना संगीताचे बाळकडू मिळाले. सतार या वाद्याची त्यांना विशेष रुची होती व जुन्या काळातील बीनकार अण्णासाहेब घारपुरे व अन्यही सतारवादकांची सुमारे चौदा पुस्तके त्यांनी अभ्यासली, रहिमत खाँ सतारिये यांचे वादन त्यांनी जवळून पाहिले आणि ते सतार वाजवू लागले.

महाविद्यालयीन वयात त्यांनी केलेल्या संस्कृत कविता प्रसिद्ध झाल्या होत्या. संस्कृत, फारसी, इंग्रजी अशा अनेक भाषांचा व्यासंग असणारे आबासाहेब मुजुमदार एक इतिहास संशोधक म्हणूनही नावाजले होते. भारत इतिहास संशोधक मंडळात ते सक्रिय होते व त्यांचे इतिहासविषयक शोधनिबंध प्रसिद्ध झाले होते. व्यवसायाने कायदेतज्ज्ञ असलेल्या आबासाहेबांना ब्रिटिश सरकारने १९३५ साली 'सी.आय.ई.' हा किताब दिला व 'पहिल्या दर्जाचे सरदार' असा किताबही त्यांना दिला होता. महात्मा गांधी, बाबासाहेब आंबेडकरांसारख्या अनेक राजकारणी व्यक्तींशीही त्यांचे सलोख्याचे संबंध होते. मुळातील सरदार घराण्यातील श्रीमंती व उदारता त्यांच्याकडे पुरेपूर होती व या साऱ्याचा विनियोग त्यांनी संस्कृती व कलेच्या विकासासाठी आजन्म केला. त्यांनी भरीव असे संस्थात्मक कार्य पुष्कळ केले.

सार्वजनिक कार्यामुळे कायदेमंडळ, बँका, विमाकंपन्या, देवस्थाने, व्यायाममंदिरे, वैद्यकीय,

शैक्षणिक, शेतकी, साहित्यिक अशा विविध क्षेत्रांतील सुमारे १८७ संस्थांशी ते अध्यक्ष, चिटणीस, विश्वस्त, मार्गदर्शक इ. नात्यांनी संबंधित होते. त्यांच्या प्रत्यक्ष कार्याचा, सल्ल्यांचा उपयोग अनेक संस्थांना झाला. बलोपासक व उत्तम टेनिसपटू असणाऱ्या आबासाहेब मुजुमदारांनी सूर्यनमस्कार, कुस्ती व भारतीय व्यायामपद्धतीचा नेहमी गौरव केला. महाराष्ट्र व्यायाम परिषदेच्या १९२७ सालच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. पुणे भारत गायन समाज, भरत नाट्य संशोधन मंदिर, गांधर्व महाविद्यालय अशा संगीत व नाट्यविषयातील संस्थांचे ते अध्यक्ष, मार्गदर्शक पदाधिकारी म्हणून अनेक वर्षे कार्यरत होते. एस.एस.सी. बोर्ड, पुणे विद्यापीठ अशा शैक्षणिक संस्थांच्या शिक्षण मंडळांवरही ते सल्लागार होते. सोलापूरच्या संगीत संमेलनाचे ते अध्यक्ष होते. आकाशवाणीच्या चाचणी मंडळाचे ते अनेक वर्षे सभासद होते.

ब्रिटिश काळात भारतीय संगीतकलेचे स्वरूप बदलत असताना आबासाहेबांसारख्या रसिक श्रीमंतांनी अनेक कलाकारांना उदार आश्रय, आर्थिक साहाय्य व कलात्मक सहकार्य देऊन फार मोठे कार्य केले. त्यामुळे या कलेचे जतनीकरण व संवर्धन झाले. पुण्यातील कसबा पेठेतील मुजुमदारवाड्यातील मैफलींचा दर्जा काही वेगळा असे व यांत कलाकार आपले उत्तमातले उत्तम आविष्कार करत. गणेशोत्सवात, तसेच अन्यही निमित्तांनी मुजुमदारवाड्यातील गणेशमहालात कित्येक कलाकार हजेरी लावत. यांत बखलेबुवा, वझेबुवा, सवाई गंधर्व, मास्तर कृष्णराव, बालगंधर्व, विनायकबुवा पटवर्धन, मा. दीनानाथ, हिराबाई व सुरेशबाबू असे कित्येक कलाकार असत, शिवाय अल्लादिया खाँ, अब्दुल करीम खाँ, फैयाझ खाँ, विलायत हुसेन खाँ, मंजी खाँ, भेंडीबाजारवाले अमान अली खाँ, बडे गुलाम अली खाँ इ. मुसलमान गायकही अत्यंत भक्तिभावाने, श्रद्धेने गात असत. काशीकर, राशिनकर, निजामपूरकर यांसारखे विख्यात कीर्तनकार व बाई सुंदराबाई, यल्लूबाईंसारख्या मातब्बर लावणी व ठुमरी गायिकाही इथे गात.

त्या काळी अहोरात्र चालणाऱ्या मैफलींत रसिकाग्रणी आबासाहेब ताठ बसून एकाग्र चित्ताने, रसिकतेने ऐकत असत आणि त्यांची पगडी डोलू लागली की कलाकारास खरे स्फुरण मिळे व अन्य श्रोत्यांनाही प्रस्तुती दर्जेदार असल्याची खात्री पटे. उदार, रुबाबदार व भारदस्त व्यक्तित्व असणारे आबासाहेब कुठल्याच कलाकारास विन्मुख करीत नसत. शिकाऊंपासून ते तरबेज कलावंतांना ते समभावनेने ऐकत.

आबासाहेब हे एक वाद्यसंग्राहक व वाद्यवादकही होते. त्यांच्या संग्रहात पन्नासहून अधिक तंतु-सुषिर-अवनद्ध व घनवाद्ये होती, आणि रुद्रवीणा, स्वरमंडळ, स्वरशृंगार, सतार, सरोद, इसराज, सारंगी इ. तंतुवाद्ये ते स्वत: वाजवत. अनेक परदेशी अभ्यासकही त्यांच्याकडून भारतीय वाद्यांची माहिती घेत असत. प्रामुख्याने गायकीचे वर्चस्व असणाऱ्या मराठी रसिकांमध्ये वाद्यवादनाबद्दल आस्था निर्माण करण्याचे मोठे कार्य त्यांनी केले. अनेक कलाकारांची बाडे त्यांनी संग्रहित केली व सुमारे ३५,००० दुर्मीळ रचनांचा संग्रह केला, ज्यांत धृपद, ख्याल, ठुमरी, टप्पा, लावणी, भजन या प्रकारांच्या शेकडो रचना आहेत.

अनेक भाषांचा अभ्यास असणाऱ्या आबासाहेबांच्या संग्रहात संस्कृत, मराठी, हिंदी, इंग्रजी, अन्य भारतीय व युरोपीय भाषांतील संगीतविषयक दुर्मीळ ग्रंथ, हस्तलिखिते, पोथ्या, कोशग्रंथ होते व त्यांचा उपयोगही त्या काळातील अनेक संशोधक कलाकार करत असत.

त्यांनी संगीतविषयक स्फुटलेखनही केले. १९१९ साली पुणे येथे भरलेल्या पहिल्या प्राच्यविद्या परिषदेत त्यांनी ‘कालिदास आणि संगीत’ हा निबंध वाचला होता. ‘वाद्यांचा इतिहास’ ही त्यांची लेखमाला दै. ‘केसरी’मध्ये १९६२-६३ साली प्रकाशित झाली. त्यांनी लिहिलेले ‘रागांची प्राचीनता’, भिन्नषड्ज व बिलावल रागांवर टिपण, ‘श्री समर्थ रामदास आणि संगीत’, ‘दिवाळी आणि संगीत’, ‘निसर्ग आणि संगीत’, ‘संगीत आणि मराठी

वाङ्मय', 'गांधर्व महाविद्यालय व संगीतलेखन पद्धती', 'वाद्यसंगीताचे मानकरी गं.भि. आचरेकर', 'डिस्कव्हरी ऑफ ए न्यू कॉमेंटरी ऑन दी संगीत मकरंद', इ. निबंध वेळोवेळी नियतकालिकांतून प्रकाशित झाले होते. 'पठ्ठे बापूराव कृत ढोलकीच्या लावण्या', मिराशीबुवांची 'भारतीय संगीत माला' अशा ग्रंथांना त्यांनी लिहिलेल्या अभ्यासपूर्ण प्रस्तावना लाभल्या होत्या.

आबासाहेबांचा लावणीचाही उत्तम अभ्यास होता. त्यांना अनेक जुन्या लावण्या पाठ होत्याच, शिवाय लावणी-तमाशातील अनेक कलावंतांना त्यांनी मदतही केली. तत्कालीन मुंबई सरकारने तमाशावर बंदी आणली तेव्हा त्यांनी विरोध केला व तमाशा सुधारणा समितीत ते कार्यरत होते. पुण्यातील आर्यभूषण थिएटरमध्ये झालेल्या महाराष्ट्र तमाशा परिषदेच्या अधिवेशनात सत्तरीच्या वयात आबासाहेबांनी अस्सल ढंगाच्या लावणीचा टचका ऐकवून थक्क केले होते.

अभिजात नृत्याविषयी उदासीन असणाऱ्या महाराष्ट्रात रोहिणी भाटे, सौदामिनी राव इ. नर्तिकांना प्रोत्साहन देऊन नृत्याच्याही संवर्धनात त्यांनी मदत केली. ''महाराष्ट्र म्हटले की मास्तर कृष्णा, आबासाहेब मुजुमदार आणि प्रभात फिल्म कंपनी या तीनच 'संस्था' मला आठवतात,'' असे गौरवोद्गार प्रख्यात बंगाली संगीतकार आर.सी. बोराल यांनी काढले होते.

प्रदीर्घ, आरोग्यपूर्ण आयुष्य लाभलेल्या आबासाहेबांचा वयाच्या सत्त्याऐंशीव्या वर्षी पुण्यात मृत्यू झाला. त्यांचे नातू प्रतापराव व नातसून अनुपमा मुजुमदार यांनी मुजुमदारवाड्यात संग्रहालय करून अभ्यासकांना ते उपलब्ध केले आहे, तसेच 'स्वरसंगत सरदार' हा चरित्रात्मक लेखसंग्रहही प्रसिद्ध केला आहे. त्यांच्या वाड्यावर पुणे ऐतिहासिक वास्तू समितीने मानाचा नीलफलक लावला असून त्यांच्या नावाने पुणे भारत गायन समाजातर्फे पुरस्कारही दिला जातो.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

*१. मुजुमदार, अनुपमा; 'स्वरसंगत सरदार'; पुणे; २००१.*

म

## मुटाटकर, सुमती विश्वनाथ
**गायिका**

**१० सप्टेंबर १९१६ – २८ फेब्रुवारी २००७**



सुमती विश्वनाथ मुटाटकर यांचा जन्म अनंत चतुर्दशीच्या दिवशी बालाघाट येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव गंगाधर अंबर्डेकर व आईचे नाव अन्नपूर्णाबाई होते. वडील न्यायाधीश असल्याने त्यांच्या वारंवार बदल्या होत असत. ते संगीताचे दर्दी होते. त्यांनी नामवंत कलाकारांच्या बैठकी व मैफली स्वत:च्या घरी घडवून आणल्या. अंबर्डेकर घराणे मूळचे दमोह जिल्ह्यातील हंटा गावचे आणि मुटाटकर घराणे सागरचे. सुमतीताईंचे सासरचे नाव नलिनी असले तरी माहेरच्या नावानेच त्या ख्यातनाम झाल्या.

शालेय शिक्षणात त्यांची कुशाग्रबुद्धीची चमक दिसू लागली. त्यांना मैदानी खेळ, चित्रकला, वाचन, लेखन व संगीताची आवड होती. वडिलांच्या बदलीमुळे शिक्षणात खंड नको म्हणून त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण अमरावतीला विद्यार्थिगृहात पार पडले. त्या १९३३ साली प्रथम श्रेणीत मॅट्रिक झाल्या. त्यांचा १९३४ साली इंटरला असताना विश्वनाथ मुटाटकरांशी विवाह झाला. त्या १९३७ साली मॉरिस महाविद्यालयातून बी.ए. झाल्या. एम.ए.ची परीक्षा देणे राहून गेले; परंतु कायद्याच्या अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाला त्या पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाल्या.

त्या १९३९ ते १९४२ पर्यंत सावळाराम मास्तरांकडे संगीत शिकल्या. नंतर लखनौहून पद्मभूषण डॉ. एस.एन. रातंजनकरांकडून त्यांनी अभिजात संगीताचे रीतसर शिक्षण घेतले. शिवाय ग्वाल्हेरच्या पं. राजाभैया पूछवाले यांच्याकडे ख्याल आणि टप्पा, धृपद, धमार, अष्टपदीचा सविस्तर अभ्यास केला. उस्ताद विलायत हुसेन खाँ साहेबांकडून त्या आग्रा घराण्याची ख्याल गायकी शिकल्या. त्यांनी रसूलनबाईंकडून ठुमरीची शैली

आत्मसात केली. पं. अनंत मनोहर जोशी, गजानन जोशी, उस्ताद मुश्ताक हुसेन खाँ यांच्याकडून त्या अवघड व दुर्मीळ चिजा, तसेच गोविंदराव बऱ्हाणपूरकरांकडे पखवाजाची लयकारी शिकल्या. चिकाटी व ज्ञानलालसेपायी जिथून मिळेल, तिथून ज्ञानार्जन करून सुमतीबाईंनी स्वत:ला समृद्ध बनविण्याचा ध्यास घेतला.

सातत्याने श्रम करून त्यांनी ‘संगीत निपुण’, ‘संगीताचार्य’ आणि लखनौ संगीत विद्यापीठातून ‘हिंदुस्थानी संगीताचे सांस्कृतिक आयाम’या विषयात डॉक्टरेट संपादन केली. त्यांनी विदर्भातून पहिल्या संगीताच्या डॉक्टर असा बहुमान मिळवला. आकाशवाणीच्या निरनिराळ्या केंद्रांवरून त्यांचे कार्यक्रम होत असत. बहुविध गीतशैलीवर त्यांचे प्रभुत्व असून पखवाज वाद्याच्या संगतीत धृपद-धमार गायनशैली हमखास पेश करणाऱ्या त्या एकमेव महिला होत्या.

संगीत क्षेत्रात संशोधन व विपुल लेखन करणाऱ्या डॉ. सुमती दिल्ली, राजस्थान व नागपूर विद्यापीठाच्या पीएच.डी.च्या परीक्षक होत्या. त्यांनी १९७२ मध्ये भारताच्या सांस्कृतिक विभागातर्फे नेपाळला भेट दिली. अनेक मासिके, आकाशवाणी, पत्रिकांतून त्यांचे कितीतरी विषयांवर लिखाण प्रकाशित झाले. आकाशवाणी, संगीत नाटक अकादमी, विद्यापीठे आदींमध्ये चर्चात्मक समालोचने व बहुविध संगीत कार्यक्रमांचे त्या आयोजन करत. त्यांनी अनेक उच्चपदे भूषविली. उदा. कार्यक्रम निर्माती, आकाशवाणी (१९५३-६७), प्राध्यापिका, दिल्ली विद्यापीठ (१९६८-८१) इ. इंग्रजी व संस्कृत भाषेवर त्यांचे प्रभुत्व असून त्यांनी बंगाली, गुजराती भाषांचाही अभ्यास केला होता. सुमतीबाईंचे यजमान विश्वनाथ मुटाटकर हे गणितज्ञ व नागपूरच्या सिटी महाविद्यालयामध्ये गणित विभाग प्रमुख होते.

सुमतीबाईंनी रचलेल्या बंदिशींचे ‘गीतनिर्झरी’ हे पुस्तक प्रसिद्ध झाले. तसेच ‘आस्पेक्ट्स ऑफ म्यूझिक’, ‘सुजान’, ‘सुमति-संगीताभरणम्’ ही पुस्तकेही प्रकाशित झाली आहेत. ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार (१९७९), ‘पद्मश्री’ (१९९१), ‘संगीत रिसर्च अकादमी’ सन्मान (१९९२), ‘कालिदास’ सन्मान (२००१), इत्यादींनी त्यांना गौरविण्यात आले होते. कोलकाता येथे एक्याण्णवाव्या वर्षी त्यांचे निधन झाले.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. मंगरूळकर, नारायण; ‘वैदर्भीय संगीतोपासक’-१, १९७४, नागपूर.*

## मुनीर खाँ ललियानावाले

**तबलावादक**

**१८६३ — १८ नोव्हेंबर १९३७**

उस्ताद मुनीर खाँ यांचा जन्म मेरठ जिल्ह्यातील ललियाना या खेड्यात झाला. त्यांनी तबल्याचे प्राथमिक धडे त्यांचे वडील सुप्रसिद्ध तबलावादक उस्ताद काले खाँ, यांच्याकडून घेतले. वयाच्या पंधराव्या वर्षी त्यांनी फरूखाबाद घराण्याचे संस्थापक उस्ताद हाजी विलायत अली खाँ यांचे सुपुत्र, उस्ताद हुसेन अली खाँ यांचा गंडा बांधला. त्यांच्याकडे पंधरा वर्षे तालीम घेतल्यानंतर त्यांनी दिल्ली घराण्याचे उस्ताद खलिफा बोली बक्श यांचे शिष्यत्व पत्करले.

बोली बक्श हे दिल्ली घराण्याचे उस्ताद काले खाँ यांचे पुत्र. बोली बक्श यांचे पुत्र उस्ताद नथ्थू खाँ व मुनीर खाँ हे गुरुबंधू. पुढे मुनीर खाँ यांनी हाजी विलायत अलींचे ज्येष्ठ पुत्र खलिफा उस्ताद निसार अली खाँ यांचेही शिष्यत्व पत्करले. त्यांनी उस्ताद नजर अली खाँ, लखनौ घराण्याचे बडे मुन्ने खाँ, ताज नासर खाँ पखवाजी इत्यादी चोवीस उस्तादांकडून विद्या घेतली असे म्हटले जाते.

त्या काळचे प्रसिद्ध गायक उस्ताद मौला बक्श, घसीट खाँ, नथ्थन खाँ, फैय्याझ खाँ, तसेच अनेक तंतुवाद्यकारांना त्यांनी तबल्याची साथ केली.

त्यांच्या अतुलनीय ज्ञानभांडारामुळे ते ‘कोठीवाले’ तबलिये या नावाने प्रसिद्ध होते. स्वत: एक प्रतिभावंत रचनाकार असल्यामुळे त्यांनी महत्प्रयासाने मिळविलेल्या अगणित बंदिशींमध्ये खूप भर पडली. त्यांनी विविध

लयकारींचे उपज अंगाचे मुखडे, मिश्र जातीतील कायदे, अनेक गती व गततुकडे, फर्माइशी व कमाली चक्रदार वगैरे रचना केल्या. ते उत्तम शिक्षक होते. त्यांच्या अभिजात बंदिशींच्या ज्ञानभांडारामुळे आकर्षित होऊन अनेकांनी त्यांचे शिष्यत्व पत्करले. त्यांनीही शिष्यांना मुक्तहस्ताने विद्या दिली.

त्यांचे अनेक शिष्य नाणावलेले तबलावादक व रचनाकार म्हणून प्रसिद्धी पावले. मुनीर खाँ यांनी तयार केलेल्या प्रथितयश तबलावादकांची नावे अशी आहेतः त्यांचे भाचे खलिफा अमीर हुसेन खाँ, पुतणे खलिफा गुलाम हुसेन खाँ, अहमदजान थिरकवा, हबीबुद्दिन खाँ, नझीर खाँ पानिपतवाले, अल्लाह मेहेर, सादक हुसेन खाँ, मुश्ताक हुसेन खाँ, अब्दुल रहीम मियाँ, शमसुद्दिन खाँ, बाबालाल इस्लामपूरकर, विलायत हुसेन खाँ, राजा चक्रधर सिंग (रायगड), निसार हुसेन खाँ, हसन खाँ, डॉ. फैज जंग बहादूर (हैदराबाद), अयूब मियाँ, औलाद हुसेन (खैरागड), अब्दुल रहीम (बुऱ्हाणपूर), विष्णूजी शिरोडकर, माशेलकर, सुब्रावमामा अंकोलेकर वगैरे.

निरनिराळ्या घराण्यांच्या सौंदर्यपूर्ण वादनवैशिष्ट्यांचा अंतर्भाव करून त्यांनी आपला तबला प्रगल्भ बनवला. त्यामुळे त्यांच्यापासून एका नव्या घराण्याची मुहूर्तमेढ रोवली गेली. त्यांनी आयुष्याचा बराच काळ मुंबईत व्यतीत केला. त्यामुळे फरूखाबाद घराण्याच्या या शाखेला ‘बम्बई घराना’ असेही संबोधले जाते.

उस्ताद मुनीर खाँ यांचे शिष्य उस्ताद अमीर हुसेन खाँ यांच्या विनंतीवरून त्यांचे शिष्य निखिलज्योती घोष, पंढरीनाथ नागेशकर, आत्माराम थत्ते यांनी १९५३ साली ‘उस्ताद मुनीर खाँ अकॅडमी ऑफ तबला आर्ट’ ही संस्था स्थापन केली. पुढे १९५६ पर्यंत मुनीर खाँ यांच्या ‘बरसी’चा ‘उरूसवजा’ समारोह दरवर्षी नेमाने लक्ष्मीबाग, गिरगाव येथे होत असे. ही जबाबदारी १९५६ पासून अमीर हुसेन खाँचे शिष्य अरविंद मुळगावकर यांनी सांभाळली.

— अरविंद मुळगावकर

## मुळगावकर, अरविंद विष्णू

**तबलावादक**

**१८ नोव्हेंबर १९३७**



अरविंद विष्णू मुळगावकरांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांना लहानपणापासून तालवाद्यांबद्दल आकर्षण होते. उ. अल्लारखासाहेबांचा तबला ऐकून तबल्याबद्दल त्यांना जास्त आकर्षण वाटू लागले. देशपांडेबुवा यांच्याकडे १९५३ च्या सुमारास त्यांच्या तबलावादनाचा श्रीगणेशा झाला. त्यानंतर उस्ताद बाबालाल इस्लामपूरकरांकडे त्यांचे तबल्यातील शिक्षण सुरू झाले. उस्ताद अमीर हुसेन खाँसाहेब यांच्याकडे त्यांना सोळा वर्षे तालीम मिळाली.

या दीर्घ कालावधीत त्यांच्या गुरूंकडून त्यांना बनारसचा अपवाद वगळता इतर सर्व घराण्यांची शास्त्रशुद्ध तालीम मिळाली. खाँसाहेब शास्त्रावर प्रभुत्व असणाऱ्या काही दुर्मीळ व्यक्तींपैकी एक होते. त्यामुळे अरविंद मुळगावकरांना विविध घराणी, त्यांचे योग्य निकास, तबल्यातील विविध संकल्पना, नादसौंदर्य, रचनासौंदर्य इ. अनेक गोष्टी खाँसाहेबांकडून मिळाल्या.

खाँसाहेबांनी आपल्या रचनांसोबत विविध घराण्यांच्या ज्येष्ठ रचनाकारांच्या हजारो रचना मुळगावकरांना दिल्या. त्याबरोबरच त्यांना उस्ताद अहमदजान थिरकवा, उस्ताद अता हुसेन खाँ यांसारख्या दिग्गजांची तालीम व पं. भोला श्रेष्ठ, पं. सामताप्रसाद यांच्याकडून बनारस घराण्यासंदर्भातही मार्गदर्शन मिळाले. तबल्याबाबत सर्वांगीण चिंतन व खडतर परिश्रम यांमुळे अरविंदजी मुळगावकर भारतातील एक अतिशय अधिकारी व्यक्ती म्हणून संगीत जगताला सुपरिचित आहेत.

पारंपरिक रचनांचा चिकित्सकपणे अभ्यास करून त्या योग्य निकासांसह सादर करणे, दायां-बायांचे वजन,

म

बोलांची स्पष्टता ही त्यांच्या वादनाची वैशिष्ट्ये सांगता येतील. विविध रचनांचे व्याकरण समजावून घेऊन केलेली सौंदर्यपूर्ण पढंत हे विशेष होय.

ते विद्यादानाचे कार्य गेली ४५ वर्षे अव्याहतपणे करीत आहेत. लेखक म्हणूनही मुळगावकरांनी भरीव कार्य केले आहे. त्यांच्या 'तबला' या ग्रंथाने संगीतविषयक साहित्यात मोलाची भर टाकली आहे. 'आठवणींचा डोह' हा त्यांनी लिहिलेला आणखी एक ग्रंथ. एका शिष्याच्या नजरेतून साकारलेला गुरूच्या जीवनाचा अतिशय परिणामकारक आलेख या ग्रंथामध्ये दिसून येतो. मुळगावकर रचनाकार म्हणूनही अतिशय श्रेष्ठ आहेत. त्यांच्या 'गुस्ताखी मुआँफ' व 'इजाजत' या दोन ग्रंथांमधून त्यांच्यातील प्रतिभावंत रचनाकाराचे दर्शन होते.

अमीर हुसेन खाँसाहेबांच्या जन्मशताब्दीला त्यांनी आपल्या २५ शिष्यांकडून खाँसाहेबांच्या १०५ बंदिशी बसवून घेतल्या व असे २५ जणांच्या सहवादनाचे कार्यक्रम कोल्हापूर, मुंबई व कऱ्हाड येथे सादर केले.

तबल्याच्या प्रचार व प्रसारासाठी त्यांनी 'बंदिश' नावाची संस्था स्थापन केली असून दरवर्षी त्या संस्थेतर्फे मोठमोठ्या कलाकारांचे कार्यक्रम, तसेच राज्यपातळीवरील तबलावादनाच्या स्पर्धेचे आयोजन केले जाते. महाराष्ट्रातील तबलाप्रेमींना तबल्याचे शास्त्र समजवण्यामध्ये त्यांनी संपूर्ण महाराष्ट्रभर सादर केलेल्या सप्रयोग व्याख्यानांचा खूप मोठा वाटा आहे. संवाद फाउण्डेशनतर्फे होणाऱ्या दृक् - श्राव्य ध्वनिमुद्रणांसाठी तज्ज्ञ वक्ता म्हणून त्यांनी काम पाहिले आहे. संपूर्ण भारत, तसेच अमेरिका, स्वित्झर्लंड, मॉरिशस येथेही त्यांचे स्वतंत्र वादन व सप्रयोग व्याख्याने झाली आहेत.

त्यांना महाराष्ट्र शासनाचा 'वाद्यसंगीत' पुरस्कार, भारत सरकारची सीनियर फेलोशिप, 'स्वरसाधना रत्न', आय.टी.सी. तसेच अय्यर प्रतिष्ठानातर्फे 'जीवनगौरव' पुरस्कार, 'वसुंधरा पंडित स्मृती' पुरस्कार इ. अनेक पुरस्कारांनी सन्मानित केले आहे. ओंकार गुलवाडी, विवेक जोशी, कृष्णा घोटकर, सूर्याक्ष देशपांडे, सतीश तारे, आमोद दंडगे, बाळकृष्ण अय्यर, प्रसाद पाध्ये, इ. त्यांच्या शिष्यवर्गापैकी काही महत्त्वाची नावे होत.

— आमोद दंडगे

## मुळे, कृष्णराव गणेश

**संगीतशास्त्रकार**

**२३ डिसेंबर १८६४ – २१ जुलै १९४४**



कृष्णराव गणेश मुळे हे आधुनिक काळातील एक महत्त्वाचे भारतीय संगीतशास्त्रकार होते व त्यांचे योगदान तत्कालीन व नंतरच्याही अनेक शास्त्रकारांनी आदरणीय मानले आहे. कृष्णराव गणेश मुळे यांचा जन्म एका निम्नमध्यमवर्गीय कुटुंबात झाला व त्यांचे शालेय शिक्षण पुण्यात झाले. पुण्यातील गायन समाजाचे संस्थापक सदस्य, बीनकार, सतारवादक शास्त्रकार असणाऱ्या पुरुषोत्तम गणेश तथा अण्णा घारपुरे (१८४२-१९२०) यांनी मुळे यांना दहा वर्षे बीन व सतारीची तालीम दिली. नंतर ते ग्वाल्हेरला गेले व तेथे गणपतराव कृष्णराव आपटे (उस्ताद हद्दू खाँचे शिष्य असणाऱ्या बाबा दीक्षित यांचे शिष्य) यांच्याकडे मुळ्यांनी बारा वर्षे ग्वाल्हेर घराण्यातील धृपद व ख्यालगायन, तबलावादनाची तालीम घेतली.

पुढे पुण्यात विख्यात बीनकार बंदे अली खाँ व त्यांची पत्नी चुन्ना यांचा दोन वर्षे सांगीतिक सहवास लाभल्याने कृष्णराव मुळे बीन हे वाद्यही उत्तम वाजवू लागले. या प्रदीर्घ सांगीतिक व्यासंगाने त्यांचे व्यक्तित्व समृद्ध झाले. गायनात बंदिशीच्या अर्थाच्या अंगाने उपज, तसेच बीनवर सुरेल मुलायम आलापचारी ही त्यांची वैशिष्ट्ये होती. उपजीविकेसाठी मुळे मुंबईत स्थिरावले. शेठ गोकूळदास या संगीतप्रेमी रसिकाने आपल्या माधवजी धरमसी मिलमध्ये त्यांना नोकरी दिली. तसेच त्यांनी दादर येथे 'वीणावादन संगीत विद्यालया'द्वारे संगीताचा प्रसार

म

केला. शरच्चंद्र आरोलकर, ब्रह्मे, जोगळेकर, तसेच चित्रकार अंबिका धुरंधर हे त्यांचे काही शिष्य होते.

कृष्णराव मुळे वाद्यांची बनावट व दुरुस्तीही उत्तम करीत. ‘पेटीतंबोरा’ हे सूरसोट्यापेक्षा अधिक गुंजनयुक्त आधारस्वर देणारे, चौकोनी आकाराचे, चलसुलभ वाद्य त्यांनी बनवले होते. (१९८० च्या दशकानंतर या तऱ्हेचे तंबोरे बनवले व वापरलेही गेले, मात्र मुळ्यांच्या काळात ही कल्पना नवी होती.)

ते व्यावसायिक कलावंत नव्हते व त्यांनी संगीतावर उपजीविका केली नाही, तरीही त्यांचा संगीतातील अधिकार तत्कालीन अनेक कलाकार मानत असत. गायकीची उत्तम जाण असणारे शास्त्रकार म्हणून त्यांचा लौकिक होता. रावसाहेब देवल, लक्ष्मणशास्त्री द्रविड, धुंडिराजशास्त्री बापट, गं.भि. आचरेकर, आबासाहेब मुजुमदार, इ. अशा समकालीन शास्त्रकारांशी मुळ्यांचे वैचारिक आदानप्रदान चाले.

मुळे यांचे ‘सतारशिक्षण - पुस्तक पहिले’ हे सतारवादनाची सांगोपांग माहिती देणारे पुस्तक १९२७ साली प्रसिद्ध झाले. प्रसिद्ध गीतकार स.अ. शुक्ल यांच्या ‘संगीतिका’ (१९३७) या पदसंग्रहासाठी त्यांची लोकप्रिय पदे मुळ्यांनी संगीतलिपिबद्ध केली होती. ‘स्त्री-गीते’ या पुस्तकात त्यांनी महाराष्ट्रातील स्त्रियांच्या ओठी खेळणाऱ्या, प्रचलित असणाऱ्या पारंपरिक गीतांचे स्वरलेखन प्रसिद्ध करून एका प्रकारे ‘संस्कृतिसंगीतशास्त्रा’च्या संदर्भात मौलिक कार्य केले.

भरतमुनीकृत नाट्यशास्त्रासारख्या प्राचीन व मध्ययुगीन संस्कृत शास्त्रग्रंथांचा त्यांनी अभ्यास केला होता आणि सामवेदकालीन संगीतापासून आधुनिक काळापर्यंत संगीतात झालेल्या स्थित्यंतराबाबत त्यांनी बरेच संशोधन व चिंतन केले होते. त्यांनी ‘भारतीय संगीत भाग १’ (१९३९) या आपल्या ग्रंथात ‘प्राचीन भारतीय संगीतातील मूलतत्त्वे व त्यांचे आजच्या संगीतप्रणालीतही दिसणारे औचित्य’ हा विषय साक्षेपाने मांडला होता. भारतीय संगीतातील प्राचीन संकल्पना आजवर कशा टिकून आहेत व आज अस्तित्वात असणारे संगीत जरी बाह्यरूपाने बदलले असले, तरी त्याचा गाभा अजूनही कसा टिकून आहे याचे उत्तम विश्लेषण त्यांनी केले होते.

भारतीय संगीताच्या राग-ताल-काव्य या मूलतत्त्वांच्या त्रयीचा मूलगामी असा एकत्रित विचार त्यांनी या ग्रंथात मांडला होता व या सिद्धान्ताचाच क्रियात्मक पाठपुरावा पुढे शरच्चंद्र आरोलकरांनी केलेला दिसतो. या ग्रंथाचे पुढचे दोन भागही ते प्रसिद्ध करणार होते, मात्र त्यांचा मृत्यू झाल्यामुळे हे कार्य अपुरे राहिले.

शेठ गोकूळदास व त्यांचे पुत्र मथुरादास, पुरुषोत्तमदास यांच्या आर्थिक साहाय्यानंतर वृद्धापकाळात रावबहादूर धुरंधर, डॉ. मोघे या चाहत्या मित्रांनी मुळ्यांना मदत केली. अखेरीस बिलीमोरा येथे उद्योगपती सरदेसाई यांच्याकडे ते आश्रयास राहिले व तेथेच ते मृत्यू पावले. अमेरिकेतील ‘एन्सायक्लोपीडिया ऑफ ग्रेट पीपल ऑफ दी वर्ल्ड’मध्ये त्यांचे संगीतशास्त्रविषयक कार्य व संक्षिप्त चरित्र प्रकाशित झाल्याने पाश्चात्त्य जगतातही त्यांना प्रसिद्धी मिळाली.

— चैतन्य कुंटे

## मुर्डेश्वर, देवेंद्र

**बासरीवादक**

**१९ सप्टेंबर १९२३ — २९ जानेवारी २०००**



देवेंद्र मुर्डेश्वर यांचा जन्म कर्नाटकातील कारवार जिल्ह्यातील मासूर या गावात झाला. शिक्षण पूर्ण केल्यानंतर त्यांनी मुंबई ही कर्मभूमी म्हणून निवडली आणि १९४३ मध्ये उपजीविकेसाठी ते मुंबईत स्थायिक झाले.

लहानपणापासून मुर्डेश्वर यांना संगीतात रुची होती. प्रथम त्यांनी श्रेष्ठ तबलावादक उ. अमीर हुसेन खाँ यांच्याकडे तबलावादनाचे धडे घ्यावयास सुरुवात केली. त्यांनी १९४५ पर्यंत तबल्यावर रियाझ करून त्यावर

म

प्रभुत्व मिळविले. उ. अमीर हुसेन खाँ पं. पन्नालाल घोषांच्या साथीसाठी जात असत. पं. पन्नालाल घोषांचे आकाशवाणीवरील धीरगंभीर वादन ऐकून मुर्डेश्वर यांना बासरी शिकण्याची अनिवार ओढ लागली. त्यांनी गुरू अमीर हुसेन खाँ यांना आपली ही इच्छा पन्नाबाबूंकडे व्यक्त करण्याची विनंती केली. त्याप्रमाणे १९४५ सालापासून पं. घोषांकडे बासरीचे अध्ययन सुरू झाले.

गुरुकुल पद्धतीच्या या शिक्षणातून पं. पन्नालाल घोषांच्या बासरीवादन तंत्राचे आणि रागाविष्काराचे सर्व बारकावे आणि खासियती त्यांनी आत्मसात केल्या आणि बासरी तयार करण्यापासून ते घोषशैलीमध्ये वाजविण्यापर्यंतचे पूर्ण प्रावीण्य मिळविले. पुढे मुंबई आणि दिल्ली आकाशवाणीवर निर्माता म्हणून ते शेवटपर्यंत कार्यरत होते. ते आकाशवाणीचे 'अ' दर्जा प्राप्त कलाकार होते. गुरू पं. पन्नालाल घोष यांना संगीताच्या अखिल भारतीय कार्यक्रमांत मुर्डेश्वर नेहमी बासरीची साथ करीत. त्यांचे स्वत:चेसुद्धा संगीताचे अनेक अखिल भारतीय कार्यक्रम झाले, तसेच विदेशांत अमेरिका, कॅनडा, युरोपमध्ये त्यांच्या अनेक मैफली गाजल्या.

एच.एम.व्ही. कंपनीने मुर्डेश्वरांच्या अनेक ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध केल्या. त्यांच्या केदार, झिंजोटी, पूरिया कल्याण, पिलू रागातील गती विशेष गाजल्या. आलापप्रधान, सौंदर्यपूर्ण स्वरलतांची गुंफण, गमकयुक्त दमसांसाचे वेणुवादन, लयबद्ध तंतकारी असे त्यांच्या वादनशैलीचे वर्णन करता येईल.

पं. पन्नालाल घोष यांचे मुर्डेश्वर पट्टशिष्य व जावई होते. पन्नाबाबूंची कन्या शांतिसुधा ही त्यांची पत्नी होय. त्यांचा मुलगा आनंद हासुद्धा उत्तम बासरीवादक होता. अवघे ४० वर्षे आयुष्य लाभलेल्या आनंदनेही बासरीचे देशविदेशांत अनेक कार्यक्रम केले.

पन्नाबाबूंच्या निधनानंतर मुर्डेश्वरांना मैहर घराण्याचे उ. अल्लाउद्दीन खाँ यांचे मार्गदर्शन लाभले. शास्त्रीय संगीतातील अनेक पारंपरिक चिजा त्यांना मुखोद्गत होत्या. त्यामुळे त्यांचे बासरीवादन घरंदाज आणि समृद्ध होते. त्यांना संगीत नाटक अकादमी, दिल्लीचा 'जीवन गौरव' पुरस्कार मिळाला होता. संगीतातील प्रावीण्याबरोबर चित्रकलेतसुद्धा त्यांना उत्तम गती होती.

बासरीचा प्रसार आणि प्रबोधन यांसाठी त्यांनी पं. पन्नालाल घोष बासरी विद्यापीठ स्थापून गुरुकुल पद्धतीने शिक्षण दिले. रागविस्तार, स्वरलिपी, ध्वनिमुद्रित वादनाद्वारे शिक्षणापेक्षा विद्यार्थ्याने गुरूच्या वादनाचा मागोवा घेत स्वत:च्या प्रतिभेने मांडणी करण्यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यांच्या अनेक शिष्यांपैकी केशव गिंडे, नित्यानंद हळदीपूर, आनंद मुर्डेश्वर, लायन लाइफर (अमेरिका) हे प्रमुख आहेत.

— केशव गिंडे

## मूर्ते, नीळकंठ लक्ष्मण

**तबलावादक**

**९ ऑक्टोबर १९१० – मृ. दि. अनुपलब्ध**



नीळकंठ लक्ष्मण मूर्ते यांचा जन्म भंडाऱ्यानजीक अंभोरा येथे गरीब कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव काशीबाई होते. वयाच्या दहाव्या वर्षीच आई व वडिलांचे पाठोपाठ निधन झाले. दरम्यान मोठे बंधू चिंतामण यांना नागपूरच्या जमनादास पोद्दारेश्वर राममंदिरात जेवणाखाण्यासह पुजाऱ्याची नोकरी लागली.

नीळकंठ मूर्ते यांचे चौथीपर्यंतचे शिक्षण फडणीस प्राथमिक शाळेत झाले. राममंदिरात रोज नागोराव बोबडे गायन करीत. त्यांनी मूर्ते यांना प्रसिद्ध तबलावादक बळीराम पंडे यांच्या स्वाधीन केले. गुणग्राहक, सालस व मेहनती मूर्त्यांनी लवकरच चमक दाखवली. शिक्षण चालू असताना पोद्दारांनी त्यांना उदारपणे आश्रय दिला. त्यांनी १९२७ ते १९३२ या काळात तबला शिक्षण, शिवणकाम व राममंदिरात सेवा बजावली. नंतर अंधविद्यालयात तबलावादकाची अर्धवेळ नोकरी करून अंधांना तबलावादनाचे धडे दिले आणि बरेच विद्यार्थी

तयार केले. त्यांचा १९३२ मध्येच विवाह काटी गावचे तुकारामजी हेजीब यांच्या कन्या इंदिराबाईंशी झाला.

नीळकंठ मूर्ते यांनी डॉ. सुमती मुटाटकरांना तबलासंगत केली. सावळाराम मास्तरांबरोबर ते बाहेरगावी तबलासाथीला जात असत. मुंबईला एच.एम.व्ही.ने १९३५ मध्ये सावळाराम मास्तरांच्या बासरीवादनाच्या ध्वनिमुद्रिका केल्या, त्या वेळी तबला-संगत मूर्त्यांचीच होती. मास्टर मनोहर बर्वे यांच्याबरोबरही त्यांनी तबलासंगत केली. त्यांनी १९४३ ते १९४६ व १९४० ते १९५० पर्यंत क्रमशः हिस्लॉप महाविद्यालयामध्ये व भिडे कन्याशाळेत तबलावादकाचे काम केले. त्यांना १९५० मध्ये एल.ए.डी. महाविद्यालयात तबला-अध्यापकाची नोकरी मिळाली.

वादनाचार्य बळीराम पंडे यांनी स्थापन केलेली संस्था ‘बलवंत वादन कला भुवन’ बंद पडण्याची स्थिती उत्पन्न होताच नीळकंठ मूर्ते यांनी १९५३ मध्ये त्याचे नामांतर ‘बलवंत वादनालय’ करून आपल्या घरीच आपल्या गुरूची संस्था चालू ठेवली. गीतामंदिर व मारुतीमंदिर यांच्यामध्ये तालमंदिर उभारून मूर्त्यांनी विद्यादानाचे कार्य केले.

गुरूकडून संपादन केलेल्या पानसे घराण्याच्या शुद्ध, घरंदाज वादनशैलीचे शिक्षण मूर्ते यांनी आपल्या विद्यार्थ्यांना प्रेमाने, निरलसपणे देऊन विशाल शिष्यवर्ग निर्माण केला. त्यात बॅरिस्टर दामोदर वाडेगावकर (मुंबई), गोविंद देशमुख (खैरागड), रामदास शेंडे (उज्जैन), मुरलीधर दीक्षित, नामदेव बुराडे, चंद्रशेखर आष्टीकर, मुकुंद कुलकर्णी, दिलीप मूर्ते व इतर अनेकांचा समावेश होतो. त्यांनी विख्यात कलाकारांची तबलासंगत करून अनेक बैठकी गाजविल्या. गुरुकृपा संगीत मंडळातर्फे २५ जुलै १९७१ रोजी बाबूराव दंडे यांच्या अध्यक्षतेखाली नीळकंठ मूर्ते यांचा एकसष्टीनिमित्त हृद्य सत्कार केला गेला.

— वि.ग. जोशी

**संदर्भ** :

*मंगरूळकर, नारायण; ‘वैदर्भीय संगीतोपासक’; मार्च १९७४.*

म

## मोहम्मद हुसेन खाँ

**सारंगीवादक, गायक**

**१९०५ – १७ सप्टेंबर १९८८**



सारंगीच्या सुरांचा सात पिढ्यांचा जन्मजात वारसा लाभलेल्या आणि हरियाणाच्या झज्जर घराण्याची परंपरा असलेल्या उ. मोहम्मद हुसेन खाँ यांचा जन्म झज्जर या गावी झाला.

मोहम्मद हुसेन खाँना सारंगीवादनाचे बाळकडू त्यांचे वडील उ. मुल्लाजी कादरबक्ष यांच्याकडून मिळत गेले, तर गायनाचे शिक्षण त्यांना गुडियानीवाले उ. बशीर खाँ व भेंडीबाजार घराण्याचे उस्ताद अमान अली खाँसाहेब यांच्याकडून प्राप्त झाले. याचबरोबर विचित्रवीणेचे शिक्षण त्यांनी उ. जीरू खाँ व इंदूरचे उ. आबिद हुसेन खाँ यांच्याकडून घेतले.

मोहम्मद हुसेन खाँनी सुरुवातीच्या काळात स्वरांची साधना करीत सोहराब मोदी यांच्या ‘आर्यसुबोध’ या नाटक कंपनीत वादनाचे काम केले. तसेच हिराबाई बडोदेकर यांच्या नाटक कंपनीत ते नोकरी करत. तेथे ध्वनिमुद्रण आणि नाटकांना साथसंगत करत असत. बालगंधर्वांबरोबर ते वडिलांसमवेत आणि त्यांच्या पश्चातही सारंगीची साथ करीत असत. नंतर भालजी पेंढारकरांची अरुण सिनेटोन कंपनी, आणि पुण्यातील शालीमार फिल्म कंपनी, नवयुग फिल्म कंपनीत त्यांनी सारंगीवादनाचे काम केले.

पुणे, मुंबई, सोलापूर, कोल्हापूर इ. ठिकाणी मोहम्मद हुसेन खाँ सारंगीच्या साथीला जात. त्यात प्रामुख्याने पं. बसवराज राजगुरू, गंगूबाई हनगल, सरस्वतीबाई राणे, आजमबाई, छोटा गंधर्व, मा. कृष्णराव फुलंब्रीकर, विनायकराव पटवर्धन, उ. मुश्ताक हुसेन खाँ, उ. नासीर हुसेन खाँ, उस्ताद विलायत हुसेन खाँ या दिग्गजांना त्यांनी सारंगीवर साथ दिली.

मोहम्मद हुसेन खाँनी १९४० साली भालजी पेंढारकर यांच्या हस्ते स्थापन केलेल्या पुण्यातील ‘अरुण म्यूझिक क्लास’ या संस्थेमध्ये संगीत विद्यादानाचे कार्य सुरू केले. त्यांचे १९५५ पर्यंत मुंबई आकाशवाणीवर एक दिवस सारंगीवादनाचे, तर दुसऱ्या दिवशी गाण्याचे कार्यक्रम होत असत.

त्यांनी ‘उपज आणि ‘बंदिश’ या दोन पुस्तकांची निर्मिती केली. यात त्यांनी अनेक रागांच्या बंदिशींची रचना केली, तसेच दोन नवीन राग ‘हिंदरंजनी’ आणि ‘शिवकंस’ यांची निर्मिती केली. पं. जितेंद्र अभिषेकी व ज्योत्स्ना भोळे हे राग अत्यंत तन्मयतेने गात असत.

खाँसाहेबांचा त्यांच्या योगदानाबद्दल १९८४ साली अब्दुल हलीम जाफर खाँ यांच्या ‘सितार अकॅडमी’तर्फे सन्मान करण्यात आला, तसेच मुंबईच्या ‘सुरसिंगार’ संस्थेतर्फे १९८५ साली गौरविण्यात आले. १९८७ साली पुणे महानगरपालिकेतर्फे माजी मुख्यमंत्री शंकरराव चव्हाण यांच्या हस्ते त्यांना ‘बालगंधर्व’ पुरस्कार देण्यात आला आणि १९८८ साली पुण्याच्या वेदशास्त्र संस्थेने त्यांचा सन्मान केला.

खाँसाहेबांनी त्यांच्या कारकिर्दीत मधुकर खाडिलकर, मधुकर गोळवलकर, वामनराव गोडबोले, हसुलकर, थोरले चिरंजीव शब्बीर हुसेन खाँ, धाकटे चिरंजीव फैयाज हुसेन खाँ (व्हायोलिन) व अन्वर कुरेशी (गझल गायन) या शिष्यांना कलेमध्ये पारंगत केले.

– फैयाज हुसेन खाँ

***

म




## रविशंकर
***चौधरी, रवींद्रशंकर श्यामशंकर***
**सतारवादक, संगीतकार**
**७ एप्रिल १९२० – १३ डिसेंबर २०१२**



दर्जेदार सतारवादक व संगीताचे क्षितिज विस्तारित करणारे द्रष्टे संगीतकार पं. रविशंकर हे ‘भारतीय संगीताचे विश्वप्रतिनिधी’ म्हणून जगविख्यात आहेत. रवींद्रशंकर श्यामशंकर चौधरी म्हणजेच पं. रविशंकर यांचा जन्म उत्तर प्रदेशातील तीर्थक्षेत्र वाराणसी येथे झाला. बंगाल इलाख्यातील नडाइल जिल्ह्यातील कालिया हे तालुक्याचे गाव (सध्या बांग्लादेशात) त्यांचे मूळ गाव होते. त्यांचे वडील कायदेतज्ज्ञ होते व झालवाड संस्थानाच्या महाराजांकडे त्यांनी प्रशासकीय अधिकारी म्हणून व नंतर लंडन येथे वकील म्हणून काम केले.

श्यामशंकर व हेमांगिनी या दांपत्यास उदयशंकर, राजेंद्रशंकर, ज्ञानेंद्रशंकर व रवींद्रशंकर ही चार अपत्ये होती. हे अत्यंत सधन कुटुंब होते. वडिलांनी दुसरा विवाह केल्याने मुलांचे पालनपोषण आई हेमांगिनी यांनीच केले. घरात विद्याभ्यास, कलाप्रेम व उच्च अभिरुचीचे वातावरण होते. नवतावादी नर्तक असणारे ज्येष्ठ बंधू उदयशंकर यांच्याकडून रविशंकरांची संगीताशी तोंडओळख झाली. वयाच्या दहाव्या वर्षी, १९३० साली उदयशंकर यांच्या नृत्यगटात ते सामील झाले व फ्रान्समधील पॅरिस येथे गेले. तेथे ते नृत्यनाट्यांमध्ये एक नर्तक म्हणून काम करत, तसेच सरोद, सतार, इसराज ही वाद्येही वाजवीत असत. या दौऱ्यात ते युरोपमध्ये फिरले आणि त्यामुळे लहान वयातच त्यांना युरोपियन भाषा अवगत झाल्या. तेथील आचारांतील अदब व शिस्त यांसह पाश्चात्त्य संगीताचे संस्कार झाले. ते १९३४ साली भारतात परतले. याच काळात ते वाद्यवादनाबरोबरच कथक व कथकली नृत्यशैलीही शिकत होते.

प्रथम वडील व मग आई यांचे १९३५-३६ साली निधन झाल्याने बंधू उदयशंकर हेच कुटुंबप्रमुख बनले. त्यांच्यासमवेत रविशंकर पुन्हा एकदा १९३५ मध्ये युरोप आणि अमेरिकेच्या दौऱ्यावर गेले. मैहर घराण्याचे संस्थापक असणारे हरहुन्नरी कलाकार व गुरू उ. अल्लाउद्दीन खाँसाहेब ऊर्फ ‘बाबा’ हे १९३५ साली उदयशंकरांच्या नृत्यपथकासाठी या दौऱ्याच्या वेळी ‘संगीतरचनाकार’ म्हणून आले. तेव्हा केवळ पंधरा वर्षांचे रविशंकर बाबांचे दुभाषी म्हणून त्यांना मदत करत. याच वेळी बाबांच्या सांगीतिक प्रतिभेचा जबरदस्त प्रभाव त्यांच्यावर पडला. रविशंकर त्यांचे शिष्य बनले आणि नृत्यादी अन्य कला सोडून त्यांनी केवळ संगीताचाच व्यासंग चालू ठेवला.

रविशंकरांना १९३८ साली गंडाबंधन करून बाबांनी मैहर येथे १९४४ सालापर्यंत अत्यंत कडक शिस्तीत आपला मुलगा अली अकबर व मुलगी अन्नपूर्णा यांच्याबरोबर खास तालीम दिली, रोजचा ८-१० तासांचा रियाझ करवून घेतला. रविशंकरांना तंतकारी शैली, शेकडो धृपदे, अनेक रागरागिण्या यांच्या तालमीसह लयतालाचेही उत्तम शिक्षण मिळाले. बाबांच्या तालमीत त्यांनी सूरबहार, रबाब, सरोद, बीन व सूरसिंगार या वाद्यांचे वादनतंत्र सतारीसाठी विकसित

केल्याने त्यांचे सतारवादन अन्य कलाकारांच्या वादनापेक्षा अत्यंत निराळे झाले. बाबांचे रविशंकरांवर पुत्रवत प्रेम होते व त्याचमुळे १९४१ साली बाबांच्या कन्या व शिष्या अन्नपूर्णादेवी यांच्याशी त्यांचा विवाह झाला.

रविशंकरांनी १९४४ साली मैहर सोडून मुंबईस स्थलांतर केले व त्यांनी 'इंडियन पीपल्स थिएटर असोसिएशन' (इप्टा) या संस्थेत 'इंडिया इम्मॉर्टल' या नृत्यनाट्यांसाठी संगीतदिग्दर्शन केले. याच काळात मुंबईमध्ये त्यांची सतारवादक म्हणूनही कारकीर्द सुरू झाली व बहरत गेली. अल्पावधीतच त्यांनी भारतीय संगीताच्या क्षेत्रात एक उत्तम सतारवादक म्हणून आपले स्वतंत्र स्थान निर्माण केले. त्यांनी १९४५ साली 'सारे जहाँ से अच्छा' या अत्यंत गाजलेल्या गीतास चाल दिली, जी आजही लोकप्रिय आहे.

पं. रविशंकर १९४९ ते १९५६ या काळात दिल्ली येथे आकाशवाणीचे 'वाद्यवृंद विभाग प्रमुख' म्हणून कार्यरत असताना त्यांनी भारतीय व पाश्चात्त्य वाद्यांसाठी 'संकल्पनाधारित स्वररचना' केल्या. भारतीय वृंदवादनाला त्यामुळे निराळी चालना मिळाली. भारत सरकारने १९५४ साली रशियास पाठवलेल्या पहिल्या सांस्कृतिक मंडळात पं. रविशंकर यांचा समावेश होता.

पारंपरिक सतारवादनापेक्षा खूपच निराळी पद्धत पं. रविशंकरांनी विकसित केली व तिचा प्रभाव आजही आहे. धृपद शैलीची आलापचारी, मसीतखानी व रजाखानी गतकामासह निराळ्या धाटणीची गतकारी, अनेक आम व अनवट रागांची विविधेतर तालांतील पेशकश, लोकधुनांचे मनोरम वादन ही त्यांच्या मैफलीची वैशिष्ट्ये होती. 'पं. रविशंकर यांची रागप्रस्तुती म्हणजे रागाचे उत्सवी स्वरूप' असे म्हटले गेले आहे. आपल्या वेगळ्या शैलीनुसार पं. रविशंकरांनी सतारीत काही रचनात्मक बदलही केले व त्याद्वारे सतारीचा नादगुण बदलला, जो खास 'रविशंकरांच्या सतारीचा नादगुण' म्हणून वैशिष्ट्यपूर्ण आहे. धृपद शैलीतील आलाप-जोड-झाला वादनासाठी त्यांनी सतारीवर अतिमंद्र पंचम व अतिअतिमंद्र षड्जाची तार जोडली व द्रुत लयीतील झाला वाजवताना या तारांचा गोंगाट वाटू नये म्हणून त्यांच्यासाठी संदमक लावला.

अहिरललत, तिलकश्याम, परमेश्वरी, रंगेश्वरी, गंगेश्वरी, कामेश्वरी, सांझ कल्याण, राज्य कल्याण, मोहनकंस, जनसंमोदिनी, मनमंजरी, पलास काफी, जोगेश्वरी, चारुकंस, पूर्वी कल्याण, भवानी भैरव, बैरागी तोडी, कौशिक तोडी, शैलांगी, सुरंजनी, बंजारा, स्वर्णजयंती हे राग त्यांनी निर्माण केले व यांपैकी अनेक राग आज भारतीय रागसंगीतात प्रस्थापित आहेत. तीनताल, झपताल, धमार या तालांसह त्यांचे आडाचौताल, मत्तताल, जयताल, चारताल की सवारी, पंचम सवारी, शिखरताल, तसेच १९, २३, २९ अशा विषम मात्रांच्या तालांबरोबरच साडेपाच, साडेसहा, साडेनऊ मात्रांतील तालांत वादन त्यांच्यामुळे प्रचारात आले.

पं. रविशंकरांनी कर्नाटकी राग व तालपद्धतीमधील अनेक वैशिष्ट्ये आत्मसात करून ती उत्तर हिंदुस्थानी संगीतात समाविष्ट केली. तसेच किरवाणी, वाचस्पती, चारुकेशी, मलयमारुतम्, हेमावती असे कर्नाटक संगीतातील अनेक राग त्यांनी लोकप्रिय केले. अली अकबर खाँ, गजाननबुवा जोशी, श्रीधर पार्सेकर, विलायत खाँ अशा तोलामोलाच्या कलाकारांसह त्यांनी केलेले जुगलवादन खूपच गाजले.

पं. रविशंकरांनी १९५६ पासून अमेरिका व युरोपमध्ये यशस्वी दौरे व दीर्घकालीन वास्तव्य सुरू केले व 'थ्री रागाज' ही त्यांची पहिली आंतरराष्ट्रीय एल.पी. लंडन येथे ध्वनिमुद्रित झाली. मुंबईत त्यांनी १९६२ मध्ये 'किन्नर स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक' स्थापन केले. ते १९६४ पासून अमेरिकेतील कॅलिफोर्निया व लॉस एंजेलिस येथील विद्यापीठांमध्ये शिकवू लागले.

ते १९६७ पासून प्रामुख्याने अमेरिकेतच राहू लागले, तसेच त्यांनी लॉस एंजेलिस येथे 'किन्नर

स्कूल’ची स्थापना करून अमेरिकेत संगीतशिक्षणाचे केंद्र सुरू केले. त्यांना १९७० साली कॅलिफोर्निया इन्स्टिट्यूट ऑफ आर्ट्स येथे भारतीय संगीत विभाग प्रमुख म्हणून निमंत्रित केले गेले. अमेरिकेतील ॲपल रेकॉर्ड्स या कंपनीने १९७१ साली पं. रविशंकरांच्या सांगीतिक योगदानावर ‘राग’ हा चित्रपट काढला व त्याचे न्यूयॉर्क येथे प्रथम प्रदर्शन झाले. जगातील सर्वांत मोठ्या अशा ‘सेंट जॉन डिव्हाइन कॅथेड्रल’ चर्चमध्ये त्यांना १९७५ साली मैफल पेश करण्याचा मान लाभला. भारतात १९८२ साली झालेल्या एशियाड क्रीडा महोत्सवासाठी त्यांनी रचलेले ‘अथ स्वागतम्’ हे गीत अत्यंत गाजले.

पं. रविशंकरांनी पाश्चात्त्य व अन्य संगीतसंस्कृतींतील कलाकारांसह संगमसंगीताचे वैविध्यपूर्ण आविष्कार केले. त्यांची १९५२ साली येहुदी मेन्युइन या प्रतिभावान पाश्चात्त्य व्हायोलिनवादकाशी ओळख झाली. मेन्युइन यांना भारतीय संगीताचा परिचय रविशंकरांनी करून दिला. त्यांनी १९५८ साली युनेस्को आंतरराष्ट्रीय संगीत महोत्सवात मेन्युइन व डेव्हिड ऑस्ट्राख यांच्यासह वादन पेश केले, तसेच लंडनच्या रॉयल फेस्टिव्हल हॉल येथे सतारवादन केले. फिलिप ग्लास यांनी पं. रविशंकरांच्या हाताखाली संगीत संयोजक म्हणून काम केले व पुढे ‘पॅसेजेस’ (१९९०) या प्रकल्पांसाठी ते सहकारीही बनले. बीटल संगीताचा राजा जॉर्ज हॅरिसन तर त्यांच्या वादनाने इतका भारावला, की त्याने १९६६ साली पं. रविशंकरांचे शिष्यत्व घेतले.

‘मॉंटरे पॉप फेस्टिव्हल’ या प्रख्यात उत्सवातील १९६७ सालच्या त्यांच्या प्रस्तुतीने अमेरिकेतील तरुण पिढीला जिंकले. या घटनेने अमेरिकेतील रसिकवर्ग पं. रविशंकरांचे सतारवादन आणि अर्थातच भारतीय वाद्यसंगीताकडे आकृष्ट झाला. त्यांना १९७० साली ‘लंडन सिंफनी ऑर्केस्ट्रा सोसायटी’ने निमंत्रित केले व असे निमंत्रण मिळणारे ते पहिलेच भारतीय कलाकार होते. या प्रकल्पात त्यांनी भारतीय रागांवर आधारित सिंफनीच्या रचना केल्या, त्यांचे संगीत नियोजक म्हणून प्रख्यात आंद्रे प्रेवीन यांनी काम केले. ‘ईस्ट ग्रीट्स ईस्ट’ या प्रकल्पात होसन यामामोटो (शाकुहाची वादक) व मुसुमी मियाशिता (क्योटो वादक) या जपानी कलाकारांसाठीही त्यांनी खास वाद्यरचना रचल्या.

त्यांनी १९८१ साली न्यूयॉर्क फिल्हार्मोनिक ऑर्केस्ट्रासाठी ‘रागमाला’ हा राग-सिंफनी संगमाचा विशेष प्रकल्प केला, ज्यासाठी झुबिन मेहता यांनी संगीतनियोजन केले. मेक्सिको सिंफनी सोसायटीसाठी त्यांनी ‘मेक्सिको - कॉन्चेर्टो नं.१’ ही रचना केली, तसेच ‘मेलडी ॲण्ड रिदम’ (१९५८), ‘नव-रस-रंग’ (१९६४), ‘फेस्टिव्हल ऑफ इंडिया’ (१९६८), ‘डार्क हॉर्स टूर’ (१९७४), ‘उदय उत्सव’ (१९८३), ‘इन्साइड क्रेमलिन’ (रशिया, १९८८), ‘घनश्याम’ नृत्यनाट्याचे संगीत व नृत्यरचना (१९८९), इ. विशेष संगीत प्रस्तुतीही केल्या.

‘थ्री रागाज’ (१९५६), ‘इंप्रोवायझेशन्स’ (१९६२), ‘पोर्ट्रेट ऑफ जीनियस’ (१९६४), ‘वेस्ट मीट्स ईस्ट’ ही मालिका (१९६६-६७), ‘म्यूझिक फेस्टिव्हल फ्रॉम इंडिया’ (१९६९), ‘शंकर फॅमिली ॲण्ड फ्रेण्ड्स’ (१९७४), ‘होमेज टू महात्मा गांधी’ (१९८१), ‘रागमाला’ (१९८२), ‘तनमन’ (१९८७), ‘इन्साइड क्रेमलिन’ (१९८८), ‘पॅसेजेस’ (१९८९), ‘इन सेलिब्रेशन’ (१९९६), ‘चॅन्ट्स ऑफ इंडिया’ (१९९७), ‘रागताल’ (१९९९), ‘फ्लॉवर्स ऑफ इंडिया’ (२००७), ‘कोलॅबोरेशन्स’ (२०१०) या पं. रविशंकरांच्या काही गाजलेल्या ध्वनिमुद्रिका आहेत.

‘धरती के लाल’, ‘नीचा नगर’ (१९४५), ‘अनुराधा’ (१९६०), ‘गोदान’ (१९६१), ‘काबुलीवाला’ (१९६६, यासाठी बर्लिनच्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवात ‘सिल्व्हर बेअर’ अवॉर्ड), ‘मीरा’ या हिंदी चित्रपटांना पं. रविशंकरांचे संगीत लाभले. ‘अनुराधा’ या चित्रपटातील ‘सांवरे सांवरे’ (भैरवी), ‘जाने कैसे सपनों में’ (तिलक

र

श्याम), 'हाय रे वो दिन' (मिश्र जनसंमोहिनी) ही गीते विशेष लोकप्रिय ठरली. त्यांनी काही बंगाली चित्रपटांनाही संगीत दिले. त्यांपैकी सर्वांत गाजलेले व महत्त्वपूर्ण संगीत सत्यजीत रे यांच्या 'अपू ट्रायॅलॉजी' म्हणून गाजलेल्या चित्रपटाचे होते.

'चेअरी टेल' (१९५५), स्वीडिश चित्रपट 'दी फ्यूट ॲण्ड दी ॲरो' (१९५७), 'ॲलिस इन वंडरलॅण्ड' (१९६३), 'चपाक्वा' (१९६५), 'ॲवालांश' (१९६५), 'चार्ली' (१९६८), 'ट्रांसमायग्रेशन मॅकॅब्रे - विओला' (१९६८), 'गांधी' (१९८२, ऑस्कर पुरस्कारासाठी नामांकन), 'जेनेसिस' (१९८६), 'दी टायगर ॲण्ड दी ब्राह्मिन' (१९९१), इ. पाश्चात्त्य चित्रपटांच्या संगीतानेही त्यांना विश्वमान्यता दिली.

पाश्चात्त्य जगतात सर्वांत जास्त मैफली करणारे, ध्वनिमुद्रित केले गेलेले पं. रविशंकर हे ज्येष्ठतम भारतीय कलाकार आहेत. त्यांनी तबलावादकाला मैफलीत एकलवादनाची संधी वारंवार दिली व त्याद्वारे मानाचे स्थान प्राप्त करून दिले, हे त्यांना एक मोठेच श्रेय आहे. पाश्चात्त्य जगात आज 'भारतीय संगीत म्हणजे सतार आणि तबला' असे समीकरण निर्माण झाले याचे श्रेयही पं. रविशंकर आणि उ. अल्लारखा व झाकिर हुसेन यांना जाते. अली अकबर खाँ, अल्लारखा, झाकिर हुसेन, हरिप्रसाद चौरासिया, शिवकुमार शर्मा, सुलतान खाँ, लक्ष्मी शंकर, जितेंद्र अभिषेकी अशा अनेक भारतीय कलाकारांचा पाश्चात्त्य जगाला परिचय करून देण्याचे श्रेयही पं. रविशंकरांनाच जाते.

'भारताचे सांस्कृतिक राजदूत' म्हणून जगभरातील अनेक देशांनी पाचारण केलेले पं. रविशंकर हे जगभरातील सर्वाधिक पुरस्कार व सन्मान मिळवलेले भारतीय कलाकार असावेत! 'डॉक्टर ऑफ फाइन आर्ट्स' (कॅलिफोर्निया विद्यापीठाकडून, १९६८), तीन वेळा 'ग्रॅमी' अवॉर्ड (१९६७, १९७० व १९७३ : हा सन्मान मिळवणारे पहिले भारतीय), 'युनिसेफ' सन्मान (१९८०), मेरीलॅण्ड व बाल्टीमोर राज्यांचे सन्माननीय नागरिकत्व (१९८४), फ्रान्स सरकारचा कलाविषयक सर्वोच्च नागरी सन्मान (१९८५), 'फुकोओका एशियन कल्चरल प्राइझ' (जपान १९९१), 'रामोन मॅग्सॅसे' पुरस्कार (फिलिपाइन्स, १९९२), 'महात्मा गांधी' सन्मान (लंडन, १९९२), हार्वर्ड व न्यू इंग्लंड विद्यापीठाकडून सन्माननीय डॉक्टरेट (१९९३), ब्रिटिश कोलंबियातील व्हिक्टोरिआ विद्यापीठाकडून सन्माननीय डॉक्टरेट (१९९४), 'प्रीमियम इंपीरिअल' सन्मान (जपान आर्ट असोसिएशन, १९९७), 'पोलर म्यूझिक' अवॉर्ड (नोबेल सन्मानाची प्रतिष्ठा असणारे, १९९८), ब्रिटिश सरकारकडून 'नाइटहूड' हा नागरी सन्मान (२००१) असे जगभरातील अनेक सन्मान त्यांना दिले गेले. अमेरिकेतील ह्यूस्टन नगरपालिकेने १९८३ साली ४ व ५ जून हे दोन दिवस 'रविशंकर दिन' म्हणून साजरे केले!

भारतातही त्यांना अनेक मानसन्मान मिळाले, ते असे : खैरागड विद्यापीठ, कलकत्ता विद्यापीठ व रवींद्रभारती विद्यापीठ (१९७३), बनारस हिंदू विद्यापीठ (१९८०), दिल्ली विद्यापीठ (१९८४) अशा विद्यापीठांची सन्माननीय डॉक्टरेट, 'देशिकोत्तम' सन्मान (१९८१), खास 'फिल्मफेअर' पुरस्कार (१९७९), 'कालिदास' सन्मान (१९८७), 'स्पिरिट ऑफ फ्रीडम' पुरस्कार (१९९०), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार व 'रत्न' सदस्यत्व (१९६२ व १९७५), 'पद्मभूषण' (१९६७), 'पद्मविभूषण' (१९८१) आणि भारताचा सर्वोच्च नागरी सन्मान 'भारतरत्न' (१९९९) पं. रविशंकर यांना दिला गेला. राज्यसभेचे सभासद म्हणूनही त्यांची १९८६ ते १९९२ या काळासाठी नियुक्ती झाली होती. त्यांना २०११ साली संगीत नाटक अकादमीचा विशेष 'टागोर' सन्मान देण्यात आला.

रुबाबदार व्यक्तित्वाच्या व कलाकार म्हणून प्रसिद्धीचे वलय मिरवणाऱ्या रविशंकरांचे खाजगी आयुष्य विवादास्पद ठरले. अन्नपूर्णादेवींबरोबरचा त्यांचा विवाह असफल ठरल्यानंतर पुढे त्यांना कमला चक्रवर्ती, सुई जोन्स, सुकन्या राजन यांनी वैवाहिक जीवनात साथ दिली. शुभेंद्र शंकर हा त्यांचा पुत्र

तरुणपणीच निधन पावला. अनुष्का शंकर, नोरा जोन्स या कन्या त्यांचा संगीताचा वारसा चालवत आहेत.

पं. रविशंकर यांनी ‘माय म्यूझिक माय लाइफ’ (१९६८), ‘राग-अनुराग’ (१९७९) व ‘रागमाला’ (१९९६) ही तीन आत्मचरित्रात्मक पुस्तके लिहिली, तसेच ‘लर्निंग इण्डियन म्यूझिक – ए सिस्टिमॅटिक ॲप्रोच’ (१९७९) हे संगीतशिक्षणपर पुस्तकही लिहिले.

लॉस एंजेलिस व मुंबई येथे ‘किन्नर स्कूल ऑफ म्यूझिक’, वाराणसी येथे ‘हेमांगिनी गुरुकुल’, सॅनडियागो येथील गुरुकुल व नवी दिल्लीचे ‘रविशंकर सेंटर’ येथे पं. रविशंकरांनी अनेक शिष्यांना संगीत शिकवले. उमाशंकर मिश्र, जया बोस, गोपालकृष्ण, विजय राघव राव, शमीम अहमद, कार्तिककुमार, शंकर घोष, भास्कर चंदावरकर, मंजू मेहता, विश्वमोहन भट्ट, इ. भारतीय कलाकार, तसेच येहुदी मेन्युइन, जॉर्ज हॅरिसन, फिलिप ग्लास, डेव्हिड मर्फी, इ. पाश्चात्त्य कलाकार हे त्यांचे महत्त्वपूर्ण शिष्य आहेत.

कॅलिफोर्निया स्टेट युनिव्हर्सिटी येथे ४ नोव्हे. २०१२ रोजी त्यांची शेवटची जाहीर मैफिल झाली. श्वसनाचा प्रचंड त्रास होत असल्याने प्राणवायूचा मास्क लावून त्यांनी कन्या अनुष्का शंकरसह ही मैफिल सादर केली. त्यांचा मृत्यू कॅलिफोर्निया येथे वयाच्या ९२व्या वर्षी झाला.

– चैतन्य कुंटे

र

## रहिमत खाँ

*भूगंधर्व*

**गायक**

**१८५२ – जून १९२२**

रहिमत खाँ हे ग्वाल्हेर घराण्यातील प्रसिद्ध बुजुर्ग गायक उस्ताद हद्दू खाँ यांचे धाकटे चिरंजीव. ज्येष्ठ चिरंजीव मुहम्मद खाँ यांच्याबरोबर हद्दू खाँनी धाकट्या मुलालाही संगीताची तालीम दिली. राजबिंडा, गोरापान, सुदृढ असा मुलगा रहिमत खाँ हा वडिलांचा फार लाडका होता. त्यामुळे तो लहरी आणि हूडही होता. जयपूरचे तत्कालीन राजे महाराज सवाई मानसिंह त्याच्या गायनाने अतिशय आनंदित झाल्याची नोंद आहे.



पल्लेदार, सुरेल, चपळ आवाज, तान अतिशय तयारीची, अशा रहिमत खाँना ‘तान के कप्तान’ असे म्हटले जाई. गायनातील सहजता, अकृत्रिमपणा व भारदस्तपणा हे त्यांचे प्रमुख गुण. मुंबई, पुणे, कोल्हापूर, कुरुंदवाड येथील त्यांच्या कार्यक्रमांनी त्यांचे नाव सर्वत्र प्रसिद्ध झाले. विष्णुपंत छत्रे आणि निसार हुसेन खाँ हे त्यांचे सहाध्यायी होते.

छोटे महंमद खाँ यांचे १८७४ साली व पाठोपाठ हद्दू खाँ यांचे १८७५ साली निधन झाल्याने खाँसाहेब सैरभैर झाले. एकेकाळी पोशाखाच्या बाबतीत दक्ष असलेल्या रहिमत खाँचे जेवणखाण, कपडेलत्ते अशा सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष होऊ लागले. ते भ्रमिष्टावस्थेत ग्वाल्हेर सोडून बनारसला गेले. तेथे ते व्यसनांच्या आहारी गेले.

परंतु, विष्णुपंत छत्रे गावोगावी सर्कसचे खेळ करीत बनारसला आले असताना १८९२ मध्ये त्यांना रहिमत खाँ दिसले व त्यांना आपल्या बिऱ्हाडी घेऊन आले. विष्णुपंतांनी त्यांची खूप सेवा केली. सर्कसच्या वातावरणात खाँसाहेब रमले, आणि त्यांचे गाणे पुन्हा सुरू झाले. नंतर रसिकवर्ग रहिमत खाँचे गाणे ऐकण्यासाठी छत्र्यांच्या सर्कशीत जात असे.

उस्ताद रहिमत खाँ व उस्ताद अल्लादिया खाँच्या गायनाच्या सामन्यात उस्ताद रहिमत खाँ जिंकल्याची नोंद आहे. उस्ताद अब्दुल करीम खाँनीदेखील उस्ताद रहिमत खाँचे गायन फार नावाजले होते. रहिमत खाँच्या लोचदार गायनाचा प्रभाव अनंत मनोहर जोशी, तसेच अल्लादिया खाँसाहेबांचे पुत्र मंजी खाँ यांवर पडला. रहिमत खाँच्या १९२० मध्ये भूप, मालकंस, बसंत, पूरिया, भैरवी, टप्पा, पिलू, होरी अशा ध्वनिमुद्रिकाही निघाल्या.

१९०५ साली विष्णुपंत छत्रे वारल्यानंतर रहिमत खाँचा सांभाळ काशिनाथपंत छत्रे यांनी केला. छत्रे बंधूंच्या निधनानंतर कुरुंदवाडच्या संस्थानिकांनी रहिमत खाँचा सांभाळ केला. जून १९२२ मध्ये ते कुरुंदवाड मुक्कामी वारले.

'सुध मुद्रा, सुध बानी' असे त्यांचे गायन असे. त्यांना 'तान के कप्तान' आणि 'भूगंधर्व' अशा पदव्या मिळाल्या होत्या.

– डॉ. सुधा पटवर्धन

## राजहंस, नारायण श्रीपाद

☛ **बालगंधर्व**

## राजुरकर, मालिनी वसंत

**गायिका**

**७ जानेवारी १९४७**



मालिनी वसंत राजुरकर (पूर्वाश्रमीच्या प्रभा वासुदेव वैद्य) यांचा जन्म अजमेर येथे झाला. त्यांचे वडील वासुदेव विश्वनाथ वैद्य व आई शारदाबाई हे अत्यंत शालीन, सरळमार्गी दांपत्य असल्याने घरात संस्कारपूर्ण वातावरण होते. वडील सैनिकी शाळेत शिक्षक होते, मात्र घरात सर्वांना संगीताची रुची होती.

ग्वाल्हेर घराण्याचे पं. राजाभैया पूछवाले यांचे शिष्य पं. गोविंदराव राजुरकर हे अजमेरच्या गायनशाळेत प्राचार्य होते, त्यांच्याकडे प्रभा वैद्य विद्यालयीन पद्धतीने सात वर्षे शिकल्या. त्यांना राजस्थान संगीत नाटक अकादमीची शिष्यवृत्तीही मिळाली. ग्वाल्हेरच्या शिक्षण विभागाच्या 'संगीत रत्न' (१९५९) व 'संगीत निपुण' (१९६०) या पदव्या त्यांनी मिळवल्या.

शालेय व महाविद्यालयीन शिक्षणातही उत्तम चमकणाऱ्या प्रभा वैद्यांना खरे तर गणित या विषयातच कारकीर्द करायची होती. त्यानुसार त्यांनी १९६० साली राजस्थान विद्यापीठातून गणित विषयात पदवी मिळवली. त्यांनी १९६० ते १९६२ अशी तीन वर्षे अजमेरच्या सावित्री गर्ल्स महाविद्यालयात गणित, इंग्रजी व संगीत हे विषय शिकवले.

त्यांचा ७ जुलै १९६४ रोजी विवाह ग्वाल्हेर येथील वसंत राजुरकर यांच्याशी झाला. विवाहानंतर पं. राजाभैयांचेच शिष्य असणाऱ्या पती वसंतराव यांच्याकडे त्यांचे संगीतशिक्षण चालू राहिले. वसंतरावांनी आपल्या पत्नीतील कलागुण जाणून तिच्या संगीतव्यासंगाला पाठिंबा दिला.

मालिनी राजुरकरांची १९६४ साली पहिली जाहीर मैफल अजमेरच्या महाराष्ट्र मंडळात झाली. पती वसंतराव यांना १९६५ साली हैद्राबादच्या महाविद्यालयात संगीताचे प्राध्यापक म्हणून नोकरी मिळाल्याने ते हैद्राबादेस स्थायिक झाले. येथून पुढे हैद्राबाद, धारवाड, हुबळी इ. ठिकाणी कार्यक्रम सुरू झाले.

मुंबईत १९६६ साली मालिनी राजुरकरांचा पहिला कार्यक्रम झाला व त्यास उपस्थित असणाऱ्या विदुषी माणिक वर्मा व पं. जसराज यांनी त्यांचे कौतुक केले. याच वर्षी पुण्याच्या सवाई गंधर्व महोत्सवात त्या गायल्या व त्यांचे नाव ठळकपणे रसिकांपुढे आले. या कार्यक्रमात पं. भीमसेन जोशी व पं. वसंतराव देशपांडे यांनी त्यांचे खास कौतुक केले. यानंतर ग्वाल्हेरच्या तानसेन समारोहासह देशभरच्या सर्व मान्यवर रंगमंचांवरून त्यांनी कलाप्रस्तुती केली. पुण्याच्या सवाई गंधर्व महोत्सवात पं. भीमसेन जोशी हे त्यांना दरवर्षी आग्रहाने पाचारण करीत, यावरून त्यांची एका दिग्गज कलाकाराने केलेली पारख व रसिकप्रियता या दोन्ही बाबी लक्षात येतात.

त्यांनी अमेरिका, कॅनडा (१९८० व १९९५), ब्रिटन (१९८४), मस्कत, दुबई इ. आखाती देश (१९९० व १९९८), बांग्लादेश (१९९८) असे परदेश दौरेही केले. आकाशवाणीच्या त्या 'अ'

र

दर्जाच्या कलाकार असून १९६७ पासून त्या आकाशवाणी व दूरदर्शनवर नियमितपणे गात आहेत.

एच.एम.व्ही.ने १९७१ साली त्यांची पहिली इ.पी. ध्वनिमुद्रिका (‘नरवर कृष्णासमान’ व ‘पांडुनृपती जनक जया’ ही दोन नाट्यगीते) काढली, ती गाजल्यामुळे १९७९ साली रागगायनाची पहिली एल.पी. (भूपाल तोडी, कैशिकरंजनी, खमाज टप्पा) निघाली व तिलाही रसिकांचा उत्तम प्रतिसाद मिळाला. यानंतर एच.एम.व्ही., म्यूझिक टुडे, व्हीनस, इंडिया टुडे, अलूरकर म्यूझिक हाऊस, इ. कंपन्यांनी मालिनीताईंच्या अनेक ध्वनिमुद्रिका काढल्या व त्यांच्या सुमारे ४० रागांतील ख्याल, टप्पे, तराणे ध्वनिमुद्रणांद्वारे रसिकांना उपलब्ध आहेत.

मूळ मराठी असून अजमेर येथे जन्म व बाल्यकाल गेलेल्या, नंतर हैद्राबादेत स्थित असलेल्या मालिनी राजुरकरांचा महाराष्ट्रात फार मोठा चहाता रसिकवर्ग आहे व त्यांनी मराठी रसिकांची संगीताभिरुची जोपासली आहे.

मुख्यत: ख्याल व टप्पा या गानप्रकारांसाठी प्रसिद्ध असणाऱ्या मालिनी राजुरकरांच्या ख्यालगायकीबाबत असे म्हणता येते, की ‘विद्यालयीन संगीतशिक्षण पद्धतीतील मैफलीच्या दर्जास आलेल्या गायकीचे हे एक उत्तम व प्रातिनिधिक मानावे असे उदाहरण आहे.’ पारंपरिक रितीचे तालमीचे गाणे मालिनीताईंच्या वाट्यास आले नसले तरीही आपल्या गायकीस बाळबोध न ठेवता, तालमीच्या गायकीतील अस्सलपणा, मूलतत्त्वे व सौंदर्यस्थळे त्यांनी अंगीकारली. सातत्याने रियाझ व चिंतनातून गायकीस बुलंद केले. के.जी. गिंडे, बाळासाहेब पूछवाले, प्रभाकर चिंचोरे, जितेंद्र अभिषेकी अशा अनेक बुजुर्गांचे मार्गदर्शन घेऊन त्यांनी गाणे समृद्ध केले.

र

एके काळी पं. कुमार गंधर्व, गंगूबाई हनगल, माणिक वर्मा यांचा विशेष प्रभाव त्यांच्या गायकीत जाणवत असे; यथावकाश या प्रभावांतून बाहेर येत त्यांनी स्वत:ची अशी खास धाटणी बनवली व ती रसिकप्रियही झाली. स्वच्छ, खुला आवाज, स्पष्ट गानोच्चार, रागशुद्धता, बंदिशींची नेटकी प्रस्तुती, सरगमचा लयकारीतील वापर, दाणेदार व आखीवरेखीव तान, एकंदर गायनातील जोमदारपणा, प्रसन्नता ही त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये आहेत.

पारंपरिक बंदिशींबरोबरच आधुनिक काळातील श्री.ना. रातंजनकर, गोविंदराव नातू, दिनकर कायकिणी, सी.आर. व्यास, जितेंद्र अभिषेकी, रामाश्रय झा, बलवंतराय भट्ट, इ. वाग्गेयकारांच्या बंदिशी मैफलींतून सातत्याने मांडून त्या लोकप्रिय करण्याचे श्रेयही मालिनी राजुरकरांना जाते. ख्यालाबरोबरच तरुणपणी त्या ठुमरी फार नजाकतीने गात असत व त्यावर उ. बडे गुलाम अली यांची छाप दिसे.

गंधर्वगायकीतली नव्हे, तर अभिषेकी प्रणीत नाट्यपदे त्या मैफलीत क्वचित गात असत. ख्यालशैली अंतर्गत असणारे तराना, खयालनुमा तराना, त्रिवट, अष्टपदी, रागमाला, टपख्याल, बंधीठुमरी वा बोलबंदिशी इ. विविध प्रकार त्यांनी ताकदीने सादर केले. साधारणत: विद्यार्थिदशेतच गायले जाणारे सरगमगीत व लक्षणगीत हे प्रकारही त्यांनी मैफलींतून कल्पकतेने पेश केले आहेत. आमरागांसह चक्रधर, कैशिकरंजनी, ओडव बागेश्री, देवरंजनी, गुणरंजनी, चारुकेशी, बसंतमुखारी, विजयानगरी हे अधुनाप्रसिद्ध रागही त्यांनी वारंवार मैफलीत गायल्याने ते प्रचलित होण्यास चालना मिळाली.

बुद्धी व गळा या दोन्हींची तयारी, चपळाई व चमक आवश्यक असणारे टप्पागायन ही मालिनी राजुरकरांची खासियत आहे. त्या काळात काहीशी लुप्तप्राय झालेली, ग्वाल्हेर घराण्यातील पंजाबी ठेक्यातील चुस्त अशी ही टप्पागायकी त्यांनी मैफलींतून सातत्याने मांडली व तिला पुन्हा झळाळी दिली, त्यात प्रयोगशीलता आणली. साधारणत: पाच-दहा मिनिटेच गायल्या जाणाऱ्या या प्रकारास त्यांनी वीसपंचवीस मिनिटांपर्यंत नेले. ही नुसती वेळेची वाढ नव्हती; त्यांनी

टप्पागायकीतील सांगीतिक आशय, मांडणीतील तंत्र, घटकांचा वैविध्यपूर्ण वापर व नावीन्य यांबाबतही भर घातली व हा गानप्रकार एका उंचीस नेला. आजच्या पिढीस टप्पागायकीची आवड त्यांनीच लावली व त्यामुळे या दुर्लक्षित गानशैलीकडे अनेक तरुण कलाकार पुन्हा वळले, हे मालिनी राजुरकरांचे मोठे योगदान आहे.

केवळ पतीच्या आग्रहाखातर व्यावसायिक कलाकार म्हणून पुढे आलेल्या मालिनीताईंनी संसार व संगीत हे दोन्ही नेटाने सांभाळले. अनेक दशकांचा ॲलर्जिक ब्रॉन्कायल दमा, उत्तरायुष्यात गुडघ्यांच्या विकारावर मात करून त्या जिद्दीने गायल्या. 'आधी चांगली व्यक्ती, नागरिक असावे, नंतर कलाकार' ही त्यांची कायमच भूमिका राहिल्याने परिपक्व व समतोल विचारांच्या, निगर्वी व पारदर्शी स्वभावाच्या मालिनी राजुरकरांनी आपल्या माणुसकीच्या तत्त्वांस कधीही मुरड घातली नाही. त्यामुळेच संगत-कलाकार, संयोजक, रसिक या सर्वांशी त्यांचे सौहार्दाचे नाते राहिले.

'फाय फाउण्डेशन' पुरस्कार (१९९१, इचलकरंजी), जागतिक मराठी परिषदेतर्फे सत्कार (१९९९), षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त विदुषी गंगूबाई हनगळ व पं. भीमसेन जोशी यांच्या हस्ते सत्कार (२००१), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (२००१), 'आंध्र अकादमी' सन्मान (२००२), मध्यप्रदेश सरकारचा 'तानसेन' सन्मान (२००५), 'उ. हाफिज अली खान' पुरस्कार (२००५), मंगेशकर कुटुंबीयांतर्फे 'मास्टर दीनानाथ मंगेशकर स्मृती' पुरस्कार (२००८), पुणे भारत गायन समाजातर्फे 'माणिक वर्मा' पुरस्कार (२०१०) यांद्वारे मालिनी राजुरकरांचा गौरव करण्यात आला आहे.

— चैतन्य कुंटे

**संदर्भ :**

'छंदोवती' : मालिनी राजुरकर षष्ट्यब्दीपूर्ती स्मरणिका; पुणे; २००१.

## राजोपाध्ये, वसंत यशवंत

**संगीत शिक्षक, लेखक**

**२८ डिसेंबर १९१३ – २२ नोव्हेंबर २००८**



प्रामुख्याने संगीत शिक्षक असलेले, तसेच संगीत संबंधित पुस्तकांचे लिखाण केलेल्या वसंत यशवंत राजोपाध्ये यांचे वडील विद्वान व संगीतप्रेमी होते. वसंत राजोपाध्येंना लहानपणापासूनच संगीताबद्दल आकर्षण होते. मॅट्रिक झाल्यानंतर १९३६ पासून ग्वालियर घराण्याचे सुप्रसिद्ध गायक पं. नारायण व्यास यांच्याकडे त्यांनी गाणे शिकण्यास सुरुवात केली. गांधर्व महाविद्यालयाची 'संगीत प्रवीण' ही परीक्षा ते उत्तीर्ण झाले.

राजोपाध्ये १९४८ पासून अ.भा. गांधर्व महाविद्यालय मंडळाचे कार्यवाह व नंतर अध्यक्ष झाले. काश्मीर शासनाच्या 'म्यूझिक ॲण्ड फाइन आर्ट्स' या संस्थेत १९६७ ते १९७२ पर्यंत संस्थाप्रमुख म्हणून ते कार्यरत होते. 'व्यास संगीत विद्यालया'त संस्थापक म्हणून त्यांचा मोठा वाटा होता व नंतर ते याच विद्यालयाचे प्रमुख झाले. 'संगीत कला विहार' या संगीतविषयक मासिकाचेही ते सह-संस्थापक होते.

संगीतातील परीक्षार्थींकरिता सहज समजावे असे लिखाण त्यांनी आपल्या पुस्तकांतून केले आहे. 'संगीतशास्त्र' हे संगीतशास्त्रावरील विद्यार्थ्यांना समजेल असे आटोपशीर लेखन असलेले पुस्तक; याबरोबरच 'घर का रियाज' हे पुस्तकही प्रसिद्ध झाले.

केसरबाई केरकर, बडे गुलाम अली, पं. विष्णू दिगंबर पलुसकर, वि.ना. भातखंडे इत्यादी अनेक गायक, गायिका, संगीतकार यांची व्यक्तिचित्रेही त्यांनी आपल्या लेखनातून साकारली आहेत. 'काही वैशिष्ट्ये ग्वालियर गायकीची,' 'संगीतातून जीवनदर्शन', 'कव्वालीचे मूळ भारतीयच', 'स्त्रिया आणि संगीत' अशा संगीताशी संबंधित विविध विषयांवर त्यांनी

र

विपुल लेखन केले. काही गायक-गायिकांच्या मुलाखतीही त्यांनी घेतल्या. ग्वालियर घराणा संगीत संमेलनाच्या उद्घाटन समारंभाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. तसेच श्री. ना.दा.ठा. या विद्यापीठाचे ते ‘गव्हर्नर्स नॉमिनी’ होते. संगीत रिसर्च अकॅडमी, कलकत्ता; अब्दुल हलीम अकादमी, मुंबई; स्वर साधना समिती इत्यादी संस्थांतर्फे राजोपाध्ये यांच्या संगीतसेवेबद्दल त्यांचा सन्मान करण्यात आला.

— माधव इमारते

## राणे, सरस्वती सुंदर

**गायिका**

**४ ऑक्टोबर १९१३ – १० ऑक्टोबर २००६**



सरस्वती सुंदरराव राणे या अब्दुल करीम खाँ व ताराबाई माने यांच्या कन्या व सुरेशबाबू माने, हिराबाई बडोदेकरांची धाकटी बहीण होत. त्यांचा मिरजेला जन्म झाला. सकीना हे त्यांचे आधीचे नाव व घरातले लाडके नाव ‘छोटूताई’. त्यांचा विवाह सुंदर राणे यांच्याशी झाल्यावर त्या सरस्वती राणे या नावाने सुपरिचित झाल्या.

सरस्वती राणे त्यांचे गाण्यातले पहिले शिक्षण हिराबाईंकडे झाले. जयपूर घराण्याचे नत्थन खाँ, ग्वाल्हेर घराण्याचे बी.आर. देवधर यांच्याकडूनही त्या शिकल्या.

‘नूतन संगीत नाटक मंडळी’च्या संगीत नाटकात त्यांनी कामे केली. ‘संगीत संशयकल्लोळ’, ‘सौभद्र’, ‘एकच प्याला’तील त्यांच्या भूमिका व ‘ललना मना’ सारखी पदे गाजली. सुरुवातीला ‘ओडियन’ कंपनीने त्यांचे शास्त्रीय व सुगम संगीताचे ध्वनिमुद्रण प्रसिद्ध केले. त्यात बंदिशी, मराठी भावगीते, हिंदी भजने होती. यांतलीच काही गीते पुढे कोलंबिया, यंग इंडिया यांनी परत प्रसिद्ध केली.

बोलपटांच्या आरंभीच्या दोन दशकांत (१९३०-४०) हिंदी आणि मराठी सिनेमांसाठी अण्णासाहेब माईणकर, दादा चांदेकर, शंकरराव व्यास, के.सी. डे, सुधीर फडके, सी. रामचंद्र इ. अनेक संगीत दिग्दर्शकांसाठी सरस्वती राणे यांनी पार्श्वगायन केले. ‘पायाची दासी’, ‘पैसा बोलतो आहे’, ‘भरतभेट’, ‘सरगम’, ‘शहेनशहा अकबर’ ही त्यांतील काही चित्रपटांची ठळक नावे. आचार्य अत्र्यांच्या बऱ्याच चित्रपटांतून त्या गायिल्या आहेत. ‘अंगणात फुलल्या जाई जुई’ हे त्यांचे गाणे खूप गाजले. ‘रामराज्य’मधील ‘बीना मधुर मधुर कछु बोल’ हे त्यांचे सर्वांत गाजलेले गीत होय. त्यांचे नाव तेव्हा भारतभर झाले. स.अ. शुक्लांनी याच चालीवर लिहिलेले मराठी भावगीत ‘मैना मधुर मधुर वच बोल’ हेही त्यांनी गायले.

पार्श्वगायन ही पद्धत जेव्हा नवीन होती, त्या काळात सरस्वतीबाईंच्या सुरेलपणामुळे त्यांनी अनेक बोलपटांत प्रभावी, उत्तम पार्श्वगायन केले. त्या काळात सरस्वतीबाई पार्श्वगायनात आघाडीच्या गायिका होत्या. नंतर १९७० मध्ये श्याम बेनेगलांच्या ‘भूमिका’ सिनेमात नात मीना फातर्पेकरांबरोबर त्यांनी शुद्ध कल्याणची बंदिश गायिली. त्यांचे रागदारी, भावगीत, चित्रपटगीत अशा सर्व प्रकारांचे ध्वनिमुद्रण निघाले आणि गाजलेही. ग.दि. माडगूळकर व सुधीर फडके यांचे ‘घनश्याम नयनी आला’ हे सरस्वतीबाईंनी अप्रतिम गायिलेले गीत प्रचंड गाजले.

अतिशय मधुर, सुरेल आवाज, स्वच्छ तान, गोलाई असलेले शब्दोच्चार ही त्यांची खास वैशिष्ट्ये होत. अजून एक विशेष म्हणजे हिराबाई बडोदेकर व त्यांची जुगलबंदी ही होय. ज्या काळात फक्त पुरुष कलाकार जुगलबंदी करायचे, त्या काळात गायिकांची जुगलबंदी या दोघींनी सुरू करून एक नवा पायंडाच पाडला. अत्यंत प्रभावी गायनाने ही जुगलबंदी हमखास रंगे असे उल्लेख मिळतात. त्यांच्या सहगायनाची ध्वनिमुद्रिकाही एच.एम.व्ही.ने काढली होती. त्यांच्या सहगायनाच्या १९६५ ते १९८० या काळात अनेक मैफली झाल्या.

र

त्या १९३३ पासून आकाशवाणीवर गाऊ लागल्या व आकाशवाणीच्या संगीत संमेलनांत, साखळी प्रसारण कार्यक्रमांत त्यांनी पेशावर ते कन्याकुमारी अशा भारतभर मैफली केल्या. त्यांचे गणेशोत्सवातही गावोगावी कार्यक्रम होत असत. सवाई गंधर्व संगीत महोत्सवातही त्यांचा सहभाग ठरलेला असे. बी.आर. देवधरांचा चंद्रकंस राग सरस्वतीबाईंनी पहिल्यांदा पेश केला. पहिल्या स्वातंत्र्यदिनी दिल्लीतील कार्यक्रमात, तसेच पहिल्या महाराष्ट्र दिनी शिवनेरीवर झालेल्या विशेष कार्यक्रमात त्यांना गाण्याचा बहुमान मिळाला. गायन दर्जेदार असतानाच त्यांनी सत्तराव्या वर्षी मैफली गायनातून निवृत्ती घेतली हे विशेष होय.

साधारण १९५०-५५ नंतर त्यांनी विद्यादानाला वाहून घेतले. मीना जोशी, मीरा पणशीकर आणि नात मीना फातर्पेकर अशा शिष्या तयार केल्या. त्यांचे त्र्याण्णवाव्या वर्षी पुण्यात निधन झाले. त्यांना ‘बालगंधर्व’ पुरस्कार (महाराष्ट्र शासन, १९६६), ‘जीवन गौरव’ पुरस्कार (कोलकात्याच्या आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमीतर्फे, १९९१ मध्ये मुंबई व २००६ मध्ये दिल्ली येथे), ‘यशवंतराव चव्हाण’ पुरस्कार, उ. फैजाझ अहमद खाँ स्मृती ट्रस्टचा ‘किराणा घराणा सन्मान’ (१९९९) देऊन गौरविण्यात आले.

– डॉ. शुभदा कुलकर्णी

## रातंजनकर, श्रीकृष्ण नारायण

**गायक, शास्त्रकार व गुरू**

**३१ डिसेंबर १९०० – १४ फेब्रुवारी १९७४**

श्रीकृष्ण नारायण रातंजनकर ऊर्फ अण्णासाहेब यांचा जन्म मुंबई येथील भटवाडीत, एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. वडील नारायण गोविंद रातंजनकर हे मुंबई पोलिसांतील गुन्हे अन्वेषण विभागात एक अधिकारी म्हणून नोकरी करीत. त्यांना संगीताची खूप आवड व जाण होती आणि ते उत्तम सतार वाजवीत असत. त्यांचे इंग्रजी, मराठी व संस्कृत या भाषांवर उत्तम प्रभुत्व होते. श्रीकृष्ण रातंजनकर यांचे शालेय



शिक्षण मुंबई येथील एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये झाले. सन १९२६ मध्ये ते विल्सन महाविद्यालयातून बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले.

वयाच्या सातव्या वर्षी श्रीकृष्ण रातंजनकरांचे संगीताचे प्रारंभिक शिक्षण पतियाळा घराण्यातील उस्ताद काले खाँ यांचे शिष्य कृष्णभट्ट होनावर यांच्याकडे सुरू झाले. त्यानंतर १९०८ पासून त्यांना पं. अनंत मनोहर जोशी यांच्याकडे ग्वाल्हेर गायकीचे शिक्षण मिळाले. त्यांचा १९१० साली त्यांच्या वडिलांचे एक वकील मित्र शंकरराव कर्नाड यांच्या मार्फत पं. विष्णू नारायण भातखंडे यांच्याशी परिचय झाला व १९११ पासून भातखंडे यांच्याकडे त्यांची नियमित तालीम सुरू झाली.

१९१६ साली बडोदे येथील पहिल्या संगीत परिषदेच्या वेळी श्रीमंत सयाजीराव गायकवाडांच्या मध्यस्थीने भातखंडे यांनी रातंजनकरांना उस्ताद फैयाझ खाँसाहेबांचे गंडाबंध शागीर्द केले. १९१६ ते १९२२ या मधल्या पाच वर्षांत रातंजनकरांना आफताब-ए-मौसिकी उ. फैयाझ खाँसाहेबांकडून आग्रा-रंगीले घराण्याच्या गायकीची रीतसर तालीम मिळाली व या गायकीचा सांगोपांग अभ्यास त्यांनी केला. त्या तालमीसाठी त्यांना बडोदा संस्थानाकडून दरमहा चाळीस रुपये शिष्यवृत्ती देण्यात आली होती.

‘मॉरिस कॉलेज ऑफ हिंदुस्थानी म्यूझिक’ या नावाने १९२६ मध्ये संगीत महाविद्यालयाची स्थापना झाली. पं. भातखंड्यांनी लखनौ येथे अण्णासाहेबांना या महाविद्यालयामध्ये शिकविण्यासाठी बोलावले आणि त्यांची महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून नेमणूक केली. या पदावर त्यांनी १९५७ पर्यंत अखंड काम केले.

पुढे १९२८ ते १९५६ या कालावधीत त्यांनी सांस्कृतिक, सांगीतिक व शैक्षणिक क्षेत्रात अनेक

र

महत्त्वाच्या व मानाच्या हुद्द्यांवर कार्य केले. त्यांत बहुतेक सर्व विद्यापीठांचे परीक्षक, अभ्यासक्रम समिती, केंद्र व राज्य सरकारांच्या सांस्कृतिक समित्या, आकाशवाणीच्या ऑडिशन समित्या व अखिल भारतीय आकाशवाणीच्या ऑडिशन बोर्डाचे उपाध्यक्षपद इत्यादींचा समावेश आहे. ते युनेस्कोचे सभासद होते.

सन १९४७ मध्ये त्या वेळचे उत्तर प्रदेशचे मुख्यमंत्री गोविंद वल्लभ पंत यांच्या हस्ते 'भातखंडे संगीत विद्यालया'चे 'भातखंडे विद्यापीठ' म्हणून नामांतर झाले व त्याचे मुख्य संचालक म्हणून रातंजनकरांची नेमणूक झाली. त्याच वर्षी त्यांना भातखंडे विद्यापीठाने 'गायनाचार्य' (डॉक्टर ऑफ म्यूझिक) ही पदवी दिली. सन १९४८ मध्ये त्यांच्या सल्ल्याने मुंबई येथील भारतीय विद्या भवनात कुलपती डॉ. के.एम. मुन्शी यांच्या मदतीने 'भातखंडे संगीत व नर्तन शिक्षापीठा'ची स्थापना झाली व रातंजनकर यांची सल्लागार समितीचे अध्यक्ष म्हणून नेमणूक केली. या पदावर ते फेब्रुवारी १९७४ पर्यंत, म्हणजे त्यांच्या निधनापर्यंत कार्यरत होते.

सन १९५२ ते १९६० या आठ वर्षांच्या कालावधीत त्यांनी आकाशवाणीच्या केंद्रीय ऑडिशन बोर्डाचे उपाध्यक्ष म्हणून काम केले. त्यांची १९५७ मध्ये मध्यप्रदेशातील खैरागड येथे इंदिरा कला संगीत विश्वविद्यालयाचे प्रथम उप-कुलपती म्हणून नेमणूक झाली. या पदावर त्यांनी १९६१ पर्यंत अखंड काम केले. सन १९६२ ते १९७४ पर्यंत मुंबईतील शीव येथील श्रीवल्लभ संगीतालयाचे सन्मान्य संचालक (ऑनररी डायरेक्टर) म्हणूनही त्यांनी कार्य केले.

मध्यंतरीच्या काळात त्यांना दीड वर्षांसाठी लखनौ येथे 'भातखंडे संगीत महाविद्यालया'ची जबाबदारी देण्यात आली. त्यांच्या सांगीतिक जीवनाच्या कारकिर्दीत त्यांनी भारतीय अभिजात रागदारी संगीताचे अध्ययन करणाऱ्यांसाठी प्रचंड साहित्य निर्माण केले. तसेच त्यांनी 'सुजान' या नाममुद्रेने ढंगदार अशा ८००हून अधिक बंदिशींची रचना व रागांची निर्मितीही केली. त्यांनी संगीत नाटके लिहिली व प्राचीन ग्रंथांचे अनुवादही केले. 'अभिनव गीत-मंजिरी' (तीन भागांत) या पुस्तकांत त्यांच्या बंदिशी प्रकाशित झाल्या. 'तान-संग्रह' (भाग १-३), पं. भातखंडे क्रमिक पुस्तक-मालिका भाग १ ते ४ मध्ये असलेल्या ४५ रागांवर आधारित तानांचा संग्रह, 'वर्णमाला' या पुस्तकात दाक्षिणात्य संगीतातील 'वर्णम'वर आधारित, हिंदुस्थानी आणि कर्नाटक रागांमध्ये संस्कृत भाषेत रचलेले वर्णम् आहेत.

त्यांनी उत्तर प्रदेश, बिहार व राजस्थान येथील उच्च-माध्यमिक शाळांतील अभ्यासक्रम व परीक्षांसाठी 'संगीत-शिक्षा' नामक (तीन भागांत) पुस्तके लिहिली. लखनौ येथील भातखंडे संगीत विद्यापीठाच्या अभ्यासक्रमासाठी 'अभिनव संगीत शिक्षा' (भाग १ व २) ही पुस्तके त्यांनी लिहिली.

रातंजनकरांनी हिंदुस्थानी संगीतातील तालांची लक्षणगीते 'ताल लक्षण-गीतसंग्रह' नावाचे पुस्तकही लिहून प्रकाशित केले. 'हिंदुस्थानी संगीत पद्धति की स्वरलिपि' नावाचे हिंदी पुस्तकही त्यांनी लिहिले व प्रकाशित केले. भारतातील विश्वविद्यालयांत संगीत विभागांच्या अभ्यासक्रमांसाठी मराठी व हिंदी भाषेत 'संगीत परिभाषा विवेचन' हे उपयुक्त पुस्तक त्यांनी लिहिले. त्यांनी नॅशनल बुक ट्रस्ट, नवी दिल्लीकरिता, तसेच महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळासाठी पं. वि.ना. भातखंडे यांचे चरित्र लिहिले व त्या पुस्तकाचे भारतातील सर्व प्रमुख भाषांमध्ये प्रकाशन झाले.

'ॲस्थेटिक आस्पेक्ट्स ऑफ इंडियाज म्यूझिकल हेरिटेज' हे पुस्तक म्हणजे रातंजनकरांच्या आयुष्यातील त्यांनी भारतीय संगीताचे प्रात्यक्षिक व शास्त्रीय घटकांवर लिहिलेले सर्व लेख व त्यांच्या एकूण सर्व व्याख्यानांचा संकल्पित संग्रह आहे.

रातंजनकरांनी हिंदुस्थानी संगीताचे मूळ आधारग्रंथ उ.पं. व्यंकटमखी लिखित, 'चतुर्दण्डिप्रकाशिका' व पं. रामामात्त्य लिखित, 'स्वर-मेलकलानिधि' या दोन

संस्कृत ग्रंथांचे हिंदी भाषांतर केले. पं. वि.ना. भातखंडे यांच्या 'श्रीमल्लक्ष्यसंगीतम्' या ग्रंथावर त्यांनी संस्कृतमध्ये भाष्य लिहून 'लक्ष्य संगीतकार' या नावाने ते प्रकाशित केले. 'संगीत-रत्नाकर' या ग्रंथातील 'स्वराध्याय' व 'रागाध्याय' या प्रकरणांचे सिंहावलोकन त्यांनी इंग्रजीमध्ये केले.

याव्यतिरिक्त कालिदास लिखित, 'कुमार-संभव' या महाकाव्याचे 'शिवमंगलम्' या नावाचे संगीत नाटक लिहिले व त्याचे निर्देशन केले.

त्याचप्रमाणे त्यांनी 'गोवर्धन-उद्धार' हे ब्रजभाषेत व 'झांसी की रानी लक्ष्मीबाई' हे हिंदीच्या 'खडी बोली' मध्ये अशी संगीत नाटके लिहिली व त्यांचे दिग्दर्शन केले. अखंड, नि:स्वार्थ संगीतसेवा व मौलिक योगदानासाठी केंद्र सरकारने १९५७ मध्ये आचार्य रातंजनकरजींना 'पद्मभूषण' या सन्माननीय पदवीने अलंकृत केले. ते प्रार्थना समाजाचे सदस्य होते.

– प्रा. यशवंत महाले

## रानडे, अशोक दामोदर

**संगीत शास्त्रकार, गायक, गुरू**

**२६ नोव्हेंबर १९३६ – ३० जुलै २०११**



प्रयोगनिष्ठ कला आणि शास्त्र परंपरा यांची योग्य सांगड घालून भारतीय संगीतातील विचारधारा पुढे नेणारे भारतीय संगीत क्षेत्रातील गाढे अभ्यासक, मार्मिक विश्लेषक, भारतीय संगीत-संस्कृतीच्या समृद्धतेचे दर्शन घडविणारे चिंतनशील भाष्यकार, सर्जनशील संगीतकार, प्रयोगशील गायक व साक्षेपी समीक्षक; संगीतशास्त्र, सौंदर्यशास्त्र, लोकसंगीतशास्त्र, आवाज जोपासनाशास्त्र, संस्कृतिसंगीतशास्त्र यांचे खास अभ्यासक असलेल्या अशोक रानडे यांनी संगीताच्या परिघात वावरणाऱ्या इतर अन्य विद्याशाखांची संगती लावून संगीत विचारांना आधुनिक दृष्टिकोनातून एक नवे परिमाण व दिशा दिली, तसेच संगीताबरोबर रंगभूमी, साहित्य यांचा अभ्यास व लेखनही केले.

अशोक दामोदर रानडे यांचा जन्म पुणे येथे झाला. वडील दामोदर अनंत रानडे मॅट्रिक उत्तीर्ण असून बॉम्बे प्रोव्हिन्शिअल कोऑपरेटिव्ह बँकेत काम करीत. साहित्य आणि संगीताची त्यांना आवड होती व ते कविताही करत. त्यांचे आजोबा कीर्तनकार आणि वैद्य होते. अशोक रानडे हे दीड वर्षांचे असतानाच त्यांच्या आई इंदिराबाईंचे निधन झाले. त्यानंतर सावत्र आई सुमती रानडे ऊर्फ माईंनीच त्यांचे संगोपन केले. त्या पूर्वाश्रमीच्या बोडस. पं. विष्णू दिगंबर पलुसकरांचे शिष्य पं. लक्ष्मणराव बोडस हे रानड्यांचे मामा होत.

अशोक रानड्यांचे शालेय शिक्षण गिरगावात, आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या शाळेमध्ये झाले. त्यानंतर महाविद्यालयीन शिक्षण विल्सन महाविद्यालयामधून झाले. त्यांनी १९६० साली मुंबई विद्यापीठाची कायद्याची पदवी घेतली, तसेच मराठी व इंग्रजी साहित्य घेऊन अनुक्रमे १९६२-६४ साली मुंबई विद्यापीठाची एम.ए.ची पदवी घेतली.

वयाच्या दहाव्या वर्षापासून ग्वाल्हेर, आग्रा आणि जयपूर घराण्याची गायकी आत्मसात केलेले व व्हायोलिनवादनात स्वत:चा बाज निर्माण करणारे विख्यात गायक-वादक पं. गजाननबुवा जोशी यांच्याकडे रानड्यांचे संगीतशिक्षण सुरू झाले. तब्बल दहा वर्षे (१९४८-१९५८) त्यांना गजाननबुवांची तालीम व सहवास लाभला. त्यानंतर आग्रा घराण्याचे पं. प्रल्हाद गानू (१९५८-१९६२), ग्वाल्हेर घराण्याचे पं. लक्ष्मणराव बोडस (१९६२ ते १९६६) व पुढे १९७० ते १९७४ या काळात प्रा. बी.आर. देवधर यांच्याकडे त्यांचे शिक्षण झाले. बी.आर. देवधरांकडून त्यांनी आवाज जोपासना-शास्त्राचेही धडे घेतले. पुढे आवाज जोपासनाशास्त्राचा अभ्यास स्वतंत्रपणे वाढवून गायनाबरोबरच रानड्यांनी रंगभूमीवरील भाषणांमधील आवाजाच्या वापराच्या अनुषंगाने आवाज साधनेचा अभ्यास केला. त्यांनी

र

१९७६ साली अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाची ‘आचार्य’ ही पदवी प्राप्त केली.

कायद्याची परीक्षा उत्तीर्ण केल्यावर १९६३ पासून जवळजवळ तीन वर्षे ते मुंबई आकाशवाणीवर कार्यरत होते. आकाशवाणीवर असतानाच त्यांच्या जीवनातील महत्त्वाची घटना घडली. आकाशवाणीवरच काम करणाऱ्या हमीदा इब्राहिमशी त्यांचा परिचय झाला. पुढे या परिचयाचे विवाहात रूपांतर झाले. हमीदा इब्राहिमच्या हेमांगिनी रानडे झाल्या. श्रीमती हेमांगिनी रानडे या हिंदी साहित्यातील कथा-कादंबरी लेखिका आहेत.

रानडे १९६५ ते १९६८ या कालखंडात सिद्धार्थ कॉलेज ऑफ कॉमर्स ॲण्ड इकॉनॉमिक्स या महाविद्यालयात मराठी आणि इंग्रजीचे प्राध्यापक होते. त्यांची १९६८ साली मुंबई विद्यापीठाच्या संगीत केन्द्राचे प्रथम संचालक म्हणून नियुक्ती करण्यात आली. त्यांनी १९६८ ते १९८३ पर्यंत हे संचालकपद सांभाळले. कार्यकुशल व्यवस्थापनाबरोबरच विविध प्रकारच्या संगीताचे ध्वनिमुद्रण, श्रवणसत्रे, संगीतसभा व प्रात्यक्षिकांचे आयोजन, हिंदुस्थानी संगीताबरोबरच पाश्चात्त्य संगीत व इतर संगीतविषयक पुस्तके, नियतकालिके आदींचा ग्रंथालयात समावेश अशा अनेक अभिनव योजना राबवून युनिव्हर्सिटी म्यूझिक सेंटर हे सांस्कृतिक आदानप्रदानाचे केंद्रच झाले होते. विशेष म्हणजे विद्यापीठात शिकविण्याकरिता त्यांनी चार प्रमुख घराण्यांच्या चार मातब्बर गायकांची गुरू म्हणून नेमणूक केली होती.

र

१९८३-८४ या काळात ते पुणे येथील अर्काइव्ह्ज ॲण्ड रिसर्च केंद्रात साहाय्यक संचालक (संशोधन) म्हणून होते. त्यानंतर १९८४ पासून १९९३ पर्यंत राष्ट्रीय संगीत नाट्य केंद्राच्या (एन.सी.पी.ए.) रंगभूमी विकास प्रकल्पाचे ‘प्रकल्प संचालक’ म्हणून त्यांनी काम पाहिले. ते १९९४ पासून अखेरपर्यंत स्वतंत्रपणे विविध कार्यशाळांचे आयोजन, पुस्तक-लेखन, संगीतविषयक व्याख्याने, गायनाची तालीम, संकल्पनाधिष्ठित मैफली अशा अनेक कार्यांत व्यग्र होते.

अशोक रानडे यांच्या संगीतलेखनाचा आवाका खूप मोठा आहे. त्यांनी संगीतविषयक विपुल लेखन केले. त्यांनी १९६०-६२ च्या दरम्यान आपल्या लेखनाच्या कारकिर्दीची सुरुवात केली. सुरुवातीला वृत्तपत्रांतून, मासिकांतून, नियतकालिकांतून संगीतातील विविध विषय घेऊन त्यांनी लिखाण केले. रानड्यांचा संगीत-लिखाणाविषयीचा व विचारांचा दृष्टिकोन हा एकांगी नव्हता. भारतीय संगीत म्हणजे फक्त रागदारी संगीतच नव्हे, तर व्यापक अर्थाने भारतात रुजलेल्या आणि अखंड वाहत असलेल्या, आदिम, लोक, धर्म, कला, जनसंगीत व संगमसंगीत अशा सहा संगीत कोटींतील सांगीतिक मूलतत्त्वांचा व संकल्पनांचा अभ्यास करण्याचे आवाहन स्वीकारायला हवे असा त्यांचा आग्रह होता. यातूनच भारतीय संस्कृतीत अस्तित्वात असलेल्या एकूण संगीत व्यवहाराचे समग्र आकलन होणे शक्य आहे असे त्यांना वाटे.

अशोक रानडे यांनी संगीतांतर्गत व संगीतपर विषयांची संगती लावून, विद्वत् परंपरा व प्रयोग परंपरा यांची सांगड घालून संगीताचा विचार एका व्यापक सामाजिक, सांस्कृतिक चौकटीतून केला. त्यामुळेच भारतीय संस्कृतीतील साहित्यशास्त्र, काव्यशास्त्र, तत्त्वज्ञान, नाट्यशास्त्र, धर्मपरंपरा, आयुर्वेद, योगशास्त्र, ध्वनिशास्त्र, संगीताचा इतिहास आणि संगीतशास्त्र, लोकसंस्कृती, लोकसंगीत, सौंदर्यशास्त्र, ध्वनिशास्त्र, मौखिक परंपरा, प्रत्यक्ष प्रयोगकला इत्यादी सर्व भारतीय विद्याशाखांच्या अभ्यासातून व वैचारिक मंथनातून आलेली संगीतविषयक समग्र दृष्टी स्वीकारून त्यांनी आपले संगीतविषयक विचार आपल्या लेखनातून मांडलेले दिसतात. विशेषत: संस्कृति-संगीतशास्त्राविषयीचे त्यांचे लिखाण महत्त्वाचे ठरते.

संगीत आणि संस्कृती यांचा एकमेकांशी आंतरिक संबंध असतो. संस्कृती बदलली तर संगीत बदलते आणि संगीत बदलले तर संस्कृती बदलाचे ते निदर्शक असते. संस्कृति-संगीतशास्त्राचा विचार पाश्चात्त्यांच्या सांगीत दृष्टिकोनातून आशियाई संगीतावर होत असे.

रानड्यांनी भारतीय संस्कृति-संगीताचा विचार भारतीय दृष्टिकोनातून केला. याबरोबर इराण, अफगाण, पोर्तुगाल, पर्शिया अशा भारताच्या आसपासच्या परदेशांतील संगीताचा तौलनिक अभ्यासही त्यांनी केला. हे भारतीय संगीत विचारातील रानड्यांचे महत्त्वाचे योगदान ठरावे. त्यामुळे त्यांच्या संगीत-विचारांना एक वेगळेच परिमाण प्राप्त झाले.

आजवर रानड्यांची इंग्रजी आणि मराठी या दोन्ही भाषांतून एकंदर २१ पुस्तके प्रकाशित झाली आहेत. १९७१ साली 'संगीताचे सौंदर्यशास्त्र' हे त्यांचे पहिले पुस्तक प्रकाशित झाले. त्यानंतर लोकसंगीतशास्त्र, संगीतशास्त्र, आवाज जोपासनाशास्त्र, संस्कृतिसंगीतशास्त्र, संगीत आणि नाटक, महाराष्ट्रातील संगीत इतिहास, मराठी संगीत रंगभूमी, रागदारी संगीतात वापरल्या जाणाऱ्या संज्ञांचा कोश, अशा विविध विषयांवर त्यांची पुस्तके प्रकाशित झाली. या सर्वच पुस्तकांचा परामर्ष घेणे वा परिचय देणे इथे शक्य नाही; पण पुस्तकांची जंत्री खाली दिलेली आहे, त्यावरून विषयाची व्यापकता लक्षात यावी.

**संगीतशास्त्र आणि संस्कृतिसंगीतशास्त्र:** संगीताचे सौंदर्यशास्त्र (१९७१), लोकसंगीतशास्त्र (१९७५), स्ट्रॅव्हिन्स्कीचे सांगीतिक सौंदर्यशास्त्र (१९७५), कीवर्ड्ज अ‍ॅण्ड कॉन्सेप्ट्स (१९९०), इंडोलॉजी अ‍ॅण्ड एथ्नोम्युझिकॉलॉजी (१९९२), एसेज इन एथ्नोम्युझिकॉलॉजी (१९९८), रिफ्लेक्शन्स ऑन म्युझिकॉलॉजी अ‍ॅण्ड हिस्टरी (२०००), कन्साइज डिक्शनरी ऑफ म्युझिक (२००६), पर्स्पेक्टिव्ह ऑन म्युझिक (२००८), संगीत विचार (२००९).

**महाराष्ट्रातील संगीत :** स्टेज म्युझिक ऑफ महाराष्ट्र (१९८६), महाराष्ट्र आर्ट म्युझिक (१९८९).

**उत्तर हिन्दुस्थानी रागसंगीतातील गायक-गायिकांच्या गायकीची समीक्षा व चिकित्सा :** ऑन म्युझिक अ‍ॅण्ड म्युझिशिअन्स ऑफ हिन्दुस्थान (१९८४), मला भावलेले संगीतकार (२०१०), दे लिट् द वे (२०१०).

**भारतीय संगीताच्या इतिहासाचे परिचयात्मक पुस्तक :** हिन्दुस्थानी म्युझिक (इंग्रजी आणि मराठी) (१९९७).

**रंगभूमीसंबंधी :** म्युझिक अ‍ॅण्ड ड्रामा (१९९१), भाषणरंग (१९९५), भाषणविषयक नाट्यविचार (२००१).

**हिंदी चित्रपटसंगीत :** हिंदी फिल्म साँग (२००६), चित्रपट गीत परंपरा आणि आविष्कार (२०१०).

याखेरीज अनेक नियतकालिके, वृत्तपत्रे, मासिके, संशोधनपत्रिका इत्यादींतून विविध विषयांवर त्यांचे लेखन प्रसिद्ध झाले आहे. विशेष उल्लेख करायचा झाला तर १९९५ साली 'महाराष्ट्र टाइम्स' या वृत्तपत्रातून मराठी भावसंगीताचा वेध घेणारी 'किरणांची सावली' ही लेखमालिका व 'लोकसत्ते'तील संगीतविषयक वैविध्यपूर्ण रंजक अशी 'संगीत-संगती' ही मालिका.

इंग्रजी, मराठी या भाषांवर प्रभुत्व, या दोन्ही भाषांतील साहित्याचा व्यासंग व कायद्याच्या भाषेचा अभ्यास, त्यामुळे रानड्यांच्या लेखनाचा एक वैशिष्ट्यपूर्ण ठसा निर्माण झाला आहे. डॉ. अशोक रानडे यांच्या लेखनाला वैचारिक आणि तात्त्विक बैठक असते. विषयाच्या मूळ गाभ्याशी जाऊन त्या विषयात कार्यान्वित होणाऱ्या संकल्पना मांडून अतिशय शिस्तबद्ध पद्धतीने, संकल्पना स्पष्ट करत तार्किक सुसंगती राखून ते विषय व आशयाचे रूप स्पष्ट करतात. विषयानुरूप योग्य संज्ञा आणि परिभाषांचा चपखल व नेमका अर्थ दर्शविणारा उपयोग त्यांच्या लिखाणातून दिसतो. रंजकता, गूढता, विशेषणांची खैरात व फापटपसारा न मांडता अतिशय आटोपशीर, नेमके, मुद्देसूद, विषयाची मर्यादा व गांभीर्य राखून केलेले त्यांचे लिखाण असते. मर्मग्राहक दृष्टी, अभ्यासपूर्ण व मार्मिक विश्लेषण ही त्यांच्या लेखनाची थोडक्यात वैशिष्ट्ये होत.

किराणा घराण्याच्या गंगूबाई हनगल यांच्या अल्बमचे संपादन (१९८८), तसेच संगीत नाटक

र

अकादमीच्या ‘हिन्दी फिल्म म्यूझिक’ या विशेषांकाचेही संपादन त्यांनी केले आहे. याबरोबर ‘हास्य विनोद आणि सुखात्मिका’ (१९९२), ‘कथाशताब्दी’ (१९९३) या दोन ग्रंथांचे त्यांनी विजया राजाध्यक्षांबरोबर संपादन केले असून, ‘संगीत कला विहार’च्या ‘जनसंगीत’ (२०००), ‘लोकसंगीत’ (१९९८) व ‘धर्मसंगीत’ (१९९९) या विशेषांकांचे अतिथी संपादक म्हणून त्यांनी काम पाहिले.

**संकल्पनाधिष्ठित कार्यक्रम (थीम प्रोग्रॅम्स)**

अशोक रानडे यांनी विविध ‘थीम्स’ (विषय-संकल्पना) घेऊन अतिशय दर्जेदार असे रंगमंचीय कार्यक्रम सादर केले. खरे म्हटले तर हाही एक संगीत-संस्कृती दर्शनाचा सुंदर आविष्कारच होता. भारतीय जनव्यवहारात संगीताचा वापर व आविष्कार किती वैविध्यपूर्ण रितीने झाला आहे व त्याची नानाविध रूपे कशी होती हे रानड्यांनी या कार्यक्रमांतून आपल्या सहकाऱ्यांसह मांडले होते. या कार्यक्रमाची संकल्पना, संगीत आणि निरूपण खास रानड्यांचे होते. असे १९ कार्यक्रम रानड्यांनी सादर केले. रागदारी संगीतातील धृपद, धमार, ख्याल, ठुमरी, टप्पा, तराणा आदी प्रकार, लोकसंगीतातील ओवी, भारूड, लावणी, वासुदेव गीत, वेगवेगळ्या संतकवींची पदे व रचना, मराठी नाट्यसंगीत, भावसंगीत इत्यादी संगीतप्रकारांचे सादरीकरण यांतून होत असे. ओघवत्या, स्पष्ट व प्रासादिक वाणीतील रानड्यांचे विद्वत्तापूर्ण संदर्भासहित विश्लेषणात्मक निरूपण हा या कार्यक्रमाचा विशेष भाग होता. कार्यक्रमांच्या विषयांतील वैविध्यता खालील कार्यक्रमांच्या शीर्षकांवरून यावी : १) नाट्यसंगीताची वाटचाल (१९८४), २) मानापमानातील गाणी (१९८६), ३) सावन (१९८८), ४) बैठकीची लावणी (१९८९), ५) देवगाणी (१९९१), ६) संगीत रंग (१९९२), ७) स्वरचक्र (१९९३), ८) रंगवसंत (१९९३), ९) नाट्यसंगीताचे मराठी वळण (१९९४), १०) राधा (१९९५), ११) त्रिभंग ते अभंग (१९९५), १२) रचना ते बंदिश (१९९७), १३) गायकीचे वळण (२०००), १४) संचित (२००४), १५) चंद्रभैरवी (२००५), १६) गीतिभान (२००७), १७) संतांची वाटचाल (२००७), १८) कला गणेश (२००८), १९) रामगाणे (२००९). समाज, धर्म, शास्त्र, परंपरा, उत्सव, देवदेवता, दिनचक्र-ऋतुचक्र, जीवन-मृत्यू, दैनंदिन जीवनातील लौकिक सुखदु:खादी भावना अशा कितीतरी विषयांशी-घटकांशी भारतात संगीताचे खोलवर नाते जडलेले आहे व त्याची अभिव्यक्ती किती तऱ्हांनी झाली आहे, हे या कार्यक्रमांतून कळत असे.

**रंगभूमीविषयक कार्य :** रानडे १९८४ ते १९९४ या काळात राष्ट्रीय संगीत नाट्य केंद्राच्या रंगभूमी विकास प्रकल्पाचे संचालक होते. या प्रकल्पांतर्गत डॉ. रानड्यांनी आपल्या सहकाऱ्यांसह रंगभूमीशी संबंधित विविध प्रकारची माहिती जमवून दस्तऐवजीकरणाचे कार्य केले. मराठी, तसेच अमराठी रंगभूमीवरील नट, नाटककार, दिग्दर्शक, लेखक, संगीतकार, वेशभूषाकार, नेपथ्यकार, प्रकाशयोजक अशा विविध रंगकर्मींच्या मुलाखती, नाट्यसंस्थांची माहिती व इतर रंगभूमीविषयक तपशिलांच्या नोंदी केल्या. याशिवाय विविध विषयांच्या, आवाज जोपासनाशास्त्र, तत्कालस्फूर्ती, अशा अनेक कार्यशाळांचे, चर्चासत्रांचे, शिबिरांचे आयोजन व संचालनही केले. ‘रंग अंतरंग’ या एनसीपीएने काढलेल्या अंकांतून, तसेच ‘फॅक्ट्स अ‍ॅण्ड न्यूज’ या इंग्लिश पत्रिकेतून ही माहिती प्रकाशित करण्यात आली आहे. रंगभूमीशी संबंधित रानड्यांनी लिहिलेली विविध विषयांवरील टिपणेही यांत आहेत.

रानड्यांनी अकरा नाटकांना, काही लघुपटांना व एका चित्रपटाला संगीत दिले असून आंतरराष्ट्रीय सुलेखन प्रदर्शन ‘आकार’ (१९८८), ‘डिस्कव्हरी ऑफ इंडिया’ (१९८९, नेहरू सेन्टर, मुंबई) आणि ‘वॉक थ्रू फतेहपूर सिक्री’ यासाठी संगीत आयोजित केले होते. त्यांनी ‘चव्हाटा’ (१९७१), ‘मिथ मेकर्स’ (१९७१), ‘सोनार बांगला’ (१९७२), ‘माता द्रौपदी’ (१९७२), ‘देवाजीने करुणा केली’ (१९७३), ‘संध्या छाया’ (१९७९), ‘एक झुंज वाऱ्याशी’ (१९८८),

र

‘काळा वजीर पांढरा राजा’ (१९९३), ‘टेम्प्ट मी नॉट’ (१९९३), ‘राहिले दूर घर माझे’ (१९९७) या नाटकांना, ‘बाबा आमटे’ आणि ‘सिंगिंग लाइन’ इत्यादी लघुपटांना, तसेच ‘देवी अहिल्याबाई होळकर’ (२००३) या हिंदी चित्रपटाला संगीत दिले आहे. ‘एक झुंज वाऱ्याशी’ या नाटकाला महाराष्ट्र राज्याच्या व्यावसायिक रंगभूमी स्पर्धेचे उत्तम संगीत दिग्दर्शनाचे पारितोषिक लाभले आहे.

**सर्जनशील गायक, उत्तम मार्गदर्शक गुरू :** रानड्यांच्या जीवनात ‘संगीत’ केंद्रस्थानी असूनही व्यावसायिक गायक न होण्याचा निर्णय त्यांनी तरुण-वयातच घेतला होता. मात्र ते उत्तम सादरीकरण करीत. ग्वाल्हेर, आग्रा, जयपूर या घराण्यांची तालीम मिळालेल्या रानड्यांच्या संग्रही २५० राग आणि २५०० च्या आसपास बंदिशी होत्या. धृपद, ख्याल, टप्‌खयाल, ख्यालनुमा, अष्टपदी, चतुरंग, तराणे, ठुमरी, दादरे, पुराना गझल असे नाना प्रकार त्यांच्या संग्रही होते. याशिवाय त्यांनी ‘रसिकरंग’ या नावाने अनेक बंदिशी बांधल्या आहेत. तसेच काही जुन्या बंदिशींची पुनर्रचना व काही जुन्या (तानसेन, बैजू, सूरदास इत्यादी) संहितांची स्वरयोजनाही त्यांनी केली आहे. रानडे आपल्या गायनाच्या बैठकीतून नेहमीच काही नवीन, वेगळे, जे गायले जात नाहीत असे राग, बंदिशी, संगीत प्रकार मांडत. रचनाबंधाची (बंदिशींची) जाण ठेवून केलेले नेटके व पद्धतशीर आविष्करण हे त्यांचे वैशिष्ट्य होय.

रानड्यांच्या शिष्यवर्गात केदार बोडस, मिलिंद मालशे, कल्याणी साळुंके, सुरेश बापट, शुचिता आठल्येकर यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. याव्यतिरिक्त त्यांच्या कार्यक्रमांतील तालमींतून, तसेच खाजगीरीत्या अनेकांना त्यांचे मार्गदर्शन लाभले. तसेच रंगभूमीवरील अनेक अभिनेत्यांना व अभिनेत्रींनाही आवाज-जोपासनाबाबत त्यांचे मार्गदर्शन लाभले आहे

डॉ. अशोक रानड्यांना देशाविदेशांतील संगीतविषयक विविध चर्चासत्रांतून आमंत्रित करण्यात आले होते. रशिया, लंडन, मॉरिशस, चीन, पाकिस्तान, जपान, जर्मनी, अमेरिका, इटली अशा विविध देशांत त्यांनी संगीतविषयक व्याख्याने, चर्चासत्रे संगीताचा प्रचार, प्रसार या निमित्ताने भेटी दिल्या आहेत.

त्यांनी आवाज जोपासनाशास्त्र, संगीतशास्त्र, संगीताचे सौंदर्यशास्त्र, बंदिश, संगीत रसग्रहण, घराणे इत्यादी विषयांचा अभ्यासक्रम, तसेच कार्यशाळांचे आयोजनही केले आहे. यमन, बिहाग, भैरव या रागांच्या कार्यशाळाही त्यांनी घेतल्या आहेत.

अशोक रानडे यांनी रामकृष्णबुवा वझे, ओंकारनाथ ठाकूर, केसरबाई केरकर, मा. कृष्णराव यांबरोबरच हिंदी चित्रपटसंगीत क्षेत्रातील संगीत दिग्दर्शक एस.डी. बर्मन, मदन मोहन, गायक के.एल. सैगल इत्यादी गायक, गायिका, संगीतकार यांची ध्वनिमुद्रणे वाजवून त्यांच्या संगीताचे विश्लेषण व वैशिष्ट्ये सांगणारे कार्यक्रम केले.

त्यांनी १९७०-८० च्या दशकात दूरदर्शनवर होणाऱ्या ‘प्रतिभा आणि प्रतिमा’ कार्यक्रमांतून गायकांच्या मुलाखती घेतल्या, तसेच ‘पिंपळपान’ व ‘आकाशदीप’ या कार्यक्रमांतून विविध क्षेत्रांतील मान्यवरांच्या मुलाखतीही त्यांनी घेतल्या आहेत.

‘बैठकीची लावणी’ (१९८९) आणि ‘देवगाणी’ (१९९१) या रानड्यांच्या दोन कार्यक्रमांच्या ध्वनिफिती निघाल्या असून देवगाणीची ध्वनिचकतीही आता निघाली आहे. याबरोबरच गीतिभान (२००६), संतांची वाटचाल (२००७), कलागणेश (२००८) व रामगाणे (२००९) या कार्यक्रमांच्या ध्वनिचकत्या निघाल्या आहेत. अंडरस्कोअर रेकॉर्ड्स प्रा.लि. या कंपनीने ‘संचय’ हा यमन, बिहाग व भैरव या रागांतील बंदिशींच्या संग्रहांचा एक अल्बम डॉ. रानड्यांच्या आवाजात काढला आहे. यात एकंदर बत्तीस रचना आहेत. यांत विलंबित, द्रुत खयाल, टप्‌खयाल, तराणा, ठुमरी, बंदिश की ठुमरी, दादरा, सावन, होरी अशा अनेक शास्त्रोक्त आणि उपशास्त्रीय संगीतातल्या

रचना रानड्यांनी सादर केल्या आहेत. याशिवाय रागाची ऐतिहासिक माहिती, संगीतशास्त्रीय माहिती, बंदिशींचा अर्थ, वैशिष्ट्ये व आशय अशा अनेक तपशिलांनी भरलेले रानड्यांचे निरूपण हे ‘संचय’चे खास वैशिष्ट्य.

‘टागोर चेअर ह्युमॅनिटीज’ या सन्माननीय अध्यासनाकरिता १९९४ ते ९५ या काळात बडोद्याच्या एम.एस. युनिव्हर्सिटीने त्यांची नियुक्ती केली होती. दिल्लीच्या युनिव्हर्सिटी ग्रँट कमिशनने १९९१-९२ या कालखंडात ‘नॅशनल लेक्चरर इन म्यूझिक’ हे पद त्यांना दिले होते. जवाहरलाल नेहरू विद्यापीठाच्या ‘स्कूल फॉर ॲस्थेटिक्स ॲण्ड आर्ट्‌स’मध्ये त्यांना ‘फोर्ड व्हिजिटिंग फेलोशिप’ प्रदान करण्यात आली होती.

अशोक रानडे यांना महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेतर्फे, ‘मा. कृष्णराव फुलंब्रीकर’ पुरस्कार (१९९८), संगीत संशोधनाबद्दल ‘म्यूझिक फोरम’चा ‘म्यूझिक फोरम’ पुरस्कार (१९९८), ‘संगीत-विचार’ या पुस्तकासाठी पुरस्कार (२००९), महाराष्ट्र सरकारचा ‘कलादान’ पुरस्कार (२००७), महाराष्ट्र सरकारचा समीक्षात्मक लेखनाकरिता असलेला ‘कुरुंदकर’ पुरस्कार (२०१०), ‘चतुरंग प्रतिष्ठान’चा ‘जीवन गौरव’ पुरस्कार (२०१०), संगीत नाटक अकादमी, दिल्लीचा पुरस्कार (२०११) आदी पुरस्कार मिळाले आहेत.

र

याशिवाय कोलसन इंडोलॉजी फेलोशिप, वोल्फसन कॉलेज ऑक्स्फर्ड (यु.के.), संस्कृति-संगीतशास्त्राकरिता क्वीन्स युनिव्हर्सिटीमध्ये, अशा अनेक विदेशांतील विद्यापीठांतून प्राध्यापक म्हणून त्यांना सन्मानाने आमंत्रित केले होते.

संगीतात सतत शोध घेणाऱ्या या व्रतस्थ व अखंड साधकाचे निधन मुंबईत अल्पशा आजाराने झाले. ‘मर्मज्ञ’ हा डॉ. रानडे यांच्या कार्याचा वेध घेणारा गौरवग्रंथ यांच्या पश्चात २०१२ साली प्रकाशित झाला. त्यांच्या नावे ‘डॉ. अशोक दा. रानडे मेमोरिअल ट्रस्ट’ स्थापन करण्यात आले असून त्याद्वारे विविध विद्वानांची व्याख्याने, कलावंताचे आविष्कार आयोजित करण्यात येतात. मुंबईतील ‘म्युझिक फोरम’तर्फे त्यांच्या नावे ‘डॉ. अशोक दा. रानडे स्मृति पुरस्कार’ हा कलाक्षेत्रातील तज्ज्ञ, अनुभवी व्यक्तीस देण्यात येतो.

– माधव इमारते

## रानडे, गणेश हरी

**संगीत शास्त्रकार**

**१ ऑक्टोबर १८८७ – १० मार्च १९६६**



गणेश हरी रानडे यांचा जन्म सांगलीला झाला. त्यांनी मराठी साहित्य आणि संगीत या दोन्ही क्षेत्रांत अभ्यास केला, तसेच ते विज्ञानाचे पदवीधरही (बी.एस्सी.) होते. सांगलीच्या विलिंग्टन महाविद्यालयामध्ये व १९४० नंतर १९५८ पर्यंत पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये त्यांनी भौतिकशास्त्र या विषयाचे अध्यापक म्हणून काम केले.

पं. गणपतीबुवा भिलवडीकर व नंतर पं. गुंडोबुवा इंगळे यांच्याकडून गणेश रानडे यांना ग्वालियर घराण्याची तालीम मिळाली. गायनाबरोबरच संगीतशास्त्रातही ते पारंगत होते. मुंबई सरकारच्या ‘संगीत शिक्षण समिती’च्या सचिवपदी त्यांची नेमणूक झाली होती. यामुळे त्यांना तत्कालीन सांगीतिक शैक्षणिक स्थितीचा वेध घेता आला. यातूनच त्यांच्याकडून ‘हिंदुस्थानी म्यूझिक’ (ॲन आउटलाइन ऑफ इट्स फिजिक्स ॲण्ड ॲस्थेटिक्स) या इंग्रजी पुस्तकाचे लिखाण झाले. मुंबई विद्यापीठातर्फे या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनार्थ अर्थसाहाय्य लाभले होते. या पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९५२ मध्ये निघाली. या पुस्तकाचे स्वागत भारतात इतरत्रही झाले. विविध संगीत विद्यालयांच्या पाठ्यक्रमांतही हे पुस्तक लावले गेले होते.

संगीत आणि भौतिकशास्त्र व सौंदर्यशास्त्र यांची संगती लावून भारतीय संगीतातील अनेक घटकांवर यात प्रकाश टाकलेला दिसतो. भारतीय संगीताचा ऐतिहासिक आढावा, संगीतोपयोगी ध्वनी, संगीत सप्तकाचे उगमस्थान, वैदिक श्लोकगायन व मंत्रोच्चार, सामगान, रसचर्चा, वृत्त-छंद, लोकसंगीत इत्यादी विषयांचा यात समावेश आहे.

त्यांची १९५१ मध्ये अखिल भारतीय सांस्कृतिक अधिवेशनात संगीत विभागाचे सदस्य म्हणून नियुक्ती झाली होती. त्यांना १९५५ मध्ये युनेस्को म्यूझिक कॉन्फरन्सला (मनिला, फिलिपाइन्स) भारतीय सरकारतर्फे पाठविण्यात आले. संगीत नाटक अकादमीशीही त्यांचा संबंध होता. आकाशवाणीवरून गणेश रानडे यांचे संगीतविषयक भाषण प्रसारित झाले होते, तसेच संगीतासंबंधी त्यांचे अनेक लेख विविध मासिकांतूनही प्रकाशित झाले होते. त्यांनी 'संगीताचे आत्मचरित्र' हे पुस्तक लिहिले. तसेच 'म्युझिक इन महाराष्ट्र' हा त्यांचा ग्रंथ महाराष्ट्र सरकारने १९६७ साली प्रकाशित केला. त्यांचे पुण्यात निधन झाले.

— माधव इमारते

## रानडे, जनार्दन लक्ष्मण

***जे.एल. रानडे***

**भावगीत गायक**

**२७ मार्च १९०५ — १९ डिसेंबर १९९८**



मराठी भावगीत गायनाच्या वाटचालीतले अगदी आरंभीच्या काळातील अध्वर्यू गायक जे.एल. तथा जनार्दन लक्ष्मण रानडे यांचा जन्म आजोळी, इचलकरंजी येथे झाला. त्यांचे आजोबा कीर्तनकार दातार यांच्याकडून त्यांना संगीताचा वारसा लाभला. रानड्यांचे वडील सांगली संस्थानात उपनिबंधक (सब-रजिस्ट्रार) होते. त्यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण सांगलीच्या सिटी विद्यालय व विलिंग्डन महाविद्यालय येथे इंटरपर्यंत झाले. शालेय कार्यक्रमांत, गणपती उत्सवांतील मेळ्यांत या बालकलाकारातील चमक दिसू लागली. त्यांचे संगीताचे प्रारंभिक शिक्षण सांगलीस मोरूबुवा गोंधळी व गोडबोले या दोघांकडे झाले. शालेय वयातच त्यांनी पं. भातखंड्यांचे संगीतशास्त्रविषयक ग्रंथ वाचले होते व संगीत संशोधन करणाऱ्या देवल आणि क्लेमेंट्स यांच्याशीही त्यांनी ओळख करून घेतली होती.

वडील, आई व आजी यांचे अनुक्रमे १९११,१९२१ व १९२४ साली निधन झाले आणि कौटुंबिक जबाबदारी अंगावर पडल्याने संगीताची रुची व गती असूनही, त्या काळी संगीतास सामाजिक प्रतिष्ठा फारशी नसल्याने जनार्दन रानडे यांना नोकरी पत्करावी लागली. रावसाहेब देवलांच्या शिफारसीने त्यांना क्लेमेंट्स यांनी १९२८ साली जिल्हा न्यायालयात लेखापालाची नोकरी दिली व सांगली सोडून ते अहमदनगर येथे गेले. न्यायालयाच्या रूक्ष वातावरणातही क्लेमेंट्स यांनी रानडे यांच्या संगीताभिरुचीस उत्तेजन दिले, त्यांना हार्मोनिअमची स्वरजुळणी शिकवली. नगर (१९२८ ते १९४९), कोल्हापूर (१९४९ ते १९५३), पुणे (१९५३ ते १९५८) या ठिकाणी त्यांच्या बदल्या झाल्या व १९५८ साली ते न्यायालयातून शिरस्तेदाराच्या पदावरून निवृत्त झाले.

नोकरीच्या कालखंडात नगरहून दर शनिवारी-रविवारी पुण्यास जाऊन ते पं. विनायकराव पटवर्धन यांच्याकडून ग्वाल्हेर गायकी शिकले. त्यांनी जगन्नाथबुवा पुरोहित व हिराबाई बडोदेकर यांचेही मार्गदर्शन घेतले होते. जी.एन. जोशी व पंडितराव नगरकर यांसारखे गायक रागसंगीतासह भावपदे गाऊ लागले होते व रानडे यांनीही याच मार्गाने जाण्याचे ठरवले. कोल्हापूरला बालगंधर्व व गोविंदराव टेंबे यांना त्यांनी आपले गायन ऐकवले

र

आणि या दोघांच्या शिफारसपत्राने रानड्यांसाठी मुंबई आकाशवाणी व एच.एम.व्ही. कंपनीचे द्वार उघडले. त्यांनी १९३३ मध्ये आकाशवाणीवर आपला प्रथम कार्यक्रम दिला व पुढे सुमारे ५० वर्षे ते आकाशवाणीसाठी गात होते.

त्यांचा १९३२ ते १९५२ हा सांगीतिकदृष्ट्या अत्यंत बहराचा काळ होता. या काळात नाट्यसंगीताची पीछेहाट सुरू होऊन भावगीत व चित्रपटगीत हे दोन नवे प्रकार मराठी रसिकांस खुणावत होते. भावगीत गायनाचा हा नवा प्रकार रानडे यांनी आपल्या गाण्यातून रुजवला. रानडे आपल्या मैफलीत एखादी रागदारी बंदिश, ठुमरी, नाट्यगीत, भावगीते, भजने गात. त्यांची ख्यालगायनाची तयारी विशेष नसली तरी गाणे रंजक, चटकन मोहवणारे, भावपूर्ण, तरीही तयारीचे असे. स.अ. शुक्ल, बाबूराव गोखले, ग.दि. माडगूळकर, दीक्षित यांसारख्या कवींची पदे ते स्वत: चाली लावून गात असत. 'मराठी भाषेतील रागाधिष्ठित, विस्तारक्षम बंदिशीसारखी गीते' असे त्यांच्या भावगीतांचे स्वरूप होते. भावगीताच्या या बाल्यावस्थेत त्यावर अर्थातच तत्कालीन कलासंगीत व नाट्यसंगीताचा प्रभाव असल्याने रानड्यांच्या भावगीत गायनात भावतत्त्वापेक्षा रागतत्त्वावर भर होता. रानडे पदे गाताना मनात त्याचा संपूर्ण आराखडा ठेवत असल्याने गीतांना बंदिस्त मोहकपणा येई. ध्वनिवर्धकाला अतिशय अनुकूल, स्वच्छ, सुरेल आवाज, सुस्पष्ट व माधुर्यपूर्ण शब्दोच्चार, स्वरोच्चारांतील सूचक विरामचिन्हे, संयत आलाप, लडीदार ताना, खटके, मुरकी इ. अलंकारांचे कोरीव काम, नेमके उच्चार, पल्लेदार ताना, तानांच्या तिहाया, ढंगदारपणा या गुणांमुळे त्यांचे भावगीत अल्पावधीतच तत्कालीन मराठी रसिकवर्गात, खास करून युवक वर्गात प्रिय ठरू लागले.

एच.एम.व्ही. कंपनीने त्यांची पहिली ध्वनिमुद्रिका जुलै १९३४ मध्ये काढली. स.अ. शुक्ल या कवींची 'कलिका गोड नाचे', 'नभी हसली चंद्रिका', 'कुणी काय जादू केली' ही त्यांची काही पहिली गाजलेली गीते होत. एच.एम.व्ही.ने १९३४ ते १९५२ या अठरा वर्षांत त्यांच्या सुमारे ८० मराठी भावगीते, हिंदी बंदिशी, पदांच्या ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध केल्या. गौडमल्हार, नंद, शुद्धसारंग, कल्याण, सूरमल्हार, बिलावल, तोडी, मालकंस, बिहाग, बागेश्री, भीमपलास, पटदीप, खंबावती, पूरिया, मारुबिहाग हे राग, तसेच 'राम की महिमा अपरंपार'सारखी हिंदी भजनेही त्यांनी ध्वनिमुद्रिकांसाठी गायली. त्यांची मराठी भावपदे साधारणत: काफी, खमाज, पिलू, तिलंग, देस, तिलक कामोद, पहाडी भैरवी या रागांत आहेत; मात्र काही वेगळ्या वा त्या काळी अप्रचलित असणाऱ्या रागांतही त्यांनी 'चांद हसरा पुनवेचा' (मधुवंती), 'पायी पैंजण वाजती' (पूरिया कल्याण), 'नाजूक कुणी ललना' (मुलतानी) अशी पदे गायली. प्राय: ते स्वत:च गीतांस चाल लावून गात, मात्र क्वचित 'हासत ये' (श्रीधर पार्सेकर), 'सांग पोरी सांग' (दत्ता वाळवेकर) अशी गीते अन्य संगीतकारांसाठीही गात.

या ध्वनिमुद्रिकांमुळे जनार्दन रानडे हे महाराष्ट्रातच नव्हे, तर पूर्ण भारत, आफ्रिका व आशियाई देशांत रसिकप्रिय गायक ठरले. 'अति गोड गोड ललकारी' या गीताच्या तर ५००० ध्वनिमुद्रिका खपल्या व एच.एम.व्ही.ने त्यांचा खास सत्कार केला. रानडे यांनी तीन मिनिटांच्या ध्वनिमुद्रिकेनुसार कमी वेळात, पण रंजक वाटेल असा आपला एक गाण्याचा साचा तयार केला व तो अत्यंत यशस्वी ठरला होता. त्यामुळे एच.एम.व्ही. नवोदित गायकांस ध्वनिमुद्रिकेसाठी असे साचेबंद गाण्याचे तंत्र शिकवण्यास त्यांना कधीकधी पाचारण करत असे व याद्वारे त्यांनी मल्लिकार्जुन मन्सूर, सुधीर फडके इ. कलाकारांस ध्वनिमुद्रिकेसाठी कसे गावे याचे प्रशिक्षणही दिले होते !

रानडे यांनी १९५८ ते १९६० अशी दोन वर्षे गारगोटी येथे मौनी विद्यापीठात लेखापालाची नोकरी केली. यानंतर १९६० ते १९८० अशी वीस वर्षे ते वर्धा येथील महिला आश्रमात संगीत शिक्षक म्हणून कार्यरत

होते. ते १९८० नंतर सांगलीस परतले व आपल्या ‘ललकारी’ या निवासस्थानी त्यांनी संगीत विद्यालय सुरू केले. तेथे अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाचे परीक्षा केंद्र सुरू केले, ज्याद्वारे अनेक विद्यार्थ्यांस ते मार्गदर्शन करत, विशेषत: परीक्षांची तयारी अत्यंत उत्तम रितीने करून घेत. रानडे १९६१ ते १९९६ अशा दीर्घ काळासाठी अ.भा.गां.म.वि. मंडळाचे परीक्षक व मार्गदर्शक होते. १९८२ साली कर्नाटक विद्यापीठाच्या संगीत विभागाने त्यांना पदव्युत्तर विद्यार्थ्यांसाठी विशेष मार्गदर्शक म्हणून निमंत्रित केले होते.

जाहीर जलसे, खाजगी मैफलींसह आकाशवाणीच्या दिल्ली, हैदराबाद, मुंबई, पुणे, सांगली, औरंगाबाद, नागपूर इ. अनेक केंद्रांवरून रानडे यांनी रागदारी व भावगीते दोन्हींचे असंख्य कार्यक्रम केले. पुणे केंद्रावरून डिसेंबर १९८६ मध्ये त्यांनी स्वेच्छेने सेवानिवृत्ती घेतली. वयाच्या नव्वदाव्या वर्षी आद्य मराठी नाट्यकार विष्णुदास भावे यांच्या ‘सीता स्वयंवर’ या नाटकाच्या दीडशेव्या वर्षानिमित्त या नाटकास, तसेच कालिदासाच्या ‘मालविकाग्निमित्रम्’ या संस्कृत नाटकास त्यांनी सांगली आकाशवाणीसाठी संगीत दिले.

रानडे १९९२ साली पुण्यातील वृद्धाश्रमात दाखल झाले. ब्याण्णवाव्या वर्षापर्यंत ते गायन, मार्गदर्शन, मुलाखती इ. उपक्रमांत सुदृढतेने कार्यरत होते. निवारा वृद्धाश्रमात त्यांचे वृद्धापकाळाने निधन झाले. त्यांची १९७१ साली मुंबई दूरदर्शनवर ‘प्रतिभा आणि प्रतिमा’ या कार्यक्रमात जी.एन. जोशी यांनी मुलाखत घेतली होती. पुणे आकाशवाणीतही बबनराव नावडीकर व श्रीरंग संगोराम यांनी त्यांच्या मुलाखती घेतल्या होत्या. मुंबईत ३ जून १९९५ रोजी इंडियन रेकॉर्ड कलेक्टर्स असोसिएशन या संस्थेने सुधीर फडके, स्नेहल भाटकर, अशोक रानडे, यशवंत देव यांच्या उपस्थितीत या ‘भावगीताच्या भीष्माचार्यां’चा विशेष सत्कार केला होता.

— चैतन्य कुंटे

## रामनारायण

***बियावत, रामनारायण नाथूजी***

**सारंगीवादक**

**२५ डिसेंबर १९२७**



नाथूजी हरलालजी बियावत आणि पत्नी रामकुंवरीबाई या उदयपूर स्थित गरीब शेतकरी दाम्पत्याचे तिसरे अपत्य म्हणजेच पं. रामनारायण ऊर्फ मुखिया होय. शास्त्रीय संगीताचा काहीही वारसा नसलेल्या नाथूजींपाशी एक दिलरुबा (इसराज) होता. घराच्या ओटीवर बसून तिन्हीसांजेला ते भजने म्हणत व सोबतीला दिलरुबा वाजवीत.

नाथूजींचे गुरू गंगागुरू महाराजांकडे एक छोटी सारंगी होती. त्यांनी ती सारंगी नाथूजींना सुपूर्द केली. रामचे वय तेव्हा जेमतेम चार-पाच वर्षांचे असेल. एके दिवशी खेळताखेळता रामचे लक्ष त्या सारंगीकडे गेले. ती सारंगीच त्याचे आवडते खेळणे होऊन बसली. रामला नाथूजींनी कुठल्या बोटाने कुठला सूर वाजवायचा, ते शिकविले. त्यांनी रामच्या सारंगीवादनाचा भक्कम पायाच घातला. राम सहा वर्षांचा झाल्यावर नाथूजींनी रीतिरिवाजाप्रमाणे रामला शाळेत घातले; परंतु शाळेच्या पहिल्याच दिवशी मास्तरांकडून छडीचा मार मिळाल्यामुळे त्याचे शाळेत जाणेच कायमचे बंद झाले.

पंडित उदयलाल व पंडित गिरिधारीलाल या उदयपूरमधील दोन प्रमुख गुरूंकडे त्यांचे सारंगीचे शिक्षण सुरू झाले.

वयाच्या अवघ्या दहाव्या वर्षी छोट्या रामने पंडित सुखदेव प्रसाद यांना उदयपूरमध्ये सारंगीसाथ केली. पदार्पणातच रामने अटकेपार झेंडे लावण्याची आपली मनीषा व क्षमता दाखवून दिली. पुढे त्याला पंडित महादेवप्रसाद महियरवाले यांचेही प्रदीर्घ मार्गदर्शन

र

लाभले. त्याकरिता रामला उदयपूर सोडून तीन वर्षे त्यांच्याबरोबर जागोजागी फिरतीत घालवावी लागली.

वयाच्या सोळाव्या वर्षी रामने सारंगीवादनात चांगलेच प्रभुत्व मिळवले होते. तेव्हा पं. महादेवप्रसाद यांच्या शिफारशीवरून लाहोर स्थित उस्ताद अब्दुल वहीद खान यांच्याकडून पुढील मार्गदर्शन घेण्याकरिता मार्च १९४४ मध्ये उदयपूर सोडून रामचे लाहोरात आगमन झाले. लाहोर रेडिओ स्टेशनचे प्रमुख पं. जीवनलाल मट्टू यांनी रामनारायण यांची सारंगी ऐकली व त्यांना रेडिओ केंद्रावर नोकरी दिली.

अवघ्या वीस वर्षांच्या पंडित रामनारायणने १९४७ पर्यंत अवघ्या लाहोर शहरातच नव्हे, तर पूर्ण पंजाबात आपल्या आगळ्यावेगळ्या सारंगी साथीची छाप उमटवली.

फाळणीनंतर ते दिल्ली रेडिओ स्टेशनला आले. पंडित कृष्णराव शंकर पंडित आणि पंडित ओंकारनाथ ठाकूर या दोन विद्वानांना पंडित रामनारायणसारख्या हिऱ्याचे मोल लक्षात आले. त्यांनी भरपूर प्रोत्साहन तर दिलेच; पण त्याबरोबरच सारंगी हे वाद्य एकलवाद्य म्हणून शास्त्रीय संगीतात प्रस्थापित करण्याचे बीज रामनारायणांच्या मनात रुजवले.

अनेक अडचणींवर मात करीत १९६२-६३ पर्यंत पंडितजींनी सारंगीला फार उंच स्तरावर नेऊन ठेवले. यामागची प्रमुख कारणे म्हणजे, लहानपणापासून नाथूजींनी केलेले संस्कार आणि संगीत हे आध्यात्मिक असल्याचे मानणारे त्यांचे गुरू.

र

त्यांनी १९६४ साली तब्बल तीन महिन्यांकरिता युरोपचा दौरा केला. सोबत तबल्यावर साथीला त्यांचे वडीलबंधू पंडित चतुरलाल होते. युरोपातील तमाम संगीतप्रेमींनी पंडितजींची वाहवा केली. अगदी यहूदी मेन्यूइन व नादियाँ बुलोंझीसुद्धा पंडितजींचे चहाते झाले. त्यानंतर परदेशवाऱ्या सततच चालू राहिल्या. सारंगी व पंडित रामनारायण या द्वयीला अफाट लोकप्रियता, मान्यता मिळाली. परिणामस्वरूप पंडितजींची संगीतसभा जगभरातील सर्व संगीतसमारोहांचा अविभाज्य घटक बनत गेली. पं. रामनारायण यांना 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९७५), 'आय.टी.सी. एस.आर.ए.' पुरस्कार (२००२), तसेच 'पद्मश्री' (१९७६), 'पद्मभूषण' (१९९१) व 'पद्मविभूषण' (२००५) आदी मानसन्मान प्राप्त झाले.

'एक सूर माझा आणि एक सूर सारंगीचा' हे त्यांचे आत्मचरित्र प्रसिद्ध झाले आहे. पंडितजींनीही सरोदसारखे वाद्य आपल्या मुलाला, पंडित ब्रिजनारायण यांना शिकवले. मुलगी अरुणा व नातू हर्षनारायण या दोघांनाही त्यांनी उत्तम सारंगीवादक बनवले.

**— अमोघ घैसास**

## रेळे, कनक यतींद्र
**नर्तिका**
**११ जून १९३७**



मुंबईत जन्मलेल्या कनक रेळे या माधुरीबेन व शिवदास दिवेचा यांच्या कन्या होत. त्यांच्यातील कलागुण ओळखून लहान वयातच कलाप्रेमी आईने त्या काळचे कथकली नृत्यशैलीचे प्रख्यात गुरू करुणाकर पणीक्कर यांच्याकडे नृत्याची शिकवणी सुरू केली. लवकरच कनक रेळेंनी त्या कलेत नैपुण्य प्राप्त केले. त्या काळात कथकलीसारखी पुरुषप्रधान नृत्यशैली सादर करणाऱ्या त्या एकमेव स्त्री-कलाकार होत्या.

कलेबरोबरच शिक्षणातही अग्रेसर असलेल्या कनक रेळे पुढे उच्च शिक्षणासाठी परदेशी रवाना झाल्या. इंग्लंडच्या मँचेस्टर विद्यापीठामधून त्यांनी आंतरराष्ट्रीय कायद्यात पदवी संपादन केली. भारतात परतल्यावर खरे तर भरपूर पैसा आणि सुखवस्तू जीवन देणारा व्यवसाय त्यांची वाट पाहत होता; पण नृत्याची ओढ त्यांना स्वस्थ बसू देईना. त्यांनी 'मोहिनी अट्टम्' या केरळमधील शास्त्रीय नृत्यशैलीचे अध्ययन, तसेच संशोधन सुरू केले.

या संशोधनासाठी त्यांना ‘फोर्ड फाउण्डेशन’ या अमेरिकेतील संस्थेने शिष्यवृत्ती बहाल केली. याच नृत्यशैलीवर आधारित शोधनिबंध त्यांनी मुंबई विद्यापीठात सादर केला व पीएच.डी. पदवी मिळवली.

समाजमान्यतेवाचून दुर्लक्षित झालेल्या व पर्यायाने नष्ट होणाऱ्या मार्गावर असलेल्या ‘मोहिनी अट्टम्’ या नृत्यशैलीस त्यांनी अक्षरश: जीवनदान दिले. गेली चाळीस वर्षे या नृत्यशैलीच्या संशोधनात, तसेच प्रचारात त्या व्यस्त आहेत.

डॉ. कनक रेळे विविध सन्माननीय अशा राष्ट्रीय, तसेच आंतरराष्ट्रीय नृत्य महोत्सवांतून आपले नृत्य सादर करतात. प्रख्यात नृत्यांगनाच नव्हे, तर त्या एक उत्तम शिक्षक, संशोधक, तसेच उत्तम नृत्यरचनाकार आहेत. शास्त्रीय नृत्यशैलीच्या माध्यमातून त्यांच्या शिष्यांनी सादर केलेल्या ‘संतवाणी’, ‘शिलप्पदीकारम्’, ‘कल्याणी स्वप्नवासवदत्तम्’, ‘कांचनमृग’, ‘रुक्मिणी स्वयंवर’ या विविध नृत्यरचना त्यांच्यातील सर्जनशीलतेचे दर्शन घडवितात.

शास्त्रीय नृत्यकलेला शिक्षणक्षेत्राच्या विद्यापीठीय स्तरावर नेऊन तत्संबंधी विविध अभ्यासक्रम राबविण्यात त्यांचा वाटा मोठा आहे. नृत्यकलेच्या शिस्तबद्ध आणि शास्त्रशुद्ध शिक्षणासाठी त्यांनी १९७२मध्ये मुंबई विद्यापीठाशी संलग्न असणाऱ्या नालंदा नृत्यकला महाविद्यालयाची स्थापना केली. गेल्या ३०-३५ वर्षांत या नृत्यशाळेतून अनेक विद्यार्थी नृत्याचे शिक्षण घेऊन बाहेर पडले आहेत.

कनक रेळे यांच्या चतुरस्र मार्गदर्शनामुळे  हे आज देशातील नृत्य अध्ययनाचे, तसेच संशोधनाचे प्रमुख केंद्र बनले आहे.

अनेक राष्ट्रीय, तसेच आंतरराष्ट्रीय पुरस्कारांनी त्यांना गौरविण्यात आले आहे. ‘पद्मश्री’ (१९९०, ‘कालिदास सन्मान’, ‘संगीत नाटक अकादमी अवॉर्ड’ (२००६), ‘गुजरात राज्य गौरव’ पुरस्कार, ‘नृत्यचूडामणी’, ‘कलाविपंछी’ इ. पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत.

– प्रा. माधुरी देशमुख

✻✻✻

र




## लच्छू महाराज

***मिश्रा, बैजनाथ कालिकाप्रसाद***

**नर्तक**

**१ सप्टेंबर १९०१ – १९ जुलै १९७८**



गुरू बैजनाथ महाराज अर्थात बैजनाथ कालिकाप्रसाद मिश्रा हे लखनौ घराण्याचे एक प्रथितयश, ओजस्वी, पण तितकेच कोमल, मुलायम हृदयाचे, विलक्षण प्रतिभेचे आणि सर्वांगसुंदर अशा भावाभिनयाचे मानबिंदू होते. बैजनाथ उपाख्य लच्छू महाराज लहानपणापासूनच अतिशय चपळ, खट्याळ व मिस्कील, त्यामुळे 'लुच्चा'-'लच्छू'-'लच्छू महाराज' या नावाने ते प्रसिद्ध झाले. लहान वयातच काका कथकमार्तण्ड बिंदादीन महाराज यांच्या विद्वत्तापूर्ण, पण रसाळ रचना त्यांना प्रभावित करत असत. साधन-संपन्नता, विलासपूर्णता यांनी समृद्ध अशा त्यांच्या बाल्यावस्थेतही त्यांना शायरी हा प्रकारही रुचिपूर्ण वाटला. या साऱ्यांचा परिपाक म्हणजे त्यांच्याकडे चालत आलेल्या परंपरागत वारशात त्यांच्याकडूनही मोलाची भर पडली.

खुद्द त्यांना भावाभिनय व सुढंग अशा नाजूक, अर्थवाही अंगप्रत्यंगांच्या नाजूक हालचाली फार मोहवत असत. त्याला अनुसरून त्यांनी लांबलचक व लयबद्ध, छंदबद्ध अशा कविता, छोटे कवित्त तर अभिनयाने नितांतसुंदर केलेच, पण नृत्त विभागातदेखील आमद, तोडे, तुकडे, परण इत्यादींवर ही भावप्रस्तुती करायला सुरुवात केली, की जे आतापर्यंत कोणीही, कधीही केलेले नव्हते. हे निश्चितच एका प्रगल्भ बुद्धिमत्ता व सर्वांगसुंदर अभिनयाच्या मिलाफाचे द्योतक वाटते.

पत्नी रमादेवी ही त्यांच्या केवळ आयुष्याची संगिनी नव्हती, तर कलाविश्वातीलही त्यांच्या खांद्याला खांदा लावून काम करणारी अशी सखी होती. त्यामुळेच जेव्हा ते सपत्नीक मुंबईला फिल्मी दुनियेच्या आमंत्रणावरून आले, तेव्हा 'मुगल-ए-आजम', 'पाकीजा', 'जीवन-मृत्यू', 'एक ही रास्ता', 'मुझे जीने दो', 'तीसरी कसम', 'काला पानी' इत्यादींमध्ये नृत्यदिग्दर्शन करताना आधी लच्छू महाराजजी त्यांना हवे तसे हावभाव, हालचाली प्रथम रमांवर बसवीत व मग ते दोघे मिळून सेटवर नृत्यदिग्दर्शन करीत.

त्यांच्या मुंबईतील वास्तव्यात त्यांच्या भोवती शिष्यगणही होता, उदा. सितारादेवी, रोहिणी भाटे, मधुरिता सारंग, श्वेनी पंड्या इ. बॅले नृत्यशैली कथक नृत्याच्या माध्यमातून अधिक विस्तृत व चांगली व परिणामकारक रितीने भावाभिव्यक्ती करू शकते हेही त्यांचेच मत होय. त्यांची, कथकनृत्याचा देवलोकातून रंगमंचापर्यंतचा प्रवास दर्शविणारी 'नृत्य परिवर्तन' ही नृत्यनाटिका फारच संस्मरणीय ठरली. त्यांनी 'मौसमे-बहार', 'बापू की अमर कहानी', 'आम्रपाली', 'गोकुल की गली सांकरी', 'राधा पिया प्यारी', 'मालती-माधव' या सर्व प्रसिद्ध नृत्य-नाटिकांतून आजचे मोठे गुरू, कलाकार यांना नृत्य-दिग्दर्शन केले होते.

मात्र १९७२ साली मुंबईची चमक-दमक व फिल्मी दुनिया सोडून ते लखनौला परतले, तेथील उर्वरित काळ त्यांनी रोजच अध्यापन करीत व्यतीत केला व तेथेच त्यांचे निधन झाले. त्यांना भारत सरकारने 'संगीत नाटक

अकादमी' अवॉर्ड (१९५७), 'राष्ट्रपती' पदक (१९५८), 'राज्य अकादमी' पुरस्कार (१९७४) देऊन त्यांचा गौरव केला.

— अलका राहाळकर

## लक्ष्मणप्रसाद जयपूरवाले

***गुणी गंधर्व***

**गायक**

**१५ जानेवारी १९१५ - १६ डिसेंबर १९७७**



लक्ष्मणप्रसाद जयपूरवाले यांचा जन्म गुजरातमधल्या धांग्रधा या संस्थानात, जयपूर-बिकानेरच्या राजभट्ट घराण्यात झाला. त्यांचे वडील पंडित बलदेवप्रसाद हे इंदूर संस्थानात दरबार गायक होते. लक्ष्मणप्रसाद सात ते आठ वर्षांचे असताना त्यांच्या आई-वडिलांचे निधन झाले. नंतर त्यांचा सांभाळ त्यांचे वडील बंधू पंडित मुरलीप्रसाद यांनी केला. घरातील संगीत वातावरण, वडिलांकडून मिळालेले प्राथमिक शिक्षण, स्वत:च्या आवाजाची आणि बुद्धीची जोड या शिदोरीवर ते कानपूरला 'श्रीकृष्ण थिएटर कंपनी' या नाट्यसंस्थेत कामाला लागले.

उत्तम अभिनय आणि तिन्ही सप्तकांत सहजतेने संचार करणारा सुरेल आणि पल्लेदार आवाज यांच्या बळावर त्यांच्या भूमिका लोकप्रिय झाल्या. त्यांना भरपूर पैसा आणि प्रसिद्धी मिळाली. पुढे त्यांनी नाटक कंपनी विकत घेतली. त्यांचा विवाह जयपूर दरबारातले नर्तक पंडित बद्रीप्रसाद यांच्या कन्येशी झाला.

लक्ष्मणप्रसाद यांचा मूळ पिंड गायकाचा असल्यामुळे नाट्यव्यवसायात त्यांचे मन रमत नव्हते. त्यांनी पुढे कुट्टू गोपालजी यांचे शिष्यत्व पत्करले. कुट्टू गोपालजी हे लाडली महाराज ऊर्फ कुंवर श्याम यांचे शिष्य होते. ते हरिदास गोस्वामी (गुंसाई) परंपरेतील होते. गोपाल गायक, गुंसाई गोस्वामी पन्नालालजी आणि लाडली महाराज अशी ही ४०० ते ४५० वर्षांची परंपरा होय. याच परंपरेतील 'सेनिया' ही मुस्लीम शाखा मियाँ तानसेन यांच्यापासून निर्माण झाली आहे. या गुंसाई परंपरेतील कुंवरश्यामजींचे घराणे राधागोविंद मंदिरात संगीत भक्ती करीत असे.

गुरू कुट्टू गोपालजी यांच्याकडून लक्ष्मणप्रसाद यांनी धृपद, धमार, ख्याल, ठुमरी, होरी या विविध अंगांच्या गायकीचे शिक्षण घेतले. या सकस तालमीमुळे वयाच्या सत्तावीस-अठ्ठाविसाव्या वर्षी पंडितजींची त्या वेळच्या प्रसिद्ध गवयांत गणना झाली. उत्स्फूर्त काव्यरचना करण्याचा भट्ट घराण्याचा वारसा आणि योग्य स्वरलयीच्या योजनेने त्यांनी आपली एक स्वतंत्र शैलीच बनविली होती.

त्यांची १९४४च्या सुमारास दिल्ली आकाशवाणीवर म्यूझिक सुपरवायझर म्हणून नियुक्ती झाली. पुढे १९५०च्या सुमारास त्यांचे मेहुणे प्रसिद्ध संगीत दिग्दर्शक पंडित खेमचंद प्रकाश यांनी त्यांना मुंबईला आणले. त्यानंतर त्यांनी आपले जीवन भारतात सर्वत्र मैफली करणे, आपल्या काव्यप्रतिभेने वेगवेगळ्या बंदिशी तयार करणे यात व्यतीत केले. 'आत्मज्ञान' व 'कुंवर श्याम घराणा' ही पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. राजस्थान सरकारने त्यांना पुरस्कार देऊन त्यांचा सत्कार केला. जालंधर येथे झालेल्या हरवल्लभ परिषदेमध्ये 'गुणी गंधर्व' ही पदवी देऊन त्यांना सन्मानित करण्यात आले.

मुंबईला माटुंगा येथे राहत असलेल्या बाबा भगवानदासजी यांच्या प्रेरणेने पंडित त्यांच्या गायकीला मानमान्यता मिळाली. पंडितजी आणि त्यांचे गुरू हे कृष्णभक्त होते. रासलीला आणि कृष्णवर्णनपर बंदिशी ही घराण्याची खासियत. रागांच्या नावांवरही त्यांनी बंदिशी केल्या. छंद प्रबंध, धृपद अंगाचे आलाप, सुसंगत बढत, वक्र गतीतल्या टप्पा अंगाच्या ताना, दुप्पट-चौपट लयीची सरगम आणि भक्तिरसाने ओथंबलेल्या बंदिशी ही कुंवर श्याम घराण्याची वैशिष्ट्ये होत.

मुंबईच्या जसलोक रुग्णालयामध्ये त्यांचे निधन झाले.

- सुनंदा आपटे

ल

## लोंढे, गंगाधर मेघश्याम

**गायक, नट**

**१८ जुलै १९०२ – २७ सप्टेंबर १९४४**



गंगाधर मेघश्याम लोंढे यांचा जन्म मध्यप्रदेशातील इंदूर येथे झाला. गंगाधर लहान असतानाच त्यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यामुळे त्यांच्या आईने त्यांना मामाकडे आणले व तेथेच ते वाढले. कुटुंबातील आर्थिक टंचाईमुळे गंगाधरपंतांचे शालेय शिक्षण आठवी इयत्तेपर्यंत होऊ शकले. लोंढे यांच्या कुटुंबात गायनाचे वा संगीताचे कुठल्याही प्रकारचे वातावरण नव्हते; मात्र गंगाधरपंतांना उपजत संगीताची आवड व गायनाला अनुकूल असा आवाज लाभल्यामुळे त्यांनी संगीताचे प्राथमिक शिक्षण घेतले होते. इंदूरला गंधर्व नाटक मंडळी जेव्हा मुक्कामाला येत, तेव्हा त्यातील सुप्रसिद्ध नट गणपतराव बोडस गंगाधरपंतांच्या मामाकडेच उतरत. त्यामुळे गंगाधरपंतांना गंधर्व कंपनीची नाटकेही पाहायला मिळाली. यातून गंगाधरपंतांना संगीत आणि अभिनयात रुची निर्माण झाली.

त्यांचा आवाज जात्याच चांगला असल्यामुळे शालेय शिक्षण घेत असतानाच अनेक समारंभांतून ‘उद्‌घाटनपर स्वागतगीत’ गायला त्यांना बोलवत. अशाच एका समारंभातील त्यांचे गायन ऐकून उपस्थित किर्लोस्कर नाटक मंडळीच्या सदस्यांनी त्यांना नाटक कंपनीत येण्याचे आमंत्रण दिले. त्यांनी १९१८ ते १९२४ या काळात किर्लोस्कर नाटक मंडळीतून स्त्री – भूमिका केल्या. किर्लोस्कर नाटक मंडळी सोडून ते १९२५ मध्ये पुण्यात आले. पुण्यात त्यांनी तांबेशास्त्रींकडून शास्त्रोक्त गायनाचे रीतसर धडे घेतले. काही काळापर्यंत मा. दीनानाथांच्या बलवंत संगीत मंडळीत व नंतर विश्वनाथ संगीत मंडळीतूनही त्यांनी कामे केली.

ल

१९२५ मध्ये १९२६ साली अच्युत बळवंत कोल्हटकरांनी ‘मस्तानी’ या नाटकातील गाण्याच्या संगीत दिग्दर्शनाकरिता त्यांना बोलावले. दरम्यान त्यांना गणपतराव बोडसांकडून अभिनयाचे पाठही मिळाले. गंगाधर लोंढे १९२७ पासून बापूराव पेंढारकरांच्या ‘ललितकलादर्श’मधून काम करू लागले. ललित–कलादर्शच्या ‘वधूपरीक्षा’ (१९२८) या नाटकातूनच गंगाधरपंतांनी पुरुष भूमिका करण्यास प्रारंभ केला. या नाटकातील भार्गव या भूमिकेमुळे त्यांनी रसिकांचे लक्ष वेधून घेतले. ‘हाच मुलाचा बाप’, ‘नेकजात मराठा’, ‘सज्जन’ या नाटकांतील भूमिकांमुळे ते लोकप्रिय झाले.

ते १९३१ पासून गंधर्व नाटक मंडळीच्या नाटकांतून कामे करू लागले. गंधर्व नाटक मंडळीच्या नाटकातून बालगंधर्वांबरोबर गंगाधरपंतांनी विविध नायकांच्या भूमिका साकार केल्या. लोंढे ‘गंधर्व हिरो’ म्हणून ओळखले जाऊ लागले. ‘सावित्री’ या नाटकातील ‘सत्यवाना’ची त्यांची भूमिका त्या काळी फारच गाजली होती.

बालगंधर्व १९३४ च्या शेवटी चित्रपटाकडे वळले. एकंदरच चित्रपटाचा प्रभाव सर्वत्र वाढू लागला होता. याच काळात गंधर्व नाटक मंडळीही बंद पडली. बालगंधर्वांना चित्रपटसृष्टी मानवली नाही व यशही फारसे लाभले नाही. गंधर्व कंपनी पुन्हा सुरू करावी अशी त्यांची इच्छा झाली; पण ते ‘प्रभात’ फिल्म कंपनीशी कराराने बांधले गेले असल्यामुळे त्यांनी गंगाधरपंतांना गंधर्व नाटक मंडळी सुरू करण्यास सुचविले. गंगाधरपंतांच्या नेतृत्वाखाली गंधर्व नाटक मंडळी पुन्हा १९३५ साली सुरू झाली. त्यांनी जवळजवळ अठरा महिने इतर नटांच्या साहाय्याने ही कंपनी चालविली. याच काळात म्हणजे १९३४ नंतर मुंबईच्या रूबी रेकॉर्ड कंपनीने ‘ओडियन’ या लेबलखाली गंगाधरपंतांच्या गायनाच्या ध्वनिमुद्रिकाही काढल्या.

त्यांनी १९३६ ते १९४१ या काळात ‘कान्होपात्रा’ (१९३६), ‘राजा गोपीचंद’ (१९३८), ‘भगवा झेंडा’

(१९३९) आणि ‘भक्त दामाजी’ (१९४१) या चित्रपटांतून भूमिका केल्या. यांतील त्यांच्या गाण्यांनाही लोकप्रियता लाभली. दी ग्रामोफोन कंपनीने त्यांच्या रेकॉर्ड्स काढल्या होत्या.

लोंढ्यांनी १९३९ साली स्वतःची ‘राजाराम संगीत मंडळी’ काढली. या कंपनीने ‘मानापमान’, ‘सौभद्र’, ‘संशयकल्लोळ’ अशी अनेक जुनी संगीत नाटके केली. लोंढ्यांनी रंगभूमीवरील अनेक मान्यवर व प्रसिद्ध नटांना आपल्या कंपनीच्या नाटकांतून भूमिका करण्यास आमंत्रित केले. संगीत नाटकांच्या पडत्या काळात जुन्या नाट्यसंगीताची परंपरा जपण्याचे वा जिवंत ठेवण्याचे फार मोठे कार्य गंगाधरपंत लोंढ्यांनी केले. इतकेच नव्हे, तर गडकऱ्यांचे ‘प्रेमसंन्यास’ हे गद्य नाटक त्यांनी १९४० साली राजाराम संगीत मंडळीतर्फे संगीत नाटक म्हणून रंगभूमीवर आणले.

‘प्रेमसंन्यास’ या नाटकातील पद्यरचना वसंत शांताराम देसाई यांची व संगीत मा. कृष्णरावांचे आहे. राजाराम संगीत मंडळीने सादर केलेल्या पूर्वीच्या जमान्यातील संगीत नाटकांच्या प्रयोगांना रसिकांचा भरभरून प्रतिसाद मिळाला.

त्यांनी १९४३ साली सांगली येथे झालेल्या नाट्य शताब्दी महोत्सवात ‘शारदा’ या नाटकात बालगंधर्वांबरोबर महत्त्वाची भूमिका केली होती. देखणे व भारदस्त व्यक्तिमत्त्व, स्वच्छ वाणी व भरदार, सुरेल आवाजातील आटोपशीर व परिणामकारक गाणे यामुळे गायक-नट म्हणून त्यांनी रसिकांची मने जिंकली. लोंढे यांची ध्वनिमुद्रित पदे त्यांच्या तेजस्वी गायनाची साक्ष देतात. ‘धन्य तूचि कांता’ (अमृतसिद्धी), ‘लहरी अता सुखाच्या’ (अमृतसिद्धी), ‘धवल लौकिका’ (अमृतसिद्धी), ‘शर लागला’ (कान्होपात्रा), ‘लोळत कच मुखमधुवरी’ (विद्याहरण) ही त्यांची काही गाजलेली पदे. अवघ्या बेचाळिसाव्या वर्षी त्यांचे अकस्मात निधन झाले.

— माधव इमारते

## लोलयेकर, अंजनीबाई
**गायिका**

**४ सप्टेंबर १९३० – २१ नोव्हेंबर २००१**



गोव्यातील लोलये या निसर्गसंपन्न गावी अंजनीबाईंचा जन्म झाला. सूर-लय त्या घरात हातात हात घालून गात होती. त्यांचे बंधू यशवंतबुवा हे ग्वाल्हेर घराण्याचे गायक होते, तर दुसरे बंधू रामदासजी हे तबलावादक होते. या दोघांकडून अस्सल सूर-लयीची जाण अंजनीला बालवयातच मिळाली. वयाच्या चौदाव्या वर्षीच त्यांची जाहीर बैठक झाली आणि रसिकांच्या पसंतीस उतरली.

एकविसाव्या वर्षी ‘इंटरनॅशनल म्यूझिक ऑफ कलकत्ता’ या संस्थेत त्यांना प्रवेश मिळाला. तिथे दोन वर्षे राहून अंजनीबाईंनी गाण्याची अथक साधना केली. त्यांनी हरिभाऊ घांग्रेकर यांच्याकडून ग्वाल्हेर गायकीचे संस्कार घेतले. यानंतर गाण्याची पारख आणि आवड असणाऱ्या, धनवान आणि गुणवान अशा बाबूभाई बँकर यांच्या सहवासात त्या आल्या. ते आग्रा घराण्याची गायकी शिकायचे. अंजनीबाई अन्वर हुसेन खाँचे शिष्य गोविंदराव अग्नी यांच्याकडून आग्रा गायकीही शिकू लागल्या.

अंजनीबाई लोलयेकर यांनी देशभर गायनाच्या मैफली केल्या. दिल्ली, मद्रास, कलकत्ता (कोलकाता), ग्वाल्हेरचा तानसेन समारोह अशा ठिकाणच्या मैफली गाजल्या. मुंबई आकाशवाणीवर त्या अनेक वर्षे गात होत्या, तसेच एच.एम.व्ही.ने त्यांच्या अडाणा, बागेश्री, शंकरा, नटबिहाग या रागांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या, त्या खूप गाजल्या.

सुरेल गायकी, लोचदार, जव्हारदार आणि तीनही सप्तकांत मोकळा लागणारा असा त्यांचा आवाज होता. आग्रा घराण्याच्या शिरस्त्यानुसार त्या रागाची नोमतोम आलापी करत, त्यातील कणस्वर अत्यंत सुरेल आणि

ल

मुलायम लागत. प्रवाही उपज, भरपूर दमसास, रेखीव हरकती-मुरक्या ही त्यांच्या गाण्याची वैशिष्ट्ये होती. रागदारीबरोबरच त्या ठुमरी व नाट्यसंगीतही उत्तम गात असत.

अनेक सामाजिक संस्थांसाठी अंजनीबाई लोलयेकर यांनी मैफली केल्या, तसेच मुक्त हस्ताने दानही केले. कन्या सुवर्णा बँकरला व इतर अनेक शिष्यांना त्यांनी आपली कला शिकविली. त्यांचा मुलगा साई बँकर हे उत्तम तबलावादक आहेत. अंजनीबाई लोलयेकरांचे मुंबईत निधन झाले.

– डॉ. शुभदा कुलकर्णी

***

ल

# व



## वझलवार, दत्तात्रेय गोविंद

**गायक**

**५ सप्टेंबर १९१६ - १६ फेब्रुवारी २००३**



दत्तात्रेय गोविंद तथा भैयाजी वझलवार यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव गोपिकाबाई होते, तर त्यांचे वडील हे सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये कार्याध्यक्ष होते. सहा वर्षांचे असताना वडिलांच्या अचानक निधनाने कुटुंब उघडे पडले. लहानपणापासून संगीत व चित्रकलेची आवड असणारे भैयाजी रंगीबेरंगी चित्रे, स्वत: रंगविलेली चित्रे, वृत्तपत्रे वगैरे विकत. लग्नमुंजीतही मौजेने गाडगे-मडके रंगवीत, भिंतीवर चित्रे काढीत.

भैयाजींनी नील सिटी हायस्कूलमध्ये प्रवेश घेतला. ते शाळेत संघगीते, समूह गीते, भक्तिगीते गात. ‘चतुर संगीत महाविद्यालया’त ते ५-६ महिने संगीत शिकले. नंतर १९२७ च्या हिंदू-मुस्लीम दंग्यामुळे त्यांचे गायनशाळेत जाणे बंद झाले. नंतर तात्याजींचे घनिष्ठ मित्र शंकर प्रवर्तक यांच्याकडे भैयाजी वझलवारांचे रीतसर संगीत अध्ययन सुरू झाले. त्यांनी १९३२ मध्ये ‘बालभास्कर’ ही पदवी मिळविली. ते १९३५ साली ‘संगीत शिक्षक सनद’च्या बरोबरीची ‘संगीत मध्यमा परीक्षा’ आणि दहा वर्षांनी ‘संगीत प्राज्ञ विशारद’ परीक्षाही पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. प्रवर्तक मास्तरांच्या हाताखाली ते संगीताचे वर्ग घेऊ लागले. भातखंडे संगीत महाविद्यालयामध्येही काही दिवस भय्याजींनी संगीत शिकविले.

मुर्शद खाँसाहेब अझीमबक्ष या फकिरी वृत्तीच्या थोर कलाकाराने १९३९ साली उरुसामध्ये त्यांचे गायन ऐकले व ते खूष झाले. तेव्हापासूनच दोघे संपर्कात राहिले. खाँसाहेबांनी मनसोक्त शिक्षण दिल्याने वझलवारांनी उत्तमोत्तम चिजा, अवघड बंदिशी आत्मसात केल्या. प्रवर्तक मास्तर व खाँसाहेब या दोन गुरूंमुळे वझलवार नवीन रचना बांधण्यात प्रवीण झाले.

भैयाजींचा २६ फेब्रुवारी १९४४ रोजी सुमतीबाईंशी विवाह झाला. संगीताचा प्रचार-प्रसार करण्यासाठी त्यांनी स्थापन केलेल्या ‘श्री शारदा गायन वादनालय’ संस्थेत एके काळी सुमारे पावणे दोनशे विद्यार्थी शिकत होते. वझलवारांच्या मेहनतीमुळे व चिकाटीमुळे संस्थेची भरभराट झाली. त्यांचे एक शिष्य शिरीन लालकाका हे इंग्लंडमध्ये भारतीय संगीत विद्यालय चालवीत आहेत. गिरीश वझलवार, गणपत फडणीस, डॉली बलसारा, शरद सुतवणे, उषा पारखी इ. अनेक शिष्य त्यांनी तयार केले. त्यांनी १९४८ ते १९६१ पर्यंत सिटी महाविद्यालयामध्ये अर्धवेळ अध्यापकाचे काम करून नंतर राजीनामा दिला.

उत्तम संगीत शिक्षक, परीक्षक, रचनाकार व जाणकार वझलवारांनी अनेक रागांत अनेक चिजा रचल्या. त्यांच्यापाशी दुर्मीळ व अवघड चिजांचा खजिना होता. त्यांचे नागपूर येथे निधन झाले.

— वि. ग. जोशी



## वझे, रामकृष्ण नरहर

**गायक**

**२८ नोव्हेंबर १८७२ – ५ मे १९४३**

रामकृष्ण नरहर वझे यांचा जन्म सावंतवाडी संस्थानातील ओझरे या गावी झाला. रामकृष्ण दहा



महिन्यांचे असतानाच त्यांचे पितृछत्र हरपले. त्यामुळे त्यांच्या मातु:श्री लक्ष्मीबाई यांनीच मोलमजुरी करून त्यांना सांभाळले. रामकृष्णांचे वय ४-६ वर्षांचे असताना कागल येथे त्या चरितार्थासाठी आल्या. कागल संस्थानातील श्रीमंत अण्णासाहेब देशपांडे यांच्याकडे त्या स्वयंपाकपाण्याचे काम करीत.

रामकृष्ण वझे यांचे प्राथमिक शिक्षण जेमतेम मराठी चौथ्या इयत्तेपर्यंत झाले. त्यांचा गायनाकडील ओढा पाहून लक्ष्मीबाईंनी त्यांचे गायन-शिक्षण दरबार गवई बळवंतराव पोहरे यांच्याकडे सुरू केले. दोन वर्षे त्यांच्याकडे शिकल्यानंतर मालवणात विठोबा अण्णा हडप यांच्याकडे त्यांनी वर्षभर शिक्षण घेतले. वयाच्या बाराव्या वर्षी त्या काळच्या रिवाजाप्रमाणे आईने त्यांचे लग्न लावून दिले. आईच्या एकटीच्या मिळकतीवर आपल्या संसाराचे ओझे सांभाळले जाणार नाही, या विचाराने ते व्यथित झाले. वाटेल ते करून संगीतविद्या मिळवायची व प्रपंचाचा भार स्वत:वर घेऊन आईला कष्टातून सोडवायचे या निर्धाराने रामकृष्णांनी निर्धन अवस्थेतच अवघ्या बाराव्या वर्षी घर सोडले.

रामकृष्ण वझे कागलहून चालतच पुण्याला पोहोचले व तेथून त्यांनी मुंबई गाठली. मुंबईला त्यांना प्रख्यात बीनवादक बंदे अलीखाँ यांचे बीनवादन, तसेच शिष्या चुन्नाबाई यांचे गाणे ऐकायला मिळाले. मुंबईहून ते इंदूरला नानासाहेब पानसे यांच्याकडे गेले. नानासाहेबांनी त्यांना ‘गाणे शिकायचे असेल तर ग्वाल्हेरला जा,’ असे सांगितले. त्यानंतर उज्जैनला ते नाना अष्टेवाले यांच्याकडे राहिले. इथे रामकृष्ण वझे यांना तानरसखाँ या गवयाचे गाणेही ऐकायला मिळाले. पुढे अष्टेवाल्यांबरोबरच ते बनारसला विष्णुपंत छत्रे यांच्या सर्कशीत गेले. सर्कशीचे खेळ नसत तेव्हा तिथे नामवंत गायकांचे जलसे होत. याच मुक्कामात निसार हुसेनखाँ यांच्याशी त्यांची गाठ पडली. त्यांना गुरू मानून त्यांच्याबरोबर ते ग्वाल्हेरला पोहोचले.

अतिशय हालअपेष्टा सोसून, माधुकरी मागून खाँसाहेबांचा विक्षिप्त स्वभाव व लहर सांभाळून मोठ्या कष्टाने व चिकाटीने वझे यांनी गानविद्या मिळवली. सुरुवातीच्या चार वर्षांत खाँसाहेबांनी त्यांना जेमतेम आठ चिजा शिकवल्या. त्यांचा आवाजही त्या वेळी फुटला होता. त्यामुळे त्यांच्या वाटेला उपेक्षा व हेटाळणीच येत असे. पुढे सरदार दादासाहेब भुस्कुटे यांच्या आग्रहावरून निसार हुसेन खाँसाहेबांकडून वझे यांना भरपूर गानविद्या मिळाली. जवळजवळ नऊ वर्षे त्यांना निसार हुसेन खाँसाहेबांची तालीम मिळाली.

रामकृष्णबुवा वझे हे भरतीदार गवई होते. ग्वाल्हेरमध्ये असताना त्यांनी अनेक गवयांकडून विद्या घेतली. बुवांनी जवळजवळ सतरा गुरूंकडून विद्या मिळविली असे सांगितले जाते. इनायत हुसेन खाँ, सादक अली खाँ, मुहम्मद अली खाँ, अली हुसेन बीनकार, सतारिये पन्नालाल गुसांई इत्यादी. त्यांनी अनेकांना तंबोऱ्यावर साथ केली आणि अनेक गवयांकडून हरतऱ्हेचे रंग त्यांनी आपल्या ग्वाल्हेर गायकीत सामावून घेतले. याचाच परिणाम असा झाला, की बुवांची गायकी प्रचलित ग्वाल्हेर घराण्यापेक्षा वेगळी झाली व ती खास ‘वझेबुवांची गायकी’ म्हणून ओळखली जाऊ लागली.

त्यांना १९०० मध्ये नेपाळ दरबारात राजदरबारी म्हणून सन्मानित करण्यात आले. नेपाळच्या दौऱ्यावर असतानाच स्वामी विवेकानंदांचा पंधरा दिवसांचा सहवास त्यांना लाभला. या सहवासात संगीतादी सर्व विषयांत दोघांनी एकमेकांच्या विचारांचे आदानप्रदान केले.

बुवा हे एक सारग्राही गायक होते. विविध घराण्यांची गायकी आत्मसात करून स्वत:च्या स्वतंत्र शैलीतून त्यांचे एकसंध सादरीकरण हे बुवांच्या गायनशैलीचे वैशिष्ट्य होते. वझेबुवांचा आवाज मोठा व रुंद होता. गायकी जोरकस व आक्रमक होती. वजनदार गमक मुखबंदीच्या, जबड्याच्या हुंकारयुक्त तानांनी भरलेली. त्यांची स्पष्ट व

व

जोरदार तान गर्जनाच वाटे. मध्य व द्रुत लयीतील चिजा ते बहारीने गात. प्रचलित रागाबरोबरच अप्रचलित रागही ते बहारीने गात. बरेचसे अप्रचलित राग त्यांनी प्रकाशात आणले. कल्पनाशक्ती व बुद्धिप्रधानता यांचा अजोड मिलाफ त्यांच्या गायनात होता.

मराठी संगीत रंगभूमीवरील वझेबुवांचे योगदान महत्त्वाचे आहे. जवळजवळ नऊ ते दहा नाटकांना त्यांनी संगीत दिले. 'हाच मुलाचा बाप' (१९१८), 'संन्याशाचा संसार' (१९१९), 'शहा शिवाजी' (१९२१), 'सत्तेचे गुलाम' (१९२२), 'तुरुंगाच्या दारात' (१९२३), 'कृष्णार्जुन युद्ध' (१९२५), 'संगीत श्री' (१९२६), 'शिक्का कट्यार आणि रणदुंदुभी' (१९३७) आणि 'सोन्याचा कळस' (१९३२). वझेबुवांनी नाट्यसंगीता-करिता भारदस्त रागदारी संगीताची योजना केली. मर्दानी व तेजस्वी गायकी परंपरा त्यांनी रंगभूमीला बहाल केली. अनेक प्रचलित, तसेच अप्रचलित रागदारीतील खानदानी चिजा वझेबुवांनी नाट्यसंगीताद्वारे रंगभूमीवर आणल्या. त्या योगे मराठी नाट्यसंगीतात अनवट राग आणि विविध ताल आणले. 'सखी मुखचंद्र', 'देवता कामुकता', 'वितरी प्रखर', 'आपदा राज्यपदा', 'दिव्य स्वातंत्र्य रवी', 'सुकतातची जगी या' इत्यादी नाट्यपदे त्यांच्या रंगभूमीवरील सांगीतिक योगदानाची साक्ष देतात.

वयाच्या सदुसष्टाव्या वर्षी रामकृष्णबुवा वझे यांनी 'संगीत कला प्रकाश' या नावाने दोन भागांत दुर्मीळ राग व बंदिशी प्रकाशित केल्या. तसेच, यात आत्मचरित्रात्मक लेखनही केले. आत्मचरित्रात्मक लेखनातून बुवांनी घेतलेल्या अपार कष्टांची कल्पना तर येतेच, शिवाय त्या काळच्या संगीतविश्वावरदेखील प्रकाश पडतो. याशिवाय नोटेशनसहित नव्वद रागांच्या बंदिशी आहेत. विविध वृत्तपत्रे व मासिकांमधूनही त्यांनी लेख लिहिले. त्यांनी 'श्रीराम करुणा लहरी' हे आध्यात्मिक पुस्तकही प्रकाशित केले.

कोलंबिया कंपनीने वझेबुवांच्या रागदारी गायनाच्या नऊ ध्वनिमुद्रिका काढल्या. खंबावती (सखी मुखचंद्र), मियां मल्हार (बोल रे पपियरा), भैरव बहार (डार डार पात), तिलक कामोद (तीरथ को सब करे), खट (विद्याधर) इत्यादी ध्वनिमुद्रिकांतील त्यांचे गायन अत्यंत प्रभावी असून वझेबुवांच्या गायनाची त्यातून कल्पना येते.

वझेबुवांनी अनेकांना मुक्तकंठाने विद्यादान केले. त्यांच्या अनेक उल्लेखनीय शिष्यांत त्यांचे सुपुत्र पं. शिवरामबुवा वझे, पं. हरिभाऊ घांग्रेकर, केशवराव भोसले, पं. गजाननबुवा जोशी, कागलकरबुवा, गुरुराव देशपांडे, पं. भास्करबुवा जोशी, भालचंद्र पेंढारकर यांचा समावेश होतो. मा. दीनानाथ हेही त्यांचे गंडाबंध शागिर्द होते. याशिवाय अनेकांना त्यांचे मार्गदर्शन लाभले. नंतरच्या पिढीतील कुमारगंधर्व, राम मराठे इ. गायकांवर त्यांच्या गायकीचा प्रभाव दिसतो.

रामकृष्णबुवा हे व्हायोलिन आणि सतार ही वाद्येही उत्तम वाजवीत. ते निर्व्यसनी होते. गाण्यावर तसेच खाण्यावर त्यांचे प्रेम होते, 'जो गवैया सो खवैया' असे ते म्हणत. त्यांना मधुमेहाचा विकार होता. त्यांचे पुणे येथे निधन झाले. त्यांच्या जन्मगावी वजरे येथे ५ मे २००४ साली त्यांचे स्मारक बांधण्यात आले आहे. तेथे त्यांच्या पुण्यतिथिनिमित्त अनेक कार्यक्रमांचे आयोजन होते.

— लीनता वझे, माधव इमारते

## वझे, शिवराम रामकृष्ण

**गायक**

**१९०९ – १५ जानेवारी १९६३**



शिवराम रामकृष्ण वझे यांचा जन्म नागेशी, गोवा येथे झाला. गायनाचार्य रामकृष्णबुवा वझे यांचे सुपुत्र व शिष्य असणाऱ्या शिवरामबुवांनी त्यांची गायकी सहीसही उचलली, विद्या जपली व वडिलांप्रमाणेच 'कोठिवाले गवैये' असा लौकिक संपादन केला.

वयाच्या चौथ्या वर्षी नागेशीच्या मंदिरात त्यांनी 'पेणं' नावाचे वाद्य वाजवून श्रोत्यांकडून दाद आणि

व

बक्षीस म्हणून सोन्याची 'पवने' (नाणी, मुद्रा) मिळवली. थोरल्या बुवांचा रियाज ऐकायचा, ते शिष्यांना देत असलेली तालीम ऐकायची आणि ते बाहेर गेले की भिंतीतील फडताळात (भिंतीतच असणारे खोल कपाट) बसून रियाज करायचा हा त्यांचा दिनक्रम होता. पुढे रंगमंचावर रामकृष्णबुवांची साथ तंबोऱ्यावर करीतच शिवरामबुवांनी गायनविद्या कमावली.

अत्यंत लहरी आणि मनस्वी असणारे शिवरामबुवा लहर असेल तर कितीतरी अनवट व जोडरागांचा खजिना रसिकांपुढे रिता करीत. थोरल्या बुवांपेक्षा त्यांचा रागविस्तार संथ व भरीव असे. बोलतानेपेक्षा सरगम करण्यावर त्यांचा भर होता. समेवर येण्याच्या त्यांच्या पद्धतीत इतकी विविधता, आकर्षकपणा असे, की त्यांच्या प्रत्येक समेला जाणकारांची उत्स्फूर्त दाद मिळे. त्यांना आकाशवाणीची सर्वोच्च श्रेणी होती. त्यांचे गायन धारवाड, पुणे आणि दिल्ली केंद्रांवर राष्ट्रीय कार्यक्रमांतर्गत प्रसारित होत असे.

'बेळगाव भूषण' ही बिरुदावली थोरले रामकृष्णबुवा वझे आणि शिवरामबुवा वझे या गायक पिता-पुत्रांनी भूषवली. बेळगावात आलेला कलाकार त्यांना भेटल्याशिवाय जात नसे. आदरयुक्त प्रेमाचा हा शिरस्ता थोरल्या बुवांच्या माघारीही कायम राहिला. शिवरामबुवांचे बेळगाव येथे अर्धांगवायूमुळे निधन झाले.

— लीनता वझे

**संदर्भ** :

*१. गजेंद्रगडकर, अरविंद 'स्वरधवल धारवाडचे सुरेल दिवस'; 'अंतर्नाद', दिवाळी अंक; २००२.*

*२. देसाई, रणजित; 'श्री. शिवरामबुवा वझे'; 'केसरी'; रविवार ६ मार्च १९६०.*

व

## वर्मा, माणिक अमर

**गायिका**

**१६ मे १९२६ – ९ नोव्हेंबर १९९६**

गायिका हिराबाई दादरकर यांच्या पोटी पुणे येथे माणिकबाईंचा जन्म झाला. त्यांचे बालपण सुरलयीतच



गेले. भारत गायन समाजातील अप्पासाहेब भोपे व नंतर भास्करबुवा बखले यांचे शिष्य बापूराव केतकर, बागलकोटकर बुवा यांच्याकडे त्यांचे आरंभीचे शिक्षण झाले. तानरस घराण्याचे इनायत खाँ, गुलाम रसूल खाँ, तसेच हैदराबादचे बशीर खाँ यांचेही मार्गदर्शन त्यांनी घेतले.

वयाच्या अवघ्या एकोणिसाव्या वर्षी सूरत येथे झालेल्या त्यांच्या मैफलीतील गाण्याने ओंकारनाथ ठाकुरांसारख्या दिग्गज गायकानेही त्यांची तारीफ केली. त्यानंतर सुरेशबाबू माने व हिराबाई बडोदेकर यांच्याकडे त्यांनी किराणा घराण्याचे शिक्षण घेतले. आग्रा घराण्याचे पं. जगन्नाथबुवा पुरोहित 'गुणिदास' यांच्याकडूनही त्यांनी तालीम घेतली. अलाहाबादच्या भोलानाथ भट्ट यांच्याकडून त्यांनी काही बंदिशी व विशेषत: ठुमरी-दादऱ्याच्या रचना घेतल्या.

या चौफेर शिक्षणामुळे सुरेलपणा, लय-तालाची प्रगल्भता आणि ख्याल, ठुमरी-दादरा, भावगीत, भजन या सर्व प्रकारांत त्या निपुण झाल्या. भास्करबुवांच्या गायकीतील पीळदारपणा, नेटका मोहकपणा, सुरेशबाबू व हिराबाईंचा सुरेलपणा व मार्दव, गुणिदासांचा बंदिशीच्या मांडणीतील डौल, इनायत खाँ व बशीरखाँची तनय्यत, सुरेशबाबू व भोलानाथांकडून मिळालेला ठुमरीचा बनारस व पंजाबी ढंग, बालगंधर्वांच्या गायकीतील लाघव व प्रासादिकता या साऱ्यांचे एकजिनसी रसायन माणिकबाईंच्या गाण्यात झाले.

त्यांच्या ढाल्या, बसक्या आवाजात विलक्षण गोडवा होता. त्यांच्या गळ्यातील जागान् जागा दाणेदार, हरकती-मुरक्या स्वच्छ व नेमक्या असत. प्रचलित रागांच्या गायनाबरोबरच जोगकंस, चंद्रकंस, मधुवंती, अभोगी अशा तेव्हा अधुनाप्रसिद्ध असणाऱ्या रागांना मैफलींत वारंवार गाऊन प्रचलित करण्यात त्यांचा वाटा होता. माणिक वर्मा दीपककेदार, देवगिरी बिलावल,

नटमल्हार, गौरीसारखे अप्रचलित रागही अत्यंत समर्थतेने पेश करत. त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे बसवराज राजगुरूंबरोबर त्यांनी जुगलबंदीच्या मैफली केल्या. आपली परंपरा जपून त्यांनी नवतेचाही स्वीकार केला. बुद्धिप्रधानता जपली, पण गाणे पांडित्यपूर्ण, जड केले नाही. सहजसोपी वाटावी अशी गायकी बनविली.

त्यांचा स्वभाव अत्यंत ऋजू, अजातशत्रू असा होता. व्यक्तित्वात असलेल्या निर्मळ निर्व्याजपणाचे प्रतिबिंब त्यांच्या गायकीवरही होते. सर्व गानप्रकारांवर त्यांची सारखीच व सहज हुकमत होती. माणिक वर्मा या खऱ्या अर्थाने बहुस्पर्शी गायिका होत्या. एच.एम.व्ही.ने जोगकंस, भटियार, श्यामकल्याण, देस, मारवा, बिहागडा या रागांतील त्यांच्या ध्वनिमुद्रिका प्रकाशित केल्या व त्यांद्वारे ख्यालगायिका म्हणून त्यांची कीर्ती देशभर पोहोचली.

बालगंधर्व हे माणिकबाईंच्या पिढीचे दैवतच होते. अर्थातच बालगंधर्वांची गायकी त्यांनीही अनुसरली व ‘नाथ हा माझा’, ‘अनृतची गोपाला’, ‘धनराशी जाता’, ‘खरा तो प्रेमा’, ‘तिमिरपटल भार विपुल’, ‘रूपबली तो नरशार्दुल’, ‘नृपकन्या तव जाया’, इ. अनेक नाट्यगीते त्यांनी मैफलींत गायली, तसेच त्यांच्या ध्वनिमुद्रिकाही निघाल्या. ‘लाविते मी निरांजन’, ‘निघाले आज तिकडच्या घरी’ अशी नवी नाट्यगीतेही त्या बाळ कोल्हटकरांच्या नाटकांसाठी गायल्या.

माणिकबाईंनी १९३९ साली वयाच्या अवघ्या अकराव्या वर्षी दत्ता डावजेकरांनी संगीतबद्ध केलेली चार भावगीते गायली व या दोन ध्वनिमुद्रिकांद्वारे त्यांचे या क्षेत्रात पदार्पण झाले. यानंतर त्यांनी या क्षेत्रात आपली खास मुद्रा उमटवली. चित्रपटगीतांच्याही बाबतीत माणिक वर्मांचे खास स्थान आहे. ‘प्रभात फिल्म कंपनी’च्या ‘गोकुल’ या हिंदी चित्रपटातील ‘आया गोकुल में छोटासा राजा’ या सुधीर फडके यांनी स्वरबद्ध केलेल्या गीताद्वारे त्यांनी पार्श्वगायनाच्या क्षेत्रात पदार्पण केले. मात्र, त्या अधिकतर मराठीच चित्रपटांसाठी गायल्या.

विविध संगीतकारांकडे माणिक वर्मा असंख्य भावगीते, भक्तिगीते, चित्रगीते गायल्या व ती मराठी जनमानसाच्या सांस्कृतिक जीवनाचा अविभाज्य भाग बनली. यांतील काही गाजलेली गाणी अशी : ‘सावळाच रंग तुझा’, ‘गळ्याची शपथ तुला’, ‘शरदाचे चांदणे’, ‘घननीळा लडिवाळा’, ‘बहरला पारिजात दारी’, ‘पहाट झाली उद्यानातुनी’, ‘जाळीमंदी पिकली करवंद’, ‘गोकुळीचा राजा’, ‘सगुण निर्गुण’ (सुधीर फडके), ‘अंगणी गुलमोहर फुलला’ (दत्ता डावजेकर), ‘ऊठ राजसा घननीळा’ व ‘आभाळीचा चांद’ (गजानन वाटवे), ‘कौसल्येचा राम बाई’, ‘हसले मनी चांदणे’, ‘जा मुली शकुंतले सासरी’ (पु.ल. देशपांडे), ‘अमृताहुनी गोड’, ‘विजयपताका श्रीरामाची’ (बाळ माटे), ‘सांगू कशी ग मनाची व्यथा’, ‘त्या चित्तचोरट्याला’ (मधुकर गोळवलकर), ‘चांदण्या रात्रीतले’ (वसंत पवार), ‘त्या सावळ्या तनूचे’, ‘क्षणभर उघड नयन देवा’, ‘जनी नामयाची’, ‘भाग्य उजळले’ (दशरथ पुजारी), ‘घडीघडी चरण तुझे’, ‘आळविते मी तुला विठ्ठला’ (राम फाटक), ‘हरी भक्तीचा’, ‘तुझ्या मुरलीत माझी प्रतिमा’ (गोविंद पोवळे), ‘लाज राख नंदलाला’, ‘एकतारी गाते’ (श्रीनिवास खळे), ‘इथेच आणि या बांधावर’, ‘येऊ कशी घनश्याम’ (विठ्ठल शिंदे), ‘जाशी कुठे नवनीतचोरा’ (नीळकंठ अभ्यंकर), ‘शिवशंकर ते’ (प्रभाकर जोग), ‘उघड उघड पाकळी’ (वि.द. अंभईकर), ‘करात माझ्या वाजे कंकण’, ‘मनी माझिया नटले’ (वसंत आजगावकर), ‘सावळ्या हरीची’ (अशोक पत्की).

आकाशवाणी, दूरदर्शन या माध्यमांतून माणिक वर्मा रसिकांसमोर आल्या. ‘गीतरामायणा’मधील त्यांनी गायलेली सीतेची पदे रसिकप्रिय ठरली. भारत व विदेशांतील अनेक मान्यवर रंगमंचांवरील मैफलींतून सादर झालेले त्यांचे गायन रसिकांनी वाखाणले.

कवी अमर वर्मा यांच्याशी विवाह झाल्यावर त्यांनी संसारही अत्यंत नेटका केला. चार मुलींचा संसार सांभाळून, घरात पाहुणे असले तरी गाण्यावाचून दिवसही काढला नाही, अशा तपश्चर्येचे हे गाणे होते. हिराबाई

बडोदेकरांनंतरच्या पिढीत माणिकबाईंचे नाव एक आदर्श गायिका म्हणून घेतले जाई व त्यांचा हा आदर्श नंतरच्या अनेक कलावतींनी डोळ्यांसमोर ठेवून वाटचाल केली. माणिकबाईंनी मुक्त कंठाने विद्यादानही केले. आशा खाडिलकर, शुभा जोशी, अर्चना कान्हेरे, शैला दातारांसारख्या अनेक शिष्या त्यांनी तयार केल्या. भारती आचरेकर, वंदना गुप्ते, राणी वर्मा या त्यांच्या मुलीही कलाक्षेत्रात चमकल्या.

माणिकबाई १९७३ च्या सुमारास मेंदूज्वराच्या जीवघेण्या आजाराने अंथरुणास खिळल्या, मात्र या दुखण्यातून बाहेर पडून त्या पुन्हा जिद्दीने गाऊ लागल्या व तेवढ्याच जोमाने मैफली रंगवू लागल्या. अखेरच्या काळात त्यांना अँजायना हा विकार जडला व मुंबईत त्यांचे निधन झाले.

माणिक वर्मांना ‘पद्मश्री’ (१९७४), ‘आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमी’ पुरस्कार (१९७७), ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार (१९८६), ‘गदिमा’ पुरस्कार (१९९५) इ. अनेक पुरस्कारांनी गौरविण्यात आले. त्यांच्या पश्चात मुंबईत ‘माणिक वर्मा प्रतिष्ठान’ स्थापून त्याद्वारे ‘माणिक रत्न’ पुरस्कार व शिष्यवृत्ती दिली जाते. तसेच ‘स्वरानंद’ या संस्थेमार्फत ‘माणिक वर्मा बहुस्पर्शी’ पुरस्कार ख्याल, नाट्यगीत व भावगीत या तिन्ही विधांतील उत्तम गायिकेस दिला जातो. भारत गायन समाजातर्फेही त्यांच्या नावे पुरस्कार दिला जातो व त्यांच्या पुण्यतिथीस विशेष मैफल सादर केली जाते.

– चैतन्य कुंटे

व

## वसईकर, गणपत पिराजी

**सनईवादक**

**१८६२ – २५ ऑक्टोबर १९४८**

पं. विष्णू दिगंबर पलुसकरांच्या काळातील घराणेदार सनईवादक म्हणून पं. गणपत वसईकरांचे नाव प्रसिद्ध आहे. व्यावसायिक सनईवादक म्हणून त्या काळात ते मोठमोठ्या संगीतोत्सवात सनईवादन करीत असत. गणपत पिराजी वसईकर यांचा जन्म वसई येथे झाला. त्यांच्या घरची आर्थिक परिस्थिती विशेष चांगली नसल्याने त्यांचे शालेय शिक्षण फारसे झाले नाही. त्यांना सनई व तबलावादनाचे शिक्षण मिळाले. त्यांना वसईतील देवळाच्या नगारखान्यात सनईवादकाची नोकरी मिळाली होती. देवस्थानाच्या व्यवस्थापकांनी या होतकरू कलाकाराची प्रतिभा हेरून, त्याला शिष्यवृत्ती देऊन मुंबईच्या उ. नजीर खाँ यांच्याकडे शिकायला पाठवले. तिथे गुरुसेवा करून त्यांनी विद्या मिळविली. आपल्या ज्ञानात भर घालून त्यांनी सनईवादनाचे तेज वाढविले.

गणपत वसईकर उत्तम तबला साथही करीत. पं. विष्णू दिगंबर पलुसकरांच्या भजनांच्या कार्यक्रमांची शोभा त्यांच्या तबला साथीने द्विगुणित होत असे. बडोदा संस्थानाच्या अधिपतींच्या आज्ञेवरून त्यांनी ‘सनईवादन पाठशाला’ भाग १ व २ ही सनईवादन संदर्भातील शास्त्रोक्त क्रमिक पुस्तके १९१८ साली लिहून प्रकाशितही केली.

आयुष्यातली शेवटची २०-२५ वर्षे त्यांनी भगवद्भक्तीत घालवली. तेव्हाचे त्यांचे स्वरूपदर्शन लोकांना प्रभावित करीत असे. लांब आणि शुभ्र दाढी-मिशा, भालप्रदेशी गंधाचा टिळा आणि मस्तकावरील महाराष्ट्रीय पद्धतीची पगडी घालून ते सनईवादनासाठी व्यासपीठावर येऊन बसले, की त्या दर्शनाने लोक मुग्ध होत. त्यांचे वादनही परिपक्व व सुंदर असे. त्यांना शेवटपर्यंत बडोदा दरबाराकडून आर्थिक साहाय्य मिळाले.

– डॉ. सुधा पटवर्धन

## वाईकर, यमुनाबाई

**लावणी गायिका**

**१९१९**

‘बैठकीची लावणी’ या महाराष्ट्रातील खास गानप्रकाराच्या श्रेष्ठतम कलाकार असणाऱ्या यमुनाबाई वाईकरांचा जन्म सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर जवळच्या नुने-कळमे या गावी झाला. महाबळेश्वर येथे उगम पावणाऱ्या कृष्णा, कोयना, सावित्री, गायत्री आणि वेण्णा या पाच नद्यांपैकी ‘वेण्णा’ हे नाव त्यांच्या



वडिलांनी ठेवले, मात्र धाकटा भाऊ 'यमुना' म्हणू लागल्याने तेच नाव रूढ झाले. कृष्णा नदीच्या वाई येथे त्यांचे वडिलोपार्जित घर होते. गाणे-वाजवणे, डोंबारी खेळ करण्याची परंपरा त्यांच्या कोल्हाटी समाजात होती व आई-वडील, भाऊ, पारूबाई, ताराबाई, हिराबाई, ममताबाई व यमुनाबाई या पाच मुली असे हे कुटुंब गरिबीत आपली कला जपत होते.

आई गीताबाई या तुणतुण्यावर गाणी म्हणत, तसेच गोंदणे-टोचणे अशाद्वारे गुजराण करत. आईमुळे घरात लावणी गाणे हे होतेच, शिवाय वडील विक्रमराव जावळे व भाऊदत्तोबा डोंबारी खेळ करत असल्याने यमुनाबाईही लहानपणी केसाने दगड उचलणे, कोलांट्या मारणे इ. कसरतीचे खेळ करत.

आईची लावणी आणि वडिलांची ढोलकी, तबला ऐकून त्याबरोबर त्याही अगदी बालवयापासून गाऊ-नाचू लागल्या, तमाशाच्या फडाबरोबर गावोगावी जाऊ लागल्या. बेबी-शेवंता बार्शीकर, लैला-चांगुणा जेजुरीकर, लीला-कला येवलेकर, रामप्यारी पुणेकर अशा त्या काळातील उत्तम लावणी गाणाऱ्या कलावतींच्या लावणीगायनाचा प्रभाव त्यांच्यावर पडला.

उ. अब्दुल वहीद खाँ यांच्याकडे शिकलेली शेवंती नावाची गायिका त्या काळात पक्की, रागदारीवर आधारित लावणी गात असे, त्याचाही प्रभाव यमुनाबाईंवर पडला. बैठकीच्या लावणीचा पारंपरिक अंदाज, गायनाची रीत, लावणीवर अदा करणे, भाव दाखवणे हे सर्व त्यांना प्रसिद्ध लावणीगायिका गोदावरीबाई पुणेकर यांनी शिकवले. मुंबईला तमाशा पार्टीतील पेटीवादक फकीर मुहंमद, द्वारकाबाई सातारकर या मैत्रिणीकडे त्या ठुमरी, कव्वाली, गझल शिकल्या. बडे गुलाम अलींची शागिर्दी करणाऱ्या अख्तरभाई कोल्हापूरकर यांच्याकडे त्या काही काळ ख्याल, तराणाही शिकल्या.

यमुनाबाई १०-१२ वर्षांच्या असताना तेव्हाच्या गाजलेल्या 'रंगू-गंगू सातारकर आणि पार्टी'मध्ये होत्या. पुढे त्यांनी नृत्यापेक्षा लावणीगायनावरच भर दिला. तमाशात त्यांच्या बहिणी नाचत, तर त्या व त्यांच्या आत्या वडिलांची ढोलकी, चुलत भावाची पेटी यांच्या साथीने गात असत. मुंबईत नायगाव व भुलेश्वर येथे तमाशाच्या 'झडती' होत असत, तेथे त्या लावणी सादर करत. 'पिला हाउस थिएटर'मध्येही १९४२ साली त्यांचा कार्यक्रम झाला. त्यांनी १९४३ साली 'यमुना-हीरा-तारा तमाशा' ही स्वत:ची बारी सुरू केली व मुंबई गाजवली. वाईमध्ये त्यांनी अल्पकाळ 'मानापमान', 'भावबंधन' या संगीतनाटकांत भूमिका व गायन केले. त्या काळात त्यांच्यावर बालगंधर्वांच्या नाट्यसंगीताचा प्रभाव होता.

शारीर-सौंदर्यातील आवाहकतेपेक्षा आपले नजाकतदार गायन, प्रभावी अदाकारी यांद्वारे यमुनाबाई लावणीची बैठक यशस्वी करत. उंच आणि बुलंद सूर, भावदर्शक उच्चारण, अदाकारीतील नखरा, मुरका, तोरा यांमुळे त्यांची प्रस्तुती अत्यंत सरस होत असे. लावणीतील एखादी ओळ वारंवार आळवत आवाजाचा पोत व गरिमा बदलून, सूचक मुद्राभिनयाने नाना भावच्छटा उलगडत त्या लावणी 'खेळवत'. चौकाची लावणी ही त्यांची खासियत होती व बालेघाटी, छक्कड, सवाल-जवाब इ. लावणीचे प्रकारही त्या रंगवून गात. ऐंशीव्या वर्षीही त्यांनी पतंगाच्या लावणीवर त्यांची केलेली अदा षोडशेला लाजवेल अशी असे.

'नेसले पितांबरी जरी', 'पंचकल्याणी घोडा अबलख', 'तुम्ही माझे सावकार', 'शुद्ध श्रावणमासी', 'सोडा मनगट', 'पाहुनिया चंद्रवदन', 'सांभाळा झोक', 'अहो भाऊजी मी कोरा माल' इ. लावण्या त्यांनी गाजवल्या. चित्रपटगीतांच्या वाढत्या प्रभावाच्या काळातही यमुनाबाईंनी नेटाने पारंपरिक लावणीगायनाचा

ढंग कसोशीने मांडला व जपला. पं. बिरजूमहाराज यांच्यासारख्या कथक नृत्यसम्राटानेही यमुनाबाईंच्या अदाकारीला सलाम केला एवढेच नव्हे, यमुनाबाईंचे ठुमरीगायन आणि त्यावर बिरजूमहाराजांची अदाकारी असाही कार्यक्रम रंगतदार झाला होता.

डॉ. अशोक दा. रानडे यांनी त्यांची विस्तृत मुलाखत 'ग्रंथाली'साठी घेतली होती व डॉ. रानडे यांच्या 'बैठकीची लावणी' या कार्यक्रमातही त्यांचा सहभाग होता. यमुनाबाईंच्या लावणीगायनाचे ध्वनिमुद्रणही त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या ध्वनिसंग्रहालयासाठी केले होते.

अत्यंत साध्यासुध्या स्वभावाच्या व राहणीच्या यमुनाबाई वयाच्या ८०-८५ पर्यंत उत्तम गान-अदाकारी करत होत्या. त्यांच्या भाच्या, पुतण्या यांखेरीज अनेकांना त्यांनी बैठकीची लावणी आणि अदाकारी शिकवली आहे, शासकीय कार्यशाळांतूनही अनेकांना मार्गदर्शन केले आहे. यमुनाबाईंकडून मार्गदर्शन घेऊन काही विदेशी संशोधकांनी कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीमध्ये लावणीविषयक प्रबंध सादर केला आहे.

भटक्या डोंबारी कोल्हाटी समाजासाठी वाईत पक्की घरे उभारण्यात पुढाकार घेणे, लाखानगरमध्ये विठ्ठलमंदिर बांधणे, अखिल महाराष्ट्र कोल्हाटी समाज संस्थेच्या अध्यक्षपदावर असताना समाज व्यसनमुक्त होऊन शिक्षणाकडे वळवण्यासाठी प्रयत्न करणे अशी सामाजिक बांधीलकीची कामेही यमुनाबाईंनी केली.

राज्य सरकारचा 'लावणीसम्राज्ञी' पुरस्कार, 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, अखिल भारतीय जागतिक मराठी परिषदेचा सन्मान, सांगली नगर परिषद सन्मान, 'निळू फुले' सन्मान, मध्यप्रदेश सरकारचा 'अहिल्यादेवी होळकर' सन्मान, राष्ट्रपतींच्या हस्ते 'संगीत नाटक अकादमी रत्न' पुरस्कार (१९९४), संगीत नाटक अकादमीचा 'टागोर सन्मान' व भारत सरकारकडून 'पद्मश्री' (दोन्ही २०१२) असे पुरस्कार देऊन यमुनाबाईंच्या कार्याचा गौरव करण्यात आला आहे.

— चैतन्य कुंटे

व

## वाटवे, गजानन जीवन

**गायक, संगीतकार**

**८ जून १९१७ – २ एप्रिल २००९**



गजानन जीवन वाटवे यांचा जन्म बेळगाव येथे एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला व तेथेच त्यांचे शालेय शिक्षणही झाले. वडिलांनी सुचवलेला भिक्षुकीचा व्यवसाय मान्य नसल्याने व संगीत क्षेत्राच्या वेडापायी ते वयाच्या चौदाव्या वर्षी घर सोडून पुण्यास पळून आले. पुण्यात गोपाल गायन समाजात त्यांनी चार वर्षे, माधुकरी मागून संगीताचे शास्त्रीय शिक्षण घेतले.

गजानन वाटव्यांनी वयाच्या अठराव्या वर्षी काव्यगायनास सुरुवात केली व पहिला कार्यक्रम पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये केला. माधव ज्यूलियन यांच्या 'आई' या कविता गायनाने वाटवे यांचे पुण्यात नाव झाले, तर 'वारा फोफावला' या गीताने ते मराठी रसिकांच्या मनीमानसी जाऊन बसले आणि मराठी सुगम संगीताचे नवयुगनिर्माते ठरले. त्यांची सर्वच गीते विलक्षण गाजली, तर काही गीते मराठी सुगम संगीताची आभूषणे ठरली.

नव्या-जुन्या कवींच्या उत्तमोत्तम कविता निवडून त्यांना अर्थपूर्ण, मधुर व सहज गुणगुणण्याजोग्या चाली लावणे हा वाटव्यांचा छंद, ज्याला महाराष्ट्रातील रसिकांनी उदंड प्रतिसाद दिला. त्यांच्या जाहीर कार्यक्रमांना हजारोंची उपस्थिती असे. शेवटचा श्रोताही नजरेत येत नसे, एवढी गर्दी असे. गणपती उत्सवातील वाटव्यांचे कार्यक्रम ही लोकांना पर्वणीच असे. मिळेल ती जागा पटकावून, लोक पहाटेपर्यंत खिळून बसत. वह्या-पेन्सिली घेऊन कविता उतरवून घेत.

कार्यक्रमांत वाटवे एकटेच गात. सोबत साथीला फक्त तबला व व्हायोलिन असायचे. ते स्वत:च हार्मोनिअम वाजवत. त्यामुळे ऐन वेळी चालीत विविधता आणून ते

गात व कवितेतील अर्थ भावपूर्णरीत्या श्रोत्यांपर्यंत पोहोचवत. काव्याची उत्तम निवड, स्पष्ट शब्दोच्चार व कवितेला पूर्ण न्याय देणारी चाल व गायकी, ही वाटव्यांची वैशिष्ट्ये होती. अनेकविध रसाच्या कविता ते गात; शृंगार, वात्सल्य, हास्य, वीररस, कारुण्य, शांत, भक्तिरस, विरहगीते हे सर्व रस त्यांच्या गायनात आल्याने पाच-पाच तास चालणाऱ्या या भावगीतांच्या कार्यक्रमांत कधीच एकसुरीपणा आला नाही.

दीनानाथ स्मृती प्रतिष्ठानाचे 'लता मंगेशकर' पारितोषिक १९९३ साली मंगेशकर कुटुंबीयांनी वाटव्यांना दिले, तर १९९४ सालचा 'लता मंगेशकर' पुरस्कार महाराष्ट्र राज्य सरकारने वाटव्यांना दिला. विजय फाउण्डेशनने ३० जून २००१ रोजी त्यांना 'युगनिर्माता' पुरस्कार दिला व गदिमा प्रतिष्ठानाने २००५ साली त्यांना पुरस्काराने सन्मानित केले. असे अनेक सन्मान वाटव्यांच्या हयातीत त्यांना मिळाले.

'गगनी उगवला सायंतारा' या शीर्षकाचे त्यांचे आत्मचरित्र १९७१ साली प्रथम प्रकाशित होऊन २००७ साली त्याची दुसरी आवृत्ती निघाली. पुण्यातील नारायण पेठेतील चौकाचे 'सायंतारा चौक' हे वाटव्यांच्या स्मरणार्थ नामकरण झाले आहे.

स्वरानंद संस्थेतर्फे २०११ पासून 'वाटवे करंडक'ही 'नवे शब्द, नवे सूर' अशी स्पर्धा प्रतिवर्षी आयोजित केली जाते.

— मंजिरी चुनेकर

**संदर्भ :**

*१. वाटवे, गजानन; 'गगनी उगवला सायंतारा'.*

## वाडकर, सुरेश

**गायक**

**७ ऑगस्ट १९५५**

सुरेश वाडकर यांचा जन्म मुंबईतील एका संगीतप्रेमी कुटुंबात झाला. त्यांना गोड गळ्याची उपजत देणगी लाभली. अवघ्या चार वर्षे वयाच्या सुरेश यांनी नाट्यगीत म्हटले तेव्हा वडिलांनी त्यांना पार्श्वनाथ



डिग्रजकर या भजन गायकाकडे सोपवले. त्यांनी चार वर्षे सुरेशला गाणे शिकवले. आचार्य जियालाल वसंत यांनी सुरेश वाडकरांच्या पुढील संगीत शिक्षणाची, तसेच शालेय शिक्षणाची जबाबदारी स्वीकारली. त्यांच्याकडे वाडकरांनी गायनाचे व तबलावादनाचे धडे घेतले. त्यांनी अलाहाबादच्या प्रयाग संगीत समितीची गायन-तबलावादनाची पदवी मिळवली. त्यांनी सतारवादन व कथक नृत्याचे प्रशिक्षण घेतले. यानंतर गुरुजींच्या कन्या प्रेम वसंत यांच्याबरोबर युरोपच्या दौऱ्यात सहभागी होण्याची संधी त्यांना मिळाली.

युरोप दौऱ्यावरून आल्यावर वाडकर हरिदास संगीत संमेलनात शास्त्रीय संगीत गायले. याच सुमारास सूर सिंगार संमेलनाचे ब्रिजनारायण यांनी पहिल्याच चित्रपट संगीत संमेलनात त्यांना आमंत्रित केले आणि त्यांना 'मदन मोहन श्रेष्ठ पुरुष गायक पुरस्कार' मिळाला. संगीतकार रवींद्र जैन यांनी १९७७ मध्ये वाडकरांना राजश्री प्रॉडक्शन्सच्या 'पहेली' या चित्रपटात गायनाची संधी दिली. पार्श्वगायक म्हणून सुरेश वाडकर हे नाव रुपेरी पडद्यावर झळकले. पाठोपाठ १९७८ मध्ये संगीतकार जयदेव यांच्या 'गमन'मध्ये ते गायले. 'सीने में जलन आँखों में तूफान सा क्यों है' या गाण्याने पार्श्वगायन क्षेत्रात सुरेश वाडकर हे नाव सर्वतोमुखी झाले.

त्यानंतर वाडकरांना लता मंगेशकर यांच्याबरोबर गाण्याची संधी मिळाली. लक्ष्मीकांत प्यारेलाल या संगीतकार जोडीने 'क्रोधी' या चित्रपटातले 'चल चमेली के बाग में' हे द्वंद्वगीत लता मंगेशकर-सुरेश वाडकर यांच्याकडून गाऊन घेतले. खय्याम, कल्याणजी-आनंदजी यांनी वाडकरांना गाण्यासाठी बोलावण्यास सुरुवात केली, तर मराठीत सुधीर फडके, पं. हृदयनाथ मंगेशकर, श्रीनिवास खळे, श्रीकांत ठाकरे इत्यादी संगीतकारांनी त्यांना गायनासाठी बोलाविले.

संगीतकार श्रीधर फडके यांच्या 'ओंकारस्वरूपा' या ध्वनिफितीने सुरेश वाडकरांना रसिकांची मोठी प्रशंसा मिळाली. कवी सुरेश भट यांच्या गझला व संगीतकार रवी दाते यांच्या स्वररचना, संगीतकार प्रभाकर पंडितांनी स्वरबद्ध केलेल्या चाली सुरेश वाडकरांनी गायल्या. त्याही लोकप्रिय ठरल्या.

'ओंकारस्वरूपा सद्‌गुरू समर्था', 'विठ्ठल प्रेमभाव आवडी', 'विरले सगळे सूर तरीही', 'आता जगायचे असे माझे किती क्षण', 'दयाघना तुटले घर, ते' अशी मराठी गीते, तसेच 'सांज ढले गगन तले हम कितने एकाकी' हे 'उत्सव' चित्रपटातले गीत, 'सदमा' या चित्रपटातील 'ऐ जिंदगी गले लगा ले' हे गीत सुरेश वाडकरांच्या लोकप्रियतेची साक्ष देतात.

महाराष्ट्र राज्याचे अकरा, गुजरात राज्याचे तीन, तर पंजाब राज्याचे दोन पुरस्कार 'सर्वोत्कृष्ट पार्श्वगायक' म्हणून त्यांना मिळालेले आहेत. आपल्या गुरूंचे स्वप्न पूर्ण करण्यासाठी, विद्यार्थ्यांना संगीत शिकविण्यासाठी वाडकरांची 'आजीवासन' ही संस्था कार्यरत आहे. त्यांनी स्थापन केलेली 'श्रीमती सावित्री वसंत हायस्कूल' ही शैक्षणिक संस्था मुंबईत कार्यरत आहे.

दूरदर्शनच्या मालिकांची शीर्षक गीते, भक्तिगीतांच्या, स्तोत्रांच्या, मंत्रांच्या सीडी, मंच सादरीकरण, संगीत विद्यालयाचे अध्यापन यांत व्यस्त असलेले सुरेश वाडकर पार्श्वगायनाच्या सुवर्णयुगाच्या सरत्या कालखंडात पुढे आलेला एक महत्त्वाचा दुवा म्हणून ओळखले जातात.

— सुलभा तेरणीकर

व

## वाडीलाल, शिवराम नायक

**गायक**

**१८८२ — १९४७**

पंडित वाडीलाल शिवराम नायक यांचा जन्म उत्तर गुजरात येथील सिद्धपूर या गावी झाला. त्यांच्या मातुःश्री काशीबाई व पिता शिवराम यांना दोन मुले होती. मोठा वाडीलाल व धाकटा केशवलाल. सन १८९१ मध्ये वाडीलाल नऊ वर्षांचा असताना त्यांच्या मातुःश्रींचे निधन



झाले. सन १८९२ मध्ये शिवराम यांनी वाडीलाल याला मुंबई येथील 'दी बॉम्बे गुजरात नाटक मंडळी' या नाटक कंपनीत अभिनय व गाणी शिकण्यासाठी पाठविले. परंतु वाडीलाल याला शास्त्रीय संगीताचे नैसर्गिक आकर्षण असल्याकारणाने नाटकात अभिनय करणे किंवा नाटकातील गाणी गाणे यांत त्याचे मन रमले नाही.

लहानपणापासून नैसर्गिक उत्कृष्ट अनुकरणशक्ती असल्यामुळे कोणतेही गाणे ऐकून तो लगेच ते हुबेहूब गात असे. या उत्तम आकलनशक्तीमुळेच वाडीलाल यांना त्या काळातील भेंडीबाजार घराण्याचे सुप्रसिद्ध गायक उस्ताद नजीर खाँसारखे उत्तम गुरू लाभले.

वाडीलाल यांच्या १८९७ मध्ये वडिलांचे निधन झाले. त्यामुळे त्यांना पुन्हा पूर्वीच्या नाटक कंपनीत स्वतःच्या उदरनिर्वाहासाठी व लहान भावाच्या पालनपोषणासाठी नोकरी करावी लागली. उ. नजीर खाँ यांच्या तालमीत वाडीलाल यांची संगीतात फारच वेगाने व उत्तम प्रगती झाली. त्यामुळे या वेळेस नाटक कंपनीत त्यांना दिग्दर्शक, संगीत निर्देशक आणि गीतरचनाकार म्हणून काम करण्याची उत्तम संधी मिळाली. गीतरचनाकार म्हणून त्यांचे नाव गुजराती रंगभूमीच्या इतिहासात अजरामर झाले आहे. 'जुगल-जुगारी', 'मधुबंसरी', 'राइनो पर्वत' इत्यादी नाटकांना त्यांचे रसाळ संगीत व उत्कृष्ट लोकप्रिय रचनांचे योगदान गुजराती रंगभूमीच्या इतिहासात सुवर्ण अक्षरांत लिहिले गेले आहे.

संगीताच्या शिक्षणाबरोबर वडिलांच्या इच्छेनुसार व स्वत:लाही आवड असल्यामुळे वयाच्या जवळजवळ अठराव्या वर्षी त्यांनी संस्कृत भाषेचा अभ्यास करण्यास सुरुवात केली. मुंबईतील काळबादेवी, भुलेश्वर भागात एका संस्कृत पाठशाळेत त्या वेळचे प्रतिष्ठित संस्कृत पंडित जीवराम शास्त्री यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांना जुन्या वैयाकरण पद्धतीने, संस्कृत व्याकरण व

साहित्याचा सखोल अभ्यास करण्याचे भाग्य लाभले. संगीताव्यतिरिक्त वेदान्त, न्याय आणि व्याकरणशास्त्रात त्यांना अतिशय बौद्धिक आनंद मिळत असे.

पं. भातखंडे व उ. नजीर खाँ यांचा अतिशय घनिष्ठ संबंध असल्याने नजीर खाँ यांनी वाडीलाल नायक यांचा भातखंडे यांच्याशी परिचय करून दिला. वाडीलाल यांचा संस्कृत भाषेचा व्यासंग व रागदारी संगीत शिकण्याची उत्कट इच्छा यांमुळे पं. भातखंडे यांच्या सहवासात त्यांना संगीतावरील सर्व संस्कृत ग्रंथांचे सखोल अध्ययन करण्याची संधी मिळाली. वाडीलाल यांनी पं. शारंगदेव लिखित 'संगीत रत्नाकर'मधील 'स्वराध्याय' व 'रागविवेकाध्याय' यांचे गुजराती भाषेत भाषांतर करून ते प्रकाशित केले.

पं. भातखंडे यांनी जवळजवळ दीडशे प्रसिद्ध व अप्रसिद्ध रागांतील अनेक धृपदे, धमार व विलंबित-द्रुत ख्यालांच्या बंदिशी वाडीलाल यांच्याकडून दीडेकशे वर्षांपूर्वी ज्या प्रकारे बंदिशी गायल्या जात असत, तशा हुबेहूब प्रत्येक कण, स्वरासकट घोटवून घेतल्या होत्या. पं. भातखंडे यांच्या गायनशैलीतील कणयुक्त राग-आलाप व विस्तार, रागवाचक स्वरांचे लगाव आणि विश्रांतीस्थाने वाडीलाल यांच्या गाण्यातून दिसत असत. विशेषत: बंदिश पेश करण्याचा भावपूर्ण ढंग व बंदिशीला लयीच्या माध्यमाने सौंदर्ययुक्त सजविणे आणि चिजेच्या तुकड्यांना कलात्मकरीत्या जोडणे ही वाडीलाल यांची खासियत होती.

संगीताचे शास्त्रीय ज्ञान व सूक्ष्मरीत्या केलेल्या चिजांच्या अभ्यासामुळे, संगीताच्या कलात्मक स्वरूपाचे उत्तम ज्ञान असल्यामुळे कोणी काहीही आक्षेप पं. भातखंड्यांच्या सिद्धान्तांवर केले, तर त्यांवर मुद्देसूद चर्चा करून व प्रत्यक्ष चिजांची उदाहरणे गाऊन दाखवून वाडीलाल आक्षेपांचे निरसन करीत. भारतीय संगीतातील शास्त्रीय व प्रात्यक्षिक विषयांवर विद्वानांशी चर्चा करण्यात ते अत्यंत कुशल असे संगीतज्ञ मानले जात असत.

वाडीलाल नायक यांना धृपद गायनशैलीचे विशेष आकर्षण होते. त्या वेळचे सुप्रसिद्ध आलाप व धृपद गायक, उदयपूरचे उस्ताद जाकिरुद्दीन खाँ यांच्याकडून खास 'नोम्-तोम्' आलापाची तालीम व धृपद गायनशैलीची वैशिष्ट्ये त्यांनी आत्मसात केली. वाडीलाल नायक अतिशय परिणामकारक आलाप व धृपद गायन करीत असत.

त्यांनी काही वर्षे गुजरात राज्यातील 'वनस्थळी राज्य संगीत विद्यालय' येथे 'प्राचार्य' या पदावर राहून विविध प्रकारे संगीताची नि:स्वार्थ सेवा केली. वाडीलाल यांनी आपल्या गुरूंच्या अमूल्य कार्याचा आणि त्यांच्या विचारांचा प्रचार व प्रसार करण्यासाठी आपले जीवन समर्पित केले. त्यांचे वयाच्या पासष्टाव्या वर्षी निधन झाले. अहमदाबाद येथील 'संगीत केंद्र' या ध्वनिसंग्रहालयाच्या संचालिका गीता साराभाई - मेयर या त्यांच्या शिष्या आहेत.

— प्रा. यशवंत महाले

## वाडेकर, अलकनंदा अशोक

***बकुळ पंडित***

**गायिका, अभिनेत्री**

**२५ जुलै १९४९**



अलकनंदा अशोक वाडेकर, अर्थात पूर्वाश्रमीच्या बकुळ पंडित, मराठी संगीत रंगभूमीवरील अभिनेत्री गायिका, यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव रघुनाथ बाळकृष्ण पंडित व आईचे नाव रजनी पंडित. वडील व्यवसायाने औषध विक्रेते; पण त्यांना संगीताची आवड होती. ते तबला व बासरी वाजवत. बकुळ पंडितांचे प्रारंभिक संगीत शिक्षण त्यांच्याचकडे झाले. व्यवसायामुळे रघुनाथ पंडितांना हैद्राबाद येथे स्थायिक व्हावे लागले. त्यामुळे बकुळ पंडित यांचे शालेय शिक्षण हैद्राबाद येथेच झाले. त्या १९६४ साली हैद्राबादच्या 'विवेकवर्धिनी' या शिक्षणसंस्थेतून मॅट्रिक झाल्या.

व

शालेय शिक्षणाबरोबरच त्यांचे संगीत- शिक्षणही सुरू होते. भगवान धारप यांच्याकडे त्या 'गीतरामायण' शिकल्या. त्यानंतर दिगंबर कामतेकर व उत्तमराव पाटील यांच्याकडून त्यांनी शास्त्रोक्त संगीताचे धडे घेतले. त्यांनी १९६५ व १९६६ मध्ये ऑल इंडिया रेडिओच्या शास्त्रीय व सुगम संगीत स्पर्धेतून प्रथम पारितोषिक पटकावले.

त्या १९६६ साली संगीत शिक्षणासाठी म्हणून पुण्यात आल्या. पुण्यात पं. वसंतराव देशपांडे, विजय करंदीकर, हिराबाई बडोदेकर यांच्याकडे त्यांचे शास्त्रोक्त संगीताचे शिक्षण झाले. याबरोबरच फर्गसन महाविद्यालयामधून तत्त्वज्ञान या विषयात त्यांनी पदवी घेतली, तसेच पुणे विद्यापीठातून पदव्युत्तर अभ्यासक्रमही (एम.ए.) पूर्ण केला.

बकुळ पंडितांचा रसिकांना परिचय झाला तो 'कट्यार काळजात घुसली' व 'हे बंध रेशमाचे' या दोन नाटकांतून. त्यांचे २१ जानेवारी १९७० रोजी 'कट्यार काळजात घुसली' या नाटकातील 'उमा' या भूमिकेतून रंगभूमीवर प्रथम पदार्पण झाले. यातूनच त्यांच्या गायनकलेचा परिचय रसिकांना झाला. यात त्यांच्या गायनाला फारसा वाव नव्हता. मात्र, 'हे बंध रेशमाचे' (१९७२) या रणजित देसाईंच्या नाटकातील रेशमाची त्यांची भूमिका अभिनय आणि गायनानेही गाजली. यानंतर 'पाणिग्रहण' (१९७१), 'अशोकपुत्र कुणाल' (१९७२, संगीत : गोविंदराव अग्नी), 'इथे बुद्धिवादी हरला आहे' (१९७३, संगीत : राजेश्वर बोबडे) इ. नाटकांतून त्यांनी भूमिका केल्या. त्यांचा १९७३ सालीच व्यवसायाने स्त्री-रोगतज्ज्ञ असलेल्या अशोक देवीदास वाडेकर यांच्याशी विवाह झाला व त्या अलकनंदा वाडेकर झाल्या.

या दरम्यान त्यांना पं. जितेंद्र अभिषेकी यांचेही मोलाचे मार्गदर्शन लाभले. १९७७ पासून सुमारे १०/१२ वर्षे सातत्याने त्या आग्रा घराण्याचे गायक व उत्तम शिक्षक पं. गोविंदराव अग्नी यांच्याकडे तालीम घेत होत्या.

बकुळ पंडितांनी 'गणानं घुंगरू हरवलं', 'कुंकू माझं भाग्याचं' या राम कदम यांचे संगीत असलेल्या मराठी चित्रपटांतूनही गाणी गायली आहेत. सुधीर फडके यांच्याबरोबर गायलेले 'देवाजीचं नाव घ्यावं सकाळच्या पारी' हे गाणे, तसेच 'लाल लाल मिरची तोडा बायांनो' अशी काही मोजकीच चित्रपटगीते त्यांनी गायली आहेत. सी. रामचंद्र यांच्या 'गीत गोपाल' या कार्यक्रमातून त्यांचा सहभाग होता. हैद्राबादला असताना त्या गझलही गात.

शास्त्रीय संगीताच्या पक्क्या तालमीमुळे सूर-लयीचा झालेला पक्का पाया व तयारी, जात्याच सुरेल, गोड व बारीक आवाज, गायनातील आटोपशीरपणा व नेमकेपणा ही त्यांच्या गायनाची काही वैशिष्ट्ये होत. 'हे बंध रेशमाचे' या नाटकातील 'विकल मन आज' व 'का धरिला परिदेश' या गाण्यातून त्याचा प्रत्यय येतो. तसेच श्रीनिवास खळे यांचे संगीत असलेल्या 'पाणिग्रहण' या नाटकातील 'उगवला चंद्र पुनवेचा' व 'प्रीती सुरी दुधारी' ही दोन गाणीही त्यांनी छान गायली असून ही नाट्यपदे रसिकांच्या मनांत घर करून बसली आहेत. नाट्यसंगीताचा बाज राखून सुगम व भावपूर्ण रूप त्यांच्या गायनातून दिसते. या गाण्यांच्या ध्वनिमुद्रिकाही निघाल्या आहेत. 'बकुल गंध' ही जुन्या नाटकांतील गायलेल्या गाण्यांची ध्वनिफीत निघाली आहे. 'रंगदेवता'तर्फे त्यांना 'रघुवीर सावकार' पारितोषिक लाभलेले आहे.

श्रीमती अलकनंदा वाडेकर यांचे वास्तव्य मुंबईत असून त्या नाट्यसंगीत व शास्त्रीय संगीताचे मार्गदर्शन करत असतात.

— माधव इमारते

## वाडेगावकर, वामन नारायण

**संगीत शिक्षक**

**४ ऑक्टोबर १८९७ — २४ फेब्रुवारी १९६६**

वामन नारायण वाडेगावकरांचा जन्म केळीबाग, नागपूर येथे झाला. त्यांचे वडील नारायण दाजीबा वाडेगावकर हे संस्कृतचे विद्वान व कलाप्रेमी होते. त्यांच्या समाजकार्याच्या गौरवासाठी सरकारने त्यांना 'रावबहादूर' ही पदवी दिली होती. वडिलांचे सुसंस्कार मुलामध्ये उतरले होते.

व



नारायण वाडेगावकरांच्या दोन सुपुत्रांची नावे सावळाराम व वामन. देवीच्या रोगाने सावळारामचे दोन्ही डोळे गेले व त्यास पूर्ण अंधत्व आले, तर वामनची दृष्टी जन्मजात अधू असून ती हळूहळू अधू होत जाऊन बाराव्या वर्षी ते दृष्टिहीन झाले. नागपूरला १९१३ साली आलेल्या केशव गोपाळ शिरवळकर यांना इंग्रजी, मराठी साहित्याची उत्तम जाण असून ब्रेललिपी अवगत होती. नारायणरावांनी त्यांना आपल्या घरी ठेवून घेतले. त्यांनी दोघा मुलांना लेखन, वाचन, साहित्य व ब्रेललिपीचे शिक्षण देण्याची व्यवस्था घरीच केली.

वामन वाडेगावकर १९२५ मध्ये मुंबईला ताडदेव येथील अंधविद्यालयात दाखल झाले. सहा महिने राहून अनुभवसंपन्न होऊन अनेकांच्या सहकार्याने त्यांनी १९२८ मध्ये अंधविद्यालयाची स्थापना केली. त्यांना साहाय्य करणाऱ्यांमध्ये रा. स्व. संघाचे माधवराव गोळवलकर गुरुजीही होते. त्याच वर्षी वामन वाडेगावकरांचा विवाह अनंत बोरकर यांच्या कन्येशी झाला. त्यांच्या अंधविद्यालयाच्या कार्यात पत्नी इंदिराबाईंनी बरोबरीने मदत केली.

श्रद्धानंद पेठेत १९३५ मध्ये संस्थेची स्वत:ची इमारत उभी राहिली. संगीत शिक्षक म्हणून सावळाराम यांनी खूप मेहनतीने संगीत विभाग सांभाळला. वामन वाडेगावकरांनी स्वकर्तृत्वाने दाखवून दिले, की अंधांना कमी लेखण्याचे, वाळीत टाकण्याचे कारण नाही. त्यांच्या अंध विद्यालयात नेत्रहीनांना सर्वतोपरी आश्रय मिळून शालेय, सांस्कृतिक, औद्योगिक, संगीत आदी सर्व क्षेत्रांत शिक्षण देण्याची व्यवस्था होती. अंधांना स्वत:च्या पायांवर उभे राहण्याची हमी या संस्थेने दिली.

अंधविद्यालयाचे संस्थापक वामन वाडेगावकर यांचे हे भरीव समाजकार्य पाहून १९३७ साली सरकारने त्यांना 'रावसाहेब' ही पदवी देऊन गौरविले. लगेच पुढे शंकराचार्यांनी 'समाजरत्न' हा किताब देऊन त्यांचा गौरव केला. प्रकृती अस्वास्थ्यामुळे १९४८ पासून रावसाहेब वामन वाडेगावकर संस्थेतून निवृत्त झाले.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *मंगळूरकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; मार्च १९७४.*

## वालावलकर, पुरुषोत्तम माधव

**हार्मोनिअमवादक**

**११ जून १९२३ - १३ जानेवारी २०१४**



पुरुषोत्तम वालावलकरांचा जन्म सावंतवाडी येथे माधव व पार्वती या दांपत्यांच्या पोटी झाला. वडिल माधवराव हे गायक नट होते व 'गंधर्व नाटक मंडळी'मध्ये बालगंधर्वांचे नायक म्हणून त्यांनी कारकीर्द गाजवली होती.

पुरुषोत्तम वालावलकर यांचे बालपण हुबळी, धारवाड आणि मुख्यत: बेळगावात गेले. त्यांचे हार्मोनिअमचे शिक्षण विठ्ठलराव कोरगावकर, हणमंतराव वाळवेकर, गोविंदराव टेंबे यांच्याकडे झाले. हार्मोनिअमवादनामधील या तीन गुरुंबरोबरीनेच 'बालगंधर्व' यांच्याविषयी त्यांना नितांत श्रद्धा होती. वालावलकरांनी बालगंधर्व, शिवरामबुवा वझे, कागलकरबुवा यांच्या सहवासात गायकीचे संस्कार घेतले.

बडे गुलाम अली खाँ, भीमसेन जोशी, किशोरी आमोणकर, मल्लिकार्जुन मन्सूर, जितेंद्र अभिषेकी, गंगूबाई हनगल, शोभा गुर्टू, गिरिजादेवी, अजय चक्रवर्ती, रशीदखाँ, सी.आर. व्यास इ. दिग्गज कलावंतांना त्यांनी हार्मोनिअमची साथ केली. मैफलीत बसल्यावर मुख्य गायकाची स्वरांची गरज ओळखून ते ती साथीतून पुरवत असल्याने त्यांची साथ ती मैफल एका वेगळ्याच उंचीवर नेऊन ठेवत असे.

त्यांच्या शिष्यांपैकी हार्मोनिअम आणि ऑर्गनवादक संजय गोगटे हे आजचे प्रथितयश संगतकार आहेत. हार्मोनिअमवादनातील प्रदीर्घ योगदानाबद्दल पं. वालावलकरांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले होते. संगीत रिसर्च अकॅडमी, कोलकाता (२००५), 'लीलाताई जळगावकर संवादिनीवादन' पुरस्कार, 'बालगंधर्व' पुरस्कार (२००७), 'गांधर्व महाविद्यालय संगतकार' पुरस्कार (२००६) प्राप्त झाले होते. मुंबई येथे त्यांचे निधन झाले.

— धनश्री खरवंडीकर

**संदर्भ :**

*१. गोगटे, संजय; 'कोण तुजसम सांग'; 'सकाळ', २३ फेब्रुवारी २००६.*

## विजय राघव राव

**बासरीवादक, संगीतकार**

**३ नोव्हेंबर १९२५ – ३० नोव्हेंबर २०११**



बासरीवादक, संगीतकार, नृत्यकार, साहित्यिक असे बहुआयामी व्यक्तित्व असलेल्या पं. विजय राघव राव यांचा जन्म चेन्नई (मद्रास) येथे झाला. दाक्षिणात्य संगीत व नृत्यात त्यांनी बालवयातच नैपुण्य मिळवले. ते १९४५ पासून पं. रविशंकर यांचे शिष्य झाले व हिंदुस्थानी संगीतातही त्यांनी प्रावीण्य मिळवले.

त्यांनी बासरीवादनाच्या मैफली, वाद्यवृंदरचना, व्यावसायिक ध्वनिमुद्रणे अशा अनेकविध सांगीतिक प्रस्तुती केल्या. दिल्ली येथील लाल किल्ल्यावर १९४७ साली स्वातंत्र्यदिनी ध्वजवंदनाच्या संगीत संयोजनाचा बहुमान त्यांना लाभला. महात्मा गांधींसाठी रामधून वाजवण्याचे भाग्यही त्यांना लाभले. त्यांची १९६८ साली 'पेंटॅटोनिक मेलडीज ऑन फ्ल्यूट' ही स्वतंत्र ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध झाली.

त्यांनी १९६०-७० च्या दशकात 'बदनाम बस्ती', 'बन्सी बिरजू', 'एक अधूरी कहानी', 'सिनेमा सिनेमा', 'कफन', 'फेस्टिव्हल टाइम' इ. हिंदी, इंग्लिश व अन्य भाषांतील अनेक चित्रपटांस संगीत दिले. मृणाल सेन यांच्या पुरस्कारविजेत्या 'भुवन शोम' या चित्रपटासाठी, तसेच चित्रकार एम.एफ. हुसेन यांच्या 'थ्रू दी आइज ऑफ ए पेंटर' या लघुपटाच्या संगीतासाठी त्यांना पुरस्कार मिळाले होते. भारत सरकारच्या फिल्म्स डिव्हिजनमध्ये १९८० पर्यंत लघुपटांचे संगीतकार म्हणून विजय राघव राव कार्यरत होते.

आकाशवाणीचे वाद्यवृंद संचालक म्हणून त्यांनी अनेक वाद्यवृंद रचना केल्या. दूरदर्शनसाठीही त्यांनी चित्रपट, मालिका, नृत्यनाट्यांना संगीत दिले. ते १९८० मध्ये पं. रविशंकर यांच्या 'जॅझयात्रा'त साहाय्यक होते व 'जॅझमिन' या भारतीय व जॅझ संगीताच्या एकत्रित आविष्कारात त्यांनी बासरीवादन केले. रिचर्ड अटेनबरो यांच्या 'गांधी' या चित्रपटासाठी त्यांनी पं. रविशंकरांचे संगीत साहाय्यक म्हणूनही काम केले.

त्यांनी 'हंसनाद' या नवीन रागाची निर्मिती केली, तसेच रोणू मुजुमदार, सचदेव, विजय कुलकर्णी इ. शिष्य घडवले. ते एक साहित्यिकही होते. तेलुगू व इंग्लिश भाषांतील त्यांच्या कथा-कवितांची पाच पुस्तके प्रकाशित झाली.

भारताखेरीज अमेरिका, रशिया, झेकोस्लोव्हाकिया, स्वित्झर्लंड, फ्रान्स, जर्मनी, ब्रिटन इ. देशांत त्यांच्या मैफली झाल्या व त्यांना विविध बहुमानही मिळाले. त्यांना बर्लिन फिल्म फेस्टिव्हलमध्ये 'गोल्डन बेअर' सन्मान, 'पद्मश्री' (१९७०), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९८२), मेरीलॅण्ड सरकारची सन्माननीय डॉक्टरेट (२००२), 'आदित्य बिर्ला कलाशिखर' पुरस्कार (२००८) देऊन गौरविण्यात आले. त्यांच्या कारकिर्दीची महत्त्वाची वर्षे मुंबईत व्यतीत करून ते अखेरीस अमेरिकेत स्थायिक झाले होते.

— चैतन्य कुंटे

## विलायची, गोविंद शिवराम

**तबलावादक**

**१८७८ – ३ सप्टेंबर १९६४**



गोविंद शिवराम विलायची यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई होते. त्यांचे वडील तबला उत्तम वाजवीत. त्यामुळे संगीताचे संस्कार त्यांना बालपणीच मिळाले. त्यांनी वडिलांकडून तबलावादनाचे प्राथमिक धडे घेतले. आर्थिक परिस्थितीमुळे ते शालेय शिक्षण घेऊ शकले नाहीत. पुढे त्यांना श्रीमंत राजे लक्ष्मणराव भोसले यांनी राजाश्रय दिला, त्यामुळे संगीताची जोपासना करता आली.

निष्णात तबलावादक उ. मेहबूबखान यांच्याकडून विलायची यांनी तबलावादनाचे रीतसर शिक्षण घेतले, त्याचप्रमाणे मृदंगाचार्य रास्तेबुवांकडून मृदंगाचा अभ्यास केला. लाल खाँसाहेबांकडून सतारीचे शिक्षण घेतले. हार्मोनिअमवरही गोविंदराव विलायची यांचे प्रभुत्व होते. तसेच जलतरंग, सारंगी, दिलरुबा या वाद्यांवरसुद्धा त्यांनी प्रभुत्व मिळवले होते.

बनारस घराण्याचा बाज, लयीचे तंतोतंत संतुलन आणि दुर्मीळ बोलांचा त्यांच्याजवळ असलेला खजिना यांमुळेच ते लोकप्रिय झाले. त्यांनी नागपूर आकाशवाणी केंद्रावरून कार्यक्रम सादर केले. स्वतंत्र वादनाबरोबरच अनेक कलाकारांना त्यांनी साथसंगत केली. त्याबरोबरच वाद्यशिक्षणाचे कार्यही केले. त्यांच्या शिष्यपरंपरेत जनार्दनपंत दारव्हेकर, भैयाजी चौरीकर, गजाननराव दशपुत्रे यांचा समावेश होतो.

विलायचींचा स्वभाव निर्भीड, स्पष्टवक्ता व थोडासा फटकळ होता. परंतु संपूर्ण आयुष्यभर कलाराधनेत घालवल्यामुळे संगीताची झालेली हेळसांड त्यांना बघवत नसे. त्यांनी १९२० ते १९३७ पर्यंत आपल्या निवासस्थानी संगीताचे वर्ग चालवले. नंतर त्याच वर्गाचे संस्थेत रूपांतर केले. त्या संस्थेचे ५ जानेवारी १९३७ रोजी ‘श्री गुरू गायन वादनालय’ असे नामकरण केले. नागपूरमधील बडकस चौकात ही संस्था स्थलांतरित झाली. त्यांनी संगीत प्रचारार्थ बरेच भ्रमण केले.

वयाच्या एक्याऐंशीव्या वर्षी नागपूरमधील सुप्रसिद्ध राजाराम वाचनालयातर्फे ‘संगीत महर्षी’ ही उपाधी देऊन त्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला. तसेच मध्यप्रदेश संगीत समाजाच्या वतीने वर्धा इथे त्यांचा सत्कार झाला. वयाच्या शाऐंशीव्या वर्षी गोविंद विलायची यांचे नागपूर येथे निधन झाले.

– सुपर्णा कुलकर्णी

**संदर्भ :**


१. *मंगरूळकर, नारायणराव; ‘वैदर्भीय संगीतोपासक’, भाग १; १९७४.*


## विलायत हुसेन खाँ

**गायक**

**१८९६ – १८ मे १९६२**



उस्ताद विलायत हुसेनखाँ यांचा जन्म आग्रा येथे झाला. विलायत हुसेन खाँ यांचे वडील नत्थन खाँ हे मोठे विद्वान गायक होते. विलायत हुसेन खाँ यांच्या बालपणीच त्यांच्या वडिलांचे निधन झाले. त्यामुळे ते जयपूरला आपले आजोबा उस्ताद कल्लन खाँ यांच्याकडे गेले. ते जयपूर दरबारचे गायक होते. त्यांच्याकडून, तसेच त्याच दरबारातील गुणी धृपदिये उस्ताद करामत खाँ यांच्याकडून त्यांना पायाभूत स्वरतालांचे शिक्षण मिळाले. आजोबा महंमद बक्ष यांच्याकडे त्यांना ख्याल आणि धृपदाची तालीम मिळाली. उस्ताद गुलाम अब्बास यांच्याकडेही ते संगीत शिकले. पुढे त्यांना त्यांचे वडीलबंधू महमद खाँ व अब्दुल्ला खाँ यांच्याकडून संगीताची तालीम मिळाली. त्यांचे मोठे मामा महमूद खाँ

व

व मधले मामा पुत्तन खाँ व धाकटे मामा मुन्शी जमाल अहमद यांच्याकडूनही त्यांना बऱ्याच रागरागिण्यांतील ख्याल मिळाले.

आपल्या घराण्याच्या बाहेरच्या अनेक उस्तादांकडून त्यांनी विविध रागरागिण्यांचा व चिजांचा संग्रह केला. जवळजवळ ४० गुरूंकडून त्यांनी संगीतविद्या घेतली. ते एकाअर्थी गायकांचेच गायक होते. प्रचलित रागांमधील शेकडो बंदिशी, तसेच अनवट रागांमधील (अप्रचलित) कैक बंदिशी त्यांना मुखोद्‌गत होत्या.

खाँसाहेबांनी उदारहस्ते विद्यादान केले. त्यांच्या शिष्यगणात पं. रत्नकांत रामनाथकर, पं. जगन्नाथबुवा पुरोहित, काणेबुवा, सुमती मुटाटकर, गिरिजा केळेकर, पं. सीताराम फातरपेकर, सरस्वतीबाई फातरपेकर यांचा विशेष उल्लेख केला पाहिजे. पं. रत्नकांत रामनाथकर हे खाँसाहेबांची गायकी सहीसही मांडत असत. खाँसाहेब काटेकोरपणे शिष्यांकडे लक्ष देत असत व रागशुद्धतेबाबत जराही तडजोड करत नसत. मोगूबाई कुर्डीकर, राम मराठे, मेनका शिरोडकर, यशपाल इत्यादींनी त्यांचे काही काळ मार्गदर्शन घेतले.

विलायत हुसेन खाँसाहेब स्वभावाने मोठे स्वाभिमानी होते. ते मुंबईला आले तेव्हा त्यांची आर्थिक परिस्थिती फारशी ठीक नव्हती. त्यांच्या चाहत्यांनी त्यांचा एक जलसा आयोजित करून जमा झालेली रक्कम खाँसाहेबांना सुपूर्द केली. मात्र, आयोजकांनी खाँसाहेबांच्या मदतीकरिता हा निधी गोळा केला असल्याचे सांगितल्यामुळे खाँसाहेबांचा स्वाभिमान दुखावला गेला. त्यांनी तो सर्व निधी तिथल्या तिथेच टिळक फंडासाठी देत असल्याचे जाहीर केले. खाँसाहेबांचे व्यक्तिमत्त्व व वागणेबोलणे रुबाबदार होते. पुण्याला आबासाहेब मुजुमदारांच्या घरी त्यांनी स्वखर्चाने येऊन हजेरी लावली. पण, आबासाहेबांनी बिदागी देऊ केली असता, ती त्यांनी नम्रपणे नाकारली.

खाँसाहेबांच्या मैफलींचे वैशिष्ट्य म्हणजे सुरुवातीलाच सुरावटीत राग जाहीर होत असे. रागाच्या चिजेचा स्थायी अंतरा अगदी चुस्त असे. समेवर येताना हमखास 'आमद' असायचीच. त्यामुळे श्रोते समेला हमखास दाद देत असत. द्रुत चिजेत ताना घेताना ते मुखड्याच्या आधी एक सुरावट 'आमद' म्हणून बांधायचे आणि मुखड्याच्या आधी ती सुरावट हमखास घ्यायचे. त्यामुळे मुखड्याचा कार्यकारणभाव सिद्ध व्हायचा आणि मैफल चैतन्यपूर्ण होत असे. त्यांच्या गाण्यातील सर्वांत आकर्षक भाग लयकारी हा होता. लयकारीचे बोल ते अतिशय डौलदारपणे टाकत असत.

मुंबईत असताना 'प्राणपिया' या टोपणनावाने खाँसाहेबांनी अनेक बंदिशी केल्या होत्या. चाळीसहून अधिक वर्षांचा काळ मुंबईत वास्तव्य केल्यानंतर खाँसाहेबांनी आकाशवाणीच्या दिल्लीच्या मुख्यालयात सल्लागाराचे प्रतिष्ठेचे पद स्वीकारले आणि १९५५-५६ च्या दरम्यान त्यांच्या जीवनाचा नवा अध्याय सुरू झाला.

मुंबईतील शिकवणीची दगदग थांबली व खाँसाहेबांची निर्मितीची ऊर्मी बहरली. त्यांचे गाणे पूर्वीपेक्षा अधिक आशयघन झाले.

दिल्ली येथे रचलेल्या बंदिशींमध्ये जोग रागामधील 'घरी पलछिन कछु ना सुहाय' ही बंदिश अविस्मरणीय ठरली. दिल्ली येथे पं. वि.रा. आठवले व पं. गजाननराव जोशी यांसारख्या नामवंत गायकांनी खाँसाहेबांच्या विद्येचा लाभ घेतला.

आकाशवाणीसाठी खाँसाहेबांनी बऱ्याचशा अनवट रागांचे ध्वनिमुद्रण करून दिले. त्यांचे हे भरघोस दान संगीतातील भावी पिढ्यांसाठी मोठे वरदान ठरले आहे. हे ध्वनिमुद्रण अंदाजे ७२ तासांचे आहे. त्यांनी आपल्या सांगीतिक आयुष्यातील, तसेच आपल्या पूर्वजांकडून ऐकलेल्या दुर्मीळ आठवणी पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्या आहेत. 'संगीतज्ञों के संस्मरण' या नावाने संगीत नाटक अकादमीने हा ग्रंथ प्रकाशित केला आहे.

**— पं. बबनराव हळदणकर**

व

## व्यास, चिंतामण रघुनाथ

***सी.आर. व्यास***

**गायक, बंदिशकार**

**९ नोव्हेंबर १९२४ – १० जानेवारी २००२**



चिंतामण रघुनाथ व्यास यांचा जन्म उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर या गावी झाला. व्यासांचे घराणे हे संत घराणे म्हणून ओळखले जाई. चिंतामण व्यास शालेय शिक्षणाकरिता बार्शी येथे आले. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यानंतर संगीताच्या शिक्षणाकरिता ते मुंबईला आले. शालेय शिक्षण चालू असताना किराणा घराण्याची तालीम त्यांनी पं. गोविंदराव भातंब्रेकर यांच्याकडे घेतली. संगीताचे पुढचे शिक्षण घेण्यासाठी त्यांनी मुंबईला येण्याचा निर्णय घेतला. मुंबईला त्यांनी दोन-तीन ठिकाणी नोकरी करून नंतर आय.टी.सी.मध्ये कायमची नोकरी धरली.

मुंबईमध्ये गिरगावातील ट्रिनिटी क्लबमध्ये दर शनिवारी व रविवारी गाण्यांचे कार्यक्रम होत असत. तेथे त्यांचे गाणे ऐकून नाफडे नावाच्या रसिकाने त्यांना चांगले गाणे शिकण्याकरिता ग्वाल्हेर गायकीचे श्रेष्ठ गायक पं. राजारामबुवा पराडकर यांच्याकडे पाठवले. पराडकरबुवांच्या निधनापर्यंत व्यासांचे संगीताचे शिक्षण चालू होते. तसेच, पं. यशवंतबुवा मिराशी यांच्याकडे मार्गदर्शन घेण्याचे भाग्यही व्यासांना लाभले.

पराडकरबुवांकडे शिकत असतानाच व्यासांची मुंबई येथील भारतीय विद्या भवन येथे संगीताचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. तेथे पं. श्रीकृष्ण नारायण रातंजनकरांशी त्यांचा संबंध आला. तसेच रातंजनकरांचे शिष्य पं. चिदानंद नगरकर, पं. के.जी. गिंडे व पं. एस.सी.आर. भट यांच्याशी संबंध आल्यामुळे संगीताकडे बघण्याचा त्यांचा दृष्टिकोन व्यापक झाला.

ग्वाल्हेर घराण्याची उत्कृष्ट तालीम घेत असतानाच व्यासांची पं. जगन्नाथबुवा पुरोहित ऊर्फ ‘गुनिदास’ यांच्याशी भेट झाली. गुनिदास हे एक उत्तम वाग्गेयकार होते. त्यामुळे बंदिशीकडे बघण्याची त्यांची ‘नजर’ संपूर्णपणे बदलली. जगन्नाथबुवांनी व्यासांच्या प्रतिभेला पैलू पाडले. व्यासांनी खूप उत्तम बंदिशींच्या रचना केल्या. व्यासांच्या बंदिशी त्यांच्या शिष्यांप्रमाणेच अनेक प्रथितयश गायक-गायिका आपल्या मैफलीत पेश करतात.

‘रागसरिता’ या पुस्तकात व्यासांनी रचलेल्या १२१ बंदिशी आहेत. ‘तज रे अभिमान’ (बिलासखानी तोडी) ‘कौन मीत कौन वैरी’ (विभास), ‘मनवा तुम ना जाने’ (धानी), ‘मेरा मन लागो’ (रागेश्री), ‘ना डारो रंग मोपे’ (बागेश्री) अशा कमी शब्दांत अधिक आशय सांगणाऱ्या त्यांच्या अनेक बंदिशी लोकप्रिय झाल्या. त्यांच्या बंदिशी ‘गुणिजान’ या टोपणनावाने आढळतात. व्यास हे उत्तम गायक, वाग्गेयकार गुरू म्हणून ओळखले जायचे. त्यांची शिष्यपरंपरा तेवढीच मोठी आहे. उदा. प्रभाकर कारेकर, कुंदा वेलिंग, श्रीपाद पराडकर, मंगला रानडे, संजीव चिमलगी, तसेच पुत्र सुहास व सतीश व्यास यांचा समावेश त्यांच्या शिष्यपरिवारात होतो.

आय.टी.सी.तील नोकरी करत असताना व्यासांनी कंपनीतर्फे महाराष्ट्राच्या नऊ जिल्ह्यांमध्ये ‘बर्कले नाट्यमहोत्सव’ आयोजित करून एक उत्तम उपक्रम केला. ‘महाराष्ट्र ललित कला निधी’ या संस्थेची स्थापना करून त्यांनी आपले गुरू पं. जगन्नाथबुवा पुरोहित यांच्या स्मृत्यर्थ ‘गुनिदास संगीत संमेलन’ सुरू केले. देशात आणि परदेशांत त्यांनी अनेक कार्यक्रम केले. ‘स्पीक मॅके’ या संस्थेतर्फे त्यांनी अनेक ठिकाणी संगीताच्या कार्यशाळा घेतल्या.



व्यासांच्या व्यक्तिमत्त्वाला अनेक पैलू होते. स्पष्टवक्तेपणा हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा महत्त्वाचा पैलू होता. ग्वाल्हेर घराण्यात सुरुवातीचे व त्याही आधी किराणा घराण्याचे संस्कार झाल्यामुळे बोल-आलाप, बोल तान व सुरेलपणा त्यांच्या गायनात दिसत असे. त्यामुळे तीनही घराण्यांचे समग्र दर्शन त्यांच्या गायनात

दिसे. आम रागांबरोबर अनवट किंवा अप्रचलित रागही ते तेवढ्याच ताकदीने रसिकांसमोर मांडायचे.

व्यासांना त्यांच्या सांगीतिक योगदानाबद्दल भारत सरकारने ‘पद्मभूषण’ पुरस्काराने १९९२ मध्ये सन्मानित केले. त्याव्यतिरिक्त त्यांना ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार (१९८७), ‘महाराष्ट्र गौरव’ पुरस्कार (१९९०), ‘उस्ताद हफीज अली’ पुरस्कार (१९९८) ‘मा. दीनानाथ’ पुरस्कार (१९९९) आणि मध्य प्रदेश शासनाचा ‘तानसेन’ पुरस्कार (१९९९) असे अन्य पुरस्कारही प्राप्त झाले. कलकत्ता येथे गुनिदास संगीत संमेलनासाठी गेले असतानाच त्यांचा अकस्मात मृत्यू झाला.

– सुहास व्यास

## व्यास, नारायण गणेश

**गायक**

**४ एप्रिल १९०२ – १ एप्रिल १९८४**



नारायण गणेश व्यास यांचा जन्म कोल्हापूरला झाला. त्यांचे वडील उत्तम गायक, सतारवादक होते. त्यांचे वडीलबंधू शंकर व्यास पं. विष्णू दिगंबर पलुसकरांचे शिष्य होते. ते १९११ साली विष्णू दिगंबरांच्या गांधर्व महाविद्यालयात दाखल झाले. नऊ वर्षांच्या शिक्षणानंतर आपल्या बंधूंसह ते १९२२ साली अहमदाबादला आले व तेथील गांधर्व महाविद्यालयात अध्यापन करू लागले. त्यांनी १९३७ साली मुंबईत दादर येथे ‘व्यास संगीत विद्यालया’ची स्थापना बंधू शंकर यांच्या सहकार्याने केली.

नारायण व्यासांचा आवाज पातळ, गोड, सुरेल होता. भरपूर दमसास, सुस्पष्ट सरळ, सपाट ताना हे त्यांच्या गायकीचे वैशिष्ट्य होते. ग्वाल्हेर गायकीची शैली आत्मसात केल्यावर, नारायण व्यास यांनी मास्तर कृष्णराव आणि बालगंधर्व यांचा आदर्श नजरेसमोर ठेवून आपले गाणे ढंगदार केले. शास्त्रीय संगीताबरोबरच ते ठुमरी व भजनेही गात असत. एच.एम.व्ही.ने १९२९ ते १९४२ या काळात त्यांच्या ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध केल्या.

दुर्गा रागातील ‘सखी मोरी’, तिलक कामोद रागामधील ‘नीर भरन कैसे जाऊँ’, बहार रागामधील ‘फुलवाले कन्थ’, मांड रागामधील ‘बालम मोरा सुनी हो’ ही ठुमरी, अशा त्यांच्या ध्वनिमुद्रिका लोकप्रिय झाल्या आणि त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले. त्यांना निरनिराळ्या ठिकाणांहून मैफलींची निमंत्रणे येऊ लागली आणि भारतभर त्यांनी अनेक मैफली गाजवल्या.

‘कहां के पथिक कहां’, ‘राधेकृष्ण बोल मुख’से आणि ‘ठुमक चलत रामचंद्र’ ही त्यांची विशेष लोकप्रिय झालेली भजने होत. विष्णू दिगंबरांमुळे नारायण व्यासांना पंजाबमध्येही विशेष लोकप्रियता लाभली. लोकांना काय पाहिजे हे ओळखण्याची अचूकता त्यांच्याजवळ होती, म्हणूनच त्यांना हे यश मिळाले. आपले गुरुबंधू विनायकबुवा पटवर्धन यांच्याबरोबर त्यांची गायनजुगलबंदीही भारतभर लोकप्रिय होती. त्यांची ‘मालगुंजी’ रागाची, जुगलबंदीची ध्वनिमुद्रिकाही लोकप्रिय ठरली.

त्यांना १९७७ मध्ये संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार मिळाला. मध्यप्रदेश सरकारने १९८२ मध्ये ‘तानसेन’ पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला. अ.भा. गांधर्व महाविद्यालय मंडळाच्या पुणे अधिवेशनात आणि पुण्याच्या सवाई गंधर्व संगीत महोत्सवातही त्यांचा सत्कार करण्यात आला.

शास्त्रीय संगीताचे लोकप्रिय गायक म्हणून नारायण व्यासांचे नाव रसिकांच्या नेहमीच लक्षात राहील. मास्टर नवरंग नागपुरे, वसंतराव राजोपाध्ये, विमल पत्की, शरद जांभेकर, प्रसाद सावकार व पुत्र विद्याधर व्यास हे त्यांचे प्रमुख शिष्य होत.

– मधुवंती पेठे

## व्यास, विद्याधर नारायण

**गायक**

**८ सप्टेंबर १९४४**



उत्तर हिंदुस्थानी रागदारी संगीतातील विख्यात पं. नारायणराव व्यास यांचे सुपुत्र विद्याधर यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई. विद्याधर व्यासांचे शालेय शिक्षण राजा शिवाजी विद्यालयात (किंग जॉर्ज हायस्कूल) झाले. मुंबईच्याच रुइया महाविद्यालयामधून अर्थशास्त्र व राज्यशास्त्र हे विषय घेऊन त्यांनी बी.ए. ही मुंबई विद्यापीठाची पदवी घेतली. त्यांनी पदव्युत्तर एम.ए. समाजशास्त्र हा विषय घेऊन केले.

घरातच गायन असल्यामुळे लहानपणापासूनच त्यांच्यावर गाण्याचे उत्तम संस्कार झाले. पं. नारायणरावांकडून त्यांना खास ग्वाल्हेर घराण्याच्या पलुसकर पठडीतील तालीम मिळाली. याबरोबरच अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाची ‘संगीताचार्य’ ही पदवीही त्यांनी घेतली.

जात्याच स्वरेल आवाजाची देणगी लाभलेले व ग्वाल्हेर घराण्याची पक्की तालीम लाभलेले विद्याधर व्यास ग्वाल्हेर घराण्यातील प्रचलित, अप्रचलित रागांतील विविध ख्याल, तराणे, तसेच पलुसकरांनी गायलेली भजनेही सुरेख गातात. त्यांच्या आवाजावर नारायणराव व्यासांच्या लगावांचा प्रभाव आहे. बोल अंगांनी गाण्यावर भर, ग्वाल्हेरी अंगाच्या सरळ-सपाट ताना व प्रवाहितता ही त्यांच्या गाण्याची काही वैशिष्ट्ये होत.

एक उत्तम शिक्षक व मार्गदर्शक म्हणूनही त्यांचा लौकिक आहे. ते १९६४ पासून शिक्षण क्षेत्रात कार्यरत आहेत. पदवी परीक्षेच्या विद्यार्थ्यांना, पदव्युत्तर एम.ए.च्या विद्यार्थ्यांना ते शिकवत आहेत व मार्गदर्शन करीत आहेत. डॉक्टरेट घेणाऱ्या विद्यार्थ्यांनादेखील १९७२ पासून त्यांचे मार्गदर्शन लाभले आहे. १९७३ साली जयपूर येथील गव्हर्नमेंट म्यूझिकल कॉलेजात (राजस्थान संगीत संस्थान) प्राचार्य पदावर त्यांची नियुक्ती झाली. १९८४ साली मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागाचे ते प्रमुख झाले. २००४ साली लखनौ येथील भातखंडे म्यूझिक इन्स्टिट्यूटमध्ये कुलगुरू (व्हाइस चान्सलर) या पदासाठी त्यांची निवड झाली. २००७ पासून कोलकात्याच्या आय.टी.सी. संगीत रिसर्च अकॅडमीचे कार्यकारी संचालक म्हणून भार सांभाळला.

अनेक अधिवेशने, संगीत परिषदा यांतून त्यांचा सहभाग असतो. संगीत विषयावरही त्यांनी विपुल प्रमाणात लेखन केले असून ते प्रात्यक्षिकासह व्याख्यानही देत असतात. ते आकाशवाणीवरील उच्च दर्जाचे गायक आहेत. दूरदर्शनवरही त्यांचे कार्यक्रम झाले असून, भारतात व परदेशांतही त्यांच्या मैफली झाल्या आहेत. ‘हिंदुस्थानी रागसंगीताची निर्मिती’ या विषयावरही त्यांनी अनेक कार्यक्रम केले आहेत. त्यांची ‘सुने री मैंने निर्बल के बलराम’ ही ध्वनिचकती निघाली आहे.

विद्याधर व्यासांचा आणखी एक पैलू म्हणजे त्यांनी नाटकातून केलेल्या भूमिका. पुरुषोत्तम दारव्हेकरांच्या ‘संगीत कट्यार काळजात घुसली’ या नाटकात (१९६९-७३) त्यांनी सदाशिवची भूमिका (जी प्रसाद सावकार करत होते) केली. नाटकाकरिता त्यांनी ‘अतुल व्यास’ हे नाव घेतले होते, तसेच जयपूरमध्ये वास्तव्य असतानाही हौशी नाट्यमंडळातून त्यांनी विविध मराठी नाटकांतून भूमिका केल्या आहेत.

विद्याधर व्यासांना २००७ साली संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार देण्यात आला. मुंबईत वास्तव्य असलेले विद्याधर व्यास अजूनही वेगवेगळ्या संगीत संस्थांतून सल्लागार म्हणून कार्यरत असून ते विद्यार्थ्यांनाही मार्गदर्शन करत असतात.

— माधव इमारते

## व्यास, शंकर गणेश
**गायक, संगीतकार**
**२३ जानेवारी १८९८ – १७ डिसेंबर १९५६**



पं. विष्णू दिगंबर पलुसकरांच्या ज्येष्ठ शिष्यांपैकी एक असलेले शंकर गणेश व्यास यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे वडील गणेशपंत हे कीर्तनकार पुराणिक होते व संगीताचे प्रेमी होते आणि ते स्वतः सतार व हार्मोनिअम ही दोन वाद्ये वाजवत असत. त्यांचे हे वैशिष्ट्य शंकर व्यासांमध्ये वारसारूपाने आले.

व्यासांचे पितृछत्र त्यांच्या वयाच्या सातव्या वर्षीच हरपले. पं. विष्णू दिगंबर कोल्हापूर येथे आले असताना त्यांचे लक्ष व्यासबंधूंकडे गेले. शंकर व त्यांचे धाकटे बंधू नारायण त्यांच्याकडे शिकण्यास गेले. शंकर व्यासांनी पलुसकरांच्या नियमानुसार नऊ वर्षे शिक्षण घेतले. त्या शिक्षणात गायनाबरोबर वाद्यवादनाचाही अंतर्भाव होता. त्यांच्या शिक्षणकाळात त्यांनी 'सतार लहरी' नावाचे पुस्तक लिहिले आणि गुरू पं. विष्णूबुवांनी ते छापून प्रकाशितही केले.

शिक्षण पूर्ण झाल्यावर शंकर व्यास गुजरातेत अहमदाबादला पं. ना.मो. खरे यांच्याबरोबर गांधी आश्रमात कार्य करू लागले. पुढे त्यांनी गुजरात विद्यापीठात शिकवले. गुजरात प्रांतात संगीत प्रचारार्थ गांधर्व महाविद्यालयाची १९३१ साली स्थापना करताना त्यांनी गुरुबंधू ना.मो. खरे व गोपाळराव जोशी यांचे सहकार्य घेतले. त्यांनी १९३७ साली बंधू नारायण व्यास व डॉ. वसंतराव राजोपाध्ये यांच्या मदतीने मुंबईत व्यास संगीत विद्यालयाची स्थापना दादर येथे केली.

व

शंकर व्यासांच्या व्यक्तिमत्त्वाला अनेक पैलू होते. ते ग्वाल्हेर घराण्याचे घरंदाज गायक होते. नारायण व्यासांच्या सोबतीने शंकर व्यासांनी एच.एम.व्ही.साठी जलतरंग व मॅण्डोलिन अशी वाद्यांच्या जुगलबंदीची ध्वनिमुद्रिका केली. शंकर व्यास मॅण्डोलिन फार सुरेख वाजवत असत. रसदीप, भवानी, भवानी केदार हे राग त्यांचीच निर्मिती होय. गुंजीकानडा, मालगुंजी अशा अवघड रागांत त्यांनी प्रासादिक रचना केल्या. 'प्राथमिक' व 'माध्यमिक संगीत' ही पुस्तके लिहून त्यांनी विद्यार्थ्यांची सोय केली.

त्यांनी १९३७ ते १९५५ या कालखंडात चित्रपटसृष्टीत संगीतकार म्हणूनही कारकीर्द गाजवली. त्यांनी ३५ हिंदी, ५ मराठी व ३ गुजराती बोलपटांचे संगीत, तसेच १५ चित्रपटांचे पार्श्वसंगीत दिग्दर्शनही केले. 'नरसी भगत' (१९४०), 'भरत भेट' (१९४१), 'रामराज्य' (१९४३) हे चित्रपट त्यांच्या संगीतामुळेही खूप गाजले. 'रामराज्य' सिनेमातील 'वीणा मधुर मधुर कछु बोल' हे सरस्वती राणे यांनी गायलेले पद त्या काळी अत्यंत लोकप्रिय झाले. 'नरसी मेहता' या सिनेमातले 'झुलना झुलावे नंदलाल' हे असेच गाजलेले सिनेगीत होय. चित्रपटातील वाद्यवृंदासाठी त्यांनी भारतीय वाद्ये वापरली आणि आपल्या भारतीय, महाराष्ट्रीय कलाकारांना त्या वाद्यवृंदात स्थान दिले. शंकर व्यास हे हसतमुख, मनमिळाऊ व संघटक वृत्ती असलेले व्यक्तिमत्त्व होते. पं. विष्णू दिगंबर पलुसकरांच्या निधनानंतर सर्व भारतभर विखुरलेल्या आपल्या गुरुबंधूंना एकत्र आणणे व गांधर्व महाविद्यालय मंडळाची स्थापना करणे यांत त्यांचा सिंहाचा वाटा होता. नंतर ते या मंडळाचे अध्यक्षही झाले. त्याचप्रमाणे मंडळाचे मुखपत्र असलेले 'संगीत कला विहार' हे मासिक काढण्यातही त्यांनी पुढाकार घेतला, तसेच या मासिकाचे ते आद्य संपादक झाले. पं. शंकर व्यासांचे चिरंजीव रत्नाकर व्यास हे उत्तम सरोदवादक झाले. कन्या रोहिणी चांदेकर गायिका होत्या. शंकर अभ्यंकर हे प्रसिद्ध सतारिये त्यांचेच शिष्य होत. अहमदाबाद येथे साठ वर्षे पूर्ण होण्याआधीच शंकर व्यास यांचे निधन झाले.

– डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ:**

*१. डॉ. राजोपाध्ये; 'संगीत कला विहार'; डिसेंबर २००५.*

***




## शर्मा, शिवकुमार उमादत्त
**संतूरवादक**
**१३ जानेवारी १९३८**



संतूर या वाद्यावर भारतीय रागसंगीताचा दर्जेदार आविष्कार करून त्यास जगभरात मान्यता देणारे पं. शिवकुमार उमादत्त शर्मा हे या शतकातले एक महत्त्वाचे कलाकार आहेत. ते मूळचे काश्मिरी असले, तरी त्यांच्या कारकिर्दीची महत्त्वाची वर्षे मुंबईत गेली व आजही ते महाराष्ट्रातच स्थायिक आहेत. शिवकुमार शर्मांचा जन्म काश्मीरमधील जम्मू येथे झाला. त्यांचे पूर्वज काश्मीरच्या राजघराण्याचे शैवपंथीय राजपुरोहित होते. त्यांचे वडील पं. उमादत्त शर्मा (सरदार हरनामसिंग व बडे रामदासजी यांचे शिष्य) हे रागतालावर प्रभुत्व असणारे उत्तम गायक, इसराजवादक व तबलावादक होते. त्यांचे लाहोर आकाशवाणीवरून कार्यक्रम होत असत.

रागसंगीतातील कलाकार असणारे वडील व आई यांनी गायलेली डोग्री लोकगीते, जम्मू दरबारात येणाऱ्या अनेक नामवंत कलाकारांचे संगीत या साऱ्यांचा संस्कार झाल्याने शिवकुमारांना बालपणीच संगीताची रुची होती. वयाच्या पाचव्या वर्षापासूनच वडील त्यांना गायन व तबलावादनाचे पाठ देऊ लागले.

वयाच्या बाराव्या वर्षी मुहम्मद अब्दुल तिब्बट वक्ल, मुहम्मद कालिन बफ यांच्याकडून त्यांनी काश्मिरी सुफियाना संगीतातील संतूर ऐकले. ते चौदा वर्षांचे असताना वडिलांनी त्यांच्या हाती संतूर देऊन या वाद्यावर रागसंगीताचा आविष्कार करण्याची प्रेरणा दिली. वडिलांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी या वाद्यावर रागसंगीताचा आविष्कार करण्याचे प्रयोग करावयास सुरुवात केली. संतूरवर मेहनत घेण्याच्या आधी ते काश्मीरमध्ये तबलावादक म्हणून नावारूपाला आले होते व त्यांनी पं. रविशंकर, सिद्धेश्वरी देवी, इ. अनेक दिग्गजांना तबल्याची साथ केली होती.

सतराव्या वर्षी ते जम्मू आकाशवाणीवर तबला व संतूर या दोन्ही वाद्यांची प्रस्तुती करत. आंतरविद्यापीठीय संमेलनात त्यांनी १९४६ साली मिळवलेल्या सुवर्णपदकामुळे शिक्षणमंत्र्यांनी काश्मीरचा संगीत प्रतिनिधी म्हणून त्यांची निवड केली आणि त्यांचे कार्यक्रम श्रीनगर व अन्य ठिकाणी होऊ लागले.

संतूरची रचना व वादनशैली या विषयात शिवकुमार शर्मांनी गहन चिंतन व संशोधन केले. मुळात लोकवाद्य असणाऱ्या संतूरवर रागसंगीत वाजवण्यासाठी त्यांनी काही महत्त्वाचे बदलही केले. संतूरवर प्रत्येक स्वरासाठी चार तारा लावल्या जात, त्याऐवजी त्यांनी तीन तारा लावल्या. चिकारीसाठी चार तारा योजल्या. संतूर हे लाकडी आसनाऐवजी ते मांडीवर ठेवून वाजवू लागले, ज्यामुळे त्याची अतिरिक्त कंपने नाहीशी झाली. ते पितळी तारांऐवजी स्टीलच्या तारा वापरू लागले. तारांसाठीच्या एकोणतीस घोड्या व क्रोमॅटिक स्केलनुसार जुळवलेल्या सत्त्याऐंशी तारा यांमुळे ते मिश्र राग, रागमालासारख्या संकीर्ण स्वरूपाच्या रचनाही वाजवू शकले.

तारांवरून कलम अलगद व सलगपणे छेडत मींडेचा आभास निर्माण करण्याची वैशिष्ट्यपूर्ण पद्धत त्यांनी विकसित केली, ज्यामुळे मुळात तुटक नाद असणाऱ्या या वाद्यावर रागांची सविस्तर आलापनक्रिया शक्य झाली.

शिवजींनी संतूर या वाद्यावर अतोनात परिश्रम घेऊन एक निराळी अशी वादनशैली निर्माण केली. आपले लयतालाचे सूक्ष्म भान आणि रागदारीचे ज्ञान वापरून त्यांनी या वाद्यावर अत्युच्च असा रागाविष्कार केला. आरंभी या वाद्यावर 'मींड, गमक नाही, त्यात सलगता नाही, हे हलकेफुलके वाटते व गंभीर अशा रागसंगीतासाठी उपयुक्त नाही', अशीही टीका त्यावर केली गेली. मात्र शिवकुमार शर्मांचे दर्जेदार वादन व त्यांची वाढती लोकप्रियता या टीकेस उत्तम उत्तर ठरले.

रागाची सविस्तर बढत करणारा आलाप-जोड-झाला, गतकारीमध्ये तिस्र-खंड-मिश्र-संकीर्ण अशा लयजातींमध्ये तालाशी सहजपणे केलेली लयक्रीडा, पहाडी धुनी यांमुळे त्यांचे वादन अत्यंत लोकप्रिय झाले. वडिलांकडून मिळालेले लयतालावरचे प्रभुत्व संतूरसाठी योजकतेने वापरून त्यांनी गतकारीतील लयतालाविष्काराचा एक उच्च दर्जाचा मापदंडच निर्माण केला. मत्ततालासारख्या अनवट तालांतील गतकारीही त्यांनी संतूरवर प्रचलित केली.

मुंबईत १९५५ साली स्वामी हरिदास संगीत संमेलनात त्यांचा संतूरवादनाचा पहिला कार्यक्रम झाला आणि हे वाद्य व कलाकार, दोन्ही एकदम चर्चेत आले. संगीतकार वसंत देसाई यांनी १९५६ साली त्यांना 'झनक झनक पायल बाजे' या चित्रपटासाठी संतूरवादन करण्याची पहिली संधी दिली. पार्श्वसंगीतासाठी त्यांनी स्वतंत्रपणे केलेले वादनही ध्वनिमुद्रिकेच्या रूपात प्रसिद्ध झाले. या चित्रपटातील गीतांमधले संतूर अनेक संगीतकार व रसिकांनाही पसंत पडले आणि चित्रपटसंगीतात संतूरचा वापर विपुल प्रमाणात सुरू झाला. अनेक संगीतकारांच्या विविध भाषांतील फिल्मी, चित्रपटेतर गीतांना शिवजींनी आपल्या संतूरच्या मोहक स्वरांचे कोंदण दिले व हे वाद्य रसिकांच्या मनांत प्रसन्नतेचा शिडकावा करत राहिले.

त्यांनी १९५७ साली कलकत्त्याच्या ऑल इंडिया म्यूझिक फेस्टिव्हलमध्ये वादन करून या महोत्सवातील सर्वोत्कृष्ट प्रस्तुतीसाठी असणारे उ. इनायत खाँ पदक मिळवले. त्यांच्या स्वतंत्र वादनाची पहिली ध्वनिमुद्रिका १९६० साली एच.एम.व्ही.च्या जी.एन. जोशींच्या प्रोत्साहनाने प्रकाशित करण्यात आली. त्यांची १९६७ साली 'कॉल ऑफ दी व्हॅली' ही हरिप्रसाद चौरसिया (बासरी) व ब्रिजभूषण काब्रा (हवाइअन गिटार) यांच्यासह प्रस्तुत केलेली ध्वनिमुद्रिका कमालीची लोकप्रिय ठरली आणि त्यास २५ वर्षे झाल्यावर १९९५ साली 'व्हॅली रिकॉल्स' हा संच त्यांनी प्रसिद्ध केला. त्यांच्या स्वतंत्र संतूरवादनाच्या आणि 'फीलिंग्ज' (१९८५), 'साउण्डस्केप्स-पर्वत' (१९९३), 'एलिमेन्ट्स-जल' (१९९५), 'अंतर्ध्वनी' (१९९७) इ. अभिनव आविष्कारांच्या ध्वनिमुद्रिका जगभरात गाजल्या.

पं. रविशंकर यांनी १९६८ साली शिवकुमार यांना प्रथम अमेरिकेत निमंत्रित केले. या दौऱ्यात त्यांनी स्वतंत्र व सामूहिक कार्यक्रम तर केलेच, शिवाय पं. रवीजींच्या 'किन्नर' या संगीतशाळेत शिकवलेही. मग तेथूनच शिवजींचे जगभरातील यशस्वी असे अगणित परदेश दौरे सुरू झाले.

'शिव-हरी' या नावाने त्यांनी हरिप्रसाद चौरसियांसह अनेक हिंदी चित्रपटांना यशस्वीपणे संगीत दिले, उदा. 'सिलसिला' (१९८०), 'फासलें' (१९८५), 'विजय' (१९८८), 'चांदनी' (१९८९), 'लम्हें' (१९९१), 'डर', 'साहिबान', 'परम्परा' (१९९३) हे त्यांचे काही गाजलेले चित्रपट होत. 'लम्हें' व 'डर' या चित्रपटांच्या संगीतासाठी त्यांना विशेष पारितोषिक मिळाले होते. मुळात उत्तम तबलावादक असलेल्या शिवजींनी आर.डी. बर्मन यांच्या विनंतीवरून 'गाइड' (संगीत : एस.डी. बर्मन) या चित्रपटातील 'मोसे छल किए जाय' या गीतासाठी उत्कृष्ट तबलासाथही केली!

त्यांनी १९८० च्या दशकात 'संगीतोपचार' या विषयातील संशोधनासाठी डॉ. रमाकांत केणी यांना सहकार्य केले. संगीत रिसर्च अकादमी व स्पीकमॅकेसारख्या संस्थांचे ते मार्गदर्शक आहेत. रतनलाल टिक्कू, नंदकिशोर मुळे, आर. विश्वेश्वरन, सतीश व्यास, किरणपाल सिंग, हरजिंदलपाल सिंग, धनंजय

दैठणकर, तरुण भट्टाचार्य व पुत्र राहुल शर्मा असे भारतीय, तर बी. सिव्हर्स (जर्मनी), सियुत्सू मियोशिता, मारी कोमोरो, ताकाहिरो (जपान), करुणा परेरा (श्रीलंका), जावेद (इराण) इ. शिष्य त्यांची संतूरवादनाची परंपरा चालवत आहेत.

पं. शिवकुमार शर्मांच्या कार्याचा गौरव त्यांना अमेरिकेतील बाल्टिमोरचे सन्माननीय नागरिकत्व (१९८५), 'संगीत नाटक अकादमी' पुरस्कार (१९८६), 'महाराष्ट्र गौरव' (१९९०), 'पद्मश्री' (१९९१), 'हाफिज अली खाँ' सन्मान (१९९८), 'पद्मविभूषण' (२००१) देऊन करण्यात आला. त्यांना १९९१ मध्ये जम्मू विद्यापीठाने सन्माननीय डॉक्टरेट दिली.

– चैतन्य कुंटे

**संदर्भ:**

*१. शर्मा, पं. शिवकुमार; 'जर्नी विथ अ हंड्रेड स्ट्रिंग्ज' (आत्मवृत्त); शब्दांकन : इना पुरी; पेंग्विन बुक्स; २००३.*

## शाळिग्राम, पद्मावती अनंत

**गायिका**

**२० सप्टेंबर १९१८**



पद्मावती अनंत गोखले (पूर्वाश्रमीच्या पद्मावती शाळिग्राम) यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे आजोबा हे उत्तम मृदंग वाजवायचे व वडील गोपाळ शाळिग्राम हेही गायक व पखवाजवादक होते. ते कोल्हापूर दरबाराच्या आधिपत्याखाली संगीत विद्यालय चालवायचे. पद्मावतीबाईंचे बंधू केशव व वामन हेही गायक व तबलावादक होते. संगीताचा वारसा पद्मावतीबाईंना घरातून मिळाला होता. काका पं. गोविंदबुवा शाळिग्राम (उ. अल्लादिया खाँसाहेबांचे ज्येष्ठ शिष्य) यांच्याकडून त्यांना जयपूर घराण्याचे शिक्षण मिळाले. त्या १९३१ सालापासून मैफलींत गाऊ लागल्या. त्यावेळी त्या १३ वर्षांच्या होत्या व अल्पावधीतच त्यांचे नाव गाजू लागले.

भरदार, ढाला, पण गोडवा, नखरा, चापल्य असणारा आवाज, गायकीत आकाराशिवाय, एकार, उकार, इकाराचा वापर, कणस्वरांचा नेमका वापर, दीर्घ दमसांस, गुंतागुंतीची व झपाटेदार तान ही त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये आहेत. भूपनट, बिहागडा, खट यांसारखे जयपूरचे राग तर त्या गायल्याच; पण मालकंस, भूप, पूरिया असे आम रागही त्या वेगळ्या ढंगाने गात. नंद हा त्यांचा खास आवडीचा राग त्या फार बहारीने गात असत. ख्यालाच्या बरोबरीने पद्मावतीबाईंनी बनारस ढंगाची व पंजाबी हरकती, मुरक्यांनी नटलेली ठुमरीही गायली. 'जा मैं तोसे नाही बोलूं', 'बिन देखे परे नाही चैन', 'लगत करेजवा में चोट', 'हट छोड़ सखी' या ठुमऱ्या त्या खूप रंगवून गात असत. शिवाय त्या भावगीते व बालगंधर्वांची नाट्यपदेही उत्तम गायच्या. एच.एम.व्ही.ने काढलेल्या त्यांच्या कामोद, जयजयवंती, पूर्वी, तोडी, तिलककामोद या रागांच्या ध्वनिमुद्रिका गाजल्या.

पद्मा शाळिग्राम या नावाने विवाहपूर्वी त्यांनी वासवदत्ता (१९३४), भूल का भोग (१९३५) अशा काही मराठी, हिंदी व तेलुगू पौराणिक चित्रपटांतून भूमिकाही केल्या. 'देवयानी' (१९४०) या चित्रपटातील त्यांची देवयानीची भूमिका गाजली.

पद्मावती गोखले यांनी घराण्याच्या परंपरेला काही बाबतीत छेद देऊन आपले गाणे समृद्ध केले. त्यामुळे त्यांना घराण्यातील बुजुर्गांचा रोष पत्करावा लागला. त्या काळात अशा तऱ्हेची सांगीतिक बंडखोरी आणि त्यातून आलेली सर्जनशीलता स्त्री-कलाकारासाठी सहज आणि समाजमान्य नव्हती. बाईने नम्र, सोज्ज्वळ असावे या समजुतीला वैयक्तिक व सांगीतिक आव्हान देऊन ते पद्मावतीबाईंनी सहज पेलले.

त्या काळातील अनेकांनी 'जयपूर घराण्याची' गायिका म्हणून त्यांना मानले नाही, मात्र पद्मावतीबाईंनी आपल्या बहारदार मैफलींनी आपले उत्तम गायिका

श

म्हणून असणारे स्थान सिद्ध केले. पांढरपेशा समाजातून आलेल्या स्त्री-कलाकाराने ठुमरीसारखे शृंगारिक प्रकार सादर करणे हे त्या काळात समाजमान्य नव्हते व जयपूर घराण्यातही मान्य नव्हते. पण पद्मावतीबाईंनी ठुमरी गायनालाही पांढरपेशा समाजात प्रतिष्ठा मिळवून दिली.

त्या काळात लाहोरसारख्या प्रांतात आपल्या मैफलींना स्त्रियांनी आलेच पाहिजे असा आग्रह धरणाऱ्या पद्मावतीबाई एका प्रकारे बंडखोर गायिकाच म्हणायला पाहिजेत. दिलखुलास, स्पष्टवक्ता स्वभाव असलेल्या बुद्धिमान आणि परखड विचारांच्या गायिका म्हणून त्यांचा लौकिक होता. सांगली, मिरज, इचलकरंजी, जमखिंडी, जत, औंध, फलटण अशा महाराष्ट्रातील संस्थानांमध्ये, तसेच स्वातंत्र्यपूर्व काळातील पूर्ण भारतात लाहोर, पेशावर, जालंधरपासून कन्याकुमारीपर्यंत त्यांनी मैफलींतून आपली गायकी पोहोचविली. आकाशवाणीच्या त्या ‘अ’ दर्जाच्या कलाकार असल्याने देशभरातील आकाशवाणी संगीत संमेलनांतून त्या गायल्या. या गायिकेची आणि गायकीची दखल घेऊन ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार (१९८८), ‘कालिदास’ सन्मान (१९९४-९५), कोलकाता येथील संगीत रिसर्च अकादमीची शिष्यवृत्ती, अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाचा विशेष सन्मान देऊन पद्मावतीबाईंना गौरवले गेले.

— डॉ. शुभदा कुलकर्णी

## शिंदे, गणपत जयाजीराव

☛ **गणपतभैया**

श

## शिरोडकर, ताराबाई

**गायिका**

**१८९८ — ६ जुलै १९४९**

गोव्याजवळील शिरोडा येथे ताराबाई शिरोडकर यांचा जन्म झाला. त्यांना बालवयापासूनच गायनाची आवड होती. त्या काळी गोव्यात विठोबा अण्णा हडप हे



गायनगुरू होते. त्यांच्या शिष्या मोगाबाई काकोडकर यांच्या तीन कन्या मोनाबाई, श्यामाबाई व उमाबाई या उत्तम ख्याल-टप्पा गायकी गात व या काकोडकर भगिनींचा आदर्श तेव्हाच्या गोवेकर कलावतींसमोर असे. ताराबाईही त्यांच्यामुळे प्रभावित होऊन गाऊ लागल्या. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण वयाच्या सोळाव्या वर्षापासून पं. वझेबुवांकडे झाले. वझेबुवांची तालीम त्यांना पणजीजवळच्या कालापूर येथे वर्षभर मिळाली.

त्यानंतर पं. भास्करबुवा बखले यांच्या गायकीची ओढ ताराबाईंना लागली. विशेष म्हणजे, ताराबाईंच्या प्रतिभेने प्रभावित होऊन, त्यांना तालीम देण्यासाठी भास्करबुवांनी आपले गोव्यातील वास्तव्य एक वर्ष वाढविले. वर्षभराचे शिक्षण झाल्यावर भास्करबुवा पुण्यास परतले. यानंतर आपल्या गुरूच्या शिकवणुकीचे पालन करत ताराबाई नित्य गायनाचा रियाज करत राहिल्या. परंतु काहीच दिवसांत, १९१२ साली आपल्या गुरूच्या प्रत्यक्ष मार्गदर्शनासाठी त्यांनी आपले बस्तान पुण्याला हलविले.

पुण्यात त्यांना भास्करबुवांकडून वर्षभर शिक्षण मिळाले. एकंदर सात-आठ वर्षे तालीम घेऊन भास्करबुवांची आग्रा-जयपूर-ग्वाल्हेर या घराण्याची व्यामिश्र गायकी ताराबाईंनी आत्मसात केली. इतक्या अल्पावधीच्या शिक्षणानंतर त्यांची स्वतंत्र मैफली करण्याची तयारी झाली, यावरून या दोघाही गुरु-शिष्यांच्या बुद्धीची, प्रतिभेची पारख होते. ताराबाईंचा आवाज उंच पट्टीचा, अत्यंत गोड व बुलंद होता. त्यांच्या आवाजाचा पल्लाही मंद्र गंधार ते तार धैवत असा मोठा होता. भास्करबुवांची बोजदार, लोचदार गायकी त्या हुबेहूब गात.

ताराबाई शिरोडकरांनी १९१६ मध्ये मुंबईत कायमस्वरूपी वास्तव्य केले. त्यांना चहूकडून मैफलींची

निमंत्रणे येऊ लागली. तरीही या गुणसंपन्न गायिकेचा ध्यास परिपूर्णतेकडे राहिला. मुंबईत आल्यावर त्यांनी उस्ताद नत्थन खाँचे पुत्र व शिष्य मुहम्मद खाँ यांच्याकडे गायकीचे शिक्षण घेण्यास सुरुवात केली. (उ. नत्थन खाँ हे आग्रा घराण्याचे त्या काळचे महत्त्वाचे गायक व भास्करबुवांचे गुरू होते.) मुहम्मद खाँसाहेबांकडून त्या विशेष करून टप्पा, ठुमरी, गझल हे गानप्रकार शिकल्या.

ताराबाईंची कीर्ती सर्वदूर पसरली. एच.एम.व्ही. कंपनीने त्यांची सिंदुरा व मल्हार रागांची ध्वनिमुद्रिका काढली होती. त्यांना इंदूरच्या तुकाजी महाराजांकडून दरबारी गायिका म्हणून निमंत्रण आले. पण ताराबाई अभिमानी आणि स्वतंत्र प्रवृत्तीच्या असाव्यात. खास निमंत्रण असेल तेव्हाच, काही महत्त्वाच्या प्रसंगी त्या इंदूरला मैफली करीत असत. इतर वेळी अन्य ठिकाणी गायन करण्याचे त्यांचे स्वातंत्र्य यामुळे अबाधित राहिले असावे. पहिल्या महायुद्धाच्या काळात संरक्षण निधी उभारण्याच्या मदतीसाठी त्यांनी अनेक मैफली केल्या. कलाकार असूनही सामाजिक जबाबदारीचे, कर्तव्याचे भान ताराबाईंनी राखले.

ताराबाईंची प्रवृत्ती एकंदरीने अंतर्मुख, शांत आणि प्रसिद्धीपासून तशी दूर राहण्याची होती. काही कौटुंबिक आघातांमुळे त्यांनी ऐन उमेदीत जाहीर मैफली बंद केल्या. भास्करबुवांच्या पुण्यतिथीच्या निमित्ताने त्यांच्या चाहत्यांच्या आणि आकाशवाणीच्या अधिकाऱ्यांच्या आग्रहाने त्या आकाशवाणीवर गायल्या.

ताराबाई या भास्करबुवा बखले यांच्या अव्वल शिष्या, त्यामुळे एके काळी भास्करबुवांच्या तऱ्हेच्या गायकीच्या स्त्रियांमध्ये प्रथम मान भास्करबुवांच्या गुरुभगिनी व नत्थन खाँच्या शिष्या बाबलीबाई (भावनगरवाली) यांचा व दुसरा ताराबाईंचा असे. त्या काळी केसरबाई, मोगूबाई यांसारख्या गायिकांनी ताराबाईंचा आदर्श आपल्या डोळ्यांसमोर ठेवला होता, यावरून त्यांच्या रागसंगीतातील अधिकाराची कल्पना येते.

पोटाच्या कर्करोगामुळे शेवटची काही वर्षे ताराबाई गाऊ शकल्या नाहीत. कमल पाठारे यांना काही काळ त्यांचे मार्गदर्शन मिळाले. त्यांचे मुंबईत निधन झाले.

– डॉ. शुभदा कुलकर्णी

## शिरोडकर, मेनका

**गायिका**

**सुमारे १९१० – २३ डिसेंबर २००३**



गोव्यातील फोंडा या गावाजवळील शिरोडा येथे मेनका शिरोडकर यांचा जन्म झाला. त्यांना आरंभीचे शिक्षण त्यांच्या आईनेच दिले. अल्लादिया खाँसाहेबांचे सुपुत्र भूर्जी खाँसाहेब हे मेनका शिरोडकरांचे गुरू होत. मेनकाबाईंनी त्यांच्याकडे जयपूर गायकीचे शिक्षण घेतले. काही काळ त्या आग्रा घराण्याच्या उ. विलायत हुसेन खाँ यांच्याकडेही शिकल्या. परंतु ठुमरी, दादरा, गझल हे प्रकारच मेनकाबाईंनी प्रामुख्याने सादर केले.

बेळगाव येथे घम्मन खाँ यांच्याकडे त्या ठुमरी-दादरा, गझल हे गानप्रकार शिकल्या. अदाकारी करून नृत्यगायन करण्याचा मेनका शिरोडकरांचा व्यवसाय होता. कालांतराने 'महालक्ष्मी मिल्स'चे मालक मेहता यांच्याशी मेनका शिरोडकरांचा विवाह झाला. त्यांचे ऐश्वर्य जसे मेनकाबाईंनी भोगले, तसेच कालांतराने महालक्ष्मी मिल बंद पडल्यावर आपले सर्व जडजवाहीर विकून त्यांनी कर्जफेड केली व गरिबी पत्करली.

मुंबईत स्थायिक झाल्यावर मेनकाबाईंचे गाणे सर्वदूर पोहोचले. खाजगी मैफली, जलसे, तसेच बिकानेर, डुंगरपूर, जम्मू अशा अनेक संस्थानांतून त्यांना गायनाची निमंत्रणे येऊ लागली. राजे धनराजजी यांच्या हवेलीतील एका मैफलीत विदुषी केसरबाई केरकरांच्या आधी मेनकाबाईंचे गायन झाले व ते इतके रंगले, की ''यानंतर मी काय गाणार?'', असे म्हणून केसरबाई गायल्या

नाहीत अशी एक आख्यायिका आहे. मिनर्व्हा मुव्हिटोनच्या ‘पृथ्वीवल्लभ’ (१९४३) या हिंदी चित्रपटासाठी त्यांनी ‘राम नाम धन पाया’, ‘पंछी उड़ चल अपने देस’, ‘खुले स्वर्ग के द्वार’ ही गीतेही गायली. (संगीतकार : सरस्वती देवी व रफिक गझनवी; गीतकार : पं. सुदर्शन.)

‘केसरबाई’ पुरस्काराने मेनका शिरोडकरांचा सन्मान करण्यात आला होता. एकंदर ९३ वर्षांचे दीर्घायुष्य लाभलेल्या मेनकाबाई काहीशा दुर्लक्षित अवस्थेत, फोंडा येथे निधन पावल्या. विख्यात गायिका शोभा गुर्टू या त्यांच्या कन्या व शिष्या होत.

– डॉ. शुभदा कुलकर्णी

**संदर्भ :**

*देसाई, माधवी; ‘गोमंत सौदामिनी’; गोवा; २००१.*

## शिर्के, राजश्री सिद्धार्थ

**नर्तिका**

**१५ नोव्हेंबर १९५१**



राजश्री सिद्धार्थ शिर्के यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांच्या आईचे नाव शोभा व वडिलांचे नाव रामनाथ गोपीनाथ पाटील होते. त्यांना लहानपणापासूनच नृत्य शिकायची खूप आवड होती; परंतु त्या वेळी रीतसर नृत्यशिक्षण घेण्याची संधी त्यांना मिळाली नाही. त्यांची इच्छाशक्ती एवढी दांडगी होती की पाहिलेल्या, वाचलेल्या सर्व गोष्टींना आपल्याच कल्पनेने त्या मूर्त स्वरूप देत असत. संधी मिळेल तेव्हा व तिथे त्या नृत्याचे कार्यक्रम बघायला जात असत. नृत्ये बघून त्यांनी नृत्याचे जे काही ज्ञान प्राप्त केले, त्याच जोरावर शाळेत लोकनृत्य करणे, आंतरशालेय स्पर्धेत नृत्यरचना करणे हे चालू होते. वयाच्या बाराव्या वर्षी बघितलेल्या रशियन बॅलेच्या अचूक काटेकोरपणाने त्यांच्या मनावर गहिरा प्रभाव पडला. पुढे १३/१४ वर्षांच्या असताना त्यांना गुरू सातमकर यांच्याकडे नृत्य शिकण्याची संधी मिळाली आणि त्यांचे कथक नृत्याचे प्रारंभिक शिक्षण सुरू झाले.

शालेय शिक्षण संपल्यावर त्यांनी सिद्धार्थ वाणिज्य आणि अर्थशास्त्र महाविद्यालय येथे प्रवेश घेतला. परंतु इंटरला असतानाच डॉ. कनक रेळे यांच्या नालंदा नृत्यकला महाविद्यालयाची स्थापना झाल्याचे त्यांना कळले, तेव्हा तिथे त्यांनी भरतनाट्यम्‌साठी प्रवेश घेतला. नृत्याचा सर्वांगीण अभ्यास, शिवाय मुंबई विद्यापीठाची नृत्यातील पदवी ही सर्वांत आकर्षित करणारी गोष्ट होती. वयाच्या सतराव्या वर्षी त्या अनाथालयामध्ये लोकनृत्य शिकवत होत्या.

काही काळातच त्यांचे लग्न झाले आणि अभ्यासक्रम सुरू ठेवणे त्यांना अशक्य झाले. मात्र वेगवेगळ्या शाळांत शास्त्रीय व लोकनृत्ये बसविण्याचे काम चालूच होते. ही त्यांची नृत्यरचना पाहून भायखळ्याच्या ‘ख्राइस्ट चर्च आय.सी.एस.ई.’ शाळेने त्यांना नृत्यशिक्षिका म्हणून नेमले. याच सुमारास कथक गुरू मधुरिता सारंग यांच्या बॅलेत भरतनाट्यम् करणाऱ्या मुलीची गरज होती आणि तिथे राजश्री शिर्के यांची निवड झाली. मधुरिता सारंग यांच्या रूपाने त्यांना कथक नृत्यात मनाजोगता गुरू लाभला. मग त्यांनी अपार परिश्रमाने, रियाझाने या नृत्याची कास धरली व सहा महिन्यांतच आपल्या गुरूंबरोबर पाटणा संमेलनात नृत्यप्रस्तुती केली. काही कालावधीतच त्या मान्यवर महोत्सवांत नृत्य प्रस्तुती करू लागल्या.

दरम्यान दूरदर्शनच्या चाचणी परीक्षेत परीक्षक असणाऱ्या डॉ. कनक रेळे यांनी त्यांना नृत्य करताना पाहिले व आपल्या महाविद्यालयामध्ये पुन्हा एकदा आपली पदवी पूर्ण करण्याची संधी दिली, त्यामुळे राजश्री शिर्के यांचा पदवी अभ्यासक्रम पुन्हा मार्गी लागला. डॉ. कनक रेळे यांचे अतिशय प्रगल्भ आणि तितकेच सहज मार्गदर्शन त्यांना खूप मोलाचे ठरले. आपली सांसारिक जबाबदारी, कथकचा रियाझ

सांभाळून त्यांनी एम.ए. (नृत्य) ही पदवी यशस्विरीत्या संपादन केली.

त्यांनी १९८४ मध्ये 'लास्य' या संस्थेची स्थापना केली. त्यांनी नृत्याच्या सोबत एस.एन.डी.टी. विद्यापीठातून हिंदी साहित्यामधील एम.ए.ची पदवी प्राप्त केली. आता तर दोन्ही नृत्यशैलींतील अभ्यास, जोडीला रामायण, महाभारत, सामाजिक विषय, संतकाव्यांवर संशोधन करून त्यांनी नृत्यरचना केल्या. 'लास्य'द्वारा त्यांनी 'कृष्ण-पांचाली', 'पंचमहाभूत', 'आत्मसंघर्ष', 'अस्तित्व' या नृत्यरचना सादर केल्या. संतसाहित्यावर अभ्यास करून, महाराष्ट्रातील चार प्रमुख संतांच्या काव्यरचनांवर 'नाचू कीर्तनाचे रंगी' ही संरचना मांडली.

दिग्दर्शक चेतन दातार यांना ती भावली आणि राजश्री शिर्के, चेतन दातार आणि वैभव आरेकर यांनी एकत्र काम करण्याचा निर्णय घेतला. चेतन दातार यांनी या दोघा नर्तकांना नाट्यप्रशिक्षण दिले. यांच्या एकत्रित कामाने महाराष्ट्रामध्ये प्रथमच एक नवीन प्रस्तुतीकरण पद्धतीचा जन्म झाला. संगीतज्ञ डॉ. अशोक रानडे यांनी त्याला 'रंगनृत्य' हे नाव दिले. या 'रंगनृत्य' शैलीत त्यांनी 'श्याम सखी', 'माता हिडींबा', 'संगीत द्वंद्व', 'हरवलेले प्रतिबिंब' या प्रस्तुती केल्या. माता हिडींबासाठी राजश्री यांना उत्कृष्ट नायिकेचे नामांकन प्राप्त झाले.

राजश्री शिर्के यांचे मराठी नाट्यसंगीतावरचे सादरीकरण म्हणजे 'रंगला श्रीहरी रंगली राधिका', 'प्रिये पहा' आणि 'घेई छंद हा मकरंद'. अनेक कवींच्या काव्यरचनांवर नृत्य-संरचना सादर झाली, जसे 'रसयात्रा' (कुसुमाग्रज), 'मेघदूत' (कालिदास), 'स्वाती तिरुनाल' (केरळमधल्या स्वाती तिरुनाल राजाच्या हिंदी काव्यरचनेवर आधारित). त्यांनी अयोध्येतील कथाकार पद्धतीवर संशोधन केले. कथा सांगताना नृत्य, संगीत व नाट्याचा वापर करून त्यांनी केलेली सादरीकरणे भारतभर नावाजली गेली. उदा. 'रावण-मंदोदरी संवाद', 'गर्वहरण', '१८५७ एक उठाव', 'संत कान्होपात्रा' आणि रवींद्रनाथ टागोर लिखित 'खाता'. संगीत नाटक अकादमी, चंदीगड, हैदराबाद, कृष्ण गान सभा, नाट्यकला कॉन्फरन्स अशा अनेक नामवंत संस्थांकडून राजश्री शिर्के यांना बोलविण्यात आले आणि त्यांच्या कामाची प्रशंसाही झाली. या कथाकार पद्धतीवर संशोधन करण्यासाठी त्यांना केंद्र सरकारची पाठ्यवृत्ती लाभली.

राजश्री शिर्के यांच्या नृत्यात स्त्री-भ्रूणहत्येवरची 'मानुषबिरादरी' ही प्रस्तुती पाहून एस.एन.डी.टी. विद्यापीठाच्या कुलगुरू रूपा शहा खूप प्रभावित झाल्या आणि त्यांनी एस.एन.डी.टी.मध्ये व्यावसायिक नृत्याचा अभ्यासक्रम सुरू करण्याची मान्यता दिली. या तऱ्हेने २००३ साली 'लास्य सेन्टर फॉर डान्स एज्युकेशन ॲण्ड रिसर्च' हे एस.एन.डी.टी.शी संलग्न झाले व तिथे तीन वर्षांचा नृत्यपदविका अभ्यासक्रम आणि दोन वर्षांचा प्रगत पदविका अभ्यासक्रम सुरू झाला. राजश्री शिर्के यांना गरीब मुलींसाठी आपल्या कलेद्वारे मदत करण्याची इच्छा होती म्हणून त्यांनी 'लास्य संकल्प' या संस्थेची रचना करून महानगर- पालिकांच्या शाळांत शिकणाऱ्या गरीब मुलींना मोफत नृत्यशिक्षण दिले.

राजश्री यांनी अनेक मान्यवर नृत्यमहोत्सवांत प्रस्तुती करून आपली एक वेगळी ओळख निर्माण केली आहे. त्यांना 'मुंबई मेयर्स अवॉर्ड फॉर वुमन अचीव्हर्स ऑफ द इयर'(२००५), 'खुसरोवानी हालिम अकादमी ऑफ सितार'चा पुरस्कार, संत रोहिदास समाजाकडून 'आदर्श शिक्षक' पुरस्कार (२००७), 'मराठी साहित्य संघ अवॉर्ड फॉर क्रिएटिव्हिटी इन संगीत नाटक' (२००६), 'मराठी साहित्य संघ अवॉर्ड फॉर वर्क इन एक्सपरिमेंटल थिएटर टू लास्य' (२००३) प्राप्त झाले आहेत.

त्यांचे कार्य आता त्यांचे पुत्र अनिरुद्ध शिर्के (उ. अल्लारखा, मुरली मनोहर शुक्ल व भवानीशंकर यांचे शिष्य) यशस्विरीत्या सांभाळत आहेत.

– राधिका शिर्के

## शिलेदार, कीर्ती जयराम

**गायिका, अभिनेत्री**

**१६ ऑगस्ट १९५२**



कीर्ती जयराम शिलेदार यांचा जन्म पुणे येथे झाला. वडील आणि आई जयमाला रंगभूमीवरील गायक व नट असल्यामुळे संगीत व अभिनय यांचे संस्कार त्यांच्यावर लहानपणीच झाले.

वयाच्या दहाव्या वर्षी शिलेदारांच्या ‘त्रिपात्री’ ‘सौभद्र’पासून कीर्ती शिलेदारांचे संगीत रंगभूमीवर पदार्पण झाले. ‘संगीत सौभद्र’ या नाटकातील नारदाची भूमिका त्यांनी प्रथमच केली आणि रसिक प्रेक्षकांची मने जिंकली. संगीत आणि अभिनय याचे धडे घेत असतानाच आबासाहेब गरवारे महाविद्यालयातून मराठी या विषयातील ‘बी.ए.’ची पदवीही कीर्ती शिलेदार यांनी मिळविली.

विद्याधर गोखलेंच्या ‘स्वरसम्राज्ञी’ या नाटकाच्या निमित्ताने कीर्ती यांना नीळकंठबुवा अभ्यंकर गुरू म्हणून लाभले. अभ्यंकरबुवांच्या तालमीत वाढलेल्या कीर्ती शिलेदार शास्त्रीय संगीताबरोबरच नाट्यसंगीत, ठुमरी अशा विविध संगीत प्रकारांत तयार झाल्या. आकाशवाणीच्या राष्ट्रीय संगीत सभेतूनच दोनदा त्यांचे गायन प्रसारित झाले. त्यांच्या १९०० च्या आसपास मैफली झाल्या.

अनेक जुन्या संगीत नाटकांतून त्यांनी भूमिका केल्या. रुक्मिणी, सुभद्रा, मंथरा, द्रौपदी, वसंतसेना, रेवती अशा अनेक भूमिकांमधून त्यांनी संगीत रंगभूमीवर आपला ठसा उमटवला. रंगतदार, ढंगदार गायकीबरोबरच त्यांचे लयीवरदेखील प्रभुत्व दिसून येई. तबला व पखवाज वाजवण्यातही त्या निपुण आहेत.

कीर्ती शिलेदारांनी २७ नाटकांतून ३४ भूमिका केल्या असून साडेचार हजारांवर संगीत नाटकांचे प्रयोग केले आहेत. दीप्ती भोगले (लता शिलेदार) या त्यांच्या ज्येष्ठ भगिनींच्या ‘संगीत नादलुब्ध मी’ आणि ‘संगीत चंद्रमाधवी’ या दोन्ही नाटकांचे संगीत दिग्दर्शनही कीर्ती शिलेदार यांनी केले. पारंपरिक संगीत नाटकांचा विचार आणि बदलत्या काळानुसार नावीन्याचा अंतर्भाव त्यांच्या संगीत नाटकात आणि संगीतातही दिसतो. ‘चंद्रमाधवी’ या नाटकाच्या संगीतासाठी त्यांना ‘झी’चा ‘सर्वोत्कृष्ट संगीत’ पुरस्कार मिळाला.

विद्याधर गोखल्यांचे ‘स्वरसम्राज्ञी’ हे खास शिलेदारांसाठीचे नाटक होय. यातील तमाशातील मैनेची भूमिका अत्यंत गाजली. तमाशातल्या मैनेपासून शास्त्रीय संगीत गाणाऱ्या घरंदाज गायिकेपर्यंतच्या अनेक छटा दाखविण्यासाठी कीर्ती शिलेदारांनी प्रचंड मेहनत घेऊन ही भूमिका ताकदीने सादर केली.

कीर्ती शिलेदारांनी ‘स्वर-ताल-शब्दसंगती’ हा संगीतातील शब्दार्थाचे आणि काव्यार्थाचे महत्त्व सांगणारा शोधनिबंध लिहिला. ‘नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा’तर्फे विविध भाषक विद्यार्थ्यांकडून त्यांनी हिंदी भाषेतून नाट्यगीते गाऊन घेतली. एन.एस.डी.तर्फे झालेल्या ‘एकच प्याला’च्या प्रकल्पामध्येही त्यांचा सहभाग होता. तसेच, ‘संगीत शारदा’ या नाटकाचा हिंदी नाट्यांशही त्यांनी सादर केला. संगीत नाटक अकादमीच्या समितीवरही त्या पाच वर्षे होत्या.

महाराष्ट्र शासन पुरस्कृत ‘बालगंधर्व’ पुरस्कार (२००९), नाट्यदर्पण रजनीचा ‘नाट्यव्रती’ सन्मान (१९९९), पुणे महापालिकेचा ‘बालगंधर्व’ पुरस्कार (२००६) हे त्यांना मिळालेले काही मानसन्मान होत.

— धनश्री खरवंडीकर

## शिलेदार, जयमाला जयराम

**गायिका, अभिनेत्री**

**२१ ऑगस्ट १९२६ – ८ ऑगस्ट २०१३**

जयमाला जयराम शिलेदार यांचा जन्म इंदूर येथे झाला. त्यांच्या आईचे नाव काशीबाई होते. त्यांचे वडील नारायण सावळाराम जाधव हे गंधर्व संगीत मंडळी, तसेच शिवराज कंपनी, ललितकलादर्श अशा कंपन्यांमधून

श



अनेक छोट्या-मोठ्या भूमिका करत. ते स्त्री-भूमिकाही करत. त्यामुळे साहजिकच नाटक आणि संगीत, त्यांच्या तालमी, संस्कार या वातावरणातच जयमाला यांचे व्यक्तिमत्त्व घडत गेले. त्यांचे माहेरचे नाव प्रमिला जाधव होते.

जयमाला शिलेदारांना त्यांचे कुटुंबीय व आप्तेष्ट प्रेमाने 'नानी' असे संबोधतात. त्यांच्या लहानपणीचा काळ या बिऱ्हाडी नाटकमंडळींमध्येच गेला. त्यांचे शालेय शिक्षण बेळगाव येथील 'वनिता विद्यालया'त मराठी पाचवीपर्यंतच झाले. त्यांचे सुरुवातीचे गाण्याचे शिक्षण वडील नारायण जाधव यांच्याकडे झाले. पुढे बेळगावला असताना त्या मोगूबाई कुर्डीकरांकडेही शिकल्या. नंतर जयपूर गायकीची तालीम त्यांना मोहन पालेकरांकडून मिळाली. त्यानंतर जगन्नाथबुवा पंढरपूरकर, मनहर बर्वे, कृष्णराव चोणकर अशा दिग्गजांकडून त्यांना तालीम मिळाली. लहान वयात बालगंधर्वांच्या गाण्याचे संस्कार प्रमिलावर घडले. त्यांनी 'संगीत विशारद' आणि 'संगीत अलंकार' या पदव्याही प्राप्त केल्या.

अभिनयाचेही धडे त्यांना गोविंदराव टेंबे यांच्याकडून मिळाले. डिसेंबर १९४२ मध्ये गोविंदराव टेंबे यांच्या 'वेषांतर' या नाटकाद्वारे प्रमिला जाधव यांनी रंगभूमीवर पहिले पाऊल टाकले. येथूनच त्यांची संगीत रंगभूमीवरील नायिका म्हणून यशस्वी कारकीर्द चालू झाली. साहित्य संघाच्या नाट्योत्सवापासून जयराम शिलेदार व प्रमिला यांच्या रंगभूमीवरील सहजीवनाची सुरुवात झाली. जयराम शिलेदार आणि प्रमिला जाधव यांनी अत्यंत प्रतिकूल वातावरणात १ ऑक्टोबर १९४९ रोजी 'मराठी रंगभूमी' ही संगीत नाट्यसंस्था स्थापन केली. त्यांनी १९५० साली विवाह केला. 'मराठी रंगभूमी' या नाट्यसंस्थेतून व इतर संस्थांमधूनही जयमाला शिलेदारांनी अनेक भूमिका यशस्वी केल्या. सुभद्रा, रुक्मिणी, वसंतसेना, रेवती, शारदा, देवयानी अशा नायिकांच्या भूमिकाच त्यांनी केल्या. त्यांनी एकूण सेहेचाळीस नाटकांमधून बावन्न भूमिका आणि सुमारे चार हजारांवर प्रयोगांतून आपले अलौकिक कर्तृत्व गाजविले. बालगंधर्वांपासून छोटा गंधर्व, राम मराठे, रामदास कामत अशा अनेक संगीतनटांसह त्यांनी प्रदीर्घ काळ काम केले.

सुरेल आणि निकोप आवाज, विनयशील अभिनय, प्रेक्षकांना हवेहवेसे वाटत असतानाच पद संपविणे, भूमिकेला साजेल असा पदांचा विस्तार, त्यांतील शब्दांची मोडतोड न करता होणारे स्पष्टोच्चार या सर्व बारकाव्यांनिशी केलेले गायन व मेहनतीमुळे त्यांच्या भूमिका लोकप्रिय ठरल्या. याशिवाय पदांच्या आधीचे संवाद आणि त्यांची लय ही पदांमध्येच नकळत मिसळून जात असे. सर्वसमावेशक असा स्वतःचा वेगळा विचारही त्यांच्या गाण्यात सतत दिसतो.

नाटकांतील भूमिकांबरोबर जयमाला शिलेदारांचा शास्त्रीय संगीताचा अभ्यासही मोठा होता. शास्त्रीय संगीताच्या मैफलींबरोबरच त्यांनी नाट्यसंगीताच्याही स्वतंत्र मैफली केल्या. संगीत नाटक हेच त्यांचे जीवन होते. कंपनी काढल्यामुळे कंपनीतील सर्व माणसांची जबाबदारी त्यांच्यावर होती. संगीत नाटकांचे उत्पन्नही फारसे नव्हते. त्यामुळे गाण्याच्या मैफली करून त्या सर्व खर्च भागवत. प्रतिकूल काळामध्येही त्यांनी यशस्विरीत्या कंपनी आणि त्यातील सर्व माणसांचा प्रेमाने सांभाळ केला.

'बलसागर तुम्ही वीर शिरोमणी', 'मधु मधुरा तव गिरा', 'सुवर्णतुला' नाटकामधील 'गुणकंस' रागातील 'येतील कधी यदुवीर' ही पदे नाटकाप्रमाणेच मैफलीतही त्या समरसून गात. शास्त्रीय संगीतातील 'पूर्वा कल्याण' आणि 'गुणकंस' हे त्यांचे मैफलीतील खास लोकप्रिय ठरलेले राग होते. प्रसन्न चेहऱ्याने आणि सतत हसतमुख राहून गाणे हे तर त्यांचे वैशिष्ट्यच होते. त्यांनी १९४४ साली गायलेल्या चार भावगीतांच्या ध्वनिमुद्रिकाही गाजल्या. त्यांनी १९४७ साली 'गरिबांचे राज्य' (संगीत : दादा चांदेकर) या एकमेव चित्रपटात भूमिका व गायन केले.

उत्तम गृहिणी, कलावंत, शिक्षिका, संगीत दिग्दर्शिका असे त्यांचे अष्टपैलू व्यक्तिमत्त्व रसिकांसमोर येते. त्यांनी सोळा संगीत नाटकांचे संगीत दिग्दर्शन केलेले आहे. ‘बाजीराव-मस्तानी’, ‘अनंतफंदी’, ‘पती गेले ग काठेवाडी’, ‘एखाद्याचं नशीब’ यांसारख्या नाटकांना त्यांनी संगीत दिले. जातिवंत शिक्षिका म्हणूनही त्या लोकप्रिय झाल्या. आज चौऱ्याऐंशीच्या घरात असणाऱ्या जयमालाबाईंचा अजूनही उत्तम दाद घेणारा गळा, नवीन पिढी तयार करण्यासाठीची त्यांची धडपड, असिधाराव्रत घेतल्याप्रमाणे जयमालाबाईंनी अजूनही जपलेले विद्यादानाचे व्रत बहुमोल आहे.

अखिल भारतीय नाट्यपरिषद प्रणीत ‘बालगंधर्व’ पुरस्कार (१९७४), राज्यशासन प्रणीत ‘बालगंधर्व’ पुरस्कार, ‘नाट्यदर्पण’चा ‘महिंद्र नटराज’ पुरस्कार (१९९८), अखिल भारतीय नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद (२००३, अहमदनगर), ‘छत्रपती शाहू’ पुरस्कार (२००६), ‘लता मंगेशकर’ पुरस्कार (२००७), नाट्यपरिषदेचा ‘जीवनगौरव’ पुरस्कार व संगीत नाटक अकादमी पुरस्कार (२०११) हे पुरस्कार त्यांना संगीत व संगीत नाटक क्षेत्रात दिलेल्या योगदानाबद्दल प्राप्त झाले.

— धनश्री खरवंडीकर

**संदर्भ**:


*१. शिलेदार, जयराम; ‘सूरसंगत’*

*२. कर्वे, स्वाती; ‘गंधर्वछाया’*

*३. सौ. जयमाला शिलेदार गौरवग्रंथ; १९६८.*


## शिलेदार, जयराम यशवंत

**गायक, नट**

**६ डिसेंबर १९१६ – ६ नोव्हेंबर १९९२**

जयराम यशवंत शिलेदार यांचा जन्म बेळगाव येथे झाला. आई अहिल्या व वडील यशवंत मार्तंड शिलेदार यांच्या सोबत बेळगावच्या शहापूर भागात त्यांचे बालपण गेले. त्यांच्या घरात फोनो होता. नटसम्राट बालगंधर्व, मा. दीनानाथ, नारायण व्यास अशा अनेक दिग्गज कलावंतांच्या तबकड्या त्यांनी



लहानपणापासूनच ऐकून पाठ केल्या. घरात गाण्याचे वातावरण नव्हते, तरी त्यांच्या आईला मात्र गाणे आवडायचे. शिलेदारांचे संगीतशिक्षण बेळगावात कागलकरबुवांकडे झाले.

शिलेदारांचे शालेय शिक्षण सातवी म्हणजे इंग्रजी चौथी झाले. त्यांचा गाण्याकडे असणारा स्वाभाविक कल ओळखून त्यांच्या वडिलांनी लहानपणापासूनच त्यांना नाटक कंपनीत पाठविले. त्यातूनच रघुवीर सावकारांच्या ‘रंगदेवता हिंदी-उर्दू नाटक कंपनी’त त्यांचा प्रवेश झाला. त्यांचे संगीतशिक्षण नाटक कंपनीत असताना शिवरामबुवा चिखलीकर यांच्याकडे झाले.

जयराम शिलेदारांच्या रंगभूमीवरील वाटचालीला ‘संशयकल्लोळ’ या नाटकापासून सुरुवात झाली. ‘सौख्यसुधा वितरो सदा नव’ या नांदीत ते सहभागी झाले. रघुवीर सावकारांकडून त्यांना तालीम मिळाली. पुढे ‘सुनहरी मछली’, ‘शिरीन फरहाद’, ‘साध्वी मीराबाई’ अशा हिंदी-उर्दू नाटकांतील स्त्री-भूमिकाही त्यांनी केल्या.

वयाच्या अठराव्या वर्षी त्यांनी ‘संगीत मानापमान’मधील ‘धैर्यधर’ साकारला. याच काळात त्यांनी बहुतेक सर्व संगीत नाटकांमधून निरनिराळ्या भूमिका वठवल्या. त्यांतील वि.वा. शिरवाडकरांच्या ‘दुसरा पेशवा’मधील ‘बाजीराव’ आणि वि.रा. हंबर्डे यांच्या ‘संगीत बाजीराव-मस्तानी’मधील ‘बाजीराव’ या दोन्ही भूमिका रंगभूमीवर वेगळाच ठसा उमटवून गेल्या. बालगंधर्व, विनायकबुवा पटवर्धन, गणपतराव बोडस, चिन्तूबुवा गुरव, चिंतामण कोल्हटकर यांसारख्या महान कलावंतांचे मार्गदर्शनही शिलेदारांना लाभले.

जयराम शिलेदारांनी अठ्ठेचाळीस नाटकांतून शंभरच्या आसपास भूमिका केल्या. यांत अगदी छोट्या भूमिकांपासून ते नायकांच्या भूमिकांपर्यंत समावेश आहे. निसर्गदत्त निकोप आवाज आणि काळी चारच्या

शि

पंचमापर्यंत पोहोचणारा खणखणीत आवाज ही त्यांच्या आवाजाची खास वैशिष्ट्ये होती. त्यामुळे त्यांचे गाणे अधिकाधिक समृद्ध झाले.

संगीत नाटकाच्या उत्कर्षासाठी त्यांनी १ ऑक्टोबर १९४९ रोजी पुणे येथे 'मराठी रंगभूमी' या संस्थेची स्थापना केली. त्यांनी केवळ संगीत नाटकालाच वाहिलेली ही संस्था स्थापन करण्यामागे जुन्या संगीत नाटकांचे संवर्धन व्हावे व नव्या संगीत नाटकांची निर्मिती हा हेतू होता. त्यामुळे १९४९ पासून केवळ संगीत नाटकांसाठीच आयुष्य वेचणाऱ्या शिलेदार कुटुंबीयांचे संगीत नाटक क्षेत्रातील हे बहुमोल योगदान अत्यंत महनीय, विलक्षण ठरले. सर्व जुन्या संगीत नाटकांच्या प्रयोगांबरोबरच 'एखाद्याचं नशीब' : बाळ कोल्हटकर, 'अभोगी' : चिं.त्र्यं. खानोलकर, 'बाजीराव-मस्तानी': वि.रा. हंबर्डे, 'रूपमती' : विद्याधर गोखले, 'गा भैरवी गा' यांसारखी एकंदरीत २२ नवीन संगीत नाटके 'मराठी रंगभूमी' या संस्थेतर्फे सादर झाली.

'संगीत रंगभूमी' बरोबरीनेच चित्रपट क्षेत्राशीही त्यांचा संबंध आला. व्ही. शांताराम यांच्या 'राजकमल'कडून त्यांना 'राम जोशी' या चित्रपटासाठी बोलावले गेले. 'राम जोशी' या चित्रपटामुळे जयराम शिलेदार लोकप्रियतेच्या शिखरावर पोहोचले. 'राम जोशीं'च्या लोकप्रियतेमुळे हिंदी चित्रपटातील संधी त्यांना चालून आल्या; परंतु संगीत नाटकाच्या प्रेमामुळे त्यांनी त्या नाकारल्या. बोलपटांमुळे रंगमंदिरांचे चित्रपटगृहांत रूपांतर झाले, त्यामुळे नाट्यगृहांची चणचण भासू लागल्यावर शिलेदारांनी संपूर्ण कापडी थिएटर उभारले. 'जयराम मंडप' असे त्याचे नाव होते. त्या कापडी नाट्यगृहात त्यांनी नाटकांचे प्रयोग सादर केले.

जयराम शिलेदारांनी जीवनाच्या आरंभापासून अंतापर्यंत संगीत आणि संगीत नाटकच केले . त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ 'गंधर्वभूषण जयराम शिलेदार ट्रस्ट'ची स्थापना केली गेली. या ट्रस्टतर्फे बरेच नवनवीन उपक्रम सातत्याने राबविले जातात, त्यांमध्ये संगीतनाट्यप्रवेश स्पर्धा, नाट्यसंगीत स्पर्धा, संगीतनाट्यविषयक शिबिरे, संगीत नाटकांविषयीची सप्रयोग व्याख्याने यांचा समावेश असतो. तसेच, नवीन तरुण पिढी संगीत नाटकांकडे आकर्षित व्हावी या दृष्टीने ही संस्था सातत्याने कार्यरत आहे.

जयराम शिलेदारांना 'विष्णुदास भावे' सन्मान, तसेच 'बालगंधर्व' सुवर्णपदक प्राप्त झाले. कोल्हापूर महानगरपालिकेतर्फे, तसेच वाशिम, नागपूर येथेही मानपत्रे देऊन त्यांचा सन्मान केला गेला.

— धनश्री खरवंडीकर

## शिवणकर, वसंत सदाशिव

**नर्तक**

**११ मार्च १९२८ – ५ मार्च १९७३**



वसंत सदाशिव शिवणकरांचा जन्म हिंगणघाट येथे झाला. त्यांची आई बालपणीच वारली. वडील इलेक्ट्रिशिअन, मेकॅनिक होते. त्यांच्या घराण्यात संगीत नव्हते; परंतु वसंत शिवणकरांना उपजत गायन-वादनाची आवड होती. शालेय शिक्षण चालू असतानाच ते राष्ट्रसंत तुकडोजींच्या भजन मंडळात सामील झाले, त्यांच्या संगतीत ४-५ वर्षे राहून गायन-भजन म्हणणे, हार्मोनिअम, खंजिरी, झांज वाजवून दौऱ्यात जाणे या उपक्रमांमुळे ते भजनमंडळीतले एक घटक बनले.

शुक्ला गुरुजींच्या मोलाच्या सल्ल्याप्रमाणे ते नागपूरला आले आणि त्यांनी नृत्याभ्यासाचा शुभारंभ केला. संधी साधून जयशंकर, शंभू महाराज व बिरजू महाराजांसारख्या श्रेष्ठ कलाकारांकडून मिळाले तेवढे ज्ञान त्यांनी संपादन केले. अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय मंडळाची नृत्याची 'संगीत अलंकार' ही पदवी त्यांनी मिळवली. खैरागडच्या इंदिरा कलासंगीत विश्वविद्यालयाची 'मध्यमा' नृत्य परीक्षा ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले.

शिवणकरांनी १९५६ साली इंडियन क्लासिकल डान्स अकादमीच्या नागपूर शाखेतून भरतनाट्यम, मोहिनी नृत्यम्, कथकली नृत्याभ्यास पूर्ण केला. भारतीय कलानिकुंज संस्थेतून त्यांनी लोकनृत्य, नृत्यनाटिका, नृत्यांचे बोल व रचनांचे अध्यापन केले. संस्थाप्रमुख माणिकराव मुखर्जी यांनी ठिकठिकाणी नृत्य कार्यक्रम घडवून आणले. 'कुमारसंभवम्'मध्ये त्यांनी शिवाची भूमिका केली. तसेच रामायण, महिषासुरवध इ. बऱ्याच नृत्यनाटकांत त्यांनी प्रमुख भूमिका केल्या. वसंत शिवणकरांनी बऱ्याच नाटकांचे संगीत दिग्दर्शन केले. गांधर्व महामंडळाचे ते परीक्षक होते.

त्यांचा १७ जून १९५३ रोजी चांद्याचे बालाजी तोडकर यांच्या कन्येशी विवाह झाला. स्थानिक डी.ए.ए.पी.टी. कार्यालयात ते केवळ कर्मचारीच नव्हते, तर कलाग्रणी व कार्यालयाचे भूषण होते. ज्योती वरखेडकर, शोभा वकील, मृणालिनी दामले इ. विद्यार्थिनींना नृत्यशिक्षण देऊन त्यांनी तरबेज बनवले. स्वत:च्या मुलीलाही तयार करून मंचावर तिचे कार्यक्रम केले. ते गायक, नृत्यकार असून व्हायोलिन, हार्मोनिअम, तबला, मृदंग, बुलबुलतरंगवादक होते. अभिनय, मुद्रा, अर्थभावानुकूल शास्त्रीय कलात्मक नृत्याभिनय करण्यात ते वाकबगार होते.

सेवानिवृत्तीनंतर नृत्यशाळा काढून अभिजात संगीत नृत्याचा चांगला प्रसार करावे असे त्यांच्या मनात होते. त्यांनी त्यासाठी वाद्ये, पोशाख, साहित्य जमविले होते व पूर्वतयारी केली होती. पण ५ मार्च १९७३ या दिवशी महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळातर्फे आयोजित नृत्य-नाट्य-संगीत महोत्सवाच्या उद्घाटन सोहळ्यात नृत्यप्रस्तुती करत असताना रंगमंचावरच त्यांचे निधन झाले.

— वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; १९७४.*

श

## शेजवळ, अर्जुन सावळाराम

**मृदंगवादक**

**२५ एप्रिल १९३४ – २९ ऑक्टोबर १९९२**



अर्जुन सावळाराम शेजवळ यांचा जन्म मुंबई येथे एका वारकरी कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव यमुनाबाई होते. त्यांचे वडील ह.भ.प. सावळारामबुवा शेजवळ एक प्रख्यात शास्त्रीय भजन गायक होते, तसेच मोठे बंधूही उत्तम गायक होते. लहानपणापासूनच अर्जुन शेजवळ यांचा ओढा वादनकलेकडे होता. लहानपणी त्यांचे खेळ म्हणजे गायन-वादन असेच असायचे.

त्यांचे वडील अकाली निधन पावले; परंतु मोठ्या भावाकडून त्यांच्यावर संगीताचे संस्कार घडत होते. संगीताबरोबरच कॅरम, क्रिकेट हे त्यांचे आवडीचे खेळ होते व त्यांत ते पारंगतही होते. क्रिकेटवर त्यांचे विशेष प्रेम होते. अनेक प्रसिद्ध क्रिकेट खेळाडूंबरोबर ते क्रिकेट खेळत असत.

वडीलबंधू विठ्ठलदादा गणेश चतुर्थीच्या दिवशी अर्जुन यांना वयाच्या आठव्या/नवव्या वर्षी मृदंगाचार्य नारायण कोळी यांच्याकडे पखवाजवादन शिकण्यासाठी घेऊन गेले आणि त्यांचे पूर्ण आयुष्य पखवाजमय झाले. नारायण कोळी व विठ्ठल शेजवळ हे अत्यंत घनिष्ठ मित्र होते. दोघेही एकाच इमारतीमध्ये राहत असल्यामुळे पखवाजाच्या शिक्षणास वेळेचे कोणतेही बंधन नव्हते. नारायणरावांच्या मनात आले की ते इमारतीमधल्या या विद्यार्थ्याला बोलावून घेत. गुरूकडे जाऊन आले की अर्जुन घरी पुन्हा रियाझ करायला बसत.

त्यांचा रियाझ त्यांचे भाऊ विठ्ठल करून घेत असत. त्यांचा रियाझ तासन् तास चाले. नारायणराव कोळ्यांचे निधन होईपर्यंत अर्जुन रोज त्यांच्याकडे जात.

अर्जुन यांनी धृपद-धमारची पहिली साथ- संगत चतुर्भुज राठोड यांच्याबरोबर केली. त्यानंतर त्यांनी

अनेक नामवंत कलाकारांबरोबर साथसंगत केली, त्यांत विशेषत्वाने पं. के.जी. गिंडे, पं. एस.सी.आर. भट तसेच पं. सियाराम तिवारी, पं. रविशंकर हे होते.

त्यांची आणि त्यांच्या गुरूंची पखवाज जुगलबंदी ऐकणे आणि पाहणे ही एक मेजवानी असायची. तबल्याबरोबरही त्यांनी खूप जुगलबंदी केली; परंतु उस्ताद झाकिर हुसेनबरोबर झालेली प्रत्येक जुगलबंदी ही अविस्मरणीय असायची.

सिनेसंगीतामध्येही त्यांनी आपला ठसा उमटवला, तिथेही त्यांनी भरीव कामगिरी केली. आव्हानात्मक गोष्टी त्यांनी लीलया करून दाखवल्या. त्यांनी पाश्चात्त्य संगीतकारांसह आणि कलाकारांसह देशात आणि विदेशांत म्हणजे संपूर्ण युरोप, तसेच लंडन आणि अमेरिका येथे अनेक कार्यक्रम केले. त्यांनी स्वतंत्र कार्यक्रमही सादर केले.

मृदंगाचार्य अर्जुन शेजवळ यांचा मृत्यू मुंबई येथे, त्यांच्या राहत्या घरी झाला. त्यांच्या पश्चात त्यांचा मुलगा प्रकाश याने पखवाज वादनाची परंपरा चालू ठेवली आहे.

– देविदास शेजवळ

✻✻✻

श




## संपतलाल, बद्रीप्रसाद

**तबलावादक**

**१७ सप्टेंबर १९३३ – २२ सप्टेंबर १९९०**



बद्रीप्रसाद संपतलाल यांचा जन्म अलाहाबाद येथे झाला. त्यांचे वडील हार्मोनिअमवादक होते. ते गायनही करत व हार्मोनिअमची संगत करत. ते निष्णात नर्तकही होते. गावोगावी बैठकी करता करता त्यांना मध्यप्रदेशातील रायगडच्या राजदरबारात बहुमान मिळाला. त्यांनी मध्यप्रदेश गाजवला, तर त्यांच्या गुणी सुपुत्राने अखिल भारतीय ख्याती संपादन केली. संपतलाल यांच्या आई लक्ष्मीबाई या उर्दू, संस्कृत भाषातज्ज्ञ व संगीतप्रेमी होत्या.

वडिलांकडून संस्कार ग्रहण करीत संपतलाल वयाच्या सहाव्या वर्षीच गायन करू लागले. कथक नृत्याचे रीतसर शिक्षण घेऊन संपतलाल चौदाव्या-पंधराव्या वर्षी नृत्याचे कार्यक्रम करू लागले. त्यांनी हार्मोनिअमवर प्रभुत्व मिळविले. शिवाय ते तबलाही छान वाजवू लागले.

कलकत्ता येथे १९५० मध्ये संगीत परिषदेत त्यांच्या नृत्याचा पहिला कार्यक्रम गाजला. बद्रीप्रसाद यांचे धाकटे बंधू जगदीशप्रसाद गायनात, तर कैलासप्रसाद नृत्यकलेत तयार झाले. वडील व बंधू गायनाचा रियाज करीत तेव्हा बद्रीप्रसाद तबलासंगत करीत. पुणे, हैद्राबाद, लखनौ, बनारस, कलकत्ता येथे त्यांच्या गायनाच्या बैठकी गाजल्या. नंतर बद्रीप्रसाद यांचे तबलावादन प्रधान होऊ लागले व अखेर ते तबलानवाज म्हणून प्रसिद्ध झाले. त्यांचा १९५५ मध्ये विदर्भातील काटोल येथे मुक्काम असताना विद्याबाई यांच्याशी विवाह झाला व नागपूरच्या छावणी भागात ते स्थायिक झाले.

तुमसरचे रायसाहेब संपतलाल यांच्या कलेवर खूष झाले व त्यांनी आपल्या मुलाला तबलाशिक्षण देण्यासाठी संपतलालना तिथेच ठेवून घेतले. चार-पाच वर्षे संपतलाल यांनी तेथे शनिवारी भजन, गायन, वादन साथसंगत केली. नागपूर आकाशवाणीवर त्यांचे कार्यक्रम होत. दुर्दैवाने तुमसर-नागपूर प्रवासात विद्याबाई यांचे अपघाती निधन झाले व संपतलाल दुःखी झाले.

बद्रीप्रसाद संपतलाल यांचा विदर्भ साहित्य संघात सत्कार झाला. वसंतराव रानडे यांच्या व्हायोलिनवादना-बरोबर त्यांनी हार्मोनिअमची जुगलबंदी पेश केली. संपतलाल यांनी पंजाब, दिल्ली, फरूखाबाद घराण्याच्या उत्तमोत्तम बोलांचा संग्रह केला. त्यांची दायांबायांची तयारी व संतुलन चांगले होते. स्पष्ट बोल, हाताला वजन, तसेच गोडवा व मुलायमपणा होता. सतार, गायकी, नृत्य व स्वतंत्र वादन अशा चौफेर तबलावादनात त्यांची कमालीची तयारी होती. आकाशवाणी संमेलने, अनेक महोत्सवांत त्यांची उपस्थिती असे. त्यांना अनेक मानपत्रे व पारितोषिके मिळाली होती.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. मंगरूळकर, नारायण; ‘वैदर्भीय संगीतोपासक’; १९७४.*

## सडोलीकर-काटकर, श्रुती

**गायिका**

**९ नोव्हेंबर १९५१**

जयपूर-अत्रौली या घराण्याच्या गायिका म्हणून नावलौकिक प्राप्त केलेल्या श्रुती सडोलीकर-काटकर

स



यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे वडील वामनराव व काका मधुकर सडोलीकर यांना उ. अल्लादिया खाँ व भुर्जी खाँ यांच्याकडून जयपूर घराण्याची अस्सल तालीम लाभली होती. संगीताची अशी समृद्ध पार्श्वभूमी असल्याने वडील पं. वामनरावांकडून अगदी लहान वयापासून, घरातूनच त्यांना जयपूर-अत्रौली परंपरेचे शिक्षण मिळाले. नंतर सुमारे बारा वर्षे पं. गुलूभाई जसदनवालांकडूनही त्या शिकल्या व नंतरही त्यांनी बाबा अजिजुद्दीन खाँ यांचे मार्गदर्शन घेतले.

मुंबईच्या श्री. ना. दा. ठा. विद्यापीठातून त्यांनी संगीतात एम.ए. केले व हवेली संगीतावर संशोधन केले. त्यांनी एन.सी.पी.ए.कडून भाभा पाठ्यवृत्ती, केसरबाई केरकर पाठ्यवृत्ती मिळविली. हवेली संगीतातून जयपूर घराण्यात आलेल्या बंदिशींवर त्यांनी विशेष कार्यक्रम केला. मोकळा, ढाला, काहीसा अनुनासिक असा सडोलीकरांचा आवाज आहे. आपल्या परंपरेनुसार चुस्त अशा बंदिशी त्या मांडतात. त्यांच्या रागबढतीत कण, खटके आणि न्यासाची विपुलता आहे. त्या अत्यंत शिस्तबद्ध अशी बढत करतात. आपण जे काही मांडतो आहोत, त्याबद्दलची स्पष्टता आणि आत्मविश्वास हे त्यांच्या गायकीत पुरेपूर आढळते. जोडरागांवरचे त्यांचे प्रभुत्व त्यांच्या बुद्धिमत्तेची साक्ष देते. श्रुती सडोलीकर-काटकरांनी जयपूर घराण्याच्या गायकीतील बुद्धिप्रधानता जपलेली आहे. ख्याल, ठुमरी, भजन हे सर्व गानप्रकार त्या समर्थतेने सादर करतात.

आकाशवाणीच्या ‘अ’ दर्जाच्या कलाकार असलेल्या श्रुती सडोलीकरांनी आकाशवाणी संगीत संमेलने व दूरदर्शनच्या माध्यमातून, तसेच भारतासह अमेरिका, कॅनडा, युरोप, पश्चिम आशियाई देशांतील अनेक महत्त्वाच्या रंगमंचांवरून आपल्या कलेचा आविष्कार मैफली आणि कार्यशाळांद्वारे सफलतेने केला आहे.

नेदरलँडमधील ‘रॉटरडॅम कॉन्झर्व्हेटरी ऑफ म्यूझिक’ मध्ये त्या भारतीय संगीताच्या अभ्यागत प्राध्यापक म्हणून काम करतात. त्यांची अनेक व्यावसायिक ध्वनिमुद्रणे प्रसिद्ध आहेत. ‘षण्मुख संगीत शिरोमणी’, ‘गोपिनाथ सरकार’ पुरस्कार, ‘डागर घराणा’ सन्मान (महाराणा मेवाड फाउण्डेशन, उदयपूर), ‘संगीत नाटक अकादमी’ पुरस्कार असे अनेक सन्मान त्यांना लाभले.

गोविंदराव टेंबे यांच्या ‘संगीत तुलसीदास’ या नाटकात वामनराव सडोलीकर यांनी काम केले होते. म्हणूनच श्रुती सडोलीकर यांनी वडिलांच्या आठवणीप्रीत्यर्थ १९९९ साली या नाटकाची पुनर्निर्मिती केली. तसेच टेंबे यांच्या जन्मशताब्दीत ‘गोविंद गुणी रंगले’ हा विशेष कार्यक्रमही त्यांनी सादर केला. मराठी नाट्यसंगीतातील पदे ज्यांवर आधारित आहेत असे मूळ ठुमरी-दादरे व ती नाट्यपदे, असा कार्यक्रम त्यांनी सादर केला.

डॉ. अशोक दा. रानडे यांनी सादर केलेल्या बैठकीची लावणी, देवगाणी, चंद्रभैरवी, इ. अनेक संकल्पनाधिष्ठित मैफलींत त्यांचा सहभाग होता.

संगीत रिसर्च अकॅडमी, कोलकाता येथे गुरू म्हणून श्रुतीताईंची नियुक्ती झाली होती. सध्या त्या लखनौच्या भातखंडे विद्यापीठाच्या कुलगुरुपदी कार्यरत आहेत.

— डॉ. शुभदा कुलकर्णी

## सप्रे, शंकर लक्ष्मण

**संगीत शिक्षक**

**१६ जुलै १९०१ - २ नोव्हेंबर १९७५**



शंकर लक्ष्मण सप्रे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वर तालुक्यात, धामणी या गावी झाला. त्यांच्या वडिलांना संगीताची आवड असून त्यांनी गायन, हार्मोनिअम व तबलावादनाचा चांगला अभ्यास केला होता. आपल्या मुलालाही संगीत क्षेत्रातच पुढे आणण्याच्या

स

आकांक्षेने त्यांनी घरीच त्याचा अभ्यास स्वतः घेणे सुरू केले.

सप्रे यांची आई लक्ष्मीबाई १९१५ साली स्वर्गवासी झाली. तत्पूर्वी १९१२ मध्येच सप्रे कुटुंब कल्याण येथे राहू लागले होते. प्रख्यात कीर्तनकार दासगणूंची तेथे कीर्तने होत. सप्रे कीर्तनात हार्मोनिअम वाजवीत. सप्रे यांना त्यांचे मामा भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांनी गांधर्व महाविद्यालयात घातले. तेथे एक वर्ष अभ्यास करताना त्यांना पं. विष्णू दिगंबर पलुसकरांचे मार्गदर्शन मिळाले. १९१९ मध्ये त्यांचा आवाज फुटला, म्हणून त्यांनी हार्मोनिअमची संगत सुरू केली. मेहनत घेऊन आवाजात सुधारणा केली. नाटक कंपनीच्या सहवासात नाट्यसंगीत अवगत करून घेतले.

शंकर सप्रे यांनी १९२५ मध्ये विवाह झाल्यावर नाटक कंपनी सोडली. त्यांच्या पत्नीचे नाव कमलाबाई होते. त्यांनी संगीत प्रचार-प्रसाराचे कार्य करण्याचा निश्चय केला व नागपूरला वास्तव्य केले. बंधूंच्या व मित्र अंबादास आपटे यांच्या सहकार्याने त्यांनी ‘श्रीराम संगीत महाविद्यालया’ची स्थापना १९२६ साली केली. अमृतसर व नागपूर अशा दोन ठिकाणी सप्रे यांनी पं. विष्णू दिगंबर पलुसकरांच्या गायनाला अप्रतिम साथ केल्याने पंडितजींनी त्यांना प्रशस्तिपत्र दिले. त्यांनी पंडितजींच्याच हस्ते आपल्या संस्थेचे उद्‌घाटन केले.

गायन, हार्मोनिअमच्या जोडीला सप्रे यांनी विद्यालयात नाट्यशाखा काढून नाट्य व अभिनयतंत्राचे शिक्षण द्यायला आरंभ केला. त्यांनी १९२९ मध्ये ‘संगीत नवा खेळ’ हे विद्यार्थ्यांचे पहिले नाटक रंगमंचावर सादर केले. शांता आपटे यांच्याकडून प्रेरणा घेऊन त्यांनी बालगोपाळांचे मेळे काढले. काही मेळ्यांसाठी स्वतः पदे रचली. त्यांच्या मेळ्यात काम करणारे वसंत व रामचंद्र म्हणजे पुढे खूप प्रसिद्धीस आलेले गायक वसंतराव देशपांडे व रामचंद्र चितळकर (सी. रामचंद्र) होते.

शंकर सप्रे यांना १९४० साली सेवासदन शाळेत शिक्षकाची नोकरी लागली. त्याच वर्षी त्यांनी ‘संगीत शास्त्रप्रवेश’ व आलाप, तानांचेही पुस्तक प्रकाशित केले. अध्यापन, लेखन व काव्य हे त्यांचे आवडते विषय होते. संस्कृत ‘गीतगोविंद’ काव्याचे रागतालबद्ध गायन केल्याबद्दल त्यांना ‘पंडित’ ही बहुमानाची पदवी मिळाली. त्यांनी विदर्भात ‘गांधर्व महाविद्यालया’ची शाखा प्रथमतः सुरू करण्याचे मोलाचे कार्य केले. कुशल संगीत शिक्षक, हार्मोनिअमवादक व भजनकार सप्रे यांनी दर शनिवारी शिस्तबद्ध संगीत भजनांचा उपक्रम सुरू केला व तो पुढेही चालू राहिला. पलुसकरांचा स्मृतिदिन विद्यालयाच्या वार्षिकोत्सवाला जोडून दरवर्षी करण्याचा आरंभ सप्रे यांनी नागपुरात केला.

सप्रे यांची शिक्षणपद्धती पद्धतशीर, साधी व सुलभ होती. ते निर्व्यसनी, नियमबद्ध होते व सत्तरी उलटली तरी त्यांचा आवाज खणखणीत होता. अ. भा. गांधर्व महाविद्यालय मंडळाचे ते कार्यकारी सदस्य, परीक्षक होते. त्यांनी अनेक शासकीय समित्या, मंडळांचे सदस्यत्व भूषविले होते. अनेक सत्कार-समारंभांतून त्यांचा गौरव केला गेला.

त्यांच्या ख्यातिप्राप्त विद्यार्थ्यांमध्ये सी. रामचंद्र, डॉ. वसंतराव देशपांडे, तारा पिल्ले, प्रभाकर पिल्ले, कुसुम आफळे, सतीश प्रधान, प्रभाकर देशकर, माणिक साठे, कमल पावणस्कर, शिवानी घोष, पुष्पा जाधव, भैयाजी वडसमुद्रकर, वामन महाबळ, रामभाऊ भूमकर, डॉ. गोविंद नाईक यांचा समावेश होतो.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

*१. मंगरूळकर, नारायण; ‘वैदर्भीय संगीतोपासक’ भाग १.*

## सरदेशमुख, विठ्ठल रामचंद्र

**हार्मोनिअमवादक, गायक**

**४ जुलै १९११ – ६ एप्रिल १९८१**

विठ्ठल रामचंद्र सरदेशमुख यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील ब्रह्मगाव येथे झाला. त्यांचे घराणे मुळात कीर्तनकारांचे; पण पेशवाईत त्यांस सरदेशमुखीचे वतन मिळाले होते. संगीताचे बाळकडू त्यांना आईकडूनच

स



मिळाले व तिच्या प्रोत्साहनाने हार्मोनिअमवादनाला सुरुवात झाली. मिरजेचे राजारामपंत मुंडे यांच्याकडे त्यांचे आरंभीचे संगीतशिक्षण झाले. पुढे शिक्षणासाठी ते पुण्यात आले. शालेय शिक्षण घेत असताना हरिभाऊ वाटवे या पुण्यातील हार्मोनिअम शिक्षकांकडूनही त्यांना मार्गदर्शन मिळाले. किराणा घराण्याचे ज्येष्ठ गायक सुरेशबाबू माने यांच्या सान्निध्यात या सुरेल गायकीच्या अंतरंगाशी विठ्ठलरावांचा परिचय झाला. काही काळ त्यांना पं. सवाई गंधर्व यांचीही तालीम मिळाली. त्यांनी एक गायक म्हणून किराणा गायकीची निष्ठेने जोपासना केली. सुरेल गायनाइतकाच तानपुरे अतिशय सुरेल जुळविण्याबद्दलही त्यांचा लौकिक होता.

विठ्ठलराव सरदेशमुखांनी पुण्यातील स.प. महाविद्यालयातून संस्कृत या विषयात पदवी मिळवली. शिक्षण पूर्ण करून, बी.ए.बी.टी. ही पदवी मिळवून ते अहमदनगरला परतले. तेथे त्यांनी 'सुरेश संगीत विद्यालय' सुरू केले, तसेच शाळेत शिक्षक म्हणूनही ते काम करू लागले. पुण्यातल्या मुलींच्या भावे शाळेत ते शिक्षक म्हणून रुजू झाले. लवकरच पुण्यातील संगीतविश्वाशी त्यांचा परिचय होऊन जम बसला. आयुर्वेदाचार्य पांडुरंगशास्त्री व वामनराव देशपांडे, बाळासाहेब अत्रे, दत्तोपंत देशपांडे या मंडळींच्या नेहमीच्या बैठकीत ते सामील झाले. आर्य संगीत प्रसारक मंडळाचे ते संस्थापक सदस्य होते व 'सवाई गंधर्व संगीत महोत्सवा'च्या आरंभीच्या काळात त्यांचे योगदान महत्त्वाचे होते. 'सवाई गंधर्व महोत्सवा'त ते आपल्या गायन व हार्मोनिअमवादनाची हजेरी लावत.

त्या काळातील सर्वच कलाकारांवर ज्यांच्या हार्मोनिअमवादनाचा प्रभाव पडला, त्या गोविंदराव टेंबे व विठ्ठलराव कोरगावकर यांच्याकडूनही त्यांनी हार्मोनिअमवादनातील बारकावे आत्मसात केले.

विठ्ठलराव सरदेशमुख हे त्या पिढीतील रसिल्या, ढंगदार अशा 'गोविंदराव शैली'ने स्वतंत्र हार्मोनिअमवादन करणारे, तसेच अत्यंत पूरक व नेमकी साथसंगत करणारे कलाकार म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या पॅरिस रीडसूच्या हार्मोनिअमची व तिच्या 'स्वरजुळणी'ची ते जिवापाड काळजी घेत असत. विठ्ठलरावांच्या हार्मोनिअमवादनात सुरेलपणा व तयारीचाही सुंदर प्रत्यय येत असे. वादनातूनही त्यांना मिळालेल्या किराणा घराण्याच्या गायकीचेच दर्शन घडत असे. ते खास 'सुरेशबाबूं'च्या शैलीची ठुमरीही फार नजाकतीने वाजवत.

त्यांनी १९४० ते १९७२-८० या कालावधीत मुलींच्या भावे शाळेत संस्कृत शिक्षक म्हणून काम केले. संस्कृतबरोबरच विशेष गुणवत्तेच्या विद्यार्थिनींना ते गायनही शिकवत असत. भावे शाळेच्या अभ्यासक्रमात संगीत विषय सुरू करण्यासाठी त्यांनी पुढाकार घेतला होता. विठ्ठलरावांच्या घरी दर रविवारी मैफल होई व हा उपक्रम त्यांनी तीसेक वर्षे सातत्याने केला. या अनौपचारिक मैफलींमध्ये कलाकारांची परस्परांत सांगीतिक देवाणघेवाण होई. कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, वसंतराव देशपांडे, माणिक वर्मा, लालजी गोखले अशा अनेक कलाकारांची तेथे नित्य ये-जा असे. 'मॉडेल कॉलनी आर्ट सर्कल'ची स्थापना करून अनेक कलाकारांच्या मैफली त्यांनी घडवून आणल्या.

मुंबई, पुणे व औरंगाबादच्या आकाशवाणी केंद्रांवरून त्यांचे गायन व एकल हार्मोनिअमवादनाचे कार्यक्रम होत असत. एक उत्तम दर्जाचे हार्मोनिअम संगतकार म्हणूनही त्यांनी स्वत:चे स्थान निर्माण केले होते. सुरेशबाबू माने, हिराबाई बडोदेकर, सरस्वतीबाई राणे, गंगूबाई हनगल व भीमसेन जोशी अशा किराणा घराण्याच्या गायकांना विठ्ठलरावांनी समरसून साथ केलीच, शिवाय कुमार गंधर्व, सिद्धेश्वरी देवी, अझमत हुसेन खाँ, मल्लिकार्जुन मन्सूर, किशोरी आमोणकर अशा ग्वाल्हेर, आग्रा, जयपूर घराण्याच्या कलाकारांनाही ते तेवढीच रोचक संगत करत असत.

त्यांनी १९५६ साली हार्मोनिअमची संगत करणे थांबवले. काही प्रसंगीच त्यांनी कुमार गंधर्व, भीमसेन जोशी अशा मोजक्याच, पण उच्च कोटीच्या कलाकारांना हार्मोनिअमची साथ केली. विठ्ठलराव सरदेशमुख यांच्या प्रमुख शिष्यांमध्ये प्रभुदेव सरदार, योगिनी जोगळेकर, उषा चिपलकट्टी, पौर्णिमा तळवलकर, लीला सरदेसाई, माधुरी दंडगे, शांता निसळ यांचा उल्लेख करता येईल. अभिनेते व गायक चंद्रकांत गोखले हेही काही चिजा त्यांच्याकडून घेत असत. याशिवाय माणिक वर्मा, डॉ. प्रभा अत्रे व पद्मा तळवलकर या सुप्रसिद्ध गायिकांनाही आरंभीच्या काळात विठ्ठलरावांनी मार्गदर्शन केले होते. त्यांचे पुत्र विजय सरदेशमुख यांनाही विठ्ठलरावांनी आपल्या संगीताचा वारसा दिला.

विठ्ठलराव सरदेशमुख हे हरहुन्नरी कलाकार होते. संगीताप्रमाणेच चित्रकला, सुलेखन, रांगोळी, पुष्पसजावट या कलांमध्ये त्यांना रस व गती होती. त्यांचे पुणे येथे निधन झाले. 'गाथा एका विठ्ठलाची' हे विठ्ठलराव सरदेशमुख यांचे ललितचरित्र त्यांच्या कन्या नलिनी कुलकर्णी यांनी २००१ साली प्रसिद्ध केले.

— चैतन्य कुंटे

## सरनाईक, निवृत्तीबुवा तुकारामबुवा
**गायक**

**४ जुलै १९१२ – १६ फेब्रुवारी १९९४**



निवृत्तीबुवा तुकारामबुवा सरनाईक यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांच्या वडिलांना गायनाची खूप आवड होती. ते उत्तम भजने करीत. त्यांची प्रासादिक भजने कोल्हापुरात लोकप्रिय होती. सरनाईक कुटुंबाचे मूळचे आडनाव जाधव असे होते. तुकारामबुवांचे सर्वांत धाकटे बंधू सुप्रसिद्ध गायक-नट आणि 'यशवंत नाटक मंडळी'चे मालक 'महाराष्ट्र कोकीळ' शंकर सरनाईक हे होते. कोल्हापूरचे धृपदिये अथणीकर यांच्याकडे शंकररावांनी धृपद-धमारची तालीम घेतली; परंतु त्यात मन न रमल्यामुळे त्यांनी उस्ताद अब्दुल करीमखाँ यांच्याकडे दोन-तीन वर्षे किराणा घराण्याची तालीम घेतली.

पं. निवृत्तीबुवा सरनाईक यांना दोन मोठे भाऊ व एक बहीण होती. ते चार वर्षांचे असताना त्यांच्या आईचे निधन झाले. तेव्हा त्यांच्या वडिलांनी दुसरे लग्न केले; परंतु संबंध बिघडल्यामुळे त्यांनी मोठ्या तीनही मुलांना पहिल्या पत्नीच्या माहेरी ठेवले. गाण्याच्या प्रेमापोटी त्यांनी निवृत्तीबुवांना मात्र शंकर सरनाईकांच्या स्वाधीन केले. शंकर सरनाईक तेव्हा शिवराज नाटक कंपनीत होते व निवृत्तीबुवा त्या वेळी (सन १९१७) पाच वर्षांचे होते. इथून त्यांची भ्रमंती सुरू झाली, ती १९३५ साली शंकररावांनी 'यशवंत नाटक मंडळी' बंद करेपर्यंत चालली. शंकर सरनाईक आणि त्यांची 'यशवंत नाटक मंडळी' यांचा निवृत्तीबुवांच्या घडणीत फार मोठा वाटा आहे.

शिवराज नाटक कंपनीचा मुक्काम १९१९-२० च्या सुमारास इंदूरला होता. इंदूरच्याच मुक्कामात शंकर सरनाईकांनी शिवराज कंपनी सोडली; ते कोल्हापूरला आले. नंतर तुकोजीराव होळकरांच्या आज्ञेनुसार 'यशवंत नाटक मंडळी' सुरू झाली. वयाच्या पाचव्या वर्षापासून निवृत्तीबुवा काकांबरोबर होते. त्यामुळे पुष्कळ गाणे कानावर पडत होते. गाण्याची आवडही उत्पन्न झाली होती. 'यशवंत नाटक मंडळी' सुरू झाल्यावर निवृत्तीबुवांनी खऱ्या अर्थाने गाणे शिकायला सुरुवात केली. या नाटक कंपनीत सवाई गंधर्व, कृष्णराव गोरे, वामनराव सडोलीकर, नथ्थूबुवा गवई यांसारखी नामवंत मंडळी होती.

निवृत्तीबुवांनी शंकररावांकडे गाणे शिकायला प्रारंभ केला. त्यांची कंपनी त्या वेळी नवी आणि जुनी अशी दोन्ही प्रकारची नाटके करीत असे. निवृत्तीबुवा आठ-नऊ वर्षांचे असताना 'चलती दुनिया'मध्ये तोता-मैनाच्या संवादात ते 'तोता'चे काम करीत.

स

याच सुमारास गोविंद विठ्ठल भावे यांच्याकडे निवृत्तीबुवांचे गायन-शिक्षण सुरू झाले. हे भावे कंपनीत ऑर्गनवादक होते व गांधर्व महाविद्यालयात गाणे शिकलेले होते. 'यशवंत नाटक मंडळी'त बळवंतराव रुकडीकर, बाबालाल इस्लामपूरकर यांसारखे मातब्बर तबलजी होते. त्यांच्या तालमीत बुवांचा हात तबल्यावर चांगलाच तयार झाला होता. बुवा नामवंत गायक बनले; पण त्यांचे तबल्यावरचे प्रेम यत्किंचितही कमी झाले नाही. त्यांच्या गायनातील लयीची सुंदर समज, दर्जेदार लय, अंग या गोष्टींचे मूळ रुकडीकर व इस्लामपूरकर यांच्या तालमीत सापडते.

पं. निवृत्तीबुवा चौदा-पंधरा वर्षांचे झाल्यानंतर नाटकात नायिकेची भूमिका करू लागले. सवाई गंधर्व यांच्याकडे त्यांची गायनाची तालीमही सुरू झाली. बुवांना त्यांच्याकडून दोन वर्षांच्या तालमीत तोडी, शुद्ध कल्याण, यमन कल्याण वगैरे राग शिकायला मिळाले. त्यांनी बुवांना स्वरांचा लगाव व सुरेलपणा शिकवला. बुवांच्या गाण्यात त्यामुळे पुष्कळ फरक पडला. यानंतर शंकरराव सरनाईकांनी उ. रजबअली खाँ यांचा गंडा बांधला. मात्र त्यांना कंपनीच्या कामातून शिकायला वेळ काढता येत नसल्याने निवृत्तीबुवाच रजबअली खाँकडून दोन वर्षे शिकले. 'यशवंत नाटक मंडळीं'चा मुक्काम मुंबईला असताना शंकररावांनी उ. अल्लादिया खाँसाहेबांचा गंडा बांधायचे ठरविले व १९३० साली हे गंडाबंधन झाले.

१९३० ते १९३३ अशी तीन वर्षे बुवांना खाँसाहेबांची तालीम मिळाली. फुलश्री रागाने सुरुवात होऊन नंतर यमन, देवगिरी बिलावल, रायसा कानडा, मियां की तोडी, लक्ष्मी तोडी, बहादुरी तोडी, रूपमती मल्हार, पटमंजिरीचे सात-आठ प्रकार अशा अनेक रागांची तालीम मिळाली. बुवांनीही भरपूर मेहनत केली. यशवंत नाटक मंडळी १९३५ साली बंद झाली व बुवा कोल्हापूरला परत आले. पुढे त्यांनी संगीत हा व्यवसाय म्हणून पत्करला. एकीकडे त्यांनी विद्यादानाचे कार्य सुरू केले व दुसरीकडे मैफली गायक म्हणून आपला जम बसवायला सुरुवात केली. लवकरच आघाडीच्या गायकांमध्ये त्यांची गणना होऊ लागली.

पं. निवृत्तीबुवांची सुरुवातीची तालीम सवाई गंधर्वांची असल्याने बुवांच्या गाण्यात किराणा घराण्याचा प्रभाव होताच. त्याचबरोबर मधुकर वृत्तीने ते सतत विद्या वाढवीत राहिले. ते अत्यंत बुद्धिमान होते. त्यांची गानजिज्ञासा पराकोटीची होती. त्यांनी अनेक कलाकारांकडून अनवट राग, दुर्मीळ बंदिशी घेतल्या व आपले गाणे समृद्ध केले.

जयपूर घराण्याच्या परंपरेत बुवा बंडखोर समजले जातात. सतत खुल्या आकाराने ते गायले नाहीत. जयपूर गायकीत फारसे न आढळणारे विलंबित एकताल निवृत्तीबुवा अनेकदा गायले आहेत. त्यांनी अनेक उत्तमोत्तम बंदिशींची रचना केली. बुवांचे तबल्यावर प्रभुत्व असल्याने संगीतातील तान आणि लय या दोन्ही अंगांचा विचार त्यांनी आपल्या गायकीत प्राधान्याने केला. त्यांच्या तानक्रियेवर उस्ताद अल्लादिया खाँ व उस्ताद रजबअली खाँ या दोघांचा प्रभाव फार मोठा आहे. या दोघांच्याही तानक्रियेच्या पद्धतीत स्वत:च्या प्रतिभेची भर घालून बुवांनी स्वत:ची अशी खास तानक्रिया तयार केली. ती तानक्रिया 'पं. निवृत्तीबुवांची तानक्रिया' म्हणून ओळखली जाते. बुवांनी काही पारंपरिक छोटे ख्याल थोडासा बदल करून आकर्षक केले आहेत.

पं. निवृत्तीबुवा १९६६ मध्ये मुंबईत आले. तिथे १९६९ ते १९७९ अशी दहा वर्षे ते मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागात सन्माननीय गुरू म्हणून कार्यरत होते. सरदारबाई कारदगेकर, आझमबाई, प्रभुदेव सरदार, विजया जाधव-गटेलवार, ज्योत्स्ना मोहिले, नीलाक्षी जुवेकर, प्रसाद सावकार, दिनकर पणशीकर, गणपुले, विनोद डिग्रजकर, हे त्यांचे प्रमुख शिष्य होत. तसेच किशोरी आमोणकर, जितेंद्र अभिषेकी, पद्मा तळवलकर, जयश्री पाटणेकर याही काही काळ बुवांकडून मार्गदर्शन घेत असत. अरुण व उल्हास या कशाळकर बंधूंनीही बुवांच्या तानक्रियेचा प्रभाव अंगीकारला. त्यांना १९७९

साली कलकत्ता येथील संगीत रिसर्च अकादमीत आमंत्रित केले गेले. त्यांना १९९१ मध्ये कंपवायूचा त्रास सुरू झाला, त्यामुळे त्यांचे गायनही कायमचे थांबले. बुवा मुंबईला परत आले; परंतु त्यांची प्रकृती खालावतच गेली. पं. निवृत्तीबुवांना 'संगीत नाटक अकादमी' (१९७९), 'तानसेन' पुरस्कार (मध्यप्रदेश सरकार, १९८६), 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार (१९९०) आदी सन्मान प्राप्त झाले.

— डॉ. लता गोडसे

## सवाई गंधर्व

***कुंदगोळकर, रामभाऊ गणेश***

**गायक**

**१९ जानेवारी १८८६ – १२ सप्टेंबर १९५२**



गेल्या शतकातील आघाडीचे गवई, संगीत रंगभूमी गाजवलेले गायक, नट, किराणा घराण्याचे अध्वर्यू उस्ताद अब्दुल करीम खाँसाहेब यांचे गुणी शिष्य आणि गंगूबाई हनगल, पं. फिरोज दस्तूर व भारतरत्न पं. भीमसेन जोशी यांचे थोर गायनगुरू अशी ज्यांची ओळख सांगता येईल असे सवाई गंधर्व म्हणजे रामचंद्र गणेश कुंदगोळकर यांचा जन्म हुबळी (कर्नाटक) जवळच्या कुंदगोळ या लहानशा खेड्यात झाला. वडील जमखंडी संस्थानातील सावशी गावचे मूळचे कुलकर्णी; पण कुंदगोळला दत्तक घराण्यात गेल्यामुळे तेथील नाडगीर जहागीरदारांची वहिवाटदारी व इनाम गावची पाटीलकी करीत असत.

वडील संगीत नाटक आणि बैठकीच्या गाण्याचे शौकीन होते. कुंदगोळहून जवळच असलेल्या हुबळीत होणाऱ्या नाटकांना, मैफलींना वडिलांबरोबर रामभाऊ लहानपणी जात असत. दुसऱ्या दिवशी तेच गाणे साभिनय म्हणून दाखवीत असत. गाण्याचे जबरदस्त वेड असलेल्या गोड गळ्याच्या आपल्या मुलाच्या संगीत शिक्षणाची व्यवस्था वडिलांनी कुंदगोळ येथे केली. कुंदगोळला १८९७ मध्ये राहायला आलेले बळवंत कोल्हटकर हे जुन्या पठडीतल्या धृपद गायकीचे जाणकार होते. त्यांनी किशोरवयाच्या रामभाऊंना काही ख्याल, तराणे, पखवाजबरोबर ब्रह्मताल, मत्तताल शिकवले. कोल्हटकरबुवांचे १८९८ मध्ये निधन झाले आणि रामभाऊंचे दीड वर्षांचे संगीत शिक्षण थांबले; पण कुंदगोळमध्ये रामभाऊ 'बालगवई' म्हणून ओळखले जाऊ लागले. याच वेळी हुबळीत दोन तरुण मुसलमान गवयांच्या मैफलीचा बराच बोलबाला होऊ लागला. रामभाऊंना त्यांचे गाणे ऐकायची ओढ लागली. इंग्रजी चौथीसाठी हुबळीला शिकण्यासाठी जायचा हट्ट त्यांनी वडिलांकडे धरला. खरे तर त्या गवयांचे गाणे ऐकायला हुबळीला जायचे होते. वडिलांनी हुबळीत त्यांची शाळेची व्यवस्था केली.

मोठ्या हिकमतीने कुंदगोळकरांनी क्लबमधल्या मैफलीत प्रवेश मिळवला. उस्ताद अब्दुल करीम खाँ आणि तानपुऱ्यावर साथ करणारे त्यांचे बंधू अब्दुल हक यांचे श्रुतिमधुर गाणे ऐकताच मंत्रमुग्ध झालेल्या रामभाऊंनी वडिलांकडे सरळ जाऊन आपल्याला खाँसाहेबांकडे गाणे शिकायचे आहे असे सांगितले. योगायोगाने खाँसाहेब कुंदगोळला नाडगीर जहागीरदारांच्या वाड्यात गायला आले. वडिलांनी रामभाऊंना त्यांच्याकडे सुपूर्द केले. रामभाऊंचा आवाज, त्यांची जिद्द पाहून खाँसाहेबांनी त्यांना हुबळीला गाणे शिकण्यासाठी बोलावले.

भूप रागातील 'सुधे बोल' या चिजेची अस्ताई खाँसाहेबांनी शिकवली; पण दोन महिन्यांत खाँसाहेब दौऱ्यावर निघून गेले. पुन्हा कुंदगोळला परतलेले रामभाऊ वर्षभर घरीच राहिले. या वेळी त्यांचे लग्नही झाले. मात्र अल्पावधीत खाँसाहेब हुबळीला परतले. पुन्हा रीतसर शिकवणीला सुरुवात झाली. या वेळी मात्र खाँसाहेबांनी रामभाऊंचा शिष्य म्हणून स्वीकार केला. त्यांचे १९०१ मध्ये गंडाबंधनही विधिपूर्वक झाले.

स

खाँसाहेब हुबळीहून सोलापूरला आले ते आपल्या गुणी शिष्याला घेऊनच. खाँसाहेबांची शिस्तबद्ध तालीम सुरू झाली. या कठोर तालमीत खर्ज, मेहनत, एकेक स्वर घोकणे, सातही स्वर तंबोऱ्यावर समप्रमाणात लावणे, रागातील वर्ज्य, वादी-संवादी स्वर यांच्याकडे लक्ष देऊन स्वर लावण्याची पद्धत, मींड, विराम, सरगम असा कडक अभ्यास असे. खाँसाहेब गाण्याच्या वेळी साथीला रामभाऊंना घेत असत. रावसाहेब देवल व मि. क्लेमंट्स या संगीततज्ज्ञांच्या श्रुतिसंशोधनाच्या चर्चा, जाहीर सप्रयोग व्याख्याने या वेळीही रामभाऊ हजर असत. खाँसाहेब संगीताचे सौंदर्यही उलगडून दाखवीत असत, तसेच दोषही दाखवून देत असत. रामभाऊंना १९०० ते १९०६ या अवधीत खाँसाहेबांची तालीम मिळाली. 'लाचारी', 'गुजरी', 'मियां' हे तोडीचे प्रकार, 'भैरव बहार', 'ललिता गौरी' असे अवघड राग शिकायला मिळाले. खाँसाहेबांचा भर चिजांच्या संग्रहापेक्षा श्रुती, स्वरांची शुद्धता, सौंदर्य, माधुर्य या अंतरंगांवर होता. १९०७ मध्ये रामभाऊ खाँसाहेबांकडून निघाले व वझेबुवांचे गुरू निसार हुसेन यांच्याकडून 'सरपरदा', 'लंकादहनसारंग', 'जौनपुरी बहार' इ. रागांतील चिजा रामभाऊंनी घेतल्या. खाँसाहेबांनी त्यावर नाराजी व्यक्त केली. पण बीनकार मुराद खाँ, हैदराबादचे रहीम खाँ, हैदरबक्ष यांचेही मार्गदर्शन घ्यावे असे उदार मनाने सुचवले. रामभाऊंनी जयतकल्याण, हिंडोलबहार, खट, जैताश्री इ. चिजा हैदरबक्षांकडून घेतल्या, तर मुराद खाँकडून मलुहा केदार, जलधर केदार, नटमल्हार, जयजयवंती इ. रागांतील चिजा घेतल्या आणि स्वत:ची गायकी समृद्ध केली.

रामभाऊंच्या जीवनाला १९०८ सालापासून वेगळे वळण लागले. नाट्यकला प्रवर्तक मंडळीचे सखारामपंत केतकर यांनी रामभाऊंना हेरून ठेवले होते. ते कुंदगोळला गेले असताना नाटकात येण्याबद्दल त्यांना तयार केले. खाँसाहेबांच्या इच्छेविरुद्ध जाण्याची इच्छा नसतानाही नाटकातील झगमगाटाचा मोह पडून, शंभर रुपये पगाराचे प्रलोभन वाटून पोरवयातील रामभाऊ नाटकात गेले. नाट्यकलामध्ये प्रवर्तक मंडळींचा मुक्काम अमरावतीला होता. त्या वेळी रामभाऊंचा नाटकात प्रवेश झाला. भाषांतरित नाटके, जुनी बाळबोध पदे असणाऱ्या 'नाट्यकला'च्या वातावरणात रामभाऊंना राहायला आवडले नाही. पण गोपाळराव मराठे यांनी रामभाऊंच्या आगमनाने 'सौभद्र', 'शारदा', 'रामराज्यवियोग'सारखी संगीतप्रधान नाटके करायचे ठरवले. काही नवी नाटकेही आणली. ह.ना. आपटे कृत 'संत सखू', वर्तक कृत 'तापसी शारदा' यशस्वी ठरली. रामभाऊंनी 'प्रभावती', 'लीलावती' या नाटकांत कामे करून कंपनीला लोकप्रियता व पैसे मिळवून दिले. पण 'संत सखू', 'सौभद्र'मधील पदे विशेष गाजली. पुण्या-मुंबईपर्यंत रामभाऊंच्या गाण्याची, कामाची कीर्ती पोहोचली.

बालगंधर्व हे त्या वेळी संगीत रंगभूमीवर तळपत होते. अशा वेळी रामभाऊ 'सौभद्र'मधून आपल्या गायकीचे बहारदार दर्शन घडवीत होते. एकदा 'सौभद्र' सुरू असताना सुप्रसिद्ध पुढारी व वऱ्हाडातील विख्यात व्यक्तिमत्त्व श्रीमंत दादासाहेब खापर्डे उद्‌गारले, ''अरे हे तर सवाई गंधर्व आहेत.'' त्यानंतर असनारे वकिलांच्या हस्ते एका समारंभात 'सवाई गंधर्व' ही अक्षरे कोरलेले सुवर्णपदक रामभाऊंना सन्मानपूर्वक दिले गेले. त्यानंतर त्यांचे 'सवाई गंधर्व' हे बिरुद रूढ झाले.

रामभाऊ १९१३ पर्यंत नाट्यकला प्रवर्तक मंडळीत होते. तेथून निघून त्यांनी स्वतंत्रपणे १९१४ मध्ये 'नूतन संगीत मंडळी' ही संस्था काढली. 'सौभद्र', 'मृच्छकटिक', 'मानापमान', 'शारदा', 'मूकनायक' या नाटकांबरोबरच माधव जोशी यांची 'विनोद', 'करमणूक', 'मनोरंजन' ही नाटके, तसेच फाटकशास्त्रींचे 'क्रांतिकौशल्य', करमरकरांचे 'सुमसंग्राम', बामणगावकरांचे 'आत्मतेज' अशी नाटके बसवली. 'पारसदेवी', 'जफर नेकी', 'देश सेवक' अशी हिंदी-उर्दू नाटके रंगभूमीवर आणली. पुढे रामभाऊ पुरुष-भूमिका करू लागले. मात्र १९२४ सालात त्यांनी कंपनी बंद केली.

त्यांनी १९२६ मध्ये ‘यशवंत संगीत मंडळी’त ‘तुळशीदास’, ‘पटवर्धन’ या नाटकांतून कामे केली. पुढे हिराबाई बडोदेकरांच्या ‘नूतन संगीत नाट्यशाखा’ या मंडळीतही काम केले. या कंपनीत ‘मीराबाई’ नाटकात त्यांचे दयानंदाचे काम गाजले; पण १९३१ साली ही कंपनी बंद पडली आणि रामभाऊंच्या रंगभूमीच्या पंचवीस वर्षांच्या कारकिर्दीला विराम मिळाला. त्यानंतर १९३२ पासून मात्र मुंबई, पुणे येथे शिकवण्या, गाण्याचे जलसे, आकाशवाणीवरील गाणी, ध्वनिमुद्रिका यांमध्ये ते व्यस्त राहू लागले. पुणे, मुंबई व कुंदगोळ येथे वास्तव्यास राहू लागले. नाट्यजीवनामुळे खंडित झालेल्या संगीतसाधनेस त्यांनी वाहून घेतले. अब्दुल करीम खाँसाहेबांनी आपल्या गुणी शिष्याला गाण्याच्या साथीलाही बोलावले. भारतीय शास्त्रीय संगीताच्या क्षितिजावर तेजस्वीपणे तळपणारे किराणा घराण्याचे गायक म्हणून रामभाऊंनी कीर्ती मिळविली तो हाच कालखंड होता.

अब्दुल करीम खाँसाहेबांचे २७ ऑक्टोबर १९३७ या दिवशी निधन झाले. पण त्यांचा हा शिष्य किराणा घराण्याच्या गायकीची ध्वजा उंचावत राहिला. त्याचबरोबर किराणा घराण्याची उज्ज्वल अशी शिष्य-परंपराही निर्माण करीत राहिला हे रामभाऊंचे मोठे कार्य म्हणता येईल.

पौगंडावस्थेत असताना फुटलेला रामभाऊंचा आवाज कधीच पुन्हा पूर्ववत झाला नाही. तो जड, खरखरीत राहिला. मात्र खाँसाहेबांच्या आवाज साधनेच्या विशिष्ट पद्धतीमुळे, रामभाऊंच्या मेहनतीमुळे त्यांचे गाणे किराणा घराण्याच्या माधुर्याच्या परंपरेला साजेसे सिद्ध झाले.

‘भैरवी’, ‘तोडी’, ‘मियां मल्हार’, ‘दरबारी’, ‘जयजयवंती’, ‘मालकंस’, ‘कामोद’ ‘वसंत’, ‘अडाणा’ असे राग ते खुलवीत असत. ‘उगीच का कांता’, ‘चंद्रिका ही जणू’, ‘मम सुखाची ठेव’, ‘व्यर्थ छळियेले’, ‘रामरंगी रंगले’ अशी नाट्यपदेही ते बहारदारपणे म्हणत असत, तसेच ‘ना मारो पिचकारी’, ‘पी की बोली न बोल’सारख्या ठुमऱ्यांतही रंग भरत असत.

रामभाऊंच्या जीवनाच्या उत्तरार्धात त्यांच्या मैफलींप्रमाणेच त्यांनी संगीतविद्येचे अध्यापन करून मोठी शिष्यपरंपरा तयार केली हे ठळकपणे सांगता येईल. गंगूबाई हनगल, भीमसेन जोशी, फिरोज दस्तूर, बसवराज राजगुरू अशी त्यांची शिष्यपरंपरा पाहिली तर भारतीय संगीताच्या गुरु-शिष्य परंपरेला त्यांनी दिलेली अपूर्व देणगी आहे, असे म्हणावे लागेल.

वृद्धापकाळात पक्षाघात, उच्च रक्तदाब या विकारांनी रामभाऊ जर्जर झाले. ते १८ नोव्हेंबर १९४१ या दिवशी दादर येथील नप्पू सभागृहामध्ये अखेरचे गायले. पुण्यात स्थायिक झाल्यानंतर त्यांनी निवृत्त आयुष्य व्यतीत केले.

पुण्यात १९ जानेवारी १९४६ या दिवशी झालेल्या रामभाऊंच्या षष्ट्यब्दीपूर्ती सोहळ्यात युवा भीमसेन जोशी जाहीर कार्यक्रमात गायले आणि त्यांचे नाव सर्वत्र गाजू लागले. रामभाऊंच्या आयुष्यातला हा भाग्याचा दिवस ठरला. या शिष्याने पुढे जागतिक कीर्ती मिळवली.

रामभाऊंचे पुण्यात निधन झाले. कन्या प्रमिला, जामात डॉ. नानासाहेब देशपांडे, पत्नी, मुलगा व चाहत्यांचा मोठा परिवार त्यांच्या मागे होता.

त्यांच्या स्मृतिनिमित्त सवाई गंधर्व पुण्यतिथी महोत्सव १९५३ पासून सुरू आहे व भारतात मोठा भव्य संगीत महोत्सव म्हणून ओळखला जातो. सवाई गंधर्वांच्या १४ ध्वनिमुद्रिका उपलब्ध आहेत. समारोपाच्या दिवशी त्यांची ‘भैरवी’ची ध्वनिमुद्रिका वाजवली जाते व त्यांची स्मृती जतन केली जाते.

— सुलभा तेरणीकर

स

## सहस्रबुद्धे, वीणा हरी

**गायिका**

**१४ सप्टेंबर १९४८**

वीणा हरी सहस्रबुद्धे यांचा जन्म कानपूर येथे झाला. घरातूनच संगीताचा, ग्वाल्हेर गायकीचा वारसा



वीणाताईंना मिळाला. वडील पं. शंकरराव बोडसांकडून आणि बंधू काशिनाथ बोडसांकडून त्यांना ग्वाल्हेर गायकीची परंपरा प्राप्त झाली. पं. वसंत ठकार, पं. बलवंतराय भट्ट, पं. गजाननबुवा जोशी यांच्याकडूनही त्यांना शिक्षण मिळाले. लग्नानंतर काही काळ परदेशात वास्तव्य असताना तसे संगीत मागे पडले, तरीही विशेष म्हणजे मायदेशात परत आल्यावर, संगीताचा पुन:प्रवेश आयुष्यात किंचित उशिरा होऊनही त्यांनी अत्यंत मनस्वीपणे आणि गंभीरपणे गायकी वाढवून, संपन्न अशी कारकीर्द घडविली.

संगीत-अध्यापन, मैफली गायन, वाग्गेयकार (अनेक बंदिशींची निर्मिती), लेखन आणि ध्वनिमुद्रित संगीत या सर्व क्षेत्रांत त्यांचे कार्य विपुल आणि बहुमोल असे आहे.

त्यांनी संस्कृतमध्ये पदव्युत्तर शिक्षण घेतले; परंतु संगीत क्षेत्राची व्यवसाय म्हणून निवड केली. संगीतात पदव्युत्तर शिक्षण घेऊन, त्यानंतर त्यांनी तराण्यावर संशोधन करून डॉक्टरेट मिळवली. त्यांनी अनेक उत्तम तराणे बांधले.

मैफलीच्या गायिका म्हणून भारतभर अनेक ठिकाणी त्यांनी मैफली गाजविल्या. तानसेन समारोह, सवाई गंधर्व अशा महोत्सवांतून तर त्यांचे गायन अनेकदा झाले; परंतु परदेशांतही त्यांनी अनेक मैफली केल्या, गाजविल्या. 'Voices of the World' या कोपनहेगनमधील संगीतोत्सवासाठी त्यांना खास निमंत्रण होते.

वीणा सहस्रबुद्धे यांनी कानपूरला, त्यांच्या वडिलांच्या शंकर संगीत विद्यालयात १९७६ ते १९८५ पर्यंत शिकविले. त्यांनी १९८५ ते १९९० दरम्यान ना.दा. ठाकरसी विद्यापीठात, पुणे येथे संगीत अध्यापनाचे काम केले. त्यातील शेवटची दोन वर्षे त्यांनी विभाग प्रमुख म्हणून काम केले. त्यांनी १९९४ मध्ये स्टॉकहोममध्ये झालेल्या कंठसंगीताच्या एका समारोहात चर्चासत्रे घेतली. पुण्यामध्ये १९९० ते १९९७ पर्यंत पेन्सिल्वेनिया विद्यापीठातील विद्यार्थ्यांसाठी 'संगीत रसास्वाद' या विषयावर कार्यशाळा घेतल्या. जून २००२ ते मे २००४ या काळात त्यांनी मुंबई आय.आय.टी.मध्ये निमंत्रित अध्यापक म्हणून काम केले. मुंबईच्या सेंट झेविअर्स कॉलेजमध्येही त्यांनी अनेक चर्चासत्रे घेतली. ब्रिटनमधील खुल्या विद्यापीठात चित्रफितीद्वारे शिक्षणांतर्गत अभ्यासक्रमासाठी त्यांनी एक सिद्धहस्त कलाकार म्हणून काम पाहिले. त्या २००९ मध्ये कानपूर आय.आय.टी.मध्ये 'कलाकार' म्हणून कार्यरत होत्या.

वीणा सहस्रबुद्धे यांनी संगीतावर दर्जेदार लेखनही केले आहे. 'उत्तराधिकार' या त्यांच्या पुस्तकात, वडिलांचे (शंकरराव बोडस) आणि भावाचे (काशिनाथ बोडस) आणि स्वत:चे असे संगीतावरील लिखाण समाविष्ट आहे. तसेच २००५ मध्ये 'अबॅटन बुक कंपनी'ने त्यांचे 'वन थाउजंड माइंड्स' हे पुस्तक प्रसिद्ध केले. 'नादनिनाद' हे त्यांच्या परिवारातील व त्यांच्या स्वत:च्या बंदिशींचे पुस्तक प्रकाशित झाले आहे.

त्यांचे गायन विपुल प्रमाणात ध्वनिमुद्रित झाले आहे. एच.एम.व्ही., रिदम हाउस, बी.एम.जी., सोनी, म्यूझिक टुडे अशा प्रख्यात कंपन्यांनी त्यांचे जवळजवळ ५० अल्बम्स प्रकाशित केले आहेत. त्यांत राग-संगीताचे ख्याल, तराणा, ऋतुसंगीत, भजन असे विविध प्रकार समाविष्ट आहेत.

वीणा सहस्रबुद्धे यांनी सुरेल, घुमारेदार आवाज कमविला आहे आणि विशेष म्हणजे ही आवाजावरील पकड तीन तासांच्या मैफलीत शेवटपर्यंत राहते. भरपूर दमसासामुळे सर्व अलंकार समर्थतेने पेलण्याची आणि गळ्यातून निघण्याची सहजता या गायकीत आहे. ग्वाल्हेरचे बेहेलावेही या गायकीत मिळतात. अतिशय जोशपूर्ण मांडणी हे त्यांच्या गायकीचे मर्म आहे. विपुल गमक असलेली आलापीही यात आहे. त्या भरपूर गणिती लयकारी करतात, त्यातून त्यांचे तालावरचे प्रभुत्व दिसते. बंदिशींचा संदर्भ राग-बढतीत सतत जाणवतो. रागस्वरूपे अत्यंत सुस्पष्ट अशी असतात. त्यांची तान अत्यंत चपळ,

स

व्यामिश्र आणि संपन्न आहे. ख्यालात हरकती, मुरक्या अत्यंत प्रमाणित असल्याने ही गायकी भारदस्त आणि परिपक्व बनली आहे. त्यांच्या गायकीतील अभिव्यक्ती वीररसपूर्ण, जोशपूर्ण अशी  आहे.

आणखी एक मोलाची गोष्ट म्हणजे अनेक अप्रचलित, श्रोत्यांच्या कानांवर न पडलेल्या अशा बंदिशींचा अभ्यास करून वीणा सहस्रबुद्धे त्या मैफलीत पेश करतात. त्यामुळे त्यांच्या गायकीत बंदिशींची विविधता आणि समृद्धी आहे. दरबारी कानडा, श्री, मल्हार असे पुरुषी समजले जाणारे रागही त्या समर्थतेने पेश करतात. ख्याल, भजन, ऋतुसंगीत असे सर्व गानप्रकार वीणा सहजतेने गातात.

देशविदेशांत मैफली गाजवणाऱ्या वीणा सहस्रबुद्धे यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. भारतात व सध्या अमेरिकेतही त्यांनी अनेकांना संगीत शिकवले असून जयंती सहस्रबुद्धे, सावनी शेंडे, रंजनी रामचंद्रन इ. शिष्या त्यांचा वारसा चालवत आहेत.

— डॉ. शुभदा कुळकर्णी

## साठे, मनीषा राजस

**नर्तिका**

**२६ मे १९५४**



मनीषा राजस साठे यांचा जन्म पुणे येथे विमलाबाई व पुरुषोत्तम साठे या दांपत्याच्या पोटी झाला.आई-वडिलांकडून मनीषा साठ्यांना रंगभूमीचा वारसा मिळाला होता. वडिलांचे रंगांचे दुकान होते व ते हौशी दिलरुबावादक होते. आई ‘भरतनाट्यमंदिर’ या संस्थेत नाट्य दिग्दर्शिका व अध्यापिका होत्या. मनीषा साठे यांच्या नृत्यशिक्षणाचा प्रारंभ पं. बाळासाहेब गोखले यांच्याकडे झाला आणि नंतर त्यांना पं. गोपीकृष्ण यांच्याकडे नृत्यशिक्षणाचे धडे प्राप्त झाले. त्यांना सलग सहा वर्षे मार्गदर्शन मिळाले. त्यांनी २३ एप्रिल १९७५ रोजी ‘मनीषा नृत्यालय’ स्थापन केले. या नृत्यालयामार्फत त्या संपूर्ण भारतात गोपीकृष्णांच्या शैलीचा, शिक्षणाचा प्रसार करतात.

कलाकारात आवश्यक असणारी तांत्रिक परिपूर्णता, सौंदर्यदृष्टी, कल्पनाविलास आणि संवेदनशीलता यांचा योग्य मिलाफ त्यांच्या ठायी पाहायला मिळतो, तर गुरू म्हणून त्यांच्या अंगी असलेला संयम मोठा आहे. त्यामुळेच अवघड गोष्टी सोप्या करून शिकवण्यात त्यांची हातोटी आहे, तसेच अविरत शिकवण्याची चिकाटीही त्यांच्याकडे आहे.

त्यांनी विविध विषयांवर नृत्यसंरचना केलेल्या आहेत. यात पौराणिक विषयांपासून एकविसाव्या शतकातील पोखरणच्या अणुबाँब प्रकल्पापर्यंत अनेक विषय त्यांनी सारख्याच सफाईने हाताळले आहेत. १९९१ पासून जपानी संगीत आणि कथक या विषयांवर त्या सातत्याने विविध प्रयोग करत आहेत.

सवाई गंधर्व संगीत महोत्सव, खजुराहो नृत्य महोत्सव, काला घोडा महोत्सव, लखनौ रसरंग महोत्सव या आणि अशा अनेक महोत्सवांतून त्यांनी कथक नृत्य सादर केले. याचबरोबर ‘वारसा लक्ष्मीचा’, ‘सरकारनामा’ आणि ‘तारुण्याच्या लाटेवर’ या मराठी चित्रपटांतून त्यांनी नृत्यदिग्दर्शन केले, ज्यासाठी त्यांना महाराष्ट्र राज्य सरकारचा ‘उत्तम नृत्य दिग्दर्शक’ व ‘अल्फा टी.व्ही.’ पुरस्कार प्राप्त झाले. रोटरी इंटरनॅशनलचा ‘व्होकेशनल’ पुरस्कार, तर सिटाडेल मॅगझीनचे ‘एक्सेलन्स’ अवॉर्ड त्यांना २००६ मध्ये मिळाले. महाराष्ट्र सरकारने त्यांना ‘राज्य शासन पुरस्कारा’ने गौरविले आहे.

मनीषा साठे या टिळक विद्यापीठ, पुणे विद्यापीठ, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी, भारती विद्यापीठ या सर्व विद्यापीठांच्या सल्लागार समित्यांवर कार्यरत असून पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांसाठी मार्गदर्शक म्हणून त्यांची नियुक्ती झाली आहे.

— मंजिरी कारूळकर

**साठे, रवींद्र मोरेश्वर**
**गायक, ध्वनिमुद्रक**
**७ फेब्रुवारी १९५१**



रवींद्र मोरेश्वर साठे यांचा जन्म पुण्यातल्या संगीतप्रेमी कुटुंबात झाला. त्यांच्या आईचे नाव शकुंतला होते. त्यांचे वडील आकाशवाणीवर निवेदक होते. ते हार्मोनिअमही वाजवत. वयाच्या आठव्या वर्षीच रवींद्र साठे हे सुधीर फडके यांची गाणी सुरेलपणे म्हणत. त्यांनी मुकुंदराव गोखले यांच्याकडे संगीताचे प्राथमिक शिक्षण घेतले. बालपणातच साठ्यांना आकाशवाणीवर गाणे गायची संधी मिळाली.

पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून रवींद्र साठे यांनी पदवी मिळवली. पुढे त्यांनी ध्वनिमुद्रणाच्या अभ्यासक्रमासाठी पुणे येथील 'फिल्म इन्स्टिट्यूट'मध्ये ध्वनिमुद्रण विभागात प्रवेश घेतला. तेथून त्यांनी ध्वनिमुद्रण आणि ध्वनियांत्रिकीतील पदवी मिळवली. दरम्यान 'रोटरॅक्ट'ने आयोजित केलेल्या सुगम संगीत स्पर्धेत त्यांनी भाग घेतला आणि प्रथम क्रमांक मिळवला. त्यानंतर त्यांनी पं. नागेश खळीकर यांच्याकडे शास्त्रीय संगीताचे धडे घेण्यास सुरुवात केली.

रवींद्र साठे यांनी १९७२ साली विजय तेंडुलकर लिखित आणि जब्बार पटेल दिग्दर्शित 'घाशीराम कोतवाल' या नाटकात नट व गायकाची भूमिका साकारली. सदर भूमिकेसाठी त्यांना पुरस्कारही मिळाला. ते १९७२ ते १९९२ या काळात पाच आंतरराष्ट्रीय नाट्यमहोत्सवांत सहभागी झाले, तसेच त्यांनी अकरा देशांत दौरे केले. त्यानंतर त्यांना चित्रपटांत गाणी गाण्यासाठी आमंत्रणे मिळाली.

रवींद्र साठे १९७४ साली मुंबई दूरदर्शनवर ध्वनिमुद्रक म्हणून काम करू लागले. त्या वेळेस त्यांनी कुशल ध्वनिमुद्रणतंत्रज्ञ म्हणून नाव कमावले. मुंबई दूरदर्शनवर कार्यरत असताना त्यांना सुहासिनी मुळगावकरांमुळे 'अमृतमंथन' या कार्यक्रमात संस्कृत श्लोक गाण्याची संधी मिळाली.

डॉ. जब्बार पटेल यांच्या १९७५ साली प्रदर्शित झालेल्या 'सामना' या चित्रपटातील 'कुणाच्या खांद्यावर कुणाचे ओझे' या अविस्मरणीय गाण्याने रवींद्र साठे यांचा आवाज घराघरांत पोहोचला. साठ्यांनी १९८१ साली नोकरी सोडली आणि चित्रपटसृष्टीत स्वतंत्रपणे ध्वनिमुद्रक म्हणून ते काम करू लागले. त्यांना १९८१ साली 'उंबरठा' या चित्रपटाच्या ध्वनिमुद्रणासाठी सर्वोत्कृष्ट ध्वनिमुद्रकाचा पुरस्कार मिळाला.

गजानन वाटवे यांच्या गाण्यांच्या दोन भागांतल्या ध्वनिफितींचा संच रवींद्र साठे यांच्या आवाजामुळे १९८५ मध्ये लोकप्रिय ठरला. 'गगनी उगवला सायंतारा', 'मोहुनिया तुज संगे', 'मी निरांजनातील वात' या गाण्यांना त्यांच्या आवाजामुळे उजाळा मिळाला. गजानन वाटवे व सुधीर फडके यांना आदर्श मानणाऱ्या रवींद्र साठे यांनी आपल्या गायनाने स्वतंत्र ठसा उमटवला. आनंद मोडक यांनी स्वरबद्ध केलेल्या 'ओंजळीत स्वर तुझेच' या २००१ सालच्या ध्वनिफितीतील गीतांचे गायनही रवींद्र साठे यांनी केले. 'जैत रे जैत', 'सर्वसाक्षी', 'सवत', 'आक्रीत', 'उंबरठा', 'सिंहासन', 'अत्याचार', 'गारंबीचा बापू' या काही चित्रपटांमध्ये त्यांनी गायलेली गाणी गाजली.

स्वामी समर्थ, मोरया गोसावी यांच्यावरील भक्तिरचना, अथर्वशीर्ष, मनाचे श्लोक, भगवद्‌गीता, रामरक्षा, 'म्यूझिक टुडे'ची प्रार्थना, तसेच चिन्मयानंद परिवारासाठी त्यांनी केलेले संस्कृत गायन अतिशय लोकप्रिय ठरले. उत्तरा केळकर, रंजना जोगळेकर यांच्याबरोबर रंगमंचीय कार्यक्रमांतही साठ्यांनी गाणी सादर केली.

गजानन वाटवे, मधुकर गोळवलकर, सी. रामचंद्र, दत्ता डावजेकर, स्नेहल भाटकर, राम कदम, श्रीनिवास खळे, यशवंत देव, भास्कर चंदावरकर, हृदयनाथ मंगेशकर, आनंद मोडक, अशोक पत्की, अजय-अतुल

अशा जवळपास चार दशकांतील संगीत दिग्दर्शकांसाठी साठ्यांनी गाणी गायली. हिंदी भाषेत हरिप्रसाद चौरसिया आणि शिवकुमार शर्मा यांनी संगीतबद्ध केलेल्या दहा देवतांच्या दहा ध्वनिफितींना रवींद्र साठे यांनी आवाज दिला. रशिया येथील भारत महोत्सवात पं. रविशंकर यांनी स्वरबद्ध केलेल्या 'स्वरमिलन' या दीड तासाच्या कार्यक्रमात रशियन आणि भारतीय कलाकारांची सोबत रवींद्र साठे यांनी केली.

मराठी, हिंदी, गुजराती, ओरिसा, हरियानवी, आसामी अशा विविध भाषांमधील १७५ हून अधिक चित्रपटांसाठी रवींद्र साठे गायले आहेत. भक्तिगीते, श्लोक आणि स्तोत्रे यांच्या २५० हून अधिक ध्वनिफिती त्यांच्या आवाजाने समृद्ध झाल्या आहेत.

'जैत रे जैत' (१९७८), 'पश्चात्ताप' (१९९१), 'एक होता विदूषक' (१९९२), 'रावसाहेब' (१९९५), 'तू तिथे मी' या व यांसारख्या एकूण नऊ चित्रपटांच्या पार्श्वगायनासाठी उत्कृष्ट पार्श्वगायकाचे पुरस्कारही त्यांना मिळाले आहेत. 'नर्मदा तारा वेहेता पाणी' या गुजराती चित्रपटाच्या पार्श्वगायनासाठीही त्यांचा २००३ साली सन्मान करण्यात आला. गायनातील योगदानाबद्दल त्यांना 'नांदेड स्वामी समर्थ' पुरस्कार, अखिल भारतीय नाट्य परिषदेचा 'बालगंधर्व' पुरस्कार, स्वरानंदचा 'माणिक वर्मा' पुरस्कार, गदिमा प्रतिष्ठानाचा 'चैत्रबन' असे पुरस्कार प्रदान करण्यात आले.

— सुलभा तेरणीकर, अमोल ठाकुरदास

## साठे, शरद श्रीपाद

**गायक**

**१८ फेब्रुवारी १९३२**

निकोप, मृदू आवाज, त्याला लाभलेली अविरत मेहनतीची जोड, ख्याल-टप्पा-तराणा या गायनप्रकारांवरील विशेष प्रभुत्व या सर्वांमुळे हिंदुस्थानी शास्त्रीय कंठसंगीत क्षेत्रात आपला ठसा उमटवणारे पं. शरद श्रीपाद साठे यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांची आई यमुना दिलरुबा वाजवत असे. त्यांची मावशी लीला



लिमये या सुप्रसिद्ध गायिका होत्या. त्यांची थोरली बहीण डॉ. कमल केतकर ही पं. द.वि. पलुसकरांची शिष्या होय. घरातून संगीताचा असा वारसा लाभलेल्या शरद साठे यांचे शिक्षण पं. द.वि. पलुसकर यांच्याकडे १९४९ साली सुरू झाले. त्यांच्याकडील विद्यालयीन शिक्षणाबरोबर त्यांच्या सोबत केलेले दौरे, त्यांचा सहवास, श्रवण, निरीक्षण या सर्वांमुळे त्यांची गायकी आणि व्यक्तिमत्त्व या सगळ्यांचाच प्रभाव त्यांच्यावर पडला. मैफलीचे नियोजन, आचार-विचारांतील शिस्तबद्धता, वक्तशीरपणा, 'सुध-बानी, सुध-मुद्रा' ही गायकाची बैठक या वैशिष्ट्यांमुळे द.विं.प्रमाणेच साठेही लोकप्रिय कलाकार झाले.

त्यांना १९५६ पासून पुढील दहा वर्षे मुंबईत प्रा. बा.र. देवधर यांची तालीम मिळाली. त्यांच्याकडे अनेक प्रचलित आणि अनवट रागांमधील चिजा शरद यांना आत्मसात करता आल्या. त्यांना भारत सरकारची शिष्यवृत्ती मिळाली. अनेक बुजुर्ग कलाकारांना ऐकण्याची आणि त्यांच्याबरोबर साथसंगत करण्याची संधी शरद साठे यांना मिळाली. अनेक थोर कलाकारांच्या गायकीचा अभ्यासही त्यांना करता आला. १९६६ पासून १९९४ पर्यंत ग्वाल्हेर घराण्याचे अध्वर्यू आणि पं. कृष्णराव शंकर पंडितांचे शिष्य पं. शरच्चंद्र आरोलकर यांचा सहवास त्यांना लाभला. त्यामुळे ग्वाल्हेर गायकीचे यथार्थ दर्शन शरद साठ्यांना झाले आणि ख्याल, टप्पा, तराणा, ठुमरी या गायनप्रकारांचा विशेष अभ्यासही झाला.

तिन्ही विद्वान गुरूंचे मार्गदर्शन, इतर गायकीचा डोळस अभ्यास आणि अविरत मेहनत यांतून पंडित शरद साठे यांची स्वत:ची अशी गायकी तयार झाली आहे. स्वरांचा नजाकतपूर्ण लगाव, ख्यालाच्या मांडणीतील, बोलबनावातील विविधता, समेवर येण्याची पद्धत,

रागाची शुद्धता, तानांची विविधता ही त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये होत. ‘टप्पा’ हा अवघड गायनप्रकार गाणाऱ्या अगदी मोजक्या कलाकारांपैकी एक आणि द.वि. पलुसकरांनी लोकप्रिय केलेली भजने गाणारे कलाकार म्हणून ते ओळखले जातात.

पं. शरद साठे यांना ‘संगीत रिसर्च अकादमी’ पुरस्कार (२००६), ‘विनायकबुवा पटवर्धन’ पुरस्कार (२००९), ‘संगीतरत्न - काशी संगीत समाज’ पुरस्कार (२००७) आदी पुरस्कार प्राप्त झाले आहेत. पं. साठे आकाशवाणी व दूरदर्शनवरील उच्च श्रेणीचे कलाकार म्हणून ओळखले जातात. पं. विष्णू दिगंबर पलुसकरांवरील चित्रफितीसाठी (१९७२) त्यांनी आवाज दिला होता. त्यांनी मुंबई व पुणे विद्यापीठांत, तसेच महाराष्ट्रात इतरत्र ‘टप्पा’ या विषयावरील व्याख्याने दिली आहेत. युनिव्हर्सिटी ऑफ वॉशिंग्टन (सीॲटल) येथे पं. साठे यांच्या आवाजातील ग्वाल्हेर घराण्याचे ध्वनिमुद्रण संग्रहित केलेले आहे.

पं. शरद साठे यांनी एन.सी.पी.ए. मुंबई, तानसेन संगीत समारोह, सवाई गंधर्व समारोह, गुणिदास संगीत समारोह, महाराष्ट्र राज्य संगीत नृत्य महोत्सव, आकाशवाणी संगीत सम्मेलन, दूरदर्शन राष्ट्रीय कार्यक्रम, संगीत रिसर्च अकादमी - कोलकाता, विष्णू दिगंबर संगीत संमेलन - दिल्ली, तसेच अमेरिका, लंडन, दुबई, बहारिन येथील कार्यक्रमांत आपले गायन सादर केले आहे.

मुंबईतील जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्समधून ‘जी.डी. आर्ट’ ही दृश्यकलाविषयक पदविका मिळवलेले शरद साठे हे उत्तम सुलेखनकार (कॅलिग्राफर) म्हणूनही विख्यात आहेत. उपजीविकेसाठी त्यांनी ‘लिंटास’सारख्या नामवंत जाहिरात संस्थांमध्ये नोकरी केली व अनेक पुस्तकांचेही कलानिर्देशन केले. मुंबईतील ‘दादर माटुंगा कल्चरल सेंटर’ या महत्त्वाच्या संगीतसंस्थेचे कार्य गेली सुमारे तीस वर्षे त्यांनी केले असून सध्या ते या संस्थेचे अध्यक्ष आहेत.

— स्मिता महाजन

## सातारकर, कांताबाई

**तमाशा कलावंत**

**१५ ऑक्टोबर १९३९**



स्वातंत्र्योत्तर काळात आपल्या कलेद्वारे तमाशाचे नाव सर्वदूर पोहोचविण्याचे काम कांताबाईंनी केले. एक उत्तम अभिनेत्री, दिग्दर्शक, शाहीर व व्यवस्थापक अशा विविध भूमिकांमधून त्यांनी स्वत:ला सिद्ध करून दाखविले. त्यांनी १९४८ ते ८५ पर्यंत तमाशा रंगभूमीवर वावरताना अक्षरश: शेकडो भूमिका जिवंत केल्या.

कांताबाई सातारकरांचा जन्म गुजरातमधील डिंबा (जि. बडोदे) या छोट्याशा गावात झाला. आई-वडील दोघेही दगडाच्या खाणीत काम करायचे. पुढे कुटुंब साताऱ्यात स्थायिक झाले. तिथल्या नवझंकार मेळ्यात कांताबाईंनी वयाच्या नवव्या वर्षी सर्वप्रथम काम केले. त्यांनी काही दिवस स्थानिक तमाशात काम केले. पुढे त्यांनी याच क्षेत्रात मोठे नाव मिळवायचे या हेतूने मुंबई गाठली. मुंबईत सुरुवातीला दादू इंदुरीकरांच्या तमाशात व नंतर तुकाराम खेडकरांच्या तमाशात त्यांनी काम करायला सुरुवात केली.

त्यांचा १९५५ मध्ये तुकाराम खेडकरांशी विवाह झाला. खेडकरांच्या सोबतीने त्यांनी अनेक वगनाट्यांतून भूमिका केल्या. त्यांच्या अभिनयाला सर्वत्र दाद मिळू लागली. अनिता, अलका, रघुवीर व मंदा या चार अपत्यांच्या जन्मानंतर अचानक तुकाराम खेडकरांचे निधन झाले. पुढची तीन-चार वर्षे अतिशय कठीण गेली. कांताबाईंनी काही दिवस खानदेशातील आनंदराव महाजन यांच्या तमाशात काम केले. इतके दिवस फड मालकिणीच्या भूमिकेत असणाऱ्या कांताबाईंनी पुन्हा जिद्दीने उभे राहण्याचे ठरवले. अतिशय कठीण परिस्थितीत त्यांनी स्वत:चा तमाशा फड उभा केला.

त्यांचे 'रायगडची राणी', 'गवळ्याची रंभा', 'पाच तोफांची सलामी', 'सख्खा भाऊ पक्का वैरी' असे असंख्य वग संपूर्ण महाराष्ट्रात प्रचंड गाजले. तमाशा क्षेत्रात नवनवीन प्रयोग करण्यातही कांताबाईंचा हातखंडा होता. ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक अशा विविध प्रकारच्या वगनाट्यांतून त्यांनी समाजाचे प्रबोधन केले. कांताबाईंचा तमाशा फड १९८० पासून पुढे महाराष्ट्रातील अग्रगण्य तमाशा फड म्हणून गणला जाऊ लागला. मुलगी अनिता व मंदा यांनी आपल्या नृत्याच्या व अभिनयाच्या जोरावर महाराष्ट्रात स्वतंत्र ओळख निर्माण केली. दुसरी मुलगी अलका गायिका म्हणून, तर मुलगा रघुवीर महाराष्ट्रातील अव्वल सोंगाड्या म्हणून परिचित आहे.

मागील पाच दशकांत असंख्य पुरस्कार मिळवणाऱ्या कांताबाई सातारकर व त्यांची सर्व मुले संगमनेरला आपली कर्मभूमी मानतात. दिल्ली येथे २०१० मध्ये झालेल्या 'कॉमनवेल्थ गेम्स' प्रसंगी दिल्ली व चंदिगड येथे तमाशा सादर करण्याचा मान श्रीमती कांताबाईंच्या तमाशा फडाला मिळाला. आज त्यांची तिसरी पिढीदेखील तमाशाच्या रंगभूमीवर आपल्या कलेद्वारे रसिकांचे मनोरंजन करीत आहे. तमाशा क्षेत्रातील त्यांच्या योगदानाची दखल घेऊन महाराष्ट्र शासनाने त्यांना 'जीवन गौरव' पुरस्काराने सन्मानित केले आहे.

— संतोष खेडलेकर

## सावळाराम मास्तर

***खर्डेनवीस, पुरुषोत्तम प्रल्हाद***

**गायक, बासरीवादक**

**१८ जून १९०६ — ११ नोव्हेंबर १९५७**

'सावळाराम मास्तर' या नावाने सर्वत्र परिचित असलेल्या पुरुषोत्तम प्रल्हाद खर्डेनवीस यांचे जन्मस्थान चांदा हे होय. त्यांचे वडील खासगी काम करीत व भजन मंडळात गात असत. सावळाराम हे त्यांच्या द्वितीय पत्नी सावित्रीबाई यांच्यापासून झालेले एकच पुत्ररत्न. देवीच्या रोगामुळे पूर्ण अंध झालेल्या सावळारामांवर लहानपणापासूनच संगीताचे संस्कार होऊ लागले. सात वर्षांचे असतानाच त्यांचे आई-वडील इहलोक सोडून गेले. त्यांचे मामा वाचासुंदर त्यांना नागपूरला घेऊन गेले. मामांनी त्यांचे प्रेमाने पालन केले. सावळारामांची वृत्ती गुणग्राही होती. अनुकरणशक्ती अफाट होती.



नागपूरला प्रसिद्ध नाटक कंपन्यांचा मुक्काम असे. मामा सावळारामला नाटकाला नेत. मास्टर दीनानाथ, सवाई गंधर्व, सरनाईक अशा मातब्बर गायकांच्या हुबेहूब नकला करून त्यांनी 'रवि मी चंद्र कसा', 'खरा तो प्रेमा', 'शूरा मी वंदिले', 'मर्मबंधातली ठेव' इ. बरीच पदे पाठ केली. मामांकडे हार्मोनिअम होता. सावळाराम स्वत:हूनच तो वाजवू लागले. मामा चकित झाले. त्यांनी भाच्याला प्रसिद्ध हार्मोनिअमवादक गणपतराव दीक्षित यांचे मार्गदर्शन मिळवून दिले. एका नातेवाइकाने १९१९ साली मुंजीत त्यांना भिक्षावळ म्हणून एक बासरी भेट दिली. क्रमाक्रमाने फुंक, स्वर व त्यातून रागरागिण्या, पदे साकार होत गेली. मास्तरांचा पहिला जलसा नीलसिटी हायस्कूलमध्ये १९२० साली झाला.

सावळाराम मास्तरांना गणेशोत्सवात भरपूर कार्यक्रम मिळाले. दोन वर्षांनी त्यांनी चतुर संगीत महाविद्यालयात प्रवेश घेऊन पाच वर्षे शंकर प्रवर्तकांचे रीतसर मार्गदर्शन घेतले. यानंतर सावळाराम आपले नातलग रावबहादूर वाडेगावकर यांच्याकडे राहू लागले व हे दोघे एकत्र अभ्यास करू लागले. वामन व सावळाराम या दोघांनी १९२८ मध्ये अंध विद्यालयाची स्थापना केली व मास्तरांनी संगीत शिक्षकाचे कर्तव्य पार पाडून बरेच विद्यार्थी तयार केले.

त्यांचा १९३० मध्ये विवाह प्रमिलाबाई देशपांडे यांच्याशी झाला. त्यांनी १९३३ मध्ये 'सावळाराम

संगीत विद्यालय' ही स्वतंत्र संस्था काढून चालविली. तेथे त्यांनी गायन, बासरी, तसेच तबल्याचेही शिक्षण दिले. त्यांचे १९४८ पासून गायन व बासरीवादनाचे कार्यक्रम होऊ लागले. त्यांना मुंबईला बोलावून एच.एम.व्ही. कंपनीने त्यांच्या बासरीवादनाचे ध्वनिमुद्रण केले. तिलककामोद, काफी, शामकल्याण, भूप, दरबारी, 'चंद्रिका ही जणू' व 'शूरा मी वंदिले' या चिजांच्या व पदांच्या ध्वनिमुद्रिका निघाल्या. बासरीच्या ध्वनिमुद्रणाचा पहिला मान महाराष्ट्रातून मास्तरांना मिळाला.

एकदा कलकत्त्याला एका बैठकीत गवयाचा तबलजी न आल्याने मास्तरांनी तबला वाजवून संगत केली. नागपूरला १९४४ मध्ये पहिली मोठी संगीत परिषद मास्तरांनी खूप परिश्रमाने आयोजित करून वाद्यवृंदात बासरी वाजवून वाहवा मिळविली.

मास्तरांनी अनेक विख्यात कलाकारांची हार्मोनिअम संगतही केली. त्यांनी गायन व बासरी- वादनात सुमती मुटाटकर, उषा नंदनपवार, यमुना शेवडे, कमल पावणस्कर, कमलाबाई आठवले, केशवराव ठोमरे, देवीदास ओरके, भैयाजी पट्टलवार, नारायण मंगरूळकर असे अनेक शिष्य तयार केले. रा. स्व. संघाचे सरसंघचालक माधव गोळवलकरांनीसुद्धा काही दिवस मास्तरांकडे बासरीचे अध्ययन केले होते.

सावळाराम मास्तर प्रेमळ, विनोदी, तसेच स्वाभिमानी होते. त्यांची स्मरणशक्ती व माहिती दांडगी होती. पुढे नागपूर सोडून व संस्था बंद करून ते १९५५-५६ मध्ये गोंदिया येथील संगीतशाळेत शिक्षक म्हणून काम करू लागले. तेथेच त्यांना अर्धांगवायूचा झटका आला. नागपूर येथे एकावन्नाव्या वर्षी त्यांचे निधन झाले.

– वि.ग. जोशी

**संदर्भ :**

१. *मंगरूळकर, नारायण; 'वैदर्भीय संगीतोपासक', भाग १; मार्च १९७४.*

## सिंदे खाँ

***बाबा सिंदे खाँ***

**गायक**

**जन्मतारीख अनुपलब्ध – १७ जून १९५०**



बाबा सिंदे खाँ यांचा जन्म सिंध किंवा पंजाबमध्ये झाल्याचे सांगितले जाते. त्यांच्या वडिलांचे नाव अमीर खाँ असे होते. अमीर खाँ हे बन्ने खाँचे शिष्य व मामेबंधू होते. बन्ने खाँ हे पिढीजात धृपद गायक होते. लखनौ येथे हद्दू-हस्सू खाँचे गाणे ऐकून ते ग्वालियर येथे ख्याल शिकण्यासाठी गेले. एका प्रसंगातील बन्ने खाँची गुरुभक्ती पाहून हस्सू खाँनी त्यांना मनापासून तालीम दिली. पुढे दक्षिण हैदराबाद येथे त्यांची दरबारी गवई म्हणून नेमणूक झाली. बन्ने खाँनी अमीर खाँना गंडा बांधून त्यांना चांगली तालीम दिली.

अमीर खाँ हेही भरतीदार गवई होते. बन्ने खाँच्या मृत्यूनंतर त्यांच्या जागेवर अमीर खाँ रुजू होणार होते. तेव्हा त्यांच्या पत्नीने त्यांना सिंधमध्ये आपल्या मुलांना शिकवण्यासाठी बोलावून घेतले. तेव्हापासून अमीर खाँ सिंधमध्येच सेठ विसनदास या सिंधी व्यापाऱ्याकडे राहू लागले. सिंदे खाँचे शिक्षण अमीर खाँकडेच झाले.

अमीर खाँना प्यार खाँ, मुहम्मद खाँ, सिंदे खाँ व मिस्त्री खाँ असे चार पुत्र होते. प्यार खाँना अमीर खाँची तालीम मिळाली, त्याचबरोबर खाँ अलिबक्षांची पतियाळा घराण्याचीही तालीम त्यांनी घेतली होती. वडिलांच्या मृत्यूनंतर सिंदे खाँ प्यार खाँ यांच्याबरोबर राहू लागले. हे दोघेही सेठ विसनदास या व्यापाऱ्याकडे नोकर होते. नोकरीचा कंटाळा आल्यामुळे ते काबूलला गेले व पुढे एका वर्षाने कराचीला गेले. दोघा भावांचे पटत नसल्यामुळे नंतर ते वेगळे राहू लागले. सेठ विसनदास कराचीमध्ये असले की सिंदे खाँ त्यांच्याकडे राहत.

सेठ विसनदास हे कवी होते व वैराग्यपर काव्यरचना

स

करीत. सिंदे खाँचा ईश्वरभक्तीकडे लहानपणापासूनच ओढा होता. विसनदासांच्या काव्याचा त्यांच्यावर विशेष परिणाम झाला. सिंदे खाँनी गृहस्थी माणसाचे कपडे घालणे सोडून दिले व ते कफनी घालू लागले.

सिंदे खाँ १९१९ च्या आसपास मुंबईला आले. मुंबई शहर त्यांना आवडले. तसेच त्यांना काही शिकवण्याही मिळाल्या. सिंदे खाँचा स्वभाव तापट होता. त्यांची गायनविद्या उत्तम प्रतीची असल्यामुळे ते कोणाची भीड बाळगीत नसत. त्यांच्या निर्भीड स्वभावाचा राग येऊन मुंबईतील प्रस्थापित गवयांनी सिंदे खाँची प्रसिद्धी वेडा फकीर म्हणून करायला सुरुवात केली. त्यामुळे त्यांचे लक्ष संगीतावरून विचलित झाले.

खाँसाहेब मैफलीचे गवयी नव्हते. त्यांच्या पूर्वायुष्यात ते सिंध प्रांतात मैफली करत; पण मुंबईत त्यांच्या विशेष मैफली झाल्या नाहीत. मात्र चीज भरण्याची त्यांची शैली व हातोटी विलक्षण सुंदर होती. लयकारीतील जोर, कण भरण्याची रीत, समेवर बोल पकडून येण्याची तरकीब व चीज म्हणताना शब्दार्थाप्रमाणे स्वररचना ही त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये होती. थोरले बंधू प्यार खाँ यांच्या सहवासामुळे त्यांना पतियाळा घराण्यातील बऱ्याच चिजा मिळाल्या. ग्वालियर व पतियाळा या दोन गायकींच्या मिलाफातून त्यांची गायकी विशेष ढंगदार बनली.

बडे गुलाम अली खाँसाहेबांना सिंदे खाँबद्दल अतीव आदर होता. ते त्यांना खूप मानत. त्यांच्याजवळ ते लहानपणी शिकले होते व मुंबईत स्थायिक झाल्यावर सिंदे खाँकडून त्यांनी काही चिजाही घेतल्या होत्या. बी.आर. देवधरांना सिंदे खाँनी बऱ्याच चिजा शिकवल्या. बी.आर. देवधरांवर त्यांचा लोभ होता. बी.आर. देवधरांनीच त्यांच्यावर चरित्रपर लेख लिहून या शापित गंधर्वाचा संगीत जगताला परिचय करून दिला.

सिंदे खाँना काही लोक एक 'नशेबाज पागल' व 'भांडखोर वृत्तीचा गवई' समजत असत, तर दुसरे त्यांना दैवी शक्ती असलेला एक विद्वान गवई व अवलिया मानत असत. पण ते अत्यंत हुशार, बुद्धिमान, फकिरीवृत्तीचे एक स्वतंत्र अवलिया होते. वयाच्या पासष्ट-सहासष्टाव्या वर्षी त्यांचे किंग जॉर्ज हॉस्पिटल, मुंबई येथे निधन झाले.

**— सुधा पटवर्धन, माधव इमारते**

**संदर्भ :**

*१. देवधर, बी.आर.; 'थोर संगीतकार'.*

## सितारादेवी

**नर्तिका**

**१९२२**



सितारादेवी यांचा जन्म कलकत्ता (कोलकाता) येथे धनत्रयोदशीच्या मंगल दिवशी झाला. त्यांचे वडील पं. सुखदेव महाराज हे नेपाळच्या दरबारातील प्रसिद्ध संगीतकार होते. त्यांची आई मत्स्यकुमारी ही नेपाळच्या राजगुरूंची कन्या होती. सितारादेवींचे मूळ नाव धनलक्ष्मी होते. मोठ्या बहिणी अलकनंदा व तारा (पं. गोपीकृष्ण यांची आई) यांच्यासमवेत सितारादेवींनी नृत्याचे शिक्षण घेतले. त्यांना गुरू म्हणून पंडित सुखदेव महाराजांनी म्हणजे वडिलांनीच मार्गदर्शन केले. उच्चभ्रू समाजात मुलींनी नृत्य करणे अमान्य असल्यामुळे तत्कालीन समाजाने या कुटुंबावर बहिष्कार टाकला. परंतु या सामाजिक बहिष्काराला न घाबरता सुखदेव महाराजांनी आपल्या तीनही मुलींना नृत्याचे शिक्षण दिले.

पं. सुखदेव महाराज सितारादेवींकडून रोज दहा ते बारा तास नृत्यसाधना करून घेत. पं. सुखदेव महाराज हे तालमींच्या बाबतीत फार कडक शिस्तीचे होते; परंतु खूप मेहनत झाल्यावर पायाला तेल चोळून देण्याएवढे त्यांचे हृदय कोमलही होते. तसेच साधनेसाठी आवश्यक ताकद मिळवण्यासाठी पौष्टिक,

स

शक्तिवर्धक आहार मुलांना मिळाला पाहिजे, याकडेही ते कटाक्षाने लक्ष देत. गुरूंच्या कडक शिस्तीमुळे सितारादेवींनाही साधनेची गोडी लागली, म्हणून त्या रियाझाच्या वेळा काटेकोरपणे पाळत. एकच हालचाल शंभर वेळा करून त्यामध्ये सितारादेवी अचूकता आणण्याचा प्रयत्न करत. पायांची ताकद वाढविण्यासाठी त्या तासन्‌तास समुद्रकाठच्या रेतीमध्ये तत्कार करत.

सितारादेवींना पं. सुखदेव महाराजांबरोबरच कथक नृत्यातील अध्वर्यू पं. लच्छू महाराज आणि पं. शम्भू महाराज या बंधुद्वयांकडेही नृत्य शिकण्याचे भाग्य लाभले. त्यामुळे पं. लच्छू महाराजांच्या नृत्यातील लास्यांग आणि शम्भू महाराजांच्या नृत्यातील तडफ व चमक यांची प्रचिती सितारादेवींच्या नृत्यातून येते.

सितारादेवींनी कथक नृत्याव्यतिरिक्त भरतनाट्यम्, मणिपुरी या भारतीय शास्त्रीय नृत्यशैलींचाही खोलवर अभ्यास केला. लोकनृत्य, पाश्चात्त्य नृत्यांतही त्यांना रुची होती. विविध मैदानी खेळ, पोहणे इ.चीही त्यांना आवड होती. अशा या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाच्या सितारादेवींचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे भारतीय चित्रपटसृष्टीतही त्यांनी आपली छाप पाडली. नर्तिका म्हणूनच चित्रपटात काम करण्याची संधी त्यांना मिळाली, तसेच अभिनयातील परिपक्वतेमुळे प्रमुख नायिकेची भूमिकाही त्यांना साकारायला मिळाली.

संगीताच्या क्षेत्रातील मोठमोठ्या कलाकारांचा सहवास सितारादेवींना लाभला. पंडित रविशंकर, उस्ताद अल्लारखाँ, बडे गुलाम अली खाँ यांनी सितारादेवींच्या नृत्याचे कौतुक केले. त्यांना अनेक मानसन्मान मिळाले. गुरुदेव रवींद्रनाथ टागोर यांच्याकडून त्यांना ‘क्विन ऑफ कथक डान्स’ ही उपाधी मिळाली. त्यांनी १९६९ मध्ये ‘बिर्ला मातोश्री’ सभागृहामध्ये सलग बारा तास नृत्य करण्याचा विक्रम केला. त्यांना भारत सरकारकडून ‘पद्मश्री’ (१९७३) बहुमान व पुढे ‘कालिदास सन्मान’ (१९९५) मिळाला. तसेच त्यांना २००९ मध्ये संगीत नाटक अकादमी, दिल्लीतर्फे राष्ट्रपती प्रतिभाताई पाटील यांच्या हस्ते ‘फेलोशिप’ प्रदान करण्यात आली. नृत्यशिक्षणाचा प्रसार करण्यासाठी नव्वदीच्या घरातल्या सितारादेवी झटत असतात.

– माधुरी आपटे

## सौंथलिया, गोपाळ राधाकृष्ण

☛ *गोपीकृष्ण*

***

स




## हळदणकर, श्रीकृष्ण सावळाराम

***हळदणकर, बबनराव***

**गायक**

**२९ सप्टेंबर १९२७**



श्रीकृष्ण सावळाराम हळदणकर यांचा जन्म मुंबई येथे झाला. ते 'बबनराव' या नावाने परिचित आहेत. त्यांचे वडील सावळाराम हे आंतरराष्ट्रीय ख्यातीचे चित्रकार होते. त्यांच्या आईचे नाव लक्ष्मीबाई होते. बबनरावांचे शालेय शिक्षण 'शारदा विद्या मंदिर'मध्ये झाले. मुंबई विद्यापीठातून त्यांनी रसायनशास्त्र या विषयाची बी.एस्सी.(टेक.) ही पदवी घेतली. रसायन उद्योगात संशोधन व विकास अधिकारी म्हणून त्यांनी १९८५ पर्यंत काम केले.

त्यांनी १९५० ते १९५५ या काळात गानतपस्विनी मोगूबाई कुर्डीकर यांच्याकडे भरीव तालीम घेतली. दीर्घ दमसास, अस्ताई-अंतऱ्याची चपखल मांडणी या गोष्टी बबनरावांमध्ये रुजल्या.

पुढे आग्रा घराण्याचे श्रेष्ठ उस्ताद खादिम हुसेन खाँसाहेब यांच्याकडे १९६० ते १९७५ या काळात त्यांनी नियमितपणे तालीम घेतली व खाँसाहेबांच्या अखेरपर्यंत (१९९३) बबनराव त्यांचे मार्गदर्शन घेत होते. अनवट राग, वैविध्यपूर्ण बंदिशी, गायकीची अठरा अंगे, ढंगदार बोलबनाव, तसेच ख्याल, धमार, ठुमरी अशा विविध शैलींची तालीम त्यांना खाँसाहेबांकडून मिळाली.



नोम्‌तोम्‌चे नादसौंदर्य, लडिवाळ बोलबनाव, लयकारी व तिहायांवरील प्रभुत्व, आम रागांची अनोखी मांडणी व अनवट रागांमधील सहज संचार ही त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये आहेत. 'रसपिया' या नावाने त्यांनी अनेक ढंगदार व आकर्षक बंदिशी बांधल्या आहेत. बबनरावांनी 'कौसी जोग' व 'चांदनी मल्हार' हे राग निर्मिले.

आग्रा व जयपूर गायकीच्या सौंदर्यतत्त्वांची चर्चा करणाऱ्या 'जुळू पाहणारे दोन तंबोरे' या त्यांच्या पुस्तकास महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार १९९७ मध्ये प्राप्त झाला. 'मिलनोत्सुक दो तानपूरे' या नावाने हिंदीमध्ये या पुस्तकाचा अनुवाद झाला आहे.

'रागाज ॲज संग इन आग्रा घराना' (२००१), 'रसपिया बंदिशें' या पुस्तकांतून कॅसेटच्या संचासह बबनरावांच्या काही वैशिष्ट्यपूर्ण बंदिशी प्रकाशित झाल्या आहेत. 'घराण्यांची वाटचाल' हे अन्य घराण्यांची चर्चा करणारे पुस्तक त्यांनी संपादित केले आहे. एच.एम.व्ही.तर्फे बबनरावांच्या ध्वनिमुद्रिका प्रकाशित झाल्या असून आकाशवाणीचे ते 'अ' श्रेणीचे कलाकार आहेत. भारतभर, तसेच युरोप-अमेरिका येथेही त्यांच्या मैफली झाल्या आहेत.

गोवा कला अकादमी येथे १९८२ मध्ये संचालक पदावर काम करीत असताना देशभरातील विद्वानांना पाचारण करून ५४ रागांची स्वरूपे निश्चित करणारा 'रागों का प्रमाणीकरण' हा प्रकल्प त्यांनी यशस्वीपणे पार पाडला.

संगीत क्षेत्रातील उत्तम लेखनासाठीचा 'काका हाथरसी' पुरस्कार (२००३); भारत गायन समाज, पुणे यांच्याकडून 'माणिक वर्मा' पुरस्कार (२००३); प्रभा

अत्रे फाउण्डेशन पुरस्कार (२००४) व संगीत क्षेत्रातील कामगिरीसाठी महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार (२००७) असे पुरस्कार त्यांना लाभले आहेत. त्यांचा शिष्यपरिवार फार मोठा आहे. बबनरावांच्या पत्नी उषाताई यांची समर्थ साथ या सर्व वाटचालीमध्ये आहे.

– पौर्णिमा धुमाळे

## हळदणकर, सुरेश विनायक

**गायक, संगीतनट**

**१९२६ – १८ जानेवारी २०००**



महाराष्ट्रातील रसिकांना 'महाराष्ट्र गंधर्व' म्हणून परिचित असणाऱ्या सुरेश विनायक हळदणकरांचा जन्म पणजी येथे झाला. त्यांच्या आईचे नाव शांताबाई होते. त्यांचे शालेय शिक्षण गोव्याला पोर्तुगीज भाषेतून झाले. गोमंतकाच्या अस्सल भजनी परंपरेत लहानपणापासून त्यांची सांगीतिक जडणघडण झाली.

सुरेश हळदणकर यांचे खरे नाव अमृत हळदणकर होते. बाळासाहेब खाजगीवाल्यांनी त्यांचे नामकरण 'सुरेश' असे केले. बाळासाहेब खाजगीवाले आपल्या महेश संगीत नाटक मंडळीला गंधर्व कंपनीचा दर्जा प्राप्त व्हावा म्हणून मधुर आवाजाची मुले शोधत होते. गोव्यात त्यांना अमृत हळदणकर हा सुरेल, धारदार आवाजाचा मुलगा भेटला. तेव्हा हळदणकरांचे वय अवघे सतरा होते. त्यानंतर हळदणकर खाजगीवाल्यांच्या कंपनीतून संगीत नाटकांत काम करू लागले. या कंपनीत भास्करबुवा बखले यांचे शिष्य बापूराव केतकर आणि प्रख्यात हार्मोनिअमवादक पं. गोविंदराव टेंबे यांनी सुरेश हळदणकरांचा शास्त्रीय संगीताचा पाया पक्का करून घेतला. टेंब्यांनी भाऊराव कोल्हटकर यांचा ढंग हळदणकरांच्या गाण्यात उतरवला. ही तालीम १९५५ पर्यंत चालू होती.

खाजगीवाल्यांची कंपनी बंद झाल्यावर मुंबईत मा. मनहर बर्वे यांच्याकडे त्यांची तालीम सुरू झाली. पं. राम मराठे हे त्यांचे सहाध्यायी होते. गिरगावात ब्राह्मण सभेत त्यांची पहिली जाहीर मैफल जी.एन. जोश्यांनी घडवून आणली. सुरेश हळदणकरांचे मुंबईत सर्वत्र नाव झाले. गिरगावच्या गणेशोत्सवातही त्यांचे कार्यक्रम होऊ लागले. श्रोते रस्त्यावर उभे राहूनही त्यांचे गाणे ऐकू लागल्यामुळे रात्री ट्राम बंद करणे भाग होत असे, असे म्हटले जाते. पुढे जगन्नाथबुवा पुरोहित व गणपतराव देवासकर यांची त्यांनी तालीम घेतली. याशिवाय मोहनराव पालेकर (जयपूर), अन्वर हुसेन खाँ (आग्रा) यांचीही तालीम त्यांना मिळाली.

सुरेश हळदणकरांनी मोजक्याच संगीत नाटकांतून भूमिका केल्या. त्यांनी १९४७-४८ मध्ये वयाच्या एकविसाव्या वर्षी गंधर्व कंपनीच्या 'सौभद्र' या नाटकात नारदाची भूमिका केली. 'राधाधर मधुमिलिंद', 'पावना वामना' ही गाणी ऐकून रसिक श्रोते खूश झाले. सुरेश हळदणकरांचा खरा भाग्योदय झाला तो १९५४ साली आलेल्या चिंतामणी यशवंत मराठे यांच्या 'होनाजी बाळा' या नाटकातून. या नाटकाचे संगीत हेमंत केदार यांचे होते. यातील होनाजीची भूमिका पाहूनच आचार्य अत्रे यांनी त्यांना 'महाराष्ट्र गंधर्व' ही पदवी दिली. मराठी रंगभूमीवर गायक-नट म्हणून त्यांचा ठसा उमटला.

सुरेश हळदणकर यांनी 'होनाजी बाळा' या नाटकाबरोबरच 'संशयकल्लोळ', 'सौभद्र', 'विद्याहरण', 'जग काय म्हणेल' इत्यादी संगीत नाटकांतून भूमिका केल्या. उंच पट्टीचा आवाज, माधुर्य व गाण्याचा आकर्षक ढंग व आवाहकता यांमुळे रंगभूमीवरील त्यांचे गाणे प्रभावी होई. 'श्रीरंगा कमलाकांता', 'विमल अधर', 'गोविंदा रे गोपाळा', 'पद्मनाभा नारायणा', 'मानिली आपुली', 'सुरसुखखनी तू विमला', 'सुकांत चंद्रानना' इत्यादी नाट्यपदांच्या ध्वनिमुद्रिकांतून त्यांच्या गायनाचा प्रत्यय आपल्याला येतो. त्यांच्या रागदारी शास्त्रीय संगीताच्या काही ध्वनिमुद्रिका निघाल्या होत्या. नाटकांमधून निवृत्त

ह

झाल्यावर त्यांनी गायन विद्यालय काढले व उर्वरित काळ संगीताचे शिक्षण देण्यात व्यतीत केला. कुमार गंधर्वांचे व त्यांचे दृढ स्नेहबंध होते. कुमार गंधर्व यांचे आजारपणातून उठल्यावर मुंबईतील जे पहिले जाहीर गाणे झाले, ते सुरेश हळदणकरांच्या विद्यालयातच. सुरेश हळदणकरांच्या प्रमुख शिष्यांत प्रभाकर कारेकर, नीलाक्षी जुवेकर यांचा उल्लेख करावा लागेल. त्यांना मिळालेले काही पुरस्कार असे आहेत :

अ.भा. नाट्यपरिषदेचा 'बालगंधर्व' पुरस्कार (१९८०), महाराष्ट्र राज्य शासनातर्फे 'बालगंधर्व' पुरस्कार (१९९४), गोमंतक कला अकादमीतर्फे 'लता मंगेशकर' पुरस्कार (१९९५), तसेच नेहरूंच्या हस्ते त्यांना 'सुवर्णपदक' (१९५६) देऊन गौरविण्यात आले. गोवा स्वतंत्र झाल्यावर (१९६१) पहिले राष्ट्रगीत म्हणण्याचा मान त्यांना मिळाला. त्यांचे वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी मुंबईत निधन झाले.

— मधुवंती पेठे

## हिर्लेकर, श्रीकृष्ण हरी

**गायक**

**१८७१ – २२ ऑगस्ट १९५६**



गायनाचार्य पं. विष्णू दिगंबर पलुसकरांचे प्रथम शिष्य श्रीकृष्ण हरी हिर्लेकर यांचा जन्म गगनबावडा संस्थानात झाला. त्यांचा आवाज गोड होता आणि बालपणीच त्यांना भजने गाण्याची आवड निर्माण झाली. गगनबावडा संस्थानाचे अधिपती माधवराव मोरेश्वरराव हे उत्तम सतारवादक होते. तत्कालीन प्रसिद्ध कलाकार उ. अल्लादिया खाँ, उमराव खाँ, रहमत खाँ वगैरे या संस्थानात येऊन गाणे सादर करीत असत. बालवयात हे गाण्याचे कार्यक्रम ऐकून त्यांची अभिरुची संपन्न झाली.

त्यांचे वडील गगनबावडा संस्थानात राजोपाध्ये होते व वडिलांकडूनच त्यांना पारंपरिक वेदविद्या, हिशेबाचे व्यवहार यांचे शिक्षण मिळाले. मराठी सहावीपर्यंत शालेय शिक्षण झाल्यावर त्यांना संस्कृत शिक्षणासाठी बडोद्यास पाठवले गेले. तेथे बीनकार अली हुसेन यांच्याकडून हिर्लेकरांनी संगीताचे प्राथमिक धडे घेतले.

त्यांचा शास्त्रीय संगीताकडे असलेला ओढा पाहून संस्थानिकांनी त्यांना मिरजेला पं. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांच्याकडे शिकण्यासाठी पाठविले. तिथे शिकायला येणाऱ्या पं. विष्णू दिगंबरांशी त्यांचा परिचय झाला आणि श्रीकृष्ण त्यांनाही गुरुस्थानी मानू लागले. पं. विष्णू दिगंबर १८९६ साली मिरज सोडून गेले तेव्हा श्रीकृष्णदेखील त्यांच्याबरोबर गेले आणि विष्णूबुवांचे जिथे कार्यक्रम असतील, तिथे तेही गाऊ लागले.

महाराष्ट्र, गुजरात, काठेवाड प्रांती गायनार्थ भ्रमण करत ते ब्रजभूमीत, मथुरेला पोहोचले. तिथून दिल्लीला जाऊन पुढे पंजाबात गेले. या दरम्यान पं. पलुसकरांच्या सहवासात राहून शास्त्राचे अध्ययन, त्याचबरोबर स्वरलिपीची माहितीही त्यांनी घेतली. पं. विष्णू दिगंबरांनी संगीतबद्ध केलेल्या ऋग्वेदातील ऋचांचे गायन ऐकून प्रभावित झालेल्या डॉ. ॲनी बेझंट यांनी काश्मीरच्या महाराजांना त्याविषयी सांगितले. तेव्हा काश्मीरच्या महाराजांनी पलुसकरांना एका शिष्याला संगीत शिकवण्यासाठी पाठविण्याविषयी सांगितले. पं. पलुसकरांनी १९०३ साली पं. हिर्लेकरांना काश्मीरला पाठविले. तीन वर्षे तिथे संगीताचे शिक्षण देऊन पुढे त्यांनी १९०६ साली बनारसला संगीताचे अध्यापक झाले आणि फार उत्तम प्रकारे कार्य करून त्यांनी बरेच विद्यार्थी घडवले.

आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी वानप्रस्थाश्रमी गृहस्थाची जीवनचर्या अंगीकारली आणि भगवद्‌भक्तीत काळ व्यतीत केला. त्यांचे वाराणसी येथे निधन झाले.

— डॉ. सुधा पटवर्धन

**संदर्भ:**

१. *देवधर, बी.आर.; 'थोर संगीतकारांची परंपरा'; पॉप्युलर प्रकाशन; मुंबई, २००७.*

ह

## हिवरगावकर, पवळा तानाजी भालेराव

**तमाशा कलावंत**

**१२ ऑगस्ट १८७० – ६ डिसेंबर १९३६**

पवळा तानाजी हिवरगावकर यांचा जन्म संगमनेर तालुक्यातल्या हिवरगाव येथे तानाजी भालेराव व रेवूबाई यांच्या पोटी झाला. अतिशय गरीब कुटुंबातील तानाजी व रेवूबाईने खंडोबाला नवस केला होता व त्या नवसामुळे मुलगी झाली म्हणून तानाजीने नवसात कबूल केल्याप्रमाणे लहानग्या पवळाचे लग्न खंडोबाशी लावून तिला खंडोबाची मुरळी केले. पवळा लहानपणापासून दिसायला सुंदर, आवाज अतिशय गोड. मुरळी म्हणून खंडोबाची गाणी म्हणणारी पवळा नंतर वाघापूरच्या हरिबाबा घोलप यांच्याकडे नाचगाणे शिकली व तिने त्यांच्याच तमाशात नाचायला सुरुवात केली.

पूर्वीच्या काळी करमणुकीची माध्यमे अतिशय मर्यादित होती. तेव्हा मराठमोळ्या माणसाला घटका दोन घटका विरंगुळा मिळवून देण्याचे काम तमाशाने केले. तमाशा केवळ करमणूकच करीत नव्हता, तर कधी वगनाट्यांद्वारे, तर कधी लावण्यांद्वारे आपला इतिहास लोकांपुढे मांडायचा; लोकांना समजेल अशा सोप्या भाषेत सामाजिक संदेश द्यायचा. ब्रिटिशांच्या सत्तेचा अस्त जवळ येत होता. त्या काळात महाराष्ट्रात तमाशा सर्वांगाने फुलला-बहरला. सर्वसामान्य जनतेसाठी तमाशाचे जे खेळ व्हायचे, त्या काळात तमाशात स्त्रिया नसायच्या. सुंदर दिसणारी तरुण मुलेच साडी नेसून, पायात घुंगरे बांधून नाचायची. परंतु पवळाने सर्व प्रस्थापित रूढींना मोडीत काढीत तमाशात काम करण्याचा निर्णय घेतला व हरिबाबाच्या तमाशात नाचायला सुरुवात केली. तमाशात खरीखुरी स्त्री नाचते म्हटल्यावर सगळीकडे हरिबाबा घोलपांच्या तमाशाचे नाव झाले, लोक पवळासाठी हरिबाबाचा तमाशा बघायला गर्दी करायला लागले.

पुढे हरिबाबांनी तमाशा बंद करण्याचा निर्णय घेतला व त्यांनी गावोगावी कीर्तने करायला सुरुवात केली. पवळाने नामा धुलवडकर यांच्या तमाशात काम करायला सुरुवात केली. मुंबईत त्या काळी वेगवेगळे तमाशा फड गाजत होते. परंतु सगळीकडे पुरुषच नाचे होते. नामा धुलवडकरांचा फड जेव्हा मुंबईत गेला, तेव्हा अतिशय सुंदर स्त्री तमाशात नाचते याचे त्या वेळीही पुरोगामी समजल्या जाणाऱ्या मुंबईकरांना मोठे अप्रूप वाटले. मुंबईत पवळामुळे धुलवडकरांच्या तमाशाला मोठी गर्दी व्हायला लागली.

मुंबईत त्या काळी गाजलेल्या भाऊ फक्कड, शिवा संभा कौलापूरकर, दगडू कोंडीबा साळी, भागू नागू माळी, शंकरराव अवसीकर, रघू इंदुरीकर व पठ्ठे बापूरावांचे तमाशे अतिशय लोकप्रिय होते. पवळाच्या तमाशातल्या पदार्पणामुळे सर्वांच्याच नजरा नामा धुलवडकरांच्या तमाशाकडे लागल्या.

पवळामुळे मुंबईत नामा धुलवडकरांच्या तमाशाचा भाव वधारला होता. तमाशा कलेसाठी आपले घरदार, सर्वस्व सोडलेल्या पठ्ठे बापूरावांना आपल्या तमाशात पवळा असावी असे वाटू लागले. एका आमने-सामने रंगलेल्या तमाशाच्या सामन्यात पठ्ठे बापूरावांनी पवळाला जिंकले. पठ्ठे बापूरावांची उपजत प्रतिभा पवळाच्या आगमनानंतर अधिकच बहरली. पठ्ठे बापूरावांच्या तमाशात पवळाचा थाट आणखी वाढला. नखशिखान्त सोन्याने मढवलेली पवळा त्या काळी मुंबईहून संगमनेरला यायची व येथून तिच्यासाठी खास बनवलेल्या छकड्यातून हिवरगावला जायची. हिवरगावला पवळाने शेतीही घेतली होती.

हिवरगावला काही दिवस राहून पवळा पुन्हा मुंबईला जायची. पवळा व पठ्ठे बापूरावांमुळे इतर तमाशांचा प्रेक्षकवर्ग कमी व्हायला लागला. पठ्ठे बापूराव ब्राह्मण तर पवळा दलित समाजातील, या गोष्टीचा इतर तमासगिरांनी अपप्रचारासाठी वापर सुरू केला. आपल्या समाजातील नाचणारीण ब्राह्मणाने फितवली, त्यामुळे आपल्या समाजातील लोकांनी बापूरावांच्या तमाशात काम करायचे नाही असा निर्णय पीला हाउसमध्ये झालेल्या बैठकीत झाला.

ह

बापूरावांच्या विरोधात वातावरण तापू लागले. जातीपाती मानणाऱ्या त्या काळात पठ्ठे बापूरावांना तमाशासाठी साथीदार मिळेनासे झाले. पवळा व बापूरावांना आता या परिस्थितीतून मार्ग कसा काढायचा याची चिंता पडली. त्या काळी किसनदादा गवळी, हासमशेठ बांगडीवाले, हिराबाई परदेशी, अबूशेठ या लोकांचे थिएटर मालक म्हणून वर्चस्व होते. बापूरावांनी या सर्वांना सांगितले की, आम्हांला विकत तरी घ्या, नाहीतर आमचा लिलाव करा; परंतु या परिस्थितीतून मार्ग काढा. अखेरीस कलाकारांची कदर करणाऱ्या अबूशेठ यांनी पवळा व बापूरावांना दरमहा ९०० रुपये बोलीवर लिलावात घेतले.

पठ्ठे बापूराव व पवळाच्या तमाशाला सगळ्या महाराष्ट्रात गर्दी वाढत होती. तमाशाच्या वाढत्या गर्दीबरोबर पुन्हा एकदा पैशांचा प्रचंड ओघ सुरू झाला. बापूराव आणि पवळा, दोघेही सोन्याचे शौकीन. दोघांच्याही अंगावर सोन्याचे दागिने, भरजरी कपडे असायचे. हातात पैसा खेळायला लागल्यानंतर बापूरावांचा खर्चही वाढला. इतरांना मदत करण्याबरोबरच बापूरावांच्या गांजाचे व्यसन वाढतच होते. पवळा या गोष्टीमुळे चिडायची. परंतु बापूरावांच्या खर्चाला आळा बसत नव्हता. हळूहळू दोघांमधील मतभेद भांडणांपर्यंत जाऊन पोहोचले. अखेरीस रोजच्या भांडणाला कंटाळून पवळाने तमाशापासून दूर होण्याचा निर्णय घेतला.

पवळाने मुंबई सोडून हिवरगाव गाठले होते. पवळा बापूरावांच्या तमाशात असताना तिचे चाहते असलेल्या मसूरच्या मारुतीराव पाटलांनी पवळाची भेट घेतली. पवळाने पुन्हा तमाशात काम करावे यासाठी पाटलांनी वाघापूरच्या माधवराव घोलप (सुतार) यांची भेट घेतली. माधवराव घोलपांच्या मध्यस्थीनंतर पवळाने मारुतीराव पाटलांनी उभ्या केलेल्या नव्या फडात काम करायची तयारी दाखवली.

मारुतीराव पाटील कवडेकरांनी उभारलेल्या फडाची लोकप्रियता पवळामुळे सर्वत्र वाढत होती; परंतु एकदा काही कारणावरून पवळा व मारुतीरावांचे भांडण झाले. साताऱ्याच्या कोर्टात पवळावर दागिने चोरल्याच्या आरोपावरून पाटलांनी केस लावली होती. न्यायालयाने पवळाच्या बाजूने निकाल दिला. या घटनेनंतर पवळा पुन्हा तमाशा सोडून हिवरगावला आली.

पवळा हिवरगावला आल्याचे कळताच पठ्ठे बापूरावांनी थेट वाघापूर गाठले. तिथल्या माधवराव पहिलवानांच्या मध्यस्थीने त्यांनी पवळाची भेट घेतली. बापूरावांच्या आग्रहानंतर पुन्हा एकदा पठ्ठे बापूराव आणि नावचंद पवळा हिवरगावकर बहुरंगी तमाशा उभा राहिला. पुन्हा एकदा वैभवाचे दिवस आले. मात्र पुन्हा एकदा काही दिवसांनी पवळा व बापूराव वेगळे झाले, तमाशा बंद पडला. पवळा पुन्हा एकदा हिवरगावला आली.

एखाद्या सम्राज्ञीप्रमाणे जगलेल्या पवळाने अखेरच्या काळात खूप हाल सोसले. मुंबईतल्या आपल्या भावाकडे पवळा जीवनाच्या शेवटच्या घटका मोजीत होती. दम्याने संपूर्ण शरीर खंगून गेले होते. मुंबईतच तिचे निधन झाले.

— संतोष खेडलेकर

**हुसेन अमीर अहमद बक्श**

☛ ***अमीर हुसेन खाँ***

❇❇❇

ह

# परिशिष्ट



## १. संपादक परिचय

### केशवचैतन्य जगन्नाथ कुंटे



चैतन्य कुंटे हे युवा पिढीतील एक अष्टपैलू हार्मोनियमवादक, संगीतकार, संगीत अभ्यासक व व्याख्याते असे बहुपेडी व्यक्तिमत्त्व आहे. डॉ. अरविंद थत्ते यांच्याकडून हार्मोनियमवादन व हिंदुस्थानी संगीतातील संकल्पना व तंत्र या दोन्हीची सखोल तालीम त्यांना मिळत आहे. पं. मोहनराव कर्वे व डॉ. अशोक दा. रानडे यांच्याकडून रागदारीचेही शिक्षण ते घेतात. शिवाय अनेक बुजुर्गांच्या सहवासातून व शोधक स्वभावातून आपले सांगीतिक व्यक्तिमत्त्व समृद्ध करण्याचा त्यांचा प्रयत्न सतत चालू आहे.

पं. भीमसेन जोशी, किशोरी आमोणकर, नृत्यपंडिता रोहिणी भाटे इ. अनेक कलाकारांना चैतन्य कुंटे यांनी हार्मोनियमची संगत कुशलतेने केली आहे. साथसंगतीबरोबरच त्यांना एकल हार्मोनियमवादनचा व सप्रयोग व्याख्यानांचाही अनुभव आहे. एक चतुरस्र हार्मोनियमवादक म्हणून 'पं. गोविंदराव पटवर्धन पुरस्कार' देऊन २००७ साली त्यांना गौरविण्यात आले आहे.

प्रचलित व अप्रचलित रागतालांत वैशिष्ट्यपूर्ण अशा तीनशेहून अधिक बंदिशी त्यांनी रचल्या आहेत. या बंदिशींचे 'सुरन गाओ सरस' व 'संप्रति' हे कार्यक्रम त्यांनी केले असून त्यांच्या बंदिशींचे 'सृजन' - प्रथम व द्वितीय, 'रसिया' हे ध्वनिमुद्रित संच प्रकाशित झाले आहेत.

'रामदास पदावली', 'संतस्वरवेल', 'मनरंगाचे आभाळ', 'साज ठुमरीचा', 'एका कवितेसाठी', 'केशवसुत', 'ओंजळीत स्वर तुझेच' अशा कार्यक्रमांतील रचनांमध्ये चैतन्य कुंटे यांनी अभंग, भक्तिगीत, लावणी, भावगीत, गझल हे मराठी संगीतप्रकारांमधील प्रकार समर्थपणे हाताळले आहेत. 'ऋतुचक्र', 'अमूर्त', 'व्यथा बोलते काव्य चिरंतन', 'परशुरामविजयम्', 'शाकुंतल', 'पंचतत्त्वामृतम्', 'कृष्णलीलासंकीर्तन', 'वसुधात्मिका' या कथ्थक, भरतनाट्यम् व ओडिसी या नृत्यशैलींतील नृत्यप्रस्तुतींसाठी त्यांनी संगीत दिले आहे.

त्यांनी स्वरबद्ध केलेले 'भावांजली', 'आकाशमोगरा', 'दिनचर्या' हे संच प्रकाशित झाले आहेत. दूरदर्शनसाठी 'तपस्या' या मालिकेच्या शीर्षकगीतास संगीत दिले आहे.

संगीतकार म्हणून करत असलेल्या या बहुरंगी कामगिरीसाठी त्यांना २०१० साली स्वरानंद प्रतिष्ठानचा 'केशवराव भोळे संगीतकार पुरस्कार' देऊन गौरविण्यात आले आहे. तसेच संगीतक्षेत्रातील योगदानासाठी त्यांना २०११ मध्ये 'वसंतोत्सव पुरस्कार' देण्यात आला. 'टप्पा गायकी' या विषयावरील संशोधनासाठी त्यांना केंद्र सरकारच्या सांस्कृतिक मंत्रालयातर्फे २००२-०४ साली पाठ्यवृत्ती मिळाली होती व या प्रकल्पांतर्गत टप्पा गायकीवर संशोधन, लेखन व रंगमंचीय प्रस्तुती केली. 'ललित कला केंद्र', पुणे विद्यापीठ येथे अभ्यागत व्याख्याते व गुरू या नात्याने ते कार्यरत आहेत. चैतन्य कुंटे यांनी पारंपरिक संगीतप्रकारांच्या अभ्यासामधून 'मेघरंग', 'बसंतरंग', 'ऋतुचक्र', 'नायिका भावतरंग', 'कुमार गंधर्वदर्शन', 'कुमार-राग-विलास', 'प्रवाही', 'टप्पा गायकी - एक अवलोकन', 'भैरवी दर्शन' अशा 'संकल्पनमैफिलीं'ची निर्मिती व संहितालेखनही केले आहे.

'महाराष्ट्र कल्चरल सेंटर' व 'स्वरगंगा'च्या अनेक उपक्रमांत त्यांचे सर्जक योगदान असते. एम.ए. (इतिहास व भारतविद्या) व एम.फिल. (पुरातत्त्वशास्त्र) केलेले चैतन्य कुंटे हे संगीताचा एकंदर मानवी संस्कृतीशी असणारा संबंध यावर चौफेर विचार करत आहेत.

**शोधनिबंध :**

'टप्पा गायकी - समग्र चिंतन' (भावरंग संगीत समारोह स्मरणिका, जून २००५, भावनगर)

'मराठी नाट्यसंगीतावर टप्पा गायकीचा प्रभाव' (आय.टी.सी. संगीत रिसर्च अकादमीची शोधपत्रिका, क्र. २१, डिसेंबर २००७, कोलकाता)

'आधुनिक कलासंगीताच्या संदर्भात प्राचीन सौंदर्यशास्त्रीय कल्पनांचे पुनरावलोकन' (संस्कृत विभाग, मुंबई विद्यापीठातर्फे आयोजित राष्ट्रीय चर्चासत्रासाठी जानेवारी २०१०)

'हिंदुस्थानी संगीतातील शक्तितत्त्व' (साठे महाविद्यालय, मुंबई आयोजित 'भारतीय तत्त्वज्ञान, कला, पुरातत्त्व व साहित्यात शक्ती' या चर्चासत्रासाठी, मार्च २०१०)

**संपादन :**

'छंदोवती' - विख्यात गायिका मालिनी राजूरकर षष्ट्यब्दीपूर्ती गौरव स्मरणिका, २०००

'पुण्यस्वर २००९' - पुणे विद्यापीठाच्या भीमसेन जोशी अध्यासनाच्या दशकपूर्तीनिमित्त 'पुण्यातील संगीतसंस्कृती ' या विषयावरील विशेषांक

'पुण्यस्वर २०११' - पुणे विद्यापीठाच्या ललित कला केंद्र आयोजित 'बंदिश' चर्चासत्र विशेषांक

'स्वरस्मृती' - पं. मोहन कर्वे यांच्या सहस्रचंद्रदर्शनानिमित्त प्रकाशित गौरवग्रंथ, २०११

**लेख :**

'बंदिश - एक चिंतन' (आलाप दिवाळी अंक, २००२, पुणे)

'पुण्यातील संगीत' (इन्टॅक हेरिटेज मॅप, २००३, पुणे)

'संगीतविचारांची एक मैफल: डॉ. अरविंद थत्ते यांची मुलाखत' (स्वररंग सकाळ त्रैमासिक, एप्रिल २००९, पुणे)

'पुण्याच्या संगीतसंस्कृतीचा ऐतिहासिक आढावा' (पुण्यस्वर २००९, पुणे)

'महाराष्ट्र - अभिजात संगीताची राजधानी' (महाराष्ट्र पन्नास: कलात्म, २०१०, पुणे)

'प्रांगणीय संगीत' (संचित दिवाळी अंक, २०१०, पुणे)

'मास्तर कृष्णराव व कुमार गंधर्व - दोन युगनिर्मात्या कलाकारांचा तुलनात्मक विचार' (संगीत कला विहार, एप्रिल २०११, मुंबई)

सकाळ, लोकसत्ता, लोकमत, तरुण भारत या दैनिकांत अनेक स्फुट लेख.

## माधव प्रभाकर इमारते



संगीत आणि चित्रकला या दोन्हींवर सातत्याने वस्तुनिष्ठ परीक्षणात्मक लिखाण करणारे माधव प्रभाकर इमारते मूळचे नागपूरचे. त्यांचे शालेय शिक्षण नागपुरातच झाले. संगीत, नाटक, चित्रकला यांची आवड लहानपणापासूनच. संगीताचा वारसा घरातूनच लाभला. शालेय जीवनात अनेक नाटकातून छोट्या-मोठ्या भूमिका व गायन. मात्र मॅट्रिक झाल्यानंतरच संगीताचे शिक्षण सुरू झाले. नागपूरच्या पं. शंकरराव सप्रे यांच्या श्रीराम संगीत विद्यालयात प्रारंभिक संगीतशिक्षण झाले. पुढे १९७२ मध्ये मुंबईला आल्यावर श्री. अरविंद चाफळकर यांच्याकडे दोन वर्षे व नंतर नामांकित गायन गुरू पं. वसंतराव कुलकर्णी यांच्याकडे जवळजवळ चार ते पाच वर्षे संगीताचे धडे घेतले. काही कारणांमुळे आवाजात दोष निर्माण झाल्यामुळे मध्यंतरी तीन वर्षे कर्नाटक संगीतातील वीणावादनाचेही धडे घेतले. पुढे आवाज अनुकूल झाल्यावर गायन शिकण्यास पुन्हा सुरुवात केली. मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागातून आग्रा घराण्याचे सुप्रसिद्ध गायक कै. पं. गोविंदराव अग्नी यांच्या मार्गदर्शनाखाली पदविका (१९९०) तसेच पदवी परीक्षा बी.एफ.ए. (१९९४) उत्तीर्ण झाले. तसेच याच संगीत विभागातून पं. विद्याधर व्यास यांच्या मार्गदर्शनाखाली १९९६ साली पदव्युत्तर अभ्यासक्रमही पूर्ण केला. १९९२ पासून जवळजवळ अखेरपर्यंत सुप्रसिद्ध संगीतज्ञ डॉ. अशोक दा. रानडे यांच्या निकटचा सहवास व सौंदर्यशास्त्र, संगीतशास्त्र, आवाज जोपासनाशास्त्र इत्यादी विविध सांगीतीक विषयांत, तसेच सादरीकरणाबद्दलचे मौलिक मार्गदर्शन लाभले. मुंबई विद्यापीठाच्या संगीत विभागात, 'बायोग्राफीज अॅण्ड एसेज' या विषयाकरिता व्हिजिटिंग लेक्चरर म्हणूनही काम केले आहे.

आजवर संगीतविषयक लिखाण हे वृत्तपत्रातूनच झाले आहे. 'लोकप्रभा' या साप्ताहिकातून 'कॅसेटवार्ता' या सदरातून विविध प्रकारच्या ध्वनिफितींवर लिखाण केले आहे. तसेच महाराष्ट्र टाइम्स या दैनिक वृत्तपत्रातून 'क कॅसेटचा' या शीर्षकाच्या सदरातून शास्त्रीय संगीताच्या ध्वनिफितींवर परीक्षणात्मक लिखाण केले आहे व त्याला मान्यवरांची दाद मिळाली आहे. याशिवाय गायिकांच्या प्रदीर्घ मुलाखतीही घेतल्या आहेत.

मुंबईच्या सर जे.जे. स्कूल ऑफ आर्टमधून चित्रकलेचे शिक्षण झाले. १९७९ साली पेन्टिंगचा डिप्लोमा घेतला. १९८५ च्या आसपास सकाळ या दैनिकातून चित्रकलेवर लिखाण सुरू झाले. त्यानंतर केसरी, लोकसत्ता, महाराष्ट्र टाइम्स आदी वृत्तपत्रातून प्रदर्शनांची परीक्षणे, पुस्तक परीक्षणे, चित्रकार यावर लिखाण केलेले आहे. २००४ आणि २००५ या वर्षात सकाळ या वृत्तपत्राच्या 'अभिजात' मालिकेतून पाश्चात्त्य तसेच भारतीय चित्रकारांच्या कलाकृतींबद्दल आटोपशीर व नेमकेपणा ठेवून लिखाण केले आहे. वाई येथील मराठी विश्वकोशातही नोंदी लिहिल्या आहेत. १९९३-९६ या काळात कॅम्लीन कंपनीत (आर्ट मटेरिअल डिव्हिजन) रिसर्च असिस्टंट म्हणून कार्यरत होते. १९९९ साली जहांगीरमध्ये मोठे एकल प्रदर्शन भरले. आजवर दोन एकल प्रदर्शने व विविध समुह प्रदर्शनांतून सहभाग झालेला आहे. मुंबईखेरीज दिल्ली व बंगळुरू येथेही प्रदर्शने झालेली आहेत.

## सुपर्णा कुलकर्णी,
**कार्यकारी संपादक**



व्यासंगपूर्ण व विविध विषयांवरील लेखन, कोशनिर्मितीच्या कामातील उत्साही संयोजन व संपादन हे सुपर्णा कुलकर्णी यांचे वैशिष्ट्य आहे. यांनी बी.एस्सी.बी.एड. नागपूर येथून तर एम.ए. मराठी मुंबई विद्यापीठातून केले. शिल्पकार चरित्रकोशाच्या **'साहित्य'** व **चित्रकला** खंडांचे अनुक्रमे कार्यकारी व सहसंपादक म्हणून काम केले. मुंबई तरुण भारतच्या स्तंभलेखिका असून त्यांनी मुंबई तरुण भारत दिवाळी अंक २०१२ , व परम मित्र दिवाळी अंक २०१३ चे संपादन केले आहे.

त्यांची 'अशा बरसल्या धारा' हा काव्यसंग्रह व जुन्या नवीन कवितांवरील रसग्रहण, समीक्षणात्मक लेखांचा सग्रह 'काही ओळी अनुभवाव्या' ही दोन पुस्तके प्रकाशित झाली आहेत. साप्ताहिक विवेक मध्ये स्तंभलेखन केले आहे. तसेच विविध वृत्तपत्रे, दिवाळी अंकांमधून सातत्याने लेखन करीत आहे.



# परिशिष्ट

## २. लेखक परिचय



**अच्युत अभ्यंकर**
आकाशवाणीवरील व दूरदर्शनवरील 'अ' श्रेणीचे गायक. 'सूरसिंगार', 'गायनाचार्य' या पुरस्कारांनी सन्मानित.



**डॉ. कमल अभ्यंकर**
एम.ए.,पीएचडी.; 'राजशेखराची काव्यमीमांसा', 'गाभारा', 'हास्यतुषार' आदी पुस्तके प्रकाशित.



**सुनील अवचट**
बी.ई. (सिव्हिल), बासरीवादक; आकाशवाणीचे व दूरदर्शनचे 'अ' श्रेणीचे कलाकार.



**अनुराधा अनिल आगाशे**
बी.ए. (मानसशास्त्र), एम.ए.; कथक नृत्यात पदविका.



**माधुरी आपटे**
ललित कला केंद्र, पुणे येथील कथक नृत्य विषयात एम.ए. पदवी प्राप्त. भारतभर तसेच चीन, जपान, युरोप, अमेरिका या देशात कथक नृत्याचे सादरीकरण. 'सिंगारमणी' पुरस्काराने सन्मानित, सध्या पी.एचडी. साठी कार्यरत व ललित कला केंद्रात मानद गुरू, संगीत अभ्यासक्रमाच्या पुस्तकाचे लेखन.



**रवींद्र यशवंत आपटे**
बी.कॉम.; पत्रकारितेमध्ये पदविका.



**सुनंदा आपटे**
गायिका, आकाशवाणीच्या श्रेणीप्राप्त कलाकार, विविध जाहिरातींचे गीतगायन



**डॉ. मंगला आपटे**
बी.ए. (हिंदी), एम.ए. (संगीत), संगीताचार्य (अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय), श्री.ना.दा.ठा. विद्यापीठातर्फे चान्सलर्स प्राइज व गानहिरा पारितोषिक प्राप्त. देश- परदेशात शास्त्रीय, नाट्य व सुगम संगीताच्या मैफली, पुणे आकाशवाणीच्या मान्यताप्राप्त कलाकार, अनेक महाविद्यालयात संगीत परीक्षक. पुणे व इचलकरंजी येथे संगीत अध्यापन. जगन्नाथबुवा पुरोहित यांचे संगीतातील योगदान या विषयात पीएच.डी.



**व्हायोलिना उमराणीकर**
संगीत विशारद, बी.ए., बी.एड.



**उ. उस्मान खाँ**
प्रख्यात सतारवादक



**विश्वनाथ नीळकंठ ओक**
संगीतकार, गीतकार, समीक्षक, लेखक.



**प्रवीण करकरे**
तबलावादक. बी. कॉम., एम.ए. (तबला), संगीत अलंकार (अ.भा. गांधर्व महाविद्यालय), आकाशवाणीचे व दूरदर्शनचे श्रेणीप्राप्त कलाकार, शारदा संगीत विद्यालय वांद्रे येथे तबला अध्यापक म्हणून कार्यरत. सूर सिंगार संसदतर्फे 'तालमणी' पुरस्काराचे मानकरी.



**शरद करमरकर**
गायक, संगीत अलंकार, आकाशवाणी 'अ' श्रेणी कलाकार.



**विकास कशाळकर**
हिंदुस्थानी शास्त्रीय गायक, शिक्षक, संगीत दिग्दर्शक; बालभारती, पुणे येथून निर्माता म्हणून निवृत्त, ललित कला केंद्र पुणे, श्री.ना.दा.ठा. महाविद्यालय, अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालय, मुंबई येथे हिंदुस्थानी संगीताचे मार्गदर्शक



**प्रा. डॉ. मिलिंद कसबे**
'तमाशाचा शब्दकोश' या विषयात पीएच.डी.; नारायणगाव महाविद्यालयात मराठी विषयाचे विभाग प्रमुख म्हणून कार्यरत, पीएच.डी.चे मार्गदर्शक, समीक्षक; 'तमाशा : कला आणि कलावंत' हे पुस्तक प्रसिद्ध, तसेच विविध वर्तमानपत्रांतून व नियतकालिकांतून लेखन; 'दया पवारः साहित्यिक, माणूस आणि मित्र' या पुस्तकासाठी 'डॉ. आंबेडकर फेलोशिप' पुरस्कार (२००२) प्राप्त.



**डॉ. प्रकाश कामत**
ध्वनिमुद्रिकांचे संग्राहक (लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड्‌समध्ये नोंद).



**मंजिरी कारुळकर**
एम.कॉम., बी.एड.
कथक नृत्यअलंकार.



**प्रसाद प्रल्हाद कुलकर्णी**
बी.ए. संगीत विशारद, एम.ए. (संगीत) प्राथमिक शिक्षक ता. पंढरपूर, जि. सोलापूर. अ.भा. गांधर्व महाविद्यालय येथे परीक्षक म्हणून काम. राज्यस्तरीय माध्यमिक व ग्रामसेवक अधिवेशन या ठिकाणी गायन.



**रुपक कुलकर्णी**
बासरी वादक, पं. हरिप्रसाद चौरसिया यांचे शिष्य, आकाशवाणी व दूरदर्शनचे श्रेणीप्राप्त कलाकार, विविध अल्बम प्रकाशित.



**वसुधा कुलकर्णी**
सांख्यिकी शास्त्रात पदवीधर, नागपूर आकाशवाणीवर उद्घोषक म्हणून कार्य केले. 'कृष्णा कल्ले : एक कृतार्थ गीतप्रवास' हे पुस्तक प्रकाशित.



**डॉ. शुभदा कुलकर्णी**
बी.एस्सी., एल.एल.एम., एम.ए. (संगीत), पीएच.डी. (संगीत), पद्‌मश्री कल्याणजी सुवर्णपदक प्राप्त, 'गानहिरा' या पुरस्काराने सन्मानित; 'महाराष्ट्रातील संगीत परंपरा', 'गायिका अन् गायकी' ही दोन पुस्तके प्रकाशित. संगीतावर व अन्य विषयांवर प्रसारमाध्यमांतून सातत्याने लेखन.



**धनश्री खरवंडीकर**
एम.ए. (संगीत), संगीत अलंकार (गायन), संगीत अलंकार (हार्मोनिअम); श्री.ना.दा.ठा. महाविद्यालयात व्याख्याता.



**वंदना खांडेकर**
बी.ए., आकाशवाणीवर व दूरदर्शनवर कार्यक्रम, पार्श्वगायिका.



**संतोष खेडलेकर**
एम.ए. पत्रकारिता, वेट एन जॉय वॉटरपार्क, शिर्डी येथे उच्च पदाधिकारी, संगमनेर इतिहास संशोधन मंडळांचे संस्थापक, संगमनेर पत्रकार संघाचे अध्यक्ष, 'क्रांतीवीर भागोजी नाईक', 'गोष्ट एका गावाची' ही पुस्तके प्रकाशित.



**अनुराधा गरुड**
एम.ए. (इंग्रजी, संगीत) 'कालाय तस्मै नम:' या संगीत नाटकातील भूमिकेला महाराष्ट्र सरकारचे पारितोषिक प्राप्त, 'तरंगनाद' या पं. वि.रा. आठवले यांच्या पुस्तकाचा इंग्रजीत अनुवाद.



**संगीता गलांडे**
बी.कॉम., संगीत विशारद, कीर्तनकार



**भाई गायतोंडे**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. ५९६



**केशव गिंडे**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. ५९८



**रत्नाकर गोखले**
व्हायोलिन वादक, पं. डी.के. दातार यांचे शिष्य.



**डॉ. लता गोडसे**
गायिका, पुणे विद्यापीठात अध्यापक म्हणून कार्यरत.



**डॉ. रवींद्र घांगुर्डे**
गायक, पं. बबनराव हळदणकर व पद्माकर कुलकर्णी यांचे शिष्य, संगीत नाटकात भूमिका. मा. दीनानाथ यांच्यावर विशेष लेखन व संगीतविषयक शैक्षणिक कार्य.



**अमोघ घैसास**
बी.कॉम, एफ.सी.ए., एल.एल.बी., ए.सी.एस., 'एक सूर माझा, एक सारंगीचा' हे मॅजेस्टिक प्रकाशनातर्फे पं. रामनारायण यांचे चरित्र प्रकाशित.



**शशिकांत चिंचोरे**
संगीतविशारद, बासरीवादक, केशवराव गिंडे यांचे शिष्य. सवाई गंधर्व संगीत महोत्सवाचे संगीत समीक्षक. विविध वृत्तपत्रांतून संगीत विषयावर लेखने. संस्कारभारती अंतर्गत बासरीवादनाचे कार्यक्रम.



**मंजिरी चुनेकर**
बी.ए. (इंग्लिश लिटरेचर), एल.एल.एम., उद्योजिका.



**भीमण्णा जाधव**
सुंद्री वादक



**किशोरी जानोरीकर**
एम.ए. (संगीत); 'गानहिरा हिराबाई बडोदेकर' पुरस्कार प्राप्त.



**वर्षा जोगळेकर**
बी.एस्सी. (स्टॅट.), संगीत रंगभूमीवर कार्यरत.



**मनीषा जोशी**
गायिका, देवकी पंडित यांच्या शिष्या



**वि. ग. जोशी**
अनुवादक, लेखक



**सुषमा यशवंत जोशी**
एम.कॉम., अकाउंटन्सी आणि अर्थशास्त्र या विषयांच्या मार्गदर्शक, माहिम सार्वजनिक वाचनालय येथे कार्यवाह म्हणून कार्यरत.



**अमोल ठाकुरदास**
बी.एफ.ए. (जे.जे. स्कूल ऑफ आर्ट), फिल्म ॲंड व्हिडीओ प्रॉडक्शन (सेंट झेवियर्स महाविद्यालय), विविध दूरदर्शन मालिकांचे लेखन व दिग्दर्शन.



**सुलभा तेरणीकर**
बी.ए. (ऑनर्स, अर्थशास्त्र);
विविध वृत्तपत्रांमधून चित्रपट, संगीत, साहित्य व सामाजिक विषयांवर लेखन; 'स्वरप्रतिभा' या वार्षिकाचे संपादन; 'चंदेरी आठवणी' हे पुस्तक प्रकाशित; चित्रपट परीनिरीक्षण महामंडळाच्या माजी सदस्या; 'सामाजिक ज्ञानकोश' या तीन खंडांचे संपादन.



**आमोद दंडगे**
विशारद, अलंकार (तबला); 'सर्वांगीण तबला' (मराठी), 'तालार्णव' (हिंदी), 'कम्प्लीट तबला' (इंग्रजी) अशी पुस्तके प्रकाशित.



**स्वाती दातार**
नृत्यांगना; एम.ए. भरतनाट्यम्, 'स्वरदा' संचालिका.



**ज्योती दाते**
मुक्त पत्रकार; एम.ए., बी.जे. (पत्रकारिता), विविध वृत्तपत्रांमधून लेखन.



**मृदुला राजेंद्र दामले**
एम.ए. (अर्थशास्त्र)
मराठी संगीत नाट्य रंगभूमीवरील सुप्रसिद्ध व्यक्तिमत्त्वांवर अनेक वृत्तपत्रांमधून लेखन.



**मधुवंती देव**
गायिका, बी.एस्सी., एम.ए. (संगीत), आकाशवाणीच्या 'ब' श्रेणी कलाकार, ललित कला केंद्र येथे मार्गदर्शक



**मुकुंदराज देव**
तबलावादक



**संजय हरिभाऊ देशपांडे**
ऑर्गनवादक; बँक ऑफ इंडियामधून निवृत्त.



**सूर्याक्ष देशपांडे**
तबलावादक; बी.एस्सी., तबला अलंकार; पंडित अरविंद मुळगावकर यांचे शिष्य.



**सृजन देशपांडे**
गायक; 'संवाद फाउण्डेशन'च्या ध्वनिसंग्रहात संवर्धनाचे काम सांभाळतात.



**माधुरी देशमुख**
नर्तिका, नालंदा नृत्यकला महाविद्यालयातून एम.एफ.ए.ची पदवी प्राप्त व याच महाविद्यालयात नृत्याचे अध्यापन. मोहिनीअट्टम या नृत्यप्रकाराचे सादरीकरण.



**अद्वैत धर्माधिकारी**
बी.एस्सी. (प्राणीशास्त्र), एम.ए. (इंग्रजी), (मराठी), १८ वर्षे फार्मास्युटिकल कंपनीत कार्यरत, पाच वर्षे स्वाध्याय महाविद्यालय येथे इंग्रजीचे प्राध्यापक; आकाशवाणी, वृत्तपत्रे, नियतकालिकांसाठी लेखन, मुलाखतवजा कार्यक्रम, ध्वनिमुद्रक संग्राहक.



**डॉ. पौर्णिमा धुमाळे**
गायिका; पीएच.डी. (संगीत);
पुणे आकाशवाणीवर गायन, साहाय्यक प्राध्यापक म्हणून कार्यरत. (नाथीबाई ठाकरसी विद्यापीठ, पुणे)



**प्रदीप श्रीपाद नाटेकर**
मुंबई आकाशवाणीवर 'बी-हाय' श्रेणीचे कलाकार.



**अमिता नातू.**

एम.ए. (संगीत), संगीत विशारद, 'स्वरसाधना' पारितोषिक प्राप्त, ललितकला केंद्र पुणे येथे प्राध्यापक म्हणून काम. भारत गायन समाज येथे संगीताचे अध्यापन.



**डॉ. सुधा पटवर्धन**

हिंदुस्थानी रागसंगीताच्या गायिका, लेखिका व गुरू. राजस्थानातल्या कोटा शहराजवळच्या लाखेरी गावी सातवीपर्यंतचे शालेय शिक्षण झाल्यानंतर जयपूरजवळच्या बनस्थाली विद्यापीठात आठवी ते पदवीपर्यंतचे शिक्षण झाले. शाळेतच कथक नृत्य, तबला याचे प्राथमिक धडे मिळाले. तसेच उ. इमामुद्दिन डाग यांचेकडे धृपद-धमारचे शिक्षण घेतले. शालेय वार्षिकोत्सवात डॉ. राजेंद्र प्रसाद, पं. जवाहरलाल नेहरू, डॉ. सी.डी. देशमुख इ. व्यक्तींसमोर प्रस्तुतीकरण केले. विवाहानंतर आपले सासरे व ग्वाल्हेर घराण्याचे ज्येष्ठ गायक गुरू पं. विनायकराव पटवर्धन यांच्याकडेही संगीतशिक्षण झाले. अनेक बंदिशींची रचना केली. पैकी 'रागविज्ञान - भाग ७'मध्ये काही समाविष्ट. १९७४ पासून 'पं. विष्णू दिगंबर संगीत विद्यालया'च्या प्राचार्या. टिळक महाराष्ट्र विद्यापीठातून 'साहित्य पारंगत' (एम.ए. समकक्ष पदवी, १९८५) घेतली. कालिदासांच्या आणि इतर कवींच्या संस्कृत काव्याचे, तसेच प्रज्ञाभारती श्री. भा. वर्णेकर यांच्या 'श्रीराम संगीतिक' या काव्याच्या गायनाचे प्रस्तुतीकरण केले. डॉ. ग. ह. तारळेकर यांच्या मार्गदर्शनाखाली सामसंगीताचे प्रयोग केले. रागसंगीताच्या मराठी रचना, ग्वाल्हेर घराण्यातील तराणा यांच्या विशेष मैफिलींची प्रस्तुती. अखिल भारतीय गांधर्व महाविद्यालयाच्या 'संगीत कला विहार' मासिकाचे ५ वर्षे संपादन केले व सध्या संगीत मासिक, हाथरस याच्या मानद संपादिका म्हणून कार्यरत आहेत.



**भूपाल पणशीकर**

गायक; 'संवाद फाउण्डेशन'च्या ध्वनिसंग्रहात संवर्धनाचे काम सांभाळतात.



**अरविंद परांजपे**

अर्थसल्लागार, तबला वादक, एकल व प्रात्यक्षिक, तबलावादनात सहभाग, कलापिनी निर्मित 'स्वरकमलांजली' या कार्यक्रमांचे संयोजन व सहभाग.



**श्रीपाद राजाराम पराडकर**

बी.ए., संगीत विशारद; स्टेट बँकेतून निवृत्त, 'तीन प्रहर' गायनावरील सीडी प्रसिद्ध.



**मंजूश्री पाटील**

बी.ए. (हिंदी), एम.ए. संगीत (सुवर्णपदक); आकाशवाणीवरील 'अ' श्रेणीप्राप्त कलाकार.



**मधुवंती पेठे**

संगीत विशारद (गायन), 'समधुरा' संगीत विद्यालयाच्या संस्थापक, बी.ए. (इको स्टॅटस), नाट्यसंहितालेखक, विविध वृत्तपत्रात लेखन.



**वर्षा फडके-आंधळे**

बी.कॉम., एल.एल.एम. वरिष्ठ सहसंचालक - महिला व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य.



**उस्ताद फैयाज हुसेन खाँ**
व्हायोलिनवादक, गायक



**अंकुर बल्लाळ**
एम.ए. (समाजशास्त्र) कथक नृत्यविशारद, ओडिसी नृत्यविशारद



**डॉ. संगीता राजीव बर्वे**
बी.ए.एम.एस., एम.ए. (मराठी); आहारतज्ज्ञ, साहित्यभूषण, (कुसुमाग्रज प्रतिष्ठान); 'मृगतृष्णा', 'दिवसाच्या वाटेवरून' हे काव्यसंग्रह, तसेच बालसाहित्य प्रसिद्ध.



**सदाशिव बाक्रे**
बी.ए., पी.जी.डी. एच.आर.डी., संगीत विशारद, वर्तमानपत्रात संगीतविषयक लेखन, बदलांचे व्यवस्थापन या क्षेत्रात कार्यरत.



**डॉ. संगीता बापट**
बी.ए.,एम.ए. (सुवर्णपदक), पीएच.डी. 'साधना' साप्ताहिकाच्या संपादकीय साहाय्यक म्हणून कार्यरत; 'अथश्री' त्रैमासिकाच्या कार्यकारी संपादिका, विविध वृत्तपत्रांमधून व नियतकालिकांतून लेखन.



**गोविंद केशव भिडे**
एम.एस्सी. (भौतिक); भाभा अणुसंशोधन केंद्रात संशोधन अधिकारी; भारत इलेक्ट्रॉनिक्स, पुणे येथे मुख्य कार्यकारी अधिकारी.



**शिल्पा भिडे**
कथक कलाकार



**सुचेता भिडे**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. २७४



**नरसिंह जोशी मंगळवेढेकर**
बी.ए. बी.एड., हार्मोनियम व मृदंग वादक. द.र. कवठेकर प्रशाला पंढरपूर येथून मुख्याध्यापक म्हणून निवृत्त. दत्तोपंत जोशी मंगळवेढेकर यांनी रचलेल्या १०८ तालांची ध्वनिफीत प्रकाशित, मृदंग शिकण्यासाठी दहा पाठ असलेली दृक्श्राव्यध्वनिफीत इंग्रजी व मराठीतून प्रसिद्ध. 'फ्रॉम हियर टू इटर्निटी अलियास १०८ इंडियन तालाज्' हे पुस्तक प्रकाशित.



**नारायणराव मंगरूळकर**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. ८०७



**सौ. स्मिता महाजन**
नर्तिका, बी.ए. (गणित, संख्याशास्त्र), एम.ए. (कला) पुणे विद्यापीठ, संगीत विशारद (गांधर्व महाविद्यालय), पुणे विद्यापीठात अध्यापन.



**पं. यशवंतबुवा महाले**
मास्टर ऑफ म्यूझिक, 'सुजनदास' या नावाने बंदिश रचना, नियतकालिकांतून संगीतविषयक लेखन.



**सुधीर माईणकर**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. ८२१



**अरविंद मुळगावकर -**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. ८३८



**अलका राहाळकर**
बी.ए. (ऑनर्स), नृत्य विशारद (गांधर्व महाविद्यालय), कथक विषयात अध्यापन (पुणे विद्यापीठ), सध्या सृष्टी कथक केंद्रात गेली पंधरा वर्षे सातत्याने अध्यापन. जेसीज या राष्ट्रीय पातळीवरील नृत्य स्पर्धेत पारितोषिक प्राप्त.



**आसावरी आनंद राहाळकर**
बी.ए., एम.सी.एम., नृत्य विशारद, नृत्यअलंकार, संगीत विशारद, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ येथे प्राध्यापक म्हणून कार्यरत. अ.भा. गांधर्व महाविद्यालय येथे परीक्षक, सृष्टी कथ्थक केंद्राच्या संस्थापक, युनेस्कोच्या सभासद.



**प्रमोद रानडे**
गायक, दूरदर्शनवरील कार्यक्रमात गायन.



**लीनता वझे**
एम.ए. (संगीत), सतारवादिका



**डॉ. आश्विनी वळसंगकर**
बी.ए. (अर्थशास्त्र) एम.ए. (संगीत), संगीत विशारद, सुरेश बाबू माने यांचे संगीतातील योगदान या विषयावर पी.एचडी. (अखिल भारतीय गांधर्व महामंडळ, मुंबई) संगीत विषयावर विविध वृत्तपत्रांतून व मासिकांतून लेखन, संगीताचार्य परीक्षेच्या मार्गदर्शक, सोलापूर श्रुती गंधार संगीत महाविद्यालयाच्या प्राचार्या, ‘स्वरमयी गुरुकुल’ या संस्थेच्या संचालिका.



**डॉ. शुभदा वायंगणकर**
एम.ए. (संगीत), पी.एचडी. (संगीताचे मानसशास्त्र) शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर येथे मार्गदर्शक व अध्यापक.



**नेहा वैशंपायन**
बी.ए. (मराठी), एम.ए. (शास्त्रीय संगीत) मुंबई व पुणे आकाशवाणी निवेदिका म्हणून कार्यरत, दिवाळी अंकामध्ये लेखन, अशोक पत्की यांच्या ‘सप्तसूर’ पुस्तकाचे शब्दांकन.



**सुहास व्यास**
गायक पं. चिंतामण रघुनाथ व्यास यांचे चिरंजीव आणि शिष्य. ‘मृगरंजनी’ या संगीत नाटकाचे संहितालेखक.



**राधिका अनिरुद्ध शिर्के**
नृत्यांगना, नृत्यप्रशिक्षक



**देवदास शेजवळ**
फळ उद्योजक, हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताची विशेष आवड. तसेच छायाचित्रण हा आवडता छंद आहे.



**विजय सरदेशमुख**
गायक. पं. कुमार गंधर्व यांचे शिष्य. आकाशवाणीचे आणि दूरदर्शनचे श्रेणीप्राप्त कलाकार. ललित कला केंद्र, पुणे येथे गुरू. भारतात विविध ठिकाणी गायनाचे कार्यक्रम.



**मनिषा साठे**
विस्तृत परिचय पृष्ठ क्र. ३८८



**पं. शरद साठे**
विस्तृत परिचय पृष्ठ क्र. ९१६



**सौ. लीना मोहन हर्डीकर**
बी.ए., एम.ए. (संगीत).



**पं. बबनराव हळदणकर**
पाहा विस्तृत परिचय पान क्र. ३९६

* * *

# परिशिष्ट



## ३. उपयुक्त संदर्भ साहित्य


- कपिलेश्वरी बाळकृष्णबुवा 'अब्दुल करीम खाँ यांचे चरित्र', कपिलेश्वरी बाळकृष्णबुवा (प्रका.), १९७२.
- हुमणे राजाराम 'धन्य जन्म जाहला', श्रीविद्या प्रकाशन पुणे, १९८०.
- देवधर बा. र., 'थोर संगीतकार', अखिल भारतीय गांधर्व महा. मंडळ मुंबई, १९७३.
- देवधर बा. र., 'थोर संगीतकारांची परंपरा', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९९.
- रानडे रा. ग. व मारूलकर दत्ता, 'संगीत प्रो. ग. ह. रानडे', रा. ग. रानडे, मुंबई, १९९७.
- जोशी जी. एन. 'स्वरगंगेच्या तारी', मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, १९७७.
- केतकर कमल, 'परिमल' शरद प्रकाशन, मुंबई, १९९३.
- केळकर नी. म., 'भास्करबूवा बखले', कर्नाटक प्रकाशन संस्था, मुंबई, १९६७.
- दातार शैला, 'देवगंधर्व', राजहंस प्रकाशन, पुणे, १९९५.
- फुलंब्रीकर कृष्णराव, 'बोला अमृत बोला', सुपर्ण प्रकाशन, पुणे, १९८५.
- धामणकर भैयासाहेब, 'मा. कृष्णराव गौरव ग्रंथ', भा. कृ. गौरव ग्रंथ समिती, मुंबई, १९८३.
- संगोराम श्रीरंग-संपादक, विनयचंद्र मौद्‌गल्य-संपादक 'वंदे विनायकम', पं. वि. पटवर्धन स्मारक समिती, पुणे, १९८८.
- मंगरूळकर नारायण, 'वैदर्भीय संगीतोपासक (भाग १ व २)', मंगरूळकर विनया, नागपूर, १९७४.
- मुळगावकर अरविंद, 'आठवणींचा डोह', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २००६.
- वनारसे श्यामला, 'संगीताचे मानसशास्त्र', श्रीलेखन वाचन भांडार, पुणे, १९७३.
- डॉ. कुलकर्णी शुभदा, 'गायिका आणि गायकी (ठुमरी व ख्याल)', अमलताश डिझाईन्स ॲण्ड पब्लिकेशन , २०११.
- मारुलकर ना. र., 'गोमंतकीय संगीतकार', स्वरमंच मडगाव, गोवा, १९७६.
- भोबे गोपाळकृष्ण, 'कलात्म गोमंतक', कला अकादमी गोवा, दमण व दीव, १९७२.
- सरदेसाई मलबार, 'खांबघुमटांच्या सावलीत संगीत', दि गोवा हिंदु असोसिएशन मुंबई, १९७०.
- मोटे ह. वि. - संपादक, 'विश्रब्ध शारदा (खंड दुसरा)', मुंबई, १९७२.
- सामंत बाळ, 'मराठी नाट्यसंगीत', म. वा. देसाई, मुंबई, १९७५.
- जोशी बाबूराव, 'संगीताने गाजलेली रंगभूमी', स्कूल व कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, १९५९.
- देसाई व. शा., 'मखमलीचा पडदा', व्हीनस बुक स्टॉल, पुणे, १९६२.
- संगोराम श्रीरंग, 'वेध : संगीत नाटक आणि नाट्यसंगीत', पुणे, १९९३.
- संपादक साठे वसंत, 'चित्रसंपदा', जागतिक मराठी परिषद, मुंबई, १९८९.
- देव यशवंत, 'शब्दप्रधान गायकी', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९७८.
- अभ्यंकर शोभा, 'सखी भावगीत माझे', राजहंस प्रकाशन, पुणे, २०१२.
- रातंजनकर श्री. ना., 'संगीत परिभाषा', आयडियल बुक सर्व्हिस, पुणे, १९७३.
- गोखले श. वि., 'लयतालविचार', महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७९.
- संगोराम श्रीरंग, 'मुक्त संगीत संवाद', गानवर्धन संस्था, पुणे, १९९५.
- मारुलकर ना. र., 'संगीतातील घराणी आणि चरित्रे', स्वरसंपदा प्रकाशन, १९९२.
- हळदणकर बबनराव 'घराण्यांची वाटचाल', रागश्री संगीतप्रतिष्ठान, मुंबई, २००२.
- दात्ये ह. वि., 'गायनी कळा', दात्ये हरि विनायक, पुणे, १९६८.
- शिरगावकर कुंदा , 'अनाहत नाद', त्रिदल प्रकाशन, मुंबई, १९८४.
- भाटे रोहिणी, 'माझी नृत्यसाधना', सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणे, १९५०.
- भाटे रोहिणी, 'लहेजा', मौज प्रकाशन गृह. मुंबई, २००६.
- रानडे अशोक दामोदर, 'मला भावलेले संगीतकार', राजहंस प्रकाशन, पुणे, २०१०.
- रानडे अशोक दामोदर, 'लोकसंगीतशास्त्र', भारत मुद्रक आणि प्रकाशक लिमिटेड, १९७५.
- डॉ. चोरघडे विमल, 'महाविदर्भातील लोकगीतांचे संगीत', मनोहर ग्रंथमाला, पुणे, १९८७.
- कुलकर्णी श्री. रं., 'ओवी ते लावणी', १९८४.
- जोशी बाबूराव, 'संगीताचे रसग्रहण', मौनी विद्यापीठ, कोल्हापूर, १९५६.
- संगोराम श्रीरंग, 'आस्वाद संगीत समीक्षा', राजहंस प्रकाशन, पुणे, २००३.
- भोळे केशवराव, 'अस्ताई', मौज प्रकाशन, मुंबई, १९६२.
- भोळे केशवराव, 'अंतरा', मौज प्रकाशन, मुंबई, १९६७.
- भोळे केशवराव, 'वसंतकाकांची पत्रे', व्हीनस प्रकाशन, पुणे, १९६४.
- दीक्षित कृ. द ., 'अत्तर सुगंध', मौज प्रकाशन, मुंबई, १९८५.
- दीक्षित कृ. द ., 'षडज् गांधार', मौज प्रकाशन, मुंबई, १९६७.
- देशपांडे वामनराव, 'आलापिनी', मौज प्रकाशन, मुंबई, १९७९.
- शिरगावकर अ. बा., 'नादब्रह्म', रामकृष्ण बुक डेपो, मुंबई, १९६९.


✻✻✻





"मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे प्रत्येक पाऊल हे कुणीतरी एखाद्या व्यक्तीने उचललेले असते.
अशी व्यक्ती हीच प्रेरक व पथदर्शक राहते. मानवी संस्कृतीचा विकास हा अशा व्यक्तींच्या
परिश्रमांची अंतिम परिणतीच आहे. कारण व्यक्तीमध्येच नवोन्मेषी प्रतिभा
व ती साकार करण्याची ऊर्जा आणि प्रत्यक्षात आणण्यासाठी
आवश्यक ती कार्यपद्धती विकसित करण्याची क्षमता असते." - योगी अरविंद









साप्ताहिक विवेक

१२, कामत औद्योगिक वसाहत, ३९६, स्वातंत्र्यवीर सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी: (९१-२२) २४२२ १४४०/ ५६३९, फॅक्स : (९१-२२) २४३६ ३७५६
Email: charitrakosh@gmail.com Website: www.maharashtranayak.com